विवेक

आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण

# शिल्पकार चरित्रकोश

ही गाथा कर्तृत्वाची! प्रगल्भ नेतृत्वाची!

# ॥ इतिहास ॥

इतिहास । साहित्य । विज्ञान व तंत्रज्ञान आणि शिक्षण । न्यायपालिका - प्रशासन - संरक्षण । कृषी - सहकार । नाटक - चित्रपट । संगीत - क्रीडा ।
चित्र, शिल्प - उपयोजित कला । समाजकारण - पत्रकारिता - राजकारण । उद्योग - अर्थकारण - भविष्यवेध । धर्म - अध्यात्म - ललितेतर साहित्य । आरोग्य ।

# आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण
# शिल्पकार चरित्रकोश

## खंड १
# इतिहास

संपादक
डॉ. रा. श्री. मोरवंचीकर

प्रमुख प्रायोजक
निर्माण ग्रुप ऑफ कंपनीज

प्रकाशक
साप्ताहिक विवेक
(हिंदुस्थान प्रकाशन संस्था)

आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण
शिल्पकार चरित्रकोश, खंड १ : इतिहास


**पहिली आवृत्ती :**
ज्येष्ठ कृ. त्रयोदशी/चतुर्दशी
शके १९३१, २१ जून २००९

**प्रकाशक :**
**साप्ताहिक विवेक** (हिंदुस्थान प्रकाशन संस्था)
५/१२, कामत औद्योगिक वसाहत
३९६ – स्वा. सावरकर मार्ग, प्रभादेवी
मुंबई – ४०० ०२५.
दूरध्वनी : (०२२) २४२२ ९४५१,
२४२२ १४४०, २४२२ ५६३९
फॅक्स : (०२२) २४३६ ३७५६

**e-mail :**
charitrakosh@gmail.com
**Website :**
www.maharashatranayak.com

**संगणकीय अक्षरजुळणी :**
अक्षय फोटोटाइपसेटर्स
१–चित्रकूट सहनिवास, डॉ. आंबेडकर मार्ग,
ठाणे (पश्चिम) – ४०० ६०१.

**मुद्रक :**
सिद्धी ऑफसेट प्रा. लि.
प्रभादेवी, मुंबई – ४०० ०२५.

**मुखपृष्ठ :** आशुतोष सरपोतदार
**पृष्ठ मांडणी व विभाजक :** सुधीर खेडेकर
**रेखाचित्रे :** श्रीकांत कशेळीकर

**छायाचित्रांसाठी विशेष आभार :**
डॉ. अ. प्र. जामखेडकर
डॉ. सूरज पंडित, दिलीप बलसेकर

**आभार :**
महाराष्ट्र राज्य दर्शनिका विभाग
महाराष्ट्र राज्य पुराभिलेख विभाग
महाराष्ट्र राज्य पुरातत्त्व विभाग
मार्ग पब्लिकेशन्स
भारतीय संस्कृती कोश

**मूल्य : ९०० रुपये**

## इतिहास खंड

**संपादक**

डॉ. रा. श्री. मोरवंचीकर

**कार्यकारी संपादक**

दीपक हनुमंत जेवणे

**संपादकीय सल्लागार**

डॉ. गो. बं. देगलूरकर

डॉ. अरुणचंद्र पाठक

डॉ. अरुणा ढेरे

**प्रकल्प सहयोग**

निर्माण ग्रुप ऑफ कंपनीज, अंधेरी, मुंबई

दि सारस्वत को. ऑप. बँक. लि.

**खंड सहयोग**

महात्मा गांधी मिशन, औरंगाबाद

दि ठाणे जनता सहकारी बँक लि., ठाणे

पितांबरी उद्योग समूह, ठाणे

# भूमिका

आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण – शिल्पकार चरित्रकोश या महत्त्वाकांक्षी प्रकल्पातील पहिला खंड वाचकांच्या हाती देत असताना आम्हांला आनंद होत आहे. महाराष्ट्राच्या ऐतिहासिक जडणघडणीची ओळख करून देण्यापासून भविष्यकालीन महाराष्ट्राचा वेध घेण्यापर्यंत या प्रकल्पाची व्याप्ती आहे. महाराष्ट्राचा इतिहास, वर्तमान आणि भविष्य यांसंबंधी एक व्यापक जाणीव महाराष्ट्र राज्यनिर्मितीच्या सुवर्ण महोत्सवाच्या निमित्ताने आम्ही वाचकांसमोर ठेवत आहोत.

पहिल्या खंडात महाराष्ट्राच्या जडणघडणीच्या विभिन्न पैलूंचा परिचय वाचकांना करून देण्याचा आमचा प्रयत्न आहे. अतिशयोक्ती न करताही असे म्हणता येईल की, महाराष्ट्राचा परिचय एवढ्या व्यापक स्वरूपात आणि विभिन्न पैलूंचा विचार करून देण्याचा असा हा पहिलाच प्रयास असावा. ग्रंथाची पृष्ठमर्यादा लक्षात घेऊन अनेक विषयांचा ऊहापोह विस्ताराने करणे शक्य नव्हते. प्रत्येक विषयाचा स्वतंत्र ग्रंथ निर्माण व्हावा एवढी त्या-त्या विषयाची व्याप्ती आहे. विविध दृष्टिकोनांतून महाराष्ट्राच्या इतिहासाची तोंडओळख सर्वसामान्य वाचकांना करून देणे, हा प्रस्तुत खंडाचा उद्देश आहे.

हा प्रकल्प चरित्रकोशाचा असला, तरी ज्या ऐतिहासिक पार्श्वभूमीवर आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण झाली आहे व आगामी चरित्रकोशातील चरित्रनायकांनी आपली कामगिरी केली आहे, ती पार्श्वभूमी लक्षात यावी या दृष्टीने या खंडाची रचना इतर आगामी खंडांप्रमाणे व्यक्तिचरित्रात्मक न करता विविध क्षेत्रांच्या माहितीपर लेखांच्या स्वरूपात केली आहे. यानंतरच्या पुढील खंडांतून एकोणिसाव्या आणि विसाव्या शतकांतील पाच हजारांहून अधिक व्यक्तिमत्त्वांचा परिचय वाचकांना करून दिला जाईल.

इतिहास खंडाच्या पूर्वतयारीकरिता पुणे येथील इतिहास संशोधन मंडळात जी पहिली बैठक झाली, त्यातून या खंडाचा आराखडा निश्चित करण्यात आला. या खंडाचा प्रारंभिक आराखडा निश्चित करताना डॉ. श्यामा घोणसे यांचे मोलाचे सहकार्य लाभले आहे. या बैठकीत डॉ. रा. श्री. मोरवंचीकर, डॉ. गो. बं. देगलूरकर, डॉ. अरुणचंद्र पाठक, डॉ. अरुणा ढेरे, डॉ. श्यामा घोणसे, डॉ. शोभना गोखले, डॉ. सदाशिव गोरक्षकर, पांडुरंग बलकवडे, डॉ. गिरीश मांडके, गिरीश प्रभुणे, डॉ. वृंदा पाठारे, अरुण फडके, वृषाली फडके, डॉ. भा. रा. अंधारे हे मान्यवर उपस्थित होते. या सर्वांच्या सहकार्याबद्दल आम्ही आभारी आहोत.

हा प्रकल्प 'विवेक'ने हाती घेतला असला, तरी तो काही विशिष्ट व्यक्तींचा किंवा एका संस्थेचा प्रकल्प नाही. महाराष्ट्राच्या सामूहिक कर्तृत्वशक्तीमुळेच तो यशस्वी होणार आहे. या प्रकल्पासाठी महाराष्ट्रातील विविध क्षेत्रांतील एवढ्या अगणित व्यक्तींचा सहयोग मिळत आहे की, त्यांतील सर्वांचाच नामोल्लेख येथे करणे जागेअभावी अशक्य आहे. या प्रकल्पाला प्राचार्य राम शेवाळकरांचे आशीर्वचन लाभले आहे आणि ते प्रकल्पाच्या केंद्रीय कार्यकारिणीच्या संपादकीय सल्लागार समितीतही होते. प्रकल्पातील पहिलाच खंड प्रकाशित होत असताना ते आपल्यात नाहीत याचे दुःख मनाला वाटत आहे. त्यांची स्मृती मात्र संपूर्ण प्रकल्पात सदोदित सोबत करेल.

हा प्रकल्प यशस्वी करण्यासाठी विविध विषयांतील तज्ज्ञ, पुरस्कर्ते आणि ग्राहक यांचे सहकार्य लाभले आहे, लाभत आहे. त्याबद्दल आम्ही त्यांचे ऋणी आहोत. अशा प्रकारचा प्रकल्प भरीव अर्थसाहाय्याशिवाय पूर्ण होऊ शकत नाही. या साहाय्यासाठी प्रमुखतः निर्माण ग्रुप ऑफ कंपनीज, दि सारस्वत को-ऑप. बँक यांनी व अन्य अनेक प्रायोजकांनी सहकार्य दिले. त्यांच्या सहकार्यामुळे हा प्रकल्प यशस्वी करणे शक्य होणार आहे. त्या सर्वांना मनःपूर्वक धन्यवाद!

**– दिलीप करंबेळकर**

## साप्ताहिक विवेक

**प्रबंध संपादक**
दिलीप करंबेळकर

**संपादक**
रमेश पतंगे

**कार्यकारी संपादक (इ-विवेक)**
किरण शेलार

**मुख्य उपसंपादक**
मकरंद मुळे

**व्यवस्थापक**
शहाजी जाधव

**जाहिरात विभाग प्रमुख**
अमोल पेडणेकर

**प्रतिनिधी प्रमुख**
राहूल पाठारे

**विक्री आणि विदर्भ प्रमुख**
रविराज बावडेकर

**संपादकीय विभाग**
दीपक जेवणे
शीतल पालकर
रवींद्र गोळे

**कार्यालयीन साहाय्य**
अनंत मालप, आदिनाथ पाटील,
सुशांत डोके,
दयानंद शिवशिवकर, संजय पवार

**व्यवसाय प्रतिनिधी**
सचिन जाधव, अजय कोतवडेकर,
राकेश सोनार, प्रदीप निकम

# प्रकल्प समिती

## मार्गदर्शक समिती

एकनाथ ठाकूर (माजी खासदार)
सुरेश हावरे
डॉ. गिरीश वासुदेव

## सल्लागार मंडळ

श्रीराम दांडेकर
अनिल गचके
देवेंद्र देवस्थळे
संजय हेगडे
रवींद्र प्रभुदेसाई
राहुल सोलापूरकर
(संपर्क समन्वयक)

## संपादकीय समिती

डॉ. रा. श्री. मोरवंचीकर
डॉ. बाळ फोंडके
डॉ. सुभाष भेंडे
डॉ. चंद्रकांत वर्तक
डॉ. अशोक रानडे
डॉ. भा. र. साबडे
डॉ. द. र. बापट
वसंत रोकडे
सुहास बहुळकर
सुधीर नांदगावकर
जयराज साळगावकर
सूर्यकांत पाठक
विद्याधर ताठे

## सुकाणू समिती

**प्रबंध संपादक**
दिलीप करंबेळकर

**मुख्य कार्यकारी संचालक**
सी. ए. मिलींद आगरकर

**प्रकल्प समन्वयक**
मकरंद मुळे

**संपादकीय समन्वयक**
दीपक जेवणे

**संपादकीय साहाय्य**
सुपर्णा कुलकर्णी

**व्यवस्थापकीय समन्वयक**
शहाजी जाधव

**कार्यालयीन व विक्री समन्वयक**
सुशांत डोके

**विभागीय प्रतिनिधी**
महेश पोहनेरकर, पुणे
प्रसाद फडणवीस, नागपूर
दिलीप धारूरकर, औरंगाबाद
भाऊसाहेब मते, औरंगाबाद

# संपादकीय

# जडणघडण महाराष्ट्राची

साप्ताहिक विवेकने 'आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण– शिल्पकार चरित्रकोश' हा अतिशय उपयुक्त आणि महत्त्वाकांक्षी प्रकल्प हाती घेतला आहे. प्रस्तुत प्रकल्पांची १२ खंडात मांडणी करायची असून त्या मालिकेतील 'इतिहास' हा प्रथम खंड पूर्ण झाला आहे. या खंडाचे नाव इतिहास असे असले, तरी त्यामध्ये आधुनिक महाराष्ट्राच्या जडणघडणीशी संबंधित असणाऱ्या सर्व घटकांशी; जसे भूगोल, पर्यावरण, अर्थशास्त्र, कृषी व सिंचन, समाजशास्त्र, स्थापत्य–कला, संस्कृती आदी शाखांची पूर्वपीठिका मांडण्याचा प्रयत्न केला आहे. आगामी खंडांत महाराष्ट्राच्या ज्या शिल्पकारांचे योगदान अपेक्षित आहे, अशा सर्व शाखांचा विश्लेषणात्मक परिचय करून देण्याचा प्रयत्न प्रस्तुत खंडात केला आहे. त्यामुळे या खंडाला दिलेले इतिहास हे नाव प्रातिनिधिक असून, त्यामध्ये पूर्वोक्त सर्व शाखांच्या इतिहासाचे एका अर्थाने प्राक्कथन केले आहे, आणि मी एक हाडाचा इतिहास संशोधक असल्याची विवेकच्या मंडळीची समजूत आहे म्हणून त्यांनी मला या खंडाचे संपादकपद स्वीकारण्याची विनंती केली. आजपर्यंतचे विवेकच्या संपादक मंडळाचे आणि माझे संबंध विचारात घेता मला त्यांच्या या विनंतीचा अस्वीकार करणे शक्य नव्हते म्हणून मी ही जबाबदारी पेलण्याची तयारी दर्शवली. खंडात समाविष्ट केलेल्या विषयांचे अवलोकन केले, तेव्हा कुठे माझ्या लक्षात आले की, स्वीकृत जबाबदारी हे फार मोठे आव्हान आहे आणि आपण ते पेलू शकू का? कारण या प्रकल्पाकडे दृष्टिक्षेप टाकल्यास आपणासही पटेल की, इतिहास खंडाचा आवाका किती प्रचंड आहे. संबंधित प्रकरणे खंडास साजेशी अशी त्या–त्या विषयातील जाणकारांकडून लिहून घेतलेली आहेत.

**जनकेंद्रित इतिहास आवश्यक**

प्रत्येक विषयाला (Faculty) स्वतःचा वेगळा असा इतिहास असतो आणि या खंडात तोच देण्याचा प्रयत्न संबंधित विद्वानांनी आपल्यापरीनी केला आहे. तसे पाहिल्यास इतिहासाचे दोन प्रवाह आहेत. लोकइतिहास तथा जनइतिहास; ज्याला संशोधनाची चौकट असतेच असे नाही. तो काहीसा मिथक स्वरूपाचा असतो. तो लोकमानसात विशेष घर करून असतो– समकालीन इतिहासकाराला लोकमानसासारखा वास्तवाचा शेवट करता आला नसला, तरी लोकइतिहासकार त्याला लोकमताप्रमाणे आकार देत असतात. त्यांच्यावर संशोधनाचे किंवा वास्तवाचे कोणतेही दडपण नसते. याउलट दुसरा प्रवाह हा संशोधनात्मक किंवा वास्तववादी असतो, आणि तो इतिहासाचा आत्मा असतो. पण मागील काही काळात संशोधनातही एक विशिष्ट परंपरा रूढ होऊ पाहत असल्यामुळे त्यामधून माणूस हरवला आहे, याची अलीकडे जाणीव होऊ लागली आहे. इतिहासाचे आणि जनसामान्यांचे अतूट नाते आहे. (History has to do something with the people.) तथापि त्याचा इतिहास अद्याप अंधारातच आहे, अप्रकाशितच आहे. याची कारणे अनेक असू शकतात, तथापि आजपर्यंत इतिहासाची म्हणून जी साधने वापरली जात आहेत, ती एका विशिष्ट वर्गाची आहेत. त्यामध्ये प्रस्थापितांना विशेषतः नृपतींना केंद्रीभूत ठेवून त्याच्या व्यक्तिमत्त्वाला प्रकाशात आणण्यासाठी आवश्यक असणाऱ्या मर्यादित साधनांचाच विचार केला गेला आहे. उदाहरणच द्यावयाचे झाल्यास 'जलसंधारण' हे इतिहास–लेखनाचे मुख्य साधन असणे आगत्याचे आहे. पाणी नसेल तर कुठला समाज आणि कुठले राज्य? महाराष्ट्रासारख्या राज्यात तर जनतेचा इतिहास म्हणजे त्यांनी दुष्काळावर मात करून पाणी कसे मिळवले हाच असू शकतो. कारण आपल्याकडे दर चौथे वर्ष हे दुष्काळी वर्ष असते आणि नंतरची तीन

वर्षे ही त्याने परिस्थितीवर कशी मात केली, हे सांगणारी असतात. पण केवळ एका दुर्गाडीच्या दुष्काळाशिवाय अन्य दुष्काळांच्या नोंदी इतिहास-लेखनातून (हेतुतः) वगळण्यात आलेल्या दिसतात, त्यामुळे त्याचे स्वरूप 'History without people' असे भासते. थोडक्यात सामान्यांऐवजी गूढ व्यक्तिमत्त्वांभोवती संशोधन केन्द्रित होते. सामान्य माणसाच्या सामान्य संस्कृतीचे असामान्यत्व अशारीतीने उपेक्षिले जाते. म्हणून इतिहासात गूढगुंजनास, भव्य-दिव्य चमत्कारास वाव नाही, या वास्तवाचा स्वीकार करण्यास समाजमन अद्यापही फारसे तयार झाले आहे, असे वाटत नाही.

मानवी इतिहासाच्या प्रदीर्घ वाटचालीत प्रत्येक समाजाला अनेक दिव्यांतून जावे लागते. तथापि कालौघात अशा प्रकारच्या संघर्षाचे, इतिहासाचे उदात्तीकरण केले जाते. लोकइतिहास वास्तवतेवर कुरघोडी करण्याचा प्रयत्न करतो. अशा प्रतिकूल परिस्थितीमध्ये इतिहासाचा मुक्तपणे अभ्यास करून आपल्या पूर्वजांनी दिलेला लढा हा मानवी पातळीवरील उदात्त लढा होता. त्यामध्ये यत्किंचितही दैववाद, गूढवाद किंवा मायावाद नव्हता; हे स्पष्ट करण्याची आज नितांत गरज आहे. त्यासाठी सर्वस्पर्शी संशोधनाची गरज असते. पण अलीकडच्या संशोधनाचे स्वरूप सर्वस्पर्शी (integrated) न राहता ते एकांगी (lopsided) होत चालले आहे. परिणामी येणाऱ्या पिढीला आत्मवंचनेचे दुःख भोगावे लागेल आणि ही जबाबदारी केवळ आपल्यावर असणार आहे हे विसरून चालणार नाही.

दिवंगत इतिहासकार शेजवलकरांनी म्हटल्याप्रमाणे इतिहास हे महाराष्ट्राच्या मानगुटीवर बसलेले एक भूत आहे. आणि दुर्दैवाने त्याची प्रचिती आज ठायी-ठायी, पावलो-पावली येत आहे. कारण या समंधाची मानगुटीवरील पकड दिवसेंदिवस घट्ट होत चालली आहे. इतिहास माणसाला शहाणपण शिकवितो, असे जरी बेकन या ज्येष्ठ पाश्चिमात्य इतिहासकाराने म्हटले असले, तरी महाराष्ट्राच्या व देशाच्या आजच्या इतिहासवेडाकडे पाहिल्यास ते तितकेसे खरे वाटत नाही. राज्यातील रंजनवाद वाढतो आहे. तो खंडीत करण्याची जबाबदारी इतिहासकारांनी स्वीकारली पाहिजे. यामध्ये बलदंड राजकारण्यांचा आणि जातीयवादाचा शिरकाव, ही फार मोठी समस्या होऊ पाहत आहे. भावी संशोधक या गंभीर समस्येकडे डोळसपणे पाहतील आणि त्यावर उपाययोजना करतील अशी आशा आहे.

**लोकानुरंजनातील धोके**

राष्ट्राच्या पुनरुज्जीवनासाठी पुनरुज्जीवनवादाचा स्वीकार (acceptance of fundamentalism) काही काळाकरिता जगभरात जरूर केला गेला, तसा तो महाराष्ट्रातही झाला. तथापि या अवस्थेतून महाराष्ट्र बाहेर यावयास तयार नाही. त्यामुळे गतकालीन नेत्यांभोवती रुंजी घालण्यात समाज गुंग झाला आहे. राजा कालस्य कारणम् हा इतिहासातील एक प्रस्थापित प्रवाह आहे. लोकरंजन हा महाराष्ट्र संस्कृतीचा स्थायिभाव आहे. या भारावलेल्या अवस्थेत कधीकाळच्या अवतारवादाचा आपण पुरस्कार करत आहोत, याचे भान समाजाला राहिलेले नाही. त्यामुळे समाज-अस्मितेची जागा भासमान इतिहासाने घेतली आहे. ऐतिहासिक पुराव्यांच्या आधारे इतिहासाची पुनर्रचना करणे दिवसेंदिवस कठीण होत आहे. म्हणून इतिहास-संशोधकावर तथा समाज-सुधारकावर समाजाला वेळीच सावध करण्याची नैतिक जबाबदारी येऊन पडली आहे.

संयुक्त महाराष्ट्र चळवळीचे अध्वर्यू आचार्य अत्रे मोठ्या अभिमानाने सांगत असत की, महाराष्ट्राला इतिहास आहे व इतर राज्यांना भूगोल आहे. हे काही अंशी वास्तव असले, तरी महाराष्ट्रीय माणूस कल्पनारम्य अशा मध्ययुगीन कालखंडातून, त्या वेळच्या गनिमी डावपेचांतून बाहेर येण्यास तयार नाही. असह्य अशा वास्तवास सामोरे न जाता, तो मनाने मध्ययुगातच रममाण होऊ पाहत आहे. कधी काळी स्वीकारलेल्या पुनरुज्जीवनवादाचाच हा परिणाम होय. आत्मकर्तृत्वाचा इतिहास रोचक असतो, पण त्यामधून आत्मगौरवाचा भस्मासुर जन्मास येतो. यामध्ये मूळ इतिहासाचा गाभा केव्हा आणि कसा अदृश्य होतो, हेच समजत नाही. मध्ययुगाच्या पलीकडे महाराष्ट्रास काही इतिहास आहे, ही वस्तुस्थिती मान्य करण्यास मराठी माणूस तयार नसण्याचे एक महत्त्वाचे कारण म्हणजे आजवरच्या संशोधनाची दिशा व तिचा धांडोळा घेणारे संशोधक हे होय.

संशोधन लोकाभिमुख करणे निराळे आणि लोकसमजुतींना संशोधनात घुसडणे निराळे. विभूतिवादाच्या दृष्टिकोनातून प्राचीन महाराष्ट्राचा इतिहास लिहिण्याचा प्रयत्न झाला तथापि तो लोकमनाची फारशी पकड घेऊ शकला नाही. मग महाराष्ट्राला

प्राचीन इतिहास नाही, असे समजायचे का? अर्थात आहे तथापि तो अद्याप लोकाभिमुख झालेला नाही. तो लोकाभिमुख करण्याची जबाबदारी कोणाची? इतिहास संशोधकांची, साहित्यिकांची की ऐतिहासिक नाटककाराची? कारण दरम्यानच्या काळात ऐतिहासिक कथा-कादंबऱ्यांतून व नाटकांतून इतिहासावर बराच मारा करण्यात आला आणि हाच आपला खरा इतिहास आहे, अशी भल्याभल्यांची धारणा झाली. २०व्या शतकाच्या शेवटच्या पर्वात रामानंद सागरांनी आणि बी. आर. चोप्रांनी रामायण-महाभारतावर काही दूरदर्शन मालिका सादर केल्या आणि लोकांचा इतिहासाकडे पाहण्याचा दृष्टिकोनच बदलला आणि तेव्हापासून ते परवा-परवाच्या 'जोधा-अकबर'पर्यंतच्या प्रयत्नांत लोकरंजन हेच इतिहासाचे प्रयोजन आहे. अशी लोक-समजूत झाली. तेव्हापासून अनेक ऐतिहासिक चरित्र नायकांना इतिहासातून शोधून समाजाच्या व्यासपीठावर सादर करण्याचा प्रयत्न झाला. अशा प्रकारचा रंजन-प्रधान इतिहास सतत सादर केल्याने कोणता राष्ट्रवाद पोसला जातो आहे, याचा प्रत्येक वेळी अनुभव आला आहे. यासाठी शिल्पकार चरित्रकोशाचा उपक्रम उपयुक्त ठरणार आहे. तथापि लोकशाहीने बहाल केलेले लेखन तथा भाषण स्वातंत्र्याचे हक्क लेखकापासून कोण हिरावून घेणार?

भारतीयांना प्राचीन गौरवशाली इतिहासात गुंतवून ठेवणे, हे इंग्रजांचे मुख्य उद्दिष्ट होते. यासाठी त्यांनी रंजनवादाचाच पुरस्कार केला. आणि आजही त्यामधून आपण पूर्णार्थाने बाहेर पडलो नाही, हे वास्तव आहे. ही इतिहासाची देणगी आहे. अलीकडील काही संशोधकांनी ही कोंडी फोडण्याचा स्तुत्य उपक्रम केला आहे. आणि दाखवून दिले आहे की, केवळ ऐतिहासिक घटनांचा तथा ऐतिहासिक नायकांच्या कर्तृत्वाचा आलेख मांडणे म्हणजे इतिहास नव्हे. तर खरा इतिहास लिहिण्यासाठी समकालीन पर्यावरण, ऐतिहासिक व सांस्कृतिक भूगोल, भूगर्भशास्त्र पर्जन्यातील चढउतार, अर्थोत्पादनाची साधने, जलसंधारण, धार्मिक व सामाजिक संरचना आदी घटकांतील कार्यकारणभाव विचारात घ्यावे लागतात. महाराष्ट्रातील काही कालखंडाचा तशा पद्धतीने इतिहास लिहिण्याचा प्रयत्न झाला आहे तथापि बराचसा भाग बाकी आहे.

महाराष्ट्र इतिहास संशोधन क्षेत्रातील मागील पाच दशकांतील कामगिरीचा विचार केल्यास असे जाणवते की, काही अपवादात्मक संशोधन संस्थाच मूलगामी संशोधनात अग्रभागी आहेत. अन्य ठिकाणी चाललेल्या संशोधनावर भाष्य करणे उचित ठरणार नाही. महाराष्ट्राच्या इतिहासपूर्व आणि प्रागैतिहासिक कालावर तसेच पुरापर्यावरणावर बरेचसे काम झाले आहे आणि विशेष म्हणजे त्यामध्ये डेक्कन महाविद्यालय, पुणे ही एकमेव संस्थाच कार्यरत आहे. याचा विस्तार होणे काळाच्या दृष्टिकोनातून आवश्यक होते, पण तसे का झाले नाही, याचे कारण समजत नाही. या कालखंडातील महाराष्ट्रावर अद्याप म्हणावा तसा प्रकाश टाकण्यात यश आले नाही. महाराष्ट्रातील ताम्रपाषाण संस्कृती आणि नंतरचा ऐतिहासिक काळ यांमधील दुवे अद्याप जोडले गेलेले नाहीत. त्यामुळे इतिहास-लेखनात एक पोकळी निर्माण झाल्यासारखी वाटते.

**नैसर्गिक संपदा**

महाराष्ट्राच्या भूगोलाचा विचार केल्यास असे जाणवते की, गोदा, कृष्णा यांसारख्या प्रभावी नद्या सह्याद्रीच्या दऱ्याखोऱ्यांतून शतकानुशतके वाहत असल्या, तरी त्या गरीब पित्याच्या श्रीमंत कन्या असाव्यात असे वाटते. कारण त्या माहेराहून जाताना प्रत्येक वेळी पित्याकडून अगदी हट्ट करून अलोट जलसंपदा घेऊन जातात, पण संस्कृतीच्या आरंभीच्या काळापासून महाराष्ट्रात पाण्याची कमतरता (Water-defecit) जाणवते. तापी तशी बाहेरूनच येते आणि सातपुड्यातून मिळेल तेवढा जलसाठा घेऊन बाहेरच जाते. मग महाराष्ट्र संस्कृती जी बहरली; ती भीमा, प्रवरा, निरा, पांजरा, मांजरा, पवना, तेरणा-पूर्णा यांसारख्या उपनद्यांच्या खोऱ्यांत; हे भौगोलिक सत्य आहे. त्यामुळे सह्याद्रीच्या उभय क्षेत्रांपासून ते सातपुड्यापर्यंत पसरलेल्या आणि नरनाळा, गाविलगड, बस्तर यांसारख्या दुर्गम भागांनी व्यापलेल्या भूभागाची भौगोलिक आणि पर्यावरणीय वैशिष्ट्ये परस्परांहून भिन्न असलेली जाणवतात. परिणामी त्यांची जीवनशैली, भाषा, आहार-विहार आदी घटक भिन्न वाटतात. त्यामुळे हे भौगोलिक अडथळे विचारात घेऊन महाराष्ट्र राज्याच्या निर्मितीनंतर एकसंध महाराष्ट्र निर्माण होण्यासाठी आपण काय प्रयत्न केले, याचा विचार या वेळी होणे गरजेचे आहे. भाषावार प्रांतरचना या तत्त्वाचा आपण पुरस्कार केला नसता, तर त्या महाराष्ट्राचे चित्र कसे दिसले असते? राजकीय इच्छा म्हणून नव्हे तर लोकेच्छा म्हणून महाराष्ट्र एक संघ झाला आहे काय, हा खरा संशोधनाचा विषय आहे. ठरावीक काळानंतर स्वतंत्र

विदर्भाची मागणी होत असते. कालांतराने ती क्षीण होते आणि कालाच्या पोकळीत अंतर्धान पावते. मराठवाड्याला आपल्या आर्थिक मागासलेपणाचे दुःख सतत बोचत असते. कोकण आणि खानदेश हे प्राप्त परिस्थितीतून कठोर परिश्रमाने मार्गक्रमण करीतच असतात. मग महाराष्ट्र म्हणजे केवळ पश्चिम महाराष्ट्रच का? असा एक सुप्त मतप्रवाह भूगोलाने निर्माण केलेला आहे. शिवाय इंग्रजी राजवटीखाली ज्या काही पायाभूत सुधारणा झाल्या, जो काही आर्थिक विकास झाला; तो याच पट्ट्यात झाला असल्याने आणि स्वातंत्र्य लढ्याचे रणशिंग याच भूभागात फुंकले गेल्याने तसा काहीसा आभास निर्माण होण्यास मदत झाली आहे. याशिवाय छत्रपती शिवरायाचे राज्य या भूमीत निर्माण झाले. नंतरच्या वारसदारांच्या दोन गाद्या येथील जनमानसांत आजही पक्क्या घर करून आहेत. आणि आर्थिक दृष्टिकोनातून विचार केल्यास इंग्रजांनी सात बेटांना एकत्र गुंफून मुंबईला पूर्वेकडील ब्रिटिश वसाहतीच्या राजधानीचा (Colonial Capital) दर्जा दिला. ज्या प्रमाणात मुंबईचा विकास व विस्तार होत गेला, त्या प्रमाणात उपरोक्त पट्टा मुंबईला पोषक प्रदेश (Hinter-Land) म्हणून उत्स्फूर्तपणे जोडला गेला. यासाठी त्यांना कोणत्याच प्रकारचे आंदोलन करावे लागले नाही. ती एक भौगोलिक गरज होती. नैसर्गिक संरचनाच त्या पद्धतीची असल्याने महाराष्ट्राच्या इतर भूप्रदेशांच्या तुलनेत या भागाचा विकास झपाट्याने झाला, म्हणून अन्य भागांना तसे वाटणे स्वाभाविक होते. उशिराने का होईना शासनकर्त्यांना याची जाणीव झाली आणि त्यांनी विकास मंडळे निर्माण केली. विकास मंडळाचे विकास विरोधी राजकारण हा चिंतनाचा विषय आहे, कारण त्यांच्या निर्मितीने प्रादेशिक वादाला खतपाणी घातले गेले आणि मूलभूत हेतूच पराभूत झाला.

हा भौगोलिक शाप आहे. उःशापाच्या माध्यमातून त्याचे निराकरण होणे आवश्यक होते, पण ते होऊ शकले नाही; हा दुर्दैवाचा भाग मानावा लागतो. भौगोलिक वास्तवाचे दुसरे सुरेख उदाहरण म्हणजे सोलापूर, धाराशिव, उस्मानाबाद, अहमदनगर, धुळे नंदूरबार हा अवर्षणग्रस्त पट्टा होय. हा पट्टा कायम दुष्काळी पट्टा म्हणून इतिहास काळापासून ज्ञात आहे. पर्जन्याच्या दृष्टिकोनातून विचार केल्यास हा संपूर्ण पर्जन्य छायेत येणारा प्रदेश. येथे कोरडे वारे सतत वाहत असतात. या भौगोलिक परिस्थितीवर उपलब्ध भौगोलिक साधन-संपत्तीचा वापर करूनच मात करणे गरजेचे आहे. या मानवी कर्तृत्वाचे, जिद्दीचे उदाहरणही आपल्याला नगरसारख्या अत्यंत दुष्काळी प्रदेशात सापडते. या प्रदेशातील लोकांनी भंडारदऱ्यासारखे धरण उभारून जिल्ह्याच्या सहा तालुक्यांचा कायापालट तर केलाच शिवाय आर्थिकदृष्ट्या इतकी समृद्धी निर्माण केली, की त्याची बरोबरी उर्वरित महाराष्ट्र करू शकत नाही याचे आणखी एक उदाहरण पाहा.

तापी नदी खानदेशाची माता म्हणून ओळखली जाते. तथापि ती उत्तरेकडे सतत खचत चालली आहे. तिला खचदरीचे स्वरूप प्राप्त झाले आहे. जलसंधारणाच्या दृष्टिकोनातून तिची उपयुक्तता कशी वृद्धिंगत होईल, हा अभियांत्रिकी कौशल्याचा भाग आहे. अद्यापपर्यंत तिच्यावर एकही मोठे धरण बांधले नव्हते. अलीकडेच प्रकाशेजवळ तिच्यावर प्रचंड धरण उभारण्यात आले आहे. आशा करू या की, प्रवरा खोऱ्यासारखी येथेही हरित-क्रांती होईल आणि खानदेशाची जलत्रुटी काही प्रमाणात कमी होईल. याउलट पांजरा या तापीच्या उपनदीवर तिच्या भौगोलिक रचनेचा लाभ घेऊन लोकांनी आजपर्यंत शेकडो बंधारे उभारून मागील काही शतकांपासून संपूर्ण आशिया खंडातील एकमेव अशी फड-जलसंधारण पद्धती (Block System of Water Conservation) अवलंबून धुळे जिल्ह्याचा काही भाग सिंचनाखाली आणला होता. तथापि लोकांची वाढती (तहान) भूक विचारात घेऊन आजपर्यंत राजकारणापासून अलिप्त असलेल्या या एका न्याय-वाटप संस्थेसमोर मोठे आव्हान उभे केले आहे. या पद्धतीवरून भारतरत्न विश्वेश्वरय्या यांनी भारतीय जलसंधारण पद्धत विकसित केली आहे. भूगोलातील असे अनेक विरोधाभास प्रत्येक जिल्ह्यात पाहावयास मिळतात. म्हणजे महाराष्ट्राचा भूगोल, महाराष्ट्राचे पर्यावरण आणि एकसंध महाराष्ट्राची वाटचाल हे भावी पिढीसमोर मोठे आव्हान असणार आहे.

भूगोलाचे असेच काहीसे हल्ले महाराष्ट्राच्या अस्मितेवर, महाराष्ट्र-संस्कृतीवर झालेले दिसतात. आणि वर सांगितलेल्या प्रत्येक विभागाने आपल्या सांस्कृतिक प्रेरणा लगतच्या प्रभावी शेजाऱ्याकडून घेतल्याचे स्पष्ट होते. म्हणजेच महाराष्ट्राच्या भूगोलाने आरंभापासूनच वसाहतीकरणाचे एक मोठे आव्हान-निसर्गदत्त आव्हान, दगडाच्या देशाचे आव्हान निर्माण केले आहे. हे आव्हान विचारात घेऊन ज्यांनी त्यामधून मार्ग काढला, त्यांना भूगोलाने साथ दिली आणि या भूप्रदेशाचा इतिहास आकारास आला.

**पाण्याची कमतरता**

महाराष्ट्राचा सांस्कृतिक भूगोल आणि ऐतिहासिक भूगोल यांमध्ये फार मोठा विरोधाभास आहे. पाण्याची कमतरता हे त्याचे मुख्य कारण मानले जाते. बहुतांश नद्या चारच महिने म्हणजे पावसाळ्यातच वाहतात. काही मोठ्या नद्यांमध्ये आठ महिने पाणी असते तथापि बारमाही वाहणाऱ्या नद्या अपवादालासुद्धा नाहीत. त्यामुळे जे वसाहतीकरण झाले आणि जो इतिहास / जी संस्कृती निर्माण झाली, ती या जलाशयाच्या अनुषंगानेच. म्हणून जलसंवर्धन व जलव्यवस्थापनाची समस्या विभागनिहाय रहिवाशांनी आपल्या कौशल्याच्या बळावरच सोडविलेली दिसते.

पाण्याच्या कमतरतेचा परिणाम येथील वनस्पती व प्राणी जगतावर झालेला दिसतो. घनदाट जंगलांचा अभाव (अपवाद विदर्भातील मेळघाट – चिखलदरा) असल्याने मान्सूनवर पोसलेली खुरटी जंगले सह्याद्री, सातपुडा, यवतमाळ, तोरणमाळ आदी ठिकाणी दिसतात. म्हणून प्राण्यांची विशेषतः हिंस्र श्वापदांची संख्या (बिबट्यापर्यंतच) मर्यादित प्रमाणात आढळते. परिणामी यावर आधारित असणाऱ्या जनजातींचे प्रमाणही राष्ट्रीय पातळीवर अल्प असल्याचे दिसते. डोंगरमाथा, घाट, उपरोक्त जंगले यांच्या अनुषंगानेच आपणास या जमाती आजही तग धरून राहिलेल्या आढळतात.

जलदुर्भिक्षाचा मोठा परिणाम सांस्कृतिक भूगोलावरही झाल्याचे स्पष्ट होते. म्हणून नद्या असल्या, तरी त्या ठिकाणी तीर्थक्षेत्रांचा म्हणावा तसा विकास झाला नाही. उत्तर भारतातील आणि दक्षिण भारतातील तीर्थक्षेत्रांशी तुलना केल्यास महाराष्ट्रातील एकही तीर्थक्षेत्र त्या भव्यतेचे नाही. अपवादात्मक १२ ज्योतीर्लिंगांपैकी पाच ज्योतिर्लिंगे महाराष्ट्रात आहेत, पैकी फक्त त्र्यंबकेश्वर परिसरातच राष्ट्रीय पातळीवरील कुंभमेळ्यासारखा मेळा मागील काही शतकांपासून होत आहे. हा मेळा श्रावणमासास जोडून येत असल्याने पाण्याचा व स्नानाचा प्रश्न निसर्गानेच सोडविल्याचे आत्तापर्यंतच्या नोंदीवरून वाटते.

अज्ञात कालापासूनच मान्सून लहरी असल्याने उत्तर–दक्षिणेत जाणवणारा नदी–मातृक समाजाचा प्रभाव महाराष्ट्रात तितका ठळकपणे जाणवत नाही. म्हणून नदीकाठी असणाऱ्या घाटांची संख्या तसेच शिवालयांची संख्या गंगा–कावेरीसारखी (अमर्याद) नाही. खरे तर गोदावरी, कृष्णा आणि तापी खोऱ्यांत महाराष्ट्र विभागला गेला आहे. तसेच गोदा खोरे हे भारतातील क्रमांक दोनचे म्हणजे गंगेनंतरचे मोठे खोरे आहे. तथापि या सर्व नद्या महाराष्ट्राच्या बाहेर गेल्यावरच संपन्न होतात, हे महाराष्ट्राचे कायमचे शल्य आहे. परिणामी स्वातंत्र्यानंतरच्या काळात या खोऱ्यात अधिकाधिक जलसंधारणाची कामे झाली असल्यास नवल वाटण्याचे कारण नाही. तथापि जलसंधारणाची समस्या अद्यापही समाधानकारक पद्धतीने सुटलेली नाही. गोदावरीला गंगा म्हटले जात असले, तरी ती तेलुगू गंगा असल्याचे व कृष्णा कन्नडिगांची यमुना असल्याचे आजपर्यंतच्या सांस्कृतिक वाटचालीतून सिद्ध झाले आहे.

नदीवर फारसे अवलंबून राहता येत नसल्याने या जमातींनी (communities) आपल्या परीने पाणी मिळवण्याचा प्रयत्न केला आणि त्यामधून देव–मातृक संस्कृतीचा विस्तार झाला. देव–मातृक संस्कृती म्हणजेच पावसाच्या पाण्याचे संधारण करून त्यावर आधारित जीवन–शैलीची निर्मिती करणे होय. यामधूनच शेकडो विहिरी, बारवा, तळी, सरोवरे व तत्सम जलाशये आकारास आली. निसर्गाशी तडजोड हा त्यांचा पायाभूत घटक होता. भूजलाचा वेध घेणारे तंत्र व शास्त्र येथे झपाट्याने विकसित झाले. यामध्ये लोकसहभागाला भरपूर वाव असल्याने सर्व वसाहतकारांनी गाव तेथे तळे, तळे राखील तो पाणी चाखील, याचा प्रत्यय समाजाला आणून दिला. अगदी डोंगरमाथ्यावरसुद्धा जलसंधारणाचे तंत्र विकसित केले. सतत येणाऱ्या दुष्काळाला तोंड देण्यासाठी (हाताशी) अतिरिक्त जलसाठे प्रयत्नपूर्वक जतन केले. एकट्या विदर्भात गोंडांचे हजारो तलाव (पुढे यांनाच मालगुजरी तलाव म्हणून ओळखले जाऊ लागले) कधी काळी अस्तित्वात होते. आणि महाराष्ट्रात आजही धरणावरील सिंचनापेक्षा विहिरीवरील सिंचनक्षेत्र अधिक आहे. त्यामुळे मर्यादित क्षेत्रातील सिंचन ही भूगोलाने दिलेली देणगी आहे, हे विसरून चालणार नाही. तथापि भूगर्भातील पाणी उसपण्याच्या साधनात क्रांतिकारक बदल झाल्यामुळे भूजलसाठ्याचे भवितव्य महाराष्ट्रात धोक्यात आले आहे.

लोकसंख्येचा विस्फोट, अमर्याद नागरीकरण. सिंचन क्षमतेवर पडलेला न पेलणारा भार हे प्रश्न महाराष्ट्राला भेडसावत आहेत. एकीकडे वातावरणातील बदलामुळे (climatic-changes) ग्रामीण अस्तित्वच धोक्यात आले आहे, तर दुसरीकडे वातावरणातील प्रच्छन्न मानवी हस्तक्षेपामुळे महाराष्ट्राची वाळवंटीकरणाकडे वेगाने वाटचाल होत आहे. यावरील

जालीम उपाय म्हणून राजकारण्यांनी तिकडे जाणीवपूर्वक दुर्लक्ष करण्याची प्रतिज्ञा केली आहे. या भौगोलिक आव्हानाचा विचार गंभीरपणे होणे अगत्याचे आहे.

**प्रादेशिक विषमता**

भूगोलाचा स्पष्टपणे जाणवणारा दुसरा प्रमुख परिणाम म्हणजे प्रादेशिक विषमता. सह्याद्रीच्या अभेद्य तटबंदीमुळे कोकण आरंभापासून विलग होता. पर्जन्य भरपूर, नद्या भरपूर तथापि जलसंधारणास वाव नसल्याने मुंबईवर जगणारा चाकरमानी, अशी त्याची नवी ओळख निर्माण झाली. अलीकडील व्यापार आणि दळण-वळण क्षेत्रातील क्रांतीमुळे कोकणात बदलाचे वारे जोराने वाहू लागले आहेत. त्यामुळे कोकणाची नाळ खऱ्या अर्थाने महाराष्ट्राशी जोडली जाणार आहे. हा सकारात्मक बदल मानावा लागेल. या भागाचे दुसरे वैशिष्ट्य म्हणजे कोकणाला लाभलेला विस्तृत सागर-किनारा. याचा लाभ घेणारी सागर-मातृक संस्कृती येथे परशुरामाचे काळापासून नांदत आहे. येथील बंदरांची जडण-घडण, घाट आणि बंदर यांचे नाते, आयात-निर्यात, सागराचा लहरीपणा यांमुळे येथे काहीशी भिन्न संस्कृती जोपासली गेली.

याउलट विदर्भात-वऱ्हाडात मोठ्या प्रमाणात नैसर्गिक तळी आहेत. पाऊस बऱ्यापैकी आहे आणि भूप्रदेश खनिज संपत्तीने समृद्ध आहे. तसेच जंगलेही उत्तम आहेत. त्यामुळे येथे देव-मातृक, नदी-मातृक व खनिज-मातृक संस्कृतीची सरमिसळ झाली आहे. तथापि ब्रिटिश राजवटीत त्यांच्या पारंपरिक कृषिपद्धतीत बदल झाला. इंग्रजांची अमेरिकेतील कापसाची शेती संपली (यादवी युद्धामुळे १८६६-७९), म्हणून त्यांनी विदर्भात कापसाची लागवड करण्यास हेतुपुरःसर प्रोत्साहन देऊन बाजारभावाची व बाजारपेठांची हमी दिली. मुंबई-नागपूर-कोलकाता असा रेल्वेमार्ग टाकण्यात आला. आरंभीच्या काळात हा बदल किफायतशीर वाटला. पण अलीकडे कापसाचे भाव जागतिक पातळीवर ठरत असल्याने आणि सतत तेच पीक घेतल्याने कापसाचा उतार कमी झाला. उत्पादनापेक्षा खर्च वाढल्याने शेतकरी कर्जबाजारी झाले. कर्जफेडीचे अन्य पर्याय नसल्याने शेतकऱ्यांनी आत्महत्या केल्या. हे दुष्टचक्र असेच राहिल्यास ऊस उत्पादक व द्राक्ष उत्पादक यांच्यावरही उद्या हीच पाळी येणार आहे. थोडक्यात महाराष्ट्राला लाभलेल्या भूगोलामुळे देव-मातृक, नदी-मातृक, सागर-मातृक आणि वन-मातृक असे समाज तयार झाले आणि भिन्न ऐतिहासिक कालखंडांत लाभलेल्या राजकीय नेतृत्वाखाली ते वाटचाल करत राहिले. ज्या प्रमाणात त्यांच्या राजकीय नेतृत्वात बदल झाले, त्या प्रमाणात त्यांनी आपले अस्तित्व/वर्चस्व टिकविण्याचा प्रयत्न केला. परिणामी महाराष्ट्राच्या प्रादेशिक सीमा आणि ऐतिहासिक सीमा यांमध्ये कायम तफावत निर्माण झालेली दिसते. भाषावार प्रांतरचना होऊनही अद्यापही सीमातंटे विशेषतः कर्नाटकाशी असलेले सीमातंटे, गोव्याचा भूप्रदेश हे राजकारणाचे बीज घटक आहेत. उदाहरणार्थ निपाणी-नगर-हवेली-बेळगाव महाराष्ट्रात विलीन झालेच पाहिजेत, वगैरे.

महाराष्ट्राच्या भूगोलाचे आगळेवेगळे वैशिष्ट्य म्हणजे ती एक संयोगभूमी असून उत्तर-दक्षिण तथा पूर्व-पश्चिम यांच्या भौतिक तथा सांस्कृतिक आदान-प्रदानाचे क्षेत्र आहे. त्यामुळे अनादी काळापासून यांना जोडणारे मार्ग, सार्थवाहपथ (व्यापारी मार्ग) या भूमीतून तेथील महत्त्वाच्या घाटातून जातात. यासाठी सह्याद्रीचे, सातपुड्याचे घाट प्राचीन ऐतिहासिक काळापासून ज्ञात आहेत. याच मार्गाचे पुढे सांस्कृतिक मार्गात रूपांतर झालेले दिसते. म्हणून महाराष्ट्र संस्कृतीची जडणघडण होत असताना संबंधित क्षेत्रामध्ये सीमावर्ती प्रादेशिकतेचा प्रभाव जाणवतो. उदाहरणार्थ विदर्भावर मध्य प्रदेशाच्या व बस्तरच्या आदिवासी जनजीवनाचा, खानदेशावर सुरत-अहमदाबादच्या गुजराती जनजीवनाचा, मराठवाड्यावर हैद्राबाद-भालकी-गुलबर्गा असा तेलुगू-कानडी संमिश्र संस्कृतीचा, पश्चिम-महाराष्ट्रावर कर्नाटकाचा आणि कोकणावर भूमध्य सागरी प्रदेशातील लोकजीवनाचा आणि या सर्वांचा एकत्रितपणे एकसंध महाराष्ट्र संस्कृतीचा- या सर्वांना मुंबईचा अपवाद करावा लागतो. या दृष्टिकोनातून मुंबईची चिरफाड करायची झाल्यास, तो संशोधनाचा स्वतंत्र विषय ठरावा.

**महाराष्ट्राची दैवते**

आणखी एका भौगोलिक मुद्द्याचा विचार करून आपण महाराष्ट्राच्या इतिहासाचा विचार करू या. महाराष्ट्राच्या प्रमुख देवतासुद्धा भूगोलाची देणगी आहेत, असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही. कारण महाराष्ट्राचे प्रमुख दैवत पंढरपूरचा विठोबा

होय. विठोबाचा पंथ – वारकरी पंथ – वारी करणाऱ्यांचा पंथ. म्हणजे गोपालकांचा पंथ म्हणून वैष्णव. त्याला विष्णूचा २५ वा अवतार मानतात. यामधील काही जण त्याला प्रत्यक्ष श्रीकृष्णच मानतात, म्हणून पंढरपूरच्या पंचक्रोशीत त्यांनी मथुरा–वृंदावन–गोकुळासह द्वारका वसविण्याचा प्रयत्न केला आहे, असो. विठोबाची उत्पत्ती विरोबा– बिरुबा या मेंढपाळांच्या दैवतावरून झाल्याचे मानणारा एक मतप्रवाह आहे. गोपालक तथा मेंढपाळ कुरणासाठी, पाणथळासाठी भटकत असतात. ज्यांना पाणथळाच्या जागा सापडल्या, त्यांनी कालांतराने कृषि–संस्कृतीचा अंगीकार केला, पण त्यांचे आराध्य दैवत विठोबाच राहिले. खरीप आणि रब्बी हंगामांत येणाऱ्या एकादशीला पंढरपूर येथे मोठी यात्रा भरते. या यात्रेच्या तपशिलात गेल्यास, यात्रे निमित्ताने भरलेल्या बाजारात फेरफटका मारल्यास सगळा भूगोल डोळ्यांसमोर उभा राहतो.

दुसरे मुख्य दैवत जेजुरीचा खंडोबा – मूळचा तो स्कंद त्यापासून खंडोबा. तेथेही मेंढपाळ आणि त्यांच्या जीवन–शैलीस पोषक भौगोलिक वातावरणच जत्रेच्या निमित्ताने पाहावयास सापडते. यानंतर तुळजापूरच्या आणि माहूरच्या मातांचा विचार करावा लागतो. या सर्व माता आदिम संस्कृतीची उपास्य दैवते होत. आजही त्या ठिकाणी चढविले जाणारे भोग विचारात घेतल्यास त्यांची उत्पत्ती आदिम शक्तिदैवतांमधून झाल्याचे स्पष्ट होते. याशिवाय महाराष्ट्राची बहुतांश लाडकी दैवते स्वतःच्या साम्राज्यामध्ये गडकोटावर विराजमान झालेली आढळतात. वास्तविक सह्याद्रीचे प्रत्येक शिखरच दैवत असल्याचा आभास त्यामधून निर्माण करण्यात आला आहे. असो. महाराष्ट्र राज्य निर्मितीच्या मागील ५० वर्षांत यामध्ये कुठेच बदल झालेला आढळत नाही. म्हणून संभाव्य एकसंध महाराष्ट्राच्या निर्मितीसाठी हे भौगोलिक घटक व त्यांचे योगदान यांचा विचार होणे अगत्याचे ठरते.

**महाराष्ट्रचा प्राचीन इतिहास**

देशाच्या अन्य भागांच्या इतिहासाप्रमाणे महाराष्ट्राच्या इतिहासाचेही ढोबळमानाने प्राचीन, मध्ययुगीन व अर्वाचीन असे तीन ठळक भाग पडतात. महाराष्ट्रावरील मुस्लीम आक्रमणापासून मध्ययुगाचा आरंभ होतो व इंग्रजी राजवटीपासून आधुनिक कालखंडाची सुरुवात होते. प्राचीन काळात अनेक राजघराण्यांनी आपले नशीब अजमावण्याचा प्रयत्न केला. यांमध्ये सातवाहन, वाकाटक, चालुक्य, राष्ट्रकूट व यादव ही प्रमुख घराणी होती. या सर्व सत्तांमध्ये केवळ सुरुवातीचे पैठणचे सातवाहन उर्फ शालिवाहन आणि अखेरचे देवगिरीचे यादव लोकमानसात घर करू शकले. सातवाहन युगाला तर महाराष्ट्राचे सुवर्णयुग मानले जाते आणि यादव घराणे अखेरचे हिंदू घराणे होते. यादव किती प्रमाणात यशस्वी झाले, हा वादाचा मुद्दा असला; तरी अन्य राज्यकर्त्यांच्या तुलनेत त्यांनी जनकल्याणाच्या काही योजना राबविल्याने ते अद्यापही लोकस्मरणात आहेत.

सातवाहनांच्या (शालिवाहनांच्या) यशाची कारण परंपरा शोधत असताना असे जाणवते की, यांच्या यशात तथा इतरांच्या अपयशात बाह्य कारणांइतकीच अंतर्गत कारणेही महत्त्वाची ठरतात. बाह्य कारणांमध्ये पर्यावरणाची अनुकूलता हे महत्त्वाचे कारण ठरते. कारण इ.स.पू.५०० ते साधारण इ.स.५०० हा कालखंड जगभरातच अनुकूल हवामानाचा होता. मान्सूनची नियमितता हा त्यामधील महत्त्वाचा घटक होता. त्यामुळे सातवाहनांनी महाराष्ट्राच्या सर्व भूप्रदेशाशिवाय उत्तरेकडे नर्मदेपर्यंतचा व दक्षिणेकडे कावेरीपर्यंतचा प्रदेश आपल्या वर्चस्वाखाली आणून प्रदीर्घ काळापर्यंत एकछत्री अंमल प्रस्थापित केला. जलसंधारणातील लोकसहभाग वाढवून अधिकाधिक क्षेत्र लागवडीखाली आणले. व्यापारात विशेषतः पाश्चिमात्य देशातील ग्रीक–रोमन बाजारपेठांची गरज लक्षात घेऊन आवश्यक त्या पायाभूत सुधारणा केल्या. समुद्रातील चाचेगिरीला आळा घालून व्यापारी दळणवळणासाठी मान्सून वाऱ्यांचा वापर सुरू केला. पश्चिम किनारपट्टीवरील शेकडो नैसर्गिक बंदरांचा शोध घेऊन आणि शिडांची जहाजे वापरून सागरी हालचालींना गतिमान केले. स्वतःची चलन–व्यवस्था प्रचारात आणून त्याला सचोटीच्या बळावर आंतरराष्ट्रीय मान्यता प्राप्त केली. व्यापारवादाचा (Mercantalism) पुरस्कार करून उत्पादन–प्रधान श्रेण्यांच्या (Guilds) विकासास चालना दिली. साम्राज्यभर व्यापारी तसेच उद्योग–प्रधान श्रेण्यांचे जाळे निर्माण केले. कृषिक्षेत्रातील तज्ज्ञ ब्राह्मण–पंडितांना आणि व्यापारी क्षेत्रातील तज्ज्ञ बौद्ध–पंडितांना पाचारण करून राज्यभर त्यांचे मार्गदर्शन सुलभ व्हावे या हेतूने त्यांच्या कायमच्या निवासासाठी/योगक्षेमासाठी भूमिदाने दिली. थोडक्यात राज्यशकट समर्थपणे चालविण्यासाठी समाजातील प्रत्येक घटकाला कार्यप्रवण करून त्याच्या योगदानाचे स्वागत केले.

त्यांच्या कारकिर्दीत दुष्काळ पडल्याची नोंद नाही. यादवी युद्धाची तथा सत्तेसाठीच्या रक्तपाताची नोंद नाही. व्यापारी भरभराटीबरोबरच मोठ्या प्रमाणात सांस्कृतिक विकास साधला. त्यांच्या समृद्धीचे चित्र समकालीन वाङ्मयातून तर मिळतेच मिळते शिवाय त्यांच्याच काळात निर्माण झालेल्या शेकडो लयन-स्थापत्यातून, सह्याद्रीच्या गिरिखोऱ्यांतून ठायी-ठायी दृगोचर होते. ओबडधोबड कातळांतून सौंदर्याने ओतप्रोत भरलेल्या सुमारे ५०० लयन-शिल्पांतून त्यांची सौंदर्याभिरूची तर स्पष्ट होते शिवाय त्यांचा जीवनाकडे पाहण्याचा दृष्टिकोनही स्पष्ट होतो. जगण्याची कला साध्य झालेला मुक्त व सुखी समाज ही महाराष्ट्राला सातवाहनांनी दिलेली सर्वश्रेष्ठ देणगी होय. भूगोलाचे आव्हान एकदिलाने स्वीकारलेला समाज काय करू शकतो, याचा वस्तुपाठ सातवाहन सत्तेने घालून दिला. हा ऐतिहासिक भूगोलातील एक विरोधाभास, एक चमत्कार असल्याचे नंतरच्या इतिहासावरून स्पष्ट होते.

यानंतरच्या वाकाटक, चालुक्य (सर्व शाखा) व राष्ट्रकूट यांच्या राजवटी अंतर्गत आणि बाह्य कलहाने जर्जर झालेल्या, सत्तेसाठी संघर्ष अपरिहार्य असतो, हा संदेश देणाऱ्या होत्या. त्यांचा संघटनापेक्षा विघटनावर अधिक भर होता. प्रतिकूल पर्यावरणास कसे सामोरे जावे, याचे उत्तर शोधण्यावर त्यांचा अधिक भर होता. परिणामी रक्तपात आणि सत्तापालट हा कार्यक्रम त्यांना अपरिहार्यपणे राबवावा लागला. नाही म्हणावयास राष्ट्रकूट घराणे आणि विशेषतः त्यातील गोविंद, कृष्ण आणि इंद्र यांनी समकालीन सर्व भारतीय नृपतींना त्यांच्या मकरध्वजाला शरण येण्यास भाग पाडले होते. बंगाल, मध्य प्रदेश, गुजरात आणि दक्षिण भारतातील सर्व राजघराण्यांनी राष्ट्रकूट घराण्याशी वैवाहिक संबंध जोडून त्यांची प्रतिमा भारतीय पातळीवर उंचावली होती. वेरुळच्या कैलासासारखी अनेक मंदिरे आकारास आली होती. कन्नड साहित्याचे उत्थापन होऊन ते कळसास पोहोचले होते. तथापि समाज सुखी-समृद्ध नव्हता. व्यापार बुडाला होता. राज्यशकटातील लोकसहभाग दिसत नव्हता. चलन-व्यवस्थेची गरज संपली होती. पर्यावरणात प्रतिकूल बदल होऊन दुष्काळाचे दुष्टचक्र मागे लागले होते. आणि सत्ता संपादनात मशगूल असणाऱ्या राज्यकर्त्यांना तिकडे लक्ष देण्यास सवड नव्हती. आजही आपण त्याच परिस्थितीमधून वाटचाल करत आहोत. अशी परिस्थिती का ओढवते?

**मध्ययुगीन इतिहास**

यादवांचा काल काहीसा अनुकूल वातावरणाचा, सामाजिक परिवर्तनाचा मानावा लागतो. समाज सुस्थितीकडे वाटचाल करत होता. व्यापाराचे पुनरुज्जीवन होत होते. चलन-व्यवस्था स्थिरावली होती. तथापि राज्यकर्त्यांच्या मागे सामंतशाही आणि सर्व सामान्यांमागे कर्मकांड हात धुऊन लागले होते. मराठी भाषेचा विकास, हेमाडपंथी मंदिरांचा विकास, दुर्गनिर्मिती, बंदरांची भरभराट हे सर्व होत असतानाच भारतीय संस्कृतीवर मध्य आशियातून इस्लामी संस्कृतीचे पाशवी आक्रमण अनपेक्षितपणे झाले आणि त्याला कसे सामोरे जावयाचे, याचे उत्तर मंदिर-भक्तीमध्ये आणि प्रस्थापित कर्मकांडामध्ये शोधण्याचा प्रयत्न केला गेला. भारतीय पातळीवरील कोणत्याच राज्यकर्त्याला आक्रमणाचे स्वरूप समजू नये, याचे आश्चर्य वाटते. अल्लाउद्दीन खिलजीसारखा एक राज्यकर्ता आपल्या उण्यापुऱ्या २० वर्षांच्या कारकिर्दीत एकाच प्रकारच्या फसवेगिरीचा वापर भारतभर करून, चितोडपासून देवगिरीपर्यंत आणि मलिक कफूर हा एकटा सरदार वारंगलपर्यंताचा प्रदेश दिल्ली सलतनतीच्या वर्चस्वाखाली आणून रामदेवासारख्या देवगिरीच्या राजाला दिवसाढवळ्या कैद करून नेतो, हा इतिहासातील केवढा विरोधाभास. रामदेवराय गाफील राहिल्यामुळे १०० वर्षांची देवगिरीसारखी अभेद्य राजधानी अल्लाउद्दीन लासूरच्या लुटूपुटीच्या काही तासांच्या झटापटीमध्ये जिंकून घेतो. देवगिरीच्या किल्ल्यावर धान्याऐवजी मिठाची पोती भरली जातात. आजही ज्या गोष्टी अतर्क्य आणि अशक्य वाटतात त्या गोष्टी १३व्या शतकात कशा साध्य झाल्या? यामध्ये कुठेतरी पाणी मुरत असले पाहिजे! यानंतर यादव आणि दिल्ली सल्तनत यांमध्ये चार युद्धे झाली. या सर्वच युद्धांत यादवांचाच पराभव कसा झाला, हे एक गूढच आहे.

१३२० ते १६५० हा कालखंड महाराष्ट्राच्या दृष्टिकोनातून अतिशय नामुष्कीचा, पराभवाचा, मानहानीचा, कर्तृत्वशून्यतेचा मानावा लागतो. केवळ आशेचा किरण दिसतो, तो विजयनगरच्या हिंदू साम्राज्याच्या पराक्रमी वाटचालीचा. तथापि विजयनगरच्या अखेरच्या नृपतीच्या (रामराजाच्या) एका चुकीच्या निर्णयामुळे १५६५ च्या तालीकोटच्या लढाईमध्ये विजयनगरचे २३० वर्षांचे साम्राज्य पार धुळीस मिळाले.

इकडे महाराष्ट्रात छत्रपतींनी निर्माण केलेल्या हिंदवी स्वराज्यावर (इ. स. १६५० ते १६८०) वरवंटा फिरविण्यासाठी दस्तूरखुद्द औरंगजेबाला दिल्लीचे तख्त सोडून २७ वर्षांकरिता औरंगाबाद आणि बेगमपूर (भीमाकाठी, पंढरपूरजवळ) येथे तळ ठोकून बसावे लागले. छत्रपती शिवाजीमहाराजांना पराभूत करणे जमले नाही म्हणून त्यांच्यावरील राग त्यांचे सुपुत्र छत्रपती संभाजी राजांना क्रूरपणे ठार करून काढला गेला. तथापि राखेतून उदय होणाऱ्या फिनिक्स पक्ष्याप्रमाणे अतिशय अल्पावधीत शिवरायांनी निर्माण केलेली ऊर्जा महाराष्ट्रात जागृत झाली आणि हिंदूपदपातशाहीच्या गर्जनेने सारा भारतीय आसमंत दुमदुमून गेला.

यादवांच्या पतनानंतर बहमनी राजवट निर्माण झाली. तीमध्ये केवळ सुरुवातीचे पाच सुलतान कर्तबगार निघाले. अर्थात कल्याणकारी राज्यसंकल्पना या दृष्टिकोनातून त्यांची कर्तबगारी शून्य होती. पण स्वतःचे राज्य टिकविण्याच्या दृष्टिकोनातून आणि हिंदू राजवटी उद्ध्वस्त करण्याच्या भूमिकेतून ते इतरांच्या तुलनेत कर्तबगार होते. बाकी सर्व व्यसनी, जुलमी आणि केवळ भोगवादी होते. याच काळात महाराष्ट्रात वारंवार दुष्काळ पडत होते. पैकी १३९६ ते १४०८ या कालावधीतल्या दुर्गादेवीच्या १२ वर्षांच्या दुष्काळाच्या खुणा महाराष्ट्राच्या अंगाखांद्यावर आजही स्पष्टपणे दिसतात. त्याच्या फारशा तपशिलात न जाताही आपणास जाणवते की, या काळात ज्या पंडितांनी व सामंतांनी समाजाचे नेतृत्व करणे आवश्यक होते, तेच कर्मकांडांत आणि भ्रामक मोठेपणाच्या मनोराज्यात हरवून गेले होते. त्यामुळे पराभवांमागून पराभव होत होते. हिंदू समाज स्वतःच शरणागतीचा मार्ग स्वीकारतो, हे ऐतिहासिक सत्य आहे. याला अपवाद फक्त मराठी जनतेने औरंगजेबाविरुद्ध दिलेला २७ वर्षांचा स्वातंत्र्य-लढा होय.

१४९० च्या सुमारास बहमनीच्या अंतर्गत कलहाने उच्चांक गाठला आणि त्याचे विभाजन पाच शाह्यांत झाले. पैकी विजापूरची आदिलशाही, अहमदनगरची निजामशाही गोवळकोंड्याची कुतुबशाही, बिदरची बरीदशाही, वऱ्हाडची इमादशाही आणि बऱ्हाणपूरची फारुकी राजवट. महाराष्ट्राच्या भिन्न भागांवर यांचे वर्चस्व होते. या काळात अस्तित्वासाठी आणि वर्चस्वासाठीच्या सततच्या युद्धाने महाराष्ट्र त्रस्त झाला होता. विनाकारण युद्ध, पक्षबदल, गुजरातसारख्या परक्या सत्तेला मदतीसाठी पाचारण आणि अगणित बंडे यांनी राज्यभर उच्छाद मांडला होता. आरंभी ह्या शाह्यांचे विजयनगरशी भांडण होते. नंतर त्या परस्परांचे लचके तोडण्यात निमग्न होत्या. आणि मोगल सम्राट अकबराच्या दक्षिण-विस्तार धोरणातून त्यांच्या मागे मोगली आक्रमणे सुरू झाली. ती औरंगजेबाच्या दक्षिण-विजयाने पूर्ण झाली. या सर्व परिस्थितीचे थोडक्यात समालोचन करायचे झाल्यास- महाराष्ट्रातील जनता भयग्रस्त, अत्यंत दुःखी, असंरक्षित आणि उपाशी पोटी होती. लज्जारक्षणार्थ लागणारा बोटभर कपडाही किती जणांच्या अंगावर असेल, हा संशोधनाचा विषय आहे. कारण राज्यकर्त्यांचा आणि प्रजाप्रतिपालनाचा काडीमात्र संबंध नव्हता. ते सतत जनानखान्यात रमले होते अथवा यादवी युद्धात गुंतलेले होते. पक्ष बदलण्यात आणि वाहत्या गंगेत हात धुण्यात तसेच परस्परांशी सुडाचे (खानदानी) राजकारण करण्यात सामंत गुंतले होते. समाजधुरीण शास्त्री-पंडित कर्मकांडांत आणि पुराणकथा रंगविण्यात गुंग झाले होते आणि सामान्य माणूस जिवंत राहण्यासाठी भराव्या लागणाऱ्या निरनिराळ्या करांच्या ओझ्याखाली दबलेला होता. अशा प्रतिकूल परिस्थितीमध्ये महाराष्ट्राच्या भूमीत विश्वाला ललामभूत ठरलेले अनेक संत-महंत होऊन गेले, हा एक योगायोगच मानावा लागतो.

**संतांचे योगदान**

महाराष्ट्राच्या जडणघडणीमध्ये ज्या विभूतींचा मोठा वाटा आहे, त्यांमध्ये ज्ञानेश्वर-नामदेव-एकनाथ-रामदास-तुकाराम या संतपंचकाचा समावेश होतो. पण संत हे टाळकुटे होते, त्यांनी पलायनवादाचा पुरस्कार करून प्रस्थापित समाजधारणेलाच पाठिंबा दिला, असे वृथा आरोप केले जातात. येथे आपणास त्याच्या तपशिलात जाण्याचे प्रयोजन नसले, तरी उपरोक्त टीकाकारांना संतांचे कार्य समजलेच नाही, असे खेदाने म्हणावे लागेल. कारण हे महापुरुष झालेच नसते, तर महाराष्ट्राचा सर्वनाश निश्चित होता. हे एक ऐतिहासिक सत्य आहे. या सर्व संतांनी आपल्या निष्कलंक आचरणाने, निरूपणाने, भजन-कीर्तनाने, लेखणीने आणि कर्तृत्वाने पारंपरिक वैदिक धर्माचे पुनरुज्जीवन करून समाजसंस्थेचा संभाव्य विनाश थांबविला. अद्वैताचा पुरस्कार करून चराचर व्यापून राहिलेल्या निर्गुण-निराकार परमेश्वराच्या भक्तीचा मार्ग सर्वसामान्यांना खुला केला.

खऱ्या भक्तीची तथा भक्ताची लक्षणे समाजमनावर बिंबवून 'सर्वांभूती भगवंत' ही धारणा बळकट केली. रामदासांचा अपवाद केल्यास या सर्वांचे आराध्य दैवत विठ्ठल हेच होते. आणि त्याच्या भक्तीतूनच भक्तिमार्गाची, भक्तिपंथाची स्थापना ज्ञानेश्वरांनी केली आणि संपूर्ण महाराष्ट्र एका ध्वजाखाली आला.

वास्तविक ज्ञानेश्वर हे नाथपंथी होते आणि नाथपंथ हा शैवपंथ असूनही त्यांनी विठ्ठल या वैष्णव पंथाचा, वारकरी पंथाचा अत्यंत ऋजुतेने पुरस्कार केला, यामधेच साऱ्या महाराष्ट्रधर्माचे सार एकवटलेले आहे. संत तुकारामांनी याच्याही पुढे जाऊन 'नाही भेदा-भेद भ्रम अमंगळ' असे ठासून सांगितले आहे. एकीकडे इस्लामी आक्रमणाची चढती कमान आणि दुसरीकडे संतपंचकाच्या शिकवणीतून तीव्र होत जाणारा, धारदार होत जाणारा भागवत धर्म हे दोन प्रवाह समांतर वाहत असलेले दिसतात. ज्ञानेश्वर-नामदेवांच्या काळातील सामाजिक परिस्थिती, एकनाथांच्या काळातील सामाजिक स्थिती आणि रामदास-तुकारामांच्या काळातील परिस्थिती यांतील बदल आणि त्या अनुषंगाने झालेले संतांचे लिखाण, यांचा तौलनिक अभ्यास होणे गरजेचे आहे. असा अभ्यास झाला, तरच त्यांचे कार्य जनसामान्यांपर्यंत पोहोचण्याची शक्यता आहे. त्याचबरोबर उपरोक्त संत आणि अन्य राज्यांतील संत यांच्या कार्यांचाही तौलनिक विचार होणे अगत्याचे आहे.

गोरक्षनाथ झाले नसते, तर साऱ्या भारताची जी हानी झाली असती; तीच परिस्थिती महाराष्ट्राच्या दृष्टिकोनातून ज्ञानदेवांच्या बाबतीत होती. ज्ञानदेवांना महाविष्णूचा अवतार, मानले जाते आणि ते एकनाथ-तुकारामांच्या रूपाने १७व्या शतकापर्यंत कार्यरतच राहिले. एकनाथ जरी लौकिक अर्थाने जनार्दनस्वामींचे शिष्य असले, तरी वास्तवात ते ज्ञानदेवांचे शिष्य होते; हे विसरून चालणार नाही. ज्ञानदेवांची ज्ञानेश्वरी आणि एकनाथांचे भावार्थ रामायण यांची आजही महाराष्ट्रभर पारायणे होतात, यामागील कारण काय? ज्ञानदेवांनी गीतेचे निरूपण हा विषय कशासाठी घेतला. समाजरूपी अर्जुन जुना झाला होता, त्याला मरगळ आली होती, तो दिङमूढ झाला होता. त्याला जागे करण्यासाठी, सचेतन करण्यासाठी गीताटीका हाच जालीम उपाय होता आणि पुढे तर ज्ञानदेवांचा मागोवा घेत एकनाथांनी भावार्थ रामायणाच्या लिखाणातून प्रत्यक्ष कृतीचे आवाहन केले. छत्रपतीच्या दुर्गा-दुर्गांवरून यामधील युद्धकांडाचे पारायण होत होते. यातून निर्माण होणारी ऊर्जा इतकी प्रचंड होती, की संभाजी राजांच्या अमानुष वधानंतर तिच्या प्रचंड ज्वाळांतून दिल्लीचे तख्त होरपळून निघाले. महाराष्ट्राने २७ वर्षे स्वातंत्र्यलढा दिला आणि ती ऊर्जा धगधगती ठेवली, तीच इंग्रजांविरुद्धच्या लढ्यातही कामी आली.

६६ वर्षांच्या नाथांच्या अंगावर, पैठणसारख्या त्यांच्या वतनाच्या गावी; एक यःकश्चित यवन थुंकतो! किती दारुण प्रसंग! त्याची खोली, गांभीर्य कोणी विचारात घेत नाही. नाथांना तो अपमान असह्य वाटतो. त्यांच्या जिव्हारी लागतो आणि ते महाराष्ट्र कुलस्वामिनीचा 'बये'चा दरवाजा अखेर ठोठावतात आणि 'बया, दार उघड!' असे उत्कट आवाहन करतात. बया प्रसन्न होते आणि शिवरायाच्या रूपाने अवतरते. समर्थ रामदासांनीसुद्धा याच बयेला, आता काहीतरी रोकडे दाखविण्याची, गळ घातली आहे. या सर्व संतांच्या लिखाणांचा एकत्रित विचार केल्यास समाजात यावनी सत्तेविरुद्धचा असंतोष किती प्रचंड प्रमाणात खदखदत होता, ते जाणवते. येथेच तमोयुग समाप्त होऊन आधुनिक युगाची सुरुवात होते. रामदास-तुकाराम वन्ही चेतवतच जातात आणि अवघा महाराष्ट्र, शिवरायाच्या भगव्या ध्वजाखाली, देशाच्या-राष्ट्राच्या पुनर्निर्मितीस कटिबद्ध होतो. यातच संतांच्या कार्याची फलश्रुती होती. त्यास अन्य पुराव्यांची आवश्यकताच नाही. हा न पुसला जाणारा लोकइतिहास आहे. थोडक्यात संतांनी समाज-संघटनावर भर देत असताना शुद्ध आचरण, शुद्ध भक्ती यांचा आग्रह धरला. कर्मकांड व संन्यास ह्यांना विरोध केला आणि क्षुद्र देवतांचे विसर्जन यांवर भर देऊन वर्णसमतेचा पुरस्कार केला. महाराष्ट्रात शैव-वैष्णव वादास थारा दिला नाही. श्रीविठ्ठल हे समन्वयवादी दैवत, सर्वांचे आराध्य-दैवत बनविले (रमा, रमेश, मस्तकी हर। पुढे तीर चंद्रभागा।। -एकनाथ) (हरिहराभेद नाही, करू नये वाद। -तुकाराम). संत चळवळीचे भरीव कार्य म्हणजे त्यांनी मराठी भाषेचा पुरस्कार करून नवसमाज उभारणी करण्यासाठी मोठ्या प्रमाणात समाज-प्रबोधन केले.

समर्थांच्या शिकवणीचा पाया ज्ञानेश्वर-एकनाथांच्या तत्त्वज्ञानावर उभारला असला, तरी समर्थांचा महाराष्ट्र धर्म आणि ज्ञानेश्वर-एकनाथांचा भागवत धर्म यांमध्ये बरीच तफावत आहे. समर्थांना परचक्राविषयी कमालीची चीड होती, म्हणून त्यांनी समाजशक्तीच्या संघटनेवर विशेष भर दिला. मराठा तितुका मेळविण्यावर जोर दिला. आत्मसन्मानासाठी बलोपासनेला प्राधान्य दिले. 'स्वराज्य, स्वधर्म आणि स्वसंरक्षण' यांसाठी संघटित होण्याचे नुसते आवाहन करून ते थांबले नाहीत तर त्यासाठी त्यांनी

महाराष्ट्रभर भ्रमण करून शेकडो मठांची स्थापना केली. बलाचे प्रतीक म्हणून मारुतीची मंदिरे आणि त्यासोबत आखाडे गावोगावी उभारले. तुम्ही स्वतःचे बल एवढे वाढवा की शत्रूला तुमच्याकडे वाईट नजरेने बघणे अशक्य होईल, असे त्यांचे प्रतिपादन होते. त्यांनी कृतीवर भर दिला आणि संघटना वाढविण्यासाठी राज्यभर प्रसार–प्रचार करत राहिले. केवळ शारीरिक बलोपासना न करता प्रपंच करून ऐहिक सामर्थ्य वाढविण्यावरही त्यांचा भर होता. अर्थाशिवाय अन्य गोष्टींना महत्त्व नसते. महाराष्ट्राच्या जडणघडणीमध्ये बलोपासना, मठ–मंदिरे आणि आखाडे ह्यांचा मोठा वाटा आहे.

शिवरायांच्या राष्ट्रनिर्मितीमधील महत्त्वाचे घटक हेच होते. १९ व्या शतकातील स्वामी दयानंद सरस्वती, त्यांनी स्थापन केलेला आर्य समाज आणि भारतीय राष्ट्रवाद विशेषतः आक्रमक राष्ट्रवाद यांचे जे नाते होते, तेच नाते समर्थ रामदास, त्यांचे रामदासी, मठ आणि शिवरायांनी आरंभिलेली महाराष्ट्रीय पुनरुत्थानाची चळवळ, स्वधर्म व स्वराज्य–साधनेची चळवळ यांमध्ये होते. जोपर्यंत ध्येयप्राप्तीसाठी मानसिक तयारी होत नाही, तोपर्यंत बाकीचे प्रयत्न निष्फळ ठरतात.

**हिंदवी स्वराज्याची स्थापना**

राजा ही काळाची गरज असते. शिवछत्रपतींचा उदय आणि महाराष्ट्रातील हिंदवी स्वराज्य उभारणी, हे याचे उत्तम उदाहरण होय. मराठी भाषिक समाज, डोंगराळ मुलूख, बहमनीच्या शाह्यांमध्ये सरंजामी भोगणाऱ्या मराठी वतनदारांचे वर्चस्व, संतमहंतांची सामाजिक बांधिलकीची शिकवण, मुसलमान सुलतानांमध्ये असलेली वैरभावना, गावाची गावकी स्थानिक वतनदारांकडे आदी सर्व अनुकूल घटक मागील दोन शतकांपासून अस्तित्वात असूनही रोहिडेश्वराची शपथ घेईपर्यंत आणि तोरणा गडावर स्वराज्याचे मंगलमय तोरण बांधेपर्यंत कुणाच्याही मनात–स्वप्नात हिंदवी स्वराज्याची संकल्पना डोकावली नाही. ‘योजकस्तत्र दुर्लभः’ या न्यायाने शिवरायांना हे सर्व जाणवले आणि हे कृतीत उतरविण्याचा निश्चय त्यांनी सर्वांना विश्वासात घेऊन जाहीर केला. यापूर्वीच्या समकालीन अन्य सरंजामदारांनी या अनुकूल घटकांचा लाभ घेतला नाही असे नाही. तथापि तो त्यांनी स्वतःच्या स्वार्थासाठी अतिशय धूर्तपणे आणि विशेषत्वाने लोकांचा विश्वासघात करून घेतला.

याउलट शिवरायांनी ‘हे राज्य व्हावे ही श्रींची इच्छा’ असल्याचे जाहीर करून सर्वांसमक्ष स्वराज्य–स्थापनेची प्रतिज्ञा केली. घटना लहानशी पण किती क्रांतिकारी! कारण त्या शपथेमधून अनेक शतके दबलेल्या लोकमनातील भावनेचा आविष्कार केला. ज्या नेतृत्वाची प्रतीक्षा लोक शतकानुशतके करत होते, तेच त्यांना शिवरायांच्या रूपातून लाभले. लोकभावनेचे प्रकटीकरण हे स्वातंत्र्यसंग्रामातील पहिले यशस्वी पाऊल असते. कारण ते ध्येय गाठण्यासाठी वाटेल ते मोजण्याची, देण्याची लोकांची भावनिक सिद्धता होणे महत्त्वाचे असते. या सूत्रातून आपण शिवचरित्राचे विश्लेषण करण्याचा प्रयत्न केल्यास आपणास काय दिसते? नेता जर राष्ट्रउभारणीसाठी प्रामाणिकपणे आत्मसमर्पण करत असेल, तर जनता का नाही साथ देणार! येथे आपणास शिवचरित्र–कथन करायचे प्रयोजन नाही तथापि; चरित्रातील ऐतिहासिक घटना आणि लोकभावनेचे उद्दीपन यांचा विचार करायचा आहे. याला समांतर उदाहरण केवळ भगवान कृष्ण–चरित्रात मिळते. त्यांच्या जीवनातील दारुण प्रसंग आणि गोकुळवासीयांच्या भावनांचे उद्दीपन. आपण केवळ एका प्रसंगाचे, कालियामर्दनाचे स्मरण करू या. डोहात बुडालेला बाळकृष्ण आणि तो सुखरूप बाहेर यावा म्हणून कालिंदीच्या (यमुनेच्या) तीरावर आक्रोश करणारा साऱ्या गोपगोपींचा, गोकुळवासियांचा जनसागर, यांमध्ये काही उलट झाले असते, तर आज कृष्णाचे नाव तरी आपल्यापर्यंत पोहोचले असते का? लोकेच्छांच्या बळावर कृष्ण कालियाचे दमन करू शकला. सत्यासत्याच्या संघर्षात अखेर सत्याचा विजय होतो, कारण ते लोकमनात दडलेले असते. ते भावनेवर, भावावर आरूढ होऊन, भारूड होऊन जोपर्यंत बाहेर पडत नाही; तोपर्यंतच असत्याला वाव असतो इतकेच. या प्रसंगानंतर कृष्ण–जीवनातील सर्व आघाड्यांवर तो यशस्वी होणार, त्याचा पक्षच महाभारतातून तावून–सुलाखून निघणार, हे भविष्य सांगण्याची वेगळी गरज भासत नाही. या प्रसंगाने कालिंदीचे हृदयशल्य फेडिले! तथा भयमुक्त केले गोकुळवासीयांसी! हे तर झालेच. तथापि गोकुळवासीयांना वेगळी ओळख (identity) मिळाली. नवा त्राता मिळाला. रक्षक मिळाला. त्यांचा आत्मविश्वास बळावला आणि संभाव्य कंसविरोधाला आवश्यक असणारे मनोबल, आत्मबल त्यांना मिळाले.

छत्रपतींच्या जीवनातील केवळ दोन प्रसंग– अफझलखान प्रसंग व आग्राभेट यांचे स्मरण करू या. केवढा आणि किती (बद)लौकिक असणारा अफझलखान. दक्षिण भारतात त्याच्या तोडीचा क्रूरकर्मा नव्हता. आणि शिवरायांचे सैन्यबल, अनुभव, शारीरिक बल कोणत्याच मुद्यावर उभयतांची तुलना होऊ शकत नाही. पण अफझलखान संपविणे, ही राष्ट्रीय गरज आहे. या प्रसंगातून मराठ्यांचे राष्ट्र साकारणार आहे, याची रोम–रोमांत जाण असणारे निष्ठावंत शिवराय आणि विजापूर दरबारामध्ये स्वसामर्थ्य सिद्ध करून जहागिरीमध्ये बढतीची अपेक्षा बाळगणारा सरंजामदार अफझलखान. दरबाराचे राजकारण तरी काय लायकीचे! प्रसंग अगदी लहानसाच, पण यात थोडी जरी गफलत झाली असती, तर किती माता–भगिनींना अन्यायाची सोबत करावी लागली असती?

तसाच आग्राभेटीचा प्रसंग. सिंहाच्या गुहेत प्रवेश करून त्याची आयाळ कुरवाळून परत यावयाचे. गुहेत गेलेल्या प्राण्यांच्या पावलांचे ठसे दिसतात, तथापि परत फिरलेल्या प्राण्यांचे ठसे दिसत नाहीत; हे माहीत असूनही. अशा पराक्रमाच्या परीकथा केवळ विक्रम आणि वेताळाच्या कथेमध्येच शक्य आहेत. वास्तवात हे केवळ असंभवनीय आहे. पण महाराष्ट्राचे नशीब बलवत्तर. शिवराय एकटेच परतले नाहीत तर लहानग्या शंभूराजांनाही त्यांनी सुरक्षितपणे रायगडावर आणले. मानवाने घडविलेला केवढा दैवी चमत्कार! का नाही त्या काळातील जनता शिवरायांना अवतार मानणार? महाराष्ट्राची सारी शक्ती त्यांच्या बाहूंत एकवटली असताना का नाही शक्तीची अधिष्ठात्री त्यांच्या अधीन होणार? त्या वेळच्या समाजाच्या धारणेप्रमाणे या सर्व गोष्टी (myth) म्हणून आवश्यकच होत्या. त्यामुळे शिवरायांचे नेतृत्व नक्की झाले. लोकांना, महाराष्ट्राला ओळख मिळाली. लोकविश्वास संपादित झाला आणि लोकभावनेचे उद्दीपन होऊन शिवराय गोब्राह्मण प्रतिपालनार्थ हिंदवी स्वराज्याची स्थापना करू शकले. अफझलखान वधाने राजांच्या पराक्रमांचे पोवाडे दक्षिण भारतभर गायले जाऊ लागले. त्यांच्या नेतृत्वाला शह देईल अशी एकही शक्ती राहिली नाही. आग्राभेटीने उत्तरेचे राजकारण राजांना समजले आणि राज्याभिषेकाचा तथा दक्षिण दिग्विजयाचा मार्ग सुकर झाला. राज्याभिषेकाचे शल्य सर्वांत जास्त औरंगजेबाला वाटले कारण मराठा इतुका पादशहा झाला.

शिवरायांनी किती लोकविश्वास संपादित केला होता, याची दोन सुरेख उदाहरणे म्हणजे सिंहगड प्रसंग व आग्र्याच्या कैदेत राजांसोबत असणारा मदारी मेहतर. वास्तविक तानाजी मालुसरे राजांना लग्नाचे निमंत्रण देण्यास आले असता राजे सहज बोलून गेले की, आमच्या मनात सिंहगड घेण्याचे घोळत होते. एका क्षणाचाही विलंब न लावता तानाजी मालुसरे उत्स्फूर्तपणे म्हणाले, 'आधी लगीन कोंडण्याचे.' एकीकडे ही स्वामिनिष्ठा आणि दुसरीकडे ही राष्ट्रनिष्ठा. पुत्राचे मंगलकार्य पुढे ढकलून मोहिमेवर जाण्याचे इतिहासातील हे एकमेव उदाहरण. राजांचा शब्द झेलण्यात केवढी धन्यता. राष्ट्रनिर्मितीसाठी लोकविश्वास संपादणे किती महत्त्वाचे असते, हे महात्मा गांधीच्या 'चले जाव' घोषणेवरून समजावे. ते शब्द एकट्या गांधीचे नव्हते तर साऱ्या भारतीयांची आज्ञा होती. आणि आज एक अब्जाची लोकसंख्या असलेल्या राष्ट्रात असे एक तरी व्यक्तिमत्त्व उदाहरणादाखल दाखविता येईल काय?

मदारी मेहतर ना नात्याचा ना धर्माचा. तो राजांच्या आग्रा कैदेतील सर्व घडामोडींत अंतःकरणापासून सहभागी होता. राजांची येथून सुटका झाली पाहिजे, हे त्याला मनापासून पटले होते. त्यासाठी कोणतेही दिव्य करण्यास तो तयार होता. वास्तविक त्याला केवढा मोठा सौदा करता आला असता. राष्ट्रनिर्मितीमध्ये सर्वांचा सहभाग किती आवश्यक असतो. मग धर्म, जात आदी निकष त्यापुढे अत्यंत गौण ठरतात.

**युगप्रवर्तक**

हिंदवी स्वराज्याची स्थापना ही केवळ राजकीय क्रांती नसून ते सामाजिक, धार्मिक आणि ऐहिक परिवर्तन होते. सातवाहनांनंतर महाराष्ट्राच्या जडणघडणीचे अखेरचे पर्व शिवरायांच्या कारकिर्दीमध्ये आकारास आले. राष्ट्रनिर्मितीसाठी आवश्यक असणाऱ्या घटकांचा विचार केल्यास शिवरायांची राजनीती, प्रशासन, रणनीती, सैन्यसंघटन (कोणत्याही सामान्य मावळ्याला स्वतःच्या बळावर पराक्रम दाखविण्यास मुभा होती), दुर्गनीती (राजांच्या स्वराज्याचा पाठीचा कणा– इंग्रजांना याची जाणीव झाल्यावर त्यांनी दुर्गांचा जमेल तेवढा विध्वंस हेतुतः केला), जलनीती, अर्थ व कोष नीती, न्यायदान, धर्मनीती,

प्रजानीती, सागरनीती (इंग्रज हेच आपले संभाव्य शत्रू आहेत), कल्याणकारी आणि सर्वसमावेशक राज्य ज्यामध्ये कटाक्षाने वतनबंदी ही सर्व वैशिष्ट्ये आढळतात. आजही आपण एकीकडे लोकशाही पद्धतीचा पुरस्कार करत आहोत तर दुसरीकडे वतनदारीला/घराणेशाहीला (लोकशाहीतील नवे मनसबदार) मान्यता देत आहोत आणि जबाबदार नेते मंडळी बेजबाबदार वक्तव्ये करून वतनदारांचे (घराणेशाहीचे) समर्थन उघडपणे करीत आहेत. हे लोकशाही परिपक्व झाल्याचे उदाहरण समजावयाचे का?

म्हणूनच छत्रपतींना युगप्रवर्तक मानले जाते. राम आणि कृष्ण ह्यांना असेच युगप्रवर्तक मानले गेले होते. मागील ४०० वर्षांपासून मराठी मनावर अधिसत्ता गाजविणारे असे शिवरायांचे एकच व्यक्तिमत्त्व आहे. आजही सर्व महाराष्ट्राला एकत्र आणणारे, नतमस्तक व्हावयास लावणारे ते एकमेव व्यक्तिमत्त्व आहे. ते ऐतिहासिक व्यक्तिमत्त्व असूनही त्यांनी दिलेला लढा हा सर्वस्वी मानवी पातळीवरील होता, याचा विसर अलीकडे आपणास पडत चालला आहे. सुज्ञ मनातील ही सल नष्ट झाली पाहिजे.

हाच संघर्ष आमच्या इंग्रजांविरुद्धच्या लढ्याचा पायाभूत घटक होता. हे मर्म सुभाषचंद्र बोस, पंजाब केसरी लाला लजपतराय, आणि महाराष्ट्र केसरी लोकमान्य टिळक ह्यांनी ओळखले होते. म्हणून टिळकांनी शिवजयंती उत्सवाचा आरंभ केला. राष्ट्राची निर्मिती शाळेच्या वर्गातून होत असते (Nations are built in classrooms). त्यामुळे महाराष्ट्राचे एकसंधत्व संपन्न करायचे झाल्यास येथील सर्व शाळांतून किमान प्राथमिक आणि माध्यमिक शळांतून इयत्ता सातवीपर्यंत हा इतिहास शिकवला गेला पाहिजे. राष्ट्रनिष्ठेचा हा दुहेरी वारसा (Tangible- राष्ट्रीय नेत्यांनी उभारलेली अथवा त्यांच्या जीवनातील घटनांशी निगडित असणाऱ्या वास्तू वगैरे व Intangible – त्यांचे चरित्र) जतन केला पाहिजे. त्याच्याशी भावनिक जवळीक साधता आली पाहिजे. ती साधण्याचा प्रयत्न हेतुतः केला पाहिजे. पण देशात या प्रवृत्तीचा अभाव असल्याचेच अधिक जाणवते. परवा मी एका कार्यक्रमानिमित्त नंदुरबारला गेलो होतो, तेव्हा तेथील किल्ला दाखविण्याची विनंती मी आमंत्रितांना केली तेव्हा ते म्हणाले की, नंदुरबारला किल्ला आहे हे आम्हांला तुमच्याकडूनच (लेखकाकडून) समजले. मग मी बाल–हुतात्मा शिरीषकुमारचे घर दाखविण्याची विनंतीवजा चिकाटी धरली. त्यांनी मला ते दाखविले आणि माझे मन शतशः विदीर्ण झाले. मग छत्रपती शिवरायांनी निर्माण केलेले आदर्श पेलण्यास आपण समर्थ आहोत काय? एका राजसत्तेचे रूपांतर लोकसत्तेत करणारे शिवराय कुणीकडे आणि घटनेची बांधिलकी असूनही लोकसत्तेचे रूपांतर राजेशाहीत–घराणेशाहीत करणारे तथाकथित लोकनियुक्त लोकप्रतिनिधी कुणीकडे? अपराध्याला शिक्षा झालीच पाहिजे, या निकषावर चालणारी शिवशाही कुणीकडे आणि अपराध्यांचे राजकीय वसाहतीकरण करणारी लोकशाही कुणीकडे?

या दगडांच्या देशात, या कणखर देशात स्वाभिमान जागृत करणे, लोकसहभागाच्या माध्यमातून अंतिम जनकल्याणाचे उद्दिष्ट साध्य करणारी शिवशाही आणि महाराष्ट्राचे रूपांतर खऱ्या अर्थाने दगडांच्या देशात करणाऱ्या लोकशाहीत अतिशय कठीण आव्हाने आपल्यासमोर उभी आहेत. पिण्याच्या पाण्याची समस्या दिवसेंदिवस कठीण होत चालली आहे. ग्रामीण संस्कृती टिकल्यास महाराष्ट्र संस्कृती, महाराष्ट्र धर्म वाचण्याची शक्यता आहे. तथापि आज ग्रामीण संस्कृती प्राणवायूवर आहे. कर्जमुक्ती केवळ कागदावरच आहे. प्रत्यक्षात जगणे कठीण झाले आहे. त्यासाठी त्याला मानसिक आधाराची, आत्मविश्वासाची, प्रामाणिक नेतृत्वाची, मित्रांची गरज आहे. आणि तसा सखा मिळत नसल्याने, त्याच्यासमोर आत्महत्येशिवाय दुसरा पर्याय नाही. परिस्थितीत बदल झाला नाही, त्याच्या जीवनातील मृगजळ आपण दूर करू शकलो नाही; तर तासाला होणाऱ्या आत्महत्या मिनिटावर येतील. म्हणून महाराष्ट्राचे चरित्र–नायक समजून घ्या. भूगोलाच्या मर्यादांचा विचार करा आणि या दगडाच्या भूमीला पेलवेल एवढेच ओझे तिच्यावर लादा. इतिहासाच्या सर्व कालखंडांत स्वाभिमानाने जगलेल्या महाराष्ट्राचा स्वाभिमान खंडीत करू नका. असो.

**ग्रंथाचे स्वरूप**

इतिहास, भूगोल, पर्यावरण आदी भागांसह प्रस्तुत खंडात एकंदर सात प्रकरणे समाविष्ट करण्यात आली आहेत. आगामी खंडांत महाराष्ट्राच्या शिल्पकारांची चरित्रे देण्यात येणार आहेत. प्रस्तुत शिल्पकारांची निवड निरनिराळ्या क्षेत्रांमधून करण्यात

आली आहे. ती कोणत्या निकषावर कशी केली जाणार आहे याची रूपरेखा यापूर्वीच्या परिचय ग्रंथात मांडली आहे. या शिल्पकारांच्या कार्यक्षेत्राची व्याप्ती अभ्यासकांच्या ध्यानात यावी म्हणून प्रस्तुत खंडात विविध कार्यक्षेत्रांचा मागोवा तपशिलाने घेण्यात आला आहे. त्यामध्ये महाराष्ट्राची जडणघडण या विभागात पर्यावरणीय, भौगोलिक तथा वांशिक जडणघडण कशी झाली, यासंबंधी चर्चा केली आहे. त्यानंतर महाराष्ट्रातील वनवासी, भटके-विमुक्त आदींचा तपशील दिला आहे. शिवाय महाराष्ट्राच्या प्रादेशिक विभागांची जडणघडण कशी झाली, याचाही मागोवा घेण्यात आला आहे. विशेष म्हणजे त्यामध्ये मुंबई, बृहन्महाराष्ट्र आणि गोवा यांचाही तपशील दिला आहे. राजकीय दृष्ट्या गोवा आज महाराष्ट्राचा भूभाग नसला, तरी, भौगोलिक आणि सांस्कृतिकदृष्ट्या तो कोकणाचा म्हणजे पर्यायाने महाराष्ट्राचा पारंपरिक घटक आहे, हे मान्य करावेच लागेल. आपला महाराष्ट्र उत्खननामधून कसा दिसतो, याचाही विचार येथे करण्यात आला आहे. अद्याप हे कार्य पूर्ण झालेले नाही, तरी आजपर्यंत या क्षेत्रात जे कार्य झाले आहे; त्याचाही आढावा घेण्यात आला आहे.

दुसऱ्या विभागात इतिहासाचा म्हणजेच राजघराण्यांचा मागोवा तपशिलाने घेतला आहे. त्याचा ऊहापोह वर केला आहेच. त्यामध्ये विजयनगरच्या आणि महाराष्ट्राच्या ऋणानुबंधावर प्रकाश टाकण्यात आला आहे. धर्म-तत्त्वज्ञान व संप्रदाय या अनुक्रमे तिसऱ्या व चौथ्या विभागांत महाराष्ट्रातील प्रस्थापित धर्म, त्यांचे भिन्न संप्रदाय आणि त्यांनी मांडलेल्या तत्त्वप्रणालींची ओळख करून देण्यात आली आहे. विशेष म्हणजे यामध्ये पारशी आणि ज्यू धर्मांवरील लिखाणही समाविष्ट करण्यात आले आहे. हा विभाग फार प्रशस्त असून यामध्ये अनेक नामवंतांनी आपले योगदान दिले आहे. पाचव्या विभागात महाराष्ट्राची सामाजिक वाटचाल रेखाटली आहे. त्यामध्ये स्त्री-जीवनासह समाजाच्या अनेक पैलूंवर उदाहरणार्थ आहार-विहार, वस्त्रे-प्रावरणे, मनोरंजन, खेळ यांसारख्या आकर्षक तथापि फारशा ज्ञात नसलेल्या भागावर लिखाण करण्यात आले आहे. कला व स्थापत्य या सहाव्या विभागात गिरिशिल्पे, मंदिरशिल्पे, दुर्गशिल्पे, चित्रकला, संगीत, लोककला आदी पैलू प्रकाशात आणले आहेत. सातव्या विभागात भौतिक प्रगतीची वाटचाल रेखाटली आहे. त्यामध्ये कृषी, अर्थ आणि जलव्यवस्थापन यांसारख्या नव्या विषयांना पहिल्यांदाच स्थान मिळवून दिले आहे. यामध्येच वैज्ञानिक वाटचालीचा आढावा घेण्यात आला आहे. याशिवाय मराठी भाषा, बोली भाषा, महाराष्ट्रातील न्यायव्यवस्था अशी महत्त्वाची स्फुट प्रकरणे या खंडात समाविष्ट करण्यात आली आहेत.

ग्रंथ सर्वार्थाने संपन्न होण्यासाठी संबंधित क्षेत्रातील तज्ज्ञांना, जुन्या जाणकारांना तसेच नव्याने भरारी घेणाऱ्या संशोधकांना पाचारण करण्यात आले आहे. साप्ताहिक विवेकच्या आवाहनाला उत्तम प्रतिसाद लाभल्याचे संशोधक-लेखकाच्या नावांवरून आणि त्यांनी सादर केलेल्या लेखातील आशयावरून स्पष्ट व्हावे. यांची नामावली द्यावयाची झाल्यास त्यामध्ये वयोवृद्ध-तपोवृद्ध डॉ. प्रभाकर मांडे, डॉ. म. रा. जोशी, डॉ. गो. बं. देगलूरकर, डॉ. अ. प्र. जामखेडकर, डॉ. श. न. राजगुरू, डॉ. शोभना गोखले, डॉ. यशवंत पाठक, डॉ. दि. मा. मोरे, डॉ.मधू जामकर, डॉ. अरुणचंद्र पाठक, डॉ. ओमप्रकाश समदानी, डॉ. नीलकंठ बापट, प्र. के. घाणेकर, फादर फ्रान्सिस दिब्रिटो, डॉ. अविनाश आवळगावकर, डॉ. गजकुमार शहा, डॉ. नरेंद्र डेंगळे, डॉ. अरविंद गोडबोले यांच्या लेखनाच्या योगदानाने ग्रंथ भारदस्त होण्यास मदत झाली आहे. तसेच ग्रंथ-संपादनाच्या टप्प्यावर असताना ज्या मान्यवर लेखकांना आयत्या वेळी म्हणजे कमी लेखन-कालावधी असताना विनंती केली गेली, त्यांनीही 'विवेक'च्या प्रेमापोटी आपले लेखन देऊन उत्तम सहकार्य केले आहे. त्या सर्वांचा आणि ह्या खंडाच्या सिद्धतेसाठी प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्षपणे अनेक मान्यवरांचे मनापासून सहकार्य लाभले आहे, त्यांचाही नामोल्लेख येथे करणे अवघड आहे आणि त्यांचे असे आभार मानणे त्यांना फारसे रुचणार नाही. पण खरोखरच या सर्वांचे कौतुक करावे तेवढे थोडे आहे. कारण अगदी मोजक्या शब्दात लेखकांनी विषयाला न्याय दिला आहे. शिवाय आपले लिखाण संभाव्य कोशातील जागा व्यापणार नसून, जनमानसातील कोशात त्याचे स्थान असणार आहे, ही भूमिका गृहीत धरून ग्रंथ खऱ्या अर्थाने संपन्न केला आहे. यांपैकी काही विद्वानांबरोबर काम करण्याची मला संधी मिळाली आहे. यांतील बहुतांशांना मी व्यक्तिशः ओळखतो. त्यांच्या मूलगामी संशोधनाने मी प्रभावित झालो आहे. त्यामुळे पुढील खंडात त्याचे योगदान अखंडित असेल असे मी संपादक मंडळाच्या वतीने गृहीत धरतो व सर्वांना धन्यवाद देतो.

पहिला खंड तयार होण्यास किती विद्वानांचे हात लागले आहेत, हे ग्रंथाचे अंतरंग पाहून आपल्या ध्यानात येईलच. ते वेगळे नमूद करण्याचे कारण म्हणजे उर्वरित अकरा खंडांचा आवाका किती प्रचंड असेल, याची आपणास कल्पना यावी यासाठीच संपादकीय पूर्ण करण्यापूर्वी मला आणखी एक बाब आपल्या निदर्शनास आणावयाची आहे की, हा दगडांचा देश सुंदरही आहे– या लोकांची सौंदर्याभिरुची वेरूळ–अजिंठ्याच्या लेण्यांतून, राष्ट्रकूट–यादवकालीन मंदिरांतून दृगोचर झाली आहे. म्हणून कविवर्य कोल्हटकरांनी म्हटल्याप्रमाणे 'बहु असोत सुंदर संपन्न की महा। प्रिय आमुचा एक महाराष्ट्र देश हा।।' १ मे २००९ च्या पार्श्वभूमीवर, महाराष्ट्र राज्य स्थापनेच्या ५० व्या वर्षाच्या पूर्णत्वाच्या पार्श्वभूमीवर हा ऐतिहासिक खंड वाचकांना सादर करण्याचा हा दुग्धशर्करा योग आला, याची मला धन्यता वाटते. त्यामुळे 'आकांक्षांपुढती जिथे गगन ठेंगणे' असणाऱ्या महाराष्ट्राच्या ललामभूत कर्तृत्वाला, शिल्पकारांना, चरित्र–नायकांना आणि ज्ञानेशाच्या उन्मेश–शालिनी प्रतिभेला वंदन करून थांबतो. धन्यवाद!

रा. श्री. मोरवंचीकर

# अंतरंग

### विभाग १ - महाराष्ट्राची जडणघडण



### विभाग २ - राजघराणी

## विभाग ३ - धर्म व तत्त्वज्ञान



## विभाग ४ - संप्रदाय



## विभाग ५ - सामाजिक वाटचाल



## विभाग ६ - कला व स्थापत्य



## विभाग ७ - भौतिक प्रगती

# निर्माण ग्रुप ऑफ कंपनीज

***'To be among the top 5 builder-developers in India, and among the top 25 in the world while being the leader in the affordable housing segment by creating better lifestyles and better environments through state of the art townships at affordable rates.'***

हे ब्रीदवाक्य घेऊन आज निर्माणची वाटचाल सुरू आहे. १९९५ साली अजित मराठे आणि राजेंद्र सावंत या दोन युवकांनी भागीदारीत सुरू केलेल्या ह्या फर्मचे रूपांतर आता निर्माण रिअल्टर्स अ‍ॅन्ड डेव्हलपर्स लि. अशा पब्लिक लिमिटेड कंपनीत झाले आहे. येत्या २ ते ३ वर्षांत या कंपनीचा पब्लिक इश्यू बाजारात येणार आहे आणि आज फक्त एक कंपनी न राहता अनेक कंपन्यांचा हा निर्माण ग्रुप तयार झाला आहे.

निर्माण रिअल्टर्स अ‍ॅन्ड डेव्हलपर्स लिमिटेड कंपनीच्या अंतर्गत मुख्यतः बिल्डर-डेव्हलपर म्हणून विविध ठिकाणी जागा विकत घेऊन तेथे विविध प्रकारचे प्रकल्प, मुख्यतः निवासी प्रकल्प उभे केले जातात. असे ४० प्रकल्प विविध स्तरांवर, विविध ठिकाणी सुरू आहेत. कांदिवली, मालाड, जोगेश्वरी, महालक्ष्मी, पार्ले, गोवंडी, नेरळ, रत्नागिरी, गणपतीपुळे, माणगाव (गोरेगाव), गोवेले या ठिकाणी प्रकल्पांचे काम सुरू आहे. झोपडपट्टी पुनर्विकास, जुन्या चाळींचे पुनर्वसन, बंगलो स्कीम, सेकंड होम प्रोजेक्टस अशा विविध प्रकारांत हे प्रकल्प येतात आणि यांतील ९० टक्के प्रकल्प हे अ‍ॅफोरडेबल हाउसिंग या प्रकारात मोडतात. यातील महालक्ष्मीचा प्रोजेक्ट मात्र क्लास हाउसिंग या प्रकारात गणला जातो. मुंबईच्या रेसकोर्ससमोर तसेच महालक्ष्मी स्टेशनजवळ २०३ भाडेकरूंच्या पुनर्वसनाचा हा प्रकल्प आहे.

खऱ्या अर्थाने निर्माण ग्रुपचे नाव झाले ते नेरळ येथील सेकंड होम प्रोजेक्टसमुळे. तेथल्या प्रकल्पाला २००८ चे 'बेस्ट सेकंड होम्स प्रोजेक्ट' हे अ‍ॅकोमोडेशन टाइम्सचे अ‍ॅवॉर्ड मिळाले. आज सेकंड होम प्रोजेक्टमध्ये नेरळ येथे 'निर्माण नगरी' 'निसर्ग निर्माण', तसेच 'माथेरान व्हॅली' हे प्रकल्प उभे राहत आहेत. या सेकंड होम प्रोजेक्टचे नाव खऱ्या अर्थाने सर्वदूर पोचवले ते नेरळ स्टेशनपासून १ कि. मी येथे असलेल्या 'निर्माण नॅनो सिटी' या प्रोजेक्टमुळे. मंदीच्या काळात बांधकाम व्यावसायिक नवीन प्रकल्प सुरू करायला घाबरत असतानाही निर्माण ग्रुपने सर्वसामान्य लोकांना परवडतील अशा चार ते साडे चार लाख रुपये किमतीच्या घरांचा 'निर्माण नॅनो सिटी' हा प्रोजेक्ट जाहीर केला. मंदीच्या ऐन भरातही निर्माण ग्रुपवर प्रचंड विश्वास दाखवून सर्वसामान्य लोकांनी त्याला उदंड प्रतिसाद दिला आहे.

'बिल्डरच्या हाताखाली बिल्डर' ही संकल्पना निर्माणने अतिशय उत्तमरीत्या राबवून अधिकाधिक मराठी लोकांनी बांधकाम व्यवसायात यावे या दृष्टीने 'निर्माण ट्रेनिंग अ‍ॅकेडमी' प्रयत्न करते. प्रत्येक बुकिंगमागे रु.५०००/- हे 'निर्माण चॅरिटेबल ट्रस्ट'च्या खात्यात जमा होऊन त्यातून माणगावचे १०० विद्यार्थी व मुंबईतील काही अनाथाश्रमांतील विद्यार्थीदेखील या योजनेअंतर्गत दत्तक घेतले आहेत. पर्यटन, संगणक, इंग्रजी संभाषण, कृषीविषयक अभ्यासक्रम आदी अभ्यासक्रमांद्वारे कोकणातील उद्योगधंद्यांना पूरक असे मनुष्यबळ विकसित करण्याकरिता माणगाव जिल्हा रायगड येथील आय.आय.टी. केंद्रात शासनाच्या सहयोगाने नवीन अभ्यासक्रम चालू करण्याचा निर्माणचा मानस आहे. निर्माण ग्रुपच्या प्रेरणेने आणि मा. द. मा. सुकथनकर यांच्या मार्गदर्शनाखाली काही कोकणप्रेमी युवकांनी कोकणच्या विकासासाठी एकत्र येऊन सेव्ह कोकण लॅण्ड लिमिटेड या पब्लिक लिमिटेड कंपनीची स्थापना केली आहे. हा सामाजिक दृष्टिकोन ठेवून 'आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण – शिल्पकार चरित्रकोश' या प्रकल्पास निर्माण सहकार्य करीत आहे.







उल्कापातामुळे तयार झालेले लोणार सरोवर

# पुरापर्यावरणीय मागोवा

■ **डॉ. श. न. राजगुरू**

**नेवास्याजवळ प्रवरेकाठी, बोरीजवळ कुकडी नदीकाठी, आणि मोरगावजवळ कऱ्हा नदीकाठी वाळू-गोट्यांचे आणि मातीच्या अवसादांचे पुराचुंबकीय पद्धतीने नुकतेच कालमापन केले आहे. ह्या कालमापनाप्रमाणे हे अवसाद कमीत कमी ७ ते ८ लाख वर्षांपूर्वीचे असावेत, असे अनुमान भूपुरातत्त्वाच्या संशोधकांनी काढले आहेत. ह्या तिन्ही ठिकाणी आद्य पुराश्मयुगीन मानवाने बेसाल्ट ह्या दगडावर केलेली हत्यारे मिळतात. महाराष्ट्रातील मानवी अस्तित्वाचा हा सर्वांत जुना पुरावा मानला जातो.**

पर्यावरणातील बदल पृथ्वीच्या उत्पत्तीपासून होत आले आहेत. ह्या बदलांचा अभ्यास पूर्वीच्या काळी फक्त भूशास्त्रज्ञ करीत असत. २० व्या शतकाच्या उत्तरार्धात मात्र काचघर परिणामांमुळे पृथ्वीच्या तापमानात होणाऱ्या वाढीमुळे पर्यावरणातील बदलांचा मानवी संस्कृतीवर होणाऱ्या संभाव्य परिणामांचा विचार बहुविधज्ञानशाखांतर्फे होऊ लागला. इतिहासाच्या अभ्यासात भूगोलातील आणि पर्यावरणातील बदल ह्यांची जाणीव झाल्यामुळे ह्या लेखात महाराष्ट्राच्या प्राचीन आणि आधुनिक इतिहासाच्या अभ्यासकांसाठी पुरापर्यावरणाबद्दल तांत्रिक क्लिष्टता टाळून माहिती देण्याचा प्रयत्न केला आहे.

पर्यावरणातील बदल प्राचीन काळात नैसर्गिक कारणांमुळेच झाले आहेत. ह्या नैसर्गिक कारणांमध्ये पृथ्वीच्या गतीतील बदल, सूर्यावरील डाग, सौरऊर्जाग्रहणातील चढउतार आणि त्यामुळे निर्माण होणारी तापमानातील विषमता, सागरी पातळीत होणारे बदल, वातावरणातील ओझोन, कार्बन-डाय-ऑक्साइड, मीथेन आणि ऑक्सिजन ह्या वायूंच्या प्रमाणात होणारे बदल, ज्वालामुखींचा उद्रेक, भूकंप, आणि ह्यांसारख्या अनेक घटकांचा समावेश होतो. जगातील कुठल्याही स्थानाच्या पर्यावरणासंबंधीच्या बदलांचा जेव्हा आपण विचार करतो,

तेव्हा स्थानिक बदलपण महत्त्वाचे असतात. ह्या लेखात महाराष्ट्राच्या पुरापर्यावरणाबद्दल दिलेली माहिती. गेल्या ३५ वर्षांत भूशास्त्र, भूरूपिकीशास्त्र, भूकालमापनशास्त्र आणि पुरातत्त्व ह्या ज्ञानशाखांमध्ये जे संशोधन झाले आहे, त्यांवर आधारित आहे.

महाराष्ट्राच्या पर्यावरणाचा विचार करताना महाराष्ट्राचे भारतीय द्वीपकल्पात असलेले स्थान, महाराष्ट्रभूमीची उत्पत्ती आणि काळानुसार त्यात घडून आलेले बदल (उदा. प्रागैतिहासिक काळातील हवामान आणि सागरपातळी ह्यांतील बदल) या सर्वांचा विचार करावयास हवा. सुमारे १० कोटी वर्षांपूर्वी भारत आफ्रिकेच्या बराच जवळ होता. (सुमारे ३७° द. अक्षांश) आणि तो गोंडवनभूमीचा एक भाग होता. त्या काळी हवामान उबदार आणि समशीतोष्ण होते. त्या काळी ह्या भूमीवर 'डायनोसॉर (भीमसरड)' वावरत होते. पुढील काळात भारतीय पट्टा (plate) गोंडवनापासून विवर्तनीय (tectonic) हालचालींमुळे दूर सरकला आणि त्याची वाटचाल आग्नेय दिशेने होऊ लागली. विषुववृत्त ओलांडत असताना तिथे असलेल्या तप्तबिंदूमुळे पट्ट्याच्या पश्चिमी किनाऱ्यावर भेगीय आणि द्रोणीय ज्वालामुखीतून प्रचंड मोठ्या प्रमाणावर लाव्हारस भूपृष्ठावर ओतला गेला. ह्या लाव्हारसाच्या थंड होण्यामुळे बेसाल्ट खडक आणि दख्खनचे पठार निर्माण झाले. ही क्रिया सुमारे ७ कोटी वर्षांपूर्वी सुरू झाली आणि सुमारे ४ कोटी वर्षांपर्यंत चालू होती. ही प्रक्रिया चालू असताना मोठ्या प्रमाणात कार्बन-डाय-ऑक्साइड वातावरणात मिसळला जात होता. भारतीय द्वीपकल्प उत्तर गोलार्धात सरकल्यामुळे आणि कार्बन-डाय-ऑक्साइडच्या प्रमाणात वाढ झाल्यामुळे हवामानात बदल झाला. डॉयानोसॉरसारख्या प्रचंड प्राण्याचे अस्तित्वच धोक्यात आले.

ह्या काळात पृथ्वीवर मोठ्या प्रमाणावर उल्कांचा वर्षावपण होत होता. ह्या ३-४ कोटी वर्षांपूर्वीच्या पर्यावरणाची चर्चा इथे अगदी थोडक्यात केली आहे. कारण आपल्याला प्रागैतिहासिक आणि इतिहासकालीन पर्यावरणातील बदलांची माहिती जरा जास्त प्रमाणात देणे आवश्यक वाटते. भूशास्त्रीय परिभाषेत ह्या कालखंडाला 'सेनोझोइक' काळ म्हणतात. सेनोझोइकची विभागणी 'टर्शअरी किंवा तृतीयक' (सुमारे ४ कोटी ते २० लाख वर्षांपूर्वीचा काळ) आणि 'क्वाटर्नरी किंवा चतुर्थक' (सुमारे १८ लाख वर्षांपूर्वीपासून ते आजपर्यंतचा काळ) अशी केली जाते. क्वाटर्नरीची विभागणी 'प्लाइस्टोसीन' (सुमारे १८ लाख वर्षांपूर्वीपासून सुमारे १० हजार वर्षांपूर्वीचा काळ) आणि 'होलोसीन' (सुमारे १० हजार वर्षांपूर्वीपासून ते आजपर्यंतचा काळ) अशी केली आहे.

### तृतीयक काळातील महाराष्ट्र

(सुमारे ४ कोटी ते सुमारे २.५ कोटी वर्षांपूर्वीचा काळ).

भारत विषुववृत्तावर असताना या पठारी प्रदेशात त्या वेळी असलेल्या विषुववृत्तीय उष्ण आणि दमट हवामानात विटेसारख्या दिसणाऱ्या तांबड्या रंगाच्या खडकाची निर्मिती झाली. ह्याला भूशास्त्रीय भाषेत 'लॅटेराइट' आणि स्थानिक भाषेत 'जांभा' असे म्हणतात. महाराष्ट्रात कोकणपट्टीत, सह्याद्रीच्या घाटमाथ्यावर आणि पूर्वेकडील आजच्या कमी पावसाच्या निमदुष्काळी पठारी भागात बेसाल्टच्या खडकावर जांभा पसरलेला आहे. हा जांभा खडक तयार होताना महाराष्ट्र एखाद्या सखल प्रदेशाप्रमाणे समुद्रपातळीपेक्षा थोड्याफार उंचीवर होता. हवामान उष्ण आणि दमट होते आणि वार्षिक पाऊस कमीतकमी १२०० ते १५०० मि.मि.तरी असावा. ह्या जांभा खडकात लोखंड, मँगॅनीज आणि काही ठिकाणी ॲल्युमिनिअम भरपूर मिळते. महाराष्ट्राच्या पठारी भागातील जांभा खडकांचे पुराचुंबकीय कालमापन केले आहे. पठारी भागातील जांभा आद्य टर्शअरी काळातलाच आहे, तर कोकणपट्टीतील जांभा उत्तर टर्शअरी आणि आद्य प्लाईस्टोसीन काळातील आहे. रत्नागिरी जिल्ह्यात जांभा खडकाच्या खाली २ ते १.५ कोटी वर्षांपूर्वी तयार झालेले गाळाच्या मातीचे अवसाद मिळतात. ह्या मातीमध्ये कधी-कधी लिग्नाइट किंवा कमी प्रतीचा कोळसापण मिळतो.

महाराष्ट्रातील जांभ्याच्या अभ्यासावरून आर्द्र हवामानाचे, समुद्रपातळीतील बदलांचे आणि नवभूविवर्तनीय (neotectonic) हालचालींबद्दल चांगली माहिती मिळते. सह्याद्री पर्वताची निर्मिती पठारी

भागावरील जांभा तयार झाल्यानंतरच्या काळातील आणि कोकणपट्टीतील जांभा तयार होण्याआधीच्या काळातील असावी, असे अनुमान भूशास्त्रज्ञांनी काढले आहे. थोडक्यात जांभा खडक टर्शअरी काळातील आर्द्र हवामान, समुद्र पातळीतील बदल आणि भारतीय तक्त्याच्या उत्तरेकडे सरकण्याच्या प्रक्रियेमुळे झालेल्या नवविर्तनीय हालचालींवर बराच प्रकाश टाकतो. उत्तर टर्शअरीमध्येच हिमालय पर्वतराजी निर्माण झाली आणि भारताचे आज दिसणारे भौगोलिक स्थान त्याच काळात गाठले गेले. नैर्ऋत्य मान्सूनच्या पावसाची सुरुवातही ठामपणे उत्तर टर्शअरी काळातच झाली. सपुष्प वनस्पती आणि सस्तन प्राणीपण ह्याच काळात भारतीय उपखंडात अवतरले.

सह्याद्री पर्वताच्या निर्मितीमुळे पश्चिमेकडची कोकणची किनारपट्टी आणि पूर्वेकडील उंचावलेले महाराष्ट्राचे पठार अस्तित्वात आले. पश्चिमेकडून हे पठार उंचावले गेल्यामुळे त्याला पूर्वेकडे उतार प्राप्त झाला आणि पश्चिमेकडून पूर्वेकडे वाहणाऱ्या नद्यांचा (कृष्णा, भीमा, गोदावरी) उगम झाला. ह्या नद्या आणि त्यांच्या उपनद्या ह्यांच्या खोऱ्यांमध्ये वाळू-गोटे, माती, रेती ह्यांचे अवसाद मिळतात. ह्या अवसादांमध्ये प्रागैतिहासिक मानवाची दगडी हत्यारे मिळतात. त्याचप्रमाणे नद्यांच्या काठी गाळांचे भराव, मंचके (terraces) तयार झाली आहेत. ह्यावर काळी माती मिळते आणि ह्या काळ्या मातीवर सुमारे ४००० वर्षांपूर्वी महाराष्ट्रातील शेतकीप्रधान संस्कृती सुरू झाली. ह्या लेखात प्राचीन संस्कृतीवर माहिती दिलेली नाही परंतु ह्या संस्कृतीची पर्यावरणाच्या दृष्टिकोनातून मिळालेली माहिती इथे थोडक्यात दिली आहे.

### आद्य प्लाइस्टोसिन काळ

उत्तर टर्शअरी काळात महाराष्ट्रातील पायरीसारखी दिसणारी पठारे अस्तित्वात आली. प्रामुख्याने विवर्तनीय हालचाली आणि हवामानातील लक्षणीय बदल हे पायरीसारखी दिसणारी पठारे तयार होण्यासाठी कारणीभूत आहेत. अचूक कालमापनाअभावी ह्या पठारांच्या उत्पत्तीवर पर्यावरणाच्या दृष्टिकोनातून जास्त माहिती देता येत नाही. आद्य प्लाईस्टोसीन काळातील काही नद्यांकाठी


प्रागैतिहासिक मानवाची दगडी हत्यारे

मिळणारे अवसाद आपल्याला पर्यावरणाबद्दल थोडीफार माहिती देतात.

नेवास्याजवळ प्रवरेकाठी, बोरीजवळ कुकडी नदीकाठी, आणि मोरगावजवळ कऱ्हा नदीकाठी वाळू-गोट्यांचे आणि मातीच्या अवसादांचे पुराचुंबकीय पद्धतीने नुकतेच कालमापन केले आहे. ह्या कालमापनाप्रमाणे हे अवसाद कमीत कमी ७ ते ८ लाख वर्षांपूर्वीचे असावेत, असे अनुमान भूपुरातत्त्वाच्या संशोधकांनी काढले आहेत. ह्या तिन्ही ठिकाणी आद्य पुराश्मयुगीन मानवाने बेसाल्ट ह्या दगडावर केलेली हत्यारे मिळतात. महाराष्ट्रातील मानवी अस्तित्वाचा हा सर्वांत जुना पुरावा मानला जातो.

त्या काळी हवामान एकूण शुष्कच होते. ह्या नद्या बारमाही वाहत नव्हत्या. रानबैल, घोडा, हत्ती ह्या प्राण्यांचे जीवाश्म किंवा अश्मिभूत हाडे हेपण दगडी हत्यारांबरोबर नदीने संचयन केलेल्या अवसादांमध्ये मिळतात. ह्या तिन्ही नद्यांची पात्रे साधारणपणे आजच्या पात्रांच्या पातळीवरच होती. ह्या नद्यांकाठी भटके-शिकारी जीवन जगणाऱ्या मानवाने एक अस्मानी संकट त्या काळी अनुभवले. बोरी आणि मोरगाव इथे अश्मयुगीन हत्यारांबरोबर ज्वालामुखीय राखी-पांढऱ्या रंगाच्या राखेचे थर मिळतात. ह्या राखेमध्ये ज्वालामुखीय काचेची भुकटी असून तिचे रासायनिक आणि खनिज गुणधर्म सुमात्रा (इंडोनेशिया) बेटावरील 'टोबा' या जिवंत ज्वालामुखीच्या राखेच्या गुणधर्मांशी साम्य दर्शवितात.

ह्या राखेच्या पुराव्यावरून एक अनुमान असे काढता येते की, सुमारे ७ ते ८ लाख वर्षांपूर्वी टोकाचा ज्वालामुखी जिवंत होऊन वातावरणात १५ ते २०



आद्य पुराश्मयुगीन मानव

कि.मी. उंचीवर राख फेकली गेली आणि ही राख सुमारे ३००० कि.मी.चा वातावरणातील प्रवास करून भारतीय उपखंडावर पोहोचली. पुणे जिल्ह्यातील कुकडीच्या आणि कऱ्हेच्या खोऱ्यात पावसाबरोबर राख पडून नदीकाठच्या निक्षेपांमध्ये गाडली गेली. ह्या राखेमुळे वनस्पतीचे आवरण तात्पुरते नष्ट झाले असावे. अश्मयुगीन मानवाने अनुभवलेला आणि आद्य प्लाईस्टोसिन काळातील भारतात मिळालेला अस्मानी संकटाचा हा एकमेव पुरावा मानला जातो.

प्लाईस्टोसीन काळातील पठारी भागातील अवसादांबद्दल कालमापन करणे अत्यंत अवघड आहे, कारण हा काळ कार्बन–१४ ह्या बहुश्रुत कालमापन पद्धतीने ३५ ते ४० हजार वर्षांपूर्वीचा काळ अचूकपणे ठरविता येतो. त्या पूर्वीच्या म्हणजे काही लाख वर्षांपूर्वीच्या घटनांचा काळ युरेनिअम–थोरिअम, इलेक्ट्रॉन स्पिन रेसोनन्स, फिशन ट्रॅक, थर्मो–ल्युमिनिसन्स, ॲरगॉन–ॲरगॉन आणि पुराचुंबकीय ह्या पद्धतींचा उपयोग करून ठरविता येतो. ह्या सर्व कालमापन पद्धती महागड्या असून भारतातील एक–दोन प्रयोगशाळांतच तपासता येतात. म्हणूनच आद्य प्लाईस्टोसीन काळातील पर्यावरणाबद्दल जास्त माहिती सध्या देता येत नाही.

**उत्तर प्लॉईस्टोसीन काळातील पर्यावरण**

(सुमारे ४ लाख वर्षापूर्वीपासून १० हजार वर्षापूर्वीचा काळ)

ह्या काळातील गाळाच्या मातीचे अवसाद नद्यांकाठी बऱ्यापैकी मिळतात. ह्या अवसादांमध्ये बऱ्याच ठिकाणी अश्मयुगीन हत्यारे, प्राण्यांची अश्मिभूत हाडे, शंख, शिंपले, वाहून आलेल्या झाडांचे ओंडके हे सारे मिळते.

पठारी महाराष्ट्रातील बहुतांशी नद्या त्यांच्या निर्मितीच्या काळापासून आत्तापर्यंत त्यांच्या जुन्या पात्रांतूनच वाहत आहेत. त्यात लक्षणीय बदल झालेला नाही. त्याला अपवाद कृष्णा नदीचा देता येईल. महाराष्ट्र–कर्नाटक सीमेवर असलेल्या शिरगुपी गावाजवळ कृष्णेचे १ ते १ ।। कि.मी.ने बदललेले पात्र दिसून येते. सोडून दिलेल्या पात्रात चुनखडकात रूपांतरित झालेली झाडांची खोडे तसेच मुळे आढळतात. ह्या खोडांचे युरेनिअम–थोरिअम सेरिजने काढलेले वयोमान ३.५ लाख वर्षांपूर्वीपेक्षा जुने आहे. ह्या ठिकाणी आद्यपुराश्मयुगीन हत्यारे आणि हत्तीचे जीवाश्म मिळाले आहेत. प्राचीन अवसादांमध्ये भरपूर चुनखडी मिळते; त्यावरून ३.५ लाख वर्षांपूर्वी कृष्णा खोऱ्यातील हवामान अर्धशुष्क होते, असे अनुमान काढता येते. प्रवरेकाठी संगमनेर, नेवासा आणि पठारी भाग येथून वाहणाऱ्या नद्यांच्या काठी असेच चुनखडीयुक्त निक्षेप मिळतात. ह्यावरून उत्तर प्लाईस्टोसीन काळात हवामान सर्वसाधारणपणे अर्धशुष्कच होते.

वाईजवळ कृष्णेच्या खोऱ्यात पर्यावरणाच्या संबंधातील ७५ हजार वर्षांपूर्वीचा एक महत्त्वाचा पुरावा म्हणजे हवामान शुष्क झाल्यामुळे डोंगराच्या उतारांवरील वनस्पतींचे आच्छादन कमी झाले आणि शुष्क किंवा दुष्काळी वातावरणात जोराच्या पावसानंतर डोंगराच्या मातीची मोठ्या प्रमाणावर धूप होऊन ती पायथ्याशी येऊन संचयित झाली. अशा प्रकारचे डोंगर बोडके होऊन त्यांच्या उतारावरील मातीची आणि दगडांची धूप झाल्याचे पुरावे पठारीभागात बरेच ठिकाणी मिळतात. अशा तऱ्हेच्या घटना हवामान शुष्क झाल्याचेच दर्शवितात.

जागतिक पातळीवर सुमारे ७५ हजार वर्षांपूर्वी अंतिम हिमयुगाची सुरुवात झाली होती. पृथ्वीवरचे पाणी गोठून हिमालय, युरोप, उत्तर अमेरिका, आर्क्टिक आणि अंटार्टिका ह्या भूभागावर बर्फाचे आच्छादन आले. भारताच्या बहुतांश भागांत बर्फ जरी पडले नाही, तरी मान्सूनचा पाऊस कमकुवत झाला. पावसात अनियमितता निर्माण होऊन दुष्काळांचे प्रमाण वाढले. आणखी एक

घटना सुमारे ७५ हजार वर्षांपूर्वी घडली आणि ती म्हणजे टोबाचा ज्वालामुखी पुन्हा जागृत झाला आणि ह्या जागृत झालेल्या ज्वालामुखीची राख बंगालच्या उपसागरात, भारतीय द्वीपकल्पातील पूर्णा, नर्मदा, सोन ह्या नद्यांच्या खोऱ्यात पसरली. काही शास्त्रज्ञांच्या मते ७५ हजार वर्षांपूर्वी पसरलेल्या राखेचा परिणाम हवामान थंड होण्यावरपण झाला आणि वनस्पतीचे आच्छादन खूपच कमी होऊन पुरामध्याश्मयुगीन मानवीसंस्कृतीच्या ऱ्हासाला सुरुवात झाली.

हिमयुगाची सुरुवात, टोबा ज्वालामुखीची फार मोठ्या प्रमाणावर पसरलेली राख ह्यांचा स्वाभाविक परिणाम नद्यांच्या कार्यावर झाला. समुद्र पातळी खाली जाऊ लागली. हिमालय गोठला आणि राजस्थानचे वाळवंटीकरण झाले. पठारी महाराष्ट्रातील नद्यांमध्ये गाळ साचू लागून त्यांची पात्रे विस्कळीत होऊ लागली. सुमारे २२००० ते १८००० वर्षांपूर्वीच्या कालखंडात कृष्णा, भीमा, गोदावरी आणि त्यांच्या उपनद्या गाळाने भरून गेल्या आणि त्यांची पात्रे आजच्या पात्राच्या पातळीपेक्षा ३ ते ४ मीटरने उंचावली गेली. ह्या उंचावलेल्या पातळीचा एक चांगला परिणाम म्हणजे नद्यांच्या पात्रांमध्ये आणि लगतच्या पूरमैदानांमध्ये डबकी, छोटी तळी तयार झाली. ही डबकी आणि तळी असल्यामुळे मान्सूनचा पाऊस ६० ते ७० टक्के कमी होऊनसुद्धा अश्मयुगीन मानवाला आणि प्राण्यांना बारमाही पाणी मिळू शकले. मध्याश्मयुगीन किंवा उत्तर पुराश्मयुगीन मानवाने गारांवर तयार केलेली क्षुद्रास्त्रे (microliths) गाळांच्या आणि वाळूच्या अवसादांमध्ये महाराष्ट्रात बऱ्याच ठिकाणी मिळतात. ह्या हत्यारांबरोबरच शंख-शिंपले, हत्ती, पाणघोडा, रानबैल, गेंडा, हरीण, घोडा, नीलगाय, कासव इत्यादी प्राण्यांचे जीवाश्म अगर अश्मिभूत हाडे मिळतात. त्याचबरोबर शहामृगाच्या अंड्याचे तुकडेपण मिळतात. थोडक्यात अश्मयुगीन भटक्या मानवाला हा उत्तर प्लाईस्टोसीनचा कालखंड प्राणी, वनस्पती आणि उथळ नद्यांच्या पात्रांमधील पाणथळ जागा आणि मान्सूनचा एकूण पाऊस कमी असूनसुद्धा पर्यावरणाच्या दृष्टीने सुसह्य वाटला असेल.

ह्याच कालखंडात सुमारे ५० हजार वर्षांपूर्वी विदर्भातील बुलढाणा जिल्ह्यात लोणार ह्या ठिकाणी एक मोठा उल्कापात होऊन बेसाल्टच्या पठारामध्ये साधारणपणे गोलाकार ८१.८ कि.मी. व्यासाचा आणि १३० मी. खोलीचा खड्डा पडला. ह्याला भूशास्त्रीय भाषेत Impact Crator किंवा 'आघात विवर' असे म्हणतात. ह्या विवरामध्ये आता खारे पाणी आहे आणि ह्या विवराच्या कडा साधारणपणे ३० मी. उंच आहेत. ह्या तळ्यामध्ये ९५ मी.पर्यंत मातीचा गाळ साचलेला आहे. अशा तऱ्हेची विवरे चंद्रावर आणि मंगळावरसुद्धा आहेत. अमेरिकेतील ॲरिझोना संस्थानातही आहेत. काही भूशास्त्रज्ञांना हे आघात विवर आहे, हे पटत नाही. छोट्या प्रमाणावर ज्वालामुखीचा उद्रेक होऊन ते तयार झाले असावे, असे त्यांना वाटते. लोणार तळ्यामध्ये साचलेल्या गाळाच्या अवसादांचे भूशास्त्रीय, पुरावनस्पतीशास्त्रीय आणि भूकालमापनशास्त्रीय दृष्टिकोनातून संशोधन चालू आहे. त्याचे निष्कर्ष गेल्या ५०-६० हजार वर्षांत मान्सूनच्या पावसाच्या प्रमाणात झालेल्या बदलांचे स्वरूप अचूकपणे कळून घेण्यास उपयुक्त ठरतील.

ह्या काळात कोकणपट्टीतील नद्या तीव्र उतारावरून वाहत होत्या आणि नद्यांकाठी गाळ संचयन कमी प्रमाणात होत होते. ह्याला मुख्य कारण म्हणजे पृथ्वीवरचे बहुतांश पाणी गोठल्यामुळे समुद्रपातळी आजच्या पातळीपेक्षा १०० ते १५० मी. ने खाली गेली होती. मुंबईच्या पश्चिमेकडे आजच्या किनारपट्टीपासून सुमारे १०० कि.मी अंतरावर आणि ८० मी. खोलीवर चुनखडीचे खडक मिळतात. त्यांचे कार्बन-१४ ह्या कालमापनपद्धतीने १२,००० ते ११,००० असे कालमापन झाले आहे. हे चुनखडीचे अवसाद उथळ समुद्रातच तयार होतात. ह्या खडकांचा पुरावा गोव्याच्या राष्ट्रीय सागर संस्थान ह्या संस्थेतील शास्त्रज्ञांनी जगासमोर आणला.

त्यानंतर सुमारे १६ हजार ते ९ हजार वर्षांपूर्वीच्या कालखंडात पर्यावरणात लक्षणीय बदल होत गेले.

**होलोसीन काळातील पर्यावरण**

(सुमारे १०,००० वर्षांपूर्वीपासून ते आजपर्यंतचा काळ)

उत्तर प्लाईस्टोसीन हा कालखंड एकूणच थंड आणि शुष्क होता. साधारणपणे १२ हजार वर्षांपूर्वीपासून पृथ्वीचे हवामान उबदार होऊ लागले. भारतातील मान्सूनपाऊस सुधारायला सुरुवात झाली. हिमालयातील हिमनद्या आकुंचन पाऊ लागल्या आणि बर्फात गोठलेले पाणी वितळून ते समुद्रात येऊ लागले. समुद्रपातळी वर येऊ लागली. राजस्थानच्या वाळवंटातील शुष्क पडलेल्या तळ्यांमध्ये पाणी साठायला सुरुवात झाली.

मान्सूनच्या पावसाच्या दृष्टीने ८ हजार ते ५ हजार वर्षांपूर्वीचा काळ उत्तम होता. समुद्रपातळीपण सुमारे ६ ते ७ हजार वर्षांपूर्वी आजच्या पातळीवर पोहोचली. महाराष्ट्राच्या पठारी भागातील नद्यांमध्ये डोंगर उतारावरून येणाऱ्या गाळाचे प्रमाण कमी झाले कारण चांगल्या पावसामुळे डोंगरमाथा आणि डोंगरउतार येथील वनस्पति-आच्छादन दाट झाले. एकूणच पर्यावरणाच्या दृष्टिकोनातून हा सुवर्णकाळ मानायला हरकत नाही. बारमाही वाहणाऱ्या नद्या, उत्तम वनस्पति-आच्छादन ह्यांमुळे डोंगर उताराची कमी झालेली झीज आणि पठारी भागावर तयार होणारी काळी माती हे पर्यावरणाच्या दृष्टीने उत्तम घटक होते.

अशा चांगल्या पर्यावरणाच्या काळात मध्याश्मयुगीन मानवाची संस्कृती महाराष्ट्रात दूरवर बहरली. कोकणची किनारपट्टी, सह्याद्रीचा घाटमाथा आणि पूर्वेकडे पसरलेली बेसाल्ट खडकांवरची पायरीसारखी दिसणारी पठारे हे सारे मध्याश्मयुगीन मानवाने व्यापले. शेतीची सुरुवात गंगेच्या खोऱ्यात झाली परंतु महाराष्ट्रात मात्र पशुपालन आणि भटकी जीवनपद्धतीच चालू राहिली. सुमारे ४ हजार वर्षांनंतर मान्सूनचा पाऊस कमकुवत होऊ लागला आणि ३ हजार वर्षांपूर्वी तो लक्षणीयदृष्ट्या कमी झाला. त्यानंतर २ हजार वर्षांपूर्वी पाऊस चांगला पडू लागला आणि सुमारे १ हजार वर्षांपासून महाराष्ट्राच्या पठारी भागात पावसाचे प्रमाण कमी होऊन दुष्काळी वर्षांमध्ये वाढ झाली. १२ व्या शतकातील दुर्गादेवीचा दुष्काळ सतत १२ वर्षे पडला होता. त्याचप्रमाणे १५ वे शतक ते १७ वे शतक यांमधील काळात महाराष्ट्रात वारंवार दुष्काळ पडल्याचे ऐतिहासिक पुरावे मिळतात.

कोकणपट्टीत ह्याच काळात म्हणजे गेल्या ६ हजार वर्षांत समुद्रपातळी आजच्या पातळीपेक्षा २ ते २.५ मी.ने कधी खाली, तर कधी वरती होती. सुमारे २.५ हजार वर्षांनंतर ती खाली गेली, तर त्यापूर्वीच्या काळात थोडीशी वर होती. ह्या समुद्रपातळीतील बदलांचा लक्षणीय परिणाम पश्चिमवाहिनी नद्यांच्या मुखाजवळच्या भागावर निश्चितपणे झाला असावा.

महाराष्ट्रातील हवामानातील आणि समुद्रपातळीतील बदलांचा सखोल अभ्यास होणे आवश्यक आहे. हे बदल जागतिक पातळीवर होणाऱ्या पर्यावरणातील बदलांशी निगडित आहेत. ह्या संशोधनात बहुविधशाखांचा उपयोग होणे अत्यंत आवश्यक आहे. गेल्या काही शतकांत झालेल्या पर्यावरणातील बदलांची जेव्हा अचूक माहिती मिळेल, तेव्हा आपण २१ व्या शतकातील जागतिक पातळीवर होणाऱ्या तापमान वाढीमुळे पर्यावरणात होणाऱ्या बदलांचा चांगला विचार करू शकू.

**संदर्भ :**


१) श. न. राजगुरू, सविता घाटे, हेमांगी देवधर
'महाराष्ट्राचे प्रागैतिहासिक पर्यावरण'
महाराष्ट्र इतिहास आणि संस्कृती - पर्यालोचन
भारतीय इतिहास संकलन समिती, महाराष्ट्र प्रकाशन, पुणे १९९५

२) Vishwas Kale
'Tertiary and Quaternary Geology of The Deccan Traps of Maharashtra'
Geography and Maharashtra
Edited by Jaymala Diddee, S. R. Jog, V. S. Kale and V. S. Datye
Rawat Publications, New Delhi 2002

3) S. J. Sangode, S. Mishra, S. Naik and S. Deo
'Magnetostratigraphy of the Quaternary Sediments Associated with Some Toba Tephra and Acheulian Artefact Bearing Localities in Western and Central India' Gondawana Geological Magazine
Special Volume No. 10, PP. III-121.2007


* * *



# महाराष्ट्राची जडणघडण



## उत्खननातून प्रकटणारा महाराष्ट्र

■ डॉ. गो. बं. देगलूरकर

**महाराष्ट्रात केल्या गेलेल्या उत्खननांमुळेच महाराष्ट्रातील ताम्रपाषाणयुगीन संस्कृतीवर प्रकाश टाकता आला, एवढेच नव्हे तर अश्मयुगानंतर येथे एकदम लोहयुगयच अवतरले ही समजूत चुकीची ठरवली गेली. या दृष्टीने जोर्वे (१९५०) येथे उपलब्ध झालेली रंगवलेली मृद्‌भांडी व त्यानंतर तेथे झालेल्या उत्खननाचे महत्त्व अनन्यसाधारण आहे. उत्खनने म्हणजे इतिहासाच्या बिनीचे पथक. उत्खनन लोकजीवनाची, त्यांच्या आचारांची, हालचालींची, प्रगतीची आणि कर्तृत्वाची माहिती देतात, म्हणून उत्खननांचे विशेष महत्त्व.**

कुठल्याही संस्कृतीच्या प्रगतीमध्ये भौगोलिक वैशिष्ट्यांचा वाटा महत्त्वाचा असतो. महाराष्ट्रातील विविध प्रादेशिक वैशिष्ट्यांचे प्रतिबिंब पुरातात्त्विक आधारांद्वारे पुढे आणण्याचे कार्य पुरातात्त्विक साधनाने केले आहे. आणि त्यातही मोठा वाटा आहे तो उत्खननांचा. हा ठोस असतो आणि बोलकाही असतो.

पुरातात्त्विक पुराव्यांच्या दृष्टीने १८६३ साल महाराष्ट्राच्या अभ्यासासाठी महत्त्वाचे ठरते. श्री. वायने यांना पैठणजवळील मुंगी गावानजीक एक ॲगेट दगडाचा छिलका सापडला. श्री. वायने म्हणतात की, प्राचीन अश्मयुगीन मानव या छिलक्याचा उपयोग चाकूच्या पात्यासारखा करीत असावा. पैठणच्याच परिसरात आणि सामान्यतः याच सुमारास रानटी हत्तीची कवटी गोदावरीच्या डाव्या तीरावर गवसली, पुढे १९०४ साली श्री. पिलग्रिम यांना नांदूर (जिल्हा नाशिक) येथे वालुकास्तरात हत्तीचे अश्मीभूत अवशेष तसेच पाणघोड्याचे अश्मीभूत दात मिळाले. श्री. पिलग्रिम यांच्या मते हे अवशेष पूर्व-प्लायस्टोसीन युगाचे असावेत.

या पुराव्यांद्वारे दोन घटनांवर प्रकाश पडतो. १) महाराष्ट्रात काही लाख वर्षांपूर्वी प्रचंड आकाराचे (४८० सें.मी. उंचीचा हत्ती) प्राणी वास्तव्यास होते व २) दगडी छिलक्यांची हत्यारे / अवजारे वापरणारा मानव गोदावरीकाठी राहत होता.

टॉड यास १९३९ साली कांदिवली (मुंबई) येथे अश्मयुगीन हत्यारे सापडली आणि पुढे डेक्कन महाविद्यालयाच्या पुरातत्त्ववेत्यांनी अश्मयुगीन पुराव्यांची मालिकाच पुढे आणली. गोदावरीकाठी १९४४–१९४५ मध्ये, १९५२ मध्ये गंगावाडी (नाशिक), १९५४ मध्ये गोदावरी व प्रवरा येथे अन्वेषणानंतर महत्त्वाची माहिती उपलब्ध झाली. नेवाशाला अश्मयुगीन पुरावे मोठ्या प्रमाणात उपलब्ध झाले. पुढे कर्नाटकातही मध्याश्मयुगीन हत्यारे मिळाली. यांना 'नेवासीय' हत्यारे असेच संबोधिले जाते. याबरोबरच ज्या वेळी ही हत्यारे वापरली जात होती, त्या वेळची नैसर्गिक परिस्थिती, हवामान, झाडझाडोरा आणि तत्कालीन वन्यप्राण्यांचे स्वरूप यांचीही माहिती उपलब्ध केली गेली. अनेक पुरातत्त्ववेत्यांच्या संशोधनांद्वारे महाराष्ट्रातील अश्मयुगीन संस्कृतीच्या विस्ताराची माहिती उजेडात आली.

महाराष्ट्रात केल्या गेलेल्या उत्खननांमुळेच महाराष्ट्रातील ताम्रपाषाणयुगीन संस्कृतीवर प्रकाश टाकता आला, एवढेच नव्हे तर अश्मयुगानंतर येथे एकदम लोहयुगयच अवतरले ही समजूत चुकीची ठरवली गेली. या दृष्टीने जोर्वे (१९५०) येथे उपलब्ध झालेली रंगवलेली मृद्‌भांडी व त्यानंतर तेथे झालेल्या उत्खननाचे महत्त्व अनन्यसाधारण आहे. याच वेळी नाशिक येथील उत्खननातही अशा प्रकारच्या रंगीत खापराबरोबरच गारगोटीच्या छिलक्यांची हत्यारे आणि फक्त तांब्याच्या वस्तू सापडल्या. यामुळे नाशिक–जोर्वे येथील ताम्रपाषाणयुगीन लोकवस्तीची सांस्कृतिक परंपरा लक्षात आली. एवढेच नव्हे तर अश्मयुग नि ऐतिहासिक काल यांच्यामधला एक महत्त्वाचा दुवा हाती आला. या कालखंडातील अनेक पुरावे पुढे प्रकाशे, बहाळ, टेकवडा, दायमाबाद, बहुरूपे, सावळदा, चांडोली, सोनगाव येथील उत्खननांद्वारे उपलब्ध झाले.

ताम्रपाषाणयुगानंतर पण प्राचीन ऐतिहासिक कालखंडाच्या प्रारंभी एका वैशिष्ट्यपूर्ण म्हणजेच मॅगॅलिथिक (बृहदाश्मयुगीन) संस्कृतीचे अवशेष महाराष्ट्रात सापडले. या संस्कृतीचे लोक मृतांचे अवशेष पाषाणांच्या वर्तुळात मध्यभागी पुरून वर्तुळाच्या परिघाभोवती मोठमोठ्या शिळा ठेवीत असत. अशी शिळावर्तुळे दक्षिण भारताप्रमाणेच विदर्भात टाकळघाट–खापा, माहुरझरी, नयकुंड, जुनापानी, रायपूर (हिंगणे), बोरगाव, भागीमोहरी, खैरवाडा इत्यादी ठिकाणी शेकड्यांनी उपलब्ध झाली.

प्राचीन ऐतिहासिक कालखंडातील अनेक स्थळांवर उत्खनने केली गेली. यांतील सगळी नसली, तरी बहुतांशी उत्खनने डेक्कन महाविद्यालय (आता विद्यापीठ), पुणे येथील संशोधकांनी केलेली आहेत. ब्रह्मपुरी (कोल्हापूर), कऱ्हाड, नाशिक, नेवासे, तेर, पैठण, भोकरदन, पवनी, पवनार, भोन, अडम, आरंभ, भवर, ब्रह्मपुरी (जिल्हा चंद्रपूर), चौल, हमलापुरी, जुन्नर, कौण्डिन्यपूर, मन्सर, मांढळ, नागरा, मुलचेरा, पचखेरी, पातुर्डी, इनामगाव इत्यादी ठिकाणीही उत्खनने झाली.

इसवीच्या प्रारंभीच्या काही शतकांतील भारत–रोम सांस्कृतिक संपर्काचा पुरावा महाराष्ट्रात नाशिक, कोल्हापूर, तेर, पैठण, भोकरदन, प्रकाशे, पवनार आणि कौण्डिन्यपूर येथील उत्खननांतून उपलब्ध झाला.

अश्मयुगापासून ते मध्ययुगापर्यंत महाराष्ट्रात झालेल्या विविध सांस्कृतिक उलाढाली, परिवर्तने आत्तापर्यंत झालेल्या पुरातात्त्विक अन्वेषणांद्वारे आणि उत्खननांतून उजेडात आलेली आहेत. ह्या निरनिराळ्या काळात वस्ती करणारे लोक कोण होते, त्यांचे राहणीमान, खानपान, वस्त्रेप्रावरणे, दागदागिने, चालीरिती, इतर प्रादेशिक लोकांशी त्यांचा सांस्कृतिक संपर्क, त्यांच्याशी देणे–घेणे आणि महाराष्ट्र संस्कृतीवर झालेला परिणाम या सर्व पैलूंसंबंधांचा अंदाज बांधणे पुरातात्त्विक पुराव्यांच्या साहाय्याने शक्य झाले आहे. या सर्व वाटचालींचा थोडा तपशिलाने विचार आवश्यक आहे.

### अश्मयुगीन महाराष्ट्र

वरील माहितीवरून महाराष्ट्र महोदयाचा सांस्कृतिक इतिहास पढील कालखंडात मांडता येतो–

अश्मयुगीन महाराष्ट्र
ताम्रपाषाणयुगीन महाराष्ट्र
महाराष्ट्रातील बृहदाश्मयुगीन संस्कृती आणि
प्राचीन ऐतिहासिक महाराष्ट्र

पैकी अश्मयुगीन कालखंडाचा विचार पुराश्मयुग, मध्याश्मयुग, उत्तराश्मयुग आणि नवाश्मयुग अशा टप्प्यांतून करावा लागतो. हे कालखंड सांस्कृतिक प्रगतिदर्शक असल्यामुळे, त्यांचा आदि-अंत निश्चित करता येत नाही. ताम्रपाषाणयुगातही दगडी हत्यारांचा वापर होतच होता आणि लोहयुगात तांब्यांच्या वस्तूंचा उपयोग केला जात होता.

प्राचीन अश्मयुगात नद्यांच्या काठी हातकुऱ्हाडी, तासण्या, फरश्या आणि एकपृष्ठसंस्कारीत तोडहत्यारे इत्यादी प्रकार आढळून येतात. ही हत्यारे दगडी गोट्यापासून वा मोठ्या छिलक्यापासून (फ्लेक्स) तयार केली जात. महाराष्ट्राच्या निरनिराळ्या भागांत उपलब्ध असलेल्या दगडांपासून ही हत्यारे केलेली असत. कोठे ती तांबड्या ट्रॅपपासून (जिल्हा धुळे) तर कोठे ती डोलेराइटची (गोदाकाठचे गंगापूर) असतात. या हत्यारांवरून हवामान जास्त आर्द्र म्हणजे जोरदार पावसाचे असले पाहिजे, असे अनुमान शास्त्रज्ञांनी केले आहे. म्हणजेच हा काळ दीड ते दोन लाख वर्षांपूर्वीचा असला पाहिजे. या काळातील अतिपावसामुळे महाराष्ट्रात घनदाट जंगल आणि त्यात प्रचंड रानटी प्राण्यांचे वास्तव्य असावे आणि त्यासाठी फरशी, हातकुऱ्हाड यांसारखी हत्यारे तयार केली गेली असणार.

### मध्याश्मयुग

दक्षिण कोकण सोडल्यास विदर्भ, मराठवाडा, खानदेश, पश्चिम महाराष्ट्र इत्यादी भागांत मध्याश्मयुगीन मानवाची हत्यारे सापडली आहेत. आधीच्या काळातील हत्यारांपेक्षा ही हत्यारे वेगळ्या दगडांची, वेगळ्या तंत्राची आणि निराळ्या स्तरीय संदर्भाची आहेत. त्यांना नेवासीय (१९५४-१९५५ मध्ये पहिल्यांदा तेथे मिळाल्यामुळे) हत्यारे वा द्वितीय श्रेणीची (सिरीज टू) किंवा मध्याश्मयुगीन हत्यारे असे म्हणतात. मौज म्हणजे हा मध्याश्मयुगीन काळ महाराष्ट्रात अस्तित्वातच नव्हता, असे मत तयार होत असतानाच त्या हत्यारांचा शोध डॉ. सांकलिया यांना लागला आणि महाराष्ट्राचा अश्मयुगीन इतिहास अधिक समृद्ध झाला. तज्ज्ञांच्या मते ही हत्यारे दुसऱ्या आर्द्र-युगाच्या काळातील होत. या वेळी पावसाचे प्रमाण तुलनेने कमी झाले होते. जंगलेही विरळ झाली होती. या काळचे रानटी बैल, हत्ती  व इतर काही सस्तन प्राणी यांचे अश्मिभूत अवयव मिळाले. हा कालखंड ढोबळ मानाने इसवीपूर्व पंचवीस ते तीस हजार वर्षे असा असा ठरविला गेला आहे.

### उत्तराश्मयुग

या युगामध्ये ॲगेट, चर्ट, चाल्सिडोनी अशांसारख्या दगडांपासून हत्यारे बनविली जात. याबरोबर लघु-अश्मदहत्यारेही (microliths) या काळातीलच होत, असे म्हणावे लागते. या दोन प्रकारांच्या हत्यारांचे पारस्परिक संबंधांबद्दल अद्यापि निश्चित असे मत देता येत नाही. ही हत्यारे आखूड, पन्हाळीदार, चंद्रकोरसदृश, समांतर बाजूची पाती असलेली अशी आहेत. या काळातील आर्द्र हवामान पहिल्या दोन्ही अश्मयुगांतल्या आर्द्र कल्पापेक्षा फारच कमी आर्द्र होते. या युगातील हवामान, त्याचा काळ याबद्दल निश्चित स्वरूपात काही सांगता येण्यासाठी आणखी पुरावे उपलब्ध व्हायला हवेत, असे तज्ज्ञांचे मत आहे.

### नवाश्मयुगीन महाराष्ट्र

या युगातील पुरावा स्तरीय संदर्भाद्वारे सहसा मिळत नाही, मिळतो तो पुरावा उघड्यावर म्हणजेच जमिनीवरून (सरफेस कलेक्शन) गोळा केलेला आहे. काही ठिकाणी तो नंतरच्या ताम्रपाषाणयुगीन पुराव्यासमवेतच उपलब्ध झालेला आहे.

पुराव्यांच्या उपलब्धतेचे असे स्वरूप असले, तरी मानवी संस्कृतीच्या उत्क्रांतीच्या संदर्भात नवाश्मयुगाला एक महत्त्वाचा टप्पा अशी मान्यता लाभलेली आहे. या कालखंडात अन्नसंचय करणारा मानव, अशी त्याची ओळख न राहता अन्नोत्पादन करणारा अशी त्याची ओळख दृढ झाली. साहजिकच शेतीस उपयुक्त जनावरे तो पाळू लागला आणि साठवणीसाठी उपयुक्त ठरावीत म्हणून मातीची भांडी करू लागला (चाकाचा शोध, अग्नीचा शोध), घासून धारदार केलेली दगडांची हत्यारे (घृष्टाश्महत्यारे) बनवू लागला. या संस्कृतीसंबंधातील उत्कृष्ट पुरावा पॅलेस्टाइनमधील जेरिको येथे (इसवीपूर्व



मृद्‌भांडी, चित्रित खापरे, कट्यार.

७–८वे सहस्रक) मिळाला असला, तरी जगातल्या निरनिराळ्या भागांत समकालातच ते युग अवतरले असावे, असे मानता येत नाही. आपल्याकडे काश्मीर व आंध्र प्रदेश येथील पुराव्यांवरून या नवश्मयुगाचा काळ इसवीपूर्व फक्त २००० वर्षे एवढा येतो.

महाराष्ट्रात १९६८ पर्यंत तरी नवाश्मयुगीन संस्कृतीचा पुरावा उपलब्ध झाला नव्हता. मात्र आंध्र, कर्नाटक या शेजारच्या राज्यांत नवाश्मयुगीन संस्कृतीचे लोक राहत होते, हे लक्षात घेता महाराष्ट्रातही त्यांची वसती असण्याची शक्यता नाकारता येत नाही. निदान पुढील ताम्रपाषाणयुगात ती संमिश्र रूपात का होईना आढळते हे खरे.

## ताम्रपाषाणयुगीन महाराष्ट्र

कोकण वगळता संपूर्ण महाराष्ट्रात ताम्रपाषाणयुगीन लोकांनी वसती केली होती, असा निष्कर्ष येथे झालेल्या उत्खननांवरून काढता येतो. १९५० मध्ये या संस्कृतीचा पदर व आकस्मिकपणा जाणवला आणि पुढे गोदा, कृष्णा, भीमा, तापी, गिरणा, प्रवरा, घोड, नीरा, कऱ्हा या नद्यांच्या खोऱ्यांत तसेच अमरावती आणि चंद्रपूर या जिल्ह्यांत त्या काळच्या वसाहतींचे अवशेष उघडकीस आले.

घनदाट असलेले जंगल तोडून येथे वसाहती केल्या गेल्या, असे अनुमान आहे. या काळच्या संस्कृतीला ताम्रपाषाणयुगीन म्हणण्याचे कारण असे की, हे लोक वस्तू व हत्यारे यांच्या निर्मितीसाठी तांब्याचा आणि गारगोटीच्या छिलक्यांचा उपयोग करीत.

महाराष्ट्रातील या संस्कृतीला जोर्वे संस्कृती म्हणूनही संबोधले जाते कारण सर्वप्रथम प्रवराखोऱ्यातील जोर्वे या गावी तिची चाहूल लागली होती. जोर्वे संस्कृतीतील मडक्यांचे आकार, घडण आणि त्यांच्यावरचे काळ्या रंगातील चित्रीकरण या सर्वांमध्ये अंगभूत सुसूत्रता आढळते. अशी ही मृद्‌भांडी हे या संस्कृतीचे प्रमुख लक्षणच झाले, असे म्हणावे लागते. येथे आणखी एक गोष्ट ध्यानात घ्यावी लागते. वर उल्लेखिलेल्या काही ठिकाणी जोर्वे खापरे मिळतात त्यापेक्षा खालच्या थरात माळवा पद्धतीची खापरे मिळाली (उदाहरणार्थ इनामगाव) त्यामुळे ही संस्कृती जोर्वेपूर्व काळातही येथे नांदत होती, असे म्हणावे लागते.

## जीवनमान

**या कालखंडातील मृद्‌भांडी –** पुरातत्त्वशास्त्रात खापरांना अनन्यसाधारण महत्त्व प्राप्त झालेले आहे. खापरांवरून काळही ठरवता येतो तसेच राहणीमानही. ताम्रपाषाणयुगीन मानवाने या काळात जाड्याभरड्या पोताची तांबडी मडकी बनवली. ती ठेवण्यासाठी स्टॅन्ड (बैठकी), मोठाले घडे, मापट्यासारखे तोंड असलेली भांडी, चकतीच्या आकाराच्या झाकण्या, लहान वाडगे, मोठाले रांजण, बाह्यपृष्टभागावर कोरून अथवा चिखलाची वळी चिकटवून त्यावर बोटे रोवून नक्षी काढलेली भांडी यांचा समावेश होतो. काही ठिकाणी (उदाहरणार्थ नेवासे) भौमितिक नक्षीबरोबरच मृद्‌भांड्यांवर प्राण्यांचे चित्रणही केले जाई. कुत्रा, हरीण, त्यांतही चौखूर उधळणारी, एकामागोमाग धावणारी हरणे. असे आकर्षक ठरणारे प्राणिचित्रण आहे. याशिवाय राखी रंगाची तांबडी खापरे वैशिष्ट्यपूर्ण आहेत. काही राखी रंगाची मडकी काठावर तांबड्या गेरूने

रंगवलेल्या स्वरूपात आढळली. बाटलीच्या आकाराची, रेघोट्या मारलेली जणू झूल घातलीय अशा प्रकारची भांडी (उदाहरणार्थ नेवासे, चांडोली येथे) सापडली आहेत. फनेलसारखे तोंड असलेली, कोनाकृती उदराची, गोलबुडाची व नलिकातोटी असलेली भांडी, भांड्याचे काही भाग चाकावर तर काही साच्यात बनवून ते एकमेकांशी जोडलेले, अशी भांडीही हे लोक घडवीत. याशिवाय गोल उदराचे घडे, उंच मानेच्या कळश्या, काही भाग चाकावर तर काही भाग हाताने घडविलेले वाडगे, तसेच साठवणीचे रांजण, पराती यांचाही समावेश करता येतो. दफनकुंभ राखी रंगाचे असत. हे बहुतांशी विनानक्षीचे, मात्र मानेवर बोटे रोवून नक्षी काढलेलीही असत.

**आहार –** हे लोक प्रामुख्याने मांसाहारी असावेत. शाकाहारासंबंधीची अगदी जुजबी माहिती नेवासा उत्खननात शोधून काढावी लागली. दायमाबाद, चांडोली, इनामगाव इत्यादी ठिकाणी येथील ताम्रपाषाणयुगीन वस्तीचे एकूण तीन कालखंड आढळले. यांपैकी इनामगाव येथील घरात धान्य साठवणीसाठी गोल आकाराच्या बांधलेल्या कणग्यांचे अवशेष तसेच चौकोनी चूल व मातीचा तवा आढळला, तसेच येथे घोड नदीचे पाणी वळवून ते साठवण्यासाठी दगडगोट्यांचा व मातीचा बंधारा बांधलेला आढळला. या काळात गहू व बार्ली यांचे पीक घेतले जात असे, हे कळून आले. नदीला घातलेले माती आणि चुन्याचे बंधारे दायमाबाद (जिल्हा नगर) आणि बलसाणे, मांढरे (दोन्ही जिल्हा धुळे) येथेही आढळले. अशा काही पुराव्यांवरून या काळची मंडळी शेती करीत होती हे कळते. स्वयंपाकघरात सापडलेले खोलगट पाटे, साठवणीचे रांजण, मातीची बनवलेली बैलाची खेळणी–ही आणखी पूरक बाब.

**घरे –** घरे ही कुडाची होती. या घराच्या जमिनी काळ्या मातीवर करड्या रंगाचा चिखल थापून करीत असत किंवा चुन्याचे सारवण करून तयार करीत. घराच्या भिंती तट्ट्यावर चिखल थापून बनविल्या जात. कुडाच्या भिंतीवर वाशांच्या आधाराने घरांची छपरे तयार करीत. चांडोली येथे लहानात लहान घर २.४० मी. × ४.८० मी. तर मोठे घर ६ मी. × १२ मी. आकाराचे होते. इनामगाव येथील उत्खनन फार व्यापक प्रमाणात केले गेले. तेथे ताम्रपाषाणयुगीन वस्त्यांचे तीन कालखंड उजेडात आले. पहिला इसवीपूर्व १६०० ते १३००, दुसरा पूर्व जोर्वे संस्कृतीचा इसवीपूर्व १३०० ते १००० आणि तिसरा उत्तर जोर्वे संस्कृतीचा इसवीपूर्व १००० ते ७०० अशी विभागणी पुरातत्त्ववेत्यांनी केली आहे. पैकी पहिल्या म्हणजे माळव्या संस्कृतीच्या लोकांची घरे काटकोन–चौकोनी आकाराची होती. ही अर्थात कुडाची होती. घरात गोल कणग्या, चौकोनी चूल असे. दुसऱ्या कालखंडातील लोकांच्या काटकोन चौकोनी आकाराच्या घराला व्हरांडा होता, शिवाय पावसाचे पाणी वाहून जाण्यासाठी घरासमोर पन्हाळी केलेली असे. येथील एका घरातील मृद्‌भांड्यावर नावेचे चित्र तर दुसऱ्या भांड्यावर बैलगाडी कोरलेली आढळली. विशेष म्हणजे मृद्‌भांडी भाजण्यासाठी तयार केलेली भट्टीही येथे सापडली. (डेक्कन महाविद्यालय अभिमत विद्यापीठाच्या वस्तुसंग्रहालयात ती पाहता येते.) उत्तर–जोर्वेकालात गोल झोपड्या बांधीत. काळ्या मातीवर सारवण करून त्यांच्या जमिनी तयार करीत आणि दगडाच्या चुली करीत. या काळच्या अनेक ठिकाणच्या घरांत मातीचे लंबगोल आकाराचे, वातीसाठी पन्हाळे असलेले दिवेही आढळले.

**हत्यारे –** हे लोक गारगोटीपासून तयार केलेली व तांब्याची हत्यारे वापरीत असत. गारगोट्यांच्या छिलक्यांची हत्यारे या काळात उपलब्ध झाली. या ताम्रपाषाणयुगात ॲगेट चाल्सिडोनी, कार्नेलिअन या प्रकारच्या दगडांच्या छिलक्यांपासून लहान हत्यारे बनवीत. या काळात छिलके, पाती, चाकूच्या पात्यासारखी पाती, चंद्रकोरसदृश पाती, नोकरदार पाती वापरात होती. त्यांचा नेमका वापर कशासाठी केला जाई, या संबंधात अजून निर्णय झाला नाही.

या काळातील तांब्याच्या कुऱ्हाडी वैशिष्ट्यपूर्ण आहेत. या चपट्या आणि काटकोन चौकोनी आकाराच्या, यांचा शिर्षभाग जाड नि सपाट असून पात्याची बाजू सरळ अथवा थोडीशी बहिर्वक्र आहे. पृथक्करणानंतर असे दिसले की, यांमध्ये ९८ टक्के शुद्ध तांबे आहे व पावणेदोन टक्के कथील मिसळले आहे. अशा कुऱ्हाडी व त्यांचे अवशेष दायमाबाद, नेवासे इत्यादी ठिकाणी आढळून आले.



ताम्रपाषाणयुगीन मृद्‍भांड्यातील दफन.

**दागदागिने –** यांचे अलंकार शंख, तांबे आणि रंगीबेरंगी पाषाण-मण्यांचे असत. तांब्याच्या बांगड्या आणि बाळासाठी वाळे करीत ते तांब्याचेच. जोर्वे येथे बांगड्यांत ९८.२१% शुद्ध तांबे आढळून आले. तांब्याचे मणीही केलेले असत. नेवासे येथे पुरलेल्या एका मृत मुलाच्या गळ्याभोवती तांब्याच्या सतरा मण्यांची माळ आढळली. विशेष म्हणजे ही माळ पांढरे रेशीम आणि कापूस ह्यांच्या धाग्यापासून तयार केलेल्या दोऱ्यात ओवलेली होती. यावरून संशोधकांच्या लक्षात आले ते असे की, कापसाच्या धाग्याच्या वापराचा हा महाराष्ट्रातील अत्यंत प्राचीन पुरावा असून रेशमाच्या वापराचा भारतातील आद्य पुरावा असावा.

दगडापासून केलेले मणीही ॲगेट, कार्नेलिअन, चाल्सिडोनी, फियान्स, जास्पर, स्टीएटाइट, अमॅझोनाइट यांचे असत. इनामगाव येथे एका आड एक तांबड्या जास्परच्या आणि तांब्याच्या मण्यांची माळ आढळली.

**धार्मिक समजुती –** काही घरांत (उदाहरणार्थ चांडोली येथील) कुंडे आढळली, एका कुंडात चार दगड व भरपूर राख सापडली. या भट्ट्या की अग्निकुंडे असा संभ्रम आहे. अशी अग्निकुंडे (?) नेवाशालाही मिळाली. इनामगाव येथील उत्खननात तर मातृदेवता, शीरोहीन देवता, शिरोहीन पुरुष देवता मिळाल्या. एक मातृदेवता तर कच्च्या मातीच्या डबीत सुरक्षितपणे ठेवलेली मिळाली. देवतेला तिच्या बैलवाहनावर बसविण्याची योजनाही केली होती, असे आढळले. चांडोली येथे १५ ते २२ सेंमी. उंचीच्या मातीच्या मातृदेवतांच्या प्रतिमा मिळाल्या. यांचे स्तन उठावात व नाभी खोल दाखविलेली आहे. या काळाच्या लोकांचा मृत्यूनंतरच्या जीवनासंबंधीही काही विचार असावा, असे वाटते. कारण अनेक ठिकाणी मृताबरोबर त्याच्या वापरातल्या वस्तू, भांडी इत्यादी पुरल्याचे आढळून आले. यावरून मरणोत्तर जीवनावर त्यांचा विश्वास असावा, असे अनुमान काढता येते.

**दफने –** नेवाश्याला उत्खननात १०० च्या वर दफने आढळली. अशीच दफने नाशिक, चांडोली, इनामगाव इत्यादी ठिकाणीही मिळाली. यांत मृतांची- प्रौढांची व मुलांची- दफने उत्तरेकडे डोके व दक्षिणेकडे पाय अशा पद्धतीने केलेली होती. ही दफने बहुतांशी घरच्या जमिनीतच केल्याचे आढळते. प्रौढांची दफने काही ठिकाणी रांजणात तर काही ठिकाणी उघड्या जमिनीवर केल्याचे आढळून आले. काही ठिकाणी मृतांचे घोट्याखालचे पाय उपलब्ध नाहीत. लहान मुलांना दोन किंवा तीन कुंभांत पुरले जाई. एके ठिकाणी (नेवासे उत्खनन) एका प्रौढ स्त्रीचा सांगाडा पाच मडक्यांमध्ये ठेवलेला आढळला. इनामगाव येथे काही महत्त्वाच्या व्यक्तींना चार पायांच्या कच्च्या मातीच्या रांजणात पुरीत असल्याचा पुरावा मिळाला आहे.

ताम्रपाषाणयुगीन महाराष्ट्रीय असे होते. हे सारे कळले ते येथे केलेल्या उत्खननांद्वारे. या काळच्या संस्कृतीचे स्वरूप, तिची व्याप्ती, तिची वैशिष्ट्ये यासंबंधींचा संक्षिप्त आढावा पुरातत्त्वज्ञांनी उपलब्ध करून दिलेला आहे.

## बृहदाश्मयुगीन महाराष्ट्र

महाराष्ट्रातल्या बृहदाश्मयुगीन संस्कृतीसंबंधीचा सुगावा सुमारे १५० वर्षांपूर्वी मेजर पिअर्स आणि हिस्लॉप यांनी नागपूरच्या परिसरात केलेल्या खोदकामामुळे लागला आणि भारतीय पुरातत्त्व सर्वेक्षण, डॉ. शां. भा. देव यांनी विदर्भातील अनेक ठिकाणी केलेल्या उत्खननांमुळे त्यावर बराच प्रकाश टाकता आला. प्रस्तुत लेखकाने रायपूर (हिंगणे), भागीमोहरी इत्यादी ठिकाणी उत्खनने केली. शिवाय मेजर पिअर्स याने नागपूरजवळ कामटी येथे शिळावर्तुळांचे उत्खनन करून त्यांतील ज्या वस्तू लंडन येथील ब्रिटिश म्युझिअमकडे पाठवल्या होत्या, त्यांचाही अभ्यास तेथे जाऊन केला.

या संस्कृतीची विस्ताराने ओळख होते, ती मृतांच्या दफनाच्या पद्धतीवरून. शिळावर्तुळे, टेकाडे, शिलाखंड आणि शिळाप्रकोष्ठ असे त्यांचे प्रकार सांगता येतील. अशा प्रकारचे दफनविशेष बहुसंख्येने दक्षिण भारतात सापडत असले, तरी त्यांचे अस्तित्व मध्य प्रदेश, राजस्थान, बिहार, उत्तर प्रदेश आणि काश्मीर येथेही तुरळक प्रमाणात का होईना आढळून आले आहेत. कालाच्या दृष्टीने विचार करता ही संस्कृती इसवीपूर्व ९ वे–१०वे शतक ते इसवीच्या दुसऱ्या शतकापर्यंत नांदत होती, असे दिसते. प्रारंभीच सांगितल्याप्रमाणे महाराष्ट्रात विशेषतः पूर्वविदर्भात केलेल्या उत्खननामुळे या संस्कृतीची बरीचशी माहिती उजेडात आली असली, तरी काही प्रश्न अद्याप अनुत्तरितच राहिले आहेत.

या संस्कृतीचे लोक मृताला वा त्याच्या काही अवशेषांना, एका खड्ड्यात फरश्या उभ्या रोवून, पेटी तयार करून तीत पुरत असत. शिवाय त्यावर १ ते १॥ मीटर जाडीची माती आणि डबर यांची भर घालून उंचवटा करीत आणि अशा उंचवट्याच्या परिघाभोवती अवाढव्य शिळांचे वर्तुळ तयार करीत. म्हणूनच या संस्कृतीला मेगॅलिथक म्हणजे बृहदाश्मयुगीन संस्कृती असे म्हणतात. या शिळावर्तुळांच्या मध्यभागी आणि भरावामध्ये काळी आणि तांबडी व अभ्रकयुक्त मृद्‌भांडी पुरत असत. महाराष्ट्रात अनेक ठिकाणी यासंबंधीची उत्खनने केली गेली, मात्र टाकळघाट–खापा आणि नयकुण्ड या ठिकाणीच या लोकांच्या वस्तीचे अवशेष प्राप्त झाले. बाकी सर्व दफनेच मिळाली.

या काळातही लोक कुडाच्या घरात राहत, घरातील जमिनी चोपलेल्या चिखलावर चुन्याचे सारवण करून तयार करीत. हे लोक प्राणी पाळत. त्यांत गाई, बैल, शेळ्या व घोडे यांचा समावेश होत असे. मृद्‌भांड्यात ठेवलेल्या लोखंडाच्या वस्तूंमध्ये भाले, कुऱ्हाडी, कट्यारी, छिन्नी, राप्या, पाळ्या, नखाण्या यांचा समावेश असे. माहुरझरी येथे एका आकाराने मोठ्या सांगाड्याच्या छातीवर लोखंडाचे पाते व तांब्याची मूठ असलेली संमिश्र धातूची कट्यार प्राप्त झाली. याशिवाय तांब्याचे वाळे, घंट्या (लोखंडी लोलकाच्या), वरातीतल्या घोड्याला आता



बृहदाश्मयुगीन घोड्याचे अलंकार.

सजविले जाते; तसे सर्व अलंकारही माहुरझरी, रायपूर इत्यादी ठिकाणच्या शिळावर्तुळांत मिळाले. या वर्तुळात मृताबरोबर कार्नेलियाचे मणी मिळाले. माहुरझरी, जुनापानी यांसारख्या ठिकाणी असे मणी अक्षरशः शेकड्यांनी मिळालेले आहेत. याशिवाय सोन्याच्या चकत्या, सोन्याची वळी आणि बांगड्या सापडल्या आहेत.

या शिळावर्तुळांत व अन्य प्रकारच्या बृहदाश्मयुगीन दफनात मिळणारी मृद्‌भांडी विशिष्ट प्रकारची असल्याचे आढळले. ही आतून काळी व बाहेरून बुडाला लाल रंगाची, पातळ पोताची, चकचकीत पृष्ठभागाची असत. काळी आणि तांबडी, चमकदार काळ्या रंगाचीही असत. यांपैकी काही झाकण्यांच्या शीर्षावर बोकड व पक्षी यांची शिल्पे चिकटवलेली आढळली (माहुरझरी येथे), तर खापा (जिल्हा नागपूर) येथे तांब्याच्या वाडग्यावर तांब्याच्या झाकण्या आढळल्या. विशेष म्हणजे या झाकण्यांवर चार कळ्या वा चार फांद्यावर बसलेले चार पक्षी दिसतात. हे पक्षी अणकुचीदार चोचीचे आहेत.

महाराष्ट्रातील बृहदाश्मयुगीन संस्कृतीवर दक्षिण भारतातील बृहदाश्मयुगीन संस्कृतीचा प्रभाव पडला होता, हे अगदी स्पष्ट आहे. महाराष्ट्रात प्रामुख्याने पूर्वविदर्भात अशा प्रकारची अधिकात अधिक उत्खनने केलेल्या डॉ. शां. भा. देवांचे म्हणणे असे की, महाराष्ट्रातील बृहदाश्मयुगीन संस्कृतीचे स्वरूप काहीसे संमिश्र आहे. तिच्यामागील सांस्कृतिक प्रेरणा महाराष्ट्राबाहेरील दक्षिण भारतातील प्रदेशात शोधाव्या लागतात.

## प्राचीन ऐतिहासिक महाराष्ट्र

बृहदाश्मयुगीन संस्कृतीच्या काळात लोखंडाच्या वस्तू उपलब्ध झाल्या; एवढेच नव्हे तर लोखंड तयार करण्याची प्रक्रिया कशी केली जाई, हेही नयाकुंड येथे मिळालेल्या भट्टीवरून लक्षात आले. मात्र याचा कालखंड कोणता मानायचा, यासंबंधी अजून निर्णय होऊ शकला नाही.

लोखंडामुळे मानवी जीवनात क्रांती निर्माण झाली. किंबहुना असेही म्हणता येईल की, आजच्या आपल्या जीवनाचा प्रारंभच लोहयुगापासून झाला. या लोहयुगीन संस्कृतीत राज्ये नव्हे तर मौर्य-सातवाहन यांसारखी मोठाली साम्राज्ये उदयास आली. अर्थातच मोठाल्या नगरांचा पायाही घातला गेला. भारतात पाटलीपुत्र, राजगृह, तक्षशिला, उज्जायिनी ही नगरे उदयास आली. तर पैठण, अडम, तेर यांसारखी नगरे महाराष्ट्रात उदयास आली. लोहयुगची सुरुवात इसवीपूर्वीच्या दहाव्या शतकापासून झाली असावी, असे उत्खननात आढळलेल्या पुराव्यांवरून म्हणता येईल.

महाराष्ट्रात प्राचीन ऐतिहासिक काळातील अवशेष मौर्य-सातवाहन काळापासून सापडतात. हे अवशेष पैठण, नेवासे, तेर, भोकरदन, पवनार, अडम, नाशिक, बहाळ, प्रकाशे, नालासोपारा, कऱ्हाड, कोल्हापूर इत्यादी नगरांत आढळून आले. परदेशी प्रवासी प्लिनी याने नोंदवले आहे की, सातवाहनांच्या राज्यात तटबंदी असलेली तीस गावे होती. (हिस्ट्री ॲन्ड कल्चर ऑफ दि इंडियन पीपल, खंड २, पृष्ठ२१०.) नागपूरजवळच्या अडम येथील उत्खननात गावाभोवतीची तटबंदी आढळली.

सातवाहनांचा काळ (इसवीपूर्व दुसरे ते इसवीचे दुसरे शतक) म्हणजे महाराष्ट्राच्या सर्वांगीण उन्नतीचा व भरभराटीचा काळ. दक्षिण भारतातील हे पहिले साम्राज्य आणि तेही खूप विस्तृत. सातवाहनांच्या काळात ब्राह्मण, बौद्ध आणि जैन यांना समान वागणूक होती. या काळात भाजे, पितळखोरे, कोण्डाणे, बेडसे, अजिंठे, कार्ले (पहिला गट), जुन्नर, कान्हेरी इत्यादी ठिकाणी शैलगृहे कोरली गेली, नाणी प्रसारात आणली गेली, साहित्य निर्माण झाले आणि राज्यशासनाची घडी बसवली गेली. एवढेच नव्हे तर परकीयांचा बीमोड करण्यात आला.

उपरोल्लिखित ठिकाणी आणि महाराष्ट्रात इतर ठिकाणी जी उत्खनने झाली, त्यांतून जी माहिती उपलब्ध झाली; ती सामान्यतः सर्वच ठिकाणी कमीजास्त प्रमाणात सारखीच आहे. तिचा एकत्रच विचार केलेला आहे.

**रहिवासी –** उत्खननातून मानवी सांगाडे उपलब्ध न झाल्यामुळे त्या वेळच्या रहिवाशांची ओळख शैलगृहातून शिल्पीत केल्या गेलेल्या प्रतिमांवरून करून घ्यावी लागते. कार्ले, पितळखोरे, कान्हेरी इत्यादी लेण्यांतून अशी शिल्पे आढळतात. यावरून दिसते ते असे की, ही माणसे स्थूलपणाकडे झुकलेल्या देहयष्टीची पण रसरशीत असावीत. रांगडी मात्र नव्हती. स्त्रियांची देहयष्टी पुरुषांना साजेशीच होती. त्यांनी दागदागिने वापरण्यात कुचराई केलेली नाही. कपाळावर बिंदी, गळ्यात लांबसर एकावली, अनेकपदरी हार वा छन्नवीर दागिना, कानात वर्तुळाकृती कुंडले, मनगटाभोवती मुक्तावलये वा वाळे, अनेकपदरी मेखला त्या वापरीत. वस्त्रे तलम होती आणि ती अकच्छ नेसत. ही सर्व सुखवस्तूपणाची लक्षणे आहेत. पुरुषही कमी का होईना दागिने वापरीत. नेसूचे वस्त्र आणि डोकीला तुऱ्याचा ऐटबाज फेटा असे.

**आहार –** या काळातील धान्याची, शेतीसंबंधीची भरपूर माहिती उत्खननातून पुढे आलेली आहे. हे लोक शिकार हे उपजीविकेचे साधन समजत. गहू, ज्वारी, तांदूळ, हरभरा, नाचणी, वाल, मटार व मिलेट या प्रकारची धान्ये मिळाली. ही सर्व धान्ये एकाच वा सर्व ठिकाणी मिळाली असे मात्र नव्हे. कोल्हापूर आणि नाशिक येथील उत्खननात हरिणाची जळलेल्या स्थितीतील हाडे स्वयंपाकघरात सापडल्याने हे लोक मांसाहारीही होते, हे स्पष्टपणे सिद्ध झाले. शिवाय लोखंडी बाण मिळाल्यामुळे हे लोक शिकार करीत, हे कळले आणि गळ प्राप्त झाल्यामुळे मत्स्याहारी होते, हेही लक्षात येते.

**अलंकार –** वर थोडासा उल्लेख झालेला आहेच. ॲगेट, कार्नेलिअन, जास्पर, गार्नेट, शंख वापरून निरनिराळ्या आकारांचे, रंगांचे मणी तयार करून त्यापासून वैचित्र्यपूर्ण आकर्षक दागिने करीत. शिवाय ताईत (सिंहताईत-

नाशिक), कूर्माकृती ताईत (कौण्डिन्यापूर), कट्यार-ताईत, यक्ष-ताईत (नेवासे) वापरीत. विशेष म्हणजे दृष्टमणीही उपयोगात आणीत, असे आढळले आहे.

**प्रसाधने आणि उपकरणे –** स्त्रिया डोळ्यांत काजळ घालण्यासाठी हस्तिदंताच्या, तांब्याच्या व क्वचित हाडाच्याही कज्जलशलाका वापरीत. केशरचनेसाठी कंगव्याचा वापर केला जाई. भोकरदन येथे आरशाची मूठ म्हणून हस्तिदंती स्त्री-प्रतिमेचा उपयोग केला आहे. विविध प्रकारच्या वज्र्या वापरीत. यांतील काही आंब्याच्या कोयीसारख्या, तर काही चौकोनी असत.

**घरे –** मुद्दाम नमूद केले पाहिजे की, आता मोठ्या आकाराच्या (४२ × २७.५ × ७.५ सेमी) भाजलेल्या विटांचा उपयोग मुक्तपणे होऊ लागला होता. घरे दोन-तीन खोल्यांची, विटांच्या भिंतींची, पन्हाळीदार कवेलूंची, (लाकडी तुळयांवर खिळे ठोकून बसवलेली) उभारली जाऊ लागली. घरातल्या जमिनी चिखल चोपून किंवा ताग आणि चुना यांच्या मिश्रणाने पक्क्या बनवीत. जमिनीत खणलेल्या चरामध्ये चिखलात दगडगोटे टाकून घरांचा पाया मजबूत करीत. स्वयंपाकघरात मातीच्या चुली, पाण्यासाठी रांजण, पाटा-वरवंटा, वाडगे, लोटे, पराती, थाळी, कटोरे, तोटीची भांडी आढळून आली. इसवीपूर्व पहिल्या शतकात जाते उपलब्ध झाल्याचे दिसते (नेवासे येथे). वरच्या वजनदार आणि उंच तळीमध्ये लाकडी दांडा आडवा घालून हे जाते फिरवले जाई. पुरातत्त्वज्ञ या काळातील मातीच्या भांड्यांची विभागणी चार प्रकारांत करतात. १) काळी आणि तांबडी भांडी, २) जाडीभरडी तांबडी मृद्‌भांडी, ३) उत्तरेकडील काळ्यानिळ्या झिलईची मृद्‌भांडी (फारच अल्प प्रमाणात मिळाली), आणि ४) उत्कृष्ट तांबड्या झिलईची, पातळ नि खणखणीत (रोमन) मृद्‌भांडी व रोमन मद्यकुंभ.

**सांडपाण्याचा निचरा –** घरातील सांडपाण्याचा निचरा करण्यासाठी त्या काळाच्या मानाने प्रगत अशा पद्धतीची योजना होती. सांडपाणी वाहून जाण्यासाठी कूप केले जात आणि त्यांचे तळ थेट पिवळ्या मळईपर्यंत खोल नेले जात. या कूपांच्या बांधणीचेही चार प्रकार होते. १) नेहमीच्या आकाराच्या विटांनी बांधलेले गोल कूप, २) पाचरीच्या आकारांच्या (wedge-shaped) विटांनी बांधलेले, ३) खापरांची कडी एकावर एक ठेवून केलेले, आणि ४) मोठाले रांजण बूड फोडून एकावर एक ठेवून केलेले. काही उत्खननस्थळी या चारपैकी दोन प्रकारांतील कूपही आढळले. या कूपांमध्ये स्वयंपाकघरातील सांडपाणी, केरकचरा, घरातील निकामी वस्तू (उदाहरणार्थ तुटकी हस्तिदंती स्त्री-प्रतिमा भोकरदन येथील कूपात) टाकून देत.

**आयुधे आणि उपकरणे –** प्राचीन इतिहासकाळात लोखंडाच्या अनेक वस्तू, अवजारे, आणि हत्यारे तयार केली गेली. त्यात चाकू, सुऱ्या, भाले, बाणांची विविध प्रकारची टोके, पळ्या, उलथणी, वाट्या इत्यादींचा समावेश होतो. नाशिकला मिळालेल्या एका वैशिष्ट्यपूर्ण वस्तूची नोंद येथे घ्यायला हवी. ही कॅलट्रॉपसारखी आहे. ही तीन वा चार पायांची (टोकाची) असून कशीही टाकली, तरी तिचे एक टोक वर राहते. हे कौटिल्याने उल्लेखिलेले 'त्रिक' असावे, असे उत्खननतज्ज्ञ शां. भा. देव यांना वाटते. इसवीच्या तिसऱ्या-चौथ्या शतकांत शिशुपालगढ (उडिसा) येथे सापडलेल्या वस्तूपेक्षाही आधीची आहे. पहिल्या महायुद्धात घोडदळाला अडथळा आणण्यासाठी कॅलट्रॉप वापरले गेले होते.

**धार्मिक श्रद्धा –** या काळात बौद्ध धर्म बराच लोकप्रिय होता असे सोपारा, पवनी, हरदुलाला, भोन, तेर, वडगाव, नेवासे येथे सापडलेल्या स्तूपांवरून भाजे, कार्ले, पितळखोरे, अजिंठे, कान्हेरी इत्यादी ठिकाणच्या लेण्यांवरून व अभिलेखांवरून कळते.

तेर, नेवासे, कोल्हापूर, कौण्डिन्यपूर, भोकरदन इत्यादी ठिकाणच्या उत्खननांतून मिळालेल्या मातीच्या मूर्तींवरून, या काळी मातृदेवतेची उपासना होत होती; ही गोष्ट नक्की होते. याशिवाय नेवासे, कौण्डिन्यपूर, पवनार, भोकरदन येथे मातीची अर्चनाकुंडेही सापडली आहेत. काही ठिकाणी (उदाहरणार्थ पितळखोरे, नेवासे) यक्ष प्रतिमा व यक्ष ताईतही मिळाले. या धार्मिक श्रद्धेसंबंधीची आणखी माहिती गाथासप्तशतीसारख्या ग्रंथातही आहे.

या काळचे एक ठळक वैशिष्ट्य म्हणजे परकीयांशी झालेला संपर्क. या काळातील महाराष्ट्राच्या सोपारा,

कल्याण, चौल इत्यादी बंदरांबद्दल परकीय प्रवाशांनी माहिती दिली आहे. गौतमीपुत्राचे अधिराज्य तिन्ही समुद्रांवर होते. यज्ञश्रीच्या नाण्यावर शिडाच्या जहाजाचे शिल्पांकन आहे. प्लिनी, टॉलेमी यांनी येथील व्यापारासंबंधीही लिहिले आहे. परकीयांच्या वसाहती पश्चिम किनाऱ्यावरील बंदरावर झालेल्या असाव्यात, असे अनुमान आहे. कार्ले, कान्हेरी येथील शिलालेखांत यवन देणगीदारांची नावे मिळतात. पितळखोरे येथे एका यवन दंपतीचे शिल्प मिळते. रोमहून जी दारू यायची ते मद्यकुंभही (अँफोरा) उत्खननात मिळाले. परकीयांशी झालेल्या व्यापारामुळे महाराष्ट्रात सुबत्ता आली होती. उत्खननात रोमन नाणी, पुतळ्यांची माळ, मृद्‌भांडी, काचेच्या वस्तू, ब्रॉन्झचे (पॅसिडॉन, इरॉस व सायकी) पुतळे, केओलिनच्या प्रतिमा हे सारे प्राप्त झाले. येथून परदेशांत सौंदर्य-प्रसाधने जात; भोकरदनहून हस्तिदंती स्त्री-प्रतिमा इटलीतील पॉम्पी या बंदरात इसवीसन ७८ च्या आधीच पोचली होती. ती सध्या नापोली येथील वस्तुसंग्रहालयात सुरक्षित आहे.

व्यापारासाठी आवश्यक ठरणारी नाणीही या काळात निर्माण केली गेली. जोगलठेंबी, तऱ्हाळा येथे सातवाहनांचे नाणेनिधी मिळाले. गौतमीपुत्र, यज्ञश्री, श्रीसातकर्णी एवढेच नव्हे तर सुमारे वीसच्यापेक्षाही अधिक राजांची नाणी आजवर उपलब्ध झाली आहेत. पैकी काही नाणी व्यक्तिचित्रण असलेली (portrait coins) आहेत. ही नाणी चांदीची, कथलाची, शिशाची व मिश्र धातूंचीही आहेत.

प्रागैतिहासिक, प्राग्इतिहासकालीन आणि प्राचीन ऐतिहासिक महाराष्ट्र महोदयासंबंधीचा उत्खननाद्वारे उलगडलेला हा दृश्यपट. उत्खननांमुळे हा इतिहास मांडता येतो. लिखित प्रकारचे पुरावे सातवाहनकाळात मिळतात, पण त्यापूर्वीचे पुरावे मिळत नाहीत. महाराष्ट्रातील उपरोल्लेखित स्थळांचे उत्खनन प्रामुख्याने पुणे येथील डेक्कन महाविद्यालय संशोधन संस्थेने (आता विद्यापीठ) केले, भारतीय पुरातत्त्व सर्वेक्षण विभाग, महाराष्ट्राचा पुरातत्त्व व वस्तुसंग्रह विभाग आणि नागपूर विद्यापीठ ह्या संस्थांनीही काही उत्खनने केली आहेत. मराठवाडा विद्यापीठाने भोकरदन, तेर, देवगिरी पैठण येथे उत्खनने केली. उत्खनने म्हणजे इतिहासाच्या बिनीचे पथक. उत्खनन लोकजीवनाची, त्यांच्या आचारांची, हालचालींची, प्रगतीची आणि कर्तृत्वाची माहिती देतात, म्हणून उत्खननांचे विशेष महत्त्व.

**संदर्भ :**


१. देव शां. भा. १९६२ महाराष्ट्रातील उत्खनने, देव व अन्सारी १९६५ चाल्कोलिथिक चांडोली, १९६८ महाराष्ट्र- एक पुरातत्त्वीय समालोचन, १९६८ पवनार एक्सकेव्हेशन, १९७६ पवनी एक्सकेव्हेशन, भोकरदन एक्सकेव्हेशन.
२. जुनापानी, टेकवडा, तेर, दायमाबाद, पैठण, बहाळ, बहुरूपे, सावलदा, सोनगाव येथील उत्खननांसाठी : इंडियन आर्किऑलॉजी- ए रिव्ह्यूचे १९६१, १९५६, १९५७, १९५८, १९३६, १९५६, १९५९ व १९६४-१९६५ चे अंक पाहावेत. अडमसाठी १९९०-१९९१ चा अंक
३. ब्रह्मपूरी, भोन, भागीमोहरी, चौल, जुन्नर यांसाठी बुलेटिन ऑफ डेक्कन कॉलेज रिसर्च इन्सिट्यूटचे २००१ - २००२, २००४ - २००५, २००६ - २००७ हे अंक पाहावेत.
४. देव-जामखेडकर, एक्सकेव्हेशन्स ॲट नयकुंड, १९७८, देगलूरकर, मॅगॉलिथिक रायपूर.


* * *



# महाराष्ट्राची जडणघडण




## महाराष्ट्राची उत्पत्ती

■ डॉ. रा. श्री. मोरवंचीकर

**महाराष्ट्र हा राकट देश, दगडांचा देश तथापि तो आमचा देश आहे. अन्य देश भलेही सुंदर असतील, पण आमचा राकट देश आम्हांला इतरांहून निश्चितच प्रिय आहे. भाषिक ऐक्य हा या सुसंवादाचा पाया होय. मराठी भाषिकांचा देश तो महाराष्ट्र, ही जाणीव जरी १२ व्या शतकात झाली असली; तरी तिचा आरंभ इसवी सनापूर्वीच्या तिसऱ्या शतकापासून झाल्याचे इतिहास सांगतो. म्हणजेच मराठी भाषेचे मूळ काय होते, तिचा अस्पष्ट असा वापर कळत-नकळत कधीपासून सुरू झाला, याचे ज्ञान नव्या पिढीला असणे अगत्याचे आहे.**

महाराष्ट्राच्या सांस्कृतिक व भावनिक अस्मितेला भूगोलाच्या चौकटीत परिसीमित करणे काहीसे कठीण काम आहे. कारण दंडकारण्यापासून दक्षिणापथापर्यंत आणि दक्षिणापथापासून महाराष्ट्रापर्यंत त्याच्या जडणघडणीच्या, व्यक्तिमत्त्वाच्या भिन्न छटांचे कालपरत्वे प्रतिबिंबित झालेले स्वरूप भिन्न-भिन्न असल्याने त्यांच्या सांस्कृतिक व प्राकृतिक भूगोलात मोठ्या प्रमाणात आकुंचन व प्रसरण झाल्याचे जाणवते. परिणामी त्याच्या चतुःसीमा कालनिहाय वेगवेगळ्या असल्याचे स्पष्ट होते. असे असले, तरी आरंभापासून आजतागायत त्याच्या भाषेचे 'कूळ', एकच असल्याचे निश्चित आहे. ज्याप्रमाणे त्याच्या प्राकृतिक जडणघडणीत कालसदृश्य स्थित्यंतरे होत गेली, त्याप्रमाणे त्याच्या भाषेमध्येही प्राकृत, प्राकृत अपभ्रंश आणि अंतिमतः मराठी अशी स्थित्यंतरे झाल्याचे स्पष्ट दिसते. प्रस्तुत प्रकरणात महाराष्ट्र हे नामाभिधान व त्याला लाभलेला मराठी भाषेचा पायाभूत आधार यांमध्ये झालेल्या वाटचालीची ओळख करून देण्याचा प्रयत्न केला आहे. वास्तविक हे बऱ्याच वादाचे व शब्दच्छलाचे प्रकरण असल्याने व पूर्वसुरींनी यामध्ये अनेक वादस्थळे निर्माण केली असल्याने त्यांची द्विरुक्ती टाळून आपण त्याचा मागोवा घेणार आहोत. शिवाय

चरित्रकोशाच्या खंडात नव्या पिढीसाठी याची तोंडओळख असणे आवश्यक वाटल्याने हा प्रपंच.

### महाराष्ट्र राज्याची निर्मिती

आजचे स्वतंत्र महाराष्ट्र राज्य १ मे १९६० रोजी अस्तित्वात आले. त्यापूर्वीच्या द्वैभाषिक मुंबई राज्यात समाविष्ट असलेले कच्छ, सौराष्ट्र, गुजरात हे प्रांत वेगळे करून त्यांचे स्वतंत्र गुजरात राज्य निर्माण करण्यात आले आणि उर्वरित मुंबई प्रदेशात मध्य-प्रदेशातील विदर्भ व तेव्हाच्या हैद्राबादच्या निजामी राज्यातील मराठवाडा यांची भर घालून आजचे महाराष्ट्र राज्य आकारास आले. आजच्या महाराष्ट्र राज्यात कोकण, देश (पश्चिम महाराष्ट्र), मराठवाडा, विदर्भ व खानदेश या प्रादेशिक विभागांचा अंतर्भाव होतो.

### महाराष्ट्राच्या चतु:सीमा

१५° ८' ते २१°१' उत्तर अक्षांश आणि ७२°६' ते ८०°९' पूर्व रेखांश ह्यांच्या दरम्यान विस्तारित असलेल्या महाराष्ट्र राज्याचे क्षेत्रफळ ३०७,७६२ चौ.किमी. असून लोकसंख्या ९ कोटी आहे. सध्या महाराष्ट्रात ३५ जिल्हे आहेत. प्रशासनाच्या सोयीच्या दृष्टीने ही संख्या वाढण्याची शक्यता आहे.

गोवा ते दीव-दमण ही ७२० किमी. लांबीची सलग किनारपट्टी महाराष्ट्राची पश्चिम सीमा निश्चित करते. या दंतुर किनारपट्टीवर प्राचीन कालापासून आंतरराष्ट्रीय ख्यातीची अनेक बंदरे आजही कार्यक्षम आहेत. ही बंदरे केवळ व्यापारासाठी प्रसिद्ध नसून ती सांस्कृतिक देवाण-घेवाण करणारी महत्त्वाची केंद्रे होती. मुंबई हे अशा प्रकारचे एक आंतरराष्ट्रीय बंदर असून महाराष्ट्र राज्याच्या राजधानीचे केंद्र आहे. शिवाय संपूर्ण देशाची ती आर्थिक राजधानी आहे. उद्योगधंदे, व्यापार, लोकसंख्या आदी निकषांच्या अनुषंगाने ते जगातील दहा प्रमुख शहरांपैकी एक आहे. तथापि आरंभीच्या कालखंडात महाराष्ट्राची, दक्षिणापथाची आद्य राजधानी गोदावरी काठी असलेल्या प्रतिष्ठान (पैठण) येथे होती, हे विसरता येणार नाही. प्रतिष्ठान ते मुंबई या राजधानी-स्थित्यंतराच्या प्रवासातच महाराष्ट्र राज्याची ऐतिहासिक व सांस्कृतिक जडणघडण सामावलेली आहे. महाराष्ट्राची २५०० वर्षांची वाटचाल समजण्यासाठी तिची उकल करणे अगत्याचे आहे.

अरबी सागराने महाराष्ट्राची पश्चिमी सरहद्द नक्की केली आहे, तर ठाणे, नाशिक, धुळे या जिल्ह्यांच्या उत्तर सीमा महाराष्ट्राची वायव्य सरहद्द निश्चित करतात. यांना लागूनच गुजरात राज्य आहे. नंदुरबार, जळगाव, बुलढाणा, वर्धा, नागपूर आणि चंद्रपूर यांच्या उत्तर सीमा महाराष्ट्राला मध्य-प्रदेशापासून अलग करतात. थोडक्यात सातपुडा पर्वत व तापी नदी ह्यांनी राज्याची उत्तर सीमा मर्यादित केली आहे.

महाराष्ट्राची पूर्व सीमा सरळ रेषेत नाही. गोवा, कारवारपासून ती पायरी-पायरीने चढत जाते. कारवार, सोलापूर, बिदर, माहूर, चांदा, भंडारा या पद्धतीने एकावर एक रचलेल्या पायऱ्या दिसतात- म्हणजेच महाराष्ट्राच्या आग्नेय दिशेस आंध्र प्रदेश असून; नांदेड, यवतमाळ, चंद्रपूर, गडचिरोली या जिल्ह्यांच्या सीमारेषांनी आंध्र प्रदेश महाराष्ट्रापासून अलग केला आहे. दक्षिणेलगत कर्नाटक राज्याच्या सीमा नांदेड, लातूर, उस्मानाबाद, सोलापूर, सांगली, कोल्हापूर या जिल्ह्यांना स्पर्श करतात.

### भाषावार प्रांतरचना

१९५४ नंतर भाषावार प्रांतरचनेच्या मार्गदर्शक तत्त्वांनुसार उपरोक्त सीमा ढोबळमानाने कायम करण्यात आल्या असल्या, तरी काही सीमातंटे अद्याप मिटलेले नाहीत; हे पृथगात्मतेचे वैशिष्ट्य होय. त्या दृष्टिकोनातून बेळगाव, कारवार, गोवा आदी प्रदेशांबद्दलचा वाद हा राजकीय स्वरूपाचा झाला असून, सांस्कृतिकदृष्ट्या तो महाराष्ट्राचाच भूभाग आहे, हे आजपर्यंतच्या मतदानातून स्पष्ट झालेले लोकमानस त्याला पुष्टी देणारे आहे. आपण महाराष्ट्रीयच आहोत हे त्यांनी मतपेट्यांतून नि:संदिग्धपणे दाखवून दिले आहे. पण आमची त्यांना महाराष्ट्रात घेण्याची राजकीय इच्छाशक्ती नाही. अशाच प्रकारच्या उदासीनतेमुळे पाणीवाटप तंट्याचे घोंगडे अद्याप भिजतच पडले आहे. असो. या सांस्कृतिक वेगळेपणाचे जतन होण्यास महाराष्ट्राची प्राकृतिक रचना मोठ्या प्रमाणात अनुकूल आहे.

नव्या पिढीच्या दृष्टिकोनातून ह्या अस्मितेच्या वाटचालीचा परिचय करून देणे, ही काळाची गरज आहे.

### महाराष्ट्राच्या वेगळेपणाची वाटचाल

सर्व नद्यांमधून वाहणारे पाणी, 'जलतत्त्व' या नात्याने एक असले, तरी रंग, रूप, चव व समाजधारणा करण्याची त्याची शक्ती हे सारे नदीपरत्वे भिन्न असते. या नात्याने गंगा ही भारतातील सर्वश्रेष्ठ नदी जरूर ठरते. कारण ती १/३ भारतीयांचे सर्वार्थाने पोषण करते. म्हणून यमुना तथा गोदावरी या कनिष्ठ नद्या ठरत नाहीत, कारण त्यांच्या कुवतीनुसार त्या आपले कार्य शतकानुशतके करीतच आहेत. याच नियमाने मानव हा इथून-तिथून एक असला, तरी महाराष्ट्रातील मरहाठ्टी हा गुजराती, कानडी, तेलगू या आपल्या बंधूंपासून तितकाच वेगळा आहे. भाषा, आहार-विहार, पोषाख, सण-समारंभ, धर्मकल्पना यांमधून त्याचे वेगळेपण स्पष्ट होत असते. या सर्व घटकांमध्ये भाषा, भूप्रदेश, धर्म व वंश हे घटक महत्त्वाचे ठरतात.

उपरोक्त महत्त्वाच्या घटकांमुळे समूहाचे वेगळेपण आकार घेत असते व अशा समूहाचा वेगळेपणाचा अभिमान वृद्धिंगत होत असतो. कोणत्याही परिस्थितीत आपल्या वेगळेपणाचे जतन, जपणूक करण्याची भावना म्हणजेच अस्मिता होय. याउलट शेजारचे समूह आपले वर्चस्व सिद्ध करण्याचा प्रयत्न करत असतात. त्यामुळे अस्मितेसाठी द्यावा लागणारा सर्वंकष लढा हे समूहाचे व्यवच्छेदक लक्षण ठरते. अशा प्रकारच्या लढ्यातून वेगळेपणाची भावना जोमाने जोपासली जाते. क्वचित प्रसंगी दुबळ्या अस्मितेच्या समूहाला अनेक वेळा तडजोड करावी लागते. त्यामुळे त्याच्या अस्मितेला तडे गेलेले दिसतात. आजचा महाराष्ट्र विशेषतः मुंबई हे याचे उत्तम उदाहरण ठरावे.

एकीकडे आपले वेगळेपण जतन करण्यासाठीची चाललेली धडपड आणि दुसरीकडे यावर होणारे अन्य समाजांचे सांस्कृतिक श्रेष्ठत्वाचे आघात हे सतत चालू असते. मुंबईसह महाराष्ट्र वेगळा झाला, हे ऐतिहासिक सत्य; पण पुढची वाटचाल कशी झाली, हा चिंतनाचा विषय ठरू शकतो. अशा दुहेरी संघर्षातून भारताच्या 'अनेकत्वातून एकात्मता' (Unity in Diversity) या उदात्त तत्त्वाचा जन्म झाला. पण मागील ६० वर्षांत हे तत्त्व आपल्या किती पचनी पडले, हाही तितकाच चिंतनाचा आणि चिंतेचा विषय ठरतो.

मागील एका शतकापासून भारतीय राष्ट्रीयत्व जतन करण्याचे प्रामाणिक प्रयत्न महाराष्ट्राकडून होत आहेत. यातून एक प्रभावी तेजःपुंज राष्ट्र निर्माण व्हावे ही आपली यामागील तळमळ आहे. यामध्ये काही प्रमाणात यशही लाभत आहे. तथापि समाजातील काही घटकांना हे तत्त्व अंगीकृत करता आलेले नाही. ते या प्रयत्नाला सुरुंग लावण्याचा प्रयत्न करीत आहेत. त्याचा अन्य घटकांवर विपरीत परिणाम झाल्याचे दिसत आहे. विशेषतः उत्तरपूर्वेकडील व दक्षिणेकडील राज्यांना यामुळे चांगलेच खतपाणी लाभत आहे. संघ राज्यातून फुटून निघण्याच्या धमक्या वारंवार दिल्या जात आहेत. ह्याचा अर्थ काय होतो? कदाचित भाषावार प्रांतरचनेमुळे ह्या विचारांना खतपाणी लाभल्याचे जाणवते. त्यामुळे प्रादेशिक इतिहास-लेखनातून त्यांच्या अहंकाराला फुटलेले विखारी धुमारे समाजहिताला ठायीठायी बाधा पोहचवत आहेत. आपण एका प्राचीन संस्कृतीचा थोर वारसा लाभलेल्या देशाचे घटक आहोत, हेच समाज सोईस्करपणे विसरत चालला आहे. आपल्या अस्मितेसह आपण एकसंघ भारताचे घटक आहोत, ह्याची जाणीव करून देण्यासाठी हा प्रयत्न- प्रस्तुत ग्रंथ आकार घेत असताना संबंधितांनी हाच दृष्टिकोन बाळगावा, ही अपेक्षा.

### संस्कृती म्हणजे काय?

महाराष्ट्र म्हणजे मराठी-संस्कृती असणाऱ्यांचा देश. पण, संस्कृती म्हणजे काय? एखाद्या विशिष्ट भौगोलिक वातावरणात शतकानुशतके स्थिरावलेल्या समाजाने परिसराशी साधलेला सुसंवाद म्हणजे संस्कृती होय. या ठिकाणी सुसंवाद हा शब्द अत्यंत महत्त्वाचा ठरतो. कारण महाराष्ट्र हा राकट देश, दगडांचा देश तथापि तो आमचा देश आहे. अन्य देश भलेही सुंदर असतील, पण आमचा राकट देश आम्हांला इतरांहून निश्चितच

प्रिय आहे - हा सुसंवाद- भाषिक ऐक्य हा या सुसंवादाचा पाया होय. मराठी भाषिकांचा देश तो महाराष्ट्र, ही जाणीव जरी १२ व्या शतकात निर्माण झाली असली; तरी तिचा आरंभ इसवी सनापूर्वीच्या तिसऱ्या शतकापासून झाल्याचे इतिहास सांगतो. म्हणजेच मराठी भाषेचे मूळ काय होते, तिचा अस्पष्ट असा वापर कळत-नकळत कधीपासून सुरू झाला, याचे ज्ञान नव्या पिढीला असणे अगत्याचे आहे.

## मराठी भाषेचा उदय व विकास

भाषेच्या दृष्टिकोनातून विचार केल्यास भारतीय भाषा या संस्कृतपासून विकसित झाल्या, असे प्रारंभी मानले जात होते. तथापि प्रस्तुत सिद्धान्त आता कालबाह्य झाला असून संस्कृत भाषेशिवाय प्रत्येक प्रदेशाला स्वतःची अशी एक बोली, एक भाषा होती. ती संबंधित प्रादेशिक नावावरून ओळखली जात होती. जसे मगधमध्ये बोलली जाणारी मागधी, महाराष्ट्रात महाराष्ट्री, शिवाय शौरसेनी, पैशाची आदी. या सर्व प्रादेशिक म्हणजेच प्राकृत भाषा होत. कालौघात यांमध्ये अनेक प्रवाह सामील झाले व अपभ्रंश भाषांचा उदय झाला.

अपभ्रंश भाषांच्या सातत्यानंतर इसवी सन पूर्व साधारणतः पाचव्या/सहाव्या शतकात अपभ्रंश मराठी, कानडी, तामिळी आदी भाषांचा उदय झाला, असे अलीकडे मानले जाते. अपभ्रंश भाषेच्या दालनात मोठ्या प्रमाणात संशोधन झाले असून त्यामधून उपरोक्त सिद्धान्ताला पुष्टी मिळते. पाश्चिमात्य भाषा तज्ज्ञ डॉ. ग्रिअरसन, डॉ. स्टेन को नौ आदींनी व भांडारकर, वैद्य, गुणे, घाटगे यांसारख्या भारतीय भाषा कोविदांनी महाराष्ट्र आणि महाराष्ट्री प्राकृत तथा मराठी या एकाच नाण्याच्या दोन बाजू असल्याचे ठामपणे मांडले आहे. थोडक्यात महाराष्ट्र हे मराठीचे माहेर होय. मात्र हा प्रवास करण्यास अनेक शतकांचा कालावधी जावा लागला, हे निश्चित.

सर्वसामान्यतः इसवी सन पूर्व तिसऱ्या शतकापासून महाराष्ट्रीच्या (मराठीच्या) वेगळेपणाचे अस्तित्व समकालीन भाषा, शिलालेख, नाणी, लोकसाहित्य व लोकसंस्कृती ह्यांमधून जाणवू लागले होते. यापूर्वीच्या कालखंडावर प्रकाश टाकण्यासाठी महाराष्ट्रात अनेक ठिकाणी उत्खनने झाली - त्यामधून त्या समाजाच्या भौतिक संस्कृतीवर व्यापक प्रकाश पडला तथापि त्यांची भाषा व मनोव्यापार यांवर म्हणावा तसा प्रकाश पडला नाही. जोपर्यंत एखाद्या समाजाचा मनोव्यापार भाषेच्या माध्यमातून समजू शकत नाही, तोपर्यंत त्या समाजाचे सांस्कृतिक वेगळेपण म्हणावे तसे जाणवत नाही.

कानडी व मराठी यांमध्ये जे वेगळेपण जाणवते, ते केवळ भाषाभिन्नत्वामुळे. अन्यथा त्यांच्यामध्ये कोणताच रक्तभेद अथवा पिंडभेद नाही पण सांप्रत तो भेद पराकोटीला पोहोचला आहे. तोच प्रकार उत्तर भारताच्या हिंदी भाषिक पट्ट्यात जाणवतो. थोडक्यात महाराष्ट्राचा पिण्ड मराठी भाषेवर पोसल्याची अनेक उदाहरणे कालाच्या प्रदीर्घ पटावर आपणास आढळतात. त्यामधील काही ठळक उदाहरणे विचारार्थ पुढे दिली आहेत.

## महाराष्ट्रीला (मरहाट्टीला) राजाश्रय

महाराष्ट्री भाषा महाराष्ट्राची केवळ लोकभाषा नसून राजभाषाही होती. महाराष्ट्राच्या विश्वसनीय इतिहासाचा आरंभ सातवाहन कालापासून म्हणजे इसवी सन पूर्व तिसऱ्या शतकापासून होतो. या राजघराण्याला शककर्त्या शालिवाहनाचे घराणे म्हणून महाराष्ट्रभर ओळखले जाते. या घराण्याने महाराष्ट्रावर ४५० वर्षांकरिता राज्य केले. (इ. स. पू. २३० ते इ. स. २३०) या घराण्याने महाराष्ट्रीला राजाश्रय दिला. मराठीला राजाश्रय देणारे ते महाराष्ट्रातील पहिले घराणे होय. त्यांच्या वैभवाच्या कालखंडात भारताचा प्रचंड भूभाग त्यांच्या वर्चस्वाखाली होता- त्यांनी महाराष्ट्री भाषेला राजाश्रय दिल्यामुळे तिचा प्रसार देशभर होण्यास मदत झाली. त्यांचे सर्व शिलालेख आरंभापासून अंतापर्यंत महाराष्ट्री प्राकृतात आहेत. याउलट त्यांच्या राजकीय प्रतिस्पर्ध्यांचे, क्षत्रपांचे घराणे अभारतीय असूनही, सर्व शिलालेख शुद्ध संस्कृतात आहेत, हे विशेष.

सातवाहनांच्या अनेक नृपतींनी मोठ्या प्रमाणावर नाणी पाडली होती. या नाण्यांचा वापर भारतभर होता. सर्व नाण्यांवर त्यांनी प्राकृत भाषेचाच वापर केला आहे. त्यामुळे

महाराष्ट्री भाषेचा भारतभर प्रसार होण्यास मदत झाली. उपरोक्त शिलालेखांपैकी राजमाता गौतमी बलश्रीचा नाशिक येथील क्रमांक तीनच्या लेण्यामधील लेख, हे महाराष्ट्र प्राकृतचे सौष्ठव स्पष्ट करणारे आहेत. तिने गौतमीपुत्राचे ओजस्वी व्यक्तिमत्त्व या लेखाद्वारे रेखाटले, तसे इतरत्र कुठे रेखाटल्याचे आढळत नाही. यावरून महाराष्ट्री-प्राकृत भाषेचे लोकमनातील स्थान समजण्यास मदत होते.

महाराष्ट्री प्राकृत ही महाराष्ट्रातील जनसामान्यांची बोलीभाषा होती, हे दर्शविणारा दुसरा निःसंदिग्ध पुरावा म्हणजे 'हाल' सातवाहनाने इसवी सनाच्या पहिल्या शतकात संपादित केलेला 'गाहा सत्तसई' हा ग्रंथ होय. प्रस्तुत ग्रंथातील ७०० गाथांची निवड त्याने समकालीन कवींच्या साहित्यातून केल्याचे ग्रंथाच्या प्रस्तावनेत म्हटले आहे. याचा अर्थ असा की, साहित्याची भाषा म्हणून महाराष्ट्री-प्राकृत यापूर्वी काही शतके लोकमानसात रूढ होती. गाहा सत्तसईतील भूगोल व लोकजीवन हे महाराष्ट्रातील असल्याचे त्यावरून वाटते. शिवाय उपरोक्त शिलालेखातील भाषा आणि गाहा सत्तसईमधील भाषा एकच होत. म्हणूनच वररुची या समकालीन व्याकरणकाराने आपल्या ग्रंथात महाराष्ट्री व्याकरणाला प्राधान्य दिल्याचे स्पष्ट होते.

यावरून महाराष्ट्री-प्राकृत अपभ्रंश भाषेसह महाराष्ट्रातच विकसित झाली. ती अशोकपूर्व म्हणजेच मौर्यपूर्व कालापासून रूढ होती. तिचे मराठी रूप पूर्णपणे विकसित होण्यास साधारणतः एक हजार वर्षांचा कालावधी लागला असावा. कारण इसवी सनाच्या तेराव्या शतकात तिचे व्यक्तिमत्त्व पूर्ण विकसित झाल्याचे समकालीन साहित्यातून स्पष्ट होते. पिशेल या जर्मन भाषापंडिताने मराठीची भूमी म्हणजे महाराष्ट्र, असे मत दिले आहे.

सातवाहनानंतर आलेल्या वाकाटक या राज्यकर्त्या घराण्याने या भाषेला राजाश्रय दिला; आणि काही नृपतींनी याच भाषेत शब्दसंपदा निर्माण केली. त्यामध्ये प्रवरसेन (दुसरा) याचे 'सेतुबंध व रावणवहो' हे प्राकृत ग्रंथ प्रसिद्ध आहेत. महाराष्ट्री भाषासौष्ठव, मधुरता, शालीनता, मार्दव आदी गुणांनी प्रचुर असल्यामुळे आद्य नाटककारांनी ती प्रामुख्याने स्त्री-पात्रांचे तोंडी घातल्याचे जाणवते. जैन



'गाहा सत्तसई'मधील वर्णनानुसार साकारलेले बाहुलीचे शिल्प.

धर्मीयांचे आरंभीचे कथा-वाङ्मय महाराष्ट्री भाषेत असल्यामुळे तिचा भारतभर प्रसार होण्यास मदत झाली. नंतरच्या कालातील महानुभाव लेखकांनी आपले सर्व लिखाण याच भाषेत करून तिचा लौकिक महाराष्ट्राबाहेर वाढविला.

सातव्या शतकात होऊन गेलेल्या दण्डी कवीने महाराष्ट्री प्राकृतबद्दल गौरवोद्गार काढले आहेत. यानंतर झालेल्या पुष्पदंत, राजशेखर, राजा भोज आदी कवींनी महाराष्ट्री-अपभ्रंश भाषेचा वापर केल्याने तिचा सतत विकास होण्यास मदत झाली. म्हणजेच सातवाहन पूर्वकालात सुरू झालेला महाराष्ट्री-प्राकृत-अपभ्रंश भाषेचा विकास यादव काळात पूर्णत्वास गेला आणि ज्ञानेश्वरांनी 'महाराष्ट्र'मंडळामध्ये ज्ञानेश्वरीसारख्या अलौकिक ग्रंथाची रचना करून महाराष्ट्री भाषेवर कळस चढविला. याच भाषेने महाराष्ट्राचे वेगळेपण

जोपासून त्याचे एका अस्मितासंपन्न प्रादेशिक घटकात म्हणजेच महाराष्ट्रात रूपांतर केले, हे विशेष होय. मराठीमुळेच १५०० वर्षांहून अधिक कालाकरिता महाराष्ट्र संस्कृतीचे वेगळेपण, अस्मिता, पृथगात्मता जोपासली गेली, यातच मराठीचे मोठेपण सामावले आहे.

## महाराष्ट्र नामाभिधान

महाराष्ट्र संस्कृती, मराठी भाषा ह्यांच्या वाटचालीचा धांडोळा घेत असताना आपण तिचे वेगळेपण, तिच्या भौगोलिक सीमा यांचा यथाक्रम विचार केला. आता आपण या प्रदेशाला महाराष्ट्र हे नामाभिधान कसे प्राप्त झाले आणि त्यामध्ये कोणते प्रादेशिक घटक केव्हापासून समाविष्ट झाले, ह्याचा विचार करणार आहोत. त्यासाठी अभिलेख, लोकसाहित्य व प्रत्यक्ष साहित्य ह्यांचा मागोवा घ्यावा लागणार आहे.

**दण्डकारण्य** : महाराष्ट्रालाच रामायण-महाभारत कालात दण्डकारण्य म्हणून ओळखले जात होते. लोकपरंपरेतून व उपरोक्त महाकाव्यांतून वर्णन केलेल्या दंडकारण्याच्या सीमा अतिशय अस्पष्ट आहेत; त्यामुळे त्याची नेमकी स्थळनिश्चिती करणे काहीसे कठीण काम आहे. रामायणामध्ये विंध्य व शैल्य (श्रीशैल्य) ह्या पर्वतांदरम्यानच्या प्रदेशाला दण्डकारण्य म्हटले आहे. महाभारतामध्ये दंडकारण्यामधील अनेक आदिवासी जमातींची माहिती दिली आहे.

लोकपरंपरेनुसार दण्डक व त्याचे अनुयायी राक्षस असून ते यज्ञयाग करणाऱ्यांना त्रास देत असत, म्हणूनच प्रभू रामचंद्रांनी दंडकारण्यात येऊन चौदा हजार राक्षसांचा वध केल्याचे मानले जाते. त्यामधूनच नाशिक-पंचवटीचे परिसरातून सीतेचे अपहरण झाले व पुढील रामायण घडले. महाभारतात सहदेवाच्या दक्षिण-यात्रेच्या निमित्ताने दंडकारण्याचे वर्णन विस्ताराने दिले आहे.

बौद्ध साहित्यामध्ये विंध्य पर्वताच्या दक्षिणेकडील प्रदेशाला दण्डकारण्य म्हटले आहे. पेरिप्लस ग्रंथाच्या अज्ञात लेखकाने कल्याण, जुन्नर व पैठण ही दंडकारण्यातील केंद्रे आहेत, असे म्हटले आहे. वायुपुराणात गोदावरी व कृष्णा ह्या नद्या दंडकारण्यातून वाहतात असे म्हटले आहे. दंडकारण्यात अनेक ऋषींचे आश्रम असल्याचे म्हटले असले, तरी दंडकारण्यात सलग वसाहती असल्याचे वाटत नाही.

**दक्षिणापथ:** दंडकारण्यालाच नंतर दक्षिणापथ म्हणून ओळखले जाऊ लागले. दक्षिणापथाचे उल्लेख साहित्यामध्ये व अभिलेखामध्ये मोठ्या प्रमाणात सापडतात. विंध्य पर्वत व नर्मदा नदी यांमुळे भारतवर्षाचे विभाजन झाले असून, पैकी उत्तरेच्या भागाला उत्तरापथ व दक्षिणेकडील भू-प्रदेशास दक्षिणापथ असे म्हणत होते. याचा सर्वांत प्राचीन उल्लेख ऋग्वेदात सापडतो. ऋग्वेदावरील यास्काच्या टीकेतही याचा उल्लेख येतो. यानंतर रामायण, महाभारत, बौद्धायन सूत्रे, पाणिनी, मत्स्य, वायू व मार्कंडेय आदी पुराणांतून दक्षिणापथाचे उल्लेख येतात. ऐतरेय ब्राह्मणानुसार दक्षिणापथ हे आंध्र, पुंड्र, शबर आदी बहिष्कृत जमातींचे केंद्र होते. काव्यमीमांसेमध्ये महिष्मतीच्या दक्षिणेकडील प्रदेश म्हणजे दक्षिणापथ होय असे म्हटले आहे. कौटिल्याच्या अर्थशास्त्रामध्ये दक्षिणापथाचे व्यापारी-महत्त्व सांगितले आहे.

वात्स्यायनाच्या कामसूत्रांमध्ये 'नर्मदेया दक्षिणेदेशी दक्षिणापथः' असे म्हटले आहे. पेरिप्लसच्या लेखकानेही दक्षिणापथाचा 'दक्षिणाबेड्स' असा उल्लेख केला आहे. उपरोक्त उल्लेखावरून दक्षिणापथाच्या चतुःसीमा अतिशय लवचीक असल्याच्या दिसतात. त्याच्या विस्ताराबद्दल संशोधकांत मतभिन्नता आहे. यामध्ये अतिदक्षिणेकडील (south) भूप्रदेशाचा अंतर्भाव होत नसल्याने काही संशोधकांनी या प्रदेशास 'डेक्कन' अशी संज्ञा दिली आहे. डेक्कन (Deccan) हा शब्द दक्षिण या शब्दाचा अपभ्रंश होय.

## उत्कीर्ण लेखातील दक्षिणापथ

उत्कीर्ण लेखांतूनही दक्षिणापथाचे अनेक उल्लेख येतात. सर्वांत प्राचीन उल्लेख इसवी सन पूर्व दुसऱ्या शतकातील असून तो नाणेघाटातील शिलालेखात कोरविला आहे. प्रस्तुत शिलालेख प्रथम सातकर्णीची भार्या, महारथी त्राणकारीची कन्या नागनिका हिच्या आज्ञेवरून कोरण्यात आला आहे. यामध्ये सिमुक या सातवाहन नृपतीला

दक्षिणापथपती म्हणून गौरविले आहे. याचप्रमाणे अनेक सातवाहन नपृतींनी धारण केलेल्या 'दक्षिणापथपति', दक्षिणापथेश्वर, महारथी यांसारख्या महाराष्ट्र प्रदेश सूचक बिरुदांचा उल्लेख, जुनागढ व नाशिक अभिलेखांतून आलेला आढळतो.

पेरिप्लसने उल्लेखलेला दक्षिणाबेड्स म्हणजेच दक्षिणापथ असून तोच महाराष्ट्र होय असे डॉ. भांडारकर, म.म. काणे व कोशकार केतकर ह्यांचे स्पष्ट मत आहे. यावरून महाराष्ट्राचे प्राचीन नाव दक्षिणापथ होते व या दक्षिणापथात अनेक प्राचीन घटक प्रदेश होते. साहित्यामधून दक्षिणापथाबरोबर त्यांचाही उल्लेख केलेला आढळतो. या घटक प्रदेशांमध्ये विदर्भ, अश्मक, मूलक, कुंतल, अपरान्त तथा अन्य काही लहान-लहान प्रदेशांचा समावेश होतो. शिवाय प्राचीन साहित्यातून गोपराष्ट्र, मल्लराष्ट्र, पंडूराष्ट्र असेही उल्लेख येतात. त्यांची ओळखही असणे गरजेचे आहे. अश्मक हे दक्षिणापथातील प्राचीन जनपद होय. महाभारताच्या भीष्मपर्वात याची नोंद आहे. अश्मक नृपतीचा अभिमन्यूने वध केल्याचे द्रोणपर्वात म्हटले आहे. अश्मकाचा उल्लेख मूलक व कलिंग यांच्यासमवेत परमोत्थ जातकात आढळतो. त्याचा अस्सक असाही उल्लेख केला गेला आहे. पोतन (बोधन, जि. निजामाबाद) ही अस्सकाची राजधानी. नाशिक व अजिंठा अभिलेखात याचे उल्लेख येतात.

**मूलक:** रामायणामध्ये मूलकाचा उल्लेख आढळतो. देवगिरी ते जालना पर्वतरांगेतील परिसर म्हणजे मूलकाचा भूप्रदेश होय. हा गोदाकाठचा प्रदेश असल्याने अत्यंत सुपीक होता. पैठण (प्रतिष्ठान) ही मूलकाची, तसेच नंतरच्या सातवाहन साम्राज्याची राजधानी. मूलकाच्या ऱ्हासानंतर येथे पेतनिकांचे जनपद निर्माण झाले, ज्याची अशोकाच्या शिलालेखात नोंद आढळते. नंतर नाशिक येथील उत्कीर्ण लेखात मूलकाची नोंद सापडते.

**अपरान्त:** प्राचीन काळापासून प्रसिद्ध असलेल्या या भूप्रदेशाची नोंद गौतमधर्मसूत्रे, बौद्धायनधर्मसूत्रे यांमध्ये सापडते. पौराणिक परंपरेनुसार अपरान्त म्हणजे परशुरामाची भूमी. हैहय कार्तवीर्याचा वध केल्यानंतर परशुरामाने अपरान्तात वसाहत निर्माण केल्याचे मानले जाते. टॉलेमीने याला 'अरायके' असे म्हटले आहे. भांडारकरांनी अपरान्त म्हणजे उत्तरकोकण असून शुर्पारिक (सोपारा) ही त्याची राजधानी असल्याचे म्हटले आहे. शिवाय अपरान्ताला नागभूमी म्हणून ओळखले जाते. चेमुलक (चौल), कल्लियाण (कल्याण) ही या किनारपट्टीची बंदरे प्राचीन काळापासून प्रसिद्ध आहेत. हिप्पालसने लावलेल्या मान्सून वाऱ्याच्या शोधामुळे या किनारपट्टीचे महत्त्व वाढले (इ. स. ४५) व तीवर वर्चस्व प्रस्थापित करण्यासाठी प्रदीर्घ काळ राजकीय संघर्ष होत राहिले. नाशिकच्या व कान्हेरीच्या शिलालेखांत अपरान्ताची नोंद आहे.

**विदर्भ:** बृहदारण्यकोपनिषदात विदर्भाचा पहिला उल्लेख आढळतो. आर्यांचे दक्षिणेकडील आगमन विंध्याच्या पूर्व व पश्चिम दिशेने झाल्याचे मानले जाते. पूर्वेकडून विदर्भात प्रवेश करणारा अगस्ती हा पहिला आर्य तर विंध्याच्या पश्चिमेकडून अपरान्तामध्ये प्रवेश करणारा भृगू हा पहिला आर्य होय. अगस्तीसमवेत भोज, क्षत्रियपण विदर्भात आले. त्यांच्या एका नृपतीचे नाव विदर्भ होते. त्यावरूनच या प्रदेशास विदर्भ हे नाव प्राप्त झाले. कुंडिनपूर (कौंडिण्यपूर जि. अमरावती) ही त्याची आद्य राजधानी. रामायण-महाभारतामध्ये विदर्भाचा उल्लेख अनेक वेळा आला आहे. अगस्तीची पत्नी लोपामुद्रा ही विदर्भ राजकन्या. त्याचप्रमाणे श्रीकृष्णाची पट्टराणी रुक्मिणीपण विदर्भ राजकन्याच. दमयन्तीचा जन्म उपरोक्त भोजकुलातीलच शिवाय अजराजाची पत्नी इंदुमती त्याच कुलातील. विदर्भालाच भोजकट असेही नाव होते. अशोकाच्या शिलासनात राष्ट्रीक, पेतनिक ह्यांच्याबरोबर भोजिकांचाही उल्लेख आहे. राजशेखर, वात्स्यायन आदींच्या ग्रंथात विदर्भाचे विपुल उल्लेख येतात.

**कुंतल:** दक्षिण महाराष्ट्राचा भूप्रदेश म्हणजे प्राचीन कुंतल होय. धाराशिव जिल्ह्यातील पर्वतरांगांना कुंतलगिरी असे म्हणतात. सातवाहन नृपती स्वतःचा उल्लेख कुंतलस्वामी म्हणून करत असत. अजिंठा शिलालेख, बैघट ताम्रपट, पांडुरंग पल्ली ताम्रपट यांमधून कुंतलाचे उल्लेख आले आहेत. सोढ्ढलाच्या उदयसुंदरी कथानकात पैठण कुंतलाची राजधानी म्हटले आहे. महाभारतात तसेच पुराणात कुंतलाचे उल्लेख येतात. दण्डीच्या दशकुमारचरितात कुंतलाचा उल्लेख



मेहूण शिलालेख – शके ७४७.

आहे. बिल्हणाच्या विक्रमांकदेव चरितात कुंतल आणि कर्नाट एकत्र असल्याचे म्हटले आहे.

याशिवाय ऋषिक, रथिक, भोजिक, नासिक्य, पेतनिक आदी प्राचीन जनपदांचे निर्देश समकालीन अभिलेखांतून आलेले आहेत. तसेच गोपराष्ट्र (नाशिक परिसर), मल्लराष्ट्र (त्याच्या दक्षिणेचा प्रदेश). पांडूराष्ट्र (पाण्ड्य–तामिळनाडू देश) यांचे उल्लेख आढळतात. असे असले, तरी प्रत्यक्ष महाराष्ट्र हे नामाभिधान कसे पडले, हे कुतूहल कायमच राहते. सर्वसामान्यतः असे मानले जाते की; राष्ट्रीक, (रहलोक) भोजिक, अश्मक, कुंतल, विदर्भ, अपरान्त, गोपराष्ट्र, मल्लराष्ट्र आदींचे एका बलाढ्य साम्राज्यात विलीनीकरण झाल्यावर त्यांना महाराष्ट्रीक (महाराष्ट्राचे) म्हणून नाव पडले असावे व कालांतराने महाराष्ट्र हे नाव रूढ झाले असावे.

रट्ट ह्या प्राकृत शब्दाचे संस्कृत रूप राष्ट्रीक होते, असे डॉ. भांडारकरानी म्हटले आहे. भोज स्वतःचा महाभोज असा गौरवपर उल्लेख करतात त्याप्रमाणे राष्ट्रीक आपणास महाराष्ट्रीक म्हणवून घेऊ लागले आणि परिणामतः महाराष्ट्र ही प्रदेशवाचक संज्ञा रूढ झाली. म. म. काणे ह्यांनीही ह्याच मताला दुजोरा दिला आहे. तथापि ही प्रक्रिया पूर्णत्वास जाण्यास प्रदीर्घ कालावधी लागला असावा, असे दिसते.

### महाराष्ट्र– शिलालेखांतून

**ऐरण–लेख:** महाराष्ट्राचा सर्वप्रथम शिलालेखातून आलेला उल्लेख ‘ऐरण’च्या शिलालेखात आढळतो (जि. सागर, म. प्र. राज्य). महाक्षत्रप श्रीधर वर्म्याचा सेनापती सत्यनाग याने इ. स. ३६५ मध्ये प्रस्तुत लेख एका स्तंभावर कोरला आहे. तो स्वतःचा उल्लेख महाराष्ट्री असा करतो.

‘राज्ञः आरक्षिकेन सेनापति सत्यनागेन महाराष्ट्र प्रमुखेन महाराष्ट्रेन।’ असा त्याने स्वतःचा महाराष्ट्रीय म्हणून गौरवपूर्ण उल्लेख केला आहे.

**ऐहोळे लेख:** महाराष्ट्र असा देशवाचक उल्लेख असणारा दुसरा शिलालेख ऐहोळे (जि. विजापूर, कर्नाटक राज्य) येथे उपलब्ध झाला आहे. प्रस्तुत लेख इ. स. ६३४ मध्ये कोरला असून त्यामध्ये जैनकवी रविकीर्ती याने दुसरा चालुक्य नृपती सत्याश्रय पुलकेशी याचा ‘तीन महाराष्ट्राचा स्वामी’ असा गौरव केला आहे.

'अगमदधिपत्वं यो महाराष्ट्रकाणां, नवनवति सहस्रग्रामभाजां त्रयाणाम्।' म्हणजे सत्याश्रय पुलकेशी हा नव्याण्णव हजार गावे असलेल्या तीन महाराष्ट्रकांचा स्वामी झाला, असा आहे. आता ९९००० गावे असलेले तीन महाराष्ट्र कोणते हा संशोधनाचा विषय आहे, पण या ठिकाणचा महाराष्ट्राचा प्रदेशवाचक उल्लेख अत्यंत महत्त्वाचा ठरतो.

**मेहूण लेख :** अशाच प्रकारचे महाराष्ट्र या नावाचा निर्देश असलेला लेख मेहूण (जि. जळगाव, महाराष्ट्र राज्य) येथे उपलब्ध झाला आहे. लेख शुद्ध संस्कृतमध्ये असून इ. स. ८१५-२५ मधील आहे. यामध्ये हैहय (कलचुरी) घराण्याची वंशावळ दिली असून त्यामधील प्रतिकंट नामक नृपतीचे उपनाम महाराष्ट्र असल्याचे म्हटले आहे. यावर अद्याप व्यापक संशोधन झालेले नाही. तथापि तसे असेल, तर महाराष्ट्र हे व्यक्तिवाचक नाव असणारा हा एकमेव शिलालेख ठरेल. आता आपण महाराष्ट्राच्या साहित्यातून आलेल्या नोंदींचा आढावा घेऊ या.

## महाराष्ट्राचा साहित्यातील उल्लेख

महाराष्ट्राला प्राकृतामध्ये महारठ्ठ म्हणून संबोधिले गेल्याचे 'महावंस' या बौद्ध ग्रंथावरून स्पष्ट होते. इसवी सन पूर्व तिसऱ्या शतकात मोगलीपुत्ततिस्स याचे अध्यक्षतेखाली बौद्ध सांगती झाली होती. त्यानंतर त्याने ज्या प्रदेशांत धर्मोपदेशक पाठविले त्यांची यादी दिली आहे. त्यामध्ये महारठ्ठ देशाचा उल्लेख अपरान्तबरोबर आढळतो. असाच उल्लेख बुद्धघोषाच्या समंतपासादिकेच्या प्रस्तावनेत आढळतो. त्यामध्ये यवनधम्म रख्खिताला अपरान्तमध्ये तर महाधम्म रख्खिताला महारठ्ठात पाठविल्याचे म्हटले आहे. महावंसाप्रमाणेच 'दीपवंस' ग्रंथामध्ये महारठ्ठाचा उल्लेख येतो. हे सर्व उल्लेख इसवी सनाच्या तिसऱ्या शतकातील आहेत. तथापि मोगलोपुत्ततिस्साची घटना इसवी सन पूर्व तिसऱ्या शतकात झाली आहे, हे महत्त्वाचे.

वराहमिहिराने आपल्या बृहत्संहितेमध्ये 'भाग्ये रसविक्रयिणः पण्य स्त्री कन्यका महाराष्ट्राः' असे वर्णन केले आहे. या ठिकाणी महाराष्ट्र हा शब्द महाराष्ट्रात राहणारे या अर्थी उपयोजित आहे. वराहमिहिर इसवी सनाच्या सहाव्या शतकात होऊन गेला. इ. स. ६४० ते ६४१ मध्ये ह्यूएन्संग हा चिनी प्रवासी महाराष्ट्राला भेट देऊन गेला. त्याने महाराष्ट्राचा उल्लेख Moholo-cha (Moholesh) असा केला असून येथील लोकांची काही स्वभाववैशिष्ट्ये सांगितली आहेत. ती याप्रमाणे- महाराष्ट्र भूमी सुपीक असून ती धनधान्याने समृद्ध आहे. येथील लोक साधे, प्रामाणिक तथापि रागीट आहेत. त्यांना कोणी त्रास दिल्यास ते बदला घेण्यास तत्पर असतात. शरणागताला ते अभय देतात. वगैरे.

दण्डी हा सातव्या शतकात होऊन गेलेला प्रसिद्ध संस्कृत कवी, त्याने 'काव्यदर्श' या ग्रंथात महाराष्ट्री भाषेचा गौरव केला आहे.

**महाराष्ट्राश्रयां भाषां प्रकृष्टं प्राकृतं विदुः।**
**सागरः सूक्तिरत्नानां सेतुबंधादि यन्मयम् ।।**

अर्थ: महाराष्ट्रात प्रचलित असलेली भाषा ही विद्वानांच्या मते सर्वांत श्रेष्ठ प्राकृत भाषा होय. कारण तीमध्ये सेतुबंधासारखे सूक्तिरत्नांचे सागर आहेत. यावरून महाराष्ट्र हा देशवाचक शब्द असल्याचे स्पष्ट होते.

## महाराष्ट्र व जैन साहित्य

उद्योतनसुरी हे आठव्या शतकातील प्रसिद्ध जैनाचार्य होते. (इ. स. ७७८) 'कुवळायमाला' हा त्यांचा अपभ्रंश भाषेतील काव्यसंग्रह. त्यामध्ये त्यांनी मरहट्टीचे सुरेख शब्दचित्र रेखाटले आहे. त्यानुसार मरहट्टी हा 'घटमुट, काळासावळा, सहनशील, अभिमानी आणि दिण्णल्ले, गहिल्ले असे बोलणारा' असल्याचे म्हटले आहे.

'लीलावई' या खंडकाव्याचा कर्ता कोऊहल कवी इ. स. ८०० च्या आसपास होऊन गेला. आपल्या प्रेयसीच्या आग्रहाखातर त्याने प्रस्तुत काव्यरचना, सर्वसामान्य स्त्रीवर्गाला समजेल अशा, मरहठ्ठी-देशी भाषेतून केली. त्यामध्ये सातवाहन नृपती हाल (कुंतल) आणि सिंहलद्वीपाची राजकन्या यांच्या प्रणयाचे व विवाहाचे चित्रण करण्यात आले आहे. त्याला महाराष्ट्राबद्दल व त्याची राजधानी प्रतिष्ठानबद्दल अतिशय अभिमान असल्याचे त्याच्या लिखाणातून ठायी-ठायी स्पष्ट होते. मासला म्हणून



आळंदी येथील श्रीज्ञानेश्वर समाधी.

हे वर्णन पाहा– पृथ्वीला ललामभूत असलेल्या या प्रदेशात धनधान्य–समृद्धीमुळे शेतकरी संतुष्ट असतात. या महाराष्ट्रात नेहमी कृतयुग असते. येथे सर्वत्र जलविहार करण्यायोग्य तळी आहेत. सर्वत्र कमळांनी भरलेली सरोवरे आहेत. या देशाची राजधानी, प्रतिष्ठान नगरी अत्यंत रम्य असून ती गोदावरीच्या काठी वसलेली आहे. या नदीत स्नान करून मरहट्टी स्त्रिया आपली सर्व पापे धुऊन टाकतात. त्यांच्या वक्षांची हळद पाण्यात मिसळल्यामुळे गोदावरीचे पाणी पिवळसर झालेले असते. स्वदेश व स्वभाषा यांबद्दलच्या अभिमानावरून महाराष्ट्री जनांची अस्मिता किती प्रखर होती, याची जाणीव होते.

राजशेखर हा राष्ट्रकूटकालीन नाटककार व साहित्यशास्त्रज्ञ इसवी सनाच्या १० व्या शतकात होऊन गेला. त्याचे घराणे साहित्य परंपरेला वाहिलेले. बालरामायण हे त्याचे प्रसिद्ध नाटक. या साहित्यकृतीमध्ये त्याने आपल्या पणजोबांचा । महाराष्ट्र चूडामणिः। असा गौरव केला आहे. बालरामायणात लंकेहून परत जातानाच्या प्रसंगात सुग्रीव रामाला म्हणतो ‘भरताग्रज, अयमग्रे महाराष्ट्रविषयः।’ याच प्रसंगात राम सीतेला कुंतल व विदर्भ खंडमंडळाचे वर्णन करतो. सीतास्वयंवरात जमलेल्या नृपतींमध्ये कुंतल देशाचा राजा होता, त्याचा उल्लेख सीता ‘महारठ्ठ वरिठ्ठो’ या शब्दात करते ‘चतुर्विशति प्रबंध’ या त्याच्या अन्य ग्रंथात महाराष्ट्र, पैठण आदींचा उल्लेख अनेक वेळा आढळतो. ‘इह भारतवर्षे दक्षिणखंडे महाराष्ट्र देशावतंसं श्रीमत् प्रतिष्ठान नाम पत्तनं विद्यते’ यावरून महाराष्ट्राच्या अनेक पैलूंवर प्रकाश पडतो.

पुराणकारांच्या महाराष्ट्रविषयक कल्पना मार्कंडेय, वायू व ब्रह्म ह्या पुराणांत व्यक्त झाल्या आहेत. मार्कंडेय पुराणात ‘महाराष्ट्रा माहिषकाः कलिंगास्वैव सवेशः’ असा महाराष्ट्राचा उल्लेख आलेला आहे. शिवाय दक्षिणापथात समाविष्ट असणाऱ्या देशांचाही उल्लेख केला आहे. यामध्ये दण्डक, अश्मक, नैसिक, कुंतल, विदर्भ आदींची नोंद आहे. सर्वसाधारणपणे इसवी सनाच्या ४/५ शतकात पुराणे लिहिली गेली असावीत, असे पुराण–संशोधक पार्गिटर याने म्हटले आहे.

वात्स्यायनाच्या कामसूत्रात (इसवी सन पहिले शतक) महाराष्ट्राचे महाराष्ट्रकाणाम् व महाराष्ट्रिक्य असे उल्लेख आले आहेत. भरताच्या नाट्यशास्त्रात (समकालीन) महाराष्ट्राचा द्रमिडांध्र–महाराष्ट्राः असा उल्लेख केला आहे. म्हणजे इसवी सन पूर्व तिसऱ्या शतकापासून महाराष्ट्राचे देशवाचक (क्वचित प्रसंगी व्यक्तिवाचक विशेषण म्हणून) अनेक उल्लेख आढळतात.

तेरावे शतक हे मराठी भाषा आणि महाराष्ट्र देश (मंडळ) यांच्या दृष्टिकोनातून ज्ञानेश्वरांच्याच शब्दांत सांगायचे झाल्यास कलशाध्याय होते. इ. स. ११८८ मध्येच मुकुंदराजांचा विवेक–सिंधुसारखा तत्त्वज्ञानावर तथा अध्यात्मावर आधारलेला ग्रंथ आकारास आला. लोकांच्या अंतःकरणाला स्पर्श करण्याची ताकद मराठी भाषेत निर्माण झाली होती. ‘कन्नडदेशा, तेलुगू देशा न जाता महाराष्ट्री वसावे’ हा चक्रधरस्वामींचा उद्देश त्यांच्या अनुयायांनी शब्दशः अमलात आणून मराठी भाषेत

मोठ्या प्रमाणात साहित्य-निर्मिती केली, तथापि नंतरच्या राजकीय स्थित्यंतरांमुळे हे साहित्य काही काळ अंधारात प्रतीक्षा करत होते; म्हणून ते जनमानसात तत्काळ घर बांधू शकले नाही. अलीकडे यावर बरेच संशोधन झाले आहे आणि त्यामधून त्यांना महाराष्ट्र देश व भाषा यांविषयी किती पराकोटीचा अभिमान होता, हे स्पष्ट झाले आहे.

'महंतराष्ट्र म्हणौनि महाराष्ट्र, महाराष्ट्र निर्दोष आन सगुण, धर्म-सिद्धी जाये ते महाराष्ट्र' (आचारपाठ, पहिले सूत्र) अशा प्रकारची जाज्वल्य अभिमान स्पष्ट करणारी वचने त्यांच्या साहित्यात ठायी-ठायी पेरलेली आढळतात. महाराष्ट्रात विद्या आणि पौरुष यांचा उत्तम परिपोष आढळतो. 'महाराष्ट्री विद्या आणि पुरुष असे (एकांक-लीला क्र. ४ पूर्वार्ध-लीला क्र. २५०). त्यांच्या मनात महाराष्ट्राची व्याप्ती किती होती पाहा-

देश म्हणजे खंडमंडळ। जैसे फलेठाणा पासौन दक्षिणसि मऱ्हाटी भाषा जेतुला ठायी वर्ते ते एक मंडळ। तयासी उत्तरे बालाघाटाचा शेवट असे ऐसे एक खंड मंडळ। मग उभय गंगा तीर (गोदातीर) तेही एक खंडमंडळ। आन तयापासौनि मेघंकर घाट ते एक खंडमंडळ। तयापासौनि अवघे वराड ते एक खंडमंडळ। परी अवघे मिळौनि महाराष्ट्र बोलिजे. (आचार महाभाष्य) कृष्णमुनि डिंभ यांनी ऋद्धिपूरवर्णन या ग्रंथात, जेथे-जेथे चक्रधरस्वामींनी क्रीडा केली तो प्रदेश म्हणजे महाराष्ट्र, असे सारांशाने म्हटले आहे.

नंतर आलेल्या भगवान ज्ञानेश्वरांनी तर माझ्या मराठी भाषेत काय कमी आहे, असे श्रोत्यांनाच विचारून ती पैजेवर अमृताला जिंकणारी म्हणजे अमृताहून श्रेष्ठ असल्याची ग्वाही दिली आहे - त्यांच्या ज्ञानेश्वरी या जगद्‌विख्यात ग्रंथातून मराठीची परिपक्वता तर स्पष्ट झालीच आहे, शिवाय "तिला माउलीचा सन्मान लाभला आणि हे सर्व महाराष्ट्रातच झाले" असे त्यांनी स्पष्ट प्रतिपादन केले आहे. तिच्यावर देशीकार लेण्याचा साज चढविताना अठराव्या अध्यायात ते म्हणतात-

ऐसे युगी वरीकळी। आणि महाराष्ट्र मंडळी।
श्री गोदावरीच्या कुळी। दक्षिणीली ।।१७८१।।

तेथ महेशान्वय संभूते। श्री निवृत्ती नाथसुते।
केले ज्ञानदेवे गीते। देशीकार लेणे ।।१७८४।।

**संदर्भ :**


१) मिराशी वा. वि.
सातवाहन नृपति आणि पश्चिमी क्षत्रप यांचा इतिहास व कोरीव लेख, मुंबई १९७९
२) डिस्कळकर द. बा.
प्राचीन महाराष्ट्र इतिहास व संस्कृती, पुणे १९६२
३) देव शां. भा.
महाराष्ट्रातील उत्खनने, मुंबई १९६२
४) भांडारकर रा. गो.
अर्ली हिस्ट्री ऑफ डेक्कन, लंडन १९६०
५) केतकर श्री. रा.
प्राचीन महाराष्ट्र भाग १/२ पुणे १९६३
६) काणे पां. वा.
एनशिअन्ड जिओग्राफी ॲन्ड सिव्हिलिझेशन ऑफ महाराष्ट्र
७) सहस्रबुद्धे पु. ग.
महाराष्ट्र संस्कृती, पुणे १९७९
८) शेंडे एस. आर.
हॉऊ, व्हेन्स ॲन्ड महाराष्ट्र केम इनटू बिइंग-सिद्धभारती भाग १/२
९) तुळपुळे शं. गो.
यादवकालीन मराठी भाषा- प्रबंध प्राचीन मराठी कोरीव लेख-पुणे १९६३
१०) मोरवंचीकर रा. श्री.
सातवाहनकालीन महाराष्ट्र, पुणे १९९३
११) जोगळेकर स. आ.
गाहासत्तसई, पुणे १९५६
१२) भागवत रा. रा.
प्राकृत भाषेची विचिकित्सा, आवृत्ती दुसरी १९३०
१३) घाटगे ए. एम.
महाराष्ट्र: लॅंग्वेज ॲन्ड लिटरेचर- मुंबई विद्यापीठ जर्नल भा. ४/६ १९३६
१४) पिशेल आर.
दि कंपेरिटिव्ह-ग्रामर ऑफ दि प्राकृत लॅंग्वेजेस इंग्रजी भाषांतर झा सुभद्र- दिल्ली १९२७
१५) शहा सुमती
पूर्णार्घ्य, सोलापूर


* * *



# महाराष्ट्राची जडणघडण



## महाराष्ट्रीय समाजगटांचा विकास

■ डॉ. सुभाष वाळिंबे

> ‘आर्य लोकांनी हडप्पा व मोहोंजोदाडो शहरे काबीज केल्यानंतर तिकडच्या आणि कालांतराने उत्तरेकडील सर्व द्रविडीअन लोकांना दक्षिणेकडे पिटाळून लावले’ या प्रकारे भाषाशास्त्रज्ञ व मानववंशशास्त्रज्ञ यांनी मांडलेल्या दुर्दैवी व सर्वस्वी चुकीच्या सिद्धान्ताचा जनसामान्यांवर खूप पगडा बसला. गेल्या पंचवीस-तीस वर्षांच्या पुरातत्त्वशास्त्र, मानवशास्त्र आणि अणु-जीवशास्त्र या शाखांतील संशोधनामुळे मागील सिद्धान्तांचा फोलपणा प्रकर्षाने समोर येतो.

महाराष्ट्रात दिसणाऱ्या विविध जाती-जमाती या काल-आज निर्माण झालेल्या नाहीत. पाषाण कालापासून ते लिखित पुरावा उपलब्ध होण्याच्या कालापर्यंत मानवाच्या सांस्कृतिक जीवनाचा आलेख विविध उत्खननांनी आणि समन्वेषणाने उपलब्ध करून दिलेला आहे. अगदी अलीकडच्या काळात उपलब्ध झालेले DNA चे तंत्रज्ञान हे मानवशास्त्रीय किंवा पुरातत्त्वशास्त्रीय संशोधनातून पुढे आलेले निष्कर्ष पडताळून पाहण्यास उपयोगी ठरते.

सुमारे १५ ते १८ लाख वर्षांपूर्वी आफ्रिकेमध्ये ‘होमो इरेक्टस’ (Homo Erectus) या नावाने आपले पूर्वज अस्तित्वात होते. त्यांच्या मेंदूची वाढ बऱ्यापैकी झाली होती, आणि ते त्यांच्या दोन पायांवर शरीराचा भार सांभाळू शकत होते. अर्थातच बुद्धी आणि चपळाई यांमध्ये ते त्यांच्या अगोदरच्या ऑस्ट्रॅलोपिथेक (Australopithecus) या प्राण्यापेक्षा सरस होते. सुबक हत्यारांच्या साहाय्याने मोठ्या प्राण्यांची ते टोळक्याने शिकार करत होते. तसेच अन्न शिजवण्यासाठी व उबेसाठी त्यांना अग्नीचा उपयोग माहीत होता. मानवी उत्क्रांतीच्या टप्प्यातील असे हे आपले पूर्वज सुमारे बारा लाख वर्षांपूर्वी भारतीय उपखंडात आले. त्यांच्या अश्मास्थींच्या (fossils) स्वरूपातील पुरावा

अद्याप भारतात हाती लागलेला नाही. परंतु अशुलीअन (Acheulian) या नावाने ओळखली जाणारी त्यांची पूर्व पुराश्मयुगीन (Lower Palaeolithic) काळातील वसतिस्थाने महाराष्ट्रात व भारतात इतरत्र सापडली आहेत. आपले पूर्वज शिकार करून आपली गुजराण करत असत. त्यामुळे अर्थातच जंगलाच्या आसपास, तसेच त्यांच्या हत्यारांसाठी लागणारा सुयोग्य दगड उपलब्ध असेल अशा ठिकाणी ते वस्ती करत असत. महाराष्ट्र म्हणजे दगडांचा देश! त्यामुळेच कदाचित पाषाणयुगीन मानव महाराष्ट्राकडे आकर्षित झाला असावा. महाराष्ट्राच्या निरनिराळ्या भागांमध्ये; तापी, गोदावरी, प्रवरा, भीमा, घोड, कृष्णा, पूर्णा, पैनगंगा, वैनगंगा, मांजरा इत्यादी नद्या आणि त्यांच्या उपनद्या यांमध्ये पाषणयुगीन हत्यारे फार मोठ्या प्रमाणावर सापडली आहेत. अगदी अलीकडे कोकणामधील गुहांमध्ये त्या काळातील मानवाच्या अस्तित्वाचा पुरावा मिळाला आहे.

हळूहळू सभोवतालच्या परिसराशी जमवून घेता-घेता त्यांच्या राहणीमानात व शरीरयष्टीत बदल होत गेले. या पूर्वजांच्या अश्मास्थी अद्याप महाराष्ट्रात मिळाल्या नसल्या, तरी हळूहळू विकसित होत गेलेल्या दगडी हत्यारांचे शोध लागले आहेत.

सध्याच्या मानवाला शास्त्रीय परिभाषेत मॉडर्न होमो सेपिएन्स Modern Homo Sapiens (MHS) म्हणतात. आफ्रिकेमध्ये सुमारे दीड ते दोन लाख वर्षांपूर्वी उत्क्रांत झालेले हे आधुनिक मानव भारतीय उपखंडात सुमारे ऐंशी हजार ते साठ हजार वर्षांपूर्वी आले असावेत. मागे उल्लेख केलेल्या मानवांपेक्षा हे नवीन आलेले मानव शारीरिकदृष्ट्या व बौद्धिकदृष्ट्या प्रगत होते. या प्रगत मानवापासून किंवा या दोन्ही मानव समूहांतील संकरापासून आजचा मानव तयार झाला.

सुमारे ४० हजार ते १० हजार वर्षांपूर्वी हवामानात लाक्षणिक बदल झाला. रखरखीत आणि थंड हवामानामुळे जंगले कमी झाली. अर्थातच मोकळ्या गवताळ प्रदेशात शिकार किंवा अन्य अन्न मिळवण्यासाठी या मानवास झगडावे लागले. पण त्यांनी त्यांच्या बौद्धिक व शारीरिक चपळाईमुळे या संकटावर मात केली. इतकेच नव्हे, तर लवकरच स्थैर्य प्राप्त करून लहान-लहान वसाहती निर्माण केल्या. या ठिकाणी त्यांचे कायम वास्तव्य कदाचित नसेलही, परंतु यातूनच मध्याश्मयुगीन संस्कृती उदयास आली. या आणि त्यानंतरच्या काळातील मानवी अस्थिपुरावा व त्यांची वसतिस्थाने यांचा मुबलक पुरावा भारतीय उपखंडात सापडतो.

या कालखंडामध्ये मानवी जीवनात एक क्रांतिकारक बदल झाला. जंगलामध्ये किंवा जंगलाच्या आसपास राहून शिकारी व भटके जीवन जगणारा हा माणूस आता एका ठिकाणी झोपड्या बांधून स्थिर जीवन जगू लागला. पशुपालन, शेती यांद्वारे धान्योत्पादन करू लागला. यासाठी आवश्यकता होती, ती नदीकाठच्या शेतीस योग्य व पाळीव प्राण्यांसाठी मुबलक प्रमाणात चारा मिळेल अशा भूप्रदेशाची. पूर्वी लाखो वर्षे एकाच ठिकाणी राहिल्यामुळे सभोवतालच्या परिसराशी मानवाचे शारीरिक अनुकूलन झाले होते. हेच समूह आता अन्नाच्या शोधात विखुरले गेले. शिकारी जीवनात माणसाचे पोट हातावर असे, म्हणजे रोज पोटाची खळगी भरण्यासाठी त्याला वणवण करावी लागे. शिकारीतून मुबलक अन्न मिळाले, तरी त्याचा साठा करण्याची कला त्याला अवगत नव्हती. एका ठिकाणी फार मोठ्या जमावाने राहणे शक्य नव्हते किंवा एकाच ठिकाणी फार दिवस राहणेही शक्य नव्हते. वीस-पंचविसाच्या गटांनी राहणारी व सारा दिवस अन्नाच्या शोधात असणारी ही माणसे हजारो-लाखो वर्षे जवळपास एकाच प्रकारचे साचेबंद आयुष्य जगत होती.

शेती जीवनामध्ये अन्नाचे साठे करणे शक्य झाले. हा तांत्रिक बदल इतर अनेक सामाजिक बदल घडवून आणण्यास कारणीभूत ठरला. समाजातील प्रत्येकाने अन्नासाठी वणवण करण्यापेक्षा समाजोपयोगी इतर कसब आत्मसात करून त्याबदल्यात शेतकऱ्यांकडून अन्न मिळवणे शक्य झाले. म्हणजेच स्थिर-शेतीच्या जीवनशैलीस पूरक असे अनेक जोडधंदे सुरू झाले. त्यामधून कारागीर निर्माण झाले. हळूहळू खेडी मोठी होऊ लागली. नागरी जीवनास प्रारंभ झाला. स्वतःला पुरून उरेल इतके अन्न व इतर उपयुक्त वस्तू निर्माण होऊ लागल्या. या

संपत्तीच्या संरक्षणाची गरज वाटू लागली. जवळचा अन्नाचा जास्तीचा साठा किंवा इतर मौल्यवान वा गरजेच्या गोष्टी देऊन त्या बदल्यात इतर आवश्यक गोष्टी मिळवण्याकडे कल वाढू लागला. याचा परिपाक म्हणजे मोठमोठी नगरे व व्यापारी केंद्रे उदयास येऊ लागली.

४००० वर्षांपूर्वी महाराष्ट्रात शिकारी जीवनपद्धतीपासून शेतीप्रधान स्थिर जीवनपद्धती मूळ धरू लागली होती, तर नागरी संस्कृतीची सुरुवात ही सुमारे २५०० वर्षांपूर्वीची.

शेतीप्रधान जीवनामध्ये माणूस स्थिरावल्यानंतर ज्याला आपण बलुतेदार म्हणतो, अशा कसबी लोकांचा वर्ग सर्वप्रथम निर्माण झाला असावा. यातही जीवनावश्यक गोष्टी; उदाहरणार्थ स्वयंपाकासाठी व अन्नधान्य साठवण्यासाठी मातीची भांडी बनवणारे कुंभार, पाटा-वरवंटा-जाती इत्यादी स्वयंपाकोपयोगी दगडी वस्तू बनविणारे पाथरवट, धातूची हत्यारे-वस्तू-दागिने बनविणारे कारागीर, इत्यादी प्रथम तयार झाले असावेत. त्यानंतर कालांतराने सूत बनविणारे व कपडे शिवणारे शिंपी, तेलबिया गाळणारे तेली, लाकूडकाम करणारे सुतार इत्यादी अस्तित्वात आले असावेत. याचबरोबर जंगलातून औषधी मुळ्या-पाला-फुले-फळे जमा करून औषधोपचार करणारे वैद्य व वेळप्रसंगी जादूटोण्यांवर उपाय करणारे वैदू-भगत गावोगावी तयार झाले असावेत. याचबरोबर नैसर्गिक उपलब्धतेनुसार वेताच्या, कळकाच्या वस्तू बनविणारे बुरूड किंवा जनावरांचे कातडे कमावणारे चांभार निदान काही गावांत तरी निर्माण झाले असावेत.

यानंतर विचार करावा लागेल, तो निरनिराळ्या जातींच्या उत्पत्तीचा. याचाही उगम शेती संस्कृतीशी जोडला गेला पाहिजे. ज्या लोकांनी शेतीची कला लवकर अवगत केली, त्या लोकांना आर्थिक स्थैर्य अर्थातच लवकर प्राप्त झाले. धान्याचा साठा करता येणे शक्य असल्यामुळे, आजूबाजूच्या लोकांवर त्यांचे वर्चस्व राहिले असेल. या 'श्रीमंत' लोकांनी त्यांच्या शेतीस मदतनीस म्हणून इतर लोकांना कामावर ठेवले असेल. या 'श्रीमंतां'पैकी काही शेतकरीच राहिले, तर काहींनी स्वतःची बौद्धिक पातळी वाढवली; कला अवगत केल्या, तर काही लोकांनी व्यापारावर लक्ष केंद्रित केले.

ज्यांची बौद्धिक पातळी उंच होती, त्यांना नागरी संस्कृतीची सुरुवात झाल्यानंतर वरचा सामाजिक दर्जा मिळाला असेल, तर शेतकरी व व्यापारी जनतेच्या गरजा इतर कारागिरांच्या मदतीने भागवीत असतील. थोडक्यात ज्यांनी शेतीस जितक्या लवकर सुरुवात केली, त्यांचा सामाजिक दर्जा तितका वरच्या पातळीवर राहिला असे समाजशास्त्रज्ञ सांगतात. समाजासाठी हलक्या दर्जाची कामे करणारी माणसेही या नागरी संस्कृतीमध्ये आवश्यक होती.

मुळात आपण सर्व जण उदरनिर्वाहासाठी जंगलावर अवलंबून होतो. बऱ्याच जणांनी टप्याटप्याने शेतकी जीवनपद्धती अंगीकारली. पण काही जणांना जंगलाची ओढ कायम राहिली आणि त्यांनी आपले वास्तव्य जंगलात किंवा जंगलाच्या आसपासच ठेवले. यातले काही जण रानावनांतील उपयुक्त पदार्थ, उदाहरणार्थ मध, हिरडे, कात, शिकेकाई, लाख, झाडाच्या साली, वल्कले, रबर आणि औषधी वनस्पती गोळा करून त्या नजीकच्या नागरी वसाहतीस पुरविण्याचे काम करीत. म्हणजेच जरी जीवनपद्धती भिन्न राहिल्या, तरी एकमेकांच्या सहवासाने जाति-जमाती वर्षानुवर्षे एकत्र राहिल्या आणि राहतात.

शेतीप्रधान संस्कृतीचा उगम आणि त्याचा वेगवेगळ्या जाति-जमातींच्या बांधणीमध्ये उल्लेखलेला मागील संबंध तपासण्यासाठी आम्ही एक संशोधन प्रकल्प हाती घेतला. जर वेगवेगळ्या जाति-जमाती शेतकी जीवनपद्धतीमुळे तयार झाल्या असतील, तर झाल्यास महाराष्ट्रापुरते बोलायचे झाल्यास त्याचा संबंध थेट ताम्रपाषाण युगाशी लावता आला पाहिजे. याच काळात आपल्या भागात शेतीप्रधान स्थिर जीवनाची सुरुवात झाली असे मानले जाते.

महाराष्ट्रातील ताम्रपाषाण युग सुमारे इ. स. पूर्व १६००-६०० या दरम्यान अस्तित्वात होते. हे लोक शेतीवर गुजराण करीत व त्याचबरोबर पशुपालन, मासेमारी व थोडीफार शिकारही करत असत. या युगाचा सर्वांत चांगला कालखंड इ. स. पूर्व १४०० ते ९०० वर्षे या दरम्यान समजला जातो. यानंतर मात्र या युगाचा ऱ्हास सुरू झाला व इ. स. पूर्व ६०० च्या दरम्यान ते नामशेष झाले. यासाठी पुरातत्त्वशास्त्रज्ञ मुख्यतः दुष्काळ व खालावलेली नैसर्गिक परिस्थिती ही कारणे देतात. या युगाच्या

समृद्धीकाळात शेतीबरोबर गायी-म्हशी व थोड्याफार शेळ्या-मेंढ्या पाळल्या जायच्या. तर उतरत्या काळात शेळ्या-मेंढ्यांसारख्या लहान प्राण्यांना विशेष पसंती होती. पाऊस अनियमित पडल्याने शेती फायद्याची नाही हे जेव्हा लक्षात आले, तेव्हा स्वाभाविकच जास्त संख्येने शेळ्या-मेंढ्या पाळणे हा पर्याय उपलब्ध होता. जेव्हा पशुपालनाची ही गरज प्रमाणापेक्षा जास्त झाली, तेव्हा शेती करणारे, गायी-म्हशी पाळणारे व शेळ्या-मेंढ्या पाळणारे असे निदान तीन वर्ग निर्माण झाले असावेत आणि या तिघांना एकाच गावात राहून उपजीविका करणे अवघड झाले असावे.

ताम्रपाषाणयुगीन संस्कृती पुणे, नगर, नाशिक, धुळे इत्यादी सह्याद्रीच्या पूर्वेकडील लगतच्या प्रदेशात व्यापक प्रमाणात होती. जेव्हा नैसर्गिक परिस्थिती खालावली, तेव्हा गायी-म्हशी पाळणाऱ्या गुराख्यांना सह्याद्रीकडे जाणे जास्त सोयीचे वाटले असावे कारण या भागामध्ये विपुल जंगलसंपदा शाबूत होती. शेती करणारे लोक हे होते त्याच ठिकाणी; म्हणजेच नदीकाठच्या सपाट भूप्रदेशातच राहिले, तर शेळ्या-मेंढ्या पाळणारे 'धनगर' पूर्वेकडे गेले असावेत; कारण हा भाग शेतीस फारसा फलदायी नसला, तरी या ओसाड प्रदेशातील मोजके गवत व वनस्पती शेळ्या-मेंढ्या चारण्यासाठी पुरेसे होते. या तीन गटांशिवाय काही लोक जंगली भागात स्थलांतरित झाले असावेत आणि शिकार व इतर जंगल संपत्तीवर गुजराण करत असावेत. आजमितीसही पाहिले, तर सह्याद्रीच्या डोंगरमाथ्यावर गायी-म्हशी पाळणारे विपुल प्रमाणात दिसतात; तर बारामती, फलटण-दहिवडी-सोलापूरकडे मेंढपाळ-धनगर दिसून येतात. हे तीन व्यावसायिक जरी वेगवेगळ्या भागात राहत असले, तरी स्थिर शेतकऱ्यांबरोबर त्यांचे घनिष्ट संबंध असतात आणि ते आपल्या गरजांसाठी परस्परांवर अवलंबून असतात. अगदी कातकऱ्यांसारखे गटही जंगलाच्या आसपास राहून जंगल साधनसंपत्ती शेतकऱ्यांना उपलब्ध करून देतात व त्यांच्याकडून धान्य मिळवतात. अगदी असेच संबंध ताम्रपाषाणयुगाच्या अस्ताला निर्माण झालेल्या विविध व्यावसायिक गटांमध्ये राहिले असावेत.

आश्चर्याची बाब म्हणजे कुणबी, कातकरी, वारली, महादेव कोळी, गवळी, धनगर व शेळ्यामेंढ्या पाळणारे धनगर यांच्याकरता आम्ही केलेल्या mtDNA चाचणीमध्ये कमालीचे साधर्म्य आढळले. आणि पश्चिम महाराष्ट्रातील इतर काही शेतीप्रधान जातीही मागील समूहांशी जवळचे नाते सांगतात असे आढळून आले. यावरून ताम्रपाषाणयुगीन लोकांचे ते सध्याचे वारसदार असावेत या अंदाजास पुष्टी मिळते.

आधुनिक महाराष्ट्रातील समाजगटांची जडणघडण मांडताना आणखी एका मुद्याचा विचार करायला हवा आणि तो म्हणजे उत्क्रांतीशी बोलीभाषेचा लावला गेलेला संबंध.

भारतीय मानवशास्त्रामध्ये विविध समाजघटकांचा आणि त्यांच्या बोलीभाषेचा जवळचा संबंध लावला जातो. भाषाशास्त्रानुसार देशात सुमारे ३२५ भाषा बोलल्या जातात आणि या भाषांची विभागणी चार प्रकारांत (Language Families) केली जाते: Austric (Austrasiatic), Dravidian, Indo-European and Sino-Tibetan. यांपैकी Sino-Tibetan भाषांचा प्रचार महाराष्ट्रात नाही. या चारही भाषागटांच्या उगमाबद्दल वाद आहेत आणि त्याचे पडसाद मानवशास्त्रीय संशोधनात स्वाभाविकपणे उमटले गेले. हे चार भाषागट म्हणजे चार वेगवेगळी lineages मानली गेली. Austric भाषिक लोक पासष्ठ हजार वर्षांपूर्वी, Dravidian सहा हजार वर्षांपूर्वी तर Indo-European चार हजार वर्षांपूर्वी भारतात आले असे मानले जात असे. भारतीय संस्कृतीच्या विकासामध्ये दिसणारी कोणतीही नवीन गोष्ट (उदाहरणार्थ शेतीचा उगम, पशुपालन कला, वेगवेगळ्या धातूंचा शोध व वापर इत्यादी) भाषिक लोकांच्या भारतीय उपखंडातील आगमनाशी (किंवा आक्रमणाशी) जोडली जात असे. यात कळस म्हणजे Indo-European भाषेच्या भारतीय उपखंडात झालेल्या प्रसाराचा थेट संबंध 'आर्य' लोकांच्या कथित 'आक्रमणाशी' लावला गेला.

'आर्य लोकांनी हडप्पा व मोहनजोदडो शहरे काबीज केल्यानंतर तिकडच्या आणि कालांतराने उत्तरेकडील सर्व द्रविडीअन लोकांना दक्षिणेकडे पिटाळून लावले' या प्रकारे

भाषाशास्त्रज्ञ व मानवशास्त्रज्ञ यांनी मांडलेल्या दुर्दैवी व सर्वस्वी चुकीच्या सिद्धान्ताचा जनसामान्यांवर खूप पगडा बसला. गेल्या पंचवीस-तीस वर्षांच्या पुरातत्त्वशास्त्र, मानवशास्त्र आणि अणु-जीवशास्त्र या शाखांतील संशोधनामुळे मागील सिद्धान्तांचा फोलपणा प्रकर्षाने समोर येतो. 'उच्चवर्णीय लोक विशिष्ट वंशाचे' तर इतर खालच्या दर्जाचे काम करणारे लोक विशिष्ट 'वंशाचे' अशी धारणा मनात ठेवणे चुकीचे आहे. व्यापारासाठी परकीय लोक भारतात येत होतेच पण या संबंधांना (विशेषतः आर्य लोकांच्या) आक्रमणाचे स्वरूप कधीच नव्हते हे आता सिद्ध झाले आहे.

महाराष्ट्रातील किंवा इतर भागांतील लोकसमूहांचा विकासआलेख रेखाटताना या संशोधनाचा जरूर विचार केला पाहिजे. सामाजिक विकास होताना आपण इतर संस्कृतींतील गोष्टी मोठ्या प्रमाणात आत्मसात करतो, त्याच वेळी आपल्या संस्कृतीतील गोष्टीही इतरांना नकळत देत असतो. या सांस्कृतिक गोष्टींचा संबंध शारीरिक गुणधर्मांशी लावता कामा नये. महाराष्ट्रात, दक्षिणेकडील राज्यात किंवा उत्तर भारतातही घडून आलेली शारीरिक उत्क्रांती ही त्या-त्या भागातील अगणित वर्षांच्या वास्तव्यामुळे सभोवतालच्या परिस्थितीशी अनुरूप अशी झाली आहे. कदाचित हेच कारण असेल, ज्यामुळे वेगवेगळ्या प्रदेशातील एकाच प्रकारचा व्यवसाय करणारे लोक वेगवेगळे दिसतात. गेल्या निदान काही हजार वर्षांचा सभोवतालच्या नैसर्गिक परिस्थितीशी होत असलेल्या अनुकूलनाचा हा परिणाम असावा.

मानवशास्त्रीय आणि अणुजीवशास्त्रीय संशोधनातून असे दिसून आले आहे की, गेल्या आठ-दहा हजार वर्षांमध्ये भारतामध्ये कोणतेही मोठे समूह स्थलांतरित झालेले नाहीत. याचा अर्थ लोक येत नव्हतेच असे नाही, पण येणाऱ्या लोकांची संख्या नगण्य होती. त्यांनी आपली संस्कृती इथे रुजवली असेल परंतु या आलेल्या लोकांमुळे इथल्या मूळच्या लोकांच्या शारीरिक गुणधर्मांमध्ये बदल झाला नाही.

मानवी दातांच्या अभ्यासावरून असे दिसून आले आहे की, उत्तरेकडच्या सिंधू नदीच्या खोऱ्यातील हडप्पा संस्कृतीतील लोक असोत किंवा महाराष्ट्रातील ताम्रपाषाणयुगीन लोक असोत, या दोन्ही संस्कृतींतील लोक आठ-दहा हजार वर्षांपूर्वीच्या मध्याश्मयुगीन लोकांबरोबर नाते सांगतात, पण त्यांच्या उत्क्रांतीचा एकमेकांशी काहीही संबंध नाही. या दोन्ही संस्कृतींतील उत्क्रांती स्वतंत्रपणे त्या-त्या परिसरानुरूप झाली आहे.

याच मुद्द्यावर लेखाचा शेवट करताना डॉ. घुर्ये व डॉ. इरावती कर्वे यांनी मांडलेल्या समाजशास्त्रीय सिद्धान्ताचा विचार करावा लागेल. आज ज्या अनेक जाती दिसतात, त्या 'विलगीकरणामुळे' (fission) निर्माण झाल्या की 'सल्लग्नीकरणामुळे' (fusion) ? उदाहरणार्थ 'ब्राह्मण' ही 'जात' मानली, तर कोकणस्थ, देशस्थ, कऱ्हाडे, चित्पावन इत्यादी 'पोटजाती' होतात. याचाच अर्थ ब्राह्मण या समूहाचे विलगीकरण होऊन या पोटजाती निर्माण झाल्या. हे खरे असेल, तर या 'पोटजातींतील' लोकांमध्ये शारीरिक साम्य जास्त प्रमाणात असायला हवे. भौतिक मानवशास्त्रीय अभ्यासात असे लक्षणीय साम्य आढळून आले नाही. याचाच अर्थ कोकणस्थ, देशस्थ, कऱ्हाडे इत्यादी लोक समान दर्जाचे काम करीत असल्यामुळे त्यांना 'ब्राह्मण' या एकाच वर्गात समाविष्ट केले गेले. म्हणजेच कोकणस्थ, देशस्थ, कऱ्हाडे, इत्यादी वर्गांस 'पोटजाती' न म्हणता 'जात' म्हणावयास हवे आणि 'ब्राह्मण' हा जातिसमूह म्हणून संबोधला जावा. यालाच तांत्रिक भाषेत 'सल्लग्नीकरण' म्हणतात. डॉ. कर्वे आणि त्यांच्या अनेक विद्यार्थ्यांनी निरनिराळ्या जातिसमूहांवर भौतिक मानवशास्त्रीय संशोधन केले आणि व्यावसायिक जातिसमूह निर्माण होण्यास समानता जास्त महत्त्वाची असते हे दाखविले. आज महाराष्ट्रात कमीतकमी अडीचशे जातिसमूह असावेत. आणि यांतील एकेका समूहात अनेक जाती आहेत. हे सर्व घटक वर्षानुवर्षे आपली शारीरिक आणि सांस्कृतिक वैशिष्ट्ये राखून आहेत.

* * *



चाक असलेले प्रागैतिहासिक काळातील वाहन.

# वनवासी

■ डॉ. प्रमोद वि. पाठक

भारतीय उपखंडात मानवाच्या वस्तीचे अवशेष अत्यंत पुरातन काळापासूनचे मिळतात. पुरातत्त्वीय संशोधनानुसार लाखो वर्षांपूर्वीच्या अश्मयुगापासूनचे अवशेष भारतात विस्तृत प्रदेशावर मानवी समूहांचे अस्तित्व दर्शवितात. जशी-जशी मानवी समाजाची प्रगती होत गेली, तसे-तसे त्यांचे जीवनमानही बदलत गेले. अतिप्राचीन काळात गुहा आणि शैलाश्रय (cave shelters) ह्यांच्या आधाराने राहणारा मानवी समाज हळूहळू झोपड्या बांधून आणि पाण्याच्या साठ्याच्या सभोवताली वसती करू लागला.

**सर्वच भारतीय समाज एका अर्थाने वनवासी होता. त्याच्यात जे परिवर्तन आले, त्याला सुपीक आणि समतल भूभागात वाव मिळाला म्हणून. एके काळी गंगा-यमुना खोऱ्यात वसती करून राहणारे वनवासी सिंधू संस्कृतीच्या व ऋग्वेदाच्या उत्तर काळात पूर्वेकडे पसरत जाणाऱ्या संस्कृतीचे अंग बनून गेले. त्यांनी कृषी व पशुपालन तंत्रे अवगत केली.**

अतिप्राचीन काळी सामूहिक शिकारीवर आणि वनोपार्जित वस्तूंवर आपले संपूर्ण जीवन कंठणारा समाज कृषी उत्पादन आणि पशुपालन अवस्थेत (Early agrarian and animal domestication stage) परिणत झाला. त्याला सुपीक जमिनीतून धान्योत्पादन करण्याचे तंत्र हस्तगत झाले. तसेच त्यासाठी पशूंची हत्या करून नव्हे, तर पशू पाळून चांगला उपयोग होऊ शकतो, हे लक्षात आल्याने तो समाज पशुपालनाकडेही वळला. अशा कृषी करणाऱ्या व पशुपालक समाजाची सुरुवात इ.पू.१०,००० च्या सुमारास सुरू झाली असावी, असा तज्ज्ञांचा कयास आहे. शेतीचे पीक नदीकाठी असलेल्या सुपीक जमिनीत उत्तम येते व ती जमीन शेती करण्यासाठी भुसभुशीत असते, हे लक्षात आल्याने नदीकाठच्या सुपीक जागांवर शेती करण्याची आणि त्या अनुषंगाने स्थिर जीवन जगण्याची आवश्यकता त्या प्राचीन

समाजाच्या लक्षात आली. त्याचा परिणाम म्हणून जगभरात अनेक ठिकाणी नद्यांच्या काठाकाठाने स्थिर समाज आणि त्यायोगे संस्कृती जन्माला आल्या.

भारतातही सिंधू, सरस्वती, गंगा, गोदावरी, कावेरी इत्यादी नद्यांच्या सुपीक प्रदेशात स्थिर वस्त्या वाढून वैदिक, सिंधुसंस्कृती व दक्षिणेतही संगम संस्कृती आदी प्रगत झाल्या. त्या संस्कृतींचा विस्तार हळूहळू होत गेला, तेव्हा त्या-त्या प्रदेशांत या संस्कृतींच्या सीमारेषेवर असलेल्या वनवासी समाजापर्यंत त्या प्रगतीचे वारे पोहोचले आणि कालौघात ते समाजही या संस्कृतींचा अविभाज्य अंग होऊन राहिले. मात्र काही ठिकाणी डोंगराळ व पर्वतीय क्षेत्रांत कृषी व पशुपालनाचे तंत्र पाहिजे तेवढ्या परिणामकारक रितीने पोहोचू न शकल्याने त्या क्षेत्रांमधील समाज बऱ्याच अंशी आपल्या प्राचीन जीवनशैलीला चिकटून राहिले. त्यातूनच आजच्या वनवासी समाजाचे अस्तित्व जणू अबाधित राहिल्याचे दिसून येते.

सुप्रसिद्ध गणिती आणि प्राचीन संस्कृतीचे जागतिक कीर्तीचे संशोधक डॉ. दामोदर धर्मानंद कोसंबी यांनी त्याबाबत मार्मिक अभिप्राय दिला आहे. ते लिहितात- 'In the jungle belts of central and coastal India down to the Nilgiris and Malabar are to be found other tribal remanants: Munda, Bhil, Todas, Kadar. All these are peaceful; the few occasionally turbulant ones like Santhals and Bhils were ground down long ago by Superior armaments; all are primitive. **What has fossilized them is refusal of each tiny splinter to take to regular food production to acknowledge and utilize the productive system of encircling society.** They cling desperately to primitive outward forms of superstitions weld together to the old life. (कोसंबी १९७५ : २६-२७)

भारताच्या वनवासी वसतीच्या भागांकडे पाहिल्यास असे दिसते की सह्याद्री, विंध्य, सातपुडा, अरवली; पूर्वेस हिमालय पर्वत रांगा, दक्षिणेस निलगिरी आणि मलबार या प्रदेशांतील अरण्य भागात वनवासी जातीजमाती आणि जनसमूहांचे अस्तित्व गेली हजारो वर्षे जसेच्या तसे आहे.

तसे पाहिल्यास सर्वच भारतीय समाज एका अर्थाने वनवासी होता. त्याच्यात जे परिवर्तन आले, त्याला सुपीक आणि समतल भूभागात वाव मिळाला म्हणून. एके काळी गंगा-यमुना खोऱ्यात वस्ती करून राहणारे वनवासी सिंधू संस्कृतीच्या व ऋग्वेदाच्या उत्तर काळात पूर्वेकडे पसरत जाणाऱ्या संस्कृतीचे अंग बनून गेले. त्यांनी कृषी व पशुपालन तंत्रे अवगत केली. डॉ.कोसंबी लिहितात- 'The entire course of Indian history shows tribal elements being fused into a general society. (कोसंबी, तत्रैव)

या सामाजिक अभिसरणाचे महाराष्ट्रातील उदाहरण प्राचीन काळात मिळते. मध्य महाराष्ट्रात नेवासे, इनामगाव इत्यादी ठिकाणी जे उत्खनन झाले त्यात गोलाकार घरांचे समूह, मृत बालकांचे मडक्यात दफन इत्यादी गोष्टी मिळाल्या. ह्या वसत्यांची कालगणना इ.स.पूर्व ३००० ते २००० अशी मिळते. अशाच प्रकारची घरांची-झोपड्यांची गोलाकार रचना विसाव्या शतकात चंद्रपूर जिल्ह्यातील माडिया गोंडांच्या वस्तीत आढळल्याचे ॲड. सुनील दिघे यांनी नमूद केले आहे. घनदाट जंगलात विंध्य सातपुडा पर्वतरांगांच्या आडोशाने राहणाऱ्या माडिया जनसमूहाला वस्त्र विणण्याची आणि सुईने वस्त्र शिवण्याची कला माहीत नव्हती. ते हजारो वर्षे तसेच जीवन जगत होते. (ॲड. सुनील दिघे २०००, वनवासी विकास, पृष्ठ १५६) सुमारे ५००० वर्षांपूर्वी असेच जीवन मध्यमहाराष्ट्रातील पठाराच्या भूभागातही होते. मात्र तेथे नागरी संपर्क येऊन स्थिर आणि नागरी जीवनात ते हळूहळू परिणत झाले.

### शैलाश्रय आणि गुहाचित्रांचा मागोवा

वनवासी समाज हजारो वर्षे डोंगरांतील गुहा आणि भव्य खडक ह्यांच्या आडोशाने (cave shelters) राहत



चाक असलेली प्रागैतिहासिक काळातील वाहने.

होता. त्याच्या वसतीचे चिन्ह म्हणजे त्या गुहांवर त्या वेळच्या जनसमूहांनी चितारलेली भित्तिचित्रे आहेत. सुप्रसिद्ध इतिहास संशोधक डॉ. विष्णू श्रीधर वाकणकर यांनी मध्य प्रदेशातील भीमबेटका येथील गुहाचित्रांचा शोध लावला आणि वनवासी जनसमूहांचे हजारो वर्षांच्या अस्तित्वाच्या काळादरम्यान जीवन कसे होते, यावर प्रकाश टाकला. वाकणकरांच्या शोधमोहिमेमुळे भारतीय संस्कृतीच्या इतिहासाची कितीतरी नवी विद्यादालने उघडली.

प्रा. सोनावणे यांनी भारतातील शैलचित्रांच्या शोधाचा आणि त्यातून प्रकट होणाऱ्या संस्कृतीचा आढावा नुकताच घेतला. (सोनावणे २००८, पृ.१-१३) प्रा. सोनावणेंच्या आढाव्याप्रमाणे भारतीय उपखंडात सुमारे ५००० ठिकाणी अशी शैलाश्रय चित्रे शोधली गेली असून त्यांचा काळ इतिहासपूर्व सुमारे ३०,००० पासून (भिमबेटका येथील काही शैलचित्रे) तो इतिहास काळापर्यंत विस्तारला आहे.

एके काळी भारतात शहामृगांची वसती होती. त्यांच्या अस्थींचे आणि अंड्यांच्या वरच्या कवचाचे अवशेष या शैलाश्रयांमध्ये मिळाले आहेत. त्यावरून त्या शैलाश्रयातील चित्रांची प्राचीनता लक्षात येते. जसे-जसे तिथले मानव समाज प्रगत होत गेले, तसे-तसे शैलाश्रयातील चित्रांचे विषय, शैली, इत्यादीही बदलत गेल्या. या बदलत्या जनजीवनाचा विस्तृत आलेख एरविन न्यूमेअर ह्या पुरातत्त्व संशोधकाने आपल्या लेखात घेतला आहे. (Erwin Neumayer 1991, Pp39-69) ह्या लेखात इतिहासपूर्व काळातील वाहन जोडलेल्या गाड्या आणि वाहन म्हणून वापरण्यात आलेल्या जनावरांच्या चित्रांची नोंद प्रामुख्याने केली आहे. न्यूमेअर यांनी ज्या ठिकाणची चित्रे दिली आहेत, त्यात विशेष करून महाराष्ट्राला लागून असलेल्या मध्य प्रदेश, कर्नाटक आणि आंध्र प्रदेश या राज्यांतील शैलचित्रांचा समावेश आहे (न्यूमेअर, तत्रैव, पृ. ६९).

या चित्रांमध्ये जशी शिकरीची आणि वन्य प्राण्यांची व मानवसमूहाची 'वनवासी' पद्धतीची चित्रे आहेत, तशीच नागर शैलीतील छकडे, रथ आणि हत्ती वगैरेंचीही चित्रे आहेत. ऐतिहासिक काळात जेव्हा घोड्यावर बसून युद्धे होऊ लागली आणि घोडा एक महत्त्वाचे वाहन झाले, तेव्हा तीही चित्रे त्यात येऊ लागली. या चित्रांच्या आधारे असे दिसते की, निबिड जंगलात राहणारे वनवासी नागरी जीवनाच्या संपर्कात येत होते. त्यांच्या जीवनशैलीचा जरी वनवासी जीवनावर परिणाम झाला नाही, तरी त्यांच्या कलाविश्वात नागरी जीवनाचे पडसाद उमटले. इतकेच नव्हे तर नागरी जीवनातील संस्कृती आणि देवीदेवतांचाही त्या कलाविश्वात समावेश झाला.

प्रा. सोनावणे यांनी नोंद केल्याप्रमाणे शैलाश्रय चित्रांमध्ये बलराम, कृष्ण, शिव यांच्या चित्रांचा समावेश झाला. (टिकुला येथील चित्रे) तसेच स्तूपांची चित्रेही समाविष्ट झाली. (गंभीरपुरा येथील चित्रे) (सोनावणे, तत्रैव, पृ.११) ही सर्व सांस्कृतिक चित्रे नागरी आणि वनवासी संपर्काचे इतिहासपूर्व कालापासूनचे सातत्य दर्शवितात.



**वैदिक व पौराणिक अनुबंध**

नागर जीवनापासून वेगळे अस्तित्व राखून असलेल्या व भारतात सर्वदूर पसरलेल्या वनवासी समाजाचे अस्तित्व ऋग्वेद काळापासून स्वीकारण्यात आले आहे. त्यांचे व स्थिर जीवन जगणाऱ्या वैदिक समाजाचे घनिष्ठ संबंध हे वेदांमधील सूक्तांमधून स्पष्ट दिसतात. अनेक भारतीय तसेच पाश्चात्य विद्वानांच्या मतानुसार ऋग्वेदाच्या भाषेत, वेगळ्या वंशाचे समजले गेलेल्या, मुंडा भाषेतून आलेल्या व संस्कृत रूपात परिष्कृत झालेल्या शब्दांचा समावेश आहे. ऋग्वेदाचे भाषाशास्त्र हा वेगळाच विषय असला, तरी मुंडा व इतर वनवासी भाषांमधील शब्दांचा अंतर्भाव दोन्ही जनसमूहांचा संपर्क आणि अभिसरणच दर्शवितो.

ऋग्वेदातील एक प्रमुख देवता रुद्र ही अनार्यांची का समजली जावी, हा मोठा प्रश्न आहे. यज्ञकर्मात रुद्र देवतेला आहुत्या देताना आवाहन करणारी अनेक सूक्ते ऋग्वेदात आली आहेत. ऋग्वेदात महत्त्वाची घटना म्हणून दशराज्ञ युद्धाचा निर्देश होतो. सुदास राजाने आपल्याविरुद्ध लढाईस उभ्या राहिलेल्या दहा राजांचा पराभव केला असा उल्लेख आहे (ऋग्वेद ७.८३). त्या युद्धात सुदासाविरुद्ध ठाकलेल्या शत्रुसमूहात भारताच्या पश्चिम व वायव्य भागांत वास्तव्य करीत असलेल्या पाक्थ भलानस, विषाणीन इत्यादी जनसमूहांचा समावेश होतो. हे समाज आजही त्या पर्वतीय क्षेत्रांत, पख्तून, बलुची इत्यादी नावांनी ओळखले जातात. त्यांना आजच्या भाषेत पश्चिम पर्वतीय वनवासी समाज असे म्हणता येईल. ते सर्व त्या वेळच्या ऋग्वेदकालीन समाजाचे अविभाज्य अंग होते.

वैदिक ऋषी नाभानेदिष्ट त्याला मिळालेले यज्ञातील धन घेऊन जात असताना वाटेत त्याला रुद्र आडवा आला. तो वनवासी वेशात होता. नाभानेदिष्टाला यज्ञात मिळालेल्या धनावर, त्याने आपला अधिकार सांगितला. प्रथम नाभानेदिष्टाने अज्ञानाने नकार दिला. पण त्याच्या वडिलांनी, त्या वनवासी पुरुषाचे वर्णन ऐकल्यावर तो रुद्र आहे, हे जाणून त्याचा अधिकार मान्य केला नाभानेदिष्टानेही त्यानंतर ती धनसंपदा रुद्राला देऊ केली. (ऐतरेय ब्राह्मण ५.१४). जर रुद्र हा तथाकथित अनार्यांचा देव असेल, तर यज्ञात त्या (गणां)चाही समावेश होता व यज्ञ संपल्यावर उरलेले साहित्य त्यांनी घेऊन जावे अशी परंपरा होती, हे विशेष.

वैदिक काळात सोमयज्ञ करण्याच्या वेळी सोमवल्ली गाड्यांवर रचून घेऊन येणारी व्यक्ती 'वनवासी' असे. त्याच्याकडून गाईच्या बदल्यात सोम विकत घेतला जाई. या ठिकाणी पहिली गोष्ट लक्षात येते ती म्हणजे सोमवल्लीच्या ठिकाणाचे स्थान वनवासींना निश्चितपणे माहीत होते. यज्ञासाठी गाड्यांमध्ये भरून सोम यज्ञस्थानी पोचविण्याची जबाबदारी त्यांच्याकडे असे. या पार्श्वभूमीवर त्यापूर्वी दिलेल्या भित्तिचित्रांचा उलगडा होतो. जी अनेक ठिकाणी गाड्यांची व गाडी, छकडा अथवा रथ ओढणाऱ्या प्राण्यांची चित्रे इतिहासपूर्व काळापासून काढण्यात आली आहेत, त्यांचा संबंध वर दिलेल्या वनवासी नागर संपर्काशी जोडता येतो. अर्थात 'वनवासी' समाज केवळ 'सोमवल्ली'चाच पुरवठा करत नसे तर वनौषधी, मध, लाकूड आणि अशा कितीतरी गोष्टी नागरी वस्त्यांमधून पुरवीत असे.

ऋग्वेदोत्तर म्हणजे यजुर्वेदाच्या काळातही वनवासी समाजाला सांस्कृतिक जीवनात स्थान होते. शुक्ल यजुर्वेदाच्या रुद्राध्यायात 'वनवासी' समाजाचे उल्लेख अनेक प्रकारे येतात. तेथे वनवासी समाजाला बृहत्तर नागरी समाज घटकांतील महत्त्वाचा भाग म्हणून रुद्रस्वरूपात वंदन केले आहे. मानव समूह म्हटले की जसे साहचर्य येते, तसेच

संघर्षही येतात. ज्या वेळी स्थिर जीवन जगणाऱ्या वैदिक समाजाने पर्वत-जंगलात राहणाऱ्या वनवासींच्या भूभागावर स्वामित्व प्रस्थापित करण्यास सुरुवात केली, त्या वेळी संघर्षही उद्भवले. रुद्राच्या प्रलयकारी स्वरूपात त्या उग्र स्वरूप धारण केलेल्या जनजातींचे दर्शन होते. त्यांना शुक्ल यजुर्वेदात 'गिरिशन्त', 'गिरित्र', तर त्यांच्या नेत्याचा 'गिरीश' म्हणून उल्लेख केला आहे. या वनवासी लोकांनी बाण मारून आपली हत्या करू नये, अशी रुद्राची प्रार्थना केली आहे. वनवासीचे प्रमुख शस्त्र धनुष्यबाण असे. शैलचित्रांमध्येही धनुष्यबाण घेऊन शिकार करण्याची चित्रे आहेत.

यांमिषुं गिरिशन्त हस्ते बिभर्ष्यस्तवे।
शिवां गिरित्र तां कुरु मा हिंसीः पुरुषं जगत्॥३॥
(शुक्ल यजुर्वेद १६.३)

जंगलातील वाटांची माहिती असणारे 'वनवासी' हे प्रवाशांचे मार्गदर्शक, वाटाडे असत. त्यांच्या प्रमुखाला रुद्र स्वरूपात नमन केले आहे: 'पथीनां पतये नमः'(शुक्ल यजुर्वेद १६.६४) इतकेच नव्हे तर अरण्यात राहणाऱ्या समाज पुरुषाला एकच समजून वंदन केले आहे. 'वन्याय च नमः' (शुक्ल यजुर्वेद १६.३४)

नंतरच्या पौराणिक वाङ्मयात श्रीराम आणि हनुमान यांचे जिवाभावाचे नाते आणि अतूट साहचर्य हा नागर आणि वनवासी साहचर्याचा-सहअस्तित्वाचा आदर्श ठरला. श्रीरामाने सुग्रीवाला तर राज्य मिळवून दिलेच, पण त्याला सार्वभौम राजा नियुक्त करून स्वतः पित्याच्या आज्ञेचे पालन करीत 'वनवासी' म्हणून राहणे स्वीकारले.

महाभारतात भीमाचे हिडिंबेशी लग्न, नागकन्या उलुपीचा अर्जुनाशी विवाह हे नागर व वनवासी समाजांमधील रोटी-बेटी व्यवहाराचे निदर्शक आहेत. त्यातच द्रोणाचार्य आणि एकलव्य ह्यांची कथा येते. आपल्या गुरूला गुरुदक्षिणा म्हणून हाताचा अंगठा कापून देणाऱ्या एकलव्याचे आम्ही वंशज आहोत, असे सांगणारी वनवासी जमात बाण मारताना आत्ताआत्तापर्यंत अंगठ्याचा वापर करीत नसे. वनवासी समाजातील धनुष्यबाण मारण्याच्या कौशल्याचे नागर समाजालाही कौतुक वाटत असे, ते अर्जुनाच्या किरात रूपातील शिवाबरोबर झालेल्या संघर्षात दिसते. त्या प्रसंगावर आधारित किरातार्जुनीय हे सुप्रसिद्ध नाटक संस्कृत वाङ्मयात अजरामर ठरले आहे.

भारतीय संस्कृतीचे एक महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे त्यांनी सांस्कृतिक विविधतेचा मनःपूर्वक स्वीकार केला. जशी-जशी नागर संस्कृती भारतभर पसरू लागली, तसे-तसे नागर व वनवासी समाजांमध्ये सांस्कृतिक आदानप्रदान सुरू झाले. तथाकथित अनार्यांचा देव शिव हा ऋग्वेदकालीन रुद्र स्वरूपातून शिव महादेव या स्वरूपात परिणत झाला. महाराष्ट्राच्या सीमेवर पंचमढीजवळ चौऱ्यागढच्या महादेवाच्या यात्रेला जसे नागर भाविक जातात, तसेच आसपासच्या जनजातींचे लोकही महादेवाला वाहण्यासाठी खांद्यावर त्रिशूल घेऊन 'महादेवा जातो गा' अशी हाळी देत यात्रेत सामील होतात. नागर संस्कृतीने वनवासी देवीदेवतांना आपल्या देवीदेवतांमध्ये समाविष्ट करून घेत इतिहास काळातील सर्वसमावेशक हिंदू संस्कृतीचा पाया घातला.

वनवासी जमातीचे निसर्ग-पूजक आचारही त्यांनी आपलेसे केले. इंग्रजी शासनकर्त्यांनी वनवासी संस्कृतीला नागरी-हिंदू संस्कृतीपासून वेगळे काढण्यासाठी तिला निसर्गपूजक संस्कृती animism असे संबोधण्यास सुरुवात केली. वस्तुतः फार प्राचीन काळापासून- थेट ऋग्वेद काळापासून- निसर्गातील शक्तींना देव मानून त्यांच्यासाठी यज्ञात आहुती देण्याचा प्रघात होताच. ऋग्वेदातील अग्नी, मित्र-सूर्य, पर्जन्य, वायू, अपांनपात या सर्व देवता निसर्गातील शक्तीच आहेत. फार प्राचीन काळात द्यावापृथिवी, भग, इत्यादी देवता; तसेच सिंधू, सरस्वती व इतर नद्या ह्यांची स्तुती हीसुद्धा निसर्गपूजेतच मोडते.

इ.पू.१००० वर्षांच्या सुमारास जेव्हा लोखंडाचा शोध लागला आणि त्याच्या कठीण अवजारांनी जेव्हा सुबक व भव्य मूर्ती बनविण्यास सुरुवात झाली, तेव्हा निसर्गपूजेचे मूर्तिपूजेत रूपांतर झाले. पौराणिक वाङ्मयात देव म्हणून स्वीकारले गेलेले आणि विष्णू अथवा शिवाचे अवतार मानले गेलेले स्थानिक देव, जोतिबा, खंडोबा, अनेक मातृदेवता ह्या सर्व प्रामुख्याने वनवासी व विमुक्त जातींच्या देवता होत्या. इतर सेमेटिक धर्मांनी ज्याप्रमाणे पूर्वापार संस्कृती नष्ट केल्या, त्याप्रमाणे न करता त्यांना व्यापक हिंदू संस्कृतीत सामावून घेण्यात आले. इतकेच नव्हे तर नागर

समाजाने त्यांचा स्वीकार कुलदेवता स्वरूपात केला, त्यांना कुळाचारासारख्या महत्त्वाच्या उत्सवामध्ये स्थान दिले.

अथर्ववेदात 'नग्रिका' देवीचा उल्लेख आहे. तिचे मूळ जनजातींमधील समाजांमध्ये मिळते, असे प्रतिपादन डॉ. रा. चिं. ढेरे यांनी आपल्या 'लज्जागौरी' या संशोधनपर ग्रंथात केले आहे. तसेच अथर्ववेदात आलेला 'पशुपती' (अथर्ववेद २.३४) हा महाराष्ट्र व छत्तीसगड यांच्यादरम्यान वसती करून असलेल्या गोंड जनजातींचा पूर्व देव असावा. गोंड जनजातींच्या उत्सव-वेषात कपाळावर रेड्याची शिंगे बांधण्याची प्रथा आत्ताआत्तापर्यंत होती.

### वनवासींचे सामाजिक अभिसरण

वनवासी व नगरवासी संपर्कात आल्यावर काही ठिकाणी त्यांनी एकमेकांत मिसळून जाणे अपरिहार्य होते. त्यांना हिंदू संस्कृतीने आपल्यात समाविष्ट करून घेतले. हिंदू संस्कृतीचा अविभाज्य भाग असलेली जात-संस्था त्यांच्यातही समाविष्ट झाली. जनजातींचे वैशिष्ट्य म्हणजे त्यांचे मानचिन्ह (Totem) असे. औदुंबर वृक्षाला आपल्या जनजातीचे मानचिन्ह मानणारी जनजाती गुजरातमध्ये होती. ते स्वतःला उदुम्बर म्हणवीत. त्यांचा समाज जसा खालच्या मानलेल्या जातीत समाविष्ट झाला, तसाच ब्राह्मणांमध्येही समाविष्ट झाला. भवभूती हा प्रख्यात नाटककार उदुम्बर ब्राह्मण होता. या उदुम्बर जनजातीशी एकरूपता साधणारे ब्राह्मण त्यात समाविष्ट केले गेले. त्यातून या प्रकारच्या सामाजिक अभिसरणाची व जनजातींच्या उन्नयनाची प्रक्रिया सुरू झाली, असे मत डॉ. कोसंबी नोंदवतात.

'The great Sanskrit poet Bhavabhuti was such an Udumbar Brahmin. This does not mean organisation by the Brahmins of a 'Vast Federation' but that Brahmins were adopted into the tribes or joined the tribal priesthood. This process continued down to the last century and is in fact the principal method whereby successive developing groups of *'atvika'* (living in forests) savages were enrolled as endogamons castes into general Indian Society.'' (कोसंबी १९८५:१६)

डॉ कोसंबी हे मार्क्सवादी विचारवंत होते. त्यांनी जशी या सामाजिक अभिसरणाची ग्वाही दिली आहे, तशीच ग्वाही दुसरे प्रख्यात मार्क्सवादी इतिहासतज्ज्ञ डॉ. रोमिला थापर यांनीही दिली आहे. मेवाडमधील गुहील राजघराणे हे भिल्ल जनजातीशी, मध्य प्रदेशातील चंदेला घराणे गोंडांशी व अनेक राजपूत घराणी ही (तथाकथित) अनार्य व संस्कृत भाषाबाह्य जनजातींमधून विकसित झाल्याचा दाखला श्रीमती थापर यांनी दिला आहे.

त्यांच्यातून ब्राह्मण जातीसुद्धा अस्तित्वात आल्याचा दाखला त्या देतात - The function of the caste (Puranas of various castes) is to preserve the earlier traditions as well as to link the caste with the known social hierarchy. The priests of such tribes were often given brahmin status-hence anomaly of the Abhir Brahman. (थापर १९७५:४०)

अभिर ही जशी जनजाती आहे, तसेच अभिर ब्राह्मणही आहेत. महाराष्ट्रातही थोड्या प्रमाणात त्यांचे वास्तव्य आहे. जनजाती आणि ब्राह्मण जात यांचे अस्तित्व हा थापर यांना त्यांच्या मार्क्सवादी विचारसरणीमुळे विरोधाभास वाटतो.

भारतात अनेक ठिकाणी वनवासी जनजातींची राज्ये अस्तित्वात आली. अकबराशी लढा देऊन त्यात प्राणांची बाजी लावणारी राणी दुर्गावती ही वनवासी जनजातीची होती. तिची राजधानी मध्य प्रदेशातील गढामंडळा येथे होती.

महाराष्ट्रात चंद्रपूर येथे गोंड जनजातीचे राज्य होते तर लागून असलेल्या बस्तरमध्ये भंजदेव या वनवासी राजवंशाचे राज्य होते. राज्यकर्त्या गोंडांचे वंशज स्वतःला राजगोंड म्हणवतात. महाराष्ट्राच्या पूर्व भागात चंद्रपूर, गडचिरोली, भंडारा इत्यादी जिल्ह्यांमध्ये त्यांची वस्ती आहे. पेशव्यांनी अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात त्यांच्यावर विजय

मिळवेपर्यंत ही राज्ये अस्तित्वात होती. त्यांच्यात आता आधुनिक शिक्षणाचा प्रसार होऊन डॉक्टर, इंजिनिअर व इतरही सुशिक्षितांचे प्रमाण चांगले आहे. पश्चिमेकडे ठाणे जिल्ह्यात जव्हारच्या डोंगराळ भागात मुकणे या वनवासी राजांचे राज्य होते.

वनवासी समाज हा बृहत्तर भारतीय समाजाच्या सांस्कृतिक, सामाजिक आणि राजकीय जीवनाचा अविभाज्य भाग होता. इतर समाजघटकांप्रमाणे वनवासी समाजानेही इस्लामी आक्रमणाचा प्रतिकार करून आपली अस्मिता व सांस्कृतिक अस्तित्व कायम राखले. महाराणा प्रतापसिंह ह्यांना अकबराविरुद्धच्या लढ्यात साहाय्य देणारे भिल्लच होते.

**वनवासींची उत्पादन तंत्रे व कला**

वनवासींचे नागर संस्कृतीशी ज्या ठिकाणी विशेष साहचर्य झाले नाही, त्या ठिकाणी गेली शेकडो वर्षे ते जनसमूह विकासाच्या काठावरच राहिले. त्यांच्यात पाषाणयुगीन संस्कृतीच्या परंपरा तशाच सुरू राहिल्या. चंद्रपूरच्या व बस्तरच्या जंगलात वसती करून राहिलेल्या माडिया गोडांमध्ये शिवलेले कपडे वापरण्याची प्रथा नव्हती. त्यांना सुईचा वापरही माहिती नव्हता असे दिघे नमूद करतात (दिघे, तत्रैव, पृ. १५५). अशी स्थिती सर्वच ठिकाणी नव्हती. काही भूभागांत वनवासींनी उत्पादन तंत्रे प्रगत केली आणि त्यांचा इतर नागरवासियांशी व्यापारही चालत असे.

काही जनजातींमध्ये पितळेच्या आणि तांब्याच्या वस्तू बनविण्याची तंत्रे विकसित झाली होती. भारतातील मिश्रधातू– पितळ, कांसे इत्यादी बनविण्याच्या पद्धतीचा आढावा घेणाऱ्या लेखात श्री. नवज्योत लहिरी हे परंपरेने चालत आलेल्या जनजातीच्या कलेचा निर्देश करतात (नवज्योत लाहिरी, १९९४ पुरातत्त्व, पृ.७०). काही जनजाती तांबेपितळ इत्यादी धातूंच्या टाकाऊ वस्तू वितळवून त्याच्यापासून नव्या वस्तू बनविण्याचा धंदा करीत. त्यांच्यापैकी एक शामधन झारा व त्यांची पत्नी इन्दिरा झारा यांची झालेली भेट व धातूकाम करण्याचे कसब नवज्योत लाहिरी यांनी नमूद केले आहे. मध्य प्रदेशातील रायपूर येथे झारा यांच्या जनजातीचे लोक लाहिरी यांना भेटले. ते जे टाकाऊ पितळ वापरत, त्याला ते 'फुटा पितळ' म्हणत.

बिहारच्या छोटा नागपूर भागात असुर जनजातीचे लोक थोड्या प्रमाणात पण चांगल्या प्रतीचे लोखंड बनविण्यात वाकबगार होते. लोप पावलेल्या त्यांच्या लोखंड उत्पादन तंत्राला नव्याने उजाळा देण्याचे काम बिशुनपूर येथे काम करणाऱ्या विकासभारती या स्वयंसेवी संघटनेने केले. प्राचीन काळापासून त्या भागात छोट्या-छोट्या भट्ट्या तयार करून त्यातून लोखंड गाळण्याचे काम असुर बिरजिआ जनजातीचे लोक करत असत.

बस्तरच्या भागात वास्तव्य करून असलेल्या जनजाती देवता, प्राणी इत्यादींच्या मूर्ती पितळेच्या तारांपासून बनवितात. ते त्यांचे पारंपरिक उत्पादनतंत्र आहे.

बांबूच्या वनांच्या सान्निध्यात राहत असल्याने बांबूच्या काड्या व पट्ट्या काढून त्यांच्या दैनंदिन उपयोगाच्या वस्तू, उदाहरणार्थ सुपे, टोपल्या, इत्यादी व इतर कलाकुसरीच्या वस्तू बनविण्याचा कुटिरोद्योगही या जनजाती करत असत. ३०-४० वर्षांपूर्वीपर्यंत, जेव्हा प्लॅस्टिकच्या व स्टेनलेसस्टीलच्या वस्तूंचा विशेष वापर नव्हता, तेव्हा ठिकठिकाणच्या आठवडी बाजारांमधून अशा वस्तू विकायला असत. वनवासी समाजांमध्ये धातू व इतर मौल्यवान वस्तू ह्यांचा वापर करण्याची प्रथा नसल्याने निसर्गातील पाने-फळे यांचा उपयोग शरीर सजविण्यासाठी करण्यावर भर असे. पूर्वी नमूद केलेच आहे की, वनवासी भित्तिचित्रे असलेली स्थळे भारतीय उपखंडात हजारोंच्या संख्येने आहेत. त्यामागे त्या समाजाची सौंदर्यदृष्टी दिसते.

महाराष्ट्रातही ठाण्याजवळील वारली समाजात विशेष करून झोपडीच्या भिंतीवर काही विशेष प्रसंगी, प्रथेनुसार तांदळाचे भुकटी-पीठ वापरून चित्र काढण्याची प्रथा होती व आजही सुरू आहे. या चित्रांमध्ये वनवासीच्या निरनिराळ्या दैनंदिन व्यवहारांचे चित्रण आढळते. सरळ रेषा, त्रिकोण आणि गोल या आकृत्यांचा वापर करून काढलेल्या चित्रांमध्ये काही वेळी कथानकेही गुंफलेली असतात. जव्हारजवळ राहणारे जीवा म्हशे यांच्या वारली-चित्रकलेला जागतिक पातळीवर मान्यता मिळाली आहे. भारतातही त्यांची प्रदर्शने भरली होती.

बसल्याबसल्या खास तयार केलेल्या कपड्यावर जीवा म्हशे वारली धर्तीची चित्रे काढताना प्रस्तुत लेखकाने पाहिले आहे. आतातर शहरी कलाकारही त्या पद्धतीने चित्रे बनवू लागले आहेत. यातच त्या पारंपरिक चित्रकलेचे वैशिष्ट्य दडलेले आहे.

नागर आणि वनवासी संस्कृतींचा हा महाराष्ट्रातील संगम गेल्या हजारो वर्षांच्या साहचर्याचे आधुनिक आविष्करण आहे.

वनवासी किंवा आदिवासी समाज हा भारताच्या सांस्कृतिक वारशाचे अविभाज्य अंग आहे. ज्या वेळी शहरी-नागरी समाजापासून दूर राहिलेल्या समाज घटकांना जनगणनेत स्थान देण्याची वेळ आली, त्या वेळी इंग्रजी शासकांनी त्यांच्या फोडा व झोडा नीतीला धरून वनवासींना हिंदू समाजापासून वेगळे दर्शविण्यासाठी aboriginals असे संबोधण्यास सुरुवात केली. त्या शब्दाचे भारतीय भाषांमध्ये 'आदिवासी' असे रूपांतर होऊन ते समाज आणि जमाती ह्या नागर समाजापेक्षा वेगळ्या आणि मूळ रहिवासी असून इतर समाज हा आक्रमक व नंतर स्थायिक झालेला, असा अर्थबोध होण्याची पार्श्वभूमी आपोआपच तयार झाली. भारतीय समाजात असलेल्या सांस्कृतिक एकसंधतेला तडा जावा, त्यांच्यात आपापसात दुफळी माजावी या हेतूने प्रेरित होऊन इंग्रजी शासक आणि शिक्षण रचनाकारांनी आर्यांचे आक्रमण, आर्यद्रविड भाषा-भेद, इत्यादी गोष्टी इतिहासाच्या अभ्यासक्रमात अंतर्भूत करून शिक्षण घेतलेल्या काही पिढ्यांचा बुद्धिभेद करण्याचा यशस्वी प्रयत्न केला. त्यातच नागर वस्तीपासून अलिप्त राहिलेल्या समाजामध्ये वेगळेपण जोपासण्याची खेळी या 'आदिवासी' शब्दाने केली. त्या शब्दाला योग्य तो प्रतिशब्द, ज्याने त्या समाजाचे वास्तव स्वरूप योग्य पद्धतीने दर्शविले जाते, तो 'वनवासी' शब्द आहे. प्रस्तुत लेखातील एकंदर चर्चेवरून या समाजबांधवासाठी 'वनवासी' हाच शब्द योग्य असल्याची कल्पना वाचकांना आली असेलच. तेव्हा सर्वसाधारण संभाषणात तसेच शासकीय पातळीवर प्रचलित असलेल्या 'आदिवासी' शब्दाने जे समाज आणि ज्या सांस्कृतिक परंपरा निर्देशित होतात त्यांचाच उल्लेख या लेखात 'वनवासी' शब्दाने केला आहे. त्यांचा उल्लेख Tribals किंवा जनजाती असाही होतो. महाराष्ट्रात आढळणाऱ्या भिल्ल, गोंड, माडिया, डरॉव, धोंडी, दुबळा, आंध, वारली, कोकणा, कोळी, कोलम, कातकरी इत्यादी जनजातींचा त्यात समावेश होतो.

महाराष्ट्रात साधारणपणे अकरा जिल्ह्यांमध्ये वनवासींचे प्रमाण इतर जिल्ह्यांपेक्षा जास्त आहे. ते जिल्हे ठाणे, नाशिक, धुळे, यवतमाळ, वर्धा, नागपूर, चंद्रपूर, गडचिरोली, भंडारा, बुलढाणा, नांदेड असे आहेत. त्यांत सुमारे चाळीसच्या वर वनवासी जमाती व उपजमाती विखुरल्या आहेत. एकेका जिल्ह्यात अनेक वनवासी जमातींचे वास्तव्य दिसते आणि हे गेली शेकडो वर्षे सर्वसाधारणपणे तसेच होते. महाराष्ट्रातील काही वनवासी जमातींची आणि उपजमातींची व त्यांच्या काही सामाजिक रूढींची व आचारांची माहिती येथे दिली आहे.

### गोंड

भारतातील वनवासींमध्ये सर्वांत जास्त लोकसंख्या असलेले गोंड हे वनवासी प्रामुख्याने मध्यभारतातील सर्व राज्यांमधून विखुरले आहेत. छत्तीसगड, पूर्व महाराष्ट्र, विदर्भ, आंध्र प्रदेश, ओरिसा या भागांत त्यांची वस्ती आहे. १९८१ सालच्या जनगणनेप्रमाणे त्यांची लोकसंख्या सुमारे ७४ लाख होती. ती आता १ कोटीच्या जवळपास गेली असावी. गोंड जमातीतही उपजमाती आहेत. त्यांतील 'अर्ख' ही जमात चंद्रपूर व गडचिरोली जिल्ह्यात, माडिया गोंड गडचिरोली जिल्ह्यात, राजगोंड चंद्रपूर, यवतमाळ, नागपूर, भंडारा येथे तर संझारी गोंड हे चंद्रपूर व यवतमाळ जिल्ह्यांत आढळतात. त्याशिवाय गोवारी, कोलम या उपजमातीही विदर्भाच्या पूर्व भागात आढळतात.

एके काळी मध्य भारतात गोंड राजाचे 'गोंडवन' हे राज्य होते. त्या वेळचा राज्यकर्ता समाज स्वतःला राजगोंड म्हणवून घेतो. राजगोंड हे स्वतःला इतर गोंड जमातींपेक्षा श्रेष्ठ समजतात. त्यांना राजपूत आणि ब्राह्मण हे स्वतःच्या सामाजिक दर्जात जवळचे वाटतात. अठराव्या शतकात नागपूरकर भोसल्यांनी ओरिसापर्यंत राज्यविस्तार करताना ह्या गोंड राज्यांना जिंकून घेतले होते.

राजगोंड जमात ही बरीच पुढारलेली असून त्यांच्यात शिक्षणाचे प्रमाण इतर गोंड आणि वनवासी समाजांपेक्षा जास्त आहे. त्यामुळे त्यांच्यात डॉक्टर, इंजिनिअर व इतर व्यावसायिक ह्यांची संख्या इतरांपेक्षा जास्त आहे. त्यांच्यात राजकीय नेते, उद्योजक व प्रशासकीय अधिकारीही आहेत.

आपल्या जमिनींवर मालकीहक्क सांगण्यासाठी गोंडांनी पहिला उठाव हैद्राबाद संस्थानच्या आदिलाबाद जिल्ह्यात केला. सध्या नक्षलवाद्यांचे प्रश्न याच भागात जास्त आहेत.

गोंडांच्या अनेक कुलदेवता असतात. त्यांत बडादेव सर्वांत महत्त्वाचा असून काळीमाता, नारायण देव, धुला देव इत्यादी अनेक देवतांचा समावेश होतो. चित्रकला, हस्तकला, अंगावर गोंदणे, मातीची भांडी, बांबूच्या टोपल्या इत्यादी कलापूर्ण गोष्टी करण्यात गोंड पारंगत आहेत. गोंडांनी अनेक शतकांपूर्वी स्थिर जीवनाचा अंगीकार केला. ते शेती व पशुपालन मोठ्या प्रमाणावर करतात.

### भिल्ल

उत्तर महाराष्ट्र, गुजरात आणि मध्य प्रदेश यांच्या सीमा ज्या प्रदेशांत एकमेकांना जुळतात त्या भागात प्रामुख्याने भिल्ल जमातीची वस्ती आहे. भिल्ल जमातीचे स्वतःचे गाव असते. त्याला फाल म्हणतात. त्यांच्यात विवाह करताना वेगळ्या फालांमधून वर-वधू शोधले जातात. भिल्लांसह इतर जमाती एकाच गावामध्ये वस्ती करून असतील, तर भिल्ल स्वतःचा वेगळेपणा राखून असतात. भिल्लांमध्ये पालिया भिल्ल स्वतःला शुद्ध समजतात तर कालिया भिल्लांना ते खालच्या दर्जाचे मानतात.

भिल्लांमध्ये पुरुषप्रधान समाजव्यवस्था आहे. प्रमुखाला गामेटी, मुखीया अथवा पटेल म्हणतात. गामेटी हे ग्रामश्रेष्ठीचे स्थानिक रूप आहे. त्यांच्याकडे गावातील भांडणतंटे मिटवण्याचे व जमातीचे भगतपणाचे काम असते. निर्णय करणाऱ्या वृद्धांच्या पंचायतीचा तो प्रमुख असतो.

महाराष्ट्रात भिल्ल जमात धुळे, नंदुरबार, नाशिक, जळगाव, नगर, इत्यादी जिल्ह्यांत आढळते. त्यांच्यात गडासिया, ढोली, डुंगरी, मेवाती, रावल, तडवी, इत्यादी उपजमाती आहेत. यांतील तडवी ही जमात प्रामुख्याने हिंदू-मुस्लीम मिश्र समाजव्यवस्थेतील असल्याने ठळकपणे वेगळी विभागली जाते. त्यांच्यात हिंदू व मुस्लीम असे दोन्ही रितीरिवाज पाळण्याची प्रथा आहे. १९७० च्या दशकात धुळे जिल्ह्यात भिल्ल जमातींनी जमिनींची व वनांची मालकी या संदर्भात लढा दिला होता.

भिल्लाला ही वेगळीच जमात भिल्ल आणि राजपूत संपर्कातून झाली असून, इतिहास काळात मोगल सैन्याबरोबर उत्तरेतून दक्षिणेत येणाऱ्या राजपुतांच्या सहवासामुळे अनेक हिंदू प्रथा व देवतांचे पूजन इत्यादी त्यांच्यात प्रचलित झाले आहेत. ते पूर्वापारच्या वाघादेव, बडा देव इत्यादी देवतांबरोबरच हनुमान, गणेश, महादेव इत्यादींचीही पूजा करतात. त्यांची वस्ती धुळे व जळगाव जिल्ह्यांत आढळते. त्यांच्यात अहिराणी भाषा बोलली जाते. राजपूत संपर्कामुळे त्यांची आडनावेही सूर्यवंशी, जाधव, पवार इत्यादी असतात.

### धोडी व दुबळा

या दोन वनवासी जमाती महाराष्ट्राच्या व गुजरातच्या सीमा एकत्र येतात तेथे व दादरा-नगरहवेली या केंद्रशासित प्रदेशांत आढळतात. धोडीया व दुबळा हे वनवासी शेतकरी व शेतमजूर आहेत. ठाणे जिल्ह्यातील तळासरी व डहाणू या भागांत धोडीया व दुबळा जमातींची वस्ती आहे. ह्या दोन्ही जमाती द्विभाषिक - मराठी व गुजराती आहेत. या दोन्ही जमातींत एकपत्नी प्रथा आहे मात्र पुनर्विवाह व घटस्फोट हेही होतात. दोन्ही जमातींत मृतांचे दहन केले जाते आणि हाडे नदीत टाकतात. त्यानंतर बाराव्या दिवशी मृताच्या नावे दिवस साजरा करण्यात येतो. या दोन्ही जमातींमध्ये वाघ देवी, केशरी देवी या देवतांबरोबरच हनुमान, अंबामाता, महालक्ष्मी देवी, जलाराम बापा इत्यादींचीही पूजा करण्यात येते. या दोन्ही जमातींमध्ये शिक्षणाचे प्रमाण वाढत असून त्यांच्यातील काही लोक प्रशासकीय अधिकारी, डॉक्टर, इंजिनिअरसुद्धा झाले आहेत.

### वारली-कातकरी

ह्या दोन्ही जमाती प्रामुख्याने ठाणे जिल्ह्याच्या उत्तर भागात राहतात. वारली जमातीत चार टोळ्या - सुधा, मुरडे, डावर आणि निहीर - आहेत. त्यांच्यात सुमारे दोनशे कुळे

आहेत. त्यांच्यात एकपत्नीत्व रूढ आहे आणि वधूची किंमत मोजली जाते. कातकरी जमातीत दोन उपजमाती- सोनकातकरी व ढोर अथवा धेड कातकरी आहेत. सोनकातकरी स्वतःला उच्च वर्गाचे समजतात. त्यांच्यात पवार, हिलम, वाघमारे अशी आडनावे असतात. कात (विड्याच्या पानात वापरला जाणारा) तयार करण्याचा परंपरागत व्यवसाय करणारे ते कातकरी. ह्या दोन्ही जमातींचे लोक मांसाहारी असले, तरी वारली लोक गायी-म्हशीचे दूध पीत नाहीत. ते बछड्यासाठी आहे, असे ते मानतात. वारली लोककलेला, विशेषतः वारली चित्रकलेला आता जागतिक पातळीवर वेगळ्या शैलीची चित्रकला म्हणून मान्यता मिळाली आहे.

**संदर्भ :**


१. कोसंबी दामोदर धर्मानंद
(1975) *An Introduction to the Study of Indian History,* Popular Prakashan, Mumbai, 1993 reprint.

२. कोसंबी दामोदर धर्मानंद
(1985) Cormbined Methods in Indology in *History and Society: Problems of Interpretation'* Ed. A.J.Syed, Dept. of History, Univervity of Mumbai 1989 reprint Pp.1-25.

३. थापर डॉ. रोमला
(1975) *The Past and the Prejudice,* National Book Trust, New Delhi Vol.II Pp 61-69.

४. दिघे, सुनील
(२०००) रानटी कोण? सुसंस्कृत आदिवासी का निष्ठुर नागरी संस्कृती? 'वनवासी विकास: संकल्पना आणि दिशा' संपादक डॉ.प्रभा आपटे आणि संजय तांबट, प्रकाशक- वनवासी कल्याण केन्द्र, मुंबई.

५. न्यूमेअर इरविन
Neumayer Erwin (1991) Wheeled Vehicles and Mounted Animals in Prehistoric Rock Art, in *Man And Environment,* Vol. XVI (2) Pp 39-69.

६. लहिरी नवज्योत
(1995) The Alloying Traditions of Protohistoric and Historic India: Some General Trends and their Ethnographic Dimensions, Puratattva No.25 Pp 64-73.

७. सोनवणे व्हि. एच.
(2008) Rock Art of India : A Histroical Perspective, *Man and Environment* Vol. XXXIII No.1 Pp 1-13.

८. डॉ. गिरधारी भास्कर
आरसा-आदिवासी जीवन शैलीचा, प्रकाशक-पूजा कम्प्युटर्स, नाशिक, प्रकाशन वर्ष २००३.

९. डॉ. सांगवे विलास
आदिवासींचे सामाजिक जीवन, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, प्रकाशन वर्ष १९७२.

१०. डॉ. गारे गोविंद
महाराष्ट्रातील आदिवासी, प्रकाशक-आदिवासी संशोधन प्रशिक्षण संस्था, पुणे, प्रकाशन वर्ष १९८८.

११. देवगावकर शैलजा
वैदर्भीय आदिवासी जीवन संस्कृती, प्रकाशक-श्री. मंगेश प्रकाशन, प्रकाशन वर्ष-१९८९.

१२. पं. जोशी महादेवशास्त्री, संपादक
भारतीय संस्कृती कोश, पुनर्मुद्रण १८८७, पुणे.


* * *



# भटके-विमुक्त

■ डॉ. प्रमोद वि. पाठक

**म**हाराष्ट्र शासनाने ज्या समाजाची वर्गवारी भटके-विमुक्त समाज अशी आता केली आहे; त्यात अनेक जाती, जमाती आदी जनसमूहांचा समावेश होतो. ह्या छोट्या जनसमूहांची संख्या काहींच्या बाबतीत काही हजारांत मोडत असली, तरी त्या जनसमूहांनी आपली सांस्कृतिक वैशिष्ट्ये जपून आपले वेगळेपण जोपासले आहे. प्रस्तुत लेखनात प्रामुख्याने आढळणाऱ्या काही भटक्या-विमुक्त समाजांचा निर्देश आणि त्यांच्या काही प्रथांचा मागोवा घेण्याचा प्रयत्न केला आहे.

१८५७च्या स्वातंत्र्यसमरानंतर भारतात इंग्रजांचे शासन स्थिर झाल्यावर, शासकीय कामात सोयीचे व्हावे यासाठी त्यांनी येथील समाजांचे वर्गीकरण करून त्यांच्या वैशिष्ट्यांची नोंद करण्याचे काम सुरू केले, तसेच भारतात जनगणना घेण्याचा दशवार्षिक कार्यक्रम राबवायला सुरुवात केली. त्या वेळी नगरे आणि खेडी यांत सुस्थापित आणि स्थिर असलेल्या समाजांबरोबरच सदैव भटकंती करणारे अस्थिर समाजही आढळून आले. त्यांच्या 'कायदा आणि सुव्यवस्था' प्रस्थापित करणे, या धोरणाला विरोध करणाऱ्या या अस्थिर असलेल्या समाजांचीही त्यांना नोंद घ्यावी लागली. त्यातूनच भटके गुन्हेगार समाज असे सरधोपट वर्गीकरणही शासकीय व्यवहारात नोंदले जाऊन काही समाजांवर गुन्हेगारीचा जन्मजात शिक्का पडून त्यांचे दुष्परिणाम

**वस्तुतः आज भटके आणि विमुक्त समजले जाणारे समाज बृहत्तर हिंदू समाजजीवनाचे अविभाज्य अंग होते. या प्रत्येक समाजाची काही वैशिष्ट्ये होती. त्यांचा उपयोग स्थिर समाजाला होत असे. त्यांच्या कामाचा मोबदलाही त्यांना मिळत असल्याने ही देवाणघेवाण शेकडो वर्षे सुरू होती. त्यांची प्रत्येकाची जात-जमात वेगळी होती, तरी वांशिकदृष्ट्या त्यांना वेगळे काढले जात नव्हते.**

शे-सव्वाशे वर्षांनंतरही त्या समाजांना भोगावे लागत आहेत. ही वस्तुस्थिती दुर्दैवाने आजच्या शासनव्यवस्थेतही अनुभवाला येते.

इंग्रजांच्या शासन काळात, इंग्रजी अधिकाऱ्यांनी स्थानिक समाजाशी कसे वागावे, त्यांचे सामाजिक व्यवहार समजून घ्यावे. यांसाठी जाती-जमातींचा आढावा घेणारा एक बृहद् कोश इंग्रजांनी निर्माण केला. तो अभ्यासकांना आजही उपयोगी पडतो. रिस्ले यांच्या 'Casts and Tribes in India' ह्या कोशाचा उपयोग संशोधक-अभ्यासकांना आजही होतो. अर्थात केवळ एका बृहद्कोशात सर्वच माहिती गोळा होणे शक्य नव्हते. त्यामुळे अभ्यासकांनी नंतरही प्रदेशवार कोश तयार केले. त्यात थर्स्टन यांचा 'Casts and Tribes of Southern India' रसेल आणि हिरालाल ह्यांचा Casts and Tribes of the Central Provinces of India' एन्थावेन यांचा The Tribes and Casts of Bombay' असे अनेक प्रदेशवार कोशही निर्माण झाले. त्यांच्याच पावलावर पाऊल ठेवून भटक्या व विमुक्त जमातींचा अभ्यास करून त्या जमातींवर गेल्या ३-४ दशकांत मराठीतून लिखाण करण्यास सुरुवात झाली. प्रस्तुत आढाव्यात इंग्रज राज्यकर्त्यांनी घालून दिलेला पायंडा अथवा नंतरच्या अभ्यासकांनी त्याच धर्तीवर केलेल्या लेखनातील एकसुरीपणा टाळून नवा दृष्टिकोन मांडण्याचा प्रयत्न केला आहे.

महाराष्ट्रापुरते बोलायचे, तर महाराष्ट्रातील जाती-जमातींचे सामाजिक आणि वंशशास्त्रीयदृष्ट्या अध्ययन करून इंग्रजांनी रुजविलेल्या समजांना धक्का देणारे निष्कर्ष काढणाऱ्या संशोधकांत प्राचार्य घुर्ये, प्रा.इरावती कर्वे आदींचा समावेश होतो. त्यांच्या अभ्यासाच्या फलस्वरूप एक नवीन विद्या-शाखाही अस्तित्वात आली. ती वांशिक पुरातत्त्व (Ethno-Archaeology) ही विद्याशाखा आहे. पुण्याच्या डेक्कन महाविद्यालयात काम करणाऱ्या प्रा. मालती नागर यांनी या विषयात अधिक रस घेऊन आपल्या सहकाऱ्यांच्या साहाय्याने तिला एक व्यापक स्वरूप दिले. या विद्या-शाखेत समाजांच्या नागरी-स्थिर समाजाबाहेर जीवन जगणाऱ्या आणि हळूहळू लोप पावणाऱ्या जीवन-पद्धतींचा अभ्यास करण्यावर भर दिला जातो. भटक्या व विमुक्त समाजांची स्पष्ट कल्पना येण्यासाठी वांशिक पुरातत्त्वीय अभ्यासाच्या आधारे त्या समाजांकडे पाहण्याची आवश्यकता आहे.

वस्तुतः आज भटके आणि विमुक्त समजले जाणारे समाज बृहत्तर हिंदू समाजजीवनाचे अविभाज्य अंग होते. या प्रत्येक समाजाची काही वैशिष्ट्ये होती. त्यांचा उपयोग स्थिर समाजाला होत असे. त्यांच्या कामाचा मोबदलाही त्यांना मिळत असल्याने ही देवाणघेवाण शेकडो वर्षे सुरू होती. त्यांची प्रत्येकाची जात-जमात वेगळी होती, तरी वांशिकदृष्ट्या त्यांना वेगळे काढले जात नव्हते. इंग्रजांच्या आगमनानंतर प्रथम आर्य-अनार्य, आर्येतर असे फरक करण्यास त्यांनी सुरुवात केली. नंतर तर ज्या जमातींचा उद्योगधंदा नष्ट झाला, व ज्यांना नव्या व्यवस्थेत सामावून न घेता आल्यामुळे उपजीविकेसाठी दरोडे घालणे, चोऱ्या करणे असे निरुपायाने करावे लागले, त्या सर्वच्या सर्व समाजांना गुन्हेगार समाज असे ठरवून त्यांच्या डोक्यावर पोलिसी दंडुक्यांची आणि अवहेलनेची टांगती तलवार ठेवण्यात आली. इंग्रजांचे मुलकी आणि कर आकारणीचे धोरण याला कारणीभूत होते. आजच्या वर्गीकरणाप्रमाणे महाराष्ट्रात भटके-विमुक्त समाजवर्गात येणाऱ्या समाजांमध्ये बंजारा, बेरड, कंजारभाट, कैकाडी, मांग, गारुडी, पारधी, भामटा, माकडवाले, गोपाळ, चित्रकथी, जोशी, धनगर, वडार तर शेजारच्या गुजरात राज्यात आढळणारे रबारी असे समाज अंतर्भूत होतात. या लोकांनी प्रस्थापित गावगाड्यास उपयुक्त ठरतील असे पूरक उद्योग जोपासले होते.

### सामाजिक वर्गीकरण

प्रस्तुत लेखकानुसार ह्या भटक्या आणि विमुक्त जमातींचे महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे त्यांचे सतत बदलत राहणारे निवासस्थान होय आणि त्यावरून त्यांचे वर्गीकरण निश्चित करण्यात आले आहे. या जमाती गेली शेकडो वर्षे फिरत्या राहिल्या आहेत. भटकंती करताना त्यांनी काही उद्योग आत्मसात केले आहेत. त्यांच्या ह्या विशेष उद्योगांचे

गावगाडा ओढण्यात महत्त्वाचे योगदान होते. प्रस्तुत लेखक त्यांचे ढोबळमानाने दोन भागांत वर्गीकरण करतो.

१) उत्पादक आणि पर्यावरण जतनाचे काम करणारे जनसमूह.

२) रंजक आणि कलाकौशल्याचा उपयोग करून उपजीविका करणारे जनसमूह.

या समाजांचा स्पष्ट उल्लेख संत एकनाथांच्या वाङ्मयात अनेकदा आला आहे. नाथांनी जरी त्यांच्या व्यवहाराला आध्यात्मिक पातळीवर नेऊन ठेवले, तरी त्या अभंगांमधून त्यांच्या नित्य उपजीविका आणि नित्य व्यवहार यांवर प्रकाश पडतो.

उत्पादक आणि पर्यावरणीय संतुलन राखण्याच्या कक्षेत येणारे समाज बंजारा किंवा लमाण, बेरड, पारधी, छप्परबंध इत्यादी आहेत. बंजारा किंवा लमाण या समाजांचे महत्त्वाचे काम म्हणजे धान्य, दैनंदिन खाण्याच्या वस्तू आणि दारूगोळा ह्यांची दूरवर ने-आण करण्याचे असे. पूर्वीच्या काळी मोहिमेवर निघालेल्या सैन्याला रसद पुरवठा करण्याचे महत्त्वाचे काम हे बंजारा जनसमूह करत असत. त्यांचे तांडे बैलांवर धान्य लादून आपल्या परिवारांसह प्रवास करत असत. त्यांची अधिक माहिती मोतीराज राठोड यांच्या 'तांडा संस्कृती' या मिळते. त्यांच्या ग्रंथात सहकार्याशिवाय कुठल्याही सैन्याची मोहीम फत्ते होणे शक्यच नसे. इंग्रजी राज्यव्यवस्थेत सैन्याच्या देशांतर्गत मोहिमाच लयाला गेल्या. रेल्वेसारखी दळणवळणाची साधने आल्याने बंजारा जमातींचे; शेकडो वर्षे चालू असलेले; धान्य, दारूगोळा इत्यादींची वाहतूक करण्याचे काम ठप्प झाले. एके काळी फिरतीवर राहणारे, हजारो बैल आणि जनावरे बाळगणारे लोक स्थिर होताना मात्र आपली आर्थिक स्वतंत्रता गमावून बसले. ते हालाखीचे जीवन जगू लागले.

असाच प्रकार पारधी, बेरड, रामोशी इत्यादी समाजांच्या बाबतीतही घडला. एके काळी वन्य प्राण्यांची शिकार करण्यात निष्णात असणारे पारधी गावाला लांडगे, कोल्हे इत्यादींचा उपद्रव जास्ती होऊ लागला की गावकीकडून खास बोलविले जात. ते आपल्या जथ्यासह येत आणि गावाच्या बाहेर जंगलात पाल ठोकत. आपले पारंपरिक कसब वापरून ते कोल्ह्यालांडग्यांचा उच्छाद



मरीआईवाला

कमी करत. त्याच वेळी जंगलात मिळणारा रानमेवा, मध, वनौषधी इत्यादींचीही ते गावात विक्री करत. एकीकडे जैविक पर्यावरणीय संतुलन (Bio Environmental Balance) संभाळणे आणि वनोपर्जित उपयोगी वस्तू (Forest Products) नागरी वस्तीत उपलब्ध करून देणे, असा या लोकांचा उत्पादक जीवनक्रम होता. जंगले नष्ट झाली, जंगलांवर शासकीय मालकी येऊन त्यांना वनोपर्जित वस्तू घेण्याची उजागरी न राहिल्याने काही लोकांनी ते कसब वापरून दरोडे घालणे, छोट्या-मोठ्या चोऱ्या करणे असा मार्ग स्वीकारला.

मेंढपाळ असणारे धनगर तर प्रत्येक गावाला आपल्या गावात विशेषतः शेतात यावेसे वाटत. त्यांच्या शेळ्यामेंढ्यांना शेतात २-३ दिवस बसवून ठेवत व चरू देत. सर्वभक्षी असलेली ही जनावरे निरनिराळ्या प्रकारचे तण खाऊन नष्ट करीत तर त्यांच्या लेंड्यांचे उत्तम खत होऊन ते पिकांसाठी उपयुक्त ठरे.

महाराष्ट्रात ज्ञात असलेल्या कैकाडी जमातीचा उल्लेख व त्यांच्या जीवनक्रमाची प्राचीन माहिती 'पद्मावती परिणय' या



नंदीबैलवाला

ग्रंथात मिळते. ही जमात शिकार करत असे व फावल्या वेळात राळ्याची तसेच साळीसारख्या वरकड धान्याची शेती करत असे. त्यांच्यात जंगले जाळून शेती करण्याची प्रथा होती. त्याचबरोबर लोक वेळू, फोक इत्यादींपासून पाट्या, टोपल्या, दोर वळणे इत्यादी नित्योपयोगी वस्तूंचे उत्पादन करून गावात विकत.

वरील सर्व उदाहरणे लक्षात घेता भटक्या समाजांच्या उत्पादक कौशल्यांचा उपयोग गावातील लोकांना वारंवार होत असे. त्यांचे जीवनही त्यातून एकमेकांवर अवलंबून असे.

भटक्या जमातीत येणाऱ्या दुसऱ्या वर्गात चित्रकथी, चारण भाट, नंदीबैलवाले, जोशी, माकडवाले इत्यादींचा समावेश होतो. या जमातींचा वावर प्रामुख्याने खेडी आणि त्यापेक्षा जरा जास्त लोकवस्ती असणाऱ्या गावांमधून असे. मोठ्या शहरांमधून त्यांची संख्या कमीच होती. याचे मुख्य कारण खेड्यांत आणि गावांत मनोरंजनाची आणि निरोपाची व दळणवळणाची साधने यांची कमतरता असे. अशा वेळी माकडवाले, गारुडी, नंदीबैलवाले असे काही वैशिष्ट्यपूर्ण मनोरंजनाचे प्रकार गावांत घेऊन येणारे फिरस्ते त्या-त्या दिवसांपुरते पूर्ण गावाचे मनोरंजन करीत, त्याचबरोबर माकडांनी गावात उच्छाद मांडला असेल अथवा सर्प, नाग इत्यादी पकडायचे असतील, तर तीही कामे करीत. कुडमुडे जोशी जसे भविष्य सांगत तसेच एका गावातील समाचार दुसऱ्या गावात पोचवीत. अनेकदा सोयऱ्यांच्या कुटुंबात घडलेली बातमी या जोशी मंडळींतर्फे अथवा नंदीबैलवाल्यांतर्फे दुसऱ्या गावी दिली जाई. समोरच्याला रुचेल असे भविष्य सांगतानाच त्याची इतर माहिती काढून घेऊन ती दुसरीकडे वापरून आपली छाप पाडण्याचा उद्योगही ही मंडळी करत. गावाची मानसिकता निरोगी राखण्याचे काम हे समाज करत असत. त्यामुळे खेड्यांमधून व गावागावांमधून त्यांची वाट पाहिली जात असे. त्यांच्या सेवेचा मोबदला धनधान्य गया स्वरूपात देऊन गावातील लोक त्यांचा कृतज्ञतापूर्वक योग्य आदर करीत.

नव्या औद्योगिकीकरणाच्या आणि तंत्रप्रगतीच्या काळात त्यांच्या या सर्व उपयोगी पडणाऱ्या कौशल्यांना वाव राहिला नाही. स्थिर समाजांना मालकी मिळकतीचे जे उपजत ज्ञान मिळते, ते फिरते राहिल्यामुळे त्यांना मिळाले नाही. त्यामुळे एकाएकी जीवनाधार सुटल्याप्रमाणे त्यांची स्थिती झाली. तसेच स्थिर समाजव्यवस्थेत राहण्याची सवय नसल्याने तीत सामावताना, इतर समाजांशी मिळवून घेताना त्यांना जड गेले आणि आत्ताही जड जाते आहे. त्यातच गुन्हेगारीचा शिक्का बसल्यामुळे सतत संशयी दृष्टीने पाहणाऱ्या समाजात मिसळताना हे समाज मानसिक घुसमट अनुभवत असतात.

### विमुक्त समाजांची वैशिष्ट्ये

महाराष्ट्रातील भटक्या व विमुक्त समाजांच्या बाबतीत विचार करताना असे दिसते की, महाराष्ट्रात उत्तर आणि दक्षिण अशा दोन्हीकडून आलेल्या समाजांचा आणि जाती-जमातींचा समावेश होतो. गेल्या शेकडो वर्षांच्या काळात उत्तरेकडून येऊन आता महाराष्ट्रात स्थिर झालेल्या समाजांमध्ये बंजारा, लमाण अथवा लंबाडी, छप्परबंद, कंजारभाट इत्यादी जमातींचा समावेश होतो; तर बेरड, रामोशी, वडार, कटबू, कैकाडी इत्यादी दक्षिणेतून आलेल्या जमातींचा समावेश येतो.

या सर्व समाजांची स्वतःची अशी सांस्कृतिक ओळख भारतीय परंपरेशी जुळलेली आढळते. प्रत्येक जमात कोणत्या ना कोणत्या स्वरूपात स्वतःला प्राचीन परंपरेशी जोडताना दिसते; उदाहरणार्थ बंजारा, कंजारभाट, पुण्याच्या आसपास राहणारे भामटे समाज स्वतःला राजपूत वंशाचे

समजतात, तर रामोशी स्वतःला रामवंशी म्हणवितात. 'रामोशी' हा रामवंशी शब्दाचा अपभ्रंश आहे, असे म्हणतात. ही लढवय्यी जमात किल्ल्यांच्या रक्षणाचे व पहारा देण्याचे काम करीत असे. कैकाडी जमातीचा उगम तामिळनाडूतील कुरव अथवा कोरवा या आदिम जातीपर्यंत जातो. प्राचीन भारतीय वाङ्मयातील निषाद, किरात, शबर इत्यादी जमातींचे लोक ह्या कैकाडी समाजाचे पूर्वज होते. त्यांचे उल्लेख अनेक प्राचीन ग्रंथांमधून येतात. महाभारत आणि किरातार्जुनीय यांत महादेवाने अर्जुनाची परीक्षा घेण्यासाठी किराताचा वेष घेतल्याची कथा आहे. लमाण, वंजारी स्वतःला वाली आणि सुग्रीव यांचे वंशज मानतात. मातंग समाजाची देवता मातंगी ही आदिशक्तीचे एक स्वरूप म्हणून पुराणात वर्णिली गेली आहे. तीच कोल्हापूरची अंबाबाई आहे. एके काळी कोल्हापूर परिसरात मातंगांचे राज्य होते. मांग, मातंग समाजाचे लोक स्वतःला राज्यकर्ते समजतात. मथितार्थ असा की, या भटक्या-विमुक्त जमाती अस्थिर असल्या, तरी फार प्राचीन काळापासून त्या भारतीय हिंदू परंपरेचा व संस्कृतीचा वारसा घेऊन आपले जीवन कंठत होत्या. याचा दुसरा महत्त्वाचा दुवा म्हणजे त्यांच्यामध्ये चालू असलेल्या सामाजिक परंपरा आहेत.

### भारतीय परंपरांचे पालन

विवाह ही समाजजीवनातील महत्त्वाची घटना आहे. नवरदेव आणि नवरी यांचे नाते कोणत्या आधारावर ठरवावे, याचे ठोकताळे भारतीय परंपरेत हजारो वर्षांपूर्वी निश्चित केले आहेत. भटक्या-विमुक्त जमाती एकाच आडनावाच्या दोन कुळांमध्ये विवाहसंबंध घडवून आणत नाहीत. ही प्रथा बंजारी, लंबाडी, राजपूत भामटे, टकारी भामटे इत्यादी समाजांमध्ये पाळली जाते. कैकाडी समाजात तर सगोत्री विवाह करणाऱ्या पुरुषाला शिक्षा केली जाते[१] ही स्थिर समाजातील गोत्रव्यवस्थेशी समांतर व्यवस्था आहे.

या समाजांमध्ये देवी-देवतांची पूजा होत असते आणि जे सण पाळले जातात, ते सर्व हिंदू परंपरेचा भाग आहेत. बेरड जमातीचे लोक व्यंकटेश, मारुती, दुर्गव्वा, यल्लमा, इत्यादी देवतांची पूजा करतात; महाराष्ट्रातील अंबाबाई, जोतिबा, खंडोबा यांच्या जत्रेत सामील होतात. कंजार-भाटामध्ये रामदेवपीर, दुर्गामाता, कालीमाता इत्यादी देवतांच्या चांदीच्या मूर्ती बनवून त्यांची पूजा केली जाते. दक्षिणेतील प्रमुख देव मुरुगन याने कुरवकन्या वल्लीशी लग्न केले म्हणून दक्षिणेतील कोरवा त्याला जावई मानून पूजा करतात तर महाराष्ट्रातील कैकाडी खंडोबाला जावई मानतात. पारधी जमातींतील काही उपजमातींत भवानी मातेची चांदीची मूर्ती करून तिची पूजा केली जाते. हे सर्व विमुक्त समाज हिंदू परंपरांशी अविच्छिन्नपणे जोडले गेले आहेत. ते भारतीय सणही साजरे करतात. होळी, दसरा, दिवाळी या सणांच्या वेळी देवांना बळी देणे; नैवेद्य अर्पण करून स्वतः नंतर खाणे; अनेक स्थानिक देवतांच्या जत्रांना न चुकता जाणे आणि तेथे भरणाऱ्या जातपंचायतीच्या कामात सहभागी होणे; ह्या परंपरा त्यांच्यात शेकडो वर्षांपासून सुरू आहेत.

नागरी हिंदू परंपरांची दुसरी वैशिष्ट्येही त्यांतील अनेक समाज कसोशीने पाळताना दिसतात. नवजात शिशूचा जन्म झाल्यानंतर विटाळ पाळण्याची नागर प्रथासुद्धा ह्या विमुक्त जमाती पाळताना दिसतात. वंजारा जमातीमध्ये बाळंत झालेली स्त्री पाच दिवस विटाळ पाळते. बेरड जमातीतही बाळ जन्मल्यानंतर पाच दिवस विटाळ पाळण्यात येतो. काही ठिकाणी पाचव्या दिवशी पाचवीची पूजा केली जाते. कंजार-भाट जमातीत मूल जन्मल्यावर बाळ-बाळंतिणीला सहाव्या दिवशी आंघोळ घालून शुचिर्भूत केले जाते, मात्र सव्वा महिना विटाळ पाळला जातो. कैकाडी जमातीतही पाचव्या दिवशी पाचवीची पूजा केली जाते. ही पूजा स्त्रिया न करता, त्या जातीतील पुरुष जंगलात जाऊन करतात. मांग-गारुडी समाजात बाळंतिणीचा विटाळ सव्वा महिना पाळला जातो तर मासिक पाळीच्या वेळी पाच दिवसांचा विटाळ पाळतात.

ब्राह्मण, मराठ्यांप्रमाणेच राजपूत भामटे, रामोशी इत्यादी जमातींमध्ये लग्नाच्या वेळी देवक ठेवण्याची चाल आहे. हिंदू विवाह पद्धतीत हळदीचे महत्त्व आहे. नवरा-नवरीला हळद लावण्याची प्रथा या समाजांमधूनही कसोशीने पाळली जाते. अनेक विमुक्त जमातींची लग्ने ब्राह्मणांच्या हस्ते लावली जातात.

मर्तिकांचे विधी करताना थोडासा फरक जाणवतो, तो म्हणजे काही जमातींत जाळण्याऐवजी पुरण्याची प्रथा आहे. तेवढा फरक सोडल्यास मृत माणसाच्या नावे उपचार पाळणे, जात बांधवांना जेवण देणे ह्या प्रथा नागर समाजांप्रमाणे या सर्व भटक्या-विमुक्त समाजांतही प्रचलित आहेत.

या सर्व जमातींची स्वतःची वेगळी न्यायव्यवस्था परंपरेने अस्तित्वात होती. अस्थिर जीवन जगत असल्याने कोणी समाजघटकाने दुसऱ्यावर अन्याय केला, विशेषतः विवाहसंबंधात रीतिबाह्य वर्तन केले, तर त्या अन्यायाच्या निराकरणासाठी जातपंचायतीसमोर गाऱ्हाणे केले जाई. या जातपंचायती बहुधा ठरावीक जत्रांच्या ठिकाणी भरत असत, कारण त्या वेळी जातीचे झाडून सर्व लोक तेथे येत असत. जातपंचायतीने केलेला निर्णय हा सर्वांना शिरोधार्य मानावा लागे. क्वचितच त्या व्यवस्थेबाहेर जाऊन राजाकडे तकरार केली जाई. राजाही जातपंचायतीच्या निर्णयाला विचारात घेऊन निर्णय देत असे.

## वैदिक वारसा

इंग्रजांनी जाणूनबुजून ह्या भटक्या-विमुक्त जमातींना तथाकथित अनार्य ठरवून त्यांना मूळ समाजापासून व संस्कृतीपासून वेगळे पाडण्याचे धोरण ठेवले होते. त्यातच भर पडली ती काही जमातींना गुन्हेगार ठरवून कायमचे समाज-बहिष्कृत करण्याची. खरेतर हिंदूच समाजाचे अविभाज्य अंग असलेले हे उत्पादक, समाजाला उपकारक आणि बृहत्तर समाजाचे रंजन व मानसिक पोषण करणारे घटक बदलत्या सामाजिक आणि तांत्रिक व्यवस्थेशी जुळवून घेण्यास असमर्थ ठरल्यामुळे आर्थिक विपन्नावस्थेत गेले. त्यांच्या प्रथांचे मूळ वेदवाङ्मयात आणि वैदिक परंपरांमध्ये मिळते.

ऋग्वेद कालात विधवा-विवाहाची पद्धत प्रचलित होती. ऋग्वेद मं.१० सू. ४० च्या दुसऱ्या ऋचेत विधवेचा तिच्या दिराबरोबर विवाह होण्याच्या प्रथेचा उल्लेख आला आहे. तीच प्रथा बंजारा समाजात प्रचलित आहे. ऋग्वेदोत्तर नागर समाजात ही प्रथा मागे पडली. विशेषतः उच्च समजल्या जाणाऱ्या जातींमध्ये पुनर्विवाह निषिद्ध समजला गेला. कनिष्ठ समजल्या जाणाऱ्या जातींमध्ये पुनर्विवाह अथवा पाट लावण्याची प्रथा सररास प्रचारात होती. बहुतांश विमुक्त जमातींमध्ये पुनर्विवाह प्रथा रूढ आहे. तिचा उगम ऋग्वेदाशी जोडला जाऊ शकतो.

वेदकाळातही अरण्यात राहणारे आणि अस्थिर जीवन जगणारे समाज होते. यजुर्वेदाच्या रुद्राध्यायात त्यांना आणि त्यांच्या म्होरक्यांना रुद्राचे स्वरूप म्हणून नमन केले आहे. मृगांची शिकार करणाऱ्या व सतत फिरतीवर असणाऱ्या, तसेच अरण्यांचा स्वामी असलेल्या रुद्राला नमन असो; असा उल्लेख शुक्ल यजुर्वेद रुद्राध्याय १६.२० मध्ये आला आहे. तसेच डोक्यावर शिरस्त्राण घालून फिरणाऱ्यांना नमन केले आहे. ते बहुधा आता ज्यांना बंजारी म्हणतो, ज्यांच्यात डोक्याला शिंगे बांधून फिरण्याची प्रथा असल्याचे दिसते.[२] त्यांच्याकडे संकेत करते (शुक्ल यजुर्वेद १६.२२) निषाद आणि श्वपती यांचा उल्लेखही त्या वेळी असलेल्या विमुक्त जमातींकडे निर्देश करतो. (शुक्ल यजुर्वेद १६.२७)

नंतरच्या काळात उपनिषदे, रामायण, महाभारत इत्यादी ग्रंथांमधून नागर जीवनशैली न स्वीकारता, पण नागर जीवनाशी सुसंवाद साधत राहिलेल्या विमुक्त समाजांचे उल्लेख अनेकदा येतात. त्यावरून असे दिसते की, भटके-विमुक्त समाज हे वेदकाळापासून भारतात अस्तित्वात होते आणि त्यांचे वन्य प्रदेशात वास्तव्य होते.

## बदलत्या परिस्थितीची आव्हाने

गेल्या पन्नास-साठ वर्षांत, स्वातंत्र्योत्तर काळात वनांचा ऱ्हास झाला. तांत्रिक प्रगतीने जीवनातील पारंपरिक गरजा- जसे वडारांनी बनविलेली जाती, बुरुडांनी बनविलेल्या टोपल्या इत्यादी गोष्टी मागे पडल्या. अनेक उत्पादने व औषधे नैसर्गिक स्रोतांवर अवलंबून न राहता कारखान्यांमधून तयार होऊ लागली. त्यामुळे या उत्पादनांवर जीवन जगणारे हे समाज एकाएकी हालाखीच्या अवस्थेत गेले. अस्थिर जीवनातून स्थिरतेकडे वळताना त्यांना जो मानसिक आणि आर्थिक आधार समाजाकडून मिळायला हवा होता, तो मिळाला नाही. त्यामुळे त्यांच्यातील तरुण पिढी योग्य मार्गी लागली नाही. आधुनिक शिक्षणासाठी लागणारी कौटुंबिक पार्श्वभूमीही त्यांना नव्हती.

जाती–जमातींत विभागले गेल्यामुळे राजकारण्यांना आकर्षित करेल असे संख्याबळ अनेक जमातींकडे नव्हते. ज्या बंजारा जमातीकडे ते होते, त्या जमातीमधील व्यक्ती मंत्री, मुख्यमंत्री अशा स्तरांवर पोहोचल्या पण बाकीच्या समाजाकडे त्यांचे लक्ष गेले नाही.

आता हळूहळू स्थिर जीवनाशी जुळवून घेत जाणारे हे समाज इतर समाजांच्या बरोबरीने येण्याच्या प्रयत्नांत आहेत. त्यांच्यातही आता पहिला पदवीधर, पहिला वकील, डॉक्टर इत्यादी पायऱ्या ओलांडल्या गेल्या आहेत. त्यांच्यात प्राचीन परंपरा लोप पावून आधुनिकता येते आहे. आज या आधुनिकीकरणाच्या तडाख्यात सापडून स्वत्व न गमाविण्यासाठी त्यांना त्यांच्या आदिम वैदिक आणि पौराणिक वारशाची माहिती करून देण्याची आवश्यकता आहे. त्यामुळे त्या समाजांना ताठ मानेने व इतर समाजांच्या बरोबरीने जीवन जगता येईल.

**संदर्भ :**

१. लक्ष्मण माने
विमुक्तायन, महाराष्ट्रातील विमुक्त जमाती: एक चिकित्सक अभ्यास, १९९७. (यशवंतराव चव्हाण प्रतिष्ठान, मुंबई), पृ.६७
२. तत्रैव, पृ.८.

* * *




# विदर्भ

■ **डॉ. एस. जी. देवगावकर**

विदर्भाचा इतिहास प्राचीन असून तो थेट ऋग्वेदात आढळणाऱ्या माहितीपासून सुरू होतो. ऋषभदेव राजाच्या नऊ पुत्रांपैकी एका पुत्राचे नाव विदर्भ होते. ऋषभदेवाने त्याच्या साम्राज्यातल्या नऊ खंडांपैकी एक भाग विदर्भाला दिला, तो भाग 'विदर्भखंड' या नावाने ओळखला जाऊ लागला. भागवत पुराणातही असा उल्लेख आढळतो. यदुवंशाच्या भोज शाखेत ऋषभदेव हा प्रमुख होता; त्याचाच पुत्र विदर्भ होय. महाभारतातील वनपर्वातील वर्णनावरून लक्षात येते की, अगस्त्य ऋषींची पत्नी लोपामुद्रा ही विदर्भराजकन्या होती. भगवान श्रीकृष्णाची पत्नी रुक्मिणी हीसुद्धा विदर्भराजकन्याच होती. प्राचीन विदर्भाची राजधानी ही कौंडिण्यपूर कुंडिनपूर येथे होती.

विदर्भाला 'वऱ्हाड' या नावानेही ओळखले जाते. यादवांचा सेनापती खोलेश्वर याच्यावेळेस वऱ्हाडास 'वरदातट' असेच म्हणत. त्या वेळी वऱ्हाडचा अर्धा भाग पूर्वेला, तर अर्धा भाग पश्चिमेला होता. 'वरदातट' या शब्दापासून 'वऱ्हाड' या शब्दाची व्युत्पत्ती वर्धातट→ वरदातट→ वऱ्हाअट→ वऱ्हाट→ वऱ्हाड अशा प्रकारे झाली असावी हे शास्त्रशुद्ध वाटते. मात्र या वऱ्हाडात केवळ अमरावती, अकोला, यवतमाळ व बुलढाणा याच जिल्ह्यांचा समावेश होता. विदर्भात मात्र अन्य सर्वच जिल्हे होते.

**विदर्भाला 'वऱ्हाड' या नावानेही ओळखले जाते. यादवांचा सेनापती खोलेश्वर याच्यावेळेस वऱ्हाडास 'वरदातट' असेच म्हणत. त्या वेळी वऱ्हाडचा अर्धा भाग पूर्वेला, तर अर्धा भाग पश्चिमेला होता. 'वरदातट' या शब्दापासून 'वऱ्हाड' या शब्दाची व्युत्पत्ती वर्धातट–वरदातट–वऱ्हाअट–वऱ्हाट–वऱ्हाड अशा प्रकारे झाली असावी हे शास्त्रशुद्ध वाटते. मात्र या वऱ्हाडात केवळ अमरावती, अकोला, यवतमाळ व बुलढाणा याच जिल्ह्यांचा समावेश होता. विदर्भात मात्र अन्य सर्वच जिल्हे होते.**

राजशेखराच्या बालरामायणात विदर्भ व महाराष्ट्र ही नावे समान अर्थाने योजिली आहेत. रामायण – महाभारत काळात महाराष्ट्र देशाचे नाव आढळत नाही, तर विदर्भ व दंडकारण्य हीच नावे हल्लीच्या महाराष्ट्र देशासाठी वापरलेली आहेत. चालुक्य पुलकेशीच्या सातव्या शतकातील एका ताम्रपटात तो 'तिन्ही महाराष्ट्रांचा' अधिपती होता व त्यात ९९,००० गावे होती असे म्हटले आहे. या तीन महाराष्ट्रात विदर्भाचा समावेश होत होता.

'अगमदधिपतित्वं यो महाराष्ट्र कानां।
नवनवतिसहस्र ग्रामभाजां त्रयाणाम।।'

भौगोलिक मर्यादा पाहता पूर्वीचा विदर्भ प्रदेश हा हल्लीच्या विदर्भापेक्षा विस्तृत होता. वाकाटक सम्राट हरिषेणाचे विदर्भातील साम्राज्य हे सातमाळ पर्वतराजीच्या दक्षिणेकडील गोदावरीच्या खोऱ्यापर्यंत होते. यात आजच्या अकोला, यवतमाळ, परभणी, नांदेड, आदिलबाद इत्यादी जिल्ह्यांचा समावेश होता. धुळे (खानदेश) जिल्ह्याचा भाग, तसेच छत्तीसगडचा बराच भाग तत्कालीन विदर्भात मोडत होता. म्हणजेच साधारणपणे गोदावरी ते नर्मदा असा दक्षिणोत्तर व रायपूर जिल्हा ते धुळे जिल्हा (खानदेश) असा पूर्व-पश्चिम प्रदेश विदर्भात होता.

## आजचा विदर्भ

आजचा विदर्भ हा महाराष्ट्र राज्याचा प्रशासकीय भाग असून, त्यात अमरावती व नागपूर ह्या विभागांचा समावेश होतो. अमरावती विभागात अमरावती, अकोला, यवतमाळ, बुलढाणा आणि वाशिम या जिल्ह्यांचा समावेश होतो. तर नागपूर विभागात नागपूर, वर्धा, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर, गडचिरोली या जिल्ह्यांचा समावेश होतो. भारताच्या मध्यभागी असलेला हा प्रदेश उत्तर अक्षांश १९° ते २२° आणि पूर्व रेखांश ७६° ते ८१° यांत स्थित आहे. या प्रदेशाचे क्षेत्रफळ ९८००० वर्ग किलोमीटर आहे. विदर्भाच्या दक्षिणेस पैनगंगा व प्राणहिता या नद्यांची मर्यादा असून उत्तरेला सातपुडा पर्वतरांगा आहेत. पूर्वेला वैनगंगा नदी व पश्चिमेला धुळे, नेमाड, परभणी हे जिल्हे आहेत. प्रमुख नद्यांमध्ये वर्धा, पूर्णा, कन्हान, वैनगंगा, वेणा, चंद्रभागा, बांदिया, पर्लकोटा या नद्या असून सातपुडा पर्वताच्या रांगा पसरल्या आहेत. अनेक टेकड्या, लहान डोंगर आणि जंगले असून त्यांत अल्लापल्लीचे जंगल (जि. गडचिरोली) हे उत्तम सागवान आणि अन्य वनसंपदा देणारे आहे. मेळघाटचे (जि. अमरावती) जंगल हे पर्वतराजी व दऱ्या यांमध्ये पसरले आहे. अमरावतीत मेळघाट व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर जिल्ह्यात ताडोबा अभयारण्य, तसेच गोंदिया जिल्ह्यात नवेगाव बांधचे अभयारण्य हे प्रसिद्ध आहेत.

## प्राचीन इतिहास

विदर्भाचा प्राचीन इतिहास पाहता इसवीसनपूर्व तिसऱ्या शतकात हा प्रदेश मौर्य सम्राट अशोक याच्या साम्राज्याचा भाग होता. मौर्यांनंतर विदर्भ प्रदेशावर सातवाहनांची सत्ता निर्माण झाली. अकोला जिल्ह्यातील तऱ्हाळा या गावी त्यांच्या नाण्यांचा संग्रह सापडला आहे. इ. स. २५० पर्यंत येथे सातवाहनांची सत्ता होती. त्यानंतर वाकाटकांपैकी विंध्यशक्ती नावाच्या राजाने तेथे आपले राज्य स्थापिले. इ. स. ५५७ च्या सुमारास वाकाटकांच्या अस्तानंतर विदर्भात कलचुरींचे राज्य प्रस्थापित झाले. त्या वंशाचा संस्थापक कृष्णराज याची चांदीची अनेक नाणी अमरावती जिल्ह्यातील धामोरी आणि बैतूल जिल्ह्यातील पट्टन या गावी सापडली आहेत.

इसवीसनाच्या सातव्या शतकाच्या पूर्वार्धात उदयास आलेला चालुक्यनृपती पुलकेशी (दुसरा) याने कलचुरीचा पराभव करून तीन महाराष्ट्र आपल्या राज्यास जोडले. चालुक्यांच्या आणि राष्ट्रकूटांच्या काळात विदर्भात एक राष्ट्रकूट घराणे राज्य करीत होते. त्यांची राजधानी नंतरच्या काळात अचलपूर (एलिचपूर) येथे होती. राष्ट्रकूटांचे अनेक ताम्रपट विदर्भात मिळाले आहेत. काही वैदर्भीय विद्वानही त्यांच्या आश्रयास होते. राष्ट्रकूटांच्या राजवटीत चांदा जिल्ह्यातील मार्कंडा (हल्लीचा गडचिरोली जिल्हा) येथे सुबक शिवमंदिर बांधले गेले. वैनगंगेच्या काठी असलेल्या या शिवमंदिरात अजूनही मार्कंडेय ऋषी येतात अशी श्रद्धा आहे. धारानृपती भोज याचा पुतण्या जगदेव हा चालुक्य विक्रमादित्य (सहावा) याच्या आश्रयास गेला, तेव्हा विक्रमादित्याने त्याला विदर्भातील



विदर्भातील नाणी

काही भागाचा अधिपती म्हणून नेमले होते. त्याचा इ. स. १११२ चा शिलालेख यवतमाळ जिल्ह्यातील डोंगरगाव येथे सापडला आहे. विदर्भाच्या पूर्व भागावर परमारांची सत्ता असावी कारण भांदक (भद्रावती) येथे परमारनृपती लक्ष्मदेव याचा इ. स. ११०४-०५ चा शिलालेख सापडला आहे. या काळानंतर विदर्भावर यादवांची सत्ता होती. ग्रंथकार आणि वैयाकरणी म्हणून प्रसिद्ध झालेला यादवांमधील बोपदेव नावाचा राजा हा वर्धा नदीच्या तीरावरील वेदपद गावचा रहिवासी होता. याच काळात विदर्भात महानुभाव पंथाचा उदय झाला.

नागपूरचा सर्वांत प्रथम उल्लेख सन ९४० मधील एका ताम्रपटात आढळतो. ८६२ मधील राष्ट्रकूट राजा तिसरा कृष्ण याच्या ताम्रपटात नागपूर व नंदिवर्धन (नगरधन- रामटेकजवळ या गावाचा उल्लेख आहे.)

महाभारत, पुराणे ह्या ग्रंथांत विदर्भातील नद्यांचे उल्लेख मिळतात. पायोशी (पूर्णा), वर्धा, वेणा (वैनगंगा) या त्या नद्या होत. विदर्भाचे वैवाहिक संबंधही उत्तर भारतीय राजांशी होते. नळ राजाची पत्नी दमयंती, अज राजाची पत्नी इंदुमती तर श्रीकृष्णाची पत्नी रुक्मिनी या विदर्भाच्या राजकन्या होत. नळ राजाची भटकण्याची दिशा व क्रम बघितल्यास सध्याच्या नागनदीच्या (नागपूर) आसमंतातील प्रदेश किंवा सध्याचा नागपूर जिल्हा. हाच जिल्हा नाग वंशीय करकोटक राजाचा होता, असे म्हणता येईल.

मौर्यांच्या समकालीन असलेल्या वाकाटक राजघराण्याने विदर्भावर प्रदीर्घ काळपर्यंत राज्य केले. या वाकाटक राजघराण्याची एक शाखा वस्तगुल्म- वाशिम (अकोला जिल्हा) तर दुसरी शाखा नंदिवर्धन ही होती. कालीदासाचे 'मेघदूत' या रामटेक परिसरात रचले गेले. राष्ट्रकूट राजा तिसरा कृष्ण याच्यानंतर हा प्रदेश देवगिरीच्या यादवांच्या वर्चस्वाखाली होता. वऱ्हाड व नागपूर प्रदेशांकडील अनेक विद्वानांनी व कर्तबगार व्यक्तींनी देवगिरीस जाऊन तेथे आपले नाव कमाविले. यांत यादवांचा मुख्य प्रधान हेमाद्रीपंत (वर्धा), सेनापती खोलेश्वर (अमरावती) हे प्रमुख होते. त्यांनी यादवांच्या राज्यांचा विस्तार केला. हे सर्व उल्लेख या प्रदेशांच्या प्राचीनत्वाची साक्ष पटवितात.

नागपूर नाव ज्यावरून पडले असण्याचा संबंध आहे, तो नाग वंश असून पुराणांवरून कळते की, नागांचा राजा तक्षक याने परीक्षिताला दंश केला, यानंतर जनमेजयाने नागांचा विध्वंस केला. नागांसंबंधी विशेष माहिती उपलब्ध नाही. कुशाणांनंतर बुंदेलखंडात भारशिवनाग हे राजे झाले. त्यांनी विदर्भाच्या वाकाटकांशी स्नेह संपादन केला. भारशिवनागांचा एक दगड भंडाराजवळ पौनी येथे सापडला. त्यावरून नागपूर हे नाव पडले असावे. तसेच नागपुरात असलेली नागनदी व नागदेवतेचे मंदिर नागपूर नावास पुष्टी देतात. या प्रदेशावर मौर्य, शुंग, वाकाटक इत्यादी राजवटींचे वर्चस्व होते. ७५० च्या दरम्यान विदर्भात चालुक्यांचा अस्त झाल्यावर राष्ट्रकूट पुढे आले. राष्ट्रकूट साम्राज्याचा संस्थापक दन्तिदुर्ग (७४५- ७६५) याने आपल्या राजवटीत रामटेकचे स्वतंत्र राज्य जिंकून घेतले. सीताबर्डीच्या शिलालेखात (१०८७) राष्ट्रकूटांचा उल्लेख आहे. राष्ट्रकूटांनंतर देवगिरीच्या यादवांचे वर्चस्व निर्माण झाले. पुढे दिल्लीच्या खिलजी वंशाचे वर्चस्व निर्माण झाले.

**- डॉ. भा. रा. अंधारे**

त्या पंथाचे मूळपुरुष श्रीगोविंदप्रभू हे अमरावतीजवळच्या ऋद्धपूरचे रहिवासी होते.

### समाजजीवन – जातिजमाती

विदर्भातील समाजजीवनात जातिजमातींत विविधता आढळते. शेती करून त्यावर उपजीविका करणाऱ्या जाती मोठ्या प्रमाणात आढळतात. कुणबी समाजाचे लोक मोठ्या प्रमाणात असून वऱ्हाडच्या जिल्ह्यांमध्ये प्रामुख्याने ज्वारी, गहू, तसेच कापूस उत्पादक मोठ्या प्रमाणावर आहेत. अल्पभूधारक स्वतःच्या शेतीप्रमाणेच शेतमजुरी किंवा अर्ध–बटाईने शेती करतात. यात तिरळे (तिळोरे) कुणबी मोठ्या प्रमाणावर आहेत. मात्र चंद्रपूर, गडचिरोली भागात धानशेती करणारे कुणबी असून त्यात धनोजे कुणबी जास्त आहेत. त्यासोबतच खैरे कुणबी व झाडे कुणबीही आहेत. विदर्भात कुणबी–मराठा हा भेद मोठ्या प्रमाणावर नसून स्वतःला मराठा म्हणवणारे कमी असून कुणबी म्हणवून घेणारे बहुतांश आहेत. विदर्भात तेली समाजही मोठ्या प्रमाणावर असून वर्धा, चंद्रपूर, गडचिरोली, नागपूर या जिल्ह्यांमध्ये तेली जातीचे लोक मोठ्या प्रमाणावर आहेत. त्यांचा मुख्य व्यवसायही शेतीच असून त्यातले सावतेली सधन आढळतात.

या जातींप्रमाणेच माळी जातीचेही लोक बऱ्याच प्रमाणात असून तेही शेती, मळे यांच्यावरच प्रामुख्याने उपजीविका चालवतात. याशिवाय सुतार किंवा वाढई, बढई, शिंपी, लोहार, सोनार, कासार, कोष्टी, कुंभार, वाणी, न्हावी या सर्व जातींचे लोक आपापला परंपरागत व्यवसाय किंवा शेती करतात. शिक्षणाचा प्रसार आणि आरक्षणाच्या सवलती यांमुळे सर्वच जातींतील लोक आता नोकऱ्यांमध्येही आढळतात. ब्राह्मण जातीचे लोकही अल्प प्रमाणात असून विदर्भात जास्त संख्येने देशस्थ ब्राह्मण व त्याखालोखाल कोकणस्थ व कऱ्हाडे ब्राह्मणही आहेत. काहींकडे परंपरागत शेती असून बाकीचे प्रामुख्याने नोकरीत किंवा व्यवसायात आढळतात. विदर्भात ज्यांना सामान्यतः कोमटी म्हणून ओळखले जाते, त्या आर्यवैश्यांची संख्या चंद्रपूर, यवतमाळ जिल्ह्यांत जास्त असून शेती, व्यापार या क्षेत्रांत त्यांनी पुष्कळ प्रगती केलेली आहे. महार, मांग, मादगी या जातींपैकी महार जास्त असून विदर्भात सर्वत्र त्यांची वस्ती आहे.

विविध जातींप्रमाणेच विदर्भात अनेक परप्रांतीय लोक सुमारे तीनशे वर्षांपूर्वीपासून स्थायिक झालेले आहेत. यात प्रामुख्याने मारवाडी म्हणून ओळखले जाणारे राजस्थानी लोक असून त्यात माहेश्वरी, अग्रवाल आणि जैन यांचा समावेश होतो. त्यांच्यातील बहुतांश लोक व्यापारात असून काही त्यासोबत शेती–सावकारीही करतात. हे लोक सधन असून काहींनी विविध क्षेत्रात नोकऱ्याही स्वीकारल्या आहेत. तसेच गुजराती, सिंधी आणि पंजाबी लोकही व्यवसाय, उद्योग, नोकरी यांसारख्या विविध क्षेत्रांत आहेत.

विदर्भात विविध जमाती असून या वनवासींमध्ये प्रामुख्याने गोंड, परधान, कोलाम तसेच कोरकू यांचा उल्लेख करावा लागेल. गोंड हे संख्येने जास्त असून त्यांच्या उपजमातीत प्रामुख्याने राजगोंड, धुर्वेगोंड, खातुलवार किंवा खतोलेगोंड आणि माडिया–गोंड यांचा समावेश होतो. त्यांची वस्ती प्रामुख्याने चंद्रपूर, गडचिरोली आणि यवतमाळ तसेच नागपूर आणि गोंदिया या जिल्ह्यांमध्ये आहे. माडिया–गोंड गडचिरोली जिल्ह्यातल्या दुर्गम भागात राहतात. कोलाम आणि परधान ह्या जमाती वांशिकदृष्ट्या गोंडांना जवळच्या असून त्या यवतमाळ आणि चंद्रपूर जिह्यांत जास्त प्रमाणात आहेत. महाराष्ट्रात ज्या तीन जमातींना अतिमागास किंवा आदिम म्हणून घोषित करण्यात आलेले आहे, त्यात विदर्भातील माडिया–गोंड आणि कोलम या जमातींचा अंतर्भाव होतो. कोरकू ही आदिवासी जमात अमरावती जिल्ह्याच्या मेळघाट विभागात मोठ्या प्रमाणात केंद्रित झालेली आहे. या जमातींपैकी गोंड ही जमात सांस्कृतिक तसेच राजकीयदृष्ट्या प्रगतीपर असून त्यांच्या हाती राजसत्ता होती. चंद्रपूर आणि नागपूर येथे गोंडांचे राज्य अनेक वर्षं होते. या जमातींव्यतिरिक्त आंध (यवतमाळ जिल्हा), माना, हलबा, गोवारी इत्यादी जमाती आहेत.

भटक्या जमाती आणि विमुक्त जातींचेही लोक विदर्भात मोठ्या प्रमाणावर विखुरलेले आहेत. भटक्या जमातींपैकी प्रमुख जमातीत बेलदार, धनगर, गवळी आणि गवलान हे संख्येने मोठ्या प्रमाणात आहेत. यातील मजूरी करणारे

बेलदार हे चंद्रपूर, नागपूर जिल्ह्यांत जास्त आहेत. पूर्वी आंध्रप्रदेशातून आलेल्या शेती करणाऱ्यांपैकीच ही जमात असून त्यांनी विविध क्षेत्रांत प्रगती केलेली आहे. भोई किंवा ढीवर यांचाही समावेश भटक्या जमातींत होतो. विमुक्त जातींमध्ये प्रामुख्याने यवतमाळ जिल्ह्यातील बंजारा या जमातीचा उल्लेख करावा लागेल. पारधी, कैकाडी, मसनजोगी हेसुद्धा अल्प प्रमाणात आढळतात.

विदर्भात मुस्लीम धर्मीयांची संख्याही जास्त असून प्रामुख्याने अकोला, अमरावती आणि नागपूर येथे त्यांची संख्या बरीच आहे. यात सुन्नी, शिया या दोन्ही प्रकारचे मुस्लीम धर्मीय असून त्यातल्या बोहरा समाजाने व्यापारात बरीच प्रगती केलेली दिसते.

## जनसंस्कृती व परंपरा

मागे वर्णिलेल्या विविध जातिजमातींचे लोक विदर्भात वर्षानुवर्षे एकत्रित राहत असून त्यांनी आपल्या परंपरा व लोकसंस्कृती बऱ्याच प्रमाणात जपलेली असून काही प्रमाणात त्याची देवघेवही झालेली आढळते. हिंदू संस्कृतीचा प्रभाव सर्वांवरच कमीजास्त प्रमाणात आढळतो. महादेव आणि देवी यांची पूजा विदर्भात मोठ्या प्रमाणावर होत असून यात हिंदू जातींप्रमाणेच आदिवासी जमाती आणि भटक्या विमुक्तांचाही समावेश आहे. चौऱ्यागडच्या महादेवाला तसेच अमरावती जिल्ह्यातील सालबर्डीच्या महादेवाला किंवा गडचिरोली जिल्ह्यातल्या मार्कंड्याच्या शिवमंदिराला महाशिवरात्रीला लाखोंच्या संख्येने ही सर्व मंडळी जातात. माहूरगडावरच्या रेणुकामातेला, तसेच चंद्रपूरच्या महाकालीला आणि अमरावतीच्या अंबादेवी व एकविरादेवीला नवरात्रात लाखो लोक जातात. सर्व जाति-जमातींचे लोक या दैवतांना मानतात. नवरात्रोत्सवात गुजरातचा गरबा हा सर्वांचाच आवडता झालेला असून गणेशोत्सवात सर्व जाति-जमातींचे लोक उत्साहाने भाग घेतात. यात मुस्लीम बांधवही अनेक ठिकाणी भाग घेतात. चंद्रपूर जिल्ह्यात काही गावी मोहरमच्या 'सवाऱ्या' हिंदूंकडेही असतात. नागपूरचे ताजुद्दिनबाबा हे सर्व धर्मियांचे श्रद्धास्थान आहे. गोंड, कोरकू हे सर्वच दसऱ्याचा सण साजरा करतात. गडचिरोली जिल्ह्यातल्या अहेरीचा दसरा हा तेथील गोंड राजेअत्राम घराण्याचे वारसदार मोठ्या प्रमाणावर करतात.

ग्रामीण भागातील समाजजीवन अजूनही परंपरागत रूढी, प्रथा, परंपरा जपत आलेले आहे. अर्थात शिक्षण, शहरीकरण व आधुनिकीकरण यांचा परिणाम युवा पिढीवर दिसत असला, तरी जनसंस्कृती नष्ट झालेली नाही. विशेषतः वैदर्भीय संतांच्या प्रभावाची जाणीव आजही होते. यात शेगावचे संत श्रीगजानन महाराज, अमरावतीचे राष्ट्रसंत श्रीतुकडोजी महाराज, श्रीसंत गाडगेबाबा तसेच श्रीगुलाबराव महाराज यांच्या विचारांनी प्रभावित झालेले लोक आजही आहेत. राष्ट्रसंतांच्या प्रेरणेने स्थापन झालेली 'श्रीगुरुदेव सेवा मंडळे' विदर्भातल्या ग्रामीण भागांत संतांचा संदेश आजही प्रसारित करतात.

## बोलीभाषा व लोकदैवते

वैदर्भीय बोलीभाषांमध्ये प्रामुख्याने वऱ्हाडी बोली, नागपूरी बोली आणि चंद्रपुरी बोली यांचा उल्लेख करावा लागेल. एकाच मराठी मायबोलीची विविध रूपे यात दिसतात. भंडारा जिल्ह्यात थोडा वेगळा प्रकार आढळतो. विदर्भातल्या प्रमुख आदिवासी बोलींमध्ये गोंडी बोली कोलामी बोली आणि बंजारी बोली या तीन प्रमुख होत. मुख्य म्हणजे या आदिवासी बोलींमध्ये मौखिक परंपरेने चालत आलेले भरपूर लोकसाहित्य आहे. या बोलींचा आणि त्याचे व्याकरण आणि लोकसाहित्य यांचा अभ्यास केलेले अभ्यासकही विदर्भात आहेत. गेल्या २०-२५ वर्षांत झाडी-पट्टी बोली हा एक अभ्यासही झालेला असून त्यावरही लिखाण झाले आहे.

वैदर्भीय साहित्यात महानुभाव पंथाचे संस्थापक तसेच उपासक यांनी निर्माण केलेल्या मराठीतील साहित्याचाही उल्लेख करावा लागेल. या पंथातील माहीमभट्टाने लिहिलेले हे लिखाण मराठीतील पहिले साहित्य मानण्यात येते. लीळाचरित्र हे त्यात प्रमुख होय. श्रीगोविंदप्रभू यांचे जन्मस्थान ऋद्धपूर हे त्यांच्या पंथाचे मुख्य स्थान मानले जाते. महानुभाव पंथीय लोक एकमुखी दत्ताला तसेच श्रीकृष्णाला मानतात. विदर्भात दत्तसंप्रदायाच्या दृष्टीने श्रीनृसिंहसरस्वतींचे जन्मस्थान असलेले वाशीम (पूर्वीचा

अकोला) जिल्ह्यातले कारंजा (लाड) हे जागृत स्थान मानले जाते. त्याचप्रमाणे वत्सगुल्म (आधीचे वाशीम) हेही प्राचीन काळाचे, धार्मिक आणि सांस्कृतिकदृष्ट्या अत्यंत महत्त्वाचे असे गाव होय. मुकुंदराजाचे परमगुरू हरिनाथ यांची समाधी वैनगंगेच्या तिरावर अंबानगरी (आत्ताचे अंभोरा) येथे आहे. नागपूरजवळील रामटेक या गावी कवी कुलगुरू कालिदासाने आपली काव्यरचना केली आणि या जागी काही काळ प्रभू श्रीरामचंद्रांनी वास्तव्य केले होते अशी आख्यायिका आहे.

## सद्यःस्थिती

शैक्षणिक क्षेत्रातही विदर्भ अत्यंत प्रगतिपर मानला जातो. विशेषतः अमरावती जिल्ह्यात सुमारे ६५ वर्षांपूर्वी डॉ. पंजाबराव देशमुख यांच्या पुढाकाराने ग्रामीण स्तरापर्यंत माध्यमिक शाळा आणि नंतर महाविद्यालयांची स्थापना करण्यात आल्यामुळे शिक्षणप्रसार झपाट्याने होऊन त्या काळात केरळ राज्यानंतर अमरावती जिल्ह्याचे नाव शैक्षणिक बाबतीत क्रमांक दोनवर घेण्यात येत असे. नागपूरचे तत्कालीन मॉरिस कॉलेज (हल्लीची वसंतराव नाईक इन्स्टिट्यूट ऑफ सोशल सायन्सेस) आणि हिस्लॉप कॉलेज तसेच अमरावतीचे किंग एडवर्ड कॉलेज (हल्लीचे विदर्भ महाविद्यालय) या एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीच्या संस्था होत.

नागपूर विद्यापीठाची स्थापनाही (आत्ताचे राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ) ४ ऑगस्ट १९२३ सालची असून इ. स. १९८३–८४ च्या शैक्षणिक सत्रापासून अमरावती येथे स्वतंत्र अमरावती विद्यापीठाची (आत्ताचे श्रीसंत गाडगेबाबा अमरावती विद्यापीठ) स्थापना झाली. नागपूर जिल्ह्यातील रामटेक येथे ‘कवी कुलगुरू कालीदास संस्कृत विद्यापीठ’ असून अकोला येथे ‘डॉ. पंजाबराव देशमुख कृषी विद्यापीठ (पी.के.व्ही.)’ स्थापन करण्यात आले आहे. आता जवळपास सर्वच जिल्ह्यांच्या तसेच तालुका स्तरावरील गावांत आर्ट्स, कॉमर्स आणि अनेक ठिकाणी सायन्स कॉलेजेस आहेत. माहिती–तंत्रज्ञान तसेच जनसंवाद क्षेत्रांतील अनेक मान्यताप्राप्त संस्था, मेडिकल कॉलेजेस, इंजिनिअरिंग कॉलेजेस, लॉ कॉलेजेस विदर्भात आहेत. रा. तु. म. नागपूर विद्यापीठाची डी. लक्ष्मीनारायण इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी, विश्वेश्वरय्या नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी (ही युनिव्हर्सिटी आहे) आणि भारत सरकारची नॅशनल एनव्हायरनमेंटल इंजिनिअरिंग रिसर्च इन्स्टिट्यूट (एन. ई. ई. आर. आय NEERI) आणि नॅशनल कॉटन रिसर्च इन्स्टिट्यूट, या मान्यताप्राप्त संस्था नागपुरात आहेत.

सामाजिक क्षेत्रांत कार्य करणाऱ्या अनेक मान्यवर संस्था विदर्भात आहेत. वर्धा गावाजवळ महात्मा गांधींनी स्थापन केलेला ‘सेवाग्राम आश्रम’, जवळच धाम नदीच्या तीरावरील श्रीविनोबाजी भावे यांचा पवनार येथील ‘परमधाम आश्रम’ ही सामाजिक–सांस्कृतिक कार्याची अखिल भारतीय महत्त्वाची केंद्रे आहेत. याशिवाय वर्धेजवळच दत्तपूर येथे म. गांधींच्याच प्रेरणेने स्थापन झालेले श्री. मनोहर दिवाण यांचे दत्तपूर – कुष्ठधाम, अमरावतीजवळ डॉ. शिवाजीराव पटवर्धन यांनी स्थापन केलेले तपोवन कुष्ठधाम आणि इ. स. १९५१–५२ मध्ये चंद्रपूरजवळील आनंदवन येथे श्री. मुरलीधर देविदास उर्फ बाबा आमटे यांनी स्थापन केलेला आनंदवन कुष्ठधाम ही आधुनिक तीर्थक्षेत्रेच होत. गडचिरोली जिल्ह्यात भामरागडजवळील हेमलकसा येथील लोकबिरादरी प्रकल्प; श्रीबाबा आमटे यांच्या प्रेरणेने त्यांचे द्वितीय पुत्र डॉ. प्रकाश आमटे आणि त्यांच्या पत्नी डॉ. सौ. मंदाकिनी आमटे यांनी चालवलेला लोकबिरादरी प्रकल्प हा माडिया–गोंड आदिवासींना आरोग्यविषयक तसेच शैक्षणिक, कृषिविषयक सेवा देतो. गडचिरोलीजवळच शोधग्राम येथे डॉ. अभय बंग आणि त्यांच्या पत्नी डॉ. राणी बंग यांनी चालवलेला प्रकल्प, वनवासींना आरोग्यसेवा देऊन तसेच त्यांच्या आरोग्यसमस्यांवर, विशेषतः कुपोषणावर, संशोधन करून नावलौकिकास आला आहे. अमरावती जिल्ह्यातील मेळघाटातील कोरकूंच्या कुपोषण आणि आरोग्यविषयक समस्यांवर वैद्यकीय सेवा पुरविण्याचे कार्य फार व्यापक स्वरूपात, ‘वनवासी कल्याण आश्रमाची’ परतवाडा येथील शाखा ही तेथील डॉ. राजेंद्र वासुदेव पट्टलवार यांच्या मार्गदर्शनाखाली, सातत्याने करते आहे. यवतमाळ जिल्ह्यातील मारेगावजवळील झरी–जामनी तालुक्यात

श्रीबाबा आमटे यांचे ज्येष्ठ पुत्र डॉ. विकास आमटे हे एक बहुआयामी विकास प्रकल्प चालवीत असून ते तेथील कोलाम, परधान आणि गोंड या वनवासींसाठी कार्यरत आहेत.

साहित्याच्या क्षेत्रात कार्य करणारी 'विदर्भ साहित्य संघ' ही संस्था गेली सुमारे पाऊणशे वर्षं कार्यरत असून त्या संस्थेची स्थापना प्रथम अमरावतीला झाली आणि नंतरच्या काळात तिचे मुख्यालय नागपूर येथे स्थलांतरित करण्यात आले. विदर्भ संशोधन मंदिर ही नागपूरची संस्था प्राचीन काळापासूनच्या इतिहासाचे संशोधनकार्य करणारी संस्था नागपुरात असून तिने भरीव कार्य केले आहे. तसेच नागपूर येथे सर्वोदय आश्रम असून विनोबा विचारमंच त्याच्याशी संलग्न आहे. वरोऱ्याचे सुप्रसिद्ध गांधीवादी विचारवंत कै. रा. कृ. पाटील यांच्या प्रेरणेने हा आश्रम भरीव कार्य करीत आलेला आहे. राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे मुख्यालय नागपूरच्या महाल भागात असून रेशीमबाग येथे डॉ. हेडगेवार भवन आणि भव्य वास्तू तसेच कवायत मैदान आहे. १४ ऑक्टोबर १९५६ रोजी विजयादशमीच्या दिवशी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या नेतृत्वाखाली लाखो समाजबांधवांनी बौद्ध धर्माची दीक्षा घेतली. ती दीक्षाभूमी आणि भव्य स्तूप व बौद्धमूर्ती नागपुरातल्या लक्ष्मीनगरजवळ असून दरवर्षी तेथे प्रचंड मेळावा भरतो. जवळच कामठी येथे ड्रॅगन पॅलेस असून तोही बौद्ध बांधवांचे श्रद्धास्थान आहे.

**संदर्भ :**


१) भारतीय संस्कृतिकोश - खंड चार पृ. ६८७-६८८
२) मध्यप्रांत व वऱ्हाडचा इतिहास
यादव माधव काळे, नागपूर युनिव्हर्सिटी, नागपूर, इ. स. १९३८
३) विदर्भ प्रदेशाने संस्कृत वाङ्मयात टाकलेली भर
डॉ. प्रभाकर प्र. आग्रे, श्री. मंगेश प्रकाशन, नागपूर इ. स. २००३.


# गोंड आणि भोसले राजवटी

■ डॉ. भा. रा. अंधारे

पूर्वीच्या मध्यप्रांत वऱ्हाडात चंद्रपूर, वर्धा, भंडारा, नागपूर या भागांवर गोंडांचे आधिपत्य होते. त्यांपैकी चंद्रपूरचे गोंड राजे व छिंदवाडा जिल्ह्यातील देवगडचे गोंड राजे असे दोन वेगळे वंश आहेत.

मध्य प्रदेशच्या पूर्वोत्तर भागात विशाल भूप्रदेशावर गोंड जमातीने दीर्घ काळ राज्य केले. त्यांचे राज्य १८ व्या शतकाच्या मध्यापर्यंत टिकून होते. त्यात नागपूर व महाराष्ट्राचा पूर्वेकडील भाग (म्हणजे भंडारा व चंद्रपूर) येतो, त्यामुळे या प्रदेशाला गोंडवाना संबोधले जाते.

## देवगडचे गोंड राजे

देवगडचे गोंड राज्य गढामंडलाच्या अधिसत्तेखाली होते. नंतर ते स्वतंत्र झाले. मध्य प्रदेशातील छिंदवाडा जिल्ह्यात छिंदवाड्यापासून ४० कि. मी. अंतरावर नैऋत्ये-कडील पर्वतावर देवगडचा किल्ला आहे. हा किल्ला देवगड गावाला लागून असल्याने त्याला देवगड नाव पडले.

देवगडपासून ४० मैल अंतरावर राज्याचे मुख्यालय हरियागड होते. येथे हत्ती मोठ्या प्रमाणात असल्यामुळे त्याला हत्तीगड असेही म्हणतात. त्याचाच अपभ्रंश हरियागड झाला आहे. इ. स. १४७२ पासून १५४२ पर्यंत देवगड येथे गवळी राजे रणसूर व धनसूर यांची सत्ता होती. परंतु वीरभानशहाचा पुत्र जाटबा याने त्यांना ठार करून देवगडवर आपले वर्चस्व प्रस्थापित केले. १५६४ च्या पूर्वी देवगडचे राजे गढाच्या राजाला खंडणी देत होते, असा उल्लेख अकबरनाम्यामध्ये आला आहे. देवगडच्या गोंड राज्याचा खरा संस्थापक जाटबा हा होय. त्यानेच तत्कालीन राजकीय परिस्थितीचा लाभ घेऊन आपल्या राज्याचा विस्तार नागपूरकडे केला. जाटबाला अकबराने राजा म्हणून मान्यता दिली होती. त्याचा मृत्यू १६२० च्या सुमारास झाला असावा. त्याच्या राज्यात महाराष्ट्रातील नागपूर व भंडारा ह्या जिल्ह्यांचा अंतर्भाव होता. त्याने स्वतःला महाराजा म्हटले होते व स्वतःची नाणी पाडली होती. ही

नाणी नागपूरच्या संग्रहालयात आहेत. जाटबाला आठ पुत्र होते. त्यांच्यापैकी दलशहा हा पुढे गादीवर बसला. त्याने १५ वर्षे राज्य केले. त्याचे निधन १६३४ मध्ये झाले. त्यानंतर त्याचा भाऊ कोकशहा गादीवर बसला.

### नागपूरवर खानदौरानचे आक्रमण

१६३७ मध्ये देवगडच्या गोंड राजाकडून थकलेली खंडणी वसूल करण्यासाठी शहाजहानने आपला सेनापती खानदौरान यास पाठविले. तो देवगडवर चालून आला व त्याने वर्धा जिल्ह्यातील केळझर (विदर्भातील अष्टविनायकांपैकी एक किल्ला, नागपूर-वर्धा मार्गावर आहे) व आष्टा हे किल्ले जिंकून घेतले. त्यानंतर त्याने नागपूरच्या किल्ल्यावर आक्रमण केले, तोही जिंकून घेतला, ही बातमी कोकशहाला कळताच त्याने खानदौरानला १००० हत्ती दिले शिवाय मोगल खजिन्यात ३ वर्षांत ४ लाख रुपये जमा करण्याचे वचन दिले. कोकशहाचा मृत्यू अंदाजे १६४८ मध्ये झाला असावा. त्यानंतर केसरीशहा उर्फ दुसरा जाटबा गादीवर आला. दुसऱ्या जाटबाचा मृत्यू १६६० मध्ये झाला. नंतर गोरकशहा उर्फ कोकशहा देवगडच्या गादीवर बसला. त्याच्या मृत्यूनंतर देवगड राज्यात यादवी सुरू झाली आणि लोकशहाचा ज्येष्ठ पुत्र महिपतशहा गादीवर बसला. परंतु धाकटा मुलगा दिनदारशहा याने महिपतशहाचा पराभव करून गादी मिळविली. त्यानंतर महिपतशहा देवगडची गादी मिळविण्याकरिता औरंगजेबाकडे बऱ्हाणपूर येथे गेला.

औरंगजेबाने महिपतशहाला इस्लामधर्म स्वीकारण्याच्या अटीवर मदत करण्याचे मान्य केले. तेव्हा महिपतशहाने आपली अट बादशहासमोर ठेवली, ती म्हणजे 'हम भात में सामील होंगे पर साथ में नही.' याचाच अर्थ रोटी व्यवहार करेन पण बेटी व्यवहार करणार नाही. त्याने इस्लाम धर्म स्वीकारला. त्याचे नाव औरंगजेबाने बख्तबुलंद (नशिबवान) हे ठेवले.

औरंगजेबाने बख्तबुलंद याला १६८६ मध्ये देवगडच्या गादीवर बसविले व देवगडचे नामांतर इस्लामगड असे केले. बख्तबुलंद याने बरार, पावनी, डोंगरताल, शिवनी, कटंगी हे प्रदेश जिंकले. बख्तबुलंद याने नागपूर नगरीची स्थापना केली, असे मत प्रसिद्ध रेसिडेन्ट जेन्कीस याने व्यक्त केले आहे. पण ते बरोबर वाटत नाही. कारण नागपूर हे १७०२ पूर्वी अस्तित्वात होते. या परिसरातील राजापूर, रायपूर, हिवरी, हरिपूर, वाठोड, सक्करदरा, आकरी, फुटाळा, गाडगे, भानखेडा, लेंढरा व सीताबर्डी ही बारा गावे (यामुळे त्याला राजापूर बारसा म्हणत) बख्तबुलंद याने रस्ते तयार करून एकत्र जोडली. त्यामुळे त्याला नव-नागपूरचा निर्माता म्हणता येईल. बख्तबुलंदच्या आदेशावरून त्याचा सेनापती राजाखान पठाण याने भंडारा जिल्ह्यातील अंबागड, सानगडी, प्रतापगड ही गावे जिंकून ती देवगड राज्यास जोडली. त्याने पाटणसावंगी (सावनेरजवळ) हे गाव वसविले व गढी बांधली. त्याने अंबागड (तुमसरजवळ) सानगड, भिवगड या ठिकाणी किल्ले बांधले.

नागपुरातील गोंड किल्ल्याच्या आत १७०२ च्या सुमारात राजपरिवाराकरिता मशीद बांधली गेली. ही मशीद किल्ला मशीद या नावाने ओळखली जाते. १७०२ पासून नागपुरात मुस्लीम संस्कृतीची सुरुवात झाली, असे म्हणता येईल. काही इतिहासकार म्हणतात की, बख्तबुलंद याने १७०२ मध्ये देवगडवरून नागपूर येथे राजधानी आणली. परंतु हे मत बरोबर वाटत नाही. देवगडच्या सर्व राज्यकर्त्यांमध्ये बख्तबुलंद सर्वश्रेष्ठ राज्यकर्ता होता. त्यानेच या नागपूर प्रदेशात शेती व उद्योगधंदे ह्यांना प्रोत्साहन दिले. त्याच्या कालखंडात अनेक उद्योगी लोक नागपूरकडे आकर्षित झाले होते.

### चांदसुल्तान

१७०९ मध्ये बख्तबुलंदच्या मृत्यूनंतर त्याचा ज्येष्ठ मुलगा चांदसुल्तान गादीवर बसला. बाजीराव पेशव्याने १३ जानेवारी १७२९रोजी देवगड राज्यावर हल्ला चढविला, तेव्हा चांदसुल्तानने ६५०० रुपये देण्याचे मान्य केले. त्यानंतर छत्रसालच्या मदतीकरिता बाजीराव बुंदेलखंडात निघून गेला. चांदसुल्तान याने राज्याची राजधानी नागपूर येथे नेली. नागपूर येथे विकासाची कामे केली. बाजारपेठा निर्माण केल्या. त्यामुळे दुसऱ्या प्रांतांतून लोक उद्योगाकरिता आले. त्याने नागपूरभोवती ५ किमी

लांबीचा काळ्या दगडांचा परकोट बांधला. या परकोटाला ५ भव्य प्रवेशद्वारे बांधली- १) बुधवार, २) इतवारा, ३) भानारा, ४) उमरेड, ५) शुक्रवार. यांपैकी आज फक्त शुक्रवार दरवाजा अस्तित्वात आहे व त्याला गांधीद्वार असे नाव देण्यात आले आहे. त्याने नागपूर नगर देखणे करण्याकरिता शुक्रवार दरवाजाजवळ शुक्रवार तळे निर्माण केले. या तलावाच्या सीमा सीताबर्डी किल्ल्याच्या पायथ्यापर्यंत होत्या. त्याच तलावातून शहराला पाणीपुरवठा होत असे. याशिवाय त्याने जोहरीपुऱ्याला लागून असलेल्या गाडीखान्यात जामा मशीद बांधली. नागपूरच्या जानोजी भोसले (१७५५ ते १७७२) याने या मशिदीच्या खर्चाकरिता एक गाव लावून दिला. १७३५ मध्ये चांदसुल्तानचा मृत्यू झाला.

## राजे वलिशहा

चांदसुल्तान यास तीन मुले होती- १) मिरबहादर, २) अकबरशहा, ३) बुऱ्हाणशहा. परंतु बख्तबुलंदचा अनौरस पुत्र वलिशहा याने देवगडचे सिंहासन बळकावले व मिरबहादर यास नागपूरच्या गोंड किल्ल्यात १७३५ मध्ये ठार मारले. वलिशहा याने चांदसुल्तानचे दोन औरस पुत्र व पत्नी रतनकुवर यांना कैदेत टाकले. तेव्हा राणी रतनकुवर हिने रघुजी भोसले यांना गुप्तपणे मदत मागितली. या वेळी रघुजी भोसले यांचा मुक्काम यवतमाळ जिल्ह्यातील भान येथे होता. रघुजी भोसले याने कळंब, केळझर, पवनी हे प्रदेश जिंकले. सोनबर्डीच्या लढाईत वलिशहाने दिवाण रघुनाथसिंग याला रघुजीचा प्रतिकार करण्यासाठी पाठविले. रघुजीने रघुनाथसिंगाचा पराभव केला, त्याला जीवनदान दिले व सांगितले की, देवगड येथे जाऊन वलिशहास किल्ल्याबाहेर काढावे. रघुनाथसिंग देवगडला परतला. त्यानंतर १७३७ मध्ये रघुजीने भंडाऱ्याचा प्रसिद्ध भुईकोट किल्ला जिंकला. अशा प्रकारे भंडारा जिल्हा व आसपासच्या प्रदेशांत भोसल्यांचा अधिकार प्रस्थापित झाला.

१७३८ मध्ये रघुजीने देवगडवर आक्रमण करून वलिशहाला गणेश दरवाजातून बाहेर आणले तथापि या लढाईत वलिशहा मारला गेला. रघुजीने राजमाता रतनकुवरला देवगडचे राज्य दिले.

## देवगडचा तह

राणी रतनकुवर आणि रघुजी भोसले यांच्यात २ फेब्रुवारी १७३९ रोजी देवगडचा तह झाला. त्यानुसार राणीने रघुजीला तिसरा पुत्र मानून राज्याचा तिसरा हिस्सा दिला. त्यात नागपूर, भंडारा हा प्रदेश रघुजीला मिळाला. पवनी, बाळापूर, चिखली, मुलतापी इत्यादी व त्यांतील १५६ गावे व युद्धखर्च म्हणून १० लक्ष रुपये रघुजीस मिळाले.

राणी रतनकुवरच्या मृत्यूनंतर अकबरशहा व बुऱ्हाणशहा यांच्यात संघर्ष सुरू झाला. तेव्हा बुऱ्हाणशहाने रघुजीस मदत मागितली. त्या युद्धात अकबरशहाचा पराभव झाला. त्यामुळे अकबरशहा निजामाकडे गेला व तेथेच विषाबाधेमुळे त्याचा मृत्यू झाला.

बुऱ्हाणशहाचा दिवाण रघुनाथसिंग याने पुढे चंद्रपूरचा गोंड राजा निळकंठशहा याच्या मदतीने बंड पुकारले व रघुजीची सत्ता झुगारून चौथ देणे बंद केले. या वेळी रघुजी बंगालच्या मोहिमेत गुंतले होते. परत येताच त्यांनी रघुनाथसिंगाचे पाटणसावंगी येथे पारिपत्य केले. त्यानंतर रघुजीने देवगडचा गोंड राजा बुऱ्हाणशहा यास नागपूर येथे आणून गोंडाच्या किल्ल्यात ठेवले. त्यास भोसल्यांकडून वार्षिक ३ लाख रुपये पेन्शन मिळू लागली. देवगडचे गोंड राजे संस्थानिक म्हणून ओळखले जाऊ लागले.

## बुऱ्हाणशहा (१७४३ ते १७६९)

बुऱ्हाणशहाच्या हातात नाममात्र सत्ता होती. भोसले राजांच्या राज्याभिषेकाच्या वेळी राजतिलक लावण्याचा बहुमान गोंड राजाला होता. काही मर्यादित स्वरूपाचे अधिकार त्यास होते, कारण त्याच्याकडे ४८ गावांची मालकी होती. बुऱ्हाणशहा हा भोसले राज्यकर्त्यांच्या चार राजवटींचा साक्षीदार होता. १) आद्य रघुजी १७३०-१७५५, २) जानोजी भोसले १७५५-१७७२, ३) मुधोजी भोसले १७७२-१७८८, ४) दुसरे रघुजी १७८८-१८१६. बुऱ्हाणशहाचा मृत्यू १७९६ मध्ये झाला. त्यानंतर त्याचा ज्येष्ठ पुत्र बहरामशहा गादीवर बसला. त्याचा १८२१ मध्ये मृत्यू झाल्यानंतर रहमानशहा

हा गादीवर बसला. तो निपुत्रिक होता. त्याचा दत्तकपुत्र (भावाचा मुलगा) सुलेमानशहा हा त्यानंतर राजा झाला. त्याने दत्तक घेतलेला आझमशहा हा शेवटचा गोंड राजा होय. मृत्यूच्या पूर्वी त्याने हिंदू धर्माचा स्वीकार केला होता. गोंड राजे मुसलमान झाले होते, तरी त्यांनी हिंदू रूढींचे व रीतीरिवाजांचे पालन केले. जावळ काढणे, हळदी कार्यक्रम, विजयादशमी व दिवाळी ह्या दिवशी देवीची पूजा, किल्ल्यातील मुस्लिम लोक व राजा हिंदी-मराठी भाषा बोलत, मराठी पेहराव व अलंकार घालीत. स्त्रिया नऊवारी पातळ नेसत. गोंड राजवटीत मराठीबरोबरच हिंदी भाषेचा प्रसार नागपुरात झाला. नागपुरात हिंदी भाषा आणण्याचे श्रेय गोंड राजांना आहे. गोंड राजे आझमशहा व चौथे रघुजी भोसले यांनी प्रसिद्ध संत हजरत ताजुद्दीन बाबांची सेवा केली. मोहरमच्या ताजियाची सुरुवात भोसले राजाकडून होण्याची प्रथा विद्यमान आहे. देवगडच्या गोंड राजाने नवनागपूर निर्माण केले. किल्ला परिसर गोंड राजाच्या नावाने ओळखला जातो. नागपूरला अझमशहा लेआऊट, राजनगर व प्रसिद्ध गोंडवाना क्लब आहे. नागपूर विभागाच्या विकासात गोंड राजाचे मोठे योगदान आहे. यावरून मराठीत रूढ झालेली 'देवगड खचले नागपूर वसले' म्हण प्रसिद्ध आहे.

### भोसले घराणे

नागपूरचे आद्य रघुजी भोसले यास इ. स. १७३८ मध्ये छत्रपती शाहूकडून लखनौ, मकसुदाबाद, बेदर, बितीया, बंगाल, बुंदेलखंड, अलाहाबाद, हाजिपूर, पाटणा ह्या प्रदेशांची सनद मिळाली. याशिवाय देवगड, गढामंडला (जबलपूर), भवरागड, चांदा या प्रांतांची चौथाई व मोकासाचे हक्क वसूल करण्याचा अधिकार रघुजी भोसले यास मिळाला.

रघुजी भोसले याने बंगालवर चार स्वाऱ्या करून तेथील नवाब अलिवर्दीखान यास सळो की पळो करून सोडले व १७५१ मध्ये सुवर्णरेखाचा तह झाल्यावर ओरिसा प्रांतावर भोसल्यांची सत्ता कायमची प्रस्थापित झाली. याशिवाय बंगाल, बिहार यांच्या चौथाईबद्दल रघुजीस १२ लाख देण्याचे नवाबाने मान्य केले.

रघुजीने चंद्रपूरवर स्वारी करून गोंड राजा निळकंठशहाचा पराभव केला व चंद्रपूरचे संस्थान नागपूर राज्यास जोडले.

रघुजीचा सेनापती भास्करपंत कोल्हटकर याने बंगालच्या पहिल्या मोहिमेच्या वेळी रतनपूर (छत्तीसगडची राजधानी) जिंकले व रायपूर, संबलपूरवर आपला अधिकार प्रस्थापित केला. छत्तीसगडातील संस्थाने भोसल्यांना खंडणी देण्याचे मान्य करून मांडलिक झाली. अशा प्रकारे छत्तीसगडवर मराठ्यांचा अंमल सुरू झाला व रघुजीने आपला मुलगा बिंबाजी यास तेथे सुभेदार नेमले. रघुजीचा मृत्यू १४ फेब्रुवारी १७५५ रोजी झाला. रघुजीने मराठ्यांची सत्ता पूर्वेकडील बंगालपर्यंत विस्तारित करून ओरिसा प्रांत कायमचा आपल्या अधिकारात आणला. मराठी संस्कृतीचा प्रभाव व प्रचार पूर्वेकडे मुर्शिदाबादपर्यंत प्रस्थापित झाला, याचे श्रेय आद्य रघुजीस द्यावे लागेल.

रामटेकचे माहात्म्य वृद्धिंगत होण्यासही रघुजी कारणीभूत होता. रघुजीच्या मृत्यूनंतर जानोजी भोसले (१७५५ ते १७७२) सेनासाहेब सुभा झाले. मुधोजी यास चंद्रपूर सुभा, बिंबाजी यास छत्तीसगड सुभा तर सांबाजी यास दारव्हा सुभा देण्यात आले.

जानोजीच्या कारकीर्दीत हैद्राबादच्या निजामअलीने वऱ्हाड प्रदेश जिंकण्यास सुरुवात केली आणि दोघांमध्ये शेवटी एलिचपूर येथे १७५७ मध्ये तह झाला. या तहाने वऱ्हाडातील उत्पन्नापैकी ४५% भोसल्यांनी तर ५५% निजामाने घ्यावे असे ठरले व वऱ्हाडात भोसले-निजामांची सत्ता सुरू झाली. त्यामुळे या प्रदेशाला दोअमली प्रदेश म्हणतात. नागपूरकर भोसल्यांना किंग ऑफ बेरार म्हणू लागले.

जानोजी-मुधोजी यांच्यात सेनासाहेब सुभा या पदावरून चार वर्षे संघर्ष सुरू होता. शेवटी नांदगाव राहाटगावच्या लढाईत (१७५९) जानोजीचा विजय झाला. पुढे माधवराव पेशव्यांनी नागपूरवर आक्रमण करून, जानोजीला मराठा संघावरील पेशव्यांचा अधिकार मान्य करण्यास भाग पाडले. भोसल्यांच्या यादवीमुळे जानोजीचे बंगालकडे दुर्लक्ष झाले आणि परिणामी प्लासीच्या युद्धाने (१३ जून १७५७) बंगाल प्रांतात इंग्रजी सत्तेने पाय

रोवला. जानोजीचा मृत्यू १७७२ मध्ये झाला. जानोजीला अपत्य नव्हते, त्याने आपला बंधू मुधोजी याचा पुत्र दुसरा रघुजी यास आपला उत्तराधिकारी म्हणून स्वीकारले होते. सांबाजीलाही नागपूरचे सेनासाहेबसुभा हे पद हवे होते, शेवटी मुधोजी व सांबाजी यांच्यात २६ जानेवारी १७७५ रोजी पाचगावची लढाई होऊन, सांबाजी मारला गेला आणि मुधोजी व दुसरा रघुजी यांचा मार्ग निष्कंटक झाला.

पहिल्या आंग्लमराठा युद्धात नाना फडणिसाने निर्माण केलेल्या ब्रिटिशविरोधी संघाचे सदस्य मुधोजी व निजाम यांना वॉरन हेस्टिंग्जने कटातून फोडले. या वेळी साडेतीन शहाण्यांपैकी एक देवाजीपंत चोरघडे यांनी नाना व इंग्रज ह्याच्यासमोर मुधोजीची बाजू उत्कृष्टपणे मांडली. शेवटी १७८२ मध्ये सालबाईचा तह होऊन पहिले इंग्रज-मराठा युद्ध थांबले. परंतु मराठा मंडळात मुधोजीची प्रतिष्ठा घसरली.

७ डिसेंबर १७८७ रोजी रतनपूर येथे बिंबाजीचा मृत्यू झाला. मुधोजीचा मृत्यू नागपूर येथे १९ मे १७८८ रोजी झाला. मुधोजीच्या मृत्यूने संपूर्ण सत्ता दुसऱ्या रघुजीकडे आली.

दुसऱ्या रघुजीचा कालखंड २८ वर्षांचा असून ह्या कालखंडाला भोसल्यांच्या इतिहासात सुवर्णयुग म्हणता येईल. कारण त्या कालखंडात राज्यात शांतता होती. त्याने नागपूर राज्याचा सर्व दृष्टीने विकास केला. त्याने नागपुरात अनेक उद्याने, तळी व मंदिरे निर्माण करून विकासाची कामे केली. १८ व्या शतकाच्या उत्तरार्धात नागपूर हे उद्याने व तळी ह्यांचे नगर म्हणून ओळखले जाऊ लागले. नागपूरच्या सौंदर्यात भर पडली. त्याने नागपुरात २० उद्याने निर्माण केली व उत्कृष्ट मंदिरांमध्ये गणली जाणारी सक्करदऱ्याचे लक्ष्मीनारायण मंदिर, तुळशीबागेतील मुरलीधर मंदिर, केळीबागेतील लक्ष्मीनारायण व गणेश मंदिर, महालातील नागेश्वर मंदिर, तेलंगखेडीतील कल्याणेश्वर मंदिर व इंदुलीबागेतील शिवमंदिर ही सारी मंदिरे बांधली. त्याने दुसऱ्या प्रांतातून संत्र्यांची रोपे आणून नागपूर व सभोवतालच्या प्रदेशांत संत्र्यांची लागवड केली. नागपूरची ख्याती सर्व जगात संत्रानगरी म्हणून झाली, याचे श्रेय



नागपूरकर भोसल्यांची नाणी.

दुसऱ्या रघुजीला आहे. त्यामुळे त्याला आधुनिक नागपूरचा शिल्पकार म्हणणे योग्य होईल. तो अतिशय धूर्त व मुत्सद्दी होता. त्याने शेवटपर्यंत तैनाती फौजेचा तह स्वीकारला नाही. त्यामुळे त्याला दुसऱ्या इंग्रज-मराठा युद्धात देवगावच्या (१७ डिसेंबर १८०३) तहाने पूर्वेकडील अर्धे राज्य गमवावे लागले. त्याच्या मृत्यूनंतर (१८१६) अवघ्या एका वर्षात अप्पासाहेब भोसल्यांनी तैनाती फौज स्वीकारली व भोसल्यांचे राज्य इंग्रजांच्या नियंत्रणाखाली आले.

१८१७ मध्ये झालेल्या सीताबर्डीच्या लढाईत अप्पासाहेबांचा पराभव झाला. त्यांना पदच्युत केले गेले. यानंतर दुसऱ्या रघुजीची कन्या बनुबाई गुजर हिचा मुलगा बाजीबा यास बाकाबाई (दुसऱ्या रघुजीची पत्नी) हिच्या सल्ल्याने १६ जून १८१८ रोजी तिसरा रघुजी या नावाने गादीवर बसविले. त्या वेळी तो १० वर्षांचा होता. सर्व सत्ता राणी बाकाबाई आणि ब्रिटिश रेसिडेन्ट जेकिन्स यांच्या हातात होती. १८१८ पासून नागपूर राज्यात इंग्रजांचा अंमल सुरू झाला आणि १८२६ पर्यंत तो होता. १८२६ मध्ये तिसरा रघुजी सज्ञान झाला व त्याच्याकडे राज्यकारभार सोपविण्याच्या दृष्टीने १२ डिसेंबर १८२६ रोजी तह झाला. पुढे १८२९ मध्ये झालेल्या तहानुसार चांदा, भंडारा, देवगड, छत्तीसगड हे प्रदेश तिसऱ्या रघुजीस परत मिळाले. ब्रिटिश रेसिडेन्टचा हस्तक्षेप दिवसेंदिवस वाढत गेला आणि रेसिडेन्ट व तिसऱ्या रघुजी यांच्यात बेबनाव निर्माण झाला. तिसऱ्या रघुजीला अपत्य नव्हते. ११ डिसेंबर १८५३ रोजी तिसऱ्या रघुजीचे वयाच्या ४७ व्या वर्षी निधन झाले. इंग्रजांनी नागपूरचे राज्य खालसा करायचे हे पूर्वीपासूनच ठरवले होते. कारण लंडन येथील मँचेस्टरमधील कापड-गिरण्यांना लागणारा कापूस व इतर कच्चा माल नागपूर प्रांतात मुबलक होता, तेव्हा लॉर्ड डलहौसी याने नागपूरचे

राज्य १३ मार्च १८५४ रोजी खालसा करून ब्रिटिश साम्राज्यात विलीन केले.

तिसऱ्या रघुजीने नागपूर येथे रुक्मिणी मंदिर परिसरात अतिशय देखणे असे शिवमंदिर (रघुराजेश्वर), मारोती व गणपती मंदिर, लक्ष्मीनारायण मंदिर अशी मंदिरे बांधली. या मंदिरांवरील शिल्पे वाखाणण्याजोगी आहेत. याशिवाय सोनेगाव येथे मुरलीधर मंदिर व पारडी येथे मुरलीधर मंदिर बांधले. या सर्व मंदिरांची शिखरे रेखीव व आकर्षक आहेत. त्याने लोकोपयोगी कामेही केली. महाराजबाग व तेलंखेडी बगीचा ह्यांचा विकास केला. नागपूरचा पहिला ॲलोपथिक दवाखाना त्यानेच सुरू केला. त्यानेच शहरातील गरिबांकरिता लंगरखाना सुरू केला.

पहिला रघुजी याने मराठ्यांचे साम्राज्य पूर्वेकडील दुर्ग, रायपूर, बिलासपूर, संबलपूर, ओरिसा तर उत्तरेकडील जबलपूर, गढा, मंडला, बालाघाट, छिंदवाडा, सौसंर, हौशंगाबाद व छत्तीसगड ह्या प्रांतांत प्रस्थापित केल्यामुळे मराठी भाषेचा व संस्कृतीचा प्रसार होण्यास भोसले यांची राजवट कारणीभूत ठरली. त्यामुळे अनेक मराठी कुटुंबे तेथे स्थायिक होऊन आजही ती गुण्यागोविंदाने नांदत आहेत. पूर्वेकडील बृहन् महाराष्ट्राचा निर्माता हा पहिला रघुजी होता दुसऱ्या रघुजीने मंदिर शिल्पाच्या क्षेत्रात अजोड कामगिरी केली. बगिचे, तळी, मंदिरे, शिल्पे व इमारती यांनी नागपूर एके काळी सजलेले होते. भोसल्यांनी आपले हे कार्यक्षेत्र नागपूर राज्यापुरतेच मर्यादित न ठेवता, राज्याच्या सीमेपलीकडे विशेष करून उत्तर भारतात मंदिरे निर्माण केली. भोसल्यांची मंदिरे बनारस, अलाहाबाद आणि अयोध्या येथे आहेत. अलाहाबाद येथे यमुना नदीच्या काठी बेनी मुधोजी मंदिर आणि नौबतखाना आहे. बनारसला गंगेच्या काठी भोसल्यांनी घाट बांधला. तसेच अयोध्या येथे शरयू नदीवरही भोसल्यांनी घाट बांधला. सर्व बांधलेल्या वास्तूंवर देखरेखीकरिता भोसल्यांनी आपल्यातर्फे दिवाण ठेवून खर्च ठरवून दिला. छत्तीसगडची राजधानी रतनपूर येथील टेकडीवर बिंबाजी भोसलेंनी रामाचे सुंदर देऊळ बांधले. ते प्रतिरामटेक तीर्थक्षेत्र म्हणता येईल.

आज पूर्वेकडे झाडीपट्टी व आमगावपर्यंत महाराष्ट्र प्रांत आहे. त्याचे सर्व श्रेय भोसले राजवटीस आहे, मध्यप्रांत व छत्तीसगड येथे अनेक गावांत व शहरांत ठिकठिकाणी मराठी कुटुंबे स्थायिक झालेली आहेत. याचे श्रेय भोसल्यांच्या १२५ वर्षांच्या राजवटीस आहे.

* * *






**मराठवाड्याच्या दृष्टीने यादवांचा राजवंश अत्यंत महत्त्व पूर्ण ठरतो. यादवांच्या पाचवा भिल्लम याने इ.स. ११८७ मध्ये देवगिरी येथे शहर वसवून किल्ला बांधला. या काळात संगीत, कला आणि वाङ्मय या क्षेत्रांत मोठी भर पडली. रामचंद्र यादवांच्या काळात 'चतुर्वर्ग चिंतामणी' या ग्रंथाची निर्मिती झाली. तसेच 'विवेकसिंधु' हा ग्रंथ आद्यकवी मुकुंदराजांनी लिहिला. ज्ञानदेवांचे मूळ गाव 'आपेगाव' हे गोदावरीकाठी आहे, तर वेरूळ येथील घृष्णेश्वर, परळी येथील वैजनाथ आणि औढा नागनाथ ही तीन ज्योर्तिर्लिंगे तसेच रेणुकादेवी, माहूर (जिल्हा नांदेड), तुळजाभवानी, तुळजापूर (जिल्हा उस्मानाबाद) जोगेश्वरी देवी (अंबाजोगाई / जिल्हा बीड) ही शक्तिपीठे आहेत.**

# मराठवाडा

**■ डॉ. अरुणचंद्र पाठक**

प्राचीन महाराष्ट्राच्या केंद्रस्थानी असलेल्या या भूभागास 'मराठवाडा' ही भौगोलिक संज्ञा प्राप्त होणे, ही योगायोगाची ऐतिहासिक निष्पत्ती आहे. या शब्दाचे 'मराठे' हे पूर्वपद 'महाराष्ट्र' या संस्कृत शब्दाचे अपभ्रष्ट रूप असून त्याचे उपपद 'वाडा' हे 'वाटक' या संस्कृत शब्दाचे तद्भव होय. 'वाडा' किंवा 'वाडी' ही उपपदे प्राचीन काळी दक्षिणेत प्रांतिक प्रशासकीय विभागासाठी लावलेली आढळतात. उदाहरणार्थ, गंगावाडी ९६००, नोलम्बवाडी ३२०० इत्यादी. 'मराठवाडी' या संज्ञेचा उल्लेख 'टिपू सुलतानाच्या' कारकिर्दीत प्रथम आढळतो. १८व्या शतकाच्या उत्तरार्धातील हा उल्लेख हैद्राबाद संस्थानातील मराठी भाषिक प्रदेशाच्या म्हणजे आजच्या 'मराठवाड्याच्या' संदर्भातील आहे. निजाम-अली-हजरत, मुख्यमंत्री सर सालारजंग पहिला याने १८७०च्या सुमारास राज्यात जिल्ह्यांची नव्याने निर्मिती केली व मराठी भागाचा 'औरंगाबाद' सुभा निर्माण करून त्याला 'मराठवाडी - मराठवाडा' असे नाव दिले.

गोदावरी नदी ही या प्रदेशाची मुख्य धमनी तथा जीवनवाहिनी आहे. आजच्या महाराष्ट्राच्या क्षेत्रफळाचा विचार करता मराठवाडा या प्रादेशिक

विभागाचे क्षेत्रफळ ६४,२८६.७चौ. किमी. आहे. म्हणजे साधारणपणे २१% इतके आहे. २००१च्या जनगणनेप्रमाणे, या प्रदेशाची लोकसंख्या १,५५,८९,३०७ आहे. लोकसंख्येचे हे प्रमाण महाराष्ट्राच्या १६ टक्के आहे. आजच्या मराठवाड्यात औरंगाबाद, जालना, परभणी, हिंगोली, बीड, नांदेड, उस्मानाबाद आणि लातूर असे आठ जिल्हे आहेत. भौगोलिकदृष्ट्या मराठवाड्याचा प्रदेश मुख्यत्वे बेसॉल्ट या काळ्या खडकाचा बनलेला आहे. मराठवाड्याचे दक्षिण पठार समुद्रसपाटीपासून सरासरी ३८१ मी. उंचीचे आहे. प्राकृतिकदृष्ट्या मराठवाड्याचे दोन भाग पडतात: पठारी प्रदेश व सखल प्रदेश. बालाघाटाच्या रांगा परभणी जिल्ह्यातून जातात व पुढे उस्मानाबाद जिल्ह्यात शिरून त्याचे दोन प्रादेशिक भाग पडतात:

१) ईशान्य आणि पूर्वेकडील पठार

२) नैर्ऋत्य व दक्षिण भागातील सखल प्रदेश

पर्वतांची तिसरी रांग औरंगाबाद, जालना आणि बीड जिल्ह्यांची विभागणी पठार व सखल प्रदेश अशी करते. बालाघाट, जालना डोंगर आणि अजिंठ्याचे डोंगर हे या प्रदेशातील प्रसिद्ध डोंगर होत. या प्रदेशातील गोदावरी, पूर्णा आणि मांजरा या नद्या मोठ्या व महत्त्वाच्या आहेत. मराठवाड्याच्या पाच जिल्ह्यांतून गोदावरी नदी वाहते. गोदावरीच्या खोऱ्यातील गाळाची जमीन कित्येक मीटर खोल आहे. या नैसर्गिक सुपीकतेमुळे मानव अश्मयुगापासूनच मराठवाड्याकडे आकृष्ट झाल्याचे दिसते.

ऋग्वेदातील दक्षिणापथ, महाभारतातील दंडकारण्य आणि रामायणातील व मत्स्यपुराणातील दक्षिणापथ यांमध्ये मराठवाडा प्रदेशाचा समावेश होतो. प्राचीन ऐतिहासिक काळापासून येथे मानवी अस्तित्वाच्या खुणा उपलब्ध होतात. गोदावरीच्या खोऱ्यात, मांजरा नदीच्या काठी; तांदुळजा, वागदेरी, गंगापूर, धणेगाव ह्या परिसरात मोठ्या प्रमाणात जीवाश्म उपलब्ध झाले आहेत. वडोळी वाघोली येथील प्रागैतिहासिक अवशेषांचा विचार करता, या काळात मराठवाड्यात घनदाट जंगल असावे, असे पुरातत्त्वज्ञ मानतात. मांजरा खोऱ्यातील जीवाश्म साधारणपणे एक लक्ष वर्षांपूर्वीचे आहेत. तर उत्तरपुराश्मयुगीन व मध्यपुराश्मयुगीन दगडी हत्यारे येथे विपुल प्रमाणात उपलब्ध झाली आहेत. मुंगीपैठण येथे मध्यपुराश्मयुगीन हत्यारे मिळाली. तर आपेगाव येथे ताम्रपाषाणयुगीन वसाहतींचे अवशेष मिळाले. या वसाहतींचा काळ इ.स.पूर्व १५६४ मानला जातो. मराठवाड्यातील मांनवी वस्ती सुमारे ७०,००० वर्षांपासूनची असावी. प्रारंभिक ऐतिहासिक काळात येथे जनपद संस्कृतीचे अस्तित्व होते.

मराठवाड्याच्या एकूण भूभागाचा विचार करता, येथे अश्मक (नांदेड जिल्हा), भोगवर्धन (औरंगाबाद व जालना जिल्हा), कुंतल (उस्मानाबाद व लगतचा प्रदेश), महाराष्ट्र (गंगाथडी), मूलक (औरंगाबाद व जालना जिल्ह्याचा दक्षिण भाग), पितनीक (औरंगाबाद जिल्ह्याचा नैर्ऋत्य भाग) यांसारखी जनपदे होती, असे काही इतिहास अभ्यासकांनी नोंदवले आहे. याविषयीचे उल्लेख ‘अष्टाध्यायी’ व ‘अंगुत्तरनिकाय’ यांमध्ये आहेत.

मराठवाड्याच्या सीमारेषा दक्षिण-पूर्व बाजूस अनुक्रमे कर्नाटकास व आंध्रप्रदेशास संलग्न आहेत. स्वाभाविकपणे, या भागात कन्नडशी व आंध्रप्रदेशाशी सांस्कृतिक अनुबंध दिसतो. येथील ग्रामनामांच्या उत्पत्तीचा शोध घेताना ही बाब काही प्रमाणात जाणवते. ऐतिहासिक काळामध्ये, येथे नंद साम्राज्याचा संबंध आला असावा. नवनंद डेरा याचा संबंध नांदेड या स्थानाशी लावण्यात येतो. अशोकाच्या शिला-लेखांतून पेतनिकांचा म्हणजे पैठणवासीयांचा उल्लेख येतो.

### राजवंश

पैठण ही सातवाहनांची राजधानी होती. या काळात, पैठण (प्रतिष्ठान), तेर (तगर), भोकरदन (भोगवर्धन) यांसारखी स्थाने पुढे आली. या स्थानांचा रोमबरोबर व्यापारी संबंध होता. सातवाहन काळात मराठवाड्याला राजकीय, सामाजिक व सांस्कृतिक क्षेत्रांत मोठी प्रतिष्ठा लाभली. याच काळात पितळखोरा व अजिंठा येथील प्रारंभिक लेणी खोदली गेली. गौतमीपुत्र सातकर्णी याने नहपान क्षत्रप, कर्दमक यांसारख्या शत्रूंना पराभूत करून महाराष्ट्र परकीय आक्रमणापासून वाचवला. पैठण व तेर येथील पक्वमृदा शिल्प (टेराकोटा) तसेच हस्तिदंती बाहुली हे महाराष्ट्राच्या कलाइतिहासातील प्रारंभिक टप्प्यातील मानदंड आहेत.


औरंगाबाद लेणे, ४-अ मधील बुद्ध.

इ. स. पू. २०० ते इ. स. २४० या काळात सातवाहनांनी महाराष्ट्राला खऱ्या अर्थाने वैभव प्राप्त करून दिले. स्वाभाविकपणे, मराठवाड्याचाही संपर्क आंतरराष्ट्रीय स्तरावर सर्वत्र प्रस्थापित झाला.

सातवाहनानंतर वाकाटक राजवंशाची सत्ता येथे होती. याच काळात अजिंठा लेणी व शिल्पचित्रे ह्यांची निर्मिती झाली. लेणी क्र. १६,१७,१९ व १,२ या गुंफा वाकाटक राजा हरिसेन याच्या काळात निर्माण झाल्या. अजिंठा, घटोत्कच येथील लेण्यांचा विकास ही कलाइतिहासाला लाभलेली एक मोठी देणगी मानावी लागेल. यानंतर राष्ट्रकूटांनी मोठे साम्राज्य उभे केले. प्रदीर्घ सत्ताकाळात वेरूळ, विशेषतः कैलास ह्या लेण्यांची निर्मिती झाली. याच काळात वेरूळ, धारूर, कंधार या स्थानांचा विकास प्रशासकीय केंद्रे म्हणून झाला. राष्ट्रकूट काळात वेरुळ येथे साकारलेले कैलास मंदिर ही जागतिक पातळीवरील अजोड कालकृती मानली जाते. राष्ट्रकुटांनंतर कल्याणचे चालुक्य यांनी तसेच कल्चुरी यांनी काही भागांवर राज्य केले. या काळात होट्टल, धर्मापुरी, जुन्नी यांसारख्या स्थानांचा विकास झाला. विक्रमादित्य सहावा याच्या काळातील अनेक शिलालेख नांदेड, बीड, लातूर या जिल्ह्यांत उपलब्ध झाले आहेत.

मराठवाड्याच्या दृष्टीने यादवांचा राजवंश अत्यंत महत्त्वपूर्ण ठरतो. यादवाच्या पाचवा भिल्लम याने इ. स. ११८७ मध्ये देवगिरी येथे राजधानीचे शहर वसवून किल्ला बांधला. या काळात संगीत, कला आणि वाङ्मय या क्षेत्रांत मोठी भर पडली. रामचंद्र यादवांच्या काळात 'चतुर्वर्ग चिंतामणी' या ग्रंथाची निर्मिती झाली. तसेच 'विवेकसिंधु' हा ग्रंथ आद्यकवी मुकुंदराजांनी लिहिला. ज्ञानदेवांचे मूळ गाव 'आपेगाव' हे पैठणजवळ गोदावरीकाठी आहे, तर वेरूळ येथील घृष्णेश्वर, परळी येथील वैजनाथ आणि औढा नागनाथ ही तीन ज्योर्तिर्लिंगे तसेच रेणुकादेवी, माहूर (जिल्हा नांदेड), तुळजाभवानी, तुळजापूर (जिल्हा उस्मानाबाद) याशिवाय जोगेश्वरी देवी (अंबाजोगाई, जिल्हा बीड) ही शक्तिपीठे मराठवाड्यात आहेत. यांना साधारणपणे यादवकाळात प्रसिद्धी मिळाली. यादवांच्या काळात शिल्प व स्थापत्य ह्यांचा विकास झाला. चारठाणा, अंबाजोगाई, अन्वा, जागजी, अर्धापूर, धारासुर, बीड, मानूर, ऐरंडेश्वर, माणकेश्वर, माहूर, मुखेड, पानगाव खरोसा या स्थानांवर उभी असलेली स्मारके ही तत्कालीन कला-वैभवाची साक्ष देतात. यादवांचा सेनापती खोलेश्वर तसेच जयत्रपालाचा पुत्र सिंघन हे पराक्रमी सेनानी होते. त्यांनी विविध लढायांबरोबरच दिलेल्या दानांतून तत्कालीन मठ-मंदिरांचा विकास झाला.

## साहित्य-परंपरा

ज्योतिषी शास्त्रज्ञ भास्कराचार्य यांचा मुलगा लक्ष्मीधर हा यादवांच्या दरबरातील एक पंडित होता. 'मिताक्षरा' या ग्रंथाचा कर्ता विज्ञानेश्वर हा मराठवाड्यातीलच होता. महानुभाव पंथाचे संस्थापक चक्रधर ह्यांचे वास्तव्य प्रामुख्याने गोदावरीकाठाच्या प्रदेशांत झाले. माहिमभटाने 'लीळाचरित्र' संकलित केले. महानुभाव साहित्यात भर घालणारे केसोबास यांचा 'सूत्रपाठ' शके १२०२, भगोदेव बासांचा 'पूजा असवर' शके १२०७, केसोबासांचाच 'मूर्तिप्रकाश' आणि महदाईसाचे कृष्णचरित्रपर 'छंदोबद्ध ढवळे' शके १२०७ हे पंथीय ग्रंथकार मराठवाड्यातीलच होत. देवगिरी येथील नरेंद्र याचे 'रुक्मिणीस्वयंवर' (शके १२५४), भास्करभट्ट बोरीकर यांचे 'शिशुपालवध' व

'उद्धवगीता' यांसारखे साहित्य निर्माण करणारे साहित्यिक या काळात झाले.

इराणी भाषेतील साहित्याची परंपराही या भागात होती. तांडकरतुरा– शुअरा (कवीचे चरित्र) ह्या–भागात नोंदवले गेले. 'ताज्किरा' या प्रकारात दक्षिणेतील पहिला कवी– शके१६७४ मध्ये औरंगाबाद येथे झाला. तर शाह– आशरफ बियाबानी याची 'व्यवसरहार' मनस्वी कथाकाव्य हिजरी ९०९ मध्ये (शके १४२६) अंबड, जिल्हा जालना येथे लिहिले गेले. संत एकनाथांच्या साहित्यरचनेचा, रामदासांच्या एकूण कर्तृत्वाचा, नरसीबामनी येथील नामदेवांचा व त्यांच्या हिंदी पद्यरचनेचा उल्लेख या भागातील साहित्य–परंपरेत करावा लागतो. पुढील काळामध्ये, अंबाजोगाई येथील दासोपंत (इ. स. १५५१ ते १६१५) हे अनंत संप्रदायाचे पुरस्कर्ते होते. त्यांनी सव्वा लक्ष ओव्यांचा 'गीतार्णव' हा ग्रंथ लिहिला. 'गीतार्थचंद्रिका' ही लघुटीका तसेच 'पासोडीपंचीकरण' ही रचना विशेष उल्लेखनीय आहे. उत्तर काळात, जालना जिल्ह्यातील रामानंद, अच्युतानंद यांसारख्यांनी एकनाथांपासून प्रेरणा घेऊन लिहिलेल्या संपादण्या व अन्य साहित्य महत्त्वाचे होते. मराठवाड्याची भूमी ही संतांची भूमी आहे. येथे ज्ञानेश्वर व नामदेव यांच्याबरोबरच विसोबा खेचर, गोरा कुंभार, जनाबाई, जगमित्रनागा याचबरोबर जनार्दन स्वामी, भानूदास, एकनाथ, रामदास याच भूमीतील आहेत. अर्वाचीन काळात ही परंपरा श्रीधरस्वामी, गीतावर्णकार दासोपंत मध्वमुनी, अमृतराय, उद्धव चिद्घन, वामन पंडितापर्यंत येते.

### इस्लामी राजवट

यादवांच्या वैभवाकडे आकर्षित होऊन अलाउद्दीनने दक्षिणेस स्वारी केली. यादवांचा पराभव झाला. पुढे मलिक कपूर याने देवगिरीवर आक्रमण करून यादवांचे अस्तित्व नष्ट केले. खीलजीनंतर महम्मद तुघलक याने राजधानी दिल्लीहून देवगिरी येथे आणली व देवगिरीचे नाव बदलून दौलताबाद केले. महम्मद तुघलकानंतर मराठवाड्याचा बराच भाग बहामनी साम्राज्यात समाविष्ट झाला. १५३८ नंतर बहामनी राज्याचे पाच भाग झाले. मराठवाड्याचा प्रदेश आदिलशाही, ईमादशाही, कुतुबशाही, बरीदशाही आणि निजामशाही यांत विभागला गेला. १६३३ मध्ये मोगल बादशहा शहाजहान याने दौलताबाद जिंकले. दक्षिणेचा सुभेदार म्हणून काही काळ औरंगजेब येथे होता. यानंतर १७२४ पासून मराठवाड्यावर आसफजाही घराण्याचे म्हणजे हैद्राबादच्या निजामाचे आधिपत्य होते.

मराठ्यांनी निजामाविरुद्धच्या अनेक लढायांत पालखेड (१७२८), उदगीर (१७६०), राक्षसभुवन (१७६३), खर्डा (१७९५) इत्यादींत निजामाचा पराभव केला. १७९५ मध्ये मराठवाड्याचा प्रदेश निजामाने पेशव्यांकडे सुपूर्द केला. सवाई माधवरावाच्या मृत्यूनंतर त्यावर पुन्हा निजामाने ताबा मिळवला. हैद्राबाद संस्थान भारतात विलीन होईपर्यंत (१७२४ ते १९४८) निजामाने इंग्रजांच्या आश्रयाने मराठवाड्यावर राज्य केले. स्वातंत्र्यपूर्व काळात हैद्राबाद स्टेट काँग्रेसच्या नेतृत्वाखाली निजामाविरोधी चळवळींना जोर चढला होता. रझाकारासारख्या धर्मवेड्या मंडळींनी मराठवाड्यातील प्रजेचा अनन्वित छळ केला. तथापि मराठवाड्यातील गोविंदभाई, नानल, श्रीनिवासराव बोरीकर, मुरलीधरराव कामतीकर, मुकुंदराव पेडगावकर, दिगंबरराव बिंदू, स. कृ. वैशंपायन, भगवानराव गांजवे, हुतात्मा पानसरे, दामोदर पांगरेकर, माणिकचंद्र पहाडे, बाबासाहेब वाघमारे, फुलचंद गांधी, देवीसिंग चौहान, बेथुजी, बाबूराव कानडे, हनुमंत बेंडे, गोळेगावकर, मेलकोटे, जमलापुरम्, केशवराव, अच्युतराव देशपांडे, काशीनाथराव वैद्य, अनंतराव भालेराव यांसारख्या मंडळींनी निर्धाराने प्रतिकार केला.

भारत सरकारने १३ ते १७ सप्टेंबर १९४८ मध्ये पोलीस कारवाई करून निजामाला शरण आणले आणि हैद्राबाद संस्थान भारतीय संघराज्यात विलीन केले. १ नोव्हेंबर, १९५६ रोजी मराठवाडा द्विभाषिक मुंबई राज्यात समाविष्ट करण्यात आला आणि १ मे, १९६० रोजी महाराष्ट्र एक घटक म्हणून समाविष्ट झाला.

### विविध कलाकृती

मध्ययुग आणि उत्तर मध्ययुग काळात मराठवाड्यात विविध कलाकृतींचा विकास झाला. यांमध्ये अजिंठा,

वेरूळ, औरंगाबाद येथील लेण्यांप्रमाणे घटोत्कच, माहूर, अंबाजोगाई, खरोसा धाराशीव या ठिकाणी ज्याप्रमाणे लेण्या निर्माण झाल्या, कंकालेश्वर मंदिर, बाडे त्याप्रमाणे प्रामुख्याने मध्ययुगीन काळात व बहामनी कालखंडात दौलताबाद, अंतुर (औरंगाबाद), नळदुर्ग व परांडा किल्ला (उस्मानाबाद जिल्हा), उदगीर व औसा किल्ला (जिल्हा लातूर), कंधार व माहूर किल्ला (जिल्हा-नांदेड), धारूर व धर्मापुरी किल्ला (जिल्हा बीड) अशा किल्ल्यांची निर्मिती व विकास झाला.

उत्तर काळात शहागंज मशीद (औरंगाबाद), सरफराज खानची मशीद (बिलवली), शहनशहा वलीर दर्गा (बीड), सोनपीर दर्गा (नांदेड), हजरत-शमशुद्दीनचा दर्गा (उस्मानाबाद) यांसारख्या स्थानांबरोबरच नवखंडा महल व सोनेरी महल (औरंगाबाद), अजिंठा व फर्दापूर येथील शाही हमाम, पर्तुर येथील खानखा, औरंगाबाद येथील पाणचक्की, दौलताबाद, बनीबेगम बाग खुल्ताबाद, बीबी का मकबरा, पाणचक्की (औरंगाबाद) यांसारख्या इस्लामिक स्थापत्याची साक्ष देणाऱ्या वास्तूंबरोबरच नांदेड येथील हुजूर साहिब सचखंड गुरुद्वारा यांची नोंद घ्यावी लागते.

### सद्य:स्थिती

स्वातंत्र्यानंतर संयुक्त महाराष्ट्राचा एक घटक म्हणून मराठवाड्याचा विकास होत आहे. येथे डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद; स्वामी रामानंद तीर्थ विद्यापीठ, नांदेड; कृषी विद्यापीठ, परभणी यां बरोबर वैद्यकीय व अभियांत्रिकी महाविद्यालये आहेत.

मराठवाड्याच्या एकूण क्षेत्रापैकी २,२५,४०० हेक्टर जंगलक्षेत्र आहे. तर मशागतीयोग्य पण पडीत जमीन २,१२,९०० हेक्टर आहे. लागवडीखालील क्षेत्र ६३,०२,१०० हेक्टर आहे. सिंचन प्रकल्पात जायकवाडी, माजलगाव, सिद्धेश्वर, मांजरा, निम्नतेरना, विष्णुपुरी (उपसासिंचन) यांसारखे प्रकल्प झाले आहेत. एकूण १,८२,६०० हेक्टर जमीन सिंचनाखाली असल्याची नोंद २००१च्या सांख्यिकीय अहवालातून मिळते.

सन २००१-२००२ सालच्या (सन १९९३-९४) स्थिर किमतीला महाराष्ट्र राज्याचे नोंदणीकृत व अनोंदणीकृत कारखान्यांतील एकूण उत्पादन ५५,३४५ कोटी रुपये होते. त्याच वर्षी मराठवाड्यातील आठ जिल्ह्यांचे उत्पादन केवळ ३,९३९ कोटी रुपये किंवा राज्य उत्पादनाच्या फक्त ७टक्के होते. जिल्ह्यांच्या औद्योगिक उत्पादनाची महाराष्ट्राच्या औद्योगिक उत्पादनाशी तुलना केल्यास औरंगाबाद जिल्ह्याचे प्रमाण मराठवाड्यात सर्वाधिक म्हणजे ३.९ टक्के आहे. इतर जिल्हे मात्र औद्योगिकदृष्ट्या खूपच मागासलेले आहेत. उदा. बीड व जालना ०.३ टक्के, नांदेड ०.८ टक्के, परभणी ०.४ टक्के, लातूर ०.४५ टक्के, उस्मानाबाद ०.३ टक्के तर हिंगोली केवळ ०.२६ टक्के आहे.

औद्योगिक उत्पादनाचे प्रमाण फार अल्प असल्यामुळे (औरंगाबाद वगळता) ७ जिल्ह्यांत औद्योगिक रोजगाराचे प्रमाणही किमान २.५ टक्के ते जास्तीत जास्त १० टक्केपर्यंत आहे. साहजिक या ७ जिल्ह्यांचे दरडोई उत्पन्न राज्य सरासरीपेक्षा ३० टक्के ते ५० टक्के कमी आहे. तसेच या जिल्ह्यांचा मानव-विकास निर्देशांकही फार निम्नस्तरावर आहे. मराठवाड्याचे जलद औद्योगिकीकरण करणे, हा त्यावर एक उत्तम उपाय होऊ शकतो. पर्यटन व सेवाक्षेत्र यांमध्ये मोठा विकास होऊ शकेल.

### संदर्भ :


१. काळे भगवान, संपादक
मराठवाडा : काल आणि आज, पृ.७२-७३, जालना
२. ठोसर डॉ. हरिहर
Historical Geography of Maharashtra and Goa, Indian Epigraphical Society Mysore, 2002.
३. Gazetteer of India Series - Nanded, Aurangabad, Parbhani, Osma-nabad, Distri of gazetteers. च्या आधारे.
४. Census of India, 2001 चा संबंधित खंड.


* * *









**कोकणातील लोकांचा शेती हा प्रमुख व्यवसाय असला, तरी तो कधीही संपन्नावस्थेत नव्हता. एकतर जमिनीतील चढ-उतारामुळे शेतीलायक जमीन फार कमी. शिवाय मोठ्या नद्यांच्या खोऱ्यातील सपाट भाग सोडल्यास मृदा कमी उत्पादन न देणारी. त्यातच वाहतुकीच्या सोयी फारशा विकसित न झाल्याने विशेषतः दक्षिण कोकणातील भाग बाजारपेठेपासून वंचित राहिला. मात्र या भागात बंदरे अस्तित्वात असल्यामुळे लोकांचा भर व्यापारउदिमावर अधिक होता. असा व्यापार अगदी पहिल्या-दुसऱ्या शतकापासून सुरू असल्याचे पुरावे आढळतात.**

# कोकण

**■ डॉ. फडके व्ही. एस.**

मुंबईकरांच्या दृष्टीने कोकण म्हणजे पूर्वीचा रत्नागिरी जिल्हा (आत्ताचे रत्नागिरी व सिंधुदुर्ग हे जिल्हे) अभिप्रेत असायचा. या भागात पिकणारे आंबे-फणस-काजू तसेच जांभ्या दगडापासून तयार झालेली लाल माती यांचा समावेशदेखील 'कोकण' या संकल्पनेत व्हायचा. भौगोलिकदृष्टीने पाहायचे झाल्यास सह्याद्रीच्या पश्चिमेकडील किनारपट्टीला लागून असलेला सर्वच भाग कोकणात मोडतो. मग त्यात रायगड, ठाणे व खुद्द मुंबईचे दोन्ही जिल्हे येतात. कोकण रेल्वेच्या संदर्भात तर कोकणचा विस्तार मंगलोरपर्यंत होतो. आपण महाराष्ट्राच्या संदर्भात विचार करत असल्याने सह्याद्रीच्या पश्चिमेकडील उत्तरेस दमणगंगा नदीपासून दक्षिणेस तेरेखोल खाडीपर्यंतच्या सर्व भागाचा कोकणात समावेश होतो. (क्षेत्रफळ-३०,७४६ चौ.किमी., २००१ लोकसंख्या-२४,८०७,३५७)



भगवान परशुराम – प्रचलित चित्र.

मात्र मुंबईचा विकास हा एक ऐतिहासिक योगायोग असल्याने व कोकणच्या इतर भागांतील लोकांना खेचणारा तो एक महानगरी चुंबक असल्याने त्याचा विचार स्वतंत्रपणे केला जातो. प्रस्तुत खंडातही तो तसा केला गेल्याने या लेखाचा प्रपंच 'मुंबईरहित कोकण' असा मर्यादित केला आहे.

**कोकण – अभिक्षेत्रीय संबंध**

महाराष्ट्र राज्याची निर्मिती होताना, इतर राज्यांप्रमाणेच, भाषा या आधारतत्त्वाचा उपयोग करण्यात आला. त्यामुळे पूर्वीच्या मुंबई इलाख्यात मध्यवर्ती असलेला (कोकण व देश) भाग, हैद्राबाद या निजामाच्या विलिनीकृत संस्थानातून अलग केलेला मराठवाडा त्याच्या शिरोभागी असलेला खानदेश आणि मध्य प्रांतातून (बेरार) बाहेर काढलेला वऱ्हाड किंवा विदर्भ असे काहीसे भिन्न मानसिकतेचे प्रदेश एकत्र जोडले गेले. पश्चिम महाराष्ट्रातील कोकण व देश हे भाग शिवछत्रपतींच्या वेळेपासून व त्याही पूर्वी बराच काळ एकोप्याने नांदत होते. देशावरील माल बाहेर पाठविण्यासाठी कोकणातील बंदरे वापरली जात होती. हा माल सह्याद्रीतील विविध खिंडींतून खुश्कीच्या मार्गाने बैलांच्या पाठीवरून कोकणातील खाड्यांच्या शिरोभागी असलेल्या राजापूर, चिपळूण, महाड, रोहा, कल्याण यांसारख्या शहरांपर्यंत आणला जाई. तेथून पडावांच्या साहाय्याने तो किनाऱ्यालगत वसलेल्या जैतापूर, दाभोळ, बाणकोट, चौल, सोपारा यांसारख्या बंदरांत येऊन निर्यात होत असे. कोकणातील अर्थव्यवस्था फारशी सुदृढ नसल्याने, तेथील लोक आपले नशीब कमावण्यासाठी देशावर जाऊ लागते. पेशवाईच्या काळात या प्रकारच्या स्थलांतराने विशेष जोर धरला. तरीदेखील कोकण व देश या दोन्ही प्रदेशांना स्वतंत्र ओळख होतीच.

कोणकोण (कोण डोंगरमाथा) या शब्दावरून कोकण हा शब्द तयार झाला असावा, असे एक मत आहे किंवा परशुरामाची माता कुंकणा हिच्यावरून कोकण हे नाव या प्रदेशाला मिळाले असावे, असेही मानतात. डांगमधील लोक या कुंकणा अथवा कोकणदेवीला भजतात. हरसुळापासून दोन कोसांवर नळदुणे या गावी या देवीचे स्थान आहे. जमदग्नी, परशुराम व रेणुका यांच्या मूर्ती कोकणदेव या नावाने या भागात पुजण्यात येतात. त्यांच्या वास्तव्याने पवित्र ठरलेली अनेक तीर्थे सबंध पश्चिम किनाऱ्यावर आहेत. परशुरामाच्या कर्तृत्वाशी विशेष संबंधित अशी वज्रेश्वरी, शूर्पारक (सोपारा), चिपळूण व गोवे ही चार स्थाने कोकणातच आहेत.

इसवी सनपूर्व चौथ्या शतकापासून कोकण हे नाव प्रसिद्ध आहे. बृहत्संहिता, राजतरंगिणी व चालुक्यांचे शिलालेख यांत कोकणाचे उल्लेख आढळतात. पेरिप्लस, प्लिनी, टॉलेमी, अल्बिरूनी इत्यादी प्राचीन ग्रंथकारांनीही कोकण या नावाचा उल्लेख केलेला आहे. इसवी सनपूर्व पाचव्या शतकापासून बाबिलोन, रोम इत्यादी दूरच्या देशांचा कोकण प्रांताशी व्यापार चालत होता.

इसवी सनपूर्व तिसऱ्या व दुसऱ्या शतकांत कोकण प्रांत मौर्यांच्या ताब्यात होता. पहिल्या शतकात महाराष्ट्र व कोकण या प्रदेशांवर सातवाहनांचे आधिपत्य होते. इ.स.च्या चौथ्या व पाचव्या शतकांत हा प्रांत कलचुरी राजांच्या अमलाखाली गेला. सहाव्या शतकात तेथे मौर्यांची सत्ता आली. सातव्या शतकात चालुक्य पुलकेशीने मौर्यांचे उच्चाटन करून तेथे आपली सत्ता स्थापिली. त्यानंतर तिथे शिलाहारांचा अंमल चालू झाला. तेव्हापासून ४५० वर्षांच्या कालावधीत २० शिलाहार राजांनी कोकणावर राज्य केले. इ. स. १२६० साली देवगिरीचा राजा महादेव याने कोकणावर स्वारी करून तो प्रांत आपल्या राज्याला जोडला. त्याने तेथे आपले प्रतिनिधी नेमले होते. त्यांना सर्वाधिकारी अथवा महाप्रधान अशी पदवी होती. इ. स. १३१८ मध्ये देवगिरीचे राज्य कोलमडले, तरी यादवांच्या वंशातील नागरदेव हा

१३४७ पर्यंत कोकणावर राज्य करीत राहिला. त्या वर्षी गुजरातच्या सुलतानाने नागरदेवाचा पराभव करून कोकण प्रांत जिंकला. मुसलमानी सत्ता तेथे पंधराव्या शतकाच्या अखेरीपर्यंत चालू होती. सोळाव्या शतकाच्या प्रारंभी पोर्तुगिजांनी कोकणात प्रवेश केला व आपली सत्ता हळूहळू वाढवली. शिवाजी महाराजांनी जंजिरा सोडून सर्व दक्षिण कोकणात आपली सत्ता स्थापली होती. पण उत्तर कोकणात पोर्तुगिजांचा अंमल इ.स. १७३९ पर्यंत चालू होता. त्या वर्षी चिमाजी अप्पा याने वसईचा किल्ला सर करून पोर्तुगिजांची तेथील सत्ता नष्ट केली व कोकणावर पेशव्यांची सत्ता स्थापिली, पण पुढे लवकरच तो प्रांत इंग्रजांच्या ताब्यात गेला.

रत्नागिरी जिल्ह्यातील चिपळूण, खेड, दाभोळ, संगमेश्वर, गव्हाणे, वेळगाव व वाडे-पडेल ही ठिकाणे तेथील शिलालेखांमुळे महत्त्वाची ठरली आहेत. या शिलालेखांत बरीच ऐतिहासिक माहिती मिळते. चिपळूणचा परशुराम, कोळथऱ्याचा कोळेश्वर, राजापूरची गंगाकुंडे इत्यादी कोकणातील देवक्षेत्रे व तीर्थक्षेत्रे प्रसिद्ध आहेत. कोकणातील ऐतिहासिक महत्त्वाची ठिकाणे म्हणजे तिथले किल्ले होत. शिवाजी महाराजांनी कोकणातले काही जुने किल्ले दुरुस्त केले तर काही नवे बांधले. त्यांतील विजयदुर्ग, सुवर्णदुर्ग, सिंधुदुर्ग, मालवण, पद्मगड, रायगड, विशाळगड हे किल्ले विशेष प्रसिद्ध आहेत. पद्मगडास महाराजांचा जहाजे बांधण्याचा कारखाना होता. कुलाबा व मालवण येथे आरमाराची मुख्य ठाणी होती. किल्ले व आरमार यांच्या बळावरच मराठ्यांनी आपला प्रभाव कोकणात कायम ठेवला होता.

**भूरचना**

सह्यकडा जवळ असल्यामुळे कोकण किनारपट्टीच्या रुंदीला मर्यादा पडल्या आहेत. दक्षिणोत्तर दिशेत सुमारे ७५० कि.मी. पसरलेली ही पट्टी जेमतेम ७० कि.मी. रुंद आहे. तिचा सर्वाधिक पूर्व-पश्चिम विस्तार (१०० कि.मी.) मुंबईच्या थोडासा उत्तरेला आढळतो. तेथेच उल्हास नदीच्या काळूसारख्या उपनद्यांनी मागे-मागे खोदत जाऊन सह्यमाथ्याला पूर्वेकडे हटविले आहे. हा भाग सखल असला, तरी त्याला मैदान म्हणता येत नाही. उलट अनेक छोट्या-छोट्या, अवखळ नद्यांनी वळणे घेत-घेत आपल्या मार्गात येणाऱ्या खडकांची झीज केल्याने त्याला डोंगराळ स्वरूप आले आहे. दक्षिण भागात किनाऱ्यालगत जांभ्या दगडाने आच्छादलेली सखल पठारे अगर 'सडे' आहेत.

दक्षिणेकडील तेरेखोल, गड, बाघोरन, मुचकुंदी, काजळी यांसारख्या नद्या पश्चिमवाहिनी आहेत व तेथील डोंगर पूर्व-पश्चिम पसरले असून ते थेट समुद्राला येऊन भिडतात. अशा समुद्रात घुसलेल्या दोन डोंगरांमध्ये नदी समुद्राला मिळते. त्यामुळेच नदीच्या मुखांशी बंदिस्तपणा आढळतो. तेथेच जुनी बंदरे आढळतात. मात्र काजळी, मुचकुंदी यांसारख्या काही नद्यांच्या मुखाशी वाळूचे दांडे तयार झाल्याने रत्नागिरी, पूर्णगड यांना फारशी चांगली बंदरे मानण्यात येत नसे. याउलट रतपार, जैतापूर-मुसाकाझी यांसारखी काही बंदरे अधिक सुरक्षित होती. दुर्दैवाने राजकारण आड आल्याने रतपार बंदर डावलले जाऊन बारमाही बंदराची माळ रत्नागिरीच्या गळ्यात पडली व तिच्या उपसागरात बंदर-उभारणी झाली. तेथे मान्सून काळात होणारी धूप सर्वश्रुत आहे. ती एक कायमची डोकेदुखी असून त्यामुळे मोठ्या प्रमाणावर आर्थिक नुकसान सोसावे लागत आहे. याऊलट रतपार बंदरात फिनोलेक्स कंपनीने स्वतःच्या उपयोगासाठी स्वतंत्र धक्का बांधला आहे.

उत्तर भागातील कुंडलिका, अंबा, उल्हास, वैतरणा, सूर्या यांसारख्या नद्यांवर मूळ खडकातील भेगांचा प्रभाव पडून त्यांचे प्रवाह दक्षिणोत्तर दिशेने वाहत आहेत. त्यामुळे तेथील डोंगरदेखील दक्षिणोत्तर दिशेने पसरले आहेत. या नद्यांच्या मुखाशीदेखील रेवदांडा, धरमतर, उत्तन, अर्नाळा यांसारखी बंदरे आहेत. मात्र ब्रिटिशांनी मुंबईचा बंदर म्हणून विकास केल्यानंतर सर्वच बंदरानी नांगी टाकली व आता सर्व निर्यात-माल मुंबई व तिचे जोडबंदर म्हणून ओळखल्या जाणाऱ्या जवाहरलाल नेहरू बंदर (न्हावा-शेवा) या बंदरांकडे वळतो. साहजिकच मुंबईच्या आसपासच्या प्रदेशाचा विकास मोठ्या प्रमाणात होऊन कोकणच्या इतर भागांकडे त्यामानाने दुर्लक्ष झाले.



सिंधुदुर्ग

किनारपट्टीची उंची पूर्वेकडे वाढत जाते (१५–२७५मी.). पश्चिमेकडील सखल भागाला 'खलाटी' असे म्हणतात. त्यात जांभ्या दगडाची पठारे किंवा सडे, नदी मुखांच्या भागात मैदाने, खाजणे, खार जमीन, मळे, कुर्याटे, बरकत अशी विविधगुणी जमीन आढळते. पूर्वेकडील डोंगराळ भागाला 'वतारी' असे म्हणतात व तो बराचसा भाग जंगलाखाली होता. आता तेथे जंगले तोडून शेती व आंबा–काजू यांसारखी फळशेती केली जाते. अतिपूर्वेकडील डोंगरपट्टीच्या भागात जमिनीचा उतार तीव्र असून त्यात बेसाल्टचे उभट कडे आढळतात. उत्तर कोकणात 'बंदरपट्टी' व 'डोंगरपट्टी' असे दोन विभाग मानण्यात येतात.

### हवामान व भूउपयोजन

कोकणची भूमी सह्याद्रीच्या संदर्भात नैर्ऋत्येकडून येणाऱ्या मोसमी वाऱ्यांच्या दिशेने पसरली असल्याने तेथे जून ते सप्टेंबर या काळात मुसळधार पाऊस पडतो. मात्र पावसाचे प्रमाण पूर्वेकडे उंचीनुसार वाढत जाते. त्याचबरोबर उत्तरेकडे जाताना वाढत्या अंतरानुसार ते कमी होत जाते. तरीदेखील भातशेतीला पुरेसा पाऊस सर्व भागात असतो. म्हणूनच आजही येथील मुख्य पीक भात आहे. वरकस भागात पावसाचे पाणी अडविण्याची सोय नसल्याने नागली, वरी यांसारखी भरडधान्ये अगर तीळ यांसारखी पिके घेतली जातात. किनाऱ्यालगत नारळ व थोडे आतल्या बाजूला सुपारीचे उत्पादन घेतले जाते. रायगडचा दक्षिण भाग व त्याला लागून असलेला रत्नागिरीचा उत्तर भाग सुपारीसाठी प्रसिद्ध आहे. मात्र दापोली–मंडणगड या भागातील सुपारी खाण्याऐवजी रंग काढण्यासाठी वापरली जाते.

मुसळधार पावसामुळे येथील मूळ अग्निजन्य बेसाल्ट खडकाची धूप होऊन त्यातील सिलिका व सोडिअम, पोटॅशिअम, कॅल्शिअम यांसारखे आम्लारी निघून गेले आहेत. तसेच उष्ण, दमट हवामानात लोह व ॲल्युमिनिअम यांचे ऑक्सिडिकरण होऊन अशा ऑक्साइड्सचे प्राबल्य असलेला जांभा दगड तयार झाल्याचे दिसते. पावसाचे प्रमाण उत्तरेकडे कमी होत असल्याने ही क्रिया उत्तरेकडे घटत जाते. या विदारित खडकापासून तयार होणारी मृदा निकस असली, तरी त्यात आंबा, काजू यांसारखी पिके चांगली निपजतात. त्यामुळे सिंधुदुर्ग, रत्नागिरी या जिल्ह्यांत त्यांचे पीक मोठ्या प्रमाणात आढळते.

किनारपट्टीवरील स्थानामुळे कोकणभूमीचे सागराशी अतूट नाते आहे. मासेमारी, मीठ उत्पादन व सागरी वाहतूक यांसारखे व्यवसाय या भागात विकसित झाले आहेत.



किल्ले रायगड.

खाडीलगत विस्तीर्ण मैदाने व अधिक क्षारता आढळण्याऱ्या उत्तर भागात मिठागराचे प्रमाण अधिक आढळते. मुंबईच्या प्रचंड विस्तारामुळे अशी मिठागरे आता हळूहळू नष्ट होत आहेत. 'आयोडीनयुक्त मीठ' यासारख्या नवीन संकल्पना पुढे आल्याने या मिठाची मागणीदेखील कमी होत आहे.

## अर्थव्यवस्था : कृषी

कोकणातील लोकांचा शेती हा प्रमुख व्यवसाय असला, तरी तो कधीच संपन्नावस्थेत नव्हता. एकतर जमिनीतील चढ-उतारामुळे शेतीलायक जमीन फार कमी. शिवाय मोठ्या नद्यांच्या खोऱ्यातील सपाट भाग सोडल्यास मृदा कमी उत्पादन देणारी. त्यातच वाहतुकीच्या सोयी फारशा विकसित न झाल्याने विशेषतः दक्षिण कोकणातील भाग बाजारपेठेपासून वंचित राहिला. मात्र या भागात बंदरे अस्तित्वात असल्यामुळे लोकांचा भर व्यापारउदिमावर अधिक होता. असा व्यापार अगदी पहिल्या-दुसऱ्या शतकापासून सुरू असल्याचे पुरावे आढळतात. या भागाचे लष्करीदृष्ट्या असलेले महत्त्व लक्षात आल्यामुळे अंतर्गत भागात नांदणाऱ्या राजसत्तांचे पाय या भागाकडे वळले. विजापूरच्या अदिलशाही सत्तेखाली शेतीमध्ये सुधारणा घडवून आणण्याचे जुजबी प्रयत्न झाले. खोती प्रथा त्याच काळात चालू झाली. १६ व्या शतकात हा भाग दुर्दैवाने पोर्तुगीज, डच, ब्रिटिश यांसारख्या वेगवेगळ्या परकीय सत्तांच्या ताब्यात गेला व त्यामुळे बंदरांचे तसेच शेतीचे अपरिमित नुकसान झाले. मराठा अमदानीत शेती सुधारण्याचे प्रयत्न झाले, मात्र त्याला चिरस्थायी स्वरूप लाभू शकले नाही.

पुढे पेशवाईच्या अस्तानंतर ब्रिटिशांची अनिर्बंध सत्ता आली. त्या काळात शेतकऱ्यांचे शोषण वाढले. शिवाय १८२२ च्या सुमारास मुंबईतील इमारतींच्या बांधकामासाठी

तेथील जंगलांची तूट होऊ लागली. जंगलतुटीमुळे जमिनीची झीज व धूप ह्यांचे प्रमाण वाढले. एकीकडे जांभा दगड बनवण्याच्या प्रक्रियेने वेग घेतला तर दुसरीकडे झिजेमुळे वाहून गेलेला गाळ अखेरीस बंदरांच्या मुखाशी साठून ती वाहतुकीस निकामी होत चालली. नद्यांच्या पात्रात टाकलेल्या गाळामुळे पारंपरिक जलसिंचन व्यवस्था कोलमडून पडली व शेतीचेही नुकसान झाले. शेतकऱ्यांच्या मनात गाव सोडून जाण्याचा विचार दृढ होऊ लागला.

## मुंबईचा विकास

याच सुमारास मुंबईची उभारणी सुरू झाली होती. त्यासाठी अकुशल मजुरांची आवश्यकता होतीच. त्यातच ब्रिटिशांनी बोट वाहतूक सुरू केल्यामुळे कोकणातील लोकांना मुंबईस येणे सुकर झाले. पुढे मुंबई बंदराचा विकास होऊन कापड गिरण्या सुरू झाल्यानंतर कोकणातील लोक गिरणी व गोदी कामगार म्हणूनही दाखल झाले. पुढे सुशिक्षित लोकदेखील वेगवेगळ्या कार्यालयांत काम मिळविण्यासाठी मुंबईत येऊ लागले. अशा तऱ्हेने धडधाकट, कुशल, सुशिक्षित अशा सक्षम मनुष्य बलाचे स्थलांतर झाल्याने उर्वरित कोकण ओस पडू लागला. तेथील शेतीची आणखीनच आबाळ झाली. शेतीकडे व्यवसाय म्हणून जवळ-जवळ दुर्लक्षच झाले आणि कोकणात मागे राहिलेल्या लोकांची नाळ मुंबईतील चाकरमान्यांकडून येणाऱ्या धनादेशाशी जोडली गेली.

कोकणातील जमीन फळपिकांसाठी योग्य असल्याने, तो एक आशेचा किरण होता. मुंबईची बाजारपेठदेखील दिवसेंदिवस विस्तारत होती. मुंबई शहराशी संलग्न असलेल्या ठाणे जिल्ह्याने या गोष्टीचा चांगला फायदा करून घेतला. दूध, फुले, भाजीपाला यांसारखा नाशवंत मालाचे उत्पादन येथे केले जाऊ लागले व तो माल रेल्वेतून मुंबईला येऊ लागला. पुढे-पुढे केळी, फळभाज्या, चिकू, पेरू, विड्याची पाने यांसारख्या कमी नाशिवंत मालाचे उत्पादनदेखील होऊ लागले. त्याचबरोबर या प्रकारच्या बाजाराभिमुख शेतीचा पट्टा पालघर, डहाणू यांसारख्या दूरवरच्या भागांत सरकू लागला. मात्र या व्यवसायाला खरे व्यापारी स्वरूप दिले ते पर्शियाच्या आखातातून या भागात स्थलांतरित झालेल्या पारशी व इराणी लोकांनी. त्यांनी चिकू, पेरू यांसारख्या परंपरागत फळांबरोबर या भागात सहसा न पिकणाऱ्या लिचीसारख्या महागड्या फळाचे उत्पादन सुरू करून महामुंबई बाजारपेठेचा फायदा उठविला. किनाऱ्यापासून दूर परंतु रेल्वेमार्गालगत असलेल्या रेताड जमिनीत गवताचे उत्पादन निघू लागले व ते गवत मुंबईत पाळलेल्या दुभत्या जनावरांसाठी रवाना होऊ लागते.

रत्नागिरी, सिंधुदुर्ग यांसारख्या जिल्ह्यांना संलग्नतेचा हा लाभ नसल्यामुळे तेथील शेतकऱ्यांनी आंबा, काजू यांसारख्या अधिक टिकाऊ फळांची शेती करण्यावर भर दिला. पूर्वी आंब्याची वाहतूक शिडांच्या गलबतांनी होत असे. त्यामुळे प्रत्यक्ष वाहतुकीस वेळ लागेच. शिवाय आंबा गलबतावर येऊन पडेपर्यंत व गलबतावरून बाजारात येईपर्यंत आणखी काही काळ जाई. त्यात आंब्याचे नुकसान होण्याची शक्यता अधिक होती. दलालांच्या हातांत व्यापारची सूत्रे असल्याने त्यांची मनमानी होतीच. आजच्यासारखी जलद संदेशवहन व्यवस्थाही नव्हती. त्यामुळे शेतकऱ्यांच्या अज्ञानाचा फायदा उठवून दलाल त्यांना फारसा लाभ देत नसत.

आता गावोगावी रस्ते झाल्यामुळे व लोक रस्ता वाहतुकीकडे वळल्यामुळे दक्षिण कोकणातून मुंबईला आंबा येण्याचा कालावधी खूपच कमी झाला आहे. वर्तमानपत्रे, रेडिओ, दूरदर्शन, दूरध्वनी यांसारख्या माध्यमांतून आंब्याचा भावदेखील शेतकऱ्याला रोजच्या रोज कळतो. त्यामुळे या शेतीतून मिळणाऱ्या लाभाचे प्रमाण वाढत आहे. त्यामुळेच अधिकाधिक लोक परंपरागत शेतीकडे पाठ फिरवून आंबा व काजू यांच्या लागवडीखालील क्षेत्र वाढवीत आहेत. आता तर काही कृषि-उद्योजक आंबा परदेशातदेखील पाठवू लागले आहेत. त्यासाठी पिकाऊ कोठडी (Ripening Chamber) यासारखी पायाभूत सोय अस्तित्वात येत आहे. आर्थिकदृष्ट्या शेतकरी अधिक सक्षम होत आहे. मात्र त्याबरोबर पुष्कळ शेतकऱ्यांचा कल 'केवळ हापूस' असा

असल्याने जैविक विविधता कमी होत आहे. रायवळ आंब्याची बऱ्याच प्रमाणावर तोड झाल्याने पुढे कलमांसाठी आवश्यक 'वाण' मिळणेदेखील दुरापास्त होईल. शिवाय वरून नितळ, पिवळ्या दिसणाऱ्या पण प्रक्रिया केलेल्या आंब्याला पूर्वीचा रंग, गंध व स्वाद राहिलेला नाही; ही शोकांतिका आहे.

रायगड जिल्ह्यातील हवामान आंबा व काजू ह्यांच्या लागवडीसाठी तितकेसे अनुकूल नसल्यामुळे तेथील लोकांनी नारळ व सुपारी या पिकांवर भर दिला. मुंबईजवळ असलेल्या उत्तर भागात कुक्कुटपालनाचा व्यवसाय विकसित झाला आहे.

## वनसंपत्ती

कोकणातील वने निसर्ग-सौंदर्याच्या दृष्टीने मोहक असली, तरी आर्थिकदृष्ट्या फारशी महत्त्वाची नाहीत. मात्र सह्याद्रीच्या पश्चिम उतारावर होणाऱ्या जोरदार पर्जन्यवृष्टीपासून पाणलोट भागातील मृदेचा संवर्धनाच्या दृष्टिकोनातून चांगला उपयोग होत असे. शिवाय उत्तर कोकणात, विशेषतः ठाणे जिल्ह्यात आढळणारा सागवान व्यापारीदृष्ट्या अतिशय महत्त्वाचा आहे. दक्षिणेकडे सागवानाचे प्रमाण कमी होत जाते व किंजड, नाणा, ऐन, इत्यादी वृक्षांचे प्रमाण वाढते. जंगलात आंबा, फणस, कोकम, हिरडा, बेहडा, जांभूळ, गेळा, इत्यादी झाडोरा तसेच पळसवेल, गुळवेल, शिकेकाई, इत्यादी वेली आढळतात. काही वृक्षांपासून जळाऊ लाकूड, गुरांना वैरण आणि औषधी मिळतात. या औषधांचा उपयोग करून आजार बरे करणारे वैदू कोकणात होते. आता बऱ्याच ठिकाणी दवाखाने झाल्याने लोकांनी त्यांच्याकडे पाठ फिरविली आहे. शिवाय या बाबतीत कमालीची गुप्तता पाळली गेल्याने, हे ज्ञान नष्ट होत चालले आहे. आता तर मूळच्या वनांवर वेगवेगळ्या कारणांमुळे आक्रमण चालू आहे. या आक्रमणांची सुरुवात ब्रिटिशांनी केली, असा आरोप आपण करत असलो; तरी त्यांचा वारसा आपणही चालूच ठेवला आहे. त्यामुळे सह्याद्रीचा पश्चिम उतार उजाड व विदीर्ण झाला आहेच शिवाय त्यातूनच कोकणातील पाण्याचा प्रश्नही अधिक बिकट होत चालला आहे.

## खनिजसंपत्ती

लाव्हारसाच्या उद्रेकाने तयार झालेल्या कोकणच्या बऱ्याचशा भागात खनिजे आढळत नाहीत. सिंधुदुर्ग जिल्ह्यात मात्र लाव्हारस न पोचल्याने तेथे ग्रॅनाइट, क्वार्टसाइट व त्यात मागून तयार झालेले शीस्टसारखे खडक आढळतात. शीस्ट या खडकात लोह, मँगॅनीज, क्रोमाइट इत्यादींची धातुके थोड्या प्रमाणात आढळतात. माफक प्रमाणात होणारे यांचे उत्पादन जपानला निर्यात केले जात असे. आता हे उत्पादनही कमी होत आहे. जांभीभवनामुळे निर्माण झालेले बॉक्साइट काही ठिकाणी सर्व जिल्ह्यांत आढळते. त्याचे उत्पादन एकतर जपानकडे निर्यात होते नाहीतर बेळगावकडे शुद्धीकरण कारखान्यात पाठविले जाते. रत्नागिरी व सिंधुदुर्ग ह्या जिल्ह्यांत किनाऱ्यांवरील वाळूत इल्मेनाइट हे टिटॅनिअमचे धातुक सापडते. त्याचा उपयोग पुढे होईल अशी आशा आहे. सध्या मात्र त्याचे उत्पादन केले जात नाही. कोकणात आढळणारे ग्रॅनाइट, बेसाल्ट इत्यादी खडक व त्यांच्या धुपेतून तयार होणारा जांभा दगड ह्यांचा उपयोग बांधकामासाठी होतो. त्यांपैकी कमी मूल्यवान खडकांपासून खडीदेखील मिळते.

## पर्यटन व्यवसाय

वनाच्छादित पट्टे, खळखळणारे धबधबे, स्वच्छ किनारे, किनाऱ्यावर येऊन फुटणाऱ्या लाटा व त्यातच भरीला नारळी-पोफळीची आगरे, सुरूची वने यांमुळे पर्यटक कोकणाकडे आकर्षित होतात. किनाऱ्यालगत आढळणारे अर्नाळा, वसई, कुलाबा, कोडाई, मुरूड-जंजिरा, सुवर्णदुर्ग, विजयदुर्ग, सिंधुदुर्ग यांसारखे जलदुर्ग तसेच कुणकेश्वर, दिवेआगर, हरिहरेश्वर, आंजर्ले, गुहागर, वेळणेश्वर, हेदवी, गणपतीपुळे, पावस इत्यादी ठिकाणची मंदिरे पर्यटकांना खेचून घेतात. याशिवाय जव्हार, सूर्यमाळ, माथेरान, दापोली, आंबोली यांसारखी उंच ठिकाणे थंड हवेसाठी नावाजलेली आहेत. पूर्वी पर्यटकांना आपली घरगुती सोय करून घ्यावी लागत असे. आता महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाने अनेक ठिकाणी राहण्याच्या व

खानपानाच्या सोयी उपलब्ध करून दिल्यामुळे पर्यटनाला वेग आला आहे. त्यात सिंधुदुर्ग जिल्हा पर्यटन जिल्हा म्हणून विकसित होत आहे.

### उद्योगधंदे

कोकणच्या औद्योगिकीकरणाची नाळ मुंबईशी जोडलेली आहे. त्याचा संबंध स्थानिक कच्चा माल अगर मजूरवर्ग यांच्याशी नाहीच. खुद्द मुंबईतदेखील कच्चा माल, मजूर, भांडवल, उद्योजक सारेच बाहेरून आलेले. आयात-निर्यातीसाठी बंदराची उत्तम सोय व दळणवळणाची कार्यक्षम व्यवस्था यांवर मुंबईचे उद्योग उभे राहिले आहेत. तेथे अवाजवी गर्दी झाल्यानंतर त्याच उद्योगांना पुढील विस्तारासाठी बाहेरची दिशा दाखविण्यात आली. त्यामुळेच उद्योगधंदे प्रथम ठाणे-कल्याण-अंबरनाथ; नंतर तारापूर, रसायनी, खोपोली, धारान, नागोठणे, महाड, लोटे-परशुराम असे हळूहळू दूरवर पसरले. प्रथम हवेहवेसे वाटणारे उद्योगिकीकरण नंतर मात्र नकोसे वाटू लागते, कारण त्यामुळे फायद्यापेक्षा तोटेच अधिक होत असल्याचे जाणवू लागले. आता तर स्थानिक पातळीवर विशेष औद्योगिक क्षेत्रांना (सेझ) विरोधच होत आहे. आंबा, काजू, जांभळे यांसारख्या स्थानिक कच्च्या मालावर उभारलेले उद्योगधंदे मात्र दिवसेंदिवस वाढत आहेत.

### अंतर्गत प्रादेशिक संबंध

दक्षिणोत्तर विस्तार असलेल्या कोकणच्या डोंगराळ भागात अंतर ही एक महत्त्वाची डोकेदुखी होती. त्यामुळेच कोकणवासियांचे संबंध आपापसापेक्षा 'देश'वासियांशी अधिक घनिष्ठ होते. असे संबंध अर्थातच व्यापारी पूरकतेतून निर्माण झाले होते. पुढे ब्रिटिशांनी या भागावर सत्ता प्रस्थापित केल्यानंतर मुंबईचा विकास करण्याच्या दृष्टिकोनातून त्यांना मजूर व इतर कामगार ह्यांची गरज भासू लागली. कोकणातील स्वस्तात मिळणाऱ्या मजुरांना आकर्षित करण्यासाठी त्यांनी बोट वाहतूक सुरू केली. त्यातून कोकणातील वेगवेगळे भाग व मुंबई यांचे अतूट नाते जुळून आले. तरीदेखील एका भागाचे संबंध दुसऱ्या भागाशी क्वचितच येत. असे संबंध पुढे-पुढे जुळून येऊ लागले ते मुंबईतील वास्तव्यातून. स्वातंत्र्योत्तर काळात तर रस्त्यांचा विकास होऊन राज्य परिवहन महामंडळाच्या गाड्या गावोगावी धावू लागल्या. वेगवेगळ्या भागांना जवळून पाहण्याची संधी कोकणवासियांना उपलब्ध झाली. यामुळे अंतर्गत संबंधांचे दृढिकरण झाले.

### सामाजिक विविधता

कोकण हा अठरापगड जाती-जमातींचा प्रदेश मानला जातो, कारण त्यात विविध वांशिक, धार्मिक व भाषिक लोकांची वस्ती आहे. सर्व गट-उपगटांचा नामनिर्देश करणे जागेअभावी शक्य नसले, तरी त्यांतील प्रमुख जाती-जमातींचा उल्लेख टाळणे केवळ अशक्य आहे.

महार हा कोकणचा मूळ रहिवासी मानला जातो. आजही परंपरागत धार्मिक कृत्यांमध्ये त्यांना योग्य तो मान दिला जातो. महारमूळ, महारधन यांसारख्या गोष्टी त्याचेच द्योतक मानायला हव्यात. आज मात्र या लोकांचे प्रमाण अत्यल्प आहे.

गावित ही कोकणातील मच्छीमार जमात असून या लोकांचे वास्तव्य प्रामुख्याने रत्नागिरी व सिंधुदुर्ग ह्या जिल्ह्यांत आढळते. शिवाजी महाराजांच्या काळात या लोकांनी आरमारात काम केले असल्यामुळे त्यांना मुळात 'आरमारी मराठा' असे म्हणत. हेदेखील कोकणातील जुने रहिवासी आहेत.

चित्पावन ब्राह्मणाला 'कोकणस्थ' असे म्हटले जात असले आणि कोकणची संस्कृती घडविण्यात त्याचा सिंहाचा वाटा असला, तरी त्यांची शरीरयष्टी, डोळे व कातडीचा रंग इत्यादींवरून वांशिकदृष्ट्या त्यांची जवळीक इराणी व युरोपीय लोकांशी वाटते. म्हणूनच ते येथे स्थलांतरित झाले असल्याचे मानण्यात येते. मात्र हे लोक इथे इतके बेमालूम मिसळून गेले आहेत की, त्यांनी कोकणच्या सांस्कृतिक जीवनावर आपला ठसा उमटविला. पुढे येथून ते देशावर गेले व पेशवाईच्या अस्तानंतर मुंबईकडे वळले. कऱ्हाडे, देशस्थ हे देशावरून येऊन स्थायिक झालेले लोक आहेत.

राजापूरच्या आसपास आढळणारा 'राजापुरी सारस्वत ब्राह्मण' हादेखील एक महत्त्वाचा गट मानला जातो. ते

गोव्यातील कवळ्याहून येथे आले. आज ते सिंधुदुर्ग जिल्ह्यातही मोठ्या प्रमाणावर पसरले आहेत.

दैवज्ञ ब्राह्मण हा प्रामुख्याने सुवर्णकारांचा समाज, किनारी भागात आढळतो. वसईच्या आसपास आढळणारे सामवेदी किंवा शामेदी हे मूळचे ब्राह्मण. चंद्रगुप्त मौर्याच्या काळात ओरिसा राज्यातील पुरी येथून ते स्थलांतरित झाले. पोर्तुगीज धर्मप्रचारकांनी त्यांना बाटवून ख्रिश्चन केले. व्यवसायाने शेतकरी असल्यामुळे त्यांनी मुंबईच्या बाजारात विकल्या जाणाऱ्या दूध, भाजीपाला यांसारख्या मालाचे उत्पादन सुरू केले व त्यावर आपली प्रगती साधून घेतली. पुढे त्यांनी आपल्या मुलांना उच्चशिक्षित केले. आज हे लोक देशी-परदेशी विविध व्यवसायांत गुंतले आहेत. मात्र त्यांनी जमिनीशी जोडलेले आपले नाते अजूनही जपले आहे. सांडोरसारख्या छोटेखानी, हरित शहराच्या परिसरात फिरल्यास याचे सहज प्रत्यंतर येते.

स्थानिक माणूस व पोर्तुगीज यांच्या संकरातून निर्माण झालेला ख्रिश्चन समाज 'ईस्ट इंडियन' या नावाने ओळखला जातो. मराठा हा कोकणातील आणखी एक महत्त्वाचा समाजगट असून तो येथे स्थलांतरित झालेला आहे. देवगिरीचा पाडाव झाल्यानंतर शिर्के, जाधव, सुर्वे, सावंत यांसारखी मराठी कुटुंबे कोकणाकडे वळली. पुढे मुसलमानी अमदानीत मोहिते, मोरे इत्यादी राजघराणी देशावरून कोकणात उतरली. त्यांनी आपल्याबरोबर आपले बारा बलुतेदारही आणले व त्यामुळे कोकणातील विविधता अधिक संपन्न झाली.

किनारी भागात मुसलमान लोकांचे वास्तव्य आहे. त्यांचा संबंध अरब व्यापाऱ्यांशी जोडला जातो. यांना 'जमाती' म्हणतात. काही मुसलमान हे बाटलेले हिंदू आहेत. मोडक, देशमुख, दलवाई यांसारख्या आडनावांवरून हे स्पष्ट होते. त्यांना महीगीर असे संबोधतात. जमाती लोक शेती करतात. महीगीर मासेमारी व्यवसायात गुंतले आहेत. याशिवाय या समाजाचे लोक मर्चंट नेव्ही, जहाज बांधणी व वस्त्रोद्योग यांमध्येही गुंतले आहेत.

कोकणातील लोकांत वनवासींचे प्रमाण दहा टक्क्यांवर आहे. ते उत्तर भागात अधिक तर दक्षिणेकडे अत्यल्प आहे. आदिवासींमध्ये वारली लोकांचे प्राबल्य असून त्यांची वस्ती प्रामुख्याने ठाणे जिल्ह्याच्या दुर्गम भागात आढळते. मल्हार कोळी हे ठाणे जिल्ह्याच्या आग्नेय भागात असून महादेव कोळी समाज रायगड व रत्नागिरी ह्या जिल्ह्यांत विशेषत्वाने आढळतो. ठाकूर प्रामुख्याने रायगड जिल्ह्याच्या ईशान्य भागात व त्याला लागून असलेल्या ठाणे जिल्ह्याच्या भागात आढळतात. कातकरी लोकांचे वास्तव्य रत्नागिरीत व रायगड जिल्ह्यात आहे. याशिवाय कोकणा, ढोर कोळी, दुबळा, धोडिया इत्यादी आदिवासी जमाती, विशेषतः ठाणे जिल्ह्यात, अल्प प्रमाणात आढळतात. महादेव व मल्हार कोळी हे व्यवसायाने शेतकरी असून मासेमारीदेखील करतात. ठाकूर मुख्यतः जंगलातून लाकूडफाटा आणण्याचे काम करतात. कातकरी पूर्वी कात पाडीत. आता जंगलकटाईसाठी मजूर म्हणून काम करतात. वारली लोक प्रामुख्याने शेतमजूर म्हणून काम करतात. आता मात्र आदिवासींमध्ये जागृती झाली असून ते इतर व्यवसायांतही गुंतल्याचे आढळते.

धार्मिकदृष्ट्या कोकणात हिंदूधर्मीय बहुसंख्य असून त्यांचे प्रमाण ८०टक्क्यांच्या वर आहे. त्यानंतर क्रमांक लागतो मुस्लीम बांधवांचा. मात्र त्यांचे प्रमाण १०टक्क्यांहूनदेखील कमी आहे. या समाजातील बहुसंख्य लोक शहरवासी आहेत. इतर धर्मांचे लोक ठरावीक भागात केंद्रित आले आहेत. उदाहरणार्थ, जैन व ख्रिश्चन धर्माचे लोक ठाणे जिल्ह्यात अधिक तर बौद्ध धर्मीय लोक रत्नागिरीत अधिक आहेत. गोव्याच्या सान्निध्यामुळे सिंधुदुर्ग जिल्ह्यात ख्रिश्चन लोकांचे प्रमाण बऱ्यापैकी आहे.

भाषिक गटांमध्ये मराठी भाषिकांचे प्रमाण अपेक्षेप्रमाणे सर्वाधिक आहे. त्याखालोखालचा गट हा उर्दू भाषिकांचा असून हे लोक बरेच विखुरलेले आहेत. हिंदी, गुजराती, सिंधी व इतर भाषिक हे ठाणे जिल्ह्यात विशेष प्रमाणात आढळतात. हा मुंबईच्या सान्निध्याचा परिणाम आहे. सिंधी भाषिक फाळणीनंतर पाकिस्तानातून येऊन स्थायिक झाले आहे.

कोकणात पूर्वी परदेशांतून आलेले पारशी, ज्यू, हबशी व अरब यांचे वंशज अद्यापि तेथे आढळतात. पोर्तुगीज व हबशी यांनी हजारो हिंदूंना बाटवल्यामुळे कोकणात ख्रिस्ती व मुसलमान यांचीही वस्ती बरीच आहे. कोकणातील

हिंदूंच्या चित्पावन (कोकणस्थ), सारस्वत, कऱ्हाडे, देवरुखे, वाणी, लिंगायत, कुणबी, मराठे, गाबित, महार, चांभार आदी मुख्य जाती आहेत. हे लोक शिव, विष्णू आदी देवतांव्यतिरिक्त भैरोबा, रवळनाथ, वाघजई, म्हाळसा, मंगेश, नागेश, शांतादुर्गा आदी देवतांना भजतात. वेताळ, समंध, देवचार, मुंजा, म्हसोबा, लावसट इत्यादी भुताखेतांना भजण्याचीही प्रथा आढळते.

हिंदूंच्या अन्य सणांप्रमाणे नागपंचमी, नारळीपौर्णिमा, गौरीगणपती, गोकुळाष्टमी व शिमगा या सणांना कोकणात विशेष महत्त्व असते. उत्सवांत व जत्रेच्या वेळी दशावतारी खेळ होतात. अशा प्रसंगी विविध नृत्येही केली जातात. त्यांत गौरीचा नाच, राधानृत्य, काठखेळ, रोमट इत्यादी प्रकार विशेष उल्लेखनीय आहेत. कोकणातील ख्रिस्ती लोक म्हणजे बाटलेले हिंदूच असल्यामुळे त्यांच्या बऱ्याच चालीरिती हिंदूप्रमाणेच आहेत. त्यांच्यातील जातिभेदही पूर्वीसारखाच आहे.

आत्ताचे कोकण ४०-५० वर्षांपूर्वीच्या कोकणाच्या मानाने खूपच बदलले आहे. विद्युतीकरण, वाहतूक व संदेशवहन यांची सुकरता, बाजारपेठेचा विस्तार व वाढती निकटता यांमुळे त्यात गतिमानता आली आहे. पूर्वी कोकणवासियांची मानसिकता मुंबईकडे जाण्याची होती व त्यामुळे कोकण ओस पडले की काय, अशी धास्ती वाटत होती. आता परिस्थिती बदलली असून तेथील लोकांना उत्पादक-व्यवसाय उपलब्ध होत आहेत. काम निर्माण करण्यासाठी आवश्यक असलेली इच्छाशक्ती, कल्पनाशक्ती व उद्योजकता हे सारे जवळ असणाऱ्या लोकांसाठी कामाचा तुटवडा नाही. पूर्वी वेळ कसा घालवायचा, हा प्रश्न कोकणातील बहुतांश लोकांपुढे होता. आज वेळ कोठून आणायचा हा खरा प्रश्न आहे. मात्र त्यामुळे काम करणाऱ्या हातांचा तुटवडा अधिक जाणवत आहे. एकंदरीत कोकणात खूपच गतिमानता व त्यातूनच संपन्नता येत आहे. कोकण रेल्वे चालू झाल्यापासून परप्रांतीय लोकांचे प्राबल्य दुर्दैवाने वाढत आहे आणि त्यामुळे भविष्यात अनेक समस्या उद्‌भवण्याची चाहूल लागत आहे.

* * *






शिवबाराजांची सगळी जडणघडण पुण्यात झालेली आहे. त्यांच्या हिंदवी स्वराज्याची मुहूर्तमेढच पुण्यात रोवली गेलेली आहे. १६४६ साली पुणे प्रांतातला तोरणा किल्ला जिंकून शिवरायांनी कार्याला प्रत्यक्ष सुरुवात केली. यानंतर पुणे शहरासारख्या मैदानी मुलखात राहणे धोक्याचे होते. म्हणून महाराज प्रथम किल्ले पुरंदरावर काही काळ राहिले व राजगड बांधून झाल्यावर तिथे वास्तव्यास गेले. राज्याभिषेक व त्यानंतरच्या महत्त्वाच्या घटना सोडल्यास शिवरायांच्या जीवनातील सर्व महत्त्वाच्या घटना राजगडावर म्हणजेच पुणे जिल्ह्यात घडलेल्या आहेत.

# पश्चिम महाराष्ट्र

■ मल्हार कृष्ण गोखले

पश्चिम महाराष्ट्र हा शब्दप्रयोग अगदी अलीकडच्या काळात म्हणजे साधारण १९७५ सालानंतर रूढ झाला आहे. प्रथम तो राजकारणी लोकांनी वापरला व मग वर्तमानपत्रवाल्यांनी रुळवला.

आजच्या महाराष्ट्र राज्यात, त्यापूर्वीच्या महाराष्ट्र-गुजरात या द्वैभाषिक राज्यात किंवा त्याहीपूर्वीच्या इंग्रजी राजवटीतील बॉम्बे प्रेसिडेन्सी किंवा मुंबई इलाखा या शासकीय विभागात पश्चिम महाराष्ट्र हा शब्द अधिकृत शासकीय शब्द कधीच नव्हता व आजही नाही.

मुंबई इलाख्यातील बेळगाव, धारवाड, कारवार व कोल्हापूर संस्थान या भागांसाठी दक्षिण महाराष्ट्र असा शब्द प्रचलित होता. परंतु विदर्भ व मराठवाडा ह्यांना उद्देशून पूर्व महाराष्ट्र; खानदेश व नाशिक, अहमदनगर जिल्ह्यांना उद्देशून उत्तर महाराष्ट्र; किंवा पुणे, सातारा, सोलापूर या जिल्ह्यांना उद्देशून पश्चिम महाराष्ट्र, असे शब्द कधीच प्रचलित नव्हते.

मुळात विदर्भ उर्फ वऱ्हाड हा मध्यप्रांताचा भाग होता. या मध्यप्रांताचा उल्लेख त्या वेळी सेन्ट्रल प्रॉव्हिन्सेस ॲन्ड बेरार म्हणजे मध्यप्रांत आणि वऱ्हाड असा केला जात असे. आज या विदर्भ उर्फ वऱ्हाडाचे नागपूर व अमरावती असे दोन प्रशासकीय विभाग आहेत. मराठवाडा हा हैद्राबादच्या निजाम संस्थानचा भूभाग होता. १९४७ साली देश स्वतंत्र झाला. १९४८ साली संस्थाने विलीन करण्यात आली. त्या वेळी जसा विदर्भ मुंबई इलाख्याला जोडण्यात आला, तसाच मराठवाडाही मुंबई इलाख्याला जोडण्यात आला. आजच्या अधिकृत प्रशासकीय परिभाषेत त्याला औरंगाबाद विभाग असे नाव आहे.

मुंबई इलाख्यात धुळे व जळगाव या जिल्ह्यांना अनुक्रमे पश्चिम खानदेश व पूर्व खानदेश असे म्हटले जात असे. तर त्याच्या दक्षिणेकडील नाशिक, अहमदनगर, पुणे, सातारा व सोलापूर या जिल्ह्यांना 'देश' असे म्हटले जात असे. संस्थाने विलीन झाल्यावर कोल्हापूर संस्थानचा त्याच नावाचा जिल्हा बनवून तो 'देश' विभागात समाविष्ट करण्यात आला. या देश विभागाच्या पश्चिमेला सह्याद्रीची उत्तर-दक्षिण उभी रांग पसरलेली असून तिला 'पश्चिम घाट' असे म्हटले जाते. या पश्चिम घाटाच्याही पश्चिमेला कोकण हा किनारपट्टीचा प्रदेश असून त्यात त्या वेळेस ठाणे, कुलाबा, उत्तर रत्नागिरी व दक्षिण रत्नागिरी असे जिल्हे होते.

१ नोव्हेंबर १९५६ रोजी मुंबई इलाखा किंवा मुंबई राज्य ही प्रशासकीय संकल्पना रद्दबातल ठरून महाराष्ट्र गुजरात यांचे द्वैभाषिक राज्य अस्तित्वात आले. त्या काळातही महाराष्ट्राचे कोकण, खानदेश, देश, मराठवाडा व विदर्भ असे विभाग होते. १ मे १९६० रोजी भाषावार प्रांतरचनेवर आधारित महाराष्ट्र राज्य अस्तित्वात आल्यावर या राज्याचे सहा प्रशासकीय विभाग करण्यात आले. ते असे - १) कोकण विभाग २) नाशिक विभाग ३) पुणे विभाग ४) औरंगाबाद विभाग ५) नागपूर विभाग व ६) अमरावती विभाग.

या सर्व विवेचनावरून व सोबतच्या नकाशावरून असे स्पष्ट होईल की 'पश्चिम महाराष्ट्र' या नावाचा कोणताही अधिकृत शासकीय वा प्रशासकीय विभाग कधीच अस्तित्वात नव्हता व आजही नाही. पश्चिम महाराष्ट्र हा शब्दप्रयोग हट्टाने वापरायचाच असेल, तर तो कोकणासाठी वापरायला हवा. त्यामुळे पश्चिम महाराष्ट्र ही संज्ञा अशास्त्रीय, अनैतिहासिक आणि म्हणून साफ चुकीची आहे.

पण राजकारणी लोकांनी ती रूढ केली आहे. तेव्हा 'पश्चिम महाराष्ट्र' या शब्दप्रयोगाने त्यांना ज्या जिल्ह्यांचा उल्लेख करायचा असतो, त्या भूभागाची माहिती पुढे दिली आहे. नाशिक जिल्ह्याचा पूर्व भाग खानदेशात मोडतो. ह्या जिल्ह्याचा थोडा परिचय येथे करून घेऊ.

नाशिक हा जिल्हा दख्खनच्या पठारावर सह्याद्रीच्या पूर्व उतारावर असून नाशिक शहर हे जिल्ह्याचे ठाणे आहे. देशभरातील प्रख्यात तीर्थक्षेत्रांपैकी नाशिक हे एक आहे. दक्षिण भारतातली प्रमुख नदी गोदावरी नाशिकजवळच्या ब्रह्मगिरी पर्वतात उगम पावते. कृतयुग या कालखंडात गौतम ऋषींनी या पर्वतावर तपश्चर्या केली व आपल्या हातून घडलेल्या गोहत्येच्या पापातून मुक्त होण्यासाठी भगवान शंकराच्या जटेतली पापहारिणी गंगा मागून घेतली, अशी कथा आहे. तीच गोदावरी नदी. वरील कथेवरून तिला गौतमी गंगा असेही म्हणतात. ब्रह्मगिरी पर्वतावर ज्या विशिष्ट प्रकारच्या खडकातून गोदावरी नदी उगम पावते, त्या विशिष्ट जातीचा खडक सह्याद्रीत इतरत्र कुठेही आढळत नाही, असे आधुनिक भूगर्भशास्त्रज्ञांचे निरीक्षण आहे. ब्रह्मगिरी पर्वताच्या पायथ्याशी त्र्यंबकेश्वर हे तीर्थस्थान असून ते देशभरातल्या बारा ज्योतिर्लिंगांपैकी एक आहे.

प्राचीन कालखंडात नाशिकला नाशिक्य, जनस्थान, त्रिकंटक आणि पद्मनगर या नावांनी ओळखले जात होते. रामायणात आलेल्या उल्लेखानुसार दंडकारण्यातील जनस्थान ते हेच होय. राम, लक्ष्मण व जानकी दंडाकारण्यात गोदावरीच्या तटाकी जनस्थानामध्ये पंचवटी या रम्य परिसरात पर्णकुटी बांधून राहिले होते. प्रभू रामचंद्राशी विवाह करण्याची अभिलाषा धरून आलेल्या शूर्पणखेचे कान आणि नासिका म्हणजे नाक, लक्ष्मणाने आपल्या तलवारीने छाटून टाकले, ते इथेच. त्यावरून या स्थानाला नासिक किंवा नाशिक म्हणू लागले, अशी एक उपपत्ती आहे.

परंतु दुसरी उपपत्ती जास्त तर्कसंगत वाटते. ती अशी की, गोदावरीच्या तीरावरील नऊ टेकड्यांवर गाव वसले, ते नवशिख. त्याचा अपभ्रंश नाशिक. आजही या नऊ टेकड्या किंवा नऊ उंचवट्यांचे भाग नाशिक शहरात विद्यमान आहेत. त्यांची नावे अशी – १) जुनी गढी २) नवी गढी ३) जोगवाडा टेक ४) पठाणपुरा टेक ५) म्हसरूळ टेक ६) डिंगरआळी टेक ७) सोनार आळी टेक ८) गणपती डोंगर व ९) चित्रघंटा टेक.

प्रभू रामचंद्रांची पर्णकुटी जिथे होती, बरोबर त्याच ठिकाणी सुप्रसिद्ध काळा राम मंदिर असून ते पेशव्यांचे सरदार ओढेकर यांनी बांधलेले आहे.

त्र्यंबकेश्वर मंदिर नानासाहेब पेशवे यांनी बांधलेले असून, मराठी वास्तुरचनाशैलीचा तो एक उत्कृष्ट नमुना आहे. खुद्द नाशिक शहरात व जिल्ह्यात इतरत्रदेखील मराठा कालखंडातील उत्तमोत्तम देवळे आहेत.

नाशिक जिल्ह्यात बागलाणा (सटाणा), मालेगाव, सुरगाणा, कळवण, पेठ, दिंडोरी, चांदवड, नांदगाव, नासिक, निफाड, येवले, इगतपुरी व सिन्नर असे तेरा तालुके आहेत.

इगतपुरी तालुक्यात कळसूबाई (१६४६ मीटर्स) हे सह्याद्रीचे महाराष्ट्रातील सर्वोच्च शिखर आहे. जिल्ह्यात मांगी–तुंगी, साल्हेर–मुल्हेर, रवळ्या–जवळ्या, अलंग–कुलंग, मदन–बितन, अंकाई–टंकाई, औंढा–पट्टा असे अनेक जोडकिल्ले फार मोक्याच्या ठिकाणी आहेत. एकंदर ३८ किल्ले आहेत.

इ.स.१६७० पासून शिवाजी महाराजांनी मोगलांविरुद्ध प्रचंड आघाडी उघडली. या वेळी त्यांनी मोगलांच्या ताब्यातील नाशिक जिल्ह्यातील इगतपुरी, पेठ, कळवण, दिंडोरी, सुरगाणा, खुद्द नाशिक आणि बागलाण म्हणजे आत्ताचा सटाणा हे तालुके जिंकून घेतले. रामसेज, अहिवंत, मार्कंडा, त्र्यंबक, साल्हेर, मुल्हेर, त्रिंगलवाडी इत्यादी किल्ले या भागात आहेत. हा सारा प्रदेश स्वराज्यातच ठेवण्याचा प्रयत्न महाराजांनी कसोशीने केला. याउलट पुणे व अहमदनगर जिल्ह्यांमधील स्वराज्याच्या सीमेला लागून असलेल्या मोगली मुलखाकडे महाराजांनी फार लक्ष दिले नाही. याचे कारण पुणे व अहमदनगर जिल्ह्यातील मोगलांचा प्रदेश मैदानी होता. उघड्या मैदानात प्रबळ मोगली फौजेशी टक्कर घेणे, महाराजांच्या गनिमी काव्यात बसणारे नव्हते. उलट नाशिक जिल्ह्यातील वरील तालुक्यांचा भाग हा डोंगराळ होता. आणि जंगलांनी भरलेला होता. शिवाय या भागातून महाराजांना अतिशय संपन्न अशा खानदेश व गुजरात या मोगली प्रदेशांत उतरण्यासाठी सरळ वाट होती.



नाशिक येथील काळाराम मंदिरातील मूर्ती.

मोगलांनी हा धोका ओळखून मराठ्यांना या प्रदेशातून घालवून लावण्यासाठी जंग–जंग पछाडले. पण त्यांना ते कधीही साध्य झाले नाही.

इ.स.१६८९ नंतर म्हणजे शंभूछत्रपतींच्या मृत्यूनंतर नाशिक भागावर आपले वर्चस्व स्थापन झाल्याचा आनंद मोगलांना मिळाला. पण तो फारच अल्प ठरला. कारण लष्करीदृष्ट्या अत्यंत प्रबळ झालेले मराठे इतरही मार्गांनी खानदेश आणि त्याच्याही पलीकडे गुजरात व माळवा या प्रांतांमध्ये घुसू लागले.

इ.स.१८१८ साली पेशवाईच्या अस्ताबरोबरच नाशिक जिल्हा मराठ्यांच्या हातातून इंग्रजांकडे गेला आणि त्यांच्या प्रशासकीय विभागणीनुसार मुंबई इलाख्याला जोडला गेला.

## पुणे जिल्हा

पुणे शहराच्या आणि पुणे जिल्ह्याच्या ऐतिहासिक, भौगोलिक स्वरूपाचा विचार करताना, महाराष्ट्र राज्याच्या नकाशाकडे एक दृष्टिक्षेप टाकणे आवश्यक आहे. सह्याद्री पर्वताचे तीन फाटे पश्चिमेकडून पूर्वेकडे पसरत गेलेले दिसतील. त्यातला उत्तरेकडचा फाटा म्हणजे सातमाळा रांग. दक्षिणेकडचा फाटा म्हणजे महादेव रांग. या दोहोंच्या मध्यभागी जो फाटा येतो, त्याला म्हणतात बालाघाट रांग. पुणे जिल्हा या बालाघाट रांगेच्या अवतीभवतीच आहे. बालाघाट रांगेत सुमारे साडेतीन हजार फूट उंचीवर भीमाशंकर हे शिखर आहे. इथून भीमा नदी उगम पावते. पूर्व दिशेला वाहत भीमा नदी इंद्रायणी, मुळा, मुठा, सीना, नीरा इत्यादी नद्यांना स्वत:मध्ये सामावून घेत, आंध्रच्या आणि कर्नाटकच्या सीमेवर रायचूरच्या उत्तरेला कुरुगुड्डी इथे कृष्णा नदीला मिळते. म्हणजेच पुणे जिल्हा हा भीमा नदीच्या खोऱ्यात येतो.

उत्तरेकडच्या सातमाळा रांगेत नाशिक जिल्ह्यात त्र्यंबकेश्वरजवळ ब्रह्मगिरी पर्वतात दक्षिणगंगा गोदावरी उगम पावते. तिच्या खोऱ्याला म्हणतात गंगथडी. गंगथडीची स्वामिनी आहे सप्तश्रृंगी भगवती. दक्षिणेकडच्या महादेव रांगेत सातारा जिल्ह्यात महाबळेश्वरला कृष्णा नदी उगम पावते. तिच्या खोऱ्याला म्हणतात कृष्णथडी. कृष्णथडीची स्वामिनी आहे कोल्हापूरची अंबाबाई. तर पुणे जिल्हा ज्या भीमा नदीच्या खोऱ्यात येतो, त्याला म्हणतात भीमथडी. या खोऱ्याची स्वामिनी आहे तुळजापूरची भवानी. ही तुळजाभवानीच भोसले घराण्याची कुलदेवता होती आणि तिच्या कृपाप्रसादाने शिवरायांचा यशकीर्तिताप महिमा 'अहद काबूल तहद तंजावर' म्हणजे काबूलपासून तंजावरपर्यंत हिंदुस्थानभर पसरला, भीमथडी तट्टे यमुनेचे पाणी प्याली. हिंदवी स्वराज्याची पराक्रमगाथा म्हणजे एका परीने या पुणे जिल्ह्याची म्हणजेच भीमथडीची यशोगाथा आहे.

हिंदू परंपरेनुसार पुणे जिल्ह्यातले सर्वांत प्राचीन स्थान श्रीक्षेत्र भीमाशंकर हेच होय. आकाशातून संचार करणारी तीन पुरे म्हणजे नगरे ज्याच्याकडे होती, अशा त्रिपुरासुराच्या वधासाठी भगवान शिव सह्याद्रीवर उतरला. आपल्या पिनाक नावाच्या धनुष्याला वैष्णवास्त्र अभिमंत्रित बाण जोडून शंकराने त्या एकाच अस्त्राने आकाशात वेगवेगळ्या ठिकाणी असलेली त्रिपुरासुराची तीन पुरे वेधून त्रिपुराला जाळून टाकले. हिंदू कालगणनेनुसार ते त्रेतायुग होते. तो दिवस कार्तिक पौर्णिमेचा होता. म्हणून कार्तिक पौर्णिमेला मंदिरांच्या दीपमाळांवर त्रिपुर पेटवतात. या प्रचंड युद्धकर्मामुळे भगवान शिवाला खूप श्रम झाले. त्याच्या अंगातून घामाचा पूर लोटला. शिवाच्या दर्शनासाठी जमलेले ऋषी, मुनी, देव, दानव, यक्ष, किन्नर, गंधर्व त्याला म्हणाले की, 'महादेवा तुझ्या घामाचा पूर जिथून वाहिला ती एक पुण्यपावन सरिता होऊ दे.' शिव म्हणाला, 'तथास्तु'– तसे असो. त्रिपुरासुराला मारण्यासाठी शिवाने अतिशय प्रचंड म्हणजे भीमरूप धारण केले होते. म्हणून त्या सरितेचे नाव पडले भीमा! म्हणजेच भीमा नदी.

त्रिपुरावरील शिवाच्या विजयाची, अ–शिवावरील शिवाच्या, अमंगलावरील मंगलाच्या, अधर्मावरील धर्माच्या विजयाची निशाणी आहे आणि अशा भीमेच्या खोऱ्यात पुणे जिल्हा वसलेला आहे. हिंदू कालगणनेनुसार सध्या कलियुगाची ५२वी शताब्दी सुरू आहे. त्यापूर्वी द्वापारयुगाचा ८ लाख ६४ हजार वर्षांचा काळ होऊन गेला आहे. त्यापूर्वीच्या त्रेतायुगात ही घटना घडलेली आहे. म्हणजे किमान १० लाख वर्षांपूर्वीची ही घटना आहे. याचा अर्थ भीमेचे खोरे तेव्हापासून अस्तित्वात आहे.

आधुनिक कालगणनाशास्त्र, इतिहास, पुरातत्त्वादी शास्त्रे युरोपीय विचारांवर उभे आहे. त्यांच्यानुसार पाहिल्यास, खुद्द आजच्या पुणे शहरात एक लाख वर्षांपूर्वी मानवी वस्ती होती. आधुनिक पुरातत्त्व शास्त्रानुसार या काळाला आद्य पुराश्मयुग म्हणतात. पुण्याच्या येरवडा या उपनगरालगत असलेल्या डेक्कन महाविद्यालय या प्रख्यात संस्थेत डॉ. ह. धी. सांकलिया हे आंतरराष्ट्रीय कीर्तीचे संशोधक होते. त्यांना पुण्याच्या बंडगार्डन भागात काही प्राचीन दगडी हत्यारे सापडली. अतिशय उत्कृष्ट प्रतीच्या दगडाच्या या हत्यारांचा काळ एक लाख वर्षांपूर्वीचा म्हणून निश्चित करण्यात आला. पुणे जिल्ह्यात इनामगाव, येऊर, भोसरी अशा ठिकाणीही उत्खनने झाली असून

त्यात ख्रिस्तपूर्व १००० च्या सुमाराचे अवशेष सापडले आहेत.

परंतु पुणे जिल्ह्याचा थोडाफार सुसंगत इतिहास सापडू लागतो तो ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकापासून. कल्याण, स्थानक, शूर्पारक ते भृगुकच्छ इथवरच्या नामांकित बंदरांमधला माल माळशेज घाटाने वर चढला की पुणे जिल्ह्यातले प्राचीन शहर यायचे जीर्णनगर! म्हणजेच जुण्णनगर–जुन्ननगर–जुन्नर! मध्य आशियातून सरकत–सरकत उज्जयिनीपर्यंत आलेले परकीय शक नावाचे लोक तसेच पुढे सरकत गुजरात, डांगवरून जुन्नरला आले. व्यापाराने भरभराटीला आलेले शहर त्यांनी घेतले. आता त्यांची नजर होती तत्कालीन महाराष्ट्राची राजधानी प्रतिष्ठान उर्फ पैठणवर. पण शालिवाहनाने त्यांना रोखले. साफ पराभूत केले आणि हिंदू संस्कृतीत मिसळून टाकले. महाराष्ट्राचे आद्य राजकुल म्हणून ओळखल्या जाणाऱ्या सातवाहन राजकुलाचा मूळपुरुष तोच हा शालिवाहन. शकांचा क्षत्रप म्हणजे सुभेदार असलेल्या नहपान या राजाचे लेख जुन्नर आणि आसपासच्या अनेक कोरीव लेण्यांमध्ये सापडलेले आहेत. सातवाहन राजांनी माळशेज घाटालाही 'शॉर्टकट' म्हणून नाणेघाट हा मार्ग खोदवला. नाणेघाटाच्या गुंफेत राजा गौतमीपुत्र सातकर्णी आणि त्यांच्या कुटुंबाच्या मूर्ती खोदलेल्या होत्या. आज मूर्तिभंजकांच्या घणांच्या घावांखाली त्यांच्या ठिकऱ्या उडालेल्या आहेत. एका मूर्तीचे फक्त पाय जरासे दिसतात. आज अवघ्या मराठी जनतेच्या मनात शिवछत्रपतींना जे स्थान आहे, तेच त्या काळात सातवाहन राजकुलाला असले पाहिजे, असा तर्क करता येतो. सातवाहनांची राजवट सुमारे तीनशे वर्षे टिकली. महाराष्ट्राच्या जीवनातला हा काळ अतिशय वैभवाचा, समृद्धीचा होता.

यानंतरची अडीचशे वर्षे कुणाचे राज्य होते, हे ज्ञात नाही. पण इसवी सनाच्या पाचव्या शतकात कर्नाटकातल्या बदामीहून राज्य करणाऱ्या चालुक्यांनी इथे राज्य केले. मग मुळात त्यांचे सुभेदार असलेल्या नि मागाहून स्वतंत्र झालेल्या राष्ट्रकूट राजवंशाचा अंमल इथे सुरू झाला. 'आधी कळस, मग पाया' असे विश्वविख्यात कैलास लेणे खोदवणारा राजा कृष्ण याच राष्ट्रकूट वंशात इसवी सनाच्या आठव्या शतकात होऊन गेला. त्याच्या एका ताम्रपटात पुण्याचा उल्लेख 'पुण्यविषय' या नावाने सर्वप्रथम आढळतो.

पुण्यातले एक जुने रहिवासी हुंडीवाले साठ्ये यांच्याकडे १९१२ सालच्या सुमारास एक ताम्रपट सापडला. राष्ट्रकूट नृपती कृष्णराज याने शालिवाहन शके ६८० च्या अश्विन अमावास्येला सूर्यग्रहण पर्वणीनिमित्त 'पुण्यविषय' क्षेत्रातील बोपखळू हे गाव कुणा पुडिगभट्टाला दान दिल्याचा उल्लेख त्यात आहे. बोपखळू गावाच्या चतु:सीमा पूर्वेला कलस, दक्षिणेला मुईला नदी, पश्चिमेला दर्पपूडिका आणि उत्तरेला भेसडरी अशा सांगितल्या आहेत. या तिथीची आजची तारीख १६ ऑक्टोबर ७५८ अशी येते. तसेच बोपखळू हे गाव म्हणजे आजचे बोपखळू. त्याच्या चतु:सीमा आजही अगदी तशाच दिसतात. पूर्वेला कळस हे गाव. दक्षिणेला मुळा नदी. पश्चिमेला दर्पपूडिका म्हणजे दापोडी गाव तर उत्तरेला भेसडरी म्हणजे भोसरी गाव. इंग्रजी नकाशाशास्त्रात उत्तर दिशेपासून वाचन करण्याची पद्धत आहे तर मराठी नकाशाशास्त्रात पूर्वेपासून वाचन करण्याची पद्धत आहे. ताम्रपटातला लेख चतु:सीमा सांगायला पूर्व दिशेपासून सुरुवात करतो, ते याच प्रथेमुळे. आधुनिक राज्यशासनात गाव, तालुका, जिल्हा, विभाग, प्रांत, राज्य, केंद्र अशा संकल्पना आहेत. प्राचीन हिंदू राज्यकारभारात ग्राम, मंडल, विषय, भोग, भुक्ती, देश, राज्य, राष्ट्र अशा संज्ञा होत्या. त्यानुसार राष्ट्रकूटांच्या राज्यात आजचे पुणे शहर आणि त्याच्या आसपासचा प्रदेश हा 'पुण्यविषय' होता. विषय म्हणजे सामान्यतः जिल्हा.

आजच्या पुणे–नगर रस्त्यावर असलेल्या तळेगाव–ढमढेरे या गावी याच कृष्ण राष्ट्रकूटाचा आणखी एक ताम्रपट सापडला आहे. त्याचा काळ शके ६९० म्हणजे इ.स. ७६८ असा येतो. त्यात पुण्याचा उल्लेख 'पुनकविषय' असा केलेला आहे.

पुढे राजसत्ता राष्ट्रकूटांकडून शिलाहारांकडे आली. कपर्दी, झंझ, अपरादित्य, शिलादित्य, गंडरादित्य इत्यादी पराक्रमी राजांची ही राजवट तब्बल साडेचारशे वर्षे टिकली. राजा शिलाहार अपराजितदेव याचा एक ताम्रपट जंजिरा–मुरूडला सापडला आहे. इ.स.९९३ असा काळ



तोरणा किल्ला परिसर.

असलेल्या या ताम्रपटात पुण्याचा उल्लेख येतो तो ‘पुणकविषय’ या नावाने.

पुणे शहर किंवा एकंदर पुणे जिल्हा यांचा नावाने उल्लेख असलेले हे जुन्यात जुने उपलब्ध पुरावे आहेत. शिलाहारांनंतर यादवांची राजवट सुरू झाली. यादवांना पराभूत करून अल्लाउद्दीन खिलजी हा अफगाणी मुसलमान दख्खनचा सुलतान बनला. त्याचा तुर्क गुलाम मलिक काफूर हा देवगिरीपासून रामेश्वरपर्यंत इस्लामचा वरवंटा फिरवत गेला. या इस्लामी कालखंडातच केव्हातरी पुण्याची ‘विषय’ ही राजकीय संज्ञा मागे पडून पुण्याची ‘पुनवडी’ झाली. पुणे शहरातली पुण्येश्वर आणि नारायणेश्वर ही आणि अशी अनेक देवस्थाने भंगून तिथे दर्गे, मशिदी उभ्या राहिल्या. खिलजींच्या मागून सत्तेवर आलेल्या तुघलख सुलतानांपैकी मुहम्मद तुघलख (१३२५ ते १३५१) याने राजधानी दिल्लीहून देवगिरीला आणण्याचा उद्योग केला. देवगिरीची दौलताबाद झाली. या वेळी पुण्याजवळचा कोंडाणा किल्ला कोळी लोकांच्या ताब्यात होता. तुघलखांच्या प्रचंड सामर्थ्यासमोर जराही न डगमगता कोळ्यांनी आठ महिने किल्ला लढवला.

तुघलखांचा अफगाण सुभेदार हसन गंगू बहमनी याने १३४७ साली मुहम्मद तुघलखाविरुद्ध बंड पुकारले आणि दख्खनमध्ये स्वत:ची राजवट घोषित केली. हे बहमनी राज्य साधारण १४० वर्षे टिकले आणि त्याने महाराष्ट्राच्या सामाजिक जीवनावर खोल परिणाम केले. ग्राम, मंडल, विषय इत्यादी संज्ञा मागे पडून मौजा, कसबा, महाल, परगणा, सुभा इत्यादी अरबी, मुसलमानी संज्ञा आल्या. मौज म्हणजे गाव, कसबा म्हणजे मोठा गाव, महाल म्हणजे तालुका, काही महालांचा मिळून होतो तो प्रांत, परगणा किंवा जिल्हा आणि बऱ्याचशा प्रांतांचा मिळून होतो तो सुभा.

१४८९ साली बहमनींचे दोन जबरदस्त सरदार मलिक अहमद आणि युसूफ आदिल यांनी बंड पुकारले. मलिक अहमद याने निजाम-उल-मुल्क या नावाने निजामशाही स्थापन केली. युसूफ आदिलने आदिलशाही स्थापन केली. यानंतर जवळजवळ १६३३ पर्यंत महाराष्ट्राच्या मोठ्या भागावर, त्यात पुणे प्रांत म्हणजेच पुणे जिल्हाही आलाच, निजामशाहीची होती. आजच्या पुणे शहराला कसबा-इ-पुणे म्हणजे कसबे पुणे असे म्हटले जात असे.

१५९० च्या सुमारास इस्माईल किंवा बुऱ्हाण निजामशहा यांच्या कालखंडात मालोजी भोसले आणि विठोजी भोसले निजामशहाचे जहागीरदार झाले. या काळात दिल्लीचा मोगल बादशहा अकबर हा निजामशाही बुडवू

पाहत होता. निजामशहाचा वजीर मलिकंबर हा चंगेजखानी हबशी मोठा शूर, धोरणी आणि मुत्सद्दी होता. त्याने मालोजीराजे भोसले यांना पंचहजारी सरदारी आणि पुणे व सुपे या प्रांतांची जहागीर दिली.

मालोजीराजे भोसले यांचे सुपुत्र शहाजीराजे अत्यंत पराक्रमी निघाले. मुसलमानी लष्करी तंत्र आत्मसात करून त्याला स्वत:च्या प्रतिभेची जोड देऊन शहाजीराजांनी रणांगणावर प्रचंड पराक्रम गाजवले. १६२५ च्या सुमारास शहाजीराजे आदिलशहाचे सरलष्कर म्हणजे पायदळाचे प्रमुख सेनापती बनले. परंतु शहाजीराजांना गुलामगिरी नको होती. १६२८-२९ साली त्यांनी हिंदवी स्वराज्य स्थापनेचा पहिला प्रयत्न केला. पुणे आणि सुपे प्रांत ही आपली जहागीर त्यांनी स्वतंत्र राज्य म्हणून घोषित केली. पण आदिलशहाने शहाजीराजांचा हा प्रयत्न साफ मोडून काढला. आदिलशाही सैन्याने शहाजीचे पुणे लुटून, जाळून, उद्ध्वस्त करून टाकले. पुण्याची ही उद्ध्वस्त स्थिती सात वर्षे होती.

पुण्याच्या जहागीरदारीणबाई म्हणजेच जिजाऊसाहेब १६३६ साली पुण्यात कायमच्या वास्तव्याला आल्या. त्यांच्यासोबत होते सहा वर्षांचे शिवबाराजे, प्रमुख कारभारी पंत दादोजी कोंडदेव आणि यांच्यासह कुशल मंत्र्यांचे एक मंडळ. आईसाहेबांच्या आज्ञेने दादोजीपंतांनी उद्ध्वस्त पुण्यात प्रथम गणपतीचे देऊळ बांधले आणि मग कसबे पुणे आणि पुणे जिल्हा सजवायला सुरुवात केली.

शिवबाराजांची सगळी जडणघडण पुण्यात झालेली आहे. त्यांच्या हिंदवी स्वराज्याची मुहूर्तमेढच पुण्यात रोवली गेलेली आहे. १६४६ साली पुणे प्रांतातला तोरणा किल्ला जिंकून शिवरायांनी कार्याला प्रत्यक्ष सुरुवात केली. यानंतर पुणे शहरासारख्या मैदानी मुलखात राहणे धोक्याचे होते. म्हणून महाराज प्रथम किल्ले पुरंदरावर काही काळ राहिले व राजगड बांधून झाल्यावर तिथे वास्तव्यास गेले. राज्याभिषेक व त्यानंतरच्या महत्त्वाच्या घटना सोडल्यास शिवरायांच्या जीवनातील सर्व महत्त्वाच्या घटना राजगडावर म्हणजेच पुणे जिल्ह्यात घडलेल्या आहेत.

यानंतर मे १६६० मध्ये औरंगजेबाचा सरदार शाहिस्तेखान याने पुणे जिंकून महाराजांच्या लाल महालातच मुक्काम ठोकला. वास्तविक तो दख्खनचा सुभेदार म्हणून आला होता आणि सुभ्याचे मुख्य ठाणे होते औरंगाबादला. पण तिथे न राहता तो पुण्याला आला. कारण शिवाजीचे राज्य जिंकून घेण्यासाठी लष्करीदृष्ट्यादेखील पुणे हे ठिकाण महत्त्वाचे आहे, हे त्याच्या लक्षात आले होते.

शिवरायांच्या मृत्यूनंतर खासा औरंगजेब दख्खनमध्ये उतरला. मराठ्यांच्या हिंदवी स्वराज्यासह आदिलशाही आणि कुतुबशाही ही मुसलमानी राज्येदेखील त्याला बुडवायची होती. औरंगजेब दख्खनमध्ये २५ वर्षे ठाण मांडून बसलेला होता. छत्रपती संभाजी, छत्रपती राजाराम आणि महाराणी ताराबाई यांच्या नेतृत्वाखाली संपूर्ण महाराष्ट्राने बलाढ्य मोगली सत्तेशी प्रचंड संघर्ष केला. मराठ्यांचा हा २५ वर्षांचा स्वातंत्र्यसंग्राम अत्यंत अद्‌भुत, रोमहर्षक असा आहे. यात पुणे प्रांताचाही फार मोठा सहभाग आहे. अखेर १७०७ साली औरंगजेब महाराष्ट्रातच मेला. त्याचा मुलगा अज्जम याने मोहीम गुंडाळली आणि तो दिल्लीकडे धावत सुटला. पण त्यापूर्वी त्याने आपल्या कैदेत असलेल्या शाहूराजांना सोडून दिले. शाहूराजे म्हणजे छत्रपती संभाजीराजांचे चिरंजीव. शाहू छत्रपतींनी राजधानी पुन्हा रायगडावर न नेता सातारा शहरात केली. यानंतर त्यांनी आपले कर्तबगार सरदार बाळाजी विश्वनाथ यांना पेशवा म्हणजे पंतप्रधानपद दिले व पुणे प्रांताची जहागीर दिली.

बाळाजी विश्वनाथांनी लढाया केल्या; पण मुख्यतः मुत्सद्देगिरीनेच मोठमोठी कामे यशस्वी केली. त्यांचा पुत्र बाजीराव हा मात्र महान सेनापती, योद्धा म्हणून प्रसिद्ध झाला. बाजीरावांनी पुणे शहरात वास्तव्य करण्याचे ठरवून कसबा गणपतीच्या नजीकच स्वत:साठी वाडा बांधला. हाच तो शनिवारवाडा.

छत्रपती शाहू महाराजांची उमलती वर्षे मोगलांच्या कैदेत गेल्यामुळे ते स्वत: राजकारण अगर रणांगण गाजवत नव्हते. मात्र सर्व कामे त्यांच्या सल्ल्याने व आज्ञेनेच चालत असे. १७४९ साली शाहू महाराज वारले. त्यांना पुत्र नव्हता. त्यामुळे गादीवर दत्तकपुत्र आला व खरी सत्ता पेशव्यांच्या हाती आली. या वेळी बाजीराव पेशव्यांचा पुत्र नानासाहेब हा पेशवा होता. सत्तेचे केंद्र साताऱ्यातून पुण्याला



पेशव्यांचा शनिवारवाडा.

आले. हिंदवी स्वराज्याची सुरुवात पुण्यातून झाली होती. आता स्वराज्याचे साम्राज्य झाले. शहर पुणे ही साम्राज्यधानी बनली. १७६० पर्यंत मराठी साम्राज्य सतत वाढत होते. १७६१ च्या जानेवारीत पानिपतची लढाई झाली आणि मराठी साम्राज्याला जबर तडाखा बसला. किमान पाऊण लाख मराठी सैन्य रणांगणावर ठार झाले. पुणे प्रांतातले असे एकही घर नव्हते की, जिथला एकतरी माणूस पानिपतावर पडला नव्हता. कित्येक घरे अशी होती की, तिथले सर्वच्या सर्व कर्ते पुरुष पानिपतावर कामी आले होते. उदाहरणार्थ, आजच्या पुणे–नगर रस्त्यावरचे तळेगाव–ढमढेरे हे गाव. सरदार ढमढेरे यांचे हे जहागिरीचे गाव. खुद्द ढमढेऱ्यांच्या घरातले सरदार जिवाजीराव, साखरोजीराव आणि भगवंतराव हे तिघेही कर्ते पुरुष पडले.

या भयंकर आघातामुळे खुद्द नानासाहेब पेशवेही मानसिक संतुलन गमावून मरण पावले. फार मोठ्या साम्राज्याची आणि पराभवामुळे निर्माण झालेल्या हताश स्थितीची जबाबदारी नानासाहेबांचा अवघा १६ वर्षांचा पुत्र माधवराव याच्यावर पडली.

माधवरावाने, आपण आपल्या पित्याप्रमाणे राजकारणी आहोत आणि आजोबांप्रमाणे धुरंधर सेनापतीही आहोत, हे अल्पावधीतच सिद्ध केले. पानिपतचा घाव भरून काढून त्यांनी मराठी साम्राज्याचा गाडा पुन्हा नीट मार्गावर आणला. मात्र हे अचाट काम त्याच्या नाजूक प्रकृतीला न झेपल्यामुळे ते वयाच्या अवघ्या २७ व्या वर्षी मरण पावले.

मराठी साम्राज्याला अखेरचा निर्णायक तडाखा पानिपतचा पराभव हा नसून, माधवरावाचा अकाली मृत्यू हा होता. यानंतर महादजी शिंदे आणि नाना फडणीस यांनी मराठी साम्राज्य सावरण्याचा अटोकाट प्रयत्न केला. मोगली साम्राज्य तर त्यांनी जवळपास संपवतच आणले होते. पण याच काळात इंग्रज दिवसेंदिवस प्रबळ होत चालले होते. त्यांना अटकाव करणे कठीण होत चालले होते. तरीही शूर मराठ्यांनी इंग्रजांचा पुण्याजवळील वडगाव–मावळ येथे पराभव केला. त्यांचा कॅप्टन स्टुअर्ट (इस्टुर फाकडा) याला ठार केले. ज्या तोफेचा गोळा लागून तो ठार झाला, ती सरदार पानसे यांची संबसिकल तोफ आजही पुणे येथील राजा केळकर संग्रहालयात पाहावयास मिळेल. या लढाईत महादजी शिंदे, नाना फडणीस, सरदार पानसे उपस्थित होते. तिसऱ्यांदा पुन्हा एकदा पुण्याने इंग्रजांना तडाखा दिला. त्याला चौकडीचे कारस्थान म्हणतात. नाना फडणीस, हैदर, निजाम आणि नागपूरकर भोसले यांनी एकाच वेळी हल्ला करून इंग्रजी सत्ता संपवायचीच, असे जबरदस्त कारस्थान होते. पण फितुरी नडली, नाहीतर इंग्रजी राज्यच नष्ट होत होते. १७९४ साली महादजी शिंदे पुण्याजवळ वानवडी इथे वारले. नाना फडणीस खचले आणि सहा वर्षांनी म्हणजे सन १८०० साली तेही पुण्यातच मरण पावले. हिंदुस्थान इंग्रजांच्या घशात जाणार, हे शहाण्या लोकांना समजून चुकले. प्रत्यक्षात १७ नोव्हेंबर १८१७ या दिवशी पुण्याच्या शनिवारवाड्यावर इंग्रजी निशाण– 'युनियन जॅक' फडकले आणि मराठी साम्राज्य संपले.

इंग्रज राज्यात शस्त्रबंदीचा कायदा लागू झाल्यामुळे मराठ्यांची तलवार थांबली. पण मूठभर इंग्रजांनी आमचा हा खंडप्राय देश इतक्या सहजतेने कसा जिंकला, याबद्दलचे विचारमंथन जोरात सुरू झाले. यातून वैचारिक मन्वंतराचे पर्व अवतरले. लोकहितवादी गोपाळराव देशमुख, विष्णुशास्त्री चिपळूणकर, न्यायमूर्ती रानडे, महात्मा फुले, लोकमान्य टिळक, गोपाळराव आगरकर, नामदार गोखले अशी कर्त्या विचारवंतांची एक मांदियाळीच निर्माण झाली. त्यांनी पुणे जिल्ह्याचेच नव्हे, तर अवघ्या महाराष्ट्राचे वैचारिक नेतृत्व केलं.

## अहमदनगर जिल्हा

या जिल्ह्याला हे नाव अहमदनगर शहरामुळे मिळाले आहे. इ.स.१४८९ पूर्वी हे शहरच अस्तित्वात नव्हते. अति प्राचीन काळी हा दंडकारण्याचाच भाग होता. त्यामुळे रामायणकालीन काही घटना इथेच घडल्या, असे मानले जाते. उदाहरणार्थ, जिल्ह्यातील अकोले तालुक्यात आगर या ठिकाणी अगस्ती ऋषींचा आश्रम होता, असे मानले जाते. प्रभू रामचंद्र आणि अगस्ती ऋषी ह्यांची भेट इथेच झाली. अगस्ती-पत्नी सती लोपामुद्रा आणि सीतामाई यांचा संवाद इथेच झाला. प्रभू रामचंद्र आणि बंधू लक्ष्मण यांना अगस्ती ऋषींकडून दिव्य अस्त्रांची प्राप्ती इथेच झाली, असे मानण्यात येते. आगर येथे आजही दरवर्षी महाशिवरात्रीला श्रीअगस्तीची यात्रा भरते. रावण सीतामाईला आकाशमार्गे पळवून नेत असता पक्षिराज जटायूने त्याला अडवले. जटायू व रावण यांचे युद्ध झाले. रावणाने जटायूचे पंख छाटून त्याला भूमीवर पाडले. सीतेचा शोध घेत प्रभू रामचंद्र आणि लक्ष्मण तिथे येऊन पोचल्यावर जटायूने त्यांना सर्व वर्तमान सांगितले व प्राण सोडला. रामचंद्राने जटायूला मंत्राग्नी दिला व तो पुढे निघाला. ही सारी घटना जिल्ह्यातील पट्टा या किल्ल्यावर घडली, असे मानले जाते.

पुराणामधली भस्मासुराची कथाही इथेच घडली असावी. भस्मासुराला भुलवण्यासाठी भगवान विष्णूने मोहिनी रूप धारण केले होते. जिल्ह्यात नेवासे येथे मोहिनीराजाचे अतिशय प्राचीन आणि प्रसिद्ध देऊळ आहे. नेवसे येथील पैसच्या खांबाजवळ आसन मांडून ज्ञानदेवांनी आपली भगवद्गीतेवरील टीका प्रथम सांगितली; जी नंतर भावार्थदीपिका किंवा ज्ञानेश्वरी म्हणून जगद्विख्यात झाली.

महाराष्ट्रातला पहिला ज्ञात ऐतिहासिक राजवंश म्हणजे सातवाहन राजवंश. इसवी सन पूर्व सुमारे दोनशे वर्षांपासून सातवाहन वंशाचे राजे महाराष्ट्रावर राज्य करत होते. त्यांची राजधानी प्रतिष्ठान (आजचे पैठण) ही जिल्ह्याच्या लगतच आहे. त्यामुळे जिल्ह्यात अनेक ठिकाणी सातवाहनकालीन अवशेष आढळतात.

देशभरातल्या अनेक आध्यात्मिक पंथांपैकी नाथपंथ हा एक फार महत्त्वाचा पंथ आहे. या पंथातले एक श्रेष्ठ योगिपुरुष कानिफनाथ यांची समाधी जिल्ह्यात मढी येथे आहे.

महाराष्ट्रातले देवगिरीच्या यादवांचे राज्य इ.स.१३१८ साली दिल्लीच्या खिलजी सुलतानांनी पूर्णपणे बुडवले. खिलजीनंतर तुघलख सुलतान आले. महंमद तुघलख याच्या कारकिर्दीत त्याचा सुभेदार हसन गंगू बहमनी जाफरखान याने बंड पुकारले आणि दख्खनमध्ये म्हणजे विंध्य पर्वताच्या दक्षिणेकडील प्रदेशात स्वतःची वेगळी सुलतानशाही स्थापन केली. ही गोष्ट इ.स.१३४७ सालची.

यानंतर साधारण सव्वाशे वर्षांनी बहमनी सुलतानाच्या दरबारातील पाच सरदारांनी बंड पुकारले व स्वतःची निरनिराळी राज्ये स्थापन केली. फत्तेउल्ला इमादुल्मुल्क, अहमद निजामुल्मुल्क, कुली कुतुबुल्मुल्क, युसुफ आदिल आणि कासीम बेरीद हे ते पाच सरदार.

यांपैकी अहमद निजामुल्मुल्क याने माळीवाडा, मोरचूदनगर, नालेगाव, सर्जेपुरा, चाहुराणा इत्यादी खेड्यांना एकत्र करून तिथे एक शहर वसवले. त्याला स्वतःचेच नाव दिले. तेच अहमदनगर. त्याच्या सुलतानशाहीला म्हणतात अहमदनगरची निजामशाही. अहमदाचा पूर्वज भैरवभट्ट किंवा बहिरव हा जिल्ह्यातील पाथर्डी या ठिकाणचा वेदशास्त्रसंपन्न ब्राह्मण होता. पण तो मुसलमान झाला. त्यामुळे अहमदाचे मूळ नाव अहमद बहिरी असे होते. निजामुल्मुल्क ही त्याला बहमनींनी दिलेली पदवी होती.

इ. स. १४८९ साली अहमदशहाने निजामशाही ही स्वतःची स्वतंत्र शाही स्थापन करून अहमदनगर हे शहर नव्याने वसवले व ती आपली राजधानी बनवली. इ. स. १४९४ साली त्याने अहमदनगर शहरातच भुईकोट किल्ला बांधायला सुरुवात केली. ती बांधणी इ. स. १५६० पर्यंत सुरू होती.

दिल्लीचा मोगल बादशहा अकबर याला संपूर्ण दख्खन जिंकून संपूर्ण भारतात एकछत्री मोगल साम्राज्य उभे करण्याची जबरदस्त महत्त्वाकांक्षा होती. इ. स. १५९४मध्ये अहमदनगरचा बुऱ्हाण निजामशहा मरण पावला. अकबराच्या मोगली सेना अहमदनगरवर ताबडतोब चालून आल्या. बुऱ्हाण निजामशहाची शूर

बायको चांदबिबी हिच्या पराक्रमामुळे मोगलांना त्या वेळी माघार घ्यावी लागली. पण पुढे लवकरच चांदबिबी मरण पावली आणि इ. स. १६०० मध्ये अहमदनगर मोगलांनी जिंकले.

पण राजधानी पडली म्हणून हार न खाता निजामशहाचा एक सरदार मलिक अन्वर हबशी चंगेजखानी उर्फ मलिकंबर याने दौलताबादला नवी राजधानी स्थापन करून निजामशाही राजवट टिकवली.

मलिकंबर हा रणधुरंधर सेनापतीही होता आणि कुशल प्रशासकही होता. त्याच्या हाताखाली जी अनेक माणसे शिकून तयार झाली, त्यांतले सर्वांत महत्त्वाचे नाव म्हणजे शहाजीराजे भोसले.

ऑक्टोबर १६२४ मध्ये जिल्ह्यात अहमदनगर शहराजवळच भातवडी या ठिकाणी एक प्रचंड संग्राम झाला. मोगल आणि आदिलशहा यांच्या प्रचंड फौजा निजामशाहीविरुद्ध एकवटल्या होत्या. मलिकंबराच्या सेनापतित्वाखाली, पण स्वतःच्या स्वतंत्र रणकौशल्याचाही पुरेपूर वापर करून शहाजीराजे भोसले यांनी भातवडीची लढाई जिंकली. लष्करी इतिहासात गनिमी कावा या रणतंत्राचा उपयोग या दृष्टीने भातवडीची लढाई हे एक उत्कृष्ट उदाहरण आहे. याच लढाईत शहाजीराजांचे सख्खे धाकटे बंधू शरफोजीराजे ठार झाले. या लढाईतील विजयामुळे दख्खनच्या राजकारणात शहाजीराजे भोसले यांचे महत्त्व आणि वजन अतिशय वाढले.

छत्रपती शिवरायांच्या मृत्यूनंतर (इ. स. १६८०) मोगल बादशहा औरंगजेब, संपूर्ण दख्खन जिंकून आपला पणजा अकबर याचे एकछत्री साम्राज्याचे स्वप्न पुरे करावे, या हेतूने स्वतः दक्षिणेत उतरला. त्याने विजापूरची आदिलशाही आणि गोवळकोंड्याची कुतुबशाही बुडवली. पण गनिमी काव्याने लढणाऱ्या मराठ्यांचे हिंदवी स्वराज्य त्याला बुडवता आले नाही. तब्बल २५ वर्षे (सन १६८१ ते १७०७) तो दख्खनमध्ये अडकून पडला व अखेर १७०७ साली अहमदनगर शहराजवळ भिंगार या ठिकाणी; स्वतःच्या लष्करी छावणीत, वयाच्या ८९व्या वर्षी मरण पावला.

अहमदनगर शहराचे व भिंगार या ठिकाणाचे लष्करी मोक्याचे स्थान लक्षात घेऊन पुढे इंग्रजांनीही आपली लष्करी छावणी त्याच ठिकाणी ठेवली. त्यामुळे त्या भागाला कॅन्टोनमेन्ट म्हणू लागले. आजही तेच नाव कायम आहे.

### कोल्हापूर जिल्हा

कोल्हापूरचे प्राचीन नाव करवीर असे होते. स्कंदपुराणाच्या सह्याद्री खंडात म्हटले आहे की, करवीर हा देश दुर्गम असून त्याच्या मध्यभागी लक्ष्मीनिर्मित क्षेत्र आहे. ते काशी–रामेश्वराहूनही पवित्र असून दर्शनमात्रे पापहारक आहे. ही देवांची आणि ऋषींची निवासभूमी आहे.

अति प्राचीन काळी कोलासूर नावाचा दैत्य माजला. त्याला निर्दाळण्यासाठी जगदंबेने महालक्ष्मी हे रूप धारण केले. कोलासूराचा नाश केल्यावर परत कैलास पर्वताकडे न जाता ती इथेच राहिली म्हणून इथे तिला नाव आहे 'कोलासुर भयंकरी' तिच्या वास्तव्याचे स्थान ते कोलासूर किंवा कोल्हापूर.

कोल्हापुराजवळ जोतिबाचा डोंगर आहे. याचे मूळ नाव वाडी–रत्नागिरी. कोलासुराचे मर्दन करण्यासाठी जगदंबेने म्हणे जमदग्नी ऋषींकडून क्रोध उसना घेतला. कार्य झाल्यावर तिने तो क्रोध इथे स्थापन केला. तोच क्रोधमूर्ती जोतिबा. या देवाचे मूळ नाव केदारलिंग किंवा केदारनाथ असेही आहे. ग्वाल्हेरच्या सरदार शिंद्यांसह महाराष्ट्रातल्या अनेक घराण्यांचे जोतिबा हे कुलदैवत आहे. चैत्री पौर्णिमेला इथे फार मोठी जत्रा भरते. खंडोबाच्या जसा 'येळकोट' गर्जिला जातो; तसा 'जोतिबाचा चांगभले' हा इथला उदोकार आहे.

भगवान श्रीकृष्णाच्या चरित्रात करवीरक्षेत्राचा उल्लेख आहे. जरासंधाचा मित्र कालयवन याला हुलकावण्या देत कृष्ण आणि बलराम हे दक्षिणेत आले. त्यांनी महालक्ष्मीच्या करवीर क्षेत्रात एक रात्र मुक्काम केला आणि दुसऱ्या पहाटेला ते गोमंत पर्वताकडे गेले.

कुंभी, कासारी, तुळशी आणि भोगावती या चार प्रकट नद्या व सरस्वती ही गुप्त नदी यांची मिळून बनणारी पंचगंगा नदी, हिचे खोरे पूर्णपणे या जिल्ह्यात आहे. कोल्हापूर

शहराजवळ, पंचगंगेच्या पात्राचा मूळ भाग सुमारे २१ मीटर एवढ्या उंचीवर असल्याचे आढळून आले. त्या टेकडीला स्थानिक लोक ब्रह्मगिरी असे म्हणत असत. पुण्याच्या डेक्कन महाविद्यालयामधील संशोधकांनी १९४५ साली त्या टेकडीचे उत्खनन केले. त्यातून निघालेला निष्कर्ष असा की, इसवी सनाच्या पहिल्या-दुसऱ्या शतकात त्या जागी एक वैभवशाली नगर होते. साधारण सातव्या-आठव्या शतकात एखाद्या जोरदार भूकंपाने ते उद्ध्वस्त केले असावे. या अवशेषांमध्ये काही रोमन बनावटीच्या वस्तूही आढळल्या. त्यावरून सातवाहन काळापासून कोल्हापूरचा व्यापारी संबंध पार रोमपर्यंत असावा, असा सिद्धान्त मांडला गेलेला आहे.

सातवाहनांनंतर तिसऱ्या शतकापासून पाचव्या शतकापर्यंत इथे वाकाटक, कदंब, सेंद्रक आणि मौर्य असे चार राजवंश नांदून गेले. मग हा प्रदेश चालुक्यांच्या ताब्यात आला. राजा सत्यश्रय पुलकेशी या चालुक्य सम्राटाने सगळा दक्षिण भारत जिंकला. सत्याश्रयाचा एक नातेवाईक कर्णदेव चालुक्य हा कोकणात संगमेश्वरला राहून करवीर प्रांताचा कारभार पाहत असे. इ.स. ६३४ मध्ये या कर्णदेवाने अंबाबाईच्या मंदिराचा आजचा गाभारा उभा केला, असा संशोधकांचा तर्क आहे.

चालुक्यानंतर राष्ट्रकूट राजे आले. त्यांच्या कारकिर्दीतही अंबाबाईच्या मंदिराची उभारणी चालूच होती. नवव्या शतकात ते जवळजवळ पूर्णावस्थेला गेले. वेसर शैली या नावाने प्रसिद्ध असलेल्या या मंदिराला पाच कोन आहेत. त्यावरून त्याला ताराकृती मंदिर असेही म्हणतात.

पुढे राष्ट्रकूटांच्या जागी शिलाहार आले. राजा मारासिंह शिलाहार हा मोठा पराक्रमी आणि दानशूर होता. त्याने महालक्ष्मी मंदिराचा आणखी विस्तार केला. त्याचा मुलगा गंडरादित्य याने महालक्ष्मी मंदिरावर कळस चढवून बांधकाम पूर्णत्वाला नेले. अशा प्रकारे हे बांधकाम सुमारे चार शतके चालुक्य, राष्ट्रकूट आणि शिलाहार या राजवंशांच्या कारकिर्दीत चालू होते.

कोल्हापूरजवळ पन्हाळगड हा प्रख्यात किल्ला गंडरादित्यानेच बांधला. तीच त्याची राजधानी होती. ब्रह्मगिरी या टेकडीजवळच कुंभी, तुळशी आणि भोगावती या तीन नद्यांचा संगम आहे. चक्रवर्ती सम्राट मांधाता याने काशीच्या एका घाटावर दहा अश्वमेध यज्ञ केले, अशी कथा पुराणात आहे. तेव्हापासून त्याला दशाश्वमेध घाट म्हणतात. राजा शिलाहार गंडरादित्याने कुंभी-तुळशी-भोगावतीच्या संगमामवर दहा सहस्रभोजने घातली होती, असा उल्लेख सापडला आहे.

१० नोव्हेंबर १६५९ या दिवशी शिवरायांनी प्रतापगडावर अफजलखानाचे पारिपत्य केले. त्यानंतर जराही विश्रांती न घेता त्यांनी ताबडतोब अदिलशहाच्या प्रदेशावर जोरदार चढाई सुरू केली. ठीक १५ दिवसांनी म्हणजे २५नोव्हेंबर रोजी त्यांनी कोल्हापूर जिंकले. आणखी तीनच दिवसांनी, २८नोव्हेंबर रोजी त्यांनी पन्हाळगड जिंकला.

यानंतर महिन्याभरात कोल्हापूरजवळच महाराज व त्यांची पाच हजारांची सेना विरुद्ध अदिलशहाचे सरदार रुस्तुमेजमान व फाजलखान यांची दहा हजार सेना अशी समोरासमोर लढाई झाली (२८ डिसेंबर १६५९). संख्येने व साधनसामग्रीने आपल्या दुप्पट असलेल्या अदिलशाही फौजेला शिवरायांनी साफ पराभूत केले. यानंतर सिद्दी जौहरने पन्हाळगडाला घातलेला वेढा, महाराजांनी वेढ्यातून निसटून विशाळगडाला जाणे, वाटेत घोडखिंडीत घडलेला भीषण रणसंग्राम, बाजी प्रभू देशपांडे या वीराचे बलिदान इत्यादी प्रसंग हे नुसत्या कोल्हापूर जिल्ह्याचाच नव्हे, तर संपूर्ण राष्ट्राचा इतिहासातील अत्यंत उज्ज्वल असे प्रसंग आहेत.

शिवरायांच्या नंतर छत्रपती संभाजी आणि छत्रपती राजाराम हे मोगलांशी युद्ध चालू असलेल्या काळातच मरण पावले. औरंगजेब मेल्यावर त्याचा मुलगा शहजादा अज्जम याने आपल्या कैदेतील शाहूराजे -छत्रपती शंभूराजांचे पुत्र- यांना सोडून दिले. या वेळी छत्रपती राजाराम आणि त्यांची पत्नी महाराणी ताराबाई हिने असा वाद निर्माण केला की, आपलाच पुत्र राज्याचा वारस व्हावा.

यावरून मराठी राज्यात दुही माजली. पण आखेर खेड-कडूसच्या लढाईत शाहू पक्ष जिंकला. शाहू राजे छत्रपती झाले. त्यांनी सातारा ही राजधानी केली. परंतु किती झाले तरी ताराबाई ही त्यांची चुलतीच. तेव्हा कोल्हापूर शहर व

आसपासचा मुलूख हा महाराणी ताराबाई व तिचा मुलगा दुसरा शिवाजी यांच्याकडे ठेवण्यात आला. अशा प्रकारे छत्रपती शिवरायांचे थोरले पुत्र संभाजी राजे यांची म्हणजे थोरल्या पातीची गादी साताऱ्याला व धाकटे पुत्र राजाराम महाराज यांची म्हणजे धाकट्या पातीची गादी कोल्हापूरला निर्माण झाली.

पुढे महाराणी ताराबाईची एक सवत राजसबाई हिने कोल्हापूरला मोठे कारस्थान करून खुद्द ताराबाई व तिचा पुत्र दुसरा शिवाजी यांना राज्यातून हद्दपार केले व स्वतःचा मुलगा संभाजी याला गादीवर बसवले.

या कोल्हापूरकरांनी सातारकर छत्रपती आणि सरदार पेशवे यांच्याशी कधीही जुळवून घेतले नाही. त्यामुळे पुढील काळात हिंदवी स्वराज्याचे जे मराठी साम्राज्य बनले, त्यापासून कोल्हापूरकर लांबच राहिले.

### सोलापूर जिल्हा

सोलापूर जिल्हा सर्वाधिक प्रसिद्ध आहे तो पंढरपूर या तीर्थक्षेत्रासाठी. प्राचीन काळी इथे दिंडीरवन या नावाचे वन होते. द्वारकेचा अधिपती भगवान श्रीकृष्ण याची पट्टराणी रुक्मिणी त्याच्यावर रुसून या दिंडीरवनात येऊन राहिली. तिला शोधून परत नेण्यासाठी कृष्ण स्वतः इथे आला. जवळच त्याचा भक्त पुंडरीक मातापित्यांची सेवा हीच तपश्चर्या करत होता. त्याला भेटायला देव गेला, तर पुंडरीक मातापित्यांच्या सेवेत होता. तो देवाला 'थोडा थांब' म्हणाला. अतिथीला प्रथम आसन देतात. पुंडरीकाने जवळची एक वीट पुढे केली. देव त्या विटेवर उभा राहिला. पावले एकमेकांना जुळवून आणि दोन्ही हात कमरेवर ठेवून. सेवा संपवून पुंडरीक देवाकडे गेला. त्याला ते विशिष्ट रूप इतके आवडले की, 'याच रूपात तू इथे उभा राहून भक्तांना दर्शन दे,' असे मागणे त्याने देवाजवळ मागितले.

तेव्हापासून तो तसाच उभा आहे. त्याला कृष्ण न म्हणता पांडुरंग, विठ्ठल, विठोबा अशा नावांनी संबोधले जाते. पंढरपूरची महती १३व्या शतकात संत ज्ञानेश्वरांनी भागवत धर्माची ध्वजा उंच धरल्यापासून वाढत गेली. परंतु ती त्या अगोदरही होतीच. आषाढी-कार्तिकीच्या वारीची परंपरा ज्ञानोबांच्या आधीपासूनच सुरू होती. ज्ञानोबांनी ती अधिक उज्ज्वल केली. ज्ञानदेवांच्या वेळचा महाराष्ट्राचा सम्राट यादववंशीय राजा रामदेवराव याने पंढरपूरच्या देवस्थानाला दाने दिलेली आहेत. खुद्द पांडुरंगाची मूर्ती ही किमान ५ व्या शतकातली आहे, असे मत मुंबईच्या रॉयल एशियाटिक सोसायटीतील एक ख्यातनाम संशोधक डॉ. भगवानलाल इंद्रजी यांनी १०० वर्षांपूर्वी नोंदवून ठेवले आहे.

खुद्द सोलापूर शहर हे वेगवेगळ्या सोळा गावांचे मिळून झालेले म्हणून सोळा पूर→सोलापूर, अशी या नावाची उत्पत्ती काही लोक मांडतात. परंतु ती फारशी तर्कसंगत वाटत नाही. सोलापूरचे जूने नाव सोन्नलिगे होते; यावरून सोलापूर हे नाव रुढ झाले. चालुक्य कालखंडापासून सोलापूरचे ऐतिहासिकत्व स्पष्ट होते. नंतरच्या यादवकालीन अवशेष व बरीचशी हेमाडपंती शैलीची देवळे व काही शिलालेख सोलापूर परिसरात सापडले आहेत. हे शिलालेख यादव सम्राट भिल्लमदेव (सन ११८८ ते ११९२) आणि सम्राट रामचंद्रदेव (सन १२७१ ते १३०८) यांचे आहेत. म्हणजे यादव काळात सोलापूर निश्चितच नांदते आणि महत्त्वाचे होते.

सोलापूरचा किल्लादेखील यादवांनी बांधला असावा का? शक्यता आहे. कारण खुद्द किल्ल्यातही एक हेमाडपंती मंदिर आहे. परंतु सोलापूर किल्ला जिंकून घेतल्याचा पहिला उल्लेख मिळतो. तो १४३६ सालचा; म्हणजे यादवराज्य बुडाल्यावर ११८ वर्षांनंतरचा. यादवांनंतर खिलजी, तुघलख आणि बहमनी अशा सत्ता क्रमाने आल्या. त्यांपैकी अल्लाउद्दीनशाह बहमनी दुसरा याच्या कारकिर्दीत त्याचा भाऊ महमूद याने बंड पुकारले. त्याने सोलापूर ताब्यात घेतले. नावनिशीवार असा हा सोलापूरचा प्रथम इतिहासातला उल्लेख.

बहमनींनंतर त्यांच्याच राज्यातून फुटून निघालेल्या पाच बादशाह्या आल्या. त्यांपैकी निजामशाही आणि आदिलशाही यांच्यात सोलापूर जिल्ह्याच्या ताब्यावरून सतत संघर्ष चाललेला दिसतो.

इ. स. १४६० साली महाराष्ट्रात दुष्काळ पडला. या वेळी सोलापूर आणि पंढरपूर यांच्या दरम्यान असलेल्या मंगळवेढे या गावाचा बहमनी सुलतानाचा एक लहानसा अधिकारी दामाजीपंत याने आपल्या ताब्यातील गोदाम

उघडले आणि लोकांना धान्य वाटले. बादशहाने दामाजीपंताला राजधानीत म्हणजेच बीदर शहरी ताबडतोब बोलवले. लोककथा सांगते की, दामाजी बीदरला जाऊन पोहोचण्यापूर्वी त्याचा उपास्य देव पांडुरंग हा गावकामगार विठू महाराचे रूप घेऊन बीदरला गेला. त्याने गोदामातल्या धान्याची किंमत पूर्ण रोख पैशात दरबारात जमा केली. ही कथा महाराष्ट्रात इतकी प्रसिद्ध आहे की, सन १४६० सालच्या दुष्काळाला दामाजीपंतांचा दुष्काळ असेच संबोधले जाते. याच मंगळवेढे गावात दामाजीपंतांच्या दोनशे वर्षे अगोदर चोखामेळा उर्फ चोखोबा हे महान संत होऊन गेले.



सोलापूर किल्ल्याचे प्रवेशद्वार.

यानंतर सोलापूरवरील वर्चस्वासाठी अदिलशाही व निजामशाहीमध्ये सतत शंभरवर्षाचा संघर्ष झाला. इ.स. १६२३ मध्ये निजामशहाचा सेनापती आणि वजीर मलिकंबर याने सोलापूर जिंकले. परंतु १६३६ साली शहाजीराजे भोसले यांचा पराभव करून मोगल बादशहा शहाजान याने निजामशाहीच संपवली. या वेळी झालेल्या तहानुसार मोगलांनी सोलापूर अदिलशहाला दिले.

सन १६६५ साली मिर्झाराजा जयसिंग हा शिवरायांवर चाल करून आला. त्याच्या असह्य रेट्यामुळे शिवरायांना पुरंदरचा तह करून २३ किल्ले मोगलांना द्यावे लागले. यानंतर शिवरायांनी स्वतः आग्रा येथे जाऊन औरंगजेबाला भेटावे, असा विचार चालू असताना जयसिंगाने विजापूरच्या अदिलशहाविरुद्ध मोहीम सुरू केली. या स्वारीत जयसिंगाने शिवरायांनाही सामील होण्यास भाग पाडले. मात्र मोगलांच्या विजयातले थोडेही श्रेय मराठ्यांना मिळू नये, म्हणून बहुधा त्याने शिवराय आणि त्यांचे सरसेनापती नेताजी पालकर यांच्यावर मोगल सैन्याची पिछाडी संभाळण्याचे काम सोपवले. मिर्झाराजा जयसिंग आणि दिलेरखान यांच्या मोगल सैन्याची व विजापुरातून निघालेल्या अदिलशाही सैन्याची गाठ मंगळवेढ्याजवळ पडली. विजापुरी सैन्यात खुद्द मुख्य वजीर अब्दुल मुहम्मद, अब्दुल करीम बहलोलखान, खवासखान, सिद्दी अझीज यांच्यासोबत म्हसवडचे देशमुख रत्ताजी माने आणि शिवरायांचे धाकटे सावत्र बंधू व्यंकोजीराजे भोसले हेही होते. विजापुरी फौज भयंकर त्वेषाने लढली आणि मोगलांचा पराभव झाला. मोगलांची पिछाडी संभाळण्याचे काम मात्र शिवराय आणि नेताजी पालकर यांनी चोख बजावले.

१६८९ साली छत्रपती संभाजीराजांना मुकर्रबखानाने कोकणात संगमेश्वर या ठिकाणी पकडले आहे, ही बातमी औरंगजेबाला सोलापूर जिल्ह्यात अकलूज येथे असलेल्या मोगल छावणीत मिळाली.

पुढे १६९५ साली औरंगजेबाने आपली छावणी सोलापूर जिल्ह्यातच भीमा नदीच्या तीरी ब्रह्मपुरी येथे हालवली. तिथे त्याने मोगल सैन्याची मुख्य रसद कोठी आणि पक्की छावणी उभी करून दरबार भरवायलाही सुरुवात केली. जवळच माचणूर या ठिकाणी त्याने एक किल्लाही बांधला.

या माचणूर गावात सिद्धेश्वर शिवाचे एक प्राचीन मंदिर आहे. हिंदूंची देवळे पाडून तिथे मशिदी उभ्या करण्याचा औरंगजेबाचा हट्ट या काळात थोडा कमी झाला असावा. सिद्धेश्वर हे फार प्राचीन आणि जागृत देवस्थान आहे, असे

ऐकल्यावर त्याने देवाला एक झाकलेले तबक पाठवले. लोककथा सांगते की, त्या तबकात गोमांस होते. परंतु देवासमोर तबकाचे आवरण काढल्यावर त्यात फुले आणि बेल आढळले. एवढे तर खरेच की, पाच वर्षे ब्रह्मपुरीत छावणी असूनही मोगलांनी सिद्धेश्वर देवस्थानाला तोशीस लावली नाही.

सन १७९५ साली खर्ड्याच्या लढाईत निजामाला पराभूत करून मराठ्यांनी सोलापूर शहर प्रथमच स्वराज्यात आणले. पण आणखी २३ वर्षांत मराठी राज्यच संपले. १० फेब्रुवारी १८१८ रोजी कर्नल मन्रोच्या नेतृत्वाखाली इंग्रजी फौजेने दुसऱ्या बाजीराव पेशव्याच्या फौजेला सोलापूरजवळ आष्टा येथे गाठले. बाजीराव स्वतः लढाईला उभा न राहता पळून गेला. जाता-जाता तो आपला मुख्य सेनापती झालेल्या बापू गोखले याला अतिशय टाकून बोलला. त्या बोलण्याने घायाळ झालेल्या बापू गोखल्याने इंग्रजी फौजेवर एकदम जबरदस्त हल्ला चढवला. पण आता काळ बदलला होता. इंग्रजांजवळ उत्तम तोफा, बंदुका आणि पिस्तुले होती. इंग्रजी पिस्तुलांच्या गोळ्यांनी बापू गोखले ठार झाला. मराठी सैन्याची वाताहत झाली. जनरल मन्रोने आणखी कुमक घेऊन सोलापूरच्या किल्ल्याला मोर्चे लावले. मराठे शौर्याने लढले, पण १५ मे १८१८रोजी सोलापूरचा किल्ला जनरल मेन्रोने सर केला आणि स्वराज्य संपले.

## सातारा व सांगली जिल्हा

इंग्रजांचे राज्य येण्यापूर्वी सातारा जिल्ह्याला सातारा प्रांत असे म्हटले जात असे. १९४९ साली म्हणजे स्वातंत्र्यप्राप्तीनंतर सातारा जिल्ह्याचे उत्तर सातारा आणि दक्षिण सातारा असे दोन भाग पाडण्यात आले. उत्तर सातारा जिल्ह्याचे मुख्यालय सातारा शहरात, तर दक्षिण सातारा जिल्ह्याचे मुख्यालय सांगली शहरात ठेवण्यात आले.

१९५६ साली राज्य पुनर्रचनेमध्ये या दोन्ही जिल्ह्यांचा अंतर्भाव तत्कालीन मुंबई राज्यात करण्यात आला. १९६० साली महाराष्ट्र राज्य स्थापनेच्या वेळी उत्तर सातारा जिल्ह्याचे नाव सातारा व दक्षिण सातारा जिल्ह्याचे नाव सांगली असे करण्यात आले.

सातारा हे शहर छत्रपती शाहू महाराजांच्या कारकिर्दीत निर्माण झाले. मुळात तिथे फक्त किल्ला होता. पन्हाळगडावरून राज्य करणारा शिलाहार राजा दुसरा भोज याने सन ११९० च्या सुमारास हा किल्ला बांधला. त्याची तीन नावे जुन्या कागदपत्रांत सापडतात- १. मंगलाई, २. सप्तर्षी ३. सातारे.

या किल्ल्यावर मंगळाई देवीचे आणि सप्तर्षींचे मंदिर आहे. त्यामुळे सप्तर्षी-सप्ततार-सतारे किंवा सात तारे→सातारे अशी याच्या नावाची व्युत्पत्ती लागते. मुसलमानी अमलात हा किल्ला बहमनी सुलतानाकडे असल्याचा उल्लेख सापडतो. निजामशाही इतिहासात चाँदबिबी या महिलेच्या कथित शौर्याच्या कथा बऱ्याच फुगवून सांगितल्या जातात. बहमनी सत्तेतून फुटून निघून स्वतंत्र बनलेल्या अहमदनगरच्या निजामशहाचे आणि विजापूरच्या अदिलशहाचे आपापसातही भरपूर वैर होते. हे वैर मिटवण्यासाठी या दोन बादशहांनी आपापसात लग्नसंबंध जुळवला. हुसेन निजामशहाने आपली मुलगी अली अदिलशहाला दिली. हीच ती चाँदबिबी आणि हेच ते दोन बादशहा, ज्यांनी सन १५६५ साली विजयनगरचे हिंदू साम्राज्य उद्ध्वस्त करून किमान १० लाख हिंदूंची कत्तल केली. हा अली अदिलशहा मेल्यावर विजापूरच्या राज्यात अंदाधुंदी माजली. मुख्य बंडखोर खुद्द वजीरच होता. त्याचे नाव होते किश्वरखान. त्याने सन १५८२ साली चाँदबिबीला कैद करून काही काळ सातारा किल्ल्यावर ठेवले होते.

शिवरायांनी आग्रा भेटीनंतर सन १६७० साली हिंदवी स्वराज्याचा विकास पुन्हा जोराने सुरू केला. या सपाट्यात सन १६७३ साली त्यांनी प्रथमच सातारा किल्ला जिंकला.

शिवरायांच्या मृत्यूनंतर खासा औरंगजेब स्वराज्य जिंकण्यासाठी दखखनमध्ये उतरला. सन १६९९ साली त्याने साताऱ्याच्या किल्ल्याला वेढा घातला असता, एक विलक्षण प्रसंग घडला. किल्लेदार प्रयागजी प्रभू याच्या कणखर नेतृत्वाखाली मराठे चिवटपणे गड लढवत आहेत, हे पाहून औरंगजेबाने तटांखाली सुरुंग लावले. सुरुंग उडते वेळी खुद्द औरंगजेब वेढ्यातील एका मोर्चावरून पाहणी करत होता. त्याच वेळी किल्लेदार प्रयागजी प्रभू हेही तटावरून वेढ्याची पाहणी करत होते. प्रयागजी ज्या

बुरुजावर उभे होते, तिथेच पहिला सुरुंग उडाला. प्रचंड धडाका झाला. दगडधोंडे आणि मातीचा खणका उसळला. पण विशेष म्हणजे प्रयागजी प्रभू बचावले. तटाला पडलेल्या खिंडारातून आत घुसण्यासाठी मोगलांनी दोन हजार सैनिकांचे पथक तयार ठेवले होते. ते सैनिक पुढे सरसावले तोच बेशुद्ध पडलेले प्रयागजी प्रभू सावध झाले. ते आणि त्यांचे साथीदार संभाव्य हल्ला मारून काढण्यासाठी खिंडारावर उभे राहत आहेत, तोच दुसरा सुरुंग उडाला. त्याने बुरूज व अख्खा कडाच कोसळला आणि मोगलांचे चालून येणारे संपूर्ण पथक त्याखाली सापडून ठार झाले.

औरंगजेबाच्या डोळ्यांदेखत ही घटना घडली. दुःख आणि संताप यांनी खवळलेल्या औरंगजेबाने खिंडारावर पथकांमागून पथके पाठवली. पण प्रयागजी प्रभूंनी अजिबात दाद दिली नाही. शेवटी अन्नपाणी संपल्यावरच मराठ्यांनी हत्यार टेकवले. आपला पुत्र शहजादा अज्जम किंवा आझम याच्या नावावरून औरंगजेबाने या गडाचे नाव ठेवले अजमतारा. सध्या याला अजिंक्यतारा असे म्हटले जाते.

२० फेब्रुवारी १७०७ रोजी औरंगजेब अहमदनगर शहराजवळ भिंगार येथील छावणीत मरण पावला. त्यानंतर दोन-तीन महिन्यांतच मराठ्यांनी सिंहगड, पुरंदर, पन्हाळा, सज्जनगड व सातारा हे किल्ले पुन्हा जिंकून घेतले.

औरंगजेब मेल्यावर त्याचा पुत्र अज्जम बादशाही मिळवण्यासाठी दिल्लीच्या रोखाने धावत सुटला. छत्रपती संभाजीराजांना औरंगजेबाने ११ मार्च १६८९ रोजी ठार मारले होते. त्यानंतर झुल्फिकारखानने नोव्हेंबर १६८९ मध्ये स्वराज्याची राजधानी जो रायगड, तो जिंकला. तेव्हापासून छत्रपती संभाजीराजांची पत्नी महाराणी येसुबाईसाहेब व बाल युवराज शाहूराजे हे मोगलांच्या कैदेत होते. शंभूराजांनंतर त्यांचे धाकटे बंधू छत्रपती राजाराम महाराज यांनी मोगलांशी संघर्ष जारी ठेवला होता. २ मार्च १७०० रोजी सिंहगडावर त्यांचे अतिश्रमाने निधन झाल्यावर त्यांची पत्नी महाराणी ताराबाई हिने सगळा कारभार सांभाळला होता. छत्रपती शिवरायांची ही धाकटी सून कमालीची तेजस्वी व तिखट होती.

शहजादा अज्जमने दिल्लीला जाताना शाहूराजांना सोडून दिले. शाहूराजे आता तरुण झाले होते. शाहूराजे हेच मराठी राज्याचे वारस होते. खुद्द छत्रपती राजाराम महाराजांचे हेच ध्येय होते की, युवराज शाहूंना मोगलांच्या कैदेतून सोडवून गादीवर बसवणे.

पण महाराणी ताराबाईंना राज्यलोभ सोडवेना. त्यामुळे मराठी राज्यात दुही माजली. शहजादा अज्जमची भेदाची गोळी अचूक लागून पडली. १२ ऑक्टोबर १७०७ रोजी ताराबाई पक्ष आणि शाहू राजांचा पक्ष यांच्यामध्ये पुण्याजवळ खेड-कडूस येथे लढाई झाली. शाहू राजांचा पक्ष विजयी झाला. पुणे, जेजुरी, शिरवळ, रोहिडा, राजगड, तोरणा, चंदन-वंदन इत्यादी मुलूख ताब्यात घेत शाहूराजे जानेवारी १७०८ मध्ये सातारा किल्ल्यावर आले.

किल्ल्याच्या उत्तरेस शाहूनगर हे गाव वसवून तीच स्वराज्याची नवी राजधानी असे ठरवून, १२ जानेवारी १७०८ रोजी शाहू राजांना छत्रपतिपदाचा रीतसर अभिषेक करण्यात आला. मात्र शाहूनगर हे नाव प्रचलित झाले नाही. सातारा याच नावाने हे नवे शहर प्रसिद्ध झाले.

सन १७०८ ते सन १७४९ म्हणजे छत्रपती शाहू महाराजांचा मृत्यू होईपर्यंत, सतत ४१ वर्षे सातारा शहर ही स्वराज्याची राजधानी होती. या काळात हिंदवी स्वराज्याचे हिंदवी साम्राज्य झाले. बाळाजी विश्वनाथ, बाजीराव आणि नानासाहेब या छत्रपती शाहूंच्या पराक्रमी पेशव्यांनी आणि कंठाजी कदमबांडे, पिलाजी गायकवाड, त्र्यंबकराव दाभाडे, राघूजी भोसले, फत्तेसिंग भोसले या सरदारांनी भगव्या झेंड्याचा अंमल देशात सर्व दिशांना सर्वदूर नेला.

सातारा शहर आणि सातारा जिल्हा यांचा हा अर्वाचीन इतिहास जितका गौरवशाली आहे, तितकाच त्याचा प्राचीन काळही वैभवाचा असला पाहिजे, असा तर्क आहे. याचे कारण आहे मध्य प्रदेशातील भारहूत हे ठिकाण आणि सातारा जिल्ह्यातील कऱ्हाड हे ठिकाण यांचा संबंध. मध्य प्रदेश राज्यात सतना शहरापासून जवळच भारहूत या ठिकाणी इसवी सनपूर्व तिसऱ्या शतकात बांधलेला एक स्तूप सापडलेला आहे. या स्तूपाच्या वेदिकेच्या बांधणीसाठी, महाराष्ट्रातल्या करहाटक म्हणजे आजचे कऱ्हाड येथून आलेल्या काही यात्रेकरूंनी अनुदाने दिल्याचा उल्लेख तिथल्या अभिलेखामध्ये मिळाला आहे. म्हणजे करहाटकाचे यात्रेकरू मध्य भारतातही यात्रा करत होते आणि

तिथल्या एखाद्या महान कृत्यात सहभागी होण्याइतके ते सधनही होते.

एवढे मात्र खरे की, मुद्दाम नमूद करण्यासारखी एखादी घटना सातारा परिसरात घडली, असे कोणत्याही प्राचीन साहित्यात, शिलालेखांत सापडलेले नाही किंवा खरे तर त्या दिशेने संशोधन, उत्खनन सातारा जिल्ह्यात झालेलेच नाही.

हेच सारे सांगली जिल्ह्यालाही लागू आहे. मुळात सांगली हा जिल्हा नव्हताच. प्रशासकीय सोईच्या दृष्टीने तो जिल्हा निर्माण करण्यात आला, हे आपण सुरुवातीला पहिलेच आहे. मुळात सांगली हे शहरही जिल्ह्याचे मुख्यालय होण्याइतके प्रसिद्ध किंवा प्राचीन नाही. त्याचा उदय गेल्या २०० वर्षांतला आहे.

१४ जानेवारी १७६१ या दिवशी पानिपतची लढाई झाली. त्यात किमान पाऊण लाख मराठे ठार झाले. चुलतभाऊ सदाशिवराव आणि पुत्र विश्वासराव हेही ठार झाल्यामुळे नानासाहेब पेशवा खचला आणि सहा महिन्यांतच तो मरण पावला. पानिपतावर फार मोठेमोठे सरदार पडले होते. नानासाहेबांचा अवघा १६ वर्षांचा पुत्र माधवराव हा पेशवा बनला आणि तो सरदारांची नवी फळी उभी करण्यामागे लागला. या वेळी गोविंदराव पटवर्धन हा एक लहानसा अधिकारी होता. सन १७५९ साली सावनूरच्या नबाबाविरुद्धच्या मोहिमेत चांगली कामगिरी केल्याबद्दल नानासाहेब पेशव्यांनी पटवर्धनांचा पुत्र गोपाळराव याला दोदवाड येथे काही जहागीर दिली होती. १७६१ साली गोविंदरावाला मिरजेचा किल्ला आणि आसपासचा प्रदेश देण्यात आला.

१७६१ सालापासून पुढे गोविंदराव आणि गोपाळराव या पितापुत्रांनी माधवराव पेशव्याला फार मदत केली. माधवराव आणि राघोबा यांच्यातील संघर्षात त्यांनी माधवरावाची म्हणजे न्याय्य बाजू सतत घेतली. तसेच निजाम आणि हैदर यांच्याविरुद्धही सातत्याने पराक्रम गाजवला. साहजिकच त्यांची मूळची जहागीर म्हणजे मिरज किल्ला व शहर आणि आसपासचा भाग, यांत सतत भर पडत गेली.

हे मूळचे मिरज संस्थान लष्करीदृष्ट्या अत्यंत मोक्याचे आहे. त्याच्या पूर्वेला निजामाचे राज्य, आग्नेयेला हैदरचे राज्य आणि दक्षिण व नैर्ऋत्येला कोल्हापूरचे राज्य आहे. कोल्हापूर आपलेच राज्य असूनही त्यांनी कायम सातारकर छत्रपती व त्यांचे हस्तक पेशवे यांच्याशी शत्रुत्वच राखले. तेव्हा या तिन्ही शत्रू राज्यांच्या सीमांवर पटवर्धनांसारखा विश्वासू आणि तिखट हत्याराचा सरदार ठेवणे यातून माधवराव पेशव्याची रणनीतिनिपुणता दिसते.

उत्तर पेशवाईत मात्र याच गुणांमुळे पटवर्धनांना फार त्रास सोसावा लागला. आपले पिता राघोबा यांना पटवर्धनांनी मदत केली नाही, याचा पुरता सूड राघोबाचा मुलगा दुसरा बाजीराव याने उगवला. पटवर्धनांचे त्याने अक्षरशः वाभाडे काढले.

सन १८०८ साली पटवर्धन बंधूंनी आपल्या जहागिरीची मागणी केली. गंगाधरराव यांच्याकडे मिरजेचा किल्ला गेला. चिंतामणराव यांच्याकडे सांगली आली. जमखंडी, तासगाव, कुरुंदवाड, कागवाड इत्यादी भागांच्याही वाटण्या होऊन तिथे वेगवेगळे पटवर्धन बंधू त्या-त्या जहागिरीचे प्रमुख झाले. ब्रिटिश काळात ही सगळी संस्थाने बनली. सांगलीकर संस्थानिकांनी या काळात इतर संस्थानांपेक्षा विशेष प्रागतिकता दाखवल्यामुळे सांगली हे मूळ मिरज जहागिरीपेक्षाही मोठे होत गेले व अखेर जिल्ह्याचे मुख्यालय बनले.

**संदर्भ :**


१. कर्वे चिं. ग., जोगळेकर स. आ., जोशी य. गो.
महाराष्ट्र परिचय अर्थात संयुक्त महाराष्ट्राचा ज्ञानकोश, प्रसाद प्रकाशन, पुणे.
२. दांडेकर गो. नी.
महाराष्ट्र दर्शन, मॅजेस्टिक प्रकाशन.
३. जोशी महादेवशास्त्री
तीर्थरूप महाराष्ट्र.
४. पुरंदरे ब. मो.
राजा शिवछत्रपती, राजहंस प्रकाशन
५. District Gazzetiers of Nashik, Pune, Ahamadnagar, Solapur, Sangali and Satara - Govt. of Maharashtra.


* * *



# महाराष्ट्राची जडणघडण




## खानदेश

■ डॉ. गिरीश मांडके

**मानवी संस्कृती या नेहमी जिथे बारमाही पाण्याचा पुरवठा उपलब्ध असेल, त्याच ठिकाणी म्हणजेच नदी खोऱ्यात विकसित झालेल्या आढळतात. खानदेशातील सर्वांत मोठी नदी असलेल्या तापीच्या खोऱ्यातही ताम्रपाषाणयुगीन संस्कृतीचे अवशेष मिळाले आहेत. इ.स.पूर्व २२०० ते १८०० या काळामधील तापीच्या खोऱ्यात ताम्रपाषाणयुगीन सावळदा संस्कृतीचे अवशेष पुरातत्त्ववेत्त्यांना मिळालेले आहेत. म्हणजेच महाराष्ट्रातील अतिप्राचीन शेतकरी हे खानदेशात साडेचार हजार वर्षांपूर्वी राहत होते.**

खानदेश हा महाराष्ट्राच्या उत्तरेकडील एक प्रादेशिक विभाग आहे.

खानदेशाच्या पूर्वेस बुलढाण्याचे पठार, अजिंठा-पर्वत-टेकड्या, दक्षिणेस मनमाडकडे सातमाळाच्या टेकड्या, नैर्ऋत्येस चांदवड टेकड्या, पश्चिमेस सह्याद्री पर्वतरांगा तर उत्तरेस सातपुडा पर्वतरांगा आहेत. अशा पर्वत-टेकड्यांनी वेढलेल्या खानदेशाचे लोकजीवन व लोकसंस्कृती महाराष्ट्रातील लोकजीवनापेक्षा काहीशी वेगळी आहे. येथील व्यवहाराची भाषा मराठी आहे.

या प्रादेशिक विभागात जळगाव, धुळे व नंदुरबार हे जिल्हे, तसेच नाशिक जिल्ह्याचा पूर्व भाग मोडतो, तर उर्वरित भाग पश्चिम महाराष्ट्रात असल्याचे मानले जाते. इतिहासकाळात मध्य प्रदेशातल्या पूर्व निमाड (खांडवा) जिल्ह्यातील असिरगड-बऱ्हाणपूरपर्यंत विभाग खानदेशाचा गणला जात होता. त्या काळात असिरगड येथूनच प्रशासन चालत असे. उत्तरेकडील असिरगड-बऱ्हाणपूरपासून ते दक्षिणेला नाशिक जिल्ह्यातील मालेगाव, नांदगाव, मनमाड, बागलाण (सटाणा) चांदवड इथपर्यंतचा प्रदेश, तसेच पूर्वेस वऱ्हाड विभागातील बुलढाणा जिल्ह्याची पश्चिम सीमा ते पश्चिमेकडील गुजरातमधील डांग जिल्ह्यापर्यंतचा प्रदेश खानदेश म्हणून समजला जात होता. मागे सांगितल्याप्रमाणे सांस्कृतिकदृष्ट्या हा



पितळखोरा येथील यक्षमूर्ती.

एक विशिष्ट प्रादेशिक विभाग होता आणि आजही तो तसा आहे.

## खानदेश नावाची व्युत्पत्ती

खानदेशाला असिक (ऋषिक) देश म्हणून ओळखले जात होते. ऋषिक हा संस्कृत शब्द. त्याचे प्राकृत रूप असिक होय. वाकाटकांच्या शिलालेखात असिकाची नोंद घेण्यात आली आहे. याशिवाय त्याला अभीरदेश म्हणूनही ओळखले जात होते. या परिसरात राहणारे लोक स्वतःला अभीर, अहीर अथवा गवळी समजत असत. कान्हा, कन्हैया (कृष्ण) हे त्यांचे लोकप्रिय दैवत होते. त्याच्या नावावरूनच या देशाला 'कान्हादेश' म्हटले जाऊ लागले. त्याचाच अपभ्रंश म्हणजेच खानदेश होय. खानदेशाचा लिखित इतिहास प्राधान्याने मुस्लीम राजवटीपासून सुरू होतो. तो या विभागावरील फारुकी सत्तेपासून संगतवार उपलब्ध आहे. गुजरातचा सुलतान अहमद पहिला याने इ. स. १४१७ मध्ये थाळनेरचा दुसरा फारुकी राजा मलिक नसीर याला 'खान' ही पदवी बहाल केली. मलिकच्या या उपाधीवरूनच त्याच्या ताब्यातील प्रदेशाला 'खानदेश' असे नाव मिळाले, असे अबुल फजलने 'ऐन-ए-अकबरी'त नोंदविले आहे. तथापि ते योग्य वाटत नाही कारण त्यापूर्वीही याला खानदेश म्हणूनच ओळखले जात होते. खानदेश शब्दाच्या उत्पत्तीबद्दल संशोधकांमध्ये एकवाक्यता आढळत नाही. हे नाव ऐतिहासिक असले, तरी त्यासंबंधीचा निर्विवाद ऐतिहासिक पुरावा उपलब्ध होत नाही, तो लोकेतिहासाचा भाग आहे.

## खानदेशची ऐतिहासिक पार्श्वभूमी

पाच लाख वर्षांपूर्वी अश्मयुगीन मानव खानदेशात राहत होता. त्याचे अवशेष भारत सरकारच्या पुरातत्त्व खात्यातर्फे डॉ. शंकरराव साळी यांनी शोधून काढले आहेत. चाळीसगावजवळील भास्कराचार्यांचे पाटण येथे त्यांनी केलेले उत्खनन हे आदर्श ठरावे. तेथे त्यांना उत्तर पुराश्मयुगीन दगडी हत्यारे सापडली. ती २५,००० वर्षांपूर्वीची आहेत, हे रेडिओकार्बन पद्धतीमुळे आता सिद्ध झाले आहे. तेथे त्यांना शहामृगाच्या अंड्याचे अवशेष सापडले. त्यावर नक्षी कोरलेली होती. हे महाराष्ट्रातील अतिप्राचीन कलावशेष होत. आज भारतात कोठेही शहामृग हा प्राणी आढळत नाही. तो फक्त वाळवंटी प्रदेशातच राहू शकतो. तेव्हा २५,००० वर्षांपूर्वी महाराष्ट्रात वाळवंटी हवामान असावे, असे अनुमान काढता येते.

मानवी संस्कृती या नेहमी जिथे बारमाही पाण्याचा पुरवठा उपलब्ध असेल, त्याच ठिकाणी म्हणजेच नदी खोऱ्यात विकसित झालेल्या आढळतात. खानदेशातील सर्वांत मोठी नदी असलेल्या तापीच्या खोऱ्यातही ताम्रपाषाणयुगीन संस्कृतीचे अवशेष मिळाले आहेत. इ. स. पूर्व २२०० ते इ. स. पू. १८०० या काळामधील तापीच्या खोऱ्यात ताम्रपाषाणयुगीन सावळदा संस्कृतीचे अवशेष पुरातत्त्ववेत्त्यांना मिळालेले आहेत. म्हणजेच महाराष्ट्रातील अतिप्राचीन शेतकरी हे खानदेशात साडेचार हजार वर्षांपूर्वी राहत होते. कवठे (ता. साक्री) आणि सावळदा व बहुरूपा (ता. नंदुरबार) येथील उत्खननांत त्यांचे अवशेष सापडले आहेत. पांझरा नदीच्या काठी कवठे येथे त्यांची खूप मोठी वसाहत होती. ही मंडळी तेथे खड्ड्यात घरे (गर्तावास) करून राहत होती. ती घरे गोल किंवा लंबगोल आकाराची होती. चूल घराच्या बाहेरच्या बाजूस असे. ते निमभटके लोक होते. वर्षातील पावसाचे चार-पाच महिने ते तेथे राहत आणि बाजरीची लागवड करीत. शेतीपेक्षाही ते शिकारीवर अधिक अवलंबून असत, हे उत्खननात सापडलेल्या प्राण्यांच्या हाडांवरून स्पष्ट होते.

सिंधू संस्कृतीचे लोकसुद्धा चार हजार वर्षांपूर्वी गुजरातेतून प्रथम खानदेशात आले. प्रकाशा (ता. शहादा)

येथे त्याचा पुरावा मिळतो. परंतु ते येथे फारसे स्थायिक झालेले दिसत नाहीत, ते येथे आले, केवळ कच्चा माल गोळा करण्याकरिता. त्यांना अकीक-गोमेदाचे दगड-मणी बनविण्यासाठी पाहिजे होते. ते खानदेशात विपुल प्रमाणात आहेत.

उत्तर सिंधुकालीन लोक येथे आले, त्या वेळी खानदेशात माळवा संस्कृतीच्या लोकांनी सर्वत्र वसाहती केल्या होत्या. माळवा लोकांनी त्यांचा येथे फारसा टिकाव लागूच दिला नाही. माळवा आणि त्यानंतर आलेल्या जोर्वे संस्कृतीचे नागरीकरण झाले नाही. इ. स. पू. १८०० ते इ. स. पू. १२०० पर्यंत म्हणजे ६०० वर्षे हे लोक खानदेशासारख्या सुपीक प्रदेशात राहूनही त्यांच्या संस्कृती ग्रामीणच राहिल्या. याचे मुख्य कारण म्हणजे या काळात पर्यावरण अत्यंत प्रतिकूल झाले होते. पावसाचे प्रमाण खूपच कमी झाले होते. त्यामुळे या शेतकऱ्यांना कधीच सुबत्ता लाभली नाही आणि पुढे तर इ. स. पू. १२०० च्या सुमारास एका ठिकाणी स्थिर जीवन अशक्य झाल्यामुळे महाराष्ट्राचे हे आद्य शेतकरी देशोधडीला लागले. त्यांच्या वसाहती उजाड झाल्या. तेथे पुढे ७००-८०० वर्षे वस्ती झाली नाही. पुढे मौर्य काळात (इ. स. पूर्व ४ थे शतक) वस्ती होऊ लागली आणि सातवाहनकाळात नागरीकरण झाले.



पितळखोरा येथील द्वारपाल.

ऐतिहासिक काळाच्या संदर्भात मौर्यांचे साम्राज्य 'रथिक-भोजिक-पेतनिक-अपरान्तादी' महाराष्ट्रातील भूप्रदेशावर होते. मौर्यांनंतर या परिसरावर सातवाहनांची सत्ता निर्माण झाली. सातवाहनांनी अनेक लहानमोठ्या सत्तांना एका राजकीय छत्राखाली आणले. त्यांनी या परिसरातील राजकीय अस्थिरता नष्ट करून ४५० वर्षांकरिता एकछत्री अंमल प्रस्थापित केला. शेतीच्या उत्पादनाला प्रोत्साहन देऊन नागरीकरण प्रक्रिया गतिमान केली. पूर्व-पश्चिम आणि दक्षिण-उत्तर बाजारपेठांशी व्यापारी संबंध प्रस्थापित करून देशांतर्गत व्यापाराला उत्तेजन दिले. यातील महत्त्वाचे व्यापारी पथ खानदेशातूनच जात असल्याने खानदेशाचे व्यापारी महत्त्व वाढले. खानदेशात व्यापारी चळवळीचा व्यापक पाया घातला गेला. त्याप्रमाणेच कलेच्या क्षेत्रातही नवे दालन उघडले गेले. पितळखोरा आणि अजिंठा येथे सुरेख अशा लेणी खोदल्या गेल्या. सातवाहनांनंतर या परिसरावर अभीरांची सत्ता निर्माण झाली. इ. स. २०३ ते इ. स. १६७ असा वर्षाचा अभीर राजवटीचा कालखंड ठरतो. महाराष्ट्रातील अभीर सत्तेचा संस्थापक म्हणून राजन माढरीपुत्र ईश्वरसेन यास मानले जाते. नाशिकच्या लेण्यांत याचा अभिलेख मिळालेला आहे. नाशिकजवळची अंजनेरी ही याची राजधानी होती.

खानदेशावर अभीरांची सत्ता इ. स. ४१० पर्यंत असावी. त्यानंतर गुप्त सम्राटांनी वाकाटकांच्या साहाय्याने खानदेशातील अभीर सत्तेचे उच्चाटन केले. वाकाटकांच्या नंदीवर्धन शाखेचे खानदेशाशी असणारे संबंध स्पष्ट करू शकणारे काही पुरावे प्रभावती गुप्ताच्या पुणे ताम्रपटात, प्रवरसेन द्वितीय याच्या जांब आणि वडगाव ताम्रपटात, हरिषेणाच्या थाळनेर ताम्रपटात तसेच अजिंठा लेण्यांतील वाकाटककालीन शिलालेखात आढळून येतात. यानंतर खानदेशावर चालुक्यांची सत्ता आली. चालुक्यांच्या नाशिक येथील शाखेतील राजांनी खानदेशावर पकड बसविलेली असावी. याच काळात सेंद्रकांच्या चार पिढ्यांनी खानदेशावर चालुक्यांचे सामंत म्हणून राज्य केले. यानंतर राष्ट्रकूट व यादव घराण्यांनी या प्रदेशावर राज्य केले. सातवाहनानंतर खानदेशावर दीर्घ काल वर्चस्व गाजविणारे घराणे म्हणजे यादव घराणे होय. यादवांची नाणी,


पितळखोरा लेणी

खानदेशातील अनेक जातींनी स्वतःला अहिर देशातील रहिवासी म्हणून अहिर असे उपपद लावून घेतले आहे. उदाहरणार्थ अहिर सोनार, अहिर शिंपी व अहिर सुतार. अभीर ब्राह्मणांचे उल्लेख जुन्या ग्रंथांत आढळतात. परंतु आता स्वतःला अहिर म्हणवून घेणारी ब्राह्मण घराणी आढळत नाहीत. अहिराणी संस्कृती किती जुनी व कशा प्रकारची होती, तिचे स्थित्यंतर कसे झाले, हे पाहावयाचे तर भाषा, रीतीरिवाज, मंदिरे, धार्मिक विधी, देवपूजा, लग्नविधी, वेशभूषा यांचा विचार करावयास हवा. या साऱ्या गोष्टींमधून परंपरेचा व संस्कृतीचा उगम किंवा इतर संस्कृतींशी केलेली देवाणघेवाण यांचा अभ्यास करता येतो.

शिलालेख, ताम्रपट, मठ, मंदिरे, बारवा, दुर्ग, गड, गढी हे सारे खानदेशभर पसरलेले आढळतात.

यादवांच्या कालखंडानंतर खानदेशावर फारुकी या मुस्लीम घराण्याची राजवट सुरू झाली. त्यानंतर मोगल, मराठे व शेवटी इंग्रजांची राजवट खानदेशावर आली.

## खानदेशी लोकसंस्कृती

संस्कृतीची कल्पना यावयाची असेल किंवा ओळख करून घ्यावयाची असेल, तर त्या संस्कृतीच्या समाजाची भाषा, रितीरिवाज, देवदेवता यांचा धांडोळा घ्यावयास हवा. तापी, गिरणा ह्यांच्या काठी महाराष्ट्रातील सर्वांत प्राचीन संस्कृतीचे अवशेष सापडतात व ते येथील प्राचीन अभीर-अहिर संस्कृतीचा वैभवशाली इतिहास सांगून जातात.

इतिहासाचार्य कै. वि. का. राजवाडे यांच्या मते अभीर लोक बाहेरून आले, असे निश्चितपणे ठरविता येत नाही. असे असले, तरी काही संशोधकांच्या मते अनेक वर्षांपासून अभीर लोक गंगा-सरस्वती खोरे, काठेवाड, सुरत, बागलाण असा हजार वर्षांचा प्रदीर्घ प्रवास करीत खानदेशाच्या भूमीत स्थायिक झाले. खानदेशाच्या इतिहासाचा मागोवा घेतला, तर अभीर ही जमात खानदेशात शेती व गोरक्षण यासाठीच स्थिर झाली व येथील नैसर्गिक सुपीक भूमीचा फायदा घेऊन त्यांनी आपली उन्नती करून संस्कृतीचे संरक्षण केले, असे दिसून येते.

भालदेव हे बालाजीचे रूप, खानदेशातील वैष्णव परंपरेचे हे प्रतीक, खानदेशात अनेक बालाजी मंदिरे आहेत. ग्रामीण शेतकऱ्यांच्या जीवनात या देवतेचे वेगळे स्थान व महत्त्व आहे. शेतातील धान्याची रास झाल्यावर त्यातून थोडा भाग बाजूला काढतात, त्याला बालाजी म्हणतात व त्याची पूजा बांधतात व नंतर ते धान्य वाटून देतात. नवरात्रात भालदेव बसला म्हणजे दूधदुभते विकत नाहीत. याचाच अर्थ असा की, बालाजीला धनधान्य, दूधदुभते व समृद्धी ह्यांची देवता मानतात.

कानाबाई हा कुळाचार फक्त खानदेशातच आढळतो व तो खानदेशातील सर्व जातींमध्ये पाळला जातो. ही कानबाई लग्नाआधी बसवितात किंवा श्रावण महिन्यातील रविवारी बसवितात. नंतर तिचे यथोचित विसर्जन करतात.

## जातीजमाती व आदिवासी

खानदेशात मराठ्यांची विशाल वस्ती आहे. यादव, जाधव, निकुंभ, भुसकुटे, दाभाडे, पवार, गायकवाड, भोसले इत्यादींच्या राजकुळांनी खानदेशाच्या राजकीय व सामाजिक इतिहासात महत्त्वाची कामगिरी बजावली आहे. मराठ्यांची शेकडो कुळे खानदेशात पूर्वीपासून नांदत आहेत. महानुभावांचा समाजही लहान नाही. मराठी साहित्यात महानुभावी साहित्य व लिपी ह्यांचे स्थान अत्यंत

महत्त्वपूर्ण आहे. खानदेशातील मुख्य समाज हा महाराष्ट्रातील इतर समाजांप्रमाणे आहे. परंतु खानदेश हा महाराष्ट्रातील इतर भागांपेक्षा आपले वेगळे वैशिष्ट्य राखून आहे व ते म्हणजे येथे राहणारा आदिवासी समाज होय. भिल्ल, पावरा, बंजारा, कोकणा, तडवी या आदिवासी जमाती प्रामुख्याने खानदेशात आढळतात. कित्येक शतकांपासून या प्रदेशात राहणाऱ्या या जमातींमध्ये ताम्रपाषाणयुगीन संस्कृतीची काही वैशिष्ट्ये आजही दिसून येतात.

खानदेशातील भिल्लांच्या राजसत्तेचा इतिहास शोधताना आपणास पारंपरिक मौखिक वाङ्मयाचा आधार घ्यावा लागतो. आदिवासींमधील विविध जातिजमाती आपणास राजपूत समजतात. मौखिक परंपरेप्रमाणे हे लोक राजस्थानातून स्थलांतरित होत-होत या भागात स्थायिक झाले. आपापल्या जाति-वैशिष्ट्यांप्रमाणे त्यांचे वेगवेगळे जातिनिहाय गट बनले. या गटांचा जो नेता असे, तो आपल्या जातीचे नेतृत्व करू लागला. आपापल्या प्रदेशांत त्यांनी आपली स्वतंत्र राज्यव्यवस्था तयार केली. खानदेशातील नंदुरबार जिल्हा हा आदिवासी जिल्हा समजला जातो. पाडवी, वळवी, वसावा, वसावे, नाईक या जमातींची वेगवेगळी संस्थाने होती. अक्राणीमहाल तसेच धडगाव येथे आदिवासी संस्थाने होती. परंतु इंग्रजांनी ती नष्ट केली. इंग्रज काळात काठी, नाला, सिंगपूर, सजडाण, भगदरी येथे पाडवींची; गंठा, सागबारा येथे वसव्यांची; रायसिंगपूर येथे वळवींची; तर भांगराणी, आमदा, मोरआंबा येथे नाइकांची संस्थाने होती. भारताला स्वातंत्र्य मिळाल्यावर ही संस्थाने खालसा करण्यात आली.

याहामोगी उर्फ देवमोगरा या देवीची स्थापना सागबाराच्या संस्थानिकांनी केली होती. पुढे या संस्थानांच्या वारसांनी इस्लाम धर्माचा स्वीकार केल्यामुळे त्यांना या देवीचे दर्शन घेऊ दिले जात नसे. ते दर्शनाला आले की त्यांच्यासमोर कांबळे धरले जाई. भिल्लांच्या सांस्कृतिक इतिहासात गंठा संस्थानचे योगदान मोठे आहे. त्यांनी सुरू केलेले उत्सव आजही पाळले जातात. या संस्थानिकांनी वाघाला आपले दैवत मानले होते. त्यांनी वाघाची लाकडाची मूर्ती बनवून तिची स्थापना केली होती. त्यालाच 'वागल्या गादी' असे म्हणत. वागदेव म्हणून या देवतेचे पूजन श्रावण महिन्यात होते. याशिवाय या संस्थानात दसरा सण मोठ्या प्रमाणावर साजरा होतो. या संस्थानिकांनी इस्लाम धर्माचा स्वीकार केल्यानंतरही या धार्मिक सणांमध्ये ते मोठ्या उत्साहाने सामील होत असत. सजडाणच्या संस्थानिकांनी होळीच्या 'डिंडण' नावाच्या वैशिष्ट्यपूर्ण लोकनृत्याची परंपरा सुरू केली. असा आहे खानदेश आणि अशी आहे तेथील संस्कृती. महाराष्ट्रात राहूनही आपले वेगळेपण त्याने टिकवले आहे.

**संदर्भ :**


१. Gazetteer of the Bombay Presidency, Khandesh District, Volume XII, reprinted 1930.

२. खानदेशचा सांस्कृतिक इतिहास
शहा मु. ब., का. स. वाणी मराठी प्रगत अध्ययन केंद्र, धुळे, खंड १ ते ४, २००४.


* * *



# महाराष्ट्राची जडणघडण




## मुंबई

■ वृंदा पाठारे

**मुंबईची जडणघडण व भरभराट व्यापारी बंदर म्हणून झाली. चौथ्या शतकात चेऊल हे प्रमुख बंदर म्हणून आपले महत्त्व स्थापन करेपर्यंत सुपारक (सोपारा) हे मेसोपोटेमिआशी व्यापारातील महत्त्वाचे बंदर म्हणून ओळखले जात असे. जातककथांनुसार इ.स.पूर्व ८व्या ते ६व्या शतकापर्यंत सोपारा व भडोच येथून बॅबीलॉन साम्राज्याशी व्यापार चालत असे. मेगेस्थिनीस हा चेऊल या बंदराचा उल्लेख प्रमुख बाजारपेठ म्हणून करतो. ह्या काळात मुंबई व पश्चिमेकडील भूभाग हा अपरांत म्हणून ओळखला जात असे.**

'मुंबईचे वर्णन' या १८६३ साली प्रसिद्ध झालेल्या गोविंद नारायण माडगावकर लिखित पुस्तकात मुंबईचे वर्णन आहे. त्यांना एका स्थानिक सुताराकडून मिळालेली पुढील कविता त्यामध्ये आढळते.

सत्रासेंविस संवताचे समयी इंग्रज विलायतेसी।
आला पाहुनि ज्येष्ठमास बरवा चालूनि मुंबैइसी।
फिंर्ग्यांने बकशीस गाव दिधला ईनाम बाच्छाइला।
ताळेवत समर्थ इंग्रज इथे तैपासुनी वाढला।।
महाघोर राने तशा शेतवाड्या।
बहू लोकवस्ती असीतै न होती।
महाघोर राने तशा शेतवाड्या।
लघू झोपड्या झावळ्यांच्या कवाड्या।।

माडगावकरांच्या मते मुंबईत पुरातन काळापासून स्थायिक झालेले कोळी, भंडारी, पळशे जोशी, पाठारेप्रभू पाचकळशी या पाच

जातींची ही भाषा असावी. सोपारा, वसई, ठाणे, कल्याण, चौल आणि जंजिरा या बंदरांच्या सान्निध्यामुळे मुंबईत फार पूर्वीपासून भारताच्या विविध भागांतून, विविध जातिधर्मांचे लोक ये-जा करत होते. जातककथांतून, तसेच अनेक प्रवासवर्णनांतून या बंदरांचा उल्लेख आढळतो. मुंबईच्या मिश्र-जीवनपद्धतीची ही सुरुवात म्हणावी लागेल. त्या काळी मुंबई म्हणजे सात बेटांचा समूह होता.

मनुष्याच्या वसाहतीस मुंबईत सुरुवात झाल्याचा अगदी अश्मयुगीन पुरावादेखील उपलब्ध झाला आहे. मुंबईतील बॅकबे तसेच कुलाबा या भागांत मानववंशशास्त्रज्ञांना अश्मयुगीन वसाहती पुरावे आढळले. युरोपातील गुहेत राहणाऱ्या मनुष्याप्रमाणे मुंबईतील अश्मयुगीन मानव हा दगडी हत्यारे वापरत होता. आपल्या उपजीविकेसाठी तो मासेमारी करत असे, खैर (Acacia catechu) गोळा करत असे आणि जंगलात शिकार करत असे. 'राइझ ऑफ बॉम्बे' ह्या आपल्या पुस्तकात एडवर्ड्स म्हणतो की ''A petrified khair forest was discovered while excavating the foundation of Prince's dock.''

नाशिकच्या शिलालेखानुसार दुसऱ्या शतकाच्या सुरुवातीस ठाण्याच्या उत्तर भागात मोठ्या प्रमाणावर ताडाची शेती केली जात होती. याच सुमारास स्थलांतरित झालेल्या लोकांमध्ये मोठ्या प्रमाणावर भंडारी जमात स्थायिक झाल्याचे दिसून येते. परंतु त्याआधीपासून मुंबईत कोळ्यांची वस्ती होती. पुढील काळात मुंबईतील अनेक जाती गुजरातमधून आल्याचा निर्वाळा देतात व मुख्यत्वेकरून कुलाबा, मांडवी, डोंगरी, माणगाव, वरळी, माहीम व शीव या परिसरांत त्या स्थायिक झालेल्या आढळतात. त्यांच्या आगमनाचा निश्चित काळ मात्र सांगता येत नाही. याच जातीजमातींबरोबर गुजरातमधील मोम्मई देवीदेखील मुंबईत वसली व तिच्याच नावाचा अपभ्रंश 'मुंबादेवी' असा झाला असावा, असे एक मत आहे. ह्या देवीचे मंदिर छत्रपती शिवाजी टर्मिनस व मुंबई महापालिका ह्या परिसरात बांधले गेले. पुढे तेथून हालवून त्याला आजच्या जागेत आणण्यात आले.



मुंबादेवी मंदिर

या स्थलांतरित लोकांबरोबरच, पश्चिमेशी सुरू झालेल्या व्यापारामुळे मुंबईची जडणघडण व भरभराट व्यापारी बंदर म्हणून झाली. चौथ्या शतकात चेऊल हे प्रमुख बंदर म्हणून आपले महत्त्व स्थापन करेपर्यंत सुपारक (सोपारा) हे मेसोपोटेमिच्या व्यापारातील महत्त्वाचे बंदर म्हणून ओळखले जात असे. जातककथांनुसार इ. स. पूर्व ८ व्या ते ६ व्या शतकापर्यंत सोपारा व भडोच येथून बॅबीलॉन साम्राज्याशी व्यापार चालत असे. मेगेस्थिनीस हा चेऊल या बंदराचा उल्लेख प्रमुख बाजारपेठ म्हणून करतो. ह्या काळात मुंबई व पश्चिमेकडील भूभाग हा अपरांत म्हणून ओळखला जात असे.

या काळातील राजकीय परिस्थितीविषयी बोलायचे झाले, तर इ. स. पूर्व २५० मध्ये मौर्यांचे सार्वभौमत्व उत्तर कोकणानेदेखील मान्य केल्याचे दिसते. अशोकाच्या बौद्ध



कान्हेरी गुंफा

मताचा फैलाव या भागात झालेला दिसतो. परंतु मौर्य साम्राज्याच्या अस्तानंतर पश्चिम महाराष्ट्रावर सातवाहनांचे वर्चस्व दिसून येते. इ.स. २२० पर्यंत तब्बल ३०० वर्षे सातवाहनांनी कोकण प्रदेशावर राज्य केले.

सातवाहन राजवटीच्या काळात दख्खनपासून किनाऱ्याच्या प्रदेशापर्यंतच्या मुख्य मार्गावर अनेक कोरीव लेणी खोदली गेली. नाशिक ते सोपारा तसेच जुन्नर व पुण्यापासून चेऊल आणि जंजिरा इथे जाणाऱ्या मार्गांवर असलेली तसेच काण्हेरी व कुडा येथील लेणीही खोदण्यात आली. साष्टी भागातील काण्हेरी लेणी सोडली, तर सातवाहनांचा तसा मुंबईशी संबंध आला नाही. सातवाहनांच्या काळात पर्शिअन आखाताखेरीज इजिप्तशीही व्यापार वाढीस लागला होता. इ.स. २२० मध्ये कोकण व मुंबई यांवर क्षत्रपांचे वर्चस्व प्रस्थापित झाले होते.

चौथ्या व पाचव्या शतकातील उत्तर कोकणाबद्दल फारशी माहिती उपलब्ध नाही. परंतु पाचव्या शतकात अगदी भरूचपर्यंत पश्चिम किनाऱ्यावर इ.स. २५० पासून त्रैकुटक नावाच्या घराण्याचे राज्य होते, असा उल्लेख आढळतो. कान्हेरी येथे त्रैकुटकांनी इ.स. ४९४ मध्ये दान दिल्याचा उल्लेख आढळतो. पाचव्या शतकाच्या अखेरीस त्रैकुटक घराण्याची सत्ता जाऊन मौर्य घराण्यातील काही स्थानिक राजांची सत्ता आली. ठाण्यातील वाडा येथील शिलालेखात यांपैकी सुकेतुवर्माचा उल्लेख आढळतो.[१]

इ.स. ७५७ मध्ये राष्ट्रकूटांकडून पराभव होईपर्यंत चालुक्यांचे दख्खनवर पूर्ण वर्चस्व होते. पुढे राष्ट्रकूटांनी तब्बल ५० वर्षे राज्य केले. इ.स. ८१० च्या सुमारास राष्ट्रकूट राजा गोविंद तिसरा ह्याने आपली राजधानी दुसरीकडे नेण्याचा निर्णय घेतला व ठाणे प्रदेशाचा प्रशासकीय अधिकार शिलाहार घराण्याला देण्यात आला. राष्ट्रकूटांच्या अस्तानंतर शिलाहार घराणे दक्षिण कोकणचे सर्वेसर्वा बनले व त्यांनी साडेचार शतके (इ.स. ८१०-१२६०) मुंबई व कुलाबा जिल्ह्यांसहित संपूर्ण ठाणे जिल्ह्यावर राज्य केले. शिलाहार राजवटीमध्ये व्यापाराला खूप उत्तेजन देण्यात आले. खासकरून मुस्लीम जगताशी असलेला व्यापार या काळात वाढीस लागला. इथे आलेल्या मुस्लीम व्यापाऱ्यांना मशिदी बांधण्यासाठी परवानगी देण्यात आली, त्याचबरोबर ज्यू, ख्रिश्चन तसेच पारसी लोक मोठ्या प्रमाणात चेऊल व आजूबाजूच्या प्रदेशांत स्थायिक होऊ लागले. विविध धर्ममतांना आश्रय देणाऱ्या शिलाहारांनी भारतीय स्थापत्यशास्त्राचा उत्तम नमुना असलेली मंदिरे निर्माण केली. अंबरनाथ, श्रीगुंडी तसेच वाळकेश्वर (बाणगंगा) येथील मंदिरे ही याची साक्ष देतात.

श्रीगुंडीचा उल्लेख १७ व्या / १८ व्या शतकातील अनेक प्रवासवर्णनांतून आढळतो. मूरने 'इंडियन पॅन्थिऑन' ह्या आपल्या पुस्तकात वाळकेश्वराच्या टोकाशी शिलाहारकालीन मंदिरांचे अवशेष मिळाल्याचा उल्लेख केला आहे. येथील काही शिवप्रतिमा इंग्लंडमधील साउथ केन्सिंग्टन येथील इंडियन म्युझिअममध्ये पाठविल्याचा उल्लेख तो करतो. आजही गुरुपौर्णिमेनंतरच्या मंगळवारी राजभवनाच्या परिसरातील मंदिरात अनेक भाविक जत्रेसाठी जमतात. हे मंदिर अलीकडेच बांधले गेले आहे. परंतु श्रीगुंडीच्या स्थानाची स्मृती या मंदिराच्या रूपाने जपली जात आहे.

शिलाहारानंतर हा प्रदेश देवगिरीच्या यादवांनी नेमलेल्या एका कृष्ण नावाच्या ब्राह्मण अधिकाऱ्याच्या नियंत्रणाखाली आला. परंतु या काळाविषयी फार माहिती उपलब्ध नाही. फेरिश्ता लिहितो की, १४९२ मध्ये राजधानी ठाण्याहून मुंबई-माहीमकडे हालविली गेली. या काळात एक स्वतंत्र राजा राज्य करत असल्याचा उल्लेख मार्कोपोलो करतो. हाच राजा बिंब असावा, असे वाटते. असे म्हटले जाते की, अल्लाउद्दीन खिल्जीच्या आक्रमणामुळे बिंबराजा सौराष्ट्राहून मुंबईमधील साष्टीच्या आश्रयास आला व महिकावती

म्हणजे आत्ताच्या माहीम येथे त्याने आपली राजधानी बसवली. बिंबराजाबरोबर पाचकळशी, प्रभू, यजुर्वेदी, अशा काही जाती मुंबईत स्थलांतरित झाल्या. बिंब राजाचे कुलदैवत प्रभादेवी हिचे मंदिरही या काळात बांधले गेले. राजा बिंब नक्की कोण होता, याविषयी अनेक मतांतरे आहेत. काही लोक बिंबराजाचा संबंध अनहिलवाड्याच्या सोळंकी घराण्याशी लावतात, तर काही देवगिरीच्या यादवांशी संबंध लावतात. गर्सन डी कुन्हा यांच्या 'ओरिजन ऑफ बॉम्बे' या पुस्तकाप्रमाणे व काही संशोधकांच्या मते राजा बिंब हा चालुक्य घराण्यातला असावा. बिंब राजाच्या घराण्याबद्दल जरी मतांतरे असली, तरी मुंबईच्या इतिहासावर या बिंब राजाच्या कारकिर्दीचा मोठा प्रभाव दिसून येतो. त्याच्या पश्चात १४व्या शतकाच्या सुरुवातीस त्याचा मुलगा प्रतापदेव गादीवर आला व त्याने जवळजवळ ३० वर्षे राज्य केले.

## मुस्लीम राजवट

बिंब राजाच्या राजवटीपासूनच मुस्लीम राजे मुंबईवर नजर ठेवून होते. इ. स. १३१८ मध्ये मुबारक शहा पहिला ह्याने माहीम व साष्टी काबीज केले. पुढे १३२२ मध्ये मुस्लीम राजवट ठाण्यापर्यंत पसरली. परंतु मुबारक शहाची राजवट फार काळ टिकू शकली नाही. महम्मद बिन तुघलकच्या (१३२५-१३५०) राजवटीत दख्खन व गुजरात येथे झालेल्या बंडांमुळे मुंबईचे राज्य पुन्हा हिंदू राजाकडे गेले. इ. स. १३४७ मध्ये हिंदू राजा नागरदेव याच्या जयचुरी व नाथराव भोंगले या दोन सरदारांच्या गैरवर्तणुकीमुळे उठावाची परिस्थिती निर्माण झाली व नागरदेवाच्या हिंदू राजवटीचा अस्त झाला. भोंगले हा सरदार गुजरातच्या मुस्लीम राजाच्या आश्रयास गेला. परिणामी निका मलिकच्या नेतृत्वाखाली साष्टी व ठाणे येथे आक्रमण करण्यात आले व माहीमला वेढा घालण्यात आला. नागरदेवाच्या अनुपस्थितीत त्याच्या राणीने माहीमचे रक्षण केले परंतु तिचे प्रयत्न अपयशी ठरले.

गुजरातमध्ये सुलतानशाही प्रस्थापित झाल्यानंतर फिरोजशाह याने उत्तर कोकणचा सुभेदार म्हणून जाफरखान याची नेमणूक केली. जाफरखानने जवळजवळ ३० वर्षे राज्य केले. या दरम्यान मुस्लीम राजवटीच्या विरोधात भंडारी लोकांनी बंड केल्याचे दिसून येते. या बंडाचा उल्लेख 'मुंबईचे वर्णन' या माडगावकरांच्या पुस्तकात तसेच एडवर्डच्या 'Rise of B'bay' या पुस्तकात आढळतो. परंतु लगेचच १४२९ मध्ये दख्खनच्या अहमद बहामनीने खलफ हसन बस्रीच्या नेतृत्वाखाली उत्तर कोकण सर करण्यासाठी सैन्य पाठवले. ही बातमी मिळताच गमावलेले राज्य मिळवण्याच्या हेतूने गुजरातच्या सुलतानाने जाफर खान यास सैन्य घेऊन उत्तर कोकणच्या दिशेने पाठवले. याची परिणती दख्खनच्या बहामनी व गुजरात सुलतानाचे सैन्य ह्याच्याांमधील तुंबळ युद्धात झाली. यात गुजरात सुलतानाच्या सैन्याचा विजय झाला. परंतु बहामनी सुलतानाने उत्तर कोकण काबीज करण्याचे प्रयत्न थांबवले नाहीत.

अहमद शाहपासून (१४११-१४४१) बहादूर शाहपर्यंत (१५२७-१५३६) मुंबईवर गुजरातच्या सुलतानांची हुकमत राहिली. १४७८ मध्ये गुजरातच्या सुलतानशाहीला इतरत्र अनेक विरोधांचा सामना करावा लागला. बहादूर खान गिलानी याने दाभोळचा कब्जा घेतला. १४८० मध्ये अहमदनगरचा मलिक अहमद व विजापूरचा युसुफ आदिलखान या दोघांनी गुजरात सुलतानाच्या अखत्यारीतील प्रदेश काबीज करण्यास सुरुवात केली. मलिक अहमदने १४९३ मध्ये दांडा, राजापूर व उत्तर कोकणचा काही भाग ही ठिकाणे सर केली, तर बहादूरखान गिलानीने गुजरातच्या बंदरांवर चढाया करून अहमदाबाद सुलतानांची जहाजे काबीज करण्यास सुरुवात केली.[२] गुजरात सुलतान मुहम्मद बेगडा याने प्रत्युत्तर म्हणून दाभोळवर हल्ला केला व कोल्हापूरनजीक झालेल्या लढाईत विजय मिळवला. यापश्चात बहामनीचे वर्चस्व कमी होऊन त्यांच्या वर्चस्वाखालील प्रदेशाचे विभाजन अहमदाबाद व विजापूर ह्या सत्तांमध्ये झाले.

सुलतान मुहम्मद बेगडा याच्या काळात पोर्तुगीजांनी मुंबई, साष्टी व वसई येथे आपली सत्ता स्थापन करण्याचे प्रयत्न सुरू केले होते. गुजरातच्या बहादूरशाहच्या मृत्युपश्चात, म्हणजेच इ. स. १५३६ नंतर, गुजरात सुलतानशाहीचा प्रवास हळूहळू अस्ताकडे सुरू झाला. पुढे



वसई किल्ल्यातील पोर्तुगीज सील

१५७२ मध्ये गुजरात सुलतानशाही संपुष्टात आली. अकबराच्या नेतृत्वाखाली मुघल साम्राज्य गुजरातपर्यंत पसरले. गुजरात सुलतानशाहीच्या ह्या पडझडीच्या काळात पोर्तुगीजांना मुंबई व उत्तर कोकण येथे आपल्या सत्तेची पाळेमुळे रुजविण्यात यश आले.

मुंबईवरील मुस्लीम राजवटीच्या वर्चस्वाचा काळ मात्र निश्चित सांगता येत नाही. मुस्लीम राजवटीतदेखील मुंबईचे अंतर्गत प्रशासन स्थानिक हिंदू राजाकडे असावे, असे दिसून येते. उल्लेख करता येईल अशा दोन राजांची उदाहरणे देता येतील पहिला राजा म्हणजे माहीमचा राजा, ज्याची मुलगी गुजरातच्या सुलतानाच्या मुलास दिली गेली (१४३२), तर दुसरा भिवंडीचा राजा. १४६४च्या एका शिलालेखानुसार भिवंडीच्या राजाने अनेक जमिनी दान दिल्याचा दाखला मिळतो. याच काळात स्थापन झालेला माहीम येथील मखदूम फाकी अली या पिराचा दर्गा मुंबईतील मुस्लीम राजवटीची साक्ष देत आजही उभा आहे.

### पोर्तुगीज काळ

१५३४ मध्ये गुजरातच्या सुलतान बहादूर याने मुंबई हे बेट पोर्तुगीजांना सुपूर्द केले. परंतु यापूर्वीच पोर्तुगीजांनी उत्तर कोकणात आपले वर्चस्व प्रस्थापित केले होते व ते अनेकदा मुंबईला येऊन गेले होते.

१५०८ मध्ये डॉन फ्रान्सिस्को दि अल्मेडा, गोव्याचा पहिला व्हॉईसरॉय, याने मीर हुसैनला धडा शिकवायला आपल्या मुलाला दीव येथे पाठविले. पोर्तुगीजांना भारतातून हद्दपार करण्यासाठी कायरोच्या सुलतानाने मीर हुसैनला भारतात पाठविले होते. दाभोळमार्गे येताना पोर्तुगिजांचाच पहिला संबंध मुंबईशी आला. दीव येथे झालेल्या रणधुमाळीत मीर हुसैनचा दारुण पराभव झाला. या यशामुळे दीव येथे किल्ला बांधण्याच्या पोर्तुगीजांच्या मनसुब्यास खतपाणीच मिळाले. यासाठी पोर्तुगिजांनी १५१३-१५१४ मध्ये गुजरात सुलतान बहादूरकडे जमिनीसाठी चर्चा करण्यासाठी दोन वेळा दूत पाठविला. या चर्चांमध्ये 'माहीम' हा एक पर्याय देण्यात आला होता. परंतु दूत दीववरच ठाम राहिले.

१५२२ आणि १५२४ दरम्यान डॉम ड्यूआर्टे दि मेनेहीस हा गोव्याचा व्हॉईसरॉय होता. याच काळात मुस्लीम जहाजांशी सामना देत पोर्तुगीज अनेकदा मुंबईस आले होते. १५२८-१५२९ मध्ये लोपो वाझ याने तर माहीमच्या किल्ल्यावरही ताबा मिळवला, तर १५२९ मध्ये मुंबईवर अनेक चढाया करणाऱ्या हेटर डिसिल्व्हाने मुंबईला 'a ilha da boa vida' म्हणजेच 'चांगले जीवन असलेले बंदर', अशी उपाधी बहाल केली.[३]

१५३०-१५३१ मध्ये नुनो दा कुन्हा याच्या मदतीने दीववर घाला घालण्याचा डाव आखला गेला. त्यानंतर झालेल्या चढाओढीत १५३३ मध्ये नुनो दा कुन्हा याने वसई ताब्यात घेतली व बांद्र्यापर्यंतची मुंबई आणि माहीम हे भाग पोर्तुगिजांच्या राज्याचे भाग बनले. या यशापश्चात सुलतान बहादूराने १५३४ मध्ये शाहख्वाजा यास नुनो दा कुन्हा याच्याकडे वसईच्या हस्तांतरणावरून बोलणी करावयास धाडले. याची परिणती २३ डिसेंबर रोजी वसईच्या तहात झाली. या तहाअंतर्गत पोर्तुगीजांना दीव येथे किल्ला बांधण्याची अनुमती देण्यात आली. परंतु हे यश पोर्तुगीजांना फार काळ मानवले नाही. नंतरची १० वर्षे पोर्तुगीज हे आदिलखान, गुजरातचे सुलतान, कालिकतचे झामोरिन, दीववर झालेले तुर्क आक्रमण अशा विविध आघाड्यांवर सतत लढत होते. ह्या सततच्या लढायांमुळे पोर्तुगीजांवर आर्थिक तणाव पडत गेला. याचा परिणाम असा झाला की, पोर्तुगीजांनी चांगल्या कामगिरीसाठी आर्थिक पुरस्कार देण्याऐवजी भेट म्हणून जमिनी देण्यास सुरुवात केली. प्रशासनाच्या दृष्टीने

मुंबई तसेच उत्तर कोकण प्रदेश हे विविध भागांत (manor) विभागण्यात आले. व प्रत्येक विभाग हा ४% ते १०% ह्या दराने पात्र व्यक्तीस देण्यास सुरुवात झाली. १५५४ मध्ये मुंबई बेट हे प्रख्यात फिजिशीअन व वनस्पतिशास्त्रज्ञ गारसिआ दी ओर्ता याच्याकडे म्हणजे काय? ८५ च्या दराने सुपूर्द केले गेले.[४]

पोर्तुगीज अमलाचा हा काळ त्यांच्या धार्मिक विस्ताराचीकटू कहाणीदेखील सांगतो. १५३४ मध्ये झालेल्या वसईच्या तहाबरोबरच पोर्तुगीजांच्या राजाने धर्मप्रसारासाठी मुंबई व वसई येथील मिशनऱ्यांना आर्थिक पाठबळ देऊ केले. वसई, ठाणे, मंडपेश्वर व आसपासच्या प्रदेशात मिशनऱ्यांचा धर्मप्रसार सुरू झाला. याच काळात १५१० साली माहीम येथील प्रसिद्ध सेन्ट मायकल चर्च बांधण्यात आले. याचबरोबर शीव येथे Nossa senhora de Bom Conrelho व दादर येथील Nossa senhora de salvacao (ज्याला दादरचे पोर्तुगीज चर्च म्हणून ओळखले जाते) ही दोन्ही चर्चेस १५९६ साली बांधण्यात आली. दादर येथील चर्चचा उल्लेख Fryer आपल्या १६७३ साली लिहिलेल्या प्रवासवर्णनात करतो. परळ येथील रोमीश चॅपेलदेखील याच काळात बांधले गेले. १७१९ मध्ये ब्रिटिशांनी त्याचा ताबा घेऊन तेथे गव्हर्नमेन्ट हाउस बांधले. पुढील काळात हीच वास्तू Bacteriological Laboratory साठी देण्यात आली. तिथे आज हाफखकिन इन्स्टिट्यूट उभी आहे.

पोर्तुगीजांच्या राज्यविस्ताराच्या काळात, इ. स. १५८३ मध्ये, पश्चिम तटावर इंग्रज व्यापाऱ्यांचे आगमन झाले. इंग्लंड आणि भारत येथील व्यापारवृद्धीसाठी २२ सप्टेंबर १५९९ रोजी असोसिएशन ऑफ मर्चंट ॲडवेंचरर्सची स्थापना झाली व १६०० मध्ये यास राणीची मान्यतादेखील मिळाली. हॉकिन्सच्या नेतृत्वाखाली एक तुकडी लोखंड व शिसे घेऊन सुरतेला पोहोचली. राजा जेम्सने मुघलांना लिहिलेल्या पत्रामुळे त्यांना सुरतेमध्ये उतरण्याची व तेथून पुढे आग्र्याला जाण्याची परवानगी तर मिळाली, परंतु सुरतेला कारखाना निर्माण करण्याची परवानगी न मिळाल्याने हॉकिन्सला १६१२ मध्ये मायदेशी परतावे लागले. दरम्यान सर हेन्री मिडल्टन सुरतेला पोहोचला. परंतु पोर्तुगीजांनी व्यापाराची परवानगी नाकारली. या वादाचे रूपांतर १६१५ मध्ये स्वालीच्या लढाईत झाले. यात इंग्रज विजयी झाले व या विजयामुळे पश्चिम भारतात इंग्रजांच्या साम्राज्याची मुहूर्तमेढ रोवली गेली. नैसर्गिक बंदर म्हणून – मुंबईचे महत्त्व इंग्रजांनी आधीच जाणल्यामुळे त्यांनी मुंबईवर ताबा मिळविण्याचे प्रयत्न सुरू केले व बर्डवूडने १६२५ मध्ये मुंबईवर ताबा मिळवलादेखील. परंतु नंतरच्या काळात अज्ञात कारणास्तव इंग्रजांनी मुंबईचा ताबा सोडला. १६५२ मध्ये सुरत काउन्सिलने पोर्तुगिजांकडून मुंबई विकत घेण्याचा प्रस्ताव मांडला.

१७ व्या शतकाच्या मध्यावर डचांचे वाढते वर्चस्व तसेच शहाजहानच्या मृत्यूनंतर झालेल्या अंदाधुंदीत इंग्रजांना पश्चिम भागात आपले हक्काचे असे स्थान निर्माण करण्याची आवश्यकता जाणवू लागली व पुन्हा एकदा पोर्तुगीजाकडून मुंबई हस्तगत करण्याचे प्रयत्न सुरू झाले. १६६१ मध्ये चार्ल्स दुसरा व पोर्तुगीज राजकन्या इन्फन्टा डोना कॅथेरीना यांच्या विवाहाच्या वेळी ही संधी चालून आली. या विवाहानिमित्त झालेल्या तहान्वये मुंबई बंदर इंग्रजांना सुपूर्द करण्यात आले.

### ब्रिटिश काळ

इस्ट इंडिया कंपनीसाठी विवाहानिमित्ताचा हा तह वरदान ठरला. वांद्रे, तुर्भे, साष्टीसहीत मुंबईजवळील सर्व बेटे इंग्रजांच्या ताब्यात आली. या तहापश्चात इंग्लंडने सर अब्राहम शिपमन याच्या नेतृत्वाखाली चार-पाचशे सैनिकांची तुकडी मुंबईच्या दिशेने रवाना केली. मुंबईचा पहिला गव्हर्नर म्हणून शिपमनची नेमणूक करण्यात आली.[५]

ॲन्टोनिओ डीमेलो डीकॅस्ट्रो हा पोर्तुगालचा व्हॉइसरॉयदेखील मुंबईचे औपचारिक हस्तांतरण करण्यासाठी त्याच्याबरोबर होता. ही मंडळी सप्टेंबर १६६२ मध्ये मुंबईस पोहोचली.

मुंबईचे महत्त्व ओळखल्यामुळे ॲन्टोनिओ डिमेलो कॅस्ट्रो हा प्रथमपासूनच मुंबईच्या हस्तांतरणाच्या विरोधात होता. परंतु हे हस्तांतरण लांबवण्याचे अनेक प्रयत्न करूनही

तो मुंबईचे हस्तांतरण थांबवू शकला नाही व पोर्तुगालने १६६५ मध्ये मुंबईचे पूर्ण हस्तांतरण केले.[६]

परंतु या हस्तांतरणाआगोदरच इ.स.१६६४ मध्ये अब्राहम शिपमन मृत्यू पावला व हम्फ्रे कुक हा मुंबईचा गव्हर्नर झाला. त्याच्या अखत्यारीत मुंबईचे औपचारिक हस्तांतरण झाले. पुढे पैशांच्या अपहारामुळे कुकची बडतर्फी करण्यात आली. कुकनंतर सर गर्वीस लुकास गव्हर्नर झाला. मुंबईचा बंदर म्हणून विकास होण्याच्या दृष्टीने गर्व्हीस लुकासने पावले उचलली. तसेच बान्द्र्याच्या जेझुइट चर्चच्या अखत्यारीत असलेला मुंबईतील मोठा भूभाग बळकावला.

लुकासच्या पश्चात हेन्री गेरी गव्हर्नर झाला. त्याच्या राजवटीमध्ये गोव्याच्या आश्रयास गेलेल्या हम्फ्रे कुकने गव्हर्नरपदावर आपला हक्क दाखवला. परंतु त्याची दखल न घेतल्यामुळे कुकने जेझुईटांशी संगनमत करून मुंबईवर हल्ला करण्याचा बेत आखला. इंग्रजांच्या कणखर नेतृत्वामुळे कूकला माघार घ्यावी लागली व तो वसईला निघून गेला. पुढे साष्टीमध्ये असताना त्याचे निधन झाले. या दरम्यान गेरीने आपले सैन्यबळ वाढवले. तटबंदीमध्ये सुधारणा केली व पोर्तुगीजांच्या हालचालींवर आपले नियंत्रण ठेवले. परंतु यामुळे मुंबईच्या व्यापाराकडे मात्र दुर्लक्ष झाले. याचा परिणाम म्हणून १६६८ मध्ये ईस्ट इंडिया कंपनीकडे मुंबई सुपूर्द करण्याचा निर्णय घेण्यात आला. सर जॉर्ज ऑक्सिडेन याची नियुक्ती कंपनीचा पहिला गव्हर्नर म्हणून झाली. १६६९ साली त्याच्या मृत्युपश्चात गव्हर्नर गेराल्ड अँगीअरच्या काळात मुंबईचा खऱ्या अर्थाने उत्कर्ष झाला. त्याने मुंबईत येताक्षणी सैन्यातील अव्यवस्था दूर केली. न्यायालय, टाकसाळ, हॉस्पिटल यांचे बांधकाम; स्थानिक जातीजमातींसाठी पंचायतीची निर्मिती, हे सारे अँगीयरच्या काळात झाले. १६७७-१७२२ या काळात डच, पोर्तुगीज व सिद्दी यांच्या हालचालींवरदेखील त्याने यशस्वीरीत्या नियंत्रण ठेवले.

१६७७ साली अँगीयरच्या मृत्यूनंतर हेन्री ऑक्सिडेन, थॉमर रोल्ट, जॉर्न चाइल्ड व त्यानंतर बार्थोलोम्यू हेरीज, जॉनगेयर हे अनुक्रमे गव्हर्नर झाले. परंतु या काळात मुंबईच्या भरभराटीवर थोडी मर्यादा आली. अँगीयच्या काळापासूनच मुंबईतील हवामान इंग्रज सैन्याला बाधक होत असल्याचे दिसून आले. त्यातच १६८६ ते १६९६ ह्याच्या दरम्यान पश्चिम महाराष्ट्रात प्लेगची साथ पसरली व वसई, ठाणे, चेऊल या परिसरात यामुळे हलकल्लोळ माजला.

यातच १६८३ मध्ये कंपनीला किग्विनच्या बंडालाही सामोरे जावे लागले. सैन्याच्या पगारात केलेल्या कपातीमुळे सेनापती म्हणून नुकत्याच नियुक्त झालेल्या किग्विनच्या मनात अढी निर्माण झाली व त्याचे रूपांतर त्याच्या नेतृत्वाखाली झालेल्या बंडाळीत झाले. मुंबईवर त्याने ताबा मिळवल्याची बातमी पोहोचताच राजा चार्ल्सने कणखर पावले उचलली व गव्हर्नर चाइल्डकडे मुंबई सुपूर्द करण्याचे आदेश किग्विनला दिले. १६८५ मध्ये कंपनी सरकार सुरतेहून मुंबई येथे हालविण्यामागे ही बंडाळी कारणीभूत झाली. याच काळात सिद्दी ह्या मुघल नाविक अधिकाऱ्याच्या वाढत्या प्रभावामुळे मुंबईतील कंपनी सरकारला धोका निर्माण झाला. आंग्र्यांच्या काळात शिवाजीच्या अखत्यारीत असलेल्या पनवेल, पेण व अलिबाग यांवर डोळा ठेवून ऑक्टोबर १६७२ मध्ये सिद्दी याकूतचे मुंबईत आगमन झाले. अँगीयरने त्याला मुंबईत उतरण्याची परवानगी नाकारल्यामुळे, सिद्दीने आपले बस्तान जंजिऱ्यास बसविले. परंतु १६७४ मध्ये त्याने पुन्हा मुंबईत शिरकाव करण्याचा प्रयत्न केला व त्याचे सैन्य शीवपर्यंत पोहोचले. त्याला रोखण्याचे प्रयत्न निष्फळ ठरले.

पुढे १६७८ ते १६८२ यादरम्यान सिद्दीने मुंबईचा उपयोग एक कायमस्वरूपी 'सैनिकी तळ' म्हणून केल्याचे दिसून येते. १६८३ मध्ये सिद्दी पुन्हा मुंबईत परतला. सिद्दी याकूतने २०,००० सैन्यानिशी शिवडीत तळ ठोकला. मुंबई किल्ल्याचा भाग वगळता जवळजवळ पूर्ण मुंबई त्याच्या ताब्यात आली. सिद्दीचे वाढते वर्चस्व रोखण्याचे प्रयत्न फोल ठरल्यामुळे सर जॉन चाइल्ड या गव्हर्नरने डिसेंबर १६८९ मध्ये औरंगजेबाच्या दरबारी दोन दूत पाठविले. या वाटाघाटीच्या प्रयत्नांना यश येऊन १६९० मध्ये औरंगजेबाने मंजूर केलेल्या फर्मानाप्रमाणे

माहीम–शीव व सिद्दीच्या ताब्यात असलेला मुंबईचा भाग हे सारे इंग्रजांना परत मिळाले.

२६ डिसेंबर १७१५ मध्ये चार्ल्स बून हा मुंबईचा गव्हर्नर झाला. त्याने कुलाब्यावर व खंदेरी यांच्यावर वर्चस्व असलेल्या आंग्र्यांविरुद्ध आघाडी उघडली व १७२१ मध्ये कमांडर मॅथ्यू याच्या नेतृत्वाखाली सैन्य मुंबईत अवतरले. परंतु आंग्र्यांच्या अलिबाग, चेऊल या ठाण्यांवर हल्ला करण्याचे प्रयत्न पूर्ण विफल झाले व यानंतर बूनच्या काळात आंग्र्यांविरुद्ध कोणतीही कारवाई केली गेली नाही. बूनने मुंबईच्या सुरक्षा–तटबंदीच्या मजबुतीकरणाचे काम हाती घेतले व सुरक्षा व्यवस्था प्रबळ केली, तसेच अनेक नवीन इमारती बांधण्यासाठी प्रोत्साहन दिले. त्याच्या काळातच फोर्ट येथील सेन्ट थॉमस कॅथेड्रल ह्या चर्चची स्थापना झाली.

१८व्या शतकाच्या मध्यापर्यंत पश्चिम भारतातील स्थानिक सत्तांना काबूत ठेवण्याचे धोरण कंपनीने अंगीकारले. त्यांनी आंग्र्यांच्या वाढत्या शक्तीवर नियंत्रण ठेवण्यासाठी सिद्दीचा वापर करण्याचे ठरवले. १७३५मध्ये तर मुंबई काउन्सिलने मराठ्यांशी शांततेचा करार करण्यापासून सिद्दींना परावृत्त करण्यासाठी रु.३०,०००सुद्धा देऊ केले होते. इंग्रजांचा आंग्र्यांबरोबरचा संघर्ष हा कंपनीच्या व मुंबईच्या इतिहासातील एक लक्षणीय पर्व मानता येईल.

कान्होजी आग्रे ह्यांच्या निधनानंतर त्यांचा मुलगा सुखोजी ह्याने मुंबईतील कंपनी सरकारशी सलोखा करण्यासाठी शांतिदूत पाठविले. परंतु त्याच्या मृत्यूबरोबर सलोख्याच्या या प्रयत्नांनादेखील शह बसला. ह्याच काळात कान्होजींच्या मानोजी ह्या अनौरस मुलाने पोर्तुगीजांशी संगनमत करून कुलाबा काबीज केले. कान्होजींचा दुसरा मुलगा संभाजी ह्याने मानोजीला रोखण्याचे प्रयत्न केले, पण ते फोल ठरले. पुढे मराठ्यांच्या मदतीने सिद्दींच्या ताब्यातील अंजनवेल किल्लाही त्याने आपल्या ताब्यात घेतला. ह्या यशामुळे त्याचे मनसुबे आणखीन दृढ झाले व सिद्दीच्या ताब्यातील पूर्ण प्रदेश तसेच मुंबई, गोवा आपल्या ताब्यात घेण्याचे स्वप्न तो रंगवू लागला. परंतु त्याच्या व संभाजीच्या वितुष्टांचा फायदा कंपनी सरकारने घेण्याचे ठरविले. पुढे १७५२मध्ये इंग्रजांनी संभाजी आंग्रेविरुद्ध मराठ्यांशी हातमिळवणी केली. १७५५ मध्ये या आघाडीने संभाजी व त्याच्यानंतर त्याच्या जागी आलेला तुळाजी यांच्याविरुद्ध मोहीम उघडली. १७५५मध्ये कंपनीने सुवर्णदुर्ग सर केल्यावर तुळाजी घेरिया विजयदुर्गाच्या आश्रयाला गेला. १७५६मध्ये मुंबईहून ॲडमिरल वॅटसनच्या व मराठ्यांच्या फौजा घेरियाच्या दिशेने निघाल्या. इंग्रजांचे सैन्यबळ पाहून भेदरलेल्या तुळाजीने तेथून काढता पाय घेतला व घेरियावर इंग्रजांचा ध्वज फडकला.

यादरम्यान मराठ्यांचे प्राबल्यदेखील वाढत होते व त्यांचे पोर्तुगीजांच्या ताब्यातील प्रदेश हस्तगत करण्याचे प्रयत्न सुरू होते. १७३७ मध्ये ठाणे मराठ्यांच्या ताब्यात आले. कंपनी सरकारने पोर्तुगीज व मराठा ह्यांच्यातील संघर्षात बघ्याची भूमिका घेणे पसंत केले. इतकेच नव्हे तर चिमाजी आप्पांनी वसई सर केल्यानंतर इंग्रजांनी त्यांना अभिनंदनपर पत्रदेखील धाडले. १७३९मध्ये कॅप्टन इचबर्डने पेशव्यांबरोबर करार करून या प्रदेशात व्यापार करण्याची परवानगी मिळविली. मराठ्यांची मैत्री ही इंग्रजांना त्यांच्या फ्रेंच व डच यांच्याबरोबर झालेल्या संघर्षात मदतगार ठरली. इंग्रजांच्या सत्तेची पाळेमुळे हळूहळू रुजू लागली.

हा काळ मुंबईच्या सामाजिक व आर्थिक जडणघडणीच्या दृष्टीनेदेखील महत्त्वाचा ठरतो. याच काळात १७२८मध्ये मेयर न्यायालयाची स्थापना झाली. १७५७ मध्ये Sanitary प्रशासनाची सुरुवात झाली. साष्टी व मुंबई ह्या शहरांतील संपर्कव्यवस्था सुधारण्यात आली. जहाजे बांधण्यासाठी उभारलेल्या गोदी विभागाचा विस्तार करण्यात आला. या काळात मुंबईच्या विकासाच्या दृष्टीने अनेक सुधारणा करण्यात आल्या. या काळात मुंबईचा प्रवास आधुनिकतेकडे सुरू झाला, असे म्हणणे वावगे ठरणार नाही.

१८व्या शतकाच्या उत्तरार्धात मुंबईचा इतिहास हा मुख्यत्वेकरून इंग्रज–मराठा संबंधांचा इतिहास म्हणता येईल. १७६७मध्ये घेरिया येथे आग्र्यांचे निर्दालन केल्यावर कंपनीने आपले लक्ष व्यापारावर केंद्रित केले. मराठ्यांबरोबर सलोख्याचे संबंध असले, तरी कंपनी सरकार मराठ्यांच्या वाढत्या शक्तीवर लक्ष ठेवून होते.



वसईचा किल्ला

१७७१ मध्ये विलिअम हॉर्नबी हा गव्हर्नर झाला. याच काळात माधवरावांच्या मृत्यूनंतर रघुनाथराव अर्थात राघोबादादा गादीवर आले परंतु त्यांना विरोध होऊन पुण्याबाहेर काढण्यात आले. ह्या वेळी हॉर्नबीने राघोबादादांना वाडी सर करण्यास मदतीचा हात पुढे केला व त्या मोबदल्यात राघोबादादांनी भरूच, जाम्बूसर ओलपाड, वसई, साष्टी, करंजे, खंदेरी, घारापुरी बेट हे प्रदेश कंपनी सरकारला देण्याचे कबूल केले. कंपनी सरकार व राघोबादादा यांच्यातील करारापश्चात लगेचच पहिल्या इंग्रज-मराठा युद्धास प्रारंभ झाला. साष्टी, ठाणे इंग्रजांनी सर केल्यावर, राघोबादादा व मुंबई सरकार यांच्यामध्ये ७ मार्च १७७५ रोजी सुरत येथे तह झाला. वॉरन हेस्टिंग्ज ह्या गव्हर्नर जनरलने हा तह अमान्य करून १७७६ मध्ये एक नवीन करार केला ज्या अन्वये वसई मराठ्यांना देण्याचे ठरले. हॉर्नबी हा ह्या अटीशी सहमत नव्हता. पुढे १७७८ मध्ये राघोबादादांशी नवीन तह करून वसई व खंदेरी ह्यांच्या मोबदल्यात त्याने मराठ्यांना ४००० सैन्याची सैनिकांच्या मदत कबूल केली. वॉरन हेस्टिंग्जने या नवीन करारास मान्यता दिली व बंगाल येथून कर्नल गोडार्डच्या नेतृत्वाखाली सैनिकांच्या ६ तुकड्या मुंबईच्या दिशेने पाठवल्या. परंतु मुंबई सरकारने याआधीच आपले सैन्य राघोबादादांच्या मदतीस पाठवले होते. याची बातमी मराठ्यांच्या कानी पडताच त्यांनी तळेगाव येथे संपर्काचे सर्व मार्ग बंद केले. यामुळे इंग्रजांच्या सैन्याला वडगावपर्यंत माघार घ्यावी लागली. वडगाव येथे मराठ्यांनी इंग्रज सैन्यावर हल्ला करून त्यांचा दारुण पराभव केला व अपमानकारक असा वडगावचा तह इंग्रजांना करावा लागला. यामुळे वसई व मुंबईच्या आजूबाजूची सर्व बेटे इंग्रजांनी मराठ्यांच्या हवाली केली व इंग्रजांनी राघोबादादाला साहाय्य न करण्याचे वचन मराठ्यांना देणे त्यांना भाग पडले.

याच काळात १७८० पर्यंत सैनिकीदृष्ट्या मुंबईला प्रबळ करण्याचे प्रयत्न झाले. कर्नल किटिंग्जने किल्ल्यांच्या तटबंदीची दुरुस्ती करण्याचे काम सुरू केले. १७६९ मध्ये

डोंगरीचा किल्ला तोडण्यात आला व सेंन्ट जॉर्ज किल्ल्याची बांधणी सुरू करण्यात आली. याच वर्षी माझगाव येथे डॉक यार्ड बांधण्याचे ठरवण्यात आले. १७७६ मध्ये मुंबई व ठाणे ह्यांमध्ये अंतर्गत जलवाहतूक सुरू झाली. १७७१ ते १७८४ ह्या काळात हॉर्नबी वेलार्डचे बांधकाम सुरू झाले. आजच्या हाजीअली सर्कलवरून वरळीकडे जाणारा रस्ता तसेच या काळात बांधण्यात आलेल्या गव्हर्नमेन्ट हाउस, कस्टम हाउस, मरीन हाउस, टाकसाळ, थिएटर व तुरुंग अशा शासकीय इमारतींचा उल्लेख फोर्ब्स आपल्या १८३४ साली लिहिलेल्या पुस्तकात करतो.

१७८१ साली हॉर्नबीने मराठ्यांना पुन्हा एकदा शह देण्याचे ठरवले व कल्याण काबीज केले. कर्नल गोडार्डला वसई सर करण्याचे आदेश देण्यात आले. मराठ्यांना कोकणपट्टीच्या बाहेर घालवण्यात यश आले व १७८१ मध्ये वसईच्या किल्ल्याला वेढा घालण्यात आला. याच सुमारास म्हैसूरच्या हैदरअलीने इंग्रजांविरुद्ध स्थानिक सत्तांची आघाडी निर्माण करण्याचे ठरवले. हैदरचे संकट लक्षात घेता इंग्रजांनी मराठ्यांशी हातमिळवणी करण्याचे ठरवले. एकीकडे मराठ्यांसमोर प्रस्ताव मांडण्याचा हुकूम गोडार्डला मिळाला, तर दुसरीकडे इंग्रजांनी शिंद्यांच्या सैन्यावर हल्ला केला. ह्या संघर्षाचा शेवट १७८२ साली सालबाईच्या तहामध्ये झाला. या तहानुसार साष्टी, घारापुरी, कारंजा ही बेटे मुंबई येथील कंपनी सरकारच्या कायमस्वरूपी वर्चस्वाखाली आली. गुजरातमधील काबीज केलेली ठाणी पेशव्यांकडे परत देण्यात आली व भरूच शिंद्यांकडे सुपूर्द केले गेले. या तहानुसार हैदरअलीच्या विरोधात इंग्रजांना साहाय्य करण्याचे मराठ्यांनी कबूल केले. राघोबादादा हा पेशव्यांचा बंदी झाला.

१७८४ मध्ये बोडॅम गव्हर्नर झाला व ह्या दिवसापासून मराठा व इंग्रज यांच्यातील वितुष्ट वाढत गेले. याच काळात मराठ्यांच्या अंतर्गत कलहामुळे लॉर्ड वेलस्लीला मराठा राज्यात इंग्रजी सत्ता स्थापित करण्याची आयती संधी मिळाली. नाना फडणवीस (पेशव्यांचे सल्लागार) प्रथमपासूनच इंग्रजसत्तेच्या विरोधात होते. महादजी शिंदे पुण्यावर चालून आला, तेव्हाही नाना फडणविसाने इंग्रजांची मदत घेतली नाही. पुढे महादजी शिंद्यांच्या मृत्यूनंतर गादीवर आलेला दौलतराव (१७९४) मराठी सत्तेला शह देण्यास समर्थ नव्हता. सवाई माधवराव पेशव्यांच्या मृत्युपश्चात राघोबादादांचा मुलगा बाजीराव हा शिंद्याच्या मदतीने पेशवा बनला. याच काळात शिंदे व पेशवा हे इंग्रजाविरुद्ध टिपूशी सलोखा करण्याचा बेत आखत होते. परंतु एकूणच पेशवे सरकारची दुर्बलता व मराठ्यांची त्यांच्या शेजारी राज्यांमधील लुटालूट ह्यांमुळे मराठी सत्तेचा प्रभाव ओसरत चालला होता. याच सुमारास होळकर व शिंदे ह्यांच्यातील अंतर्गत कलह शिगेस पोहोचला व १८०२ मध्ये होळकरांनी शिंद्यांवर विजय मिळवला. ह्या घटनाक्रमाने भयभीत झालेल्या दुसऱ्या बाजीरावाने सिंघूरच्या किल्ल्यात आश्रय घेतला व तेथून तो रेवदंड्याला गेला. तेथे इंग्रजांच्या मदतीने वसईला गेला. तिथे बाजीराव व कंपनी सरकार यांच्यामध्ये ३१ डिसेंबर १८०२ रोजी एक तह झाला. या तहानुसार दुसऱ्या बाजीरावाने ६००० सैनिकांच्या तैनाती फौजांना कबुली दिली व या फौजांचा खर्च म्हणून वार्षिक ६०,००० पौंड देण्याचे कबूल केले.

१८०० मध्ये सुरतेचे प्रशासन ब्रिटिश राजवटीने मुंबई येथील कंपनी सरकारच्या हवाली केले व १८०५ मध्ये सिंध प्रांतापर्यंत मुंबईची राजकीय सत्ता निर्माण झाली. मुंबई राज्याचा विस्तार लक्षात घेता प्रशासनातही बदल करण्यात आले. १७८५ मध्ये मरीन बोर्डाची स्थापना झाली. याचप्रमाणे, मिलिटरी बोर्ड, बोर्ड ऑफ ट्रेड, बोर्ड ऑफ रेवेन्यू ह्या संस्थाही अस्तित्वात आल्या. लगोलग गव्हर्नरच्या प्रशासनव्यवस्थेत प्रायव्हेट सेक्रेटरीची नेमणूक करण्यात आली व १७९८ मध्ये मेयर्स कोर्टाच्या जागी रेकॉर्डर्स कोर्ट निर्माण करण्यात आले व १८०३ मध्ये सर जेम्स मॅकिन्टॉश ह्याची पहिला रेकॉर्डर म्हणून नियुक्ती झाली. जोनाथन डंकन ह्या गव्हर्नरने जेम्स मॅकिन्टॉशला राहण्यासाठी परळ येथील गव्हर्नमेन्ट हाउस उपलब्ध करून दिले व तो स्वतः फोर्टमधील गव्हर्नमेन्ट हाउसमध्ये राहिला. याच काळात सायन कॉजवेचे काम सुरू झाले व १८०३ मध्ये त्याची बांधणी पूर्ण झाली. १८०४ मध्ये उमरखाडी येथे पहिला मोठा तुरुंग बांधण्यात आला.[७]

याच सुमारास दख्खनमध्ये नव्या घडामोडी सुरू झाल्या. १८१७ पर्यंत बाजीराव दुसरा पेशवा इंग्रजांशी सलोखा

ठेवून होता. परंतु इंग्रजांच्या नियंत्रणाखाली राहणे त्याला अपमानकारक होऊ लागले. त्यातच इंग्रजांनी सुरक्षेची ग्वाही दिलेल्या गायकवाडांचा प्रतिनिधी गंगाधर शास्त्री पेशव्यांना भेटायला पुण्यात आला असता, पेशव्यांचा सरदार त्र्यंबकजी डेंगळे ह्याने १८१५ मध्ये त्याचा खून घडवून आणला. पुढे डेंगळे ह्याला गव्हर्नर माउंटस्टुअर्ट एल्फिन्स्टनच्या ताब्यात देण्यात आले व ठाण्याच्या तुरुंगात ठेवण्यात आले. १८१६ मध्ये तो तिथून पळ काढण्यात यशस्वी झाला व पेंढारी, शिंदे, होळकर तसेच बेरारचा राजा यांच्याबरोबर पेशव्यांचे संधान बांधून त्यांना इंग्रजांविरुद्ध लढा देण्यासाठी उद्युक्त केले. याची परिणती खर्डीच्या लढाईत झाली व तिथे इंग्रजांचा विजय झाला. मराठी राज्याचा अस्त होण्यास खर्डीच्या लढाई कारणीभूत ठरली. या पराभवामुळे आपल्याला अटक होऊ नये म्हणून पेशव्याने पळ काढला. परंतु तो पुढे गव्हर्नर सर जॉन माल्कमला शरण गेला. अशा प्रकारे या विजयाने इंग्रज हे दख्खनचे अनभिषिक्त स्वामी झाले व अटकेत असलेले साताऱ्याचे राजे यांच्यासाठी राखीव ठेवलेला प्रदेश तसेच कुलाब्यामधील आग्र्यांचा प्रदेश सोडला, तर पेशव्यांच्या अमलाखालचा पूर्ण प्रदेश कंपनी सरकारच्या आधिपत्याखाली आला. यानंतरच्या काळात इंग्रजांनी आपले लक्ष मुंबईच्या प्रशासनव्यवस्थेची घडी नीट बसवण्याकडे दिले व मुंबईचा प्रवास भारताचे आर्थिक केंद्र होण्याच्या दिशेने सुरू झाला.

**संदर्भ :**


१. B'bay Gazetter XIIL, 420-1 & XIV 372-3
२. Edwardes, S.M., Rise of Bombay, p.58
३. Da cunha, Origin of Bombay, JBBRAS, 1900.
४. Da Cunha, Op. cit., p.101
५. Edwardes, S.M., Rise of Bombay
६. De cunha, Origin of Bombay, JBBRAS, 1900, p.258
७. Edwardes, S.M. Rise of Bombay p.23


* * *






# बृहन्महाराष्ट्र

**डॉ. विद्या गाडगीळ**

**महाराष्ट्र संस्कृतीची महाराष्ट्राच्या भूसीमेत वाढ होत असताना महाराष्ट्राचा संबंध इतर प्रांतांशी आला. मराठा राज्याच्या विस्तारासाठी आणि शूर मराठा सरदारांच्या महत्त्वाकांक्षेला नवे क्षेत्र देण्यासाठी छत्रपती शाहूने स्वराज्यालगतचे उत्तरेकडचे काही प्रदेश मराठा सरदारांकडे सोपविले. त्यानुसार गायकवाडांकडे बडोदा, शिंद्याकडे ग्वाल्हेर, होळकरांकडे इंदोर आले. त्या-त्या सरदारांनी स्वपराक्रमाने आपले मराठी शासन तेथे स्थिर केले. त्याचबरोबर मराठी संस्कृतीही तेथे रुजली.**

छत्रपती शिवाजी महाराजांनी इ.स.१६७४ मध्ये स्वतःला राज्याभिषेक करवून घेतला आणि महाराष्ट्रात स्वतंत्र राज्य स्थापन केले. त्यानंतर स्वराज्याचा विस्तार महाराष्ट्राच्या बाहेर दक्षिणेकडे कावेरी नदीपर्यंत करण्याचा त्यांनी प्रयत्न केला. छत्रपती शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर संभाजी, राजाराम, ताराबाई यांनी औरंगजेबाच्या झंझावाती स्वारीला तोंड देऊन स्वराज्याचे रक्षण केले. इ.स.१७०७ मध्ये औरंगजेबाचा मृत्यू झाल्यावर मुघल सत्ता दुर्बल झाली. या संधीचा मराठ्यांनी फायदा घेतला आणि अठराव्या शतकाच्या मध्यापर्यंत भारताच्या दक्षिण-उत्तर व पूर्व-पश्चिम भागांत मराठ्यांनी राजकीय प्रभाव निर्माण केला. मराठे हे भारतातील सर्वांत मोठे सामर्थ्यशाली राज्यकर्ते ठरले. इंग्रजांना भारतामध्ये सत्ता प्रस्थापित करताना अठराव्या शतकाच्या अखेरीस मराठ्यांबरोबर लढा द्यावा लागला. अशा प्रकारे मध्ययुगीन भारताच्या इतिहासात मराठ्यांची कामगिरी केवळ अलौकिक स्वरूपाची नव्हे, तर राष्ट्रीय स्वरूपाची ठरते. तद्वत बृहन्महाराष्ट्राच्या राजकीय व सांस्कृतिक इतिहासात मराठ्यांची कामगिरी अभिमानास्पद आहे.



तंजावर शैलीतील चित्र - महाराजा अमरसिंह व सरफोजी ह्यांची शाही मिरवणूक.

महाराष्ट्र संस्कृतीची महाराष्ट्राच्या भूसीमेत वाढ होत असताना महाराष्ट्राचा संबंध इतर प्रांतांशी आला. मराठा राज्याच्या विस्तारासाठी आणि शूर मराठा सरदारांच्या महत्त्वाकांक्षेला नवे क्षेत्र देण्यासाठी छत्रपती शाहूने स्वराज्यालगतचे उत्तरेकडचे काही प्रदेश मराठा सरदारांकडे सोपविले. त्यानुसार गायकवाडांकडे बडोदा, शिंद्याकडे ग्वाल्हेर, होळकरांकडे इंदोर आले. त्या-त्या सरदारांनी स्वपराक्रमाने आपले मराठी शासन तेथे स्थिर केले. त्याचबरोबर मराठी संस्कृतीही तेथे रुजली.

उत्तरेप्रमाणेच दक्षिणेकडेही मराठे पोहोचले. शहाजी महाराजांच्या काळात बंगळुरूला मराठे पोहोचले आणि मराठी संस्कृती तेथे आकाराला आली. छत्रपती शिवाजी महाराजांचे कनिष्ठ सावत्र बंधू व्यंकोजी राजे यांनी स्वपराक्रमाने तंजावर जिंकून घेतले आणि मराठी सत्तेचे केंद्र तामिळनाडूमध्ये तंजावर येथे निर्माण झाले. महाराष्ट्राचे तत्कालीन राजकीय, सामाजिक व सांस्कृतिक प्रवाह तिथल्या संस्कृतीत बेमालूमपणे समाविष्ट झाले आणि एक वेगळाच असा सांस्कृतिक संगम तंजावर येथे पाहावयास मिळतो. महाराष्ट्रापासून शेकडो योजने दूर तंजावर तसेच ग्वाल्हेर, बडोदा, इंदोर, ओरिसा, बंगाल येथे मराठी संस्कृती पोहोचली आणि ती तेथे निश्चित असा आकार घेत होती मराठ्यांची ही कामगिरी निःसंशय श्रेष्ठ दर्जाची आहे.

## तंजावरची मराठी सत्ता व संस्कृती

तंजावर हे चेन्नई-रामेश्वर लोहमार्गावर असून महाराष्ट्रापासून शेकडो योजने लांब व चेन्नईपासून ३५७ किमी. अंतरावर आहे. तंजावरच्या भौगोलिक सीमा पुढीलप्रमाणे सांगता येतील. उत्तरेस अर्काट व कावेरी नदीचा फाटा, पश्चिमेस त्रिचनापल्ली, पूर्वेस २७५ किमी. लांबीचा समुद्रकिनारा आहे. तंजावर हा अत्यंत सुपीक प्रदेश असून तेथील हवा अत्यंत आल्हाददायक आहे. तंजावरला पूर्वेचे व्हेनीस किंवा दक्षिणेचे इडन म्हणतात. जुन्या कागदपत्रांत आपणास तंजावरचे उल्लेख तंजावूर, चंदावर, चंजावर असे आढळतात. कावेरीचे सुपीक खोरे, सुपीक जमीन, आल्हाददायक हवा नारळाची उंच-उंच झाडे असलेले हे तंजावरचे संस्थान फार लहान होते. अशी भौगोलिक पार्श्वभूमी असलेल्या प्रदेशात सतराव्या शतकात मराठी सत्तेचा उदय झाला.

**तंजावरचा राजकीय इतिहास –** तंजावरचा संगतवार इतिहास इ.स.९८५ पासून मिळतो. या काळात चोल घराण्याची सत्ता तंजावरावर होती. सातव्या शतकापर्यंत चोलांची राजधानी कुंभकोणम येथे होती. दहाव्या ते अकराव्या शतकात म्हणजे राजराजाच्या काळात चोलराजांनी आपली राजधानी तंजावर केली. इ.स.१२१६ मध्ये चोल राजराजा तिसरा याच्या दुर्बलतेचा फायदा घेऊन तेथे पांड्य घराण्याची सत्ता स्थापन झाली. बाराव्या

शतकाच्या अखेरीपासून ते चौदाव्या शतकापर्यंत दक्षिण भारतात राजकीय अस्थिरता होती. मुसलमानांचे वर्चस्व निर्माण होऊ पाहत होते परंतु इ.स.१३४४ मध्ये वरंगलचा कृष्णराय, द्वारसमुद्रचा बल्लाळदेव व अन्य हिंदू राजे एकत्र येऊन त्यांनी मुसलमानांना हटविले आणि याच लाटेतून विजयनगरचे हिंदू साम्राज्य उदयाला आले. हळूहळू विजयनगरचे मांडलिक नायक ह्यांची सत्ता तंजावर येथे निर्माण झाली. नायक राजांच्या हातात फार काळ सत्ता राहिली नाही. विजयनगरच्या ऱ्हासानंतर नायक राजे आदिलशहाचे मांडलिक झाले. आदिलशहाच्या वतीने व्यंकोजीने तंजावर जिंकून तंजावरात मराठी सत्तेचा पाया घातला.

**तंजावरी मराठी सत्ता –** शहाजी महाराजांच्या मृत्यूनंतर त्यांच्या जहागिरीचा हक्क त्यांचा मुलगा व्यंकोजी ह्यास प्राप्त झाला. त्रिचनापल्ली, तंजावर, मदुरा या ठिकाणी नायक राजाची सत्ता होती. तंजावर व मदुरा येथील नायक राजांची आपसातील भांडणे मिटविण्यास आदिलशहाचा सरदार म्हणून व्यंकोजी गेला आणि त्यांनी स्वपराक्रमाने तंजावर जिंकून घेतले (इ.स.१६७५). तंजावर जिंकल्यावर आपली राजधानी बंगळुरूहून तंजावरास हालविली. त्याच्या कारकिर्दीत सर्वांत महत्त्वाची घडलेली घटना म्हणजे छत्रपती शिवाजी महाराजांशी व्यंकोजीचा संघर्ष झाला. वडिलोपार्जित जहागिरीत वाटा मागण्यासाठी इ.स.१६७६ मध्ये छत्रपती शिवाजीमहाराज दक्षिणेत आले. व्यंकोजीने छत्रपती शिवाजी महाराजांची भेट घेतली. परंतु समझोता झाला नाही. नंतर थोडा संघर्ष झाल्यावर तह होऊन समेट झाला. हा एकमेव संघर्ष वगळता या दोन राजवटींत संघर्षाचे प्रसंग पुनश्च आले नाहीत. इतकेच नव्हे तर ते स्नेहाचे, सहकार्याचे राहिले. पेशव्यांच्या काळात मराठ्यांनी तंजावरचे राज्य इंग्रजांच्या कचाट्यातून वाचविण्याचा प्रयत्न केला. ही मदत कधी वेळेवर पोहोचली तर कधी अंतर्गत परिस्थितीमुळे ती मदत वेळेवर पोहोचू शकली नाही. व्यंकोजीच्या मृत्यूनंतर (१६८५) शाहराजा गादीवर आला.

**शाहराजा दुसरा (१६८५–१७११) –** शाहराजाची कारकीर्द शांततेत पार पडली. याच्या कारकिर्दीत घडलेली महत्त्वपूर्ण घटना म्हणजे छत्रपती राजाराम महाराज जिंजीला असताना झुल्फिकारखानाने किल्ल्यास वेढा घातला, तेव्हा शाहराजाने राजारामास साह्य केल्यामुळे त्यांना झुल्फिकारखानाच्या स्वारीस तोंड द्यावे लागले. (इ.स.१६९४) १२ सप्टेंबर १६९७ मध्ये झुल्फिकारखानाशी शाहराजाने तह केला व राजारामास कोणतीही मदत न देण्याचे कबूल केले. इ.स. १७११ मध्ये त्यांच्या मृत्यूनंतर त्यांचे कनिष्ठ बंधू सरफोजी पहिले गादीवर बसले.

**सरफोजी पहिला (इ.स १७११ ते १७२८) –** शाहराजा दुसरा निपुत्रिक असल्यामुळे शाहराजानंतर त्याचा कनिष्ठ बंधू सरफोजी पहिला गादीवर आला. तो शांतताप्रिय व सौम्य प्रकृतीचा होता. त्याच्या कारकिर्दीत युद्धाचे किरकोळ प्रसंग सोडल्यास मोठी युद्धे झाली नाहीत. सरफोजीच्या कारकिर्दीत वारसाहक्कासाठी त्याची राणी अपरूपबाई हिने आपल्याला पुत्र झाल्याचे खोटेच जाहीर केले. पुढे हे प्रकरण उघडकीस आले. या गृहकलहामुळे सरफोजीस खूप दुःख झाले व मनस्ताप झाला. इ.स.१७२८ मध्ये सरफोजीचा मृत्यू झाला.

**तुळजाराजा पहिला (इ.स.१७२८–१७३५) –** सरफोजी पहिला निपुत्रिक असल्यामुळे त्याचा कनिष्ठ बंधू तुळजाराजा ह्यास तंजावरचे राज्य मिळाले. तुळजाराजा हा राजकारणी, मुत्सद्दी व विद्याभिलाषी होता. त्याच्या काळात कर्नाटकाच्या नवाबाशी संघर्ष करावा लागला.

**व्यंकोजी दुसरा (इ.स.१७३५ ते १७३६) –** तुळजारानानंतर त्याचा मुलगा बाबासाहेब गादीवर आला. हाच व्यंकोजी दुसरा होय. त्याचा भाऊ सयाजी ह्याने कपटकारस्थाने करून व्यंकोजीस पदच्युत करण्याचा प्रयत्न केला. त्यामुळे व्यंकोजी वेडा झाला आणि १७३६ मध्ये त्याचा मृत्यू झाला.

**सुजानबाई (इ.स.१६३६ ते १७३८) –** व्यंकोजी (दुसरा) नंतर त्याची विधवा पत्नी सुजानबाई हिने तुळजाराजा पहिला याचा मुलगा सयाजी ह्याच्या नावाने तीन वर्षे राज्य केले. हिच्या कारकिर्दीमध्ये अर्काटच्या नवाबाचा जावई चंदासाहेबाचे संकट तंजावरावर चालून आले (इ.स.१७३५), तेव्हा सुजानबाईने पेशव्यांकडे मदत मागितली. रघुजी भोसले यास शाहूने मदतीस पाठविले व


राजे सरफोजी दुसरे

चंदासाहेबाचे संकट परतवून लावले. याच सुमारास काटराजाचे तोतया वारसाचे प्रकरण पुढे आले. राज्यात गोंधळाची परिस्थिती निर्माण झाली आणि मल्हारजी गाडेराव, मानाजी जगताप, अनप्पा शेटगे या सरदारांनी सयाजीस दूर करून प्रतापसिंहास गादीवर बसविले.

**प्रतापसिंह (इ.स.१७३८ – १७६३) –** तुळजाराजा पहिला याच्या कट्यारीशी लग्न लावलेल्या स्त्रीचा, अन्नपूर्णाबाईचा प्रतापसिंह हा पुत्र होय. प्रतापसिंहाची कारकिर्द धामधुमीची झाली. त्याला आपल्या दरबारातील यवन सरदार सय्यदखान, सय्यदकासीम व अर्काटचा नवाब आणि त्याचा जावई चंदासाहेब यांच्या संयुक्त कारस्थानास तोंड द्यावे लागले. प्रतापसिंह हुशार व व्यवहार-चतुर असल्यामुळे त्याने या संकटांशी यशस्वी सामना केला. चंदासाहेबाच्या विरुद्ध पेशव्यांची मदत मिळवून त्याचाही पराभव केला. अर्काटच्या नवाबाशी तह करून त्याच्याशी झालेला तंटा मिटविला. १७ डिसेंबर १७६३ रोजी त्याचा मृत्यू झाला.

**तुळजाराजा दुसरा (इ.स.१७६३ ते १७८७) –** प्रतापसिंहाच्या मृत्यूनंतर तुळजाराजा दुसरा गादीवर आला. अर्काटचा नवाब महंमदअली, म्हैसूरचा हैदरअली, इंग्रज यांसारख्या शत्रूंमुळे तुळजाराजा सर्व बाजूंनी कैचीत सापडला. त्यांनी महाराष्ट्रात पेशव्यांकडे मदत मागितली. परंतु शत्रू प्रबळ असल्यामुळे पेशवे तंजावरपर्यंत पोहोचू शकले नाहीत. तुळजाराजाने हैदरअलीशी तह केला. महंमदअलीने इंग्रजांच्या मदतीने तुळजाराजास आव्हान दिले. तुळजाराजाने महंमदअलीशी तह केला. परंतु याच काळात मद्रासकर इंग्रजांनी अर्काटच्या नबाबाला तंजावरविरुद्ध मदत देण्याच्या निमित्ताने तंजावरावर स्वामित्व प्रस्थापित केले (इ.स.१७७६).

**अमरसिंह (इ.स.१७८७ – १७९८) –** तुळजाराजा दुसरा निपुत्रिक असल्यामुळे प्रतापसिंहाने विठोजी भोसल्यांच्या वंशातील सरफोजी यास दत्तक घेतले तथापि त्याचा सावत्र भाऊ अमरसिंह याने सरफोजीचे दत्तकविधान अशास्त्र ठरवून इंग्रजांशी तह करून गादी मिळविली. परंतु हा तह अन्यायकारक असल्याने अमरसिंहाने मराठा सरदारांची व पेशव्यांची मदत मिळविण्याचा प्रयत्न केला. तशात टिपूचे संकट तंजावरावर चालून आले व अमरसिंहास सत्ता गमवावी लागली.

**सरफोजी दुसरा (इ.स.१७९८ ते १८३२) –** तुळजाराजा दुसरा याचा दत्तकपुत्र सरफोजी दुसरा हा राज्याचा वारस बनला. अमरसिंह इंग्रजांना वेळेवर खंडणी देऊ शकला नाही. इंग्रजांच्या अपेक्षेप्रमाणे त्याला राज्यकारभारही करता आला नाही. तेव्हा इंग्रजांनी त्याला बाजूला सारून सरफोजी दुसरा याची स्थापना तंजावरच्या राजेपदावर केली. आणि तंजावरचे राज्य पूर्णपणे इंग्रजांचे अंकित झाले.

**शिवाजी दुसरा (इ.स.१८३२ ते १८५५) –** शिवाजी दुसरा याच्या काळात इंग्रजांचे वर्चस्व होते. परंतु वाङ्मय मात्र बहरास आले. शेवटी १८५५ मध्ये डलहौसीने तंजावर राज्य खालसा केले.

**समाजजीवन –** तंजावरच्या मराठेशाहीच्या कालखंडातील सामाजिक जीवन परंपरागत हिंदू पद्धतीचेच होते. मराठी संस्कृतीची अनेक वैशिष्ट्ये अतिदक्षिणेकडे असलेल्या या सामाजिक जीवनामध्ये आढळतात. तरीपण चोलकालीन संस्कृतीचा ठसा तेथील समाजजीवनावर थोड्याफार फरकाने कायम राहिला.

**मराठ्यांची वसाहत –** इ. स. १६३६ मध्ये शहाजीमहाराज बंगळुरूला गेले, त्या वेळेस त्यांच्यासमवेत अनेक मराठी लोक बंगळुरूला जाऊन स्थायिक झाले. त्यांमध्ये सोनार, डोंबारी, सैनिक, शेतकरी इत्यादी विविध पेशांतील मंडळी होती. बंगळुरूला शहाजी महाराजांच्या दरबारात अनेक महाराष्ट्रीय विद्वान होते. उदाहरणार्थ नारोपंडित दीक्षित, नरहरी कविश्वर, विष्णू ज्योतीर्वेद, रघुनाथ पंडित.

मराठ्यांच्या स्वातंत्र्यसंग्रामात छत्रपती राजारामाने जिंजीकडे प्रयाण केले. जिंजी मराठ्यांची राजधानी केली, तेव्हा पाटील, सेटे, कुणबी, जुलाई, चांभार, कुंभार, परीट, न्हावी, कोळी वगैरे. अनेक मराठी लोक त्याच्यासमवेत गेले. सतराव्या शतकात महाराष्ट्रात दुष्काळ पडला, तेव्हा अनेक लोक शाहराजा दुसरा याच्या आश्रयाला गेले. या सर्व ऐतिहासिक घटना स्पष्ट करतात की, सतराव्या शतकाच्या अखेरीस मराठ्यांची वस्ती कर्नाटकात प्रस्थापित होऊ लागली. व्यंकोजीने तंजावर आपली राजधानी केल्यावर त्याचे ज्येष्ठ मराठी अधिकारी व दरबारातील मराठी विद्वान तंजावर येथे गेले.

**जातिव्यवस्था –** चातुर्वर्ण्य व्यवस्था होती. तंजावरच्या मराठा राज्यकर्त्यांनी मराठ्यांप्रमाणे ब्राह्मणांनाही महत्त्वपूर्ण अधिकार पदे दिली. अमुक एखादे अधिकारपद एखाद्या विशिष्ट जातीसाठी नव्हते. ब्राह्मण आणि मराठे ह्यांच्याप्रमाणे स्थानिक लोकांनाही त्याच्या अंगच्या गुणाप्रमाणे कारभारात स्थान दिले. तसेच यांत विविध उद्योगधंदे करणारे कारागीरही होते – १) कुंभार, २) सुतार, ३) सोनार, ४) पितळ–तांब्याची भांडी बनविणारे, ५) पिथकाम करणारे, (विशिष्ट कागदापासून मूर्ती, फुले बनविणारे) ६) लाकडावर व कापडावर चित्रकाम करणारे, ७) चांभार, ८) लाकडावर कोरीवकाम करणारे, ९) संगीतातील वाद्ये बनविणारे इत्यादी. याशिवाय व्यावसायिक लोकही होते – १) न्हावी, २) गवळी, ३) भाजीवाले, ४) रथ बनविणारे, ५) धान्याची सुगी करणारे, ६) व्यापारी इत्यादी.

**स्त्रीजीवन –** मध्ययुगात विवाहाच्या ज्या प्रथा अस्तित्वात होत्या, तशाच प्रथा तंजावरातही होत्या. खड्ग विवाह, बहुपत्नीकत्व, बालविवाहाची पद्धत, हुंडा पद्धत इत्यादी. राजघराण्यातील स्त्रियांना शिक्षण घेण्याचा अधिकार होता. तथापि सर्वसामान्य स्त्री शिक्षणापासून वंचित होती. विवाहातील प्रथा महाराष्ट्राप्रमाणेच होत्या. सुनमुख, आंबा शिंपणे, वरात, वरातीतील नाचगाणे, मंगलाष्टक म्हणणे इत्यादी. देवदासीची प्रथा होती. स्त्रियांची खरेदी–विक्री होत असे.

**चालीरीती –** विविध यज्ञयाग केले जात. त्यासाठी यज्ञशाळा होत्या. मुहूर्त, ज्योतिष, पत्रिका यांवर विश्वास होता. दानप्रथा रूढ होती. राजघराण्यात तुलादानाची पद्धती होती. सरफोजी दुसरा याने चांदीचे तुलादान केले. यागांना महत्त्व होते. यात्रेकरूंच्या सोयीसाठी राज्यकर्त्यांनी छत्रम (छत्रे) उभारली होती. या छत्रममधून यात्रेकरूंसाठी अन्नदान, आजाऱ्यांसाठी औषधोपचाराची व निवासाची सोय होती.

**देवता –** अनेक महाराष्ट्रीय देवी–देवता, पुजिल्या जात. गणपती, राम, हनुमान यांची उपासना होत असे. यल्लमा, राणुबाई, चेट्टुबाई या स्त्रीदेवताही पुजल्या जात. दत्तपूजा, खंडोबा, विठोबा यांची उपासना होत असे. तंजावरच्या मराठ्यांचे कुलदैवत महाराष्ट्रातल्या मराठ्यांप्रमाणे 'भवानी' होते. महाराष्ट्राप्रमाणेच नवरात्र होत असे. स्थानिक देवता बालाजीला खूप महत्त्वपूर्ण स्थान होते.

**सण –** नवरात्र, दसरा, दिवाळी, संक्रांत, होळी हे महाराष्ट्रीय सण उत्साहाने साजरे होत. मकर संक्रांतीस जावयास दान देण्याची प्रथा होती. याशिवाय गोकुळाष्टमी, हनुमान जयंती, रामदासांची पुण्यतिथी, मेरुस्वामींची पुण्यतिथी हे दिवस साजरे होत असत. महाराष्ट्रातल्या परंपरेनुसार चैत्रागौरीचे हळदी–कुंकू आजही साजरे होते.

**विविध धर्मसंप्रदाय –** तंजावरात विविध धर्मसंप्रदाय अस्तित्वात होते. शिव, विष्णू, शक्ती या देवतांच्या उपासनेस प्राधान्य देणारे संप्रदाय मध्ययुगात उदयास आले. तंजावरात मराठ्यांच्या काळात वैष्णव व शैव पंथांचा भरपूर प्रभाव होता. राज्यकर्त्यांचे कुलदैवत त्यागराज (शिव) असल्यामुळे शैवपंथ विशेष प्रभावशाली होता. विष्णू व त्याच्या विविध रूपांची उपासना तंजावरात मराठ्यांच्या काळात रूढ होती. शिव–विष्णू यांचे ऐक्य तंजावरात मान्य होते. नाथ संप्रदायही अस्तित्वात होता. नाथपंथ हा हरिहर

ऐक्याची शिकवण देणारा पंथ ठरतो. गोरक्षनाथांनी अखिल भारतात संचार केला, त्या वेळेस या संप्रदायाचा प्रसार तंजावरात झाला असावा.

**समर्थ संप्रदाय –** समर्थ रामदासांनी देशभर जागृती करण्यासाठी पट्टाभिषिक्त राम व वीर हनुमान ह्यांची उपासना सुरू केली. त्यासाठी ठिकठिकाणी आपले मठ बांधले. त्यांतून तंजावरातही रामदासी मठ स्थापन झाले. समर्थांचे तीन मुख्य शिष्य तंजावरात होते – १) भीमस्वामी, २) राघवस्वामी, ३) अनंत मौनी. या शिष्यांनी 'महंते महंते' करावे, या समर्थांच्या शिकवणीप्रमाणे तंजावरात अनेक शिष्य तयार केले. तंजावरात एकंदर आठ व मन्नारगुडी व कोनूर येथे प्रत्येकी एक-एक रामदासी मठ अस्तित्वात होते. तमिळनाडूत एक रामदास संप्रदाय आाहे. तंजावरच्या शहातुराब या चिस्ती सुफी कवीने मनाच्या श्लोकांचे उर्दूत भाषांतर केले. त्याचे नाव 'मनसमघावन' असे आहे. तंजावरात मराठ्यांच्या काळात दासबोधाचे तामिळीत भाषांतर झाले. विविध संप्रदायांसोबत अस्सल महाराष्ट्राचे कीर्तन तंजावरात पोहोचले.

**कीर्तन –** अस्सल महाराष्ट्रीय मनोरंजनात्मक भक्तिमार्ग तंजावरात रूढ होता. तंजावरात समर्थ संप्रदायाचा प्रसार होण्यापूर्वी कीर्तन हा प्रकार अस्तित्वात नव्हता. 'हरिकथा' पुराण आणि पठण ह्यांतून लोकांपर्यंत पोचविल्या जात. समर्थ संप्रदायाच्या प्रभाव व प्रसार यानंतर हरिकथांचे रूपांतर कीर्तनात झाले. महाराष्ट्रातील कीर्तनकार मोरगावकरबुवा, विष्णूबाबा हे सरफोजी दुसरा याच्या काळास तंजावरात आले. तेथील कीर्तनकार अंगात सैल भगवा सदरा, धोतर, खांद्यावर उपरणे, डोक्यावर पगडी, हातांत टाळ आणि चिपळ्या या अस्सल महाराष्ट्रीय पोषाखात कीर्तन करीत त्यामुळे कीर्तन फार लोकप्रिय झाले.

**शिक्षण –** छत्रम जोडलेल्या शिक्षण संस्था होत्या. या शाळांमधून व्यवहारोपयोगी शिक्षण, वेदांतील सूत्रे, मराठी भाषा, गांधर्वगान, शिल्पविद्या हे सारे शिकवले जात असे. इंग्रजांच्या प्रभावानंतर शिक्षण संस्थांमधून इंग्रजी भाषेतून शिक्षण दिले जात असे. राजा शिवाजी दुसरा याच्या कारकिर्दीत दरबारात पांडित्यपूर्ण चर्चा करून परिसंवाद घडवून आणून शिक्षणास उत्तेजन देत व विद्वतसभा घेतल्या जात असत. राजा सरफोजी दुसरा याच्या कारकिर्दीत सरस्वती भांडार किंवा सरस्वती महाल विशेष नावारूपास आले. राजा सरफोजी दुसरा हा विद्या व कला ह्यांचा भोक्ता होता. त्याने शिक्षण संस्थांमधून प्राचीन भारतीय व पाश्चिमात्य शिक्षण देण्यास सुरुवात केली. शिक्षणाबरोबर वाङ्मयाची निर्मितीही मोठ्या प्रमाणावर झाली.

**वाङ्मय –** तंजावरात मराठ्यांच्या काळात मराठी भाषेचे प्राबल्य वाढले. मराठी वाङ्मयाचा विकास झाला. मराठी मोडीत लेखन करायला सुरुवात केली. व्यंकोजी राजाच्या काळापासून मराठी भाषेला राजभाषेचे स्थान मिळाले. सरकारी कामकाज, हिशेब, कागदपत्रे हे सर्व मराठी मोडीत लिहिले गेले. शाहराजाचा दरबारी महाकवी माधवस्वामी यांनी महाभारतावर रचना केली. यात एकोणीस हजार ओव्या आहेत. महाभारतावर एवढी विस्तृत रचना करणारा हा पहिलाच कवी. संतकवी एकनाथांचा तो नातू होता. याशिवाय रघुनाथ पंडित, चिंदड शंकर, श्री रुक्मांगद कवी यांसारख्या प्रतिभावंतांनी तंजावरचा दरबार फुलून गेला होता. पहिले मराठी नाटक 'लक्ष्मीनारायण कल्याण' इ.स. १६९० मध्ये तंजावर येथे लिहिले गेले. मराठी वाङ्मयाबरोबर नाट्यशास्त्रातही प्रगती झाली.

मराठी रंगभूमीचा उदय शाहराजांच्या काळात इ.स. १६९० च्या सुमारास झाला. ही सर्व नाटके प्रयोगक्षम होती. तंजावरच्या सरस्वती महालात त्या नाटकांचे प्रयोग होत असत. जगप्रसिद्ध नृत्य प्रकार 'भरतनाट्यम' ही तंजावरकरांनी जगाला दिलेली फार मोठी देणगी आहे. तंजावरचे मराठी राज्यकर्ते स्वतः साहित्यिक होते, त्यांना नृत्याची चांगली जाण होती. सरफोजी राजा पहिला हा नृत्याचा, शाहराजा हा साहित्याचा, तर तुळजा राजा दुसरा हा संगीताचा; असे हे राजे विविध कलांचे चांगले जाणकार होते. त्यामुळेच तंजावर येथे साहित्य, नृत्य, नाट्य, संगीत यांची फार चांगली जोपासना व वृद्धी झाली. संगीताची महान परंपरा लाभलेल्या भूमीत मराठी संगीत व संगीतकार हे कर्नाटक संगीताच्या जोडीने पुढे आले. अनेक मराठी संगीतकार जन्मास आले व मराठी संगीतही या काळात उदयास आले.

थोडक्यात मराठी भाषा, मोडी लिपी, मराठी नाटक, मराठी संगीत, कीर्तन हे सारे तसेच महाराष्ट्रातील सण, समारंभ, व्रते, वैकल्ये हे सारेही मराठ्यांच्या काळात तंजावर येथे पोहोचले व त्याचे संवर्धनही झाले. तंजावरच्या मराठ्यांची ही कामगिरी मराठ्यांच्या इतिहासात अजोड आहे.

तंजावरप्रमाणेच गुजरातेत मराठे पोहोचले आणि मराठ्यांनी गुजरातेत आपल्या संस्कृतीचा कायमचा ठसा उमटविला.

## गुजरातेतील मराठी सत्ता

छत्रपती शिवाजी महाराजांनी सुरतेवर स्वारी केली आणि मराठ्यांचे गुजरातशी संबंध आले. इ.स. दीड हजार वर्षापूर्वीपासून सुरत ही विकसित व्यापारी पेठ व संपन्न व्यापाऱ्यांनी गजबजलेले असे पश्चिम किनाऱ्यावरचे नगर होते. प्रचंड व्यापारी उलाढाली तेथून होत असत. मक्केला जाणारे यात्रेकरू याच किनाऱ्यावरून जात. नदीकिनाऱ्यावर डच व फ्रेंच ह्यांच्या वसाहती होत्या. सुरत लुटल्यानंतर मराठ्यांच्या हालचाली गुजरातेत सुरू झाल्या. तथापि गायकवाडांनी गुजरातवर मराठ्यांची सार्वभौम सत्ता इ.स.१७५८ मध्ये स्थापन केली. आणि मराठी सत्ता, मराठी संस्कृती तेथे हळूहळू रुजली. १७५८ ते १८२० ह्या जवळजवळ पंचाहत्तर वर्षांत तेथे मराठी सत्ता होती. गायकवाडांच्याच घराण्यातील सयाजी रावमहाराज तिसरे यांनी बडोदा संस्थानाचे आधुनिकीकरण केले. संस्थानातील शाळा, विद्यापीठ, वस्तुसंग्रहालय ह्या वास्तू गुजरातमधील मराठी सत्तेची व संस्कृतीची साक्ष देत आजही दिमाखात उभ्या आहेत.

**भौगोलिक परिस्थिती –** गुजरात हा संपन्न देश. गुजरात, कच्छ व सौराष्ट्र या तीन विभागांनी बनला आहे. वायव्येस पाकिस्तान, उत्तरेस व ईशान्येस राजस्थान, पूर्वेस माळवा व धुळे जिल्हा, दक्षिणेस ठाणे जिल्हा, पश्चिमेला अरबी समुद्र अशा सीमांनी वेढलेल्या गुजरातच्या संबंध विभागाचे क्षेत्रफळ ७१७५० चौ. मै. आहे. सतरा जिल्हे, शंभर लहानमोठी बंदरे व सुमारे एक हजार मैलांचा समुद्रकिनारा गुजरातला लाभलेला आहे. आरवली, विंध्य, सातपुडा व सह्याद्री ह्या पर्वतांच्या रांगा या पर्वतराजीच्या कुशीतून वाहणारे असंख्य जलौघ हे गुजरातमधील नद्यांना जलप्रदान करतात. त्यामुळे तेथे विपुल झाडी व दुर्गम शिखरे आहेत. गुजरात अतिशय संपन्न राष्ट्र असून तेथे खनिजसंपत्तीही विपुल आहे.

**गुजरातचा राजकीय इतिहास –** इ. स. पू. ५०० च्या सुमारास तेथे यौधेय गणराज्य होते. त्यानंतर इ. स. पू. तिसऱ्या व चौथ्या शतकात तेथे मौर्यसत्ता होती. गिरनार हे त्याच्या सत्तेचे केंद्र होते. इ. स. पहिल्या शतकात शक क्षत्रप नहपान त्यानंतर अभिर, गुप्त, मैत्रक, गुर्जर, चालुक्य या घराण्यांची सत्ता गुजरातवर होती. अल्लाउद्दीन खिलजीने गुजरात जिंकले आणि इ. स. १२९९ मध्ये तेथे सुलतानी अंमल प्रस्थापित झाला. इ. स. १७५३ पर्यंत सुलतानाची सत्ता होती. इ. स. १७५३–१७५८ या काळात गुजरातेत मोगली अंमल होता. इ. स. १७५८ मध्ये पेशव्यांचे सरदार गायकवाडांनी गुजरातेत मराठी सत्ता स्थापन केली. बडोदा ही त्यांची राजधानी होती.

**मराठी सत्ता –** इ. स. १७०७ मध्ये औरंगजेबाचा मृत्यू झाला. मराठा सरदारांच्या पराक्रमाला वाव देण्यासाठी छत्रपती शाहूने बाळाजी विश्वनाथाच्या सल्ल्यावरून मराठा मंडळाची स्थापना केली. त्यानुसार खंडेराव दाभाड्यांना गुजरात प्रांताची जबाबदारी दिली. त्यांनी त्या प्रांतात मुलूखगिरी सुरू केली. इ. स. १७१६ नंतर मराठ्यांचा गुजरात संचार वाढीला लागला. दाभाडे व गायकवाड ह्यांच्या परिश्रमाने गुजरातेत मराठी संस्कृती रुजू लागली. गुजरात हे आपल्या पराक्रमाचे खास क्षेत्र आहे, असे दाभाडे समजत असत. १७१९ मध्ये पिलाजी गायकवाड व दाभाडे ह्यांनी गुजरातवर आक्रमण करून सोनगड येथे कायमचे वास्तव्य केले. गुजरातमधील जनताही मोगलांच्या अत्याचाराला कंटाळली होती. स्थानिक लोक दला पाटील, छाणीकर, भायलीकर यांनी गायकवाडांना मदत केली. पिलाजी गायकवाडांनी महिनदीपर्यंत जाऊन खंडण्या वसूल केल्या. खंडेराव दाभाड्यांचे अधिकारी कदमबांडे व पिलाजी गायकवाड यांनी गुजरात प्रांतात चौथाई वसूल करून मोगल सत्तेला हादरा दिला.

**पेशवे–दाभाडे संघर्ष –** १७२६ मध्ये पेशवा बाजीराव पहिला याने गुजरातचा तत्कालीन सरदार सर बुलंदखान याच्याशी तह केला. या तहानुसार चौथाई सरदेशमुखीचे अधिकार मिळवले व त्या भागात मराठी सरदारांनी उपद्रव दिल्यास संरक्षणाची जबाबदारी पेशव्यांवर पडली. इ. स. १७२९ मध्ये खंडेराव दाभाड्यांच्या मृत्यूनंतर त्यांचा मुलगा त्र्यंबकराव दाभाडे ह्यांच्याकडे सेनापतीपद आले. त्र्यंबकरावाने आपले अधिकार गाजवायला सुरुवात केली, तेव्हा पेशव्यांनी सरबुलंदखानाशी नवा तह करून गुजरात प्रांतातून चौथाई सरदेशमुखी वसुलीचे अधिकार फक्त पेशवे व त्यांच्या प्रतिनिधींकडे घेतले, त्यामुळे त्र्यंबकराव दाभाडे पेशव्यांवर रागावले व त्यांनी गायकवाड, कदमबांडे यांच्याशी संधान साधून पेशव्यांविरुद्ध बंड केले. बाजीराव पेशव्यांनी त्यांची समजूत घालण्याचा अयशस्वी प्रयत्न केला. शेवटी डभई येथे दाभाडे व पेशवा बाजीराव यांच्यात लढाई झाली. त्र्यंबकराव मारला गेला. त्र्यंबकरावाच्या विधवा पत्नीने लढा चालू ठेवला. बाजीरावास विजय मिळाला, पण बाजीरावाने दाभाड्यांचा पुत्र खंडेरावास मोठ्या मनाने सेनापती केले. या सर्व प्रकरणात दमाजी गायकवाडांनी पेशव्यांना साथ दिली त्यामुळे बाजीरावाने त्यांच्या पराक्रमाचे बक्षीस म्हणून 'समशेर बहादूर' हा किताब दिला व पेशव्यांच्या बरोबरीचे स्थान दिले.

दमाजी गायकवाड व खंडोजी दाभाडे यांचा मृत्यू झाला. दमाजीस पुत्र नसल्यामुळे त्याच्या बंधूने पिलाजीरावास दत्तक घेतले. गायकवाड घराण्यात पिलाजी, दमाजी दुसरे, सयाजीराव पहिले, सयाजीराव दुसरे, खंडेराव, मल्हारराव, सयाजीराव तिसरे हे सारे पराक्रमी राज्यकर्ते होऊन गेले.

**गायकवाडांचा गुजरातमधील पराक्रम –** पिलाजीरावांनी सोनगड, पाटण, बडोदा हे प्रदेश जिंकून गायकवाडांची शान वाढविली. दमाजी दुसरे महत्त्वाकांक्षी होते. त्यांनी राजपिंपळ, इडर ही महत्त्वाची शहरे जिंकली. लाटी राज्याचा राजकन्येशी विवाह करून काही खेडी आंदण मिळविली. त्या खेड्यांचा त्यांनी विकास केला. द्वारका, सोरटीसोमनाथ ह्यांसारखी हिंदू धार्मिक पवित्र स्थाने मुस्लिमांच्या कचाट्यातून मुक्त केली. गायकवाडांचे पेशव्यांशी मैत्रीचे संबंध होते. गुजरातमधील महत्त्वाची शहरे– विजापूर, पाटण, वीसनगर, मुजपूर, वडनगर, खेराडू, राधनपूर, सिद्धपूर, नवसारी, बिलीमोरा (बडोदा) ही शहरे दमाजीने आपल्या ताब्यात घेतली व आपली राजधानी सोनगडहून पाटणला हालविली. दमाजीरावांनी उत्तम प्रकारे प्रजापालन करून संस्थानाला उत्तम दर्जा प्राप्त करून दिला.

दमाजीरावांच्या मृत्यूनंतर त्यांच्या चार मुलांपैकी सयाजीराव पहिले गादीवर आले. यांनी आपली राजधानी बडोदा येथे हालवली. बडोद्याचे मूळ नाव आक्कोटकनगरी होते. या शहराचे रोमशी व्यापारी संबंध होते. या नगरात वरपट्ट/ वडपत्र / वटोदर हे उपनगर होते. या शहरात अनेक वटवृक्ष होते. त्यामुळे या शहरातील उष्ण हवेची तीव्रता कमी होऊन शीतलता निर्माण होत असे. ही नगरे अतिशय नयनरम्य होती. या नयनरम्य नगरीस सयाजीरावांनी राजधानीचा दर्जा दिला. सयाजीरावांच्या नंतर गुजरात प्रांतावर हळूहळू इंग्रजांची पकड बसू लागली

**इंग्रजांचे वाढते वर्चस्व –** गायकवाड घराण्यातील फत्तेसिंह सयाजीराव व मुतालीक म्हणून काम करणाऱ्या मानाजीरावांचा मृत्यू झाला आणि गोविंदरावाच्या हाती अनिर्बंध सत्ता आली. बडोदा संस्थानात दुही निर्माण करून इंग्रजांना आपले वर्चस्व प्रस्थापित करायचे होते, त्याचा अंदाज पेशव्यांना आला. पेशव्यांनी इंग्रजांचा हा बेत हाणून पाडण्यासाठी गायकवाडांशी समझोता करण्याचा प्रयत्न केला. परंतु गायकवाड–पेशवे यांचे सख्य इंग्रजांना पसंत नव्हते. त्यांनी पेशवा व गायकवाड ह्यांच्या तहात आडकाठी आणली. पेशवे आपला काही मुलूख गायकवाडांना देणार होते. परंतु इंग्रजांशी शत्रुत्व नको म्हणून पेशव्यांनी हा तह मागे घेतला, गोविंदरावांनी पेशव्यांच्या प्रतिनिधीस अहमदाबादेतून हुसकावून लावून आपला वरचष्मा सिद्ध केला. इ. स. १८०० मध्ये गोविंदरावांचा मृत्यू झाला.

गोविंदरावांच्या मृत्यूनंतर आनंदराव सत्तेवर आले. आनंदराव दुर्बल होते त्याचा फायदा इंग्रजांनी घेतला. पेशवा व गायकवाड ह्यांच्यात दुही ठेवून आपले वर्चस्व बडोदा संस्थानावर निर्माण केले. इंग्रज रेसिडेन्ट अलेक्झान्डर वॉकर बडोद्यात आला. आनंदराव व त्यांचे सावत्र बंधू कान्होजी यांच्यात वारसाहक्कावरून संघर्ष झाला; त्यात इंग्रजांनी आनंदरावास मदत केली आनंदरावास संरक्षण दिल्याने

इंग्रजांनी संघर्ष न करता गुजरातेत आपली सत्ता निर्माण केली. त्यामुळे इंग्रज गायकवाडांचा उल्लेख 'मित्र' असा करत. अर्थात मित्र या नात्याने सन्मानाची वागणूक न मिळाल्यास गायकवाड इंग्रजांना विरोधही करत. असा विरोध सयाजीराव दुसरे व तिसरे यांनी केला. इ. स. १८१९ मध्ये आनंदरावांचा मृत्यू झाला. सयाजीराव दुसरे गादीवर आले.

**सयाजीराव दुसरे –** इ. स. १८१९ मध्ये सयाजीराव गादीवर आले. ते उत्साही व आग्रही स्वभावाचे होते. त्यांनी मराठ्यांची अस्मिता जपण्याचा प्रयत्न केला. इंग्रजांना विरोध करून आपल्या प्रजेच्या संगोपनाचे कार्य केले. इंग्रजांशी टक्कर देऊन ते थकले. इ.स. १८४७ मध्ये त्यांचा मृत्यू झाला. नंतर सयाजीराव दुसरे यांचे पुत्र गणपतराव (इ. स. १८४७ – १८५६), खंडेराव (इ.स. १८५६ – इ.स. १८७०) व मल्हारराव (इ. स. १८७ – इ. स. १८७५) अनुक्रमे गादीवर आले. हे तिघेही सुखलोलुप वृत्तीचे असल्याने परत एकदा इंग्रजांचे वर्चस्व निर्माण झाले. १० मे १८७५ रोजी इंदूरचे यशस्वी दिवाण सर टी. माधवराव (तंजोरकर) गुजरातचे दिवाण झाले. मल्हाररावानंतर सयाजीराव तिसरे गादीवर आले. सयाजीराव तिसरे व सर टी. माधवराव यांनी बडोदा संस्थानचे आधुनिकीकरण केले. त्यासाठी प्रशासकीय व इतर सुधारणा केल्या.

**प्रशासकीय व इतर सुधारणा –** सयाजीराव तिसरे यांनी गुजराती भाषेला राजभाषेचा दर्जा दिला. सत्ता मराठी व जनता गुजराती होती. गुजराती जनतेला आपलेसे करून घेतले. मराठी–गुजराती असा भेद नव्हता. गुजराती प्रजेला मातृभाषेबरोबर मराठीही येत असे, हे विशेष होय.

प्रशासनाच्या सोयीसाठी सत्तेचे विकेंद्रीकरण केले. राज्याची प्रांत, महाल अशी विभागणी करून त्यांवर सुभा व कमाविसदार / मामलेदार हे अधिकारी नियुक्त केले. सारावसुलीतील भ्रष्टाचार दूर केला. महालदारांना आपल्या जमाखर्चाचे हिशेब द्यावे लागत, हिशेब तपासले जाऊ लागले. तपासणीचे काम फडणीस व मुजुमदार या अधिकाऱ्यांकडे होते. हे अधिकारी मराठी होते. उदाहरणार्थ अहमदाबादचे दरकदार गणेश महादेव फडणीस व कमाविसदार गोविंदराव महाराज गायकवाड होते.

गायकवाडांनी आरमाराकडेही लक्ष दिले. त्यांचे आरमार प्रबळ होते इंग्रजांवरही त्यांच्या आरमाराचा वचक होता. दमाजीच्या आरमारास तोंड देण्यास इंग्रज व डच आरमार एकत्रित आले होते. बिलीमोरा बंदरात गायकवाडांचा आरमारी प्रमुख पंडित भापाजी गोपाळ हा होता. सुरतेजवळच्या प्रदेशात इंग्रजांचा कोणताही उपसर्ग होणार नाही, याची दक्षता गायकवाडांनी घेतली होती. त्यांचे स्वतंत्र नाविक खाते होते. जहाजांना कौल देणे, कौल दिलेल्या मालवाहू जहाजांना चाचेगिरीपासून संरक्षण देणे, इत्यादी कामे या विभागाकडे होती. यासाठी खास नौदल होते. बलसाडपासून सुरतेपर्यंतच्या किनारपट्टीचे संरक्षण करण्याचे काम त्यांचेकडे होते. कौल नसलेल्या जहाजांना पकडणे, त्यांना त्या मार्गाने जाण्यास बंदी घालणे, कौलनाम्याचे शुल्क घेणे, दंड वसूल करणे; मालवाहू जहाजांचे तराफा शुल्क घेणे; पावसाळ्यात जहाज सुरक्षिततेसाठी बंदरात असल्यास बरखा शुल्क घेणे; इत्यादी कामे नौदलाकडे होती. यावरून गायकवाडांचे नौदल किती नियमबद्ध व कार्यक्षम होते, हे स्पष्ट होते.

प्रशासनातील सुधारणांबरोबर इतरही सुधारणांकडे त्यांनी लक्ष दिले. पुरोहितांच्या वाढत्या वर्चस्वाला आळा घातला. विधवा– विवाहाचा व धर्मस्वातंत्र्याचा कायदा हे प्रथम बडोदा प्रांतातच अमलात आले. १९०४ साली बालविवाह विरोधी कायदा करून १९०८ साली विवाह नोंदणी कायदा केला. घटस्फोटाला कायदेशीर मान्यता दिली. अस्पृश्यांसाठी शाळा उघडल्या. त्यांना आर्यपुत्र व आर्यकुमार या नावाने संबोधिले जाऊ लागले.

कायदेमंडळात सुधारणा केल्या 'धारासभा' अस्तित्वात आणली. या सभेत कायदे तज्ज्ञांबरोबरच सरदार, व्यापारी, दलित वर्गाचे प्रतिनिधी ह्यांचा समावेश होता. यावरून राज्यकर्त्यांचे पुरोगामी धोरण स्पष्ट होते.

बडोदा संस्थानातील पिण्याच्या पाण्याचा प्रश्न सोडविण्यासाठी नद्या–नाल्यांचे पाणी अडवून सरोवर तयार केले. जलशुद्धी केंद्र उभारले. १८९२ साली बडोदा शहरात नळगंगा आली. वैद्यक क्षेत्रातील सुविधा जनतेस प्राप्त करून दिल्या. प्रत्येक पाच मैलागणिक एक वैद्यकीय

केंद्र उभारून मलेरियाशी सामना केला. ग्रामआरोग्य केंद्रे व रुग्णालये उभारली. दळणवळणाच्या सोयीसाठी रेल्वेमार्ग टाकले. इ. स. १८६६ साली खंडेराव महाराजांच्या काळात बॉम्बे – बरोडा ॲन्ड सेंट्रल रेल्वेने डभोई ते मियांगाम हा २० मैल लांबीचा लोहमार्ग तयार केला या लोहमार्गावर बैलांच्या साहाय्याने माल वाहून नेणाऱ्या वाघिणी खेचण्याचे काम सुरू झाले. अशा प्रकारे रेल्वेचा श्रीगणेशा मालवाहू गाड्यांनी केला.

शैक्षणिक सुधारणा केल्या. प्रजेस पूर्ण शिक्षित करण्यास ग्रंथालय चळवळ उभारली. मध्यवर्ती ग्रंथालय, मुक्त ग्रंथालय, प्राच्य विद्या संशोधन केंद्र ह्यांची स्थापना केली. स्त्रियांच्या स्थितीत सुधारणा केली. स्त्रियांना विविध कलांचे शिक्षण देण्यासाठी बडोदा येथे चिमणाबाई स्त्री–उद्योगाची निर्मिती केली. महिला संचालित बँक सुरू केली. स्त्रियांना क्रीडा शिक्षण घेण्यास प्रेरणा दिली. सयाजीराव महाराज क्रीडाप्रेमी होते. इ. स. १८९९ साली सयाजी विहार क्लब स्थापन केला. या क्लबचा उपयोग जास्तीतजास्त स्त्रिया कसा करतील, असे प्रयत्न महाराजांनी केले. इ. स. १८०२ मध्ये ईस्ट इंडिया कंपनीच्या सूचनेनुसार पोलीसखात्याची स्थापना केली. गुन्ह्यांचे स्वरूप लक्षात घेऊन त्या प्रमाणात शिक्षा दिल्या जात. फिर्यादीस योग्य न्याय मिळवून दिला जात असे. दुष्ट लोकांना शासन केले जात असे. त्यामुळे राज्यात शांतता होती. महालातील सर्व ठाण्यांवर न्यायाधीश नेमले. न्यायाधीश पगारी होते. त्यांना दरमहा ४०० रुपये पगार होता. न्यायाधीशांच्या मदतीला शास्त्री व शास्त्रवेत्ते होते, तेपण पगारी होते. पारसी, गुजराती व मराठी लिहिणारे लेखनिक न्यायालयात होते. त्यांना ठरावीक पगार होते. गुन्ह्यांबरोबर वजन, शिक्के, टांकसाळीतील रुपयांची चौकशी हे सारे न्यायाधीशांकडे होते. जातिधर्म व धर्मचाली ह्यांना अनुसरून न्याय दिला जात असे. गुन्हेगारांची नीतिमत्ता सुधारण्यासाठी इ. स. १८८२ मध्ये तुरुंगातील कैद्यांसाठी नीतिमत्ता व सद्वर्तन या विषयावर दर आठवड्याला व्याख्यान सुरू केले; ही विशेष उल्लेखनीय गोष्ट होय.

लष्करातही सुधारणा केल्या. इ. स. १८०२ मध्ये पगार थकले म्हणून सैन्यातील अरबांनी बंड केले, त्यामुळे त्यांचे पगार दिल्याने तिजोरीवर ताण पडला म्हणून खर्च कमी केले. शूर एकनिष्ठ, हिंमतवान, इमानी लोकांचे खास लष्कर बनविले. त्यास 'मुलूखगिरीचे लष्कर' म्हणत. या लष्करी सुधारणांची स्तुती इंग्रज सेनापती वॉकर याने केली. मुलूखगिरीचे हे लष्कर अत्यंत सामर्थ्यवान, प्रतापी व लढाईत फार कुशल होते. ही फौज कूच करण्यात व छापा मारण्यात फार हुशार होती. सैन्यातील अरब लोक बेशिस्त व लष्करी नियमांचे पालन न करणारे, कायद्यास न मानणारे, बेअदब, पैसेखाऊ, कुचराई करणारे होते. त्यांना नोकरीवरून कमी केले त्यामुळे खर्चात आपोआपच कपात झाली. या प्रशासकीय व इतर सुधारणा करत असताना व्यवसायाकडेही तेवढेच लक्ष दिले.

**व्यवसाय –** शेती हा प्रमुख व्यवसाय होता. कसण्यायोग्य जमिनीपैकी ७५% जमीन लागवडीखाली होती. दुष्काळ व अवर्षण ह्यांमुळे शेतीचे नुकसान झाले. कर्जबाजारी शेतकऱ्यांनी सावकारांना जमिनी विकल्या. सावकार जमीन कसत नव्हते त्यामुळे शेतीचे उत्पन्न घटले. हे उत्पन्न वाढविण्याचा प्रयत्न सयाजी महाराजांनी केला. जमीन हस्तांतरण थांबविले. उद्योगधंद्यांचा विकास केला. स्पिनिंग ॲन्ड विव्हिंग मिल सुरू केली. त्याला सरकारी अनुदान दिले. स्त्री–उद्योगांची सुरुवात केली. महिला संचालित बँक सुरू केली. इ. स. १८८५ साली साखर कारखाना काढला. व्यवसाय, शेती, प्रशासन यांबरोबरच धार्मिक जीवन व कला ही क्षेत्रे समृद्ध होती.

**धार्मिक जीवन –** महाराष्ट्रातील मराठ्यांप्रमाणे गायकवाडांनी गुजरातेतील अनेक मंदिरांचा जीर्णोद्धार केला. जुनागड इ. स. १८०२ मध्ये जिंकले व सोरटी सोमनाथाच्या मंदिराचा जीर्णोद्धार करून तेथील बंद पडलेले पूजा, उत्सव परत सुरू केले. मंदिर बांधणे, जीर्णोद्धार, वर्षासन देणे, धर्मदाय नेमणूका चालविणे इत्यादी धर्मदाय कामे केली. इ. स. १७६६–१७६७ मध्ये दमाजीने पाटणगावी शिवालय बांधले. इ. स. १७८३ मध्ये गोविंदरावाने बचराजीच्या देवालयाला चांगल्या धार्मिक कार्यासाठी जमिनी दान दिल्या जात त्यास बारखली म्हणत. मात्र त्यावर नाममात्र कर असे. मंडप बांधणे, ब्राह्मण भोजन, विद्याभ्यास, जीर्णोद्धार यांसाठी दाने दिली जात

असत. धर्मकार्यासाठी इनामे दिली. बैरागी, गोसावी, मुसलमान फकीर, ब्राह्मण कुटुंबे यांना वर्षासने दिली. विद्वानांचे सत्कार केले जात.वर्षासने गुजराती जमातीसही दिली. कलेच्या विकासाकडेही लक्ष दिले.

**कला –** तिसरे सयाजी महाराज कलाप्रेमी होते. संगीत, नाट्य या कलांना त्यांनी प्रेरणा दिली. बडोदा संस्थानचे राजगायक मधुसूदन जोशी होते. त्यांना 'अफताब–इ–मौसिकी' हे बिरूद होते. उस्ताद फैयाँज खाँ हे त्यांचे गुरू होते. इ. स. १८८६ साली गायन शाळा सुरू केली. उस्ताद मौला बक्श हे या शाळेचा पहिले प्राचार्य होते. त्यांनी स्वतः मेहनत घेऊन संगीतातील स्वरलिपी तयार केली. संगीत शिक्षणाच्या संदर्भात अनेक पाठ्यपुस्तके लिहिली. उस्ताद मौला बक्श यांचे पुत्र अल्लाउद्दिन यांनाही उत्तेजन दिले. महाराजांना चित्रकलेचीही आवड होती. प्रसिद्ध चित्रकार रविवर्मा काही काळ त्यांच्या दरबारात होते. ठिकठिकाणाहून चांगली चित्रे आणून त्यांचा समावेश संग्रहालयात केला. प्रसिद्ध रंगकर्मी बालगंधर्वांना राजाश्रय दिला. गंधर्व मंडळीस आश्रय दिला. (इ. स. १९१३). संगीत एकच प्यालाचा शुभारंभाचा प्रयोग बडोद्यात झाला. गंधर्व मंडळीच्या प्रत्येक नाटकाच्या जाहिरातीत महाराज सयाजीराव गायकवाडांविषयी कृतज्ञता व्यक्त केलेली आढळते. शारीरिक शिक्षण, मल्लविद्या ह्यांनाही उत्तेजन दिले. मुलींमध्ये मैदानी खेळांचे प्रेम निर्माण करण्यासाठी कन्या आरोग्य मंदिर उभारले. आखाड्याचे पारंपरिक स्वरूप बदलून त्यांना व्यायाम शाळा व व्यायाम मंदिर ह्यांचा दर्जा दिला. इतिहास लेखनासही प्रेरणा दिली. रियासतकार गो. स. सरदेसाई त्यांच्या आश्रयाला होते. इ. स. १८८७ साली बडोद्यात वस्तुसंग्रहालय उभारले. ठिकठिकाणाहून कलात्मक वस्तू आणून संग्रहालयाचा दर्जा उंचावला.

थोडक्यात गुजरातेत गायकवाडांनी मराठ्यांच्या वैभवाचा, पराक्रमाचा, कीर्तीचा विजयस्तंभ कायम राखून ठेवला.

### मध्य भारतातील मराठी सत्ता

इंदोर संस्थानचे मल्हारराव होळकर हे अतिशय शूर, उदार आणि धार्मिक होते. त्यांनी पेशव्यांकडून इंदोर



अहल्याबाई होळकर.

संस्थानची जहागिरी मिळवली होती. त्यांनी थोरल्या बाजीरावांबरोबर अनेक मोहिमांत पराक्रम गाजवला होता व ते स्वकर्तृत्वाने माळव्याचे सुभेदार झाले होते. त्याचा एकुलता एक पुत्र खंडेराव याच्याशी इ.स.१७३३ मध्ये माणकोजी शिंदे याची कन्या अहल्या हिचे लग्न झाले. अहल्येचा जन्म महाराष्ट्रातील बीड जिल्ह्यातील चौंडी या गावी इ.स.१७२५ साली झाला. माणकोजी शिंदे हे जातीने धनगर होते व त्यांच्याकडे गावची पाटीलकी होती. हीच अहल्या पुढे अहल्याबाई होळकर म्हणून प्रसिद्ध झाली व तिने इतिहासावर आपला ठसा उमटवला. मल्हाररावांची सून झाल्यामुळे अहल्याबाई कीर्तिशालीनी झाली. तिच्या कर्तृत्वाला मल्हाररावांच्या कर्तबगारीची, मार्गदर्शनाची आणि मायेची पार्श्वभूमी आहे. कर्तबगार सासरा आणि धार्मिक करारी वर्तनाची सासू गौतमाबाई यांच्या सहवासात अहल्याबाईचे व्यक्तिमत्त्व उमलले होते. अहल्याबाईचे पती खंडेराव इ.स. १७५४ मध्ये सूरजमल जाटाबरोबर कुंभेरी येथे झालेल्या लढाईत मारला गेला. अहल्याबाईने सती



ग्वाल्हेरचा किल्ला.

जाण्याची तयारी केली, पण सासरे मल्हारराव यांनी तसे न करण्याबद्दल तिला गळ घातली. दौलतीचा सांभाळ आणि प्रजेचे हित हे मोठे आहे असे मानून अहल्याबाईंनी सती जाण्याचा बेत रद्द केला. मल्हारराव पुष्कळदा पेशव्यांबरोबर मोहिमांत गुंतलेले असत. त्या वेळी राज्यकारभाराची कामे ते अहल्याबाईंवर सोपवत असे. वसुली, फौजेची व्यवस्था, उत्तरेकडील शत्रूंच्या हालचाली अशा अनेक गोष्टींविषयी ते आपल्या पत्रांत लिहीत असत. अहल्याबाई त्या सूचना अमलात आणत असत.

इ.स. १७६६मध्ये मल्हाररावांचा मृत्यू झाला. त्यानंतर अहल्याबाईंचा पुत्र मालेराव याला पेशव्यांकडून सरदारकीची वस्त्रे रीतसर मिळाली. पण तो वेडसर, विलासी व व्यसनी निघाला आणि वयाच्या बाविसाव्या वर्षीच मरण पावला. तेव्हा अहल्याबाईंनी तुकोजी होळकर नावाच्या दुसऱ्या आप्त तरुणाला मल्हाररावांच्या पत्नीच्या मांडीवर दत्तक देऊन त्याच्याकडे फौजेची व मोहिमेची जबाबदारी सोपवली. इंदोरपासून जवळच महेश्वर येथे अहल्याबाईंनी आपली राजधानी केली व तेथून त्या राज्यकारभार पाहू लागल्या. मात्र जुना दिवाण गंगोबा तात्या याने राघोबादादांशी संधान बांधून त्यांना इंदोरवर स्वारी करून दौलत बळकावण्याची विनंती केली. अहल्याबाईंना या कपटकारस्थानाचा सुगावा लागला व त्यांनी राघोबाच्या स्वारीला तोंड देण्याची तयारी केली. तिने पुण्यास माधवराव पेशव्यांकडे दाद मागितली. न्यायनिष्ठुर माधवरावांनी त्यांना निरोप पाठवला की, तुमचे दौलतीविषयी जो पापबुद्धी ठेवील त्याचे बेलाशक पारिपत्य करावे.

अहल्याबाईंनी तुकोजी होळकराला राघोबादादावर चालून जाण्याची आज्ञा दिली. तुकोजीने राघोबादादास निरोप पाठवला की, क्षिप्रा उतरला असता तुमची-आमची तलवार चालेल याचा विचार करून पाऊल टाकणे.

अहल्याबाई तह करेल, खंडणी देईल, ही राघोबादादाची अपेक्षा फोल ठरली. चढाई करावी तर होळकरांकडून कडवा प्रतिकार होणार, कदाचित पराभव पत्करावा लागणार. त्यात मानहानी होईल आणि बाईस जिंकले तरी त्यात फारसे भूषण नाही. अशा स्थितीत लढाई टाळून मान राखून घ्यावा, असा विचार करून राघोबाने सामोपचाराची बोलणी केली. अशा रितीने अहल्याबाईंनी धैर्याने आणि मुत्सद्देगिरीने राघोबावर विजय मिळवला. त्यामुळे प्रजाजनांत लौकिक वाढला तसेच पेशवे, शिंदे, मोगल, निजाम या सर्वांवर त्यांच्या कर्तबगारीची छाप बसली.



झाशीचा किल्ला.

अहल्याबाईंनी सासऱ्याच्या वेळच्या अनेक कायद्यांत सुधारणा केल्या. त्यांच्या कारकिर्दीत करपद्धती सौम्य होती. शेतकऱ्यांकडून उत्पन्नाच्या आधारावर सारा वसूल केला जाई. अहल्याबाईंना पांडित्याची आणि पंडितांची मोठी कदर होती. त्यांचे नाव अद्यापही आसेतुहिमाचल घेतले जाते; ते त्यांनी बांधलेल्या देवळांमुळे, देवळांच्या जिर्णोद्धारांमुळे, घाटांमुळे, धर्मशाळांमुळे, विहिरींमुळे आणि अन्नछत्रांमुळे. काशी, गया आणि सोरटी सोमनाथ इथल्या मंदिरांचा त्यांनी जीर्णोद्धार केला. यात्रेकरूंसाठी सप्तपुऱ्या आणि चार धामांच्या ठिकाणी सुविधा निर्माण केल्या. धर्माची आणि लोकोपयोगाची अनेक कामे केली. इ.स. १७९५ साली ऑगस्ट महिन्यात अहिल्याबाईंचे निधन झाले. श्रीमंत यशवंतराव होळकर यांनी इ.स. १७९९ साली महेश्वर नगरात अहल्याबाईंच्या स्मरणार्थ घाट बांधला व अहिल्येश्वर नावाचे भव्य मंदिरही उभारले.

इ.स. १५६१ मध्ये माळवा मोगलांच्या साम्राज्यात समाविष्ट झाला. इ.स. १७२८ मध्ये चिमाजी अप्पाने मोगलांच्या सुभेदाराचा पराभव करून माळव्यात मराठ्यांचे वर्चस्व स्थापन केले.

इ.स.च्या सोळाव्या व सतराव्या शतकांत बुंदेलखंडावर बुंदेले राजपुतांचे व बघेलखंडावर बाघेल राजपुतांचे राज्य होते. अठराव्या शतकात पेशव्यांनी त्या प्रदेशांतही मराठ्यांची सत्ता स्थापन केली. अशा प्रकारे संपूर्ण मध्य भारत मराठी साम्राज्यात समाविष्ट झाला. सध्याच्या मध्य प्रदेशात मोडणाऱ्या बुंदेलखंडाचे इ.स. च्या सोळाव्या शतकांत बुंदेले राजपूत सत्ताधारी बनले. इ.स. १५०७ च्या सुमारास या बुंदेले राजपुतांत रुद्रप्रताप नावाचा राजा झाला. इ.स. च्या १८ व्या शतकात छत्रसाल हा तेथील राजा झाला. महमंदखाँ बंगष याने बुंदेलखंडावर आक्रमण केले, तेव्हा छत्रसालाने बाजीराव पेशव्यांची मदत मागितली. बाजीरावाने लागलीच धाव घेऊन बंगषाचा पराभव केला. मग छत्रसालाने आपल्या राज्याचा तिसरा भाग बाजीरावाला बक्षीस म्हणून दिला. तेव्हापासून त्या प्रदेशावर मराठ्यांची सत्ता सुरू झाली.

छत्रसालाकडून मिळालेल्या प्रदेशाचे तीन भाग करून पेशव्यांनी त्यावर तीन सुभेदार नेमले. त्यांपैकी नारोशंकर मोतीवाले यांची नेमणूक झांशी प्रांतावर झाली. त्यांनी किल्ल्याच्या जवळच नवे झाशी नगर वसविले. नारोशंकरांनंतर इ.स. १७६५ च्या सुमारास झाशी प्रांतात गोसावी लोकांनी बंडाळी केली. तेव्हा पेशव्यांनी रघुनाथराव नेवाळकर या सरदाराला तेथे सुभेदार म्हणून पाठविले. त्याने तेथील बंडाळी मोडून काढली. तेव्हापासून (इ.स. १७७०) तो प्रांत नेवाळकरांना वंशपरंपरेने मिळाला. इ.स. १७९५ साली रघुनाथराव संन्यास घेऊन काशीला गेला व त्याचा भाऊ शिवरामभाऊ सुभेदार झाला. त्याचा पुत्र गंगाधरराव

इ.स. १८४२ साली झाशीच्या गादीवर बसला. मात्र त्या वेळी झाशी संस्थान कंपनी सरकारचे मांडलिक झाले होते. झाशीची राणी लक्ष्मीबाई ही याच गंगाधररावाची दुसरी पत्नी होय. पेशवाई बुडाल्यानंतर बुंदेलखंडातील हा सर्व प्रदेश इंग्रजांच्या ताब्यात गेला.

राणोजी शिंदे याने स्वपराक्रमाने माळव्यात राज्य स्थापन केले होते. महादजी शिंदे यांनी त्याचा विस्तार केला. १७५४ साली मराठ्यांनी ग्वाल्हेरचा किल्ला जिंकला होता इ.स. १७७७ मध्ये पेशव्यांनी तो महादजी शिंदे यांच्या ताब्यात दिला होता. इ.स. १८१० मध्ये ग्वाल्हेर ही त्याची राजधानी झाली. इ.स. च्या १९ व्या शतकाच्या उत्तरार्धात शिंदे घराण्यातील जे राजे गादीवर आले त्यांनी या संस्थानाची खूप प्रगती केली. अशा प्रकारे मराठ्यांनी स्वपराक्रमाने मराठी सत्तेचा विस्तार उत्तरेकडेही केला. तेथे आपले साम्राज्य स्थापन केले, वाढवतही नेले. काळाचे चक्र पुढे पुढे सरकत गेले. व्यापाराच्या मिषाने भारतात आलेल्या ब्रिटिशांनी आपल्या कुटिल नीतीने वेगवेगळी संस्थाने आणि राज्ये आपल्या सत्तेत सामील करण्याचा सतत प्रयत्न केला. शेवटी भारतात एकछत्री अंमल स्थापन करतानाही इंग्रजांना मराठ्यांशीच अखेरची टक्कर द्यावी लागली.

**संदर्भ :**


**अप्रकाशित :**

१. मोडी कागदपत्रे बंडल – तंजावरचा सरस्वती महाल ग्रंथालय.
२. मराठी हस्तलिखित – तत्रैव.
३. रिपोर्ट ऑफ तंजौर कमिशन १७९९– मद्रास पुराभिलेख.
४. तंजौर राज रेकॉर्ड – तत्रैव.

**प्रकाशित :**

१. गुजरातेतील मराठी राजवट
   खोबरेकर वि. गो., प्रकाशक – ब. मो. पुरंदरे, राजहंस प्रकाशन पुणे, मार्च १९६२
२. तंजावरचे मराठी राज्य आणि संस्कृती
   गाडगीळ विद्या, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई २००३.
३. तंजावरचे राजघराणे
   पारसनीस द. बा. – इतिहास संग्रह प्रकरणे सतरा, १९३३.
४. इये सयाजीचिये नगरी
   भागवत स्मिता, प्रकाशक – सेवा ट्रस्ट द्वारा नंदिता जोशी, मुंबई, २० मार्च २००४.
५. तंजावरचे मराठी राजे
   वाकसकर वि. स., प्रकाशक – दामोदर सावळाराम आणि मंडळी, मुंबई १९३३.
६. भारतीय संस्कृति–कोश
   संपादक पं. महादेवशास्त्री जोशी.


* * *







गोमंतकाच्या संस्कृतीचे विविध पैलू आपण पाहिले, तर असे लक्षात येते की, मूळ भारतीय संस्कृती इथे सर्वांगांनी बहरलेली आहे. तिला प्रादेशिक वैशिष्ट्यांचा अनोखा रंग चढल्यामुळे तसेच पश्चात्त्य संस्कृतीच्या वरवरच्या प्रभावामुळे एक वेगळेपणाही तिला प्राप्त झालेला आहे. पिढ्यान् पिढ्या फार सोसावे लागलेला गोवेकर, हा सहिष्णू आणि शांत वृत्तीचा बनलेला आहे. विविध धर्मपंथीय, विशेषतः हिंदू आणि खिश्चन इथे सलोख्याने राहतात. मुळात एकच असलेल्या परंतु विविध कारणांमुळे थोड्याशा बदललेल्या आपापल्या परंपरा शांतपणे सांभाळतात आणि जीवनाचा आनंद घेतात.

# गोवा

■ ल. कृ. पित्रे

गोवा किंवा गोमंतक हा भारताच्या पश्चिम किनाऱ्यावरील छोटासा प्रदेश, निसर्गसौंदर्य आणि आगळे सांस्कृतिक व्यक्तिमत्त्व यांसाठी प्रसिद्ध आहे. साडेचारशे वर्षांच्या प्रदीर्घ परकीय (पोर्तुगीज) शासनाखाली राहिल्यामुळेच हे वेगळेपण दिसून येते. 'साडेचारशे वर्षे' हे वस्तुतः अर्धसत्य आहे. इ.स. १५१० मध्ये आफोंस द आल्बुकर्क ह्या पोर्तुगीज सेनापतीने गोवा जिंकला, तेव्हा फक्त गोवा बेट (तीसवाडी) हे त्याच्याकडे आले. त्यानंतरच्या तेहेतीस वर्षांत (इ.स.१५४३) बारदेश, सासष्टी आणि मुरगाव हे भाग त्याच्या ताब्यात आले. त्यानंतरची सव्वादोनशे वर्षे पोर्तुगीज सत्ता इतक्याच भूभागावर होती. विशिष्ट राजकीय घडामोडीमुळे फोंडा, सांगे, केपे आणि काणकोण हे तालुके इ.स.१७६३ साली आणि पेडणे, डिचोली व सत्तरी हे तालुके इ.स.१७८८ साली त्यांना मिळाले. सध्याच्या तीन चतुर्थांश गोव्यावर त्यांची सत्ता केवळ २०० वर्षेच होती. सांस्कृतिकदृष्ट्या ह्या घटना



गोवा येथील रम्य समुद्रकिनारा.



गोवा येथील काबो द राम किल्ल्यावरील तोफ.

महत्त्वाच्या आहेत, कारण पोर्तुगिजांनी केलेला धर्मछळ सामूहिक धर्मांतर, धर्मसमीक्षण सभेकडून (Iquisition) केले गेलेले अनन्वित अत्याचार यांना पूर्वजित (जुन्या काबिजादी) प्रदेशातील लोकांनाच तोंड द्यावे लागले. अन्यायकारक कायदे करून पोर्तुगिजांनी त्यांची सांस्कृतिक अस्मिताच नष्ट करण्याचा प्रयत्न केला. पण त्या धर्मांतरित जनतेनेही आपल्या संस्कृतीच्या मूलभूत धारणांवर घट्ट पकड ठेवली. वरवरचे आचार बदलावे लागले, तरी मूळ संस्कृतीच्या गाभ्याला हे परकीय राज्यकर्ते धक्का पोहोचवू शकले नाहीत. त्याच काळात उर्वरित गोवा मराठ्यांच्या शासनात असल्याने त्यांची संस्कृती पूर्ववत राहिली. हा भाग जेव्हा पोर्तुगिजांच्या ताब्यात आला, तेव्हा पोर्तुगालमधील विशिष्ट राजकीय स्थित्यंतरामुळे धर्मछळाची धार बोथटली होती. जुन्या प्रदेशातील धर्मांतरित ख्रिस्ती आणि नव्या प्रदेशातील हिंदू प्रजा यांच्यातील परस्पर प्रतिक्रियांमुळे एकंदर गोमंतकीय संस्कृतीचा तोंडवळाच काहीसा बदलला. मूल स्रोत एकच असला, तरी ह्या परिस्थितीमुळे तिला एक वेगळेच रूप प्राप्त झाले.

भौगोलिकदृष्ट्या गोवा हा दक्षिण भारताच्या पश्चिम किनाऱ्यावरील लहानसा प्रदेश आहे. त्याचे स्थान, ७३.४० व ७४.२० उत्तर अक्षांश, आणि १४.५४ व १५.४८ पूर्व रेखांश यांनी नियमित आहे. गोव्याचे क्षेत्रफळ ३७०१ चौरस किलोमीटर आहे. २००१ च्या जनगणनेनुसार येथील लोकसंख्या १३,४७,६६८ इतकी होती.

उत्तरेस महाराष्ट्राचा सिंधुदुर्ग जिल्हा, पूर्वेस कर्नाटकाचा बेळगाव जिल्हा, दक्षिणेस कर्नाटकाचा कारवार जिल्हा आणि पश्चिमेस अरबी समुद्र ह्या सध्याच्या गोव्याच्या चतुःसीमा आहेत. इतिहासकाळामध्ये गोवा प्रदेशाची व्याप्ती आजच्यापेक्षा अधिक होती. एके काळी उत्तरेस महाराष्ट्रातील आजऱ्याची नदी आणि दक्षिणेस कर्नाटकातील काळी नदी इथपर्यंत त्याचा विस्तार होता. वस्तुतः वेगवेगळ्या काळांतील भिन्न राजवटींप्रमाणे गोव्याच्या सीमा विस्तारत अथवा आकुंचित होत गेल्या, ही वस्तुस्थिती आहे.

गोव्याचे हवामान कोकणासारखेच आहे. मोसमी पाऊस असून त्याचे प्रमाण वार्षिक सरासरी ३५०० मि. इतके आहे. साधारण जून ते सप्टेंबर, पावसाळा असतो. डिसेंबर-जानेवारी हे थंडीचे महिने म्हटले, तरी उष्णतामान २५ डिग्री असते. एप्रिल, मे महिन्यांत मात्र ते ३३

डिग्रीपर्यंत वाढते. हवेमध्ये वर्षभर आर्द्रता असते.

सोसोगड, कातळाची मावली, वाघेरी आणि मोर्लेगड हे गोव्यातील डोंगर आहेत आणि सह्याद्रीच्या कड्यावरून कोसळणारा 'दूधसागर' हा धबधबा आहे. मांडवी आणि जुवारी ह्या प्रमुख नद्या आहेत. आग्वाद, रेइस मागूस, चोपड्याचा किल्ला, तेरेखोलचा किल्ला, काबो द राम हे गोव्यातील किल्ले आहेत. मये, चिंबळ, करमळी, काकोडा, कुडचडे ह्या गावांत प्रशस्त तलाव आहेत. येथील लांबलचक किनारपट्टीवर हरमल, वाघातोर, कळंगूट कोलवा, पाळोले इत्यादी प्रसिद्ध समुद्रकिनारे (Beaches) आहेत.

गोव्याच्या क्षेत्रफळाच्या २८ टक्के वनभाग असून ही जंगले मुख्यत्वे पूर्वेस सह्याद्रीच्या उतारावर आहेत. साग, शिसव, माडत, किनळ इत्यादी इमारती लाकडासाठीचे वृक्ष तसेच इथे बांबूची व वेळूची बने आहेत. रानटी प्राण्यांमध्ये वाघ, कोल्हे, लांडगे, रानमांजर, तरस हे हिंस्र प्राणी; तसेच गवे, रानडुक्कर, सांबर हे इतर प्राणी आढळतात. साळ हा काटेरी प्राणिविशेषही इथे आहे.

नारळ, सुपारी, काजू ही मुख्य बागायती पिके आहेत. फळांमध्ये फणस आणि आंबा यांचे वैपुल्य आहे. पोर्तुगिजांनी इथे पंचवीस-तीस प्रकारच्या आंब्यांच्या जाती विकसित केल्या. त्यांपैकी 'मानकुराद' हा आंबा इथे हापूससारखाच प्रसिद्ध आहे. पपई, अननस, बटाटा, तंबाखू आणि काजू ह्या पोर्तुगिजांच्या देणग्या आहेत. इथे माडाच्या निरेपासून आणि काजूफळाच्या रसापासून फेणी हे विशिष्ट मद्य उत्पादन करण्याचा मोठा व्यवसाय आहे. केळ्याच्या अनेक जाती असून 'मयडोळी' हा खास प्रकार हलव्यासाठीच्या केळ्यांचा आहे.

धान्यांपैकी तांदूळ हे इथे मुख्य पीक असून ते गोव्यातील लोकांचे मुख्य अन्नही आहे. डोंगरी भागात वरी, नाचणी इत्यादी पिके काढली जातात. द्विदल धान्यांपैकी उडीद, चवळी, हळसांदे (मोठी चवळी) आणि क्वचित मूग ही पिके निघतात. भाजीपाला कोकणातल्याप्रमाणे असून 'नीरफणस' हे भाजीच्या खास छोट्या फणसाचे नाव आहे. नारळाच्या बागांना 'भाट' आणि सुपारीच्या बागांना 'कुळागर' अशा संज्ञा आहेत. त्या इथे विपूल प्रमाणात आहेत. खनिज



दूधसागर धबधबा, गोवा.

व्यवसायामुळे घडलेला फरक सोडला तर भौगोलिकदृष्ट्या गोव्यामध्ये गेल्या दोनशे वर्षांत फारसा फरक पडलेला नाही.

इतिहासाबद्दल बोलायचे, तर गोव्याच्या इतिहासाचे लिखित पुरावे इ.स.च्या चौथ्या शतकापासूनचे सापडतात. त्यापूर्वीचा इतिहास बहुशः अनुमानाधिष्ठितच म्हणावा लागेल. गोव्यात सापडलेले प्राचीनतम इतिहासपूर्वकालीन स्थळ म्हणजे सांगे तालुक्यातील 'पणसाईमळ' येथील प्रस्तरचित्रे होत. ही चित्रे मध्यपाषाणयुगीन असून त्यांचा काल इ.स.पू ८००० वर्षे असा ठरविण्यात आला आहे. (प्रा. ए. सुंदर) ह्या मध्यपाषाणयुगात गोव्यात नेग्रिटो जमात पसरली असावी. त्यानंतरच्या पाच हजार वर्षांच्या काळात प्रोटो ऑस्ट्रॉलॉइड लोक इथे आले. कौल महार वगैरे जमातींची वस्ती ह्याच काळातील आहे. त्यानंतर द्रविड,

नाग, इत्यादी जमार्तीनी नवपाषाणयुगामध्ये आणि ताम्रपाषाणयुगामध्ये गोव्यात वस्ती केली.

परशुरामाने समुद्र हटवून गोमंतभूमी निर्माण केली, अशी आख्यायिका आहे. परंतु परशुरामकालापूर्वीसुद्धा इथे वसती असल्यामुळे, इ. स. पू. २५०० वर्षे भृगुवंशीयांनी कोकण भागाच्या आर्यीकरणात पुढाकार घेतला, इतकेच त्यात तथ्य असावे. त्यानंतर आर्यांच्या टोळ्या गुजरातमार्गे गोव्यामध्ये येऊन स्थायिक झाल्या. रामायणकाळात गोव्यामध्ये आर्य वसती होती. महाभारतातील भीष्मपर्वामधील गोमंतप्रदेशाचा आणि हरिवंशातील गोमंत पर्वताचा उल्लेख गोव्याचा निर्देश करतो. असे संशोधकांचे मत आहे. महाभारतकाळात, अर्जुन, बलराम, श्रीकृष्ण ह्या व्यक्ती गोव्यात आल्या होत्या. अंतिम जरासंध-कृष्ण युद्ध इथे झाले, अशी गोवेकरांची धारणा आहे.

**गोव्यातील राजवटी**

इसवी सन पूर्व तिसऱ्या व दुसऱ्या शतकांत कोंकण प्रांत मौर्य साम्राज्यात समाविष्ट होता. इ.स.च्या पहिल्या शतकापासून गोव्यावर सातवाहनांची सत्ता होती. इ.स.च्या चौथ्या शतकात देवराज भोज गोव्याचा शासक होता. इ.स.च्या सहाव्या शतकापर्यंत कोंकण मौर्यांच्या स्थानिक सत्ता आणि त्यानंतर बदामी चालुक्यांच्या अधिसत्तेखाली गोमंतक होता. इ. स. च्या आठव्या ते दहाव्या शतकांत राष्ट्रकूटांचे मांडलिक म्हणून शिलाहारांनी गोव्यात राज्य केले. इ. स. च्या दहाव्या शतकामध्ये गोव्यात कदंब राजवंशाची सत्ता स्थापन झाली. त्यांच्यामध्ये षष्ठदेव, पहिला जयकेशी, दुसरा जयकेशी असे पराक्रमी आणि कर्तबगार राजे होऊन गेले. भोजांपासून गोव्याची राजधानी चंद्रपूर (चांदोर) ही होती. कदंबाच्या उत्तर कालखंडात गोपकपट्टन (थोरले गोवे) ही दुसरी राजधानी बनली. चालुक्यांनंतर कलचुरींच्या मांडलिकत्वाखालीही कदंब होते. इसवी सनाच्या बाराव्या शतकात गोवा यादव साम्राज्याखाली आला. यादव साम्राज्य बुडाल्यावर गोव्यावर मुसलमानी अंमल प्रस्थापित झाला. इ.स.१३६६ मध्ये विजयनगरच्या माधव या मंत्र्याने गोवा जिंकून मुसलमानांना हाकलून दिले. सप्तकोटीश्वरासारख्या उद्ध्वस्त देवालयांची पुनर्निर्मिती केली. नंतरच्या काळात बहमनी सत्तेच्या महमूद गवानाने विजयनगर साम्राज्याकडून गोवा जिंकून घेतला. बहमनी सत्तेची शकले झाल्यानंतर गोवा आदिलशाहीत समाविष्ट झाला. याच काळात (इ. स. १४९७) वास्को-द-गामा हा पोर्तुगीज दर्यावर्दी भारताच्या किनाऱ्यावर उतरला. त्यानंतर काही वर्षांतच पोर्तुगीज सरदार आफोंस-द-आल्बुकर्क याने, विजयनगरचा फितूर सरदार तिमय्या याच्या मदतीने गोव्यावर स्वारी करून तो जिंकला. लगेच प्रतिचढाई करून आदिलशहाने त्याला हाकलून दिले. खरे, परंतु पुन्हा अधिक तयारीनिशी स्वारी करून २५ नोव्हेंबर १५१० रोजी आल्बुकर्कने गोवा पुन्हा जिंकला आणि गोव्यात पोर्तुगीज वसाहतीची मुहूर्तमेढ रोविली. त्या वेळी फक्त गोवा बेट, तेहेतीस वर्षांनी सासष्टी, बार्देश आणि मुरगाव हे प्रदेश आणि त्यानंतर सव्वादोनशे वर्षांनी गोव्याचा उर्वरित भाग पोर्तुगिजांच्या सत्तेखाली आला.

या काळात पोर्तुगीज सत्तेविरुद्ध झालेल्या उठावांत, इ.स.१६५४ चा कास्त्रुचा उठाव, १७१७ चे पिंटोचे बंड आणि इ.स.१७४६ पासून १८२२ पर्यंतच्या साठ वर्षांत सत्तरीच्या राण्यांचे चौदा वेळा सशस्त्र उठाव उल्लेखिता येतात. नंतरच्या काळातील दिपाजी राणे (१८५२) आणि दादा राणे (१८९५) यांच्या बंडांनी पोर्तुगीज सत्ता हादरवून टाकली.

पोर्तुगीज सत्तेवर तेव्हा धर्मसत्तेचे प्रभुत्व असल्याने शासनाच्या सुरुवातीच्या अर्ध्या कालखंडात त्यांनी गोव्याच्या प्रजेवर अनन्वित अत्याचार केले. बळजबरीने सामूहिक धर्मांतरे करण्यात आली. इ.स. १५४० मध्ये पोर्तुगीज बादशहाच्या आज्ञेने गोवा बेटावरची सर्व देवळे उद्ध्वस्त करून काही स्थानांवर चर्चेस उभारण्यात आली. इ.स. १५४२ मध्ये जेसुईट धर्मोपदेशक सेन्ट फ्रान्सिस झेविअर गोव्यात आल्यानंतर ख्रिस्तीकरणाच्या कार्याला मोठी चालना मिळाली. रायतूरचा किल्लेदार दियोगू रोद्रिगिश याने एका रात्रीत सासष्टीतील २८० देवळे जमीनदोस्त केली. झेवियरच्याच विनंतीनुसार इ. स. १५६० मध्ये कुप्रसिद्ध 'गोवा इन्क्विझिशन' ही धर्मसमीक्षण सभा स्थापन झाली. गोमंतकीय जनतेच्या छळाला पारावार राहिला नाही.

हिंदू आणि नवख्रिस्तांवर धर्माच्या नावाखाली अनन्वित अत्याचार करण्यात आले. छळ-यातनांबरोबरच त्यांच्या दृष्टीने 'पाखंडी' असणाऱ्यांना जिवंत जाळून मारण्याच्या शिक्षा देण्यात येत असत. इ.स. १८१२ मध्ये इन्क्विझिशन आणि जेसुईट पाद्री गोव्यातून हद्दपार होईपर्यंतचा अडीचशे वर्षांचा हा इतिहास काळाकुट्ट आणि यातनादायक आहे. इ.स. १८२० च्या सुमारास पोर्तुगालमध्ये नवविचारांचा काळ होता. पोर्तुगीज बादशहा सत्ताभ्रष्ट होऊन ब्राझिलमध्ये होता. तेथूनच त्याने साम्राज्याची सनद बनविली आणि पुन्हा सत्तेवर आल्यानंतर घटनात्मक राज्यपद्धती सुरू केली. या काळात गोव्याचा प्रशासक म्हणून बर्नार्ड पेरिश सिल्व्हा ह्या गोमंतकीयाची नियुक्ती अल्पकाळ झाली होती. पोर्तुगालने धर्मसत्ता झुगारल्यामुळे आणि तेथील उदारमतवादी प्रवाहामुळे गोव्यातील धर्मछळाची धार बोथट झाली.

सुरुवातीला एक चतुर्थांश गोवा पोर्तुगिजांच्या ताब्यात असताना, सामूहिक धर्मांतरामुळे बहुसंख्य जनता ख्रिश्चनच बनली होती. सर्व प्रदेश त्यांच्या ताब्यात गेल्यावर गोव्याची लोकसंख्या अडीच लाखांवर गेली, तरीसुद्धा एकूण प्रमाण हिंदूंच्या दुप्पट ख्रिश्चन, असेच राहिले. (आजची परिस्थिती नेमकी उलट आहे!)

त्या काळातील लोकांचे राहणीमान पाहावयाचे, तर त्यांत दोन स्तर स्पष्ट दिसत. जमीनदार (भाटकार), बडे व्यापारी इत्यादी सांपत्तिकदृष्ट्या सुस्थितीतील लोक आणि कष्टकरी शेतकरी आणि गरीब बहुजन समाज. पहिल्या प्रकारच्या लोकांची घरे म्हणजे चौकांचे प्रशस्त वाडे असत. बांधकाम जांभ्या दगडाचे आणि सागवान, फणस, माडत, किनळ यांचे इमारती लाकूड वापरलेले असे. हिंदू आणि ख्रिश्चन आणि उच्चवर्णीय लोक ह्यांच्या वाड्यांची रचना सारखीच असे परंतु आतील विभागणी पाश्चात्त्य धर्तीवर केलेली असे. गरीब बहुजन समाजाची घरे त्या मानाने लहान असत. मातीच्या भिंती, माडाचे वासे आणि स्थानिक कौले किंवा माडाच्या झावळ्यांचे छप्पर असे.

गोव्यातील हिंदू उच्चवर्णीयांची वेषभूषा तत्कालीन महाराष्ट्रीय पद्धतीची असे. धोतर, अंगरखा, उपरणे, डोक्यावर पगडी किंवा रुमाल किंवा टोपी असे. पोर्तुगीज सरकारने खास सवलती दिलेल्या लोकांना मखमलीची लाल




कुप्रसिद्ध गोवा इन्क्विझिशन.

चौकोनी टोपी वापरण्याचे बंधन होते. बायका नऊवारी लुगडे नेसत. दागिन्यांमध्ये विविध फुलांच्या प्रतिकृती, हे महाराष्ट्रापेक्षा वेगळे वैशिष्ट्य होते. कष्टकरी पुरुषांच्या कंबरेला रेशमी दोरी किंवा रुप्याचा करदोटा असे आणि पंचाची लंगोटी, खांद्यावर कांबळ आणि डोक्यावर मुंडासेवजा गुंडाळलेला पंचा असे. विशेष प्रसंगी, बंडी किंवा खमीस वापरले जाई. गावडा समाजाच्या स्त्रियांमध्ये खांद्यावर गाठ येईल अशा रितीने लुगडे नेसण्याची प्रथा होती. त्या प्रकाराला 'देठली' नाव आहे. चोळीचा वापर नसे. (पुढे पोर्तुगिजांनी चोळी वापरण्याची कायद्याने सक्ती केली) ख्रिश्चन समाजात मात्र समारंभात युरोपिअन वेष कायद्याने सक्तीचा होता (इ.स. १७३६ चा इन्क्विझिशनचा हुकूम). स्त्रीवर्ग मात्र युरोपिअन वेषाबरोबर साडीचाही वापर करीत असे. साडी नेसण्याचे वेगळे प्रकार त्यांनी शोधून काढले होते. त्यांमध्ये 'पानपालो' आणि 'पानबाजू' असे प्रकार होते. बहुजन समाजामध्ये पुरुषांचा वेष हिंदू कष्टकऱ्यांप्रमाणेच होता, परंतु गावडा समाजातील स्त्रिया 'देठली' पद्धतीनेच गाठ मारून साडी नेसत.

खाण्यापिण्याच्या बाबतीत, तांदूळ हे मुख्य अन्न होते. उच्चवर्णीय 'सुरय (पॉलिश केलेले) आणि बहुजन समाज उकडा (वाफवून कांडलेला) तांदूळ वापरत असे. भाताची पेज (पातळ भात) खाण्याची सार्वत्रिक पद्धत होती. भाताबरोबर (द्रविड ब्राह्मण आणि सारस्वतातील पुरोहित वगळता) सर्व समाजांत माशांचे कालवण असे. सर्व भाज्या महाराष्ट्राप्रमाणेच असत. ताकाऐवजी अमसुलाच्या कढीचा वापर होत असे. उडदामेथी (आमटीचा प्रकार), खतखते (एक सर्वसमावेशक मिश्र भाजी), मनगणे (चणाडाळीची खीर), सोजी (गव्हाची खीर) ही विशिष्ट पक्वान्ने केली जात. ख्रिश्चनांच्या जेवणातही शितकडी (भात+माशाची आमटी) हा प्रमुख घटक होता. बालशांव (एक प्रकारचे लोणचे), बेबिन्का (एक गोड पक्वान्न) असे कित्येक खास पदार्थ त्यांच्या आहारात असत.

मद्यपान हे हिंदू समाजात निषिद्धच समजले जाई. परंतु ख्रिश्चन उच्चभ्रू समाजात क्षुधावर्धक म्हणून जेवणापूर्वी आणि विविध समारंभांत शिष्टसंमत होते. बहुजन समाजात मात्र दिवसभराच्या कष्टांनंतर श्रमपरिहार म्हणून संध्याकाळीच माडाची किंवा काजूची फेणी, फक्त ताव्हेर्नमध्ये (गुत्यांत) घेतली जात असे (घरात नव्हे!)

प्रतिष्ठित धनिक समाजामध्ये 'अंगवस्त्रे' ठेवण्याची पद्धती होती. 'शेंसविधी' हा पाणिग्रहण स्वरूपाचा विधी करून उपपत्नी म्हणून स्वीकारलेली देवदासी समाजातील स्त्री, पत्नीप्रमाणे एकनिष्ठ राहत असे. या प्रथेवर तत्कालीन समाजाचा आक्षेप नसे.

हिंदू समाजामध्ये एकत्र कुटुंबपद्धती होती. ख्रिश्चन उच्चवर्णीय आणि बहुजन समाजातील काही घटकांतही एकत्र कुटुंबपद्धती होती. परंतु ख्रिश्चन बहुजन समाजात विभक्त कुटुंब पद्धती होती.

शेती हा मुख्य व्यवसाय असून गावातील जमीन सामुदायिक मालकीची असे. कोमुनिदाद नामक वैशिष्ट्यपूर्ण ग्रामसभा शेतीचे नियमन करीत असत. गावातील कुटुंबे ह्या संस्थेचे सभासद आणि फायद्याचे भागधारक असत आणि त्यांना गांवकार म्हणत. हे गांवकार ब्राह्मण, सारस्वत आणि क्षत्रिय ह्या तीन जातींतील असत. गावडा, कुळवाडी ह्या जमातीतील लोक शेतीची देखभाल करण्यासाठी नेमलेले असत. गावाचा कारभार बहुतांशी ग्रामसंस्थांतर्फे चालत असे.

हिंदू समाजामध्ये लिखित व्यवहाराची भाषा बहुशः मराठी असे आणि (मराठी बोलणारे द्रविड ब्राह्मण सोडल्यास) सर्व गोवेकरांची बोली कोंकणी होती. शिक्षित ख्रिश्चनांची व्यवहाराची भाषा बहुशः पोर्तुगीज होती. सर्व गोवावासीयांची बोली कोंकणी असली, तरी तिचे अनेक प्रकार आढळतात. हिंदूंपेक्षा ख्रिश्चनांची कोंकणी भिन्न आहेच परंतु हिंदूंच्या कोंकणीतही स्थानपरत्वे आणि जातिपरत्वे भेद आढळतात. (पुढच्या काळात कोंकणीत साहित्यनिर्मिती होऊन ती भाषेच्या दर्जाला पोहोचली आणि सध्या तिला गोवा राज्याच्या राजभाषेचे स्थान प्राप्त झाले आहे.)

## जातिव्यवस्था व धर्मजीवन

गोव्यातील समाजात जातिव्यवस्था अस्तित्वात होती. गोव्यात हिंदूंमध्ये तीसपस्तीस जाती आहेत. ब्राह्मणांत पाच भेद असून 'पद्ये' ही गोव्यातील विशिष्ट शाखा आहे. सारस्वतांत शैव-वैष्णववादी पाच भेद आहेत. राणे, देसाई इत्यादी उच्चवर्णीय क्षत्रिय आहेत. नाईक, भंडारी यांचाही समावेश क्षत्रियांत होतो. वाणी समाज बहुसंख्येने आहे. कुंभार, सुतार, लोहार, कासार, सोनार (दैवज्ञ ब्राह्मण) ह्या जाती तसेच खारवी (कोळी), न्हावी, शिंपी, मडवळ (धोबी), तेली, महार, चांभार, इत्यादी व्यवसायाधिष्ठित जाती आहेत. मंदिर संस्कृतीशी संबंद्धात अशा सेवेकऱ्यांच्या भावीण, देवळी (नृत्यगायन करणाऱ्या) कलावंत; बंदे, फर्जंद ह्या जाती असून त्या समाजांतील स्त्रिया लग्न करीत नसत. उच्चवर्गातल्या एखाद्या 'यजमाना'शी त्यांचा पाणिग्रहणात्मक 'शेंसविधी' होत असे. सध्या ती प्रथा नाहीशी झाली असून लग्ने सामान्यपणे होतात. ह्या सर्व जातींच्या समूहांचा निर्देश सध्या 'गोमंतक मराठा समाज' असा होतो. आद्य वसाहतकार मानल्या गेलेल्या लोकसमूहामध्ये चार जाती आहेत. कुणबी वेळीप, कोंकणी गावडे, ख्रिश्चन गावडे (धर्मांतरित) आणि नवहिंदू (१९३३ साली मसुराश्रमाच्या स्वामींनी हिंदू धर्मात आणलेले गावडे) ह्या त्या जाती आहेत. ह्यांचे कुलाचार, परंपरा भिन्न आहेत आणि त्यांत आदिम संस्कृतीच्या खुणा

दृष्टोत्पत्तीस येतात. जगात कुठेही न आढळणारी जातिव्यवस्था गोव्यातील ख्रिश्चनांमध्ये दिसते. स्पृश्यास्पृश्यता सोडली, तर उच्चनीचता आणि विवाहसंबंध ह्या बाबतींत इथल्या ख्रिश्चनांचा व्यवहार हिंदूंसारखाच आहे. बामण (सारस्वत), चाड्डे (मराठा क्षत्रिय), सुदरि (शूद्र), गावडे ह्या जाती तसेच मेस्त (सुतार), मडवळ (धोबी), शेट (वाणी), सोनार, कासार, दोरजी (शिंपी), खारवी (कोळी), महार, चांभार, पदेर (पाववाला), व्हडेकार (नावाडी) ह्या व्यवसायाधिष्ठित जाती गोव्यातील ख्रिश्चनांत आढळतात. ह्या त्यांच्या कांपायन धर्मांतरापूर्वीच्या जाती असून काही शतके त्या तशाच आहेत.

हिंदूंच्या धार्मिक जीवनाकडे पाहिले, तर असे दिसून येते की; गोव्यातील हिंदू समाज मूलतः सश्रद्ध असून संस्कार, कुलधर्म, कुलाचार आणि परंपरा यांचे पालन करणारा आहे. हिंदूंचे सोळा संस्कार इतर हिंदूंप्रमाणेच आचरिले जातात. यामध्ये गर्भाधानविधी आहे. डोहाळजेवणाला ‘फुले माळणे’ म्हणतात. षष्ठीपूजन, बारसे हे विधी यथावत होतात. दात आल्यानंतर करावयाच्या अन्नप्राशनविधीला ‘दातोळ्या घालणे’ म्हणतात. पूर्वी चौल संस्काराचीही पद्धती होती. द्रविड ब्राह्मण, सारस्वत, दैवज्ञ ब्राह्मण, उच्चकुलीन मराठा, सुतार आणि कासार ह्या समाजांत मुंजी केल्या जात असत. सगोत्र विवाह निषिद्ध होता. ज्या जातीत गोत्राऐवजी कुल(देवक) असते, त्या जातीत समान कुलात विवाह निषिद्ध होता. उच्चकुलीनांमध्ये हुंड्याची प्रथा होती. इतर जातींमध्ये वधूपित्याला ‘देज’ दिले जाई. आंतरजातीय विवाह पूर्णपणे निषिद्ध होते. पांढरपेशांव्यतिरिक्त अन्य जातींमध्ये काडीमोड आणि विधवा-विवाह होत असत; बहुपत्नीकत्वाची चाल होती. (पुढे १८६९ च्या पोर्तुगीज समान कायद्याने त्यावर बंदी आली) उच्चवर्णीयांच्या विवाहविधीमध्ये महाराष्ट्रातल्या विवाहविधींपेक्षा फारसा फरक नाही परंतु बहुजन समाजातील, विशेषतः गावडा, कुणबी इत्यादी जातींतील विवाहविधींमध्ये फरक आहे. दहन हा अंत्यसंस्कार असून तो सर्व जातींत समान आहे. काही आदिम जमातींत प्रेताला पुरण्याचा पर्याय रुढ होता.

सर्व जातींच्या कुटुंबांतून कुलधर्म, कुलाचार पाळले जात. वार्षिक श्राद्ध, महालयश्राद्ध, कुलदेवतेच्या जत्रेप्रसंगी आणि इतर शुभप्रसंगी अन्नसंतर्पण; अमावास्येला, श्राद्धपक्षात काकबळी; हे विधी केले जात. कुलधर्म म्हणून कुलदेवतेच्या नियत होणाऱ्या शिबिकोत्सवाला जाण्याची प्रथाही होती.

गोव्यातील एक खास गोष्ट म्हणजे कोणतेही कार्य करण्यापूर्वी देवाची अनुज्ञा आणि आशीर्वाद घेण्यासाठी कौल घेण्यात येतो. याला ‘प्रसाद घेणे’ म्हणतात. देवमूर्तींच्या अंगोपांगावर फुलांच्या पाकळ्या (करमल झाडाची पानेही) पाण्याने चिकटवितात. पुजारी भक्तांच्या समस्या मांडत असताना जेथील पाकळी पडेल, त्या संकेताप्रमाणे कौल मिळतो. त्यानुसार कार्याकार्य निर्णय घेण्यात येतो. (काही ठिकाणी शिला किंवा खांबांवरही प्रसाद लावले जातात.) शकुनापशकुन, मुहूर्त, भविष्य, भूतबाधा, करणी, इत्यादी कल्पना आणि अंधश्रद्धाही विद्यमान होत्या. त्यावर उपाययोजना करणारा मांत्रिक आणि उपाध्याय वर्गही अर्थात होताच.

हिंदू धर्मात विहित सर्व सण गोव्यात पाळले जात. नवरात्र, रामनवमी, जन्माष्टमी, इत्यादी देवालय संबद्धिचे सण; गणेश चतुर्थी, दिवाळी, इत्यादी कौटुंबिक सण आणि शिमग्यासारखे सामाजिक सण उत्साहाने साजरे होतात. ह्या सणांमध्ये काही प्रादेशिक वैशिष्ट्येही असत. उदाहरणार्थ गणपतीच्या मखरावर बांधली जाणारी विविध फळांची ‘माटोळी’ (धर्मछळाची आठवण म्हणून), काही कुटुंबांतून मूर्तीऐवजी गणपतीच्या कागदावरील चित्राची पूजा, शिमग्यातील तरुण खेळगड्यांची ‘रोबट’ ही मिरवणूक, घरोघरी होणारे त्यांचे ‘तालगडी’ हे नृत्य ह्या गोष्टींचा त्यामध्ये उल्लेख करता येईल.

### देवभूमी गोवा

गोव्यामध्ये असंख्य दैवते आणि त्यांची देवालये असल्याने गोमंतकाला ‘देवभूमी’ म्हटले जाते. येथील दैवतसमूह चार गटांत विभागता येईल. धर्मछळाच्या काळात सुरक्षिततेसाठी, फोंडा वगैरे मराठी मुलखात स्थलांतरित झालेली; मंगेश, म्हाळसा, शांतादुर्गा, रामनाथ, नागेश, महालक्ष्मी इत्यादी दैवतांचा एक गट. ह्या नवीन स्थानी उभारली गेलेली त्यांची भव्य मंदिरे, त्यांचे महाजन,



गोव्यातील सुप्रसिद्ध श्रीमंगेश मंदिर.



गोव्यातील सुप्रसिद्ध श्रीशांतादुर्गा मंदिर.

ग्रामदेवतांचा आहे. यांच्यामध्ये मुख्यत्वे सांतेरी (वारूळ स्वरूपातील भूदेवी) बेताळ, काळभैरव, रवळनाथ, ग्रामपुरुष, क्षेत्रपाळ इत्यादी देवता येतात. कित्येकदा दैवतांची संख्या पाचाहून अधिक असली, तरी यांना 'पंचिष्ठ' म्हणतात. गोव्यात बहुतेक गावांमध्ये हे पंचिष्ठ असते. दैवतविषयक धारणा आणि त्यांच्या पूजापद्धतींमध्ये फरक असतो.

चौथा गट असंख्य लोकदैवतांचा आहे. यांमध्ये ब्रह्मा, वाठारो, बाराजाण, खेत्री, म्हारू ही बहुधा सर्वत्र आढळणारी दैवते. घोडा, वाघरो, नाग ही प्राणिरूपात्मक आणि खुंटी हे प्रतीकात्मक दैवतही आढळते.

काही ठिकाणी सतीशिला आणि वीरगळ यांचीही पूजा केली जाते. त्याशिवाय कुणबी वेळीप यांचा 'पाईक' हा शिळारूप देव, धनगरांचा बिरोबा; ही दैवते तसेच नाथपंथीयांचे 'सिद्ध' हे स्थान आणि महारांचे 'म्हारांगण' हे प्रतिकविरहित देवस्थानही दिसते. कुळवाडी जमातीची 'खामीण' आणि 'रौदिरो' ही दैवते आणि गावडा जमातीचे 'गाडवस' हे शिलाप्रतीकात्मक दैवत ही आणखी काही दैवते आहेत. यांच्यामध्ये 'देवचार' हे वैशिष्ट्यपूर्ण दैवत आहे. सर्वत्र दिसणाऱ्या ह्या दैवताचे काम ग्रामरक्षणाचे असते.

पुजारी/गुरव, इतर सेवेकरी मंडळी हा सर्व सरंजाम पाहता त्यांना आपण शिष्ट दैवते म्हणू शकतो. मुळात ही लोकदैवतेच असली, तरी त्यांचे स्वरूपच बदलून गेलेले दिसते. पेडणे येथील भगवती, काणकोणचा मल्लिकार्जुन, शिरगावची लईराई, मोरजीची मोरजाई, वळवईची केळबाई दुसऱ्या गटातील ही देवस्थाने जरी वरील देवस्थानांसारखी असली, तरी त्यांमध्ये बहुजन लोकजीवनाचा मोठा सहभाग दिसतो, त्यामुळे त्यांना विशिष्ट दैवते म्हणू. तिसरा गट

विविध वृक्ष ही त्यांची निवासस्थाने आणि 'सोरोरोट' (दारु+भाकरी) ह्या नैवेद्याचा त्याला नवस करतात. त्याचे प्रत्यक्ष दर्शन आणि त्याची अचाट कृत्ये यांबद्दल अनेक दंतकथा आढळतात. ह्या लोकदैवतांची प्रासंगिक आराधना मुख्यत्वे आदिम जमाती करीत असून त्यांमध्ये यात्वात्मक भाग अधिक दिसून येतो.

पहिल्या तीन गटांतील दैवतांची जिथे-जिथे देवालये आहेत, तिथे-तिथे त्या देवतांच्या जत्रा भरतात. त्यांमध्ये

पालखीच्या विविध प्रकारांतून देवतेची मिरवणूक आणि रथोत्सव केला जातो. शिष्ट दैवतांच्या जत्रांत पुराण-कीर्तन वगैरेही केले जाते. पूर्वीपासून दशावतारी काला हा नाट्यप्रकार येथे रुढ आहे. काही देवालयांतून दुपारी दहिकाला आणि गौळणकालाही होतो. विशिष्ट दैवतांच्या जत्रांपैकी शिरगावच्या लईराईच्या जत्रेत भक्त निखाऱ्यांवरून चालण्याचे अग्निदिव्य करतात त्याला 'होमखण' म्हणतात. काणकोण येथील मल्लिकार्जुनाच्या जत्रेत तीन माणसांच्या डोक्यांच्या चुलीवर भात शिजविण्याचा 'शिशारान्नी' हा विधी असतो. इथेच 'गड्यांची जत्रा' हा वैशिष्ट्यपूर्ण प्रकार होतो. बेताळ देवासमोर ४५ फुटी खांबावरच्या रहाटावर गड्यांना बांधून फिरविले जाते. पूर्वी कुंडईला एका जत्रेतही असा रहाटावर गळ लावून फिरविण्याचा विधी होता. महाराष्ट्रातील बगाडासारखा हा विधी आहे. तो पोर्तुगीजांनी बंद केला. जत्रांव्यतिरिक्त देवस्थानांतून नियतकालिक (पंधरवड्यातून एकदा) शिबिकोत्सव असतात. टांगलेल्या मखरात देवतेला बसवून ती झोके देऊन हालविण्याचाही वैशिष्ट्यपूर्ण विधी काही ठिकाणी केला जातो. तसेच काही जत्रांत मातीची पंचारती घेऊन शेकडो सुवासिनी देवळाभोवती फिरतात. ह्या पंचारतीला 'दिवज' आणि या जत्रेला 'दिवजांची जत्रा' म्हणतात.



बो जेझुस बासीलिका चर्च, गोवा.

## ख्रिस्ती धर्मजीवन

गोव्यातील ख्रिश्चनांचे धार्मिक जीवन चर्चभोवती केंद्रित झालेले असून त्यांचे नित्य आणि नैमित्तिक आचार हे प्रार्थना, प्रसाद आणि पापमुक्ती ह्या तीन संकल्पनांभोवती फिरत असतात. धर्मदीक्षेपासून (Baptism) तैलानुलेपन (Extreem Unction) ह्या अंत्यविधीपर्यंत त्यांचे सात संस्कार असून ते सारे चर्चमध्येच केले जातात. त्यांच्या सणांमध्ये नाताळ आणि ईस्टर हे प्रमुख सण असतात. त्रिमूर्तीचे फेस्त (Corpuschristi), पवित्र हृदयाचे फेस्त (Feast of Sacred heart), इत्यादी सणही इथल्या चर्चमध्ये केले जातात. जुन्या गोव्याच्या प्राचीन चर्चेसमध्ये सी कॅथेड्रल आणि बो जेझुस बासीलिका ही प्रमुख चर्चेस असून 'बासीलिका'मध्ये सेन्ट फ्रान्सिस झेवीअरचे शव जतन करून ठेवलेले आहे. ह्या संतावर गोवेकर ख्रिश्चनांची फार श्रद्धा असून तेथील फेस्त हे गोव्यातील प्रमुख फेस्त आहे. त्याशिवाय गावोगावी विविध संताच्या नावे अनेक चर्चेस असून मेरी, येशू, यांची विविध रूपे पूजली जातात आणि विशिष्ट दिवशी त्या-त्या ठिकाणी त्यांची फेस्त होत असतात.

खिश्चनांतील उच्चभ्रू वर्गावर पाश्चात्त्य संस्कृतीचा विशेष प्रभाव दिसून येतो. त्यांच्याव्यतिरिक्त इतर समाजाने आपल्या पूर्वपरंपरा थोड्याफार फरकाने चालू ठेवलेल्या आहेत. तियात्र (Theatre) हा ख्रिश्चनांचा लोकप्रिय कोकणी नाट्यप्रकार आहे. हिंदू कुळंब्यांमध्ये जागर हा लोककलेचा

प्रकार आहे. त्याचीच जरा वेगळी आवृत्ती म्हणजे 'ख्रिस्ती जागोर' असतो. शिवोली गावामध्ये 'जागरयो' हे देवप्रतिकस्थान आहे. तेथे हिंदूख्रिश्चन मिळून संयुक्त जागर सादर करतात. गुडफ्रायडेच्या पूर्वीची चाळीस दिवसांची उपवासाच्या सुरुवात साजरा करण्यात येणार 'इत्रुज' हा ख्रिश्चनांचा सण म्हणजे रूप बदललेला शिमगाच असल्याचा प्रत्यय येतो.

सारांशाने, गोमंतकाच्या संस्कृतीचे विविध पैलू आपण पाहिले, तर असे लक्षात येते की, मूळ भारतीय संस्कृती इथे सर्वांगांनी बहरलेली आहे. तिला प्रादेशिक वैशिष्ट्यांचा अनोखा रंग चढल्यामुळे तसेच पश्चात्त्य संस्कृतीच्या वरवरच्या प्रभावामुळे एक वेगळेपणाही तिला प्राप्त झालेला आहे. पिढ्यान् पिढ्या फार सोसावे लागलेला गोवेकर, हा सहिष्णू आणि शांत वृत्तीचा बनलेला आहे. विविध धर्मपंथीय, विशेषतः हिंदू आणि खिश्चन इथे सलोख्याने राहतात. मुळात एकच असलेल्या परंतु विविध कारणांमुळे थोड्याशा बदललेल्या आपापल्या परंपरा समजूतदारपणे सांभाळतात आणि जीवनाचा आनंद घेतात.

अलीकडच्या काळात गोव्याच्या परिस्थितीत खूप फरक पडलेला आहे. विशेषतः गोवा मुक्तीनंतरच्या गेल्या अर्धशतकात, गोमंतकाच्या प्रगतीची अनेक दारे खुली झालेली आहेत. गोमंतकीय प्रगतीकडे घोडदौड करतो आहे. परंतु त्याचा मूळ ऋजुस्वभाव, सहृदयता आणि आतिथ्यशीलता हे कायम आहेत. हे येथील समाजाचेच नव्हे तर ह्या भूप्रदेशाचेही वैशिष्ट्य आहे.

**संदर्भ :**


१. सातोस्कर बा.द. गोमंतक – प्रकृती आणि संस्कृती (खंड १,२,३), प्रकाशक – शुभदा सारस्वत, पुणे
२. नायक काशीनाथ दामोदर, गोमंतकाची सांस्कृतिक घडण प्रकाशक – गोमंत विद्यानिकेतन, मडगाव.
३. नायक काशीनाथ दामोदर, गोमंतकाचे अंतरंग प्रकाशक – राजहंस वितरण, पणजी.
४. खेडेकर विनायक, लोकसरिता प्रकाशक – कला अकादमी, गोवा.
५. खेडेकर विनायक, गोवा कुळमी, प्रकाशक – महेश आंगले, 'संपर्क माध्यम', पणजी.
६. गुणे वि. त्र्यं.–संपादक, गोवा गॅझेटिअर प्रकाशक – गोवा शासन, पणजी.
७. सातोस्कर बा. द.– संपादक, गोमंतकाची प्रतिमा प्रकाशक – सरस्वती मंदिर, पणजी.


* * *





यज्ञ सातकर्णीची चांदीची नाणी (प्रतिमायुक्त).

# सातवाहन

■ डॉ. रा. श्री. मोरवंचीकर

**सातवाहन कालखंडाला ‘सातवाहन युग’ असे म्हणतात. जेव्हा आपण एखाद्या कालखंडाला युग म्हणतो, तेव्हा प्रदीर्घ राजवट, लोककल्याणकारी प्रशासन, आर्थिक सुबत्ता, धर्मसहिष्णुता, सांस्कृतिक अस्मिता, भाषिक पुनरुत्थान आदी घटकांची पूर्तता होणे आवश्यक असते आणि नंतर अनेक शतके ही घडी कायम टिकावी लागते. या निकषांवर आपण सातवाहनांचा कालखंड आजमावला तर आपण त्या कालखंडास निश्चितपणे युग म्हणू शकतो.**

महाराष्ट्रास मध्ययुगाचे पलीकडे काही लक्षात ठेवण्याजोगा, चिंतन करण्यासारखा इतिहास आहे. याची महाराष्ट्रीयांना फारशी कल्पना नाही. कारण प्राचीन इतिहास म्हटले की, सामान्यपणे उत्तरभारतीय मौर्य अथवा गुप्त ह्या राजवटींकडे अंगुलीनिदर्शन केले जाते. भारतीय इतिहासाचा आरंभ करणारे म्हणून मौर्य तर गुप्तांच्या काळात भारताचे सुवर्णयुग होऊन गेले म्हणून गुप्त. परिणामी या दोहोंच्या दरम्यान झालेली सातवाहन राजवट काहीशी झाकोळून गेलेली दिसते. वास्तविक महाराष्ट्राला महाराष्ट्राच्या अस्मितेची ओळख करून देणारे, महाराष्ट्राला जगाच्या नकाशावर सर्वप्रथम झळकविणारे, आणि महाराष्ट्रालाच नव्हे तर सर्व भारतावर दक्षिणी संस्कृतीचा ठसा उमटविणारे सातवाहन हे एकमेव मराठी घराणे होय. त्यामुळे प्रत्येक मराठी माणसाला त्याची ओळख असणे, अगत्याचे आहे. आपल्या भूप्रदेशाची जडण-घडण

तेथील राज्यकर्ते त्यांचे यशापयश, येथील समाज, लोक, भाषा, संस्कृती आदींची ओळख म्हणजे आपलीच आपल्याला ओळख करून घेण्यासारखे आहे म्हणून सातवाहनांचा, शातवाहनांचा, शककर्त्या शालिवाहनाचा परिचय हा आपल्या नैतिकतेचा, आपल्या अस्मितेचा, आपल्या जडण-घडणीचा आवश्यक भाग ठरतो, म्हणून हा अल्पसा प्रयत्न.

ज्या पार्श्वभूमीवर सातवाहनांचा उदय झाला, त्या कालखंडाची स्वतःची अशी काही वैशिष्ट्ये आहेत. शिवाय सातवाहन युगाची वेगळी खासियत आहे, त्याची सामान्य वाचकाला ओळख असणे अगत्याचे आहे म्हणून सर्वप्रथम त्याची चर्चा केली आहे.

सातवाहन कालाचा विचार केल्यास, या काळातील पर्यावरण मानवी वसाहतीस अतिशय पोषक असल्याचे स्पष्ट झाले आहे. इ.स.पूर्व ५ वे शतक ते इ.स.नाचे ५ वे शतक यांमधील एकंदर जागतिक पर्यावरण; म्हणजे तापमान, पर्जन्य, वनस्पती, भूमी आदी सर्व घटक मानवी संस्कृति-संवर्धनास पोषक होते. परिणामी युरोपात ग्रीक-रोमन, भारतात सातवाहन व चीनमध्ये 'हान' वंश यांची सांस्कृतिक युगे अवतरली. हे स्थैर्य जलसंस्कृतीवर (Hydraulic Civilization) आधारित होते. म्हणजे समकालीन जगतामध्ये मोठ्या प्रमाणात कृषि-तंत्रज्ञानाचा विकास झाला होता. कृषि-आधारित उद्योगांचा मोठ्या प्रमाणावर विस्तार झाला होता व त्यामधूनच जागतिक व्यापाराची उभारणी झाली होती. या कालखंडात चीन व भारत (महाराष्ट्र) हे समकालीन जगाच्या आघाडीवर होते.

सातवाहन कालखंडातच दक्षिण भारतात (Deccan) लोहयुगाचा आरंभ झाला. लोहयुग आणि कृषिसंस्कृती या परस्परपूरक अशा संकल्पना आहेत. आपल्या साम्राज्यातील जमीन वहीताखाली (under cultivation) आणि ओलिताखाली (under irrigation) आणण्यासाठी मोठ्या प्रमाणात भूमिदान केल्याचे दिसते. यामधील तज्ज्ञांनी आपल्या साम्राज्यातील लोकांना योग्य मार्गदर्शन करावे म्हणून उपरोक्त भूमिदानाचे प्रयोजन करण्यात आले होते. शिवाय याला धार्मिक पातळीवर अधिष्ठान उपलब्ध करून देण्यात आले होते. आपली वसाहत जलसंवर्धनाच्या क्षेत्रात स्वयंसिद्ध असावी म्हणून तडाग निर्मितीला आणि तडागदानाला इष्टापूर्त कार्याचा सन्मान देण्यात आला होता. त्यामुळे लोहयुगाचा आरंभ, कृषिसंस्कृती व जलसंवर्धनाचा विकास या सातवाहन युगाच्या खास बाबी होत.

पर्यावरणाच्या अनुकूलतेमुळे आणि तुलनात्मकदृष्ट्या लोकसंख्यावाढीचा वेग काहीसा अधिक असल्याने नागरीकरणास गती प्राप्त झाली होती. संपन्न व स्वावलंबी नागरी केंद्रांची निर्मिती वेगाने होत होती. मान्सून वाऱ्याच्या शोधामुळे सागरी संस्कृतीचा उदय होण्यास मदत झाली व दीर्घ पल्ल्याचा व्यापारही समुद्रमार्गे होऊ लागला. परिणामी महाराष्ट्राच्या पश्चिम किनारपट्टीचे महत्त्व वाढले होते. या परिसरात लहानमोठी शेकडो बंदरे निर्माण झाली होती आणि कल्याण ते रोम म्हणजेच प्रतिष्ठान ते रोम असा थेट व्यापार सुरू झाला होता. म्हणजे नागरीकरणाचा विकास हे सातवाहन युगाचे व्यवच्छेदक लक्षण मानावे लागते.

या तीन वैशिष्ट्यांशिवाय सातवाहन युगाची स्वतःची अशी काही वेगळी वैशिष्ट्ये होती, त्याचाही या ठिकाणी परामर्ष घेणे अगत्याचे आहे. सातवाहन कालखंडाला 'सातवाहन युग' असे म्हणतात. जेव्हा आपण एखाद्या कालखंडाला युग म्हणतो, तेव्हा प्रदीर्घ राजवट, लोककल्याणकारी प्रशासन, आर्थिक सुबत्ता, धर्मसहिष्णुता, सांस्कृतिक अस्मिता, भाषिक पुनरुत्थान आदी घटकांची पूर्तता होणे आवश्यक असते आणि नंतर अनेक शतके ही घडी कायम टिकावी लागते. या निकषांवर आपण सातवाहनांचा कालखंड आजमावला तर आपण त्या कालखंडास निश्चितपणे युग म्हणू शकतो, हे पुढील विवेचनावरून स्पष्ट होईल.

सातवाहन घराण्याच्या कारकिर्दीपासून महाराष्ट्राच्या विश्वसनीय इतिहासाचा आरंभ होतो. महाराष्ट्र मौर्यांच्या वर्चस्वाखाली होता, असे मानले जात असले; तरी महाराष्ट्राच्या नेमक्या कोणत्या भूभागावर त्यांची राजवट होती, याचा विश्वसनीय पुरावा अद्याप हाती आलेला नाही. आत्तापर्यंत झालेल्या उत्खननांतून मौर्यांच्या वसाहतीबद्दल निश्चित पुरावा उपलब्ध झालेला नाही, हे विशेष होय.

सातवाहनांची राजकीय कारकिर्द सुरू होण्यापूर्वी महाराष्ट्राचा भूप्रदेश, रट्ठ, भोज, पेतनिक आदी टोळ्यांमध्ये

विभागलेला होता. सातवाहन हेच पहिले महाराष्ट्रीय घराणे होय, ज्यांनी या टोळ्यांचे सामिलीकरण करून महाराष्ट्रात एकसंध राज्य निर्माण केले.

प्राकृतभाषा व दाक्षिणात्य संस्कृती हे या सामिलीकरणामागील प्रबळ सूत्र होते. सातवाहनांनी ते सूत्र पकडून प्राकृतभाषेला राजभाषेचा दर्जा दिला. सातवाहनांचे सर्व शिलालेख व नाणी प्राकृत भाषेत आहेत. 'गाहासत्तसई' हा सम्राट हाल सातवाहनाचा प्राकृत भाषेचे वैभव प्रकट करणारा भारतातील आद्यग्रंथ होय. त्यामध्ये जो मोकळेपणा, प्रामाणिकपणा आणि मराठमोळ्या संस्कृतीचे जे दर्शन घडते, तसे नंतरच्या अन्य ग्रंथांत घडत नाही.

सातवाहन हे महाराष्ट्रीय घराणे म्हणजे मराठी घराणे होते. इतिहासामध्ये दाक्षिणात्य घराण्यांनी उत्तरभारतावर वर्चस्व प्रस्थापित केल्याची उदाहरणे अपवादात्मकच आढळतात. शिवाय त्यांची राजवट सामान्यतः इ. स. पू. २३० ते इ. स. २३० अशी ४६० वर्षांकरिता एकसंधपणे असल्याचे जाहीर आहे. साडेचारशे वर्षे कारकिर्द गाजविणारे भारतीय पातळीवरील नव्हे तर जागतिक पातळीवरीलही ते एकमेव घराणे होय.

सातवाहन घराण्यात एकंदर तीस राजे झाले. त्या सर्वांनी लोककल्याण हेच आपल्या राज्याचे उद्दिष्ट ठेवले होते. त्यामुळे जलसंवर्धन, अधिकाधिक जमीन लागवडीखाली आणणे, सिंचनाखाली आणणे, पशुपालन, वनसंरक्षण, कुंभारीकला व ओतारीकला आदी जोडधंद्याचे पाठबळ शेतीला देणे– त्यासाठी आवश्यक असणारी बाजारपेठ निर्माण करणे– देशांतर्गत व आंतरराष्ट्रीय व्यापाराला प्रोत्साहन देणे. अशा प्रकारची उद्दिष्टे त्यांनी प्रत्यक्षात राबवली म्हणून त्यांच्या काळात प्रजा अतिशय सुखात होती. राज्यकर्त्याप्रमाणेच समाजसुद्धा सुसंघटित व कर्तव्यप्रवण होता. सचोटी हा या सर्व चलन–वलनाचा पायाभूत घटक होता. समाजाचे व अधिकाऱ्यांचे लक्ष्य युद्धप्रवणेतेपेक्षा उद्यमशीलतेकडे केन्द्रित झाल्याने, सर्वच क्षेत्रांत त्यांनी आघाडी मिळविली होती. आंतरराष्ट्रीय बाजारपेठांत महाराष्ट्रातील उत्पादनाला विशेष मागणी होती. विशेषतः कापड–बाजारात एकाधिकार गाजविणारे जागतिक पातळीवरील ते एकमेव महाराष्ट्रीय घराणे होते. एरिअन, स्ट्रॅबो, प्लिनी, टॉलेमी आदी पाश्चिमात्य लेखकांची यावरील मते अभ्यासण्यासारखी आहेत. म्हणजेच सुखी प्रजाजन आणि आंतरराष्ट्रीय व्यापारातील श्रेष्ठत्व ही केवळ याच काळाची वैशिष्ट्ये मानावी लागतील.

उपरोक्त विधानांना बळकटी देणारे दोन उपोद्‌बलक पुरावे याप्रमाणे: हेच एकमेव घराणे होऊन गेले की, ज्यांनी आपली चलन–व्यवस्था प्रचारात आणली. त्यांच्या तीस नृपतींपैकी एकोणीस नृपतींची नाणी आत्तापर्यंत उपलब्ध झाली आहेत. त्यांनी व्यवहारात आणलेल्या नाण्यांवर संबंधित नृपतीचे नाव व त्याचा मुखवटा आहे. वासिष्ठीपुत्र पुलुमावीची वयपरत्वे (तरुण, पोक्त व वृद्ध) मुखवटा असलेली चांदीची नाणी मिळाली आहेत. मुळात नाणी असणे दुर्मिळ आणि त्यातही मुखवटायुक्त चांदीची नाणी त्याहून दुर्मिळ. शिवाय ही नाणी सातवाहन या घराण्याच्या संस्थापक नृपतींपासून अखेरच्या पुळुमावीपर्यंत मिळणे हे व्यापारातील प्रगतीचे मुख्य लक्षण मानावे लागते.

नाण्याप्रमाणे त्यांनी उत्कीर्ण शैलमंदिरांना मोठ्या प्रमाणात राजाश्रय दिला. त्यामुळे सातवाहन वास्तुकलेचे, जिला पुढे जाऊन अमरावती कला असे नाव प्राप्त झाले. एक नवे दालन उघडले गेले. महाराष्ट्रातील सह्याद्रीच्या काळ्याकभिन्न कातळातून पाषाणपुष्पे उमलवून दाखविण्याचे सातवाहन कलाकारांचे कसब शुद्ध महाराष्ट्रीय होते. भारतात एकंदर १२००च्या आसपास लेणी आहेत. त्यांपैकी ९०० लेणी एकट्या महाराष्ट्रात आहेत. त्यांमधील ५०% लेणी सातवाहनांच्या कारकिर्दीत झाली हे विशेष नाही का?

त्यातही आश्चर्याची गोष्ट म्हणजे या लेण्यांच्या उभारणीत राजापासून, सामान्य माणसापर्यंत सर्वांचे योगदान सामावले आहे. अगदी मासेमारी करणारा कोळी, कुस्ती खेळणारा मल्ल, औषध देणारे वैद्य, यांसारख्या समाजातील सर्व घटकांचे प्रतिबिंब या निर्मितीमध्ये उमटल्याचे जागोजागीच्या शिलालेखांतून स्पष्ट होते.

या लेण्यांचे आणखी वैशिष्ट्य म्हणजे ती अशा जागी खोदविली आहेत की, सार्थवाहपथावरून जाणाऱ्याला त्यांचे दर्शन सहजासहजी घडेल. शिवाय ती कलाकुसरीने एवढ्या सुरेख पद्धतीने अलंकृत केली आहेत की,



सातवाहन यांचे नाशिक येथे सापडलेले नाणे.

त्यांमधील शिल्पावरील दागिने, केशरचना, वस्त्रे-प्रावरणे इतक्या कालावधी-नंतरही कलाकारांसमोर आदर्श (Models) वाटतात. शिल्पातील भाव आणि जिवंतपणा शब्दांत पकडणे अवघड आहे. त्यादृष्टीने भाजा, पितळखोरा, रांची येथील शिल्पे सजीवत्वाचा अभास निर्माण करणारी आहेत. यानंतर किंवा यापूर्वी कोणत्याच राजवटीमध्ये वास्तुकला एवढ्या मोठ्या प्रमाणात बहरून आली नाही.

धर्मसहिष्णुता हे सातवाहन राजवटीचे महत्त्वाचे लक्षण होय. सातवाहन वैयक्तिक पातळीवर वैदिक धर्माभिमानी होते तथापि सामाजिक पातळीवर त्यांनी बौद्ध व जैन धर्मांना मोठ्या प्रमाणात राजाश्रय उपलब्ध करून दिला. आद्य सातकर्णीने जुन्नर परिसरात मोठ्या प्रमाणावर अश्वमेधादी यज्ञयाग करून विद्वत् ब्रह्मवृदांना मोठ्या प्रमाणात अनुदान दिले. तर अंतिम चरणातील विजय सातकर्णीने नागार्जुन या बौद्ध आर्यांच्या मार्गदर्शनाखाली 'नागार्जुन कोंडा' या नगरीची उभारणी केली. गौतमीपुत्र सातकर्णी, वासिष्टीपुत्र पुलुमावी यांनी जैनाचार्यांना उदार आश्रय दिला.

सातवाहनांच्या काळातच प्राकृत (मराठी) भाषेची, मनाची जडणघडण होऊन महाराष्ट्राची मानसिकता, महाराष्ट्राची अस्मिता तयार झाली. एकंदरीत सर्वच क्षेत्रांत प्रगतीची घोडदौड सातत्याने चालू होती, म्हणून त्यांच्या युगाला महाराष्ट्राचे सुवर्णयुग असे म्हणण्याचा अलीकडे प्रघात आहे. या पार्श्वभूमीवर आपण त्यांच्या इतिहासाचा मागोवा घेणार आहोत.

श्रेष्ठ ऐतिहासिक वारसा लाभलेल्या या घराण्याच्या आत्तापर्यंतच्या इतिहासलेखनाचा (historiography) विचार केल्यास त्यांचे मूलस्थान, त्यांचा कालखंड व त्यांचा वंश यांबद्दल आरंभीच्या इतिहासकारांत इतकी मतभिन्नता आढळते की, त्यांची परस्परविरोधाची भूमिका पाहून त्यांच्या इतिहासात डोकावण्याचे कोणी धाडसच करत नव्हते. वाचकांच्या नव्या पिढीला या वादाची तोंडओळख असली पाहिजे म्हणून त्याचा इथे धावता आढावा घेतला आहे.

### सातवाहनांचे मूलस्थान

सातवाहनांच्या मूलस्थानाविषयी इतिहासकारांत दोन पक्ष आहेत. या घराण्याचा पूर्वार्ध महाराष्ट्रात झाल्याने व उत्तरार्ध आंध्रात झाल्याने ते महाराष्ट्राचे की आंध्राचे असा नाहक वाद उपस्थित केला गेला. एकाच वास्तूची छाया सूर्योदयाच्या वेळी पश्चिमेकडे व अस्ताच्या वेळी पूर्वेकडे पडते म्हणून सूर्यालाच झाकून ठेवण्यासारखा हा प्रकार आहे. तथापि सूर्याला झाकणे म्हणजे स्वत:च्या तर्कबुद्धीला झाकण्यासारखे आहे.

सातवाहनांच्या ऐतिहासिक साधनांमध्ये; मौखिक परंपरा, धार्मिक व लौकिक साहित्य, तसेच भौतिक साहित्य आदींचा पुरेपूर भरणा आहे. तथापि आद्य संशोधकांनी या सर्वांकडे हेतुतः दुर्लक्ष करून त्यांना अट्टहासाने आंध्र ठरविण्याचा प्रयत्न केला. पुराणकारांनी त्यांचा आंध्रभृत्य म्हणून निर्देश केला असल्याने संशोधकांनी पुराणाच्या ऐतिहासिकतेबद्दल संशय प्रकट करत, त्यांच्याच मताला दुजोरा दिला. ही सातवाहनांच्या इतिहासलेखनाची मोठी शोकांतिका आहे.

सातवाहन हे आंध्राचे असून ते भृत्य म्हणजे नोकर होते, असे प्रतिपादन आद्य संशोधक रा. गो. व द. रा. भांडारकर पिता-पुत्रांनी केले. जेम्स बर्जेस या पाश्चिमात्य संशोधकाने उपरोक्त मतास पुष्टी दिली. याच मताचे समर्थन करताना स्मिथने म्हटले की, सातवाहन हे मौर्यांचा समकालीन असून सम्राट अशोकाच्या निधनानंतर ते स्वतंत्र झाले. श्रीकाकुलम (आंध्रप्रदेश) ही त्यांची राजधानी असून त्यांचा राज्यविस्तार गोदा-कृष्णा परिसरात झाला. रॅपसन व बार्नेट या संशोधकांनी या मताचा पाठपुरावा केला.

प्रा. श्रीनिवास अय्यंगारानी सातवाहनांना विंध्य पर्वतातील भटक्या आंध्र-टोळीचे ठरवून उत्तरार्धात ते आंध्रात स्थिरावल्याचे म्हटले. डॉ. सुखथकरांनी सातवाहनांना आंध्र ठरविण्यातील अडचणी (म्हणजे त्यांचे प्राकृतामधील शिलालेख, नाणी आदी) उपस्थित केल्या. तथापि अंतिमतः

मेकॅदोनी आणि हिराहट्टगल्ली ताम्रपटावरून की ज्यामध्ये त्या प्रदेशांना 'सातानीरट्ठा' आणि 'सातानीहारा' असे संबोधिले होते, त्यावरून त्यांना आंध्राचेच ठरविले. नशीब अजमावण्यासाठी ते महाराष्ट्रात गेले होते तथापि परिस्थितीत बदल होताच ते आपल्या मायदेशी परतल्याचे प्रतिपादन केले.

प्रसिद्ध आंध्र संशोधक के. गोपालचारी यांनी मान्य केले की, आद्य सातवाहनांच्या सर्व राजकीय घडामोडी महाराष्ट्राशी निगडित आहेत. तथापि ते आंध्र सम्राटांचे सेवक असून, नशिबाची खातरजमा करून घेण्यासाठी महाराष्ट्रात स्थलांतरित झाले होते. ते कदाचित वंशानेही आंध्र असावेत. शेवटी त्यांनी मान्य केले की, हे सर्व तर्काधिष्ठित आहे. त्यांच्याच मताचे समर्थन, प्रा. व्यंकटगुटी, रामाराव आदी संशोधकांनी केले. या सर्वांचा अर्थ एकच की, महाराष्ट्राच्या मुशीमध्ये एवढे कर्तृत्ववान पुरुष तथा घराणे निर्माण होऊच शकत नाही.

डॉ.मिराशींनी त्यांना वैदर्भीय ठरविण्याचा प्रयत्न केला. समर्थनार्थ त्यांनी नाशिक व हाथी गुंफा येथील शिलालेख व तऱ्हाळे या ठिकाणी उपलब्ध झालेला सातवाहनांचे नाणेसंच यांचा आधार घेतला. डॉ. काशीप्रसाद जायस्वाल यांनी त्यांचा संबंध आंध्राशी नसल्याचे ठामपणे सांगितले, पण त्यांना सातपुडा रांगेतील सतिय पुत्र ठरविले. डॉ. स. आ. जोगळेकरांनी त्यांना पुणे जिल्ह्यातील मावळ तालुक्यातील आंध्रा नदीकाठचे ठरविले. थोडक्यात उपरोक्त सर्व विद्वानांचे सिद्धान्त पुराणाच्या कुबड्यांवर आधारित आहेत.

प्रस्तुत लेखकाने 'सातवाहनकालीन महाराष्ट्र' या ग्रंथात उपरोक्त सर्व मुद्यांचे खंडन करून त्यांना महाराष्ट्रात पैठण येथे जागा उपलब्ध करून दिली. त्याचा अगदी थोडक्यात परामर्ष याप्रमाणे–

सामान्यतः इसवी सनाच्या चौथ्या शतकात प्रमुख पुराणांची रचना झाल्याचे मानले जाते. सातवाहन सत्तेचा अस्त सनाच्या तिसऱ्या शतकाच्या द्वितीय दशकाच्या जवळपास झाला. तथापि पुराणांच्या रचनेच्या कालखंडात सातवाहनांचे एक क्षीण सत्ताकेंद्र आध्रांत अस्तित्वात होते; आणि महाराष्ट्रावर वाकाटक, सातकर्णी, आभीर, क्षत्रप आदी राजघराणी राज्यकारभार करीत होती. तेव्हा पुराणकारांनी ही वस्तुस्थिति विचारात घेऊन सातवाहनांना आंध्र ठरवून टाकले. या घराण्याच्या महाराष्ट्रीयत्वाचा खोलात जाऊन शोध घ्यावा, असे त्यांना वाटले नाही, कारण इतिहास लिहिणे हा त्यांचा हेतू नव्हता. पुराणाशिवाय अन्य कोणताच ऐतिहासिक पुरावा त्यांचे आंध्रदेशीयत्व मान्य करीत नाही. त्यामुळे एका कच्या सूत्रावरून त्यांना आंध्र ठरविणे, हे त्यांच्यावर ऐतिहासिक अन्याय करण्यासारखे आहे.

त्यांना आंध्र ठरविताना त्यांच्या आंध्रातील श्रीकाकुलम, धन्या काकटक, नागार्जुन कोंडा आदी राजधान्यांवर संशोधकांनी भर दिला. तथापि त्यांच्या पैठण या आद्य राजधानीकडे का दुर्लक्ष केले, हे समजू शकत नाही.

सातवाहनांचे महाराष्ट्रीयत्व सिद्ध करण्यासाठी त्यांच्या शिलालेखाइतके विश्वसनीय दुसरे साधन नाही. सातवाहन व क्षत्रप यांचे आत्तापर्यंत ६५ शिलालेख उपलब्ध झाले आहेत. पैकी ३७ सातवाहनांचे व २८ क्षत्रपांचे आहेत. सातवाहनांच्या ३७ पैकी २८ शिलालेख महाराष्ट्रात व ९ आंध्रात आहेत. महाराष्ट्रातील तथा आंध्रातील सर्व शिलालेख महाराष्ट्री प्राकृतमध्ये व ब्राह्मी लिपीत आहेत. लेखांतील सर्व आशय त्यांचे महाराष्ट्रीयत्व सिद्ध करण्यास पुरेसे आहेत. थोडक्यात त्यांच्या अभिलेखातील एकही लेख त्यांचे आंध्रत्व सिद्ध करण्यास मदत करत नाही.

सातवाहन नृपतींनी आपल्या नावांची नाणी चलनात आणली. त्यांपैकी सिमुक सातवाहनाचे एकमेव नाणे आंध्रातील करीमनगर जिल्ह्यात सापडले – ते आद्य सातवाहनाचे नाणे असल्याने पुन्हा त्यांना आंध्राचे ठरविण्यासाठी स्पर्धा निर्माण झाली. केवळ एका नाण्यावरून ते आंध्राचे ठरत असतील, तर महाराष्ट्रात अनेक ठिकाणी त्यांच्या नाण्यांचे हजारोंनी संच सापडले आहेत व अजून सापडत आहेत. त्याचे काय? नाशिक जिल्ह्यातील जोगल टेंभीच्या एका संग्रहात १४,००० नाण्यांचा संच होता. याशिवाय महाराष्ट्रात उत्खनन झालेल्या आत्तापर्यंतच्या सातवाहन स्थळावर आद्य सातवाहनांपासून ते गौतमीपुत्र यज्ञ सातकर्णीपर्यंतच्या भिन्न नृपतींची नाणी



सातवाहन राजा शिवश्री पुळुमावि याचा वनवासी येथील लेख.



अमरावती (आंध्र प्रदेश) येथील सातवाहनकालीन स्तूप.

उपलब्ध झाली आहेत. शिवाय शिलालेखांच्या तुलनेत साधन म्हणून नाण्यांवर किती प्रमाणात अवलंबून राहावयाचे?

### स्मारके आणि अवशेष

सातवाहनांच्या महाराष्ट्रीयत्वाची खात्री पटवून देण्यास लेण्यासारखे दुसरे साधन नाही. या काळात वर सांगितल्याप्रमाणे नाशिक, कार्ले, भाजे जुन्नर, कान्हेरी, अजिंठा आदी ठिकाणी शेकडो लेणी कोरण्यात आली. ती सर्व लेणी महाराष्ट्रातच आहेत. त्यामधून आद्य सातवाहन नृपतींच्या नावांचा त्यांच्या कर्तृत्वाचा उल्लेख आहे. वर्धा परिसरात त्यांचे स्तूप मिळाले आहेत. पैठण, नाशिक, नेवासा, तेर, भोकरदन ॲडम आदी स्थळांवर झालेल्या उत्खननांतून त्यांच्या घरांचे अवशेष, खापरे, हत्यारे, अवजारे, अलंकार आदी वस्तू शेकड्यांनी उपलब्ध झाल्या आहेत. उत्खनित स्तरावरून या सर्व वस्तू इसवी सनाच्या दुसऱ्या शतकापर्यंतच्या आहेत. तेर, भोकरदन येथे मिळालेल्या हस्तिदन्ती वस्तू अजोड आहेत. अशा वस्तू आंध्रामध्ये कोठेच मिळालेल्या नाहीत.

आंध्रातील अमरावती येथे उत्कृष्ट स्तूप मिळाला असून तो सातवाहन कलेचे प्रतीक मानला जातो. अलीकडे आंध्रस्थळावर झालेल्या उत्खननात रोमन संपर्कातील अनेक वस्तू विशेषतः रोमन साम्राज्यातून आयात केलेल्या खापरीवस्तू मिळाल्या आहेत. तथापि या सर्वांचा कालखंड इसवी सनाच्या दुसऱ्या शतकाच्या अखेरचा आणि तिसऱ्या शतकाच्या प्रारंभीचा आहे. यावरून उत्तरसातवाहनांनी क्षत्रपाच्या हल्ल्यानंतर दक्षिणेकडे स्थलांतर केले, या ऐतिहासिक सत्याचे समर्थन होते.

यानंतरचा त्यांच्या महाराष्ट्रीयत्वाचा बळकट पुरावा म्हणजे सातवाहन घराण्याचे पैठणशी असलेले संबंध. त्यांचे पैठणशी असणारे संबंध इतके घनिष्ठ, भावनात्मक व आध्यात्मिक होते; की तो चिंतनाचा, संशोधनाचा स्वतंत्र विषय ठरावा. त्यासाठी प्रस्तुत लेखकाचा 'पैठण थ्रू दि एजिस्' हा ग्रंथ अभ्यासावा. त्यामध्ये लोकपरंपरा, समकालीन साहित्य (गुणाढ्याची बृहत्कथा, हालाची गाहासत्त सई, सोढ्ढलाची उदयसुंदरी, कोऊहलाची लीलावई, मेरुतुंगाचार्याचा 'प्रबंधचिंतामणी', बृहत्कल्प सूत्र भाष्य, (कालकाचार्य कथानक), पैठण येथील नागघाट, राजवाडा आदींवरून ते पैठणचेच असल्याची खातरी होते. त्यांपैकी आपण येथील केवळ एका रूढ लोककथेचा थोडक्यात परिचय करून घेऊ या.

पैठण नगरीत एक लावण्यवती ब्राह्मण कन्या आपल्या बंधुद्वयासह राहत होती. एकदा ती नागघाटावर (गोदातिरी) पाणी आणण्यासाठी गेली असता एका शेष राजाने तिला पाहिले व तो तिच्याशी गांधर्व पद्धतीने विवाहबद्ध झाला. काही दिवसांनी ती गर्भवती झाली. तिच्या चारित्र्यावर संशय

येऊन तिचे भाऊ परागंदा झाले. नंतर ती कुंभारवाड्याच्या आश्रयास गेली. लोकांनी तिला आधार दिला. तिथेच ती प्रसूत झाली. तिला पुत्र झाला, तोच सालवाहन (सातवाहन) होय. पुढे तो शस्त्रास्त्र, मल्लविद्या, न्यायदान आदी विद्यांमध्ये पारंगत झाला. उज्जैनच्या विक्रमादित्य राजाला सालवाहनाबद्दल असूया वाटू लागली. संधी मिळताच विक्रमादित्याने पैठणवर आक्रमण करून सालवाहनाशी द्वंद्वयुद्ध केले. या युद्धापूर्वी बाल सातवाहनाने आपल्या नाग पित्याकडून अमृतकूपी आणून एका विहिरीत ओतली व त्या अमृतजलाने पैठणच्या मृत राजाच्या सैनिकांना सजीव केले. द्वंद्वयुद्धात विक्रमादित्याचा पराभव झाला. तेव्हा विक्रमादित्याचे सैन्य उज्जैनकडे पळून गेले.

प्रस्तुत कथा सातवाहन व क्षत्रप (उज्जैन) यांच्या श्रेष्ठत्वाच्या संघर्षावर प्रकाश टाकणारी आहे. पण आजही पैठणमध्ये मातीचे हत्ती, घोडे व सैनिक सापडतात आणि हे सैनिक हत्ती-घोड्यावर व्यवस्थित बसतात. अमृतकुंभ ओतलेली विहीर आणि सातवाहनाचा राजवाडा, नागघाट केवळ पैठण येथेच दाखविला जातो. महाराष्ट्रात इतरत्र किंवा आंध्रात अशी स्थळे दाखविली जात नाहीत. त्यामुळे त्यांची राजकीय कारकिर्द पैठण येथेच सुरू झाली, हे निश्चित.

## सातवाहनांचा कालखंड

सातवाहन सत्तेच्या उदयाच्या बाबतीत दुसरा मतभेदाचा मुद्दा म्हणजे त्यांचा कालखंड. काही संशोधकांनी ते मौर्यांचे आंध्रातील भृत्य म्हणून त्यांना मौर्यसमकालीन ठरवून इ. स. पू. २७१ हाच त्यांच्या उदयाचा काल ठरविला. तर काही संशोधकांनी क्षत्रपांच्या इतिहासावरून त्यांच्या अस्ताचे वर्ष नक्की करून इ. स. पू. ७० ते इ. स. २३० असा त्यांचा अतिशय लहान कालखंड ठरवून त्यामध्ये सातवाहनांच्या १९ नृपतींची कारकिर्द बसविण्याचा प्रयत्न केला. वास्तविक इ. स. २३० हे त्यांचे ऱ्हासाचे वर्ष नक्की आहे आणि सर्व पुराणांनी दिलेल्या त्यांच्या कारकिर्दीची सरासरी काढल्यास ४६० वर्षे येतात म्हणून इ. स. २३० पूर्वी ४६० वर्षांची गणना केल्यास ती इ. स. पू. २३० येते व त्यांचे ३० राजे यामध्ये व्यवस्थित सामावू शकतात. कालिंगच्या खाखेल नृपतीचा हाथीगुंफा शिलालेख आणि



भाजेजुन्नर येथील लेणे.

नायनिकेचा समकालीन नाणेघाटातील शिलालेख यांचा मेळ घातल्यास सातकर्णी प्रथम इ. स. पू. १५ ते १७५ दरम्यान झाला असावा, असे दिसते. त्याच्यापूर्वी कृष्ण, सिमुक व सातवाहन हे नृपती होऊन गेले. त्यांची कारकिर्द ७० वर्षांची धरल्यास सातवाहन घराण्याचा निश्चित कालखंड इ. स. पू. २३० येतो. म्हणून या घराण्यांनी इ. स. पू. २३० ते इ. स. २३० या काळात महाराष्ट्रावर राज्य केल्याचे दिसते.

## सातवाहन वंश

उपरोक्त दोन विवाद्य विषयांसोबतच आरंभीच्या संशोधकांनी अवास्तव कोलांट्या उड्या मारून, सातवाहनांना आदिवासी, आंध्र, आंध्राचे भृत्य किंवा आंध्र हेच भृत्य ठरविण्याचा प्रयत्न केला होता. तथापि आता सातवाहन या घराण्याच्या संस्थापक नृपतीची, सातवाहन हे नाव कोरलेली, नाणी उत्खननात योग्य थरात उपलब्ध झाल्याने तो वाद संपलेला आहे. शिवाय उपलब्ध शिलालेखीय पुराव्यांवरून ते वर्णाने ब्राह्मण होते, हे आता स्पष्ट झाले आहे.

सम्राट अशोकाच्या मृत्यूनंतर उत्तरेप्रमाणे दक्षिणेतही क्रांती होऊन वैदिक धर्माभिमानी सातवाहनांचा उदय झाला.



नाणेघाट.

उपलब्ध झाल्याने, तोच या सत्तेचा संस्थापक असल्याचे निश्चित झाले. त्याची राजधानी पैठण होती.

त्याच्यानंतर पुराणात नोंदविला गेलेला सिमुक हा सत्ताधीश झाला. त्याचे व सिमुकाचे नाते काय होते, याला निश्चित पुरावा नाही. तथापि नाणेघाटाच्या प्रतिमा–लेखात, 'राजा सिमुक सातवाहन श्रीमान' असा त्याचा निर्देश करण्यात आला आहे. सिमुकाला सातकर्णी नावाचा पराक्रमी पुत्र व कृष्ण नावाचा भाऊ होता. त्याने संपूर्ण महाराष्ट्र व आंध्राचा काही भाग आपल्या वर्चस्वाखाली आणला. मागे सांगितल्याप्रमाणे 'राया सिमूक' अक्षरे असलेली त्याची नाणी करीमनगर (जि. हैद्राबाद) येथे सापडली. यावरून त्याला आंध्र ठरविण्याचा प्रयत्न झाला. सिमुकानंतर सातकर्णी (प्रथम) अल्पवयीन असल्याने सिमुकाचा भाऊ कृष्ण याने काही काळाकरिता कारभार सांभाळला असल्याचे म्हटले आहे. नाशिकच्या लेण्यात कृष्णाचा उल्लेख आहे. तथापि नाणेघाटच्या प्रतिमांमध्ये कृष्णाची प्रतिमा नाही.

अशोकाच्या अहिंसावादी धोरणाविरुद्ध ही एक प्रकारची जनक्रांती होती. यानंतर संपूर्ण भारतभर काही कालाकरिता श्रौत धर्माचे वर्चस्व असल्याचे सिद्ध होते. या पार्श्वभूमीवर आपण सातवाहनांच्या राजकीय कारकिर्दीचा अंशतः परिचय करून घेऊ या.

## सातवाहन घराणे पूर्वार्ध

या घराण्यात एकंदर ३० राजे झाले. त्यांच्या राजकीय कारकिर्दीचा परिचय करून देणे हा स्वतंत्र विषय ठरतो. तथापि या ठिकाणी घराण्यातील प्रमुख राजांची तोंडओळख करून देण्याचा प्रयत्न केला आहे.

ढोबळमानाने सातवाहन ते शिवस्वाती हे पूर्वार्ध कालातील राजे मानले जातात. तर गौतमीपुत्र सातकर्णी ते तृतीय पुलुमावी हे उत्तरार्धातील राजे मानले जातात. क्षत्रप सत्तेशी संघर्ष व रोमन–संस्कृतीशी संपर्क, ही उत्तरार्ध काळाची ठळक वैशिष्ट्ये मानली जातात. तर साम्राज्यनिर्मिती व सत्तेचे दृढीकरण ही पूर्वार्ध कालाची वैशिष्ट्ये होत.

पुराणांनी सिमुक याला या घराण्याचा संस्थापक म्हणून प्रतिपादिले असले, तरी अलीकडील संशोधनाअंती सातवाहन हाच या कुलाचा संस्थापक नृपती असल्याचे निश्चित झाले आहे. आरंभी त्याने मूलक व अश्मक परिसरावर वर्चस्व निर्माण केले. सातवाहन ही आद्याक्षरे असलेली व वृषभ तथा गजाचे प्रतीक असलेली त्याची तांब्याची व शिशाची नाणी उत्खननाच्या अपेक्षित थरातून

यानंतर सातकर्णी (प्रथम) सत्ताधीश झाला. त्याची भार्या महामही नायनिका होय. सातकर्णी व नायनिका (नागनिका) यांच्या जोड–प्रतिमा असलेली चांदीची नाणी उपलब्ध झाली आहेत. नाणेघाटातील लेखावरून सातकर्णी (प्रथम) अतिबलाढ्य 'महतोमह' नृपती असल्याचे स्पष्ट होते. कलिंगनृपती खारवेलाने सातकर्णीवर दोन वेळा आक्रमण केले तथापि दोन्ही वेळा त्याला विनाशर्त माघार घ्यावी लागली. परिणामी सातकर्णीने आपल्या उत्तरेकडील सीमा विदिशा, सांचीपर्यंत व दक्षिणेकडे तुंगभद्रेपर्यंत विस्तारीत केल्या. समकालीन राज्यकर्त्यांनी त्याचे सार्वभौमत्व मान्य केले असल्याने त्याने दोन अश्वमेध, एक राजसूय आणि अनेक औतयाग (नाणेघाटच्या शिलालेखात याची तपशीलवार नोंद आढळते.) त्याने अनेक प्रकारची नाणी चलनात आणली. तसेच त्याने सातवाहन हे घराण्याचे नाव बदलून सातकर्णी हे नाव प्रचारात आणले. यानंतर सत्तेवर आलेल्या अनेक राज्यकर्त्यांनी सातकर्णी हेच नाव

उपयोजिले. उदाहरणार्थ कुंतलसातकर्णी, विजयसातकर्णी, गौतमीपुत्र सातकर्णी - हे विशेष होय. त्याची पत्नी नागनिका ही विशेष जिद्दीची आणि कर्तबगार स्त्री होती. पतिनिधनानंतरही तिने श्रौतविधी केल्याची नोंद नाणेघाटाच्या शिलालेखातून आढळते. प्रस्तुत लेखकाच्या मते पुराणकारांनी सातकर्णीस केवळ १० वर्षांची कारकिर्द दिली आहे, ती चुकीची असून ती पन्नास वर्षांची असावी, असे त्याच्या अफाट कामगिरीवरून वाटते. स्थलपरत्वे त्याच्या तपशिलात जाता येत नाही.

सातकर्णीनंतर वेदिश्री, शक्तिश्री, सातकर्णी (द्वितीय), मेघस्वाती, स्वाती, स्कंदस्वाती, मृगेन्द्र, कुन्तल, स्वातिकर्ण, पुलुमावी (प्रथम) अरिष्टकर्ण आदी राजे झाल्याचे पुराणकारांनी नोंदविले आहे.

यानंतर आलेल्या हालाची कारकिर्द अतिशय महत्त्वाची ठरते. 'गाहासत्तसई' या शृंगारप्रधान काव्यसंग्रहामुळे ती सुपरिचित आहे. नंतरच्या प्राकृत कवींनी त्याला अनेक ग्रंथांचे नायकत्व बहाल केले आहे. त्यामध्ये उदयसुंदरी, लीलावती हे प्रमुख काव्यसंग्रह होत. याशिवाय त्याचे उल्लेख सत्पशतकम्, अभिधान चिंतामणी, तथा देशीनाम माला, सरस्वती कण्ठाभरणम् अशा अनेक ग्रंथात करण्यात आले आहेत. स्थलाभावी आपणास त्याच्या तपशिलात जाता येत नाही. गाहासत्तसई हा सातवाहन समाजाचे यथार्थ चित्रण करणारा ग्रंथ होय.

हालानंतर मंटलक, पुरिन्द्रसेन, सुंदर सातकर्णी, चकोर सातकर्णी व शिवस्वाती असे नृपती झाल्याची नोंद आहे. पूर्वार्ध कालातील शिवस्वाती हा अखेरचा नृपती होय. त्याच्या कालात सातवाहन घराण्याची बरीच पडझड झाली व त्यांना आश्रयासाठी आंध्रात स्थलांतर करावे लागले. त्याच्या पत्नीचे नाव गौतमीबलश्री व पुत्राचे नाव गौतमीपुत्र सातकर्णी होते. पत्नी अतिशय करारी होती व पुत्र महापराक्रमी होता.

### गौतमीपुत्र सातकर्णी (उत्तरार्ध)

गौतमीबलश्री ही नागनिकेप्रमाणे सातवाहन घराण्यातील दुसरी महत्त्वाकांक्षी स्त्री होय. नाशिक येथील शिलालेखावरून तिची महत्त्वाकांक्षा समजू शकते.



वसिष्ठपुत्र पुलुमाविचे नाणे.



यज्ञश्री सातकर्णीचे नाणे.

त्याचप्रमाणे गौतमीपुत्र सातकर्णीचा पराक्रम समजण्यासही मदत होते. प्रस्तुत शिलालेख गौतमीपुत्राच्या कारकिर्दीच्या अखेरच्या पर्वातील आहे. दरम्यान सातवाहन-क्षत्रप संघर्षात सातवाहनांना महाराष्ट्र सोडून जावे लागले होते. त्यांचा सारा प्रदेश नहपान क्षत्रपाने जिंकून घेतला होता. त्या नहपान क्षत्रपाचे गौतमीपुत्राने गोवर्धन परिसरात (नाशिक) समूळ उच्चाटन केले व त्याचा वंश खंडित केला. 'शक-यवन-पल्हव निदुसनस' क्षहरात वंश निर्वंश करस, असा त्याचा गौरव केलेला आढळतो. त्याने क्षत्रपाकडून किती प्रदेश जिंकला याची यादीच दिली आहे. त्यामध्ये अपरान्त, अश्मक मूलक, ऋषिक, विदर्भ, सेरगिरी, कृष्णागिरी, सह्याद्री, कुकर, आकारान्वती अनूप, पारियात्र, सौराष्ट्र, विंध्य, ऋक्षवात, मंचगिरी, श्रीस्तन मलय, महेन्द्र आणि चकोर आदींचा समावेश होता. शिवाय त्याचे आंध्रावर व कर्नाटकावर सार्वभौमत्व होते. या सर्व परत जिंकून घेतलेल्या प्रदेशाचा विचार केल्यास, सर्व भारतात तो बलाढ्य सम्राट असल्याचे स्पष्ट होते. म्हणून त्यास 'सातवाहन यश प्रतिष्ठा करस' अशा बिरुदाने गौरविले आहे. डॉ. मिराशींच्या मते त्याच्या या यशाचे नाशिक येथील देवी लेण्यात (लेणी क्रमांक तीन) शिल्पांकन करण्यात आले आहे. शिल्पपट अतिशय कलात्मक पद्धतीने कोरून त्यामध्ये सातवाहन राजलक्ष्मीचे क्षत्रप

सत्तेकडून हरण व गौतमीपुत्राकडून सुटका अशा प्रसंगांची योजना केली आहे.

गौतमीपुत्रानंतर त्याचा जेष्ठ पुत्र वासिष्ठीपुत्र पुलुमावी नृपती झाला. त्याचा क्षत्रपाशी नव्याने संघर्ष झाला. त्यामध्ये पुलुमावी यशस्वी ठरला. म्हणूनच त्याला 'दक्षिणापथपती' म्हटले गेले आहे. रुद्रदामा या क्षत्रपाची कन्या त्याची पत्नी असावी, असे प्रस्तुत लेखकास वाटते. महाराष्ट्राच्या दृष्टिकोनातून पुलुमावीची कारकिर्द ही अखेरची समृद्ध कारकिर्द होय. यानंतर सातवाहन साम्राज्याची विभागणी होऊन उत्तरेकडे स्कंद सातकर्णी व दक्षिणेकडे वासिष्ठीपुत्र सातकर्णी यांची सत्ता निर्माण झाली. यानंतर आलेल्या गौतमीपुत्र यज्ञ सातकर्णीने (यज्ञश्री) संपूर्ण महाराष्ट्र एका छत्राखाली आणला (इ.स. १८० ते २००). तोही अतिपराक्रमी होता. कान्हेरीच्या लेण्यात त्याचा शिलालेख आहे. यानंतर माढरीपुत्र शकसेन नृपती झाला. महाराष्ट्रातील तो अखेरचा नृपती होय. कान्हेरी येथे त्याचे दोन लेख आढळतात.

पश्चिमी क्षत्रपांच्या प्रभावी हल्ल्यामुळे सातवाहनांचा शक्तिक्षय झाला हे खरे असले, तरी बलाढ्य साम्राज्य जतन करण्याच्या दृष्टिकोनातून आवश्यक ते खडे सैन्य, दळणवळणाची साधने व दूरदृष्टीचा अभाव यांमुळे सातवाहनांच्या साम्राज्याचे खच्चीकरण झाले. रोमन साम्राज्याच्या अधःपतनामुळे पाश्चिमात्य देशांशी असणारा व्यापार बुडाला. नंतरच्या सातवाहनांनी पूर्वेकडील देशांशी व्यापारी आघाडी उघडण्याचा प्रयत्न केला, पण त्यामध्ये त्यांना यश लाभले नाही. नंतरचे राजे दुबळे निघाले आणि भारतीय परंपरेप्रमाणे मध्यवर्ती सत्ता क्षीण होताच तिचे अनेक तुकडे पडतात, या नियमानुसार सातवाहनांच्या बलाढ्य साम्राज्याचे अनेक तुकडे झाले. त्यांपैकी आभीर, वाकाटक आदी घराण्यांनी पुढे महाराष्ट्राच्या भिन्न प्रदेशांवर वर्चस्व गाजविले.

### महाराष्ट्रातील क्षत्रप सत्ता

क्षत्रप हे शकांचे वंशज होत. त्यांचा उल्लेख महाभारतात आलेला आढळतो. ते आरंभी अनेक टोळ्यांत विभागले होते. ते कुशांणाच्या सेवेत होते व काही कुशाण प्रांतांचे ते अधिपती होते. कनिष्कानंतर ते स्वतंत्र झाले आणि स्वतःला क्षत्रप, महाक्षत्रप, राजा, स्वामी ही बिरुदे लाऊ लागले. महाराष्ट्रात राज्य करणाऱ्या क्षत्रपांची क्षहरात व कादर्मक अशी दोन घराणी होती व त्यांनी इ.स. ७८ ते ३८८ या कालादरम्यान महाराष्ट्राच्या काही भागावर राज्य केले. पुढे समुद्रगुप्ताने (शकारी) त्यांचे भारतातून पूर्ण उच्चाटन केले.

आरंभी सातवाहनांचा क्षहरात घराण्यातील नहपान क्षत्रपाशी संघर्ष झाला. इ.स. १२४ मध्ये गौतमीपुत्राने नहपानाचा नाशिक परिसरात वध करून ते घराणे समूळ नष्ट केले. यानंतर कादर्मक या घराण्याशी क्षत्रपांचा संघर्ष झाला. त्यामध्ये पुळुमावी व रुद्रदामन (संस्थापक चष्टन – पुत्र जयदामन पुत्र रुद्रदामन) यांचा संघर्ष झाला. यापूर्वी नहापानाच्या पराभवानंतर रुद्रदामनाने सातवाहन घराण्यात आपली कन्या देऊन सलोखा करण्याचा प्रयत्न केला होता. तथापि तो फार काळ टिकलेला दिसत नाही. नंतर सातवाहनांचे, मागे सांगितल्याप्रमाणे, दक्षिणेकडे स्थलांतर झाले व क्षत्रपांनी उत्तर महाराष्ट्र, उज्जैन, माळवा आणि गुजरात या प्रांतांवर आपले वर्चस्व प्रस्थापित केले.

एकंदरीत महाराष्ट्राला वैभवाच्या शिखरावर नेणारे सातवाहन घराणे, हे महाराष्ट्राचे आद्य व संपन्न राजघराणे होय. त्यांच्या काळातच महाराष्ट्राच्या अस्मितेची जडणघडण झाली, हे निश्चित. त्यांनी महाराष्ट्रातील लहान–मोठ्या सत्तांना एका छत्राखाली आणून येथील राजकीय अस्थिरता नष्ट करून ४६० वर्षांकरिता एकछत्री अंमल प्रस्थापित केला. लोहयुगाच्या प्रसाराला चालना देऊन अधिकाधिक जमीन लागवडीखाली आणली. शेतीला सिंचनाची जोड देऊन अतिरिक्त उत्पादनाला बाजारपेठा मिळवून दिल्या. नागरीकरण प्रक्रियेला गतिमान करून, सागरी दळणवळणास संरक्षण दिले. पाश्चिमात्य बाजारपेठांत महाराष्ट्रातील उत्पादनास एकाधिकार प्राप्त करून दिला.

लोककलेच्या क्षेत्रास व्यापक पाठिंबा देऊन विणकाम, चित्रकला, स्थापत्य, नृत्य, संगीत आदी क्षेत्रांत नवे उच्चांक प्रस्थापित केले. धर्मसहिष्णुत्वाचा पुरस्कार करून अधिकाधिक बौद्ध संघांना महाराष्ट्रात निमंत्रित करून त्यांच्या योगक्षेमासाठी मुक्त भूमिदाने दिली.

नागरीकरण हे सातवाहन सत्तेचे व्यवच्छेदक लक्षण मानले जाते. कृषिक्षेत्रातील अतिरिक्त उत्पादने, खनिज उत्पादनांची समृद्धी, वनस्पतिजन्य व प्राणिजन्य (चंदन, हस्तिदंत, मध वगैरे) ह्यांची मुबलक उपलब्धी, रत्नांची व मण्यांची पैदास यांमुळे नागरीकरणाला दिशा प्राप्त झाली. हिप्पालसने लावलेल्या मान्सून वाऱ्याच्या (व्यापारी वारे) शोधामुळे व रोमन सम्राट ऑगस्टस याने भूमध्य सागरातील चाचेगिरीला आळा घातल्यामुळे पाश्चिमात्य बाजारपेठा जवळ झाल्या. कापडाच्या तथा रेशीम उत्पादनाच्या क्षेत्रातील चीनच्या मक्तेदारीला आव्हान दिले. मध्य-आशियातून जाणाऱ्या रेशमी मार्गाला (Silk Route) सागरी महामार्गाचा पर्याय निर्माण करून व्यापारी क्रांती घडवून आणली.

विनिमयावर चालणाऱ्या व्यापारात परिवर्तन करून चलनी नाण्यांवर अधिक भर देण्यात आल्याने व्यापार गतिमान झाला. राज्यकर्त्यांच्या आणि व्यापारिवर्गाच्या परस्पर सहयोगातून व्यापारी श्रेण्यांचा नवा वर्ग उदयास आला. श्रेण्यांमध्ये परस्पर सहजीवनाची संकल्पना (Corporate Trade) पक्की रुजली असल्याने; पतपेढ्या, चलन, हुंड्यावळी, आदी प्रक्रिया सुलभ झाल्या. व्यापारीपथ तयार करणे, वजने-मापे-चलन प्रमाणित करणे, स्वसंरक्षणार्थ सैन्य बाळगणे आदी जबाबदाऱ्या श्रेणिप्रमुखावर सोपविण्यात आल्या. त्याला राज्य प्रशासनात सहभागी करून घेण्यात आले.

सामाजिक स्वास्थ्य, धर्मसहिष्णुत्व साहित्य व स्थापत्य या क्षेत्रांतील प्रचंड झेप आणि एकंदरीत समृद्धीचे प्रमाण या निकषांवरून सातवाहन कालखंडात महाराष्ट्रात सुवर्णयुग निर्माण झाल्याचे स्पष्ट होते. त्यांच्या काळात निर्माण झालेल्या शेकडो लेण्या या विधानास बळकटी देतात. तसेच आत्तापर्यंत महाराष्ट्रात झालेली उत्खनने सातवाहन काळात समृद्धीच्या दिशेने झालेला हा बदल स्पष्ट करतात. पक्क्या विटांची घरे, सांडपाण्याचे नियोजन, नगरांची संरक्षण व्यवस्था, भिन्न औद्योगिक वसाहती, कलाकुसरीच्या वस्तूंची मोठ्या प्रमाणात उपलब्धी, रोमन वस्तूंची आयात, तेर व भोकरदन येथे मिळालेल्या हस्तिदंती प्रतिकृती हे याचे उपोद्‌बलक पुरावे होत. यावरून उपरोक्त विधानाची सत्यता पटण्यास मदत होते.

**संदर्भ :**


१. देव शां.भा., महाराष्ट्रातील उत्खनने, पुणे १९६२.
२. Mc Crindle J.W. Ancient India as described by Ptolemy, Bombay, 1885.
३. Schoff W. H. The Periplus of the Erythrton Sea, London 1912.
४. हालाची गाहासत्तसई (संपादक) जोगळेकर स.आ.पुणे. १९५४.
५. Watt J.W. Commercial products of India, London - 1898.
६. Wheeler M. Rome Beyond Imperial Frontiers, London - 1924.
७. Warmington E. H. The commere with the Roman Empire and India. Cambridge 1928.
८. पं. मोतीचंद्र, (मराठी अनुवाद) सार्थवाहपथ, दिल्ली.
९. मिराशी वा.वि., सातवाहन नृपति आणि पश्चिमी क्षत्रप यांचा राजकीय इतिहास व शिलालेख व मुंबई १९७९.
१०. मोरवंचीकर रा.श्री., सातवाहनकालीन महाराष्ट्र, पुणे १९९३.
११. मोरवंचीकर रा.श्री. दक्षिणकाशी पैठण, पुणे १९८७.
१२. Bhandarkar R. G., Early History of the Deccan - Varanasi 1975.
१३. Deshpande M.N., Rock-cut-caves of Pitalkhora in Deccan, 'Ancient India vol.15.'
१४. सहस्रबुद्धे पु.ग. महाराष्ट्र संस्कृती, पुणे २००३.
१५. Gopalachiri K., Early History of Andhre Country, Madras 1941.


* * *

# राजघराणी





मनसर (ता. रामटेक, जि. नागपूर) येथील
वाकाटककालीन बालशिवाची मूर्ती.

## वाकाटक

■ डॉ. अ. प्र. जामखेडकर

वाकाटक वंशातील राजांची नावे अनेक साहित्यकृतींशी तसेच अजिंठा येथील चैत्य-विहारांशी व त्यांतील चित्रकलेशी निगडित झालेली असल्याने एक महत्त्वाचे घराणे म्हणून वाकाटक आता जवळ-जवळ सर्वज्ञात झाले आहेत. १८१९ साली अजिंठा येथील लेण्याचा शोध लागला. १८४५ साली मध्य प्रांतात सिवनी येथे प्रवरसेन वाकाटकाच्या ताम्रपटांची उपलब्धी झाली. तदुत्तर डॉ. भाऊ दाजी लाड यांनी अजिंठा येथील गुंफा क्रमांक १६ व १७ मधील शिलालेखांचे वाचन केल्यानंतर या घराण्यातील राजांची नावे लक्षात आली. प्रवरसेन नावाचे दोन राजे असल्याचे लक्षात आले, पुराणांतरीच्या (म्हणजे वायुपुराण, विष्णुपुराण व भागवतपुराण) उल्लेखांमुळे वाकाटक घराण्याचा आदिपुरुष विंध्यशक्ती होता हेही लक्षात आले. अजिंठा येथील लेखात प्रवरसेनाचे नाव आढळल्याने, तसेच त्यानंतर देवसेनाचे नाव

**गेल्या शतकातील मध्यापर्यंत इ.स.३००-६०० चा काळ हा गुप्तकाळ या नावाने ओळखला जात होता. पण नंदिवर्धन शाखेचे ताम्रपट, अंजिठा येथील गुंफांतून मिळालेले हरिषेण याच्या सामंताचे शिलालेख, लेणे क्र. १६,१७,१९,२१ यांमधील त्याचप्रमाणे घटोत्कच लेणे, लेणे १-२ यांतील स्थापत्य व शिल्प आणि मुख्यत्वे मंत्रमुग्ध करणारी चित्रकला यांचे भारतीय स्तरावर मूल्यमापन झाल्यानंतर वाकाटकांच्या भारतीय संस्कृतीच्या पुनरुत्थानातील योगदानाचा प्रत्यय आला. वाकाटकांच्या या सांस्कृतिक योगदानात वाकाटक काही बाबतीत तरी काकणभर सरसच होते, हे**



अजिंठा लेण्यांचे विहंगम दृश्य.

आढळल्याने तो प्रवरसेनाचा पुत्र असावा असा भाऊ दाजींचा समज झाला.

राखालदास बॅनर्जी यांनी आपला गुप्त साम्राज्यावरील सुप्रसिद्ध ग्रंथ लिहिला. त्यात त्यांनी वाकाटकांचा काळ इ.स.चे ८वे शतक असा ठरवला. वाकाटकांच्या ताम्रपटात आढळणाऱ्या वंशावळीत प्रवरसेन द्वितीय याचा उल्लेख ''महाराजाधिराज श्रीदेवगुप्तसुतायां प्रभावती-गुप्तायामुत्पन्नस्य... महाराज-श्रीप्रवरसेनस्य'' असा येतो. हा देवगुप्त ७व्या शतकात होऊन गेलेल्या उत्तर गुप्तांपैकी असल्याने वाकाटक वंश हा ८ व्या शतकात भरभराटीस आला असावा; व त्यामुळे अजिंठा येथील स्थापत्य-शिल्प-चित्रकला हे भारताच्या सुवर्णयुगात मोडणारे नाही, अशा प्रकारची तर्कशृंखला राखालदास बॅनर्जी यांनी मांडली होती. परंतु १९१३ साली पुणे येथील प्रभावतीगुप्तच्या ताम्रपटामुळे वाकाटकांच्या कालनिश्चितीस मोठी मदत झाली. या प्रशस्तिरूप ताम्रपटात प्रभावतीगुप्तच्या निमित्ताने गुप्त-वंशावळी दिली असून ती महाराजाधिराज चंद्रगुप्ताची कुबेरनागा या महाराणीपासून झालेली राजकन्या व वाकाटक रुद्रसेन (द्वितीय) याची महाराणी आणि (द्वितीय) प्रवरसेनाची माता असा स्पष्ट उल्लेख आल्याने रुद्रसेन द्वितीय हा द्वितीय चंद्रगुप्तचा समकालीन; म्हणजे चौथ्या शतकाचा उत्तरार्ध हा त्याचा काळ असावा हे निश्चित झाले.

महामहोपाध्याय मिराशींनी १९४१ च्या सुमारास हैद्राबाद आर्किऑलॉजिकल सिरीज या ग्रंथमालेत महत्त्वाच्या गुंफा क्र.१६,१७ व घटोत्कच गुंफा येथील तीन लेख चिकित्सकपणे संपादित करून प्रसिद्ध केले. या लेखांतील नवीन माहितीमुळे अजिंठा येथील लेण्यांच्या परस्परसंबंधांवरच नाही, तर वाकाटकांच्या दोन शाखा व वत्सगुल्म शाखा ह्यांच्या वंशावळींवर, आणि हरिषेण या अंतिम ज्ञात राजाच्या कारकिर्दीवर मोठाच प्रकाश पडला. घटोत्कच लेण्यातील वराहदेवाच्या वंशावळीतील नऊ पूर्वजांच्या वत्सगुल्म शाखेतील राजांच्या संभाव्य परस्परसंबंधांवर प्रकाश पडला.[१]

नंदिवर्धन शाखेतील द्वितीय प्रवरसेनाचा काळ निश्चित झाल्यानंतर, कालक्रमाच्या संरचनेत त्याचा आजा प्रथम पृथिवीषेण याविषयीचा उल्लेख कळीचा ठरणारा आहे. मूळ पुरुष विंध्यशक्ती याच्यापासून पाचवा असलेल्या पृथिवीषेणाच्या वेळी वाकाटकांचा राज्यारंभ होऊन १०० वर्षे लोटली होती (वर्ष-शतमभिवर्द्धमान-कोशदण्डसाधन-पुत्रपौत्रिणः). प्रवरसेन द्वितीय आणि त्याचा आजा यांमध्ये निदान सत्तर वर्षांचे अंतर असावे, असे अनुमान करून, महामहोपाध्यायांनी पृथिवीषेणाने इ.स.३५०च्या सुमारास राज्यकारभारास सुरुवात केली असावी, असे मत मांडले. पहिल्या पृथिवीषेणाचे एक दान पुनरुज्जीवित केल्याचा उल्लेख आहे. याचा अर्थ द्वितीय प्रवरसेन आणि पहिला पृथिवीषेण या एका पिढीचे अंतर असलेल्या दोन राजांनी, एका पिढीचे अंतर असूनही, एकाच भूप्रदेशावर राज्य केले, असे दिसते.

हरिषेणाचा पिता देवसेन याची राजधानी असलेल्या वत्सगुल्म (आधुनिक वाशीम) नगरापासून जवळच असलेल्या, त्याने बांधलेल्या, सुदर्शन तलावाच्या निर्मितीची माहिती देणारा हिस्सेबारोळा येथील लेख कालक्रमाच्या दृष्टिकोनातून फार महत्त्वाचा आहे. शक



रामटेकजवळचे नगरधन येथील किल्ला.

३८० च्या (म्हणजे इ.स.४५८) या शिलालेखामुळे वाकाटकांच्या उत्तरेतिहासाच्या काळाची चौकट अधिक पक्की झाली. हरिषेणाने कमीतकमी इ.स.४६५ पासून ४७८ पर्यंत निश्चितच राज्य केले असावे. त्याच्या कमकुवत मुलानंतर निदान काही वर्षे म्हणजे इ.स.५०५ पर्यंत तरी त्याच्या नातवाने राज्य केले, असे मानण्यास आधार आहे.

वाकाटकांच्या नंदिवर्धन आणि वत्सगुल्म शाखांच्या नऊ पिढ्यांनी आजच्या महाराष्ट्रावर आणि लगतच्या प्रदेशावर सुमारे २५० वर्षे मोठ्या दिमाखात राज्य केले. त्यांचे गंगा-यमुना खोऱ्यांतील समकालीन आणि अधिक पराक्रमी व्याही गुप्त यांनी भारतीय संस्कृतीच्या इतिहासातील एका दिमाखदार, वैशिष्ट्यपूर्ण, निखळ भारतीय पर्वाला सुरुवात केली. भारतीय साहित्य, संगीत, दृश्यकला, स्थापत्य-शिल्प-चित्रकला, भारतीय नीतिमूल्ये, राजा आणि राजकीय संस्था यांचे आदर्श कोणते, ह्याचे उत्तर एकच; गुप्त राजे आणि त्यांचा सुवर्णकाळ. वाकाटकांनी गुप्त-राजांइतक्या लढाया कदाचित जिंकल्या नसतील, पण सातवाहनांचे उत्तराधिकारी म्हणून व गुप्त ह्यांचे सुवर्णयुगातील बरोबरीचे सहभागी म्हणून मोठी कामगिरी बजावली. म्हणूनच इ.स.२५०-५५० हा कालखंड वाकाटक-गुप्त काळ म्हणूनही ओळखला जातो.

### मूलस्थान

भागवत, विष्णू व वायू या पुराणांत वंशानुचारितामध्ये ठिकठिकाणच्या राजवंशावळी उद्धृत आहेत. एके ठिकाणी सहा वैदिशिक (विदिशावर राज्य करणाऱ्या) राजांची वंशावळ दिली आहे. हे सर्व शेष नागाचे पुत्र आहेत, असे वर्णन येते. शेवटचा राजा नंदियशस्. याच्यानंतर तीन राजे होतील, अशी भविष्यवाणी करण्यात आली आहे. त्याच्या मुलीचा शिशुक नावाचा मुलगा (दौहित्र) पुरिका येथे राज्य करील, तर काञ्चना (पुरी काञ्चनका) येथे विंध्यशक्तीचा पुत्र प्रवीर (अर्थात प्रवरसेन प्रथम) हा साठ वर्षे राज्य करील, आणि त्याचे चार पुत्र राजपद भोगतील, असे म्हटले आहे.

वाकाटकांच्या नंदिवर्धन शाखेतील ताम्रपटात मोठ्या प्रवरसेनाचा पौत्र रुद्रसेन (प्रथम) हा भारशिव कुलात जन्म पावलेल्या गौतमीचा पुत्र असल्याचा उल्लेख गौरवपूर्वक केला आहे. ज्याप्रमाणे गुप्त घराण्यातील पहिल्या चंद्रगुप्तचा पुत्र समुद्रगुप्त याच्या प्रयागप्रशस्तीत लिच्छविदौहित्र असा उल्लेख येत असल्याने लिच्छवी राजकन्या कुमारदेवी हिच्याकडून लिच्छवीचे राज्य अथवा राज्यांश त्यास दायभाग म्हणून मिळाला असावा, त्याचप्रमाणे रुद्रसेनाला विदिशाच्या भारशिवांकडून राज्यांशाची प्राप्ती झाली असावी व अशा रितीने त्यांचे मूलस्थान उत्तरेत असावे, असा पक्ष काही विद्वानांकडून मांडला जातो. त्याला उपोद्बलक म्हणून जी प्रमाणे दिली जातात, ती अशी: वर वर्णिलेला पहिला रुद्रसेन हा समुद्रगुप्तचा समकालीन (सुमारे इ.स.३३० ते ३५०) असल्याने, आर्यावर्तातील ज्या राजांना समुद्रगुप्तने परास्त केले, त्या यादीतला रुद्रदेव हाच असावा. त्यानंतर त्याचा पुत्र पृथिवीषेण राज्यावर आला (सुमारे इ.स.३५० ते ४००). पूर्वीच्या मध्य प्रांतातील जसो संस्थानात नचनेकी तलाई व गंज येथे स्थानिक मांडलिक व्याघ्रदेवाने तलाव बांधल्यावर एका शिळेवर, आपण श्रीपृथिवीषेणाचे पदवंदक असल्याचा उल्लेख केला आहे. हे पूर्ववर्ती राजांचे उल्लेख आर्यावर्ताशी संबंधित असल्याने वाकाटक राजवंशाचे मूळ आर्यावर्तात असल्याचे दिनेशचंद्र सरकार, श्रीराम गोयल, अजयमित्र शास्त्री यांसारख्या विद्वानांचे ठाम मत आहे. त्यांच्या मते उत्तरेत समुद्रगुप्त (इ.स. ३४०-३८५) व चंद्रगुप्त द्वितीय (इ.स.३८५-४१५) यांनी गुप्त साम्राज्याचा पाया पक्का करून आर्यावर्तावर आपले वर्चस्व पक्के केल्यामुळे पृथिवीषेण प्रथम (सुमारे इ.स. ३५०-४००) व विंध्यशक्ती द्वितीय (सुमारे इ.स. ३५५-

४००) यांना अनुक्रमे नंदिवर्धन (रामटेकजवळचे नगरधन) व वत्सगुल्म (वाशीम) येथे आपल्या राजधान्या स्थापाव्या लागल्या.

महामहोपाध्याय मिराशी यांनी या संदर्भात, घराणे सुरुवातीपासून दाक्षिणात्य असावेत यासाठी केलेल्या कारणमीमांसेचा व तत्पुष्ट्यर्थ दिलेल्या पुराव्याचा विचार करणेही अगत्याचे ठरेल. वाकाटक हे मूलतः आर्यावर्तातील मानण्याचे सगळ्यांत महत्त्वाचे कारण म्हणून व्याघ्रदेवाच्या नचना येथील अभिलेखाचा व तदनुषंगाने कांचनका / चनका म्हणजे आधुनिक नचना होय, अशा समीकरणाचा आधार घेतला जातो. व्याघ्रदेवाचा लेख पहिल्या की दुसऱ्या पृथिवीषेणाच्या वेळचा म्हणजेच इ.स.च्या ४थ्या की ५व्या शतकातला, याविषयीची दिलेली प्रमाणे निवळ अक्षरांच्या ठेवणीवर आधारलेली असून याव्यतिरिक्त त्याला अन्य उपोद्बलक पुरावा नाही. या अर्थाने हा वाद जास्त तांत्रिक स्वरूपाचा आहे, हे लक्षात घेता इतर प्रमाणांचा विचार करणे युक्त होईल. वाकाटकांच्या लेखांचे प्राप्तिस्थान पाहता, व्याघ्रसेन या मांडलिकाच्या लेखाचा अपवाद वगळता बाकी सर्व लेख नर्मदेच्या दक्षिणेस आहेत. त्यात उल्लेख असलेली गावेही दक्षिणेतीलच आहेत. द्वितीय पृथिवीषेणाच्या ताम्रपटातील नरेन्द्रसेनाला उद्देशून 'कोसला–मेकला–मालवाधिपतिभिरभ्यर्चितशासनः' असे गौरविले आहे. या बिरुदाचा अर्थ असा की, कोसल, मेकल आणि माळवा येथील राजे ज्याचे सार्वभौमत्व स्वीकारतात असा.हे लक्षात घेता व्याघ्रदेवाला अपेक्षित असलेला अधिराज हा द्वितीय पृथिवीषेणच असावा. द्वितीय प्रवरसेनाच्या काळात त्याची धडक नर्मदेपर्यंत पोहोचलेली होती, हे या संदर्भात लक्षात घेतले पाहिजे. दुसरे प्रमाण म्हणजे अग्रहार म्हणून दिलेल्या गावाला मिळालेल्या विशेष सवलती व बंधने (मर्यादा–परिहार) ही पल्लवांच्या सुरुवातीच्या ताम्रपटातल्या शब्दसंहितेशी मिळतीजुळती आहेत. दाक्षिणात्य राजाला उद्देशून वापरली जाणारी बिरुदे वाकाटक वंशावळीतील आधीच्या राजांना म्हणजे विंध्यशक्ती व प्रवरसेन प्रथम यांना उद्देशून वापरली आहेत. एका वाकाटक गृहपतीचा, अमरावती येथील अभिलेखात आढळलेल्या उल्लेख, वाकाटक हे दाक्षिणात्यच होते, या अभ्युपगमाला पुष्टी देणारा आहे.[२] वरील प्रमाणे लक्षात घेता, वाकाटकांच्या घराण्यातील पहिल्या तीन–चार पिढ्यांतील राजे हे निश्चितपणे आर्यावर्तात राज्य करत होते याबाबतचा ठळक पुरावा मिळेपर्यंत, ते दाक्षिणात्य होते असेच मानणे युक्त ठरेल.

## प्रमुख राजे व राज्यविस्तार

वाकाटक राजवंशाची पूर्वोत्तर कालमर्यादा निश्चित झाल्यानंतर वंशातील लोकोत्तर–चरित राजांच्या आयुष्यामधील महत्त्वाच्या घटनांची नोंद घेणे इष्ट ठरेल. नंदिवर्धन शाखेतील राजांचा विचार केल्यानंतर वत्सगुल्म शाखेचा विचार करू. वाकाटकांच्या घराण्यातील १५ पुरुषांच्या नावांचा शिलालेख–ताम्रपटांतून उल्लेख आलेला आहे. त्यांतील फक्त सात राजे व एक महिषी ह्यांनी ताम्रपत्रे, शिलाशासने प्रसारित केली आहेत. इतरांची माहिती तशाच प्रकारच्या लेखांतून दिलेल्या वंशावळींतून मिळते. अगोदर उल्लेखिल्याप्रमाणे लेखांबरोबरच पुराणातूनही पहिल्या दोन राजांची नावे भविष्यवाणीच्या स्वरूपात उल्लेखिलेली आहेत. वाशीम येथील उत्खननात वाकाटक राजांची काही नाणी सापडली आहेत; त्याचप्रमाणे अलीकडेच खासगी संग्रहांमध्ये त्यांची काही नाणी दृष्टोत्पत्तीस आली आहेत.

## विंध्यशक्ती

हा वाकाटक घराण्याचा संस्थापक. अमात्य वराहदेवाच्या अजंठा (लेणे क्र.१६) येथील शिलालेखात दिलेल्या वंशावळीत (क्षितिपानुपूर्वी) विंध्यशक्तीच्या पराक्रमाचे मोठे काव्यमय वर्णन आले आहे. पुरंदर इंद्र आणि उपेंद्र विष्णू ह्यांच्याप्रमाणे पराक्रमी अशा विंध्यशक्तीने आपल्या शत्रूंना पराजित करून (पुरंदरोपेंद्रसमप्रभावः विनिवारितारिः) राज्य–संपादन केले (स्वबहुवीर्याजित–सर्व्वलोकः) या अशा काव्यमय वर्णनामुळेच आळतेकरांनी तो फक्त शूर सेनापतीच असावा, असा तर्क प्रकट केला. परंतु भारतीय – अभिलेख – कोशात (कॉर्पस्–इन्स्क्रिप्शनम्–इंडिकेरम, खंड–५, १९६०) वाकाटकांचे अभिलेख प्रकाशित झाल्यानंतर सापडलेल्या बिदर व

थाळनेर येथील ताम्रपटसंचात त्याचा उल्लेख वाकाटकांचा मूळपुरुष व धर्ममहाराज (वाकाटकानामादिर्धर्म्ममहाराजः) असा येतो. या बिरुदांवरून तो नक्कीच अभिषिक्त राजा असावा, हे स्पष्ट होते. इतर कुठलेही पूर्ण विश्वासार्ह प्रमाण नसल्यामुळे अजय मित्र शास्त्री इत्यादी विद्वानांनी ते बुंदेल खंड- बघेल खंड या मध्यप्रांतातील भागात, तर आळतेकरांनी ते होशंगाबाद-इटारसी-बेतुल या भागांत प्रस्थापित झाले असावेत, असा कयास केला आहे.

**प्रथम प्रवरसेन**

दोन्ही शाखांच्या वंशानुपूर्वीत याचा हमखास उल्लेख येतो. दक्षिणेतील राजांनी लावलेली हारितीपुत्र, धर्ममहाराज व सम्राट ही बिरुदे त्याला लावली जातात. अग्निष्टोम, आप्तोर्याम, उक्थ्य, षोडशी, अतिरात्र, वाजपेय, बृहस्पतिसव, साद्यस्क्र हे श्रौत आणि चार अश्वमेध याग केल्याचा उल्लेख नंदिवर्धन शाखेच्या ताम्रपटांत आवर्जून असतो. वाकाटक हे विष्णुवृद्धगोत्री ब्राह्मण असून प्रवरसेन हा निश्चितच दीक्षित असला पाहिजे, हे यागांच्या उल्लेखांवरून स्पष्ट होते. 'वाजपेयनेष्ट्वा सम्राट् भवति' या वचनानुसार त्याला सम्राट ही पदवी मिळाली होती. राजसूय व अश्वमेध हे याग करण्याचा अधिकार क्षत्रियांचा होता. पण शुगांनंतर काळात कुठल्याही वैदिक धर्मानुयायी राजास आपले सार्वभौमत्व प्रकट करावयाचे झाल्यास तो अश्वमेध याग करीत असे. पुष्यमित्र शुंगाव्यतिरिक्त इतर प्रसिद्ध उदाहरणे सातकर्णी, भारशिव, समुद्रगुप्त, कुमारगुप्त व त्रैकुटक यांची सांगता येतील. प्रवरसेनाने आपल्या त्या मानाने लांबलचक कारकिर्दीत ४ अश्वमेध याग केले. पुराणे असेही सांगतात की, त्याचे चार पुत्र होते व ते चारही राजे झाले. त्यांपैकी भारशिवांचा दौहित्र गौतमीपुत्र याच्या वंशजांनी नंदिवर्धन शाखा, तर सर्वसेनाच्या पुत्रांनी वत्सगुल्म शाखा प्रस्थापित केली. आणखी दोन शाखा या अनुक्रमे दक्षिण कोसल व आंध्र येथे असाव्यात, असा कयास विद्वानांनी व्यक्त केला असला, तरी अद्यापपर्यंत त्याला भौतिक पुराव्यातून पुष्टी मिळालेली नाही.

गौतमीपुत्राला तो भारशिवांचा दौहित्र असण्याव्यतिरिक्त इतर राजत्व-निदर्शक बिरुद नाही. आणि म्हणूनच प्रवरसेनाची लांबलचक कारकिर्द आटोपण्याच्या अगोदरच तो निवर्तल्यामुळे रुद्रसेन (प्रथम) गादीवर आला असावा, असे विद्वानांचे मत झाले आहे. वाकाटकांचे मूळ आर्यावर्तात होते व समुद्रगुप्तने नायनाट केलेला रुद्रदेव हा रुद्रसेनच असावा, असे काही विद्वानांना वाटते.

पृथिवीषेण (प्रथम) याच्या कारकिर्दीत वाकाटकांनी कुठल्या रितीने राजकीय आघाडी मिळविली हे स्पष्ट नाही. पण या काळापासूनच विदर्भात वाकाटकांचा अंमल प्रस्थापित झाला, असे अ. मि. शास्त्रींना वाटते. पृथिवीषेणाच्या काळात वाकाटकांचे राज्य निश्चितपणे स्थिरस्थावर झाले होते, हे त्याच्या बिरुदावरून स्पष्ट होते. धर्ममहाराज या पदवीस योग्य अशा गुणांबरोबरच, गेल्या शतकाभराच्या वाटचालीत वृद्धिंगत झालेल्या सेना-दण्ड-कोश या साधनसंपत्तीबरोबरच पुत्रपौत्रांनी भरलेले घर असलेला राजा, असे त्याचे वर्णन आले आहे. त्याच्या आध्यात्मिक गुणांमध्ये सत्य, आर्जव, कारुण्य, शौर्य, विक्रम, नय, विनय, माहात्म्य, धीमत्त्व, पात्रगत-भक्तित्व, मनोनैर्मल्य यांचा समावेश आहे; आणि तो अत्यन्तमाहेश्वर आहे, असे वर्णन आले आहे.

पृथिवीषेणानंतर द्वितीय रुद्रसेन सत्तेवर आला. रुद्रसेनाच्या येण्याने अनेक बदल घडले. पहिला बदल म्हणजे प्रथमच एका वाकाटक राजाने आपल्याला जे राजवैभव प्राप्त झाले आहे, ते चक्रधारी देवाच्या कृपेने आहे, असे जाहीरपणे सांगितले. त्याच्या प्राप्त झालेल्या, पाचव्या वर्षी दिलेल्या ताम्रपटातूनही त्याचा पंथ पाञ्चरात्र असून त्याने शेषावर योगनिद्रेत पहुडलेल्या मोंदस्वामींच्या प्रेरणेने सात्वतचरणाच्या दोन मठांना (अधिवासद्वय) चार गावे दिल्याचा उल्लेख आहे. भगवद्भक्तीचा वसा त्याने आपल्या परमभागवत सासऱ्याकडून म्हणजे द्वितीय चंद्रगुप्तकडून घेतला, हे स्पष्ट आहे. त्याच्या पत्नीच्या, प्रभावतीगुप्ता हिच्या, दोन ताम्रपटांवरून तिचीही भगवान विष्णूविषयाची आत्यंतिक भक्ती स्पष्ट होते. या दोघांची ही भक्ती त्यांच्या प्रपौत्रापर्यंत म्हणजे पृथिवीषेण (द्वितीय) याच्यापर्यंत पोहोचली.

रुद्रसेनाच्या अकाली निधनामुळे महाराणी प्रभावतिगुप्ता हिला बालयुवराज दिवाकरसेनाची आई म्हणून राज्यकारभार

पाहावा लागला. असे समजले जाते की, युवराज दिवाकरसेनसुद्धा राज्यारोहण करू शकला नसावा आणि म्हणून दामोदरसेन राज्यावर आला, आणि त्यानंतर प्रवरसेन (द्वितीय). दामोदरसेनाने किती वर्षे राज्य केले, हे निश्चितपणे माहीत नाही; पण प्रभावतिगुप्ता ही दोन पराक्रमी राजांची आई असल्याचे प्रवरसेनाच्या तेविसाव्या राज्य-वर्षात तिने दिलेल्या ताम्रपत्रांच्या संचावरील मुद्रेवरून कळते.

सर्वाधिक दाने दिल्याची नोंद असणारा राजा म्हणून प्रवरसेन (द्वितीय) याचे नाव अभ्यासकांच्या निश्चितपणे लक्षात राहील.[३] वेगळा स्पष्ट उल्लेख नसला आणि ती भूमीची अथवा गावांची दाने फक्त धर्म, आयु आणि बल यांच्या वृद्धीसाठी, क्वचित ठिकाणी श्राद्धप्रसंगी अथवा माता-पितरांच्या पुण्यप्राप्तीसाठी जरी असली, तरी मुख्यत्वे वेदविद्यापारंगतांनाच दिलेली आहेत. क्वचित प्रसंगी गावांचाही उल्लेख अग्रहार म्हणून येतो. स्वतः प्रवरसेन कुळपरंपरेप्रमाणे अत्यन्तस्वामिमहाभैरवभक्त व परममाहेश्वर आहे; पण पिता व माता यांची अत्यंत भगवद्‌भक्ती लक्षात घेऊन त्याने शैव आचार्यांबरोबरच वैष्णव आचार्यांनाही दाने दिलेली दिसतात. या निमित्ताने महत्त्वाची गोष्ट लक्षात येते ती म्हणजे त्याचा राज्यविस्तार. त्याचे पराक्रमी अश्व निश्चितच नर्मदाथडीपर्यंत पोहोचले होते. त्याने दिलेल्या ताम्रपटांच्या प्राप्तिस्थानांवरून व विशेषकरून त्यांतील राष्ट्रनामे व ग्रामनामे यांवरून त्याच्या राज्यात मुख्यत्वे वैनगंगा व वरदा (आधुनिक वर्धा) नद्यांची खोरी, तसेच लगतचा, सध्याच्या मध्य प्रदेशचा भाग (बैतुल, बालाघाट, छिंदवाडा) असावा असे दिसते. हरिहर ठोसर यांच्या मते त्याने वत्सगुल्म शाखेतील आपल्या समकालीन चुलत घराण्यातील राजावर मात करून त्यातील प्रदेशावरही ताबा मिळवला असावा.

त्याचा पुत्र नरेन्द्रसेन याचा एकही ताम्रपट अद्यापि मिळालेला नाही. मात्र पृथिवीषेण (द्वितीय) या त्याच्या पुत्राच्या ताम्रपटातून कुन्तल राजकन्या अज्झितभट्टारिका ही त्याची महाराणी होती, हे लक्षात येते. त्याहूनही महत्त्वाचा उल्लेख म्हणजे त्याच्या अधिक पराक्रमी दायादाने (कदाचित चुलत घराण्यातील नातलगाने) त्याचे परंपरागत राज्यवैभव हिरावून घेतल्याचा उल्लेख (गुणवद्दा यादापहृतवंशश्रियः) यावरून लक्षात येते की, या चुलत घराण्यातील दोन पातींमध्ये चुरस व चढाओढ होती व तिचेच पर्यवसान एकमेकांच्या प्रदेशांवर हुकूमत चालवण्यात होत असावे.

या चुरशीत, निदान काही काळ तरी, पृथिवीषेण द्वितीय याने वरचष्मा ठेवला असावा. तो आपल्या ताम्रपटात स्वतः वंशश्रीचा दोनदा उद्धार केल्याचे (द्विमग्नवंशोद्धर्तुः) म्हणतो. त्यांपैकी एकदा तरी त्याने राजपुत्र या नात्याने राज्यावर आलेल्या संकटाचा परिहार केला असावा. दुसरी नोंद घेण्याजोगी बाब म्हणजे 'कोसला-मेकला-मालवाभ्यर्चित- शासनः' असा नरेन्द्रसेनाचा उल्लेख. याचा अर्थ हे प्रदेश जवळजवळ शेवटपर्यंत पृथिवीषेणाच्याच ताब्यात असावेत. त्याच्या समकालीन वत्सगुल्म शाखेच्या हरिषेणाचे कुन्तल, अवन्ती, कोसल, त्रिकूट, लाट आणि आंध्र या प्रदेशांवर वर्चस्व होते. यावरून असे दिसते की, पृथिवीषेणानंतर नंदिवर्धन शाखेची सत्ता वत्सगुल्म शाखेच्या ताब्यात गेली. यानंतर वत्सगुल्म शाखेचा विचार करणे इष्ट ठरेल.

### विन्ध्यशक्ती (द्वितीय) व नंतर

वत्सगुल्म शाखेतील सर्वसेन (प्रथम) याचे अभिलेख अद्याप मिळालेले नाहीत. त्याचा पुत्र विन्ध्यशक्ती (द्वितीय) अथवा विन्ध्यसेन याचा ताम्रपट-संच वाशीम येथे मिळाला आहे. त्यात नांदीकट उत्तर-मार्गातील ताकालपखोपकाजवळील आकासपद्द हे गाव पाच ब्राह्मणांना अग्रहार म्हणून दिले, असा उल्लेख आहे. हा ताम्रपट-संच विन्ध्यशक्तीने आपल्या राज्यकालाच्या ३७व्या वर्षी दिला. त्यानंतर दोन राजांनंतर देवसेन राज्यावर आला. इंडिया ऑफिस लायब्ररीत त्याच्या ताम्रपट-संचाचा काही भाग जपून ठेवला आहे. देवसेनाचा हिस्सेबोराळा येथील सुदर्शन तलावाच्या बांधणीचा लेख संशोधकांना खरोखरीच उपयुक्त ठरणारा आहे. लेखाचे महत्त्व असे की, वाडा येथील सुकेतुवर्म्याच्या शिलालेखानंतर ह्यात प्रथमच शकसंवत् वापरलेला आढळतो. सुदर्शन तळे तटाक शके ३८० म्हणजे इ.स.४५८ मध्ये बांधले गेले.

हरिषेण देवसेनाचा पुत्र. त्याच्या थाळनेर ताम्रपट-संचावरून खानदेश वाकाटकांच्या ताब्यात, त्याच्या

राज्यारोहणाच्या चौथ्या वर्षात, निश्चितपणे होता हे कळते. अल्पावधीत त्याने फार मोठ्या भूप्रदेशावर आपले वर्चस्व प्रस्थापित केले असावे, हे त्याचा मंत्री वराहदेव याच्या लेणे क्र.१६ मधील शिलालेखावरून कळते. दक्षिण महाराष्ट्र व उत्तर कर्नाटक (कुन्तल), माळवा (अवन्ती), दक्षिण गुजरात (लाट), कोकणची किनारपट्टी व लगतचा देशावरचा भाग (त्रिकूट), छत्तीसगड (कोसल) आणि ओरिसाचा मध्य प्रदेशालगतचा भाग (कलिंग) एवढ्या विस्तृत प्रदेशावर त्याचा अंमल होता. नरेन्द्रसेनाचे वर्चस्व कोसल, मेकला व मालव जनपदे मानत असत. त्याच्याच जवळच्या नातलगाने त्याच्यावर मात केल्याचा मागे आलेला उल्लेख अर्थगर्भ आहे. असेही दिसते की, पृथिवीषेणाने त्यास निकराचा विरोध केला; पण शेवटी हरिषेणाचाच विजय झाला व तो एका मोठ्या साम्राज्याचा धनी झाला.

पूर्वापर-तोयनिधींवर वर्चस्व प्रस्थापित करणाऱ्या सम्राटाची अखेरही तितकीच अनपेक्षितपणे झाली असावी, असे दिसते. स्कंदगुप्तनंतर (म्हणजे इ.स.४६२ च्या सुमारास) गुप्त साम्राज्यास तडे गेले आणि त्यांची सत्ता खिळखिळी झाली, तसेच अराजकताही माजली. त्याचाच परिणाम म्हणून आर्यावर्तात लहान-लहान प्रादेशिक सत्ता उदयास आल्या. ह्या काळात हरिषेणाने, जवळजवळ पाव शतक, वाकाटक साम्राज्याचा झेंडा उंचावला. हरिषेणानंतर काय झाले, हा तर्काचाच विषय आहे. इतिहासाकडे वळून पाहिले, तर असे दिसते की महाराष्ट्राच्या सत्तेचा काटा दक्षिणेकडे झुकलेला दिसतो. थोडा काळ महिष्मतीच्या कलचुरी कृष्णदेवाने सत्ता आपल्याकडे ठेवली. पण चालुक्यांनी त्रैकूटक, मौर्य, कलचुरी यांना नमवून धारवाड जिल्ह्यातील बदामीला सत्तेच्या केंद्रस्थानी आणले.[४] देवगिरीच्या यादवांच्या उत्थानापर्यंत महाराष्ट्रात गोदावरी-वैनगंगा खोऱ्यात सत्ता स्थिर राहिली नाही.

वाकाटकांच्या अशा दूरवर परिणाम असणाऱ्या लयासंबंधीचा खल विद्वानांनी करून आपापल्या परीने त्याची मीमांसा केली आहे. प्रथम म. म. मिराशी व त्यानंतर वॉल्टर स्पिंक यांनी या यादवीला ऋषिक व अश्मक राजे कारणीभूत असून दशकुमार-चरितातील शेवटच्या उच्छ्वासाच्या आधारे त्यावर प्रकाश टाकण्याचा प्रयत्न केला आहे. दंडीचा काळ इ.स.चे ६ वे-७ वे शतक, आणि तो मूळचा दक्षिणापथातला, असे मानले, तर राजकीय घडामोडीची ही घटना त्याने एखाद्या आख्यायिकेप्रमाणे ऐकली असावी व ती कथानिबद्ध केली असावी, असे मिराशींना वाटते. तर अजिंठा येथील वाकाटककालीन २५ गुंफांच्या घडणीच्या स्थापत्यशैलीतील साधर्म्यावरून, तेथील काम कायमचे बंद पडण्याअगोदर एकदा त्यात निश्चितच खंड पडला होता. हा खंड अश्मक आणि ऋषीक या दोन सामंतांच्या यादवीचा निदर्शक होता. त्यानंतर (इ.स.४७५ च्या सुमारास) अश्मकांनी या क्षेत्राचा ताबा घेतल्यानंतर त्यांनी हाती घेतलेल्या गुंफांचे (लेणी क्र. २२-२३) काम परत वेगाने सुरू होऊन लेणी क्र.१-२ (ही लेणी हरिषेणाची असावीत असा कयास आहे) व्यतिरिक्त इतर लेण्यांचे काम थंडावले. स्पिंक यांच्या मते इ.स. ४७७ मध्ये हरिषेणाचे निधन झाल्यानंतर ते हळूहळू थंडावले व इ.स.४९० नंतर पूर्णतः थांबले. नंतर अश्मकांचाही तसाच विलय झाला असावा. कारण दंडीच्या दशकुमारचरिताप्रमाणे विदर्भराजाचा अश्मकांविरुद्ध जय होतो व कथा सुखान्त होते. पण इतिहास साक्षी आहे की, वाकाटकांचे असे पुनरुत्थान झाले असे मानले, तरी ते क्षणजीवीच असले पाहिजे. हरिषेणाच्या उत्तराधिकाऱ्याचे नाव सर्वसेनच असावे. वाकाटक सम्राट (सार्वभौम) सर्वसेन याने आपल्याला राज्याभिषेक केल्याचे कदंब विष्णुवर्मन् याने नोंदवले आहे. अ. मि. शास्त्री यांच्या मते हा सर्वसेन हरिषेणाचा पितामह सर्वसेन द्वितीय असावा. कदाचित तो सर्वसेन तृतीयही असू शकेल.

### वाकाटकांचे सांस्कृतिक योगदान

सातवाहनांची महाराष्ट्रातील सत्ता तिसऱ्या शतकात संपुष्टात आल्यानंतर त्यांचे उत्तराधिकारी म्हणून नाव घेण्याजोगे कुठले राजघराणे पुढे आले असेल तर ते वाकाटकांचेच. यात दुमत होण्याचे कारण नाही. सोपाऱ्यापासून आंध्रातील अमरावतीपर्यंत आणि उत्तरेत माळव्यापासून उत्तर कर्नाटकापर्यंत पसरलेल्या सातवाहन साम्राज्याशी तुलना केली, तर वाकाटकांच्या दोन शाखा त्यांना तोडीस तोड आहेत, असे म्हणावे लागेल. हरिषेणाचा

काळ हा त्यांचा परमोत्कर्षबिंदू आहे. फक्त साम्राज्य विस्ताराच्याच बाबतीत नाही तर सांस्कृतिक योगदानातही वाकाटकांचा कालखंड तुलनेने कमी असला तरी, तितकाच भक्कम आहे असे दिसते. दृक्श्रुतिगम्य (audiovisual) कलांचा प्रत्यक्ष पुरावा अपेक्षिणे अयोग्य ठरेल. तथापि साहित्य आणि दृक्कलांबाबत (visual arts) दोन्ही घराण्यांचे योगदान एकाचे दुसऱ्यास सम असेच म्हटले पाहिजे.

दख्खनमधील लयनस्थापत्य हा भारतीय स्थापत्यातील अपूर्व स्थापत्यवर्ग आहे. बारकाईने विचार करता सातवाहनांचा लयननिर्मितीतील सहभाग पूर्णार्थाने नव्हता. बरीच लेणी लोकसहभागाने तर काही क्षत्रपांच्या यजमानपणात निर्माण झाली. कृष्ण सातवाहनाच्या अमात्याचा विहार, गौतमीपुत्राचे लेणे यांबरोबरच पितळखोरे आणि कान्हेरी येथील लेणी दूरान्वयाने का होईना सातवाहनांशी संबंधित आहेत. प्रत्यक्ष यजमानपण नसले, तरी या सर्व उपक्रमांना राजसत्तेचे पाठबळ व त्यासाठी योग्य वातावरण सातवाहन सत्तेनेच निर्माण केले, यात शंका नाही. तितकेच महत्त्वाचे योगदान साहित्याच्या क्षेत्रात आहे. गाथाकोश व बृहत्कथा ही विश्ववाङ्मयातील अपूर्व साहित्यलेणी आहेत. भारतातील धार्मिक वाङ्मय हे विश्वातील अत्यंत प्रेरक अशा वाङ्मयांत वरचे स्थान पटकावणारे आहे. कमीत कमी पाच हजार वर्षांची अद्‌भुत परंपरा असलेले वेद, गेली दोन हजार वर्षे आशिया खंडाला आध्यात्मिक प्रेरणा देणारी बौद्ध तिपिटके, अहिंसेचा आणि समतेचा संदेश देणारा महावीराचा जिनधर्म. परंतु या सकस धार्मिक पार्श्वभूमीवर तिला आपाततः छेद देणारा पूर्णतः लौकिक असा वाङ्मयप्रकार महाराष्ट्रात निर्माण व्हावा, हे अपूर्व आहे. त्याचे यजमानपद (patronage) सातवाहनांना जाते.[५] गाथाकोश हा शृंगारपर गाथांचा संग्रह ही तर हाल सातवाहनाचीच संपादकीय कृती आहे, हे परंपराही सांगते. गाथाकोशाचा तर एवढा प्रभाव आहे की, अलंकारशास्त्राचे गंभीर ग्रंथ अगदी १४-१५ व्या शतकापर्यंत त्यातील उदाहरणे घेतात.

या पार्श्वभूमीवर वाकाटकांच्या यजमानत्वाखाली निर्माण झालेले दृश्यकलेचे नमुने व साहित्यकृती यांचा आढावा घेणे योग्य ठरेल. वाकाटकांच्या लयनस्थापत्याचा सगळ्यांत महत्त्वाचा नमुना म्हणजे अजिंठा येथील चैत्य आणि विहार. ते बहरलेल्या फुलत्या-फळत्या वृक्षलतांप्रमाणे आकर्षित करून दृष्टी खिळवून ठेवतात. असे वाटते की, जणू दृश्य कलांचा वसंतच येथे अवतरला आहे. सातवाहन काळातील विहार तर अगदी साध्या व काहीशा सोवळ्या स्थापत्याचा आविष्कार आहे, असे म्हणायला हरकत नाही. आणि सोबतची चैत्यगृहे त्यांना साजेशीच देवगृहांचे पावित्र्य जपणारी स्तूप-पूजेची मंदिरे आहेत, ज्यांचे वातावरण भिक्षूंच्या त्रिपिटकांच्या पठणाने भरून जात असणार. पण त्याचबरोबर ती साध्याभोळ्या उपासकांसाठी भगवान बुद्धांच्या आयुष्यातील प्रसंगांचे, तसेच त्याच्या जन्मांतरीच्या कथांचे निरूपण करण्यासाठीची व्यासपीठेही होती. त्यामुळेच इथल्या भिंतींवर बुद्धचरिताचे तसेच जातक-कथांचे चित्रणही आढळते.

वाकाटक काळातील विहार या कर्मठ विहारांपेक्षा अगदी वेगळे असून अभिलेखात आलेल्या त्यांच्या वर्णनावरूनही बौद्ध धर्माच्या एकूण विचारपद्धतीत व तत्त्वज्ञानात फरक होत असल्याचे जाणवते. चैत्यगृहांप्रमाणे आता विहारही बुद्धचरिताच्या आणि जातक-कथांच्या प्रसंगांनी चितारलेले आढळतात. बदल असा झाला की, वेगळे चैत्यगृह असतानाही विहारामध्ये स्तूप कोरण्याची आणि भिक्षूंसाठीचा वेगळा देव्हारा (देवगृह) निर्माण करण्याची प्रथा सुरू झाली. याची स्पष्ट जाणीव प्रथम नाशिक येथील नहपान व गौतमीपुत्र लेण्यांत लेणे क्र.३ व १० यांमधून झाली. अजिंठा येथील वाकाटककालीन पुरावा फारच बोलका आहे. लेणे क्र. ११ मध्ये गाभाऱ्यात प्रदक्षिणा घालता येईल अशी स्तूपाकृती कोरण्यात आली होती व नंतर तिचे सिंहासनाधिष्ठित धर्मचक्रप्रवर्तन-मुद्रेतील बुद्धमूर्तीत रूपांतर करण्यात आले. या नवीन विहारांच्या तलविन्यासात झालेला मुख्य बदल म्हणजे पुढे आडवा व्हरांडा, त्यापाठी तेवढाच रुंद सभामंडप, मंडपात जाण्यासाठी चैत्यगृहाप्रमाणे तीन दरवाजे, दोन्ही पाखांना मागील बाजूस भिक्षूंचे कक्ष, त्यापाठी गर्भगृह व त्यात शिरण्यासाठी अंतराल असे त्याचे स्वरूप होय. कालपरत्वे व गरजेनुसार या आराखड्यात नंतर बदल झालेले



अजिंठा येथील लेणी क्र. १९.

दिसतात. अशा विहारांचे शिलालेखांमध्ये आलेले वर्णन अर्थपूर्णच आहे. एकाश्मक मंडपाला आतमध्ये चैत्यमंदिर आहे (निवेशिताभ्यन्त चैत्यमंदिरम्) असा उल्लेख आढळतो. अजिंठा येथील १,२,१६ व १७ या क्रमांकांची लेणी पाहिली, तर तेथील भिंतींवर जुन्या चैत्यगृहांच्या भिंतींप्रमाणेच बुद्धचरितातील ठळक प्रसंग व निवडक जातक कथा व जोडीला अवदाने यांचे चित्रण मोठ्या प्रमाणावर केलेले आढळते. या चित्रांच्या जोडीला यक्ष-यक्षी आणि बोधिसत्त्वांच्या प्रतिमांसाठीचे कोनाडे किंवा देवकुळ्याही आढळतात. जर भिक्षुनिवासात अशा प्रकारचे बदल आढळले, तर चैत्यगृहात आणखी एक मोठा बदल झालेला अजिंठा येथील लेणी क्र. १९ व २६ यांचे काळजीपूर्वक निरीक्षण केल्यास दिसेल. चैत्यगृहासमोरील आवाराला समोर संरक्षक भिंत असून, गोपुरासारखे व द्वारपालयुक्त प्रवेशद्वार दिसते. आत मुखमंडपामागील दर्शनी भागावर भगवान बुद्धाच्या मूर्ती, यक्ष व बोधिसत्त्वांच्या प्रतिमा कोरलेल्या आहेत. देऊळ आतून दुमजली असले, तरी ते एखाद्या प्रासादाप्रमाणे तीन मजली असावे, असा भास होतो. आत जाण्यासाठी तीन दरवाजे आणि/अथवा स्तूपासमोर आयताकृती सभामंडप आणि मागे लंबवर्तुळाकार प्रदक्षिणापथ ही पूर्वीच्या चैत्यगृहांची वैशिष्ट्ये टिकून राहिलेली आढळतात. महत्त्वाचा फरक असा की, स्तूपाच्या पुढील अंगावर, उभी अथवा सिंहासनाधिष्ठित भगवान बुद्धाची मूर्ती आढळते. खांबांच्या मथळ्यावर गजारूढ किंवा व्यालारूढ उपासक युगुलाबरोबर सिद्ध, गंधर्व, विद्याधर आणि गीत-वादन-नर्तनाने अधिक दिमाखदार अशा सोपचार पूजेचे चित्रणही आढळते. अवलोकितेश्वर, मैत्रेय यांच्या उपासनेबरोबरच बुद्धाच्या उपसनापद्धतीत झालेल्या या दृश्य बदलांमागे श्रावकयानाकडून बोधिसत्त्वयानाकडे होणारे बौद्ध धर्माचे

परिवर्तन स्पष्टपणे दिसते. धर्माला प्राप्त झालेला नवा सामाजिक संदर्भही लक्षात येतो. तो म्हणजे महायानात प्राप्त झालेल्या गृहस्थाश्रम व राजधर्म यांबाबतच्या कल्पना. आता त्रिपिटकांपेक्षा त्यावरच्या संस्कृत भाषेतील विभाषेला म्हणजे टीका वाङ्मयाला व संस्कृतात रचलेल्या तत्त्वज्ञानविषयक ग्रंथांना आलेले महत्त्व. बौद्ध धर्माचे अनुयायित्व सामान्य माणसापासून दूर जाऊन त्याला उच्चवर्णीयांत आणि सधन समाजात प्राप्त झालेली प्रतिष्ठा यांत दिसून येते. इ.स.च्या ३००-६०० या काळातील बौद्ध लेण्यांचे अध्ययन केले, तर आश्रयदाते हे राजे-रजवाडे, अमात्य व अनेक प्रसंगी भिक्षु-भिक्षुणी आहेत. मात्र त्यांत सामान्य स्त्रियांचा व बहुजनांचा अभावच आढळतो. तत्त्वज्ञानातील प्रगतीबरोबर बौद्ध धर्म बहुजनांपासून दूर गेला असे दिसते.

वऱ्हाड, खानदेश आणि मराठवाडा येथील बौद्ध स्थापत्यांची झाडीतील म्हणजेच पूर्व विदर्भातील लयनस्थापत्याशी तुलना केली, तर काही वेगळेपण सहजच दिसून येते. या संदर्भात नागपूर विद्यापीठाने उजेडात आणलेल्या चंढाळा (जिल्हा नागपूर) येथील जंगलातील सातवाहनकालीन गुंफांचे उदाहरण देता येईल. शिस्टसारख्या ठिसूळ दगडात कोरलेल्या या गुंफांचे छप्पर एक प्रस्तर टाकून करण्यात आले आहे व बांधकामाची ही पद्धत एखाद्या बृहदश्मयुगीन चूलतव्याच्या छपराप्रमाणे आहे. बृहदश्मयुगातील आणखी एक परंपरा म्हणजे गुंफा खोदून त्यात पूर्वजांचे अस्थिअवशेष कुंभात जपून त्यांची पूजा करणे. आजही आदिवासी लोक शिवाशी अथवा देवीशी सात्मीकरण झालेल्या स्थानिक देवतांची अशा गुंफांतून (भिवकुंड, सातभोकी, ता.मांढळ, जिल्हा नागपूर) पूजा करतात. याचाच अर्थ असा की, नागरीकरणाच्या प्रक्रियेत आदिवासींच्या काही सांस्कृतिक प्रथा ह्या हिंदू जीवनाचा भाग बनल्या.

वऱ्हाडातील काही उदाहरणे वगळता (उदा. बौद्ध गुंफा सालबर्डी, जिल्हा अमरावती; पातूर गुंफा, पातूर, जिल्हा वाशीम) विदर्भात वाकाटककाळात आढळून येणाऱ्या गुंफांचे स्थापत्य पश्चिम महाराष्ट्रात प्रचलित असलेल्या गुंफांच्या स्थापत्यापेक्षा वेगळे आहे. या प्राचीन (वाकाटक आणि नंतरच्या काळातील) गुफांचे वैशिष्ट्य असे की, त्यात दर्शनी भाग, खांब, भिंती, द्वारशाखा यांच्यावरील अलंकारणाचा ठळकपणे नजरेत भरणारा अभाव आणि खांब आणि त्यांच्यामुळे विन्यासात येणारे बदल यांचा पूर्ण अभाव. वेगळ्या शब्दांत ज्या प्रकारची लयनस्थापत्याची शैली पश्चिम महाराष्ट्रात प्रथम बौद्ध लयनस्थापत्यात, व नंतर शैव वैष्णव, शाक्त व जैन स्थापत्यांत विकसित झालेली दिसते, त्याचा यत्किंचितही प्रभाव या गुंफास्थापत्यावर आढळत नाही. उदाहरणच द्यायचे झाल्यास विझांसन येथील बौद्ध व नरसिंह गुंफा यांचे देता येईल. सातवाहन काळापर्यंत ज्याची प्राचीनता जाऊ शकते अशा या लेण्यात दर्शनी भाग पूर्णपणे अनलंकृत, सभामंडपात अथवा अंतरालात स्तंभांचा अथवा अर्धस्तंभांचा पूर्ण अभाव, द्वारांवरील द्वारशाखा पूर्णपणे अनलंकृत, तसेच गाभाऱ्यातील मूर्तींच्या आसपास कुठल्याही अलंकरणाचा अभाव, मुख्य छत मात्र कमानीच्या आकाराचे. नरसिंहाच्या गुंफेत आतमध्ये लहानसा गाभारा व दर्शनी भागावर केवल नरसिंह आहे.


अजिंठा येथील लेणी क्र. २६.



नागरा, जि. गोंदिया, येथे विटांनी बांधलेले देऊळ.

गौराळा या दुसऱ्या वाकाटककालीन गुंफेचे उदाहरण द्यायचे झाल्यास गुहेचा दर्शनी भाग पूर्णपणे ओबडधोबड असून द्वाराच्या उजव्या बाजूस नरसिंह तर डाव्या बाजूस गणेश व तळाशी शिवलिंग, तर आत भिंती व छत पूर्णपणे अनलंकृत, गुहेत तिन्ही भिंतींना लागून आठ मूर्ती ठेवता येतील असा चौथरा. आज उजव्या आणि मागल्या भिंतींवर वैष्णव (त्रिविक्रम, शेषशायी) मूर्तींचे चित्रण. मूळ मूर्ती पाषाणखंडात घडवून चौथऱ्याच्या खाचेत बसवल्या होत्या, त्या आज नाहीत. भिंतीवरील मूर्ती राष्ट्रकूटकालीन असल्या, तरी दर्शनी भागावरील शिल्पे व चौथऱ्याच्या वेदीवरील कीचकांच्या मूर्ती वाकाटककालीन असल्यामुळे गुंफा वाकाटककालीनच ठरते. तीच परिस्थिती देऊळवाड्याच्या शैव गुंफांची आहे. तेथील एका गुंफेचे छत काहीसे घुमटाकार आहे आणि एका गुंफेत शंखलिपीत लिहिलेला मजकूर आहे. या दोन्ही ठिकाणच्या गुंफांत स्तंभ अथवा अलंकरण नाही. भटाळा येथील शिवलिंग व नरसिंहमूर्ती ११.५ मीटर आकाराच्या गाभाऱ्यात आहेत. मात्र येथील सुट्या सूर्यमूर्तीवरून व नरसिंहप्रतिमेवरून त्या वाकाटककालीन असल्याचे लक्षात येते.

विटांनी किंवा घडीव पाषाणांनी बांधलेल्या देवळांचा उल्लेख या संदर्भात करणे आवश्यक ठरेल. विवेकानंदपूर (जिल्हा चंद्रपूर), वाशीम, नागरा (जिल्हा गोंदिया), मांढळ (जिल्हा नागपूर) येथे शासनाच्या पुरातत्त्व विभागाने केलेल्या उत्खननात विटांच्या देवळांचे पुरावे सापडले. मांढळ येथे सापडलेल्या देवळांचा विन्यास दोन प्रकारचा; १) सांची येथील मंदिर १९ प्रमाणे समोर गाभाऱ्याच्या विस्ताराचा अरुंद मंडप आणि आत चौरस गाभारा. २) उत्तर-दक्षिणेस पायऱ्या असलेल्या चौथऱ्यावर गाभाऱ्यासमोर उघडा लाकडी मंडप असावा. नागरा येथील मंदिर त्यामानाने अधिक लक्षणीय आहे. सुमारे २४ × ४६ मीटर आकाराच्या, प्रवेश-निर्गम (resses & projection) असलेल्या चौथऱ्याला पूर्वेस अंगातील पायऱ्या वरच्या मंडपाकडे व गाभाऱ्याकडे घेऊन जातात; पायऱ्यांलगत दोन्ही अंगांना एकेक अशा दोन देवळ्या व मागल्या भागात विटांचे शिवदेवालय असा विन्यास. देवळात त्रिभागाच्याऐवजी ब्रह्म (चौरसतळ) व रुद्रभाग (पिंडाकार वरचा भाग) असलेले मोठे शिवलिंग व गाभाऱ्याच्या उत्तरेस वारिमार्ग व भूतप्रणाल या सर्व वैशिष्ट्यांवरून निश्चित वाकाटक काळात असलेले देवालय. या सर्व वर्णनावरून स्पष्ट होते की भुभरा येथील पाषाणातील मंदिर याच प्रारुपावरून बेतले असावे, हे स्पष्ट आहे. या सर्वांवर कड म्हणजे मन्सर येथील विटांत बांधलेले प्रवरेश्वराचे देवालय. प्रचंड विस्ताराच्या या देवालयाच्या वेदीचा भागच आता शिल्लक आहे. वेदिकेच्या भागात शिवलिंग असलेल्या अनेक देवळ्या आहेत. विटांच्या घुमटातील पाकळीसारख्या कमानीवरून समकालीन तांत्रिक

प्रगतीची कल्पना येते. प्रवरसेन द्वितीय किंवा त्याच्याही अगोदर बांधल्या गेलेल्या या इष्टका देवालयावरून समकालीन समृद्धीची कल्पना करता येते.


मन्सर.

### वाकाटक काळाचे मूल्यमापन

सातवाहनांपाठोपाठ वाकाटकांना महाराष्ट्राच्या राजकीयदृष्ट्या व सांस्कृतिक जडणघडणीच्या संदर्भात कळीचे स्थान आहे असे म्हणता येईल. या संदर्भात इतिहासकारांनी त्यांचे केलेले मूल्यमापन लक्षात घेणे योग्य ठरेल. इ.स.च्या ३ ऱ्या शतकापासून ते ६ व्या शतकापर्यंतचा काळ भारतेतिहासातील सुवर्णयुग मानले जाते. ते अनेक अंगभूत वैशिष्ट्यांमुळे. अशोकानंतरचे सगळ्यांत मोठे साम्राज्य समुद्रगुप्त व चंद्रगुप्त या पितापुत्रांनी स्थापन केले; कुमारगुप्तचा ४० वर्षांचा राज्यकाळ सुसंपन्नता, शांतता व त्यास कारणीभूत असलेला एकछत्री अंमल; यांमुळे अभिजात साहित्याच्या आणि कलांच्या वाढीस कारणीभूत झाला, असे समजले जाते. परकीयांची भारतीय राजकारणावरील व अर्थकारणावरील पकड झुगारून एतद्देशीय परंपरांचे नव्या स्वरूपात पुनः स्थापन झाले, ते याच काळात. त्यामुळे शक-कुषाणांच्या काळात असलेल्या समृद्धीत निखळ भारतीयत्व नव्हते. त्यामुळेच शकारी विक्रमादित्याचे बिरुद चंद्रगुप्त द्वितीय याने घेतले, पौराणिक वैष्णव-शैव धर्मांची तत्त्वज्ञानात्मक बैठक पक्की झाली ती गुप्तकाळात. महाभारत-रामायणाचे अखिल भारतीय शेवटचे संस्करण व पुराणांच्या संहिता पक्क्या झाल्या त्या याच काळात. वैदिक धर्माने कात टाकून नव्याने लोकधर्माचा समावेश, असे उदार आणि सर्वांना भावेल असे रूप घेतले ते याच काळात. शिल्पकला, चित्रकला, स्थापत्य, संगीत, नृत्य, नाट्य या कला पुराणकथांच्या धार्मिक जोखडातून बाहेर पडून अधिक लौकिक व मुख्यत्वे मानवी भावनांना जोपासणाऱ्या अशा झाल्या. याचे उत्तम उदाहरण कालिदासाचे रघुवंश हे महाकाव्य आणि शाकुंतल हे नाटक म्हणून सांगता येईल. कला या भोग्यवस्तू किंवा निखळ रंजनासाठी नसून मानवी भावनांचे उन्नयन करण्यासाठी असतात अशा ध्येयाला चालना मिळाली ती याच काळात. मानवी व्यवहारातील नीति-अनीती, सुंदर-कुरूप यांविषयीच्या कल्पनांना निश्चित आकार मिळाला, तोही याच काळात. आणि त्यामुळे विक्रमादित्याच्या आदर्शाला प्राप्त झालेल्या मूर्त आविष्कारामुळे अनेक परवर्ती राजांनी विक्रमादित्य ही पदवी मोठ्या आनंदाने लावून मिरवली.

गेल्या शतकातील मध्यापर्यंत इ.स.३००-६०० चा काळ हा गुप्तकाळ या नावाने ओळखला जात होता. पण नंदिवर्धन शाखेचे ताम्रपट, अंजिठा येथील गुंफांतून मिळालेले हरिषेण याच्या सामंताचे शिलालेख, लेणे क्र. १६,१७,१९,२१ यांमधील त्याचप्रमाणे घटोत्कच लेणे, लेणे १-२ यांतील स्थापत्य व शिल्प आणि मुख्यत्वे मंत्रमुग्ध करणारी चित्रकला यांचे भारतीय स्तरावर मूल्यमापन झाल्यानंतर वाकाटकांच्या भारतीय संस्कृतीच्या पुनरुत्थानातील योगदानाचा प्रत्यय आला. गुप्तांच्या या सांस्कृतिक योगदानात वाकाटक काही बाबतीत तरी काकणभर सरसच होते, हे चित्रकलेतूनच नाही तर त्यांच्या प्रासादस्थापत्यावरूनही सहज लक्षात येते. रामटेकची पाषाणात बांधलेली ६ मंदिरे, मन्सर-नागऱ्याची विटांची मंदिरे यांना भव्यतेच्या बाबतीत, गुप्तांच्या आज शिल्लक असलेल्या स्थापत्यात, तरी तोड नाही.

आत्तापर्यंत विवेचन केले ते विद्वानातील एका पक्षाचे. भारतीय इतिहासाच्या या कालखंडाचा नागरीकरणाच्या, खरे म्हणजे निर्नागरीकरणाच्या, संदर्भात आणि विदर्भ प्रदेशात राज्यसंस्थेचा विकास कसा झाला असेल, या संदर्भात इतिहासकारांनी एक वेगळा विचार मांडला आहे. या विचारधारेनुसार खरे तर गुप्तकाळात निर्नागरीकरणाच्या प्रक्रियेला वेग मिळाला. त्याला मुख्यत्वे स्कंदगुप्तच्या गुप्तसाम्राज्याच्या स्थिरतेला मिळालेला धक्का, परिणामी ढासळलेली अर्थव्यवस्था आणि दीर्घकालीन दुष्काळ यांमुळे मुद्राविष्कृत आर्थिक व्यवहाराचा झालेला अपकर्ष यांमुळे सामाजिक व आर्थिक जीवनावर झालेला विपरीत परिणाम कारणीभूत ठरला. असे निष्कर्ष काढण्यात आले आहेत.

या प्रकारे इतिहासावर भाष्य करणाऱ्यांच्या मते कुषाण-सातवाहन काळ (इ.स.पूर्व १ले ते इ.स.चे ३ रे शतक) हाच कालखंड खरे सुवर्णयुग आहे. पण जास्त सबुरीने विचार केला, तर लक्षात येईल की, कुषाण काळात भारतीयीकरणाच्या सुरू झालेल्या प्रक्रियांचा परिपाक गुप्तकाळात झालेला आहे. आणि तो निश्चितच अपकर्षाचा नाही. वर दर्शविल्याप्रमाणे पुरातत्त्वीय, म्हणजे अभिलेखांच्या, नाणकशास्त्राच्या अथवा गवेषण-उत्खननाच्या संदर्भातील अभ्यासाच्या कक्षा अधिक खोलात जाऊन अभ्यास करण्याच्या दृष्टीने वाढल्यानंतर त्याबाबत अधिक खात्रीलायक निष्कर्ष पुरातत्त्वाच्या व इतिहासाच्या अभ्यासकांना काढता येतील.

## टिपा :

१. वराहदेवाच्या घटोत्कच लेण्यातील लेखात त्याने आपली ९ पिढ्यांची वंशावळ दिली आहे. त्यातील यज्ञपती, देव आणि सोम हे वल्लूर येथील प्रसिद्ध ब्राह्मण कुळातील असून सोम ब्राह्मणाच्या क्षत्रीय पत्नीपासून झालेला रवि हा 'नरेंद्र-चिन्ह' असलेला, म्हणजे राजा होता. त्याच्यापासून पाचवा हस्तिभोज, वराहदेवाचा पिता, हरिषेणाच्या पित्याचा अमात्य होता. महामहोपाध्यायांना ही समान चालणारी व उद्‌धृत वंशावळ अर्थगर्भ वाटते. हस्तिभोजापासून रवीपर्यंतचे हे पूर्वज अनुक्रमे हरिषेणापासून प्रथम सर्वसेनापर्यंतचे 'मौल' म्हणजे वंशपरंपरेने अमात्य असावेत; व त्यापूर्वीच्या सोम व देव या पूर्वजांचा प्रथम प्रवरसेन व प्रथम विंध्यशक्ती यांच्याबरोबर तत्सम संबंध असावा, असे वाटते. ही बाबसुद्धा विंध्यशक्तीपासून सर्व राजे दाक्षिणात्य असल्याचे सूचित करते असे महामहोपाध्याय मानतात.

२. तर महामहोपाध्यायांची खातरी आहे की चंद्रपूर जिल्ह्यातील देवटेक येथे सापडलेला शिलालेख हा त्याने तिथे उभारलेल्या शिवमंदिराच्या संदर्भातीलच आहे. शिलालेखाच्या आशयाकडे नीट लक्ष दिल्यास हा शिलालेख शास्त्री समजतात त्याप्रमाणे द्वितीय रुद्रसेनाचा नसून प्रथम रुद्रसेनाचाच आहे, हे पटेल. एरवी ताम्रपटात पूर्वजांचा उल्लेख महाराज या पदवीने केला जातो; तसाच तो प्रथम रुद्रसेनाचाही आहे. पण या शिलालेखात रुद्रसेनाने स्वतःचा उल्लेख फक्त राजा असाच केला आहे.

३. कमीतकमी १८ दानपत्रे.

४. अ.मि. शास्त्री सांगतात की नलांनी आणि आपल्याला वाकाटकांचे उत्तराधिकारी मानणाऱ्या विष्णुकुंडिन् यांनी वाकाटकांच्या साम्राज्याचा ताबा मिळवला असावा. विदर्भातील मुंडपुत्र आणि खानदेशातील कुंभकर्ण यांनी आपले बस्तान त्या-त्या प्रदेशांत बसवले असावे; पण ते चालुक्य येईपर्यंतच.

५. गुणाढ्याने वड्डु-कहा (संस्कृत बृहत्कथा) अत्यंत नाइलाजाने रचली. स्वतःच्या संस्कृत भाषेच्या प्रावीण्यामुळे व व्याकरणप्रभुत्वाच्या दुरभिमानामुळे सहा महिन्यांत राजाला संस्कृत भाषेतील संभाषणात वाकबगार करीन, अन्यथा संस्कृत भाषेचा कायमचा त्याग करीन अशी प्रतिज्ञा पूर्ण न केल्यामुळे त्याला वनवास पत्करावा लागला. वनवासी पिशाचांच्या सहवासात राहून त्याने पैशाची भाषेत अद्‌भुतरम्य अशा वड्डुकहेची रचना केली. पण आपल्या रसिक, नागर बांधवांची वाहवा मिळणार नाही या बोचणीने निराश होऊन भूर्जपत्रावर लिहिलेली आपली कृती अग्निसात करण्याचे त्याने ठरवले. प्रत्येक पान वाचून अग्नीला साश्रुनयनांनी अर्पण करताना त्याला पाहून पशुपक्ष्यांची मने हेलावली. राजाला हे कळल्यानंतर त्याने त्याला उरलेली कथा वाचविण्यास भाग पाडले. सुवर्णकाळात वड्डुकहेची प्राकृतात आणि संस्कृतात भाषांतरे झाली. यातून पुढे तिची जगभरात रूपांतरे झाली, हे अभ्यासकांना माहीत आहेच.

* * *





ऐहोळ येथील चालुक्यकालीन दुर्ग.

# चालुक्य व राष्ट्रकूट

■ डॉ. शोभना गोखले

**महाराष्ट्राच्या इतिहासामध्ये राष्ट्रकूट वंशाने अतिशय महत्त्वाचे योगदान दिले आहे. या वंशाने इ. स. ७५३ ते ९७५ या कालखंडामध्ये राज्य केले. महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासामध्ये राष्ट्रकूट वंशाने सर्वांगीण उत्कर्षाचा काळ प्रस्थापित केला. या वंशाचा संस्थापक दन्तिदुर्ग हा होता. त्यानंतर राष्ट्रकूट वंशामध्ये पराक्रमी आणि यशस्वी राजांची जणू मालिकाच निर्माण झाली. दन्तिदुर्गानंतर त्याचा चुलता प्रथम कृष्ण गादीवर आला आणि त्याने कर्नाटकमध्ये आपले बस्तान बसविले. कृष्ण महान योद्धा होता, तसा तो रसिक, कलाप्रेमीही होता. वेरूळचे विश्वविख्यात कैलास लेणे हे त्याच्या सौंदर्यदृष्टीची साक्ष पटवितेच.**

चालुक्य वंशाने इ.स.५४३ ते इ.स.७५३ या काळामध्ये म्हणजे जवळजवळ दोनशे वर्षांपेक्षा जास्त काळ राज्य केले. चालुक्य वंशाच्या ताम्रपटांमधून या वंशाची चालक्य, चालिक्य, चुलुकिय इत्यादी नावे आली आहेत. विजापूर जिल्ह्यातील बदामी ही त्यांची राजधानी. या वंशातील राजे स्वतःला हारितिपुत्र म्हणत आणि त्यांचे गोत्र मानण्य होते. काही ताम्रपटांतून कार्तिकेयाची स्तुती आहे, तर काही अभिलेखांतून वराहाला अभिवादन केल्याचे दिसून येते. ताम्रपटांचे लांच्छन वराहाचे असल्याचे दिसून येते. या वंशातील राजांनी श्रीपृथ्वीवल्लभ, सत्याश्रय अशी बिरुदे घेतल्याचे दिसून येते.

चालुक्यवंशामध्ये जयसिंह वल्लभ नावाचा राजा गादीवर आला. त्यानंतर रणराग. रणरागानंतर प्रथम पुलकेशी. या पुलकेशीस वातापी नगरीचा पती म्हटले आहे. त्यानंतर त्याचा पुत्र कीर्तिवर्मन या राजाने नळ मौर्य आणि कदंब यांचा पाडाव केला. कीर्तिवर्म्यानंतर त्याचा भाऊ मंगलेश गादीवर आला. या वंशातील राजे पराक्रमी असून ताम्रपटातून त्यांच्या वंशावळी आणि पराक्रम यांची नोंद आहे. सर्वांत पराक्रमी राजा म्हणजे दुसरा पुलकेशी. या राजाच्या ऐहोळे येथील प्रशस्तीवरून



बदामी येथील त्रिविक्रम शिल्प.



ऐहोळ येथील मंदिर.

त्याच्या अलौकिक पराक्रमाची कल्पना येते. त्याने दक्षिणेकडील वनवासी अळूप कोकण या प्रदेशावर अधिसत्ता प्रस्थापित केली. लाट, मालव, गुर्जर यांचा पाडाव केला. विदर्भही जिंकला. कलिंग, कोसल, पिष्टपूर हे देशही जिंकले. कांचीचा पूर्ण पराभव करून पल्लव, चोळ यांचा पराभव केला. या सर्व पराक्रमांचे वर्णन ऐहोळे येथील प्रशस्तीमध्ये आहे. हर्षाचा पूर्ण पराभव करून त्यास नर्मदेच्या पार हाकलून दिले आणि तो अखिल दक्षिणभारताचा सम्राट बनला. नव्व्याण्णव हजार गण्यति क्षेत्र असलेला त्रिमहाराष्ट्र पूर्णपणे त्याच्या अंकित होता. पुलकेशीने स्वतःस 'सत्याश्रय' हा किताबही घेतला.

हा अभिलेख ऐतिहासिकदृष्ट्या अतिशय महत्त्वाचा आहे. चालुक्यवंशातील सर्व राजांची नावे त्यामध्ये असून त्यांच्या पराक्रमाचे वर्णनही त्यांत आहे. या प्रशस्तीमध्ये संपूर्ण वंशावळ असल्यामुळे ऐतिहासिकदृष्ट्या आणि चालुक्य घराण्याच्या इतिहासामध्ये तो एक अत्यंत महत्त्वाचा दुवा ठरला आहे.

प्रस्तुत अभिलेख आणखीही अनेक गोष्टींमुळे महत्त्वाचा आहे. त्या लेखामध्ये कालनिर्देश आहे. लेखाच्या चोविसाव्या ओळीमध्ये शताब्द शक ५५६ म्हणजे इ. स. ६३४-३५ असा उल्लेख आहे. याशिवाय भारतीय युद्धानंतर ३७३५ वर्षे असाही उल्लेख त्या लेखात आहे.

ही प्रशस्ती रविकीर्ती या कवीने रचली आणि शेवटी कालिदास आणि भारवी यांची कीर्ती ज्या काव्यात सामावली आहे, त्या काव्याचा कर्ता रविकीर्ती याचा विजय असो. सत्याश्रय पुलकेशीच्या कृपेने बुद्धिमान रविकीर्ती याने जिनेन्द्राचे मंदिर बांधले. मागील सर्व उल्लेख अभ्यासनीय आहेत. त्यांमध्ये कालोल्लेख हा सर्वांत महत्त्वाचा ऐतिहासिक पुरावा आहे. त्यातील भारतीय युद्धकाळाचा उल्लेख हा भारतीय युद्धाचा काल ठरविण्यास अतिशय महत्त्वाचा पुरावा आहे. कालिदास आणि भारवी यांचे उल्लेख त्या कवींचा काल ठरविण्यास अतिशय महत्त्वाचा दुवा ठरतात, यात शंका नाही आणि शेवटी पुलकेशीने रविकीर्तीला जिनेन्द्राचे मंदिर बांधण्यास परवानगी दिली, यामध्ये राजाची उदार मनोवृत्ती दिसून येते.

इ. स. ६४१ च्या सुमारास य्वॉन च्वांग या चिनी प्रवाशाने महाराष्ट्राचे सुंदर वर्णन लिहून ठेवले आहे. महाराष्ट्राचे हवामान, जमीन, पिके यांचे वर्णन आहे. महाराष्ट्राचे क्षेत्रफळ ८३४ मैल असल्याचे त्याने नमूद केले आहे. येथील लोक उंच, काटक, साधे आणि प्रामाणिक आहेत. विद्या आणि कला यांचे भोक्ते आहेत. इत्यादी तपशीलवार वर्णन य्वॉन च्वांगने केले आहे.

पुलकेशीनंतर त्याचा पुत्र पहिला विक्रमादित्य गादीवर आला. परंतु त्याच्या काळामध्ये त्याच्या राज्याचा काही भाग पल्लव राजांनी बळकावला. पहिल्या विक्रमादित्यानंतर त्याचा पुत्र विनयादित्य गादीवर आला. त्याने आपले राज्य सावरले आणि स्वतःस पृथ्वीवल्लभ, सत्याश्रय आदी बिरुदे घेतली. सिंहलदेशाच्या राजाने त्याच्याकडे आश्रय घेतला होता. विनयादित्याने आपला पाळीध्वज परत मिळविला, असाही उल्लेख आपणास ताम्रपटात आढळून येतो. यानंतरचा राजा विजयादित्य याने पट्टडकलचे संगमेश्वराचे सुंदर देऊळ बांधले. या वंशातील शेवटचा राजा दुसरा कीर्तिवर्मन याच्या काळातील म्हणजेच शके ६७९ इ.स. ७५७ वक्कलेरी ताम्रपटात चालुक्य राजांच्या पराक्रमांचे वर्णन आढळते. विनयादित्याने चोळ, पांड्य, केरळ, पारसिक सैंहल यांचा पराभव केला आणि पाळीध्वज गंगापार नेला. दुसऱ्या विक्रमादित्याने कांचीच्या पल्लवराजाचा पराभव केला. चालुक्य राजे आणि राष्ट्रकूट राजे यांच्यामध्ये कायम सत्तास्पर्धा होती. राष्ट्रकूट राजा दंतिदुर्ग मृत्यू पावल्यानंतर द्वितीय कीर्तिवर्म्याने पाय पसरवण्यास सुरुवात केली. भीमा नदी ही चालुक्य आणि राष्ट्रकूट राज्यांची सीमा होती. कीर्तिवर्म्याने भीमा नदीच्या आसपासचा परिसर जिंकून तेथील भांडारविट्टगे म्हणजे आत्ताचे भांडारकवठे दान दिले. कीर्तिवर्म्याचे हे तात्कालिक वर्चस्व राष्ट्रकूट राजा पहिला कृष्ण याने मोडून काढले.

चालुक्य राजांनी आपले राज्य गुजरातपर्यंत वाढविले होते. दक्षिणेकडे पल्लवांशी लढाई आणि सत्तास्पर्धा सतत चालू होती. द्वितीय विक्रमादित्याच्या काळात अरबांच्या आक्रमणामुळे चालुक्यांचे राज्य पुनः डळमळीत झाले. याच वेळी गुजरात जिंकण्यास, विक्रमादित्याला राष्ट्रकूट दन्तिदुर्गाने मदत केली. आणि विक्रमादित्याचा मुलगा द्वितीय कीर्तिवर्मन गादीवर आला. पण त्याच सुमारास दन्तिदुर्गाने आपले राज्य प्रस्थापित केले. राष्ट्रकूट राजा दन्तिदुर्गाने आपले साम्राज्य निर्माण केले, हे सामानगड अभिलेखावरून स्पष्ट होते.

चालुक्य राजे विद्येचे आणि कलेचे भोक्ते होते. बदामीचे शिल्प आणि पहडकलचे विजयेश्वराचे मंदिर ही त्याची साक्षात उदाहरणे आहेत.

## राष्ट्रकूट वंश

महाराष्ट्राच्या इतिहासामध्ये राष्ट्रकूट वंशाने अतिशय महत्त्वाचे योगदान दिले आहे. या वंशाने इ.स. ७५३ ते ९७५ या कालखंडामध्ये राज्य केले. महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासामध्ये राष्ट्रकूट वंशाने सर्वांगीण उत्कर्षाचा काळ प्रस्थापित केला. या वंशाचा संस्थापक दन्तिदुर्ग हा होता. त्यांचे मूलस्थान मराठवाड्यातील लातूर (लट्टलौर) होते. या राजाचे फक्त दोनच लेख उपलब्ध आहेत. एक सामानगढ ताम्रपट (इ.स. ७५४) आणि दुसरा शिलालेख वेरूळच्या दशावतार गुंफेमध्ये आहे. या पराक्रमी राजाने चालुक्यांची सत्ता झुगारून दिली. दन्तिदुर्ग हा प्रथम चालुक्य राजा विक्रमादित्य याचा मांडलिक होता. दन्तिदुर्गाने चालुक्य राजा विक्रमादित्याला निरनिराळ्या स्वाऱ्यांमध्ये साथ दिली. विक्रमादित्याच्या मृत्यूनंतर आपले बस्तान बसविण्यास त्याने सुरुवात केली. चालुक्य वंशातील कीर्तिवर्म्याचा पराभव करून त्याने स्वतःला महाराजाधिराज परमेश्वर परमभट्टारक असे बिरुदही घेतले. इ.स. ७५३ च्या अखेरीस सर्व महाराष्ट्र दन्तिदुर्गाच्या आधिपत्याखाली आला.

इ.स. ७५८ च्या आसपास दन्तिदुर्ग मृत्युमुखी पडला. त्यानंतर राष्ट्रकूट वंशामध्ये पराक्रमी आणि यशस्वी राजांची जणू मालिकाच निर्माण झाली. दन्तिदुर्गानंतर त्याचा चुलता प्रथम कृष्ण गादीवर आला आणि त्याने कर्नाटकमध्ये आपले बस्तान बसविले. कृष्ण महान योद्धा होता, तसा तो रसिक, कलाप्रेमीही होता. वेरूळचे विश्वविख्यात कैलास लेणे हे त्याच्या सौंदर्यदृष्टीची साक्ष पटवितेच. या राजाने जगतंग आणि अकालवर्ष अशी बिरुदे घेतली होती. इ.स. ७७३ मध्ये प्रथम कृष्ण मृत्यू पावल्यानंतर त्याचा मुलगा दुसरा गोविंद गादीवर आला. परंतु तो राजविलासी असल्यामुळे त्याने सर्व राज्यकारभार आपला धाकटा भाऊ ध्रुव याच्यावर सोपविला. ध्रुव हा महापराक्रमी राजा होता.



वेरूळचे कैलास लेणे.

याच वेळी राजपुतान्यामधील गुर्जरप्रतिहार यांनी उत्तरेमध्ये कनोज काबीज केले. वत्सराज हा गुर्जर प्रतिहार राजा आणि बंगालचा पाल वंशाचा राजा धर्मपाल यांच्यामध्ये सत्तेची स्पर्धा सतत चालू होती. कनोज बळकाविणे हेच दोन्ही राजसत्तांचे ध्येय होते. राष्ट्रकूट राजा ध्रुव याने या संधीचा पुरेपूर फायदा घेतला. आपला पराक्रमी पुत्र गोविंद आणि भाऊ इंद्र यांची नेमणूक ध्रुवाने नर्मदेच्या परिसररक्षणासाठी केली. आणि ध्रुव स्वतः कनोजवर स्वारी करण्यास गेला. त्याची गाठ गुर्जरप्रतिहार राजा वत्सराज याच्या सैन्याशी झाशीजवळ पडली आणि दोन्ही सैन्यांत तुंबळ युद्ध होऊन वत्सराजाचा दारुण पराभव झाला. त्यानंतर ध्रुवाने आपली दृष्टी पाल राजा धर्मपाल याच्याकडे वळविली. गंगा-यमुना ह्या नद्यांच्या खोऱ्यांत सीमारेषांवर पाल राजाचे सैन्य दबा धरून होते. ध्रुवाने त्यांचाही पराभव केला. ध्रुवाने उत्तरेकडील कनोजच्या आसपासचा प्रदेश जिंकला. धर्मपालाचा पराभव केला. दक्षिणेकडे गंगा, पल्लव यांना पुरते नमविले. गुर्जर-प्रतिहार, पाल आणि राष्ट्रकूट यांतील ही तिरंगी लढत इतिहासामध्ये एक वेगळाच राजकीय संग्राम ठरली. ध्रुवाच्या यशाची ही खरोखरच चढती कमान होती. ह्या काळातच देशामध्ये राष्ट्रकूटांची सत्ता सार्वभौम ठरली. ध्रुवानंतर त्याचा महापराक्रमी पुत्र तृतीय गोविंद गादीवर आला. ध्रुवाने आपल्या मुलखामध्ये युवराज म्हणून गोविंदाची निवड केली होती. ध्रुवानंतर तिसरा गोविंद राज्यावर आला आणि त्याने आपला भाऊ स्तंभ याच्या साहाय्याने आपली सत्ता दक्षिणेकडे बळकट केली. गंगवाडीच्या दातिंग शिवमाराला राजबंदी केले. पल्लवराजा वेंगीचा चतुर्थ विष्णुवर्धन, या सर्वांना आपले मांडलिक केल्यावर त्याने आपली दृष्टी उत्तरेकडे वळविली. गुर्जरप्रतिहार, पाल राजे आदि उत्तरेकडील राजांना गोविंदाने आपले अंकित केले.

नेसरी ताम्रपटामध्ये तृतीय गोविंदाच्या पराक्रमाचे मोठे सुंदर वर्णन आहे. विशेषतः त्याने पालराजाच्या ध्वजावरील तारेचे चित्र फाडले. या वर्णनावरून गोविंदाने पाळ राजांना जिंकले हे स्पष्ट होते. या राजकीय पराक्रमाबरोबरच पश्चिम महाराष्ट्र आणि बंगाल यांमध्ये एक सांस्कृतिक दुवाही निर्माण झाला. याचे उत्तम उदाहरण आपल्याला कान्हेरी येथील शिलालेखात दिसते. त्या लेखामध्ये अमोघवर्षाचा मांडलिक शिलाहार राजा पुल्लशक्ती याच्या कारकिर्दीमध्ये

गौडदेशाहून अविन्धाकर नावाचा एक भिक्षू आला होता. त्याने ध्यान करण्यासाठी एक गुहा दान केली असा उल्लेख त्या शिलालेखात आहे. कान्हेरीला गुंफा क्र.३ मध्ये दीपतारेचे एक सुंदर शिल्प कोरले आहे. पाल राजे वज्रयान धर्माचे पुरस्कर्ते होते. तृतीय गोविंदाने धर्मपालाचा पराभव केला, ही पराक्रमगाथा तृतीय गोविंदाच्या नेसरी ताम्रपटामध्ये आपणास पाहावयास मिळते. राजाने ज्या राजांचा पराभव केला, त्यांचे ध्वज कसे हरण केले; याचे वर्णन त्यामध्ये आहे. धर्मपालाच्या ध्वजावर तारा या देवतेचे चित्र होते. ते तृतीय गोविंदाने फाडले असे सुंदर वर्णन त्या ताम्रपटामध्ये आहे. राष्ट्रकूट काळात वज्रायन पंथ पश्चिम महाराष्ट्रात कसा आला, हे कान्हेरीचा शिलालेख आणि तारेचे शिल्प या दोन्ही गोष्टींमुळे सूचित होते. राष्ट्रकूटांनी पालराजाचा पराभव केला या घटनेमुळे बंगाल आणि महाराष्ट्र यांच्यामध्ये एक सांस्कृतिक दुवा निर्माण झाला. कान्हेरीच्या शिलालेखात गौड देशाचा उल्लेख आणि त्या काळातील तारेचे शिल्प यांवरून पश्चिम महाराष्ट्रामध्ये याच काळामध्ये वज्रयान पंथ बंगालमधून आला, असे निश्चितपणे म्हणता येईल. तृतीय गोविंद हा महापराक्रमी राजकारणधुरंधर राष्ट्रकूट राजा होता. उत्तरेकडे बनारस, कनोज, गुजरात, दक्षिणेकडे कन्याकुमारीपर्यंत त्याने आपला दरारा बसविला होता. याच्या काळातच राष्ट्रकूट राज्य वैभवाच्या शिखरावर पोहोचले होते.

तृतीय गोविंदानंतर त्याचा अल्पवयीन अमोघवर्ष गादीवर आला. त्या वेळी राष्ट्रकूट साम्राज्य थोडे डळमळीत झाले होते. त्याच्या मांडलिकांनी बंड पुकारले होते. राष्ट्रकूट साम्राज्याचा दक्षिणेकडील गंगाशी जवळजवळ वीस वर्षे वैर होते. परंतु अमोघवर्षाने स्वतःची मुलगी चन्द्रोबलब्बे हिचा विवाह गंगराजा बुतुग याच्याशी लावून मैत्रीचे संबंध प्रस्थापित केले. अमोघवर्षाने राज्यामध्ये शांतता प्रस्थापित केली होती. तो कलेचा आणि वाङ्मयाचा पुरस्कर्ता होता. प्रजेच्या कल्याणासाठी तो सदैव झटत असे. राज्यामध्ये रोगराई पसरली असता कोल्हापूरच्या महालक्ष्मीला त्याने आपली करंगळी अर्पण केली होती. यानंतर अमोघवर्षाचा पुत्र द्वितीय कृष्ण गादीवर आला. त्याने चोळ राजाशी वैवाहिक संबंध जोडले. चालुक्यांशी सतत लढाया चालूच होत्या. द्वितीय कृष्णाचा पुत्र तृतीय इंद्र हा गादीवर आला, तो महापराक्रमी होता. गुर्जर प्रतिहारांना त्याने पूर्णपणे काबूत ठेवले.



महायोगी शिव.



रावणानुग्रह.

तृतीय इंद्रानंतर नाव घेण्यासारखी कारकिर्द झाली, ती तृतीय कृष्णाची हा राजा कर्तबगार होता. तो इ. स. ९३९ मध्ये राज्यावर आला आपला मेव्हणा बुतुग

याच्या साहाय्याने कृष्णाने चोळराजा राजादित्य याचा पराभव करून तोंडमंडल आपल्या राज्यामध्ये समाविष्ट करून घेतले. हा राजा अतिशय शूर आणि महापराक्रमी होता आणि दक्षिणभारताचा अधिपती होता. अभिलेखात त्याला **'सकल-दक्षिण दिगाधिपती'** असे नामाभिधान दिले आहे. रामेश्वरपर्यंत सर्व प्रदेश त्याने काबीज केला होता. राष्ट्रकूट राजांनी उत्तरेस गुर्जर-प्रतिहार, पूर्वीय चालुक्य, चोळ राजे ह्यांना आपल्या आधिपत्याखाली आणले होते.

मराठवाड्यातील कंधार या गावी सापडलेला तृतीय कृष्णाचा शिलालेख हा अतिशय महत्त्वाचा आहे. कंधार हे गाव कदाचित त्याची दुय्यम राजधानी असावी. शिलालेखात कंधारमधील जो तपशील दिला आहे, त्यावरून कंधार तृतीय कृष्णाची दुय्यम राजधानी असण्याची शक्यता नाकारता येत नाही. तृतीय कृष्णाने कंधारला गोज्जिग सोमनाथ, लुडिगेश्वर, छल्लेश्वर, बंकेश्वर ही शिवाची मंदिरे बांधली. आजही कंधारला या देवळांचे नंदी अस्तित्वात आहेत. याशिवाय क्षेत्रपाल आणि विनायक यांची ही देवळे बांधली. राजवाडा, सर्वलोकाश्रय मंडप, प्रधानराजविलासिनी, त्राटक, कामदेवाचे देऊळ, गावामध्ये जगत्तुंग तलाव, बाजारपेठ इत्यादी शिलालेखातील उल्लेख लक्षणीय आहेत. उन्हाळ्यात उपयोगी पडाव्यात यासाठी राजाने पाणपोया बांधल्या होत्या. थंडीपासून जनतेचे संरक्षण व्हावे यासाठी शेकोट्या बांधल्या होत्या. कंधारजवळील नांदीनदीवर विद्यास्थान बांधले होते आणि तेथील विद्यार्थ्यांच्या जेवणाची सोय ही केली होती.

राष्ट्रकूट राजवंशाच्या कालखंडाचा विचार केला, तर हा काल (इ.७५३-९७५) अतिशय भरभराटीचा असल्याचे दिसून येते. दक्षिणभारतावर त्यांची सार्वभौम सत्ता होती. त्यांचे ताम्रपट आणि शिलालेख यांवरून त्यांच्या राजकीय घडामोडींचा बोध होता. ध्रुव, तृतीय गोविंद आणि तृतीय इंद्र या राजांनी गुर्जर-प्रतिहार ह्यांना सदैव काबूत ठेवले होते. याच काळात उत्तरेकडील सांस्कृतिक गोष्टींचाही लाभ महाराष्ट्राला झाला, ही गोष्ट लक्षणीय आहे. तृतीय गोविंदाचा उत्तर भारतातील आणि दक्षिण भारतातील पराक्रम यांचे वर्णन त्याच्या धारूर आणि झेरिका ह्या ताम्रपटांत फार सुंदरतेने केले आहे. जांबगाव ताम्रपटामध्ये तृतीय इंद्राच्या पराक्रमाने वर्णन आहे. ताम्रपटामध्ये त्याची तुलना वामनाशी करून त्याने बाण राजांचा कसा पराभव केला, याचे वर्णन आहे. कनोजचा पराभव केल्यावर त्यास कीर्तिनारायण, रट्टकंदर्प, राजमार्तंड, गेयमुख ही शौर्यवाचक अभिधाने ताम्रपटात दिलेली आढळतात. या राजाने संजाणमंडलावर सध्याचे संजाण येथे अरब गव्हर्नरची नेमणूक केली होती. त्याच्या चिंचणी ताम्रपटामध्ये ताजिकवंशाच्या मधुमती (मुहम्मद) सुगतिप याची नेमणूक केली होती, असा उल्लेख आहे. तृतीय कृष्णाने आपले साम्राज्य रामेश्वरापर्यंत नेले होते.

राष्ट्रकूट राजांनी आपल्या पराक्रमाने उत्तरभारतापासून दक्षिणेकडे रामेश्वरापर्यंत अधिसत्ता गाजविली आणि सांस्कृतिक जीवनही समृद्ध केले. वेरूळचे कैलास लेणे हे त्याचे अलौकिक उदाहरण आहे.

तृतीय इंद्राने विद्वानांनाही आश्रय दिल्याचे दिसून येते. त्याच्या जांबगाव ताम्रपटामध्ये उपमा, उत्प्रेक्षा, श्लेष यांचा आढळ होतो. त्या ताम्रपटातील मजकुराचा रचयिता त्रिविक्रम भट्ट होता. हाच त्रिविक्रमभट्ट 'नलचंपू' काव्याचा कर्ता होता. त्यामधील विदर्भाच्या भौगोलिक तपशिलावरून त्रिविक्रमभट्ट हा विदर्भाचा रहिवासी असावा, असे श्रेष्ठ संशोधक मिराशी यांनी सिद्ध केले आहे. तृतीय इंद्राच्या वाजिरखेडा ताम्रपटाचा रचयिता राजशेखर हा होता. हा राजशेखर 'काव्यमीमांसा' या सुप्रसिद्ध ग्रंथाचा रचयिता होता, असे कोलते यांनी नमूद केले आहे.

सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे राष्ट्रकूट राजे उदारमतवादी होते. मसुदीनेही त्यांचा उल्लेख आदरपूर्वक केला आहे. राष्ट्रकूट राजांनी मुसलमानांना मशिदी बांधण्यास परवानगी दिली. संजाणमंडलाचा गव्हर्नर अरब मधुमती सुगतिप होता; ही गोष्ट लक्षात घेण्यासारखी आहे, यात शंका नाही.

* * *





# यादव

■ डॉ. अलका रानडे

इसवी सनाच्या आठव्या शतकाच्या मध्यास दक्षिणेची सार्वभौम सत्ता वातापीच्या (बदामीच्या) चालुक्यांकडून राष्टकूट राजवंशाकडे आली. नंतरच्या काळात कल्याणीच्या चालुक्यांनी राष्ट्रकूटांकडून सत्ता हस्तगत केली. चालुक्य द्वितीय तैल हा मूळ राष्ट्रकूटांचाच मांडलिक. राष्ट्रकूटांच्या उतरत्या काळात तैल याने अखेरचा राष्ट्रकूट राजा द्वितीय कर्क याच्याशी लढाई करून (इ. स. ९७३) त्याचा संपूर्ण पराभव केला आणि राष्ट्रकूटांची सत्ता नष्ट केली. मालखेड या त्यांच्या राजधानीच्या ठिकाणाहून त्याने दक्षिणेचा सार्वभौम राजा म्हणून राज्यकारभार सुरू केला.[१]

बाराव्या शतकाच्या अखेरीस कल्याण चालुक्यांचे समकालीन असलेले दक्षिणेतील होयसळ, उत्तरेकडील यादव आणि पूर्वेकडील काकतीय या सर्वांनी चालुक्यांवर हल्ले केले. त्याला आपली सत्ता गमवावी लागली आणि त्याच्या मृत्यूनंतर चालुक्य राजवटीची अखेर झाली. सोमेश्वर (चतुर्थ) हा अखेरचा चालुक्य राजा ठरला. अशा तऱ्हेने पश्चिमी चालुक्यांची सत्ता क्षीणबल होत चालेली पाहून त्याचाच

**यादव साम्राज्याचा जास्तीत जास्त विस्तार हा रामदेवरायाच्याच कारकिर्दीत झाला. रामदेवराय हा मराठी भाषेचा आणि वाङ्मयाचा मोठा पुरस्कर्ता आणि आश्रयदाता होता. याच काळात संत ज्ञानेश्वरांनी आपल्या भावार्थदीपिकेची उर्फ ज्ञानेश्वरीची निर्मिती केली. या काळात मराठी वाङ्मयाच्या निर्मितीस बहर आलेला होता. बरेचसे महानुभाव वाङ्मयही यादव काळात रचले गेले. पैकी नरेंद्र कवी हा रामदेवरायाचा आश्रित होता. त्याने रुक्मिणी स्वयंवर आणि नागदेवचरित या मराठी ग्रंथांची रचना केली. संत ज्ञानेश्वरांनी आपल्या ज्ञानेश्वरी या ग्रंथात रामदेवरायाचा उल्लेख केलेला आहे.**

मांडलिक असलेल्या यादव घराण्याच्या मल्लुगी यादवाने आपाल्या सत्तेची पायाभरणी केली.

यादव राजवंशाची राजकीय कारकिर्द ही नवव्या शतकापासून सुरू झाली. सुबाहू हा त्यांचा मूळपुरुष असल्याचे त्यांच्या वंशावळीत दिसून येते. इ. स. च्या ९व्या शतकाच्या पूर्वार्धात दृढप्रहारचा पुत्र प्रथम सेऊणचंद्र हा राज्य करीत होता. त्याच्या कारकिर्दीचा निश्चित कालावधी सांगता येत नसला, तरी तत्कालीन पुराव्यांच्या आधारे तो अंदाजे इ. स. ८५० पासून इ. स. ८७५ पर्यंत असावा असे जे. एन. एस. यादव यांचे मत आहे.[२] या पहिल्या सेऊणचंद्रापासून यादव राजवंश सुरू झाला, असे समजले जाते. सेऊणचंद्राच्या उत्तराधिकाऱ्यांनी सुमारे साडेतीनशे वर्षांपर्यंत म्हणजे नवव्या शतकाच्या मध्यापासून ते बाराव्या शतकाच्या अखेरपर्यंत आधी राष्ट्रकूटांचे आणि नंतर कल्याणीच्या चालुक्यांचे मांडलिक म्हणून आपल्या प्रदेशाचे शासन चालविले.

यादव राजवंशाची सत्ता ज्या भूप्रदेशावर होती, त्यात मध्य महाराष्ट्रातील नाशिक, अहमदनगर आणि औरंगाबाद हे जिल्हे आणि खानदेशाचा भाग या भूप्रदेशांचा अंतर्भाव होतो. यादव राज्यकर्त्यांच्या कोरीव लेखांतून या भूप्रदेशाचा उल्लेख 'सेऊण देश' या नावाने आलेला असून त्यामुळे यादव राजवंशातील सुरुवातीचे शासक हे सेऊणदेशीचे यादव म्हणून ओळखले जात.[३]

इसवी सनाच्या बाराव्या शतकाच्या उत्तरार्धात कल्याणीच्या चालुक्यांची सत्ता जेव्हा दुर्बल होत चालली, तेव्हा यादव राजा पाचवा भिल्लम (पंचम भिल्लम – इ. स. ११७३–११९२) याने आपला राजकीय प्रभाव वाढविला आणि अखेर कल्याणीच्या चालुक्यांचा शेवट करून राजकीय सत्ता हस्तगत केली व आपले सार्वभौमत्व घोषित केले. पंचम भिल्लम हा अतिशय महत्त्वाकांक्षी व शूर होता. त्याने आपल्या लष्करी सामर्थ्याच्या जोरावर उत्तरेकडे नर्मदा नदीपासून ते दक्षिणेकडे मलप्रभा नदीपर्यंतचा प्रदेश काबीज करून आपल्या राज्यास जोडला. महाराष्ट्राच्या किनारपट्टीवरील कोकणचा प्रदेश वगळता आजचा संपूर्ण महाराष्ट्र व कर्नाटकचा उत्तर भाग हे यादवांच्या ताब्यात आणण्यात पंचम भिल्लमाचा मोठा वाटा होता. अशा तऱ्हेने पूर्वीच्या चालुक्य साम्राज्याच्या बऱ्याच मोठ्या भूदेशावर यादवांची सत्ता प्रस्थापित झाली.[४]

सत्तेवर आल्यानंतर भिल्लमाला आपल्या अंतर्गत आणि बाह्य शत्रूंशी सतत संघर्ष करावा लागला.[५] विशेषतः चालुक्य साम्राज्याच्या दक्षिणेकडील भागात चालुक्य अवशेषांवर उभे राहिलेले होयसळ घराणे हे तर यादवांचे अखेरपर्यंत प्रतिस्पर्धी राहिले. पंचम भिल्लमालाही ह्या बलाढ्य शत्रूशी सतत संघर्ष करावा लागला.

भिल्लम (पंचम) यादवाने आपली राजधानी देवगिरीवर नेली व तेथे दक्षिणेचा सम्राट म्हणून त्याने स्वतःस राज्याभिषेक करवून घेतला.[६] हेमाद्रीने सांगितल्याप्रमाणे भिल्लमाने देवगिरी हे शहर वसविले आणि तिथपासून यादव घराणे हे देवगिरीचे यादव म्हणून ओळखले जाऊ लागले.[७] आपल्या राज्यारोहणानंतर त्याने सम्राटपद निदर्शक अशा अनेक पदव्या धारण केल्याचे दिसून येते. 'महाराजाधिराज', 'परमेश्वर' 'परमभट्टारक' इत्यादी पदव्या धारण करणारा तो यादव घराण्यातील पहिला सम्राट होय.

भिल्लम यादवाचे संपूर्ण आयुष्य युद्धांच्या धामधुमीतच गेले. तत्कालीन सर्व प्रबळ अशा पश्चिमी चालुक्य, होयसळ आणि कलचुरी राजवटींशी लढण्यात त्याची हयात गेली. आपल्या कारकिर्दीच्या अखेरीस आपली महत्त्वाकांक्षा पूर्ण झाल्याचे समाधान भिल्लमास मिळाले. भोवतालच्या राजकीय अस्थिरतेचा पूर्ण फायदा उठवून सामंतपदी असलेल्या यादव घराण्यास त्याने एका स्वतंत्र व सार्वभौम राजवंशाचा दर्जा प्राप्त करून दिला. यादव घराण्याच्या सुदैवाने त्याचे वारसही त्याच्याप्रमाणेच महत्त्वाकांक्षी आणि प्रबळ ठरले. इ. स. ११९२ मध्ये पंचम भिल्लमाचा मृत्यू झाला.

## पहिला जैतुगी (इ. स. ११९२ ते इ. स. १२००)

इ. स. ११९२ मध्ये भिल्लमाचा मृत्यू झाल्यानंतर त्याचा पुत्र जैतुगी हा सत्तेवर आला. ऐतिहासिक साधनांमध्ये त्याचा उल्लेख जैत्रपाल अथवा जैत्रसिंह म्हणूनही आलेला आहे. आपल्या पित्याप्रमाणे तोही अतिशय धाडसी आणि आक्रमक होता. त्यालाही आपले परंपरागत प्रतिस्पर्धी, होयसळांशी सतत लढावे लागले. यादवांनी होयसळांच्या

ताब्यात असलेल्या गुट्टी, रट्टपल्ली, गदग, सोरटूर इत्यादी प्रदेशांवर वर्चस्व मिळविले होते. मात्र जैतुगीच्या काळात द्वितीय बल्लाळ या होयसळ राजाने जैतुगीशी युद्ध करत हे प्रांत एकामागून एक सर केले व जैतुगीचा पराभव केला. जैतुगीला देवगिरीस परतावे लागले. मात्र त्यामुळे होयसळांशी लढणे तूर्त थांबवीत जैतुगीने आपले लक्ष इतरांकडे वळविले. आपल्या पित्याच्या हयातीत चालुक्यांचे मांडलिक असलेल्या ज्या राजांनी यादवांचे वर्चस्व मान्य केले नव्हते, त्यांचे पारिपत्य करावयाचे ठरविले व त्यानुसार त्याने पूर्वेकडील म्हणजे तेलंगणातील काकतीयांच्या राज्यावर स्वारी करून काकतीय राजा रुद्र याचा पराभव केला. दक्षिणेतील चोळ राजा कुलोत्तुंग आणि दुसरा अनंग भीम यांना शरण आणले.[८] यानंतर जैतुगीने आपले लक्ष उत्तरेकडे वळविले आणि माळव्यातील परमार आणि गुजरातेतील चौलुक्य राजांचा पराभव केला. इ.स. १२००च्या सुमारास कोरल्या गेलेल्या मानगोळी येथील कोरीव लेखामध्ये लाट आणि गौड हे प्रदेश जैतुगीने जिंकून घेतल्याची नोंद आहे.[९]

पुढे काकतीय रुद्रानंतर गादीवर आलेला त्याचा भाऊ महादेव याच्याशी जैतुगीचा संघर्ष चालूच राहिला. यादवांच्या कोरीव लेखांतील माहितीनुसार जैतुगीने काकतीय महादेवास लढाईत ठार मारले व त्याचा मुलगा गणपती यास अटक करून नंतर सोडून दिले. त्यामुळे काकतीयांच्या शिलालेखांत जैतुगीची मुक्तकंठाने स्तुती करण्यात आली आहे.[१०] देवगिरी ही राजधानी बनविण्याचे काम भिल्लमाने (पंचम) सुरू केले असले, तरी ते जैतुगीने पुरे केले व आपली राजधानी तेथे हलवली.

## दुसरा सिंघण (इ.स.१२०० ते १२४७)

जैतुगीनंतर त्याचा पुत्र द्वितीय सिंघण हा गादीवर आला. तो 'सिंहण', 'सिंघणदेव' अथवा 'सिंघल' म्हणूनही ओळखला जाई. त्याला प्रदीर्घ कारकिर्द लाभली. द्वितीय सिंघण हा यादव घराण्यातील एक श्रेष्ठ राजा ठरला. तोही अतिशय पराक्रमी ठरला. प्रदीर्घ राजवटीचा लाभ त्याला मिळाल्यामुळे त्याचे कोरीव लेख मोठ्या प्रमाणावर उपलब्ध झाले आहेत. त्याच्या राज्यरोहण शकासंबंधी निश्चित माहिती उपलब्ध नसून कोरीव लेखांमध्येही त्यासंबंधी परस्पर विसंगत माहिती आढळते. डॉ. एस. जे. मंगलम यांनी सिंघणाचा राज्यकाल इ. स. १२१० ते १२४७ असा गृहीत धरला आहे.[११] त्याचे बहुतेक कोरीव लेख इ. स. १२०० हे सिंघणाचे पहिले राज्यवर्ष असल्याचे दाखवितात.

राज्यरोहणानंतर सुरुवातीची काही वर्षे सिंघणाने आपले सैन्य प्रबळ बनविण्याकडे लक्ष दिले. पूर्वी यादवांचा ताबा असलेला बराचसा भूप्रदेश आता होयसळांनी बळकावला होता. त्यांपैकी कृष्णा व मलप्रभा ह्या नद्यांच्या दक्षिणेकडील प्रदेश सिंघणाने परत मिळविला. पुढे बेळवोळ, हुलिगेरे, हनगळ हे प्रांत सिंघणाने हस्तगत केले. यादवांची यशस्वी आगेकूच थोपविण्यासाठी होयसळांनी प्रयत्नांची पराकाष्ठा केली. त्या वेळी झालेल्या घनघोर युद्धात शेवटी सिंघणाचा विजय झाला व पुढे त्याने बल्लीग्राम ही बनवासी प्रांताची राजधानी काबीज केली.[१२] त्याच्यापुढे होयसळ नृपती बल्लाळाचा निभाव लागला नाही. तशीच आगेकूच करत सिंघणाने शिमोगा आणि बल्लारी या दोन जिल्ह्यांमधील होयसळांचा प्रदेश जिंकून घेऊन आपल्या राज्यास जोडला. इ. स. १२२० मध्ये यादवांबरोबर झालेल्या युद्धात होयसळ राजा बल्लाळाचा मृत्यू झाला.

बल्लाळाच्या मृत्यूनंतरही यादव-होयसळ संघर्ष चालूच राहिला व युद्धाचे पारडे कधी यादवांकडे तर कधी होयसळांकडे झुकत राहिले. काही काळ यादवांना माघार घ्यावी लागली परंतु परत आक्रमक पवित्रा घेत त्यांनी होयसळांच्या ताब्यात गेलेले प्रदेश परत मिळवले.[१३] राजे बल्लाळ, नरसिंह आणि सोमेश्वर या होयसळ राजांवर सिंघणाने मात केली. मात्र इ. स. १२१३ नंतर होयसळांबरोबरची लढत त्याने आपल्या सेनानींकडे सुपूर्द केली व आपले लक्ष इतरत्र वळविले.

इ. स. १२१० मध्ये सिंघणाने माळव्यावर स्वारी केली व तेथील परमार राजा सुभटवर्मास ठार मारले. त्याचा मुलगा अर्जुनवर्मा याचा पराभव केला. परमारांचे मांडलिक असलेल्या लाट (दक्षिण गुजरात) देशावर त्याने स्वारी केली. तेथील शासक चाहमान सिंहाने गुजरातेतील चौलुक्य राजा द्वितीय भीम याची मदत घेऊन यादवांशी निकराचा

लढा दिला. त्यात यादव सेनापती सगरैय्या नायक ठार झाल्याने सिंघणाने ही मोहीम आटोपती घेतली.

इ. स. १२१३ नंतर त्याने कोल्हापूरच्या शिलाहारांकडे आपले लक्ष वळवले. मध्यंतरीच्या काळात यादव–होयसळ संघर्षाच्या धामधुमीचा फायदा घेत शिलाहारांच्या भोज राजाने यादवांचे वर्चस्व झुगारत आपले स्वातंत्र्य व सार्वभौमत्व घोषित केले होते. त्यामुळे सिंघणाने इ. स. १२१५ मध्ये शिलाहारांवर स्वारी करून राजा भोज याचा पराभव केला व त्यांचा प्रदेश आपल्या राज्यास जोडून टाकला. पुढे उत्तर कोकणातील शिलाहार घराण्याचा राजा केशिराज यानेही यादवांचे मांडलिकत्व पत्करले.

यापूर्वीच्या गुजरातेतील चाहमान राजाने केलेल्या पराभवाचा बदला घेण्यासाठी सिंघणाने पुन्हा लाट देशावर स्वारीची योजना केली. या मोहिमेचे नेतृत्व त्याने आपला पराक्रमी सेनापती खोलेश्वर याच्याकडे सोपविले. खोलेश्वराने मोठा पराक्रम दाखवून हे युद्ध जिंकले. चाहमान राजा सिंह व त्याचा भाऊ सिंधुराज यांना ठार केले व त्याचा मुलगा संख उर्फ संग्रामसिंह यास कैद केले. मात्र सिंघणाने त्यास उदार अंतःकरणाने मुक्त केले.

या मोहिमेनंतर सिंघणाने गुजरातेतील सोळंकींच्या (चौलुक्य) प्रदेशावर आक्रमण केले. त्याच्या गुजरातवरील स्वारीत मोठीच जीवितहानी व वित्तहानी झाली. त्याचे वर्णन सोमेश्वरकृत 'कीर्तिकौमुदी' या ग्रंथात करण्यात आले आहे.[१४] त्यानंतर काही काळ यादव–चौलुक्य संघर्ष स्थगित झाला. तरी पुढे इ. स. १२४० मध्ये सिंघणाने खोलेश्वरपुत्र राम याच्या नेतृत्वाखाली गुजरातवर पुनश्च स्वारी केली. रामाने कित्येक सैनिकांना ठार केले व शेवटी तो स्वतःही मारला गेला. यासंबंधीची सविस्तर माहिती रामची बहीण (खोलेश्वराची कन्या) लक्ष्मी हिच्या आंबाजोगाई येथील शीलालेखात कोरून ठेवलेली आहे. लक्ष्मीने आपला दिवंगत बंधू राम याच्या स्मरणार्थ आंबाजोगाईतील ब्रह्मपुरीत रामनारायणाचे देऊळ स्थापन केले, तेथेच हा लेख आहे.[१५]

सिंघण हा मोठा कर्तृत्ववान होता. त्याच्या कामगिरीचा आढावा घेतल्यास आपणांस असे दिसून येते की, त्याने होयसळांशी दीर्घ लढा देऊन गुजरातेतील सत्तांवरही (चाहमान, चौलुक्य इत्यादी) वर्चस्व मिळविले. माळव्यातील परमारांवरही वर्चस्व मिळविले. त्याने आपल्या हिमतीवर वऱ्हाड, खानदेश, बीड, परभणी, कोल्हापूर, दक्षिण कोकण, उत्तर म्हैसूर, धारवाड एवढा मोठा प्रदेश यादव राज्यात आणला. आपल्या राज्यास लागून असलेल्या सर्व बाजूंच्या राजसत्तांशी सामना दिला. या सर्व प्रदेशांत त्याचे कोरीव लेख आढळून आले आहेत.[१६] या लढायांमध्ये काही वेळा सिंघणास माघारही घ्यावी लागली पण त्याने मोठ्या प्रमाणावर विजयही मिळवले.

अशा तऱ्हेने सिंघणाने आपली सर्व हयात लढायांमध्ये घालविली. काही वेळा त्याने तात्पुरती माघार घेतली, तरी प्रतिस्पर्ध्यासमोर त्याने कधीच शरणागती पत्करली नाही. त्यानेही सम्राटपद निदर्शक, पराक्रमनिदर्शक आणि सन्माननीय अशा अनेक पदव्या धारण केल्या. त्याची विविध बिरुदे म्हणजे 'सकल पृथ्वीचा आश्रय', 'पृथ्विवल्लभ', 'राजाधिराज' आणि 'द्वारावतीपुरवराधीश्वर' इत्यादी होत. सिंघणाच्या विजिगीषू धोरणात त्याला त्याच्या सर्व सेनापतींची बहुमोल साथ मिळाली होती. हे सेनापती म्हणजे खोलेश्वर, सगरैय्या नायक, खोलेश्वरपुत्र राम, लक्ष्मीदेव बिचण इत्यादी होत. अशा एकाहून एक सरस माणसांना हेरण्यात सिंघण अतिशय कुशल होता. एक राज्यकर्ता म्हणून सिंघण यशस्वी ठरला.

सिंघणास दोन पुत्र होते. त्यांपैकी जैतुगी (द्वितीय) हा त्याचा ज्येष्ठ पुत्र. त्यालाच सिंघणाने आपला उत्तराधिकारी म्हणून निवडले होते. दुर्दैवाने जैतुगी हा सिंघणाच्या हयातीतच मृत्यू पावला. त्यानंतर आपल्या कनिष्ठ पुत्रास वारस नेमण्याऐवजी सिंघणाने आपला दिवंगत पुत्र जैतुगी याचा ज्येष्ठ पुत्र कृष्ण याची आपला वारस म्हणून निवड केली.[१७]

### कृष्ण (इ. स. १२४७ ते १२६१)

यादव राजा कृष्ण याचा कान्हरदेव, कंन्हर इत्यादी विविध नावांनी कोरीव लेखांमधून उल्लेख आलेला आहे. हा कृष्णही आपल्या पितामहांप्रमाणे अतिशय महत्त्वाकांक्षी होता. यादव राज्याच्या सीमेला लागून असलेल्या शेजारील

राज्यांच्या बाबतीत त्याने सिंघणाचेच (द्वितीय) धोरण पुढे चालू ठेवले.[१८]

सत्तेवर आल्यानंतर सर्वप्रथम त्याने उत्तरेची मोहीम हाती घेतली. इ. स. १२५० मध्ये माळव्यावर स्वारी करून परमारांवर विजय मिळवला. त्यानंतर कृष्णाने गुजरातवर स्वारी करून तेथील वाघेला राजा विशालदेवाचाही पराभव केला. यादवांचे परंपरागत शत्रू होयसळांविरुद्धही त्याचा लढा सतत चालू होता. उत्तर आणि दक्षिण मोहिमांमध्ये यश मिळवून त्या भागात त्याने आपले वर्चस्व निर्माण केले. पुढे कृष्णाने दक्षिण कोसल (छत्तीसगढ) राज्यावर आपली जरब निर्माण केली, असा उल्लेख रामचंद्र यादवाच्या पुरुषोत्तमपुरी ताम्रपटात आहे.[१९] कृष्णाच्या काळात गोव्यातील कदंबांनी यादवांचे स्वामित्व झुगारण्याचा प्रयत्न केला, तेव्हा कृष्णाने आपला सेनापती बिचण यास पाठविले व हे बंड मोडून काढले.

कृष्णाला सर्व आघाड्यांवर विजय मिळवून देण्यात व राज्याचे प्रशासन सुक्षेम राखण्यात त्याचे शूर सेनानी व कार्यक्षम मंत्री यांचे मोठे योगदान होते. पैकी बिचण उर्फ बिचिसेठी व त्याचा वडील भाऊ मल्लिसेठी हे सिंघणाचे अधिकारी कृष्णाच्या काळातही सेवेत होते. याशिवाय इतरही अनेक कार्यक्षम अधिकाऱ्यांच्या उत्कृष्ट सेवेचा लाभ कृष्णास झाला. यादवांच्या कोरीव लेखांतून या सेनानींच्या पराक्रमाची व त्यांच्या प्रशासकीय योगदानाविषयीची सविस्तर माहिती आढळते.[२०] कृष्णाच्या कारकिर्दीतील कोरीव लेख विदर्भ खानदेशापासून संपूर्ण महाराष्ट्र तसेच कर्नाटकातील शिमोगा व चित्रदुर्गापर्यंतच्या विस्तृत प्रदेशात आढळून आले आहेत. यावरून आपला पितामह सिंघण याने विस्तारलेले विशाल राज्य कृष्णाने कायम राखून आपले दृढनियंत्रण बसविले. कृष्णाच्या कारकिर्दीत देवगिरीचे वैभव वाढतच गेले. कृष्णाने इ. स. १२६१ पर्यंत राज्य केले असल्याची माहिती उपलब्ध आहे.

कृष्णाच्या कारकिर्दीत श्रीचक्रधरस्वामींनी महाराष्ट्रात महानुभाव पंथाची स्थापना केली. कृष्णास चक्रधरांविषयी नितांत आदर होता व त्यांच्या दर्शनासाठी तो लोणार येथे गेला होता. या भेटीचे वर्णन 'लीळाचरित्र' या चक्रधरांच्या जीवनावर आधारित मराठी ग्रंथातील एका लीळेत आहे.

**महादेव (१२६१–१२७१)**

कृष्णाच्या मृत्यूनंतर त्याचा पुत्र रामचंद्र हा अल्पवयीन असल्यामुळे त्याचा भाऊ महादेव हा गादीवर आला, असा उल्लेख रामचंद्राच्या ठाणे ताम्रपटात [२१] आला आहे. खुद्द कृष्णाने आपल्या हयातीत त्याला आपल्याबरोबर प्रशासनात सामील करून घेतले होते. कृष्ण आणि महादेव यांच्या निश्चित राज्यकालाविषयी यादवांच्या कोरीव लेखांमध्ये विसंगती आहे. तरीही तत्कालीन काही पुराव्यांनुसार कृष्णाच्या राजवटीच्या अखेरच्या काळातील कृष्ण–महादेव या दोघांच्या संयुक्त राजवटीचे संदर्भ मिळाले आहेत. प्रत्यक्ष कृष्णाच्या एका कोरीव लेखात 'कन्हरदेव–महादेव विजयराज्ये' असा एक उल्लेख असून त्यामधून त्यांच्या संयुक्त राजवटीच्या अनुमानास पुष्टी मिळते.

कृष्णाच्या मृत्यूनंतर महादेवाने राज्याची सूत्रे स्वतंत्रपणे हाती घेतली. त्यानंतर महादेवाने उत्तर कोकणातील शिलाहारांची बंडखोरी मोडून काढली. शिलाहार नृपती सोमेश्वराचा संपूर्ण पराभव केला. त्यामुळे सोमेश्वराने समुद्रातील बोटींचा आश्रय घेतला. महादेवाने तेथेही आपल्या नौदलाच्या साहाय्याने सोमेश्वराचा पाठलाग करून त्याला त्याच्या नौदलासह बुडवले व संपूर्ण कोकणपट्टीवर ताबा मिळवला.[२२] बृहन्मुंबईतील बोरिवली स्टेशनजवळील एकसर या ठिकाणी काही शिलांवर (वीरगळ) एका सागरी युद्धाचे शिल्प असून ते या युद्धाचे असावे, असे काही इतिहासकारांचे म्हणणे आहे.[२३] सोमेश्वराच्या मृत्यूनंतर शिलाहार घराण्याची अखेर झाली व उत्तर कोकणावर यादवांची सत्ता प्रस्थापित झाली.[२४]

यादवांनी उत्तर कोकणावर आपला अंमल बसविल्यामुळे आता महाराष्ट्र, गोवा आणि उत्तर कर्नाटक यांच्या विस्तृत किनारपट्टीवर यादवांचे प्रभुत्व प्रस्थापित झाले. कोकण स्वारीनंतर महादेवाने गुर्जर राजा विशालदेवाचा पराभव केला. यासंबंधीची माहिती रामचंद्राच्या पैठण ताम्रपटात[२५] आणि हेमाद्रीच्या प्रशस्तीतही आहे. त्यानंतर महादेवाने माळवा आणि तेलंगणावर स्वारी केली. तेलंगणातील काकतीय रुद्रम्मादेवी या राणीने महादेवास प्रखर टक्कर दिली व त्याचे प्रयत्न निष्फळ ठरविले. त्यानंतर महादेवाने



यादव राजा रामचंद्रदेव यांच्या वेळचा देवनागरी मराठीतील उन्हकदेव शिलालेख.

आपला सर्वांत कडवा प्रतिस्पर्धी म्हणजे होयसळांकडे मोर्चा वळविला. परंतु या वेळी महादेवाचे आक्रमण होयसळ नृपती नरसिंहाने(तृतीय) परतवून लावले.

अशा तऱ्हेने महादेवाने कृष्णाकडून वारसाहक्काने मिळवलेले राज्य कायम राखले आणि कोकणचा प्रदेशही त्यात नव्याने सामील करून घेतला. महादेवाची सत्ता ही दक्षिणेकडील शिमोगा, चितळदुर्गपासून ते धारवाड, बेळगावपर्यंत, कोल्हापूरपासून ते महाराष्ट्राच्या उत्तर सीमेपर्यंत आणि पश्चिमेकडील अरबी समुद्रापासून ते पूर्वेस महाराष्ट्राच्या पूर्व सीमेस भिडल्या होत्या.[२६] हेमाद्री हा महादेवाच्या प्रशासनात मंत्रिपदावर कार्यरत होता. महादेवाने इ. स. १२७१ पर्यंत कारभार पाहिला.

## आम्मणदेव (इ. स. १२७१)

महादेवाच्या मृत्यूनंतर त्याने आपला पुत्र आम्मणदेव यास आपला वारस नेमले होते, तो गादीवर आला. तसे पाहावयास गेले, तर कृष्णाने ज्या वेळी महादेवास आपला वारस नेमले, त्या वेळी कृष्णाचा पुत्र रामचंद्र (खरा वारस) हा अल्पवयीन होता. तो वयात आल्यावर महादेवाने त्यास आपला वारस म्हणून नेमावे, या विश्वासाने कृष्णाने त्याचेकडे सत्ता सोपविली होती. परंतु हा विश्वास सार्थ ठरला नाही. महादेवाने आपला पुतण्या रामचंद्राऐवजी आपला पुत्र आम्मणदेव यास आपला वारस म्हणून नेमले.

अशा रीतीने महादेवाच्या मृत्यूनंतर आम्मणदेव जेव्हा गादीवर आला, तेव्हा रामचंद्रास अतिशय राग आला. आम्मणदेवाचा राज्याभिषेक झाल्यावर रामचंद्राने लवकरच त्यास पदच्युत केले व गादीवर ताबा मिळविला, असे त्याच्या पुरुषोत्तमपुरी ताम्रपटात[२७] नमूद केले आहे. विविध साधनांमधून आपणास याबाबत विसंगत माहिती मिळते. मात्र खुद्द रामचंद्राच्याच पुरुषोत्तमपुरी आणि पैठण येथील ताम्रपटांमध्ये[२८] आम्मणदेव हा रीतसर वारसदार नसल्यामुळे रामचंद्राने त्यास पदच्युत करून आपला हक्क प्राप्त केला असल्याची नोंद आहे. अशा तऱ्हेने आम्मणदेवाची राजवट अल्पजीवी ठरली व त्याला बाजूला सारून रामचंद्राने यादव सत्तेवर ताबा मिळवला.

## रामचंद्र उर्फ रामदेवराय (इ. स. १२७१ ते इ. स. १३१२)

रामदेवराय हा यादव घराण्यातील शेवटचा कर्तबगार राजा समजला जातो. आपले काका महादेव याच्या राजवटीत रामदेव हा प्रशासकीय कामकाजात सहभागी

होता. त्याला प्रशासनाचा बराच अनुभव होता. वर सांगितल्याप्रमाणे इ.स. १२७१ च्या सुमारास राजकीय कारस्थानाद्वारे त्याने आपल्या चुलतभावास म्हणजे आम्मणदेवास बाजूला सारले व गादीचा ताबा घेतला.

आपला राज्याभिषेक करून घेतल्यावर रामदेवरायाने लगेचच माळवा आणि गुजरात या प्रांतांवर मोहीम काढली. या मोहिमेत तो अतिशय यशस्वी झाला. या मोहिमेची आणि त्यात मिळविलेल्या विजयाची नोंद त्याच्याच इ.स. १२७१ च्या पैठण[२९] आणि १२७२ मधील ठाणे[३०] ताम्रपटात तसेच १२७६ मधील उदरी शिलालेखात आलेले आहेत.[३१]

यादवांचे होयसळांबरोबरचे वैर अखेरपर्यंत राहिले. एक शतकभर हा जो संघर्ष चालू होता, तो अजूनही मिटला नव्हता. त्यामुळे रामदेवाने होयसळांशी निर्णायक युद्ध करावयाचा निश्चय केला. त्यानुसार लष्करी तयारी करून मोठ्या सामर्थ्यानिशी होयसळांची राजधानी द्वारसमुद्रावर आक्रमण केले. होयसळांचीही मोठी तयारी होती. द्वारसमुद्रापासून काही अंतरावरील बेलवाडी या ठिकाणी दोन्ही सैन्यांची गाठ पडली. तुंबळ युद्ध झाले. दोहोंकडील सैन्याची प्रचंड हानी झाली. परंतु कोणीही माघार घेईना. अखेर यादव सैन्याला बेलवाडीच्या रणभूमीतून माघार द्यावी लागली. बहुधा सामना अनिर्णित राहिला असावा. तरी होयसळ आणि यादव यांच्या कोरीव लेखांतून मिळालेल्या माहितीनुसार या लढाईत आपणच विजयी झाल्याचा दावा उभय पक्षांनी केला आहे. त्यामुळे या युद्धाचा शेवट कसा झाला, याबाबत निश्चित उत्तर देणे कठीण आहे.[३२]

यानंतर रामदेवरायाने इतर काही मोहिमा हाती घेतल्या. त्यांपैकी भंडाऱ्यात काढलेल्या मोहिमेविषयीची माहिती त्याच्या पुरुषोत्तमपुरी[३३] ताम्रपटात आलेली आहे. याशिवाय भंडाऱ्याच्या राजास शरण आणल्याची, डहाळ देशाच्या (त्रिपुरीचे कलचुरी) राजाचा पराभव केल्याची, वज्राकारच्या (चांदा जिल्ह्यातील वैरागढ) राजास पदच्युत केल्याची व गवळी (खानदेशातील आभीर) राजास युद्धात हरविल्याची नोंदही करण्यात आली आहे. अशा तऱ्हेने रामदेवरायाने नागपूर-भंडाऱ्याचा भूप्रदेशही यादव राज्यास जोडला.

या व्यतिरिक्त रामदेवरायाने खानदेशावर विजय मिळवला. भिल्ल आणि पल्ली राजांना पराभूत केले.[३४] रामदेवरायाच्या दिग्विजयांच्या यादीत पल्ली, कान्यकुब्ज, कैलास, माहीम, सळंम खेट इत्यादींचाही समावेश आहे. मात्र यांपैकी काही मोहिमा या काल्पनिक असाव्यात, असे काही इतिहासकारांचे मत आहे.[३५]

रामदेवरायाच्या पुरुषोत्तमपुरी ताम्रपटातील उल्लेखानुसार रामचंद्राने वाराणसी क्षेत्रास मुस्लीम राजवटीतून मुक्त करून तेथे शारंगपाणीचे मंदिर बांधले. याशिवाय त्याने काकतीयांबरोबर संघर्ष करून आपल्या राज्याच्या पूर्वेकडील रायचूर, मेदक, इत्यादी प्रदेशांवर ताबा मिळवल्याचे त्याच्या त्या भागांतील कोरीव लेखांच्या पुराव्यांवरून दिसून येते.

अशा तऱ्हेने विविध लष्करी मोहिमा काढून रामदेवरायाने आपला मोठा साम्राजविस्तार केला. इ.स. १२९२ पर्यंत यादव घराण्याची सत्ता उत्कर्षाला पोहोचली होती. रामदेवरायाने आपल्या कारकिर्दीच्या सर्वोच्च काळात बहुधा संपूर्ण दख्खन प्रदेशावर आपले प्रभुत्व मिळविले असावे, असे जे.एन.एस यादव यांचे मत आहे.[३६] दख्खनमधील तत्कालीन सर्व प्रमुख घराण्यांनी- चालुक्य, होयसळ, काकतीय इत्यादी आणि गुजरातेतील गुर्जर, माळव्यातील परमार या सर्वांशी यादवांनी संघर्ष करून आपला साम्राज्यविस्तार केला. त्यांनी स्वामित्व मिळविलेल्या माळव्यापासून म्हैसूरपर्यंत आणि अरबी समुद्रापासून ते पूर्व विदर्भापर्यंतच्या विस्तृत भूप्रदेशावर यादवांचा गरुडध्वज मोठ्या डौलाने विहरत होता[३७] यादव घराण्यातील दृढप्रहारपासून ते रामदेवरायापर्यंत राज्यकर्त्यांची एक मोठी साखळी असली, तरी इ.स. च्या १३ व्या शतकाच्या अखेरीस रामदेवरायाने जी सत्ता उपभोगली त्यास तोड नाही.[३८] यादव साम्राज्याचा जास्तीत जास्त विस्तार हा रामदेवरायाच्याच कारकिर्दीत झाला.

रामदेवराय हा मराठी भाषेचा आणि वाङ्मयाचा मोठा पुरस्कर्ता आणि आश्रयदाता होता. याच काळात संत ज्ञानेश्वरांनी आपल्या भावार्थदीपिकेची उर्फ ज्ञानेश्वरीची निर्मिती केली. या काळात मराठी वाङ्मयाच्या निर्मितीस



देवगिरीच्या यादवांची चांदीची नाणी.

बहर आलेला होता. बरेचसे महानुभाव वाङ्मयही यादव काळात रचले गेले. पैकी नरेंद्र कवी हा रामदेवरायाचा आश्रित होता. त्याने रुक्मिणी स्वयंवर आणि नागदेवचरित या मराठी ग्रंथांची रचना केली. संत ज्ञानेश्वरांनी आपल्या ज्ञानेश्वरी या ग्रंथात रामदेवरायाचा उल्लेख पुढीलप्रमाणे केलेला आहे.

''तेथे यदुवंशविलास। जो सकलकला निवास। न्यायोत पोषी क्षितीश। श्री रामचंद्र।।' रामदेवरायाने पंढरपूरच्या विठ्ठलदेवाला दिलेल्या देणगीची नोंदही पंढरपूरच्या चौऱ्याऐंशीच्या शीलालेखात[३९] आहे. या लेखात त्याचा उल्लेख 'चक्रवर्ती श्री रामचंद्रदेवराए' असा असून तो 'पंढरीफडमुख्य' म्हणजे पंढरीच्या वारकरी फडाचा प्रमुख होता, असे नमूद केले आहे.

तथापि रामदेवरायाच्या कारकिर्दीच्या उत्तरार्धात या वैभवास ग्रहण लागले आणि यादव घराण्याची उतरती कळा सुरू झाली. उत्तरेकडील इस्लामी सत्तांनी वारंवार केलेल्या आक्रमणांमुळे यादवांचे सार्वभौमत्व नष्ट झाले आणि मुसलमान आक्रमकांचे मांडलिकत्व स्वीकारावे लागले.

### देवगिरीवर मुसलमानी आक्रमणे

दक्षिणेतील यादव, होयसळ, पांड्य, चोळ, शिलाहार, कदंब, माळव्यातील परमार, काकतीय, कलचुरी इत्यादी राजघराणी सतत आपापसात लढत राहिली, त्यामुळे त्यांची मोठी आर्थिक शक्ती लष्करावरच खर्च होत राहिली.

इ. स. १२०६ साली उत्तर भारतात कुतुबुद्दीन ऐबकाने इस्लामी राजसत्तेचा पाया घातला. त्याच्यानंतर आलेल्या अल्तमश, नासिरुद्दीन महंमदशहा, बल्बन, जलालुद्दीन फिरोज खिलजी आणि अल्लाउद्दीन खिलजी या सर्व सुलतानांनी आपली संस्कृती लष्करी बळाच्या जोरावर उत्तरेत पसरवण्याचा प्रयत्न केलेला होता. ज्या वेळी दक्षिणेतील राज्ये आपसात झुंजत होती, त्या वेळी दक्षिण भारत पादाक्रांत करण्याच्या महत्त्वाकांक्षेने इ. स. १२९४ मध्ये अल्लाउद्दीन खिलजी दक्षिणेत आला व त्याने देवगिरीवर पहिला हल्ला केला.

अल्लाउद्दीन खिलजी हा दिल्लीचा अफगाण सुलतान जलालुद्दीन खिलजीचा पुतण्या व जावई होता. तो करा प्रांताचा अंमलदार होता. इ. स. १२९४ मध्ये अल्लाउद्दीन आपल्या फौजेसह दक्षिणेकडे निघाला. यादव साम्राज्याच्या उत्तरसीमेवरील एक महत्त्वाचे ठाणे असलेल्या लिचपुरास येऊन थडकला. तेथून निघून तो लवकरच देवगिरीवर चालून आला. या वेळेस देवगिरीचे सैन्य काकतीयांशी लढण्यात गुंतले होते, ही बातमी अल्लाउद्दीनला आपल्या हेरांकडून कळली आणि तो देवगिरीवर चालून आला.

देवगिरीजवळील लासूर या ठिकाणी अल्लाउद्दीनला यादव सामंत कान्हा याने प्रतिकार केला. त्याचा पराभव करून अल्लाउद्दीन देवगिरीस येऊन थडकला, त्या वेळी रामदेवरायाने देवगिरीत शिल्लक असलेल्या सैन्यासह प्रतिकार केला. रामदेवराय गाफील असल्याने त्याची युद्धाची मानसिकता नव्हती. शिवाय अल्लाउद्दीनने आपल्यामागून मोठे सैन्य येत असल्याची अफवाही पसरवली होती. त्यामुळे रामदेवरायाचा धीर खचला व त्याने तडजोड करावयाची मागणी अल्लाउद्दीनकडे केली. त्या बदल्यात अल्लाउद्दीनला प्रचंड खंडणी म्हणून देऊ केली. वस्साफ या फारसी इतिहासकाराच्या माहितीनुसार रामदेवरायाने आपल्या मुलीचा विवाहही अल्लाउद्दीनशी लावून दिला. याशिवाय एलिचपूर व त्याभोवतालचा प्रदेश तसेच वार्षिक खंडणी म्हणून ठरावीक रक्कम देण्याचे कबूल करून अल्लाउद्दीनशी तह केला.[४०]

अशा तऱ्हेने वैभवाच्या कळसावर पोहोचलेल्या यादव साम्राज्याचा ऱ्हास सुरू झाला. दुर्दैवाने रामदेवरायाने

मुस्लीम आक्रमणामुळे होणारे राजकीय आणि धार्मिक परिणाम लक्षात घेतले नाहीत. उत्तरेकडील आक्रमणे आपल्या शेजारी राज्यांवर वारंवार होत असताना तो गाफील राहिला. अल्लाउद्दीनच्या देवगिरीवरील पहिल्या स्वारीनंतरही तो बेफिकीर राहिला. एवढेच नव्हे तर या आक्रमकांना थोपविण्याऐवजी त्याने आपले परंपरागत शत्रू होयसळ आणि काकतीय यांच्या विरोधात लढण्यात मुसलमानांना मदत करून दक्षिणेतील हिंदू राज्यांच्या नाशास मदत केली.[४१]

या स्वारीनंतर अल्लाउद्दीन खिलजी दिल्लीस परतला व त्याने जलालुद्दीन खिलजी याचा खून करून स्वतःच सुलतान झाला. पुढे इ. स. १३०६ पर्यंत रामदेवरायाकडून त्याला नियमितपणे वार्षिक खंडणी मिळत होती. मात्र नंतर काही काळ ही खंडणी थांबली म्हणून अल्लाउद्दीनने मलिक काफूर या सरदाराला इ. स. १३०७ मध्ये परत देवगिरीवर स्वारी करण्यास पाठविले. या स्वारीतही रामदेवरायाचा पराभव झाला व त्याला बंदिवान करून दिल्लीस नेले. परंतु तेथे सुलतानाकडून त्याला चांगली वागणूक मिळाली. रायरायन ही पदवी आणि नवसारीची जहागीर आणि शिवाय काही द्रव्य देऊन त्याच्या इतमामाप्रमाणे त्यास देवगिरीस परत पाठविले.[४२] अर्थात यामागे अल्लाउद्दीनचा स्वार्थ साधण्याचा हेतू होता. त्याला आपल्या पुढील दक्षिण मोहिमांमध्ये रामदेवरायाचा फायदा करून घ्यावयाचा होता.

पुढे दोन वर्षांनी मलिक काफूरने वारंगळवर (काकतीयांची राजधानी) स्वारी केली. या मोहिमेदरम्यान त्याची फौज जेव्हा यादव राज्यातून कूच करीत होती, त्या वेळी रामदेवरायाने त्यांची चांगली व्यवस्था ठेवली. त्याचप्रमाणे त्याने मलिक काफूरच्या सैन्याला होयसळ राजधानी द्वारसमुद्राचा मार्ग दाखवला व होसाळांशी असलेले वैर साधून मुसलमानी सैन्याकडून त्यांचा परस्पर काटा काढावयाचा प्रयत्न केला.

इ. स. १३१२ मध्ये रामदेवरायाचे देवगिरीस निधन झाले. त्याच्यानंतर त्याचा पुत्र शंकरदेव हा गादीवर आला. त्याचा उल्लेख सिंघण (तृतीय) तथा संगम या नावांनी विविध साधनांमध्ये आलेला आहे.[४३] राज्यावर आल्यानंतर त्याने दिल्ली सुलतानांचे वर्चस्व झुगारून दिले, खंडणी पाठविणे बंद केले. त्यामुळे अल्लाउद्दीन खिलजीने मलिक काफूरला पुन्हा देवगिरीच्या मोहिमेवर सैन्यासह पाठविले. त्याने सिंघणावर (तृतीय) हल्ला केला व त्याला ठार केले. या तृतीय सिंघणाच्या मृत्यूनंतर रामदेवरायाचा जावई हरपाळदेव याने यादवांचे राज्य टिकवण्यासाठी देवगिरीस उठाव केला व देवगिरीच्या मुसलमान अधिकाऱ्यास हाकलून दिले.

या वेळेपर्यंत दिल्लीच्या सत्तेवर अल्लाउद्दीनचा मुलगा मुबारकशहा आला होता. त्याने खुश्रुखानास परत देवगिरीच्या स्वारीवर पाठविले. त्याने हरपाळदेवास पकडले, त्याचा वध केला व त्याचे शिर धडापासून कापून वेशीवर टांगून ठेवले की जेणेकरून इतरांना जरब बसवी. त्यानंतर मुबारक खिलजीने मलिक याखलखी याची देवगिरीचा सुभेदार म्हणून नेमणूक केली.[४४] रामदेवाचा प्रतिनिधी राघवही या लढाईत मारला गेला. आणि यानंतर यादव घराणे परत कधीही राजकारणात आपले डोके वर काढू शकले नाही.

**संदर्भ :**


१. महाराष्ट्र राज्य गॅझेटियर, इतिहास, प्राचीन काळ, (खंड१) सांस्कृतिक कार्य विभाग, महाराष्ट्र शासन, मुंबई, २००१.; पृष्ठ क्रमांक ३६३-३६४.

२. Yadava, J. N. S., Yadavas through the Ages, Vol.I, P.323. मात्र डॉ. एस. जे. मंगलम् यांच्या मते त्याचा कार्यकाल हा इ. स. ८३५ ते इ. स. ८६० असा असावा, असे महाराष्ट्र राज्य गॅझेटियर, (इतिहास प्राचीन काळ (खंड-१) पृष्ठ क्रमांक ४१४) यात नमूद केले आहे.

३. Thosar H. S., Historical Geography of Maharashtra and Goa, [Published by the Epigraphical Society of India, Mysore, 2004] P.227.

४. Yadava, J. N. S., OP.Cit, P.281.

५. चालुक्यांचे पूर्वी सामंत असलेल्या कदंब, सिंद, हैहेय आणि इतर प्रमुखांनी भिल्लमाचे स्वामित्व पत्करण्यास नकार दिला होता. त्यामुळे त्यांच्याशी भिल्लमाचा संघर्ष होणे साहजिकच आहे.

६. पानसे मु. ग., यादवकालीन महाराष्ट्र, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई १९६३, पृष्ठ क्रमांक २७.
७. असे असले तरी शहर वसविण्याचे काम भिल्लमाचा वारस जैतुगी/जैत्रपाल याने पूर्ण केले व नंतर आपली राजधानी तेथे हलवली, असे काही इतिहासकारांचे मत आहे. पाहा- गॅझेटिअर, उपरोक्त, पृ.क्र.४२१.
८. पानसे, मु. ग., उपरोक्त, पृष्ठ क्रमांक २९.
९. Epgraphia Indica, Vol.V., Page 28. [Henceforth E. I.]
१०. महाराष्ट्र राज्य गॅझेटिअर, उपरोक्त पृष्ठ क्रमांक ४२०.
११. कित्ता, पृ. क्र. ४२१.
१२. पानसे, मु. ग., उपरोक्त, पृष्ठ क्रमांक २९.
१३. महाराष्ट्र राज्य गॅझेटिअर, उपरोक्त पृष्ठ क्रमांक ४२१-४२२.
१४. उपरोक्त, पृष्ठ क्रमांक ४२५
१५. तुळपुळे, शं. गो. (संपादक) प्राचीन मराठी कोरीव लेख, पुणे विद्यापीठ प्रकाशन, पुणे, १९६३, खंड-२, पृष्ठ क्रमांक १३१.
१६. पानसे, मु. ग.; उपरोक्त, पृष्ठ क्रमांक ३१.
१७. Ritti S. H, The Seunas, Karnataka University Publication, Dharwad,
१८. याबाबत सविस्तर माहिती महाराष्ट्र राज्य गॅझेटिअर, इतिहास प्राचीन काळ, खंड-१, यामध्ये पृष्ठ क्रमांक ४२७-४२९ यांवर दिलेली आहे. तिचा संदर्भ येथे घेतला आहे.
१९. E. I., Vol.25,P/204.
२०. याविषयी सविस्तर माहिती उपरोक्त गॅझेटिअरमध्ये पाहावी.
२१. E.I., Vol.13, P/205.
२२. मिराशी वा. वि., शिलाहार राजवंशाचा इतिहास आणि कोरीव लेख, विदर्भ संशोधनमंडळ नागपूर, १९७४, खंड १, पृष्ठ क्रमांक ३९.
२३. असे प्रतिपादन Cousens यांनी आपल्या Medieval Architecture in Deccan या ग्रंथात (पृष्ठ क्रमांक २१) वर चित्राद्वारे केले आहे. (चित्र क्रमांक ४)
२४. Yadav J. N. S. op.cit. P.307.
२५. Indian Antequeri (I.A., Vol. XIV, PP. 315-319)
२६. Yadav J. N. S. op.cit. P.308.
२७. E. I., Vol.25, PP 199-225.
२८. संदर्भ क्र.२५ पाहा.
२९. पाहा संदर्भ क्र.२५.
३०. E. I., vol.XII, PP.198-206.
३१. महाराष्ट्र राज्य गॅझेटिअर, उपरोक्त, पृष्ठ क्रमांक४३३.
३२. कित्ता.
३३. पहा संदर्भ क्रमांक २७.
३४. पानसे मु. ग. उपरोक्त, पृष्ठ क्रमांक ३४.
३५. अधिक माहितीसाठी उपरोक्त गॅझेटियर पाहा. पृष्ठ क्रमांक ४३२ ते ४३७.
३६. Yadav J. N. S. op.cit. P.311.
३७. कित्ता.
३८. Verma, O. P., The Yadavas and their Times; Vidarbha Samshodhan Mandal, Nagpur, 1970, P.148.
३९. शं. गो. तुळपुळे, उपरोक्त, पृ.क्र.१७९.(स्तंभ क्र.१).
४०. पानसे मु. ग. उपरोक्त, पृष्ठ क्रमांक ३६.
४१. गॅझेटिअर, उपरोक्त, पृष्ठ क्रमांक ४३७.
४२. पानसे मु. ग. उपरोक्त, पृष्ठ क्रमांक ३७.
४३. गॅझेटिअर, उपरोक्त, पृष्ठ क्रमांक ४३७.
४४. पानसे मु. ग. उपरोक्त, पृष्ठ क्रमांक ३८.

* * *





शिलाहार राजवटीतील नाणी.

# शिलाहार

■ डॉ. अरुणचंद्र पाठक

**एक राजवंश म्हणून शिलाहार राजांची सत्ता प्रदीर्घ काळ आहे. समकालीन सत्ताधीशांबरोबर संघर्ष करतानाच त्यांनी स्वतःचे राज्यशासन उत्कृष्टपणे चालविले. त्यांच्या विविध कोरीव लेखांतून तत्कालीन धार्मिक, सामाजिक आणि आर्थिक स्थितीचे चित्रण उपलब्ध होते. साहित्य आणि स्थापत्य यांतील त्यांचे योगदान उल्लेखनीय आहे. ते पाहिल्याशिवाय या राजवंशाचा परिचय पूर्णपणे होणार नाही. महाराष्ट्राच्या इतिहासातील शिलाहारांचे स्थान त्यांच्या लौकिक कामांतून स्पष्ट होते.**

स्वतःला राष्ट्रकूटांचे सामंत मानणारे व अस्तित्वासाठी चालुक्याशी स्पर्धा व संघर्ष करणारे आणि शेवटी यादवांकडून माघार घेणारे, असे हे राजघराणे आहे. शिलाहार वंशनामाच्या व्युत्पत्तीबाबत एक कथा रूढ आहे. पक्षिराज गरुड रोज एक सर्प भक्षण करीत असे. त्यासाठी एक नाग शिळेवर पडून गरुडाचा आहार बनत असे. शंखचूड नागाची पाळी आली, तेव्हा विद्याधर राजकुमार जिमूतवाहन याने स्वतः भक्ष्य होऊन नागाचे प्राण वाचवले. हा मूळ पूर्वज जिमूतवाहन जो शिळेवर गरुडाचा आहार बनला. त्यावरून या घराण्याला 'शिलाहार' नाव प्राप्त झाले. याविषयीचा कथाभाग पैशाची भाषेत रचलेल्या 'गुणाढ्याच्या बृहत्कथा' या ग्रंथातील असून हा ग्रंथ उपलब्ध नाही. तथापि, यावर आधारित कथा सोमदेवकृत, 'कथासरित्सागर' आणि क्षेमेंद्रकृत 'बृहत्कथामंजिरी' या संस्कृत ग्रंथांत आली आहे. उत्तर कोकण आणि कोल्हापूर शाखांचे शिलाहार स्वतःला 'तगरपुरवराधीश्वर'



शिलाहार राजा अपराजित याचा मराठीतील जंजिरा ताम्रपट.

'तगरपुरपरमेश्वर' मानतात. यांची अनेक बिरुदे कन्नड भाषेचा प्रभाव दर्शवतात. तर दक्षिण कोकण शाखेचे शिलाहार संस्कृत भाषेचा अभिमान बाळगणारे आहेत. या राजवंशांनी धारण केलेली बिरुदे त्यांच्या आत्यंतिक उदारतेचे प्रतीक मानावे लागते. जसे 'कलियुगयुधिष्ठिर' आणि 'परनारीसहोदर', 'निजभुजविक्रमादित्य', 'कोदण्डसहस्रार्जुन' इत्यादी.

राष्ट्रकूट राजा दन्तिदुर्ग याने उत्तर कोकणावर सत्ता मिळवल्यावर प्रशासक या नात्याने पहिला 'कपर्दिक शिलाहार' येथे आला. कपर्दिकापासून (इ.स. ८०० ते इ.स. ८२५) सोमेश्वरपर्यंत (इ.स. १२५५ ते इ.स. १२६५) विचार करता महादेव यादवाने याची सत्ता नष्ट करेपर्यंत (सोमेश्वरला समुद्रात बुडवेपर्यंत) एकूण ४५० वर्षांचा कालखंड आहे. सातवाहन राष्ट्रकूटांनंतर एवढी प्रदीर्घ सत्ता असणारा हा राजवंश स्वतःला सामंत म्हणवत असला, तरी प्रत्यक्ष प्रभुसत्ता गाजवणारा होता. पहिला कपर्दिक, अपराजित, छित्तराज, मुम्मुनी, अनंतदेव उर्फ अनंतपाल यांनी 'पश्चिमसमुद्राधिपति' आणि 'संपूर्ण कोकणचा स्वामी' असे म्हणवून घेतले. एकूण सतरा पिढ्यांचे सलग राज्य यांनी उपभोगले तर दक्षिण कोकणच्या शिलाहारांनी सनफुल्लपासून (इ.स. ७६५ ते इ.स. ७८५) रट्टाराजापर्यंत (इ.स. ९९५ ते इ.स. १०२४) एकूण दहा पिढ्यांनी सत्ता उपभोगली. जवळपास अडीचशे वर्षांपर्यंत यांची सत्ता राहिली. यांचा शेवट गोव्याच्या कदंबानी केला. तर कोल्हापूरचे शिलाहार जतिग पहिला (इ.स. ९४० ते इ.स. ९६०) याच्यापासून दुसरा भोजपर्यंत (इ.स. ११७५ ते इ.स. १२१२) एकूण नऊ पिढ्यांची सत्ता राहिली. 'कुंतलदेश' म्हणून हा भाग ओळखला जातो. कृष्णा खोऱ्यातील हा प्रदेश दुसरा जतिग याने सिंधांपासून संपादन केला तर ही सत्ता यादवाने संपविली. एकूण तिन्ही शिलाहारांच्या काळात समकालीन सत्ता म्हणून यांना ज्यांच्याबरोबर समन्वय आणि संघर्ष करावा लागला त्यात राष्ट्रकूट, कल्याणीचे चालुक्य, कातकीय, सिंध, चौल, हैहैय, साळुंकी, परमार, गोव्याचे कदंब, यादव यांची नोंद घ्यावी लागते.

महाराष्ट्राच्या आणि कर्नाटकाच्या संलग्न प्रदेशात शिलाहार वंशाच्या अनेक शाखा असाव्यात. त्यांपैकी पश्चिम किनारपट्टीवर शासन करणाऱ्या वरील तीन प्रमुख शाखा होत. उत्तर कोकणातील शिलाहारांच्या राज्यात मुंबई, ठाणे आणि रायगड जिल्ह्यातील प्रदेश ह्यांचा समावेश होईल. दक्षिण कोकणच्या शिलाहारांकडे रत्नागिरी, सिंधुदुर्ग आणि गोव्याचा प्रदेश हे भाग येत होते. कोल्हापूरच्या शिलाहारांची तिसरी शाखा मानावी लागते. यांच्या राज्यात दक्षिण महाराष्ट्रातील कोल्हापूर, सांगली आणि सातारा तसेच कर्नाटकातील बेळगाव जिल्हा ह्यांचा समावेश होता. महाराष्ट्राची पश्चिम किनारपट्टी व त्यालगतचा भाग हेच शिलाहारांचे एकूण कार्यक्षेत्र राहिले.

शिलाहार वंशाच्या या तिन्ही शाखा जीमुतवाहनास आपला मूळपुरुष मानतात.

### उत्तर कोकणाचे शिलाहार

उत्तर कोकणच्या शिलाहारांनी राष्ट्रकूट दन्तिदुर्ग याचे प्रशासक म्हणून आपली कारकिर्द सुरू केली. पहिला कपर्दिक हा कोकणचा शिलाहार शासक म्हणून कार्यरत होता. तो राष्ट्रकूट तिसरा गोविंद याचा समकालीन होता. गोविंदानेच त्याला शासक बनवले, असे मानले जाते. याच्या कार्यक्षेत्रास 'कोकण १४००' म्हणून ओळखले जाई. कपर्दिकानंतर 'पुल्लशक्ती' हा राज्यावर आला. कान्हेरी लेण्यातील शिलालेखात याची नोंद 'महासामंत' अशी केली आहे. राष्ट्रकूट पहिला, अमोघवर्ष याच्याकडून आपणांस कोकणचे राज्य प्राप्त झाल्याची नोंद त्याने केली आहे. यानंतर दुसरा कपर्दिक हा राज्यावर आला. याचे दोन शिलालेख कान्हेरी लेणीत आहे. कपर्दिकानंतर त्याचा पुत्र

वप्पुवन्न हा राज्यावर आला. याच्या काळात राष्ट्रकूटाने 'संजानमंडल' या भागावर अरब प्रमुख 'मधुमती' उर्फ 'महम्मद' याची सामंत म्हणून नियुक्ती केली. राष्ट्रकूटांच्या ऱ्हासानंतर 'अपराजित' याने या अरब प्रशासक वंश यांचा पराभव करून संजानमंडल आपल्या ताब्यात घेतले.

शिलाहार राज झंझ हा वप्पुन्नाचा उत्तराधिकारी होता. त्यानंतर त्याचा धाकटा भाऊ गोगिराज राज्यावर आला. गोगिराजाचा मुलगा वज्जड व त्यानंतर त्याचा भाऊ छद्वदैव हा उत्तर कोकणचा शासक बनला. तथापि शिलाहारांच्या राज्य वंशावळीत त्याचे नाव उपलब्ध होत नसल्याने त्याने राज्य बळकावले असावे, असे इतिहासकार मानतात.

यानंतर त्याचा पुतण्या आणि वज्जडाचा पुत्र अपराजित हा राजा झाला. याच्याच काळात दक्षिणेतील राष्ट्रकूट राज्य संपुष्टात येऊन दुसरा तैल चालुक्य हा सत्ताधीश झाला. अपराजिताने आपण स्वतंत्र आणि सार्वभौम शासक आहोत, हे घोषित करण्यासाठी 'पश्चिम समुद्राधिपती' आणि 'मांडलिक त्रिनेद' अशा उपाध्या धारण केल्या. त्याने अनेक दिग्विजय केले. संजानच्या अरब शासकाचा पराभव केला. देशावरील पुणे आणि दक्षिणेकडील चिपळूण, संगमेश्वर आणि गोवा हे प्रदेश जिंकून संपूर्ण कोकण किनारपट्टी आपल्या नियंत्रणाखाली आणली. याच्या राज्याच्या सीमा उत्तरेस दक्षिण गुजरात, दक्षिणेस गोवा, पश्चिमेस अरबी समुद्र तर पूर्वेला यादव राज्याशी म्हणजे खानदेशाशी भिडवल्या. एकूण अपराजित हा समर्थ शासक होता. तथापि चालुक्य राजा युवराज सत्याश्रय याच्याबरोबर एकवीस हत्तींची खंडणी देऊन त्याचे सार्वभौमत्व स्वीकारले. तथापि ते कायमचे मान्य केले नाही. अपराजितानंतर (सन ९७५ ते सन१०१०) त्याचा पुत्र दुसरा वज्जड राज्यावर आला. याने कदंबांबरोबर आपले विवाहसंबंध प्रस्थापित केले. दुसऱ्या वज्जडानंतर त्याचा धाकटा भाऊ अरकेसरी उर्फ केशिरीराज हा कोकणचा शासक बनला. केशिरीराजानंतर त्याचा पुतण्या छत्तीराज इ.स.१०२६ मध्ये राज्यावर आला. या सत्तेचा संघर्ष कदंब सत्तेशी सुरू होता. याच वेळी कोल्हापूरचा शिलाहार गोक याने दक्षिण कोकणवर स्वारी करून तो प्रदेश जिंकला. छत्तीराज हा विद्येचा व कलेचा आश्रयदाता होता. उदयसुंदरी काव्याचा कर्ता कवी सोढ्ढल हा छत्तीराजाचा आश्रित होता. 'कवी प्रदीप' अशी उपाधी देऊन छत्तीराजाने त्याचा गौरव केला. नागार्जुन हा छत्तीराजाचा धाकटा भाऊ त्यानंतर सत्तेत आला. त्याने चालुक्याबरोबर संघर्ष चालूच ठेवला. सन १०४५ च्या एका लढाईत नागार्जुन मारला गेला. चालुक्य पहिला सोमेश्वर याने नागार्जुनाचा धाकटा भाऊ मुम्मुनिराजा (सन १०४५ ते सन१०७०) याला मांडलिक बनवून कोकणचे राज्ये दिले.

मुम्मुनिराजानंतर अनंतपाल हा सत्ताधीश झाला. याच्या काळात गोव्याचा कदंब राजा पहिला जयकेशरी याने कोकणावर स्वारी केली व हा प्रदेश काबीज केला. अनंतपालाचा उत्तराधिकारी पहिला अपरादित्य याने पुढे कदंबांचा पराभव करून हे राज्य परत मिळवल्याची नोंद वडवली ताम्रपटात आली आहे. अपरादित्य हा विद्वान असून याज्ञवल्क्य स्मृतीवरील 'अपरारटीका' नावाचा ग्रंथ त्याने लिहिला. याने विविध राज्यांबरोबरच काश्मीरच्या राजाकडे 'तेजकंठ' नावाचा प्रतिनिधी पाठवल्याची माहिती 'श्री कंठ चारित्र्य' या ग्रंथात उपलब्ध आहे.

परिणामी, तेजकंठाने 'अपरार्कटीका' हा ग्रंथ काश्मीरमध्ये लोकप्रिय बनवला. याच्यानंतर, हरिपालदेव (इ.स. ११४८ ते इ.स. ११५५) राज्य करीत होता व याच्या काळातील ग्रंथात संस्कृतबरोबर मराठी भाषेचा वापर केल्याचे दिसते.

यानंतर मल्लिकार्जुन हा शिलाहार राजा झाला. या काळात, गुजरातच्या साळुंकी राजाबरोबर संघर्ष झाल्याची नोंद मेरुतुंग याने लिहिलेल्या 'प्रबंधचिंतामणी' ग्रंथात आहे. मल्लिकार्जुनानंतर दुसरा अपरादित्य शासक बनला; पुढे दुसरा अनंतदेव, दुसरा केशिदेव (सन १२०० ते सन १२४५) हे कोकणचे शासक झाले. याला पंचेचाळीस वर्षांची प्रदीर्घ कारकिर्द लाभली. याचा यादवांबरोबर संघर्ष झाला. पुढे, तिसऱ्या अनंतदेवाचा उत्तराधिकारी सोमेश्वर हा उत्तर कोकणाच्या शिलाहार शाखेचा अखेरचा शासक ठरला. त्याने 'कोकण चक्रवर्ती' अशी उपाधी धारण केली होती. महादेव यादव याने सोमेश्वराचा पाठलाग करून त्यास समुद्रात बुडवले. सन १२६५ च्या सुमारास झालेल्या



एकसर, बोरिवली (मुंबई) येथील विरगळ शिल्प.

संघर्षाचे चित्रण बोरिवली जवळील 'एक्सर' येथील विरगळ शिल्पशिलांवर आढळते.

पुरी किंवा घारापुरी ही शिलाहारांची प्राथमिक राजधानी होती. चालुक्यांच्या सत्याशयाच्या संघर्षानंतर अपराजित ह्याने ठाणे येथे राजधानी हालविली व ठाणे शहराला शिलाहारांच्या राजधानीचा मान प्रदीर्घ काळ मिळाला.

### दक्षिण कोकणचे शिलाहार

राष्ट्रकूट राजा पहिला कृष्ण याने दक्षिण कोकण जिंकून आपल्या राज्यात समाविष्ट केल्यानंतर 'सनफुल्ल' याची निवड प्रांतिक प्रतिनिधी म्हणून केली. हाच सनफुल्ल दक्षिण कोकण शिलाहार शाखेचा संस्थापक होय. (इ.स. ७६५ ते इ.स.७८५) पट्टणकुडी ताम्रपट (इ.स.९८८) रट्टराजाचा खारेपाटण ताम्रपट आणि बल्लीपट्टण ताम्रपट (अनुक्रमे) इ.स. १००८ ते इ.स.१०१०. या शासनातून या शाखेचा इतिहास उपलब्ध होतो. वा.वि.मिराशी यांनी अशा साधनांद्वारे 'शिलाहार राजवंशाचा इतिहास व कोरीव लेख' या ग्रंथात समग्र शीलाहार राजवंश यांच्या विविध पैलूंवर प्रकाश टाकला आहे. तर महाराष्ट्र शासनाच्या 'प्राचीन इतिहास' या राज्य गॅझिटिअरमध्ये याविषयीची नोंद केली गेली आहे.

'रणफुल्ला' हा सह्याद्री आणि अरबी समुद्रातील गोवा व त्या लगतच्या प्रांताचे प्रशासन चालवत होता. त्याचा उत्तराधिकारी धम्मियार याने बलिपट्टण (बलियत्तन) हे शहर वसविले. तथापि या नगराची नोंद ग्रीक लेखक टॉलेमी आणि बृहत्संहिता या ग्रंथात उपलब्ध आहे. तेव्हा धम्मियार याने या प्राचीन स्थानास राजधानीचा दर्जा देऊन आवश्यक सुधारणा केल्या असाव्यात. बलिपट्टण म्हणजे रत्नागिरी जिल्ह्यातील खारेपाटण असावे. धम्मियारचा उत्तराधिकारी 'अय्यपराज' याने विस्तारवादी धोरण अंगीकारून चंद्रपूर ही गोव्याची राजधानी जिंकली. चंद्रपूर हे 'चांदोर' म्हणून ओळखले जाते. एकूण सत्तासंघर्षाचा परिणाम म्हणून बलिपट्टण या राज्याचा राजधानीचे केंद्र म्हणून विकास झाला. तत्कालीन शिलाशासनाच्या अभ्यासातून लक्षात येते की, अय्यपराजनंतर पहिला उत्तराधिकारी अवसर झाला. यानंतर आदित्यवर्मन व दुसरा अवसर राज्यावर आला. दुसऱ्या अवसराने चेमूल्य (चोल) आणि चंद्रपूर येथील शासकांना मदत केल्याची नोंद उपलब्ध आहे. यानंतर त्याचा पुत्र इंद्रराज हा शासक बनला. त्याचा पुत्र भीम हा पराक्रमी होता. त्याने चंद्रमंडल म्हणजे गोवा परिसर जिंकून आपल्या ताब्यात घेतला. अर्थात, त्याचा संघर्ष गोव्याच्या कदंबांशी झाला, असे दिसते. भीमाचा उत्तराधिकारी तिसरा अवसर हा बुद्धिमान व पराक्रमी होता. त्याने विद्वानांना राजाश्रय दिला. याने आपल्या शिलाशासनातून राष्ट्रकूट वंशावर निष्ठा व्यक्त केल्याचे दिसते. याच्यानंतर, रट्टराज (इ.स.९९५ ते इ.स.१०२४) याला तीस वर्षांची कारकिर्द लाभली. त्याचा संघर्ष चालुक्य सत्तेशी झाल्याचे दिसते. चोल व चालुक्य यांच्या स्थिर संघर्षाचा फायदा घेऊन त्याने चालुक्यांचे आधिपत्य झुगारून दिले होते. याच संघर्षात, दक्षिण कोकणाच्या शिलाहारांची राजवट एकाएकी संपुष्टात आली. गोव्याचे कदंब हे चालुक्य सहावा विक्रमादित्य याचे सोयरे असल्यामुळे पुढील काळात दक्षिण कोकण किंवा कोकण ९०० हा परिसर त्यांच्या ताब्यात गेल्याचे दिसते.

## कोल्हापूरचे शिलाहार

शिलाहारांची दक्षिणेतील तिसरी शाखा म्हणजे कोल्हापुराचे शिलाहार. यांचे राज्य प्रामुख्याने कोल्हापूर, सांगली व सातारा हे तीन जिल्हे आणि कर्नाटकातील बेळगाव जिल्हा येथे सीमित होते. कृष्णा खोऱ्यातील हा देश 'कुंतलदेश' या नावाने ओळखला जातो.

इसवी सनाच्या चौथ्या शतकाच्या मध्यास या प्रदेशावर मानपूरच्या राष्ट्रकूटांची सत्ता होती. पुढे, बदामीचे चालुक्य व त्यानंतर आठव्या शतकात मालखेटच्या राष्ट्रकूटांचे शासन येथे होते. या काळात सिंधु हे शासनप्रमुख असल्याची नोंद मिळते. ते 'करहाटपुरवाराधीश्वर' असे बिरुद धारण करतात. साधारण अकराव्या शतकापर्यंत ते प्रमुख असावेत. प्रारंभिक काळात, कोल्हापूरचे शिलाहार कऱ्हाड येथे वास्तव्य करीत होते, याविषयीची नोंद कोरीव लेखातून मिळते. या शाखेचा संस्थापक जतिग पहिला (इ.स. ९४० ते इ.स.९६०) याने या भागातील सिंधांचे प्रशासन संपवून तेथे आपली सत्ता प्रस्थापित केली, असे दिसते. त्याची प्रारंभिक राजधानी कऱ्हाड असावी. या वंशातील राजेसुद्धा जीमुतवाहनास मूळ पुरुष मानत व 'तगरपुरवाधीश्वर' ही उपाधी धारण करीत. तथापि देवी महालक्ष्मीच्या कृपेने राज्यप्राप्ती झाली, अशी श्रद्धा ही शाखा बाळगत होती. यांच्या तीन राजधान्या राहिल्या. प्रथम राजधानी प्रणालक किंवा पदयनाल, (कोल्हापूरच्या उत्तरेस २० कि.मी, अंतरावर असलेला पन्हाळगड) दुसरी क्षुल्लकपूर म्हणजे सध्याचे कोल्हापूर व तिसरी वलिवाड किंवा वलयवाड ही होय. परंतु या तीन राजधान्या होण्यापूर्वी दुसऱ्या जतिगाच्या काळात कऱ्हाड ही या शाखेची राजधानी असल्याची माहिती बिल्हण कवीच्या विक्रमांकदेव चरितावरून मिळते. सहाव्या विक्रमादित्याची राणी चंद्रलेखा, तिचा पिता कऱ्हाडनिवासी शिलाहार प्रमुख असल्याची नोंद या ग्रंथात आली आहे. हा बहुधा दुसऱ्या जतिगाचा नातू मारसिंह (इ.स. १०५० ते इ.स.१०७५) असावा. चंद्रलेखाच्या स्वयंवरानंतर केव्हातरी, त्याने आपली राजधानी कऱ्हाडहून कोल्हापूर येथे हालवली असावी. प्रारंभिक कोरीव लेखांतून शिलाहारांचे कऱ्हाड येथील वास्तव्य स्पष्ट होते.

मारसिंह हा या शाखेचा मूळ पुरुष पहिल्या जतिगाचा पाचवा वंशज आहे. स्वाभाविकपणे, पहिला जतिग व त्यानंतरचे वंशज हे राष्ट्रकुटांच्या काळात होऊन गेले असावेत. तथापि कोकणच्या शिलाहाराप्रमाणे ते आपणांस राष्ट्रकूटाचे मांडलिक मानत नाहीत. किंबहुना, यांचे राष्ट्रकूटांबरोबर सोयरसंबंध असावेत. ते काही प्रांतांचे शासक असावेत. शिलाहार पहिला जतिग हा गंगराज राज पेर्माडी उर्फ मारसिंह याचा मामा होता. मारसिंहाने राष्ट्रकूट सम्राट तिसऱ्या कृष्णाच्या अनेक उपक्रमांत सक्रिय सहभाग घेतला होता. शिलाहार जतिग यास मारसिंहाने राष्ट्रकूटांकडून शिमोगा जिल्ह्यातील एका प्रांताच्या प्रशासनाचे अधिकार मिळवून दिले होते. जतिगाचा उल्लेख शिमोगा जिल्ह्यातील 'गोमंथ दुर्गाचा अधिपती' असा मिळतो. त्याचा उत्तराधिकारी 'नायिवर्मन्' होता.

त्यानंतर दुसरा जतिग याने सिंधांचा पराभव करून दक्षिण महाराष्ट्रावर आपली सत्ता प्रस्थापित केली. त्याने आपली राजधानी म्हणून प्रथम कऱ्हाडची निवड केली. त्यानंतर पन्हाळगड जिंकून आपल्या राज्याचा दक्षिणेकडे विस्तार केला. हेमचंद्र याच्या 'द्व्याश्रयकाव्या'तून आलेल्या नोंदीप्रमाणे द्वितीय जतिगाने, कोल्हापूरच्या राजाने चौलुक्य नृपती चामुंडराजाला (इ.स. ९९५-१००८) उत्कृष्ट माणकांचा नजराणा पाठविला होता.

द्वितीय जतिगकाचा पुत्र आणि उत्तराधिकारी गोंक याचे वर्णन त्याचा पुत्र मारसिंह याच्या ताम्रपटात आले आहे. तो कऱ्हाड, कुंडी, मिरज देश आणि समग्र कोकण देश यांचा अधिपती होता. यावरून त्याच्या सत्ताविस्तारची कल्पना येते.

गोकाने (इ.स. १०२० ते इ.स. १०५०) चालुक्य राजा दुसरा जयसिंह याला मदत केली. पुढील काळात कोल्हापूरच्या शिलाहारांनी चालुक्यांचे स्वामित्व मान्य केले. कोल्हापूर ताम्रपटात गोकाच्या चंद्रादित्य नावाच्या तिसऱ्या भावाचा उल्लेख आहे. हे तीनही भाऊ शिलाहार राज्यांच्या विविध प्रांतांवर अधिपती नेमले गेले असावे. गोकाचा

उत्तराधिकारी त्याचा मुलगा मारसिंह हा शासक झाला. तो स्वतःला 'महामंडलेश्वर' म्हणवतो. एकूण त्याने स्वतःचे स्वातंत्र्य जाहीर केल्याचे दिसत नाही. चौल आणि चालुक्य यांच्या संघर्षात पहिला सोमेश्वर याने राजराजा चोल याला मारले. तथापि राजराजाचा मुलगा राजेंद्र चोल याने परत विजय मिळवला. कोप्पम येथे आपला विजयस्तंभ उभारला. संकटाच्या वेळी सोमेश्वराने बहुधा शिलाहार मारसिंह याच्या दक्षिण कोकणात आश्रय घेतला असावा. परस्परांवर सत्ता मिळवण्यासाठीचा संघर्ष सतत सुरू होता. मारसिंहाला पाच पुत्र होते. यांपैकी काहींना प्रांतिक प्रशासक म्हणून नेमले असावे.

'द्वितीय गुहल' हा मारसिंहाचा ज्येष्ठ पुत्र (इ.स. १०७५ ते इ.स. १०८५) त्याचा उत्तराधिकारी झाला. शिलाहारांच्या बहुतेक लेखांत दुसऱ्या गुहलनंतर शासक म्हणून पहिल्या भोजाचे नाव येते. तो पराक्रमी व महत्त्वाकांक्षी होता. त्याची निष्ठा चालुक्यांवर होती. त्याने कदंब दुसरा 'शांतिवर्मन' याचा पराभव केला. बीज्जलाचे बंड मोडून काढण्यास त्याला मदत केली. त्याचे इतर पराक्रम म्हणजे वेणुग्रामाचे दहन, कुरंजच्या गोविंदाचा नाश कोकणविजय आणि भिल्लमाची सुटका हे होत. तथापि सततच्या विजयामुळे त्याची महत्त्वाकांक्षा वाढत गेली व त्याने आपला स्वामी चालुक्य सहावा विक्रमादित्य याच्याविरुद्ध बंड केले. परिणाम म्हणून विक्रमादित्याबरोबरच्या लढाईत भोज मारला गेला. याने इ.स. १०८५ ते इ.स. ११०० या काळात राज्य केले. यानंतर त्याचा भाऊ बल्लाळ हा इ.स. ११०० ते इ.स. ११०८ या कालावधीत राज्यावर होता. मारसिंहाचा सर्वांत धाकटा मुलगा बल्लाळ त्याचा उत्तराधिकारी म्हणून इ.स. ११०८ च्या सुमारास राज्यावर आला.

ग्वंडरादित्य याच्या कोरीव लेखात त्याचे लोककल्याणकारी कार्य, धर्माविषयीची श्रद्धा यांविषयी नोंद आली आहे. त्याने बौद्ध, जैन आणि हिंदू देवतांची मंदिरे बांधली व त्यांसाठी भूमिदान केले. शिलाहार दुसरा भोज याने एका कोरीव लेखात आपला पितामह ग्वंडरादित्य याने स्थानक (ठाणे) येथील राजाला त्याची गेलेली सत्ता परत मिळवून दिल्याचा उल्लेख आहे. त्याने चौलांच्या आक्रमणाच्या वेळी आपल्या चालुक्य अधिपतींना मदत केल्याची नोंद मिळते. गंडरादित्याचा उत्तराधिकारी विजयादित्य हा इ.स. ११३८ च्या दरम्यान राज्यावर आला, असे एका शिलालेखातील नोंदीवरून दिसते. विजयादित्याच्या राज्यकाळात चालुक्यसत्तेला उतरती कळा लागली होती. त्याचा फायदा कोल्हापूरच्या शिलाहारांनीही घेतला असेल. बीज्जल कलचुरी याला शिलाहारांनी मदत केली असली, तरी पुढे त्यांचे संबंध बिनसले असावेत. याविषयी विविध लेखांतून परस्पर विरोधी मतांची नोंद होते. विजयादित्यनंतर दुसरा भोज हा राज्यावर आला. त्याने स्वतः 'वीर भोज' अशी उपाधी धारण केली. या राजवंशातील हा सर्वांत शेवटचा आणि पराक्रमी राजा होता. सोमदेवाने जैनेंद्र व्याकरणावरील आपल्या 'शब्दार्णव चंद्रिका' या टीका ग्रंथात भोजाला राजाधिराज, परमेश्वर, परमभट्टारक आणि पश्चिम चक्रवर्ती अशा सार्वभौम राजाच्या उपाधीने गौरविले आहे.

देवगिरीचा यादव राज सिंघण याने चालुक्याच्या प्रदेशावर आक्रमण करून खिद्रापूरजवळ झालेल्या लढाईत भोजाचा संपूर्ण पाडाव केला. पन्हाळगड जिंकून तेथे भोजास बंदिवासात ठेवले. सन १२१२ च्या सुमारास यादवांनी शिलाहारांची सत्ता संपविली.

एक राजवंश म्हणून शिलाहार राजांची सत्ता प्रदीर्घ काळ आहे. समकालीन सत्ताधीशांबरोबर संघर्ष करतानाच त्यांनी स्वतःचे राज्यशासन उत्कृष्टपणे चालविले. त्यांच्या विविध कोरीव लेखांतून तत्कालीन धार्मिक, सामाजिक आणि आर्थिक स्थितीचे चित्रण उपलब्ध होते. साहित्य आणि स्थापत्य यांतील त्यांचे योगदान उल्लेखनीय आहे. ते पाहिल्याशिवाय या राजवंशाचा परिचय पूर्णपणे होणार नाही. महाराष्ट्राच्या इतिहासातील शिलाहारांचे स्थान त्यांच्या लौकिक कामांतून स्पष्ट होते.

### शिलाहारांचे लौकिक कार्य

शिलाहारांनी प्रामुख्याने दोन पद्धतींनी सत्ता राबवली. एक तर त्यांनी लोककल्याणाची कामे करण्यावर भर दिला. यातूनच अपरार्कटीकेत नोंदवलेली बहुतांश सर्व पूर्तकर्मे त्यांनी केली. दुसरे म्हणजे त्यांनी सामूहिक जबाबदारीच्या

तत्त्वावर केलेल्या कारभारामुळे त्यांच्या बहुतांश शिलाशासनात विविध पदाधिकारी, स्थानिक प्रतिष्ठित यांच्या साक्षीने दिलेल्या दानांची नोंद होती. यांनी केलेले सकारात्मक काम केवळ राजवंशापुरते मर्यादित राहिले नाही. तर समाजाच्या सर्व स्तरांत त्याचा प्रभाव जाणवतो.

शिलाहारांच्याच काळात मराठीतील आद्य ताम्रपट उपलब्ध होतो. तो म्हणजे दिवेआगार येथील ताम्रपट (इ.स. १०६०). बहुतेक शिलाशासनात विविध देवस्थानांची दाने आणि वृत्ती दिली असली, तरी हा ताम्रपट स्वतःचे वेगळे अस्तित्व ठेवतो. तो बराचसा वैयक्तिक स्वरूपाचा आहे. दिवेगावातील कोणी वासुदेवभट्टवांय याने आपल्या जवळील स्थितिपुरीची दोन शासने (ताम्रपट) घैसास आणि अन्य एका प्रतिष्ठिताकडे विश्वस्त मंडळाचा योगक्षेम चालविण्यासाठी म्हणून मावलभट्ट यांच्याकडे ठेवले. शिवाय १२७ सुवर्णद्याण त्यांनी दामोदरापाशी ठेवले. ते या गावातील प्रतिष्ठितांच्या साक्षीने वेदविद ब्राह्मणांनी युक्त अशा ‘स्छाना’ म्हणजे सभेच्या योगक्षेमासाठी शासन व सुवर्णाचे दान हे सर्वांच्या साक्षीने दिले आहे. ही बाब तत्कालीन व्यवहारावर प्रकाश टाकणारी आहे. शिलाहार केशिदेव (प्रथम) याचा अक्षी शिलालेख (इ.स.१०१२) याला ऐतिहासिक महत्त्व आहे. ‘पश्चिमसमुद्राधिपती’ व ‘कोकणचक्रवर्ती’ असे बिरुद धारण करणारा हा शिलाहार शासक केवळ सामंत राहत नाही तर तो प्रत्यक्ष ‘सर्वसत्ताधीश’ ठरतो. त्याच्या १६ मे १०१२च्या अक्षीलेखात भुइर्जुवाने (देवीच्या) बोंडनासाठी नऊ कवडी (धान्य) नेमून दिले आहे आणि लुनया कचली (कोरक्या) याने ‘जगात सुख असो!’ अशी कामना व्यक्त केली आहे. पुढील काळातील ज्ञानदेवांच्या पसायदानाचे बीज येथे दिसते. असे शं.गो. तुळपुळे ‘आपल्या प्राचीन मराठी कोरीव लेख’ या ग्रंथात नोंदवतात. यांच्या मते आद्य कालोखित मराठी लेख म्हणून याचा मान वादातीत आहे. या दोन्ही लेखांनंतर शिलाहारांच्या विविध सामाजिक कामांचे तपशील पाहता येतील, अशा अनेक नोंदी उपलब्ध आहेत.

उत्तर कोकणचा छित्तीराज हा विद्वान व कलेचा भोक्ता होता. त्याने अंबरनाथ येथील शिवमंदिराचे बांधकाम सुरू केले. त्याचा कनिष्ठ बंधू मुम्मुणि याच्या काळात ते पूर्ण झाले. या मंदिरावरील लेख हा शक संवत ९८२ श्रावण शुद्ध ९, शुक्रवार (२७जुलै, १०६१) या दिवशीचा आहे. श्रीअंबरनाथ देवकुल अशी नोंद असलेले महाराष्ट्रातील सर्वांत प्राचीन भूमीज मंदिर (सप्तभूम भूमीज प्रासाद) आहे.

याशिवाय खिद्रापूर येथील कोपेश्वर मंदिर शिलाहारांच्या काळात बांधल्याची नोंद आहे. शिलाहार राजा विजयादित्य याचा दण्डनायक बोप्पण याने शत्रूवर विजय मिळवल्याची व त्या आनंदाप्रीत्यर्थ हे काम केल्याची नोंद दिसते. पुढे सन १२११ मध्ये यादव सम्राट सिंघण याने भोजाचा पराभव केला व कोपेश्वर मंदिराचा काही भाग पूर्ण केल्याचे दिसते. याशिवाय आपल्या क्षेत्रात मोठ्या प्रमाणावर मंदिरांची निर्मिती शिलाहार काळात झाली असल्याचे दिसते. ठाणे जिल्ह्यात अंबरनाथ, लोणार, आटगाव, ठाणे शहर, कोल्हापूर जिल्ह्यात कागल, कोल्हापूर शहर, खिद्रापूर, फलटण, अजारा, चांदगड, गडहिंग्लज, इब्राहिमपूर, रत्नागिरी जिल्ह्यात संगमेश्वर, केळेशी यांसारख्या स्थानांवर शिव, विष्णू, सूर्य, देवी-देवता ह्यांच्याशी संबंधित मंदिरे, तर बेळगाव येथे एक मठ व ईश्वरलिंग मंदिर तसेच जैन मंदिर हे सारे यांच्या काळात मोठ्या प्रमाणात उभारले गेले. तत्कालीन मूर्तिशिल्प व शिल्पावशेष शिलाहारांच्या वेगळ्या स्थापत्यशैलीची ओळख करून देतात.

शिलाहार काळातील सर्व साधनांच्या आधारे तत्कालीन जनता पुण्योपार्जन करीत होती, असे दिसते. अनेक मंदिरांची निर्मिती या काळात झाली. ही मंदिरे, बौद्ध (लेणी विहार) तसेच जैन बसती व हिंदू ह्यांची होती. शिवाला समर्पित असलेल्या मंदिरांबरोबरच विष्णू, ब्रह्मा, सूर्य आणि शक्ती यांच्या मंदिरांची निर्मिती केली. जसे गंडरादित्याने इरुकुडी (मिरज तालुक्यातील इरली) येथे ‘गंडसमुद्र’ हा जलाशय तयार केला. मुंबईतील वाळकेश्वर येथील कुण्ड, तसेच संध्यामठ असलेला कोल्हापूर येथील रंकाळा तलाव ही सारी शिलाहारांचीच निर्मिती होती. लहान-मोठ्या विहरी तसेच ‘वाटिकांच्या (फळबागा) आराम’ यांच्या नोंदी अनेक ठिकाणी उपलब्ध आहेत. काही लेखांवरून देवालये व मठ यांना जोडून अन्नसत्रे

होती, त्यांमध्ये मुनी, विद्यार्थी व अभ्यागत यांच्यासाठी आश्रय व भोजन यांची व्यवस्था होई.

डॉ. वा. वि. मिराशी यांनी संपादित केलेल्या एकूण शिलाशासनांचे वर्गीकरण केल्यास पुल्लशक्ती व द्वितीय कपर्दी याचे कान्हेरी लेण्यातील तीन लेख बौद्ध धर्माशी (लेणी, विहार) तर होन्नूर मूर्तिलेख, गंडरिदित्याचा हेर्ले लेख तसेच गंडरादित्याचा कोल्हापूर लेख, विजयादित्याचा कोल्हापूर व बामणी लेख असे सहा लेख जैन धर्मीयांशी संबंधित आहेत. कोल्हापूर येथे 'रूपनारायण' आणि 'त्रिभुवनतिलक' या जैन बसतीची निर्मिती, तसेच खिद्रापूर येथील जैनमंदिर यांची नोंद घ्यावी लागते. ऐहिक बाबींसंबंधीची नोंद जवळपास बारा शिलालेखांतून मिळते.

विशेषतः प्रथम अपरादित्याचा चांजे शिलालेखात धर्म व कायदा यांबाबत राजाला सल्ला देणाऱ्या परिषदेला दिलेल्या दानाचा उल्लेख आहे.

विविध दाने, मंदिरासारख्या वास्तूंची निर्मिती तसेच सिद्धांसाठी मठांची निर्मिती, हे सारे त्यांच्या दैनंदिन गरजांच्या पूर्तीसाठी. याशिवाय व्यापक सामाजिक बांधिलकी त्यातून व्यक्त होते. काही व्रतांची नोंद पाहावयाला मिळते. उदाहरणार्थ तूलादान, गोदान, तृषित पांथस्तांकरिता प्रपा (पाणपोई) घालणे, पुण्यस्थळी ब्राह्मणांचा विवाह करणे, लक्षभोजन घालणे, नंदादीपासाठी दान देणे, यांशिवाय सामूहिकरीत्या करावयाच्या व्रतांत पंचलांगलव्रत म्हणजे कठीण लाकडाचे पाच आणि सोन्याचे पाच असे दहा नांगर, दहा बैल आणि त्यांना नांगरता येईल एवढी जमीन यांचे दान दिले जाई. दुसरे व्रत अग्निष्टिकाविषयीचे. हेमंत व शिशिर ह्या थंडीच्या ऋतूंत केले जाई. मार्गशीर्षातील शुभतिथीपासून विशिष्ट मंत्राने अग्नीचे प्रज्वलन व त्यालगत सतत निवास अपेक्षित होता. लोक अग्नीभोवती बसून विविध बाबींच्या चर्चा करीत. याविषयीची नोंद शिलालेखाप्रमाणेच महानुभव वाङ्मयात, विशेषतः लीळाचरित्रात व स्थानपोथीत आली आहे. स्थानपोथीतील तपशिल पाहता हे स्पष्ट होते की, अग्निष्टिका ही केवळ शेकोटी नव्हती तर ते व्यवस्थित बांधलेले यज्ञकुंड होते.

याविषयीचे एकूण तपशील लक्षात घेऊन शिलाहारांच्या लौकिक कामांचा विचार करता येतो. मारसिंह याच्या मिरज ताम्रपटामध्ये खिळिगिळिदुर्ग (पन्हाळा) याची नोंद आहे. याशिवाय शिलाहारांनी रांगणा, वसंतगड, भूदरगड, पांडव गड, चंदन-वंदन यांसारखे किल्ले बांधले होते. विशेषतः दुसरा भोज शिलाहाराच्या काळात दुर्ग उभारणीस प्राधान्य मिळाले. शिलाहारांनी वसवलेली किंबहुना यांच्या काळात विकसित झालेली किमान दहा नगरे आपणाला दिसतात. स्थानक (ठाणे), चैमुल (चौल), बलिपत्तन (खारेपाटण हे तटबंदीयुक्त नगर होते.) प्रणाल (पन्हाळा), कोल्हापूर (क्षुल्लककर) करघटक (कऱ्हाड), मिरिंजे (मिरज), एडेनाड (कोल्हापूर जवळील एक स्थान), कुंडी (बेळगाव) शिवाय तगर (तेर) यांसारख्या नगरांची नोंद आली आहे. तर विविध विषय मंडल, भोग, देश, खंपनक, षटषष्टिविषय, यांसारख्या प्रशासकीय विभागांची नोंद आहे.

याशिवाय लेखात प्रयाग येथे लक्षभोजनाची व्यवस्था त्यासाठी वृत्ती व पंचलांगल व्रताच्या पारण्यासाठीची व्यवस्था केल्याचे दिसते.

या प्रकारे जवळपास चार शतकांपेक्षा जास्त काळ सत्तेत राहिलेल्या एका महत्त्वपूर्ण राजवंशाची ओळख त्यांच्या विविध शिलाशासने व आनुषंगिक नोंदींतून आपणास मिळते. राजकीय हालचाली हाच एक हेतू न ठेवता त्यांच्या लौकिक कामांचा परिचयसुद्धा महत्त्वाचा ठरतो. (मुख्य आधार- वा. वि. मिराशी यांचा शिलाहार राजवंशाचा इतिहास आणि कोरीव लेख, नागपूर १९७४...) महाराष्ट्र राज्य गॅझेटिअर, इतिहास, प्राचीन काळ, (संपादक अ.शं.पाठक) मुंबई २००२, शं.गो.तुळपुळे, संपादक प्राचीन मराठी कोरीव

लेख, पुणे. १९६३, अ.शं.पाठक, शिलाहारांचे लौकिक स्थापत्य, बृहन्महाराष्ट्र प्राच्यविद्या परिषद, सातवे अधिवेशन, उत्तन, मुंबई. ४ ते ६ मे २००७, विभागीय अध्यक्ष पदावरून सादर केलेला शोधनिबंध)

* * *



# राजघराणी



दौलताबाद येथील चाँदमंदिर

**इ. स. १३४७ साली दक्षिणेत बहमनींचे स्वतंत्र राज्य निर्माण झाले. महाराष्ट्रातील समाजस्थिती, आर्थिक स्थिती आणि संस्कृती यांवर मुसलमानांच्या या सत्तेचे अतिशय दूरगामी असे परिणाम झाले. नवीन राज्यकर्त्यांचा दृष्टिकोन हा जेत्यांचा होता. त्यांची संस्कृती ही महाराष्ट्राला त्या काळापर्यंत परिचित असलेल्या संस्कृतीपेक्षा अगदी वेगळी होती. साहजिकच दोन्ही संस्कृतींमध्ये संघर्ष निर्माण होणे क्रमप्राप्त होते. या संघर्षात येथील संस्कृतीने परकीय संस्कृती आत्मसात करून स्वत्व कायम ठेवले.**

## बहमनी व त्याच्या पातशाह्या

■ **डॉ. सुनील पुरी**

मध्ययुगीन महाराष्ट्राच्या इतिहासाची माहिती देणारी जी फारसी साधने आहेत, त्यात फेरिश्त्यचा ‘गुलशने इब्राहिमी’, सय्यदअली तबतबा याचा ‘बुरहाने मासिर’ आणि रफिउद्दीन शिराजी याचा ‘तजकरत उल मुल्क’ या ग्रंथांचा उल्लेख अव्वल दर्जाची साधने म्हणून करता येईल. वरील ग्रंथांचे लेखक तत्कालीन इतिहासाचे कथन करताना ऐतिहासिक घटनांवरच भर देतात. त्यांच्या लिखाणात तत्कालीन राज्यकारभार, समाजस्थिती, कला व वाङ्मय या बाबींचा फारच थोडा उल्लेख येतो. जे काही उल्लेख येतात, ते केवळ अनुषंगानेच. इ. स. १३४७ साली दक्षिणेत बहमनींचे स्वतंत्र राज्य निर्माण झाले. महाराष्ट्रातील समाजस्थिती, आर्थिक स्थिती आणि संस्कृती यांवर मुसलमानी सत्तेचे अतिशय दूरगामी असे परिणाम झाले. नवीन राज्यकर्त्यांचा दृष्टिकोन हा जेत्यांचा होता. त्यांची संस्कृती ही महाराष्ट्राला त्या काळापर्यंत परिचित

असलेल्या संस्कृतीपेक्षा अगदी वेगळी होती. साहजिकच दोन्ही संस्कृतींमध्ये संघर्ष निर्माण होणे क्रमप्राप्त होते. या संघर्षात येथील संस्कृतीने परकीय संस्कृती आत्मसात करून स्वत्व कायम ठेवले.

## बहमनी राज्याची स्थापना होण्यापूर्वीचा महाराष्ट्र

तेराव्या शतकाच्या उत्तरार्धात देवगिरीच्या यादवांचे राज्य महाराष्ट्रभर पसरले होते. भंडाऱ्यापासून गोवे-वेंगुर्ल्यापर्यंत आणि पश्चिम खानदेशापासून नांदेड-देगलूरपर्यंतचा संपूर्ण प्रदेश एका मराठी राजसत्तेखाली आला होता. यादवांच्या समकालीन दिल्लीत जलालुद्दीन खिलजीचे राज्य होते. त्याचा पुतण्या अल्लाउद्दीन खिलजीने महाराष्ट्रावर स्वारी करून देवगिरीचा राजा रामदेवराय याचा पराभव करून त्यास मांडलिक बनविले होते (१२९६). अल्लाउद्दीनचा मुलगा मुबारक खिलजीने देवगिरीच्या हरपालदेवास ठार मारून यादवांची सत्ता संपुष्टात आणली (१३१८). पुढे दिल्लीमध्ये राज्यक्रांती होऊन तुघलक वंशाची सत्ता स्थापन झाली. या वंशातील सुलतान मुहमद याने आपली राजधानी दिल्लीवरून देवगिरी येथे आणली (१३२७). परंतु दोनच वर्षांनी त्याने राजधानी परत दिल्ली येथे हालवली. दौलताबादचा कारभार पाहण्यासाठी कुतलकखान या सरदाराची नेमणूक केली. सुलतान मुहमद तुघलकाचे वर्चस्व संपूर्ण उत्तर भारत, महाराष्ट्र व दक्षिणेत मदुराईपर्यंत होते.

मुसलमानांची सत्ता उत्तरभारतापुरती मर्यादित होती, तोपर्यंत मध्यआशियातून त्यांच्यात कडव्या मुसलमानांची भरती होत होती व त्यांचा कट्टरपणा जोपासला गेला परंतु त्यांचा दक्षिणेत प्रवेश झाल्यावर त्यांच्या धर्माचे व राज्यकारभाराचे स्वरूप बदलत गेले. अपरिचित प्रदेश व भिन्न भाषा यांतील वावरामुळे उत्तरेतील मुसलमानांचे व त्यांचे नाते तुटत चालले होते. हिंदूंचे आचारविचार त्यांना ग्राह्य धरावे लागले. हिंदू स्त्रियांशी वैवाहिक संबंध आल्यामुळे त्यांच्यावर हिंदू राहणीमानांचा परिणाम झाला. त्यामुळे दिल्ली दरबारच्या ताब्यात राहणे त्यांना असह्य होऊ लागले. ही वास्तुस्थिती दिल्ली दरबारने समजून घेतली नाही, त्यातूनच ते आपली मुक्तता करण्यास उत्सुक झाले. त्याशिवाय दक्षिणेतील मुसलमान प्रामुख्याने शियापंथीय होते. सुलतानाचा मामेभाऊ बहाउद्दीन गुर्शास्प (इ.स.१३२७), बिदरचा सुभेदार नुसरतखान (इ. स. १३३७), त्यानंतर अलीशाह नत्थू (१३४०) यांनी दक्षिणेत बंड केले. दक्षिणेतील या बंडाचा पाडाव दौलताबादचा सुभेदार कुतलघखानाने केला होता.

याच सुमारास दक्षिणेत विजयनगरच्या हिंदू राज्याची स्थापना झाली होती (इ. स. १३३६). दक्षिणेतील या बंडाळीस तेथील सरदार कारणीभूत आहेत, असे वाटून मुहम्मद तुघलकाने त्या सर्व सरदारांना दिल्ली येथे येण्यास फर्मावले व त्यांच्याजागी नवीन उमरावांच्या नेमणुका केल्या. याचा परिणाम उलटा झाला. मुहम्मद तुघलकाचे जुलूम व दररोज सुटणारे नवीन हुकूम ह्यांच्या योगाने अनेक वर्षांपासून दक्षिणेतील मुसलमानांच्या मनामध्ये धुमसत असलेल्या असंतोषात भर पडली. जुन्या सरदारांनी उत्तरेत जाण्याचे नाकारले. एवढेच नव्हे, तर इ. स. १३४६ मध्ये मुहम्मद तुघलकाविरुद्ध बंड करून त्यांनी दक्षिणेत स्वतंत्र राज्य स्थापन केल्याची घोषणा केली. त्यांना स्थानिक राजांनी मदत केली. सुलतानपदासाठी आपल्यातील एक सरदार इस्माईल मुख याची निवड केली. दक्षिणेतील या बंडाळीचा बिमोड करण्यासाठी सुलतान स्वतः दौलताबाद येथे आला. त्याने बंडखोर सरदारांचा पराभव केला. बंडखोरांनी दौलताबादच्या किल्ल्यात आश्रय घेतला. दरम्यान दिल्ली येथे बंड उद्‌भवले व सुलतान मुहम्मद परत दिल्लीला गेला. त्याचा फायदा घेऊन हसन गंगू उर्फ जफरखान याने सुलतानाच्या फौजेवर हल्ला केला व तिचा संपूर्ण बिमोड केला. इस्माईल शहाने दौलताबाद किल्ल्याच्या बाहेर येऊन हसन गंगूचे मोठ्या थाटाने स्वागत केले. त्याच वेळी इस्माईल शहाने राजत्याग करून जफरखान उर्फ हसनगंगूची सुलतानपदी निवड केली. हसन गंगूचा गुरू शेख सिराजुद्दीन जुनैदी याच्या हस्ते दौलताबाद (देवगिरी) येथे कुतुबुद्दीन मुबारकशहा खिलजी याच्या मशिदीत राज्यारोहणविधी झाला. अशा रितीने दक्षिणेत दौलताबाद येथे एका नवीन मुस्लीम सत्तेची स्थापना झाली.

या घराण्यातील अठरा सुलतानांनी एकदंरीत १९१ वर्षे राज्य केले. यांपैकी पहिल्या आठ सुलतानांनी

(इ. स. १३४७ ते १४२२) गुलबर्गा येथून राज्य केले व नंतरच्या दहा सुलतानांनी बिदर येथून राज्य केले (इ. स. १४२२ ते १५३८). असे असले, तरी हे बहमनी राज्य खऱ्या अर्थाने इ. स. १३४७ पासून १४८२ पर्यंत टिकले. त्यांचा वजीर महमूद गावानच्या वधानंतर बहामनीच्या पाच प्रांतीय सुभेदारांनी स्वतंत्रपणे वागण्यास सुरुवात केली. १४९० मध्ये जुन्नर, विजापूर, बऱ्हाड येथील सुभेदारांनी आपले स्वातंत्र्य जाहीर केले होते. इ. स. १४८२ ते १५३८ या काळातील बहामनी सुलतानावर बरिदशहाचे वर्चस्व होते. आजचा महाराष्ट्र बहमनी सत्तेच्या अमलाखाली होता. महाराष्ट्राच्या दृष्टीने नऊ बहमनी सुलतानांची कारकिर्द महत्त्वाची ठरते. त्याचा थोडक्यात आढावा पुढीलप्रमाणे आहे.

## बहमनी साम्राज्य गुलबर्गा कालखंड (इ. स. १३४७ ते इ. स. १४२२)

बहमनी राज्याचा संस्थापक व बहमनी वंशाचा मूळ पुरुष अल्लाउद्दीन हसन बहमनशहा हा हसन गंगू या नावाने इतिहासात प्रसिद्ध आहे. याचा जन्म आणि पूर्वायुष्य यांबद्दल चरित्रकारांत मतभेद आहेत. इराणचा एक प्राचीन राजा बहमन याचा हा वंशज म्हणून त्याला बहमनशहा हे नाव मिळाले अशी आख्यायिका आहे. पण ती आख्यायिका, हसन गंगू सुलतान झाल्यानंतर त्याच्या स्तुतिपाठकांनी रचली आहे, असे फेरिस्ता म्हणतो. त्याच्या मते जाफरखान हा गंगू ब्राह्मण ज्योतिष्याचा (पाथरा, जिल्हा परभणी) नोकर होता व ब्राह्मण याचा अपभ्रंश करून त्याने बहमन हे नाव आपल्या कुळाला लावले. गंगू ब्राह्मणाच्या भविष्यकथनाप्रमाणे हसन सुलतान झाला. सुलतानपद मिळाल्यानंतर हसनने गंगू हे नाव धारण करावे. ही गंगू ब्राह्मणाची इच्छा त्याने पूर्ण केली.

राज्याभिषेक झाल्यावर हसन गंगूने सुलतान अल्लाउद्दीन-हसन-शहा अलवली ही पदवी घेतली. त्याने ३ ऑगस्ट १३४७ ते ११ फेब्रुवारी १३५८ या काळात राज्य केले. त्याने स्वतःच्या नावाची नाणी पाडली. सिंदखेडच्या जाधव घराण्यातील गोविंददेवाने हसन गंगूस राज्य स्थापण्यात मदत केली. गोविंद देवाने बागलाण प्रदेश आपल्या ताब्यात घेतला. (त्याचा मुलगा ठाकूरजी हा सिंदखेडच्या बाजूच्या प्रदेशात देशमुख वतन संपादून राहू लागला. परंतु पुढे बहामनी राज्यात त्याचा टिकाव लागला नाही.) हसनने हिंदू जमीनदारांना सुरक्षिततेची हमी दिली. त्याचा सरदार हुसेन गुर्शास्पने कंधारचा किल्लेदार इक्राजचा पराभव करून हा किल्ला ताब्यात घेतला. इ. स. १३५० च्या सुमारास अल्लाउद्दीनने गुलबर्ग्याचे अहसनाबाद असे नामकरण करून त्यास राजधानीचा दर्जा दिला. मुधोळच्या नारायण व गोपाळ या सरदारांनी सुलतान अल्लाउद्दीन यास विरोध केला. या मोहिमेत मेवाडचा सजनसिंह व त्याचा पुत्र दिलीपसिंह यांनी सुलतानास साह्य केले. त्याबद्दल सुलतानाने त्यांना ४ नोव्हेंबर १३५२ रोजी दौलताबादजवळील १० गावांची जहागिर दिली आणि सरदार-इ-खासवेल ही पदवी दिली. सजनसिंह १३५२ मध्ये मरण पावला. अल्लाउद्दीनने गोवा, दाभोळ व कोकण किनारपट्टीवरील इतर बंदरे, कऱ्हाड व कोल्हापूर ह्या भागांवरही वर्चस्व मिळविले. (ही मोहीम त्याने विजयनगर राज्याची थकलेली खंडणी वसूल करण्यासाठी काढली असावी.) अल्लाउद्दीनने वऱ्हाडमधील माहूरवरही वर्चस्व मिळविले होते.

सुलतान अल्लाउद्दीन हसन गंगूच्या मृत्युसमयी त्याचा साम्राज्य विस्तार मुख्यतः सर्व महाराष्ट्रदेश व्यापून होता. उत्तरेस मंडूपासून ते दक्षिणेस रायचूरपर्यंत आणि पूर्वेस भोगीरपासून तो पश्चिमेस दाभोळ-गोव्यापर्यंतच्या कोकणपट्टीवर बहमनींचा साम्राज्यविस्तार झाला होता. बहमनी राज्याच्या सरहद्दीवर माळव्यात व खानदेशात नवीन मुस्लीम सत्ता स्थापन झाल्या होत्या. इतर बाजूंना हिंदू राज्ये होती आणि बहमनी राज्याची प्रजा प्रामुख्याने हिंदू होती.

सुलतान अल्लाउद्दीनाने आपल्या राज्याची विभागणी चार प्रांतांत (तरफ) केली होती. त्यावर मसनद-इ-अली, मजलीस-इ-अली, आजम हुमायून व मलीक नायब हे अधिकारी नेमले. १) अहसनाबाद-गुलबर्गा, रायचूर, मुद्गल हा प्रांत वजीर मलिक सैफुद्दिन घोरी याच्या ताब्यात दिला. २) दौलताबाद, बीड, जुन्नर आणि पैठण यांमधील व समुद्रकिनाऱ्यावरील चौल बंदराचा समावेश असलेला मराठी प्रदेश आपला पुतण्या मुहम्मद बीन अलिशाह याच्या

ताब्यात दिला. ३) वऱ्हाड व माहूर हा प्रदेश सफ्दारखान सिस्तानी याच्या ताब्यात होता. (वऱ्हाड प्रांताची विभागणी उत्तर व दक्षिण अशा दोन भागांत करून, उत्तर वऱ्हाडची राजधानी एलीचपूर (अचलपूर) आणि दक्षिण वऱ्हाडची राजधानी माहूर होती.) ४) इंदूर, कैलास, बोधन व तेलंगणाचा भाग याचा एक प्रांत करून तो आज्जम हुमायन याच्या ताब्यात दिला. यावरून बहामनीच्या ४ प्रांतांपैकी दोन प्रांत महाराष्ट्रात होते. ही राज्यव्यवस्था १०० वर्षे टिकली.

सुलतान अल्लाउद्दीनने बिगर मुस्लिमांवरील जिझिया कर रद्द केला. आपल्या राज्यात धान्य, गुरे–ढोरे यांवर करमुक्त आयात करण्याची परवानगी दिली. ४ फेब्रुवारी १३५२ रोजी वेरूळ लेण्यास भेट देताना त्याने तेथील लिपी वाचता येणारे लोक बरोबर घेतले होते.

अल्लाउद्दीन हसननंतर मुजहिदशहा उर्फ मुहम्मदशहा बहामनी पहिला याने १ फेब्रुवारी १३५८ ते ११ एप्रिल १३७५ या काळात राज्य केले. त्याने आपल्या नावाची नाणी पाडली. पूर्वी लष्करी तत्त्वावर झालेली राज्याची विभागणी बदलून त्याने ती मुलकी तत्त्वावर केली. त्याच्या काळात दौलताबादचा सुभेदार बहराम मंझिदाराने बागलणच्या कुंभदेवाच्या मदतीने केलेले बंड अयशस्वी झाले व ते दोघेही दौलताबादाचा सुफी शेख ऐनुद्दीनच्या सल्ल्याने गुजरातमध्ये पळून गेले. या सुलतानाच्या काळापासून विजयनगरच्या राज्याबरोबर सुरू झालेले संघर्ष अव्याहत चालले. विजयनगरच्या लढाईत बहमनींनी तोफा व दारूगोळा यांचा प्रथमच वापर केला आणि युरोपिअनांनी प्रथमच युद्धात भाग घेतला.

पहिल्या मुहम्मदशहानंतर अल्लाउद्दीन मुजहिदने अल्पकाळ राज्य केले. (२१ एप्रिल १३७५ ते १६ एप्रिल १३७८). राज्यारोहणानंतर त्याने दौलताबाद येथील शेख बुऱ्हाणउद्दीन याच्या दर्ग्याचे दर्शन घेण्यासाठी यात्रा केली. तेथे त्याने शेख जैनुद्दीन याला आपला आध्यात्मिक गुरू केले. हा सुलतान तुर्की व फारसी भाषेत निपुण असून उत्तम घोडेस्वार होता. बहमनी कुळात सर्वांत देखणा असून तो अतिशय ताकदवान होता म्हणून त्यास बलवंत असे नाव मिळाले.

यानंतर पहिला दाऊदशहा हा सुलतान झाला परंतु लवकरच त्याचा खून झाला. (१६ एप्रिल १३७८ ते २१ मे १३७८). त्यानंतर गादीवर आलेला दुसरा मुहम्मद याने २१ मे १३७८ ते २० एप्रिल १३९७ या काळात राज्य केले. याच्या काळात दौलताबादचा सुभेदार आजमहुमायून तर व माहूरचा सुभेदार सफदरखान हे होते. हा सुलतान फारसी व अरबी भाषांमध्ये निपुण होता. इराण व अरबस्तान येथील अनेक कवींनी या काळात गुलबर्गा येथे आश्रय घेतला. सुलतानाने गुलबर्गा, बिदर, कंधार, एलिचपूर, दौलताबाद, चेऊल, दाभोळ व इतर शहरांमध्ये अनाथ मुलांचे संगोपन करणाऱ्या शाळा सुरू केल्या व त्यांना अनुदान दिले. राज्यातील अंध व्यक्तींना मदत केली. धर्मग्रंथांचे विवरण करणाऱ्या पंडितांच्या नेमणुका केल्या. या काळात महाराष्ट्रात मोठा दुष्काळ पडला. हाच १२ वर्षांचा दुर्गादेवीचा प्रसिद्ध दुष्काळ होय (सन १३९६ ते १४०८). सुलतानाने माळवा व गुजरात येथून धान्य आणून ते अल्प किमतीत विकले, अशी नोंद आहे.

दुसरा मुहम्मद यानंतरच्या सात महिन्यांत सुलतान घियासुद्दीन तहम्तान (२० एप्रिल १३९७ ते १४ जून १३९७) व त्याचा भाऊ शमसुद्दीन दाऊद बहमनी (११ जून १३९७ ते ११ नोव्हेंबर १३९७) यांनी राज्य केले व त्यानंतर आलेल्या सुलतान ताजुद्दीन फिरोजशहाने १६ नोव्हेंबर १३९७ ते २८ सप्टेंबर १४२२ पर्यंत राज्य केले. याच्या कारकिर्दीत बहमनींचे राज्य वैभवाच्या शिखरावर होते. याच्या काळात हिंदू राजांवर एकूण २४ मोहिमा काढण्यात आल्या. १३९९ मध्ये वऱ्हाड प्रांतातील माहूरवर खेडल्याचा राजा नरसिंगरायाने आक्रमण केले होते. फेरोजशहाने त्यास पराभूत करून अल्लाउद्दीन हसन गंगू बहमनीने ठरवून दिलेली खंडणी देण्यास भाग पाडले. १४०७ मध्ये त्याने खगोलशास्त्राला उत्तेजन देण्यासाठी दौलताबादजवळ वेधशाळा बांधली होती. त्याने पश्चिम किनाऱ्यावरील चौल व दाभोळ बंदराची सुधारणा केली.

फिरोजशहा स्त्रियांच्या बाबतीत अतिशय लंपट होता. तो दरवर्षी जगातील विविध देशांतून अनेक वस्तू खरेदी करत असे. त्यास अनेक भाषा अवगत होत्या. अनेक देशांतील विद्वानांना बोलावून तो त्यांच्याशी विविध विषयांवर चर्चा

करून अनेक विषयांवरील व्याख्याने ऐकत असे. भीमा नदीच्या काठावर त्याने फिरोजाबाद नावाचे नगर वसविले. रुंद रस्ते, किल्ला, भव्य राजवाडे निर्माण करून त्या ठिकाणी नदीपासून कालवे खोदून पाण्याचा भरपूर पुरवठा केला. याच्या काळात सुप्रसिद्ध अवलिया ख्वाजा गीसू दराज दक्षिणेत आला (सन १४००). सुरुवातीस त्याची फिरोजशहावर मर्जी होती. त्यानंतर गीसू दराजने सुलतानाचा भाऊ अहमद याचा पक्ष घेतल्यामुळे त्यांच्यात बिनसले. इ. स. १४२२मध्ये फिरोजशहाने राजत्याग करून त्याचा भाऊ अहमद यास गादी दिली.

## बिदर कालखंड (इ. स. १४२२ ते इ. स. १५३८)

सुलतान फिरोजशहानंतर सुलतान शियाबुदद्दीन अहमद याने २२ सप्टेंबर १४२२ ते १७ एप्रिल १४३६ या कालावधीत राज्य केले. सय्यद गीसू दराज यास त्याने गुरुस्थानी मानले. गादीवर येण्यासाठी मदत केलेल्या खलप हसन या सरदारास आपल्या राज्याचा वकील-उस-सल्तनत या पदावर नेमले. बेदारनिजाम-उल-मुल्क यास दौलताबादच्या व अब्दूल कादर यास वऱ्हाडच्या सुभेदारीवर नेमले. गुजरात सीमेवर मोठी फौज तयार ठेवली. १४२५मध्ये माहूर येथील बंडखोरांचा बंदोबस्त केला. गोंडवनातील कळंब येथील हिऱ्याची खाण ताब्यात घेतली. त्याने गावील व नरनाळ्याचा किल्ला दुरुस्त करून त्याचे मजबुतीकरण केले व त्या ठिकाणी शाही सुविधा वाढविल्या. महाराष्ट्रातील कोकण किनारपट्टीवर बहमनी सत्तेस होणारा विरोध बहमनीचा वजीर खलप हसन (मलीक उत् तुज्जार) याने इ. स. १४२९ मध्ये दादो नरसो काळे या ब्राह्मणाच्या मदतीने मोडून काढला (खटाव प्रांतातील उठाव). दादो नरसो याने तेथील मुलखाची वसाहत करून वसुलीची चांगली व्यवस्था करून दिली (इ. स. १४२७-१४३९). याच मोहिमेत गुजरातच्या ताब्यातील माहीम बेट घेतले. झालेल्या संघर्षात बहमनींचा पराभव झाला. याच्या काळातच खाजा जहान, दाभोळ येथे आला. हाच पुढे महमूद गावान या नावाने प्रसिद्ध झाला. सुलतान शियाबुद्दीनने इराणमधून आलेल्या शहामुहिब उल्ला यास जहागिरीदाखल बीडचा भाग दिला व राजपुत्र अल्लाउद्दीन याच्या मुलीचा विवाह त्याच्याशी लावून दिला. आपल्या राज्याची विभागणी करून सुलतानाने राजपुत्र अल्लाउद्दीन यास वारस नेमले. दुसरा राजपुत्र महमूद खानाकडे रामगीर, माहूर, कळंब आणि वऱ्हाडचा काही भाग दिला. राजपुत्र दाऊदखानकडे तेलंगणाचा प्रदेश सोपविला. याच्या काळातच बहमनी साम्राज्याची राजधानी गुलबर्ग्याहून बिदर येथे हालविण्यात आली (१४२२-२३). बिदर येथे किल्ला बांधण्यात आला (१४३२). या काळात दक्षिणेत दुष्काळ पडला. पाऊस न पडल्यामुळे पाण्याअभावी गुरेढोरे पावली. लोकांनी बंडखोरीला सुरुवात केली. सुलतानाने सरकारी धान्यकोठारे खुली केली. तसेच सैन्याच्या पगारात वाढ केली.

यानंतर सुलतान अल्लाउद्दीन शहा बहमनी (दुसरा) याने १७एप्रिल१४३६ ते ६मे १४५८ या काळात राज्य केले. कोकणातील राजांनी नेहमीच बहमनींना प्रतिकार केल्याचे दिसून येते. १सप्टेंबर १६३६ मध्ये बहमनीचा सरदार दिलावरखानने कोकणातील संगमेश्वर येथील राजाचा पराभव केला. असे असले, तरी या प्रदेशातील धोका कमी झाला नव्हता; म्हणून सुलतानाने दौलताबादचा सुभेदार खलप हसन (मलीक उत् तुज्जार) यास ७००० हजार पायदळ व ३००० अरबी घोडेस्वार देऊन कोकण प्रांतातील उठाव मोडून काढण्यास सांगितले. त्याने चाकण, जुन्नर घेऊन कोकणातील बहुतेक सर्व राजांस पराभूत केले. परिणामी कोकणातील शंकरराव शिर्के याने संगमेश्वर येथील राजाशी संगनमत करून खलप हसन याची दिशाभूल केली. त्यास घनदाट जंगलात नेले व त्याच्या ७००० सैनिकांची कत्तल घडवून आणली. या भीषण पराभवामुळे बहमनी सैन्यातील परदेशी व दक्षिणी मुसलमानांमधील वादास चालना मिळून चाकण येथे परदेशी मुसलमानांची मोठ्या प्रमाणावर कत्तल करण्यात आली. यातून वाचलेल्या परदेशी मुसलमानांना बीडचा जहागीरदार हसनखान याने मदत केली. त्यानंतर कासीम बेग यास दौलताबाद व जुन्नर भागांवर नेमण्यात आले.

अल्लउद्दीन अहमदशहाने राजधानी बिदर येथे गोरगरिबांसाठी मोठे रुग्णालय बांधले. या रुग्णालयात मुसलमान हकीम आणि हिंदू वैद्य यांच्या नेमणुका केल्या.

आपल्या राज्यकारभारात बिगर मुस्लिमांना कोणत्याही मुलकी जागेवर प्रवेश दिला नाही. या सुलतानाच्या काळातच दौलताबाद येथील चाँद मिनार बांधल्याचे सांगितले जाते (१४४५). काही विद्वानांच्या मते त्याची निर्मिती सुलतान अहमदशहाच्या काळात १४३६ मध्ये झाली. सुलतान अल्लाउद्दीनच्या मृत्यूनंतर हूमायूनशहाने ७ मे १४५८ ते ४ सप्टेंबर १४६१ ह्या काळात राज्य केले. या काळात त्याने माणुसकीला काळिमा आणणारी अनेक कृत्ये केली. त्यामुळे इतिहासकारांनी त्यास 'जुलूमशहा' ही पदवी दिली. त्याचा भाऊ राजपुत्र हुसेनखान याने हबिबउल्ला याच्या साह्याने बंड केले व बीड शहर व आजूबाजूचा प्रदेश आपल्या ताब्यात घेतला. परंतु हे बंड अयशस्वी झाले. तो विजयनगरच्या राजाकडे मदतीसाठी जात असताना विजापूरचा सुभेदार सिराजखान जुनैदीने त्यास पकडले. सुलतानाने त्याचा वध केला.

त्यानंतर सुलतान निजामुद्दीन अहमद याने ४ सप्टेंबर १४६१ ते ३० जुलै १४६३ या काळात राज्य केले. १४६२ मध्ये माळव्याचा राजा महमूद खिलजीने ओरिसाचा राजा कपिलेश्वराची मदत घेऊन बहमनी राज्यावर आक्रमण केले. नांदेड जिल्ह्यातील कंधार येथे झालेल्या लढाईत बहमनी सैन्याचा पराभव झाला. राजधानी बिदरला वेढा पडला. गुजरातचा सुलतान महमूद पहिला हा या बिकट प्रसंगी बहमनीच्या मदतीस आला. महमूद खिलजीने कल्याणी, गोंडवन, एलिचपूर, आकोटमार्गे माघार घेतली. त्यात त्याची सहा हजार फौज गारद झाली. या सुलतानाच्या काळात परदेशी व दक्षिणी मुसलमानांमध्ये असंतोषाची भावना जोर धरू लागली.

त्यानंतर सुलतान शम्सुद्दीन मुहम्मद (तृतीय) याने बहमनीच्या गादीवर ३० जुलै १४६३ ते २६ मार्च १४८२ ह्या कालावधीत राज्य केले. इतिहासात तो 'लष्करी' या नावाने प्रसिद्ध आहे. बहमनी राज्यातील दक्षिणी व परदेशी मुसलमानांच्या असंतोषाची दखल घेऊन वजीर महमूद गावानाने अधिकारांची सारखी विभागणी केली. वऱ्हाडच्या सुभेदारीवर फता उल्ला यास इमाद-उल-मुल्क असा किताब देऊन, मलिक हसन यास निजाम-उल-मुल्क ही पदवी देऊन तेलंगणावर व युसुफ आदिलखान याची दौलताबाद, जुन्नर आणि चाकण या प्रांतांवर नेमणूक केली. १४६९ मध्ये सुलतानाने महमूद गावान यास कोकणच्या मोहिमेवर पाठविले. महाराष्ट्राच्या इतिहासात या मोहिमेचे अतिशय महत्त्व आहे. (यापूर्वी कोकणच्या मोहिमेत बहमनीचा सेनापती मारला गेला होता.) कोकणातील खेळण्याचा राजा शंकररायाकडे ३०० गलबतांचे आरमार होते. सह्याद्री माथा शत्रूला अजिंक्य असल्याचे महमूद गावानने आपल्या पत्रांमध्ये वर्णिले आहे. या प्रदेशाची तुलना इराणमधील तजरिस्तान व दमावंद या प्रसिद्ध पर्वत श्रेणींशी केली आहे. (महमूद गावानचा हा पत्रसंग्रह 'रियाजूल इन्शा' या नावाने प्रसिद्ध आहे.) कोकणच्या या मोहिमेत ५० लहानमोठ्या लढाया झाल्याचे सय्यद अली सांगतो. रांगणा (१९ जुलै १६७०), माचाळ (१४ जानेवारी १४७१) जिंकून १४७१ मध्ये खेळण्यावर स्वारी केली. या मोहिमेत मुधोळचा कर्णसिंह आणि त्याचा पुत्र भीमसिंह यांनी घोरपडीच्या साह्याने किल्ल्यामध्ये प्रवेश करून किल्ला जिंकला. (सिसोदिया वंशातील दक्षिणेत आलेल्या क्षेमसिंह व सजनसिंह यांपैकी सजनसिंहाने बहामनी संस्थापक हसन गंगूस मदत केली होती. सजनसिंह १३५२ मध्ये मरण पावला. त्याचा पाचवा वंशज उग्रसेन यास कर्णसिंह व शुभकृष्ण ही दोन मुले होती. यांपैकी शुभकृष्णास वेरूळ वगैरे वतन प्राप्त होऊन त्याच्या वंशाजास भोसले नाव मिळाले. शुभकृष्णाचा तिसरा वंशज बाबाजी भोसले होय. कर्णसिंहाने खेळणा किल्ला हस्तगत केला होता.) यात कर्णसिंह मरण पावला. त्याच्या मुलास म्हणजेच भीमसिंह यास 'राजा घोरपडे बहादूर' हा किताब व मुधोळजवळ ८४ गावांची जहागिरी दिली. तेव्हापासून भीमसिंहाच्या वंशजास घोरपडे हे आडनाव प्राप्त होऊन त्याचे वास्तव्य मुधोळास झाले.

त्याच्या जहागिरीमध्ये रायबागपासून वाईपर्यंतचा प्रदेश व किल्ले मोडत होते. शिवकाळात घोरपडीच्या साह्याने सिंहगड जिंकला त्या अगोदर २०० वर्षांपूर्वीची ही घटना आहे. यानंतर महमूद गावानने विजयनगरच्या ताब्यातील गोवा बंदर जिंकले. गोव्याच्या मोहिमेत खूशकदम या सेनापतीची खूप मदत झाल्याने त्याला किश्वरखान हा किताब देऊन गोवा, फोंडा, कंदवल, कोल्हापूर हा भाग

जहागिरीदाखल देण्यात आला. या काळातच युसुफ आदिलशहाने अंतूरचा किल्ला जिंकून घेतला. वैरागडचा राज विजीसिंग याने दर्या इमादेशहासमोर शरणागती पत्करली. महमूद गावानने हिंदू सरदारांची मदत घेऊन अवैध मार्गाचा अवलंब केला व बहमनी सत्तेचे पूर्ण महाराष्ट्रावर वर्चस्व प्रस्थापित केले.

इ.स.१४६८ ते १४७५ या काळात महाराष्ट्रात भयंकर दुष्काळ पडला होता. वाई येथील देशपांडे घराण्यातील शके १३९६मधील कागदपत्रांवरून या दुष्काळाच्या घटनेस पुष्टी मिळते. या दुष्काळामुळे शहरे ओस पडली. अनेक लोक मृत्युमुखी पडले. त्यामुळे लोकसंख्या कमी झाली. अनेकांनी माळवा व गुजरात प्रांतांत स्थलांतर केले. याच दुष्काळात दामाजीपंताने मंगळवेढ्यातील गोरगरिबांकडून धान्याची कोठारे लुटली असावी. गावानने दक्षिणी व परदेशी मुसलमानांमधील वैर शमविण्याचाही प्रयत्न केला. परंतु असंतुष्ट दक्षिणी मुसलमानांचा नेता मलिक हसन निजाम-उल-मुल्क याने गावानचा खून घडवून आणला. (५एप्रिल १४८१). बहमनी राजवटीतील तो अखेरचा कर्तृत्ववान वजीर होता.

### बहमनीचे शेवटचे दिवस

वजीर महमूद गावानच्या वधाचा बहमनी राज्याच्या स्थैर्यावर अतिशय विपरीत परिणाम झाला. सुलतान महमूद पश्चात्तापाने मरण पावला. त्याच्यानंतर गादीवर आलेल्या सुलतान शियाबुद्दीन महमूद याने २६मार्च १४८२ ते २७डिसेंबर १५१८ या कालावधीत राज्य केले. अल्पवयीन सुलतानास आपल्या वर्चस्वाखाली ठेवण्याचा प्रयत्न अनेक सरदारांमध्ये होऊ लागला. या सर्वांमध्ये इमाद-उल-मुल्क, निजाम-उल-मुल्क, युसुफ आदिलखान, कुली कुतुबशहा आणि कासीम बरीद हे होते. निजाम-उल-मुल्क मलीक नायब म्हणून राज्यकारभार पाहत होता. पण त्याचाही खून झाला. त्यामुळे बिदरचा राज्यकारभार राजधानीचा कोतवाल कासीम बरीद या परदेशी मुसलमान सरदाराकडे गेला. या वेळी बीड व जुन्नर भागांवर निजाम-उल-मुल्कचा मुलगा मलीक अहमद याचा ताबा होता. मलीक वुजी व मलीक अश्रफ या दोन भावांना दौलताबादच्या सुभेदारीवर नेमण्यात आले. मउदूमखान उर्फ ख्वाजा जहाज दक्नी याच्याकडे परंडा व सोलापूर किल्ल्यांचे अधिकार दिले. इ.स.१४८६ मध्ये बहादूर गिलानी याने गोवा, दाभोळ, कोल्हापूर, पन्हाळा, शिराळा, बेळगाव, चौलबंदर व गुजरातच्या ताब्यातील माहीमचा भाग हे सारे ताब्यात घेऊन बंड पुकारले. मिरज येथे झालेल्या लढाईत बहादूरखान मारला गेला. १४९०पासून इमाद-उल-मुल्क मलीक अहमद, युसुफ आदिलखान यांनी बहमनीपासून स्वतंत्र होऊन राज्यकारभार पाहण्यास सुरुवात केली होती. बिदरच्या सुलतानावर कासीम बरीदचे वर्चस्व राहिले. तो सुलतानाच्या नावाने प्रत्येक सरदारास हुकूम सोडत असे. इ.स.१५१८मध्ये सुलतान शियाबुद्दीन महमूदशहानंतर बहमनी राज्याचे विभाजन पूर्ण झाले. त्यानंतरच्या चार सुलतानांनी १५३८ पर्यंत राज्य केले. सुलतान चौथा अहमद (२७ डिसेंबर १५१८ ते १५ डिसेंबर १५२०) त्यानंतर सुलतान अल्लाउद्दिन शहा (२८ डिसेंबर १५२० ते ५ मार्च १५२३), सुलतान वलिउल्ला (५ मार्च १५२३ ते १५२६) व सुलतान कलिमुल्ला (१५२६ ते १५३८). शेवटच्या बहमनी सुलतानावर बरीदशाहीचे पूर्ण वर्चस्व होते. सुलतान कलिमुल्ला याने १५२६मध्ये बाबर या मोगल बादशहाची मदत मागितली व त्या मोबदल्यात दौलताबादचा व वऱ्हाडचा प्रांत देण्याचे कबूल केले. परंतु बाबराने त्यास प्रतिसाद दिला नाही. अमीर बरीदच्या छळामुळे सुलतान कलिमुल्ला विजापूरच्या इस्माईल आदिलशहाकडे पळून गेला. तेथून तो अहमदनगरच्या बुरहाण निजामशहाकडे आश्रयास गेला व तेथेच तो मरण पावला. १९१ वर्षे चाललेले बहमनी घराणे त्याच्या मृत्यूबरोबर संपुष्टात आले. परंतु वस्तुस्थिती म्हणजे त्याच्या मृत्यूपूर्वी दक्षिणेची विभागणी पाच सल्तनतींमध्ये झाली होती. त्या म्हणजे अहमदनगर, विजापूर, वऱ्हाड, गोवळकोंडा व बिदर ह्या सल्तनती होत.

### बहामनी सत्तेचे समालोचन

दक्षिणेवर मुसलमानांची पहिली स्वारी इ.स.१२९६ मध्ये झाली. यादवांचे राज्य इ.स.१३१८ मध्ये समाप्त



महमूद गावानच्या काळातील उदगीर किल्ला.

झाल्यावर त्यानंतर ३० वर्षे दिल्लीच्या सुलतानांची सत्ता महाराष्ट्रावर होती. इ. स. १३४७ मध्ये दक्षिणेमध्ये बहमनी या स्वतंत्र राज्याची स्थापना झाली.

बहमनी राज्याचा विस्तार उत्तरेस नर्मदेपासून दक्षिणेस तुंगभद्रेपर्यंत, पश्चिमेस अरब सागरापासून पूर्वेस भूवनगिरीपर्यंत झाला होता. त्यांचे सामर्थ्य व ऐश्वर्य तत्कालीन दिल्लीच्या बादशहाबरोबरचे होते. सुरुवातीच्या काळातील सुलतानांनी या साम्राज्याला वैभवाच्या शिखरावर पोहचवले. काही अपवाद सोडल्यास कोणताही सुलतान हा रक्तपाताशिवाय गादीवर आला नाही. दक्षिणेच्या राजकारणात ही गोष्ट नवी होती. आणि हा रक्तपाताचा वारसा दक्षिणेला दिल्लीच्या खिलजी आणि तुघलक घराण्यांकडून मिळाला होता. बहमनी राज्याच्या स्थापनेपासून अहमदनगरच्या पाडावापर्यंतच्या कालखंडात अनेक वेळा सिंहासनासाठी खून व रक्तपात झालेले दृष्टीस पडते. महमूद गावानच्या मृत्यूनंतर बहमनीच्या विघटनातून निर्माण झालेल्या बरीदशाही सुलतानांनी आपल्या राज्यलालसेपोटी बहमनी कुळातील अनेक राजपुरुषांचा बळी घेतला. याचे दक्षिणेच्या राजकारणावर अतिशय दूरगामी परिणाम झाले. राज्यातील सरदारांनी–अमिरांनी याचा फायदा घेऊन राज्यात अंदाधुंदी माजविली. विशेषतः दक्षिणी आणि परदेशी मुसलमान ह्यांच्यातील वाद यातूनच सुरू झाला. त्यामुळे अनेक निरपराध लोकांच्या कत्तली घडून आल्या आणि मोठमोठ्या मुत्सद्यांचे बळी पडले. चाकण येथील परदेशी मुसलमानांची कत्तल, ख्वाजा लहान तुर्क आणि महमूद गावान यांचे झालेले खून, पंधराव्या शतकाच्या अखेरीस बिदर येथे झालेली दंगल ही ठळक उदाहरणे आहेत. राजघराण्यातील इतर वारशांनीही गादीसाठी अनेक बंडे केलेली दिसून येतात. या बंडांमुळे बहमनी राज्यावर बाह्य आक्रमणे झाली. परंतु अंतर्गत सुव्यवस्था आणि शांतता यांनाही धोका निर्माण झाला. यातच बहमनी सत्ता खिळखिळी होऊन बहमनी साम्राज्य ऱ्हास पावले.

बहमनी राज्यात हिंदूंना मोठ्या अधिकाऱ्याच्या जागा जवळजवळ नव्हत्याच. परदेशी व दक्षिणी मुसलमानांमधून या जागांवर नेमणूक केली जाई. बहमनी राजवटीच्या शेवटच्या कालखंडात काही हिंदू अधिकाऱ्यांची नावे आढळतात. त्यांपैकी एक मुधोळचे घोरपडे हे होत. मध्ययुगीन महाराष्ट्रावर राज्य करीत असलेले सरकार हे बहुसंख्य हिंदूंवर राज्य करणाऱ्या अल्पसंख्य मुसलमानांचे होते.

बहमनी सुलतानांनी मुलकी राज्यकारभारातील प्रचलित पद्धतीत फारसा बदल केला नाही. मुलकी राज्यकारभार देशमुख, देशपांडे, देसाई, पाटील, कुलकर्णी या वतनदारांच्या हाती होता. जमिनीपासून येणाऱ्या करांची वसुली करण्याचे काम त्यांच्याकडे होते. जमिनी वहिताखाली आणण्यासाठी या वतनदारांना सरकारकडून मेहनताना मिळे. महाराष्ट्रीय जनतेला वतनाचे अतिशय वेड होते, हे लक्षात घेता बहमनी राज्यकर्त्यांनी आपली सत्ता

अबाधित राहावी म्हणून या वतनदारांचा फार मोठ्या प्रमाणावर उपयोग करून घेतला. परिणामी बहमनी राज्यकर्त्यांकडून हिंदू समाज आणि त्या समाजाच्या रूढ आर्थिक आणि सामाजिक स्थितीत ढवळाढवळ करण्याचे फारसे प्रयत्न झाले नाहीत.

बहमनी काळात महाराष्ट्रात अनेक दुष्काळ पडले. त्यात मोठा दुष्काळ इ. स. १३९६–१४०८ पर्यंत सतत बारा वर्षे होता. तो जवळजवळ सर्व भारतभर होता. यालाच दुर्गाडीचा दुष्काळ असेही म्हणतात. इ. स. १४६८–१४७५ या काळातही मोठा दुष्काळ पडला होता. दामाजी पंताची कथा ह्या दुष्काळातील आहे. तत्कालीन मराठी वाङ्‌मयात या दुष्काळाचे वर्णन आहे. या दुष्काळात असंख्य लोक प्राणास मुकले, सर्व देश उजाड झाला. सरकारचा वसूल थकला. आणि सरकारी कामे बंद पडली. पैठण, पुणतांबे येथील अनेक ब्राह्मण पंडित घराण्यांनी देशत्याग केला. प्रसिद्ध गागाभट्टांचे घराणे याच वेळेस काशीस गेले असावे.

वैश्य, श्रेष्ठी, महाजन व वाणी हा व्यापार करणारा वर्ग नेहमी धनसंपन्न असतो. दुष्काळात शेतकरी लोक नाहीसे झाल्यामुळे ह्या वैश्य वर्गावरच सर्वांची धाड पडू लागली. त्यामुळे शेदीडशे वर्षांत तेही नाहीसे झाले. त्याच्या जागी गुजराती वाणी व मारवाडी वाणी महाराष्ट्रात आले. लिंगायत वाणीही याच करणामुळे महाराष्ट्रात आले. देशातील संपत्ती उत्पन्न करणारे वर्ग राज्यकर्त्यांनी अजाणतेपणी नाहीसे केले. त्यामुळे वसूल होण्याची पंचाईत पडून राज्यकारभार चालेनासा झाला. तेव्हा ओसाड गाव पुन्हा वसविण्याचा उद्योग त्यांना करावा लागला.

बहमनी सुलतानांच्या कारकिर्दीत फारसी भाषेचा मोठा विकास झाला. त्याचबरोबर दक्षिणी भाषेचाही विकास झाला. (दक्षिणी भाषेतील वाङ्‌मयाची निर्मिती पुढील शाह्यांच्या काळात झाली.) या काळात सुफी पंथाचा विकास मोठ्या प्रमाणावर झाला. सुफी पंथाची विचारसरणी आणि हिंदूंमधील भक्तिपंथ यांच्या विचारांत काहीसे साम्य होते. १५ व्या शतकात उदयास आलेल्या दत्तात्रेय पंथाने आणि पुढील काळातील संतमहंतांनी हिंदू आणि मुसलमान धर्मांतील विचारसरणींचा समन्वय साधण्याचा प्रयत्न केला. बहमनी काळात मराठी वाङ्‌मयाची उत्पत्ती झाली. या काळात होऊन गेलेल्या भागवत पंथातील प्रमुख संत म्हणजे नामदेव, गोरोबा कुंभार, चोखामेळा, कान्होपात्रा आणि सावतामाळी हे होते.

बहमनी राज्यकर्त्यांनी कला व स्थापत्य यांना प्रोत्साहन दिले. परंतु बहमनीकालीन शिल्प व वास्तू यांचे फारच थोडे अवशेष महाराष्ट्रात आहेत. बहमनी शिल्पांत मनोरे, मिनार, कबरी, दर्गे, भुईकोट किल्ले, गढ्या, डोंगरी व सागरी किल्ले यांचा समावेश होतो. स्थापत्यशिल्प म्हणजे हिंदू, फारसी, तुर्की शिल्पांचा समन्वय होय. बहमनी काळातील उदगीर औसा, परंडा, कंधार हे किल्ले प्रसिद्ध आहेत. बळकटीच्या दृष्टीने तत्कालीन युरोपमधील किल्ल्यांपेक्षा हे किल्ले श्रेष्ठ दर्जाचे होते. या व्यतिरिक्त महाराष्ट्रामध्ये असलेल्या बहमनीकालीन शिल्पांमध्ये खुलताबाद येथील काही अवलियांच्या कबरी आणि दौलताबाद येथील चांदमिनार व उस्मानाबाद येथील हजरत शमसुद्दीन यांच्या दर्ग्यांचा समावेश होतो.

दक्षिणेत बहामनी सत्ता स्थापन झाल्यावर संपूर्ण महाराष्ट्रावर बहमनींचे वर्चस्व सहजासहजी निर्माण झाले नाही असे दिसते. उत्तर–पश्चिम अहमदनगरच्या डोंगराळ भागातील कोळ्यांनी स्वातंत्र्य प्राप्त करून घेतले. ह्यामधील एक कोळी अधिकारी जव्हारचा राजा झाला. याच जव्हारच्या राज्यात सुरुवातीस अहमदनगर जिल्ह्याचा बराच मोठा भाग मोडत असे. बहमनींनी सुरुवातीस पश्चिम अहमदनगर आणि पुणे हे प्रदेश ५२ महालांमध्ये विभागले होते. प्रत्येक विभागावर त्यांनी वंशपरंपरेच्या हक्काने एका कोळी प्रमुखाची नेमणूक केली आणि त्याला बहमनी राज्याच्या सरदारांत दाखल करून घेतले. या ५२ प्रमुखांवर अथवा नाइकांवर त्यांनी सरनाईक या अधिकाऱ्याची नेमणूक केली. हा सरनाईक बहुधा मुसलमानच असे आणि त्याचा कारभार जुन्नर येथून चालत असे.

देवगिरीच्या यादवांचे राज्य नष्ट झाल्यावर शंभर वर्षांनीसुद्धा महाराष्ट्राचा एकचतुर्थांश भाग स्वतंत्र हिंदू राजांच्या ताब्यात होता. मध्ययुगीन महाराष्ट्रात ज्यांनी खिलजी, तुघलक आणि बहमनी सुलतानांना प्रतिकार केला; त्यांत शंकरदेव, भिल्लम, हरपालदेव, जमखिंडीचा नारायण,

मुधोळचा गोपाळ शिर्के, संगमनेरचा जखुराय, बागलाणचा कुंभदेव (गोविंददेव) यांची कामगिरी महत्त्वाची ठरते. संपूर्ण महाराष्ट्रावर बहमनींचे वर्चस्व निर्माण होण्यासाठी १५० वर्षे जावी लागली. याची कारणे म्हणजे विजयनगरबरोबरचे धोरण, बहमनी दरबारातील इराक, इराण या देशांतून आलेल्या परदेशी मुसलमानांमधील स्पर्धा आणि स्थानिक सरदारांचा आणि जनतेचा प्रतिकार ही होत. बहमनीच्या ऐन भरभराटीच्या काळात इ.स.१४५३ मध्ये कोकणात त्यांची सात हजारांची फौज गारद व्हावी, हे महाराष्ट्राच्या निकराच्या प्रतिकाराचे उदाहरण होय.

## अहमदनगरची निजामशाही

अहमदनगरच्या निजामशाही घराण्यातील सुलतानांनी महाराष्ट्रामध्ये इ.स.१४८७पासून १६३३पर्यंत १४३ वर्षे राज्य केले. ह्यांपैकी सात सुलतानांची कारकिर्द महाराष्ट्राच्या दृष्टीने विचारात घ्यावी लागते. १५७२ मध्ये या घराण्याची सत्ता काही काळाकरिता महाराष्ट्राच्या दोन तृतीयांश भागावर होती.

अहमदनगरच्या निजामशाही घराण्याचा संस्थापक अहमद निजाम-उल-मुल्क हा बहमनी सुलतान शियाबुद्दीन महमूद (१४८२ ते १५१८) याच्या दरबारातील मलीक नायब हसन निजाम-उल-मुल्क याचा मुलगा होय. हसन हा मूळचा तीमाभट नावाचा ब्राह्मण. याला अहमदशहा बहमनीने विजयनगरच्या स्वारीत इ.स.१४२२-२३ मध्ये कैद केले होते. याच्या वडिलांचे नाव बाहिरव उर्फ भैरव. ते महाराष्ट्रातील पाथरी (परभणी जिल्हा) गावचे कुलकर्णी होते. अहमद निजाम-उल-मुल्क याच्या आज्याचा नावाचा अपभ्रंश होऊन बहरी हे नाव प्रचलित झाले. बहमनी दरबारातील परदेशी-दक्षिणी मुसलमानांच्या वादात मलीक नायबचा खून झाला. (१४८६) त्यानंतर अहमद मलीक याने बहमनी दरबारापासून आपले संबंध तोडून स्वतंत्रपणे राज्यकारभार करण्यास सुरुवात केली. त्याने इ.स.१४८७ पासून १५०९ पर्यंत राज्य केले. या वेळी याच्या ताब्यात बीडचा व जुन्नरचा भाग होता. त्यानंतर त्याने शिवनेरी, चावंड, लोहगड, तुंग, तिकोणा, कोआरी, कोंडाणा, पुरंदर, भोरप जीवधन, कुहरदुर्ग, मुरंजन, महोली, पाली हे किल्ले व कोकणचा भाग निजामशाहीच्या वर्चस्वाखाली आणला. चाकण, दंडराजपुरी, दौलताबाद हे भाग जिंकून घेतले. त्याने जुन्नर दौलताबाद मार्गावर भिंगार या ठिकाणी अहमदनगर हे नवीन शहर वसवून तिथे आपली राजधानी केली. दलपतराय हा त्याचा वजीर होता. याच्या काळात दक्षिणेत तलवारीच्या द्वंद्वयुद्धाला प्रोत्साहन देण्यात आले. फारसी व अरबी वाङ्मयावर अहमद निजाम-उल-मुल्कचे असामान्य प्रभुत्व होते. तो न्यायनिष्ठुर होता.

अहमद निजाम-उल-मुल्कनंतर सुलतान बुऱ्हाण निजामशहाने इ.स.१५०९ ते १५५३ या काळात राज्य केले. याच्या काळात अहमदनगर राज्याचा मोठ्या प्रमाणावर विस्तार झाला. त्याने ५८ किल्ले घेतल्याची नोंद बुऱ्हाने मासीर या ग्रंथात आहे. त्याचा वकील कान्हू नरसी (कंबरसेन) याच्या साह्याने त्याने ३० किल्ले जिंकून घेतले होते. कंबरसेन याने घरंदाज मराठ्यांना आपल्या फौजेत ठेवून त्यांना जबाबदारीची पदे देण्यास सुरुवात. हे लोक डोंगरी प्रदेशात राहून मुसलमान अंमलदारास जुमानत नसत. पूर्वी अशा सरदारांवर विश्वास टाकला जात नसे. ते आपल्या मुलखात रिकामे राहिल्यामुळे बंडाळी करत. कंबरसेनाने अशा सरदारांस फौजेत मोठमोठ्या हुद्द्यांच्या जागा दिल्या आणि राज्याच्या कामी त्यांचा उपयोग करून घेतला. उदाहरणार्थ अचलकर्ण उर्फ अचलोजी जाधव यास पाच हजारांची मनसब दिली. बुऱ्हान निजामशहाची वऱ्हाडच्या अल्लाउद्दीन इमादशहाबरोबर तीन युद्धे झाली. १५१० साली राहुरी येथील युद्धात इमादशहाचा पराभव झाला. (या वेळी निजामशहास परांड्याच्या ख्वाजा जहानने मदत केली.) दुसरे युद्ध पाथरी या गावावरून झाले. हे गाव निजामशहाच्या पूर्वजांचे असल्यामुळे त्याने त्याबदली दुसरे समृद्ध गाव देण्याची तयारी दर्शविली होती. परंतु इमादशहाने त्यास मान्यता दिली नाही. त्यामुळे १५१८ साली निजामशहाने पाथरी जिंकून घेतले. १५२६-२७ मध्ये

पुन्हा इमादशहाने ते जिंकले. परंतु बुऱ्हान निजामशहाने पुन्हा पाथरी जिंकून माहूरवरही वर्चस्व मिळविले.

अहमदनगर व विजापूर या दोन राज्यांमध्ये सोलापूर किल्ल्यावरील वर्चस्वासाठी नेहमी संघर्ष झालेला दिसतो (१५२९ नंतर, १५४२, १५४६, १५४८). या काळात विजयाचे पारडे कधी निजामशाहीकडे तर कधी आदिलशाहीकडे जात होते. १५४१ मध्ये परंडा, १५४४ ते १५४८ पर्यंत औसा, उद्‌गीर, कंधार येथील किल्ल्यांवर बुऱ्हान निजामशहाचे वर्चस्व प्रस्थापित झाले. या काळात काही हिंदू सरदारांची नावे आढळतात. अंतुरचा किल्लेदार दानय्या, नरसुपंडित, संभाजी चिटणीस (प्रतापराव), गोपाळराव, कळंबचा राजा शिवदेव इत्यादी.

बुऱ्हाण निजामशहाच्या काळात अहमदनगर येथे अनेक इमारती बांधण्यात आल्या. बगदाद बाग, करीम बाग यांची निर्मिती, अनेक सराया व मदरसे या काळात बांधण्यात आले. कोणत्याही कामात तो घाई करत नसे. सैन्यातील बारीकसारीक गोष्टींवर त्याचे लक्ष असे.

बुऱ्हान निजामशहानंतर हुसेन निजामशहाने ३० डिसेंबर १५५३ ते ६ जून १५६५ या काळात राज्य केले. या काळात अहमदनगर येथे दोन गट निर्माण झाले. पहिला गट परदेशी मुसलमान व हबशी लोकांचा तर दुसरा गट राजपुत्र अब्दुल कादरचे समर्थन करणारा दक्षिणी मुसलमान व हिंदू यांचा. अब्दुल कादरने वऱ्हाडच्या इमाद उल मुल्कचा आश्रय घेतला. राजपुत्र शहाअली व मिरान हुसेन बाकर हे विजापूरच्या इब्राहिम आदिलशहाकडे पळून गेले. शहा हैदरने आपला सासरा, परंड्याचा सुभेदार शहादक्नी याचा आश्रय घेतला. या सुलतानाच्या काळातही सोलापूर किल्ल्यावरून विजापूर राज्याशी संघर्ष चालूच होता. १५५९ मध्ये अली आदिलशहा, विजयनगरचा रामराया व इब्राहिम कुतुबशहा यांच्या संयुक्त सैन्याने अहमदनगरवर आक्रमण केले. हुसेन निजामशहाने याचा बदला घेण्यासाठी दक्षिणेतील सुलतानांची एकजूट घडवून आणली. आपली मुलगी चांदबिबी हिचा विवाह अली आदिलशहाशी करून त्यास सोलापूरचा किल्ला दिला व आपले मतभेद मिटविले. त्यातूनच १५६५चे तालीकोटचे युद्ध होऊन विजयनगर राज्य नाश पावले. या लढाईत निजामशहातर्फे सिंदखेडच्या अचलकर्णचा मुलगा विठ्ठल शिवदेव याने भाग घेतला होता. रेवदंड्याच्या किल्ल्यावरून पोर्तुगिजांशी याच काळात संघर्ष झाला. या काळात अंतुरचा किल्लेदार दान्नया रुईराय, बागलाणचा बहिर्जी आणि यशुरसराय या हिंदू मुत्सद्यांची नावे आढळतात.

हुसेन निजामशहानंतर मुर्तजा निजामशहाने ६ जून १५६५ ते १४ जून १५८८ या काळात राज्य केले. इ.स.१५६७-६८ मध्ये अली आदिलशहाचा सरदार किश्वरखान याने बीड जिल्ह्यातील धारूर येथे किल्ला बांधला. १५६० मध्ये मुर्तजा निजामशहाने किश्वरखानास ठार मारून धारूर किल्ला ताब्यात घेतला. यानंतर अहमदनगर व विजापूर या दोन राज्यांत तह होऊन निजामशहाने वऱ्हाड व बिदर ही दोन राज्ये जिंकून घ्यावीत व आदिलशहाने कर्नाटकातील तेवढाच प्रदेश जिंकून घ्यावा असे ठरले. त्यानुसार १५७२ मध्ये वऱ्हाडचा बंडखोर सरदार तुफालखानाचा बिमोड करून नरनाळा व गावील हे किल्ले जिंकून घेतले व बुऱ्हान इमादशहास कैदेत ठेवले व वऱ्हाडचे राज्य संपुष्टात आले (१५७४).

१५७७ पासून मुर्तजा निजामशहाच्या काळात मालोजी भोसल्यांनी मोठमोठ्या कामगिऱ्या पार पाडल्या. (बाबाजी भोसले वेरूळ येथे राहत होते. बाबाजीची मुले मालोजी व विठोजी पराक्रमी निघाली. लक्षणसिंहापासून मालोजीपर्यंत ३०० वर्षांचा काळ गेला (१३००-१६००). यात भोसल्यांच्या १२ पिढ्या झाल्या. संधी मिळेल, तेव्हा नोकरपेशा नाहीतर शेतीभाती करून कित्येक गावच्या पाटीलक्या त्यांनी खरेदी केल्या. भोसल्यांची ही वतने औरंगाबाद, पैठण, अहमदनगर व पुणे प्रांतांत होती. (त्यांच्या पाटीलकी दौंडजवळ हिंगणी-बेरडी, देऊळगाव, खानवट व जिंती, इंदापूर तालुक्यातील कळस, सिन्नर तालुक्यात वावी, मुंगी पैठण व नानवज आणि वेरूळच्या उत्तरेस बनसेंद्र या ठिकाणी होत्या.) मालोजीचा जन्म १५७०-७१ च्या सुमारास झाला असावा. तो व त्याचा बंधू विठोजी वेरूळ येथे राहून संधी मिळेल त्याप्रमाणे निजामशाहीत नोकरी करत होते. मालोजीच्या वेळेपासून महाराष्ट्रात स्वराज्याचे वातावरण हळूहळू तयार होऊ लागले. निजामशाही मुत्सद्यांनी पंचहजारीमनसब व

जहागिरी म्हणून काही किल्ले व ठाणी नेमून दिली होती. ही ठाणी पुणे, नगर, नाशिक व खानदेश आदी ठिकाणी होती. परंतु ह्या प्रांतांवर मोगलांची नजर होती. म्हणून मालोजीस ही जहागीर सांभाळण्यास अतिशय प्रयास पडले. मालोजीने धार्मिक व लोकोपयोगी कामे करून प्रतिष्ठा वाढविली. वेरूळ येथील घृष्णेश्वराच्या पुरातन मंदिराचा जीर्णोधार केला. शिंगणापूर येथील महादेवाच्या डोंगरावर यात्रेकरूंना पाण्याची सोय करून दिली. तेथे विस्तीर्ण तलाव बांधून दिला. त्यामुळे वेरूळपासून साताऱ्याजवळील शंभु-महादेवापर्यंतच्या विस्तीर्ण प्रदेशात मालोजीचे नाव झाले.

१५८१ मध्ये अहमदनगर व विजापूर राज्यांतील नळदुर्ग किल्ल्याजवळील संघर्षामध्ये कुली कुतुबशहासोबत 'बुरहाने मासीर'चा कर्ता सय्यदअली तबतबा स्वतः हजर होता. आपल्या आयुष्याच्या उत्तरार्धात मुर्तजा निजामशहाने आपला मुलगा मिरान हुसेन यास मारण्याचा प्रयत्न वारंवार केला. त्यामुळे मिरान हुसेन याने बंड करून मुर्तजा निजामशहास ठार मारले (१५८९). या प्रसंगी 'गुलशने इब्राहिमी'चा कर्ता फेरिस्ता हा राजवाड्यातील रक्षक दलाचा प्रमुख होता. राजपुत्र मिरान हुसेन याने त्यास ओळखले म्हणून तो वाचला. काही विद्वानांच्या मते मुर्तजा निजामशहा वेडा होता.

मुर्तजा निजामशहानंतर मिराज हुसेन याने १५ जून १५८८ ते १५८९ या काळात राज्य केले. हा अतिशय क्रूर व अविचारी होता. लवकरच त्याचा खून झाला व इस्माईल निजामशहा गादीवर बसला (१ एप्रिल १५८९ ते ७ मे १५९१). हा मुर्तजा निजामशहाचा भाऊ बुऱ्हान निजामशहा (दुसरा) होय. (बुऱ्हान निजामशहाने सम्राट अकबराच्या दरबारात आश्रय घेतला होता. त्याचा राज्यकारभार जमालखान पाहत होता. हा मेहदवी पंथाचा होता. त्याने या पंथाचा प्रचार करून दुसऱ्या पंथाच्या लोकांचा छळ करण्यास सुरुवात केली. त्यामुळे त्याचा बिमोड करण्यासाठी वऱ्हाडच्या अमिरांनी सलाबतखानाच्या नेतृत्वाखाली उठाव केला. जमालखानास मालोजी आणि विठोजी यांनी मदत केली. या वेळी फलटणच्या वणंगपाळ निबांळकराने जमालखानाच्या बाजूने आदिलशाहीविरुद्ध भूमिका घेतली. मालोजी-विठोजी त्यास जाऊन मिळाले. ही लढाई बहुधा कोल्हापूरजवळ झाली असावी. (वणंगपाळने आपली बहीण दीपाबाई हिचा विवाह मालोजीबरोबर लावून दिला. हीच शहाजीराजांची आई दीपाबाई होय.) त्यामुळे जमालखानाने त्यांना त्यांच्या आजोबांचा सरंजाम सुपूर्द केला. मालोजी आणि विठोजी यांनी वेरूळवरून निघून दौलताबादेस आपल्या दीड हजार बारगिरांसह तळ दिला. मुंगीकर भोसले बखरीत असा उल्लेख आहे की, ''पातशहा दक्षिणेस स्वारीस झाले. दौलताबादेस युद्धप्रसंग केला. त्या समई दौलताबाद सर केली. खडकी शेहर वस्ती केली. त्या समयी भोसल्यांची पुरे चार ता.मालपुरा, खेलपुरा, परसपुरा, विठपुरा तेथे नांदणूक होती...'' यावरून हा पातशहा म्हणजे बुऱ्हाणशहा असावा. या काळातच मालोजी-विठोजीस पंधराशे स्वारांच्या तैनातीबद्दल जुन्नर परगणा शिवनेरी किल्ल्यासह वहिवाटीस आला. बुऱ्हान निजामशहा दौलताबादेस येताच बरीच मराठा मंडळी, दक्षिणी सरदार व आदिलशहाचे साह्य त्यास मिळाले. अहमदनगरच्या जमालखानाबरोबर फेब्रुवारी १५९१ मध्ये धाराशिव येथे झालेल्या युद्धात 'गुलशने इब्राहिमी'चा कर्ता फेरिस्ता जखमी झाला. त्यास धाराशिव येथे ठेवले तेथून त्याने जमालखानाच्या तावडीतून सुटका करून घेतली. त्यानंतर बुऱ्हान निजामशहा व जमालखान यांच्यात युद्ध होऊन बुऱ्हान निजामशहाचा विजय झाला. त्याने आपला मुलगा इस्माईल यास पदच्युत केले व तो स्वतः सुलतान झाला.

उतारवयात सुलतान झालेल्या बुऱ्हान निजामशहाने १५ मे १५९१ पासून १८ एप्रिल १५९५ पर्यंत राज्य केले. हा शियापंथी होता. त्याने मेहदवी पंथाच्या अनुयायांचा छळ केला. पश्चिम किनाऱ्यावरील पोर्तुगिजांशी त्याचा संघर्ष झाला. रेवदंड्याचा किल्ला घेण्यासाठी त्याने चौल येथे किल्ला बांधला. परंतु त्यास रेवदंड्याचा किल्ला घेता आला नाही. सोलापूरवरून इब्राहिम आदिलशहाशी त्याचा संघर्ष झाला. १५९१ ते १५९५ या काळात मालोजीने जे साह्य केले, त्यावरून मालोजीस दीड हजारी सरंजामावरून पंचहजारी सरंजाम दिला. सुपा-परगणा मालोजीस दिला. मालोजी राजे यांनी श्रीगोंद्यास ६०० बिघे

जमीन खरेदी करून मकरंद पेठ किंवा पुरा वसविला. १२ डिसेंबर १५९६च्या पत्रानुसार मालोजी राजे पांडे पेडगावच्या परगण्यातील कारभार पाहत असल्याचे स्पष्ट होते. बुऱ्हान निजामशहाने आपला थोरला मुलगा मेहदवी पंथाचा आहे, असे सांगून त्याच्या जागी राजपुत्र इब्राहिम यास अहमदनगरच्या गादीवर बसविले.

इब्राहिम निजामशहाने मिया मंजुदखखनी यास आपला वजीर नेमले. विजापूरबरोबर झालेल्या युद्धात तो मरण पावला. त्याने चार महिने राज्य केले. त्याच्या मृत्यूनंतर मिया मंजूने दौलताबाद येथे कैदेत असलेल्या १२ वर्षांच्या अहमद यास गादीवर बसविले (६ ऑगस्ट १५९४).

## चांदबिबीचा मोगलांशी लढा (१५९४–१६००)

अहमदनगर राज्यातील अंतर्गत घडोमोडींकडे मोगल सम्राट अकबराचे लक्ष होतेच. वजीर मियामंजूने गुजरातचा सुभेदार राजपुत्र मुराद याच्याकडे मदत मागितली. यानंतर अहमदनगर राज्यावर मोगलांचे आक्रमण सुरू झाले. या वेळी अहमदनगरच्या गादीवर कोणी बसावे, यासाठी दरबारात चार गट होते. पहिला गट वजीर मियामंजू याचा; त्याने अहमदशहास पाठिंबा दिला. दुसरा गट चांदबिबीचा; तिने इब्राहिम निजामशहाचा मुलगा बहादूर खानास पाठिंबा दिला. तिसरा गट सरदार इखलासखान याचा होता. त्याने मोतीखान नावाच्या मुलाचा पाठपुरावा केला. चौथा गट नेहंगखान हबशी याचा. त्याने पहिल्या बुऱ्हान निजामशहाचा मुलगा शहा अली याला पाठिंबा दिला. २३ डिसेंबर १५९५ला मोगलांच्या आक्रमणामुळे मियामंजू अहमदनगर किल्ला सोडून बीड प्रांताकडे गेला. तेथून चांदबिबीने अहमदनगर किल्ल्याची सूत्रे हाती घेतली. (चांदबिबी ही हुसेन निजामशहाची मुलगी असून तिचा विवाह अली आदिलशहाशी झाला होता. त्याच्या मृत्यूनंतर ती अहमदनगर येथे परत आली होती.)

मोगल राजपुत्र मुराद याने किल्ल्याचा तट उडविण्याचा प्रयत्न केला. त्यामुळे किल्ल्याचा तट ढासळला. अशा वेळी चांदबिबीने अंगात चिलखत घालून, हातात तलवार घेऊन तटातून आत येणाऱ्या मोगल सैनिकांना कापून काढले. तिचा आवेश पाहून किल्ल्यातील सैनिकांनी तिला साथ दिली. चांदबिबीने रात्रीतून तटबंदी बांधून काढली. त्यासाठी आपला पुतण्या इब्राहिम आदिलशहाची मदत मागितली. आदिलशाही फौजेने मोगलांची रसद तोडली. हे पाहून राजपुत्र मुरादाने वऱ्हाड प्रांताची मागणी करून तह करण्यास सांगितले (१४ मार्च १५९६). त्याप्रमाणे वऱ्हाड प्रांतावर मोगलांनी ताबा घेऊन अहमदनगरचा वेढा उठविला. चांदबिबीच्या या पराक्रमामुळे अहमदनगरच्या इतिहासात तिचे नाव अजरामर झाले. चांदबिबीस या काळात सिंदखेडच्या लखुजी जाधवाने मदत केली होती. लखुजी जाधवास १० हजारांची मनसब होती. परंतु ही परिस्थिती फार काळ टिकली नाही. किल्ल्याच्या आतील शिबंदीत दुफळी माजली व त्यात चांदबिबीचा खून झाला. त्यानंतर थोड्याच दिवसांनी मोगलांनी अहमदनगरचा किल्ला ताब्यात घेतला (१९ ऑगस्ट १६००). बहादूरशहास पकडून आग्रा येथे कैदेत ठेवण्यात आले.

आपला बादशहा कैद झाला, तरीही त्याची तमा न बाळगता निजामशाही सरदारांनी शहा अलीचा मुलगा मुर्तजा (दुसरा) याच्या नावाने सुलतान म्हणून द्वाही फिरवली व आपली राजधानी काही काळाकरिता परंडा येथे हालवली. या काळात निजामशाही राज्यातील दोन व्यक्तींनी धाडस आणि कर्तृत्व यांच्या बळावर लौकिक कमाविला. ह्यांपैकी १) मलिकंबर व २) मियामंजू दखखनी या दोघांनीही मोगल फौजा प्रचंड संख्येने दक्षिणेत असतानादेखील बहुतेक सर्व मुलूख आपल्या ताब्यात ठेवण्यात यश मिळविले. मुर्तजा निजामशहा (दुसरा) याचे वास्तव्य औसा येथे होते व त्याच्या ताब्यात बीड, औसा व धारूर ही ठिकाणे होती. मोगल सेनापती मिर्झा इरीच व मलिकंबर यांच्यात १६०२ साली नांदेड येथे लढाई होऊन त्यात मलिकंबर जखमी झाला. त्यानंतर मलिकंबरने मोगलांशी तह केला. त्यामुळे मुर्तजा निजामशहा व इतर सरदार यांच्या मनात मलिकंबरविषयी संशय निर्माण झाला. मलिकंबरने या काळातच खडकी येथे शहर वसविले. (पुढे शहाजहान बादशहाने त्यास आपल्या पुत्रावरून औरंगाबाद नाव दिले.) मियामंजू व मलिकंबर यांच्यातही मतभेद वाढत गेले. परंडा येथे मोगल सेनापती खानखानाच्या मदतीने मलिकंबरने मियामंजूचा पराभव केला.

१६०६ साली इंदापूरच्या लढाईत मालोजी भोसले याचा मृत्यू झाला. मालोजीची छत्री इंदापुराला असल्याचा उल्लेख पेशवे दफ्तरातील कागदपत्रांत येतो. पश्चिम महाराष्ट्राच्या डोंगराळ प्रदेशातील सामान्यतः भीमेच्या उत्तरेकडील प्रदेश निजामशाहीचा व दक्षिणेकडील प्रदेश आदिलशाहीचा मानला जात होता. या डोंगराळ प्रदेशाच्या आश्रयाने राहणारी मराठ्यांची घराणी स्वतंत्र वृत्तीने वागून कोणाचाही अंमल चालू देत नसत. द्वितीय इब्राहिम आदिलशहा व मलिकंबर यांचा बराच काळ स्नेह होता. हे सबंध आणखीन दृढ करण्यासाठी १६०९ मध्ये आदिलशहाने आपला श्रेष्ठ सरदार सिद्दी याकुतखान याच्या मुलीचा विवाह मलिकंबरचा मुलगा फत्तेखान याच्याशी घडवून आणला व कंधारचा किल्ला मलिकंबरच्या स्वाधीन केला. (आदिलशहाने हे लग्न मोठ्या थाटाने केले. सोहळा ४० दिवस चालला. दारूकामावर २० हजार होन खर्च झाले.)

या काळात निजामशाहीच्या राजधान्या वारंवार बदललेल्या दिसतात. औसा, परंडा, जुन्नर व शेवटी दौलताबाद (३० जानेवारी १६१०). त्यामुळे मोगलांबरोबर झालेल्या संघर्षाचा केंद्रबिंदू नवीन राजधानीकडे सरकला. मलिकंबर–जहांगीर संघर्षकाळात लखुजी जाधव, बाबाजी काटे व त्यांचे बंधू, माहूरचा उदाराम, विठोजी भोसलेच्या मुलांपैकी अनेक जण मोगलांना जाऊन मिळाले. त्यानंतर ४–२–१६१६ रोजी जालनापुराच्या पश्चिमेस रोशनगाव येथे भीषण लढाई होऊन त्यात मलिकंबरचा पराभव झाला. मलिकंबरने वसविलेले खडकी शहर उद्ध्वस्त करून मोगलांनी अनेक इमारतींचा नाश केला (१६२१). पुढे राजपुत्र शहाजहानने जहांगीर बादशहाच्या काळात बंड पुकारले. त्या वेळी मलिकंबरने त्यास मदत केली. शहाजहान या वेळी नाशिक येथे होता. (या काळात तो माहूर येथेही काही दिवस होता.) १६२४ मध्ये मोगल आणि आदिलशाही यांच्या संयुक्त फौजेशी भातवडी येथे लढाई होऊन त्यात शहाजीराजांचा भाऊ शरीफजीचा मृत्यू झाला. या लढाईत शहाजीराजांनी मोठा पराक्रम गाजविला. यानंतर शहाजीराजे आदिलशहाकडे निघून गेले. १८ सप्टेंबर १६२५ रोजी मलिकंबरने सोलापूरवर वर्चस्व मिळविले. पुण्याजवळ मावळच्या सरहद्दीवरील प्रदेशावर निजामशहा व आदिलशहा हक्क सांगत. आता हा प्रदेश जिंकण्यास आदिलशहातर्फे शहाजीराजे आले. तेथे मलिकंबरने त्यास विरोध केला व कानगर खोऱ्याच्या मरळ देशमुखास विजापूर फौजेवर पाठविले. ४–२–१६२६ रोजी लढाई झाली. १४–५–१६२६ रोजी मलिकंबरचा मृत्यू झाला.

१६२९ मध्ये निजामशहाच्या दरबारात श्रेष्ठ सरदार लखुजी जाधव व त्याचे दोन पुत्र अचलोजी, रघुजी व नातू यशवंतराव यांचा खून झाला. शहाजीराजे या वेळेस परंडा येथून राज्यकारभार चालवीत होते. १६३०–१६३२ या काळात दक्षिणेत दुष्काळ पडला होता. १६३० मध्ये मोगल सेनापती खानजहान लोदीने बंड केले व बीड येथे आश्रय घेतला. हेच लढाईचे मुख्य केंद्र होते. याच सुमारास मुरार जगदेव याने शहाजीराजांची जहागिरी पुणेकसबा उद्ध्वस्त करून टाकली. या काळात मोगलांनी निजाम–शाहीतील अधोणूर (१७ जानेवारी १६३१), कंधार (७ मे १६३१) हे किल्ले जिंकले. परंडा घेण्याचे मोगलांचे प्रयत्न निष्फळ ठरले. मुर्तजा निजामशहाने फतेहखानास वजीर केले. त्याने मोगलांशी संगनमत करून मुर्तजा निजामशहास विष देऊन ठार मारले व हुसेन ह्या दहा वर्षांच्या मुलास गादीवर बसविले. पुढे मोगल सेनापती महाबतखानास १७ जून १६३३ ला दौलताबादचा किल्ला दिला. हुसेन निजामशहास ग्वाल्हेरच्या किल्ल्यात कैदेत ठेवले.

१६३२ मध्ये निजामशहाचा किल्लेदार आकारिजा याने परंडा किल्ला आदिलशहास दिला होता. शहाजीराजांनी या वेळेस निजामशहीचे पुनरुज्जीवन करण्याचे ठरविले. त्यांनी नामधारी निजामशहातर्फे महसूल गोळा करावयास सुरुवात केली. शहाजहान बादशहा शहाजीराजांचा बिमोड करण्यासाठी स्वतः दक्षिणेत आला. १६३५–३६ ला त्याने आदिलशहास तह करावयास भाग पाडले. शेवटी शहाजीराजांनी शरणागती पत्करली. याच काळात मोगलांनी निजामशहाच्या ताब्यातील उदगीर व औसा हे किल्ले जिंकून घेतले (१६३६) आणि १४८७ साली स्थापन झालेल्या अहमदनगरच्या निजामशाही राज्याचा शेवट झाला.

मलिकंबरने उत्तरेतील तोडरमलची जमीनधाऱ्याची पद्धती दक्षिणेत सुरू केली व राज्याची महसूलव्यवस्था उभारली.

अनेक हिंदू सरदार या काळात मोठमोठ्या अधिकारपदावर होते. मलिकंबरने निजामशाहीच्या पडत्या काळात मोगलांचा प्रतिकार करून निजामशाही वाचविली. त्याच्या काळात खडकी शहरात केलेली पाणीपुरवठापद्धती (नहरे अंबरी) आजही चालू आहे. खडकी–औरंगाबाद येथील भडकलगेटची निर्मिती मलिकअंबरच्या काळात झाली.

## विजापूरची आदिलशाही

विजापूरच्या आदिलशाही घराण्यात (इ.स. १४९० ते १६८६) नऊ सुलतान होऊन गेले. महाराष्ट्राच्या दृष्टीने या घराण्यातील आठ सुलतानांची कारकिर्द विचारात घ्यावी लागते. त्यातही शेवटच्या सुलतानाच्या काळात शहाजी राजे आणि शिवाजीराजे ह्यांनी स्वराज्याचा श्रीगणेशा सुरू केला होता.

अबूल मुजफ्फर युसूफ आदिलशहाने विजापूर येथे आदिलशाही घराण्याची स्थापना केली. हा आहोमन कुटुंबातील रूमच्या एका बादशहाचा पुत्र होता. इराणमधील सावा या ठिकाणी त्याचे शिक्षण झाले. वयाच्या १७व्या वर्षी तो भारतात दाभोळ येथे आला. बहमनीचा प्रसिद्ध वजीर महमूद गावान याने त्यास नावारूपास आणले. आपल्या अंगच्या हुशारीमुळे तो लवकरच बहमनी घोडदळाचा प्रमुख मोतद्दार झाला. महमूद गावानच्या मृत्यूनंतर बहमनी दरबारातील अस्थिर परिस्थितीत परदेशी मुसलमानांचे पुढारीपण स्वीकारले व त्यास महमूद गावानची विजापूरची जहागिरी देण्यात आली. विजापूर हेच आपल्या राजधानीचे ठिकाण केले व तो स्वतंत्ररीत्या राज्यकारभार करू लागला. त्याने इ.स.१४९० ते १५१० या काळात राज्य केले. शिया पंथ स्वीकारणारा युसूफ आदिलशहा हा पहिलाच सुलतान होता. त्यामुळे कुली कुतुबशहा, अमीर बरीद व अहमद निजामशहा यांनी विजापूरवर आक्रमण केले व त्यास विजापूर सोडून जाण्यास भाग पाडले. युसूफ आदिलशहा बीड, वऱ्हाडमार्गे बऱ्हाणपूर पर्यंत गेला. नळदुर्गजवळ कासीम बरीद यांच्याशी त्याचा संघर्ष झाला. युसूफ आदिलशहाचा कर्नाटकातील मोरे नावाचा सरदार नाईक म्हणून प्रसिद्ध होता. त्यास १२००० पायदळाची सरदारकी देऊन निरा व वारणा या नद्यांमधील प्रदेश जिंकण्यास पाठविले. हा प्रदेश शिर्के, गुजर, महाडिक या मराठा सरदारांच्या ताब्यात होता. ते सरदार आदिलशहाचे हुकूम मानत नसत. मोरे याने हा प्रदेश काबीज केला. या कामगिरीबद्दल आदिलशहाने त्यास 'चंद्रराव' हा किताब देऊन जावळीचा राजा केले. त्या बाजूचा मावळातील दुर्गम प्रदेश मोऱ्यांनी जिंकून आपल्या ताब्यात आणला. मोरे घराणे आदिलशहाचे विश्वासू घराणे समजले जात असे. १५१० साली पोर्तुगीज गव्हर्नर अल्बुर्क याने आदिलशहाच्या ताब्यातील गोवा बंदर घेतले व भारतात पोर्तुगीज सत्तेचा पाया घातला.

युसूफ आदिलशहा उत्कृष्ट वक्ता, मुत्सद्दी व कवी होता. त्याने मुकुंदराज नावाच्या मराठा सरदाराच्या बहिणीशी लग्न केले. तिचे नाव बुबुजी खानम ठेवण्यात आले; तिचा मुलगा इस्माईल हाच पुढे युसूफ आदिलशहाचा वारस झाला. दक्षिणेतील श्रेष्ठ सुलतानांपैकी युसूफ आदिलशहा हा एक होता.

युसूफ आदिलशहानंतर त्याचा नऊ वर्षांचा मुलगा इस्माईल आदिलशहा सुलतान झाला. त्याने इ.स. १५१० पासून २७ऑगस्ट १५३४पर्यंत राज्य केले. त्याचा वजीर कमालखान दखनी याने स्वतःच हे राज्य बळकाविण्याचा अयशस्वी प्रयत्न केला (१५११). इस्माईल आदिलशहाने लष्करात व दरबारात सर्वत्र परदेशी मुस्लीम लोकांची भरती करून दक्षिणी व हबशी लोकांना घालवून दिले. त्याने सुन्नी पंथ स्वीकारला. इ.स.१५२४मध्ये इस्माईल आदिलशहाची बहीण बिबी मरियम हिचा विवाह बुऱ्हाण निजामशहाशी झाला. या लग्नानंतर सोलापूर किल्ल्यावरून विजापूर व अहमदनगर राज्यांत युद्ध झाले. परंतु यात बुऱ्हाण निजामशहाचा पराभव झाला. १५२८–२९ मध्ये यशवंतराव मोरे याने इस्माईल आदिलशहाच्या वतीने परिंड्यांच्या लढाईत बुऱ्हाण निजामशहाचा पराभव करून त्याचे हिरवे निशाण

काबीज केले. ते आदिलशहाने मोरे यास बक्षीस दिले. (पुढे मोऱ्यांच्या सात पिढ्यांनी इ.स.१६५५ पर्यंत जावळीस राज्य केले.) बुऱ्हान निजामशहास अमीर बरीदने साह्य केले होते. त्यास धडा शिकविण्यासाठी इस्माईल आदिलशहाने त्याच्यावर आक्रमण करून उदगीर येथे त्यास कैद केले. अमीर बरीद यास या वेळेस अपमानास्पद वागणूक देण्यात आली. परंतु दर्या इमादशहाच्या मध्यस्थीने त्यास उदगीरचा किल्ला परत देण्यात आला. १५३१ मध्ये कंधार व कल्याणी ह्या किल्ल्यांवरून इस्माईल आदिलशहाचा बुऱ्हान निजामशहा व अमीर बरीद यांच्याशी संघर्ष झाला.

इस्माईल आदिलशहानंतर विजापूरच्या गादीवर मल्लूखान याने २७ ऑगस्ट १५३४ पासून मार्च १५३५ पर्यंत राज्य केले. तो अत्यंत दुर्व्यसनी असल्यामुळे राजमातेच्या आज्ञेने इब्राहीम (प्रथम) यास गादीवर बसविले. त्याने मार्च १५३५ पासून १५५८ पर्यंत राज्य केले. हा सुनी पंथाचा समर्थक होता. त्याने परदेशी सैनिकांऐवजी दक्षिणी व हबशी लोकांना जवळ केले. १५४२ मध्ये इब्राहीम आदिलशहाचा अमीर बरीद व बुऱ्हान निजामशहा यांच्याशी सोलापूर किल्ल्यावरून पुन्हा संघर्ष झाला. परंतु अमीर बरीद दौलताबाद येथे अचानक मरण पावल्यामुळे बुऱ्हान निजामशहाने इब्राहीम आदिलशहाशी तह करून सोलापूर किल्ला परत दिला.

इब्राहीम आदिलशहाच्या काळात झालेल्या अनेक युद्धांमुळे ताण असह्य होऊन त्याचे मानसिक संतुलन बिघडले, अशा विपन्नावस्थेतच तो मरण पावला.

त्यानंतर गादीवर आलेल्या सुलतान अली आदिलशहाने इ.स. १५५८ ते १५८० या काळात राज्य केले. त्याने राज्यात शिया पंथ सुरू केला. अली आदिलशहाचा विवाह हुसेन निजामशहाची राजकन्या चांदबिबीशी झाला होता. निजामशहाच्या ताब्यातील कल्याणी व सोलापूर हे किल्ले घेण्यासाठी त्याने विजयनगरच्या रामरायाची मदत घेऊन कल्याणीचा किल्ला मिळविला (१५५८). १५६५ च्या तालीकोटच्या लढाईत अली आदिलशहाने विजयनगरविरुद्ध भूमिका घेतली होती. १५६५ नंतर विजयनगर राज्याचा अंकुश न राहिल्यामुळे दक्षिणेतील या शाह्या आपसात भांडू लागल्या. विजापूर-अहमदनगर संबंध कधीच सलोख्याचे नव्हते. परिणामी त्यांच्यात पुन्हा युद्ध सुरू झाले. विजापूरचा सरदार किश्वरखानाने निजामशहीस शह देण्यासाठी १५६९ मध्ये धारूर येथे किल्ला बांधला. परंतु मुर्तजा निजामशहाने किश्वरखानास ठार मारून तो किल्ला अहमदनगर राज्याच्या वर्चस्वाखाली आणला. १५६९ मध्ये जगपालराव नाईक निंबाळकर हे फलटणचा कारभार पाहत होते. (त्या घराण्याचा मूळपुरुष निबराज परभार यास मुहम्मद तुघलकाने नाईक हा किताब दिला होता.) हिंगणी-बेरडीचे बाबाजी भोसले दरवर्षी चैत्र महिन्यात शंभू महादेवाच्या यात्रेस जात असत. वाटेत त्यांचा मुक्काम फलटणच्या निंबाळकरांकडे होत असे. बाबाजी भोसलेंची दोन्ही मुले (मालोजी व विठोजी) जगपालराव नाईक यांच्याकडे नोकरीस राहिले. यांच्या साह्याने जगपालरावाने आपला प्रदेश वाढविला. १५७१ मध्ये अली आदिलशहाने पोर्तुगिजांच्या ताब्यातील गोवा व निजामशहाने रेवदंडा बंदर घेण्याचा अयशस्वी प्रयत्न केला. १५८० मध्ये अली आदिलशहाचा खून झाला. अली आदिलशहा हजरजबाबी म्हणून प्रसिद्ध होता. अली आदिलशहाच्या कारकिर्दीत मोगलांचा प्रथम संबंध आला. सम्राट अकबराचा वकील ख्वाजा अब्दुल्ला १५७९ मध्ये दक्षिणेतून परत आला, अशी नोंद अबूल फजलने केली आहे. आदिलशहाचा मृत्यू झाला, त्या वेळी मोगलांचा दुसरा वकील ऐन-उल-मुल्क शिराजी अली हा विजापूर येथे होता.

अली आदिलशहानंतर त्याचा अल्पवयीन पुतण्या सुलतान इब्राहीम आदिलशहा (दुसरा) याने ९ एप्रिल १५८० पासून १२ सप्टेंबर १६२७ पर्यंत राज्य केले. १५८४ मध्ये इब्राहिम आदिलशहाची बहीण खुदिजा सुलताना हिचा विवाह अहमदनगरच्या हुसेन निजामशहाबरोबर झाला. तिच्यासोबत चांदबिबी अहमदनगर येथे गेली. ती परत विजापूर येथे आली नाही. १५९०-१५९२ ह्या काळात फलटणच्या जगपालाचा संघर्ष आदिलशहाशी झाला. त्यात मालोजी व विठोजी या

बंधूंनी जगपालाची बाजू सावरली. त्यामुळे विजापूर दरबारात भोसल्यांचा लौकिक पसरला. १५९६ मध्ये अहमदनगर राज्यावर मोगलांनी आक्रमण केले. या वेळी इब्राहीम आदिलशहाने निजामशाहीस मदत केली. १६०३ मध्ये मोगलांशी झालेल्या तहानुसार इब्राहीम आदिलशहाने आपल्या मुलीचा विवाह मोगलराजपुत्र दानियल याच्याशी करून दिला. स्वतः फेरिस्ता विजापूरच्या राजकन्येस पाठविण्यासाठी बऱ्हाणपूरपर्यंत गेला. वाटेत त्यांचा मुक्काम पैठण येथे होता. १६१४ मध्ये आदिलशहाचा दाभोळचा मोकदम कृष्णाजीराव महाडीक मरण पावला. १६२५ च्या भातवडीच्या लढाईनंतर शहाजीराजे आदिलशाहीत आले होते. १५२६ मध्ये इब्राहीम आदिलशहाने नागोजीराव घाटगे यांस सरदेशमुख व झुंजारराव असे किताब दिले. विजापूर राज्यात त्यांची जहागिरी होती. सर्जेराव, प्रतापराव इत्यादी अनेक किताब या घराण्यास मिळाले होते (मूळ खटाव प्रांतात राहणारे मलवडीचे देशमुख असलेल्या कामराज घाडगे या मूळ पुरुषास माण प्रांताची देशमुखी व सरदेशमुखी मिळाली होती.) १६२७-२८ मध्ये परंडा किल्ला आदिलशहाच्या ताब्यात आला.

समकालीन साहित्यात 'जगद्गुरू' या नावाने विख्यात झालेला हा सुलतान सर्व अदिलशाहांत सरस राजा होऊन गेला. सातारा जिल्ह्यातील एका पाटीलकीच्या झगड्याबाबत इब्राहीम आदिलशहाने हे प्रकरण पैठणच्या पंडिताकडे पाठविले होते. या मजहरमध्ये 'इब्राहीम पातशहा जगद्गुरू' असे म्हटले आहे. त्याने 'नवरसमाला' या ग्रंथाची रचना केली. तो सरस्वती आणि गणेश यांचा भक्त होता. तो सुन्नी पंथाचा समर्थक असूनही इतर पंथीयांनाही त्याने सन्मानाने वागविले. राज्यात तोडरमलची महसूलपद्धती लागू केली व राज्याचे उत्पन्न वाढविले. मराठ्यांना व ब्राह्मणांना मोठे अधिकार दिले. पोर्तुगिजांना खुला व्यापार करू दिला. या कारणामुळे त्याचे राज्य भरभराटीला आले. मोगल सम्राट अकबराप्रमाणे त्याला धार्मिक व सांस्कृतिक क्षेत्रात रुची होती. अकबराचा वकील सरमदी हा सन १६०० मध्ये विजापूर दरबारात आला होता. लष्करी विजयापेक्षा त्याची सांस्कृतिक देणगी दक्षिण भारताच्या इतिहासाच्या दृष्टीने महत्त्वाची आहे.

यानंतर विजापूरच्या गादीवर आलेल्या सुलतान महम्मद आदिलशहाने १२ सप्टेंबर १६२७ पासून ४ नोव्हेंबर १६५६ पर्यंत राज्य केले. या सुलतानाची कारकिर्द दक्षिण भारताच्या दृष्टीने व त्यातही महाराष्ट्राच्या मध्ययुगीन इतिहासाच्या दृष्टीने महत्त्वाची आहे. या सुलतानाच्या काळातच मराठ्यांचा उदय झाला. आदिलशाहीकाळात कुडाळ परगण्याच्या देशमुखीचे काम एका प्रभू घराण्याकडे होते. १६२७ च्या सुमारास खेमसावंत या सरदाराने विजापूरच्या सुलतानाकडून काही प्रांतांची देशमुखी संपादन केली. पुढे त्यांच्या वंशजांनी कुडाळ येथील प्रभु-देशमुखांचा समूळ नाश करून सर्व प्रांताची देशमुखी विजापूर दरबारातून आणली. १६२४ नंतर मुधोजी निंबाळकर (दुसरा) हा फलटणचा कारभारी झाला. १६३१ मध्ये आदिलशहाने त्यास पकडून साताऱ्याच्या किल्ल्यात कैदेत ठेवले. तेथे तो सात वर्षे होता. साबाजी व जगदेवराय या त्याच्या मुलांना आदिलशहाने दहीगाव व भाळवणी ही गावे जहागिरीदाखल दिली होती. (पुढे शहाजीने विजापूर येथे गेल्यावर १६३८ मध्ये मुधोजीस सोडविले. या स्नेहसंबंधांतूनच पुढे मुधोजीची मुलगी सईबाई हिचा विवाह शिवाजी राजांशी झाला. १६४४ मध्ये मुधोजी वर उल्लेखीलेल्या त्याच्या दोन पुत्रांकडून मारला गेला.) ७ सप्टेंबर १६३२ ला परांडा किल्ल्यावरील मुलूख-मैदान तोफ महम्मद अलिशहाने मुराररावाकडून विजापूरला आणली होती. १६३५ मध्ये मोगल आणि आदिलशहा यांच्यात झालेल्या तहानुसार अहमदनगर राज्याचा काही भाग विजापूरला देण्यात आला होता. अहमदनगरचा पाडाव झाल्यानंतर मोगलांनी विजापूर घेण्याचा प्रयत्न केला होता. परंतु मुराररावाने आपल्या पराक्रमांद्वारे मोगलांना विजापुरी मुलखातून परत जाण्यास भाग पाडले. अहमदनगर राज्याचा शेवट झाल्यावर शहाजीराजांनी आदिलशाहीत प्रवेश केला होता. महंमद आदिलशहाने शहाजी राजे व रणदुल्लाखान यांच्या मदतीने कर्नाटकावर आपले वर्चस्व प्रस्थापित केले. या काळात विजापूर राज्याने विस्तार, सामर्थ्य आणि मोठेपणा यांची

कमालमर्यादा गाठली. महंमद आदिलशहाच्या कारकिर्दीतच शिवाजी राजांनी स्वराज्यस्थापनेच्या कार्याची सुरुवात केली होती. दादोजी कोंडदेव हे आदिलशहाच्या काळात कोंडाण्याचे सुभेदार होते.

महम्मद आदिलशहानंतर त्याचा मुलगा अली आदिलशहाने ४ नोव्हेंबर १६५६ ते २४ नोव्हेंबर १६७२ पर्यंत राज्य केले. या वेळी राजपुत्र औरंगजेब दक्षिणेच्या सुभेदारीवर दुसऱ्यांदा आला होता. त्याने विजापूर जिंकून घेण्याची तयारी केली, परंतु शहाजहान बादशहा आजारी पडल्याचे वृत्त समजताच तो अली आदिलशहाशी तह करून दिल्लीस गेला.

निजामशाही राज्य संपुष्टात आल्यानंतर त्या राज्यातील कोकणचा प्रदेश आदिलशाहीच्या वाटणीस आला होता. आदिलशाहीतील जावळीच्या चंद्रराव मोरेचा पाडाव शिवाजी राजांनी केला होता (१६५६). आदिलशाही प्रदेशातील पुणे व सुपे परगण्यांत शहाजी राजांची जहागिरी होती. या जहागिरीचा कारभार त्यांनी शिवाजी राजांना पाहण्यास सांगितला होता. येथूनच शिवाजी राजांनी स्वराज्याचा श्रीगणेशा केला होता. आपला श्रेष्ठ उमराव अफजलखान यास अली आदिलशहाने शिवाजी राजांचा बिमोड करण्यासाठी त्या मोहिमेवर पाठविले होते, परंतु तो मारला गेला. त्यानंतर सिद्दी जोहरच्या स्वारीत पन्हाळा किल्ला त्यांनी आदिलशहास परत दिला. सावंतवाडीच्या लखमसावंताने आदिलशहाची मदत घेऊन शिवाजी राजास विरोध केला होता. परंतु एप्रिल १६५९ मध्ये त्याने शिवाजी राजाबरोबर तह केला. शिवाजी राजांनी रांगणा किल्ला जिंकल्यानंतर सावंतांनी परत आदिलशहाची मदत घेऊन शिवाजी राजांच्या कार्यास विरोध केला. १६६० ला मोगल उमराव शाहिस्तेखानाने विजापूरच्या परांडा किल्ल्यावर आपले वर्चस्व प्रस्थापित केले. पुढे मिर्झाराजा जयसिंगांनी शिवाजी राजांच्या मदतीने विजापूर घेण्याचे प्रयत्न सुरू केले. परंतु आदिलशाही सैन्याने कुतुबशहाची मदत घेऊन विजापूर राज्याचे संरक्षण केले. याच काळात नेताजी पालकर आदिलशहास जाऊन मिळाला. अली आदिलशहाच्या काळात विजापूर दरबार अंतर्गत दुहीने पोखरला होता.

अली आदिलशहानंतर वजीर खवासखानाच्या मदतीने पाच वर्षांचा सिकंदर हा विजापूरचा सुलतान झाला. त्याने २४ नोव्हेंबर १६७२ पासून १५ ऑक्टोबर १६८६ पर्यंत राज्य केले. या काळात विजापूरचा पन्हाळा किल्ला शिवाजीराजांनी दुसऱ्यांदा जिंकला (१६७३), तसेच परळी व सातारा हे किल्ले घेऊन उत्तर कानडा जिल्ह्यापर्यंत स्वाऱ्या केल्या. विजापूर दरबारने बहलोलखान लोदीस शिवाजी राजांचे परिपत्य करण्यासाठी पाठविले. विजापूर दरबारातील अंतर्गत यादवीपायी मोगल सरदार दिलेरखानाने विजापूरवर आक्रमण केले. परंतु त्यास अपयश आले. १६८३ मध्ये मोगल राजपुत्र अकबराने केलेले बंड मोडण्यासाठी तो दक्षिणेत आला. छत्रपती संभाजी राजांचा बिमोड लवकर होत नाही, हे पाहून औरंगजेबाने विजापूर राज्य खालसा करण्याचे ठरविले. या वेळी सिकंदर आदिलशहा १६ वर्षांचा होता. विजापूर राज्याला वाचवू शकणारी योग्य व्यक्ती दरबारात नव्हती. अनेक आदिलशाही सरदारांनी मोगलांची ताबेदारी पत्करली होती. अशा कठीण प्रसंगी सिकंदर औरंगजेबास शरण आला. एक लाख रुपये खर्चाची तरतूद करून औरंगजेबाने त्यास औरंगाबादेस अटकेत ठेवले व विजापूरचे राज्य खालसा करून ते मोगल साम्राज्यात सामील केले (१५ ऑक्टोबर १६८६). पुढे १७०१ साली सिकंदर ह्यास विष घालून ठार मारण्यात आले.

१६८० मध्ये महाराष्ट्रातून विजापूरच्या आदिलशाहीचे समूळ उच्चाटन होऊन त्याची जागा मराठ्यांनी घेतली होती. या वेळी महाराष्ट्राचा ८०% भाग मोगलांकडे होता. लातूर जिल्ह्यातील निलंगा येथील १६३५ ते १६७२ या काळातील आदिलशाही फर्मानांमध्ये जकात कर, युद्ध कर, सुलेमान पट्टी, सादिरवार, मेजवानी, पायपोशी, कोतवाली, ठाणेदारी, पोतदारी, रोजमारा, नेऊ अशा करांचा उल्लेख आढळतो. अशा प्रकारे १९७ वर्षे चाललेल्या विजापूर राज्याचा दारुण अंत झाला.

# एलिचपूरची इमादशाही

महाराष्ट्रातील उत्तरेकडील भागावर वऱ्हाडच्या इमादशाही घराण्याने (इ.स. १४८६ ते १५७४) राज्य केले. मराठवाड्यातील परभणी जिल्ह्यापर्यंत वऱ्हाड प्रांताची सरहद्द होती. या घराण्यातील चार सुलतानांनी राज्य केले. महाराष्ट्राच्या दृष्टीने यांपैकी तीन सुलतानांची कारकिर्द विचारात घ्यावी लागते.

या घराण्याचा संस्थापक फतउल्लाह इमादुल्मुल्क हा मूळचा तेलंगी ब्राह्मण असून विजयनगरचा रहिवासी होता. इ. स. १४२३ मध्ये अहमदशहा बहमनीच्या विजयनगरवरील स्वारीत त्यास कैद करून मुसलमान केले. खान जहान तुर्क याच्या सरंक्षणदलात तो बहमनीचा वऱ्हाडचा सुभेदार होता. त्याच्या अंगच्या गुणांमुळे तो वरिष्ठ पदावर पोहोचला. खानजहान तुर्कच्या मृत्यूनंतर वजीर महमूद गावानने त्यास इमादुल्मुल्क ही पदवी देऊन वऱ्हाडच्या सेनापतिपदी नियुक्त केले. इ. स. १४७२–७३ मध्ये बंकापूर व बेळगाव मोहिमेत महमूद गावान यास त्याने मदत केली. त्यामुळे त्याची वऱ्हाडचा सुभेदार म्हणून नियुक्ती झाली. महमूद गावानच्या वधानंतर तो बहमनीचा वजीर झाला. परंतु तेथे स्थिर न राहता अहमद बहरी व युसुफ आदिलशहा यांच्याप्रमाणे त्यानेही आपले स्वातंत्र्य जाहीर केले. इ. स. १५१० साली तो मरण पावला.

त्यानंतर त्याचा मुलगा अल्लाउद्दीन यास इस्माईल आदिलशहाच्या सल्ल्यावरून महमूदशहा बहमनीने इमादुल्मुल्क ही पदवी देऊन वऱ्हाडचा सुभेदार म्हणून कायम केले. ह्याने स्वतःस सुलतान म्हणून घोषित केले व गावीलगड ही आपली राजधानी केली. इ. स. १५१० साली बुऱ्हाण निजामशहा अल्पवयीन असल्याचा फायदा घेऊन निजामशाहीवर आक्रमण केले. परंतु रघुवेरी येथे त्याचा पराभव झाला. खानदेशचा सुलतान आदिलखान फारुकीने या दोघांत समेट घडवून आणला. इ. स. १५१७ मध्ये माहूरच्या खुदाबंदखानाने बंड केले व दक्षिण वऱ्हाड काबीज केले. या वेळी कुतुब–उल–मुल्क याने त्याच्या राज्यातील काही प्रदेश जिंकून घेतला होता. बुऱ्हान निजामशहाने याचा फायदा घेऊन पाथरी व माहूर जिंकले (१५२०). पुढे पाथरी गावावरून अहमदनगर व वऱ्हाड या राज्यांमध्ये दोन युद्धे झाली. या वेळेस अल्लाउद्दीन इमादशहाने गुजरातच्या बादशहाची मदत घेऊन आपले राज्य वाचविले. यामुळे तो स्वतःच गुजरातचा मांडलिक झाला. आपली गेलेली प्रतिष्ठा मिळविण्यासाठी त्याने बिदरची व विजापूरची मदत घेण्याचा प्रयत्न केला. परंतु निराश होऊन इ. स. १५३०–३१ मध्ये तो मरण पावला.

यानंतर दर्या इमादशहा गादीवर आला. त्याने निजामशाही घराण्याशी वैवाहिक संबंध प्रस्थापित केले. इ. स. १५४०–४१ मध्ये अहमदनगर व विजापूर राजांमध्ये मध्यस्थी करून इब्राहिम आदिलशहास परंडा किल्ला देण्यास भाग पाडले. इ. स. १५४३ मध्ये बुऱ्हान निजामशहास सोलापूरच्या मोहिमेत मदत केली. निजामशाही व आदिलशाही घराण्यांतील वैमनस्यामुळे इमादशहास आपला सेनापती जहांगीरखान गमवावा लागला. याच धक्क्याने तो इ. स. १५६१–६२ मध्ये मरण पावला.

दर्या इमादशहानंतर त्याचा अल्पवयीन मुलगा बुऱ्हान इमादशहा गादीवर आला. परंतु त्यास त्याचा सरदार तुफालखान याने कैद करून नरनाळ्याच्या किल्ल्यात कैद करून ठेवले व राज्य बळकावले. त्याच्या सामर्थ्यात होणारी वाढ पाहून विजापूर व अहमदनगर येथील सुलतानांनी एक मोहीम काढून तुफालखानास ठार मारले. परंतु बुऱ्हान इमादशहास गादीवर न बसविता मुर्तजा निजामशहाने त्यास कैद केले. तेथेच तो मरण पावला. अशा रीतीने इ. स. १५७४ मध्ये वऱ्हाडचे राज्य संपुष्टात आले व हा भाग अहमदनगरच्या निजामशाहीत समाविष्ट करण्यात आला.

# बिदरची बरीदशाही

बिदर येथील बरीदशाही घराण्यात (इ.स. १४९२ ते १६१९) एकूण नऊ सुलतान होऊन गेले. त्यांपैकी पहिल्या तीन सुलतानांची कारकिर्द मध्ययुगीन महाराष्ट्राच्या इतिहासाच्या दृष्टीने विचारात घ्यावी लागते. बिदरच्या बरीदशाही सुलतानांच्या ताब्यात प्रामुख्याने आजच्या महाराष्ट्रातील मराठवाडा विभागातील काही भाग होता.

बिदरच्या बरीदशाही घराण्याचा संस्थापक कासीम बरीद तुर्क होता. हा जॉर्जिअन होता, असे फेरिस्त्याने म्हटले आहे. ख्वाजा शहाबुद्दीन येजदी याने त्यास बिदर येथे आणले. बहमनी सुलतान तिसरा मुहम्मद याच्या जॉर्जिअन सेवकांमध्ये तो भरती झाला. त्याने पैठण व चाकण यादरम्यानच्या भागांवर वर्चस्व गाजविणाऱ्या साबाजी मराठ्यांची पुंडाई मोडून काढली व सुलतानाची मर्जी संपादन केली. त्यामुळे सुलतानाने साबाजीच्या मुलीबरोबर कासीम बरीदचा मुलगा अमीर बरीद याचा विवाह लावून दिला. राजधानी बिदरमध्ये परदेशी मुसलमान व दक्षिणी मुसलमान यांच्यामध्ये झालेल्या दंगलीस योग्य रितीने हाताळल्याबद्दल कासीम बरीदला उदगीरचा किल्ला बक्षीस म्हणून देण्यात आला. कासीम बरीद बहमनीचा वजीर असून त्याचे बहमनी सुलतान तिसरा मुहम्मद याच्यावर पूर्ण नियंत्रण होते. अहमद निजाम-उल-मुल्क, फतउल्लाह, इमाद-उल-मुल्क व युसुफ आदिलशहा यांच्याप्रमाणे त्यानेही स्वतंत्र होण्याचा प्रयत्न केला व आपल्या जहागिरीतील औसा, कंधार व उदगीर हे किल्ले बळकावले (इ.स.१४९२). बहमनी सुलतानांकडे बिदर शहर व किल्ला ठेवून त्याने स्वतःच्या नावाने खुत्बा वाचला व नाणी पाडली. इ. स. १४९९ मध्ये त्याने बहमनी सुलतानास गादीवरून दूर करण्याचा प्रयत्न केला. परंतु इतर शाह्यांच्या दडपणाखाली त्याने परत बहमनी सुलतान तिसरा मुहम्मद याच्याकडे राज्यकारभार सोपविला व तो औसा किल्ल्यात जाऊन राहिला. त्याने १२ वर्षे राज्य केले व इ. स. १५०४ मध्ये तो मरण पावला.

त्यानंतर अमीर बरीद हा गादीवर आला. माहूरच्या खुदाबंद खानाचा मुलगा शारजाखान याने कंधार व उदगीर येथे लुटालूट केली, म्हणून त्याने इ. स. १५१७ साली बहमनी सुलतानाच्या वतीने माहूरवर आक्रमण करून खुदाबंद खानास ठार मारले. परंतु वऱ्हाडच्या इमारशहाच्या दडपणाखाली, अमीर बरीदने माहूर व रामगीर येथे खुदाबंद खानाच्या मुलांच्या नेमणुका केल्या. परंतु इमादशहाने दगाफटका करून माहूर व रामगीर येथे आपले वर्चस्व प्रस्थापित केले. इ. स. १५२८-२९ मध्ये इस्माईल आदिलशहाने बिदरवर आक्रमण केले. तेव्हा बिदर किल्ल्याच्या संरक्षणाची जबाबदारी अली बरीदवर सोपवून अमीर बरीद उदगीर किल्ल्यात जाऊन राहिला. विजापूरचा वजीर असदखान याने त्यास कैद केले व विजापूरला नेले. तेथे अमीर बरीद यास अपमानास्पद वागणूक देण्यात आली. शेवटी अमीर बरीदने बिदर किल्ला व बहमनीचा खजिना देण्याचे मान्य करून स्वतःचा जीव वाचविला. त्याप्रमाणे त्याचा मुलगा अली बरीदने बिदर किल्ला आदिलशहास दिला. व स्वतः उदगीर किल्ल्याचा आश्रय घेतला. अमीर बरीदचा मृत्यू इ. स. १४४२ मध्ये दौलताबाद येथे झाला. याच्या काळातच बहामनी घराण्यातील शेवटचा सुलतान कलिमुल्ला बहमनी हा बिदरहून अहमदनगरकडे पळून गेला.

अमीर बरीदनंतर त्याचा मुलगा अली बरीद याने स्वतःस सुलतान जाहीर केले. बदिरशाही घराण्यातील हा पहिला सुलतान होय. इ. स. १५४८ मध्ये अली बरीदच्या ताब्यातील कंधार, उदगीर व औसा हे किल्ले बुऱ्हान निजामशहा व दर्या इमादशहा यांनी संयुक्तपणे जिंकले व या दोघांत ठरल्याप्रमाणे उदगीरचा किल्ला इमादशहास देण्यात आला. त्याने हा किल्ला अली बरीद यास बक्षीस दिला. या वेळेपर्यंत बरीदशहाच्या ताब्यातील बहुतेक प्रदेश निजामशाहीच्या ताब्यात आला होता. अली बरीदच्या काळातील महत्त्वाची घटना म्हणजे १५६५ च्या तालीकोटच्या लढाईत विजयनगरच्या रामरायाविरुद्ध त्याने स्वतः भाग घेतला. अली बरीदचा मृत्यू इ. स. १५७९-८० मध्ये झाला.

अली बरीदनंतर त्याचा मुलगा इब्राहीम बरीद गादीवर आला. त्याने सात वर्षे राज्य केले. त्यानंतर

इ. स. १५८७ मध्ये दुसरा कासीम बरीद सुलतान झाला. १५९१ मध्ये दुसरा अमीर बरीदने त्यास पदच्युत केले. त्यानंतर मिर्झा अली बरीद, अमीर बरीद तृतीय (१६०९) हे गादीवर आले. इ. स. १६१९ मध्ये इब्राहीम आदिलशहाने त्यास कैद करून बिदर हे आदिलशाही राज्यात समाविष्ट केले.

## गोवळकोंड्याची कुतुबशाही

बहमनीच्या ऱ्हासानंतर त्याच्या पाच शाह्यांत गोवळकोंड्याचे कुतुबशाही घराणे सर्वांत योग्य होते. इ. स. १५१२ पासून १६८७ पर्यंत या घराण्यात एकूण सहा सुलतानांनी मिळून १७५ वर्षे राज्य केले. त्यांपैकी महाराष्ट्राच्या इतिहासाच्या दृष्टीने शेवटचा कुतुबशहा अबुल हसन याची कारकिर्द विचारात घ्यावी लागते.

गोवळकोंड्याच्या कुतुबशाही घराण्याचा संस्थापक कुली कुतुब-उल-मुल्क हमदानी हा इराणमधील राजवंशातील होता. महम्मदशहा बहमनीच्या काळात तो हिंदुस्थानात आला व त्याच्या शरीररक्षक दलात काम करू लागला. आपल्या अंगच्या गुणांमुळे तो महम्मदशहा बहमनीचा विश्वासपात्र सरदार झाला. बहमनी राज्याच्या पूर्वेकडील गोवळकोंडा सुभ्यात वजीर महम्मद गावान याने कुली कुतुब-उल-मुल्क याला तेथील सुभेदार नेमले होते. महम्मद गावानच्या मृत्यूनंतर तो आपल्या जहागिरीचा राज्यकारभार स्वतंत्रपणे पाहू लागला. तरीही तो बहमनी सुलतानांना नियमित खंडणी देत असे. इ. स. १५१२ मध्ये त्याने स्वतःस शहा ही पदवी घेऊन तो स्वतंत्र झाला. त्याने इ. स. १५४३ पर्यंत राज्य केले. त्याने पूर्वेकडील हिंदू राजांचा बिमोड केला. विजयनगर, बरीदशाही, आदिलशाही यांनी अहमदनगर येथील राज्यांशी अनेक युद्धे केली. त्याचा मोठा मुलगा जमशीद याने त्याचा खून घडवून आणला (१५४३). त्याने बहमनीच्या वतीने १६ वर्षे व स्वतंत्रपणे ४४ वर्षे राज्यकारभार केला.

त्यानंतर जमशीर कुतुबशहा सुलतान झाला. त्याने इ. स. १५४३ पासून २२ जानेवारी १५५० पर्यंत राज्य केले. सैफुद्दीन-उल-मुल्क व जगदेवराव हे शूर सरदार त्याचे मदतनीस होते. त्यानंतर त्याचा भाऊ इब्राहीम कुतुबशहा याने २७ सप्टेंबर १५५० ते १५८० या काळात राज्य केले. इब्राहीम कुतुबशहाचा सांभाळ विजयनगरच्या राजाने केला होता. याच्या काळात मराठ्यांचा उत्कर्ष झाला. दरबारात असलेले दिवाण जगदेवराव व सरदार रायराव यांचे उच्चस्थान पाहून इतर मुसलमान सरदारांनी कुतुबशहाजवळ त्यांच्या विरुद्ध तकरार केली. रामरावास ठार मारण्यात आले. हे पाहून जगदेवरायाने बंड पुकारले. तो वऱ्हाड, अहमदनगर, विजापूर येथे आश्रयास गेला. त्याने विजयनगरच्या राजांचे साह्य घेऊन अहमदनगर व कुतुबशहा यांच्या फौजेस जेरीस आणले. १५६५ च्या तालीकोटच्या लढाईत त्याने रामरायाविरुद्ध भाग घेतला. या सुलतानाच्या शेवटच्या कालखंडात मुरारराव हा त्याचा दिवाण होता. इब्राहीम पतनचा तलाव आणि हुसैनसागर यांची या काळात निर्मिती झाली.

इब्राहीम कुतुबशहानंतर इ. स. १५८० ते १६१२ या काळात महम्मद कुली याने राज्य केले. १६०७ मध्ये परदेशी व देशी मुसलमान ह्यांच्यात गोवळकोंडा येथे दंगा झाला. अनेक हिंदू राजांशी त्याचा संघर्ष झाला. या काळातच दक्षिणेत मोगलांचे आक्रमण सुरू झाले. महम्मद कुलीने मोसा नदीच्या काठावर एका शहराची निर्मिती केली. आपल्या आवडत्या पत्नीच्या नावावरून या शहरास भागानगर नाव दिले (इ. स. १५८९). पुढे महम्मद कुलीचा पुत्र हैदर याच्या नावावरून या शहरास हैदराबाद नाव पडले. प्रसिद्ध चार मिनारची निर्मिती याच काळातील आहे.

यानंतर गोवळकोंड्याच्या गादीवर अब्दुल्ला हुसेन याने ३१ जानेवारी १६१२ पासून १६५८ पर्यंत राज्य केले. याच्या काळातच राजपुत्र औरंगजेबाने या राज्यावर आक्रमण केले. परंतु अब्दुला हुसेन कुतुबशहाने मोठी खंडणी देऊन बचाव केला. त्यामुळे शहाजहान बादशाहाशी त्याचा स्नेह कायम राहिला. पुढे अब्दुल्ला हुसेन याचा वजीर मीर जुमला

मोगलांना फितूर झाला. त्यावरून राजपुत्र औरंगजेबाने पुन्हा एकदा गोवळकोंड्यावर आक्रमण केले व मोठी खंडणी देण्यास कुतुबशहास भाग पाडले. त्यामुळे अब्दुल्ला कुतुबशहा मोगलांचा ताबेदार झाला.

अब्दुल्ला हुसेननंतर त्याचा जावई अबुल हसन याने मादण्णापंताच्या साह्याने इ.स.१६५८ पासून १६८७पर्यंत राज्य केले. त्याने मादण्णापंतास 'सूर्यप्रकाशराव' हा किताब दिला व त्यास वजीरपदी नेमले (१६७३ ते १६८६). या काळातच रघुनाथपंथ हणमंणे याच्या दूरदृष्टीमुळे सुलतान अबुल हसन व शिवाजी राजे यांचे सख्य झाले. प्रसंगी कुतुबशहाची शिवाजीस मदत होईल, या हेतूने मदणपंत उर्फ मारण्णा आणि एकनाथपंथ उर्फ आकण्णा या दोन मुत्सद्यांकडे गोवळकोंड्याचा कारभार असल्यामुळे त्यांच्यामार्फत धोरण आखले. औरंगजेब गोवळकोंड्याचे राज्य घेण्यास टपला आहे, विजापूर राज्यही मोगलांचे अंकित होत आहे, तेव्हा अशा प्रसंगी कुतुबशहा मराठ्यांशी मोठ्या खुशीने सख्य करील असा रघुनाथपंताचा तर्क होता, तो खरा ठरला. रघुनाथपंतांनी मदणपंत याच्या साह्याने कुतुबशहाशी तह केला. आकण्णा व मदणपंत ह्यांची भेट झाली. हिंदू धर्माची वृद्धी व्हावी हा त्यामागचा हेतू व त्यानुसार शिवाजी राजांचे कार्यांचे महत्त्व जाणून शिवाजी राजांच्या कर्नाटकातील मसलतीस मदत केली. मोगल बादशहास दक्षिणेत येऊ द्यायचे नाही, हा जो शिवाजीचा संकल्प होता, त्याची पूर्तता या मोहिमेतून साध्य करावयाची होती. आणि मदणपंतांस रघुनाथपंत या मुत्सद्याचा डाव शिवाजीमार्फत तडीस न्यायचा होता. मदणपंतांचे हे वर्चस्व गोवळकोंड्याचा सेनापती इब्राहीम खान यास सहन झाले नाही. १६८३मध्ये औरंगजेब दक्षिणेत आला असता, तो औरंगजेबास सामील झाला. या गडबडीत मदणपंत मारला गेला. पुढे १६८७मध्ये औरंगजेबाने हे राज्य जिंकून घेतले व अब्दुल हसन यास दौलताबादच्या किल्ल्यात कैदी म्हणून ठेवले.

## समारोप

राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक आणि धार्मिक अशा सर्व अंगांनीच दहाव्या शतकानंतरचा काळ भारताच्या जीवनात अत्यंत महत्त्वाचा आहे. मुसलमानांच्या आक्रमणांचे सामाजिक, धार्मिक आणि सांस्कृतिक परिणाम सर्वत्र दिसू लागले होते. मथुरा, ठाणेश्वर, कनोज, सोमनाथ येथील मुसलमानी आक्रमणांच्या रेट्यापुढे शेकडो वर्षांच्या श्रद्धा आणि धार्मिक समजुती कोसळून पडत होत्या. वर्णव्यवस्था, जातिव्यवस्था यांमुळे शतशः विदीर्ण झालेला आणि आध्यात्मिक साधनेत मग्न झालेला हिंदू समाज मुसलमानी मूर्तिभंजकांपुढे दिङ्मूढ होऊन गेला. मंत्र, तंत्र, योग इत्यादी गूढ साधना, अनेक देवदेवतांची विकृत उपासना यांनी आपल्या देवतांचे रक्षण होऊ शकत नाही, हे हिंदू समाजाला प्रथमच दिसून आले. सनातन ब्राह्मण धर्माने जातिव्यवस्थेची बंधने अधिक कठोर करून पददलित समाजाला इस्लामच्या कक्षेत लोटले. मुस्लीम आक्रमकांनी मठ-मंदिराची लुटालूट करून हजारो योगी, संन्यासी यांची कत्तल करून हिंदू समाजाची मंत्र-तंत्रांवरील श्रद्धा पार धुळीला मिळविली होती. मुसलमान जसे एकेश्वरवादी होते, तसेच ते सामाजिकदृष्ट्या एकसंध होते. विविध कारणांमुळे फार मोठ्या समाजाने इस्लामचा स्वीकार केला. पुढे उत्तर भारतातील रामानंद, कबीर, नानक आदी धर्मसुधारकांना वर्णजातिभेदाचे माहात्म्य नाहीसे करूनच लोकोद्धाराचे कार्य हाती घेतले. मुसलमानी आक्रमणांमुळे उत्तर भारतात सुरू झालेल्या या प्रचंड राजकीय, धार्मिक घडामोडींचे पडसाद दक्षिणेकडे उमटले होते. महाराष्ट्रातही मुस्लीम धर्मप्रचारकांचे कार्य यादवपूर्व काळापासूनच सुरू असल्याचे दिसून येते. खुलताबाद, दौलताबाद, औरंगाबाद ही या वेळी मुस्लीम धर्म प्रचारकांची प्रमुख केंद्रे होती.

चौदावे शतक हे महाराष्ट्रात विशेष महत्त्वाचे ठरले. त्यामुळे महाराष्ट्रीय लोकांच्या राहणीमानात, समाजव्यवस्थेत, ग्रामव्यवस्थेत, पेहरावात इत्यादी अनेक बाबतींत बदल घडून आला. याला जी परिस्थिती कारणीभूत ठरली, त्यांपैकी प्रमुख कारणे म्हणजे सर्वव्यापी भयंकर दुष्काळ, परकीय सत्तेचा अंमल व समाजसंस्थांचा उच्छेद ही होत. यामुळे स्वधर्म,

स्वभाषा व स्वसंस्कृती यांना उतरती कळा प्राप्त झाली. या पार्श्वभूमीवर महाराष्ट्रातील संतांनी येथील समाजातील सांस्कृतिक आणि आध्यात्मिक संकल्पनांचे शुद्धिकरण केले. त्यांना तेथे नवे रूप देऊन संपूर्ण समाजजीवन नव्या मार्गावर आणण्याचे कार्यही केले. या सर्व सुधारणांचा प्रारंभ महाराष्ट्रात झाला. मध्ययुगीन महाराष्ट्रात संतांनी केलेली कामगिरी तत्कालीन परिस्थितीच्या संदर्भात विचारात घेतली पाहिजे.

संतांच्या कार्याचे अत्यंत मूलग्राही आणि समतोल विश्लेषण न्यायमूर्ती रानडे यांनी प्रथम केले. सतराव्या शतकात महाराष्ट्रात उदयाला आलेल्या राष्ट्रवादाची पूर्वतयारी संतांच्या धर्मसुधारणेने शिवकालापूर्वी साडेतीनशे वर्षे कशी चालविली होती, याचे मार्मिक विवेचन त्यांनी केले आहे.

कोणताही धर्मविचार स्वयंभू असत नाही. समाजजीवनातूनच त्याला आकार येत असतो. यामुळेच कोणत्याही समाजातील धर्मसुधारणेची चळवळ अपरिहार्यपणे समाजसुधारणेचेच रूप घेते. विशिष्ट श्रद्धा आणि विधियुक्त आचार ही धर्माची प्रमुख अंगे होत. महाराष्ट्रातील धर्मसुधारणेची चळवळ मूलतः सामाजिक आणि सांस्कृतिक आहे. तिला वर्गीय अधिष्ठान फारसे लाभले नाही. बहुजनांच्या अंतरंगातील वेदना या चळवळीतून व्यक्त झाल्या असल्या, तरी त्यात आर्थिक दुरव्यवस्थेविरुद्ध बंडखोरी नसून आध्यात्मिक, मानसिक, सांस्कृतिक दास्यांविरुद्धचा विषाद व्यक्त झालेला आहे. जन्मजात वर्णव्यवस्थेवर अधिष्ठित असलेल्या समाजव्यवस्थेचे हे वैशिष्ट्य आहे. चातुर्वर्ण्यव्यवस्था ही मूलतः अर्थव्यवस्था आहे. पण वर्ग आणि वर्ण यांचा आशय भिन्न आहे. चातुर्वर्ण्य व्यवस्थेत सर्व समाजघटकांच्या व्यवसायांची निश्चिती करून दिली असल्यामुळे या व्यवस्थेचे मूळचे स्वरूप आर्थिक आहे. पण ही व्यवस्था जन्माधिष्ठित झाल्याने आणि ब्राह्मण समाजाने या व्यवस्थेमागे पारलौकिक कल्पनांचे अधिष्ठान उभे करून तिला धार्मिक पावित्र्य प्राप्त करून दिले असल्यामुळे तिचे आर्थिक स्वरूप अदृश्य होऊन तिला सांस्कृतिक-सामाजिक श्रेष्ठ -कनिष्ठतेचे स्वरूप आले आणि म्हणूनच आपल्याकडील धर्मसुधारणेचे स्वरूप मुख्यतः सांस्कृतिकच राहिले. वर्णव्यवस्थेने निर्माण झालेल्या आध्यात्मिक आणि सांस्कृतिक गुलामगिरीविरुद्ध या सर्व चळवळींचा रोख राहिला. परंतु संतांनी वर्णव्यवस्थेविरुद्ध बंड केले नाही. तसेच नव्या तत्त्वज्ञानासाठी समाजदेह निर्माण केला नाही. वर्णजन्य विषमतेने निर्माण केलेल्या मानसिक-आत्मिक दास्यशृंखला तोडणे, हे महत्त्वाचे कार्य त्यांच्यासमोर होते.

चातुर्वर्ण्यातील शूद्रांचा वरिष्ठ वर्णियांशी चालू असलेला संघर्ष हा ब्राह्मणांनी निर्माण केलेल्या धार्मिक कर्मकांडाविरुद्धच होता. जन्मजात वर्णव्यवस्थेमुळे व कर्मसिद्धान्तामुळे जनतेचे मन आणि बुद्धी यांना संपूर्ण ग्रहण लागले होते. कर्माचा कायदा कोणालाही तोडता येणे शक्य नव्हते. कर्म $\longrightarrow$ कर्मानुसार जन्म $\longrightarrow$ जन्मानुसार वर्ण अथवा जात आणि वर्गानुसार व्यवसाय, अशी ही अभेद दुव्याची साखळी असल्यामुळे ऐहिक दुर्व्यवस्थेविरुद्ध बंड करणे अथवा नुसता असंतोष व्यक्त करणे म्हणजे परमेश्वरी व्यवस्थेविरुद्ध उभे राहणे होय. त्यामुळे कर्मसिद्धान्ताला बगल कशी द्यावयाची हा मोठा प्रश्न होता. संतांनी कर्मसिद्धान्ताला आव्हान देण्याचा प्रयत्न केला नसला, तरी या सिद्धान्तातून येणारे मानसिक दास्य झुगारून देण्याचा प्रयत्न केला. महाराष्ट्रातील धर्मजीवनाला नवे वळण लावणारा, लोकसंग्रह आणि सामाजिक नीतिमत्ता यांवर भर देणारा, नव्या आशयाने संपन्न झालेला भक्तिमार्ग सुरू करून संतांनी फार मोठे ऐतिहासिक कार्य केले.

बहुतेक मराठी संत कवींनी हिंदुस्थानातील सर्व यात्रा केल्या होत्या. या यात्रा हिमालयाच्या टोकापासून दक्षिण टोकापर्यंत असत. या यात्रांच्या प्रवासात अनेक साधूंशी त्यांचा सबंध येत असे. त्यात अनेक गोष्टी, देशातील इतर ठिकाणचे रितीरिवाज, इतर भागांतील स्थिती कळत असे. त्यामुळे या काळात लोकांचे खरे शिक्षक व उपदेशक हे साधू व कवी होते. याच कारणास्तव लोकांवर त्यांची मोठी छाप होती. मुसलमानी अमलातील ठिकठिकाणची दुर्दशा त्यांच्या प्रत्यक्ष अनुभवास आली. रामदासांनी शिवाजी राजांचे हेतू आपल्या अधिकारवाणीने लोकांस समजावून दिले. महाराष्ट्रात संतांनी भक्तीचे संवर्धन करून समाजातील सर्व वर्गांची धर्मतृष्णा भागविली. संतांच्या या भक्तिमार्गाने सनातन धर्माची पीछेहाट झाली. इ. स. १३०० ते १४००

या काळात महाराष्ट्रात नामदेव, सावतामाळी, गोरा कुंभार, विसोबा खेचर, कुर्मदास, नरहरी सोनार, बंकामहार, चोखामेळा, रोहीदास चांभार असे अनेक संत होऊन गेले. इ.स. १४०० ते १५०० या काळात श्रीपाद वल्लभ, नृसिंह सरस्वती, दामाजी पंत, बहिरंभट्ट उर्फ बहिरा जातवेद. इ.स. १५००-१६०० या काळात भानुदास, जनार्दन स्वामी, एकनाथ, मृत्युंजय ब्रह्मणी, सरस्वती गंगाधर, महालिंगदास, मुधेशचांगा, त्र्यंबकस्वामी, दासोपंत, विष्णुदासनामा असे मोठे नामांकित संत कवी होऊन गेले. इ.स. १६००-१७०० या काळात मुक्तेश्वर, तुकाराम, रामदास, रामदासी कवी, वामनपंडित, रघुनाथपंडित यांव्यतिरिक्त मुद्‌गाल कवी, विष्णुदासनामा, नामापाठक केंदुरकर, जनजसवंत, रंगनाथस्वामी मोगरेकर, निरंजन पंढरपूरकर इत्यादी प्रमुख संतमंडळी होऊन गेली.

मागे जी संत कवींची नावे दिली आहेत, त्यांत सर्व वर्णांचे व सर्व वर्गांचे संत आहेत. महाराष्ट्रातील तत्कालीन वारकरी, भागवत, दत्तसंप्रदाय यांचे समर्थक ही संतमंडळी आहेत. त्यांनी आपल्या विविध ग्रंथांद्वारे, वाणीद्वारे समाजास योग्य वळण लावले. शूद्र वर्गाला ब्राह्मणाच्या बरोबरीने ज्ञान मिळू लागले. कुटुंबात स्त्रियांचे महत्त्व वाढून कौटुंबिक वर्तन पवित्र होत गेले. राष्ट्र परोपकारशील, सहनशील, एकजुटीने काम करण्यास तयार असे बनत गेले. विचार व आचार यांमधील विरोध नाहीसा होत गेला. या कालखंडात मराठी भाषेची राजश्रयाशिवाय भरभराट झाली. या काळात मराठी भाषेमध्ये जे लिखाण झाले, त्या लिखाणाला महाराष्ट्रातील सर्व थरांतील लोकांनी हातभार लावला. या सर्वांत मराठी वाङ्‌मयात अपरंपार भर ज्यांनी टाकली, ते म्हणजे एकनाथ. जनार्दन स्वामी हे एकनाथांचे गुरू. एकनाथांनी स्फूर्ती घेतली ती ज्ञानेश्वरीपासून. प्रथम त्यांनी भागवत पुराणाच्या ११ व्या अध्यायावर टीकारूप ग्रंथ लिहिला. ज्ञानेश्वरी वगळता इतका समर्थ ग्रंथ दुसरा झाला नाही. एकनाथांचे समकालीन संत-लेखक म्हणजे विठा रेणुकानंद, जनिजनार्दन, रामजनार्दन. ह्या सर्व मंडळींनी भक्तिगीते रचली. याशिवाय अडाण्या कवी, कान्हो, नामा आणि निर्मल पाठक हेदेखील एकनाथांचे समकालीन होते. याशिवाय बहिरा पिसा याने गीतेच्या दहाव्या अध्यायावर टीकात्मक ग्रंथ लिहिला. एकनाथांचे समकालीन दासोपंत यांनी गीतेवर सहा टीकाग्रंथ लिहिले आहेत. दासोपंतांची इतर ग्रंथसंपत्ती म्हणजे 'पदार्ण व वाक्यनिवृत्ती' आणि 'पंचीकरण'. हा शेवटचा ग्रंथ दासोपंतानी कापडावर लिहिला म्हणून त्यास 'पासोडी' असे म्हणतात. समानता आणि परमेश्वराची भक्ती या तत्त्वांवर आधारलेल्या भागवत धर्माचा प्रभाव या कालखंडात महाराष्ट्रातील सर्व वर्गांवर पडला.

संत रामदासांचे कार्य वेगळ्या प्रकारचे आहे. त्यांनी 'मराठा तितुका मेळवावा, महाराष्ट्र धर्म वाढवावा' असा उपदेश केल्याचे प्रसिद्ध आहे. 'महाराष्ट्र' या शब्दात महाराष्ट्र देशाची रचना, त्यातील लोकांच्या अंगचे पाणी, त्यांचे सामर्थ्य इत्यादी गोष्टींचा रामदासांच्या मनातील अर्थ त्या शब्दांत व्यक्त होतो. संत रामदास हे स्वदेश अभिमानी, दूरदर्शी, समाजाची व राष्ट्राची उन्नती करून इष्ट कार्य तडीस नेण्याच्या विचारात निमग्न होते, असे दासबोधावरून दिसून येते.

## मुस्लीम सत्तेचा महाराष्ट्रीय जीवनावर परिणाम

महाराष्ट्रात मुसलमानांचे वर्चस्व निर्माण झाल्यावर राज्यव्यवहारात फारसी भाषेचा वापर सुरू झाला, संस्कृत भाषेचा लोप झाला. ज्ञानेश्वरीची भाषा शुद्ध व निर्भेळ अशी मराठी आहे. तिच्यात फारसी शब्द मुळीच नाहीत. परंतु एकनाथांच्या दस्तऐवजात शेकडा तीस शब्द अरबी किंवा फारसी आहेत. फारसीच्या सान्निध्याने बरेचसे नवीन प्रयोग मराठीत आले. कित्येक उद्‌गारवाचक अव्यये, क्रियाविशेषणे व सर्वनामे मराठीत येऊन अर्थाचे व उद्‌गारांचे बारीकसारीक भेद सफाईने व्यक्त करण्याची सोय मराठीत झाली. उच्चाराची व बोलण्याची ढबही फारसीच्या संसर्गाने मराठीत शिरली. भाववाचक नामे, विशेषणे व नात्यांची-धंद्याची पुष्कळ विशेषनामे फारसीतून मराठीत आली. आरंभी महाराष्ट्रीय जनतेला फारसी भाषा समजत नव्हती, ती समजावी म्हणून कायस्थ दुभाषी झाले. पुढे ब्राह्मणही पोटापाण्यासाठी अरबीफारसी शिकू लागले. बहमनी काळात त्यांना राज्यव्यवहारात अनेक पदे मिळाली. त्या पदांना आता आडनावाचे रूप आले आहेत. मुन्शी, मुश्रिफ, मुन्सिब, मुतालीक, मोहर्रीर, मिराशी, मुजुमदार,

पेशकर, जहागीरदार, कारभारी हे त्याचे काही नमुने आहेत. कायस्थ समाज पूर्वीपासूनच लेखन-कुशल म्हणून नावाजलेला होता. म्हणून 'नवीस'पणाची कामगिरी त्याच्याकडे आली. चिटणीस, कारखानीस, पागनीस, फडणीस, सबनीस, हसबनीस हे त्यांचे अवशेष आहेत. मराठा समाजात गजपती, हयपती, चमुपती, दलपती या संस्कृत नावांची गैबत, हैबत, दलपत ही प्राकृतरूपे होती. त्याची जागा खुशाल, पंजाब, दौलत, सुभान, पिराजी, हिम्मत, गुंजाब, अजाब इत्यादी इस्लामी नावांनी घेतली. पायजमा, जामानिमा, अचकन इत्यादी विविध प्रकार पोशाखात आले. जमीन, जुमला, जायजाद, त्याचा वसूल, त्याचा बंदोबस्त, जमाखर्च, कर्जदार, साहुकार, त्यांचे तकादी, फिर्यादी, सबूत आणि ग्वाही, त्यांचा फैसला, वकील, मुनीम, तनख्वाह हे सारे फारसीमय व अरबीमय झाले.

दक्षिणेतील आदिलशाहीत व निजामशाहीत सरकारी दफ्तर मराठीतून ठेवण्याची पद्धत रूढ झाल्यामुळे मराठीचे अस्तित्व कायम राहिले. ज्यामध्ये मराठी शब्दांचे प्रमाण पुष्कळ आहे, अशा उर्दूत महाराष्ट्रातील मुसलमान राज्यकर्ते बोलू लागले. पुढे तिला दख्खिनी उर्दू या नावाने ओळखले जाऊ लागले. मुल्ला नुस्रती, हाशमी विजापुरी, अब्दुल, कवी गवासी, हसन शौकी, कवी बहरी, इब्राहीम आदिलशहा (दुसरा) यांच्या दख्खिनी उर्दू साहित्यातून महाराष्ट्राच्या इतिहासावर प्रकाश पडतो. मुस्लीम राजसत्तेमुळे सुफी कलंदर, पीर, फकीर यांनी महाराष्ट्रीय समाज प्रभावित करण्याचा प्रयत्न केला. इ.स. १३०० मध्ये मुंतजबोद्दीन जर-जरी-बक्ष यांच्या नेतृत्वाखाली ७०० सुफी दक्षिणेत आले. राजाश्रयाच्या बळावर सुफींनी ठिकठिकाणी मठ, दर्गे, खानके, मशिदी, चल्ले यांची स्थापना केली. या वैचारिक आक्रमणांचा प्रातिकर वारकरी, भागवत व दत्त ह्या संप्रदायांनी केला. सुफी पंथावरही भक्तिमार्गाचा प्रभाव पडला. चौदाव्या शतकात महाराष्ट्रात पडलेल्या दुष्काळामुळे अनेक कुटुंबे देशोधडीला लागली. मराठी कुटुंबे कोकणाबरोबर, दक्षिणेत विजयनगर तसेच, उत्तरेत मथुरेपर्यंत गेली. त्यात विद्वान ब्राह्मण घरोघरी होते. स्वतःचे राज्य नसल्यामुळे महाराष्ट्र जीवनाचे तेज जवळजवळ नाहीसे झाले. आश्रयाविना विद्या व कला ऱ्हास पावू लागल्या. सोळाव्या शतकात दक्षिणेतील शाह्यांमधून हिंदूंचा प्रवेश होऊन त्यांना महत्त्व येऊ लागले. या कालखंडात काही मुस्लीम संतकवी ज्यात प्रामुख्याने शेख महम्मद, हुसेन अंबरखान, मुंतोजी, लतीफशाह हे होऊन गेले.

**संदर्भ :**


१. कुंटे भ. ग.
बहमनी राज्याचा इतिहास, अनुवाद, मुंबई, १९६६.

२. कुंटे भ. ग.
गुलशने इब्राहिमी, अनुवाद, मुंबई, १९८२.

३. कुंटे भ. ग.
अहमदनगरची निजामशाही, अनुवाद, मुंबई, १९६२.

४. वुल्स्ले हेग (संपादक)
दि केम्ब्रिज हिस्ट्री ऑफ इंडिया - व्हॉल्यूम III, न्यू दिल्ली, १९६५ (II Reprint.).

५. ब्रिज जॉन (संपादक)
हिस्ट्री ऑफ दि राईज ऑफ द मोमेडियन पॉवर इन इंडिया, व्हॉल्यूम, II, III, न्यू दिल्ली, रिप्रिन्ट १९८९.

६. मोडक बा. प्र.
ब्राह्मणी राजांचा इतिहास (फेरिस्त्याच्या आधारे), अनुवाद, पुणे, १८८१.

७. शेरवानी हरून खान
द बहमनीज ऑफ डेक्कन, न्यू दिल्ली, १९८५.

८. शेरवानी आणि जोशी (संपादक)
हिस्ट्री ऑफ मेडिव्हल डेक्कन - न्हालूम, I, II, हैद्राबाद, १९७३.

९. याजदानी जी. बिदर
इट्स हिस्ट्री अ‍ॅन्ड मॉन्युमेन्टस्, ऑक्सफर्ड, १९६०.

१०. तामसकर बी. जी.
लाइफ अ‍ॅन्ड वर्क ऑफ मलिक अंबर, न्यू दिल्ली, १९७८.

११. सरदेसाई गो. स.
मुसलमानी रियासत (भाग- १) मुंबई, १९५९ (चौथी आवृत्ती)

१२. सरदेसाई गो. स.
मराठी रियासत (भाग-२) १९१५.

१३. सरदेसाई गो. स.
मराठी रियासत- खंड-१ (संपादक स.मा.गर्गे.) मुंबई, १९८८.

१४. बेंद्रे वा. सी.
मालोजीराजे आणि शहाजीराजे यांचे चरित्र, पुणे, १९६७.
१५. बेंद्रे वा. सी.
विजापूरची आदिलशाही मुंबई, १९६८
१६. बेंद्रे वा. सी.
गोवळकोंड्याची कुतुबशाही, पुणे, १९३४
१७. वर्मा डी. सी.
हिस्ट्री ऑफ विजापूर, न्यू दिल्ली, १९७४.
१८. हेन्री कझिन्स
विजापूर ॲन्ड इट्स आर्किटेक्चरल रिमेन्स, न्यू दिल्ली, १९७७.
१९. बाऊन पर्सी
इंडियन आर्किटेक्चर (रूस्लामिक पिरेड), बॉम्बे, १९६८ (आवृत्ती ५वी)
२०. पगडी सेतू माधवराव
महाराष्ट्र आणि मराठे, पुणे १९६३.
२१. फिलीयोझा वसुंधरा (संपादक)
विजयनगरचे साम्राज्य, नॅशनल बुक ट्रस्ट ऑफ इंडिया, दिल्ली, १९९४.
२२. कुलकर्णी गो. त्र्य. (संपादक)
महाराष्ट्राचा इतिहास मध्ययुगीन कालखंड भाग-१, भाग-२, मुंबई २००१, २००२.
२३. सरदार गं. बा. (संपादक)
महाराष्ट्र जीवन (खंड-१), पुणे, १९६०.
२४. चौहान देविसिंग
दक्खिनी हिंदीतील इतिहास, मुंबई, १९७३.
२५. पंडित भवानीशंकर (संपादक)
महाराष्ट्राच्या जीवनातील स्थित्यंतरे आणि त्यांचा साहित्यावर व संस्कृतीवर झालेला परिणाम (न. चिं. केळकर स्मारक व्याख्यानमाला), पुणे, १९६८.
२६. मेहंदळे गजानन
राजा शिवछत्रपती, पुणे, १९९३.
२७. देशमुख विजय
राजा शिवछत्रपती, नागपूर, १९८४ (आवृत्ती दुसरी).
२८. पगडी सेतू माधवराव
सुफी संप्रदाय, मुंबई, १९५३.
२९. ढेरे रा. चिं.
दत्तसंप्रदायाचा इतिहास, पुणे, १९६४.
३०. मोकाशी पं. रा.
महाराष्ट्रातील पाच संप्रदाय, पुणे, १९७५ (आवृत्ती दुसरी).
३१. देगलुरकर गो. बं.
देवगिरी-किल्ले दौलताबाद, मुंबई, १९९९.
३२. कुंटे भ. ग.
दिल्लीच्या शहाजहानचा इतिहास, अनुवाद, मुंबई, १९८९.
३३. रानडे पंढरीनाथ
'नवरसक गीत' आणि नवरस रागमाला, संशोधक मार्च/ जून, १९८६.
३४. महाराष्ट्र शासन परभणी जिल्हा गॅझेटिअर, मुंबई, १९८८.
३५. सय्यद अनिस औरंगजेब, न्यू दिल्ली, १९७७.
३६. वेदगिरी रामभाऊ
द स्टोरी ऑफ अ ग्रेट सिटी (तेलगू), हैद्राबाद, १९९१, (इंग्रजी अनुवाद साई प्रसाद अलहरी.)
३७) शर्मा सोमशंकर
दि क्रोनॉलॉजी ऑफ सुलतान ऑफ गुलबर्गा (जर्नल ऑफ दि बिहार ॲन्ड ओरिसा रिसर्च सोसायटी Vol-XXVII, १९४१, पार्ट, IV.
३८. जोशी महादेवशास्त्री (संपादक)
भारतीय संस्कृती कोश, खंड-६, पुणे, १९७०.
३९. पुरी बी. एन.
हिस्ट्री ऑफ इंडियन ॲडमिनिस्ट्रेशन- Vol -II (Medieval- Period), बॉम्बे, १९७५.
४०. मुजुमदार आर. सी. (संपादक)
द. दिल्ली सुलतान, मुंबई, १९६७ (आवृत्ती दुसरी).
४१. अमिताभ राजन व इतर (संपादक)
नांदेड जिल्हा साहित्य व शोध, नांदेड, १९८५.
४२. इलियट ॲन्ड डाउन्सन (संपादक)
हिस्ट्री ऑफ इंडिया ॲन्ड टोल्ड बाय इट्स ओन हिस्टोरियन्स, Vol -VI, VII, अलाहाबाद, १९६४.
४३. राठोड राजाराम
उदगीर : इतिहास आणि स्मारके, उदगीर, १९६८.
४४. राजवाडे वि. का. (संपादक)
राधा माधव विलास चंपू, पुणे १९२२.
४५. राजवाडे वि. का. (संपादक)
महिकावतीची उर्फ माहीमची बखर, पुणे, १९२४.
४६. जोशी श. नं. (संपादक)
ऐतिहासिक प्रस्तावना (लेखक वि. का. राजवाडे.), पुणे, १९२८.

* * *





विजयनगरचे बोधचिन्ह.

# विजयनगर

■ **मल्हार कृष्ण गोखले**

**परचक्रनिवारण आणि धर्मरक्षण असे ध्येयधोरण विजयनगर साम्राज्याचे जसे होते, तसेच ते शिवाजीकालीन मराठी सत्तेचेही होते असे दिसते. त्यामुळेच विजयनगर साम्राज्याचा वारसा मराठी सत्तेकडे आला, असे मानले जाते. विशेष म्हणजे या मताचा पुरस्कार तमीळ इतिहासकार एस. कृष्णस्वामी अय्यंगार जसा करतात, तसाच तो आंध्र इतिहासकार ए. शंकररावही करतात. न्यायमूर्ती म. गो. रानडे आणि नारायण कृष्ण गद्रे यांनीही या मताचा पुरस्कार केला आहे.**

भारताच्या कर्नाटक राज्यातील सध्याच्या बेल्लारी जिल्ह्यात होस्पेट तालुक्यात हंपी या नावाचे गाव आहे. तेच ऐतिहासिक विजयनगर होय. हरिहर आणि बुक्क या दोन वीर पुरुषांनी तुंगभद्रा नदीच्या दक्षिण तीरावर, अनेगुंदी आणि कंपली या दोन राज्यांदरम्यान हंपी या ठिकाणी एका नवीन शहराची, नव्या राज्याची, स्थापना केली. त्याचे उल्लेख विद्यानगर, विजयानगर, विजयनगर, हंपी, पंपाक्षेत्र किंवा होस्पेट अशा वेगवेगळ्या नावांनी आढळतात. आज कर्नाटक राज्यातील विद्यमान गावाचा उल्लेख हंपी असाच होतो. हंपीच्या परिसरात विजयनगर या १४व्या शतकातल्या समृद्ध आणि समर्थ हिंदू साम्राज्यधानीचे अवशेष सर्वत्र विखुरले आहेत.

**स्थापना :** दिल्लीचा अफगाण सुलतान अल्लाउद्दिन खलजी किंवा खिलजी याने इ.स.१२९४ साली महाराष्ट्रावर स्वारी करून देवगिरीच्या यादवांचा पराभव केला. पुढे इ.स.१३०७ साली खिलजीचा गुलाम सरदार मलिक काफूर हा पुन्हा दक्षिणेत उतरला आणि नर्मदेपासून

रामेश्वरपर्यंतच्या सर्व हिंदू राजसत्तांचा त्याने निर्णायक पराभव केला. सन १३०७ साली देवगिरी (महाराष्ट्र) सन १३१० साली वरंगळ (आंध्र प्रदेश) व सन १३११ साली द्वारसमुद्र (कर्नाटक) आणि मदुराई (तमिळनाडू) ही सर्व हिंदू राज्ये मलिक काफूरच्या झंझावातासमोर उद्ध्वस्त झाली.

सन १३२० मध्ये दिल्लीतच राज्यक्रांती झाली. सुलतान मुबारिक खिलजीला उलथून टाकून गियासुद्दीन तुघलखाने तख्त बळकावले. या संधीचा फायदा घेऊन दक्षिणेतील अनेक छोट्या-मोठ्या हिंदू सत्ताधीशांनी अफगाणी सत्ता झुगारून देण्याचा प्रयत्न सुरू केला.

तुंगभद्रा नदीच्या दक्षिण तीरावर कंपली हे एक छोटेसे हिंदू राज्य होते. त्याचा परिसर म्हणजे आजच्या कर्नाटक राज्यातील बेल्लारी, धारवाड, रायचूर, अनंतपूर, शिमोगा व चितळदुर्ग या जिल्ह्यांचा परिसर. कंपलीच्या राजाने आपले राज्य वाढवण्याचा प्रयत्न सुरू केला. या राजाचे नाव होते कंपिलदेव. याच वेळी होयसळ राजा वीर बल्लाळ यानेही मुसलमानी सत्ता उडवून लावण्यासाठी संघर्ष सुरू केला होता.

तिकडे दिल्लीत गियासुद्दिन तुघलखाच्या जागी उलुघखान हा मुहम्मद हे नाव धारण करून सुलतान झाला (सन १३२६). हाच तो कुख्यात मुहम्मद तुघलख. त्याने दखखनवर ताबडतोब स्वारी केली. होयसळ वीरबल्लाळ ठार झाला. कंपिलदेव पराभूत झाला. त्याच्या अनेक सरदारांना, राजपुत्रांना मुहम्मद तुघलखाने कैद केले आणि दिल्लीला नेऊन बाटवले.

कंपिलदेवाचा एक शूर सरदार संगम ओडेसर याच्या पाच मुलांपैकी दोन मुलगे हक्क आणि बुक्क अशा तऱ्हेने बाटले. पुढे दिल्लीत मुहम्मदाविरुद्ध नित्य नवनवीन कट-कारस्थाने होऊ लागली. ठिकठिकाणचे सुभेदार बंड करू लागले. तेव्हा मुहम्मदाने हक्क आणि बुक्क या दोघा बंधूंनाच कर्नाटकची सुभेदारी देऊन आपले सरदार म्हणून दक्षिणेत पाठवले.

यांनी सुभेदारी करण्याऐवजी पुन्हा हिंदुधर्म स्वीकारला आणि कंपली व अनेगुंदी या दोन छोट्या राजधान्यांच्या दरम्यान हंपी येथे नवीन राज्य उभे केले. या कामी त्यांच्या पाठी शृंगेरी येथील शंकराचार्य पीठाचे स्वामी विद्यातीर्थ व त्यांचे शिष्य स्वामी विद्यारण्य हे उभे राहिले (इ.स.१३३६).

हक्काला हरिअप्पा किंवा हरिहर असेही म्हणत असत. त्याने सन १३३६ मध्ये हरिहरराय या नावाने स्वतःला राज्याभिषेक करवून घेतला.

इ.स.१३३६ ते इ.स.१४८५ या काळात हरिहररायापासून पुढे क्रमाने आठ राजे झाले. या काळात विजयनगरच्या राज्याचे साम्राज्य झाले. उत्तरेच्या मुसलमानी आक्रमणापासून बचाव करण्यासाठी अनेक हिंदू घराण्यांनी विजयनगरच्या राज्यात स्थलांतर केले. विजयनगरच्या या पहिल्या आठ राजांना संगम घराण्याचे राजे, असे म्हणतात.

हरिहररायाने होयसळांचे सगळे मूळ राज्य आपल्या ताब्यात आणून राज्याचा भक्कम पाया घातला. सन १३३६ ते १३५६ हा त्याचा राज्यकाल. याच काळात म्हणजे सन १३४७ मध्ये दखखनचा सुभेदार हसन गंगू बहमनी उर्फ जाफरखान याने सुलतान तुघलखाविरुद्ध बंड पुकारले आणि तो अल्लाउद्दीनशाह या नावाने स्वतःच सुलतान बनला. हीच ती गुलबर्ग्याची बहमनी राजवट. म्हणजे आता बहमनी सुलतान आणि विजयनगर यांच्या सरहद्दी एकमेकींना भिडल्या. बहमनींचे राज्य नर्मदेपासून कृष्णेपर्यंत होते. तर विजयनगरचे राज्य कृष्णा-तुंगभद्रेच्या संगमापासून दक्षिणेकडे विस्तार पावत होते. साहजिकच कृष्णेच्या आणि तुंगभद्रेच्या दरम्यानचा रायचूर दुआब हा बह मनी आणि विजयनगर यांच्यातल्या संघर्षाचा कायमचा मुद्दा बनला.

हरिहररायानंतर त्याचा भाऊ बुक्कराय हा राजा झाला (इ.स.१३५६ ते १३७७). याने पेनुकोंडे आणि अर्काट ही लगतची राज्ये जिंकली. बुक्करायाचा मुलगा कुमार कंपन याने मदुराईच्या सुलतानाचा पूर्ण पराभव करून हिंदू तीर्थक्षेत्र रामेश्वर मुसलमानांच्या राज्यातून सोडवले. पश्चिमेकडे बुक्करायाच्या सैन्याने गोपकपट्टण उर्फ गोमंतक उर्फ गोवे जिंकले. म्हणजे विजयनगरच्या राज्यात आता पश्चिम समुद्रावरच्या कोंकण प्रदेशापासून कर्नाटक, आंध्रचा बराच मोठा भाग आणि पूर्व समुद्रावरचा तमिळनाडूचा बराच मोठा भाग एवढा प्रदेश आला. त्यामुळे मलबार (आत्ताचा

केरळ) व सिंहलद्वीप (आत्ताची श्रीलंका) येथील राजांनी आपण होऊन विजयनगरला करभार दिला व त्याचे स्वामित्व मान्य केले. बुक्करायानेच आपल्या राजधानीचे नामकरण विजयनगर हे केले. आपले गुरू स्वामी विद्यारण्य उर्फ माधवाचार्य आणि त्यांचे बंधू सायणाचार्य यांच्याकडून त्याने वेदांवर भाष्ये लिहून घेतली. वैदिक हिंदू धर्माच्या पुनरुज्जीवनाचे त्याने अथक प्रयत्न केले. 'वेदमार्गप्रतिष्ठापक' हे बिरुद त्याने धारण केले.



विजयनगर साम्राज्याचे नाणी.

बुक्करायानंतर त्याचा मुलगा हरिहर दुसरा (सन १३७७ ते १४०४) या नावाने गादीवर आला. पश्चिम किनाऱ्यावर त्याने आपल्या राज्याचा विस्तार चंपावती म्हणजे चौल किंवा चेऊलपर्यंत केला. आंध्र प्रदेशात उदयागिरी, पानगळ व कर्नाटक किनारपट्टीवरील मंगळूर वगैरे भाग याच्याच काळात विजयनगरला जोडला गेला.

या संगम घराण्यातील शेवटचा राजा विरूपाक्षराय (सन १४६५ ते १४८५) याच्या कारकिर्दीत राज्यात बरेच बखेडे माजले. शेवटी विरूपाक्षरायाचा चंद्रगिरी प्रांताचा सुभेदार नरसिंह साळुव याने राज्यक्रांती घडवली आणि तो स्वतःच राजा झाला.

**साळुव घराणे :** नरसिंह साळुव (सन १४८५ ते १४९०) हा क्रांती करून राजा झाला असला, तरी हिंदुधर्माच्या रक्षणाचे विजयनगरचे कार्य त्याने जोमाने चालू ठेवले. आपले युद्धतंत्र आधुनिक ठेवण्यासाठी त्याने अरबी मुसलमान व्यापाऱ्यांकडून उत्तम अरबी घोडे विकत घेऊन आपले घोडदळ सुसज्ज केले.

नरसिंह साळुवाला फक्त पाच वर्षे मिळाली. त्याच्या कारकिर्दीत घडलेली महत्त्वाची गोष्ट म्हणजे बहमनी राज्याची पाच शकले झाली. बहमनी सुलतान महमूदशहा याच्या पाच सुभेदारांनी बंड पुकारले आणि आपापल्या सुलतानशाह्या स्थापन केल्या. आदिलशाही, निजामशाही, कुतुबशाही, इमादशाही आणि बेरीदशाही ही ती पाच राज्ये होत.

सन १४९० मध्ये नरसिंह साळुव मरण पावला. त्याची मुले लहान असल्यामुळे त्याने नरसा नायक या कर्तबगार अधिकाऱ्याला कारभारी नेमले होते. नरसा नायकाने नरसिंह साळुवाचा पुत्र तिम्म याला गादीवर बसवले व तो कारभार पाहू लागला. नरसा नायकाने आजचे कर्नाटक व तमिळनाडू हे प्रांत विजयनगरला जोडले.

काहींच्या मते पुढच्या काळात राजा तिम्म हा अकार्यक्षम निघाल्यामुळे नरसा नायक स्वतःच राजा बनला होता. तर काहींच्या मते तो मरेपर्यंत म्हणजे सन १५०३ पर्यंत कारभारीच राहिला होता. मात्र त्याच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा नरसिंह हा, नरसिंह दुसरा किंवा वीर नरसिंह या नावाने रीतसर गादीवर बसला. हा तुळुव वंशाचा असल्यामुळे विजयनगरवर आता तुळुव वंशाचे राज्य सुरू झाले.

**तुळुव वंश :** वीर नरसिंह नावाप्रमाणे पराक्रमी होता. पण तो अल्पावधीतच मरण पावला (सन १५०३ ते १५९०). त्याच्यानंतर त्याचा भाऊ म्हणजे नरसा नायकाचा दुसरा मुलगा कृष्णदेव हा राजा झाला. हाच तो विजयनगरचा प्रख्यात सम्राट कृष्णदेवराय (सन १५०९ ते १५२९).

कृष्णदेवराय हा रणधुरंधर सेनापती तर होताच, पण कुशल प्रशासक आणि गाढा विद्वानही होता. याच्या कारकिर्दीत विजयनगर राज्यात आजचा जवळपास संपूर्ण आंध्र प्रदेश समाविष्ट झाला. कृष्णदेवरायाची कारकिर्द हा विजयनगर साम्राज्याची परिसीमा होय. राजकारण, रणांगण, ग्रंथरचना, वास्तुरचना, प्रजेचा हितासाठी तलाव व कालवे इत्यादींची निर्मिती, अशा जीवनाच्या हरएक क्षेत्रात अप्रतिम नवनिर्मितीचा हा कालखंड होता. पोर्तुगीज प्रवासी नूनीश, पायीश, बार्बोझा आदींनी याच काळात विजयनगरला भेट दिली होती. विजयनगरचे वैभव पाहून ते थक्क होऊन गेले होते. कृष्णदेवराय हिंदू धर्म आणि

संस्कृती यांचा कट्टर अभिमानी होता. त्याने 'गोब्राह्मणप्रतिपालनाचार्य' अशी पदवी धारण केली होती.

कृष्णदेवरायाच्या मृत्यूनंतर विजयनगर साम्राज्याचा ऱ्हास सुरू झाला. अच्युतदेवराय (सन १५२९ ते१५४२) याच्या कारकिर्दीत नायक (सुभेदार) स्वतंत्र झाले. तर सुलतानांनी रायचूर दुआब व मुद्गल हे प्रांत बळकावले.

पुढे अंतर्गत कलहातून कृष्णदेवरायाचा पुतण्या सदाशिवराय (सन १५४२ ते १५६५) हा राजा झाला. पण खरा कारभार सेनापती रामराय आणि त्याचा भाऊ तिरुमलराय यांच्याच ताब्यात होता. राज्यकर्त्यांच्या आपसात काही भानगडी चालत असल्या; तरी राज्य अत्यंत प्रबळ, समर्थ, समृद्ध होते. प्रजा सुखी होती.

आदिलशहा, कुतुबशहा, निजामशहा आणि इमादशहा या चार सुलतानांनी एकत्र येऊन सन १५६५ मध्ये विजयनगरवर आक्रमण केले. कृष्णानदीच्या उत्तर तीरावरील तालिकोट व दक्षिण तीरावरील रक्कसगी व तंगडगी या गावांच्या दरम्यान भीषण लढाई झाली. त्यामुळे तिला तालिकोटची लढाई, राक्षसतंगडीची लढाई किंवा राक्षसतागडीची लढाई अशा वेगवेगळ्या नावांनी ओळखले जाते. दिनांक ७ जानेवारी १५६५ या दिवशी झालेल्या या भीषण युद्धात १० लाख लोक ठार झाले. प्रारंभी हिंदूंचीच सरशी होत होती. पण सेनापती रामराय शत्रूच्या वेढ्यात अचानक सापडून कैद झाला. निजामशहाने त्याचे मुंडके छाटून भाल्यावर खोचून सर्वत्र मिरवले. त्यामुळे हिंदू सैन्य पळत सुटले.

मुसलमान सैन्य विजयनगरमध्ये घुसले. सन १३३६ ते १५६५ या सुमारे सव्वादोनशे वर्षांच्या काळात ते शहर इतके समृद्ध झाले होते की ते लुटून, जाळून, उद्ध्वस्त करायलासुद्धा मुसलमानांना पुढे सहा महिने लागले. अशा प्रकारे 'हिंदुरायसुरत्राण', 'पररायभयंकर', 'दुष्टशार्दूलमर्दन' असे विजयनगर साम्राज्य संपले. दक्षिण भारतात जवळपास तुंगभद्रेपासून कन्याकुमारीपर्यंत संपूर्ण दख्खनवर दोन शतके अप्रतिहत सत्ता गाजवणाऱ्या; उत्तर भारतातल्या आक्रमक मुसलमानी राजसत्तेला, इस्लामी संस्कृतीला प्रचंड शह देणाऱ्या हिंदुसाम्राज्याचा अस्त झाला.

**आरवीडु घराणे :** साम्राज्य आणि त्याचा दबदबा संपला, तरी विजयनगरचे राज्य पुढे आणखी एक शतक टिकले. रामराय आणि त्याचा भाऊ वेंकटाद्री हे राक्षसतागडीवर धारातीर्थी पडले. पण आणखी एक भाऊ तिरुमलराय हा पळाला आणि पेनुकोंडा इथे जाऊन राजा झाला. या घराण्याला आरवीडु असे नाव आहे.

तिरुमलरायानंतर त्याचे मुलगे दुसरा श्रीरंग, दुसरा वेंकट हे राजे झाले. राजधानीदेखील दोनदा स्थलांतरित झाली. पेनुकोंड्याहून चंद्रगिरीला आणि तिथून वेल्लोरला. पण कुतबशाही आणि आदिलशाही यांच्या संयुक्त सैन्याने इ.स.१६४६ साली चौथा श्रीरंग याचा पूर्ण पराभव केला. त्यासरशी विजयनगरचे उर्वरित राज्यही संपले.

त्याच वर्षी महाराष्ट्रात शिवाजीराजे भोसले या १६ वर्षांच्या युवकाने तोरणा किल्ला जिंकून नव्या हिंदू सत्तेचा पाया घातला.

पुढे शिवाजी महाराज छत्रपती झाले (सन १६७४). त्यानंतर ऑक्टोबर १६७६ मध्ये छत्रपती शिवराय दक्षिणेत स्वारीसाठी निघाले. आजच्या आंध्र, कर्नाटक आणि तमिळनाडू प्रांतांतील अनेक ठिकाणे त्यांनी जिंकून हिंदवी स्वराज्याला जोडली. त्यात वेल्लोर हे विजयनगरच्या राज्याचे ठिकाणही जिंकले (सन १६७८). बत्तीस वर्षांच्या आदिलशाही अमलानंतर वेल्लोर राजधानीचा अजस्र किल्ला पुन्हा हिंदुराज्यात आला.

तमिळनाडूचे प्रसिद्ध इतिहासकार डॉ.एस.कृष्णस्वामी अय्यंगार, आंध्र प्रदेशचे इतिहासकार बी.ए.शंकरराव, महाराष्ट्राचे न्यायमूर्ती मा.गो.रानडे या सर्वांचे असे मत होते की, शिवशाही हीच विजयनगरच्या साम्राज्याची खरी वारसदार होय.

**संदर्भ :**


१. विजयनगर स्मारक ग्रंथ, भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे.
२. मराठी विश्वकोश - खंड १६, विश्वकोश मंडळ, वाई.
३. मुसलमानी रियासत - खंड१, रियासतकार सरदेसाई.
४. पुरंदरे ब. मो., राजा शिवछत्रपती
५. जोगळेकर ज. द., भारतातील युद्धशास्त्राची उपेक्षा

# विजयनगर साम्राज्य आणि महाराष्ट्र

■ डॉ. गो. बं. देगलूरकर



हम्पी येथील विरूपाक्ष मंदिर.

विजयनगर साम्राज्य आणि महाराष्ट्र यांचा पारस्परिक संबंध स्पष्टपणे मानण्यामध्ये सर्वांचे एकमत होईल असे नाही, मात्र या दोहोंचे कार्य पाहता त्यांच्या ध्येयात एकच धागा अनुस्यूत होता असे दिसते. इस्लामच्या अनुयायांच्या नृशंस टोळधाडींपासून एतद्देशीयांचा धर्म आणि संस्कृती अभंग ठेवण्याची जबाबदारी विजयनगरच्या सम्राटांनी उचलली आणि नंतर महाराष्ट्रानेही ती पार पाडली, हे इतिहाससिद्ध आहे. ईजिप्त, सुमेरिया, असीरिया इत्यादी अतिप्राचीन संस्कृती खंडित झाल्या, नामशेष झाल्या; या पार्श्वभूमीवर भारतीय प्राचीन संस्कृती आणि हिंदू धर्म अक्षुण्ण व अव्याहत ठेवण्याचे ध्येय विजयनगराचे संस्थापक व मराठी राज्याचे अध्वर्यू यांचेकडे जाते हे निर्विवाद आहे. त्यामुळेच तर भारतीय मनुष्य 'श्रुतिस्मृति पुराणोक्त' असे म्हणत संस्कृतिप्रवाह चालू असल्याचा अभिमान बाळगू शकतो आहे.

देवगिरीच्या यादव घराण्याला रामचंद्र यादवाच्या काळात मुसलमानी आक्रमणाचे ग्रहण लागले ते हरपालदेवाच्या क्रूर वधानंतर. यादवांच्या राज्याला गिळंकृत करून इ.स.१३१८मध्ये सुटले. आत्तापर्यंत उत्तर हिंदुस्थानात हैदोस घालणारत्या इस्लामी सत्तेला दक्षिण भारतात यामुळे प्रवेश मिळाला. तिकडे वरंगळ, द्वारसमुद्र आणि मदुरा येथे स्वतंत्रपणे राज्य करणारे हिंदु राजे सत्तापिपासेमुळे आपापसात झगडत होते. यथाक्रमाने ती राज्ये दिल्लीच्या महंमद तुघ्लखाने व त्याच्या सुभेदारांनी उदध्वस्त करून टाकली.

दक्षिणेकडील अनेक राज्यापैकी एक होते कंपिलचे राज्य. त्याचे आगळे महत्व इतिहास सांगतो. दिल्लीत चालू असलेल्या साठमारीचा फायदा घेऊन कंपिलच्या राजाने आपले लहानसे राज्य वाढविण्यासाठी भोवतीच्या प्रदेशावर स्वाऱ्या केल्या. दिल्लीच्या अल्लाउद्दीन खल्जीचा सेनापती मलिक काफूर याने देवगिरीनंतर बरंगळ, द्वारसमुद्र आणि मदुरा येथील हिंदू राज्ये बुडविली. पुढे महंमद तुघ्लख दिल्लीचा बादशहा झाल्यावर (इ.स.१३२५) त्याच्या दक्षिणेतील नातलगाने बहाउद्दीन गुशास्थ याने बंड केल्यावर कंपिलच्या राजाने त्याला आश्रय दिला म्हणून, त्या राज्यावर त्याने स्वारी केली. ते राज्य जिंकले. या लढाईनंतर कैद करून दिल्लीस नेलेल्या प्रमुख लोकापैकी हक्क आणि बुक्क नामक दोन बंधू होते. बादशाही सैन्य दक्षिणेतून दिल्लीस परतल्यावर इकडे अनेकांनी बंड करून गोंधळ उडवून दिल्याचे वृत्त कळताच महंमद तुघ्लखाने आपले राजनिष्ठ सेवक समजून दक्षिणेत राज्यकारभार पहाण्यास हक्क व बुक्क या बंधूना आनेगोंदीस धाडले. इब्नबतूतानेही 'दोन अधिकारी दक्षिणेत धाडले' असा उल्लेख केला आहे) या चाणाक्ष व विजिगीषू वृत्तीच्या बंधूनी या संधीचा फायदा घेऊन विजयनगर साम्राज्याची मुहूर्तमेढ रोविली.

विजयनगरच्या साम्राज्याच्या जडणघडणीत संगम, साळुव, तुळुव व आरवीडु या घराण्यानी सामान्यतः



हम्पी येथील प्रसिद्ध कमल महाल.

समर्थपणे राज्य केले. हे साम्राज्य इ.स.१३३६ पासून ते १५६५च्या तालिकोट (राक्षसतंगडी) लढाईपर्यंत पूर्ण वैभवात व दिमाखात होते. पुढे याच्या सामर्थ्याला ओहोटी लागली, तरी ते इ.स.१६६६ पर्यंत नांदत होतेच. एकूण ३३० वर्षे टिकलेल्या या साम्राज्याने हिंदु संस्कृती जपली; याच्या सम्राटांनी उभारलेल्या देखण्या व भव्य मंदिरांच्या सावलीत हिंदुधर्म, तत्त्वज्ञान आणि परंपरा हे सारे टिकून राहिले. हरिहर, बुक्काराय या संस्थापकांनी गुरू विद्यारण्य यांच्या मार्गदर्शनाखाली कार्य करून, अभूत पराक्रमाने मुसलमानांच्या लोंढ्यांपासून दक्षिर भारताला वाचवल्यामुळे भारतीय संस्कृतीची अखंड ज्योत तशीच पुढेही तेवत राहिली आणि त्यामुळेच विजयनगर साम्राज्याची अविस्मरणीय कामगिरी ऐतिहासिक महत्त्वाची ठरली.

विजयनगरचे साम्राज्य बरेच विस्तीर्ण होते. जवळ–जवळ सगळा दक्षिण भारत त्यांच्या अधिपत्याखाली होता, एवढेच काय तर त्यांनी सिलोनही (श्रीलंका) जिंकले होते, याशिवाय गोवा व कोंकण या भागांशीही त्या साम्राज्याचा संबंध होता, असे आढळते. दक्षिण कोंकणातील राजे तर विजयनगरचे अंकित होते असे दिसते. संगमेश्वराच्या सरदेसायांनी विजयनगरास जाऊन तेथून अधिकारी नेमून आणले होते. ते खारेपाटणास राहून कारभार करीत. रायगड (आधीचा कुलाबा) जिल्ह्याच्या दार्शनिकेत तर नर्मदेपर्यंतचे कोकणातील सर्व सत्ताधीश विजयनगरचे अंकितत्व मानीत होते, असा उल्लेख आढळतो. याला सरदेसायांच्या बखरीतूनही दुजोरा मिळतो. सन १३९१च्या कुचेरच्या ताम्रपटावरून कळते की, जयंतीपूरचा राजा माधवमंत्री याने दुसऱ्या हरिहराच्या आज्ञेवरून गोवा प्रांत जिंकला होता आणि परकीय तुरुष्कांना तेथून हाकलून लावले होते. विशेष म्हणजे परकीयांनी पाडलेल्या सप्तकोटीश्वरादी प्राचीन देवतांची प्रतिष्ठापना केली होती. याशिवाय इतिहाससंशोधक दत्तोपंत आपटे संपादित 'मुधोल संस्थान घोरपडे घराण्याचा इतिहास' अशासारख्या पुस्तकांतून वबखरींतून विजयनगरचा उल्लेख उत्तर कोकण वा तळकोकणाच्या संबंधात आढळून येतो. विजयनगर सम्राट दुसरा देवराय याचा उल्लेख कोकणातील १३३५च्या शिलालेखात आढळतो.

**विजयनगरचा वारसा**

परचक्रनिवारण आणि धर्मरक्षण असे ध्येयधोरण विजयनगर साम्राज्याचे जसे होते, तसेच ते शिवाजीकालीन मराठी सत्तेचेही होते असे दिसते. त्यामुळेच विजयनगर साम्राज्याचा वारसा मराठी सत्तेकडे आला, असे मानले जाते. विशेष म्हणजे या मताचा पुरस्कार तमीळ इतिहासकार एस. कृष्णस्वामी अय्यंगार जसा करतात, तसाच तो आंध्र इतिहासकार ए. शंकररावही करतात. न्यायमूर्ती म. गो. रानडे आणि नारायण कृष्ण गद्रे यांनीही या मताचा पुरस्कार केला आहे.

प्रारंभीच आपण असे म्हटले आहे की, विजयनगर साम्राज्य आणि मराठी सत्ता यांच्या पारस्परिक संबंधांबद्दल दुमत असू शकते. पण ध्येयधोरणांत मात्र विलक्षण साम्य आढळते. ते कसे, ते थोड्याशा विस्ताराने पहाता येईल. परकीयांचे आक्रमण दूर सारून आपला देश मुक्त करणे, दोन्ही सत्तांचे ध्येयधोरण हे स्वधर्मरक्षणासाठीही आवश्यक असे होते, ही बाब इतिहाससिद्ध आहे. बळाने धर्मभ्रष्ट

केल्या गेलेल्यांचा, पुन्हा स्वधर्मात प्रवेश झाला, ही घटना साम्राज्य संस्थापक हरिहर आणि बुक्क यांच्या संबंधात घडली होती. बळाने मुसलमान केल्या गेलेल्या नेताजी पालकर यांनी पुन्हा हिंदूधर्मात प्रवेश केल्याची घटना मराठी राज्यातही घडली होती. (पुरंदरे, राजा शिवछत्रपति, २००१, पृ.९३२) 'बुडाला औरंग्या पापी म्लेंछ संहार जाहला।' हे महाराष्ट्रात घडल्याचे आपण जाणतोच. 'या भूमंडळाचे ठायी। धर्म रक्षी ऐसा नाही। महाराष्ट्र धर्म राहिला काही। तुम्हा कारणे। (उपरोक्त, पृ.८३१) समर्थांच्या या उक्तीवरून विजयनगर साम्राज्याच्या पाठोपाठ छत्रपती शिवाजींनी तेच धोरण चालू ठेवल्याचे दिसते. 'धर्मावर लक्ष ठेवून राजाने राज्य करावे', हे आमुक्तमाल्यदामधील कृष्णदेवरायाचे विधान आणि गोब्राह्मण प्रतिपालनाचार्य हे बिरुद (मराठी विश्वकोश, खंड १६, पृ.३१३) विजयनगर सम्राटाचा धर्मविषयक दृष्टिकोप-दर्शक आहे. छत्रपती शिवाजीराजांचे बिरुदही गोब्राह्मणप्रतिपालक असेच होते, हे लक्षात घेतले पाहिजे.

माधव (विद्यारण्य) आणि सायणाचार्य या दोन बंधूंनी धार्मिक आणि राजकीय क्षेत्रांत मोलाचे मार्गदर्शन केल्यामुळे हरिहर आणि बुक्क यांना हिंदुसाम्राज्याची राजकीय घडी आणि हिंदुधर्म या दोहोंनाही स्थैर्य प्राप्त करून देता आले. 'राजकीय सत्तेशिवाय धर्मरक्षण हे निर्बळ व अस्थायी ठरत असते' हे विजयनगर सम्राटांनी तसेच शिवाजी महाराजांनीही ओळखले होते. निरपराध हिंदूंचे शिरकाण वा बळाने केलेले धर्मपरिवर्तन, मंदिरांची लूट व विध्वंस, संपत्तीचे शोषण आणि हिंदूराज्यांच्या स्वातंत्र्याचा नाश या गोष्टींपासून सुटका व्हायची, तर स्वतंत्र राज्य प्रस्थापित केले पाहिजे, याची दोघांनाही तीव्र जाणीव होती. सायणाचार्य आणि माधवाचार्य यांनी विजयनगर सम्राटांना केलेले सहाय्य आणि मार्गदर्शन हे प्रत्यक्षस्वरूपाचे होते हे खरे, तसे व तेवढे नसले तरी समर्थ रामदास आणि संत तुकाराम या समकालीनांचा, सावधपणे करावयाच्या राजकारणात-आणि 'धर्माचे पालन। करणे पाषांड खंडण।। हेची आम्हा करणे काम। बीज वाढवावे नाम।।' (तुकाराम गाथा, २००५, अभंग



हम्पी येथील रथ.

क्र.२१२५) अशा धर्मकारणाचा, अप्रत्यक्षपणे का होईना, मराठी सत्तेच्या प्रारंभ काळात उपयोग झाला असणार.

विजयनगरच्या सम्राटांनी जवळ-जवळ प्रारंभापासूनच धर्मरक्षणार्थ आणि प्रसारार्थ आवश्यक ठरलेल्या मंदिरांची उभारणी, पूनर्बांधणी, देखभाल इत्यादीकडे पूर्णपणे लक्ष दिल्याचे दिसते. काम्पराय (दुसरा हरिहर) याची राणी गंगादेवी हिने रचलेल्या 'कम्पराजविजयम्' या ग्रंथातून कळते की, दक्षिण भागातून इस्लामची बोळवण केली गेली, हे दिग्दर्शित करण्याकरिताच जणू काय त्याने (कम्पराययाने) श्रीरंगम् व मदुरा येथील देवालये पुन्हा पूर्ववत बांधली. ती मुसलमानांनी पाडली होती. (विजयनगर स्मारक ग्रंथ पृ.१२). प्रथम देवरायानेही अनेक देवालये उभारली होती (भारतीय विद्याभवन, भाग ६पृ.२८८). कृष्णदेवरायाने तर पाडल्या गेलेल्या देवालयांच्या पुनर्बांधणीसाठी दहा हजार मोहरांचा एक निधीच वेगळा काढून ठेवला होता. छत्रपती शिवाजीमहाराजांनीही गोव्यातील सप्तटीकोश्वर मंदिराची पुर्नबांधणी केली. श्रीशैल मंदिराच्या प्राकारास गोपूर बांधले, कसबा गणपती, प्रतापगड येथील मंदिरांसाठी इनामे दिली, असा इतिहास आहे. (पुरंदरे, उपरोक्त, पृ.८१२).

विजयनगरच्या साम्राज्याची स्थापना ही हिंदूंच्या इतिहासातील जशी एक महत्वाची घटना होय, तद्वतच अटकेपार झेंडे फडकवणाऱ्या मराठी सत्तेच्या संबंधातही म्हणता येईल. खाली दक्षिणेत जिंजी, तंजावर, वेलोर

(वेलूर), इत्यादी भाग मिळून एकूण १५००० चौरस किमीटर प्रदेश शिवाजी राजाने मिळविला (पगडी, १९७१,२६३.६४) आणि पुढे पेशवाईच्या काळात उत्तरेत इंदूर, ग्वाल्हेर, झांशी येथे मराठ्यांच्या सत्तेच्या विस्तार झाला. अठराव्या शतकाच्या शेवटच्या दोन दशकांत तर दिल्लीच्या नामधारी बादशहातर्फे प्रत्यक्ष कारभार करण्याची क्षमता या सत्तेत निर्माण झाली होती. अखिल हिंदुस्थानावर अधिराज्य गाजवणाऱ्या महापराक्रमी आणि तितकाच क्रूर असणाऱ्या औरंगजेबाला नोमोहरम करणाऱ्या, पळताभुई थोडी करणाऱ्या मराठा वीरांमध्ये चैतन्य निर्माण करण्याची कामगिरी बजावणाऱ्या मराठा सत्तेची वाखाणणी केली पाहिजे.

महाराष्ट्र आणि विजयनगर यांच्या संबंधांत एका सांस्कृतिक घटनेची नोंद घेणे आवश्यक ठरते. ही घटना आहे महाराष्ट्रातील श्रीविठ्ठल संप्रदायाचा प्रभाव तिकडे पडल्याची. कृष्णदेवरायास पंढरपूरच्या श्रीविठ्ठलाचे दर्शन घेतल्यावर वाटले की, ती राजस सुकुमार मूर्ती विजयनगरास न्यावी. त्याने ती नेली व तिच्यासाठी एक भव्य व देखणे मंदिरही तेथे उभारले. हंपी येथे असलेल्या वास्तुपैकी सगळ्यांत उत्कृष्ट अशी ही वास्तु आजही आकर्षक ठरते. मात्र या मंदिराचा गाभारा आता रिता आहे. दंतकथा अशी आहे की, पैठणच्या श्रीसंत भानुदासांनी ती पुन्हा परत पंढरीस आणली. असा उल्लेख समकालीन साधनांतून मात्र आढळत नाही. असे असले, तरी सांस्कृतिक, धार्मिक बाबींत महाराष्ट्र व विजयनगर यांच्यातील संबंधांवर यामुळे प्रकाश पडतो हे खरे.

'विजयनगर साम्राज्याचे मराठेशाहीवरील परिणाम' या आपल्या लेखात श्री. त्र्य. शं. शेजवलकर (विजयनगर स्मारक ग्रंथ, १९३६, पृ.६४-७८) यांनी यासंबंधी नेटके विश्लेषण केले आहे. लेखाच्या प्रारंभीच त्यांनी दोन दाक्षिणात्य इतिहासतज्ज्ञांची या संबंधातील मते उद्धृत केली आहेत, ती या बाबतीत पुरेशी बोलकी आहेत. पैकी डॉ. एस. कृष्णस्वामी अय्यंगार म्हणतात की, मराठ्यांच्या दक्षिणेकडील राज्यस्थापनेस दोन्ही गोष्टी कारणीभूत ठरतात. दक्षिणेतही राज्य वाढविण्याची अकबराची इच्छा, हे मराठ्यांच्या राष्ट्रीकरणाचे आद्य कारण असून, मुसलमानांस तीन शतक थोपवून धरणाऱ्या विजयनगर साम्राज्याचे पतन हेही मराठ्यांच्या राज्यस्थापनेस कारणीभूत झालेले आणखी एक कारण ठरते. हेंच विद्वान 'मदुरेचे नायक' या आपल्या ग्रंथाच्या प्रस्तावनेत म्हणतात की, राज्याभिषेक करून घेण्यात व दक्षिणदिग्विजय करण्यात शिवाजीचा हेतु, विजयनगर साम्राज्याचे पुनरुज्जीवन करून त्या साम्राज्याचा सर्वमान्य वारस-सम्राट म्हणून औरंगजेबासमोर उभे राहणे, हाच असला पाहिजे (उपरोक्त, पृ.६४) तर आंध्र इतिहासकार बी. ए. शंकरराव यांचा हवाला देऊन शेजवलकर सांगतात की, तालिकोटच्या पराभवामुळेच हिंदुच्या पुनरुज्जीवनाची लाट पुन्हा उसळली व शिवाजीची राज्यस्थापना हा तिचाच अंतिम परिणाम असल्यामुळे शिवशाहीला विजयनगर साम्राज्याचा खरा वारस म्हटले पाहिजे, असे श्री. शंकरराव यांचे मत होते. महाराष्ट्रातही न्यायमूर्ती म.गो.रानडे (मराठी सत्तेचा उत्कर्ष) यांचे व 'महाराष्ट्रमहोदयाचा पूर्वरंग'कार श्री. गद्रे यांचेही असेच मत होते (उपरोक्त, पृ.६४)

तात्पर्य : मराठेशाहीची कल्पना विजयनगरच्या छायेत शहाजी-शिवाजीच्या मनात स्फुरली व वृद्धिंगत झाली, असे मानावे लागते.

**संदर्भ :**


१. करमरकर द. प. व इतर (संपादक)
विजयनगर स्मारक ग्रंथ, १९३६, पुणे.
२. खरे ग. ह.
श्रीविठ्ठल आणि पंढरपूर, पुणे.
३. पगडी सेतु माधवराव
१९७१, शिवचरित्र एक अभ्यास, कोल्हापूर.
४. पुरंदरे ब. मो.
२००१ राजा शिवछत्रपति, पुणे.
५. मजुमदार, पुसाळकर (संपादक)
हिस्ट्री अॅन्ड कल्चर ऑफ इंडियन पीपल, खंड ६, १९६०, मुंबई.
६. रेगे मे. पुं. (अध्यक्ष)
१९९९, मराठी विश्वकोश, खंड ६, वाई.


* * *





लंडनच्या ब्रिटिश म्युझियममधील शिवाजी महाराजांचे चित्र.

# राजा शिवछत्रपती

■ डॉ. ओमप्रकाश समदानी

**शिवाजी महाराजांनी एक नवी वाट निर्माण केली. त्यांनी जीवनात नीतिमत्ता जोपासली, ते धार्मिक वृत्तीचे होते. परंतु धर्मावरील श्रद्धेने त्यांना धर्मांध केले नाही. सर्व धर्मांतील संतांच्या विषयी त्यांना आदर होता. राजांचे राज्य आक्रमक, युद्धखोर, युद्धावर जगणारे नव्हते. शेवटी सरकार म्हणतात, हिंदू जमातीने आपण फक्त जमादार किंवा चिटणीस नव्हे तर छत्रपतीसुद्धा निर्माण करू शकतो हे सिद्ध केले. राज्यनिर्मितीबरोबर प्रतिकूल परिस्थितीतसुद्धा राज्य राखणारी माणसे राजांनी तयार केली होती. स्वराज्याचा आणि अस्मितेचा रुजविलेला हा संस्कार ही शिवाजी राजांची अविस्मरणीय ऐतिहासिक कामगिरी होती.**

हिंदुस्थानाच्या इतिहासातील अठरावे शतक मराठ्यांच्या इतिहासाचे होते. हिंदुस्थानाची सत्ता इंग्रजांना मराठ्यांकडून प्राप्त झाली होती, मोगलांकडून नाही. या ऐतिहासिक वास्तवामुळे मराठ्यांच्या इतिहासाचे पाश्चिमात्यांना आकर्षण वाटत होते. जेम्स कनिंगहॅम ग्रॅन्ट डफ हा मराठ्यांचा आद्य इतिहासकार मानला जात असला, तरीही ग्रॅन्ट डफपूर्वीही मराठ्यांच्या इतिहासलेखनाचे प्रयत्न झाले आहेत. इतिहासलेखनाचे हे प्रयत्न सदोष होते. पाश्चिमात्य इतिहासकारांच्या लिखाणावर विस्तृत टीका झाली असली, तरी इतिहासलिखाणाचा प्रारंभ पाश्चिमात्यांनी केला, हे ऐतिहासिक वास्तव आहे.

मराठ्यांची सत्ता नष्ट झाल्यानंतर इंग्रजी सत्तेच्या विस्ताराबरोबर आधुनिक शिक्षणाचा प्रसार झाला. इतिहास लेखनाच्या क्षेत्रात बुद्धिनिष्ठ

व शास्त्रीय दृष्टिकोन निर्माण झाला. भारतीय इतिहासकारांत अस्मिता, राष्ट्रवाद आणि जनजागृती हे विचार निर्माण होण्याचा हा कालखंड होता. पारतंत्र्याच्या कालखंडात अशा प्रकारच्या संकल्पनांची आणि जाणिवांची निर्मिती ही स्वाभाविक प्रतिक्रिया असते. इतिहासलेखनाच्या बाबतीत हा प्रभाव अधिक ठसठशीतपणे जाणवतो. राष्ट्रीय दृष्टिकोनाच्या प्रभावाचा हा कालखंड होता.

मराठ्यांच्या इतिहासलेखनाला प्रदीर्घ परंपरा आहे. न्यायमूर्ती रानडे, राजवाडे, जदुनाथ सरकार, शेजवलकर, पगडी, सरदेसाई, केळूसकर, डॉ. बालकृष्ण, वा. सी. बेंद्रे यांच्यापासून विजय देशमुख, मेहेंदळे यांच्यापर्यंतच्या अनेक इतिहासकारांनी मराठ्यांच्या इतिहासलेखनाचे दालन समृद्ध केले आहे. विशेष म्हणजे इ. स. १९०० मध्ये 'मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष' या ग्रंथामधून मराठी सत्तेच्या उत्कर्षाबाबतची न्यायमूर्ती रानडे यांनी केलेली चिकित्सा आजपर्यंत अबाधित आहे.

शिवाजी महाराजांवरील इतिहासलेखनात कधी पूर्वग्रह तर काही ठिकाणी वृथा कल्पनेचा आणि वस्तुस्थितीचा विपर्यास झाल्याचे निदर्शनास येते. काही ठिकाणी कल्पित घटनांचा समावेश तर काही ठिकाणी अपुरी साधने, आत्मीयतेचा अभाव, निखळ ऐतिहासिक दृष्टिकोनाचा अभाव यांमुळे वास्तव हरवून जाते. श्रीशिवचरित्राचे मर्म रूढ इतिहासलेखनापेक्षा वेगळ्या अंगाने उलगडण्याचा हा प्रयत्न आहे, हे प्रारंभी नमूद केले पाहिजे.

## शिवपूर्व काल

शिवाजी महाराजांचे चरित्र समजण्यास किती मागे गेले पाहिजे, असा महत्त्वाचा प्रश्न प्रारंभीच उपस्थित होतो. सर्वसामान्यपणे जेवढा परिणाम व प्रभाव व्यापक, तेवढी पार्श्वभूमी अधिक खोलवर आणि समजून घेणे अपरिहार्य असते. देवगिरीच्या यादवांची सत्ता नष्ट झाली, तेव्हापासून म्हणजे मागील तीन–चार शतकांच्या सामाजिक, राजकीय पार्श्वभूमीच्या आधारे हे समजून घेणे आवश्यक आहे. कारण श्रीशिवछत्रपतींच्या राजकारणाचे धागे मागील तीन–चार शतकांच्या सामाजिक, राजकीय आणि धार्मिक परिस्थितीतूनच विणले गेले आहेत.

शिवपूर्वकालीन समाज कसा होता, तर हा समाज पारंपरिक, गतानुगतिक, स्थितिप्रिय, उदासीन, तटस्थ होता. वतनासक्ती आणि वतनाविषयीचे प्रेम होते. वतनासाठी खून, मारामाऱ्या हा नित्याचा भाग होता. राज्य कोणाचे, राज्यकर्ते कोण, त्यांचा धर्म कोणता यांविषयी समाजाला काही घेणेदेणे नव्हते. अस्मिता आणि चैतन्य नसलेला, लोळागोळा होऊन पडलेला हा समाज होता. अशा परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर शिवाजीराजांनी स्वराज्याच्या, मुक्ततेचा आनंद आणि अस्मितेचा विचार रुजविला. सामान्य लोकांच्या असामान्य कर्तबगारीचा आणि हौतात्म्य पत्करण्यासाठी तयार असणाऱ्या शेकडो लोकांचा फुलविलेला हा ताटवा श्रीशिवछत्रपतींची महत्ता अधोरेखित करतो. मध्ययुगीन भारताच्या इतिहासात सर्वसामान्य लोकांना राज्य आपले आहे, असे वाटणे ही घटनाच मोठी अनोखी होती. एखाद्या घराण्याचे राज्य, राजाचे राज्य असे मानण्याच्या या काळात हे राज्य आपले आहे, राज्य आणि राज्याच्या सुरक्षिततेत आपलीसुद्धा सुरक्षितता आहे आणि म्हणून हे राज्य टिकवणे ही माझी जबाबदारी आहे, ही भावना समाजमनात निर्माण करणारा भारतीय इतिहासातील शिवाजी राजा हा एकमेव लोकनेता आहे. स्वराज्याची आणि स्वातंत्र्याची निर्माण केलेली ही प्रेरणा किती प्रभावी होती आणि खोलवर रुजली होती, याचा प्रत्यय मराठ्यांच्या स्वातंत्र्ययुद्धाच्या कालखंडात येतो. राजा नाही, राज्य नाही, राजधानी पडलेली, महाराणी शत्रूंच्या कैदेत, युवराज कैदेत, सैन्य नाही, संपत्ती नाही, शस्त्रसामग्री नाही तरीही या संपूर्ण प्रतिकूल परिस्थितीच्याविरुद्ध अथक लढण्याची प्रेरणा ही इतिहासातील एकाकी, एकमेव घटना आहे. या प्रेरणांची निर्मिती हे श्रीशिवछत्रपतींचे सामर्थ्य आहे.

## राज्याचे अधिष्ठान, ध्येय आणि धोरण

उत्कर्ष पावणाऱ्या स्वतंत्र राजसत्तेमागे त्या राज्याची स्वतःची एक तात्त्विक भूमिका असते. राज्याची निर्मिती विशिष्ट ध्येयांनी, धोरणांनी प्रेरित होऊन केली जाणे, ही मध्ययुगीन काळातील दुर्मीळ गोष्ट आहे. शिवाजी महाराजांनी स्थापित केलेल्या सत्तेला भरभक्कम नैतिक पाया होता. विशिष्ट ध्येय, धोरण आणि नैतिक अधिष्ठान यांमुळे

शून्यातून स्वराज्याची निर्मिती होऊ शकली आणि म्हणूनच शिवप्रभूंच्या स्वराज्यविषयक धारणा समजून घेणे क्रमप्राप्त आहे. नूतन राज्याच्या ध्येयांचा, धोरणाचा विचार करण्यापूर्वी त्र्यं. शं. शेजवलकरांनी म्हटल्याप्रमाणे शिवाजी महाराजांची मनोरचना समजून घेणे आवश्यक आहे. शिवछत्रपतींच्या मनोरचनेचे विविध पैलू स्पष्ट करताना शेजवलकरांनी म्हटले आहे की, शिवाजी धर्माभिमानी, श्रद्धावान, सत्संगाचा भुकेला, गूढवाद मानणारा, अलौकिक घटनांवर विश्वास ठेवणारा, ईश्वरसाक्षात्कार अनुभवू इच्छिणारा पुरुष होता, असे ऐतिहासिक पुराव्यांवरून ठरते. शेजवलकर पुढे असे नमूद करतात की, शिवाजी श्रद्धाळू होता हे निर्विवाद पण तो शहाणा व विवेकी होता, हे त्याहून सत्य आहे. याचा अर्थ शिवाजी महाराजांचे स्वतंत्र मन हे स्वतंत्र राज्याचे अधिष्ठान होते.

प्रचंड शक्तिशाली दृढमूल सत्तांच्या बरोबर संघर्ष करून स्वराज्याची उभारणी करण्याच्या प्रयत्नाचा शेवट वस्तुतः ठरलेला होता. हा वेडेपणाचा मार्ग होता. परंतु वेडेपणाच्या या मार्गावरून चालत जाऊन यश संपादन करणे हा सृष्टीतील अकल्पित चमत्कार होता. भक्कम असणाऱ्या मोगल सत्तेला शिवाजी महाराजांनी दिलेले हे आव्हान होते. यासाठी लागणारे धैर्य कोठून येते, या प्रश्नाची मीमांसा करताना शेजवलकर नमूद करतात की, आपण आरंभिलेले कार्य इष्टकार्य आहे. पुण्यकार्य आहे, धर्मबांधवांच्या हिताचे आहे, हे केल्याखेरीज तरणोपाय नाही, हिंदूजातीला स्वाभिमानाने जगावयाचे असेल, तर धाडस करणे क्रमप्राप्त आहे. देवी भवानी आदेश देत आहे. ती पाठीशी उभी आहे. अशी न चळणारी समजूत शिवाजी राजांच्या राज्यस्थापनेच्या कार्यात दिसून येते.

श्रीशिवछत्रपतींच्या जीवितकार्याचा, ध्येयधोरणाचा मागोवा घेत असताना न्यायमूर्ती रानडे यांनी म्हटले आहे की, मराठ्यांच्या विभक्तवृत्तीला आळा घालणे, हा शिवाजीच्या अंगी मोठा गुण होता. त्याच्या जोरावर त्याने समान ध्येयाची शक्तिमत्ता समान धर्माच्या नावाने एकत्र जुळवली. तो केवळ आपल्या सामर्थ्याचे प्रतीक नव्हता तर हृदय उचंबळून सोडणाऱ्या ध्येयाच्या श्रेष्ठ आवश्यकतेचा, मराठ्यांना समान कार्याची प्रेरणा देणाऱ्या सर्वश्रेष्ठ आकांक्षेचा अवतार होता.... सर्वांना सारख्याच प्रमाणात रगडू पाहणाऱ्या संकटाविरुद्ध उच्च हेतुप्रीत्यर्थ त्याने ती सत्ता एकत्र आणली. हेच त्याच्या कर्तृत्वाचे मुख्य रहस्य..... याच मुद्याच्या अनुरोधाने न्यायमूर्ती रानडे पुढे नमूद करतात की, हिंदुस्थानात एकछत्री साम्राज्य उभे करावे, ही छत्रपतींची आकांक्षा नव्हती. आपल्या जनतेला स्वातंत्र्य मिळावे, एक राष्ट्र या नात्याने तिच्यात जूट नांदावी, ह्या जुटीत स्वसंरक्षणाची आणि आपले हक्क दुसऱ्यांना पाळावयास लावण्याची शक्ती असावी, या दृष्टीने जन्मभर चाललेला हा प्रयत्न होता. इतर सत्तांचा नाश व्हावा, असा विचार शिवछत्रपतींच्या मनात कधीच नव्हता. वि. का. राजवाड्यांनी शिवाजी महाराजांच्या कार्याची चिकित्सा करताना म्हटले आहे की, जगातील दिग्विजयी पुरुष अलेक्झांडर, सीझर किंवा नेपोलिअन यांच्याशी शिवाजी महाराजांची तुलना करणे अयोग्य आहे. हेतूच्या पावित्र्यासंबंधी अशी तुलना संभवत नाही. शिवाजी राजांचे वर्तन न्यायाचे, नीतीचे, पराक्रमाचे, स्वधर्मपरायणतेचे व परधर्म सहिष्णूतेचे होते.

श्रीशिवछत्रपती स्थापित राज्याच्या ध्येय–धोरणांबाबतची मागील मीमांसा अत्यंत स्पष्ट आहे. नवनिर्मित राज्यास हिंदुपदपादशाही या नावानेसुद्धा संबोधले जाते. समकालीन इस्लामी सत्तांची ऐतिहासिक पार्श्वभूमी लक्षात घेतली म्हणजे तत्कालीन समाजाची ती अत्यंत स्वाभाविक प्रतिक्रिया होती. श्रीशिवछत्रपतींचा याबाबतचा दृष्टिकोन काय होता. राज्यनिर्मितीमागच्या त्यांच्या प्रेरणा आणि धारणा काय होत्या, हे समजून घेणे अधिक महत्त्वाचे आहे.

लोककल्याण हा या राज्याचा केंद्रबिंदू आहे. हे राज्य रयतेचे आणि रयतेच्या कल्याणासाठी होते. त्यामुळे ते एका धर्माचे आणि धर्मापुरते होते, ही मांडणी चुकीची आहे. शिवछत्रपतींना धर्मरक्षक असे संबोधले जात असले, तरी धर्म या शब्दाची व्याप्ती मोठी आहे. हे राज्य श्रींचे, हे राज्य देवाधर्माचे आणि शिवाजी महाराजांचा उल्लेख गोब्राह्मण–प्रतिपालक असा केला जात असला, तरी केवळ हिंदू धर्मरक्षण हा या राज्याचा उद्देश नव्हता. शिवप्रभुनिर्मित स्वराज्यातला धर्म व्यापक पण तात्त्विक बैठकीवर अधिष्ठित होता. शिवचरित्रातून आणि नंतरच्या



शिवाजी महाराजांचा होन.

कालावधीत लढलेल्या मराठ्यांच्या स्वातंत्र्यसंग्रामाच्या इतिहासातून आदिलशहाने दादाजी नरसप्रभूला एक खलिता पाठवला. ही नरसप्रभूला जरब आणि राजांना दिलेली समज होती. हे पत्र दादाजीने राजाकडे पाठवून दिले. राजांनी दिलेल्या पत्राच्या उत्तरातील एक वाक्य राजांचे ध्येय, धोरण स्पष्ट करणारे आहे. 'श्रीरोहिरेश्वराच्या कृपेमुळे आम्ही मावळात यशस्वी झालो. पुढेदेखील तो आम्हांस असेच यश देईल आणि हिंदवी स्वराज्याची स्थापना करून तो आमचे सर्व मनोरथ पूर्ण करणार आहे. याबद्दल आम्ही निश्चिंत आहोत.' हा दृष्टिकोन स्पष्टपणे अधोरेखित होता, लोक राजासाठी नाही तर स्वराज्यासाठी लढले आणि म्हणूनच ती मध्ययुगीन कालावधीच्या संदर्भात आश्चर्य वाटावी अशी लोकयुद्धाची रोमहर्षक घटना आहे. शिवरायांनी जनसामान्यांच्या मनात निर्माण केलेल्या या जाणिवा होत्या. परिणामी लोक आपल्या राज्यासाठी लढत होते. हे राज्य एतद्देशीयांचे आहे. आपले सर्वांचे कल्याण राज्याच्या स्वतंत्र सार्वभौम अस्तित्वाशी निगडित आहे, ही व्यापक भूमिका होती. म्हणून हे राज्य हिंदवी स्वराज्य होते. या संदर्भातील इ. स. १६४५ मधील घटना लक्षात घेण्यासारखी आहे. जदुनाथ सरकारांनी श्रीशिवछत्रपतींच्या जीवनकार्याची मीमांसा अत्यंत सुंदर पद्धतीने केली आहे. ते म्हणतात, "Shivaji's success proves his divine gift of genius, which baffles analysis." सरकार नमूद करतात की, शिवाजी महाराजांनी एक नवी वाट निर्माण केली. सर्वनाश ठरलेल्या वाटेवरून महाराज गेले. त्यात ते यशस्वी झाले... त्यांनी जीवनात नीतिमत्ता जोपासली, ते धार्मिक वृत्तीचे होते. परंतु धर्मावरील श्रद्धेने त्यांना धर्मांध केले नाही. सर्व धर्मांतील संतांच्या विषयी त्यांना आदर होता. राजांचे राज्य आक्रमक, युद्धखोर, युद्धावर जगणारे नव्हते... हिंदू जमातीने आपण फक्त जमादार किंवा चिटणीस नव्हे तर छत्रपतीसुद्धा निर्माण करू शकतो हे सिद्ध केले. शिवाजी महाराजांनी हिंदू धर्माचा वृक्ष वठवला नाही तर तो पुनः एकदा प्रतिकूल परिस्थितीवर मात करून बहरवला आहे, याची जाणीव करून दिली.

एकूण राज्यनिर्मितीचा हा उपक्रम क्रांतिकारक होता. शिवाजी महाराजांनी राज्याची उभारणी करताना इष्ट, शक्य आणि व्यवहार्य या सर्वांचा सूक्ष्म विचार केला होता. राज्यनिर्मितीबरोबर प्रतिकूल परिस्थितीतसुद्धा राज्य राखणारी माणसे राजांनी तयार केली होती. स्वराज्याचा आणि अस्मितेचा रुजविलेला हा संस्कार ही शिवाजी राजांची अविस्मरणीय ऐतिहासिक कामगिरी होती. आजही ही भावना तितक्याच प्रखरतेने जिवंत आहे. शिवाजी राजांचे हे सर्वांत मोठे योगदान आहे. मध्ययुगीन कालखंडात स्वयंशासित, स्वतंत्र आणि सार्वभौम राज्याची स्थापना ही अतर्क्य आणि अनपेक्षित घटना होती.

### नव्या वाटा, इतिहासाला नवे वळण

हिंदुस्थानाच्या इतिहासात राजे आणि राजसत्तांची वानवा नव्हती. शिवाजी महाराजांच्या काळातसुद्धा स्वतःला राजे म्हणवणारे आणि समजणारे परंतु प्रत्यक्षात इस्लामी सत्तांची चाकरी करणारे अनेक होते. निर्भयपणे, ताठपणे जगता न येणाऱ्या अशा राजांची संख्या बरीच होती. या प्रतिकूल परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर शिवाजी राजांनी इतिहासाला कलाटणी देऊन एका नव्या वळणावर आणून उभे केले. त्यांची ही कामगिरी कधीही न पुसता येणारी आहे.

### महाराष्ट्र राज्य

इ. स. १७ व्या शतकात शिवजन्माच्या सुमारास दक्षिणेत तीन प्रमुख सत्ता होत्या. विजापूरची आदिलशाही, अहमदनगरची निजामशाही आणि गोवळकोंड्याची कुतुबशाही. उत्तर हिंदुस्थानात अत्यंत सशक्त मोगल सत्ता होती. संपूर्ण देश जेव्हा इस्लामी सत्तांच्या प्रभावाखाली होता, तेव्हा वयाच्या पंधराव्या वर्षी शिवाजी राजांनी हिंदवी स्वराज्याची मुहूर्तमेढ रोवली. शिवाजीराजांची राजमुद्रा त्यांच्या स्वातंत्र्याचा, वृद्धिंगत होणाऱ्या सार्वभौम सत्तेचा प्रकट जाहीरनामा होती. शिवरायांच्या अथक प्रयत्नांमधून निर्माण झाले ते महाराष्ट्र राज्य फार मोठे नव्हते हे खरे आहे.

परंतु ज्या मूल्यांवर अधिष्ठित हे राज्य होते. मध्ययुगीन इतिहासाला श्रीशिवछत्रपतींनी कलाटणी दिली होती. म्हणून हे राज्य या प्रदेशाला मिळालेली देणगी होती. हे महाराष्ट्र राज्य आहे, असा जेधे करिन्यामधील उल्लेख या राज्याची एवंगुण वैशिष्ट्ये अधोरेखित करणारा आहे. या राज्याचे वेगळेपण आणि वळण कोणते होते, ते समजून घेतले पाहिजे म्हणजे मध्ययुगीन इतिहासाच्या संदर्भातील हा अकल्पित चमत्कार होता, हे स्पष्ट होते.

शिवाजी राजांच्या या राज्याचे आद्यकर्तव्य होते लोककल्याण आणि रयतेचे रक्षण. शाहिस्तेखानाच्या स्वारीच्या वेळी शिवाजी राजांनी सर्जेराव जेधे यास लिहिलेले पत्र (२३ ऑक्टो. १६६२) अत्यंत बोलके आहे. राजे लिहितात, ''सध्या शाहिस्तेखान तुमच्या परगण्यात स्वारी करण्यास येत आहे, अशी बातमी जासुदांनी आणली आहे. तेव्हा पत्र मिळताच आपण आपल्या परगण्यातील गावोगावी जाऊन तेथील तमाम जनतेला ही बातमी कळवावी. सर्व माणसे, लेकरेबाळे, यांनी घाटाखाली एखाद्या मजबूत अथवा सुरक्षित जागी, जेथे शत्रूचा उपद्रव त्यांना होणार नाही अशा जागी, त्यांना पाठवावे. या कामात कसलीही हयगय करता कामा नये.... या कामात जर कसर पडली, तर मोगल ज्या लोकांना कैद करून नेतील, त्याचे सारे पाप तुमच्या माथ्यावर पडेल हे लक्षात ठेवावे. तरी तुम्ही गावचा गाव हिंडोन, रात्रीचा दिवस करून घाटाखाली सुरक्षित जागा असेल, तेथे माणसांना पाठवावे. या कामात एका घडीचादेखील उशीर करू नये.''[1]

रयतेच्या संरक्षणाचा विचार राजाच्या मनात किती खोलवर होता, हे या पत्रातून स्पष्ट होते. लोककल्याणाची आंतरिक तळमळ व्यक्त करणारे आणखी एक पत्र. कोकणात मराठ्यांच्या फौजेचा तळ होता. मे महिन्यातील उन्हाचे दिवस होते. सैन्य चिपळूण या ठिकाणी होते. राजांनी अधिकाऱ्याला लिहिलेले हे पत्र आहे. या पत्राचा संक्षिप्त आशय असा आहे की, सर्व सामग्रीचा वापर जपून करा. पुढे पावसाळा आहे. दाणा-वैरणीसाठी रयतेला त्रास देऊ नका. पत्रातील मूळ मजकूर अत्यंत बोलका आणि राजांच्या बहुआयामी व्यक्तिमत्त्वाचा आणखी एक पैलू स्पष्ट करणारा



शिवाजी महाराजांच्या काळातील रुपया.

आहे. ते लिहितात,.... सैन्यातील लोक गावात जातील, कोणी कुणब्याचे येथील दाणे, कोणी भाकर, कोणी गवत, कोणी लाकूडफाटा, कोणी भाजी, कोणी पाले इत्यादी ऐवज घेऊन येतील आणि असा त्रास कुणबी लोकांना होऊ लागला म्हणजे जे काही कुणबी घर धरून आणि आपला जीव मात्र घेऊन राहिले आहेत, तेही जाऊ लागतील. कित्येक लोक उपाशी मरू लागतील. म्हणजे त्या लोकांना असे वाटू लागेल की, मोगलांच्या धाडीपेक्षा तुमची धाड अधिक झाली. असा लोकांचा तळतळाट होईल. तेव्हा रयतेचे व घोड्यांचे जे नुकसान होईल त्याची सारी बदनामी तुम्हावरी येईल. हे तुम्ही बरे जाणोन सिपाही (घोडेस्वार) असो अथवा पावखलक (पायदळातील लोक) असोत अत्यंत सावधगिरीने वर्तन करावे.[2] पत्र बरेच मोठे आहे. पत्रांच्या केंद्रस्थानी आहे तो रयतेला काडीचाही त्रास होणार नाही, हा विचार. सैन्याने जुलूम-जबरदस्ती करू नये, वस्तू हव्या असतील तर रास्त भावाने विकत घ्याव्यात, भांडणतंटा करू नये, साठवलेली सामग्री पुरवली पाहिजे. रयतेच्या कल्याणाचा विचार हाच या राज्याचा आत्मा होता. मराठ्यांची इज्जत जोपासणारा, वाढविणारा हा आचार होता. शिवाजी राजांची सूक्ष्म दृष्टी आणि बारीकसारीक गोष्टींकडे असणारे लक्ष त्याचप्रमाणे सूचनांचे पालन न केल्यास दुर्जन समजून शिक्षा केली जाईल ही जरब, हे सारे हा लोकराजा होता हे स्पष्ट करणारे आहे.

### रयतेचे राज्य

मध्ययुगात सर्व भारतभर नव्हे, तर सर्व जगातील सत्तांचे स्वरूप राजसत्तांचेच होते. परंतु शिवाजीराजांच्या राजसत्तेचे स्वरूप अनियंत्रित, निरंकुश सत्तेचे नव्हते. रयतेचे राज्य हा सतराव्या शतकात, पुढील दोनशे वर्षांनंतरचा विचार होता. या राजसत्तेच्या अंतरंगात खरी लोकशाही होती. प्रस्थापित राजसत्ता ही जनतेची सत्ता होती, जनतेसाठीची सत्ता होती. हे

राज्य माझे आहे आणि म्हणून ते टिकवण्याची, वाढवण्याची जबाबदारी माझी आहे; हा एकात्म भाव मध्ययुगीन भारताच्या इतिहासात केवळ शिवशाहीच्या संदर्भात दिसतो. शिवाजीराजांनी राज्याभिषेक करवून घेतला. श्रीशिवछत्रपतींची बिरुदावली मध्ययुगीन काळाच्या संदर्भात समजावून घ्यावी लागते. हे राज्य मध्ययुगीन प्रस्थापित प्रघाताप्रमाणे राजाचे राज्य नव्हते. सर्वसामान्य जनतेला हे राज्य आपले वाटत होते. इ.स. १०व्या शतकापासून १८व्या शतकापर्यंतच्या मध्ययुगीन कालावधीत हे भाग्य शिवशाहीच्याच वाट्याला आले होते. राज्य आपले आहे, हा विचार जनतेच्या मनात रुजविणारा हा पहिला राजा होता. इतिहासाला दिलेले वळण लोकांच्या मनात स्वातंत्र्याची आकांक्षा प्रज्वलित करणारा होता. या जागविलेल्या आकांक्षेचा श्रीशिवछत्रपती हा प्रतिनिधी होता. जे राज्य जनतेला आपले वाटते, ते राज्य बुडविणे कोणत्याही सत्तेला शक्य नसते. राज्याच्या रक्षणासाठी जनता हौतात्म्य पत्करण्यासाठी सिद्ध होती आणि याच कारणामुळे हे राज्य नष्ट करण्याचा अथक, अव्याहत प्रयत्न औरंगजेब बादशहाने सर्व सामर्थ्यानिशी केला होता. या राज्याचा भौगोलिक विस्तार मोठा नसला, तरी निर्माण केलेले आव्हान फार मोठे होते; याची जाणीव अत्यंत धूर्त, मुत्सद्दी असणाऱ्या मोगल बादशहाला होती.

मध्ययुगीन इतिहासाच्या संदर्भात प्रभावीपणे पुढे येणारा या राज्याच्या बाबतीतला हा एक मुद्दा आहे. रयतेचा राजावरील आणि राजसत्तेवरील न ढळणारा विश्वास. इ.स. १६८० पर्यंतच्या शिवचरित्रात अनेक प्रतिकूल प्रसंग आहेत. माघार घ्यावी लागली, पराभव स्वीकारावे लागले, मिर्झाराजा जयसिंगबरोबरच्या पुरंदरच्या तहाने तर जवळपास सर्व राज्य गमावले गेल्याची स्थिती निर्माण केली होती. कुठल्याही पराभवाच्या किंवा आव्हानांच्या किंवा होरपळून निघण्याच्या परिस्थितीतसुद्धा जनतेचा राज्यावरील विश्वास कायम आहे. ज्या काळात सत्तास्पर्धा आणि सत्ताकांक्षा आणि त्यांतून उद्भवलेली बंडे ही व्यवस्थेचा अपरिहार्य भाग होती, त्या काळात लोकांचा राजावरील विश्वास कायम होता. सर्व प्रकारे आपले गोमटे या सत्तेशी निगडित आहे. आणि म्हणून शिवाजीराजांच्या 'आमच्या इमानावरी आपली मान ठेवून आम्हांपाशी या' या आवाहानाप्रमाणे लोक विश्वास ठेवून राजांच्या पाठीमागे उभे होते. मध्ययुगीन इतिहासाला न समजणारी अशी ही अकल्पित स्थिती होती.

### अर्थकारण

नवनिर्मित राज्य आर्थिक दृष्टीने सक्षम करण्याचा राजांचा प्रयत्न ही दुर्मीळ बाब आहे. प्रजेचे कल्याण आणि राज्यांचे उत्पन्न वाढवणे या दोन्ही गोष्टींचा राजांनी समतोल साधला. राज्याच्या उत्पन्नाचा मुख्य स्रोत जमिनीवरील धारा होता. मलिक अंबरने सुरू केलेली धारापद्धती राज्यात चालू होती. कोणत्या पद्धतीचा अवलंब केला, हा तपशिलाचा भाग आहे. जमीन मोजणीसाठी साखळीचे की काठीचे माप उपयोगात आणले जात होते यापेक्षा या सर्व पद्धती ठरविताना राजांनी रयतेस विश्वासात घेतले. लोकमान्यता महत्त्वाची मानली. मुलकात ''साहेबी (सत्ता) कारकुनाशिवाय (सरकारी अंमलदार) कोणाचीही नाही असे केले. नवीन रयत येईल त्यास गुरेढोरे द्यावी, बीजास दाणा–पैका देण्यात येई. भक्षावयासी दाणे–पैका देण्यात येई. तो ऐवज दोन–चार वर्षांनी उगवून घेण्यात येई. या प्रकारे रयतेचे पालनपोषण केले. मुलकात देवा–ब्राह्मणांचे, मशिदीचे, इनामती हक्कही नक्त द्रव्यात बांधून देऊन पोत्यावरून (तिजोरीतून) देण्याची व्यवस्था केली.''[३]

प्रजेचे कल्याण हा तर राज्याचा केंद्रबिंदू होता. राज्याचे उत्पन्न आणि प्रजेचे कल्याण या दोन्हींचा विचार अधोरेखित करणारे रामजी अनंत सुभेदार मामले प्रभावळी यांस इ.स. १६७६ मध्ये लिहिलेले पत्र उपलब्ध आहे. या पत्रात राजे लिहितात, ''इमाने इतबारे साहेब काम करावे. चोरी न करावी....भाजीच्या देठास तेही मन न दाखविता रास्त व दुरुस्त वर्तणे....रयतेवरी जाल रयेतीचा वाटा रयेतीस पावे आणि राजभाग राजास येई ते करणे. रयेतीवरी काडीचे जाल व गैर केलिया साहेब तुजवर राजी नाहीत, येसे बरे समजणे...गावचा गाव फिरावे....ज्याला सेत करावयास कुवत आहे, माणूस आहे, आणि त्याला जोतास बैल, नांगर, पोटास दाणे नाही, तो आडोन निकामी जाला असेल. तरी त्याला रोख पैसे हाती घेऊन दो–चौ बैलाचे पैके द्यावे, बैल घेवावे व पोटास खंडी दोन खंडी दाणे द्यावे,

जे सेत त्याच्याने करवेल तितके करवावे....जोवरी त्याला तवानगी येई, तोवरी वागवावे. या कलमास जरी दोन लाख पावेतो खर्च करिसिल आणि कुणबिया, कुणबि यांची खबर घेऊन त्याला तवानगी येती करून किर्द करसील आणि पड जमीन लावून दस्त त्याजती करून देसील, तरी साहेब कबूल असतील तैसेच कुलबी तरी आहे. पुढे करावयास उमेद धरतो''....४

नवनिर्मित राज्य आर्थिकदृष्ट्या सुस्थितीत कसे असू शकेल यासाठी राजांनी अटोकाट प्रयत्न केले. शेती सुधारणा, उद्योगधंदे वाढीसाठी प्रयत्न हा याचाच भाग होता. राज्याचे उत्पन्न कसे वाढेल आणि राज्य सक्षम कसे असेल, असेच आर्थिक धोरण आखण्यात आले होते. व्यापारविषयक धोरणामध्ये स्थानिक व्यापारी वर्गाच्या हिताला प्राधान्य देण्यात आले. इंग्रज, फ्रेंच, डच किंवा पोर्तुगीज या परकीय व्यापाऱ्यांवर अनेक निर्बंध लादण्यात आले होते. स्थानिकांना स्पर्धेची झळ पोहोचणार नाही यासाठी काळजी घेतली होती. इंग्रजांचा आणि मराठी मुलखाचा जवळचा संबंध होता. परंतु त्यांनासुद्धा अंतर्गत व्यापारात हस्तक्षेप करता येणार नाही, याचे उत्कृष्ट उदाहरण म्हणजे कोकणात चालणारा मिठाचा व्यापार, स्थानिक उत्पादन आणि व्यापारासाठी संरक्षक धोरणाचा उपयोग राजांनी केला होता. नरहरी आनंदराव या कुडाळच्या सरसुभेदारास मिठावरील करासाठी इ. स. १६७१ मध्ये लिहिलेले पत्र राजांच्या अर्थनीतीचे उत्कृष्ट उदाहरण आहे. राजे लिहितात, ''तुम्ही घाटी जकातजबर बैसविणे. बारदेशात मीठ विकते त्याचा हिशोब प्रभावळीकडे संगमेश्वराकडे मीठ विकते त्याने कित्येक जबर पडते ते मनास आणून त्या अजमासे जकाती जबर बैसविणे की संगमेश्वरी विकले आणि घाट पावेतो जे बेरीज पडेल त्या हिशेबे बारदेशीच्या मिठास जकाती घेवणे. संगमेश्वराहून बारदेशीचे मीठ महाग पडेल ऐसा जकातीचा तह देणे.''५ आपल्या देशाच्या उत्पन्नास मागणी वाढावी, 'साहेबाचा बहुत फायदा होईल.' असे धोरण अधिकाऱ्यांनी राबवावे. विविध उत्पन्नांचे स्रोत स्वराज्याचे सुराज्य करण्यासाठी उपयुक्त ठरतील, आर्थिक स्थिती बळकट होईल, यासाठी हे प्रयत्न होता.

स्वराज्यात शेतकऱ्यांच्या हिताचा विचार अपरिहार्य होता कारण शिवाजी शेतकऱ्यांचा, कुणब्यांचा राजा होता. त्यांच्या उन्नती-विकासाचा विचार हा मुख्य मुद्दा होता. शिवपूर्वकाळात सर्वसामान्य रयतेची स्थिती अत्यंत दयनीय होती. वेळप्रसंगी राजसत्तेला न जुमानणारे वतनदार होते. वतनदार रयतेचा छळ करीत असत. अशा स्वयंघोषित वतनदार राजांना महाराजांनी वठणीवर आणले. त्यांचे वाडे, हुडे, कोट पाडिले, त्यांचा कारभार नियंत्रित केला. शेतकऱ्यांच्या अडचणी सोडविण्याचे आदेश देण्यात आले. सुभेदाराला ताकीद देण्यात आली की, रयत तजावजा (दयनीय) होऊ न देणे. जमीन पडीक राहणार नाही, याची काळजी घेतली गेली. श्रीशिवछत्रपतींचे राज्याभिषेकानंतरचे एक पत्र आहे. रामजी अनंत सुभेदाराला लिहिलेल्या पत्रातील प्रत्येक शब्द राज्याचे शेतकऱ्यांच्या संदर्भातील धोरण आणि उत्तरदायित्व स्पष्ट करणारा आहे. ज्या शेतकऱ्यावर मागील बाकीचा बोजा आहे, त्या संदर्भात राजे या पत्रात लिहितात, ''मागील बाकीचा बोजा त्याच्यावर आहे, आणि तो देण्याची त्यांची ऐपत नाही.......तो कुणबी अगदी मोडून गेला आहे आणि गाव सोडून तो जाऊ पाहत आहे. अशी बाकी ज्या कुळांवर असेल, ते सारे माफ करण्यासाठी खंडाचे हप्ते तहकूब करून नंतर साहेबाला कळवावे, की या पद्धतीने लागवड करून साहेबाचा फायदा केला आहे आणि आणखी येक कुळाची बाकी वसूल न झाल्याने त्या गरीब कुळास ती माफ केली आहे, असे साहेबास कळविले म्हणजे साहेब माफीची सनद देतील.''६ शेतकऱ्याविषयीची काळजी त्याचबरोबर शेतीच्या विकासाची आस्था याचे उत्कृष्ट उदाहरण म्हणजे हे पत्र- कुणबिया कुनब्याची खबर घेऊन त्याला तवानगी येती करून किर्द करावी, हा आजही अबाधित वाटणारा विचार आहे. बळीचे राज्य येवो त्यासाठी त्यांची इडा पिडा टाळण्याचा हा कृतिशील व आदर्श प्रयत्न होता.

वरील पत्रातील उताऱ्यातून रयतेच्या कल्याणाची आंतरिक आस्था स्पष्टपणे दिसून येते. राज्याचे धोरण म्हणून सर्वसामान्यांना केंद्रस्थानी ठेवून, त्यांच्या हिताचा विचार करून राज्यसुद्धा आर्थिकदृष्टीने कसे परिपूर्ण होईल, याचा विचार प्राधान्याने केला आहे. रयतेच्या सुखदुःखाशी

जोडलेली ही नाळ मध्ययुगीन कालखंडात कुठेही आणि कोणत्याही स्थितीत अपवाद होता, हे नमूद करणे आवश्यक आहे. अर्थव्यवस्थेबाबत सूत्ररूपाने असे म्हणता येईल की, १. महसूल वसुलीसाठीची अन्यायी मक्तेपद्धती बंद करण्यात आली
२. जहागिरी देण्याची पद्धत बंद करण्यात आली. ३. जमीनदाराचे जमीनदारीचे हक्क काढून घेण्यात आले. ४. शेतीच्या विकासासाठी तगाई पद्धती सुरू करण्यात आली. ५. नैसर्गिक आपत्ती किंवा शत्रूकडून नुकसान झाल्यानंतर रयतेला महसुलात सूट देण्याची पद्धत सुरू करण्यात आली. ६. युद्धामुळे ओस पडलेल्या गावांना पुनः वसविण्यासाठी मदत दिली जात असे. ७. सारा वसुलीची प्रत्यक्ष पीकपाण्यावर आधारित पद्धत सुरू केली. एकूण अर्थकारणाचा कणा रयत होती.

**राजवटीची वैशिष्ट्ये**

शिवाजी राजांची राजवट काळाच्या कितीतरी पुढे होती. या राजवटीची काही ठळक वैशिष्ट्ये नमूद करता येतील.

१. या राज्याचा हेतू 'मराठ्यांचे गोमटे', करण्याच्याच होता. त्यासाठी सर्व मराठ्यांना एकत्रित आणून त्यांना एकसंध करण्याचा प्रयत्न राजांनी केला. मराठा शब्द एका जातीपुरता नसून त्यामध्ये ब्राह्मण, मावळे, हेटकर, भंडारी, कोळी, मुसलमान, ख्रिस्ती यांचासुद्धा समावेश होता. या सर्वांचेच साहाय्य राजसत्तेच्या उभारणीसाठी आणि विकासासाठी राजांनी घेतले.

२. अखिल भारतीय पातळीवर असणाऱ्या मोगल सत्ते अंतर्गत ही सत्ता नव्हती. ही सत्ता स्वतंत्र, स्वायत्त, आणि सार्वभौम होती. या सत्तेव्यतिरिक्त आणखी कुणाचेही स्वामित्व शिवाजी राजास मान्य नव्हते. या सत्तेचे अस्तित्व कोणाकडून मिळविलेल्या सनदेवर अवलंबून नव्हते.

३. सतराव्या शतकात राष्ट्रीय दृढीकरणाचा हा प्रयत्न होता. म्हणून इष्ट वाटणाऱ्या आपल्या कार्याच्या आड येणाऱ्यांना शिवाजी राजांनी कापून काढले. मग ते मोरे, घोरपडे असोत की कृष्णाजी भास्कर कुलकर्णी.

४. हे राज्य रयतेचे राज्य होते. बहुजन समाजाचे हित हेच राजसत्तेच्या केंद्रस्थानी होते. राजांच्या अनेक पत्रांमधून त्याचप्रमाणे त्यांच्या हुकुमांवरून याचा प्रत्यय स्पष्टपणे येतो.

५. अष्टप्रधान आणि अंमलदारांना निश्चित वेतन देण्यात येत असे. वतनदार, जमीनदार, देशमुख यांना स्वराज्याचे दायाद म्हणजे वाटेकरी म्हणून नव्हे तर स्वराज्य उभारणीच्या कार्यातील सहकारी म्हणून परंतु आपल्या स्वामित्वाखाली सहभागी करून घेण्यात आले. वतनासक्ती आणि वतनाचे प्रेम हे या काळाचे वैशिष्ट्ये होते. मातब्बर, प्रतिष्ठित असणाऱ्या या मंडळींमुळे सत्तेचा आणि रयतेचा संबंध येत नसे. ही सर्व व्यवस्था संपविण्याची अत्यंत कठीण कामगिरी साम, दाम, दंड, भेद या सर्व मार्गांचा अवलंब करून पार पाडली; इतकेच नव्हे तर त्यांना आपल्याबरोबर राज्य उभारणीच्या कार्यात सहभागी करून घेतले.

६. या राजवटीचा उद्देश हिंदुपदपादशाहीचा नव्हता पण हिंदुधर्मरक्षणाचा होता. 'हिंदवी स्वराज्याची स्थापना करून श्रीरोहिरेश्वर आमचे सर्व मनोरथ पूर्ण करणार आहे, याबद्दल आम्ही निश्चिंत आहोत' हे उद्‌गार याची साक्ष आहेत.

७. नीतितत्त्वाचे पालन हे या राजवटीचे प्रमुख वैशिष्ट्य होते. युद्धातून मिळणारी मालमत्ता, शस्त्रे अधिकाऱ्यापुढे सादर करावी लागत. कुराणासारखा धर्मग्रंथ हाती पडल्यास तो मुसलमान धर्मगुरूकडे आदराने पाठविण्यात येत असे. युद्धात स्त्रिया पकडल्या गेल्यास त्यांची पाठवणी त्यांच्या घरी सन्मानाने केली जात असे. कल्याणच्या सुभेदाराची सून, हे प्रकरण ऐतिहासिक वास्तव नसेल परंतु पाळल्या जाणाऱ्या उच्च नीतितत्त्वाचे निदर्शक म्हणून त्याचा उल्लेख करणे अनुचित ठरणार नाही.

८. धर्मांतरितांना पुनः धर्मात घेण्याचा पतितपरावर्तनाचा मार्ग या राजवटीने प्रत्यक्षात अवलंबिला. बजाजी निंबाळकर आणि नेताजी पालकर यांना पुनः हिंदू धर्मात घेण्यात आले. इस्लामी सत्ता आणि धर्म वाढणार नाही, याची काळजी घेताना मुसलमान साधुसंतांचा आदर केला. धर्मविषयक बाबतीत अत्यंत उदारवृत्ती हे शिवाजी महाराजांचे वैशिष्ट्य होते.

९. श्रीशिवछत्रपतींची राजवट लोकशाही पद्धतीची नव्हती हे खरे असले, तरी ती एकतंत्रीसुद्धा नव्हती. वंशपरंपरा, वतने, जहागिऱ्या यांना विरोध करून अनेकांचा

सत्तेत सहभाग आणि सत्तेचे अनेक हाती विभाजन हा हेतू होता.

१०. सांस्कृतिक योगदानाच्या दृष्टीने ही राजवट विशेष महत्त्वाची ठरली आहे. तुकाराम, रामदास यांसारखे संत या कालावधीतलेच होत. या काळात संस्कृत साहित्याच्या, वाङ्‌मयाच्या क्षेत्रात परमानंद, जयरामपिंड्ये, केशव पंडित यांसारख्या लेखकांनी मोलाची भर घातली. वेदान्त, ज्योतिषशास्त्र, धर्मशास्त्र, रामायण, महाभारत इत्यादी बहुविध विषयांवर लेखन झाले. रघुनाथ हणमंते यांचा 'राजव्यवहार कोश' या काळात लिहिला गेला.

शिवाजी राजांनी बजाजी निंबाळकर, नेताजी पालकर, बाजी प्रभू यांचा मुलगा पिलाजी प्रभू यांना शुद्ध करून पुन्हा हिंदुधर्मात घेतले. हा केवळ धार्मिक सुधारणेचा भाग नव्हता. शुद्धीकरण मोहिमेतून शिवाजी राजे काळाच्या किती पुढे होते, हे खऱ्या अर्थाने सिद्ध करणारी ही भूमिका होती. त्यांच्या सामाजिक सुधारणेचा हा आविष्कार होता.

या काळातील सांस्कृतिक, सामाजिक योगदान या काळाच्या बौद्धिक उंचीच्या आणि प्रगतीच्या निदर्शक आहेत.

**मूल्यमापन**

कृष्णाजी अनंत सभासदाच्या बखरीमध्ये ''.... येणेप्रमाणे राजे सिंहासनारूढ जाले. या युगी सर्व पृथ्वीवर म्लेंच्छ बादशहा, मऱ्हाटा पातशहा येवढा छत्रपती जाला ही गोष्ट काही सामान्य झाली नाही'' असे उद्‌गार श्रीछत्रपती शिवाजीच्या राज्याभिषेकाच्या संदर्भात काढले आहेत. स्वतंत्र, स्वयंशासित, सार्वभौम सत्तेचा अभिषिक्त राजा ही घटना असामान्य होती. असामान्य यासाठी की शिवजन्मापूर्वीचा समाज अन्याय, अत्याचार, जुलूम-जबरदस्ती ह्यांच्या वरवंट्याखाली भरडून निघाला होता. समर्थ रामदासांनी वर्णन केल्याप्रमाणे 'उदंड उदंड दुःखची साहिले' ही समाजाची स्थिती होती. तीन-चारशे वर्षांच्या प्रदीर्घ पारतंत्र्यामुळे स्वत्व, स्वाभिमान लोप पावले होते. अशा भयानक आणि भयावह परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर राजांचा राज्याभिषेक म्हणजे गांजलेल्या प्रजेला मुक्तिदाता, रक्षणकर्ता मिळाल्याची ललकारी होती. राज्याभिषेकामुळे मिळालेल्या आव्हानाचे ऐतिहासिक महत्त्व औरंगजेब बादशहाने ओळखले. अत्यंत कावेबाज, मुत्सद्दी असणाऱ्या बादशहाच्या हे लक्षात यावयास फारसा वेळ लागला नाही की, दक्षिणेत निर्माण झालेल्या सत्तेने एतद्देशीयांच्या वतीने जेत्या परकीय सत्तांसमोर आव्हान उभे केले. सर्व हिंदुस्थान यवनाक्रांत करण्याच्या आलमगीर बादशहाच्या महत्त्वाकांक्षेला शिवाजी राजांनी नेस्तनाबूद केले होते, हा या घटनेचा अर्थ होता. राज्याभिषेकाचे दूरगामी परिणाम काय झाले ? शिवाजी राजे निर्मित राज्याची महत्ता काय ? या प्रश्नांची उत्तरे मराठी मनाला नेहमीच आकर्षित करतात. स्वधर्म, स्वदेश, स्वराज्य, स्वभाषा यांसाठी निर्माण झालेले हे राज्य होते. या सर्वांच्या निर्मितीसाठी आणि संरक्षणासाठी कार्यक्षम प्रशासकीय यंत्रणा, न्यायसंस्था, उत्कृष्ट आर्थिक धोरण, हिंदुधर्मरक्षणाबरोबर सर्वच धर्मांच्या रक्षणाचा सहिष्णू व उदार विचार; ही या राज्याची बलस्थाने होती. म्हणूनच परमानंद, कृष्णाजी अनंत सभासद या समकालीन बखरकारांपासून ते थेट आत्तापर्यंतच्या इतिहासकारांनी आपल्या प्रतिभासंपन्न लेखणीने श्रीशिवछत्रपतींच्या कर्तबगारीचे बहुविध पैलू उलगडून दाखविले आहेत. समकालीन चरित्रलेखकांत शत्रुपक्षाकडील आणि स्वपक्षाकडील लेखक आहेत. लेखक शत्रुपक्षाकडील असला, तरी त्याची लेखणी शिवप्रभूंची कधी ना कधी गौरवपूर्ण नोंद घेतल्याशिवाय थांबत नाही.

शिवाजी राजांच्या जीवितकार्याचा मागोवा घेताना न्यायमूर्ती रानडे यांनी म्हटले आहे की, मराठ्यांच्या विभक्तवृत्तीला आळा घालणे, हा शिवाजीच्या अंगी मोठा गुण होता. त्याच्या जोरावर त्याने समान ध्येयाची शक्तिमत्ता समान धर्माच्या नावाने एकत्र जुळविली. तो केवळ आपल्या सामर्थ्याचे प्रतीक नव्हता तर हृदय उचंबळून सोडणाऱ्या ध्येयाच्या श्रेष्ठ आवश्यकतेचा, मराठ्यांना समान कार्याची प्रेरणा देणाऱ्या सर्वश्रेष्ठ आकांक्षेचा अवतार होता. त्याने मराठ्यांची सत्ता उत्पन्न केली नाही. देशभर विखुरलेल्या लहान-लहान केंद्रांतून ती सत्ता अगोदरच सिद्ध झालेली होती. सर्वांना सारख्याच प्रमाणात रगडू पाहणाऱ्या संकटाविरुद्ध उच्च हेतुप्रीत्यर्थ त्याने ती सत्ता एकत्र आणली,

हेच त्याच्या कर्तृत्वाचे मुख्य रहस्य......'' न्यायमूर्ती रानडे याच मुद्याच्या अनुरोधाने पुढे नमूद करतात की, आपल्या प्रत्यक्ष हुकमतीने साऱ्या हिंदुस्थानात एकछत्री साम्राज्य उभे करावे, ही शिवाजीची आकांक्षा नव्हती. तो आपल्या जनतेला स्वातंत्र्य मिळावे, एक राष्ट्र या नात्याने तिच्यात जूट नांदावी, ह्या जुटीत स्वसंरक्षणाची आणि आपले हक्क दुसऱ्यांना पाळावयास लावण्याची शक्ती असावी, या दृष्टीने जन्मभर त्याचा प्रयत्न चालला होता. बाकीच्या सत्तांचा नाश व्हावा, असा विचार त्याच्या मनात कधीच आलेला नव्हता.७

विभक्त प्रवृत्तीच्या मराठी समाजाला समान ध्येयासाठी संघटित करून उदात्त ध्येयाच्या प्राप्तीसाठीचा हा प्रयत्न होता. या प्रयत्नामागे कोणताही संकुचित विचार किंवा राज्यप्राप्तीचा किंवा राज्यस्थापनेचा उद्देश नाही. सर्वसामान्यांमधला पूर्णपणे विझून गेलेला स्वातंत्र्याचा, स्वत्वाचा निखारा पुनः एकदा पेटविण्याचे ऐतिहासिक कार्य शिवाजी राजांनी केले. पराभवाचा, फसण्याचा आणि दुय्यम स्तरावरील जीवन जगण्याचा हिंदूच्या वाटेला आलेला इतिहास श्रीशिवछत्रपतींनी पुसून टाकला. आपल्या हक्कांचा, स्वतंत्र व सार्वभौम असण्याच्या प्रगल्भ जाणिवेचा तो प्रयत्न होता. न्यायमूर्ती रानडे यांचे शिवाजी राजांच्या कार्याचे मूल्यमापन आजतागायत अबाधित राहिलेली चौकट आहे, हे आवर्जून नमूद केले पाहिजे.

रवींद्रनाथ टागोरांनी मराठ्यांच्या इतिहासाची मीमांसा करताना म्हटले आहे की, मराठ्यांनी नुसते शौर्य दाखविले नाही. त्यांनी राष्ट्र निर्माण केले एवंच आधुनिक भारतात जर कोणत्या प्रदेशाला इतिहास असेल आणि त्या इतिहासातून जर इतिहासविषयक काही तत्त्व शिकण्यासारखे असेल, तर ते मराठ्यांच्या इतिहासातूनच.८ शिवाजी राजांचे मोठेपण स्पष्ट करताना रवींद्रनाथ पुढे लिहितात, ''शिवाजी बंदिवान झाला असता व त्याला दीर्घकाळ आपल्या राज्यापासून दूर राहावे लागले असता, त्याची कीर्ती ढासळून भुईसपाट झाली नाही, याचे एकमेव कारण हेच की, साऱ्या देशाच्या धर्मबुद्धीशी त्याच्या प्रयत्नांचा संयोग होता. वास्तविक, त्याची साधना म्हणजे साऱ्या महाराष्ट्राच्या धर्मसाधनेचा एक विशेष प्रकाश आहे. त्या धर्मसाधनेच्या आव्हानानेच अलग-अलग असलेल्या मराठ्यांनी आपली विखुरलेली शक्ती एकत्र मिळविली आणि मंगलमय उद्देशाच्या साधनेसाठी कारणी लावली. लुटीच्या वाटणीसाठी, अधिकाराच्या वाटणीसाठी त्यांनी आपसात मारामारी, कापाकापी केली नाही.''९ धर्मामुळे सर्व मराठे एकत्रित आले. मराठ्यांचा एकत्रित येण्याचा उद्देश पवित्र, उदात्त होता. संपूर्ण भारतभर प्रभावी असणाऱ्या धर्मबुद्धीचे श्रीशिवाजीराजे हे प्रतिनिधी होते. या दोन्ही घटकांच्या समन्वयातून एका नव्या मांगल्यपर्वाचा प्रारंभ झाला. धर्मामुळे एकत्रित आलेले मराठे कालांतराने एकमेकांपासून दुरावले. उदात्त, समान ध्येयाची जागा स्वार्थाने घेतली. टागोरांच्या शब्दांत हाच मराठ्यांच्या उदयाचा आणि अस्ताचा इतिहास आहे. मराठ्यांच्या सत्तेच्या उदयाची आणि अस्ताची इतकी सहजसोपी आणि वस्तुनिष्ठ मीमांसा इतक्या कमी शब्दांमध्ये इतर कोणीही केली नाही.

श्रीशिवाजीराजांच्या कार्याची थोरवी वर्णन करताना रवींद्रनाथांनी मराठ्यांच्या आणि शिखांच्या इतिहासातील फरक स्पष्ट केला आहे. राजांचे प्रयत्न एका समुदायापुरते नव्हते. शिवाजी राजांचा प्रयत्न मुसलमानी शासनातून राष्ट्र आणि धर्म स्वतंत्र करण्याचा होता. हा उद्देश अत्यंत व्यापक होता. भारतीय इतिहास नव्याने निर्माण करणारी, घडवणारी ही भूमिका होती. शिवाजी महाराजांनी केलेली युद्धे दूरवरच्या काळाकडे लक्ष ठेवून केलेली होती. यामागे विशिष्ट पद्धत आणि शृंखला होती. रागाने केलेली ती झोंबाझोंबी किंवा कोणत्यातरी संप्रदायाचा संताप नव्हता. थोर ध्येयसाधनेचे ते प्रयत्न होते.१०

श्रीशिवछत्रपतींच्या कार्यांची व्यापकता आणि मौलिकता रवींद्रनाथांनी अधोरेखित केली आहे. या ऐतिहासिक कार्याचे विश्लेषण करताना तत्कालीन समाजस्थितीविषयी टागोरांचे निरीक्षण अधिक मर्मग्राही आणि भेदक त्याचप्रमाणे श्रीशिवछत्रपतींच्या मर्यादा स्पष्ट करणारे आहे. रवींद्रनाथ लिहितात, ''भारतातील समाज छिद्रांनी भरलेला आहे. कोणताही भाव त्यात घर धरू शकत नाही. म्हणूनच आमच्या समाजात भावपूर्ण जिवंतपणा असण्याऐवजी, निर्जीव आचारांचा इतका सुळसुळाट आहे...... मोगल आक्रमणाविरुद्ध ज्या हिंदू समाजाला विजयी करण्याचा

शिवाजीने प्रयत्न केला, त्या समाजाच्या मुळातच आचार–विचारांचे विभाग व भेदाभेद आहेत. त्यासह हिंदू समाजाला साऱ्या भारतात विजय मिळवून देण्याचा त्याचा प्रयत्न होता. यालाच वाळूचा बांध घालणे म्हणतात, हेच असाध्य साधन.''[११]

शिवाजी राजांच्या कार्याचे मूल्यमापन करताना जदुनाथ सरकार या बंगाली इतिहासकाराचे हृदय उचंबळून आल्याशिवाय राहत नाही. जदुनाथ सरकार 'Shivaji & His Times' आपल्या या ग्रंथात म्हणतात –

''I regard him as the last great constructive genius and nation builder that the Hindu race has produced....... His army was drilled and commanded by his own people, what he built lasted long, his institutions were looked up to with admiration and emulation even a century later in the palmy days of the Peshwas rule........ He has proved by his example that the Hindu race can build a nation, found a state, defeat enemies, they can conduct their own defence, they can protect and promote literture and art, commerce and industry, they can maintain navies and ocean trading fleets of their own and conduct naval battles on equal terms with foreigners. He taught the modern Hindus to rise to the full stature of their growth'[15]

श्रीशिवछत्रपतींनी जगाला हे दाखवून दिले की, हिंदुधर्माचा वृक्ष वठला नाही. पारतंत्र्याच्या अनेक शतकांच्या कालावधीनंतरसुद्धा पुनः एकदा नव्या फांद्यांनी आणि पानाफुलांनी बहरला आहे. शिवाजी राजे यांचे हे ऐतिहासिक कार्य नमूद करताना जदुनाथांच्या प्रतिभेलासुद्धा नवे धुमारे फुटले आहेत. याचीही आवर्जून नोंद घेणे क्रमप्राप्त आहे.

त्र्यंबक शंकर शेजवलकरांनी आपली सर्व प्रज्ञा, प्रतिभा शिवचरित्राचे पैलू उलगडून दाखविण्यासाठी उपयोगात आणली. त्यांनी हाती घेतलेले शिवचरित्रलेखनाचे काम दुर्दैवाने पूर्ण झाले नाही. शिवाजी महाराजांच्या कार्याचे स्वरूप आणि महत्त्व त्यांचे निवडक लेखसंग्रह तथा श्रीशिवछत्रपती – प्रस्तावना, आराखडा व साधने या ग्रंथातून त्यांनी मांडले आहे. त्यांनी प्रतिपादीत केलेले सिद्धान्त निम्ननिर्दिष्टप्रमाणे सांगता येतील–

१. मराठ्यांच्या स्वभावाची दोन वैशिष्ट्ये – त्यांची स्वतंत्र वृत्ती व भूमीची आसक्ती. व्यवहारात याचा अर्थ शिस्तबद्धतेचा अभाव व खून पाडूनही वतन टिकविण्याची शिकस्त असा होतो. शिवाजी राजांनी याला योग्य वळण देऊन त्याचा राज्यस्थापनेसाठी उपयोग करून घेतला.

२. शिवाजी राजे पिंडानेच श्रद्धाळू, धर्मनिष्ठ, गूढवाद मानणारे ईश्वरसाक्षात्कार अनुभवू इच्छिणारे होते. बुद्धिवाद्याच्या मनोरचनेशी त्यांच्या मनोरचनेची तुलना करण्यात अर्थ नाही. राजे श्रद्धाळू हे निर्विवाद पण ते शहाणे व विवेकी होते, हे अधिक सत्य.

३. त्या काळात मारणे किंवा रक्त सांडणे याची भीती वाटत नव्हती. शिवाजी राजे याच लोकांत वाढले, वावरले व यातूनच त्यांना राष्ट्रीय संघटना निर्माण करावयाची होती. इष्टकार्यासाठी आपल्या हेतूच्या आड येणाऱ्या माणसांना पडेल त्या मार्गाने त्यांनी दूर केले, तसे करणे भाग होते. चंद्रराव मोरे, अफझलखान, शाहिस्तेखान बाजी घोरपडे, पोर्तुगीज, वाडीकर सावंत वगैरेंशी वागताना योजिलेले उपाय तत्कालीन जनरीतीच्या व राजकारणाच्या ताजव्याने तोलले पाहिजेत.

४. आरमार हे नवे राज्यांग शिवाजी राजांच्या मनात प्रथमदर्शनी भरले व त्याची जोपासना त्यांनी केली. ही परंपरा पुढे चालली नाही.

५. शिवाजी राजांच्या अंगी मुसलमानी संस्कृती बिंबली होती, फक्त मन हिंदू होते. व्यवहारात मुसलमानी राज्यपद्धतीचा अवलंब केला. कारण त्याशिवाय त्या काळी दुसरा मार्ग नव्हता.

६. तर्कशुद्ध पद्धतीने विचार केल्यावर राज्यस्थापनेचे मुख्य श्रेय राजांच्या स्फूर्तीला, कल्पनेला व पराक्रमाला देणे

योग्य आहे. नवनिर्मितीसाठी जुने मोडून, फोडून काढणे भाग असते. यानंतरच सुव्यवस्था निर्माण होते. इष्ट, चिरस्थायी घटना संस्थापित करणे, जे इतिहासातून कधी पुसले जात नाही; हेच राजांचे जीवितकार्य होय.

७. काही कारणांमुळे राज्य मोडले, तरी ते पुनः उभारू शकतील अशी माणसे शिवाजी राजांनी तयार केली होती. ही सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हटली पाहिजे. अस्मितेची, मराठी राज्याच्या अभिमानाचा रुजवून काढलेला माणसांचा ताटवा, ही शिवाजी राजांची अद्वितीय, चिरस्मरणीय कामगिरी होय.

८. तत्कालीन समाजस्थितीत चाणाक्ष माणसाला जे-जे सुचले असते, ते-ते शिवाजी राजांना सुचले. परंतु त्याची मर्यादा प्रचलित चौकट हीच राहिली. जुने पूर्णपणे मोडून नवी सृष्टी निर्माण करण्याचा आवाका त्यात नव्हता, आणि तसे करणे शहाणपणाचेसुद्धा नव्हते. सर्व महापुरुषांना देश, काळ व वर्तमान ह्यांच्या मर्यादा असतात हेच इतिहासाचे सार आहे.

९. या देशातील हिंदू-मुसलमान लढ्याचा योग्य अन्वयार्थ समजलेले शिवाजी महाराज हे पहिले कर्तापुरुष. मुसलमानांची सर्व उत्तम अंगे राजांनी जाणून घेतली व आत्मसात केली. परंतु स्वतःच्या हिंदुत्वाचा अभिमान मात्र महाराजांनी कायम ठेवला. औरंगजेबाच्या कडव्या धोरणामुळे शिवछत्रपतीच्या चरित्राला नवीन कलाटणी मिळाली. राजे त्यामुळे अधिक धर्माभिमानी होऊन एका नव्या मार्गाची योजना त्यांनी आखली.

१०. शिवाजी राजे हे जन्मतः मध्ययुगातील हिंदू वीर होते. त्यांची मनोवृत्ती काळानुरूप होती. आणि म्हणूनच राजांच्या कार्याचे मूल्यमापन त्या काळाच्या संदर्भात झाले पाहिजे.

शेजवलकरांच्या प्रतिपादनाप्रमाणे ''या मुमूर्षू समाजाला शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न वेगवेगळ्या व्यक्तींनी मधून-मधून केलेला आढळतो. यांपैकी काही संतमहंत होते. कोणी धर्माचार्य व कोणी हिंदुवीर होते. पण त्यात शिवाजी हा एकच पुरुष असा झाला की, त्याने सर्व मुसलमान राज्यकर्त्यांच्या, धर्माभिमान्यांच्या व धर्मवीरांच्या संघटनेला, बळाला व युक्तीला न जुमानता एक स्वतंत्र हिंदुराज्य, औरंगजेबासारखा सर्व दृष्टींनी कार्यक्षम व प्रबळ बादशहा अधिकारावर असताना, स्थापिले आणि त्याचा जोर एवढा मोठा ठरला की, त्या राज्याच्या वारसदारांनी हिंदूंची लाट पुनः एकदा सिंधुपार नेऊन पोहचविली. एवढ्या प्रबळ संघटनेचे बीजारोपण करणारा जो एकमेव वीर, त्याचे चरित्र जाणून घेणे एतद्देशीयांना बोधप्रद व हितकारक ठरेल, असे समजून प्रस्तुत प्रयत्न आरंभिला आहे.''

प्रज्ञावंत शेजवलकरांनी शिवमय होऊन बांधलेली ही पूजा आहे. आपली सर्व बुद्धिमत्ता आणि प्रतिभा शिवचरित्रलेखनासाठी त्यांनी पणाला लावली. मराठी मनासाठी आत्यंतिक आदराचा असणारा हा विषय आहे. राजांच्या कर्तबगारीची गाथा जसजशी समजून घ्यावी, तसतशी मनातील असणारी आदरभावना वाढत जाते; हे शिवचरित्राचे गेल्या चारशे वर्षांपासूनचे वैशिष्ट्य आहे आणि हे कायम राहणार आहे, हा इतिहासाचा इत्यर्थ आहे.

**संदर्भ :**


१. कुलकर्णी अ. रा.
अशी होती शिवशाही पृष्ठ ३४, राजहंस प्रकाशन.
२. कित्ता पृष्ठ ४७,४८.
३. कुलकर्णी अ. रा. आणि खरे ग. ह.
मराठ्यांचा इतिहास खंड १, पृष्ठ २८८, कॉंटिनेण्टल प्रकाशन.
४. कित्ता, पृष्ठ २८९.
५. कुलकर्णी अ. रा. - उपरोक्त, पृष्ठ ५३.
६. कुलकर्णी अ. रा. - उपरोक्त, पृष्ठ ६५.
७. न्या. म. गो. रानडे
पृष्ठ १९ व ६२, मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष, अनुवाद फाटक न.र., साहित्य संस्कृती मंडळ, महाराष्ट्र राज्य (१९६४).
८. टागोर रवींद्रनाथ
पृष्ठ ४१, इतिहास, प्रेस्टिज प्रकाशन
९. टागोर रवींद्रनाथ - उपरोक्त, पृष्ठ ४३.
१०. टागोर रवींद्रनाथ - उपरोक्त, पृष्ठ ४९.
११. टागोर रवींद्रनाथ - उपरोक्त, पृष्ठ ५१.
१२. Sarkar Jadunath, Shivaji and his times, पृष्ठ ३८९, Ibid
१३. शेजवलकर त्र्यं. शं.
श्रीशिवछत्रपती, पृष्ठ ३, मराठा मंदिर प्रकाशन १९६४.


* * *





छत्रपती संभाजी महाराज.

# छत्रपती संभाजी ते छत्रपती शाहू

■ डॉ. श्रीनिवास सातभाई

**छत्रपती शिवाजी महाराजांच्या निधनाने मराठी स्वराज्याला मोठा हादरा बसला. छत्रपती शिवाजी महाराजांसारख्या व्यक्तिमत्त्वाच्या व त्यांनी केलेल्या असामान्य कामगिरीच्या पार्श्वभूमीवर इ. स. १६८० मध्ये त्यांचा ज्येष्ठ पुत्र संभाजी यांच्याकडे मराठी स्वराज्याची सूत्रे आली. अर्थातच संभाजीने आपले प्राण पणाला लावून स्वराज्याचे रक्षण करून शिवरायांचे कार्य पुढे चालू ठेवले.**

सतराव्या शतकात मराठी राज्याची स्थापना झाली, अठराव्या शतकात हे राज्य कळसास पोहोचले आणि एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभी हे राज्य संपुष्टात आले. अठराव्या शतकात भारतात प्रमुख सत्ता होती ती मराठ्यांची, आणि म्हणूनच भारताचा त्या शतकाचा इतिहास म्हणजे प्रामुख्याने मराठ्यांचाच इतिहास होय, असे समीकरण मांडावे लागेल. भारताच्या इतिहासात महाराष्ट्रीय लोकांची ही सर्वोच्च कामगिरी म्हणून तिचा उल्लेख करता येईल.

छत्रपती शिवाजी महाराजांनी महाराष्ट्राच्या भूमीत स्वराज्याचे बीजारोपण केले. त्यांच्या या कार्यास महाराष्ट्रीय संतांच्या कार्याची पार्श्वभूमी होती. मराठी समाजास एकसंध ठेवण्याची महत्त्वपूर्ण भूमिका संतांनी पार पाडली व शिवाजी महाराजांच्या रूपाने मराठी समाजास अलौकिक असा पुरुष, नेता म्हणून मिळाला; म्हणूनच भविष्यकाळात

मराठी सत्तेचा उदय घडून आला. छत्रपती शिवाजी महाराजांचे सर्वांत मोठे योगदान म्हणजे त्यांनी मराठी माणसाच्या मनात राष्ट्रनिर्मितीची ज्योत जागविली, व त्याद्वारे स्वराज्याची स्थापना केली. स्वधर्म, स्वराष्ट्र व स्वसंस्कृती यांच्या रक्षणार्थ आपली लढाई आपणच लढायची असते; याची शिकवण शिवाजी महाराजांनीच मराठी जनतेला दिली. मराठी माणसात त्यांनी स्वराज्यनिर्मितीची जिद्द निर्माण केली. त्यामुळेच पुढे मराठ्यांच्या स्वातंत्र्ययुद्धात महाराष्ट्रातील प्रत्येक घर हे औरंजेबाविरुद्ध एक बालेकिल्ला बनले होते. मोगलांविरुद्धचा हा स्वातंत्र्यलढा म्हणजे शिवाजी महाराजांनी केलेल्या स्वराज्याच्या बीजारोपणास आलेले फळ होते.

दि. ४एप्रिल १६८०रोजी (चैत्र शुद्ध १५, शके १६०२, रविवार) छत्रपती शिवाजी महाराजांचे निधन झाले. महाराजांच्या निधनाने स्वराज्यनिर्मितीचे कार्य पूर्णत्वास जाऊ शकले नाही. हिंदवी स्वराज्याची निर्मिती हा त्यांचा ध्यास होता. राज्याभिषेक, अष्टप्रधान मंडळाची निर्मिती, आरमार इत्यादी बाबींकडे जाणीवपूर्वक लक्ष देऊन छत्रपती शिवाजी महाराजांनी आपले स्वतःचे वेगळे दूरदर्शीपण दाखवून दिले होते. शिवराज्याभिषेकामुळे तर मराठ्यांचा इतिहासच नव्हे, तर त्यांची संस्कृतीही बदलली. राज्याभिषेकाने महाराजांच्या राज्यनिर्मितीच्या कार्यावर कळस चढविला गेला. छत्रपती शिवाजी महाराज हे दक्षिणेतील फक्त मराठ्यांचे राजे नव्हते, तर सर्व हिंदूंचे पहिले अनभिषिक्त राजे होते. विजयनगरचे साम्राज्य नष्ट झाल्यानंतर सर्वत्र यावनी सत्तेचा वरवंटा फिरत असता, महाराजांनी मोठ्या जिद्दीने यावनी सत्तांना नमवून हिंदू राजपद निर्माण केले, या गोष्टीस विशेष महत्त्व आहे. छत्रपती शिवाजी महाराजांनी निर्माण केलेले हिंदवी स्वराज्य हे म्हणजे शून्यातून साकारलेली 'निर्मिती' होती.

हिंदवी स्वराज्य निर्माता, दूरदर्शी राजा, लोकांचा राजा, उत्कृष्ट सेनापती, प्रशासक, मुत्सद्दी प्रजाहितदक्ष राजा यांसारखी अनेक बिरुदे महाराजांना लावली तरी ती कमीच पडतील असे महाराजांचे असामान्य व उत्तुंग व्यक्तिमत्त्व होते. छत्रपती शिवाजी महाराजांच्या निधनाने मराठी स्वराज्याला मोठा हादरा बसला. छत्रपती शिवाजी महाराजांसारख्या व्यक्तिमत्त्वाच्या व त्यांनी केलेल्या असामान्य कामगिरीच्या पार्श्वभूमीवर इ.स. १६८० मध्ये त्यांचा ज्येष्ठ पुत्र संभाजी यांच्याकडे मराठी स्वराज्याची सूत्रे आली. अर्थातच संभाजीने आपले प्राण पणाला लावून स्वराज्याचे रक्षण करून शिवरायांचे कार्य पुढे चालू ठेवले.

## छत्रपती संभाजी (इ.स.१६८० ते १६८९)

आदिलशाही, निजामशाही, मोगल या सत्तांशी संघर्ष करून छत्रपती शिवाजी महाराजांनी स्वराज्याची निर्मिती केली होती व या स्वराज्याचे रक्षण करण्याची जबाबदारी संभाजीकडे आली होती. इ.स. १६८० मध्ये छत्रपती शिवाजी महाराजांचा मृत्यू होताच, ही संधी साधून खुद्द मोगल सम्राट औरंगजेब आपल्या सर्व शक्तीनिशी दक्षिणेत संभाजीविरुद्ध उतरला होता. संभाजीच्या उदयाच्या वेळची ही पार्श्वभूमी व संभाजीने स्वराज्य रक्षणासाठी केलेला कडवा व यशस्वी प्रतिकार या दृष्टीने आपण संभाजीच्या कार्याकडे पाहिले पाहिजे, तरच संभाजीच्या कर्तृत्वाचे खरे मोल लक्षात येईल.

छत्रपती शिवाजी महाराजांना संभाजी (सईबाईंचा पुत्र) व राजाराम (सोयराबाईंचा पुत्र) हे दोन पुत्र होते. संभाजी दोन वर्षांचा वयाचा असताना सईबाईंचा मृत्यू झाला. वयाच्या आठव्या वर्षी संभाजीने आग्रा भेटीचा अनुभव घेतला व पंचहजारी मनसबदारही झाला. बालवयात आग्र्याहून परतीचा बिकट प्रवास केला, तर वयाच्या १७व्या वर्षी शिवराज्याभिषेकाच्या वेळी संभाजीस 'युवराज'पदाचा मान मिळाला. या सर्व बाबी बालसंभाजीचे अनुभवविश्व समृद्ध करणाऱ्या ठरल्या. त्यातूनच एक नेता, शासक म्हणून संभाजीचे व्यक्तिमत्त्व घडत गेले.

इ.स. १६७८ मध्ये म्हणजे छत्रपती शिवाजी महाराजांच्या अखेरच्या काळात, मोगल सत्तेने दिलेरखानामार्फत संभाजीस आपल्या कक्षेत ओढण्याचा प्रयत्न केला. परंतु मोगल सत्तेचे अंतरंग लक्षात येताच त्या मोहजालातून संभाजी लवकर बाहेर पडला व अवघ्या वर्षभराच्या आत स्वराज्यात परतला. युवराज संभाजीचे हे मोगलांना जाऊन मिळणे हा शिवरायांच्या दृष्टीने धक्कादायक

प्रसंग असला, तरी संभाजीचे स्वराज्यात परत येणे ही कृती योग्य होती, हे लक्षात घेतले पाहिजे.

प्रारंभिक गृहकलहानंतर जानेवारी १६८१ मध्ये संभाजीस मराठी राज्याचा छत्रपती म्हणून राज्याभिषेक झाला. यानंतर मात्र संभाजीने मागे वळून पाहिले नाही. छत्रपती संभाजीराजांना मिळालेला अवधी अल्प म्हणजे ८-९ वर्षांचा असला, तरी त्यांच्या असामान्य कर्तृत्वाने व मुख्य म्हणजे स्वराज्य व स्वधर्म यांसाठी दिलेल्या बलिदानाने महाराष्ट्राच्या समाजमनावर त्यांची अमिट अशी छाप उमटलेली आहे.

मोगल सम्राट औरंगजेब याचा पुत्र अकबर पित्याविरुद्ध बंड करून छत्रपती संभाजीच्या आश्रयास आला होता (१६८१). पण अकबरापाठोपाठ संभाजी राजांवर व मराठी स्वराज्यावर संकटांची मालिकाच सुरू झाली. छत्रपती संभाजीच्या काळात स्वराज्यावर आलेले सर्वांत मोठे संकट म्हणजे औरंगजेबाचे आक्रमण होय. शिवाजी महाराजांनी निर्माण केलेल्या स्वराज्य रक्षणासाठीच्या 'मराठ्यांच्या स्वातंत्र्य युद्धा'ला येथूनच आरंभ झाला.

छत्रपती शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर त्यांचे राज्य आपण सहजपणे जिंकून घेऊ, अशी औरंगजेबाची धारणा होती. त्यासाठी आपला पुत्र व प्रमुख सरदार यांच्यासह स्वतः औरंगजेबाने छत्रपती संभाजीला व स्वराज्याला वेढण्यास सुरुवात केली. मोगलांच्या प्रचंड सैन्यास संभाजी महाराजांनी अत्यंत कडवा प्रतिकार केला. यात १६८२ ला रामसेजला मराठ्यांनी मोगलांचा केलेला पराभव, १६८३ मध्ये शाहजादा आजमशहाला हंबीरराव मोहित्यांनी माघार घेण्यास भाग पाडणे, दक्षिण कोकण मोहिमेत मोगल सैन्याच्या हालअपेष्टा व त्यामुळे औरंगजेबपुत्र मुअज्जमला घ्यावी लागलेली माघार अशी काही प्रमुख उदाहरणे देता येतील. एकाच वेळी सर्व बाजूंनी आक्रमण करून स्वराज्य ताब्यात घेण्याचे मोगलांचे प्रयत्न संभाजी राजांच्या प्रखर विरोधामुळे १६८१ ते १८८४ या काळात यशस्वी होऊ शकले नाहीत. परिणामी औरंगजेबानेही आपला मोर्चा संभाजीऐवजी दक्षिणेतील शाह्यांकडे वळविला.

इ.स. १६८६ मध्ये आदिलशाही व १६८७ मध्ये कुतुबशाही गिळंकृत करून औरंगजेबाने आपले लक्ष मराठ्यांकडे केंद्रित केले. सर्व प्रमुख मोगल सरदारांना आक्रमणासाठी मराठी मुलखात पाठविले. एकाच वेळी चोहो बाजूंनी झालेल्या आक्रमणांचा कडवा विरोध १६८९ मध्ये संभाजी राजांना कैद होईपर्यंत मराठी फौजेने केला. प्रचंड अशा मोगल फौजेस संभाजी राजांनी गनिमी काव्याने जेरीस आणले होते; हे वास्तव आहे.

पराक्रम व धाडस यांच्या जोरावर संभाजी राजांनी एकाच वेळी मोगल, पोर्तुगीज, इंग्रज, सिद्दी व स्वकीय यांच्या विरोधात लढा दिला. पोर्तुगिजांविरुद्ध फोंडा येथील लढाईत छत्रपती संभाजीने दाखविलेले शौर्य व मुत्सद्देगिरी यांमुळेच पोर्तुगीज सेनानी 'विरजई कोंदि द आल्व्होर' यास माघार घ्यावी लागली. एवढेच नव्हे तर गोव्याच्या उत्तरेस दमण-वसईकडे मराठ्यांनी पोर्तुगिजांचा बराच मुलूख जिंकून घेतला, जुवे बेटातील पोर्तुगिजांचा किल्लाही संभाजी राजांनी जिंकला होता. संभाजीच्या आरमाराने गोव्यात प्रवेश करू नये यासाठी पोर्तुगिजांनी आपले आरमार मांडवी नदीच्या मुखाशी आणले होते. ११ डिसेंबर १६८३ च्या संभाजीच्या आक्रमणाने गोव्यात साष्ट व बारदेशपर्यंत मुसंडी मारली होती. 'पोर्तुगिजांचे नाव आणि ख्रिस्ती लोक आपण गोव्यात ठेवणार नाही, असे शत्रू उघडपणे म्हणतो,' असे १३ डिसेंबर १६८३ च्या जाहीरनाम्यात विरजई याने संभाजीबद्दल लिहिले आहे. यावरून पोर्तुगिजांनी संभाजीच्या आक्रमणाचा धसका कसा घेतला होता, हे लक्षात येते. परंतु स्वराज्यावरील मोगल आक्रमणामुळे संभाजीला स्वराज्यात परतावे लागले.

मोगल सरदार शेख निजाम रायगडाकडे जाणाऱ्या संभाजीच्या मागावर असताना, वाटेत संगमेश्वर येथे संभाजीचा मुक्काम आहे, ही माहिती मिळताच दि. १ फेब्रुवारी १६८९ रोजी छत्रपती संभाजी व त्यांचा सहकारी कवी कलश यांना शेख निजामाने संगमेश्वर येथे कैद केले. अशा रितीने आप्त स्वकीयांच्या फंदफितुरीमुळे मराठी स्वराज्याचा छत्रपती शत्रूच्या तावडीत सापडला. ११ मार्च १६८९ रोजी औरंगजेबाच्या छावणीत कोरेगाव (वढू) येथे संभाजी राजांचा वध अतिशय क्रूरपणे करण्यात आला.

छत्रपती संभाजीच्या वधाने मराठ्यांच्या इतिहासातील एका पर्वाचा अस्त झाला होता. बादशहाने अनेक आमिषे

समोर ठेवली असतानाही संभाजी राजांनी स्वराज्य रक्षणासाठी बलिदान स्वीकारले. पराक्रम व धाडस हे छत्रपती संभाजीचे अंगभूत गुण होते. खुद्द मोगल सम्राटाविरुद्ध बंड केलेल्या अकबरास आश्रय देण्याचे धाडस छत्रपती संभाजीच दाखवू शकतात. संभाजी राजांची अल्प कारकिर्द पाहता, आलेल्या संकटांमुळे त्यांना स्थैर्य व उसंतच मिळाली नाही; तरी त्यांनी कुठेही शरणागती स्वीकारली नाही.

छत्रपती संभाजीचे सर्वांत मोठे योगदान म्हणजे त्यांनी स्वराज्याच्या रक्षणासाठी केलेले अविश्रांत प्रयत्न हे होय. अपुरी साधनसामग्री व शत्रूच्या तुलनेत कमी लष्करी ताकद असतानाही त्यांनी स्वराज्यरक्षण व स्वधर्म रक्षण यांना प्राधान्य देणे हे आपले ध्येय मानले. इ. स. १६८२ मध्ये रामसिंगाला लिहिलेल्या पत्रातून संभाजी राजांचा दृष्टिकोन दिसून येतो. या पत्रात ते लिहितात, ''त्या यवनाधमाला (औरंगजेबाला) सांप्रत असे वाटू लागले आहे की, आम्ही हिंदू म्हणजे तत्त्वशून्य झालो आहोत. आम्हांला धर्माचा काही अभिमान राहिला नाही. बादशहाची वागणूक यापुढे आम्हांला सहन होणे शक्य नाही. आम्ही क्षत्रिय आहोत. आमच्या क्षात्र धर्माला कमीपणा आणणारी कोणतीही गोष्ट आम्ही मान्य करणार नाही. वेद, श्रुतिस्मृती इत्यादींत धर्म आणि जाती यांसंबंधीची कर्तव्ये नेमून दिली आहेत. त्यांची पायमल्ली झालेली आम्हांला सहन होणार नाही. राजे म्हणून आमचा प्रजापालनाचा जो धर्म, तो आम्ही टाळू शकत नाही. या दुष्ट यावनाशी युद्ध करण्यात आम्ही आमची संपत्ती, आमचा देश, आमचे दुर्ग, सारांश सर्व काही पणास लावण्यास तयार आहोत.'' (संदर्भ- डॉ. जयसिंग पवार, मराठी सत्तेचा उदय, पृ.२९९)

उपरोक्त पत्रात लिहिल्याप्रमाणे प्रत्यक्ष आयुष्यातही त्यांनी तसेच करून दाखविले. संभाजी फक्त 'उग्रप्रकृती' नव्हता, तर स्वराज्य संरक्षकही होता; हे लक्षात घेतले पाहिजे. संभाजी राजांच्या कर्तबगारीचे मूल्यमापन करताना त्यांची तुलना इतिहासकार छत्रपती शिवाजी महाराजांच्या कार्याशी करतात व त्या-तुलनेत संभाजीचे कर्तृत्व कमी लेखले जाते. परंतु अशी तुलना न करता प्राप्त परिस्थितीत, प्रतिकूल परिस्थितीवर त्या व्यक्तीने यशस्वी मात कशी केली, हे पाहिले पाहिजे.

छत्रपती संभाजीच्या बलिदानाने मराठ्यांनी खऱ्या अर्थाने स्वराज्यरक्षणाची प्रेरणा घेतली व पुढे झालेल्या स्वातंत्र्य युद्धात प्राणपणाने लढा दिला व छत्रपतीच्या नेतृत्वाशिवायही यशस्वी प्रतिकार केला. त्यामुळे छत्रपती संभाजीचे बलिदान वाया गेले नाही. संभाजीचा वध करून आपण मराठ्यांचे राज्य सहज घेऊ, ही औरंगजेबाची कल्पना प्रत्यक्षात कधीच येऊ शकली नाही.

### छत्रपती राजाराम (इ. स. १६८९ ते १७००)

छत्रपती संभाजीच्या वधानंतर राजाराम हा मराठ्यांचा, स्वराज्याचा छत्रपती बनला. या वेळी म्हणजे इ. स. १६८९ मध्ये राजारामाचे वय होते फक्त एकोणीस वर्षे. छत्रपती संभाजीस कैद होताच रायगडावर असलेल्या संभाजीपत्नी राणी येसूबाईंनी राजारामास छत्रपती म्हणून घोषित केले. याच वेळी मराठ्यांची राजधानी रायगड व संभाजीचे कुटुंब यांना ताब्यात घेण्यासाठी औरंगजेबाने मोगल सरदार झुल्फीकार खान यास पाठविले होते.

छत्रपती संभाजीनंतर छत्रपती राजाराम शत्रूच्या हाती पडू नये म्हणून राणी येसूबाईंनी छत्रपती राजारामास आपल्या सहकार्यांसह रायगड सोडण्याचा सल्ला दिला. व स्वतः राणी येसूबाई व बाल शाहू हे मोगलांचे कैदी बनले. प्रारंभिक प्रतिकारानंतर छत्रपती राजारामाने कर्नाटकातील जिंजी किल्ल्याचा आश्रय घेतला. तरीही मोगल सरदार मागावर होताच. इ. स. १६९०-९२ च्या दरम्यान मराठे-मोगल असा प्रचंड संघर्ष झाला. या काळात मराठी सेनेचे खऱ्या अर्थाने नेतृत्व केले, ते म्हणजे मराठ्यांचे सेनापती संताजी घोरपडे, धनाजी जाधव व रामचंद्रपंत अमात्य यांनी. मराठ्यांच्या कडव्या व चिवट प्रतिकारामुळे आसदखान, झुल्फिकार खान व कामबक्ष यांसारखे मोठे मोगल सेनापतीही हतबल ठरले; मराठ्यांच्या वाढत्या हल्ल्यांनी मोगल सैन्य बेजार झाले होते. तरीही मोगलांनी जिंजीचा वेढा नेटाने चालविला व २ जानेवारी १६९८ ला जिंजीचा किल्ला झुल्फिकार खानाने जिंकला. परंतु तत्पूर्वीच छत्रपती राजारामाने वेलोरच्या

किल्ल्यात आश्रय घेतला होता व लवकरच तो महाराष्ट्रात पोहोचला.

मोगलांविरुद्धच्या या स्वातंत्र्ययुद्धात महाराष्ट्रातील प्रत्येक घर म्हणजे मराठ्यांचा एक बालेकिल्ला बनला होता. त्यामुळे मराठ्यांशी लढताना मोगलांना अखेरपर्यंत यश आले नाही. हेच छत्रपती राजारामांच्या कारकिर्दीचे वैशिष्ट्य सांगावे लागेल.

इ. स. १६९८ ते १७०० ह्या कालखंडात महाराष्ट्रात राहून छत्रपती राजारामांनी शत्रूविरुद्ध लढ्याचे नेतृत्व केले. इ. स. १६९९ मध्ये प्रकृती अस्वास्थ्यामुळे खानदेश-वऱ्हाडची मोहीम अर्धवट सोडून छत्रपती राजाराम यांना परतावे लागले व २ मार्च १७०० रोजी सिंहगडावर वयाच्या ३० व्या वर्षी त्यांचा मृत्यू झाला. छत्रपती संभाजीच्या वधानंतर निर्माण झालेल्या बिकट परिस्थितीत, किल्ले व प्रदेश फारसे ताब्यात नसताना, खजिना रिता असताना छत्रपती राजारामांनी बलाढ्य अशा औरंगजेबाशी लढा दिला, हेच विशेष होय. या लढ्याच्या काळात छत्रपती राजारामाला आपद्धर्म म्हणून वतनदारी पद्धती सुरू करावी लागली. ''जो मराठा वीर मोगलांच्या प्रदेशावर हल्ले करून तो जिंकेल, त्याला जिंकलेला मुलूख वतनी हक्काने देण्यात येईल.'' असे राजारामाने जाहीर केले.

वतनदारी पद्धत सुरू करण्याचे दोन परिणाम झाले. एक म्हणजे वतनाच्या लोभाने का होईना, मराठा सरदारांनी मोगली मुलखावर ठिकठिकाणच्या गटागटांनी गनिमी हल्ले करून बादशाही सैन्यास पराभूत केले. पण या धोरणाचा दुष्परिणाम असा झाला की, शिवपूर्व कालापासून रक्तात वतनलोभ भिनलेल्या मराठी सरदारांना, वतनांची खैरात करण्याच्या राजारामाच्या धोरणामुळे त्या वतनांची भयंकर चटक लागली. त्यामुळे स्वराज्याची थोडी जरी सेवा केली, तरी त्याबद्दल वतन मिळणे हा आपला जन्मसिद्ध हक्क आहे, असे त्यांना वाटू लागले. परिणामी, 'वतन हे स्वराज्यसेवेचे साधन आहे' हे शिव छत्रपतींचे सूत्र बरोबर उलटे होऊन 'स्वराज्यसेवा हे वतनप्राप्तीचे साधन आहे' असा मूलभूत बदल इ. स. १७०७ पर्यंत मराठ्यांच्या मनोवृत्तीत घडून आला. हा बदल महत्त्वाचा होता, कारण त्यानेच मराठ्यांच्या भावी राज्यविस्ताराची प्रेरणा व स्वरूप ह्यांची निश्चिती झाली. यापुढे स्वराज्यसेवेच्या प्रेरणेने मराठ्यांनी एकत्र येऊन मराठी राज्याचा विस्तार केला. पण त्यामागील ध्येय एकछत्री सुराज्य स्थापणे हे न राहता व्यक्तिगत वतनांची व सरंजामांची प्राप्ती होणे हे झाले, हे दुर्दैव होय. इ. स. १७०० मध्ये सिंहगडावर छत्रपती राजारामांचे निधन झाल्यावर स्वातंत्र्यलढ्याची सूत्रे राणी ताराबाईंकडे आली.

**महाराणी ताराबाई (इ. स. १७०० ते १७०७)**

छत्रपती संभाजी, राजाराम यांच्यानंतर मराठ्यांच्या स्वातंत्र्ययुद्धास लोकयुद्धाचे स्वरूप प्राप्त झाले. छत्रपती शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर सुरू झालेल्या या लोकयुद्धाला २० वर्षे झाली होती, तरीही औरंगजेबाविरुद्धचा मराठ्यांचा प्रतिकार सुरूच होता. इ. स. १७०० ते १७०७ या सात वर्षांच्या काळात या लढ्याचे नेतृत्व महाराणी ताराबाई यांनी केले. कुठलाही पूर्वानुभव नसताना, पतीचे निधन झाले असताना एका स्त्रीने औरंगजेबासारख्या शत्रूविरुद्ध दिलेला लढा व मराठी सेनेचे केलेले नेतृत्व, हेच या कालखंडाचे वैशिष्ट्य होय.

महाराणी ताराबाईंच्या काळातील मराठे-मोगल संघर्ष हे स्वातंत्र्ययुद्धाचे अखेरचे पर्व होते. छत्रपती राजारामाच्या मृत्यूनंतर तरी मराठ्यांचे राज्य सहज घेऊ, ही औरंगजेबाची कल्पना फोल ठरली व त्याला राणी ताराबाईंच्या विरोधाला सतत सात वर्षे तोंड द्यावे लागले. परळी, पन्हाळा, विशाळगड, वाकिनखेडा इत्यादी ठिकाणच्या संघर्षांत किल्ले जिंकताजिंकता मोगल सैन्य जेरीस आले होते. स्वराज्यातील किल्ल्यांसंबंधी ताराबाईंचे धोरण असे होते की, बादशहाने ऑक्टोबर-नोव्हेंबरमध्ये किल्ल्यास वेढा दिला असेल, तो किल्ला सात-सात महिने लढवायचा व शेवटी पावसाळा तोंडावर आला की भरपूर पैसे घेऊन किल्ला मोगलांच्या स्वाधीन करायचा. अशा प्रकारे वर्षातून एकच किल्ला बादशहा घेऊ शकल्यास वृद्ध बादशहाचे आयुष्य लवकरच संपेल, असे ताराबाईंना वाटत होते.

शेवटी झालेही तसेच. वाकिणखेड्याच्या लढाईनंतर १७०७ मध्ये बादशहा आजारी पडला. मराठ्यांचा मोगलांशी संघर्ष चालूच होता. आता तर नर्मदा पार करून मराठ्यांनी उत्तरेत फौजा घुसविल्या होत्या. विखुरलेल्या

मराठी फौजांचा सामना करणे मोगलांनाही शेवटी अवघड झाले होते. २० फेब्रुवारी १७०७ रोजी अहमदनगर येथे या मोगल सम्राटाचा मृत्यू वृद्धापकाळाने झाला. त्याच्या मृत्यूने इ. स. १६८१ मध्ये सुरू झालेले मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्धही संपले. ज्या मराठी स्वराज्यास संपविण्यासाठी औरंगजेबाने सत्तावीस वर्षे लढा दिला, त्या सम्राटाला दक्षिणेतच मृत्यू आला. मराठी राज्य जिंकून घेण्याचे त्याचे स्वप्न अपूर्ण राहिले.

### छत्रपती शाहू

दि. २० फेब्रुवारी १७०७ रोजी मोगल सम्राट औरंगजेबाचा मृत्यू झाला. ही घटना जशी मोगलांच्या, भारताच्या आणि मराठ्यांच्या इतिहासाला वळण देणारी ठरली. या घटनेने जसा मोगल साम्राज्याचा अस्त झाला, तसा मराठी साम्राज्याचा उदयही झाला. औरंगजेबाच्या मुलांमध्ये वारसासाठी जसा संघर्ष सुरू झाला, तसा शाहूच्या सुटकेमुळेही शाहू व ताराबाई यांच्यात मराठी सत्तेवर नियंत्रणासाठी संघर्ष सुरू झाला.

छत्रपती संभाजींच्या कैदेपासून म्हणजे १६८९ पासून १७०७ पर्यंत संभाजी पत्नी येसूबाई व शाहू हे औरंगजेबाच्या कैदेत होते. औरगजेबाच्या मृत्यूनंतर त्याचा पुत्र आझमशहाने ८ मे १७०७ रोजी शाहूला कैदेतून मुक्त केले; या वेळी परसोजी भोसले, धनाजी जाधव या प्रमुख मराठा सरदारांनी शाहूला मदत केली. ऑगस्ट १७०७ मध्ये आपणच छत्रपती संभाजीनंतर स्वराज्याचे खरे वारस असल्याचे शाहूने घोषित केले व येथूनच शाहू व ताराबाई यांच्यात संघर्ष सुरू झाला. कारण या वेळी मराठी राज्याची सूत्रे छत्रपती राजारामाची पत्नी ताराबाईंच्या हाती होती. राणी ताराबाईंनी आपला पुत्र शिवाजी (दुसरा) याच्या नावाने साताऱ्याहून कारभार सुरू केला होता.

मराठी राज्यावर हक्क सांगण्याचे राणी ताराबाईंचे कारण म्हणजे छत्रपती संभाजीच्या वधानंतर छत्रपती राजाराम व ताराबाई यांनी स्वराज्याचे रक्षण केले, त्यामुळे १८ वर्षे कैदेत राहिलेल्या शाहूने स्वराज्यावर हक्क सांगू नये. यावरून उभयतांत संघर्ष उद्‌भवला. ऑक्टोबर १७०७ च्या खेडच्या निर्णायक लढाईने राणी ताराबाईंचा पराभव होऊन शाहूचा छत्रपतिपदाचा मार्ग मोकळा झाला. शाहूला छत्रपतिपद मिळवून देण्यात धनाजी जाधव, बाळाजी विश्वनाथ, खंडो बल्लाळ या निष्ठावान सहकाऱ्यांचे महत्त्वाचे योगदान होते.

खेड येथे इ. स. १७०७ मध्ये झालेल्या यादवी युद्धात ताराबाईंचा पराभव झाला, तरी ताराबाईंचे आव्हान पूर्णपणे संपलेले नव्हते. १२ जानेवारी १७०८ रोजी छत्रपतिपद मिळाल्यानंतर शाहूने मराठी राज्याची विसकळीत घडी नीट बसवून आपली सत्ता बळकट केली. याच वेळी १७१४ मध्ये छत्रपती राजारामाची दुसरी पत्नी राजसबाईने बंड पुकारून कोल्हापूर येथे ताराबाई व दुसरा शिवाजी यांना कैद करून आपला पुत्र संभाजी यास गादीवर बसविले. त्यामुळे सातारा व कोल्हापूर अशी दोन सत्ताकेंद्रे तयार झाली. इ. स. १७१९ मध्ये बाळाजी विश्वनाथाने दिल्लीहून स्वराज्याच्या सनदा आणून शाहूचे छत्रपतिपद बळकट केले.

छत्रपती शाहूला जवळपास ४२ वर्षांची कारकिर्द लाभली. या कालखंडात मराठी सत्तेचा उत्कर्षबिंदू गाठला गेला. शिवाजी महाराजांनी स्थापिलेल्या मराठी राज्याची शान शाहूने राखली, ही छत्रपती शाहूची ऐतिहासिक कामगिरी होय. 'जुने मोडू नये' असे शाहूचे धोरण होते, म्हणून त्याच्या कारकिर्दीत त्याने मोगलांबाबत सबुरीचे धोरण ठेवले.

एकूणच छत्रपती शाहूची कारकिर्द भरभराटीची गेली. त्याने १८ व्या शतकाच्या प्रथमार्धात मराठी राज्यात नवा जोम उत्पन्न केला आणि सर्व हिंदुस्थानभर मराठ्यांचा दरारा निर्माण केला. शाहूचा सर्वांत महत्त्वाचा गुण म्हणजे माणसांची उत्तम पारख व मनमिळाऊपणा. या गुणांमुळेच त्याला मराठी साम्राज्याचा विस्तार घडवून आणणारे उत्तम सहकारी लाभले. दि. १५ डिसेंबर १७४९ ला शाहूचा मृत्यू झाला. या वेळेपर्यंत भारताच्या मध्यवर्ती राजकारणात मराठ्यांचा जबरदस्त वचक निर्माण झाला होता. मराठ्यांची एक महत्त्वपूर्ण सत्ता निर्माण झाली होती.

* * *





पेशवा आणि त्यांचे मंत्री.

प्रबळ मोगलांच्या विरोधात शिवछत्रपतींनी मराठी राज्याची – स्वराज्याची स्थापना केली. त्यांनी मराठी मनाच्या अस्मितेला जागृत करून सत्त्व व स्वत्व यांची जाणीव करून दिली. यामुळे मराठी एकसंध शक्तीचे चैतन्यात रूपांतर होऊन भविष्यात स्वराज्याचे साम्राज्यात रूपांतर पेशव्यांनी विशेषतः पहिला बाजीराव व नानासाहेब यांनी घडवून आणले. परंतु दुसऱ्या बाजीरावाच्या काळात इंग्रजांशी १८०२चा वसईचा तह झाला व मराठी राज्याच्या, स्वराज्याच्या संध्याकालाचा आरंभ झाला, आणि शेवटी १८१८मध्ये अस्त झाला.

# पेशवाई

■ डॉ. श्रीनिवास सातभाई

**इ.स.** १७०८ मध्ये मोगलांच्या कैदेतून शाहूची सुटका झाल्यापासून शाहूला छत्रपतिपद मिळवून देण्यापर्यंत बाळाजी विश्वनाथाने महत्त्वाची भूमिका बजावलेली होती. त्याची जाणीव ठेवून १६ नोव्हेंबर १७१३ रोजी बाळाजीस पेशवापदाची वस्त्रे दिली.

छत्रपती शाहूच्या काळात बाळाजी विश्वनाथ, पहिला बाजीराव व नानासाहेब हे तीन कर्तबगार पेशवे होऊन गेले. शाहूने राज्यकारभाराचे सर्वाधिकार पेशव्यांस दिले, त्यामुळे छत्रपती मागे पडून मराठी राज्यात पेशव्यांची सत्ता सुरू झाली. शाहू हयात असेपर्यंत पेशव्यांवर काही प्रमाणात त्याचा अंकुश होता. पेशवे समकालीन प्रतिनिधी, सचिव, अमात्य हे कर्तृत्ववान नसल्याने, सर्व मुलकी सत्ता पेशव्यांच्या हाती एकवटली.



पेशवा बाळाजी विश्वनाथ.

### पेशवा बाळाजी विश्वनाथ (इ. स. १७१३–१७२०)

पेशवा म्हणून बाळाजी विश्वनाथाची कारकिर्द अवघ्या सात वर्षांची होती. परंतु या अल्पकाळात मराठ्यांच्या सत्तेचा पाया त्याने नव्याने घातला आणि चौफेर राज्यविस्ताराला अनुकूल परिस्थिती त्याने तयार केली. मोगलांच्या कैदेतून सुटून आल्यानंतर शाहूची परिस्थिती दोलायमान होती. कान्होजी आंग्रेने शाहूला आव्हान दिल्यानंतर शाहूच्या अस्थिर सत्तेपुढे मोठे प्रश्नचिन्ह निर्माण झाले. अशा प्रतिकूल परिस्थितीवर मुत्सद्देगिरीने मात करून बाळाजीने शाहूला स्थैर्य मिळवून दिले. कान्होजी आंग्रेसारख्या सरदारांना शाहूच्या पक्षात आणले तसेच बंडखोरांचा बंदोबस्त केला.

बाळाजीची महत्त्वाची कामगिरी म्हणजे मोगल बादशहाकडून त्याने शाहूच्या नावे स्वराज्य, चौथाई व सरदेशमुखी ह्यांच्या सनदा प्राप्त करून घेतल्या. त्यामुळे मराठ्यांच्या इतिहासाला वेगळे वळण लागले. 'स्वराज्याच्या सनदांमुळे छत्रपती शाहू हा शिवाजी महाराजांनी स्थापन केलेल्या व वृद्धिंगत केलेल्या स्वराज्याचा स्वामी झाला. चौथाईच्या व सरदेशमुखीच्या सनदांमुळे दक्षिणेतील सहा मोगली सुभ्यांतून चौथाई व सरदेशमुखी वसूल करण्याचा अधिकार मराठ्यांना मिळाला.'

'मराठा मंडळा'ची निर्मिती करून बाळाजीने मराठ्यांना पराक्रमासाठी नवे क्षितिज उपलब्ध करून दिले. एक नवी राजकीय, लष्करी व आर्थिक व्यवस्था निर्माण केली. वतने व सरंजाम यांच्या बाबतीत छत्रपती राजारामाचेच धोरण बाळाजीने चालू ठेवले. जो मराठा सरदार उत्तरेकडील मोगली मुलूख हस्तगत करेल, त्याला त्याने जिंकलेला मुलूख सरंजाम देण्याचे शाहूच्या अनुमतीने जाहीर केले. नवी राज्यव्यवस्था प्रस्थापित करताना मराठ्यांच्या ठायी निर्माण झालेल्या नव्या आशाआकांक्षांचा विचार बाळाजीने केलेला होता आणि म्हणूनच या नव्या राज्यव्यवस्थेचे मराठा मंडळाचे– मराठा सरदारांकडून स्वागत झाले. छत्रपती शाहूने बाळाजीचा गौरव 'अतुल पराक्रमी सेवक' या शब्दांत केला आहे. यावरून बाळाजीच्या कार्याचे महत्त्व लक्षात येते. इ. स. १७२० च्या एप्रिलमध्ये त्याचे निधन झाले.

### पेशवा पहिला बाजीराव (इ. स. १७२०–४०)

छत्रपती शाहूच्या सुटकेनंतर मराठी राज्याचा विस्तार साम्राज्यात झाला. मराठी फौजांनी महाराष्ट्र आणि महाराष्ट्राबाहेर गुजरात, माळवा, बुंदेलखंड, कर्नाटक हे प्रदेश व्यापले. त्यांची पथके आग्रा, राजस्थान, पंजाब, गंगा–यमुनेचा दोआब या प्रांतात घुसली. या आक्रमक राजकारणाचा उपक्रम बाळाजी विश्वनाथाचा पुत्र पहिला बाजीराव याने केला. पण पेशव्यांच्या फौजा जशा पराक्रम गाजवू लागल्या, तसा छत्रपतींचा प्रभाव कमी होत गेला. छत्रपती शाहूनंतर तर छत्रपतींना राजकारणात विशेष स्थानच राहिले नाही. पेशवेशाही किंवा पेशवाई सुरू झाली. सातारा येथे राहून छत्रपती तर पुणे येथे राहून पेशवा कारभार पाहू लागले. या सर्व धोरणांचा जनक पहिला बाजीराव होता. पहिल्या बाजीरावाने शिंदे,

होळकर, पवारादी नवीन सरदार निर्माण करून उत्तरेकडील राज्यविस्ताराचे धोरण अमलात आणले. या दृष्टीने बाजीरावाचे कर्तृत्व महत्त्वाचे आहे.

बाजीरावास इ. स. १७२० मध्ये पेशवेपद मिळाले, त्या वेळी मराठी राज्याचे अस्तित्वच डळमळीत झाले होते. दक्षिणेस निजामाच्या रूपाने नवा शत्रू निर्माण झाला होता. बंडखोर मराठी सरदार, सिद्दी–पोर्तुगीज व उत्तरेस मोगल अशा अनेक आघाड्यांवर बाजीरावास एकाच वेळी तोंड द्यावे लागले. उत्तरेतील विजय हा बाजीरावाच्या कारकिर्दीचा अत्यंत यशस्वी भाग होय. किंबहुना या पेशव्यास जे महत्त्व प्राप्त झाले आहे, त्याचे रहस्य त्याच्या उत्तराभिमुखी राजकारणातच साठले आहे. उत्तर भारतात राणोजी शिंदे, मल्हारराव होळकर, उदाजी पवार, मेहेंदळे, घोरपडे, ढमढेरे आदी मराठी सरदारांना कर्तृत्व गाजविण्याची संधी बाजीरावाच्या आक्रमक धोरणामुळेच मिळाली. मोगल अमलास कंटाळलेल्या उत्तरेतील हिंदू प्रजेने मराठ्यांचे स्वागतच केले. तेथील राजपूत राजांशी सख्य केल्यामुळे उत्तरेत पेशव्यांचे पाऊल पुढे पडत गेले व मोगल बादशाही ही हिंदूंच्या, मराठ्यांच्या हाती जाण्याचा धोका दिल्लीला वाटू लागला होता.



थोरला बाजीराव पेशवा.

बाजीरावाने सवाई जयसिंहाशी हातमिळवणी करून दिल्ली दरबारात वर्चस्व स्थापन करण्यात बरेच यश मिळविले होते. त्याची दिल्लीस्वारी ही मराठ्यांची वाढलेली आक्रमकता सिद्ध करते. परंतु पातशाही रक्षिण्याच्या छत्रपती शाहूच्या धोरणामुळे बाजीरावाने आपल्या आक्रमकतेस आवर घातलेला दिसतो. छत्रपतींच्या मनाचा कल ओळखून, जहागिरी मिळाली म्हणजे आपण पातशहाचे सेवक होऊ, असे म्हणून पेशव्याने एक–एक सुभा हाताखाली घातला आणि छत्रपतींचेच धोरण आपण चालवितो असा आभास निर्माण केला. अस्थिर झालेल्या मराठी राज्याचे स्वातंत्र्य बाजीरावाने कायम केले, त्याच्या विस्ताराचा मार्ग आखून दिला आणि हिंदुस्थानच्या इतिहासात मराठ्यांना मानाचे स्थान मिळवून दिले. यामुळेच मराठेशाहीतील कर्तृत्ववान पुरुषांमध्ये बाजीरावाची गणना केली जाते. सरदार पणीक्करांच्या भाषेत सांगावयाचे म्हणजे, ''छत्रपती शिवाजी जसे मराठी राज्याचे संस्थापक होते, तसेच पेशवा बाजीरावास साम्राज्यसंस्थापक म्हटले पाहिजे,'' (कुलकर्णी/खरे (संपादक) – मराठ्यांचा इतिहास खंड दुसरा, पृ.७७)

सर रिचर्ड टेम्पल, ग्रॅन्ट डफ या विदेशी इतिहासकारांनीही पेशवा बाजीरावाबद्दल गौरवोद्गार काढलेले आहेत. टेम्पल म्हणतात, ''बाजीराव हा मराठी सत्तेचा विस्तारकर्ता, कुशल सेनानी, हिंदूंचा संघटक–पुरस्कर्ता होता;'' तर ग्रॅन्ट डफच्या शब्दांत सांगायचे तर,



रघुनाथराव.

"He had both the head to plan and hand to execute."

**पेशवा नानासाहेब (इ.स. १७४० ते १७६१)**

इ. स. १७४० मध्ये पेशवा बाजीरावचा मृत्यू झाला. त्याच्यानंतर त्याचा पुत्र बाळाजी बाजीराव उर्फ नानासाहेब याची नियुक्ती छत्रपती शाहूने पेशवेपदावर केली. रघुजी भोसले, बाबुजी नाईक या प्रमुख सरदारांनी नानासाहेबांच्या नियुक्तीस केलेला विरोध डावलून छत्रपती शाहूने ही नियुक्ती केली होती.

नानासाहेब पेशवा झाला, त्या वेळेपर्यंत मराठी सत्ता खऱ्या अर्थाने एकसंध राहिली नव्हती. शिंदे, होळकर, नागपूरकर भोसले, गायकवाड, आंग्रे अशा अनेक दौलती उभ्या राहिल्या होत्या. खुद्द पेशव्यांची सत्ता हीही एक वेगळी दौलतच होती. त्यामुळे पेशव्याला इतर सरदारांवर हुकमत गाजविण्याचे अधिकार असले, तरी परिस्थितीमुळे त्याला फार मर्यादा पडलेल्या होत्या. उत्तर भारतात मराठी सरदारांनी मिळविलेले सरंजाम हे लष्करी सरंजाम न मानता वंशपरंपरागत वतने मानली. त्यामुळे छत्रपतींच्या किंवा पेशव्यांच्या एकछत्री स्वामित्वाखाली मराठी साम्राज्य निर्माण न होता, स्वायत्त व आर्थिक अधिकार उपभोगणाऱ्या व पेशव्याच्या खालोखाल दर्जा असलेल्या शिंदे-होळकरादी सरदारांचा, म्हणजेच बड्या वतनदारांचा एक विसकळीत महासंघ निर्माण झाला होता.

या महासंघाने पहिल्या बाजीरावाच्या नेतृत्वाखाली दिल्लीच्या वेशीपर्यंत आणि नाना साहेबाच्या काळात अटकेपार धडका मारल्या; केवळ चाळीस वर्षांच्या काळात उत्तर भारतातील बराच मोठा प्रदेश पादाक्रांत करण्याची नेत्रदीपक कामगिरी बजावली. १८ व्या शतकाच्या मध्यात संपूर्ण भारतात मराठ्यांची सत्ता सर्वांत सामर्थ्यशाली बनली होती. परंतु मराठी राज्याचे स्वरूप केंद्रशासित साम्राज्याचे न राहता विसकळीत महासंघाचे स्वरूप त्यास आल्यामुळे या राज्याच्या विस्ताराला बाळसे न येता सुजेचे स्वरूप आले. तसेच इ. स. १७४९ नंतर सर्व सत्ता पेशव्यांच्या हाती एकवटूनही ते आपल्या सरदारांवर आवश्यक ते नियंत्रण ठेवू शकले नाहीत; परिणामी १७६१ मध्ये मराठ्यांना पानिपतावर पराभवाला सामोरे जावे लागले.

नानासाहेबांच्या काळात, इ. स. १७४८ पासून दिल्लीच्या पातशाही राजकारणात मराठे कळत नकळत अधिकाधिक गुरफटत गेले. १७५२ च्या पेशवा-सफदरजंग कराराने तर दिल्लीच्या बादशाही रक्षणाची जबाबदारीच मराठ्यांनी घेतली होती. आपल्या लष्करी सामर्थ्याच्या जोरावर व मुत्सद्देगिरीने नानासाहेबांनी नागपूरकर भोसले, आंग्रे, गायकवाड वगैरेंना काबूत आणले खरे; स्वतःचा दरारा वाढविला हेही खरे, परंतु फुटीरतेच्या प्रवृत्तीचे समूळ उच्चाटन झाले नाही. तसेच तुळाजी आंग्रेंचे म्हणजे मराठ्यांचेच आरमार बुडविताना, तेही इंग्रजांच्या मदतीने करताना, विवेक पाळला नाही.




पेशव्यांचा दरबार.

किंवा अब्दालीचे संकट समोर असताना जाट, राजपूत या एतद्देशीयांनाच शत्रू मानण्यात रघुनाथराव, होळकर यांनी आपले सामर्थ्य खर्ची केले. परिणामी पानिपतावरील संग्रामात या हिंदू राजांचे सहकार्य मराठ्यांना मिळाले नाही, हे लक्षात घेतले पाहिजे.

इ. स. १७६१ चा पानिपतावरील मराठ्यांचा पराभव ही नानासाहेबांच्या कारकिर्दीतील एक महत्त्वाची घटना होय. पानिपतावरील हाहाकार हा सगळ्याच मराठी मुत्सद्देगिरीचा आणि युद्धनीतीचा पराभव होता, त्याला कमीअधिक प्रमाणात सर्वच मराठी सरदार व मुत्सदी जबाबदार होते. तो एकट्या पेशव्यांचा पराभव नव्हता, मात्र नेता म्हणून नानासाहेबांची जबाबदारी अधिकच होती. या पराभवाचा धक्का ते सहन करू शकले नाही.

पानिपतावर मराठ्यांचा पराभव झाला असला, तरी या पराभवासही मराठ्यांच्या इतिहासात एक वेगळे परिमाण आहे. पानिपतच्या युद्धामुळे सिद्ध झालेली महत्त्वाची गोष्ट ही की, मराठे हिंदुस्थानचे राज्यकर्ते म्हणून वागत होते, केवळ लुटारू म्हणून दुसऱ्या लुटारूशी लढले नाहीत. हिंदुस्थानात सत्ताधीश कोणी व्हायचे किंवा राहायचे याबद्दल वाद असो; पण हे राज्य हिंदी रहिवाशांचेच असले पाहिजे व तेच येथील राज्यकर्ते राहिले पाहिजेत, या तत्त्वासाठी मराठे पानिपतावर लढले. परक्या अब्दालीला येथे कोणताच नैतिक हक्क नाही, असे त्यांचे आव्हान होते.

इतिहासकार त्र्यं. शं. शेजवलकर पानिपतच्या पराभवाबद्दल लिहितात, "...... मराठ्यांनी अनेक चुका केल्या असतील, पण त्यांनी पाचशे वर्षांच्या वरवंट्याखाली चुरडलेल्या हिंदू प्रजेस आपल्या वर्तनाने ताठ उभे राहण्याचे उदाहरण घालून दिले होते. मराठ्यांनी मुसलमानी राज्ययंत्र इतके खिळखिळे केले होते की, कोणत्याही प्रदेशात तेथील प्रजेने बंड करून उठून मुसलमान सुभेदारास हाकून घ्यावे व स्वतःचे राज्य स्थापावे. या कामात त्यास मराठ्यांची मदत आपोआप मिळाली असती आणि हीच शिवछत्रपतिनिर्मित मराठी राज्याची इतिकर्तव्यता होती! इतर प्रांतांतील लोकांत हे लोण पोहोचू शकले नाही, हीच मराठ्यांच्या इतिहासातील खरीखुरी शोकांतिका होय, पानिपतचा पराभव नव्हे!" (पानिपत १७६१ पृ. २६१)

### पेशवा माधवराव (इ. स. १७६१–१७७२)

पानिपतच्या पराभवाच्या धक्का सहन न होऊन पेशवा नानासाहेबांचा मृत्यू झाला. नानासाहेबांचे ज्येष्ठ पुत्र

विश्वासराव पानिपतावर लढाईत मारले गेल्यामुळे द्वितीय पुत्र माधवराव पेशवेपदावर आले. इ. स. १७६०-१७६१ हा मराठी सत्तेचा भरभराटीचा कालखंड होय. मराठी सत्तेचा मध्यान्ह आणि इंग्रजांच्या राजकीय सत्तेचा आरंभ या दोन्ही घटना समकालीन होत्या; पुढे क्रमाने मराठे दुर्बल व इंग्रज बलवान झाले. इ. स. १७६१ ते १८१८ या काळात मराठे व इंग्रज यांच्यात तीन वेळा संघर्ष झाला, हा संघर्ष म्हणजे सर्वश्रेष्ठतेकरिताच संघर्ष होता, ज्यात इंग्रज जिंकले व सर्वश्रेष्ठ सत्ता म्हणून उदयास आले. एक मात्र निश्चित की, मराठा सत्तेला पराभूत केल्याशिवाय इंग्रजांना आपले सर्वश्रेष्ठत्व सिद्ध करता आले नाही.

पानिपतच्या युद्धानंतर मराठ्यांचे उत्तर भारतातील वर्चस्व नष्ट झाले असले, तरी मराठे पराभवाने खचले नाहीत. पेशवा माधवरावाने आपल्या कुशल नेतृत्वाने मराठेशाहीचा प्रभाव पुन्हा निर्माण करण्याचा प्रयत्न केला. माधवराव पेशव्यास लाभलेला कालावधी १७६१ ते १७७२ हा तसा अल्प होय, तरीही माधवरावाने उत्तरेत आपले सरदार पाठवून उत्तर भारतीय राजकारणात आपला जम बसविण्याचा यशस्वी प्रयत्न केला.

निजाम, राघोबाच्या हालचाली, हैदर ह्यांचा बंदोबस्त यशस्वीपणे करून उत्तरेत रामचंद्र गणेश व विसाजी कृष्ण या दोन सरदारांना पाठविले. इ. स. १७७१ मध्ये तर महादजी शिंदेनी राजधानी दिल्लीच ताब्यात घेतली. मराठ्यांच्या या कृर्तत्वाने दिल्लीच्या राजकारणात मराठे पुनश्च स्वयंतेजाने तळपू लागले होते. पानिपतच्या पराभवानंतर खचून न जाता माधवरावाने दिल्ली व बादशहा यांना आपल्या वर्चस्वाखाली आणले होते. माधवरावाच्या, मराठ्यांच्या यशाचा हा कळस होता. परंतु हा आनंद फार काळ टिकू शकला नाही.

इ.स.१७७२ मध्ये पेशवा माधवरावचा अकाली व दुर्दैवी मृत्यू झाला. पानिपतच्या भीषण पराभवाने मराठ्यांचे वैभव नष्ट होऊ पाहत होते. अशा वेळी कोलमडणाऱ्या मराठी राज्याला माधवरावाने नुसते सावरलेच नव्हे, तर पुनश्च त्याच वैभवास पोहचविले. माधवराव असेपर्यंत मराठ्यांच्या अंतर्गत राजकारणात हस्तक्षेप करण्यास संधी मिळाली नाही. म्हणूनच ग्रॅन्ट डफने म्हटले आहे की, "The plans of Panipat were not more fatal to the Maratha Empire than the early end of this excellent Prince."

### पेशवा नारायणराव (१७७२-१७७३)

पेशवा माधवरावाचा अकाली मृत्यू ही मराठी सत्तेसाठी दुर्दैवी घटना ठरली. माधवरावास मुलगा नसल्यामुळे पेशवेपदावर कुणास बसवावे, असा प्रश्न निर्माण झाला होता. आपल्या पश्चात आपला लहान भाऊ नारायणरावास पेशवेपदाची वस्त्रे द्यावीत, अशी इच्छा माधवरावाने अंतिमसमयी व्यक्त केलेली होती. परंतु माधवरावाच्या मृत्यूनंतर पेशवेपद आपणास मिळावे, असा आग्रह माधवरावचे चुलते रघुनाथराव उर्फ राघोबा यांनी धरला. मात्र राघोबाच्या या मागणीस पुणे दरबारातील मुत्सद्यांनी विरोध केला. तसेच १८ वर्षे वयाच्या नारायणरावाकरिता साताऱ्याहून पेशवेपदाची वस्त्रे आणली व ३ डिसेंबर १७७२ रोजी नारायणरावाने पेशवेपदाचा स्वीकार केला.

असे असले, तरी राघोबाची पेशवेपदाची महत्त्वाकांक्षा संपलेली नव्हती, या पदासाठी त्यांनी निजाम, भोसले यांचीही मदत घेण्याचा प्रयत्न केला. त्यामुळे राघोबास नजरकैदेत टाकण्यास आले. यातून राघोबा-नारायणराव वैमनस्य वाढले. पेशवा नारायणराव हा वयाने, अनुभवाने लहान होता, दुर्बल होता. त्याचा फायदा घेऊन राघोबाने १० ऑगस्ट १७७३ रोजी आपला पुतण्या नारायणरावाचा खून घडवून आणला. यामुळे नारायणरावची अल्प कारकिर्द संपुष्टात आली.

पेशवा नारायणरावाच्या मृत्यूमुळे आपल्या पेशवेपदातील एकमेव अडसर दूर झाला, असे राघोबाला वाटले. परंतु बारा मराठी मुत्सद्यांनी राघोबास पेशवेपदापासून रोखले. या वेळी नारायणरावची पत्नी गंगाबाई गर्भवती होती, तिला पुत्रप्राप्ती झाल्यावर त्या बालकास वयाच्या ४० व्या दिवशी पेशवेपदाची वस्त्रे देण्यात आली. नारायणरावाचा हा पुत्र म्हणजे सवाई माधवराव होय. अशा प्रकारे राघोबास पेशवेपदापासून दूर ठेवण्यात मुत्सद्यांना यश आले. त्यास बारभाई कारस्थान

म्हणून ओळखले जाते. यामुळे संतप्त राघोबाने पेशवेपदासाठी इंग्रजांची मदत घेण्याचा निर्णय घेतला.

### पेशवा सवाई माधवराव – बारभाई शासन (इ. स. १७७३–१७९५)

पेशवा नारायणरावाच्या वधामुळे त्याच्यानंतर त्याचा पुत्र जन्माच्या ४० व्या दिवशी पेशवेपदावर आला. पेशवेपदप्राप्तीचे सर्व मार्ग बंद झाल्यावर चिडलेल्या राघोबाने सरळ मुंबईच्या इंग्रजांची मदत मागितली. एवढेच नव्हे, तर राघोबाने इंग्रजांचा आश्रयही घेतला. इंग्रज व राघोबा यांच्यात १७७५ मध्ये सुरतेचा करार झाला. हा करार मराठे–इंग्रज संबंधात मैलाचा दगड ठरला. या कराराने इंग्रजांना अपेक्षित असलेली, मराठा राजकारणातील हस्तक्षेपाची संधी मिळाली. यातूनच इंग्रज–मराठे यांच्यात पहिले युद्ध घडून आले (१७७५–१७८२).

पेशवा सवाई माधवराव पेशवेपदावर असला, तरी मराठ्यांचा राज्यकारभार खऱ्या अर्थाने बारभाई मंडळच चालवीत होते. नाना फडणवीस व महादजी शिंदे यांनी या काळात महत्त्वपूर्ण भूमिका बजावली व मराठी राज्याचे रक्षण केले. एवढेच नव्हे, तर राघोबाला दूर ठेवले. साल्बाईच्या तहाने महादजी शिंदेंनी इंग्रजांना माघार घेण्यास भाग पाडले. पहिल्या इंग्रज–मराठा युद्धात मराठ्यांचा पेशवा अल्पवयीन असताना, राघोबा इंग्रजांच्या आश्रयास असताना नाना–महादजी या विश्वासू दुकलीने व निष्ठावान मराठी फौजेने इंग्रजांनाही जेरीस आणले हे विशेष होय. मराठ्यांनी केलेल्या या जबरदस्त प्रतिकारामुळेच पुढे वीस वर्षे इंग्रजांनी मराठ्यांना डिवचण्याचा प्रयत्न केला नाही.

पेशवा सवाई माधवरावाच्या काळात नाना–महादजीला राघोबादादांच्या उपद्‌व्यापांना तोंड देण्यास बराच वेळ द्यावा लागला. पानिपतच्या भीषण पराभव, माधवराव आणि नारायणराव पेशव्यांचे मृत्यू, राघोबाचे इंग्रजांशी संधान या सर्व संकटांवर मात करून; नेतृत्वहीन मराठी राज्य केवळ छत्रपती शिवाजी महाराजांनी निर्माण केलेल्या मराठ्यांच्या अस्मितेच्या बळावर जिवंत होते.

या संघर्षाच्या काळात सवाई माधवरावाचे जीवन विकसित होत होते. या बालपेशव्याच्या कारकिर्दीत



सवाई माधवराव पेशवा.

राघोबा–इंग्रजांविरुद्ध मिळविलेला वडगावचा विजय, महादजीने केलेला साल्बाईचा तह व इंग्रजांना घ्यावी लागलेली माघार या प्रमुख गोष्टींची नोंद करावी लागेल. याच काळातील सर्वांत उल्लेखनीय बाब म्हणजे उत्तर भारतात महादजी शिंदेंचे वर्चस्व निर्माण झाले, एवढेच नव्हे तर मोगल बादशाहा शाहआलम याने महादजी शिंदेस आपला ‘वकील–इ–मुतालिक’ (मुख्याधिकारी) म्हणून नियुक्त केले. मराठ्यांच्या वर्चस्वाचा अनुभव पुन्हा एकदा उत्तर भारताने घेतला होता.

सवाई माधवरावची वाटचाल नाना फडणविसाच्या मार्गदर्शनाखाली झाली. परंतु १८ वर्षे वयाच्या पेशव्याने अद्याप बाह्यजगाचा अनुभव घेतलेला नव्हता. खर्डा येथील लढाईत मराठ्यांनी निजामावर मिळविलेला विजय सवाई माधवरावाच्या कारकिर्दीतील शेवटचा व मोठा विजय होता. असे असले, तरी सवाई माधवरावास वैफल्याने ग्रासले होते, त्यातून पेशवा बाहेर पडू शकला नाही व दि. २७ ऑक्टोबर १७९५ रोजी त्याने आत्महत्या केली.

याच दरम्यान १७९४मध्ये महादजी शिंदेचा मृत्यू झाल्यामुळे मराठ्यांच्या राज्याला मोठा धक्का बसला व राघोबापुत्र दुसरा बाजीरावासारथ्या अदूरदर्शी नेतृत्वाकडे सूत्रे गेल्यामुळे मराठ्यांच्या सत्तेचा ऱ्हास झाला.

### पेशवा दुसरा बाजीराव – मराठी राज्याचा ऱ्हास (इ.स. १७९६–१८१८)

सवाई माधवरावांच्या मृत्यूनंतर पुण्यात पुनश्च गोंधळाची परिस्थिती निर्माण झाली होती. या वेळी पुणे दरबारात नाना फडणविसाचा दबदबा होता. त्याने राघोबाच्या तीनही मुलांना स्थानबद्धतेत ठेवले होते. सवाई माधवरावास पुत्र नसल्यामुळे पेशवेपदाच्या वारसाचा प्रश्न निर्माण झाला होता. राघोबापुत्र बाजीराव पेशवेपदासाठी उत्सुक होता. परंतु नानांचा त्यास विरोध होता. परंतु शेवटी दि. ६ ऑक्टोबर १७९६ रोजी दुसरा बाजीराव पेशवेपदावर विराजमान झाला.

इ.स. १७८२ ते १८०२ असा २० वर्षांचा कालखंड मराठ्यांच्या दृष्टीने शांततेचा गेला असला, तरी मराठा दरबारात अनेक घडामोडी झाल्या होत्या. सवाई माधवरावाचा मृत्यू होऊन पेशवेपदावर दुसरा बाजीराव आला होता. तसेच शिंदे–होळकरांचे पुणे दरबाराशी मतभेद निर्माण झाले होते. इ.स. १८०० मध्ये नानांचा मृत्यू झाल्यामुळे पुणे दरबाराचे शहाणपणही संपुष्टात आले होते. नानांच्या मृत्यूनंतर बाजीरावाचे वर्तन अधिकाधिक अनिर्बंध होत गेले. दुसऱ्या बाजीरावाच्या दुर्बलतेमुळे दौलतराव शिंदे, यशवंतराव होळकर, रघुजी भोसले आदी मराठा सरदार पेशव्यांचे वर्चस्व मानण्यास तयार नव्हते.

यातच बाजीराव–होळकर संघर्षात यशवंतराव होळकरांचा भाऊ विठूजी होळकर हा पेशव्यांच्या हाती लागताच चिडलेल्या पेशव्याने त्यास हत्तीच्या पायी दिले. ही बातमी यशवंतरावास कळताच त्याने ऑक्टोबर १८०२मध्ये थेट पुण्यावरच आक्रमण केले व प्रचंड जाळपोळ केली. होळकरांच्या आक्रमणाने घाबरून जाऊन दुसऱ्या बाजीरावाने पुण्याहून पलायन केले व वडील राघोबाप्रमाणे इंग्रजांचा आश्रय घेतला.

दि. ३१ डिसेंबर १८०२ला दुसरा बाजीराव व इंग्रज यांच्यात प्रसिद्ध असा वसईचा तह झाला. या तहाने बाजीरावास पुन्हा पेशवेपद मिळाले व पेशवांच्या दरबारात इंग्रज रेसिडेन्टचे कायमचे आगमन झाले. लॉर्ड वेलस्लीने तैनाती फौज पेशव्याच्या गळी उतरवली. वसईचा तह शिंदे–भोसले–होळकरांना मान्य नव्हता त्यामुळे त्यांनी इंग्रजांशी लढण्याची तयारी केली. इ.स. १८०२–१८०४ या कालावधीत लढले गेलेले हेच इंग्रज–मराठे द्वितीय युद्ध होय. यात इंग्रज विजयी झाले. वसईच्या तहाने दुसऱ्या बाजीरावाचे स्वांतत्र्य संपुष्टात आले. हा तह मराठी राज्याच्या अस्ताच्या वाटचालीतील महत्त्वाचा टप्पा ठरला. या तहाने इंग्रज व बाजीरावाचे शत्रू–मित्र एकच ठरले.

इच्छा असूनही दुसऱ्या इंग्रज–मराठा युद्धात दुसरा बाजीराव भाग घेऊ शकला नव्हता. वसईच्या तहाने पुणे दरबारात आलेला रेसिडेन्ट माउन्ट स्टुअर्ट एल्फिन्स्टन याने बाजीरावावर बंधने घालण्यास सुरुवात केली. तसेच नागपूर दरबारात रेसिडेन्ट रिचर्ड जेन्किन्स याने आप्पासाहेब भोसल्यांवर आपला प्रभाव वाढविण्यास सुरुवात केली. एकूणच पेशवे, शिंदे, भोसले व होळकर या सर्वांच्याच मनात इंग्रजविरोधी असंतोष धुमसत होता. आपण विरोध न केल्यास इंग्रज आपल्या राज्याचा घास कधीही घेतील याचा अंदाज पेशवा व अन्य सरदार यांना आला होता. त्यामुळे सर्वच जण निर्वाणीचा लढा देण्यासाठी प्रयत्नशील होते. यातूनच इ.स. १८१७–१८१८मध्ये इंग्रज–मराठे यांच्यात अखेरचा संघर्ष घडून आला. दुय्यम दर्जाच्या नेतृत्वामुळे या सर्वांची आघाडी उभी राहू शकली नाही. परिणामी प्रत्येकास इंग्रजांशी एकाकी लढा द्यावा लागला व त्यात मराठी सत्तेचे चारही आधारस्तंभ पराभूत झाले.

पेशवा बाजीरावास तर राजधानी पुणे येथून पलायन करावे लागले. १९ फेब्रुवारी १८१८ रोजी पंढरपूरजवळ गोपाळ आष्टी येथे इंग्रज–पेशवा यांच्यात झालेली अखेरची लढाई निर्णायक ठरली. पेशव्यांचा अखेरचा सेनापती बापू गोखले याचा या युद्धात मृत्यू झाला. १९ फेब्रुवारी या दिवसाचा योगायोग पाहा, याच दिवशी १६३० साली छत्रपती शिवाजी महाराजांचा जन्म झाला होता; ज्यांनी

हिंदवी साम्राज्याची स्थापना केली, तर याच दिवशी १८१८ ला मराठा राज्याची जवळपास अखेर झाली. आष्टीच्या पराभवानंतर बाजीरावाची एकाकी भटकंती सुरू झाली. इंग्रज मागावर होतेच. शेवटी असाहाय्य पेशवा १ जून १८१८ रोजी बऱ्हारपूरजवळ इंग्रजांच्या स्वाधीन झाला. त्यास इंग्रजांनी उत्तर प्रदेशात कानपूरजवळ बिठूर (ब्रह्मावर्त) येथे स्थानबद्ध केले व इंग्रजांचा पेन्शनर बनविले. अशा रितीने मराठी राज्याची अखेरची घरघर थांबली.

यानंतर इंग्रजांनी शिंदे, होळकर व भोसले यांना स्वतंत्रपणे पराभूत केले. इंग्रजांनी मुत्सद्देगिरीने पेशवे–भोसले–शिंदे–होळकर या चार घटकांना एकत्र येऊ न देता, स्वतंत्रपणे त्यांचे खच्चीकरण केले. त्यांच्याकडून स्वतंत्र भूभाग मिळविला. या युद्धात पेशवे व अन्य मराठा सरदार यांच्यातील मतभेदही त्यांच्या पराभवास कारणीभूत ठरले. मराठ्यांच्या पराभवामुळे इंग्रजांच्या मुख्य शत्रूचा बिमोड झाला आणि इंग्रजी सत्तेचा विस्तार कोलकाता ते मुंबई आणि मद्रास ते अलाहाबाद असा झाला. उत्तर भारतात शीख राजा रणजितसिंहाचे आव्हान सोडता संपूर्ण भारतात इंग्रजांनी आपला प्रभाव निर्माण केला होता. पुढे ब्रह्मावर्तच्या वास्तव्यातच इ. स. १८५१ मध्ये दुसऱ्या बाजीरावाचा मृत्यू झाला. तत्पूर्वी इकडे १८१८ मध्ये शनिवार वाड्यावर युनिअन जॅक फडकला होता.

### मराठी राज्याचा – पेशवाईचा अस्त (१८१८)

आष्टीच्या युद्धात मराठ्यांचे छत्रपती राजे प्रतापसिंह हे बाजीरावासमवेत होते. युद्धात पराभवाची चिन्हे दिसू लागताच बाजीरावाने पलायन केले. परिणामतः छत्रपती प्रतापसिंह इंग्रजांच्या हाती सापडले. रेसिडेन्ट एलल्फिन्स्टनने बाजीरावाचे सर्वाधिकार रद्द झाल्याचे घोषित केले. तसेच राजे प्रतापसिंह यांना सातारच्या गादीवर बसविण्याचे जाहीर केले. (१० एप्रिल १८१८) व ग्रॅन्ट डफ यास छत्रपतींचे मार्गदर्शक म्हणून नेमण्यात आले. तसेच या नवीन राज्याचे सार्वभौमत्व मर्यादित असून ते ब्रिटिशांच्या पंखाखालीच राहील, याची कल्पना राजाला दिली होती. सातारा परगण्याइतका परिसर छत्रपतींच्या स्वामित्वाचा म्हणून घोषित करण्यात आला. छत्रपतींनी इंग्रजांशी मैत्रीचे संबंध ठेवावेत, इंग्रजांच्या आज्ञेशिवाय कोणत्याही राज्याशी पत्रव्यवहार करू नये, सैन्यभरती करू नये, इत्यादी बंधने त्यांच्यावर लादली होती. तिकडे पेशव्यांची व्यवस्था व इकडे छत्रपतींची अशी अवस्था झालेली मराठ्यांना अर्थातच बघवत नव्हती; परंतु निरुपाय होता.

पेशवा बाजीरावाच्या पराभवाने पेशवाईचा अंत झालेलाच होता. पेशवाईच्या समाप्तीबरोबरच मराठी राज्याच्या अस्ताची ही नांदी झाली होती. राजे प्रतापसिंहाचे सातारचे राज्य म्हणजे अस्तंगत होत चाललेल्या मराठी राज्याच्या क्षितिजावर रेंगाळणारा एक किरण होता. तो किरण थोड्याच काळात दिसेनासा होणार, हे निश्चित होते. काळाचाच काय तो प्रश्न होता. आष्टीच्या पराभवाने मराठी राज्यावर सायंकाळची छाया पसरली, उच्चाटनात ती अधिक गडद झाली व शेवटी इ. स. १८४८ ला सातारचे राज्यही खालसा झाल्याचे घोषित होताच, शिवरायांनी स्थापन केलेल्या स्वराज्यात पारतंत्र्याचा काळोख पुन्हा पसरला.

### उपसंहार

दक्षिणेतील शाह्यांना शह देऊन प्रबळ मोगलांच्या विरोधात शिवछत्रपतींनी मराठी राज्याची– स्वराज्याची स्थापना केली. या दृष्टीने त्यांचे कर्तृत्व अलौकिकच होय. त्यांनी मराठी मनाच्या अस्मितेला जागृत करून सत्त्व व स्वत्व यांची जाणीव करून दिली. यामुळे मराठी एकसंध शक्तीचे चैतन्यात रूपांतर होऊन भविष्यात स्वराज्याचे साम्राज्यात रूपांतर पेशव्यांनी विशेषतः पहिला बाजीराव व नानासाहेब यांनी घडवून आणले.

पानिपतच्या पराभवानंतर अत्यंत संकटाच्या काळात नाना फडणवीस व महादजी शिंदे या दुकलीने आपल्या मुत्सद्देगिरीच्या व पराक्रमाच्या जोरावर, मराठी राज्याची सेवा निष्ठेने केली. परंतु दुसऱ्या बाजीरावाच्या काळात इंग्रजांशी १८०२चा वसईचा तह झाला व मराठी राज्याच्या, स्वराज्याच्या संध्याकालाचा आरंभ झाला, आणि शेवटी १८१८मध्ये अस्त झाला.

मराठी राज्याच्या अस्ताला अनेक घटक कारणीभूत ठरले. यांत प्रामुख्याने देशाभिमानाचा अभाव, अंतर्गत दोष व मत्सर, एकसंध वृत्तीचा अभाव, नवीन ज्ञान–कल्पना व सुधारणा यांकडे दुर्लक्ष, शोधक बुद्धी व दूरदृष्टी यांचा अभाव, प्रगत ज्ञानाविषयी अनास्था तसेच दुसरा बाजीराव, यशवंतराव होळकर, आप्पासाहेब भोसले व दौलतराव शिंदे यांसारखे दुय्यम दर्जाचे नेतृत्व इत्यादी घटकांचा प्रामुख्याने समावेश करावा लागेल. तसेच संकुचित वृत्ती, परंपरांचा वृथा अभिमान, घराण्याच्या रक्ताचा अनाठायी दर्प, जातिजातींतील वैमनस्य, शत्रूवर अनाठायी विश्वास, इत्यादींचा व्हावयाचा तोच परिणाम झाला.

मराठी राज्याच्या अस्ताची कारणमीमांसा वासुदेव शास्त्री खरे मोठ्या समर्पक शब्दांत करतात,

''देशाभिमान शून्यता, समूहरूपाने कार्य करण्याची नालायकी, स्वार्थ–साधनाची बेसुमार हाव, आळस, हेळसांड, दुसऱ्याच्या ओंजळीने पाणी पिण्याची सवय इत्यादी दुर्गुण आमच्या समाजात अंगी जे खिळले आहेत, तेच आमच्या राज्यनाशाला कारण झालेले आहेत. असल्या दुर्गुणांनी खिळखिळे झालेले कोणतेही राष्ट्र पाश्चात्त्य राष्ट्राशी विरोध प्राप्त झाला असता टिकाव धरू शकत नाही. हिंदुस्थान जर इंग्रजांनी घेतले नसते, तर फ्रेंचांनी घेतलेच असते. 'प्रवाहात पडलेली भांडी एकमेकांवर आदळली असता कोणते फुटायचे, मातीचे की लोखंडाचे हे ठरलेलेच आहे...'' आधुनिक महाराष्ट्राच्या निर्मितीला, जडणघडणीची ही सर्व पार्श्वभूमी आहे.

**संदर्भ :**


१. Pagadi Setumadhavrao
Shivaji, National Biography Sevies,1983.

२. सरदेसाई गो. स.
मराठों का नवीन इतिहास खंड १,२–शिवलाल अग्रवाल एन्ड कंपनी आगरा, १९६३–६४.

३. कुलकर्णी अ. रा., खरे ग. ह. (संपादक)
मराठ्यांचा इतिहास, खंड २, म.वि.ग्रं.मं. कॉन्टिनेण्टल प्रकाशन पुणे, १९८५.

४. पवार जयसिंगराव
मराठी सत्तेचा उदय, निराली प्रकाशन पुणे,१९९६.

५. कुलकर्णी अ. रा.
जेम्स कनिंगहॅम, ग्रॅन्ट डफ, पुणे विद्यापीठ प्रकाशन, १९६९.

६. शेजवलकर त्र्यं. शं.
पानिपत १७६१, राजहंस, पुणे १९९३.

७. पिसुर्लेकर पां. स.
पोर्तुगीज–मराठे संबंध, पुणे विद्यापीठ प्रकाशन, १९६७.


✻ ✻ ✻





मार्कंडीचे शिवमंदिर.

# चंद्रपूरचे गोंड राजे

■ डॉ. भा. रा. अंधारे

**नेवास्याजवळ प्रवरेकाठी, बोरीजवळ कुकडी नदीकाठी, आणि मोरगावजवळ कऱ्हा नदीकाठी वाळू-गोट्यांचे आणि मातीच्या अवसादांचे पुराचुंबकीय पद्धतीने नुकतेच कालमापन केले आहे. ह्या कालमापनाप्रमाणे हे अवसाद कमीत कमी ७ ते ८ लाख वर्षांपूर्वीचे असावेत, असे अनुमान भूपुरातत्त्वाच्या संशोधकांनी काढले आहेत. ह्या तिन्ही ठिकाणी आद्य पुराश्मयुगीन मानवाने बेसाल्ट ह्या दगडावर केलेली हत्यारे मिळतात. महाराष्ट्रातील मानवी अस्तित्वाचा हा सर्वांत जुना पुरावा मानला जातो.**

चंद्रपूरच्या गोंडांत ज्या बारा जाती आहेत, त्यांपैकी ज्यांनी राज्य स्थापन केले, जमीनदाऱ्या मिळविल्या, मंत्रिपदे भूषविली ते स्वतःला राजगोंड म्हणू लागले. या राजगोंड जमातीतच १२व्या शतकात कोलभिल्ल नावाचा महापराक्रमी पुरुष जुनगाव, मोवाड व शिरपूर-माणिकगड परिसरात उदयास आला. त्याने देवगिरीच्या यादवाची, वैरागडच्या माना राजांची सत्ता संपुष्टात आलेली पाहून सर्वत्र विखुरलेल्या गोंडांना राजकीय दृष्टीने संघटित करून माणिकगडचा बळकट किल्ला जिंकून गोंड राज्याचा पाया घातला. कोलभिल्ल यांचे हाकेस ओ देऊन जी माणसे त्यांच्याभोवती गोळा झाली, त्यांत भिका उर्फ भीमबल्लाळ सिंह प्रमुख होता. त्याचे शौर्य व धडाडी पाहून कोलभिल्लने त्याच्याकडे नेतृत्व सोपविले. त्याने जवळच शिरपूर येथे गादीची स्थापना केली. हाच गोंड राज्याचा संस्थापक मानला जातो.

भीमबल्लाळनंतर त्याचा मुलगा खर्जा व त्याच्यानंतर त्याचा मुलगा हीरसिंह गादीवर बसला. या हीरसिंहने गोंड समाजास शेती व बागायती करण्यासाठी प्रोत्साहन दिले. त्यामुळे गोंड समाजाची आर्थिक स्थिती सुधारली. हीरसिंहनंतर त्याचा मुलगा आदियाबल्लाळ सिंह (१३२२-१३४७) शिरपूर गादीवर बसला. त्याच्या कारकिर्दीत राज्याचा विस्तार झाला. त्याने शिरपूरच्या उत्तरेस २० मैल अंतरावर वर्धा नदीच्या पूर्व तीरावर नवीन राजधानी निर्माण केली. तिचे नाव आपल्या नावावरून बल्लाळपूर असे ठेवले. त्याने वर्धा नदीच्या काठी बल्लाळपूर किल्ला बांधला. या किल्ल्याचा तट काळ्या दगडांचा असून बांधणी मजबूत आहे. प्रवेशद्वारासमोर केशवनाथाचे देऊळ आहे. परंतु ती मूर्ती १८१८च्या धामधुमीत चोरीस गेली. पुढे १८१२मध्ये भोसल्यांचे कमाविसदार मोरे ह्यांनी तेथे दगडी मूर्ती बसविली आणि भोसल्यांतर्फे चंद्रपूर राज्याचा प्रशासक कॅप्टन कॉफर्ड याने ह्या देवळास नेमणूक बांधून दिली. शेवटचा गोंड राजा निळकंठशहा यास त्याच किल्ल्यात १७५१ मध्ये रघुजी भोसल्याने कैदेत ठेवले होते.

आदियाबल्लाळनंतर त्याचा मुलगा तलवारसिंह गादीवर बसला. तलवारसिंहाच्या मृत्यूनंतर त्याचा पुत्र केशरीसिंह (१३७२-१३९७) हा गादीवर बसला. त्याने राज्यात बऱ्याच सुधारणा केल्या. केशरीसिंहाच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा दिनकरसिंह गादीवर बसला. हा राजा शूर तसेच विद्याव्यासंगी होता. त्याच्या काळात मराठी भाषिकांची वस्ती चंद्रपुरात वाढली. दिनकरसिंहानंतर त्याचा मुलगा गादीवर आला. त्याने जमिनीचे वाटप करून, सैन्यास जमिनी बक्षीस दिल्या होत्या. रामसिंहानंतर त्याचा मुलगा सुरजबल्लाळसिंह बल्लारपूरच्या गादीवर बसला. सुरजबल्लाळशहानंतर त्याचा मुलगा बल्लाळशहा गादीवर आला. पण त्याच्या अंगावर कुष्ठरोगासारखी खांडके पडली होती. त्यामुळे तो खांडक्या बल्लाळशहा नावाने ओळखला जातो.

खांडक्या बल्लाळशहाने तेलठाकूर नावाच्या एका राजपूत वास्तुशास्त्रज्ञाकडे किल्ला उभारण्याची कामगिरी सोपविली व राजधानी वसविली. त्याने इंद्रपूर हे प्राचीन नाव चालू केले. त्यावरून लोक पुढे चंद्रपूर असे म्हणू लागले. त्याचा मृत्यू १४९७ मध्ये झाला. त्याची भव्य समाधी बल्लाळपूर येथे आहे.

खांडक्या बल्लाळशहाच्या मृत्यूनंतर हिरशहा हा कर्तबगार राजा चंद्रपूरच्या गादीवर बसला. त्याने तटाचे बांधकाम पूर्ण केले व पूर्व-पश्चिम, उत्तर-दक्षिण या दिशांना बुरूज बांधले व त्यावर गोंड राजचिन्ह खोदविले तसेच त्याने किल्ल्याच्या आत एक महाल व बालेकिल्ला बांधला. राजघराण्यातील कुटुंबाकरिता बालेकिल्ल्याच्या आत सोमेश्वराचे मंदिर बांधले. त्याने बालेकिल्ल्यात छोटा तलाव निर्माण केला व उत्तम घाट व फरसबंदी केली. त्या तलावाला त्याने कोनेरी तलाव असे नाव दिले. तलावाच्या पाळीवर भव्य नंदीची स्थापना केली.

त्याने असे फर्मान काढले की, जो कोणी जंगल साफ करून वस्ती वसवेल त्यास तितक्या भागाची जमीनदारीची सनद देण्यात येईल. दुसरे फर्मान त्याने काढले की, जो कोणी तलाव बांधेल आणि त्या तलावाच्या पाण्याने जितकी जमीन ओलिताखाली येईल, ती जमीन त्याला बक्षीस देण्यात येईल. त्यामुळे त्याच्या राज्यात लोकवस्ती निर्माण होऊन १६ जमीनदाऱ्या स्थापन झाल्या.

अशा प्रकारे ४४०५ चौ. मैल क्षेत्रफळ असणाऱ्या प्रदेशात लोकवस्ती निर्माण झाली. हीरशहा हा चंद्रपूरचा पहिला स्वतंत्र राजा होता. त्याने मुसलमान सत्ताधीशाचे मांडलिकत्व झुगारून दिले. हीरशहाच्या मृत्यूनंतर त्याच्या राणीने दोन राजपुत्रांना दत्तक घेतले- १) भीमा उर्फ अकबा २) लोमा उर्फ लोकबा व ती राणी स्वतः राज्यकारभार पाहू लागली. दोन्ही राजपुत्रांच्या मृत्यूनंतर अकबराचा मुलगा कर्णशहा उर्फ कोंडीशहा गादीवर बसला. तो विद्वानांचा आश्रयदाता होता. तेलंगणातील राजाच्या जाचास कंटाळून पुष्कळ तेलगू ब्राह्मण चंद्रपूरास आले व कर्णशहाने त्यांना आश्रय दिला. त्यामुळे तेलंगणातील हजारो लोकांनी चंद्रपुरात येऊन तटाबाहेर वस्ती केली. तेथे बाभूळवन होते, त्यामुळे त्या वस्तीला बाभूळपेठ म्हणतात.

कर्णशहाचा ओढा शिवभक्तीकडे होता. त्यामुळे त्याने अनेक शिवमंदिरे बांधली. याशिवाय जुनाट देवळे, लेणी यांचा जीर्णोद्धार केला. त्याशिवाय त्याने जोडमंदिरे बांधली.

दोन्ही जोड शिवमंदिरे बालाजी प्रभागात गणपतीमंदिरसमोर आहेत. कर्णशहाचा मृत्यू १५७२ मध्ये झाला.

### राजा बाबाजी बल्लाळशहा

हा राजा शूर, महत्त्वाकांक्षी व स्वतंत्र वृत्तीचा होता. त्याने बहमनी सुलतानाच्या ताब्यात असलेले वैरागड हे स्थान जिंकून घेतले. हा किल्ला १० एकर जागेत आहे. या किल्ल्याच्या पायथ्याशी हिऱ्याची खाण होती. ही खाण १८४३ पर्यंत चालू होती. शेवटी नागपूरच्या तिसऱ्या रघुजीने (१८१७–१८५३) खर्च परवडत नसल्याने ती बंद केली. बाबाजीच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा धुडराम शहा उर्फ बल्लाळशहा (१५९७–१६२२) गादीवर आला. त्याच्या काळात किल्ल्याचे काम पूर्ण झाले. यासाठी १० वर्षे लागली. आणि सव्वा कोटी रुपये खर्च झाला. तटाची उंची १५ ते २० फूट असून साडेसात मैल परिघ आहे. या किल्ल्याची वास्तू करून त्याने बराच दानधर्म केला व इनामे दिली. त्याने आपल्या राज्यात गोवध–बंदी केली. याशिवाय महाकाली समोरील नरबळीची प्रथा बंद केली.

धुडरामशहाच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा राजेकिबा उर्फ कृष्णशहा (१६२२–१६४०) हा गादीवर आला. तो दिल्लीचा सम्राट शहाजहानचा मांडलिक बनला. ओरछाचा राजा झुंजारसिंह याने शहाजहनविरुद्ध युद्ध पुकारले, आणि तो दक्षिणेत पळाला. त्याला निद्रिस्त अवस्थेत कृष्णशहाच्या सैन्याने पकडले व त्याचे शिर धडावेगळे केले (डिसेंबर १६३५) व ते बहादरशहाकडे पाठविले. (१६३७). १६४० मध्ये कृष्णशहाचे निधन झाले. १६४० मध्ये त्याचा मुलगा बाबाजी उर्फ मानाजी बल्लाळराव हा गादीवर आला.

### रामसिंग (१६६७–१६८४)

मानाजी बल्लाळशहाच्या मृत्यूनंतर त्याचा धाकटा मुलगा रामसिंग गादीवर बसला. रामसिंगाच्या मृत्यूनंतर किसनसिंग (१६८४–१६९६) गादीवर बसला. किसनसिंगाला औरंगजेबाने मराठ्यांविरुद्ध लढण्यास बोलविले होते. १६९२ मध्ये मोगल राजपुत्र मुईजुद्दीन याने पन्हाळ्याला वेढा दिला. त्या वेळी किसनसिंग त्याच्याबरोबर होता. औरंगजेबाने किसनसिंगाला स्वगृही जाण्याची परवानगी दिली. राजा किसनसिंगाला वीरसिंग व कालसिंग असे दोन पुत्र होते.

कालसिंग आपल्या आईसह औरंगजेबाच्या आज्ञेने मुसलमान झाला. त्याचे नाव नेकनाम खान. त्याच्याबरोबर छत्रपती राजारामच्या मुलीचे लग्न झाले होते आणि काही काळाकरिता त्याने देवगड राज्याची प्राप्ती करून घेतली. ही घटना १६९५ मधील होय. परंतु १६९६ मध्ये किसनसिंगाचा मृत्यू झाला.

किसनसिंगाचा मोठा मुलगा वीरसिंग हा १६९६ मध्ये गादीवर बसला व त्यास औरंगजेबाकडून मान्यता मिळाली. वीरशहास पुत्र नव्हता. त्यास मुलगी होती. ती देवगडाच्या राजघराण्यातील एक राजपुत्र दुर्गशहा यास दिली होती. तिचा नवऱ्याने अपमान केला. त्यामुळे ती माहेरी आली. तिची आई हिराई संतप्त झाली आणि आपल्या मुलीच्या अपमानाचा सूड घेण्याचे तिने ठरविले. तिने अशी प्रतिज्ञा केली की, दुर्गशहाचे शीर आणून महाकालीला वाहीन. तेव्हा लढाई झाली. त्यात वीरशहाने दुर्गशहाचे शिर धडावेगळे केले. हा विजय महाकालीच्या कृपेने झाला म्हणून राणी हिराईने दुर्गशहाचे शिर महाकालीस अर्पण केले. त्याचे प्रतीक देवळावर आहे.

### राणी हिराई (१७०४–१७१९)

वीरशहाच्या मृत्यूनंतर राणी हिराईने आपल्या दिराच्या ३ वर्षांच्या मुलास (गोविंदशहाच्या मुलास) दत्तक घेऊन त्याचे नाव रामशहा ठेवले. तो सज्ञान होईपर्यंत राणी हिराईने दिवाण बापूजी वैद्य यांच्या मदतीने कारभार पाहू लागली. (१७०४–१७१९) ही कारकिर्द प्रजेकरिता सुखावह होती. तिने दानधर्म केला. अनेक देवळे बांधली. तिनेच प्रसिद्ध महाकालीचे नवीन मंदिर बांधले.

राणी हिराईने जुने अचलेश्वराचे मंदिर पाडून नवे मंदिर उभारले. ते आजही विद्यमान आहे. हिराईने आपल्या पतीची समाधी बांधली, ती अचलेश्वर मंदिराला लागूनच आहे. अतिशय टोलेजंग उंच कळस असलेली ती समाधी आहे. या ठिकाणी अनेक समाध्या आहेत व त्यांचे शिल्प



मार्कंडी शिवमंदिरावरील शिल्प.

वाखाणण्याजोगे आहे. त्यावर गोंड, मुस्लीम व मराठा शिल्पांचा प्रभाव जाणवतो. हिराईचा दिवाण बापूजी वैद्याने बाबूपेठेत एक महादेवाचे मंदिर बांधले. तसेच त्याने पायऱ्यांची विहीरही बांधली. ती शंखाकृती होती. याशिवाय तिने वैलोचना नदीच्या काठी वैरागड येथे गोरजाई देवीचे मंदिर बांधले. हिराईने वायव्य दिशेला तळे बांधले. त्या तळ्याजवळ घोड्याचा रिसाला होता. त्यात घोडे पाणी पीत, त्यामुळेच त्याला घोडतळे असे म्हणत. त्याचाच अपभ्रंश घुटकाळा तलाव असे झाले.

राणीचे सर्वांत मोठे काम म्हणजे विदर्भातील खजुराहो म्हणून ओळखले जाणारे, गडचिरोली जिल्ह्यातील वैनगंगेच्या काठी असलेल्या मार्कडमंदिराचा जीर्णोद्धार केला. तिथे तिने छत बांधले व त्या ठिकाणी माघ महिन्याच्या शिवरात्रीला यात्रा सुरू केली. ती आजतागायत सुरू आहे. येथे दरवर्षी १ लाख भाविक दर्शन घेतात. या मंदिरावरील शिल्पे अत्यंत देखणी व सुंदर आहेत. राणी हिराईची कारकिर्द शांततेत गेली आणि अनेक बांधकामे करून तिने आपले नाव अजरामर केले. तिने प्रजेवर पुत्रवत प्रेम केले.

## रामशहा (१७१९ – १७३५)

रामशहा सज्ञान झाल्यावर राणी हिराईने राजसत्ता त्याच्याकडे सोपविली. याच वेळी कान्होजी भोसले चंद्रपूरवर चालून आला. किल्ल्याबाहेर रामबागेजवळ दोन्ही सैन्यांमध्ये लढाई झाली व त्यात कान्होजी भोसलेचा पराभव झाला.

कान्होजीच्या पराभवाची बातमी छत्रपती शाहूला समजताच त्याने आद्य रघुजी यास पाठविले. रघुजी चंद्रपूरकडे वळला, तेव्हा गोंडराजा रामशहा रघुजीच्या भेटीस गेला. रामशहाच्या पवित्र आचरणाचा रघुजीवर परिणाम झाला व रघुजी तेथून परतला.

रामशहाच्या कारकिर्दीत सोमाजी उर्फ शंकर ढुमे याला आपल्या राज्यात नोकरी दिली. ५० घोड्यांचा तो रिसालतदार झाला. त्याने गडबोरी येथील मोकासदाराचे बंड मोडून काढले. ही कामगिरी पाहून १७३४ मध्ये त्यास किल्ले गडबोरी परगण्यातील २० गावांच्या देशपांडेपणाची सनद दिली गेली. या सनदीमुळे अनेक मराठे लोक चंद्रपूर जिल्ह्यात स्थायिक झाले. १७३५ मधील घुग्गुस लढाईचा कवी माधवरचित पोवाडा अत्यंत अभ्यसनीय आहे. रामशहा हा कर्तबगार असून प्रजा त्यास मान देत आहे. रामशहाने लेंडीतळ्याची डागडुजी केली आणि उत्तरेस रामाळा तलाव असे नाव दिले. त्याने त्या तळ्यातून पूर्ण शहरास पाणीपुरवठ्याची सोय केली. याशिवाय त्याने नगिनाबाग तयार केली. त्याचा मृत्यू १७३५ मध्ये झाला.

## चंद्रपूरचा शेवटचा गोंडराजा निळकंठशहा (१७३५–१७५१)

रामशहाच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा निळकंठशहा गादीवर बसला. तो व्यसनाधीन व क्रूर स्वभावाचा होता. १७४९ मध्ये आद्य रघुजीने चंद्रपूरवर स्वारी केली, त्यात निळकंठशहाचा पराभव झाला. दोघांत तह झाला. या तहात उत्पन्नाचा दोन तृतीयांश हिस्सा रघुजीस मिळाला व किल्ल्याची व्यवस्था रघुजीकडे आली. पुढे भोसल्यांचा किल्लेदार शिवाजीपंत टाळकुटे यास निळकंठशहाने हाकलून दिले. तेव्हा रघुजी १७५१ मध्ये चंद्रपूरवर चालून गेला. त्याने निळकंठशहाचा पराभव करून त्यास कैद केले व चंद्रपूरचे सर्व राज्य आपल्या राज्यास जोडले आणि निळकंठशहास कैद करून बल्लाळपूरच्या किल्ल्यात ठेवले तेथेच निळकंठशहाचे निधन झाले. चंद्रपूरच्या या शेवटच्या गोंड राजाची समाधी चंद्रपुरास राजधानी करणाऱ्या राजा खांडक्या बल्लळशहाच्या समाधीजवळ आहे.

* * *

# धर्म व तत्त्वज्ञान





## वैदिक हिंदू धर्मसंकल्पना

■ डॉ. कल्याणी नामजोशी

**हा धर्म आदिकालापासून चालत आला आहे व अनंत कालापर्यंत चालत राहणार आहे, असा हा सनातन विशुद्ध धर्म आहे. श्रुतिस्मृती व पुराणे यांत त्याचे स्वरूप स्पष्ट करून सांगितले आहे. श्रुतीमध्ये त्रिकालाबाधित धर्मतत्त्वे सांगितली आहेत. स्मृतीमध्ये आचार कसा करावा, हे दाखविले आहे व या धर्माप्रमाणे वागून कोणी आपल्या जन्माचे सार्थक करून घेतले., यासंबंधीच्या कथा पुराणांमध्ये आहेत. या तीनही ग्रंथांचा समन्वय पाहून या धर्माची तत्त्वे समजून घ्यावयाची असतात.**

वेद म्हणजे सत्यज्ञान. या सत्यज्ञानाच्या पायावर या धर्माची रचना झालेली असल्याने याला ज्ञानमूलक धर्म, विज्ञानाधिष्ठित धर्म किंवा वैदिक धर्म असे म्हणतात. या कारणामुळे भौतिक विज्ञानात ज्ञान व विज्ञान (तत्त्वज्ञान व तंत्रज्ञान) या संबंधाने कितीही प्रगती झाली, तरी वैदिक धर्माचे तत्त्वज्ञान असत्य ठरण्याचे भय उत्पन्न होत नाही. जगातील सर्व प्रकारच्या ज्ञान-विज्ञानाचे बीज वेदवाङ्मयात सापडते. त्यामुळे सर्व प्रकारच्या ज्ञान-विज्ञान शाखांचे मूळ असणारा व सत्यज्ञानाचे प्रतिपादन करणारा हा वेदाधिष्ठित धर्म 'वैदिक धर्म' या नावाने ओळखला जातो. वेदोऽखिलो धर्ममूलम्।

वेदाला श्रुती, वेद, अम्नाय ही मुख्य नावे आहेत. तसेच निगम आणि आगम नावानेही वेदाला संबोधले जाते.

वैदिकधर्म भिन्नभिन्न नावांनी ओळखला जातो. धर्म, मानवधर्म, मनुष्यधर्म, आर्यधर्म, सनातनधर्म, श्रुतिस्मृतिपुराणोक्त धर्म, हिंदुधर्म अशी या धर्माची नावे आहेत. वास्तविक या धर्माला फक्त 'धर्म' एवढेच नाव पुरेसे आहे. धर्म शब्दाचा नुसता उच्चार करण्यानेच याचा बोध होतो. 'धृ'=धारण करणे. व्यासांनी धर्माचे लक्षण पुढील

श्लोकात सांगितले आहे – धारणाद्धर्ममित्याहुर्धर्मो धारयेत प्रजाः। (म.भा.शा.प. १०९.११) धारण करीत असल्याने त्याला धर्म म्हटले आहे. धर्म हा समाजाचे धारण करतो. समग्र वेद, स्मृती, वेदवेत्ते ह्यांचे शील व आचार आणि धार्मिक सज्जनांचा आत्मसंतोष हे धर्माचे मूलाधार आहेत.

वेद हे धर्माचे मूलाधार असून ते अपौरुषेय व नित्य आहेत. वैदिक धर्माचा उदय बौद्ध, यहुदी, इस्लाम, ख्रिस्ती ह्या धर्मांप्रमाणे एका प्रेषित किंवा मार्गदर्शक व्यक्तीकडून झाला, असे इतिहास सांगत नाही. वैदिक धर्माच्या उत्पत्तीचा इतिहास सांगतो की, चोदना व निःश्रेयस् लक्षणांनी युक्त असलेला म्हणजे अभ्युदय आणि निःश्रेयस् या अंगांनी युक्त असणारा धर्म सांगण्याचा अधिकार श्रेष्ठ आचार-विचार व सत्यवक्त्या पुरुषांकडे असतो. त्यामुळे हा धर्म अनादिकालापासून चालत आला आहे तसेच तो कोणा एका व्यक्तीच्या नावाने ओळखला जात नाही म्हणजे, हा धर्म आदिकालापासून चालत आला आहे व अनंत कालापर्यंत चालत राहणार आहे, असा हा सनातन विशुद्ध धर्म आहे. श्रुतिस्मृती व पुराणे यांत त्याचे स्वरूप स्पष्ट करून सांगितले आहे. श्रुतीमध्ये त्रिकालाबाधित धर्मतत्त्वे सांगितली आहेत. स्मृतीमध्ये आचार कसा करावा, हे दाखविले आहे व या धर्माप्रमाणे वागून कोणी आपल्या जन्माचे सार्थक करून घेतले व असा आचार न केल्यामुळे कोणी आपल्या धर्माचे मातेरे करून घेतले, यासंबंधीच्या कथा पुराणांमध्ये आहेत. या तीनही ग्रंथांचा समन्वय पाहून या धर्माची तत्त्वे समजून घ्यावयाची असतात.

### हिंदू धर्माचे उद्दिष्ट

हिंदू धर्म हे वैदिक धर्माचे नाव देश-विदेशांत अधिक प्रसिद्ध व रूढ आहे. त्याची व्याख्या तन्त्रग्रंथामध्ये दिली आहे. **हिंसया दूयते यस्मात् हिंदुरित्युच्यते बुधैः।** दुसऱ्याला काया-वाचा-मने करून कोणतेही कष्ट न देणे व सर्वांना अभय देणे याचे नाव अहिंसा होय.

सर्व जगाला तीन प्रकारची शान्ती देणे हे अहिंसेचे विधिस्वरूप आहे. आध्यात्मिक शान्ती, आधिदैविक शान्ती व आधिभौतिक शान्ती सर्वत्रांच्या आध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक अशा त्रिविध दुःखांची निवृत्ती करणे, हे हिंदु धर्माचे मुख्य उद्दिष्ट आहे.

प्रत्येक मनुष्याने आपल्या आत (अंतरंगात) समता स्थापन करून सुखी व्हावे तो व्यष्टीधर्म आहे, त्याचप्रमाणे आपल्या सभोवतालच्या विश्वामध्ये जीवमात्राच्या व सृष्टीच्या ठायी समता स्थापन करून सर्वांच्या प्रगतीचा, सुख-समाधानाचा मार्ग मोकळा करून देऊन सर्व जीवमात्रांचे व सृष्टिमात्रांचे सुख साधणे म्हणजेच आध्यात्मिक व आधिभौतिक पातळीवरील धर्माचरण होय. आधिदैविक पातळीवर प्रदूषणरहित वातावरण व पर्यावरण ह्यांचा तोल ह्या दोन महत्त्वाच्या गोष्टींच्या संदर्भात बारकाव्याने विचार केला आहे. निसर्गाला लुटून मानवाने सुख मिळवू नये तर निसर्गाच्या अनुग्रहाने आपले जीवन सुखी-समाधानी करावे, हे ज्या विद्येने समजते; ती प्रामाणिकपणे जाणून घेऊन तिचा मानवी जीवनाच्या कल्याणासाठी अत्यंत डोळसपणे उपयोग करून घेणे, हे वैदिक धर्माचे अत्यंत महत्त्वाचे अंग आहे. व्यष्टी व समष्टी तसेच अभ्युदय व निःश्रेयस् या अंगांनी समृद्ध असणारा हा धर्म सकल मानवजातीचे कल्याण करणारा विश्वधर्म आहे. स्वतःच्या लौकिक धर्माचे आचरण करीत असतानाही या विश्वधर्माचा शोध कुणी गांभीर्याने घेईल, तर त्याला वैदिक धर्माच्या प्रशस्त विचारसरणीविषयी आदर वाटल्याशिवाय राहणार नाही. **'स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः।'** असे मुळातच या धर्माचे तत्त्वज्ञान आहे.

अखिल वेद हे धर्माचे मूळ आहे. पूर्वी एकच वेद होता व नारायण हा एकच देव सर्वांचा उपास्य होता.

व्यासांनी एका वेदाचे चार भाग केले ते अध्ययनाच्या सौकर्यासाठी (सुलभतेसाठी). ऋग्वेद-यजुर्वेद-सामवेद-अथर्ववेद अशी नावे त्यांना दिली. त्या विभागांचे अध्ययन करणाऱ्यास ऋग्वेदी, यजुर्वेदी, सामवेदी व अथर्ववेदी असे म्हणू लागले. एकापेक्षा अधिक वेदांचे अध्ययन करणाऱ्यांना द्विवेदी, त्रिवेदी, चतुर्वेदी असे म्हणू लागले. कालाच्या ओघात शाखाभेद निर्माण झाले. ऋग्वेदाच्या पाच शाखा, यजुर्वेदाच्या १६ शाखा,

कृष्णयजुर्वेदाच्या पंच्याऐंशी शाखा, सामवेदाच्या हजार तर अथर्ववेदाच्या नऊ शाखा आहेत.

### कृण्वन्तो विश्वमार्यम्।

वैदिक धर्माची महत्त्वाची ओळख म्हणजे यज्ञसंस्था. यज्ञवेदी (इयं वेदिः भुवनस्य नाभिः) हा आर्यांच्या कार्यक्षेत्राचे केंद्र होते. जेथे आर्य यज्ञ करीत, ती भूमी यज्ञाच्या माध्यमातून आर्यांना प्राप्त होत असे. सुष्ट आणि दुष्ट प्रवृत्तींच्या लढ्यात सज्जन आर्यांना विजय प्राप्त होऊन ते तेथील समाज संस्कारीत करीत असत. अशा प्रकारे 'कृण्वन्तो विश्वमार्यम्।' ऋग्वेद (९-६३-५) या वैदिक आदेशानुसार वैदिक धर्माचे अनुयायी देशोदेशी निर्माण करण्यासाठी आर्यांनी म्हणजे सत्पुरुषांनी ऋषिमुनींनी अपरंपार कष्टाने, धैर्याने, चिकाटीने व सातत्याने केले. वैदिक ऋषींच्या परिश्रमाने राष्ट्र बनले आहे. वैदिक धर्म दोन अंगांनी संपन्न आहे. १. प्रवृत्तिपर २. निप्रवृत्तिपर. जन्माला आलेल्या जीवांच्या प्रवृत्ती पूर्वसंस्कारांप्रमाणे भिन्नभिन्न असतात. काही जीव वैराग्याची कवचकुंडले घेऊनच जन्माला येतात. त्यांचे जीवन निवृत्तिपर असते. ते ब्रह्मचर्याश्रम किंवा संन्यासधर्माने राहतात. प्रवृत्तिधर्म हा अत्यंत गौणरूपाने त्यांचा आश्रय होतो. तर सामान्यतः प्रवृत्तिपर जीवन-जगतातील आनंद व सुख यांच्या उपभोगासाठी उत्सुक असते. मानवाचे जीवन सुखाने व्यतीत व्हावे यासाठी वैदिक धर्मात त्याचे चार टप्पे मानलेले आहेत. त्यांना आश्रम म्हणतात. १. ब्रह्मचर्य, २. गृहस्थ, ३. वानप्रस्थ, ४. संन्यास. ब्रह्मचर्याश्रमात विद्याध्ययन पूर्ण करून गृहस्थाश्रमात सर्व प्रकारच्या सुखोपभोगांचा आनंद लुटावा व वानप्रस्थाश्रमात लौकिक जीवनातील उपभोगांची आसक्ती सोडून जीवन जगन्नियंत्याच्या चिंतनात, त्याच्या प्राप्तीसाठी केल्या जाणाऱ्या प्रयत्नात व्यतीत करावे व चित्तवृत्ती निरासक्त झाल्यास संन्यासधर्माचा स्वीकार करून जीवनाचा काळ केवळ ईश्वर चिंतनात व्यतीत करावा. येथे प्रवत्तिधर्म प्रधान आहे व निवृत्तिधर्माचा आश्रय व्यक्तीच्या प्रकृतिधर्माप्रमाणे कमी-अधिक स्वरूपात घेतला जातो, अशी वैदिक धर्माची सामान्य धारणा आहे.

### आचारप्रधान धर्म

वैदिक धर्मात कृती म्हणजे आचार प्रधान मानला आहे. तत्त्वज्ञान जीवनात उतरले पाहिजे, असा आग्रह आहे. परिस्थितीवशात तत्त्वज्ञान जाणून घेता आले नाही; तरी आचार धर्माधिष्ठित असलाच पाहिजे, असा आग्रह आहे. यामुळे 'आचार प्रभवो धर्मः।' असे म्हटले आहे.

वैदिक धर्मात आचार धर्माधिष्ठित असावा यासाठी शास्त्रप्रामाण्याचा विचार प्रभावी आहे. विधिनिषेध शास्त्रप्रामाण्याने स्वीकारले आहेत. व्यक्तीला वाटते म्हणून नाही तर शास्त्र सांगते म्हणून आचरण केले पाहिजे, असा कटाक्ष आहे. नित्य, नैमित्तिक कर्मे शास्त्राने सांगितली आहेत. कर्माच्या योग्यायोग्यतेनुसार पाप-पुण्याचा विचार केला आहे. अयोग्य कर्माविषयी पश्चात्ताप झाल्यास त्यासाठी शास्त्राने प्रायश्चित्त-कर्मे सांगितली आहेत. अयोग्य कर्माने उत्पन्न होणाऱ्या पापाचा परिहार एकवार होऊ शकतो, त्यासाठी प्रायश्चित्त-कर्म हा उपाय आहे. परंतु पापकर्माची प्रवृत्ती वारंवार झाल्यास ते भोगावेच लागते, असा धर्मशास्त्राचा दंडक आहे.

सारांशाने ऐहिक उत्कर्ष, पारलौकिक सुख व त्याची साधने मिळून अभ्युदयाचे स्वरूप पूर्ण होते. ज्या स्थितीत अनिष्टापेक्षा इष्टच अधिक असते, अशी स्थिती म्हणजे अभ्युदय होय. मोक्ष, सर्वोच्च किंवा शाश्वत साध्य याला निःश्रेयस् म्हणतात. ज्या स्थितीत कशाचीच अपेक्षा राहत नाही किंवा पूर्ण साधनाची स्थिती प्राप्त होते, अशा स्थितीला निःश्रेयस म्हणतात. ही दोन साध्ये ज्या साधनांनी प्राप्त होतात तो धर्म समजावा. निःश्रेयस्लक्षण धर्म-निःश्रेयस् अर्थात उच्चतर किंवा आत्यंतिक सुख हे धर्माचे साध्य आहे, हे धर्मलक्षणात सांगितले. मनुष्याला उच्चतर सुख तीन प्रकारांनी प्राप्त होते

१. विषयेन्द्र संयोगाने प्राप्त होणारे सुख.
२. मनातील वासना पूर्ण झाल्याने होणारे सुख.
३. वासनात्यागाने, होणारे सुख म्हणजे आत्मसुख, चिरसुख

वासनेचा अभाव मनुष्याला नेहमीच शक्य असतो असे नाही. मानवाचे सामान्य जीवन आहार-विहार-निद्रा यांनी

युक्त असते. त्यातही सुखदुःखाचा अनुभव येतो व त्यासाठी कर्माची आवश्यकता असते. त्यामुळे कर्माची अपरिहार्यता लक्षात घेऊन कोणते कर्म जास्तीतजास्त सुखाला अधिक कारण होईल, याचा विचार करून चोदनालक्षण म्हणजे कर्माला प्रवृत्त करणारा धर्म मानवाच्या कल्याणाकरिता मार्गदर्शक ठरतो. तर वासनाराहित्य आणि त्याला आवश्यक असलेले शरीरस्वास्थ्य ही दोन्ही निःश्रेयस्‌लक्षण धर्माची मुख्य अंगे ठरतात. ही दोन्ही प्राप्त झाल्याशिवाय आत्मसुखाचा अनुभव येत नाही. विषयांबद्दल (विषयी) वैराग्य हे वासनेच्या अभावाला आवश्यक असते. हे वैराग्य विषयांचा अस्थिरपणा, त्यांचे पराधिनत्य आणि आत्मसुख यांचे ज्ञान झाल्याने प्राप्त होते. लौकिक जीवनातील सुख कर्म केल्यावाचून मिळणे शक्य नाही. त्यामुळे ज्ञान व कर्म या दोहोंच्या समुच्चयानेच उच्च सुखाची प्राप्ती होते. केवळ ज्ञानाने किंवा केवळ कर्माने आत्मसुखाची प्राप्ती होत नाहीच परंतु लौकिक जीवनही यशस्वीपणे / सुखाने जगता येत नाही. म्हणून वैदिक धर्म हा कर्म म्हणजे प्रवृत्ती आणि ज्ञान म्हणजे निवृत्ती या दोन अंगांनी युक्त आहे, असे म्हणतात. हा प्रवृत्ती-निवृत्ती संयोग हेच या धर्माचे खरे रहस्य आहे.

### यम आणि नियम

वैदिक धर्माच्या आणखी दोन अंगांचा विचार करणे इष्ट / आवश्यक आहे. पहिले अंग यम तर दुसरे अंग नियम आहे. यम हा धर्मातील देश-काल-परिस्थितीपरत्वे अपरिवर्तनीय असतो. जसे अहिंसा, सत्य, अस्तेय, अपरिग्रह, ब्रह्मचर्य यांसारखी आचरणात आणण्याची तत्त्वे देश-काल-परिस्थिती, स्त्री-पुरुष, जात, धर्म, भाषा यांच्या बंधनांच्या पलीकडे असणारी तत्त्वे आहेत. तर दुसरे अंग नियम आहे. हा धर्माचा परिवर्तनीय भाग आहे. तो देश-काल आदी गोष्टींवर अवलंबून असणारा भाग आहे. जसे- शौच, संतोष, तप, स्वाध्याय, ईश्वरप्राणिधान, शुचितेच्या धारणा, ऋतुमान, देश-कालाप्रमाणे बदलतात. संतुष्टतेचा विषय, तपासाठी आचरावयाची कर्मे, स्वाध्याय व ईश्वरविषयक धारणा आणि त्याच्या उपासनेचे मार्गही देश-काल-धर्म-स्थिती-स्त्री-पुरुष आदी गोष्टींप्रमाणे वेगवेगळ्या ठिकाणी एकही असू शकतात व एकाच ठिकाणी वेगवेगळ्या प्रकाराने आचरणात आणल्या जातात. त्याला कारण रुचीभेद, आर्थिक परिस्थिती, देश-कालाची अनुकूलता अशा अनेक गोष्टी कारणीभूत ठरतात. वैदिक धर्माचे हे महत्त्वाचे लक्षण व स्वरूप या धर्माच्या अभ्यासकाने प्राधान्याने लक्षात ठेवण्यासारखे आहे. मनुस्मृतीपासून पराशरस्मृतीपर्यंत संख्येने वीसच्या वर असलेल्या स्मृतींची रचना ऋषींकडून घडली, याचे एकमेव कारण देश-काल-परिस्थितीत घडणारे बदल. आचरणांतील बदल कालाच्या ओघात अपरिहार्य असल्याने वैदिक धर्माने सातत्याने कालाची पावले ओळखली आहेत. त्यामुळे हा धर्म आग्रही आचरणास कठीण नाहीतर सर्वसमावेशक, सर्वांच्या कुवतीचा विचार करून आचारधर्म सांगणारा, वैश्विक पातळीवर प्रशस्त विचार करणारा मानवतावादी धर्म आहे.

### वैदिक धर्माची व्याख्या

वैदिक धर्माची व्याख्या नेमक्या शब्दांत सांगायची तर प्रशस्त सभामंडपाच्या संकल्पनेने स्पष्ट करता येईल. वैदिक धर्म हा प्रशस्त सभामंडपाप्रमाणे आहे, अशी कल्पना केली तर त्या सभामंडपाला आधार देणारा मध्यवर्ती आधारस्तंभ म्हणजे 'कर्मवादाचा सिद्धान्त'. त्यातील कर्मविपाकाचा परिणाम म्हणून पुनर्जन्माचा सिद्धान्त या धर्माने मांडला आहे. हा सिद्धान्त या धर्माचे महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे. तर सृष्टीच्या उत्पत्ती, स्थिती, लय. ह्यांना कारक असणारे एकमेवाद्वितीय कर्तुम्, अकर्तुम्, अन्यथा कर्तुम् तत्त्व म्हणजे परब्रह्म परमात्मा होय. ते ज्ञेय व प्राप्य आहे. निर्गुण व सगुण रूपांनी त्याचे वर्णन करता येते, हा मूलभूत सिद्धान्त आहे. तसेच या सभामंडपाला आधारभूत असणारे चार टोकांचे चार खांब आहेत. त्यांचे स्वरूप पुढीलप्रमाणे सांगता येतील.

१. चार वेद- ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद- पहिला खांब

२. चार वर्ण आणि चार आश्रम- दुसरा खांब

३. चार पुरुषार्थ- धर्म, अर्थ, काम, मोक्ष-तिसरा खांब
४. चार साधनामार्ग- कर्म, ज्ञान, भक्ती व योग-चौथा खांब

अशा प्रकारे वैदिक धर्माचे वर्णन थोडक्यात करता येईल.

### वैदिक धर्मातील सिद्धान्तांचा विचार

प्राचीन आचार्यांनी वैदिक धर्माचे सिद्धान्त सांगितले आहेत, त्यांचा विचार पुढीलप्रमाणे करता येईल.

**परार्थ कर्म**- मनुष्याला कर्म अपरिहार्य आहे हे एकदा मान्य केल्यावर स्वतःची कर्मे स्वतःच करावीत, का सहकार्याने करावीत, हा प्रश्न निर्माण होतो. अर्थात जीवन जगण्याला आवश्यक सर्व कर्मे एकटा मनुष्य करू शकत नाही. ती परस्परांनी परस्परांच्या सहकार्याने करावीत व जीवनात निःश्रेयसाचीही प्राप्ती करून घ्यावी.

**सह्यज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः।**
**अनेन प्रसविभ्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक।।**
**देवान् भावयतानेन ते देवा भवयन्तु वः।**
**परस्परं भावयन्तः श्रेयः परमवाप्स्यथ।।**
**इष्टान् भोगान् हि वो देवा दास्यन्ते यज्ञभिवताः।**
**तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुङ्क्ते स्तेन एव सः**
(भ.गी. ३.१०.१२)

**अर्थ**- पूर्वी ब्रह्मदेवाने प्रजा उत्पन्न केल्या, त्या यज्ञासह केल्या. ब्रह्मदेव प्रजांना म्हणाला की, या यज्ञाच्या योगाने तुम्ही आपला अभ्युदय साधा. यज्ञ हा तुमचे मनोरथ पूर्ण करणारा होवो. या यज्ञाने तुम्ही देवांची भावना (समृद्धी) कर. ते देवही तुमची भावना (समृद्धी) करतील. याप्रमाणे परस्परांची भावना करित दोघेही परम श्रेय प्राप्त करून घ्या.

हा परस्पर भावनेचा व आश्रयत्वाचा सिद्धान्त फारच मोलाचा आहे. तो मानव-मानवातच नाही तर पशू,पक्षी, जीव, जंतू, वृक्ष, वेली, कुटुंबे, राष्ट्रे यांमध्येही लागू पडणारा आहे. या सिद्धान्ताच्या आधारे व्यष्टी जीवनात पति-पत्नि, पिता-पुत्र, भाऊ-भाऊ, माता-भगिनी-सुहृदांनी परस्परांच्या स्नेह सहकार्याने अभ्युदय साधावा. यातून कुटुंब-संस्था वैदिक धर्माने दृढमूल केली.

आपापल्या कर्मात नैपुण्य मिळवून परस्परांचे हित साधावे, हाच वर्णव्यवस्थेचा उद्देश होता. दानपुष्ट ब्राह्मणांनी आपला सर्व वेळ ज्ञानवृद्धीकडे करावा आणि आपल्या ज्ञानाचा इतर वर्णांना लाभ करून द्यावा, हाच दानाचा प्रमुख उद्देश होता. प्रजांनी कर देऊन राजाचे पोषण करावे आणि राजाने अधार्मिक व उपद्रवी लोकांचा निग्रह करून प्रजांचे पोषण करावे, हा राजा व प्रजा यांचा परस्पर हितसंबंध होता. गुरू-शिष्य, स्वामी-सेवक इत्यादींचे परस्पर संबंधही अशाच प्रकारचे निःश्रेयसाला उद्देशून ठरविण्यात आले होते.

### धर्माचे प्रकार

धर्माचे विविध प्रकार मानले आहेत ते असे-

१. सामान्य धर्म - यालाच नीतिधर्म म्हणतात. तो सर्वांना सारखाच लागू असतो. सत्य व आत्मपौम्य दृष्टी ही सामान्य धर्माची दोन तत्त्वे होत.

२. वर्ण धर्म- ज्या-त्या वर्णाला लागू असलेल्या धर्माला वर्ण धर्म म्हणतात. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र हे वर्ण आणि आजची जातिव्यवस्था या गोष्टी अगदी भिन्न आहेत.

३. आश्रमधर्म- हा विशिष्ट आश्रमापुरता असतो. धर्म-अर्थ-काम-मोक्ष हे भारतीय संस्कृतीचे चार पुरुषार्थ मानलेले आहेत. ते साध्य करण्याचा मुख्य उपाय वैदिक आश्रमव्यवस्थेच्या रूपात सांगितलेला आहे.

वर्णाश्रम धर्म - हा विशिष्ट वर्णातील माणसाला विशिष्ट आश्रमास लागू असतो.

गुण धर्म- ज्या भूमिकेवर किंवा अधिकारपदावर मनुष्य असेल, त्याला अनुसरून करायचे कर्तव्य.

निमित्त धर्म- प्रसंगोपात घडलेल्या गोष्टींमुळे जे वेगळे आचरण करावे लागते, त्याला निमित्त धर्म म्हणतात.

आपद्धर्म- कित्येकदा दिव्य-भौम उत्पात, राज्यक्रांती दुष्काळ, निर्वासन इत्यादी आकस्मिक कारणांनी वर्णव्यवस्था बिघडते व लोकांना वर्णोचित कर्मे करणे अशक्य होऊन बसते. अशा स्थितीत एका वर्णाने अन्य वर्णाचा धर्म अपवाद म्हणून स्वीकारण्यास हरकत नाही, अशी सोय शास्त्राने केली आहे. या सोयीलाच आपद्धर्म

म्हणतात. आपत्ती टळून गेल्यावर किंवा समाजाची घडी नीट बसल्यावर ज्या-त्या मनुष्याने ज्याचा-त्याचा धर्म पुनश्च अंगीकारावा, असा नियमही धर्मशास्त्राने घालून दिला आहे.

### यज्ञसंस्था

यज्ञसंस्था-अग्निहोत्र हे यज्ञसंस्थेचे (व यज्ञसंस्था) हे वैदिक धर्माचे महत्त्वाचे अंग आहे. अग्निहोत्री यजमान निरनिराळे यज्ञ करीत असत. यज्ञाचे ऐहिक व आमुष्मिक असे दोन भाग आहेत. ऐहिक म्हणजे इंद्रादी अधिकारी देवतांची द्रव्य, पशू, इत्यादी वस्तू देऊन पूजा करणे व आमुष्मिक म्हणजे अग्नीत हवन करणे होय. अश्वमेधासारखे यज्ञ हे ऐहिक व आमुष्मिक अशा दोन्ही कर्मांनी युक्त होते.

वैदिक धर्मातील विशिष्ट संकल्पना-

१. ऋणत्रय- भारतीय नीतिशास्त्रातील ऋणत्रय ही कल्पना मूलभूत आणि उदात्त आहे. या ऋण कल्पनेचा मेळ आश्रम-व्यवस्थेशी घालून दिला आहे. देवऋण, पितृऋण व ऋषिऋण- देव ऋण यज्ञाने, पितरांचे ऋण प्रजोत्पादनाने व ऋषिऋण ब्रह्मचर्याने फेडता येते.

२. अतिथीचे स्वागत- आतिथ्य हे गृहस्थाश्रमातील एक प्रमुख कर्तव्य मानलेले आहे.

३. पंचमहायज्ञ- देवयज्ञ, पितृयज्ञ, भूतयज्ञ, मनुष्ययज्ञ व ब्रह्मयज्ञ हे पंचमहायज्ञ गृहस्थाने नित्य केले पाहिजेत.

४. दानस्तुती- दान हे धर्माचे श्रेष्ठ अंग आहे. ते सत्पात्र करावे, असा धर्माचा कटाक्ष आहे.

५. इष्टपूर्त कर्मे- मंदिरे उभारणे, उद्याने लावणे, तलाव खोदणे, पाणपोया उभारणे इत्यादी धर्म व समाजोपयोगी कर्मांचा अंतर्भाव यात होतो.

चोदना लक्षमणधर्माविषयी पुरेसे विवेचन झाल्यानंतर निःश्रेयस् अंगाविषयी तत्त्वज्ञानाची चर्चा वैदिक धर्माने वेदान्त म्हणजे वेदाचा अंतिम भाग. विचारात घेतला आहे. वेदाच्या मंत्रसंहिता, ब्राह्मण आणि आरण्यक या तीन भागांत विशेषत्वाने प्रवृत्तिधर्माची चर्चा केली आहे. तत्त्वज्ञानाची चर्चा करणारी उपनिषदे या सुरुवातीच्या तीन भागांतूनही आढळतात. चोदनालक्षण धर्म हे वैदिक धर्माचे बहिरंग आहे व तत्त्वज्ञानाचे स्वरूप हे त्याचे अंतरंग आहे.

वैदिक धर्माची मूलतत्त्वे भारताची राष्ट्रीय अस्मिता सिद्ध करणारी आहेत. ती मूलतत्त्वे अशी आहेत.

१. सर्वत्र एकच चैतन्यमय तत्त्व भरलेले आहे. (एकमेवद्वितीयं ब्रह्म) (only the unconditioned Brahma one and none else.)

२. सर्व खल्विदं ब्रह्म। हे सर्व काही परब्रह्म आहे. (The unconditioned Brahma one manifests in many.)

३. सर्व काही गतिरूप आहे. (The one is dynamic.)

४. सर्व काही ज्ञानमय आहे. (The one is conscient.)

५. ही गती नियमबद्ध आहे. कर्मतत्त्वाने ती नियंत्रित आहे आणि पुनर्जन्म हे त्या कर्मतत्त्वाशी निगडित सलग्न तत्त्व आहे. (Discifain of cosmic motion, Karma and rebirth)

६. सप्तलोकात्म विश्व व त्याची घनविरल अवस्थेनुसार विभागणी.

(The cosmos and its seven planes.)

७. विश्वाचे परस्पराश्रयत्व (Interdependence rearlier penetration and reciprocity.)

८. योग आणि यज्ञ (The science of yoga and sacrifice)

९. अनुभूतिवाद (The science of realization.)

१०. साधनानामनेकता

भारतीय संस्कृतीची उभारणी या दहा तत्त्वांवर झाली आहे आणि या संस्कृतीच्या कोणत्याही प्रवाहात या तत्त्वांची अनुस्यूतता दृष्टोत्पत्तीला आल्यावाचून राहत नाही. उपनिषदे व भगवद्‌गीता या वाङ्मयात ही तत्त्वे विकसित स्वरूपात आढळतात. पण ऋग्वेदादी वेदांचा व वैदिक वाङ्मयाचा उलगडाही या मूलसूत्रांच्या आधारेच करावा लागतो.

# मध्ययुगीन हिंदू समाज

**■ संकलम : दीपक हनुमंत जेवणे**

श्रुति-स्मृति-पुराणोक्त धर्म आचरणारा व नाना दैवतांची पूजोपासना करणारा असा भारतातील सुमारे ८० टक्के समाज हा हिंदू समाज आहे. हिंदू धर्म जगातील अतिप्राचीन व आद्य असा धर्म आहे. तो ऋषि-महर्षींनी श्रुती, स्मृती, पुराणे, इतिहास इत्यादी. ग्रंथांतून आकाराला आणलेला आहे.



हिंदूंचा जो धर्म तो हिंदू धर्म होय. मात्र हिंदू लोकांची शास्त्रे हिंदूंच्या धर्माला हिंदू धर्म म्हणत नाहीत. ती शास्त्रे या धर्माला आर्यधर्म, वैदिक धर्म, सनातन धर्म किंवा वर्णाश्रमधर्म या नावांनी ओळखतात. श्रुती शास्त्रे, पुराणे इत्यादी. ग्रंथांमध्ये धर्माच्या सामान्य म्हणून ज्या व्याख्या सांगितल्या आहेत, त्या जशा हिंदू धर्माच्या व्याख्या आहेत तशा त्या मानवमात्रांच्या धर्माच्याही व्याख्या आहेत. 'धारणाद्धर्ममित्याहु:'= समाजाची धारणा करतो तो धर्म होय. हाच बोध अधिक स्पष्ट करण्याकरिता याच अर्थाची दुसरी एक व्याख्या महाभारतात दिली आहे.

लोकयात्रार्थमेवेह धर्मस्य नियम: कुत: ।
उभयत्र सुखोदर्क इह चैव परत्र च ।।

अर्थ: या भूतलावर लोकयात्रा सुखाने चालावी म्हणून धर्माचरणाचे नियम सांगितले आहेत. हे नियम इह आणि पर अशा उभय लोकी सुख देणारे आहेत.

धर्म म्हणजे नियमबंधन आणि लोकयात्रा म्हणजे समाजाचा सार्वजनिक व्यवहार होय. धर्म म्हणजे नियमबंधन आणि समाजाला धारण करील असे काहीतरी बंधन असल्याशिवाय धर्म कल्याणकारक होणार नाही, ही जाणीव होते.

इतर कोणत्याही धर्मापेक्षा हिंदू धर्माच्या प्रवर्तकांनी व शास्त्रकारांनी खोल, सूक्ष्म व दूरवर विचार करून व्यक्तीचे इहपर कल्याण साधणारी आणि दु:ख आणि अस्वास्थ्य कमी होऊन अधिकात अधिक सुख देणारी अशी राहणी शोधून काढली आणि त्याबरोबरच काही नियमही सांगून ठेवले. या नियमांनाच आचारप्रभाव धर्म म्हणतात.

ज्या समाजरचनेत स्थितिस्थापकता असते, ती समाजरचना अनंत कालापर्यंत टिकू शकते, कारण तीतबदलत्या परिस्थितीला अनुसरून धर्मात कसे आणि काय फेरबदल करावते हे सांगितलले असते. हिंदू धर्मात एकच ग्रंथ प्रमाणभूत मानलेला नाही. विशिष्ट कारणांसाठी विशिष्ट ग्रंथ हिंदू धर्मात प्रमाणभूत मानलेले आहेत. एकाच ग्रंथात समाजाच्या सार्वकालिक सुख-स्वास्थ्यासाठी नियम सांगणे शक्य नसते. जसजशी परिस्थिती बदलते, तसतसे धर्माला वेगळे वळण द्यावे लागते. बदलत्या परिस्थितीत जुने नियम बदलावे लागतात. तशी व्यवस्था व आज्ञा हिंदू धर्मात आहे, हे त्याचे वैशिष्ट्य होय.

### हिंदू धर्माचा उगम आणि विकास

कोणत्याही एका व्यक्तीला ईश्वरी साक्षात्कार होऊन या धर्माची स्थापना झालेली नाही किंवा कोणत्याही एकाच धर्मग्रंथाचे निरपवाद प्रामाण्य स्वीकारून हा धर्म उदयास आलेला नाही. त्यामुळे या धर्माचा उगम केव्हा व कसा झाला, हे निश्चितपणे सांगता येत नाही.

परंतु वैदिक धर्माने जी विशिष्ट प्रकारची धार्मिक परिस्थिती निर्माण केली होती, तिची प्रतिक्रिया म्हणून ऐतिहासिक हिंदू धर्म उद्‌भवला, असेच एका अर्थी म्हणता येईल. तथापि हिंदू धर्माने वैदिक श्रद्धा व आचार यांच्याकडे पाठ फिरवली नाही. एवढेच नव्हे तर त्याने वेदांसंबंधीची आपली निष्ठा ठामपणे प्रतिपादिली. ही वेदनिष्ठा हिंदू धर्माला वेदोत्तरकालात उगम पावलेल्या तथाकथित नास्तिक धर्मपंथांना परिणामकारक रितीने तोंड

देण्यास उपयुक्त ठरली, असे आपल्याला निश्चितपणे आढळते.

उपनिषदांना वेदान्त असे म्हणतात. कालक्रमानुसार ती वैदिक वाङ्मयाचा व युगाचा अंत दर्शवितात. त्याचप्रमाणे ती वैदिक विचारसंकुलाच्या उच्चावस्थेतचीही निदर्शक आहेत. परंतु उपनिषदांची श्रेष्ठ ब्रह्मविद्या लोकांना विशेषशी आकलनीय ठरली नाही. उपनिषदांतील तत्त्वज्ञान सामान्य जनांच्या कुवतीबाहेरचे होते. त्यांनी लोकांना धर्म शिकवला नाही. त्यामुळे पुढे वैदिक धर्माचा अपकर्ष सुरू झाला.

त्यानंतरच्या कालखंडात एक फार मोठे विचारमंथन घडून आले आणि नवीन धार्मिक प्रवृत्तींचा उदय झाला. अवैदिक किंवा नास्तिक श्रद्धा व आचार यांच्या संघटनेस ही परिस्थिती फार उत्तेजक ठरली आणि जैन व बौद्ध धर्मपंथ उदायास आले.

परंतु वैदिक धर्माच्या आचार्यांनी वैदिक विचारप्रणाली व जीवनपद्धती यांचे पुन:संघटन करण्यासाठी व नास्तिक मतांच्या प्रसारास पायबंद घालण्यासाठी वेदांगांच्या व कल्पसूत्रांच्या द्वारा लोकांचे जीवन नियंत्रित करण्याचा एक मोठा प्रयत्न केला. पण या पुनरुज्जीवनवादी आंदोलनाने कोणत्याही अर्थी लोकांच्या आंदोलनाचे रूप धारण केल्याचे दिसून येत नाही.

प्राचीन काळापासून प्रतिष्ठित वैदिक धर्माबराबरच अनेक लौकिक धर्मपंथ भारतात अस्तित्वात होते. वेदपूर्वकालातच बद्धमूल झालेले ते लौकिक धर्मपंथ वैदिक धर्माच्या विकासातही प्रभावी ठरले. त्यांच्या देवदेवता भिन्न प्रकृतीच्या असून, धार्मिक आचारही वेगळे होते. जनजातींचे हे लौकिक धर्म लवकरच वैदिक धर्माकडे आकर्षित झाले. त्यांनी वैदिक धर्माच्या श्रद्धा व आचार यांचा जरी मोठ्या प्रमाणात स्वीकार केला नसला, तरी वेदांबद्दलची आपली निष्ठा मात्र कायम ठेवली. वैदिक धर्माचा अपकर्ष सुरू झाल्यावर त्या लौकिक धर्मांना आपली अस्मिता प्रस्थापित करण्याची संधी प्राप्त झाली. वैदिक धर्माच्या हितचिंतकांनाही नास्तिक पंथांच्या आव्हानास उत्तर देण्यासाठी अशा लोकांचे साहाय्य आवश्यक वाटले. परिणामत: बरेचसे लौकिक धर्म, त्यांच्या देवता व आचार यांच्यासह वेदनिष्ठेच्या सूत्राने एका संघटनेत बांधले गेले आणि अशा प्रकारे ऐतिहासिक हिंदू धर्म उदयास आला.

या हिंदू धर्माचे प्रमुख गुणविशेष पुढीलप्रमाणे आहेत – प्रतिष्ठित वैदिक धर्माच्या इंद्रवरुणादी देवांची जागा शिव, विष्णू यांच्यासारख्या लौकिक देवदेवतांनी घेतली. उपनिषदांनी अगोदरच संहिता–कालखंडातील देवदेवतांना पदभ्रष्ट करून त्यांच्या जागी कैवल्यस्वरूप परब्रह्माची प्रतिष्ठापना केलेली होती. त्याला प्रतिशह म्हणूनच की काय हिंदू धर्माने व्यक्तित्वविशिष्ट देवतांचे पुनरुज्जीवन केले. लोक ईश्वराकडे तारक सखा व उद्धारकर्ता या नात्याने पाहू लागले. यज्ञविधीची जागा पूजाविधीने केली. उपनिषदांचे कठोर व तप:कर्कश अध्यात्मशास्त्र मागे पडून भावमधुर भक्तिमार्ग लोकप्रिय झाला. भक्तीतूनच देवपूजा व मूर्तिपूजा उगम पावली. नूतन हिंदू विचारप्रणालीवर कर्मसंन्यासापेक्षा कर्मयोगाचा प्रभाव विशेषत्वाने पडलेला दिसतो. लोकसंग्रह म्हणजे समाजाचे स्थैर्य, धारण व दृढैक्य हेच धर्माचे एकमेव ध्येय होय, अशी नवीन धर्माची घोषणा होती.

ख्रिस्तपूर्व दुसऱ्या शतकात मगधात शुंगांचे राजकीय वर्चस्व प्रस्थापित होऊन हिंदू धर्माच्या पुनरुत्थानास मोठी चालना मिळाली. हिंदू धर्माच्या उत्थानाच्या दृष्टीने शुंगांच्या राजवटीत घडलेली महत्त्वाची घटना म्हणजे महाभारतादी महाकाव्यांची रचना. लोकांच्या देवतांशी संबद्ध असलेल्या भक्तिमार्गाची शिकवण या 'लोकांच्या वेदांनी' समाजाच्या अगदी खालच्या थरापर्यंत पोचविली. याच कालखंडात हिंदू धर्माचे शैव, वैष्णव, इत्यादी. भिन्न धर्मपंथांच्या रूपाने होणारे विखंडन बद्धमूल झाले. महाभारताच्या शेवटच्या संस्करणात ग्रथित झालेले हिंदू धर्म व तत्वज्ञान यांचे लौकिक स्वरूप, मनुस्मृतीत मांडलेला सामाजिक व राजकीय संघटनेचा हिंदू आदर्श आणि कात्यायन व पतंजली यांच्या ग्रंथांत प्रतिबिंबित झालेले अभिजात संस्कृतीचे सीमांकन हे शुंगकालात घडून आलेल्या हिंदू धर्माच्या बलविस्ताराचे प्रमुख पैलू होते.

हिंदू धर्माचे हे गुणविशेष भगवद्गीता व महाभारत यांतील कृष्णाच्या व्यक्तिचित्रांत प्रकर्षाने दुग्गोचर होतात. कृष्णपंथ हा हिंदू धर्माचा एक प्रमुख घटक होय. आणि

भगवद्‌गीता हा त्या पंथाचा प्रमाणग्रंथ होय. स्वधर्माचे पालन करून लोकसंग्रहाच्या उद्देशाचा पुरस्कार करण्यात, प्रवृत्तिमार्गाचा अवलंब करणे, हेही अभिप्रेत आहे. म्हणून कर्मयोगाची सविस्तर चर्चा गीतेत केली आहे. कृष्णाने अशा आध्यात्मिक जीवनपद्धतीचा पुरस्कार केला की, ज्यात सर्व लोकांना सहभागी होता यावे, हाच गीतेतला भक्तियोग. त्यामुळेच सगुण ईश्वरभक्ती हिंदू धर्मात श्रेष्ठ मानली जाऊ लागली.

भगवद्‌गीता हा हिंदू धर्म व नीती यांविषयीचा मूलभूत ग्रंथ मानला, तर स्मृती हे हिंदूंच्या वैयक्तिक, कौटुंबिक व सामाजिक आचारांचे नियंत्रण करणारे ग्रंथ होते, असे मानता येईल.

एक सामाजिक-धार्मिक संघटना या दृष्टीने हिंदू धर्माचे निश्चितीकरण व दृढीकरण ज्या कालखंडात होत होते, त्याच कालखंडात निवृत्ती, ऋणत्रय, पुरुषार्थचतुष्टय, कर्म-संसार, इत्यादी. कल्पनांच्या संकुलावर भर देण्याय येऊ लागला. प्राचीन मध्ययुगीन भारतात धर्म व तत्त्वज्ञान यांच्यामध्ये सूक्ष्म सीमांकन जरी करण्यात येत नसले, तरी हिंदू तत्त्वज्ञानाची दर्शने जवळजवळ धर्मनिरपेक्षतेनेच विकास पावली आहेत. ख्रिस्तपूर्व पहिल्या काही शतकांत हिंदू तत्त्वज्ञान प्रथमच व्यवस्थित अशा आस्तिक दर्शनांच्या रूपाने ग्रथित झाले.

शुंगांच्या राजकीय पतनाबरोबर हिंदू धर्माच्या भवितव्याची अनिश्चितावस्था सुरू झाली. यवन, शक, पल्हव, कुशाण इत्यादी जमातींनी त्या कालखंडात भारतावर आक्रमणे केली, काण्व, सातवाहन, भारशिव, वाकाटक या राजघराण्यांनी धर्माच्या विकासास थोडेसे साहाय्य केले. त्याच काळात महायान बौद्ध पंथाच्या रूपाने हिंदू धर्माचा एक मोठा प्रतिस्पर्धी उदयास आला. तथापि इ.स.च्या चौथ्यापाचव्या शतकांत गुप्त राजवंशाची सत्ता प्रस्थापित झाली, तेव्हा अभिजात हिंदू धर्माला पूर्ण विकसित स्वरूप प्राप्त झाले.

गुप्तकालात निष्पन्न झालेले अग्रगण्य धार्मिक वाङ्मय म्हणजे पुराणे. गुप्तकालीन हिंदू लोकांच्या श्रद्धा व आचार पुराणांत उत्तम रितीने व्यक्त झाले आहेत. त्याच काळात एकेश्वरवादी असलेल्या विभिन्न धर्मपंथांचा उदय झाला. त्यानंतरचा हिंदू धर्माचा इतिहास म्हणजे निरनिराळ्या हिंदू धर्मपंथांचा इतिहासच होय. कारण त्या धर्मपंथांव्यतिरिक्त हिंदू धर्माला वेगळे असे व्यक्तिमत्वच राहिले नाही. ज्या धर्मात स्पष्टपणे उपलक्षित केलेली आग्रही मते नसतात, त्या धर्मातच सामान्यपणे भिन्न-भिन्न धर्मपंथ सहजपणे उदयास येऊ शकतात.

वेगवेगळ्या अवतारांद्वारा आविष्कार केलेल्या विष्णू या एकाच लौकिक देवतेभोवती वैष्णव पंथ विकास पावला. त्याचप्रमाणे शैव पंथ वेदपूर्व देवता शिव याच्याभोवती विकसित झाला.

शैव आणि वैष्णव या पंथांव्यतिरिक्त अभिजात हिंदू धर्माच्या कालखंडात इतर अनेक धर्मपंथांचा उदय झाला होता. गुप्तकाळातच सूर्यदेवतेची पूजा प्रचलित होती. पद्मावती व राजगीर येथील गुप्तकालीन देवालयांचे अवशेष यक्षपंथ व सर्पपंथ यांचे निदर्शक आहेत. निरनिराळी पुराणे ही हिंदू धर्मातील निरनिराळ्या पंथांची विशिष्ट धर्मपुस्तकेच आहेत.

हिंदू धर्मातील आणखी एक अत्यंत महत्त्वाचा पंथ तांत्रिकांचा होय. या पंथाचा प्रारंभही वेदपूर्वकालापर्यंत मागे नेता येईल. पण त्याला पद्धतशीर स्वरूप इ.स.च्या पाचव्या शतकात प्राप्त झाले. या पंथात सर्व वर्णांना व स्त्रियांनाही प्रवेश मिळत होता. पण त्यातील गुह्य आचार व कडक निर्बंध यांमुळे तो एक गूढ धर्मपंथ बनला. या पंथाचे शैव, वैष्णव आणि शाक्त असे तीन प्रमुख पोटभेदही झाले.

अशा प्रकारे गुप्तकालात हिंदू धर्माचा खूप विस्तार झाला. त्यातील सर्व पंथांनी परस्परांशी व अन्य धर्मांशी पूर्ण सहिष्णू वृत्ती प्रकट केली. या नवीन चैतन्ययुक्त हिंदू धर्माने संस्कृत भाषा व संस्कृत वाङ्मय यांच्या अभिवृद्धीस मोठी चालना दिली. त्या काळातले पुराणिक व कीर्तनकार लौकिक धर्मग्रंथांत वर्णिलेल्या निरनिराळ्या तीर्थयात्रांच्या मिषाने पुराणपठण व कीर्तन यांतून हिंदू धर्माचा संदेश देशाच्या दूरदूरच्या भागांत पोचवीत असत. भारताबाहेरील देशांतही हिंदू धर्माचा प्रसार गुप्तपूर्व कालातच सुरू झाला होता. हिंदू धर्मप्रचारक पूर्वेकडे ब्रह्मदेश, यवद्वीप, सुमात्रा वगैर देशांत आणि पश्चिमेकडे

ग्रीस, मिसर इत्यादी. देशांतही पोचले होते. भारतात आलेल्या यवन, शक इत्यादी. परकीय जमातींचे हिंदूकरणही त्याच कालखंडात मोठ्या उत्साहाने चालू होते.

त्यानंतरच्या सहस्र वर्षाच्या कालखंडात (इ.स. ७०० ते १७००) हिंदू धर्माचे, पंथांच्या व उपपंथाच्या रूपाने आणखी विखंडन झाले. मात्र एखादा पंथ कितीही जहाल असला तरी, त्याने मूळ हिंदू धर्माचा त्याग न करण्याचे धोरण कटाक्षाने पाळले होते. हे धर्मपंथ काही विशिष्ट सिद्धान्तांचा पुरस्कार करण्यासाठी उदयास आले नसून ईश्वरवादाचे विशिष्ट आदर्श आणि भक्तीचे विशिष्ट प्रकार प्रस्थापित करण्यासाठी आले होते. उपनिषदांतील सर्वेश्वरवादी प्रवृत्तीपासून हिंदू धर्म पूर्णपणे कधीच विभक्त राहू शकत नाही. पण नवव्या-दहाव्या शतकानंतर हिंदू धर्मात भक्ती हीच प्राणभूत मानली जाऊ लागली. भक्तिपंथाची मुख्य प्रेरणा दक्षिण भारतातल्या नायन्मार व अळवार यांच्याकडून मिळाली.

पण वैष्णवभक्तीची खरा विकास झाला तो मध्य व उत्तर भारतात, इ.स.च्या १३व्या शतकापासून १७व्या शतकापर्यंत रामभक्ती व कृष्णभक्ती हे भक्तिवादाचे दोन मुख्य प्रवाह होते. भागवत, निंबार्क, चैतन्य, पुष्टिमार्ग इत्यादी. अनेक पंथ त्या प्रवाहात उत्पन्न झाले. शैवपंथातही कापालिक, वीरशैव, लिंगायत इत्यादी अनेक उपपंथ उदयास आले व शैव सिद्धान्त प्रस्थापित झाले.

हिंदू धर्मातील पंथ व उपासनामार्ग यांच्या या बहुलीकरणाप्रमाणेच आस्तिक दर्शनांच्या बहुलीकरणाची प्रक्रियाही त्या काळात सुरू होती. उदाहरणार्थ वेदान्तदर्शनाचा सर्वात महत्त्वाचा मूलभूत ग्रंथ म्हणजे बादरायणाची वेदान्तसूत्रे हा होय. त्या सूत्रांचा निरनिराळ्या भाष्या कारांनी वेगवेगळ्या प्रकारे अर्थाविष्कार केल्यामुळे या कामात वेदान्ताच्या निरनिराळ्या उपदर्शनांचा जन्म झाला. वेदान्तसूत्रांचा सर्वांत प्रमुख भाष्यकार म्हणजे शंकराचार्य. परंतु त्यांच्या केवल अद्वैतापेक्षा अकराव्या शतकातील रामानुजांच्या विशिष्ट अव्दैताचे आवाहन अधिक प्रबल होते, असे दिसून येते. याचे एक कारण हे असले पाहिजे की, अत्यंत लोकप्रिय होत चाललेल्या भक्तिवादाला रामानुजांच्या विशिष्ट अद्वैताने तत्त्वज्ञानीय पीठिका दिली. भक्तिवादाचा एक प्रवर्तक रामानंद हा रामानुज संप्रदायातला होता ही गोष्ट मोठी सूचक आहे. रामानुजांचा समकालीन निंबार्क हा राधापंथाला तत्त्वज्ञानीय प्रतिष्ठा प्राप्त करून देणारा पहिलाच आचार्य होता. वल्लभाचार्यांनी ईश्वरानुग्रहमतावर म्हणजे पुष्टिमार्गावर भर दिला आहे. त्यांच्या पूर्वीच्या मध्वाचार्यांनी वेदान्ताच्या अधिकृत प्रस्थानत्रयीत द्वैतवादच सिद्ध झाला आहे, असे एक वेगळेच मत मांडले आहे.

हिंदू धर्माचे लोक सामान्यपणे ईश्वराचे अस्तित्व मानतात. आकाशातील तारे, ग्रह, इत्यादींच्या गतीचे नियंत्रण करणारा, पृथ्वीवर जिवाची उत्पत्ती करणारा व तिचा नाश करणारा, सर्व विश्व सुव्यवस्थित चालविणारा कोणीतरी शक्तिमान पुरुषोत्तम असला पाहिजे. असे हिंदूंना वाटते.

ईश्वर आहे हे सिद्ध करण्यासाठी ईश्वराचा अनुभव यायला पाहिजे. तसा ईश्वराचा अनुभव येतो, अशी समजूत हिंदू धर्मात प्रचलित आहे. वेदान्ती लोक त्यालाच ब्रह्मसाक्षात्कार म्हणतात. प्राचीन ऋषींना व ज्ञानेश्वरादी संतांनाही तसा साक्षात्कार झाल्याचे त्यांच्या चरित्रांवरून कळते. शिव, विष्णू, राम, दत्त ही एकाच परमेश्वराची भिन्न रूपे असून, ज्या रूपात भक्त त्याचे ध्यान-चिंतन करतो त्या रूपात तो त्या भक्ताला दर्शन देतो, अशी कल्पना आहे.

### व्यापक धोरण व सहिष्णुता

वैदिक धर्मात मूर्तिपूजा नव्हती. इंद्र, वरुण, सोम, इत्यादी देवता या सृष्टीतील प्रत्यक्ष दिसणाऱ्या भौतिक घटनांच्या अधिष्टात्री देवता होत्या. वेदात त्यांचे स्तवन केलेले आहे. तसेच त्यांचे मानवरूपात वर्णनही केले आहे. उपनिषदांत परब्रह्माची कल्पना दृढ होऊन त्याचे निदिध्यासन हेच पूजेचे स्वरूप ठरले. पण कालांतराने संमिश्र धारणांचा मिळून हिंदू धर्म उदय पावला, तेव्हा भिन्न-भिन्न रूपांत देवपूजा सुरू झाली. सिंधुसंस्कृतीतली शिवलिंगपूजा हिंदू लोकांनी स्वीकारली. इतर देवतांच्या मात्र मानवी रूपांतल्या मूर्ती निर्माण झाल्या. सामान्य

मनुष्याला अमूर्त, निर्गुण परमेश्वराची उपासना करणे कठीण वाटते. म्हणून सगुणोपसाकांना मूर्तींची आवश्यकता भासली व त्यांनी मूर्तिपूजेचा मार्ग अनुसरला.

उपनिषदांतल्या ऋषींपासून लोकमान्य टिळक व महात्मा गांधी यांच्यापर्यंत सर्व विचारवंतांनी हे मान्य केले आहे की, सत्य हे निरनिराळ्या रंगांची प्रावरणे धारण करून अपरिचित अशा भाषेतून आपणाशी बोलत असते. हे महान सत्य लक्षात घेऊन हिंदू धर्माने संकुचित मतांचा त्याग केला आहे आणि व्यापक व उदार धोरणांचा विकास केला आहे. उदाहरणार्थ हिंदू धर्माने येथील शेकडो जातीजमातींच्या शेकडो देवांना आणि परसंस्कृतीतील कित्येक देवांनाही आपल्या उदरात जागा देऊन त्यांचे समर्थन केले आहे. त्यामुळे येथे परमेश्वरावर श्रद्धा ठेवणाऱ्या सर्व लोकांचे एकीकरण झाले. निरनिराळी मते धारण करणारे अनेक संप्रदाय हिंदू धर्माच्या कक्षेत राहू शकतात. पाखंडी लोकांना हुडकून त्यांचा छळ करणे, हे जे इतर पुष्कळ धर्मांचे आवडते काम असते, त्याचा हिंदू धर्मात कुठे मागमूसही नाही.

दुसऱ्याच्या मतांबद्दल आदर व सौजन्य दाखविणे हा हिंदू धर्माचा मुख्य सूर आहे. त्याचा मुख्य कटाक्ष मतांवर नसून, आचरणांवर आहे. भिन्न-भिन्न उपास्ये आणि भिन्न-भिन्न उपासनाविधी पाळणाऱ्यांना हिंदू धर्मात समाविष्ट करतांना आपल्या आचार्यांना कधीही संकोच वाटला नाही.

परधर्माविषयी सहिष्णुता हे हिंदू धर्माचे एक महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे. हिंदू धर्म कोणाच्या नावाने स्थापन झालेला किंवा कोणत्याही एकाच विशिष्ट ग्रंथावर आधारित नसून; तो सत्य, अहिंसा, दया, प्रेम. इत्यादी सद्‌गुणांवर आधारलेला आहे.

अलीकडे सुमारे एक हजार वर्षांत धर्मकल्पनाच बदलल्या व वैयक्तिक स्वर्ग प्राप्ती व मोक्षसिद्धी हेच धर्माचे प्रमुख लक्षण मानले जावू लागले. त्यामुळे धर्माची लोककल्याणापासून फारकत झाली. स्वत:ची मोक्षसिद्धी करणे एवढेच ध्येय डोळ्यांपुढे राहिल्याने त्याच्या आड येणाऱ्या सर्व गोष्टी अध्यर्म्य मानल्या जाऊ लागल्या. सार्वजनिक हितापेक्षा जप-जाप्याचे महत्त्व वाढले आणि कर्मयोगापेक्षा संन्यासमार्ग अधिक चांगला आणि लोककल्याणाचा खटाटोप करण्यापेक्षा लोकांचा संपर्क टाळून विजनात राहणे आणि ध्यान-धारणा करणे हे धर्मनिष्ठापणाचे निदर्शक मानले जाऊ लागले. श्री. ज.स. करंदीकर लिहितात-

समाजसेवा, सार्वजनिक हित किंवा राष्ट्रकार्य हे शब्द अगदीच अर्वाचीन असले, तरी त्यांतील कल्पना प्राचीन आहेत. ईशावस्योपनिषद, भगवद्‌गीता इत्यादी प्राचीन ग्रंथांच्या आधारावरून असे दाखवता येईल की; राष्ट्रकार्य, मातृभूमी, राष्ट्रगीत, इत्यादी शब्द नवे असले; तरी त्यांतील कल्पना समाजात रूढ व्हाव्या म्हणून प्राचीन ऋषींनी पुष्कळच खबरदारी घेतली होती. तैत्तिरीय उपनिषदात आपण एकविचाराने राहू या, आमची विद्या सतत तेजस्वी असो आणि आम्ही एकमेकांचा द्वेष करू नये, अशी संघटनेला पोषक प्रार्थना हीच मुख्य प्रार्थना आहे. जगावयाचे तेदेखील राष्ट्रकार्याकरिताच जगावयाचे, अशी कल्पना रुद्राच्या प्रारंभीच्या शांतिसूक्ता ग्रथित केली आहे. त्यात 'हे माते! माझा नाश होऊ देऊ नकोस, कारण कल्याणकारक गोष्टीच मी मनात आणीन, कल्याणकारक गोष्टीचे निर्माण करीन, शुभ बोलेन, जेणेकरून देवांना व मनुष्यांना ऐकून आनंद होईल, असेच शब्द मी उच्चारीन, अशा कल्याणकारक गोष्टी माझ्या हातून घडाव्यात म्हणून देव माझे रक्षण करोत, आणि माझे असे लोककल्याणकारक वर्तन पाहून आपल्या कुलाला शोभा आली, 'असे पाहून माझे पितर हर्षभरीत होवोत' अशी प्रार्थना आहे. या प्रार्थनेत राष्ट्रकार्याचीच सदिच्छा ओतप्रोत भरून राहिलेली नाही काय?

धर्माकडे पाहण्याचे हिंदूंचे धोरण विचारणीय आहे. मनुष्याने बुद्धिगम्य अशी काही निश्चित मते मान्य केली. की, त्याने तमुक धर्माचा स्वीकार केला. असे सामान्यत: समजले जाते. पण हिंदू धर्म अशा तऱ्हेच्या मर्यादा कोणावर लादत नाही. हिंदू धर्म हा अंत:स्फूर्तीपेक्षा सिद्धान्त कमी महत्त्वाचे मानतो आणि अंत:साक्षात्कारापेक्षा बाह्याचार कनिष्ठ दर्जाचे समजतो. धर्म म्हणजे तात्त्विक मतांचा किंवा प्रस्थापित सिद्धान्ताचा अंगिकार नव्हे; किंवा विधिपूर्वक एखादा समारंभ साजरा करणेही नव्हे. तो एक विशिष्ट प्रकारचा अनुभव आहे. ते सत्याचे दर्शन किंवा

सत्याचा प्रत्यय आहे. तो परमात्म्याच्या हाकेला जीवात्म्याकडून मिळालेला प्रतिसाद आहे. बौद्धिक विचार, सौंदर्यविषयक आवडीनिवडी आणि नीति-अनीतीचा विवेक या उपाधींनी आत्मा वेढलेला असला, तरी शुद्ध आणि निरुपाधिक अशा आत्मस्वरूपाची विशिष्ट अवस्था म्हणजे धर्म होय. हिंदू धर्म या प्रकारचा धर्म आहे.

**जीवनसूत्र**

जग म्हणजे सतत वाहत राहणारा प्रवाह होय. पण सत्स्वरूप त्यालाही व्यापून उरले आहे. जगाचा नियमबद्ध क्रम आणि पूर्णाकडे झेप घेण्याची त्याची प्रवृत्ती या गोष्टी असे दर्शवितात की, जग हे आध्यात्मिक सत्यावर उभारले आहे आणि हे सत्य एखाद्या विशिष्ट पदार्थात किंवा पदार्थसंघात व्यक्त झाल्याने ते संपून जाण्याइतके परिमित नाही. परमेश्वर जगामध्ये आहे, पण जग हेच परमेश्वराचे व्यक्त स्वरूप नव्हे. त्याचे निर्मितीचे व्यापार केवळ उत्क्रांतीच्या मार्गावरील महत्त्वाच्या टप्प्यांपुरते मर्यादित नाहीत. परमेश्वर केवळ प्राण किंवा चेतना ओतण्यापुरताच पुढे येतो असे नव्हे, तर त्याचे कार्य सतत चालूच असते. अध्यात्म्याचे मूळ निसर्गात असून, तिथूनच त्याचा विकास झाला आहे. म्हणूनच नैसर्गिक-अनैसर्गिक असा भेद करता येत नाही. दृश्य जगात आढळून येणारे अनंत वैचित्र्य हे अदृश्य आणि शाश्वत तत्त्वावरच उभारलेले आहे.

हे जाणूनच ऋषींनी आणि आचार्यांनी हिंदू धर्माची उभारणी अध्यात्मजीवनावरच केली आहे. भिन्न-भिन्न प्रकृतीच्या लोकांना येणारे धार्मिक आणि अध्यात्मिक अनुभव भिन्न-भिन्न असल्यामुळे उपासनेचे प्रकारही भिन्न असणे अपरिहार्य आहे. माझ्या बागेतील रोपे तेवढी ईश्वराने लावली आहेत आणि शेजाऱ्याच्या बागेतली रोपे ही सैतानाने लावली आहेत म्हणून ती कोणत्याही प्रकारे नष्ट केली पाहिजेत, असली विचारसरणी हिंदू धर्म मान्य करीत नाही. एखादे तत्त्व उत्तम असले आणि दुसरे तितके उत्तम नसले, पण बऱ्यापैकी असले तरी हिंदू धर्म त्याचा अव्हेर करीत नाही. हिंदू धर्माच्या या व्यापक धोरणामुळे तो सर्व प्रकारची मते मान्य करतो आणि त्यांना अधिकाधिक उच्च अवस्थेला नेण्याचा प्रयत्न करतो. हिंदू धर्माची अशी दृढ धारणा आहे की, एखाद्याच्या अज्ञानाचा निरास त्या अज्ञानी मनुष्याला बडगा दाखवून किंवा सुळावर चढवून म्हणजे जबरदस्ती करून होणार नाही. तो अज्ञाननिरास त्याच्या हृदयात ज्ञानदीप प्रज्वलित केल्यानेच होऊ शकेल.

म्हणूनच भिन्न-भिन्न प्रवृत्तीच्या भक्तांना आणि उपासकांना हिंदू धर्मामध्ये स्थान आहे आणि स्वातंत्र्यही आहे. काही भक्त असे असतात की, त्यांना साक्षात परमेश्वराचे दर्शन व्हावे, असे वाटते. काहींना परमेश्वराविषयी सत्य काय आहे, हे जाणून घेण्याच्या प्रयत्नात आनंद मिळतो. काहींना प्रवृत्तीत शांती मिळते. तर काहींना ती निवृत्तीत मिळते. डॉ. राधाकृष्णन म्हणतात-

हिंदू धर्मात उपास्य दैवत एकच पण पूजनीय द्रव्ये मात्र व्यक्तिगणिक भिन्न-भिन्न असतात. त्याचप्रमाणे व्यापक धर्माचे ध्येय एकच, पण पंथ मात्र अनेक. आपला संप्रदाय हाच एक परमेश्वरप्राप्तीचा महत्त्वाचा आणि सर्वश्रेष्ठ मार्ग आहे, असे आपण समजता कामा नये. भक्त कोणत्याही अवस्थेत असो, ब्रह्मचारी असो, गृहस्थ असो वा संन्यासी असो, त्याला मोक्ष मिळविणे शक्य आहे. सर्वांचा सारखाच दृष्टिकोन असावा, अशी अपेक्षा करणे चुकीचे आहे. साधूंच्या पावित्र्याइतकीच प्रेमळ पत्नीची पतिनिष्ठा किंवा बालकांचा अनागसपणा यांची योग्यता परमेश्वराच्या दरबारात आहे. प्रत्येक नमुन्याच्या पूर्ण विकासात दिव्यत्व प्राप्त होत असते.

हिंदू धर्माचे जीवनसूत्र ते हेच होय.

कोणत्याही समूहाला समाज किंवा राष्ट्र या पदवीवर पोचायाचे असेल, तर अनेक सांस्कृतिक बंधनांनी, अनेक निष्ठांच्या धाग्यांनी आणि अनेक श्रद्धांच्या सूत्रांनी, तो लोकसमूह दृढबद्ध असला पाहिजे. नानाविध आचार, परंपरा, दैवते, श्रद्धास्थाने, पुण्यपुरुष व पुण्यग्रंथ या सर्व गोष्टी सर्वांच्या एक आहेत. सर्वांना सारख्याच वंद्य आहेत, ही जाणीव त्या समूहातील प्रत्येक व्यक्तीच्या ठायी जागृत असली पाहिजे. या जाणिवेमुळेच या समूहातील सर्व घटकांची सुखदुःखे एक होतात, रागद्वेष समान होतात, सर्वांचे अभिमान सुसंवादी होतात. आणि

अशा प्रकारे जो एकरूप होतो, तो समाज या संज्ञेला पात्र ठरतो.

### तमोयुग

दहाव्या शतकाच्या उत्तरार्धापासून भारतावर एकामागून एक अशी मुसलमानांची आक्रमणे सुरू झाली. इ.स. ९८० मध्ये सबुक्तगीन भारतावर चालून आला आणि त्याने जयपालाचा पराभव करून पंजाब प्रांत हिंदूंच्या हातून हिसकून घेतला. इथून पुढे हिंदूंच्या इतिहासातील तमोयुगाला प्रारंभ होतो. पुढे सबुक्तगीनचा मुलगा गझनीचा महमूद याने इ.स. १०२४ पर्यंत भारतावर एकूण १७ स्वाऱ्या केल्या, पण हिंदूंना एकदाही पराभव करता आला नाही. पुढील तीनशे वर्षांत भारतावर मुस्लीम आक्रमणे अव्याहत चालू होती. बाराव्या शतकाच्या अखेरीज भारतात घोरीवंशाचे राज्य स्थापन झाले. आणि पुढील शतकात बंगाल, बिहार, आसाम, गुजरात, माळवा हे सर्व प्रांत मुस्लिमांनी जिंकून घेतले. परंतु त्यांचा दक्षिणेत प्रवेश झाला नव्हता. इ.स.च्या चौदाव्या शतकाच्या आरंभी मुसलमान दक्षिणेतही घुसले आणि त्यांनी पंधरा-वीस वर्षांतच यादव, होयसळ, पांड्य, चोळ इत्यादी राज्ये बुडविली व अशा प्रकारे अखिल भारत आक्रांत केला.

इ.स.च्या १० व्या शतकापर्यंत हिंदू लोक धर्म हे संघटनतत्त्व उराशी घट्ट धरून आपपर भाव ठरवत होते. त्यामुळे त्यांना सर्वत्र विजयच मिळत गेले. त्या पुढच्या काळात हिंदूंची जी दुर्दशा झाली, त्याला कारण धर्मतत्त्व सुटले किंवा विकृत झाले हे होय. जी धर्मतत्वे हिंदूंनी शिरोधार्य मानली होती, त्यांचा लोप झाल्यामुळे हिंदू समाज हतप्रभ होऊन गेला. संघटनातत्त्व विसरले गेले आणि सर्व व्यवहारात विघटन सुरू झाले. विषमता आणि निवृत्तिवाद ही प्रतिगामी तत्त्वज्ञाने या विघटनेला कारणीभूत ठरली आणि त्यांनी हिंदू समाजाचा अध:पात केला. 'सर्वांचा मंत्र समान, सर्वांची सभा समान, सर्वांचे मन समान आणि सर्वांचे चित्तही समान' (ऋ.१०.१९१.३) हे प्राचीन हिंदू धुरीणांचे ध्येय होते. ते समता व बंधुता यांचा उद्घोष अहोरात्र करीत होते. सर्व समाजाने सर्व भेद बाजूला सारून यजन करावे, अशी वेदांची आज्ञा होती (ऋ.१०.५३). 'कोणी ज्येष्ठ नव्हेत, कोणी कनिष्ठ नव्हेत, कोणी मध्यमही नव्हेत; तर ते परस्परांचे बंधू आहेत आणि ते सर्व उत्तम भाग्यासाठी वाढत आहेत.' ही वेदांची धारणा होती (ऋ. ५.५९.६;५.६०.५); पण हे समतेचे, संघटनेचे तत्त्व इ.स.च्या १० व्या शतकानंतर पार विसरले गेले आणि अहोरात्र विघटनेचेच प्रयत्न केले गेले.

चातुर्वर्ण्य, जातिभेद आणि अस्पृश्यता ही या काळातल्या धर्मवेत्त्यांची त्रयीविद्या होती. आणि तिचा पुरस्कार करून हा हिंदू समाज जितका विभाजित होईल, तितका करण्याचा त्यांनी जणू निर्धारच केला. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र व अस्पृश्य आणि त्यांच्या संकरातून निर्माण झालेल्या अनंत जाती यांनी परस्परांत विवाह करू नयेत आणि एकमेकांचे व्यवसाय करू नयेत, असे दंडक त्यांनी घातले. शिवाय भिन्न घटकांनी परस्परांचे अन्न घेऊ नये, त्यांनी परस्परांना स्पर्शही करू नये, अशी बंधने धर्म म्हणून त्यांनी लावून दिली. शूद्र व अस्पृश्य हा या मानवसमूहातील बहुसंख्य वर्ग. त्यांना वेदपठनाचा तर राहोच, पण श्रवणाचासुद्धा अधिकार त्यांना ठेवला नाही. म्हणजे विद्या, पूज्य ग्रंथ यांच्याही बाबतीत हा समाज विघटितच राहिला पाहिजे, असा या धर्मशास्त्रज्ञांचा कटाक्ष होता. त्रैवर्णिकांना वेदाधिकार होता. पण त्यांतही ब्राह्मणांचा सावित्री मंत्र निराळा, क्षत्रियांचा निराळा, वैश्यांचा निराळा त्यांची उपनयनाची वयोमर्यादाही निराळी, असे त्यांनी सगळे भेदमय करून टाकले.

त्या काळात मुसलमान सर्वत्र देवळे पाडीत होते. लोकांना सक्तीने बाटवीत होते. अत्याचार करीत होते. पण त्या वेळचे धर्मशास्त्रज्ञ व्रते, प्रायश्चत्तविधी, श्राद्धविधी, तीर्थयात्रा, आशौच यांवरच आपले सर्व बुद्धिबळ खर्च करीत होते. सर्व भारताला घेरीत चाललेल्या राजकीय व धार्मिक घोर आपत्तींविषयी ते उदासीन होते.

त्या धर्मशास्त्रज्ञानांच्या ग्रंथांत राजधर्म, क्षात्रधर्म, प्रतिकार, धर्मांतरितांची शुद्धी, समाजसंघटना यांचा लवमात्र विचार केलेला नाही. त्यांच्या मते व्रते-वैकल्ये, श्राद्ध-पक्ष, सोवळे-ओवळे, प्रायश्चित्त यांतच सर्व धर्म साठविला होता. त्यांचा सर्व भर कर्मकांडावर होता.

प्रारंभी आपत्तीच्या बाबतीत धर्मधुरीण जागृत होते. महंमद कासीम याने सिंध प्रांतात बाटवलेल्या हिंदूना स्वधर्मात परत घेण्याची व्यवस्था देवल ऋषींनी केली आणि एका महान आपत्तीचे निवारण केले. पण पुढील शास्त्रकारांना हा सुविचार मानवला नाही. त्यांनी कलिवर्ज्य नामक एक प्रकरण रचून पतितपरावर्तन निषिद्ध मानले. त्यामुळे एक प्रचंड हिंदुसमाज हिंधुधर्मापासून तुटून निघाला. इतकेच नव्हे तर हिंदुसमाजाचा कायमचा हाडवैरी बनून राहिला. वास्तविक मनूच्या मते सक्तीचे धर्मांतर हे धर्मांतरच नव्हे (मनु. ८.१६८). खुशीने धर्मांतर केले गेले व मग पश्चात्ताप झाला तर अल्प प्रायश्चित्ताने शुद्धी होते, असे याज्ञवल्क्य, कश्यप, विष्णू इत्यादी शास्त्रकारांनी सांगितले आहे. जे मूळचे अहिंदू त्यांनाही चातुर्वर्ण्यात समाविष्ट करून घ्यावे, असे महाभारतात उपदेशिले आहे. पण पुढच्या काळात पावित्र्याच्या कल्पना फारच उंचावल्या आणि हा विवेक सुटला. अशा प्रकारे सर्वच समाज विघटित होऊन ऱ्हास पावला. ब्राह्मण शास्त्रकारांच्या या पावित्र्याच्या कल्पनेला क्षत्रियही बळी पडले आणि वैश्य-शूद्र यांनीही या विकृत कल्पनेपुढे मान तुकवली. पण ज्यांना शास्त्रकारांनी कारण नसताना केवळ लहरीखातर हीन लेखले,त्यांनी या शास्त्राला का धिक्कारले नाही? सत्ता त्यांच्या हाती होती. शस्त्रबळ त्यांच्याजवळ होते. आणि प्राचीन काळातील उदार ऋषिमुनींच्या शास्त्राचेही बळ त्यांना आपल्या पाठीशी घेता आले असते. या काळात अनेक क्षत्रिय राजघराणी अत्यंत पराक्रमी होती. त्यांनी तरी या अधोगामी धर्मशास्त्राला किंवा अधर्मशास्त्राला विरोध करायचा. पण त्यांनी तसे तर केले नाहीच; उलट ब्राह्मणपूजक, चातुर्वर्ण्यसंरक्षक असे म्हणवून घेण्यातच भूषण मानले. याचा अर्थ असा की, त्यांनाही शास्त्रप्रणीत जन्मनिष्ठ उच्चनीचता प्रिय होती, मान्य होती. त्यांच्यातही वांशिक उच्चनीचतेच्या कल्पना अत्यंत प्रखर अशा होत्या. तेव्हा त्यांनी त्या अधोगामी शस्त्राला विरोध केला नाही, यात नवल असे काहीच नाही. तीच गोष्ट वैश्य व शूद्र सत्ताधाऱ्यांची. भारतवर्षात अमुक एका राज्यात त्या काळी राजांनी अस्पृश्यता नष्ट केली, शूद्रांना वेदाधिकार दिले किंवा शास्त्रवचनांचा धिक्कार करून त्यांना इतरांच्या बरोबरीची प्रतिष्ठा प्राप्त करून न देता ती आपल्यापुरतीच ठेवली, विषमतेच्या शास्त्रावर घाव घालून सर्व समाजाला त्याच्या शृंखलांतून मुक्त करण्याचा त्यांनी प्रयत्न केल्याचेसुद्धा कोठे आढळत नाही. सर्व समाजच जन्मनिष्ठ उच्चनीचतेच्या विषारी कल्पनांनी ग्रस्त झालेला होता, असा याचा अर्थ होतो. यापरते दुर्दैव काय?''

इ.स.च्या ८व्या शतकात सिंध प्रांत मुस्लिमांच्या ताब्यात गेला तो कायमचाच. आणि दहाव्या शतकात पंजाब परतंत्र झाला तोही कायमचाच. इ.स.च्या ११व्या शतकाच्या प्रारंभी गझनीच्या महमुदाच्या स्वाऱ्या सुरू झाल्या. एकंदर त्याने सतरा आक्रमणे केली व हिंदूंवर जे अनन्वित अत्याचार केले, त्यांना काही धरबंदच राहिला नाही. हिंदूंचे सर्व मानबिंदू त्याने तोडले, मोडले, भ्रष्ट केले. पण हिंदू त्या आततायी शत्रूचे पारिपत्य करू शकले नाहीत. त्यावरून त्या काळी हिंदूंची जीवनशक्ती किती क्षीण झाली होती, ते दिसून येते. धर्माचे, देवाचे, स्वातंत्र्याचे, स्त्रियांचे आणि मातृभूमीचे रक्षण करण्याचे सामर्थ्य हे जीवनशक्तीचे पहिले लक्षण असते. ते शक, यवन, कुशाण, हूण यांच्या आक्रमणाच्या वेळी जसे दिसून आले, तसे या वेळी दिसले नाही.

सर्व जगाच्या हालचालींचे, निदान सरहद्दीजवळच्या देशांतील घडामोडींचे तरी ज्ञान मिळविणे हे राज्यकर्त्यांचे प्रमुख कर्तव्य असते. पण परदेशगमनाचा निषेध आणि म्लेच्छसहवासाचा निषेध, ही हिंदुधर्माशास्त्रातील कलमे या गोष्टीच्या आड आली. पुढे मुहंमद घोरीच्या स्वाऱ्या सुरू झाल्या. चौथ्या स्वारीत पृथ्वीराजाने त्याचा नि:संदेह पराभव केला. पण त्याला जीवदान देऊन सोडून दिले. काही वर्षांनी मुहंमद घोरी परत आला आणि त्याने पृथ्वीराजाचा पराजय करून त्याला कैद केले. पुढे त्याने कनोज घेतले. काशीवर स्वारी केली, तिथल्या मूर्ती फोडून तिथे मशिदी उभारल्या व अपरंपार लूट जमा करून नेली. इथून पुढे हिंदूंची राजसत्ता, त्यांची मंदिरे, त्यांच्या मूर्ती, त्यांच्या स्त्रिया यांचे भवितव्य म्हणजे परकीय आक्रमणांपुढे बळी जाणे हेच ठरले. दिल्ली, अजमीर, कनोज, काशी यांचा उच्छेद झाल्यावर भारतात मुस्लीम सत्तेचा पाया घातला गेला आणि पुढच्या चाळीस वर्षांत हिंदुस्थान

स्वातंत्र्याला मुकला. इतर राज्ये जिंकण्याचे काम शिहाबुद्दीनच्या कुतुबुद्दीन ऐबक व शमसुद्दीन इल्तुमिश या सेनापतींनी केले.

इल्तुमिशनंतर सुमारे तीस वर्षे हिंदूंना अवसर मिळला होता. कारण त्या काळात दिल्लीचे सुलतान फार दुबळे होते व राजसत्ता विसकळीत झाली होती. पण पुनरुत्थान करण्याचे सामर्थ्य हिंदूंच्या ठायी राहिलेच नव्हते. विंध्याच्या दक्षिणेस देवगिरीचे यादव, हळेबिडचे होयसळ, मदुरेचे पांड्य आणि वरंगळचे काकतीय यांची विशाल राज्ये होती आणि त्यांना तर ३०० वर्षे इतका अवसर मिळाला होता. पण तेही सावध झाले नाहीत. इ.स. १२९४ साली अल्लाउद्दीन खिलजीने देवगिरीच्या यादवांचा नाश केला. दहा वर्षांनंतर त्याचा सेनापती मलिक काफूर याच्या दक्षिणेत स्वाऱ्या सुरू झाल्या. पुढील पंधरा वर्षांत त्याने वर निर्देशलेली सर्व राज्ये विध्वंसिली. अशा प्रकारे सिंध, पंजाब, दिल्ली, उत्तरप्रदेश, बंगाल, बिहार, गुजरात, माळवा, मेवाड, महाराष्ट्र, कर्नाटक, आंध्र, तेलंगण, केरळ अशा सर्व हिंदू राज्यांचा मुसलमानांनी उच्छेद केला आणि या देशात मुस्लीम सत्ता स्थापन केली.

पण पुढे राजस्थान, कर्नाटक, महाराष्ट्र व पंजाब या प्रांतांनी हिंदूंची नष्ट झालेली जीवनशक्ती पुन्हा जिवंत केली व आक्रमणाचा प्रतिकार करून शेवटी भारतातून मुस्लीम सत्तेची पाळेमुळे खणून काढली.

राजपुतांनी बाप्पा रावळपासून राणा संगापर्यंत जवळजवळ आठशे वर्षे मुस्लीम आक्रमणाचा प्रतिकार केला, बाप्पा रावळ व खुम्माण यांनी आपल्या शौर्याचे पहाड मध्ये उभे केले नसते, तर आठव्या-नवव्या शतकांतच अरबांच्या आक्रमणाची लाट सर्व उत्तर हिंदुस्थानात पसरली असती.

## स्वराज्य आणि स्वधर्म

राजपुतांनी मुसलमान आक्रमणांचा प्राणपणाने प्रतिकार केला खरा, पण अखिल राजस्थानचे एकछत्री राज्य निर्माण करणे त्यांना कधीही शक्य झाले नाही. प्रसिद्ध इतिहासकार ईश्वरीप्रसाद यांनी राजपुतांच्या शौर्याचे व उणिवांचेही वर्णन केले आहे. ते असे – राजपूत जन्मत:च लढवय्या असे. शरणागतीपेक्षा प्राणदान त्याला श्रेयस्कर वाटे.

अंगी सेनानायकांचे विपुल गुण आहेत, प्रचंड सैन्य हाताशी आहे, स्वधर्माचा अभिमान आहे; तरी सर्व राजपूत वीर बादशहाच्या सेवेत राहून हिंदुराज्ये बुडविण्याच्या व इस्लामी राज्यविस्ताराच्याच उद्योगात गुंतलेले असत. याचा अर्थ असा की, स्वराज्य व स्वधर्म यांचा काही संबंध असतो, हे त्यांच्या स्वप्नातही कधी आले नाही. व्रते-वैकल्ये, तीर्थयात्रा, उपास, गोब्राह्मणपूजन, दानधर्म, पूजा, अभिषेक यांचा आचार केला की, आपण स्वधर्माचे पालन केले असे त्यांना वाटत होते आणि ही श्रद्धा अजूनही हिंदुसमाजात दृढमूल आहे. हिंदुधर्माला व्यक्तिधर्माचे स्वरूप कसे आले होते, हे यावरून स्पष्ट होते. धर्म हा समाजाच्या धारणेसाठी, संघटनेसाठी असतो; हा प्राचीन विचारच हळूहळू या समाजातून नाहीसा झाला आणि या समाजाला संघटनतत्त्वच राहिले नाही.

आपल्या धर्मशास्त्रकारांनी आणि धर्मपीठांनी एक वेळ अद्वैत तत्त्वज्ञानाची उपासना केली नसती, तरी फारसे बिघडले नसते. पण स्वराज्य व स्वधर्म यांच्या अद्वैताची संपूर्ण उपेक्षा जी त्यांनी केली, .ती करायला नको होती.

विजयनगरच्या संस्थापकांनी मात्र स्वधर्म व स्वराज्य यांचे अद्वैत पुरेपूर जाणले. धर्मक्रांतीवाचून समाजाचा उत्कर्ष होणार नाही, अशी विजयनगरच्या धर्मधुरीणांच्या बुद्धीची निश्चिती झाली होती. याचे पहिले गमक त्यांनी पतितशुद्धीच्या रूढीचे केलेले पुनरुज्जीवन हे होय. विद्यारण्य तथा माधवाचार्य हे जे चौदाव्या शतकातले धर्मद्रष्टे थोर पुरुष यांना शुद्धिबंदी किती घातक आहे, हे ध्यानात येऊन त्यांनी हरिहर आणि बुक्क या इस्लामला सक्तीने बळी पडलेल्या थोर सरदारांना शुद्ध करून परत स्वधर्मात घेतले.

विजयनगरच्या सम्राटांनी विद्येप्रमाणेच लष्करी यंत्रणाही अत्यंत कार्यक्षम ठेवली होती. ते अनेक अर्थांनी राजर्षी होते. कृष्णदेवरायाच्या कारकिर्दीत विजयनगरच्या वैभवाचा कळस झाला (इ.स. १५०९ ते १५३०). कृष्णा व तुंगभद्रा यांच्या अुआबातील प्रदेश त्याने आपल्या अधिराज्याखाली आणला आणि अनेक वेळा

धाडी घालून विजापूर व गुलबर्गा येथील मुस्लीम सत्ताही खिळखिळ्या करून टाकल्या.

पण पुढे तीनशे वर्षे हिंदुस्थानला पारतंत्र्य सोसावे लागले. तीनशे वर्षांनंतर या देशात एक प्रचंड धर्मक्रांती घडून आली. या क्रांतीचे प्रणेते होते छत्रपती शिवाजी महाराज. व्यक्तिगत धर्माला समाजधर्माचे रूप देणे, राजधर्मात सर्व धर्मांचा समावेश होतो हे लोकांच्या मनावर ठसविणे, स्वराज्य व साम्राज्य यांना पाठमोरा झालेला धर्म त्या ध्येयाच्या मागे उभा करणे, थोडक्यात म्हणजे स्वराज्य व स्वधर्म यांचा संयोग घडवून धर्म हे समाज संघटनेचे तत्त्व मानणे; हीच ती क्रांती होय. तिचे विवेचन करताना डॉ. पु.ग. सहस्रबुद्धे लिहितात–

महाराजांना नवी दौलत संपादावयाची होती आणि रूढ हिंदुधर्म तर दर पावलाला त्यांना अडवीत होता. त्यामुळे त्या रूढ कल्पनांचा उच्छेद करीतच त्यांना मार्ग आक्रमावा लागला. समुद्रगमनाची रूढी त्यांनी झुगारून दिली व जलदुर्ग बांधून आरमार निर्माण केले. पतितांची शुद्धी रूढ धर्मशास्त्राला मान्य नव्हती, पण ते धर्मशास्त्र बाजूस ठेवून त्यांनी नेताजी पालकर व बजाजी निंबाळकर यांना परत स्वधर्मात घेतले. कलियुगात फक्त ब्राह्मण आणि शुद्रच अस्तित्वात आहेत, म्हणजे वैश्य व क्षत्रिय नाहीत. हे वचन तर त्यांनी अगदी हेटाळून टाकले व 'क्षत्रियकुलावतंस' असे स्वत:ला म्हणवून घेऊन विधियुक्त राज्याभिषेकही त्यांनी करवून घेतला. त्या काळी हिंदुधर्माला इतके हीन व समाजविघातक रूप आले होते की, ज्याला काही नवे साधायचे' होते त्याला त्यात आमूलाग्र परिवर्तन घडविल्यावाचून गत्यंतरच नव्हते.

भारतातल्या इतर प्रदेशांत हे संघटनातत्त्व महाराष्ट्राव्यतिरिक्त अन्यत्र कुठे दृष्टिगोचर होत नव्हते. इस्लामी आक्रमकांचा नि:पात करण्यात मराठ्यांना इतरांपेक्षा जास्त यश आले, याचे कारण स्वराज्य व स्वधर्म यांचा संयोग त्यांनी घडवून आणला हेच होय. महाराष्ट्रात सतराव्या व अठराव्या शतकांत भारतव्यापी जी एक प्रचंड शक्ती निर्माण झाली, ती स्वराज्य व स्वधर्म यांच्या अद्वैतातूनच निर्माण झाली, यात काही शंका नाही.

(मुख्य आधार – भारतीय संस्कृती कोश
संपादक – पं. महादेवशास्त्री जोशी)

* * *

# धर्म व तत्त्वज्ञान





## बौद्ध धर्म

■ डॉ. अ. प्र. जामखेडकर

**गुंफांमध्ये राहणाऱ्या बौद्धभिक्षूंचे आणि त्यांच्या आश्रयदात्यांचे, त्यांच्या बौद्धधर्माच्या तत्त्वज्ञानातील पारंगततेच्या आणि धर्मप्रसाराच्या कळकळीच्या व्यतिरिक्त, महाराष्ट्राला दिलेले महत्त्वाचे योगदान म्हणजे लेण्यांच्या स्वरूपातील वारसा होय. या संदर्भात फर्गसन या शैलगृहस्थापत्याच्या कलेतिहासकाराने नमूद केलेला अभिप्राय नोंदणे आवश्यक आहे. भारतातील बौद्ध शैलगृहस्थापत्याचा ठेवा हा अपूर्व असून जगातील ज्या काही थोड्या स्थापत्यप्रकारांना 'सच्चे स्थापत्य' अशी संज्ञा देता येईल, त्यापैकी आहे.**

कुठल्याही धार्मिक परंपरेचा इतिहास अभ्यासताना त्या परंपरेची बीजे केव्हा, कुठे व कशी रुजली; तिचा उत्कर्ष व अपकर्ष केव्हा झाला; आणि कुठली कारणे अशी घडली की, ज्यांच्यामुळे त्या परंपरेला आपला पसारा आवरता घ्यावा लागला, आणि सगळ्यांत मुख्य म्हणजे त्या धार्मिक परंपरेने या सर्व वाटचालीत कुठे आपला ठसा उमटविला हे पाहणे अत्यंत आवश्यक असते. आणि इतिहासाची अशी पुनर्रचना करताना निरनिराळ्या प्रकारचा पुरावा म्हणजे पुरातात्त्विक, वाङ्मयीन आणि कलेतिहासीय पुरावा लक्षात घेणे इष्ट ठरेल.

मागे म्हटल्याप्रमाणे बौद्धधर्माचा महाराष्ट्रातील इतिहासाचा अभ्यास करताना प्राचीन वाङ्मयात, त्यातल्यात्यात त्रिपिटक, दिव्यावदान व उत्तरकालीन बौद्ध वाङ्मयात, कुठले उल्लेख येतात; नाशिक, नेवसा, पैठण, पवनी, तेर, कोल्हापूर इत्यादी पुरातत्त्वीय स्थळांतून कुठल्या प्रकारचा पुरावा मिळतो; सगळ्यांत महत्त्वाचे म्हणजे लेणी, त्यांचे स्थापत्य, शिल्प तेथील शिलालेख यांतून समजणारे बारकावे यांमुळे कुठली ऐतिहासिक तत्त्वे व निष्कर्ष पुढे येतात ते महत्त्वाचे आहे. या तिन्ही प्रकारच्या स्रोतांमध्ये लेणी स्थापत्यातून मिळणारा पुरावा कलैतिहासिक दृष्टीनेच नव्हे, तर एरवीही अत्यंत वेगळा व विस्मयजनक

आहे. लेण्यांमध्ये १) भिक्षूंच्या निवासासाठीचे कक्ष (cells); ज्यांना सर्वसामान्यपणे विहार म्हटले जाते, २) चैत्यगृह, ३) भिक्षूंच्या सामूहिक उपयोगासाठीचे मांडव (उदाहरणार्थ भोजन मंडप), आणि पाण्याची टाकी (पाणपेढी, ण्हाणपोढी) यांचा मुख्यत्वे समावेश होतो. बांधीव विहारात हे किंवा या प्रकारचे वास्तुविशेष आढळतात. दगडांत किंवा विटांनी बांधलेल्या वास्तुसंकुलात नंतरच्या काळात काही बदल झाले, काही इमारती आणखी बांधण्यात आल्या, काही कमी झाल्या– पडल्या किंवा पाडल्या– किंवा गरजेनुसार काही बदल करण्यात आले, तर त्याचा कसून अभ्यास केल्यानंतर कल्पनाचित्रांच्या साहाय्याने त्यांना सजीव करता येते. कारण मानवी हस्तक्षेपामुळे त्यात पडझड होते आणि बऱ्याच वेळा कालौघात या वस्तूंना पृथ्वी आपल्या कुशीत सामावून घेते. काळ्या पत्थरात खोदून काढलेल्या गुंफांच्या मूळ स्थापत्यरचनेत मानवी हस्तक्षेपामुळे बदल झाल्याची काही अपवादात्मक उदाहरणे आहेत; झीज झाल्याने अथवा दरड कोसळल्याने गुंफांची क्षती होते, पण वास्तू छतासकट जवळजवळ अक्षुण्णच राहते. एका तऱ्हेने ज्या प्रकारे एखाद्या जीवाश्मती प्राण्यांच्या अस्थींचे, वनस्पतींच्या फुलापानांचे अवशेष जसेच्या तसे दूरवरच्या भविष्यासाठी शिल्लक राहतात, त्याचप्रमाणे बौद्धविहार हे आपल्यासाठी आजतागायत अवशिष्ट आहेत.

आजवरच्या भारतीय धर्मांच्या अभ्यासाचा आढावा घेतला, तर असे लक्षात येते की; अभ्यासकांचे दोन गट आहेत: एक त्या धर्मातील आकर ग्रंथांचा अभ्यास करून त्यातील आख्याने व इतिहास (myths and legends), गृहीत सिद्धान्त (dogma) आणि धार्मिक विधी व आचार (ritual & practices) यांचा अभ्यास करून धार्मिक संकल्पना व विचार ह्यांची चिकित्सा करून त्या आधारे धर्माचा उदय, परिपोष व ऱ्हास यांची मीमांसा करणाऱ्यांचा गट; आणि दुसरा गट म्हणजे धर्माशी संबंधित असलेल्या भौतिक व त्यातल्या कलैतिहासिक पुराव्यांचा अभ्यास करणाऱ्यांचा. इतिहासाची मांडणी करताना दोन्ही गट आपापल्या परीने नाणी, अभिलेख यांसारख्या पुरातत्त्वीय पुराव्यांची दखल घेत असतात असे दिसते. कलेतिहास तज्ज्ञांना धार्मिक संकल्पनांतील बदलांचा, राजकीय उलाढालींबरोबरच आर्थिक आणि सामाजिक बदलांचा, वांशिक पार्श्वभूमीचा (ethnic background) आणि एकूणच सांस्कृतिक इतिहासाचा विचार केल्याशिवाय अशा प्रकारच्या कलेतिहासाची मांडणी करणे अशक्य आहे, हे लवकरच लक्षात आले होते. या संबंधात १८८८ साली लिहिलेल्या फर्गसन आणि बर्गीस यांच्या **केव्ह टेम्पल्स ऑफ इंडिया** या ग्रंथात लिहिलेल्या प्रस्तावनेतील विवेचन लक्षात घेणे योग्य ठरेल. त्यांच्या मते १) वांशिक/भाषिक पार्श्वभूमी, २) धार्मिक इतिहास व परंपरा, ३) आश्रयदाते आणि ऐतिहासिक चढ-उतार, ४) भगवान गौतमबुद्धापासून ते सातव्या शतकापर्यंतच्या राजवंशांचा कालानुक्रम आणि या सर्व सांस्कृतिक पार्श्वभूमीवर बौद्धलयनस्थापत्याचा उदय, विकास व ऱ्हास यांचा विचार करणे योग्य ठरेल.

### सार्थवाह मार्ग

आपला अभ्यास महाराष्ट्रापुरता मर्यादित असल्याने बौद्ध धर्माचा प्रसार नेमका कुठल्या कालखंडात झाला, महाराष्ट्रात कुठे-कुठे झाला आणि त्याच्या ऱ्हासाचे स्वरूप काय होते, यांची माहिती घेणे आवश्यक आहे. दक्खनमध्ये म्हणजे महाराष्ट्र, उत्तर कर्नाटक आणि आंध्र प्रदेश ह्या ठिकाणी सर्वांत प्राचीन ऐतिहासिक अभिलेख हे मौर्य सम्राट अशोक याचेच आहेत. या अभिलेखात आलेल्या चेर, चोल आणि केरळपुत्र ह्या सीमावर्ती राजांच्या उल्लेखावरून अशोकाचे शिलालेख ज्या भागात सापडतात, त्या दक्खनवर राजकीयदृष्ट्या त्याचा अंमल होता, हे स्पष्ट आहे. महाराष्ट्रापुरता पुरावा सांगावयाचा झाल्यास सोपारा येथे अशोकाच्या धर्मलिपीचे प्रस्तरावर कोरलेले अवशेष तेथील स्तूपाच्या सान्निध्यात सापडले आहेत. पूर्व महाराष्ट्रात चंद्रपूर जिल्ह्याच्या देवटेक येथील एका अर्वाचीन मंदिरात एक लेख सापडला; त्याचा उद्देश सम्राट अशोकाच्या इतर काही शिलालेखांप्रमाणे प्राण्यांचा वध न करावा अशी आज्ञा कोरण्याचा होता. हे दोनही अशोकाच्या काळातील असल्याने बौद्ध धर्माचा प्रसार महाराष्ट्रात पूर्वेच्या टोकापासून ते पश्चिमेच्या टोकापर्यंत झाला, असे अनुमान करता येईल.

कोल्हापूर, तेर, भोन, (बुलढाणा) आणि पवनी (जि. भंडारा) येथील विटांनी बांधलेल्या स्तूपावशेषावरूनही ह्या अनुमानाला बळकटी मिळते. शूर्पारक (संस्कृत), सुप्पारक (पाली) ही सोपाऱ्याची प्राचीन नावे सुप्पारक जातक क्र. ४६३ यांत आढळतात; ती भगवंताच्या एका पूर्वजन्मातील नावावरून दिली आहेत. पूर्णावदान (३ रे शतक) हे भगवंताच्या पूर्ण नावाच्या शिष्याच्या आख्यानात्मक आहे. भगवंत पूर्णाच्या विनंतीला मान देऊन त्याच्या भावांनी बांधलेल्या चन्दनशालेत राहावयास येतात, असा कथाभाग आहे. सूनापरान्त कोकण येथे भगवान बुद्धाचा पूर्ण नावाचा थेर येतो अशी कथा त्रिपिटकातही आहे. या उल्लेखावरून भरभराटीचे बंदर असल्याने इ. स. पू. सहाव्या शतकात गंगा खोऱ्यातील व पूवोदधीतील सार्थवाहांना ते माहीत असण्याची शक्यता; व पर्यायाने बुद्धसमकालातच त्या ठिकाणी बौद्ध धर्माचा प्रसार झाला असल्यास नवल नाही. म्हणूनच व्यापाऱ्यांचे आवागमन पवनी व पैठण मार्गे दक्षिणेत होत असल्यास त्यात आश्चर्य मानण्यासारखे काही नाही. हे त्रिपिटकात उल्लेखिलेल्या गोदावरीकाठी अश्मक आणि मूलक जनपदांच्या सीमेवर राहणाऱ्या बावरी ब्राह्मणाच्या कथेवरून सहज स्पष्ट होते. बावरीचे शिष्य भगवान बुद्धाकडे शंकांचे निरसन करण्यासाठी गेले; त्यांचा प्रवास अश्मक, मूलकामधील पैठण, त्यानंतर माहिष्मती (आधुनिक महेश्वर), उज्जयिनी, गोनर्द, विदिशा, वनसाह्वय (हल्लीचे तुंबवन), कौशांबी, साकेत आणि श्रावस्ती ह्या मार्गाने झाला. असाच एक मार्ग कौशांबीहून निघून निषध जनपदातून विदर्भात जात असल्याचा उल्लेख महाभारतात येतो; तोच पुढे पवनीमार्गे आंध्रप्रदेशात अमरावतीला जात असे. अमरावतीचा महाचैत्य तसेच तेथील शुंगकालीन शिल्पांवरून इ. स. पू. दुसऱ्या, तिसऱ्या शतकात सार्थवाह आन्ध्रात जात असत, असे दिसते.

या सार्थवाहांच्या मार्गांचे उल्लेख अर्थगर्भ आहेत. संस्कृतीमध्ये स्थित्यंतरे कशी व का पडतात, हा पुरातत्त्वज्ञांचा आवडता अभ्यासाचा विषय. महाराष्ट्रातील ताम्रपाषाणयुगीन (इ. स. पू. २२०० ते १०००) व नंतरच्या बृहदश्मयुगीन संस्कृतीचे (सुमारे इ.स.पू ११००–७००) पूर्वेतिहासकालीन (Early Historical) नागरी संस्कृतीत रूपांतर कसे झाले, याचा अभ्यास भौतिक पुराव्यांच्या साहाय्याने करण्यात आला आहे. त्यासाठी पश्चिम महाराष्ट्रातील जोर्वे व दायमाबाद संस्कृतीचा सखोल अभ्यास करण्यात आला आहे. इनामगाव व इतर पुरातत्त्वीय स्थळांच्या उत्खननातून असे लक्षात आले की, इ. स. पू. च्या सातव्या शतकात अवर्षणामुळे पश्चिम महाराष्ट्रात ग्राम–संस्कृतीचा विलय होऊन ग्रामवासीयांना अन्नोत्पादनाऐवजी भटके राहून शिकारीवर गुजराण करावी लागली. कदाचित तशी परिस्थिती वऱ्हाडात आणि विदर्भात लोटली असावी. परंतु अशोकाच्या काळात ही परिस्थिती बदलली असावी व नागरीकरणाची प्रक्रिया गंगा खोऱ्यातील प्रेरणेमुळे परत सुरू झाली असावी. सार्थवाहांना दक्खनमधील त्यांच्या प्रवासात भिक्षूंची साथ नक्कीच मिळाली असावी. त्यामुळे लोखंड, सागवान लाकूड, मसाल्याचे पदार्थ याना परदेशात मोठी मागणी असलेल्या वस्तूंच्या विनिमयाबरोबर शेतीचे उत्तम ज्ञान मराठी जनतेने प्राप्त करून घेतले ते श्रमण–ब्राह्मणांमुळे, असे आर्थिक जीवनाच्या अभ्यासकांचे मत झाले आहे.

### लेणी आणि गुंफा

अभ्यासकांच्या मते सातवाहन काळात बुद्धोपासकांचे प्रमाण जवळ–जवळ ७५% ते ८०% असावे. नेवाशाच्या मातीच्या चैत्यावरूनच नव्हे, तर निरनिराळ्या मण्यांची आभूषणे इत्यादींवरून या स्वैर अंदाजास काहीसा पाठिंबा मिळतो, मात्र सगळ्यांत महत्त्वाचा म्हणजे बौद्ध गुंफांतून आढळणारा अभिलेख स्वरूपातला पुरावा; आणि गुंफांच्या स्वरूपातलाच. भारतातील बहुतांश लेणी दक्खनच्या पठारावरच आहेत. त्या जवळजवळ ९०० लेण्यांपैकी ६०० लेणी बौद्ध आहेत. महाराष्ट्रात त्याच नव्हे, तर दक्खनमधल्या अभिलेखांचा अभ्यास केला, तर असे लक्षात येते की, भगवान बुद्धांच्या संदेशाचा सच्चेपणा भाविकांच्या मनावर इतका ठसला होता की, समाजाच्या उतरंडीवरील अनेक घटक त्यांचे उपासक झाले होते. बुरूड, चांभार, कोष्टी, शेतीभाती आणि व्यापार–उदीम करणारे लोक, राजवैद्य, अमात्य ते राजे, राण्या आणि



अजिंठा गुंफा क्र. ४ मधील अवलोकितेश्वर.

त्यांचा परिवार या सगळ्यांचा त्यांत समावेश होता. असेही लक्षात येते की, काही महत्त्वाच्या ठिकाणी दूरवरून आलेल्या यात्रेकरूंनीही मोठ्या देणग्या दिल्या आहेत. कुठेही नव्या बौद्ध बांधकामाची – चैत्य अथवा विहार – सुरुवात झाली, तर त्यावर नवकार्मिक नावाच्या भिक्षूमधीलच एका अधिकाऱ्याची नेमणूक देखरेखीसाठी होत असे. त्याबरोबरच अशा नव्या उपक्रमात उपासकांचा प्रत्यक्ष सहभाग असे, हे कार्ले येथील देखण्या चैत्यगृहातील भूतपाल नावाच्या वैजयंती येथील (हल्लीचे वनवासी, उत्तर कानडा जिल्हा) श्रेष्ठीच्या उदाहरणावरून सहज लक्षात येईल. उपासक वैयक्तिकरीत्या, अथवा गट म्हणून लेण्यांच्या विशिष्ट भागासाठी देणगी देत असत; आणि भूतपालासारखे श्रेष्ठी त्याचा समन्वय घालीत असावेत. उपासकांनी दिलेल्या दानासंबंधातील अभिलेखातून मिळणाऱ्या माहितीच्या आधारे डॉ. अ. मि. शास्त्रींनी काही महत्त्वाचे निष्कर्ष काढलेले आहेत. त्यावरून भिक्षुसंघ आणि उपासक यांच्या परस्परसंबंधावर प्रकाश पडतो. तत्त्व म्हणून भिक्षु–भिक्षुणींनी धनसंग्रह करण्यास प्रतिबंध असला, तरी भिक्षुदानांचा उल्लेख अनेक शिलालेखांतून येतो; यावरून मालमत्तेची मालकी आणि धनसंचय यांबाबत काही व्यावहारिक तोडगा काढला गेला असावा असे दिसते. आन्ध्रप्रदेशातील अर्हद्‌गोष्ठी आणि सिंहगोष्ठी यांच्या उल्लेखांवरून अंतर्गत आणि बाह्य प्रशासनाचा भाग भिक्षूंनी आणि उपासकांनी परस्पर सामंजस्याने वाटून घेतला असल्याचे दिसते. दानाच्या बाबतीतील आणखी एक उल्लेखनीय बाब म्हणजे उपासकांच्या सामाजिक स्थानात काळानुरूप घडलेले बदल. सम्राट अशोकाच्या काळापर्यंत बौद्ध धर्मात १८ पंथांचा प्रादुर्भाव झाल्याचा उल्लेख या अगोदर आला आहेच; पण अभिधम्माच्या बाबतीत झालेले मतभेद किंवा त्यावर खोलवर विचार करून आचार्यांची झालेली मतांतरे परिणामी इसवी सनाच्या सुरुवातीच्या काळात बोधिसत्त्वयानाचा वायव्य प्रांतात झालेला उदय यांमुळे काही महत्त्वाचे बदल झाले. नागार्जुन आणि बसुबन्धु यांचे तत्त्वज्ञानात्मक ग्रंथ व काश्मिरातील मूलसर्वास्तिवादी यांनी मोठ्या प्रमाणावर रचलेल्या विभाषा (टीका), हे नव्या बदलाचे प्रतिनिधी मानता येतील. मूळच्या सोप्या व सांख्य तत्त्वज्ञानाला जवळीक दाखवणाऱ्या विचारांना या तत्त्वज्ञांनी आदर्शवादी (idealistic) तत्त्वज्ञानाची बैठक दिली. हे सर्व वाङ्‌मय साहजिकच संस्कृतमध्ये रचले गेले. महायान उपासक हा गृहस्थाश्रमीसुद्धा असू शकतो, या बदलाचा परिणाम गुहांतील लेखांमध्ये, स्थापत्यात आणि मूर्तींत लक्षणीयरीत्या दिसतो. अजिंठा येथील दुसऱ्या कालखंडातील गुहा या श्रावकयानापासून बोधसत्त्वयानाकडे स्थित्यंतर दाखवितात हा निष्कर्ष आता जवळ–जवळ सर्वसामान्य झाला आहे. येथील नंतरच्या कालखंडातील अभिलेख हे संस्कृतमध्येच आहेत. अजिंठा येथील बोधिसत्त्वयानाच्या चळवळीशी मिळतीजुळती ठिकाणे कुडा, कान्हेरी, औरंगाबाद, नाशिक ही मुख्यत्वे सांगता येतील. ह्या ठिकाणचे चैत्यस्थापत्य व मूर्तींची ध्याने (iconography) यांत निश्चितच बदल झाला आहे. प्रासादासारखी चैत्यगृहाची रचना, शाक्यमुनी व अवलोकितेश्वर आणि वज्रपाणि या देवत्रयाचे तसेच

तथाकथित श्रावस्तीच्या प्रातिहार्याचे, अवलोकितेश्वर शरणगमन (Litany of Avalokiteshuara) या मूर्तींचे प्राचुर्य आणि तारेच्या विविध मूर्तींची सुरुवात ही वैशिष्ट्ये म्हणून सांगता येतील. या सर्वांवरून सहज निष्कर्ष असा काढता येतो की, बौद्ध हा सर्वसाधारणांचा धर्म न राहता अभिजनांचा (elite) धर्म झाला. त्यामुळे दुसऱ्या कालखंडातील पाहुणी (intrusive) शिल्पे आणि चित्रे यांचे आश्रयदाते जास्त करून भिक्षूच असले, तर आश्चर्य वाटण्याचे कारण नाही. याच काळात पौराण व स्मार्त धर्मांचा आणि त्याच्या अनुषंगाने शैव, वैष्णव व शाक्त पंथांचा मोठ्या प्रमाणावर महाराष्ट्रात प्रसार झाला. ह्यावरूनही हेच म्हणावे लागते की, समकालात बौद्ध धर्माचा संकोच झाला आहे.

महायान आणि वज्रयान या बौद्ध धर्मातील पंथांचा आविष्कार महाराष्ट्रात सहाव्या-सातव्या शतकात झाला. वेरूळ येथील क्र. २ पासून ते १३ पर्यंतच्या गुंफा मंत्रयानाची व पन्हाळे काजी येथील व कान्हेरी येथील दरबार लेणे व संबंधित शिलालेख हे वज्रयानाशी संबंधित असलेले अवशेष समजले जातात. ही बाबसुद्धा बौद्ध धर्माचा उत्तरोत्तर होणारा संकोच अधोरेखित करते. वेरूळ येथील व पन्हाळे काजी येथील गुंफांत कोणत्याही प्रकारचा कोरीव लेख नाही. त्यामुळे येथील मंत्रयान व वज्रयान पंथांचे आश्रयदाते कोण होते, हे अनुमानानेच ठरवावे लागते. औरंगाबाद येथील महायान गुंफांना तेथील राजघराण्यातील उपासकांच्या प्रतिमांवरून राजाश्रय मिळाला असावा असे मानले जाते. अतीश दीपंकर श्रीज्ञान यांनी आपल्या पूर्ववयात ध्यानामध्ये प्रावीण्य मिळवण्यासाठी कान्हेरी येथे काही काळ घालवला होता; व शिलालेखावरून राष्ट्रकूट घराण्याचा कान्हेरी येथील बौद्ध भिक्षूना अप्रत्यक्ष आश्रय होता, असे दिसते. कोल्हापूरचे शिलाहार राजे सर्वधर्मसमभाव वृत्तीचे होते, हे त्यांच्या इरकुडी येथील शिलालेखावरून दिसते; मिरिञ्ज-देशातील इरकुडी येथील तलावाकाठी शिव, जिन आणि बुद्ध यांची मंदिरे गंडरादित्याच्या काळात बांधल्याचा उल्लेख आहे. तर या पूर्वी दन्तिवर्मन् राष्ट्रकूटाच्या काळात काम्पिल्य या गावातील बौद्धमठाला गाव दान दिल्याचा उल्लेख आहे. हे म्हणजे हल्लीचे तुळजापूरजवळचे काम्पिल असावे.

### अमोल ठेवा

बौद्ध धर्माच्या इतिहासाच्या दृष्टीने अभिलेखात उल्लेखिलेल्या महत्त्वाच्या आचार्यकुलांचा (schools) उल्लेख या संदर्भात आवश्यक आहे. डॉ. अजय मित्र शास्त्री यांनी अभिलेखातून उलगडणाऱ्या प्राचीन आचार्यकुलांचा व पंथांचा विशेष अभ्यास केला असून गुंफांतील शिलालेखांत काश्यपीय (कार्ले), धर्मोत्तरीय (कार्ले जुन्नर), भद्रायनीय (नाशिक), चैत्यवासी (अजिंठा, जुन्नर व नाशिक) आणि शैल आचार्य कुलाच्या दोन शाखा पूर्वशैल (अमरावती) आणि अपरशैल (कान्हेरी) यांचे उल्लेख आले आहेत. पैकी काश्यपीय, धर्मोत्तरीय आणि भद्रायनीय ही आचार्यकुले स्थविरवादी असून चैत्यवादी हे महासांघिक निकायातील होते. यावरून श्रावकयानातील कुठली केंद्रे स्थविरवादात आणि कुठली महासांघिक निकायात मोडत होती, हे स्पष्ट होते. अभिलेखातून तसा उल्लेख नसला, तरी औरंगाबाद हे महायान व मंत्रयानाचे, तर वेरूळ हे मंत्रयानाचे महत्त्वाचे केन्द्र होते असे दिसेल. पन्हाळे (काजी) येथील बौद्ध गुंफा ह्या वज्रयानातील अमोघसिद्धी व एकल्ल महावीर चंडरोषण यांच्या उपासनेची स्थाने निश्चितपणे होती. अभिलेखांवरून असेही लक्षात येते की, दक्खनमधील नागार्जुनकोंडा, उत्तरेतील सांची, सिंध, गांधार व गौड या प्रदेशांतील बौद्धधर्मीयांशी येथील भिक्षूंचा संपर्क होता.

गुंफांमध्ये राहणाऱ्या बौद्धभिक्षूंचे आणि त्यांच्या आश्रयदात्यांचे, त्यांच्या बौद्धधर्माच्या तत्त्वज्ञानातील पारंगततेच्या आणि धर्मप्रसाराच्या कळकळीच्या व्यतिरिक्त, महाराष्ट्राला दिलेले महत्त्वाचे योगदान म्हणजे लेण्यांच्या स्वरूपातील वारसा होय. या संदर्भात फर्गसन या शैलगृहस्थापत्याच्या कलेतिहासकाराने नमूद केलेला अभिप्राय नोंदणे आवश्यक आहे. भारतातील बौद्ध शैलगृहस्थापत्याचा ठेवा हा अपूर्व असून जगातील ज्या काही थोड्या स्थापत्यप्रकारांना 'सच्चे स्थापत्य' अशी संज्ञा देता येईल, त्यापैकी आहे. फर्गसन यांच्या मते ब्रिटिश साम्राज्यात समकाळात लोकप्रिय झालेले नव

अभिजनस्थापत्य (Neo Classical) हे या संज्ञेस मुळीच पात्र नाही. त्यांच्या मते अशा प्रकारची संज्ञा बौद्ध शैलगृहस्थापत्यास देणे अनिवार्य आहे, कारण १) त्याच्या हजार वर्षांच्या इतिहासात कुठल्याही समकालीन एतद्देशीय अथवा परकीय स्थापत्याचे अंधानुकरण त्याने केलेले नाही, २) ते ज्या उद्देशाने (म्हणजे भिक्षुनिवासासाठी तसेच चैत्य पूजेसाठी) निर्मिले गेले, तो उद्देश त्याने परिपूर्ण रितीने पार पाडला; आणि ३) त्यात होत गेलेले बदल हे त्याच्या नैसर्गिक विकासाच्या अंगभूत होते. फर्गसन ह्याच्या ह्या शेऱ्यातील सत्यता आज १०० वर्षांनंतरही टिकून आहे, कारण या स्थापत्यातील विकासाची उलगड करताना धर्मग्रंथांतील व अभिलेखांतील पुरावा उपयोगी पडतो आणि गुंफांची ठेवण, आराखडे व प्रयोजने (plans & motifs) त्यांच्या विकासाबाबतची निरीक्षणे आजही अभ्यासकांना उपयोगी पडतात.

डॉ. सूरज पंडित यांनी बौद्ध धर्माचा अभ्यास एका वेगळ्या रितीने केला आहे. त्यांच्या मते कान्हेरी येथील बौद्ध धर्माच्या इतिहासाचे स्थूलपणे ३ कालखंड मानता येतात. १) इ. स. पहिले शतक ते तिसरे शतक, २) चौथे ते सातवे शतक, आणि ३) सातवे ते दहावे शतक. या काळात महाराष्ट्रात अनुक्रमे सातवाहन, वाकाटक-त्रैकूटक आणि राष्ट्रकूट-शिलाहार यांचा अंमल होता. या तीन कालखंडांत कान्हेरी येथील बौद्ध मठांच्या तीन अवस्थांचे वर्णन पुढीलप्रमाणे करता येईल १) एक धार्मिक यात्रेचे ठिकाण, २) महाविहार एक विद्यास्थान, आणि ३) वज्रयान केन्द्र असे करता येईल. बौद्धधर्माच्या चढउताराचा विचार करता असे लक्षात येते की, सातवाहन (इ. स. पू. ११०- इ. स. २३०) आणि कदाचित सातवाहनपूर्व काळातही बौद्ध धर्माचा उत्कर्षच होता. बावरीसारख्या समकालीन वैदिक तपस्व्यांनासुद्धा बुद्धांविषयी आदरच होता. समाजातील वैदिकधर्मानुयायी वर्ग धरून सर्व घटक बुद्धोपदेशाचा आदर करत होते आणि पालन करत होते. दुसऱ्या कालखंडात बौद्धधर्माला पाशुपत (शैव) संप्रदायाच्या तसेच सात्वत संप्रदायाच्या स्पर्धेला तोंड द्यावे लागले. स्मार्त-पौराण धर्मामध्ये अनेक लोकधर्मांचे (folk religious practices) संश्लेषण (integration) झाल्याने त्याचीही बौद्ध धर्मास झळ पोहोचली. परंतु याच काळात आपल्या प्रगल्भ तत्त्वज्ञानामुळे बौद्ध धर्माची पताका उंच फडकत होती. नेपाळपासून जपानपर्यंत कान्हेरीच्या महाविहाराची कीर्ती पोहोचली होती. बौद्ध ध्यान-धारणेचा अभ्यास करण्यासाठी दीपंकरासारखे महापुरुष आपल्या पूर्ववयात इ. स. १० व्या शतकात कान्हेरी येथे येऊन गेले. औरंगाबाद आणि वेरूळ येथील तन्त्रयान आणि वज्रयान यांचा प्रभाव परदेशीसुद्धा पडला असण्याची शक्यता वर्तविता येते. पण जवळ-जवळ सातव्या शतकापासूनच जनसामान्यांशी असलेला संपर्क नाममात्र राहिला असावा. बौद्ध धर्मानुयायी हे शैव आणि त्यातल्या पाशुपत संप्रदायात सामील झाले असावेत. नाथ-संप्रदाय ८४ सिद्धांची परंपरा मानतो, हे सर्वश्रुत आहे. त्यांतील बहुतांश सिद्ध बौद्ध होते. गोरक्षनाथांच्या चरित्रावरून हे स्पष्ट होते की, वज्रयान आणि शैव कापालिक संप्रदायात शिरलेल्या पंचमकारांविरुद्ध त्यांनी मोठे अभियान सुरू केले होते. कदाचित त्याच्याच सपाट्यात महाराष्ट्रातील व दक्खनमधील उरलेला बौद्ध संघ नाथपंथात समाविष्ट झाला असावा. पन्हाळे (काजी) येथील गुंफांतून प्राप्त झालेला पुरावा हे ऐतिहासिक सत्य अधोरेखित करतो. महाराष्ट्राच्या आणि दक्खनच्या जडणघडणीत बौद्ध धर्माचे योगदान फार महत्त्वपूर्ण आहे. या उज्ज्वल पर्वाचे अधिक तपशिलात जाऊन संशोधन झाले पाहिजे.

**संदर्भ :**


१. फर्गसन आणि बर्जेस, केव्ह टेम्पल्स ऑफ इंडिया, १८८०
२. गुलाम, याजदानी, अर्ली हिस्ट्री ऑफ द डेक्कन,
३. वॉल्टर स्पिंक, फ्रॉम अजंटा टू एलोरा, १९७१
४. म. न. देशपांडे, केव्हज् अॅट पन्हाळे काजी, १९८३
५. अ. प्र. जामखेडकर, महाराष्ट्राचे स्थापत्य आणि कला, २००४
६. आर्स ओरिएन्टॅलिस, पुरवणी, २०००
७. के. व्ही. सौंदरजन्, केव्ह टेम्पल्स ऑफ द डेक्कन,
८. रा. चिं. ढेरे, नाथ संप्रदायाचा इतिहास, २००१
९. सूरज पंडित, रिलिजस डेव्हलपमेन्ट ऑफ बुद्धिझम अॅज अन्डरस्टुड थ्रू द आर्ट ऑफ कान्हेरी, पीएच. डी. प्रबंध मुंबई विद्यापीठ, २००४


* * *

# धर्म व तत्त्वज्ञान





## जैन धर्म

■ प्रा. गजकुमार शहा

**महाराष्ट्रातील जैनांनी गीत, संगीत, नृत्य यांनाही आपल्या समाजजीवनात महत्त्वाचे स्थान दिल्याचे दिसून येते. गीत, संगीत व नृत्य यांनी युक्त, ते धवलमंगलगान होय. तीर्थंकारांच्या पाचही कल्याणिकांत या मंगल संगीताचा उपयोग करीत. जैन मराठी काव्यात या संगीताची खास वैशिष्ट्ये आढळतात. मध्ययुगीन मराठी जैन पद्य-रचना ह्या संगीतावर आधारलेल्या आहेत.**

महाराष्ट्र म्हणजे उत्तर आणि दक्षिण हिंदुस्थान यांना जोडणारा प्रदेश. दक्षिणेच्या आलेल्या लाटा आणि उत्तरेकडून आलेला विचारांचा प्रवाह महाराष्ट्राने पचविला. जैन धर्माने महाराष्ट्रात प्रवेश केला आणि तो धर्म येथेच स्थिरावला. जैन धर्माने महाराष्ट्राच्या जडणघडणीत मोठा हातभार लावला. आपले तत्त्वज्ञान, कला, व्यापार, साहित्य, शिक्षण आणि समाजजीवन यांचा येथील संस्कृतीवर मोठा ठसा उमटविला.

महाराष्ट्रातील तेर (जि. उस्मानाबाद) येथे भगवान महावीरांचे समवशरण आले होते, असे म्हटले जाते. उत्तरेत १२ वर्षांचा दुष्काळ पडल्यानंतर आचार्य भद्रबाहु, चंद्रगुप्त मौर्य हे आपल्या शिष्यांसह दक्षिण हिंदुस्थानात गेले. त्या वेळी त्यांचा प्रवास महाराष्ट्रातूनच झाल्याने त्यांच्या आगमनाबरोबर जैन धर्माचेही आगमन महाराष्ट्रात झाले. आचार्य भद्रबाहू हे मूळचे प्रतिष्ठानचे (पैठण). त्यांचे आगमन



वाई येथील जैन शिलालेख.

महाराष्ट्रात इ.स.पूर्व चौथ्या शतकात झाले होते. पण महाराष्ट्रातील जैन धर्माच्या अस्तित्वाचा निश्चित पुरावा आपणास आचार्य कुंदकुंदाचार्यांनी इ.स.च्या पहिल्या शतकात लिहिलेल्या प्राकृत भाषेतील निर्वाण काण्डात मिळतो. या निर्वाण काण्डात सिद्धक्षेत्र गजपंथ (नाशिक), मांगीतुंगी (बागलाण), मुक्तागिरी (एलिचपूर), कुंथलगिरी आदी सिद्धक्षेत्रांचा उल्लेख आलेला आहे. आचार्य पूज्यपादाचार्यांनी इ.स.च्या पाचव्या शतकात संस्कृत भाषेत निर्वाण काण्ड रचले आहे. त्यातही महाराष्ट्रातील वरील सिद्धक्षेत्रांना निर्वाण क्षेत्रे मानून त्यांना वंदन केले आहे.

महाराष्ट्रातील जैन धर्माच्या अस्तित्वाचा असाच आणखी एक लिखित पुरावा आपणास पुणे जिल्ह्यातील मावळ तालुक्यातील पाले येथे आढळतो. तो शिलालेखाच्या स्वरूपात आहे. हा शिलालेख ब्राह्मी लिपीत कोरला आहे. त्याचा कालखंड हा इ.स.पूर्व दुसरे शतक हा आहे. इंद्ररक्षित याने हे लेणे खोदून अर्पण केले, अशा अर्थाचा हा शिलालेख आहे. या शिलालेखाचा प्रारंभ ‘णमो अरिहंताण’ या मंगलाचरणाने झालेला असल्याने हा शिलालेख जैनांचाच आहे, हे निश्चित. अतएव इ.स.पूर्व दुसऱ्या शतकात जैनांचे अस्तित्व महाराष्ट्रात होते, हे विविध पुराव्यांवरून स्पष्ट दिसते.

**शिवकाळात जैन धर्म**

जैन धर्मात आचारविचारांवरून दिगंबर आणि श्वेतांबर असे दोन पंथ प्राचीन काळी निर्माण झाले. महाराष्ट्रात मात्र दिगंबर पंथीयांची संख्या मोठ्या प्रमाणात होती. हे छत्रपती शिवाजी महाराजांच्या काळात इ.स.१६७५ मध्ये महाराष्ट्रात येऊन गेलेल्या श्वेतांबर आचार्यशील विजयजी मुनी यांनी लिहून ठेवलेल्या तीर्थमाला या प्रवासवर्णनावरून कळते. शीलविजयजी मुनी यांची तीर्थवंदना बऱ्हाणपूर मलकापूर येथून सुरू होते. या तीर्थवंदनेच्या प्रारंभीच ते म्हणतात की, येथून दक्षिणेस समुद्रापर्यंतच्या भागात बहुतेक सगळा समाज दिगंबर जैनांचा आहे.

श्वेतांबर पंथाच्या लोकांचे आगमन अकराव्या –बाराव्या शतकात गुजरात आणि माळवा येथून महाराष्ट्रात झाले. ते प्रामुख्याने व्यापार करण्यासाठी महाराष्ट्रात आले. या काळात महाराष्ट्रात देवगिरीच्या यादवांचे राज्य होते. महाराष्ट्रात शांतता आणि समृद्धी होती. जैन समाजाला प्रामुख्याने शांततेची आणि समृद्धीची गरज असल्याने तो महाराष्ट्राकडे आपोआप ओढला गेला.

या दोन्ही पंथांत समेट घडविण्याचेही कार्य महाराष्ट्र आणि कर्नाटक ह्यांच्या सीमेवर प्राचीन काळी झालेले दिसते. त्यासाठी इ.स.च्या तिसऱ्या शतकात कदंब वंशाच्या

काळात यापनीय संघाची निर्मिती झाली. यापनीय संघाने श्वेतांबर आणि दिगंबर पंथीयांत समेट घडवून आणण्याचा जो प्रयत्न इ.स.च्या चौदाव्या शतकापर्यंत केला, तो स्तुत्य होता यात संशय नाही.

### जैन तत्त्वज्ञानाचे योगदान

जैन तत्त्वज्ञान हे प्रामुख्याने पंच अणुव्रतावर आधारलेले आहे. अहिंसा, सत्य, अस्तेय, अपरिग्रह आणि ब्रह्मचर्य ही पंच अणुव्रते आहेत. प्रत्येक श्रावकाने त्याचे पालन केले पाहिजे. 'अहिंसा परमो धर्मः' असे जैन तत्त्वज्ञानात म्हटले आहे. जैनांनी आपल्या तत्त्वज्ञानात अहिंसेचा अतिशय सूक्ष्म विचार केला आहे. वनस्पतीतही जीव असतो, तेव्हा वृक्षांची विनाकारण तोड करू नका, असे सांगून जैनांनी पर्यावरण रक्षणात फार मोठे सहकार्य केले आहे. जैन तत्त्वज्ञान हे नास्तिक तत्त्वज्ञान म्हणून ओळखले जाते. कारण जैनांनी परमेश्वराऐवजी आत्म्याला प्रमुख मानले आहे. आत्मा हाच आपला गुरू आहे. त्यामुळे परमेश्वराची काहीच गरज नाही. अनेकान्त वाद ही जैनांनी या जगाला दिलेली मोठी देणगी आहे. अनेकान्तवाद याचा अर्थ तुम्ही जे सांगता, ते योग्य तर आहेच, पण दुसरा जो विचार व्यक्त करतो, तोही योग्य असू शकतो. अनेकान्त म्हणजे दुसऱ्यांच्याही विचारांचा आदर करा. याबाबत पाच आंधळे आणि हत्ती यांची कथा प्रसिद्ध आहे. अनेकान्तसिद्धान्तामुळे विचारमंथन सोपे झाले. जैनांचा अनेकान्त म्हणजे लोकशाही संस्थेचा पाया होय. जैन तत्त्वज्ञानाप्रमाणे मृत्यू हा महोत्सव आहे. त्यासाठी जैनांनी सल्लेखनाव्रत सांगितले आहे.

इ.स.च्या पहिल्या शतकात आचार्य उमास्वामी होऊन गेले. त्यांनी तत्त्वार्थसूत्र नावाचा ग्रंथ लिहिला आहे. तो जैनांचा संस्कृत भाषेतील पहिला ग्रंथ मानला जातो. या ग्रंथात जैन तत्त्वज्ञानाचा सूक्ष्म विचार केला आहे. त्याचबरोबर पृथ्वी, पृथ्वीवरील पर्वत, नद्या, सरोवरे यांची लांबी-रुंदी यांचीही माहिती त्यात दिली आहे. स्वर्ग, नरक यांची रचना याचाही या ग्रंथात ऊहापोह केला आहे. म्हणजे जैनांनी या देशाला केवळ तत्त्वज्ञानच दिले असे नव्हे तर या देशाचा भूगोल, विश्वाची रचना आदी गोष्टींचाही त्यांनी अभ्यास केला होता हे विशेष, जैन वाङ्मयात महाराष्ट्रातील अनेक नद्या, पर्वत, भूप्रदेश यांचे उल्लेख आढळतात. ज्योतिष, खगोल, वैद्य, योग, पाक, व्याकरण या शास्त्रांवरही जैनांचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

भगवान महावीरांच्या तत्त्वज्ञानात ताठरता आहे, असे सांगितले जाते. हा दोष पत्करूनही जैनांनी आपल्या तत्त्वज्ञानात यत्किंचितही बदल केला नाही. म्हणून जैन धर्म या जगात अव्याहत टिकून राहिला. यज्ञात बळी दिल्या जाणाऱ्या प्राण्यांचे जीव अहिंसेमुळे वाचले आणि या देशातील पशूंवर आधारित अर्थव्यवस्था कितीतरी वर्षे टिकून राहिली. भगवान महावीरांच्या काळात यज्ञातील पशूंच्या आहुतीमुळे ही अर्थव्यवस्था धोक्यात आली होती. तिचे अधःपतन थांबविण्याचे कार्य जैनांच्या अहिंसेने केले. भगवान मुनिसुव्रत ह्यांचे वास्तव्य पैठण येथे असताना एका रात्रीत त्यांनी साठ योजने प्रवास करून अश्वमेध यज्ञात टाकल्या जाणाऱ्या घोड्याला सम्यकत्वाची दिशा दिली, अशी कथा जिनप्रभसुरींच्या विविध तीर्थकल्प या ग्रंथात सांगितली आहे.

राष्ट्रीय आणि प्रादेशिक एकात्मता निर्माण होण्यात जैनांच्या अहिंसेचे योगदान मोठे होते. त्यामुळे देशात शांतता आणि समृद्धी ह्यांची बीजे रोवली गेली.

मध्ययुगात महाराष्ट्रात परकीय सत्ता प्रस्थापित झाल्यामुळे इतर धर्मांप्रमाणेच जैन धर्मातील लोकही गोंधळले होते. कोणत्या देवाची पूजा करावी, किंवा कोणता धर्म खरा, हेच जेव्हा त्यांना कळेना तेव्हा गुणकीर्ती यांनी श्रावकाला आपल्या धर्मात स्थिर करण्याचे मोठे कार्य महाराष्ट्रात केले. संस्कृत भाषा ही मध्ययुगात सर्वसामान्य लोकांना कळेनाशी झाली होती, म्हणून गुणकीर्ती यांनी धर्मामृत नावाचा एक स्वतंत्र गद्य ग्रंथ मराठीत लिहिला. तसेच इ.स.च्या तिसऱ्या शतकात जैन आचार्य समंतभद्र हेही होऊन गेले. त्यांनी जैन आचार सांगणारा रत्नकरंडश्रावकाचार नावाचा ग्रंथ संस्कृत भाषेत लिहिला होता. या ग्रंथाचे त्यांनी मराठीत भाषांतर करून जैन धर्मातील लोकांना त्यांच्या धर्मात स्थिर केले. धर्मामृत आणि रत्नकरंडश्रावकाचार हे जैन धर्मातील आचार-धर्मविषयक दोन महत्त्वाचे ग्रंथ आहेत. या दोन ग्रंथांमुळे महाराष्ट्रातील जैनांना त्यांचा आचारधर्म पंधराव्या शतकात स्पष्ट झाला. गुणकीर्तींचे हे कार्य फार मोठे आहे.

मध्ययुगात धर्माच्या बाबतीत विचलित झालेल्या महाराष्ट्रातील समाजाला त्यांनी एक विशिष्ट प्रकारची दिशा दाखवून आपल्या धर्मात स्थित केले, हे विशेष होय.

जैन तत्त्वज्ञानाचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे जैन समाजाने इतर धर्मीयांचा द्वेष कधीच केला नाही किंवा त्यांना कधी कमी प्रतीचे मानले नाही. जैनांनी नेहमीच सर्वांप्रती लोककल्याणाची भावना ठेवली. राष्ट्रकल्याण, लोककल्याण आणि स्वकल्याण हा जैन तत्त्वज्ञानाचा मूळ पाया असल्याने महाराष्ट्रात राहताना जैन समाजाला कधीच परकेपणाचा प्रत्यय आला नाही.

### महानुभाव पंथाशी संबंध

मध्ययुगात निर्माण झालेल्या जैन तत्त्वज्ञानाचा काही पंथांवरही परिणाम झाल्याचे दिसून येते. मध्ययुगात महानुभाव पंथ निर्माण झाला. या पंथाचे संस्थापक चक्रधर यांचा उल्लेख त्यांचे चरित्रकार नम्रदेव, जिनवर, गोमटदेव वगैरे नावांनी करतात. गोमट हे नाव श्रवणबेळगोळ येथील बाहुबलीच्या जैन मूर्तीचे असल्याचे प्रसिद्ध आहे. महानुभाव पंथातील अहिंसेचा आचार हा जैन आचारांची व विचारांची आठवण पदोपदी करून देतो. उदाहरणार्थ महानुभाव पंथात विंचू, साप अशा प्राण्यांनाही मारण्यास मनाई होती. पचन पाचनालाही हिंसा म्हटले जाई. जेव्हा खानदेश भागात चक्रधरांचे भ्रमण चालू होते, तेव्हा त्यांनी भडगाव येथील जैन मंदिरात मुक्काम केल्याचा उल्लेख महानुभाव साहित्यात सापडतो.

### मराठी साहित्यात जैनांचे योगदान

मराठी भाषेतील पहिला शिलालेख श्रवण बेळगोळ येथील गोमटेश्वराच्या मूर्तीच्या पायाशी कोरला आहे. ''श्री चावुण्डराये करवियले'' हा शिलालेख इ.स.९८० मधील आहे. जैनांनी पुराणे, चरित्रे, आख्यान, धर्मकथा, नागरकथा, कथासंग्रह, व्रतकथा, रास, कलाकाव्य, खंडकाव्य स्तोत्र, आरती, पदे आणि लावण्या असे लहान–मोठे विविध वाङ्मय प्रकार हाताळून मराठी भाषेत साहित्य–निर्मिती केली आहे. इ.स.१४५० ते इ.स.१८५० या चारशे वर्षांच्या कालावधीत पन्नासपेक्षा अधिक साहित्यिक जैन समाजात होऊन गेले. ज्ञात असलेल्यांपैकी गुणदास किंवा गुणकीर्ती हा मराठीतील पहिला जैन ग्रंथकार मानला जातो. तो इ.स.१४५० च्या दरम्यान होऊन गेला.

कलानिधी किंवा वैद्यनाथ कलानिधी हा जैनांनी यादव काळाच्या अखेरीला निर्माण केलेला महत्त्वाचा जैन ज्ञानकोश होय. याची निर्मिती बहुधा देवगिरी येथे झाली असावी. हा ग्रंथ ताडपत्रीवर लिहिलेला असून त्याची प्रत अहमदाबादेच्या 'संघवीना पाडो' या जैन ग्रंथभांडारात आहे. या ग्रंथाच्या पहिल्या प्रकरणात यज्ञांचे विविध प्रकार, पुरोहितांची नावे, यज्ञपात्रे इत्यादी सर्व गोष्टींची सूक्ष्म माहिती आहे. पुढच्या प्रकरणातून नगरे, नगररचना, वृक्षवल्ली अशा विविध विषयांची सूत्ररूप माहिती आहे. यात अनेक अपरिचित शब्द असल्याने व लेखन सूत्ररूप असल्याने वाचन कठीण झाले आहे. असा ज्ञानकोशपर अन्य ग्रंथ मराठी भाषेत क्वचितच आढळतो. जैनांनी तो ज्ञानेश्वरांच्या समकालात निर्माण करून मराठी साहित्यात मोठी भर घातली, यात संशय नाही.

मराठी जैन वाङ्मय हे प्रामुख्याने दिगंबर जैनपंथीयांनी निर्माण केले आहे.

### जैन कलेचे योगदान

जैन साहित्यात ७२ कलांचे वर्णन केले असले, तरी त्यांची चित्रकला, मूर्तिकला, वास्तुकला, मंदिर स्थापत्य, गिरिशिल्प तथा लेण्या, प्रसाधन शिल्प, मानस्तंभ आदी कला क्षेत्रांतील योगदान अतिशय मोलाचे आहे. अंकाई–टंकाई, मांगीतुंगी; भामेर, एलोरा, त्रिंगलवाडी, गजपंथ येथील चामरलेणी; पाटणादेवी, नाशिक येथील पांडव लेण्यातील जैन लेणी; धाराशिव, दौलताबाद किल्ल्यातील जैन लेणी, शहाद्याजवळील मोहिदे येथील जललेणी इत्यादी लेण्या प्रामुख्याने अमाप लोकाश्रय आणि राजाश्रय यांतून निर्माण झाल्या आहेत. वेरूळ येथे क्रमांक ३० ते ३४ ही जैनांची पाच लेणी आहेत. या लेण्यांची निर्मिती नवव्या–दहाव्या शतकात झाली आहे. आचार्य जिनसेनाचार्य यांची ग्रंथरचनाही याच काळात झाली आहे. महापुराणाच्या संशोधिका सौ.अरुणा काला यांनी आचार्य जिनसेनांचे आदिपुराण या ग्रंथात आत्मविश्वासपूर्वक असा दावा केला

आहे की, वेरूळ येथील जैनांच्या पाच लेण्यांची निर्मिती आचार्य जिनसेन ह्यांच्या वर्धमानपुराण, पार्श्वाभ्युदय आणि महापुराण यांना समोर ठेवून झाली आहे.

लेण्यांबरोबरच जैनांनी आपल्या संपत्तीचा उपयोग जैन मंदिरे बांधण्यासाठी केला, जिनप्रभ सुरीच्या विविध तीर्थकल्प या ग्रंथात (विक्रम संवत १३८९) महाराष्ट्रातील सहा मंदिरांचा (तीर्थांचा) उल्लेख केला आहे. त्यात कोल्हापुरातील भुवनतिलक आदिनाथ; सोपाऱ्यातील जिवंतस्वामी, ऋषभनाथ; नाशिक येथील त्रिभुवन तिलक जिवंत स्वामी चंद्रप्रभनाथ; प्रतिष्ठान (पैठण) येथील मुनिसुव्रतनाथ, करहेटक (कऱ्हाड) येथील उपसगहर पार्श्वनाथ आणि श्रीपूर (शिरपूर, जि.वाशीम) येथील अंतरिक्ष पार्श्वनाथ अशी महाराष्ट्रातील विविध भागांत ही मंदिरे होती. याचा अर्थ महाराष्ट्रातील बहुतेक सर्व भागांत जैन धर्माचा प्रसार झाला होता. देवगिरी किल्ल्यात तीन जैन मंदिरे होती.

जैनांनी महाराष्ट्रात मंदिर संकुलाची किंवा मंदिर-नगराची संकल्पना साकार केली. एकाच ठिकाणी अनेक मंदिरांची निर्मिती, हे जैनांचे वैशिष्ट्य होय. अंजनेरी येथे जैन मंदिरांचा व मठांचा असा समूह आपणास भग्न अवस्थेत आढळून येतो.

मानस्तंभ ही कला जैनांनी जगाला दिलेली अभूतपूर्व देणगी होय. मानस्तंभ हा दगडापासून तयार केलेला स्तंभ असतो व त्याच्या शिरोभागी मूर्तीचे अधिष्ठान असते. धर्माची कीर्ती दिगंत व्हावी, दूरवरून येणाऱ्यांना मंदिरांशी संपर्क साधता यावा आणि मानवाला आपल्या खुजेपणाची जाणीव करून देण्यासाठी अशा प्रकारच्या स्वर्गीय शिल्पाची उभारणी जैन मंदिरासमोर करण्याची प्रथा जैनांनी येथे सुरू केली होती.



ऋषभनाथांची चोविसी.

महाराष्ट्रातील जैनांनी गीत, संगीत, नृत्य यांनाही आपल्या समाजजीवनात महत्त्वाचे स्थान दिल्याचे दिसून येते. गीत, संगीत व नृत्य यांनी युक्त, ते धवलमंगलगान होय. तीर्थंकारांच्या पाचही कल्याणिकांत या मंगल संगीताचा उपयोग करीत. जैन मराठी काव्यात या संगीताची खास वैशिष्ट्ये आढळतात. मध्ययुगीन मराठी जैन पद्य-रचना ह्या संगीतावर आधारलेल्या आहेत.

इ.स.९६५ मध्ये कविराज पुष्पदंताने राष्ट्रकूट राजा कृष्ण तृतीय याच्या कारकिर्दीत महापुराण (तिसटिठमहापुरिसगुण लंकारू) या ग्रंथाची स्थापना केली. अपभ्रंश हिंदी गायनाची परंपरा जैन कवींनी मराठीत आणली. जैनांची काव्यरचना विविध रागदारींतही केलेली आढळते. यात चिमणापंडित आघाडीवर होता. जैन पोथ्यांत काफी, मल्हार, मालगौंड, सकलाभरण, कल्याण बिलावल ह्या रागदाऱ्यांची नावे आढळतात. जैनाचार्यांनी उद्यराग, कांबुजराग, यमनराग आदी अनेक प्रकारच्या रागांतील आरत्या व स्तोत्रे रचली आहेत. भजन केल्याशिवाय भोजन करू नका. भजनाने आपले भोजन अमृत बनेल, असे जैन आचार्य सांगतात.

जिनसेनांच्या आदिपुराणातील वाद्यांमध्ये वीणा, मृदंग, पणव, शंख, तुर्य, काहला, घण्टा, काष्टीरव, तुताव, दुंदुभी, महापटह, पुष्कर, आनंदिनी, भेरी, विजयघोष पटह, गभ्भीरावर्त शंख इत्यादी वाद्ये होती. १२व्या पर्वातील १९४ ते २१७ श्लोकांपर्यंत आचार्य जिनसेनांनी संगीत आणि नृत्य ह्यांचे वर्णन केले आहे.

## चित्रकला

चित्रकलेच्या साहाय्याने जैनांनी महाराष्ट्रातील सामाजिक जीवन समृद्ध केलेले दिसते.

वेरूळ येथील लेण्यांत जैनांची काही चित्रे आहेत. ही चित्रे प्रामुख्याने इंद्रसभेत आहेत. त्यात एका चित्रात भगवान महावीरांना चंदनबाला आहार देताना दाखवली आहे. कैलास लेण्यातही जैनांशी संबंधित एक चित्र आहे. त्यात जैन मुनींना पालखीत बसवून घेऊन जाताना दाखवले आहे. परंतु वेरूळ येथील बहुतेक चित्रे ही अस्पष्ट झाली आहेत.

पूर्वी महाराष्ट्रात ग्रंथलेखनासाठी ताडपत्रांचा वापर करत. मध्ययुगात जैनांनी ग्रंथलेखनासाठी कागदाचाही वापर सुरू केला होता. कारंजा येथील जैन भांडारात उपासकाचार (रत्नकरंडश्रावकाचार) (प्रभाचंद्रकृत टीका) या ग्रंथाची इ.स.१३५८मधील प्रत उपलब्ध आहे. याच काळात कागदावर चित्रे काढण्याची प्रथाही सुरू झाली. कागदावर चित्रे काढलेली कल्पसूत्राची आद्यप्रत सध्या लंडनच्या इंडिया लायब्ररीत आहे. तिच्यात ३१ चित्रे आहेत. ही प्रत इ.स.१४२७ मधील आहे. नागपूरच्या शास्त्रभांडारात सुगंध दशमीकथा या ग्रंथाची प्रत मिळाली. या ग्रंथात कथेवर आधारीत अशी ७० चित्रे आहेत. मुंबई येथील ऐल्लक पन्नालाल दिगंबर जैन सरस्वती भवनात भक्तामर स्तोत्राची एक सचित्र प्रत आढळली. तिच्यात सुमारे ४० चित्रे आहेत.

ताडपत्रीपेक्षा कागदावर चित्र रंगवणे सोपे असल्यामुळे पुढील काळात चित्रकलेत अधिक सुबकता आली. या काळात सोने आणि चांदी यांचा वापर रंग म्हणून करण्यात येऊ लागला. प्रारंभी केवल अलंकार दाखविण्यासाठी सुवर्णाचा वापर करीत. पण नंतर मात्र सोन्याचा वापर विपुल प्रमाणात करण्यात येऊ लागला. कदाचित सोने स्वस्त झाले असेल किंवा धनिकांचे याकडे लक्ष गेले असेल. ग्रंथलेखनात शाई म्हणून सोने आणि चांदी ह्यांचा वापर मोठ्या प्रमाणात होऊ लागला. श्वेतांबर परंपरेत आचार्यांची वस्त्रे सुवर्णाने सजवली जाऊ लागली. चित्रांची समस्त पार्श्वभूमी सोन्याने रंगवत. चित्रात सोन्याचा वापर जेवढा अधिक तेवढे त्याचे मूल्य वाढू लागले. सुवर्णामुळे चित्र अधिक मौल्यवान होते, असे म्हटले जाऊ लागले. चित्रांमध्ये सोन्याचा वापर प्रामुख्याने श्वेतांबर पंथीयांनी केला. सचित्र ग्रंथांत श्वेतांबरांचे ग्रंथ आजपर्यंत अधिक प्रमाणात उपलब्ध झाले आहे.

मध्ययुगात मारवाड व गुजरात येथून जैन समाज हा व्यापार-उद्योगासाठी व राजकीय कारणामुळे महाराष्ट्रात येत होता. कर्नाटकातूनही बरेच लोक महाराष्ट्रात येत असत. त्यामुळे सांस्कृतिक देवाणघेवाणीला हातभार लागला.

तीर्थयात्रा, पूजा, महोत्सव यानिमित्त जैन समाज एकत्र येत असे. हिंदुस्थानातील सर्व विभागांत जैन मुनींचा विहार होत असे. त्यांच्या या विहारामुळे राष्ट्रीय एकात्मता निर्माण होण्यास मोठा हातभार लागला.

## जैनांची सामाजिक जाणीव

समाजातील दीन, दलित लोकांबद्दल जैन समाजात कणव होता. धर्मामृत ग्रंथामध्ये 'माणूस जेविता भुकेले न उठवावे कवणाचे पोट न जाळावे' असा पोटतिडिकेचा उपदेश केला आहे. हा उपदेश केवळ धार्मिकच वाटत नाही

तर त्यातील सामाजिक जाणीव महत्त्वाची आहे. जैन तत्त्वज्ञानात सप्त-व्यसने सांगितली आहेत. जुगार, मांस-भक्षण, मद्यपान, वेश्यागमन, पारधिकर्म, चोरी, परस्त्री-सेवन या जैनांनी सांगितलेला सप्त-व्यसनांचा त्याग केल्याने जैन समाजाचे चारित्र्य खूपच उच्च राहिले. त्याचा परिणाम इतर समाजावर होणे अपरिहार्य होते. जैनांनी श्राद्ध करणे, होळी, मायराणीची पूजा, जाग, भोग, वड-पिंपळ पूजा, भूमिपूजन, नागपूजन, ग्रहणस्नान, नवस करणे या गोष्टी निषिद्ध मानल्या. धर्म म्हणून नदीत किंवा समुद्रात केले जाणारे स्नानही त्यांनी वर्ज्य केले. जैनांच्या या शिकवणीने महाराष्ट्रातील समाज हा विवेकी बनण्यास मदत झाली.

प्राचीन काळी जैन धर्मात साहित्य निर्मिती, संघ संचालन व समाजाचे धार्मिक नियंत्रण हे सारे आचार्य करीत असत. त्यांचे संघ असत. या संघ परंपरेचे रूपांतर पुढील काळात भट्टारक परंपरेत झाले. हे भट्टारक समाजात सिंहासनपती किंवा तक्ताधीश म्हणून ओळखले जात. १३व्या शतकापासून ते १९व्या शतकाच्या पूर्वार्धापर्यंत या भट्टारकाचे प्रस्थ जैन धर्मात टिकून होते. भट्टारकांनी प्रामुख्याने ग्रंथलेखन, पूजा, प्रतिष्ठा आणि सामाजिक रितीरिवाज यांकडे अधिक लक्ष दिले. महाराष्ट्रात कोल्हापूर, कारंजा, नांदणी, लातूर, देवगिरी व औरंगाबाद येथे भट्टारक पीठे होती. तत्कालीन राजकीय सत्तांकडून या भट्टारकांचा अनेकदा सन्मान झालेलाही आपणास दिसून येतो.

महाराष्ट्राची समृद्धी वाढविण्यात जैन समाजाचे मोठे योगदान आहे. जैनांनी प्रारंभापासूनच व्यापाराकडे लक्ष दिले. जैनांनी कृषी व्यवसायाकडे न वळण्याचे कारण म्हणजे कृषी करताना होणारी हिंसा. जमीन नांगरताना सर्प, विंचू, मुंग्या, घुशी, उंदीर यांसारख्या अनेक प्राण्यांची हिंसा होते. तेव्हा ही हिंसा टाळण्यासाठी जैन समाज हा व्यापाराकडे वळला. जैनांनी केवळ देशातच व्यापार केला असे नाही तर त्यांचा पाश्चिमात्य देशांशीही व्यापार चालू होता. जैनांनी समुद्र पर्यटन कधीच निषिद्ध मानले नाही. त्यामुळे त्यांचा परदेशाशी व्यापार चालू राहिला. जैन साहित्यात सोपारा बंदराचा वारंवार उल्लेख येतो. सोपारा येथे आचार्य वज्रसेन यांनी नागेंद्र, चंद्र, निवृत्ती व विद्याधर या चार व्यापारी पुत्रांना दीक्षा दिली होती. कुवलयमाला या जैन ग्रंथात (इ.स.७७८) उदयोतनसुरीने कोकणातील विजयापुरी या बंदराच्या समृद्धीचे वर्णन केले आहे. विजयापुरी म्हणजे विजयदुर्ग असावा, जो सध्या देवगड तालुक्यात विद्यादुर्ग या नावाने ओळखला जातो.

देशांतर्गत व्यापारातही जैन आघाडीवर होते. छत्रपती शिवाजी महाराजांच्या काळात बागलाणमधील मुल्हेर येथे जैनांची मोठी वस्ती होती. येथे असलेल्या चार पुऱ्यांपैकी एक पुरा जैनपुरा या नावाने ओळखला जात होता. याच काळात कारंजा येथे भोजसंघवी, अर्जुन संघवी व शीतल संघवी हे अतिशय ऐश्वर्यसंपन्न आणि दानशूर व्यापारी होते; असा उल्लेख शीलविजयी मुनी यांनी लिहिलेल्या तीर्थमालेत येतो.

### जैन व्यापाऱ्यांची आचारसंहिता

कालिका पुराणात जैन बोगार समाजाचा उल्लेख येतो. हा समाज अठरा वाणांचा व्यापार करीत असे. त्यात लोखंड, बीड, पोलाद, ताम्र, जस्त, पितळ, पोवळा, हस्तिदंत, मणी, मोती इत्यादी वस्तू असत. काशी, पैठण, खांबाईत, कलात, बऱ्हाणपूर येथील कापड प्रसिद्ध होते. व्यापार करताना तूट येऊन काही व्यापाऱ्यांचे दिवाळे निघाल्याचीही माहिती रविवार व्रत-कथा या ग्रंथातून मिळते. जैन व्यापाऱ्यांनी भेसळीपासून दूर राहावे, असेही जैन आचार्य बजावतात. याचबरोबर जैन व्यापाऱ्यांनी मध, विष, लोह, साबण, पान, धावडी, कुसुंबा, मोह, मेण, तीळ, चारोळी या वस्तूंचा व्यापार करू नये, असेही त्यांनी व्यापारविषयक आचारधर्मात सांगितले आहे. त्यामुळे हा जैन व्यापारी महाराष्ट्रात अतिशय सचोटीने व अखंडपणे व्यापार करीत राहिला.

जैन व्यापाऱ्यांचे वैशिष्ट्य म्हणजे जैन व्यापारी हा व्यापाराच्या निमित्ताने कोठेही जाण्यास तयार असे. जेथे अधिक फायदा, तेथे व्यापार ही नीती ठेवल्यामुळे तो ज्या प्रदेशात गेला, तो प्रदेश त्याचा बनला. त्या प्रदेशाला त्याने आपली कर्मभूमी मानले. नम्रता आणि समाजाप्राप्ती सद्‌भाव असे व्यापाराला आवश्यक असणारे गुण जैनांत असल्यामुळे त्यांच्या व्यापाराची प्रगती महाराष्ट्रातही झाली.

सातवाहन काळात जैनांनी आपली शैक्षणिक चळवळ स्वतंत्रपणे चालवली होती. प्रामुख्याने धर्माचरण, संस्कृती संवर्धन व व्यक्तिमत्त्वाचा विकास यांवर त्यांचा अधिक भर होता. विविध तीर्थकल्प आणि प्रबंध चिंतामणी या ग्रंथांवरून जैनांच्या शैक्षणिक चळवळींची कल्पना येते. पैठण, जुन्नर, तेर, नाशिक ही प्राचीन काळी जैनांची शिक्षण केंद्रे होती.

**जैन धर्मात स्त्रीला प्रतिष्ठा**

'एक स्त्री शिकली तर सात पिढ्या तरतील' ही स्त्रीबद्दल जैनांची भावना होती. म्हणून आज महाराष्ट्रातील जैन स्त्रिया या अधिक प्रमाणात साक्षर आहेत. प्रतिष्ठा तिलक नावाच्या ग्रंथात पुरुषांच्या ७२ आणि स्त्रियांच्या ६४ विद्यांची माहिती आहे. प्रथम तीर्थंकर आदिनाथ यांनी आपली कन्या ब्राह्मी हिला विविध प्रकारचे शिक्षण देऊन सुसंस्कृत केले होते. भगवान महावीरांनी स्त्रियांच्या बाबतीत उदार दृष्टिकोन ठेवला होता. त्यांनी आपल्या संघात पूर्वीप्रमाणेच स्त्रियांना प्रवेश ठेवला. इतकेच नव्हे तर भगवान महावीरांचा मुनिदीक्षेनंतरचा पहिला आहार सती चंदनबाला हिच्या हस्ते झाला. याचा परिणाम म्हणून मध्ययुगातही महाराष्ट्रातील अनेक जैन स्त्रिया मुक्तपणे तीर्थयात्रेला जाताना दिसतात. गुजरी-मरहटी या गीतात असाच एक महाराष्ट्रीय स्त्रियांचा थवा गुजरातमधील गिरनार पर्वताच्या पायथ्याशी भगवान नेमिनाथांच्या पादुकांचे दर्शन घेण्यासाठी येतो. त्याच वेळी गुजरातच्याही जैन स्त्रियांचा एक समुदाय तेथे येतो. आणि या दोन्ही स्त्रियांच्या समुदायात गिरनार पर्वतावर प्रथम कोणी चढावे, यातून वाद सुरू होतो. कारण गिरनार पर्वतावर जाणारी वाट अरुंद असते. या दोन्ही स्त्री-समुदायांत जे भांडण होते, ते मेघराज या कवीने गुजरी-मरहट्ट या द्वैभाषिक गीतात अतिशय सुंदर रितीने रंगविले आहे. जेव्हा गुजराती स्त्री महाराष्ट्रातील स्त्रीला कासोटेवाली, अर्धे अंग उघडी ठेवणारी, हिंग वगैरे खाणारी म्हणून हिणवते, तेव्हा महाराष्ट्रीय स्त्रीचाही प्रादेशिक अभिमान जागृत होतो. ती गुजराती स्त्रीला तुटक्या कानाची, भुऱ्या रंगाची, धनप्राप्तीसाठी जप-तप करणारी, पान न खाताच ओठ रंगलेली व लावेप्रमाणे दिसणारी वगैरे... म्हणून ठणकावते. वास्तविक पाहता स्त्रियांचे दोन्ही समुदाय हे जैन धर्माचे उपासक होते. पण त्यांतही आपणास प्रादेशिक वाद दिसून येतो. कवी मेघराज याने हे गीत पंधराव्या शतकात मराठी भाषेत लिहिले आहे. पण त्यात मराठी स्त्रियांचा जो बाणा दिसतो, तो नक्कीच महाराष्ट्राची अस्मिता वाढविणारा होता, यात शंका नाही. वाचकांनी मराठी-गुजराती शब्दांनी युक्त असलेले हे गीत जरूर वाचावे. या गीतातून मध्ययुगीन गुजरात व महाराष्ट्र येथील स्त्री-जीवनाची छान ओळख होते. तत्कालीन रितीरिवाज, खानपान, अलंकार, स्त्रीसुलभ भावना आणि महाराष्ट्राशी झालेली एकरूपता यांची माहिती आपणास मिळते. मेघराज याला उभय भाषा (गुजराती व मराठी) चक्रवर्ती म्हटले जाते.

अशा प्रकारे महाराष्ट्राच्या जडणघडणीत जैन समाजाचे योगदान कित्येक शतकांपासून आहे. हे योगदान करताना जैन समाजाने अनेकान्त ह्या तत्त्वाचा वापर करून महाराष्ट्राची अस्मिता नेहमीच जागृत ठेवली. या अस्मितेमुळेच आज महाराष्ट्र हा वैभवशाली नि समृद्ध दिसतो. त्याची काही बीजे या भूमीत जैन समाजाने पेरली होती, हे विशेष होय.

* * *





# शीख धर्म

■ डॉ. अरविंद गोडबोले

**शीख बांधव नांदेडला 'हजुर साहिब' किंवा 'अबिचल नगर' ह्या शब्दांनी गौरवतात. शिखांची पाच 'तख्ते' आहेत. तख्त म्हणजे जेथून धार्मिक आदेश दिले जातात, ते पीठ. गुरू हरगोविंदांनी अमृतसरला हरिमंदिरासमोर बांधलेले 'अकाल तख्त' वगळता इतर चार तख्ते गुरू गोविंदसिंगांशी निगडित आहेत. गुरू नानकांनी 'जपु'त आध्यात्मिक उन्नतीचे पाच खंड (पायऱ्या) वर्णिले आहेत. 'सचखंड' हे त्यांतील शेवटचे खंड असून ते निरंकाराचे वर्णनातीत निवासस्थान दर्शवते.**

शीख धर्म व महाराष्ट्र ह्यांचे नाते उगमापासून व निकट आहे. दक्षिणेत उगम पावलेला मध्ययुगीन भक्तिमार्ग उत्तरेत नेण्याचे महान कार्य, नामदेवांनी (सन १२७०-१३५०) केले. शिखांच्या 'आदी श्री गुरू ग्रंथसाहिबजी'मध्ये(संक्षिप्त रूप-ग्रंथ) महाराष्ट्रातील संत नामदेवांच्या ६१ रचना आहेत. 'अकुल पुरख' हा नामदेवांचा ईश्वरविषयक शब्द शीख गुरूंच्या रचनांत आणि चंद्र-सूर्य हे दिवे, ही त्यांची उपमा गुरू नानकांच्या 'गगनमै थालु' ह्या सुप्रसिद्ध 'आरती'मध्ये येते. बार्शीचे संत परमानंद (जन्म बहुधा १४८३) ह्यांचेही एक पद ग्रंथात (पृ. १२५३) आहे. दक्षिणेत वारकरी पंथाचा पाया ज्ञानेश्वरांनी घातला. या भागवत धर्माची पताका नामदेवांनी उत्तरेत फडकवली.

शीख हा शब्द 'शिष्य' ह्या संस्कृत शब्दापासून निघाला आहे. पालीमध्ये विद्यार्थी ह्या अर्थाचा 'सेख' हा शब्द आहे. शिखांचे पहिले गुरू, खत्री जातीतील, बेदी (वेद जाणणारे) कुलातील, नानकदेव (१४६९-१५३९) हे शीघ्रकवी व पंजाबी भाषेचे आद्य कवी होत.

बालवयापासून ईश्वराची ओढ लागलेल्या नानकदेवांना १४९७ वा १४९९ साली, बेनी नदीत स्नानाला गेले असता, ईश्वर साक्षात्कार झाला. ह्या साक्षात्कारामुळे नानकदेव व त्यांच्यानंतरच्या गुरूंना ईश्वरी अधिष्ठान प्राप्त झाले, अशी शिखांची श्रद्धा आहे. तसेच नानकांचे तेज नंतरच्या गुरूंत आले, अशी शीख संकल्पना आहे. सर्व शीख गुरू स्वतःला 'नानक' म्हणवून घेत.

साक्षात्कारानंतरच्या सुमारे वीस वर्षांत, नानकांनी पूर्वेस आसामपर्यंत निश्चित व बहुधा चीनपर्यंत, दक्षिणेस लंकेपर्यंत, उत्तरेस तिबेटपर्यंत, पश्चिमेस अरबी देशांत व शेवटी जवळच्या गोरखहतारी ह्या नाथ संप्रदायाच्या केंद्रापर्यंत अनुक्रमे 'उदासी' (तीर्थाटन) केल्या. गुरू नानकदेवांनी ह्या उदासींत त्या वेळच्या देशस्थितीचे अवलोकन केले. दुष्टांचे मतपरिवर्तन केले, प्रसंगोपात काव्यरचना केली. सोवळ्या-ओवळ्याच्या कल्पना, कर्मकांडाचे अवडंबर ह्यांचा सौम्य उपहास केला व नामस्मरण, शुद्ध आचरण ह्यांची महती गायली. 'जनमसाखी' वाङ्मयात नानकदेवांचे जीवन व चमत्कार आणि त्यांची कवने, ह्यांची 'भाविकांनी भाविकांकरिता लिहिलेली वर्णने' आहेत. त्यात काल व स्थळ ह्यांचा विपर्यास झाला असला, तरी इतिहासाचा गाभा आहे. 'दक्षिण उदासी'त, १५१०-१५१४ ह्या कालात, ते नांदेडला आले होते, अशी आख्यायिका आहे. नांदेडमधील 'गुरुद्वारा माल टेकरीसाहिब' हे त्या जागेचे स्मारक.

सर्व उदासींनंतर १५२१ च्या सुमारास पुनःश्च संसारी होऊन नानकदेव सियालकोट जिल्ह्यात (आता पाकिस्तानात) कर्तारपूर नावाने नंतर प्रसिद्ध झालेल्या गावी स्थायिक झाले. तेथे त्यांनी आपली कवने सुधारली व सामुदायिक नामस्मरण, उपासना, कीर्तन ह्यांकरिता 'धर्मशाला' (गुरुद्वाराचे प्रारंभीचे नाव) बांधली. तेथे गुरूपदेश, नामस्मरण इत्यादींकरिता भक्तांची 'संगत' होई. नानकदेवांकडे येणाऱ्यांना जेवण दिले जाई. ही प्रथा नंतरही चालू राहून, त्यातून 'लंगर' (फारशी शब्द; अनलगृह - संस्कृतशब्द) ही शिखांची सुप्रसिद्ध व्यवस्था निघाली. गुरुद्वाराला लंगर जोडलेला असतो. त्यात शाकाहार असतो. सर्व जण जमिनीवर बसून एका पंगतीत जेवतात. श्रीमंत शीख स्त्रीपुरुषही लंगरमध्ये काम करतात व गुरुद्वारात आलेल्यांची पादत्राणे सांभाळतात. ह्याप्रमाणे 'संगत', 'गुरुद्वारा', 'लंगर' व 'पंगत' ह्या शीख संस्था नानकदेवांच्या काळातच सुरू झाल्या.

'श्रीगुरू ग्रंथ साहिबजी'मध्ये गुरू नानकांच्या १९ रागांतील, विविध वृत्तांतील व काव्यप्रकारांतील ९७६ रचना आहेत. शिखांच्या नित्यपठणातील 'जपु', ओम्कारस्तुतीपर, 'दखनी ओअंकारू', सिदधांशी संवादपर 'सिध गोसटि', 'आसा दी वार' ह्या नानकदेवांच्या काही सुप्रसिद्ध रचना आहेत. त्यांच्या काव्यात इस्लामी आक्रमणाच्या व्यथा आणि बाबराच्या अत्याचारांचे वर्णन आहे.

नानकांनी सन १५३९ मध्ये, संसारी मुलगा लक्ष्मीचंद किंवा विरक्त मुलगा श्रीचंद (उदासी पंथाचे संस्थापक) ह्यांच्याऐवजी एकनिष्ठ शिष्य अंगद (१५०४-१५५२; मूळ नाव लहिणा - त्रिहान कुल) ह्यांना गुरुपद दिल्यामुळे व तीच प्रथा चालू राहिल्यामुळे त्यांची विचारसरणी लुप्त न होता, त्यांचा पंथ निर्माण झाला. तसेच गुरुपद आनुवंशिक नाही, पंथ संसारी लोकांचा आहे, हेही नानकांनी त्यातून सूचित केले. तथापि, तिसरे गुरू अमरदास (१४७९-१५७४: भल्ला कुल) ह्यांचे जावई चौथे गुरू, रामदास (१५३४-१५८१) ह्यांच्यापासून शिखांचे गुरुपद खत्री जातीच्याच सोधी घराण्यात गेले.

गुरू नानकांच्या काळातील कर्तारपूरचे केंद्र, अंगदांच्या वेळी खादूर येथे, अमरदासांच्या काळी गोविंदवाल येथे, रामदास व अर्जुन ह्यांच्या काळात अमृतसर येथे, हरगोविंदांच्या काळात कीरतपूर येथे व तेगबहादूर, गोविंदसिंग ह्यांच्या काळात आनंदपूर येथे गेले.

शिखांनी आपल्या प्राप्तीचा दहावा भाग गुरूकडे पाठवावा, ही 'दशवंध' (मसंद) पद्धत गुरू अर्जुनांनी सुरू केली. गुरू गोविंदसिंगांनी मसंद पद्धती समाप्त केली. फार मोठे सामाजिक भान असलेल्या शीख गुरूंनी नगरे वसविली, विहिरी व तलाव बांधले, शेतकऱ्यांना गायी घेऊन दिल्या आणि व्यापार व उद्योग ह्यांना उत्तेजन दिले.

गुरू अर्जुनांनी १५९९ मध्ये अमृतसरच्या हरिमंदिराची (सुवर्ण मंदिर) कोनशिला घातली. संगतमधील

गायनाकरिता अधिकृत 'गुरू व भगतबानी' असावी, म्हणून गुरू अर्जुनांनी १६०३-१६०४मध्ये 'आदी ग्रंथ' सांगितला व भाई गुरुदासांनी (१५५१-१६३१; गुरू अमरदासांचा पुतण्या) तो सुधारित गुरुमुखी लिपीत लिहून घेतला. ग्रंथ उत्तर हिंदुस्थानातील मध्ययुगीन संतांच्या संमिश्र 'साधुभाषे'त आहे. १६०४ मध्ये, आदी ग्रंथ समारंभपूर्वक हरिमंदिरात ठेवण्यात आला. आदी ग्रंथात पहिले चार, स्वतः आपण आणि कबीर, नामदेव, रविदास, त्रिलोचन प्रभृती संतांच्या व भाटांच्या रचना रागांनुसार व वृत्तांनुसार अर्जुनांनी संकलित केल्या. नववे गुरू तेगबहादूर (१६२१-१६७५) ह्यांच्या रचना आदी ग्रंथात नंतर घातल्या गेल्या. सहावे गुरू हरगोविंद, सातवे हरिराय (१६३०-१६६१) व आठवे गुरू हरिक्रिशन (१६५६-१६६४) ह्यांनी काव्यरचना केली नव्हती. दहावे व शेवटचे गुरू, संतसिपाही व महाकवी गोविंदसिंग (मूळ नाव गोविंददास वा गोविंदराय) ह्यांची 'चंदी दी वार', 'रामअवतार', 'कृष्णावतार', 'जापु', 'बचित्र नाटक', 'अकाल उस्तात', 'शसस्रनाममाला', 'झफरनामा' इत्यादी प्रचंड काव्यरचना हुतात्मा भाई मणीसिंगांनी (१६७३-१७३८) 'दसम ग्रंथा'त संकलित केली.

शीख तत्त्वज्ञान व भावविश्व हे हिंदू भावविश्वाशी नाते सांगणारे आहे. आदी ग्रंथातील एकमेव ओमृस्वरूपी, सत्यस्वरूपी, अत्युच्च, सर्वव्यापी, अंतर्यामी, परब्रह्म, परमेश्वर, त्याची गुरू (ईश्वर) प्रसादाने प्राप्ती, अविनाशी आत्मा, कर्म, माया, जन्ममृत्यूचे चक्र, सोहम्, आत्मा-परमात्मा ह्यांचे ऐक्य म्हणजे मोक्ष, जे पिंडी ते ब्रह्मांडी, जीवन्मुक्ती, नामस्मरणाची आवश्यकता, 'गुरुमुख' (ईश्वराभिमुख) व 'मनमुख' (क्षणिक सुखाभिमुख) हे मनुष्यांचे दोन वर्ग ह्या संकल्पना: घट, पिंड, त्रैगुण, त्रिभुवन ही परिभाषा; चार पदारथ (पुरुषार्थ), चार युगे, ८४ लक्ष योनी, कामधेनू ह्यांचे व रामायण, महाभारत, पुराणे ह्यांतील विपुल उल्लेख हीच गोष्ट सिद्ध करतात. ग्रंथातील फरीद ह्या सुफीच्या रचना अपरिहार्य वार्धक्य व मृत्यू यांविषयी असून त्यांत मूलभूत तत्त्वज्ञान नाही. ग्रंथात हिंदू धर्म व इस्लाम धर्म ह्यांचे मिश्रण कोठेही नाही. ग्रंथ एकच परब्रह्म मानीत असला, तरी त्यात 'सुरि नर गण गंधरब', 'सिमरहि देवते कोडि तेतीसा', जम(यम)दंड, जमजाल हे देवतासूचक शब्द आहेत. ग्रंथातील मूर्तिपूजेचा निषेध भगवद्गीता ७.२४, ब्रह्मसूत्र ४.१.४ व नाथ संप्रदाय ह्यांच्याशी सुसंगत आहे. वेदच नव्हे तर स्मृती व पुराणेही ईश्वरनिर्मित आहेत, असे गुरू अमरदास व अर्जुन सांगतात. इतर हिंदूंप्रमाणे शीखही स्मृतींनाच अनुसरीत.

जहांगीर बादशहाचा गुरू अर्जुनांवर राग होता. गुरूंना बाटवून मुस्लीम करण्याचे त्याच्या मनात होते. आपला बंडखोर पुत्र खुसरो ह्याच्या कपाळी टिळा लावला हे निमित्त साधून, मुस्लीम होण्यास नकार दिल्यामुळे, गुरू अर्जुनांना जहांगीराने मे १६०६ मध्ये हलाहाल करून लाहोर येथे ठार मारले. शीख हुतात्म्यांच्या देदीप्यमान व दीर्घ मालिकेतील आद्य हुतात्मा म्हणजे गुरू अर्जुनदेव. शीख पंथात पहिले परिवर्तन होऊन भक्तिमार्गी शीख हे शक्तिमार्गी झाले. अर्जुनदेवांनंतर गुरू झालेले त्यांचे पुत्र हरगोविंद सशस्त्र होऊन गुरुपदी बसले.

'पंजाबी साखी' व हनुमंतस्वामींची 'रामदास स्वामींची बखर' ह्यांच्यानुसार समर्थ रामदास व हरगोविंद ह्यांची गढवाल पर्वतराजीतील श्रीनगर येथे १६३४च्या सुमारास भेट झाली. तेव्हा अश्वारूढ, सशस्त्र हरगोविंद शिकारीहून परतत होते. 'साधू आहात तर हा राजवेश व ही शस्त्रे कशी?', असा प्रश्न समर्थांनी केल्यावर, 'आत साधू, बाहेर राजपुत्र; शस्त्रे दीनांच्या रक्षणाकरिता व दुष्टांच्या पारिपत्यासाठी', हे हरगोविंदांचे उत्तर ऐकल्यावर, 'हे माझ्या मनाला भावते', असे उद्गार समर्थ रामदास यांनी काढले. रामदासांनी हरगोविंदांना भगवे वस्त्र व जपमाळ दिली, अशी आख्यायिका आहे. हरगोविंदांनी हरिमंदिरासमोर ऐहिक विषयांच्या मार्गदर्शनाकरिता 'अकाल तख्त' बांधले. हरगोविंदांनंतर शीख गुरू सेनापतीही झाले आणि धर्मकारण व राजकारण एकत्र झाले. हरगोविंदांच्या कालात युद्धमान जाटांचा शीख पंथात मोठ्या प्रमाणात प्रवेश झाला. जहांगीराने हरगोविंदांना काही काळ कारागृहातही ठेवले होते. हरगोविंदांच्या मोगल सरदारांशी अनेक चकमकी झाल्या. चिरस्थायी राजकीय लाभ झाला नाही, तरी मोगलांचा पराभव करता येतो, हे गुरू हरगोविंदांनी दाखवून दिले.

राजकीय परिस्थितीप्रमाणे गुरूंच्या जीवनावर आणि स्वभावावरही पंथाचे स्वरूप अवलंबून असे. बागेत चालताना आपल्या झग्याच्या धक्क्याने पडलेली फुले पाहून दुःखी झालेले सातवे गुरू हरिराय ह्यांनी संघर्ष करणे अपेक्षित नव्हते. आठवे गुरू तर बालवयातच निधन पावले होते.

काश्मीरमधील हिंदूंना सक्तीने मुस्लीम करण्याला निषेध करणाऱ्या नवव्या गुरू तेगबहादुरांना व त्यांच्या बरोबर असलेल्या शिखांना औरंगजेबाच्या आज्ञेवरून पकडून दिल्लीत नेण्यात आले. मुस्लीम होण्यास नकार देणाऱ्या मतीदासांना खांबाला बांधून डोक्यापासून पायापर्यंत करवतीने चिरण्यात आले, सतीदासांचे तुकडे-तुकडे करण्यात आले व दयालदासांना उकळत्या तेलात फेकण्यात आले. गुरू तेगबहादुरांचा दिल्लीच्या चांदणी चौकात ११ नोव्हेंबर १६७५ रोजी शिरच्छेद करण्यात आला.

गुरू तेगबहादूरपुत्र गुरू गोविंदसिंह (मूळ नाव गोविंददास वा गोविंदराय; १६६६-१७०८) वयाच्या आठव्या वर्षी गुरू झाले. गोविंददासांच्या भोवतालचे डोंगरी राजे व मोगल सरदार ह्यांच्याशी अनेक लढाया झाल्या. त्यांनी पाच निवडक शिष्यांना काशीला संस्कृत शिकण्यासाठी पाठवले. ह्या पाच शिखांतून शिखांचा 'निर्मल' पंथ (शाकाहारी, एक तरी वस्त्र भगवे) निघाला. आपल्या पदरच्या कवींकडून त्यांनी महाभारताची काही पर्वे व चाणक्यनीती ह्यांचे अनुवाद करवले.

१६९९ मध्ये त्यांनी केशगढ येथे खालसाची स्थापना केली. 'केश' (न कापलेले केस), 'कंगा' (कंगवा), 'करा' (उजव्या मनगटातील लोखंडी कडे), 'किरपान' (कृपाण), 'कच्छ' (गुडघ्यापर्यंत चड्डी) हे खालसा शिखाचे पाच 'कक्के' त्या वेळी गुरूंनी घोषित केले, खालसा शीख पुरुषाच्या नावापुढे 'सिंह' (सिंग) व स्त्रीच्या नावापुढे 'कौर' लावण्याची राजपूत प्रथा, गुरूंनी सुरू केली. त्यामुळे गोविंददास गोविंदसिंग झाले. खालसा स्थापनेद्वारे समाजात क्षात्रधर्म आणण्याचा प्रयत्न गुरूंनी केला. सर्व शिखांना खालसाची दीक्षा अनिवार्य नव्हती. शिखांच्या वर्तणुकीचे नियम (राहितनामा) सांगणारे गुरूंचे निकटवर्ती भाई नंदलाल, शिखांतील 'सेवा पंथा'चे प्रवर्तक भाई कन्हैया व 'गुर सोभा'चे लेखक सेनापत खालसा हे शीख नव्हते.

दीर्घकालीन वेढ्यामुळे, दहावे शीख गुरू गोविंदसिंग (१६६६-१७०८) ह्यांना १७०५ मध्ये शिवकालिकमधील आनंदपूर हे त्यांचे केंद्र सोडावे लागले. त्यानंतर अत्यंत कष्टमय व प्रतिकूल परिस्थितीत, फक्त तीन अनुयायांसह, गुरू फरीदकोट भागातील दिना गावी पोहोचले. तेथे त्यांनी महाराष्ट्रात नगर येथे असलेल्या औरंगजेबाला उद्देशून फारशीत, 'झफरनामा' (विजयपत्र) लिहिले. ते घेऊन गुरूंचे अंतेवासी, दयासिंग व धरमसिंग, हे प्रारंभीचे दोन 'पंचप्यारे' (खालसाची दीक्षा घेणारे पहिले पाच) महाराष्ट्रात गेले. १७०८ मध्ये निधन पावलेले, दयासिंग व धरमसिंग ह्यांचे 'अंगीठा' हे संयुक्त स्मारक नांदेडमध्ये आहे.

औरंगजेबाच्या (१६१८-१७०७) मृत्यूनंतर मोगल परंपरेनुसार झालेल्या राजपुत्रांच्या गृहयुद्धात, गोविंदसिंगांनी बादशहाच्या मुअज्जम ह्या ज्येष्ठ पुत्राला शिखांची तुकडी पाठवून साहाय्य केले. आग्रा व धोलपूर दरम्यान, जजाऊ येथे जून १७०७ मध्ये झालेल्या लढाईत शिखांच्या बाणाने आझम मारला जाऊन मुअज्जम विजयी झाला व तो बहादूरशहा नाव धारण करून बादशहा झाला. बहादूरशहाने गोविंदसिंगांचा सत्कारही केला. तथापि बहादूरशहाने मागूनही गुरूंनी त्याला राजपूत व मराठे ह्यांच्याविरुद्ध साहाय्य दिले नाही.

कामबक्ष ह्या आपल्या सर्वांत धाकट्या भावाचे बंड मोडण्याकरता बहादूरशहा (१६४३-१७१२) दक्षिणेत आला. त्याच्याबरोबर गोविंदसिंगही दक्षिणेत नांदेड येथे ऑगस्ट १७०८ मध्ये आले. दोघांचे तळ वेगळे होते. सरहिंदचा मोगल सुभेदार नबाब वझीरखान ह्याने मुस्लीम होण्यास नकार देणाऱ्या झोरावरसिंग (वय ९ वर्षे) व फतेसिंग (वय ६ वर्षे) ह्या गुरूंच्या धाकट्या दोन मुलांना १३ डिसेंबर १७०५ ह्या दिवशी सरहिंद येथे भिंतीत चिणून मारले होते. बहादूरशहाला साहाय्य करून व त्याच्याबरोबर दक्षिणेत येऊन, त्याच्याकरवी

नांदेडमधील वास्तव्यात गोविंदसिंगांची बंदा सिंग बहादूर (१६७०-१७१६) ह्यांच्याशी भेट झाली. काश्मीरमधील

राजौरी येथे जन्मलेल्या हुतात्मा वीरवर बंदांचे मूळ नाव लक्ष्मणदास असे होते. शिकारीत मरणोन्मुख हरिणीला पाहून लक्ष्मणदासांचे कोमल हृदय द्रवले व ते वैष्णव बैरागी झाले. त्यानंतर माधोदास असे त्यांचे नामकरण झाले. अनेक वर्षांच्या देशाटनानंतर ते प्रथम पंचवटीला, नंतर नांदेडला आले व तेथे त्यांनी गोदावरीच्या डाव्या काठावर मठ बांधला. ३ सप्टेंबर १७०८ ह्या दिवशी, माधोदासांची गोविंदसिंगांशी भेट झाली व ते गुरूंचे 'बंदा' झाले. गुरूंनी माधोदासांचे नाव 'गुरबक्षसिंग' (लोकप्रिय नाव बंदासिंग) असे ठेवले. गुरूंनी बंदांना पंजाबात जाऊन सुभेदार वझीरखानाला शासन करण्याचा आदेश दिला. त्यांनी बंदांना 'बहादूर' ही पदवी, अधिकारसूचक पाच बाण, नगारा, ध्वज, पाच निष्ठावन्त शीख दिले. ठिकठिकाणच्या शिखांनी बंदांना येऊन मिळावे, अशी आज्ञापत्रे पाठवली आणि बंदांना सैनिकी निरोप दिला. ५ ऑक्टोबर १७०८ ह्या दिवशी बंदा बहादूर नांदेडहून पंजाबकडे जाण्यास निघाले. बंदांना खालसाची दीक्षा देण्यात आली होती की नाही, ह्याविषयी मतभेद आहेत. 'बंदासिंग' हे त्यांचे नाव खालसाची दीक्षा सूचित करते. तथापि, बंदा खालसा शीख असते, तर त्यांनी 'फते दर्शन' ही नवी घोषणा दिली नसती व 'बंदाई शीख' असा त्यांच्या अनुयायांचा वर्ग पुढे निघाला नसता. बंदाई शीख हे बंदा बहादुरांना आपला सेनापतीच नव्हे तर गुरूही मानीत. १७२१ मध्ये त्यांना मुख्य शीख समाजापासून बहिष्कृत करण्यात आले. अजूनही थोडे बंदाई शीख आहेत. ते खालसाचे इतर विधी अनुसरत असले, तरी बंदा बहादुरांना अकरावा गुरू मानतात. नांदेडमधील 'गुरुद्वारा बाबा बंदा बहादूर घाट साहिब' त्यांच्या मठाची जागा दर्शवतो.

वझीरखानने गुरूंना मारण्याकरिता जमशेदखान (गुलखान) व वासिलबेग (अब्दुल्लाखान) ह्या विश्वासू पठाण मारेकऱ्यांना नांदेडला पाठवले. ह्या पठाणांनी गुरूंचा विश्वास संपादन केला. एके दिवशी संध्याकाळी, प्रार्थनेनंतर तंबूत विश्रांती घेत असलेल्या गोविंदसिंगांच्या छातीत जमशेदखानने डावीकडे भोसकले. तेव्हा गुरूंनी आपली तलवार उपसून जमशेदखानचे मुंडके उडवले. गडबड ऐकून तेथे आलेल्या शिखांनी पळून जाणाऱ्या वासिलबेग ह्या जमशेदखानच्या साथीदाराला ठार केले. गुरूंवरील हल्ल्याचे कळल्यावर, बहादूरशहाने गुरूंचा घाव शिवण्याकरता आपले शस्त्रवैद्य पाठविले. त्यात कोल नावाचा एक इंग्रज सर्जनही होता. गुरूंचा घाव शिवला गेला व ते पुनः हिंडू-फिरू लागले. परंतु, एक कडक धनुष्य वाकवताना त्यांनी जोर केल्यामुळे घावाचे टाके उसवले. तेथून रक्तस्राव होऊ लागला. तो घाव सडलाही होता.

आपला अंत जवळ आला आहे, हे लक्षात आल्यावर गुरू गोविंदसिंगांनी भाई दयासिंगांना ग्रंथ आणण्यास सांगितले. त्यांनी ग्रंथापुढे पाच पैसे व नारळ ठेवला आणि आपला माथा ग्रंथापुढे टेकला व 'माझ्या जागी ग्रंथाला जाणा, मी पंथात विलीन होत आहे', असे घोषित केले आणि शिखांची मानवी गुरुपरंपरा समाप्त केली. अजितसिंग व जुझारसिंग हे त्यांचे मोठे दोन मुलगे ७ डिसेंबर १७०५ ह्या दिवशी चमकौरच्या लढाईत मारले गेले होते. झोरावरसिंग व फतेसिंग हे धाकटे दोन मुलगे सरहिंदाला भिंतीत चिणले गेले. स्वतःचे पुत्र उरले नाहीत म्हणून गोविंदसिंगांनी शिखांची मानवी गुरुपरंपरा समाप्त केली, हा तर्क निराधार आहे. गोविंदसिंग सामुदायिक मताचा आदर करीत. पंचप्यारांना खालसाची दीक्षा दिल्यानंतर त्यांनी शिखांकडून दीक्षा घेतली होती. 'आदी ग्रंथा'चा गुरू म्हणून आदर तत्पूर्वीही होत असे. ग्रंथ आणला जात असता गुरू हरिराय उठून उभे राहत असत.

७ ऑक्टोबर १७०८ ह्या दिवशी (१८ ऑक्टोबर- ग्रेवाल व बाल ह्यांचे मत) गुरू गोविंदसिंग निजधामास गेले. गुरू वैकुंठाला गेले व तेथे देवदेवतांनी त्यांचे स्वागत केले, असे एका शिखाने लिहिलेला व शिखाने अनुवादिलेला 'तवारीख सचखंड' हा गुरूंच्या अखेरच्या दिवसाचा व नांदेडचा वृत्तान्त सांगतो.

गोविंदसिंगांच्या हत्येच्या संदर्भात बहादूरशहाचे वर्तन संशयास्पद होते. त्याने मारेकरी जमशेदखानच्या नातेवाइकांकडे शोकवस्त्रे पाठवली होती. सामान्य व्यक्तीच्या मृत्यूनंतर बादशहा शोकवस्त्रे पाठवीत नसत.

प्रारंभी तरी 'दसम ग्रंथा'लाही गुरू ग्रंथ अशी मान्यता होती. अठराव्या शतकात सरबत खालसाच्या (सर्व खालसाच्या सभा दोनही ग्रंथांच्या उपस्थितीत होत असत.

आजही निहंग शीख (निळा वेश, सदैव सशस्त्र) दोनही ग्रंथांना गुरू मानतात.

आपले शीख बांधव नांदेडला 'हजुर साहिब' किंवा 'अबिचल नगर' ह्या शब्दांनी गौरवतात. शिखांची पाच 'तख्ते' आहेत. तख्त म्हणजे जेथून धार्मिक आदेश दिले जातात, ते पीठ. गुरू हरगोविंदांनी अमृतसरला हरिमंदिरासमोर बांधलेले 'अकाल तख्त' वगळता इतर चार तख्ते गुरू गोविंदसिंगांशी निगडित आहेत. ती अशी : पाटणा – जन्मस्थान; केशगढ – खालसाची स्थापना; दमदमा – आदी ग्रंथाचे संस्कारण; नांदेड – निधन. तख्त सचखंड श्री हजुर अबचलनगरसाहिब. गुरू नानकांनी 'जपु'त आध्यात्मिक उन्नतीचे पाच खंड (पायऱ्या) वर्णिले आहेत. 'सचखंड' हे त्यांतील शेवटचे खंड असून ते निरंकाराचे वर्णनातीत निवासस्थान दर्शवते.

गुरू गोविंदसिंगांबरोबर नांदेडला आलेल्या ३०० शिखांत माई भागो होत्या. त्यांनी आनंदपूरच्या वेढ्यात गुरूंना सोडून जाणाऱ्या शिखांचे मतपरिवर्तन करून त्यांचे मुक्तसरच्या लढाईत नेतृत्व केले. मुक्तसरच्या लढाईत त्या घायाळ झाल्या होत्या. पुरुष वेषातील माई भागो गुरू गोविंदसिंगांच्या शरीररक्षक होत्या. नांदेडमध्ये जेथे त्या राहत, तेथे 'बंगा माई भागो' आहे. नांदेडमध्ये राहून लंगर चालवावा, असे गुरूंनी संतोकसिंगांना सांगितले होते. त्यानुसार नांदेडमध्ये 'गुरू का लंगर' चालू आहे. गुरू गोविंदसिंगांच्या निधनानंतर त्यांच्याबरोबर आलेले अनेक शीख जरी परत पंजाबात गेले, तरी काही नांदेडमध्ये राहिले. त्यांनी नांदेड परिसरात शेती व अन्य उद्योग केले. त्यांनी स्थानिक स्त्रियांशी कलग्ने केली व नांदेडमध्ये गुरुद्वारा इत्यादी बांधले. ह्या शिखांचे वंशज – 'दखनी शीख'– आज महाराष्ट्र, कर्नाटक व आंध्र प्रदेश ह्या राज्यांत पसरले आहेत.

**संदर्भ :**


१. डॉ. अरविंद गोडबोले
गुरू नानक ते गुरू गोविंदसिंग, आ. २. भारतीय विचार साधना पुणे, पुणे.

२. डॉ. अरविंद गोडबोले
फिलॉसॉफी ऑफ श्री गुरू ग्रंथ साहिबजी, साहित्य सिंधू प्रकाशन, बंगलोर –१.

३. हरबान्ससिंग (संपादक)
द एन्सायक्लोपिडीया ऑफ सिखिझम, व्हॉ. १–४, पंजाबी युनिव्हर्सिटी पतियाळा.


* * *





# मुस्लीम धर्म

■ प्रा. दाऊद दळवी

**मुस्लीम सत्ता कितीही आक्रमक असली, तरी इतर देशांप्रमाणे भारतातील समाजजीवन व सांस्कृतिक परंपरा ह्यांना ती पूर्णपणे नष्ट करू शकली नाही. याचे कारण म्हणजे आक्रमकांच्या तुलनेत भारतीय संस्कृती मजबूत आध्यात्मिक अधिष्ठानावर आधारित व सर्वसमावेशक होती. परिणामी मुस्लीम आक्रमणाचा जोरदार धक्का सहन करूनही ती स्थिर व अभेद्य राहिली.**

उत्तर भारताप्रमाणेच मध्ययुगीन महाराष्ट्राच्या सर्वांगीण जीवनावर मुस्लीम आक्रमणाचा व संस्कृतीचा फार मोठा प्रभाव पडलेला दिसून येतो. महाराष्ट्रात मुसलमानांचे आगमन सागरी मार्गाने व खुश्कीच्या मार्गाने झाले. सुमारे सातव्या शतकापासून अरब, इराणी व कृष्णवर्णीय हबशी हे व्यापारउदिमानिमित्त पश्चिम भारताच्या किनारपट्टीवर येत असत. या व्यापाऱ्यांनी कोकणात अनेक ठिकाणी ‘हंजमान’ (अंजुमन) या व्यापारी संस्था स्थापन केल्या. त्यांचे व तत्कालीन राष्ट्रकूट, शिलाहार इत्यादी राजवंशाबरोबर सहकार्याचे व सलोख्याचे संबंध होते.[१]

त्यांनी मूळ स्वरूपातील इस्लामची ओळख कोकणवासियांना करून दिली. दैनंदिन जीवनात अरब व इतर जमातींचा स्थानिक लोकांशी सतत संबंध आल्याने त्यांच्यातील परस्पर सहकार्य, देवाणघेवाण वाढीस लागले. त्यातूनच रोटीबेटी व्यवहार सुरू झाले. कोकणातील इस्लामचे आगमन शांततेच्या व सहकार्याच्या मार्गाने झालेले आढळते. त्यामुळे इथे सामाजिक व सांस्कृतिक भिन्नता असूनही कुठलाही संघर्ष, सत्तीचे धर्मांतर किंवा कटुता असे काही निर्माण झाले नाही. कोकणच्या तुलनेत उर्वरित महाराष्ट्रात इस्लामचे आगमन उत्तरेतील मुसलमानांच्या

स्वाऱ्यांतून झाले. अल्लाउद्दिन खिलजीने १२९६ मध्ये देवगिरीच्या यादवांचे राज्य पादाक्रांत केले. १३१८ मध्ये मलिक काफूरने आक्रमणांची आघाडी उघडली. या दोन घटनांतून दक्षिण भारताची द्वारे मुस्लीम राजसत्तांना खुली झाली. दक्षिणेत सर्वप्रथम बहमनी राजवट आली व नंतर तिची शकले पडत खानदेश, अहमदनगर, बिदर, गुलबर्गा, विजापूर व गोलकोंडा ही छोटी सत्ता-केंद्रे निर्माण झाली. या काळात आक्रमकांनी सत्तेचा प्रसार व धर्मांतर या दोन्ही मार्गांचा उपयोग केला. त्याचा दूरगामी परिणाम महाराष्ट्राच्या राजकीय, सामाजिक व धार्मिक जडणघडणीवर झालेला आहे.

इस्लामच्या आगमनामुळे महाराष्ट्राच्या जीवनात नव्या मुस्लीम समाजाची भर पडली. चौदाव्या शतकापासून सुमारे अठराव्या शतकापर्यंत महाराष्ट्रात कधीही न अनुभवलेले असे प्रचंड राजकीय व सामाजिक संक्रमण सुरू झाले. महाराष्ट्रात, शहराशहरांतून व गावागावांतून मुस्लीम वस्ती वाढत गेली. दोन भिन्न तत्त्वे व प्रवृत्ती असलेल्या हिंदू व मुस्लीम संस्कृतींमध्ये संघर्ष निर्माण होणे स्वाभाविक होते. मुस्लीम राज्यकर्त्यांचे आक्रमक धोरण व सक्तीच्या धर्मांतराचे परिणाम जागोजागी दिसू लागले. भारतीय संस्कृती व येथील विविध धर्मप्रणाली या अतिशय प्रगल्भ, सहिष्णू व शांतताप्रिय होत्या. याउलट मुस्लीम आक्रमक हे धर्मप्रसाराच्या जिद्दीने झपाटलेले होते. या आक्रमणांचा प्रतिकार तितक्याच तीव्रतेने करण्यात आला.

हा संघर्ष व प्रतिकार चालू असताना आक्रमकांना भारताच्या श्रेष्ठ सांस्कृतिक व आध्यात्मिक वैशिष्ट्यांचा परिचय हळूहळू होत गेला. तसेच भारतीयांनाही इस्लामी संस्कृती, राज्यपद्धती, भाषा, साहित्य व स्थापत्य यांची ओळख होऊ लागली. मूलभूत भिन्नता असलेल्या दोन संस्कृती एकाच भूमीवर नांदू लागल्यामुळे कळत-नकळत जीवनाच्या विविध क्षेत्रांत देवाणघेवाणीला सुरुवात झाली. दोघांतील चांगली वैशिष्ट्ये, चांगले गुण व जीवनपद्धती यांमुळे लोक प्रभावित होऊ लागले व त्यातूनच नव्या संमिश्र भारतीय संस्कृतीची निर्मिती झाली.[२]

महत्त्वाचे म्हणजे मुस्लीम सत्ता कितीही आक्रमक असली, तरी इतर देशांप्रमाणे भारतातील समाजजीवन व सांस्कृतिक परंपरा ह्यांना ती पूर्णपणे नष्ट करू शकली नाही. याचे कारण म्हणजे आक्रमकांच्या तुलनेत भारतीय संस्कृती मजबूत आध्यात्मिक अधिष्ठानावर आधारित व सर्वसमावेशक होती. परिणामी मुस्लीम आक्रमणाचा जोरदार धक्का सहन करूनही ती स्थिर व अभेद्य राहिली. तिच्या बाह्य स्वरूपावर म्हणजेच कला, स्थापत्य इत्यादींवर विध्वंसाचे ओरखडे निघाले, पण तिचा अंतस्थ गाभा अविचल राहिला. भारत हा जगातील असा एकमेव देश आहे की, जिथे दोन्ही संस्कृतींचे प्रवाह अव्याहतपणे वाहत आहेत.

महाराष्ट्रात मुसलमानांच्या आगमनानंतर सुमारे चार शतके उलटली. या दीर्घ कालावधीत हिंदू व मुस्लीम समुदायावर दूरगामी परिणाम झालेले दिसतात. भारताच्या इतर भागांप्रमाणे महाराष्ट्रातही मुस्लीम समाज एकरूप झाला आहे. मुसलमान हे मराठी समाजाचे अविभाज्य अंग बनले आहेत. सामाजिक व सांस्कृतिक देवाणघेवाण ह्यांमुळे परस्परसंबंध अधिक बळकट झाले आहेत. मात्र दुर्दैवाने राष्ट्रीय स्तरावर जी एकात्मकता अपेक्षित होती, ती अद्यापही साधलेली नाही. यासाठी या समाजाची मानसिकता समजावून घेणे, एकमेकांत खऱ्या अर्थाने विश्वास निर्माण करणे व परस्परसंबंधातील उदासीनता नष्ट करणे आवश्यक आहे. त्यासाठी महाराष्ट्रातील मुस्लीम समाजाची जडणघडण प्रथम तपासून पाहिली पाहिजे. तसेच या पार्श्वभूमीवर या समाजाने मराठी संस्कृतीला दिलेले योगदानही निरपेक्ष भावनेने मूल्यांकित केले पाहिजे.

### कोकणी मुसलमान

महाराष्ट्रातील मुस्लीम समाजाचे प्रामुख्याने दोन भाग पडतात. कोकण किनारपट्टीवरील मुसलमान व उर्वरित महाराष्ट्रातील मुसलमान. या दोघांत धर्म वगळता काही बारीकसारीक फरक आहेत. कोकणातील मुसलमान हे मूळ अरब व इराणी व्यापारी व स्थानिक कनिष्ठ वर्गातील स्त्रिया यांच्या विवाहसंबंधांतून निर्माण झालेले आहेत. हा वर्ण-संकर वेगवेगळ्या स्तरांवर झालेला आहे. शूद्र वर्णीय व उच्च वर्गातील रोटीबेटी व्यवहारांतून हा नवा वर्ग झाला, त्याला नवायत किंवा नायते असे म्हणतात.[३]

फार प्राचीन काळापासून अरब व पश्चिम आशियातील इतर जातीजमाती ह्या व्यापार व इतर व्यवसाय ह्यांच्या निमित्ताने कोकणच्या किनारपट्टीवर येत असत. परंतु इ.स. ६३६ मध्ये इराकचा राज्यपाल हज्जाज बिन युसुफ याने इराक व अरबी आखातातील प्रजेवर जुलूम व अत्याचार करण्यास सुरुवात केली. त्याच्या जाचामुळे बहुतेक लोकांनी इराक, येमेन व दक्षिण अरबस्तान येथून स्थलांतर करण्याचे ठरवले व भारतात येण्याचा निर्णय घेतला. यांपैकी बऱ्याचशा लोकांनी कोकण किनारपट्टी पसंत केली.[४]

कोकणात आढळलेले राजकीय स्थैर्य, सुरक्षितता व शांतता त्यांना फार सोईची वाटली. इथले मूळ लोकही वृत्तीने समंजस व सहिष्णू होते. त्यामुळे परकीय अरबांना त्यांनी सामावून घेतले. अरबी व इराणी लोक हे उत्तम प्रतीचे दर्यावर्दी व निष्णात व्यापारी होते. त्यामुळे कुठलाही संघर्ष टाळून सलोख्याने व सहकार्याने एतद्देशीय लोकांत ते सहज मिसळून गेले. महत्त्वाचे म्हणजे कोकणी-मुस्लीम हे वर्णसंकरातून निर्माण झाले असले, तरी इतर ठिकाणच्या मुसलमानांप्रमाणे ते धर्मांतरित नाहीत. कोकणचा इतिहास पाहताना जुलूमाने व जबरदस्तीने धर्मांतर झाल्याची उदाहरणे नाहीत. ठाणे, कुलाबा व रत्नागिरी जिल्ह्यांच्या दार्शनिकांत (Gazetteers) जबरदस्तीने धर्मांतर केल्याचा उल्लेख नाही.[५]

मात्र वर्णसंकराची प्रक्रिया ही बरीच वर्षे चालू होती, असे दिसते. कोकणातील नवायत हे सामाजिक व आर्थिकदृष्ट्या संपन्न होते. इस्लाममध्ये जातिभेद नाही. मात्र शिया व सुन्नी असे वर्ग आहेत. सुन्नी जमात विधिशाखांच्या अनुसार हन्नफी, शाफई, हंबोली व मालिकी या पोटशाखांत विभागलेली आहे. कोकण किनारपट्टीवरील मुसलमान हे शाफई मताचे पुरस्कर्ते आहेत. या नवायतांची भाषा अरबी असल्यामुळे स्थानिक मराठी कोकणीतही अनेक अरबी व फारसी शब्द रूढ झाले आहेत. अरब हे गौरवर्णीय व सुदृढ बांध्याचे असल्यामुळे त्यांचे वांशिक गुण कोकणी मुसलमानांत उतरले. भिवंडी, पडघा, मनोर, कल्याण, रोहा, चौल, रेवदंडा, तळे, दक्षिण रायगड व रत्नागिरी जिल्ह्यात विशेषतः बाणकोटपासून चिपळूणपर्यंत सावित्री, जगबुडी व वसिष्ठी नद्यांच्या काठी कोकणी मुसलमानांनी वसाहती केल्या. इथल्या स्थानिक समाजाशी एकरूप होऊनही आपली मूळ धार्मिक कर्तव्ये इस्लामच्या तत्त्वानुरूप सांभाळलेली आहेत.

कोकणात आल्यावर ज्याप्रमाणे वर्णसंकर घडला, त्याप्रमाणे नवाईतात दोन वर्ग निर्माण झाले. ते म्हणजे 'जमाती' व 'दालदी' हे होत.[६]

'जमाती'मध्ये कोकण किनारपट्टीवरील आर्थिक व सामाजिकदृष्ट्या उच्चवर्णीय लोकांचा समावेश आहे. इस्लाममध्ये कुठलाही वर्ण किंवा जातिभेद नाही. मात्र भारतात आल्यावर, स्थानिक परिस्थितीनुसार हे भेद झालेले आहेत. बहुतेक 'जमाती' गौरवर्णीय, धार्मिक वृत्तीचे व वेगवेगळे व्यापार-व्यवसाय सचोटीने करणारे आहेत. त्यांची आडनावे विविध व्यवसायांवरून आलेली आहेत. कोकणात आल्यावर समाजाचे नियंत्रण व इस्लामी धर्मप्रणालींचे पालन यांनुसार नवाइतानी जबाबदाऱ्या वाटून घेतल्या. त्यांच्या आडनावावरून हे स्पष्ट समजते. ते याप्रमाणे: काझी-न्यायाधीश, फकी (धर्मशास्त्रपारंगत), मुल्ला, पेशिमाम (पुरोहित), बांगी, खतीब (प्रार्थनेशी संबंधित). अनेक कोकणी मुसलमानांनी शिलाहारांच्या व नंतरच्या काळात स्थानिक प्रशासनात भाग घेतला. त्यांपैकी महसूल, कायदा, सुरक्षा इत्यादी क्षेत्रांतील पदांप्रमाणे देशमुख, देसाई, मुकादम, दळवी, दलवाई, परकार या नावांनीही ते ओळखले जाऊ लागले. हीच नावे हिंदू बांधवांतही आहेत. यापेक्षा विशेष म्हणजे वर्णसंकराप्रमाणे कोकणी मुसलमानांत मोडक, कुलकर्णी, बेडेकर अशीही आडनावे आहेत. गावावरून गोरेकर, नेरेकर, मालवणकर, बंदरकर, तुंगेकर, चौलकर अशीही आडनावे दिसून येतात.

कोकणी मुसलमानांनी आर्थिक व कृषी ह्या व्यवसायांत भरीव कामगिरी केलेली आहे. ते उत्तम व्यापारी असल्यामुळे अंतर्गत व बहिर्गत व्यापारात ते चांगलेच पुढे आले. विशेषतः कापड, अन्नधान्य व उत्तम प्रतीचे लाकूड यांच्या निर्मितीत ते तरबेज होते. ठाणे व रायगड जिल्ह्यातील मुस्लीम हातमाग वस्त्रे तयार करण्यात निष्णात होते. कोकणात जागोजागी जमिनी घेऊन त्यांनी भातशेती केली; आंबा, नारळी-पोफळीच्या बागांची लागवड केली.

जंजिऱ्याचा सिद्दी, कोकण किनारपट्टीवर सतत आक्रमण करीत असे. त्या वेळेस रयत भयभीत होऊन गावे सोडून जाई. त्यांचे पुनर्वसन करणे आवश्यक ठरे. पेशव्यांनी अनेक मुस्लीम कुटुंबांना 'खोती'चे अधिकार दिले. त्यांत जमीन महसूल बाब महत्त्वाची होती. कोकणी मुसलमानांचे वैशिष्ट्य म्हणजे अरबी-उर्दूबरोबर त्यांनी भाषा म्हणून मराठीचा वापर केला. बहुतेक कुटुंबे अजूनही विशिष्ट प्रकारची मराठी-कोकणी बोलतात. या भाषेत अरबी व फारसी शब्दांचा फार मोठा भरणा आहे. लेखनासाठी त्यांनी मराठीबरोबर मोडी लिपीचा वापर केला. गेल्या शतकापर्यंत त्यांचा पत्रव्यवहार, जमीनजुमल्याचे कागदपत्र व वैयक्तिक पत्रे हे सारे मोडी लिपीतच असे.

'जमाती' या उच्चस्तरीय कोकणी मुसलमानाबरोबर अरबांच्या आगमनापासून 'दालदी' हा नवा वर्ग निर्माण झाल्याचे दिसून येते. अरब, येमेनी व हबशी आणि स्थानिक कोळी-भंडारी समाजाच्या संकरातून 'दालदी' वर्ग निर्माण झाला. दक्षिण कुलाबा व रत्नागिरीच्या किनारपट्टीवर या लोकांची फार मोठी वस्ती आहे. शरीराने कणखर व सोशिक असल्यामुळे ते उत्तम दर्यावर्दी होते तसेच नावाडी व मत्स्यव्यवसाय यांत अग्रेसर होते. गलबते बांधण्यात त्यांचा हातखंडा होता. व्यवसायाप्रमाणेच त्यांची आडनावे आढळतात. जसे: नाखवा, नाखुदा, सारंग, डबीर, तांडेल, भाटकर, सोलकर, बुडये इत्यादी. 'जमाती'सारखीच त्यांची बांधिलकी असली, तरी शक्यतो दोन्ही जमातींत रोटी-बेटी व्यवहार होत नसत. छत्रपती शिवाजी महाराज व संभाजी महाराज ह्यांच्या आरमारांत 'दालदी' मुस्लिमांचा फार मोठा भरणा होता.[७]

## देशावरील मुसलमान

कोकण वगळता उर्वरीत महाराष्ट्रात मुसलमानांचे आगमन अल्लाउद्दीन खिलजी व मलिक काफूर यांच्या आक्रमणापासून झाले. तेराव्या शतकापासून पुढे पेशवाईच्या स्थापनेपर्यंतचा काळ हा अतिशय धामधुमीचा व राजकीय अस्थिरतेचा होता. या काळात आक्रमकांनी सत्ता व धर्मांतर या दोन्ही मार्गांचा वापर केला. यापेक्षा सर्वांत महत्त्वाचे म्हणजे राज्यकर्त्यांच्या आश्रयाखाली अनेक मुस्लीम साधुसंत दक्षिणेत आले. त्यांत सुफी संप्रदायाचा फार मोठा भरणा होता. महाराष्ट्रात इस्लामचा प्रसार करण्यात यांचा फार मोठा वाटा होता. राजसत्ता मुसलमानांच्या हातात असल्यामुळे धर्मप्रसार करण्यास या पीर-अवलियांना विशेष कष्ट पडले नाहीत. दुर्दैवाने याच काळात फार मोठ्या प्रमाणात व सक्तीच्या मार्गाने धर्मांतर झाले, हे ऐतिहासिक सत्य आहे. ज्यांचे धर्मांतर झाले, तो वर्ग हिंदू समाजातील निम्न स्तरातील होता. त्याच्यापुढे इस्लाममधील समानतेची वागणूक, वर्णव्यवस्थेच्या जाचातून मुक्ती, रोजगार व समाजात प्रतिष्ठा मिळण्याची संधी इत्यादी प्रलोभने होती. त्यामुळेच या वर्गाचे धर्मांतर करणे शक्य झाले. काही ठिकाणी विशेषतः हिंदू तीर्थक्षेत्रे व मंदिरे यांचा विध्वंस करून समाजात दहशत निर्माण करण्याचे प्रयत्नही झाले, हे मान्य केले पाहिजे. दक्षिणेत इस्लामच्या प्रसारासाठी चांगली संधी आहे, हे जाणून दिल्लीतील प्रसिद्ध सुफी संत ख्वाजा निझामुद्दीन अवलिया यांनी मुंतजिबुद्दीन जर्जरीबक्ष या संतांना ७०० अनुयायांसोबत खुल्ताबादला पाठवले. त्यांच्या प्रयत्नानेच दक्षिणेत इस्लामच्या प्रसारास गती मिळाली असे म्हणतात.[८]

फार मोठ्या प्रमाणात झालेल्या धर्मांतराने महाराष्ट्राच्या समाजजीवनावर न भूतो न भविष्यती असे संक्रमण व परिवर्तन आले.

हे संक्रमण महाराष्ट्राच्या सर्वच भागांत घडत असताना देशावर नवा मुस्लीम वर्ग निर्माण झाला. इस्लामी तत्त्वज्ञान, चालीरीती, पेहराव, अन्न या सर्वांचे आकलन होण्यासही बराच काळ जावा लागला. त्यात भाषेचाही सर्वांत मोठा प्रश्न निर्माण झाला. अरबी किंवा फारसी या परकीय भाषा होत्या. त्या अवगत करणे सर्वांना शक्य नव्हते. वर्णसंकराप्रमाणे भाषासंकर होऊन त्यातून दख्खनी किंवा दख्खनी-उर्दू उदयाला आली. सामाजिक दृष्टिकोनातून नव मुस्लीम समाजाला निश्चित अधिष्ठान नव्हते.

महाराष्ट्रातील धर्मांतरित झालेले मुसलमान मूळच्या हिंदू वर्णव्यवस्थेतून व जातिव्यवस्थेतून आल्यामुळे त्यांचा धर्म बदलला गेला, पण त्यांच्यातील जाती, विशेषतः त्यांच्या व्यवसायांप्रमाणे तशाच राहिल्या. हिंदू धर्मात जी चाकोरीबद्ध समाजव्यवस्था होती तितकी जरी नसली, तरी प्रत्येक

व्यवसायाने नव्या धर्मात आपापले सामाजिक स्थान निश्चित केले. वैयक्तिक, कौटुंबिक व नातेसंबंध तसेच विवाहविधी हे त्या-त्या व्यवसायाशी निगडित राहिले व साचेबंद झाले. त्यामुळे इस्लाममध्ये सर्वांगीण समता ही मूलभूत असली, तरी भारतात त्याची अंमलबजावणी किती प्रमाणात होत होती, हा अभ्यासाचा विषय ठरेल.

कोकणात 'जमाती' व 'दालदी' हे मुस्लिमांचे दोनच वर्ग होते. परंतु उर्वरित महाराष्ट्रात विदर्भ, मराठवाडा, खानदेश, पश्चिम महाराष्ट्र ह्या ठिकाणी इस्लामप्रणित समाज विविध गटांत विभागला गेला होता. नव-मुस्लीम असल्यामुळे व इस्लाममध्ये वर्णव्यवस्था नसल्यामुळे स्वतःचे अस्तित्व दाखवण्यासाठी उत्तर भारतातील प्रचलित आडनावांचा उपयोग केला. ही नावे म्हणजे शेख, सय्यद, पठाण व मुगल होत. महाराष्ट्रात बहुतेक ठिकाणी ही नावे आढळतील. विद्वान व पंडित व्यक्तीला शेख म्हणण्यात येते. विशेषतः ही सन्मानदर्शक पदवी आहे. पैगंबरांची कन्या फातिमा हिच्या घराण्याशी संबंधितांना सय्यद असे म्हणतात. पठाण व मुगल अर्थातच या पश्चिम आशियातल्या भारतात आलेल्या जमाती आहेत. परंतु शुद्ध पठाण किंवा मुगल महाराष्ट्रात मिळणार नाहीत. मात्र त्यांची नावे आपल्याकडे सररास लावली जातात. महंमद पैगंबरांनंतर इस्लामचे चार खलिफा किंवा प्रमुख होऊन गेले. त्यांच्या नावांवरूनही अब्बासी, फारुकी, सिद्दिकी ही आडनावे आपल्याकडे रूढ आहेत.

हिंदू धर्मातून धर्मांतरित झालेले मुसलमान हे विविध व्यवसायांचे होते. त्यांनी इस्लामचा स्वीकार केला असला, तरी त्यांची व्यावसायिक नावे तशीच राहिली. महाराष्ट्रातील मुस्लीम समाजात अशा व्यावसायिक घटकांची संख्या फार मोठी आहे. या घटाकांतील प्रत्येक जमातीचे स्वतंत्र अस्तित्व आहे. शक्यतो स्वतःची जमात सोडून अन्य जमातींशी यांचे विवाह-संबंध होत नाहीत. ही व्यावसायिक नावे अशी आहेत - अत्तार (अत्तर, सुगंधी द्रव्ये करणारे), मोमीन (विणकर), मणियार (बांगड्या बनवणारे), सिकलगार (लोहार), कलईगार (जस्ताचे काम करणारे), नालबंद (नाळ ठोकणारे), बारूतगार (स्फोटक दारू बनवणारे), पटवेगार (रेशमी धागा बनवणारे), रंगरेज (रंगारी), बागबान (माळी), पिंजारी (कापूस-गाद्या बनवणारे), तांबोळी (पानविडा), तेली, कसाई (खाटीक), टकार (पाथरवट), तांबटगार (तांबट), हजाम (न्हावी), कांजारा (लमाण), नाईकवाडी, झारा, तीरमार, भोतेकर (कुंभार) वगैरे. मध्ययुगात या सर्वांचे व्यवसाय अतिशय महत्त्वाचे होते. यांतील तेली, तांबोळी यांना बलुतेदार-अलुतेदार पद्धतीत सामावून घेण्यात आलेले दिसते. हा सर्व समाज अतिशय श्रद्धाळू व इस्लामची शिकवण अनुसरणारा असा आहे.[९]

## सांस्कृतिक योगदान

महाराष्ट्रातील इस्लामी परंपरा अठराव्या शतकापर्यंत स्थिरावली व रूढ झाली. नव-मुस्लीम वर्गाने इस्लामचा स्वीकार केला असला, तरी मूळ नाळ न तोडता बहुत मराठी समाजाशी तो एकरूप झाला आहे. मराठी ही त्यांची मातृभाषा आहे. सामाजिक जीवनात मुस्लीम रितीरिवाजांप्रमाणे तो हिंदू संस्कृतीशी तितकाच निगडित आहे. महाराष्ट्राची सामाजिक व धार्मिक जडणघडण पाहताना या दोन्ही धर्मांचे लोक एकमेकांशी सुसंवाद साधून आहेत. त्यामुळे सर्वच समाजजीवनावर एक वैशिष्ट्यपूर्ण एकात्मकतेचे आवरण आपल्याला दिसून येते. दोन्ही समाजांतील सांस्कृतिक देवाणघेवाण ही तितकीच समृद्ध आहे.

## सुफी संतांचा प्रभाव

तेराव्या शतकाच्या पूर्वार्धात व अल्लाउद्दिन खिलजीच्या स्वारीपूर्वीच मुस्लीम साधुसंतांचे आगमन दक्षिणेत होऊ लागले. जलालुद्दिन गंजेरवाँ (कृपेचा वाहता खजिना) व मोमीन आरिफ यांचे खुल्ताबाद व हैदराबाद येथे आगमन झाले व तेथेच त्यांनी धर्मप्रसाराचे कार्य सुरू केले. त्यानंतर दिल्लीतील प्रसिद्ध सुफी संत निजामुद्दीन अवलिया यांनी मुंताजिबुद्दीन जर्जरीबक्ष यांचे अनेक शिष्य मराठवाड्यात व इतरत्र इस्लामची दीक्षा देण्याकरता गावोगाव पाठविले. त्या काळातील धर्मप्रसाराची ही सर्वांत मोठी मोहीम असावी. या शिष्यांनी प्रत्येक गावात जाऊन आपापली परंपरा निर्माण केली. मुंताजोबुद्दीन

जर्जरीबक्ष यांच्या काळात दक्षिणेत दुष्काळाचा कहर झाला होता. लोक भयानक उपासमार व हालअपेष्टा ह्यांना तोंड देत होते. तेव्हा त्यांनी मुंताजोबुद्दीन यांचा धावा केला. जनतेचे दुःख पाहून त्यांनी दुष्काळ संपेपर्यंत अन्नधान्य खरेदीसाठी भरपूर धन दिले. त्यांच्या बैठकीसमोरील चौकटीतून सोने-चांदीच्या रूपात त्यांना हे धन आत्मिक शक्तीमुळे मिळत असे, असे म्हणतात. त्यामुळे त्यांचे नाव 'जर्जरीबक्ष' हे पडले. त्यांची फार मोठी शिष्यपरंपरा मराठवाड्यात व इतरत्र पसरली होती.

बाबा शर्फुद्दीन व शम्सुद्दीन हे हैदराबादला स्थायिक झाले. ह्यांत कलंदर, हिशामुद्दीन व शेख शाहिद यांनी अनुक्रमे मंगरूळ पीर, गुलबर्गा व तालिकोट येथे खानका किंवा मठ स्थापन केले. शेख सरमस्त शहादुल्ला रहमान यांनी एलिचपूर व शाह मुईज्जुद्दीन यांनी पैठणला मुक्काम ठोकला. पैठणची पुरातन महालक्ष्मी, रेणुकादेवी व गणपती ह्यांची मंदिरे मुईज्जुद्दीन यांनी उद्ध्वस्त करून त्या ठिकाणी मशिदी व मठ बांधले असे म्हणतात. हजरत नान पाश मुईज्जुद्दीन गाझी रुक्नुद्दीन व शेख सलाउदीन शेख सैलान चिश्ती हे गंगापूर, वैजापूर व पुणे येथे स्थायिक झाले. बुरहानुद्दीन गरीबशाह (खुल्ताबाद), सिराजुद्दीन जुनैदी (गुलबर्गा), ऐनुद्दीन (विजापूर), शेख वहदुल्ला (खानदेश), सरवर मगदूम रिफाई (नांदेड), खेड-शिवापूर येथील कमर अली दरवेश यांचे दर्गे प्रसिद्ध आहे व शाह खुर्रम (एरंडेल) हे मध्ययुगात मोठे संत होऊन गेले. जैनुद्दीन सय्यद दाऊद हुसैन व अल्लाउद्दीन जिया यांनी खुल्ताबादेत भरीव कामगिरी केली. जैनुद्दीन हे फार मोठे सुफी संत होते. औरंगजेब त्यांना गुरुस्थानी मानत असे. त्यामुळे त्यांच्या निधनानंतर जैनुद्दीन यांच्या कबरीशेजारीच आपले दफन करावे, अशी इच्छा औरंगजेबाने प्रकट केली होती. त्यानुसार औरंगजेबाची अगदी साधी कबर तिथे आहे.[१०]

पैठणमध्ये निजामुद्दीन इद्रिसी सईदुस्सादात (श्रेष्ठातील श्रेष्ठ) व गुलबर्गा येथील दिल्लीच्या नासिरुद्दीन चिराग देहलवी यांचे शिष्य सय्यद महंमद गेसू दराज गरीब नवाज हे अतिशय लोकप्रिय संत होऊन गेले. नाशिकला खुनमीर हुसैनी व सय्यद मुहम्मद सादिक हुसैनी यांनी खानका स्थापन केला तर पुण्यात सय्यद हिशामुद्दीन खल्लाल व शेख सलाउद्दीन यांनी धर्मप्रसाराचे काम केले.

सुफी साधुसंतांचा सर्वांवर अनुग्रह होता. अहमदनगरचे संत शाह शरीफ हे मालोजीराजे भोसलेंचे श्रद्धास्थान होते. त्यांच्या कृपाप्रसादाने त्यांना शाहजी व शरफोजी हे दोन सुपुत्र झाले, असे म्हणतात. मालोजीराजे सुप्रसिद्ध मराठी संत कवी शेख महंमद यांचे शिष्य होते. शेख महंमदांना श्रीगोंदे येथे त्यांनी जमीन इनाम दिली होती.[११]

छत्रपती शिवाजी महाराज हे कोकणातील केळशी येथील संत बाबा याकूत सरवरी यांचा मोहिमवर जाण्यापूर्वी आशीर्वाद घेत असत.

### बाबा मगदूम अली माहिमी

मुंबई परिसरात मगदूम अली माहिमी, अब्दुररहमान शाह बाबा (बोरीबंदर), शेख मिस्त्री (वडाळा), पीर सय्यद अहमद अली शाह काद्री व अनेक सुफी संत ह्यांचे दर्गे आहेत. वर उल्लेखित पीर अवलियांची माहिती श्री. अब्दुल जब्बार मलकापुरी यांनी लिहिलेल्या 'तजकिरे अवलिया-ई-दकन' या ग्रंथात मिळते. प्रत्येक पीर-अवलियाने इस्लामच्या तत्त्वांचा प्रसार व संवर्धन करण्याचा प्रयत्न केला आहे. या साधुपुरुषांत माहीमचे मगदूम अली माहिमी यांचे व्यक्तिमत्त्व व कार्य अनन्यसाधारण आहे. मराठी संतांप्रमाणे त्यांनी भक्तिमार्गाचा पुरस्कार केला व आपले आयुष्य ईश्वरचरणी चिंतन, मनन, नामस्मरण व लोकसेवा यांत घालविले. त्यांचा जन्म १३७२ मध्ये नवाईत खानदानात झाला. त्यांच्या वडिलांचे नाव शेख अहमद व आईचे नाव फातिमा बिन्ते नाखुदा अकोलिया असे होते. त्यांच्या वडिलांचा कल्याणमध्ये फार मोठा व्यापार होता. ते स्वतः नावाजलेले विद्वान व धर्मशास्त्राचे अभ्यासक होते. त्यांची कबर कल्याणमध्ये असून दरवर्षी तेथे त्यांची पुण्यतिथी किंवा उरूस साजरा करण्यात येतो. मगदूम अलींना लोक प्रेमाने वेगवेगळ्या नावाने ओळखत- जसे अल्लाउद्दीन, अली, परो व जैनुद्दीन. इस्लामी धर्मशास्त्रात (फिक) ते पारंगत असल्यामुळे त्यांना फकी असे म्हणत. कोकणी मुस्लीम समाजातील सर्वश्रेष्ठ संत या नात्याने त्यांना

'कुतुब-ए-कोकन'- कोकणचा ध्रुवतारा म्हणून संबोधले जात असे.

मगदूम अली बाबांचा कुराण, हदीस, शरियत व इस्लामी धर्मशास्त्र ह्यांचा गाढा अभ्यास होता. अरबी व फारसी भाषेचे ते प्रकांडपंडित होते. अध्यात्म व धर्मशास्त्र यांवर त्यांनी एकूण १८ पुस्तके लिहिली. त्यांची 'तफसीर-ए-माहिमी' ही कुरआन शरीफवरची टीका अत्यंत प्रगल्भ व विद्वत्तापूर्ण गणली जाते. कुरआनवरील भारतात लिहिलेले हे पहिले भाष्य असून इजिप्तच्या कैरो येथील अल अझर विद्यापीठात ते अभ्यासले जात असे. त्यांचा दुसरा महत्त्वाचा ग्रंथ 'अल जिल्लतुत् ताईद' हा असून त्यांच्या समकालीन स्पेनचे श्रेष्ठ सुफी संत मुहीयुद्दीन इब्ने अरबी यांच्या तत्त्वज्ञानावर लिहिलेला आहे. 'कशफुल जुल्मात' (अंधाराकडून प्रकाशाकडे) हा सुफी विचारांवरील ग्रंथ सर्वमान्य आहे. कुरआनप्रमाणेच 'फिकह' किंवा मुस्लीम धर्मशास्त्रावर विशेषतः शाफई शाखेवर त्यांनी 'फिक्र-ए-मगदुमी' हा अभ्यासपूर्ण ग्रंथ लिहिला. 'तर्जुमल लमआता इराकी' (इराकींचे प्रकाशकिरण) हा ग्रंथ इराकी नामक त्यांच्या आवडत्या तत्त्ववेत्त्यावर लिहिलेला आहे. ईश्वराचे श्रेष्ठत्व सिद्ध करणारा 'इनामुल मलिकुल अल्लाम' (ईश्वराची बहुमोल देणगी) हा सुफी विचारांवरील त्यांचा गाजलेला ग्रंथ आहे. त्यांची राहणी अतिशय साधी होती आणि वृत्ती परोपकारी होती. ईश्वराचे निस्सीम भक्त म्हणून त्यांना ओळखले जाई. फेब्रुवारी १४३१ मध्ये वयाच्या ५९ व्या वर्षी माहीम येथे त्यांचे निधन झाले.

## सुफी संतांचे कार्य

ईश्वराची निरलस भक्ती, इस्लामी तत्त्वज्ञानाचा प्रसार, समाजहिताची कामे व गरिबांना मदत व विशेष म्हणजे धार्मिक शिक्षणाची सोय हे सारे पीर-अवलियांच्या खानक्यांतून होत असे. आपल्याकडील मठ, पाठशाळा यांप्रमाणे मुस्लीम संतांनी मशिदी, खानका व मदरसे उभारले व त्या माध्यमातून हिंदू व मुस्लीम जनतेचे प्रबोधन केले. 'खानका' म्हणजे पीर-अवलियांची बैठक व त्यांचे निवासस्थान. खानक्यात ते आपल्या शिष्यपरिवारासमवेत राहत असत. मोठ्या संतांच्या खानक्यांमध्ये लंगर म्हणजे सर्वांसाठी भोजनाची सोय असे. देशादेशांतून येणारे मुस्लीम शास्त्री-पंडित, महत्त्वाच्या राजकीय व्यक्ती, राजदूत, फकीर सामान्यजन इत्यादिकांनी खानके गजबजलेले असत. पीर अवलियांची प्रवचने, धार्मिक चर्चा, चिंतन, मनन इत्यादी गोष्टी खानक्यांत चालत असत. सुफी संतांच्या खानक्यात कव्वाली व गायनवादन व शेवटी उत्कट अवस्थेला जाणे (उन्मनी) हे दैनंदिन कार्यक्रमांचे भाग असत.



हाजीअली दर्गा, मुंबई.

मध्ययुगातील समाजजीवन खानक्याभोवती व दर्ग्याभोवती फिरत असे. पीर-अवलिया हे सिद्ध पुरुष असत. लोकसेवा, गरजूंना मार्गदर्शन, गरिबांच्या दुःखावर सहानुभूतीची फुंकर असे कार्य हे साधू पीर करत. बहुतेक अवलिया निःस्पृह, निरिच्छ व ईश्वरचरणी सदैव लीन झालेले असत. अशा सिद्ध पुरुषांच्या निधनानंतर साहजिकच त्यांच्या कबरींवर सुंदर इमारत किंवा मकबरा बांधण्यात येई व त्यांचे स्मरण राहावे म्हणून त्यांच्या पुण्यतिथीस उरूस किंवा मोठा उत्सव भरवला जाई. मुस्लीम संतांचा प्रभाव हळूहळू हिंदू व इतर धर्मीयांवरही पडू लागला. पिरांच्या दर्ग्यांत मुस्लिमांबरोबर हिंदू बांधवही नवस फेडू लागले. कालांतराने महाराष्ट्रातील प्रमुख संत व त्यांचे दर्गे हिंदू-मुसलमानांसाठी तीर्थक्षेत्रे बनली.

महाराष्ट्रात काही पिरांचे फार मोठे प्राबल्य व स्तोम माजवलेले आढळते. त्यांच्याभोवती प्रसिद्धीचे वलय निर्माण झाल्यामुळे त्यांची सर्वसाधारण जनतेवर फार मोठी छाप पडलेली दिसून येते. अशा संतांमध्ये शाह दावल मलिक यांचा उल्लेख आवर्जून केला पाहिजे.[१२]

याचे नाव अबू मसऊद होते. मूळचे गुजरात काठेवाडचे हे संत महंमद बेगडा या गुजरातच्या सुलतानाचे ठाणेदार होते. त्यांच्या आध्यात्मिक सिद्धीमुळे त्यांचा दावल मुल्क (देशातील श्रेष्ठ आध्यात्मिक) म्हणून गौरव करण्यात आला. कालांतराने या पदवीचे दावल मलिक म्हणून रूपांतर झाले. मध्ययुगात त्यांचे बरेच प्रस्थ असले पाहिजे. त्यांच्या आशीर्वादाने बरेचसे आजार विशेषतः नेत्ररोग व जनावरांचे आजार बरे होत. त्यामुळे सर्व थरांतील लोकांची त्यांच्यावर अपार श्रद्धा होती. त्या काळातील काही ब्राह्मण स्वतःला 'दावलभक्त' म्हणवून घेत असत, असा उल्लेख श्री.रा.चिं.ढेरे यांनी मुसलमान मराठी संत कवी या पुस्तकात केला आहे. दावल मलिकची कबर वेरूळ येथे आहे. पण महाराष्ट्रात जागोजागी त्यांचे चिल्ले किंवा स्मृति-स्थाने आहेत. त्यांचे प्रस्थ इतके वाढलेले होते की, त्यांची नोंद संत एकनाथ व समर्थ रामदास यांनीही घेतलेली आढळते.

**मुसलमान मराठी संत कवी**

मध्ययुगीन काळातच मुसलमान मराठी संत कवींनी आध्यात्मिक साहित्यात एक नवे कवाड उघडले. सुफी संत एकेश्वरवाद, ईश्वराचे निराकार-निर्गुण अस्तित्व व धार्मिक तसेच सामाजिक समानता ह्यांवर बहुजनांचे प्रबोधन करीत होते. त्याच सुमारास शाह मुंतोजी ब्राह्मणी, अलमखान, शेख महंमद, शेख सुलतान, हुसैन अंबरखान व शाह मुनी इत्यादी कवी भागवत धर्म व विठ्ठल भक्ती ह्यांत पूर्णपणे समरस झाले होते.[१३]

आध्यात्मिक व धार्मिक ह्या क्षेत्रांतला हा सर्वांत मोठा विरोधाभास आहे. हे बहुसंख्य संतकवी केवळ मुसलमानच नव्हते तर कादरी, चिश्ती या सुफी ह्या संप्रदायांशी निगडित होते. या संतकवींचा व सुफी अवलियांचा संबंध होता की नाही, हे कळण्यास आवश्यक ते पुरावे नाहीत. मात्र सुफींशी संबंध असते, तर ते भागवत किंवा भक्तिमार्ग ह्यांच्याकडे वळणे दुरापास्त वाटते. यांतील काही संतकवींना मुसलमान म्हणजे हीन जातीत जन्मलो, याबद्दल विशाद वाटत होता. हिंदू व मुस्लीम ह्या दोन्ही धर्मांतील अंतिम सत्य एकच आहे, या भावनेने त्यांनी दोन्ही धर्मांच्या अनुयायांना एकत्र करण्याचे प्रयत्न केले. यात त्यांना किती यश आले, हे सांगणे कठीण आहे. याचे कारण असे की, या काळात बहुसंख्य हिंदूचीही मुसलमानांकडे पाहण्याची दृष्टी उदासीनतेची व द्वेषाची होती. अत्यंत कडव्या प्रवृत्तीचे व मूर्तिभंजक अशी मुसलमानांची प्रतिमा होती. मुस्लीम संत कवींनी दोन्ही संप्रदायांना एकत्र आणण्याची भूमिका मांडली पण हिंदू समाजातून, मराठी संतांकडून व उच्चवर्णीयाकडून त्यांना कुठलाही प्रतिसाद मिळाल्याचे दिसत नाही. याबाबत संत शाह मुनी यांच्या पुढील पंक्ती अतिशय उद्‌बोधक वाटतात.

देवाची भक्ती चोखामेळा करी। त्यास लोक धरिती दुरी।
वैकुंठी महारवाडा वेगळा करी। नांदावया तयासी ?।।
उंच-नीच नदीत शिरोन। बाहेर निघता कुंभ भरोन।
मग म्हणती, 'स्पर्शो नको, चला दुरोन।
उदकांत उभयता उभी होती'।। (५०.४००-४०१)[१४]

बहुसंख्याकांना मुसलमानाबद्दल वाटणारा द्वेष वा त्यांची समाजबाह्य वागणूक सहन करूनही या संत कवींनी केलेले एकात्मतेचे व समन्वयाचे प्रयत्न स्पृहणीय आहेत. याबाबत शेख महंमद म्हणतात.

अविंध यातीस निपजलो कुराण पुराण बोलो लागलो।
वल्ली साधुसिद्धांस मानलो स्वहितपरहिता गुणे।।
(योगसंग्राम १६-६७) [१५]

त्यांनी दोन्ही समाजांना केलेला हा उपदेश आजच्या काळातही महत्त्वाचा आहे.

सच्चा पीर कहे मुसलमान मऱ्हाटे म्हणता सद्‌गुरू पूर्ण।
परी दोहोंत नाही भिन्नपण आँखे खोल देखो भाई।।
(योगसंग्राम १७.३) [१६]

याच संबंधात शाह मुंतोजी ब्राह्मणी (मृत्युंजय) हिंदू-मुस्लीम ऐक्यावर भर देताना म्हणतात-

शाह मुतबजी ब्राह्मणी,
जिनमे नही मनमानी।
पंचीकरण खोज किये,
हिंदू-मुसलमान येक कर दिये।।[१७]

मुसलमान संतकवींपैकी हुसेन अंबरखान यांनी 'अंबरहुसैनी' ही ओवीबद्ध टीका भगवद्‌गीतेवर लिहिली आहे. इ.स. १६५३ मध्ये हुसेन अंबरखान यांनी सोप्या

मराठी पद्यात ही टीका लिहिली, हे कौतुकास्पद आहेच; पण ती टीका त्या काळातील प्रबुद्ध मुस्लीम मनाच्या प्रगल्भतेचीही ग्वाही देते.[१८] मुसलमान मराठी संतकवींची विठ्ठलाप्रती असीम भक्ती, पंढरपूरची वारी व दोन्ही जमातींत आध्यात्मिक समन्वय साधण्याची कळकळ हे म्हणजे मराठी संस्कृतीतील सोन्याचे पान आहे, यात शंकाच नाही.

## अरबी–फारसी शब्दांचे आगमन व प्रभाव

मध्ययुगीन महाराष्ट्रात मुस्लीम सत्ता स्थिर झाल्यानंतर समाजजीवनावर विशेषतः भाषेवर व संस्कृतीवर फार मोठा प्रभाव पडलेला दिसतो. राज्यकर्त्यांची भाषा फारसी किंवा पर्शियन असल्यामुळे दैनंदिन प्रशासनात, पत्रव्यवहारात, व्यापार–उदिमाच्या क्षेत्रात याच भाषेचा वापर सुरू झाला. राज्यकर्त्यांची भाषा असल्यामुळे ती आत्मसात करणे अपरिहार्य ठरले. ब्राह्मण, कायस्थ इत्यादी उच्चवर्णीयांनी व मातबर सरदारांनी प्रथमतः फारसी शिकण्यास सुरुवात केली. फारसी शब्द व वाक्प्रचार मराठी भाषेतही वापरात येऊ लागले. साधारणतः तेराव्या शतकापासून पेशवाईपर्यंतचा सर्व पत्रव्यवहार हा फारसीतून किंवा फारसी शब्दांचा सढळ वापर असलेल्या मराठी भाषेतून सुरू झाला. आजही फारसीचे शब्द मराठी भाषेत इतके 'बेमालूम' बसलेले आहेत की ते फारसी शब्द आहेत, यावर विश्वास बसणार नाही. आपल्या दैनंदिन वापरातील हे शब्द फारसीचा प्रभाव स्पष्ट करतात.

घरातील नित्याचा वस्तू : खुर्ची, मेज (टेबल), पलंग, डेग (मोठे भांडे), तस्त, तबक, समई, शामदान, अत्तर, कुलूप किल्ली.

पेहराव व वस्त्रे : कुडता, पायजमा, सरवार, खिसा, अस्तनी, सद्रा, खमीस, विजार, कफनी, जाजम, कलाबतू, किनखाप, मखमल.

भोजन व फळे : बिर्याणी, पुलाव, फालुदा, कावा, चाय, अंगूर, जर्दाळू, अंजीर, अनार, मनुका, बदाम, खसखस, दालचिनी.

संगीत : खंजिरी, डफ, ढोल, तबला, दायरा, दिलरुबा, नक्कारा, नौबत, सतार, जलसा, महफील, तमाशा, खयाल, कव्वाली.

लिहिण्याचे सामान : कलम, दऊत, कागद, शाई, खलिता, खत, दफ्तर, किताब

घरे व स्थापत्य : किल्ला, महाल, जंजिरा, कंगोरा, खडक बुरूज, फरसबंदी, दिवाळ, दरवाजा, इमला, इमारत, मजला, जिना, दिवानखाना, गिलावा, घुमट[१९]

बहमनी, निजामशाही व आदिलशाही सत्तांच्या कारकिर्दीतील मराठी प्रदेशात मराठी–फारसी असा द्विभाषी कारभार सुरू झाला. त्यामुळे फारसी व मराठी जाणणाऱ्या दुभाष्यांची आवश्यकता भासू लागली. ही गरज सुरुवातीला कायस्थांनी भरून काढली. कुशल राज्यकर्त्यांचा प्रभाव समाजातील उच्चभ्रूंवर सर्वांत आधी पडतो. याचे उदाहरण म्हणजे ब्राह्मणांनी फारसीसदृश नावे घेण्यास प्रथम सुरुवात केली. जसे – सर्जेराव, हैबतराव, बाजीराव, फिरंगाजीराव, शहाजीराव, सरफोजीराव, दर्याराव इत्यादी.[२०]

पांढरपेशा व व्यावसायिक आडनावांत लक्षणीय बदल झाला. तो याप्रमाणे : चिटणीस, सबनीस, फडणीस, दफ्तरदार, हवालदार, मामलतदार, जमादार, मुकादम, मुश्रीफ, सराफ, हजरनीस, पोतदार, पोतनीस, पेशवे, किल्लेदार, दिवाण, वाकनीस वगैरे.[२१]

फारसीचा प्रभाव मराठ्यांच्या दिनदर्शिकेवर व राज्यव्यवहारावरही पडलेला दिसून येतो. मराठी कागदपत्रांत शक संवताबरोबर फारसीतील हिजरी, इलाही व सुलुस या कालगणनांचा वापर करण्यात आला. फारसी तारीख व वर्ष कागदाच्या वरच्या कोपऱ्यात डाव्या बाजूला लिहिण्याची पद्धत सुरू झाली. दिनदर्शिकेप्रमाणे राज्यकर्त्यांनी चलनी नाण्यांवरही अरबी–फारसी मजकूर छापण्यास सुरुवात केली. राज्यव्यवहाराच्या परिभाषेत फार मोठा बदल झाला. अनेक फारसी–अरबी शब्द रूढ झाले ते असे : अर्जदाश्त, रोजनामा, महजर, जमीन–कतबा, मेस्तन, जकात–माफी, कौलनामा, परवाना, तकिरा, अखबार, करिना, तवारीख, वाकियात, कैफियत, तकरार इत्यादी प्रशासनातील दैनंदिन नोंदी (सियाह हुजूर), व्यक्तीची माहिती (चेहरा), राजकीय आदेश (फर्मान), स्मरणपत्र (याददाश्त) व शिफारस पत्र (तजवीज) या संज्ञा रूढ झाल्या. पत्रव्यवहारासाठी मुनशी, फडणवीस, वाकियानवीस (वाकनीस), पारसनीस इत्यादींच्या नेमणुका करण्यात आल्या.[२२]

## मोडीलिपीची निर्मिती

राज्यकारभार व दैनंदिन पत्रव्यवहार फार वाढला. वेगवेगळ्या प्रकारचे अर्ज, माहिती, तजविजी, करारपत्रे लिहिण्यासाठी जलद लिपीची आवश्यकता भासू लागली. यादवांच्या पदरी असलेल्या हेमाडपंतांनी अरबी लिपीवरून मराठीत मोडी लिपीचा प्रयोग केला असावा, असे इतिहासाचार्य राजवाडेंचे मत आहे. अरबी-फारसी लिपीचे नस्क व शिकस्ता असे दोन प्रकार आहेत. नस्क ही लिपी साधी, सुटसुटीत व बाळबोध वळणाची असून शिकस्ता ही शॉर्टहँडसारखी जलद लिहिली जाणारी लिपी आहे. शिकस्ताच्या अक्षर वळणांवरून मोडी लिपीचा विकास झाला असावा.[२३]

## ऐतिहासिक लेखन

अल्बरूनीने अरबीमध्ये प्रथमच 'तहकीकात-इ-हिंद' किंवा हिंदुस्थानचा इतिहास लिहिल्याची नोंद आहे. मुसलमान राज्यकर्ते इतिहास लेखनाचे चाहते होते. त्यांचे अनुकरण आपल्याकडेही झाले व मराठीतून बखरी लिहिल्या गेल्या. या काळात दक्षिणेत फारसीमध्ये ऐतिहासिक महत्त्वाचे ग्रंथ मुस्लीम व हिंदू इतिहासकारांनी लिहिले आहेत. त्याची नोंद घेणे आवश्यक वाटते. महंमद कासीम हिंदू शहा फेरिश्ता हा विजापूरच्या दरबारात होता. त्याने 'गुलशन-ई-इब्राहिमी' हा दख्खनचा इतिहास लिहिला आहे. त्यात अनेक त्रुटी असल्या तरी त्यामुळे तत्कालीन राजकारणावर फार मोठा प्रकाश पडण्यास मदत झाली आहे. सुदैवाने डॉ. भ. ग. कुंटे यांनी त्याचे मराठीत भाषांतर केले आहे. सय्यद अली अजिजुल्ला बिन तबातबा हा अहमदनगरच्या बुरहान निझामशाह द्वितीयच्या दरबारात होता. त्याने 'बुरहान-ई-मासीर' हा ग्रंथ लिहिला. हे दोन्ही ग्रंथ दक्षिणेच्या इतिहासावरील उपयुक्त संदर्भ साधने आहेत. फारसी जाणणारे विद्वान हिंदू मध्ययुगात लेखक होते. त्यांनीही तत्कालीन राजकीय स्थितीवर लिखाण केले आहे. चंद्रभागेचे 'चहार-चमन' राम वृंदावनचे 'लुभातुत तवारीख', ईश्वरदास नागरचे 'फुतुहात-ई-आलमगिरी', भीमसेन बुधनपूरचे 'नुस्खा-ई-दिलकुशा' वा गिरधरलाल अहकारचे 'तारीख-ई-झफारा' या ग्रंथाचा उल्लेख आवश्यक आहे.[२४]

फारसी इतिहासकारांचे अनुकरण करून आपल्याकडेही अनेक बखरी, कैफियती, करिना व शकावल्या मराठीत लिहिल्या गेल्या.

## मराठीचा दख्खनी-उर्दूवरील प्रभाव

मध्ययुगीन काळात मराठी साहित्याचे दखनी-साहित्यावरही उद्‌बोधक परिणाम झालेले दिसून येतात. ही साहित्यिक देवाणघेवाण सहजता व परस्पर सहवासामुळे झालेली आहे. विशेषतः मराठी लोकगीतांचा दखनीवर पडलेला प्रभाव अभ्यासनीय आहे. मराठीतील जात्यावरील गीते, फुगडी गीते, झोपाळ्यावरील गीते, पाळणा गीते इत्यादींनी दखनी उर्दू कवींना चांगलीच भुरळ घातली आहे. सय्यद अजगर अली, फकीरुल्ला शाह, फरीद, मिराजी खुदांनुमा फारुकी वगैरे कवींनी या स्वरूपाचे बरेच लिखाण केले. या गीतांतून काही ठिकाणी त्यांनी सुफी तत्त्वज्ञान सांगण्याचाही प्रयत्न केलेला दिसतो. फकीरुल्लाच्या फुगडी-गीतांच्या माध्यमातून ईश्वराचा धावा करताना आढळते.

आओ सेहली (मैत्रीण) फुगडी खेल
हात मे हत्ता देकर खेल
साबित राह में पाऊ पैल
पौव्वा कांकां हा हू खेल
क्या क्या हैगा रुबरू
ला इलाहा इल्ललाहू।।

शाह अलीचे मुरली गीत किती नादमधुर व आशयघन आहे, या ओळींवरून समजते.

चल जमनाके तीर।
बाजत मुरली री।।
मुरली सुन कान्हाकी तिकी।
नगर नारी सगरी चौकी।
सुध न रही बाके तनकी।
मगन भई नारी गोकुळकी।
अब तुम सुनो री, सुनो री।।
कृष्ण अवतार विष्णुजी के।
नित वो सेवा संभुजी के।

छंद बजावत मुरली के।
चरनै गौ और बछरन के।
बिंदाबनमो री, बनमो री।।
जद शंकर की किरपा-भई।
तद कान्हा, मुरली बजाई।
शाह अली कहते अब गई।
भ्रांत मन की री, मन की री।।

### शाह तुराब चिश्ती

साहित्यिक देवाणघेवाणीत शाह तुराब चिश्ती यांचे योगदानही स्पृहणीय आहे. त्यांनी दखनी उर्दूमध्ये 'दिवान शाह तुराब', 'जुहरे कुल्ली', 'ग्यान सरोपा', 'गुलजारे वहादत' व 'मनसमझावान' ही पुस्तके लिहिली. ह्यांचा तसव्वुफ (सुफी तत्त्वज्ञान) व वेदान्त ह्यांचा चांगला अभ्यास होता. 'मनसमझावन' हे समर्थ रामदास यांच्या मनाचे श्लोकांचे पद्य रूपांतर आहे. समर्थांचे कोणी शिष्य सदोबास्वामी यांचा त्यांनी शोध घेतला व त्यांच्याकडून मराठी अवगत करून घेतली. शाह तुराब यांनी 'भुजंगप्रयात' वृत्ताचा वापर दखनी उर्दूत करून हे रूपांतर केले आहे. भाषिक व राष्ट्रीय एकात्मतेच्या दृष्टीने 'मनसमझावन' खरोखरच दोन मनांना एकत्र आणणारा दुवा आहे. त्यातील शब्दांचा गोडवा निश्चितच मनाला आल्हाद देणारा आहे. शाह तुराब हा मुसलमान असूनही त्यांच्या हृदयातील प्रभू रामचंद्रांबद्दल वाटणारा हा आदर पहा :

सिफत् (प्रशंसा) कर अव्वल उसकी जो राम हैगा
उसी राम के संग संग्राम हैगा
सदा राम के नाम सूँ काम हैगा
हमे ध्यान उसका सुबह शाम हैगा
वही कुल, वही मूल, वही जाम हैगा
वही साकीये बज्मे गुलफाम हैगा।।
अलख नाम अल्लाह निरंजन हरी है
निरंकार ओ निर्गुण व परमेसरी है
सिफत् उसकी हर शैमे दायम भरी है
वो गंगा, वो जमना, वो गोदावरी है
वही जुलजलाल (दैवी प्रकाश) होर इक्राम हैगा
वही साकीये बज्मे गुलफाम हैगा।।

शाह तुराब रामभक्तांना आर्जव करतात की, रामाला उद्यानात, समुद्रात किंवा आकाशात शोधण्याची काहीच आवश्यकता नाही. कारण तो चराचरात व्यापून आहे. तो प्रत्येकाच्या शरीरात आहे. तुराबना त्याचे अलख नाव त्यांच्या डोळ्यांतच दिसते. शेवटी सर्व शक्ती ही गुरुचरणांतच आहे. भक्ती संप्रदायाप्रमाणे सुफीही गुरुपरंपरेचा अत्यंत आदर करीत असत.

नको राम को ढुंढ अमनो-चमनमे
न समूदर (समुद्र) मे है, न सातो गगन मे
जगाजोत उसकाच है सब रूखन मे
भऱ्या आत्माराम हरेक के तन मे
अलख नाम दिसता है मेरे नयन मे
हे सारा सकत (शक्ती) सब गुरू के चरण मे।।[२५]

कोकणी मुस्लीम समाजात शुभकार्य व लग्नसमारंभ यांसाठी कोकणी बोलीतून अनेक सुंदर गीते रचण्यात आली. त्यांचे लेखकही अनामिक आहेत. बहुतेक गीतांत ईश्वराची आराधना व त्याची स्तुती करण्यात आली आहे. कुणी एक हमिदाबाई साध्या सोप्या शब्दांत म्हणते.

हमीदा तू लिख पयले हम्द (स्तुती) खुदाची।
अदबशी लिख सना (प्रशंसा) नबी मुस्तफाची।।
खुदाया कर दुवा माजी तू मकबूल।
नबीच्या मोहबतीला ठेव तू मशगूल।।[२६]

### कला व स्थापत्य

दक्षिणेत येताना मुस्लीम राज्यकर्त्यांनी त्यांच्याकडील विविध कला व स्थापत्यशैली ह्यांची ओळख महाराष्ट्राला करून दिली. उंची वस्त्रांची विणकाम कला, विविध धातूंची सुंदर भांडी, बश्या, सुरया बनवण्याची कला, सोन्याचांदीवरील सूक्ष्म नक्षीकाम व दागिने, काचेची भांडी, जडवाची कामे हे सारे मुस्लीम कारागिरांबरोबर येथे आले. मात्र या सर्व कलांपेक्षा त्यांचे स्थापत्य वैशिष्ट्यपूर्ण आहे. मुस्लीम स्थापत्य हे इमारतीची भव्यता, संतुलन व काटेकोरपणा यांबद्दल प्रसिद्ध आहे. त्यांनी भव्य मशिदी, मकबरे, दर्गे, किल्ले, राजप्रासाद, महाद्वारे, उद्याने व तळी बांधली. त्यांची शहरांची आखणी व पाणीपुरवठा पद्धती हे वाखाणण्यासारखे होते. दौलताबाद, खुल्ताबाद, एलिचपूर,

अहमदनगर येथील भव्य इमारती राज्यकर्त्यांच्या कर्तृत्वाची साक्ष देतात. दौलताबाद व अहमदनगर येथील किल्ले सैनिकी सुरक्षितता व भव्यपणा ह्यांबद्दल प्रसिद्ध आहेत. औरंगाबादेतील बिबी का मकबरा व अहमदनगर येथील सलाबतजंगाचा मकबरा (चांदबिबीचा महाल) उल्लेखनीय आहेत. लाकूडकामापेक्षा दगड-विटा व चुनेगच्ची ह्या कामांवर त्यांनी भर दिला. मोठमोठे कोट, महाद्वारे, मिनार, छत्र्या व घुमट ही बांधकामाची नवी वैशिष्ट्ये त्यांनी महाराष्ट्रात आणली. भाजक्या खापरीच्या नळातून शहरांना पाणीपुरवठा करण्याचे त्यांचे तंत्रज्ञान निश्चितच दाद देऊन जाते.

मुसलमानांच्या आगमनानंतर महाराष्ट्रात संमिश्र संस्कृतीचे नवे युग सुरू झाले. बळाच्या जोरावर जरी मुस्लीम सत्ताधीशांनी राज्ये उभारली असली, तरी त्यांनी साहित्य, अध्यात्म व स्थापत्य यांचे पैलू महाराष्ट्रात आणले. संघर्ष व प्रतिकार यांतून महाराष्ट्रात एक नवे पर्व उदयास आले. राष्ट्रीय व सांस्कृतिक एकात्मता ह्यांच्या दृष्टिकोनातून या संमिश्र संस्कृतीचा तौलनिक अभ्यास आवश्यक आहे.

**संदर्भ :**


१. डॉ. मिराशी वा. वि.
शिलाहार राजवंशाचा इतिहास व कोरीव लेख, नागपूर, १९७४ पृ. ८४-८९.

२. Dr. Sherwani H. K.
Cultural trends in Medieval India, Asia Publishing House, Bombay, 1967, p.45.

३. Gazetter of the Bombay Presidency : Ratnagiri, Savantwadi Districts, Vol X, 1880 P.132.

४. तत्रैव पृ. १३२-१३३.

५. Gazetteer of the Bombay Presidency Kolaba District 1883.

६. Gazetteer, Ratnagiri, Savantwadi PP 133-134.

७. तत्रैव.

८. पगडी, पंडित सेतुमाधवराव
सुफी संप्रदाय - तत्त्वज्ञान आणि परंपरा पृ. ६१- ६२.

९. Gazetteer, Ahmadnagar District Vol XVII PP 220-221.

१०. पगडी, सेतुमाधवराव : तत्रैव पृ. ७९.

११. ढेरे रा. चिं.
मुसलमान मराठी संत कवी, ज्ञानराज प्रकाशन, पुणे १९६७ पृ. ९०.

१२. तत्रैव-१-१६४.

१३. तत्रैव

१४. तत्रैव पृ. १३५.

१५. तत्रैव पृ. १३५.

१६. तत्रैव पृ. १०६.

१७. तत्रैव पृ. २६.

१८. प्रियोळकर अनंत काकोबा
अंबर हुसैनी, मराठी संशोधन पत्रिका, त्रैमासिक १९५६.

१९. पटवर्धन मा.
फारसी-मराठी कोश, आर्यभूषण छापखाना पुणे, १९२५, पृ. ६-७.

२०. राजवाडे वि. का.
राजवाडे लेखसंग्रह- ऐतिहासिक प्रस्तावना भाग १ खंड ८, चित्रशाळा प्रेस पुणे, १९५२ पृ. ३११.

२१. ढेरे रा. चिं.
महिकावतीची बखर, अनमोल प्रकाशन, पुणे १९७३ पृ. ५८-५९.

२२. Sherwani H. K. : op - cit., PP 71-73.

२३. पं. महादेवशास्त्री जोशी
भारतीय संस्कृती कोश - मोडी लिपी खंड ७वा पृ. ५२५-५२६.

२४. Sherwani H. K. : op - cit., PP 90-92.

२५. लेखनसाहाय्य - डॉ. अबदुर-सतार दळवी

२६. लेखनसाहाय्य - डॉ. अबदुलकादर मुकादम.


* * *





# ख्रिश्चन धर्म

■ फादर फ्रान्सिस दिब्रिटो

**''जा, सर्व राष्ट्रांना माझे शिष्य करा,'' असा आदेश प्रभू येशूने आपल्या शिष्यांना दिला. संत थॉमस हा येशूचा शिष्य दक्षिण भारतात आला आणि तेथे त्याने येशूच्या विचारांचा प्रचार आणि प्रसार केला. येशूचा दुसरा शिष्य बार्थोलमय हा ठाणे जिल्ह्यातील कल्याण येथे आला होता, अशी एक दंतकथा आहे.**

वांशिक गट, धर्मपंथ आणि वेगवेगळ्या विचारधारा हे भारतीय संस्कृतीच्या विविधरंगी महावस्त्राचे धागे आहेत. या लहानमोठ्या धाग्यांमुळे भारतीय संस्कृतीचे वस्त्र सुंदर बनले आहे. त्यातील एक जरी धागा उसवला, तरी संपूर्ण वस्त्राची शोभा हरवेल.

जागतिकीकरणामुळे आणि प्रसारमाध्यमांतील क्रांतीमुळे पाश्चिमात्य संस्कृतीचा आणि जीवनशैली इष्ट, अनिष्ट प्रभाव आपल्या प्राचीन भारतीय संस्कृतीवर पडत आहे. या घुसळणीमुळे आपली संस्कृती अधिक संपन्न होईल, की आपण आपले स्वत्व हरवून बसू असा प्रश्न पडतो. परंतु जी संस्कृती विविध प्रकारची मतमतांतरे पचवून हजारो वर्षे टिकून आहे, ती कधीच लयाला जाणार नाही. विविधता सामावून घेत ती आपली पृथगात्मता टिकवून राहील.

वसाहतवाद्यांबरोबर ख्रिस्ती धर्म भारतात आला हे खरे आहे. परंतु त्याआधीही ख्रिस्ती विचार या भारतभूमीत रुजला होता. फार प्राचीन काळापासून अरब, ज्यू, ग्रीक आणि रोमन हे लोक व्यापारासाठी

भारतात येत असत. रोमन इतिहासकार युसेबियुस ह्यांनी लिहिले आहे की, इ.स. १८० साली भारतात हिब्रू भाषेतील नव्या करारातील संत मॅथ्यूचे शुभवर्तमान हा ग्रंथ उपलब्ध होता. आजही केरळ आणि तामिळनाडू येथील ख्रिस्ती लोक आपली परंपरा प्रेषित संत थॉमसपासून सांगतात.

''जा, सर्व राष्ट्रांना माझे शिष्य करा,'' असा आदेश प्रभू येशूने आपल्या शिष्यांना दिला. त्यानुसार येशूचे शिष्य जगभरात विखुरले. संत थॉमस हा येशूचा शिष्य दक्षिण भारतात आला आणि तेथे त्याने येशूच्या विचारांचा प्रचार आणि प्रसार केला. पंडित जवाहरलाल नेहरूंनी 'द डिस्कव्हरी ऑफ इंडिया' या ग्रंथात ही गोष्ट नमूद केली आहे. येशूचा दुसरा शिष्य बार्थोलमय हा ठाणे जिल्ह्यातील कल्याण येथे आला होता, अशी एक दंतकथा आहे.

सहाव्या शतकात ठाणे जिल्ह्यातील कल्याण येथे एक बिशप राहत होते. त्यांची नेमणूक पर्शियाहून झाली होती. तसेच चौल (अलिबाग) येथे दहाव्या शतकात काही ख्रिस्ती लोक आणि त्यांची धर्ममंदिरे होती.

इ. स. १३२१ मध्ये थॉमस तोंलेंटिनो, जेम्स ऑफ पॅडुआ, पिटर ऑफ सिएना व ब्रदर डिमेत्रियस ऑफ तिफ्रीस, जॉर्डन कटालानी ऑफ सेरेरॅक हे मिशनरी ठाणे येथे आले होते. तेव्हा येथील स्थानिक ख्रिस्ती लोकांनी त्यांचे स्वागत केले. त्या वेळी ठाणे, कल्याण आणि सोपारा येथे सुमारे १०,००० ख्रिस्ती लोक होते. जॉर्डन तोंलेंतिनो ह्याने वसईला भेट देऊन, ९० व्यक्तींना ख्रिस्ती धर्माची दीक्षा दिली. १३२१ मध्ये कल्याण येथील काजीने चार फ्रान्सिस्कन धर्मगुरूंची हत्या केली. ठाणे व सोपारा परिसरातील हिंदू लोक अतिशय आतिथ्यशील होते, असे जॉर्डन ह्यांनी लिहून ठेवले आहे.

### ख्रिस्तपुराण- मराठीचे अभिजात लेणे

सन १५१० साली पोर्तुगिजांनी विजापूरच्या आदिलशहाकडून गोवे जिंकून घेतले आणि तेथे क्रूस रोवला. मिशनरी युरोपहून आले. त्यांच्यासमोर भाषेचा प्रश्न होता. धर्मप्रसार करण्यासाठी लोकभाषेचे ज्ञान आवश्यक होते. जेज्वीट हा कॅथलिक धर्मगुरूंचा एक पंथ आहे. त्या पंथाच्या मिशनऱ्यांनी देशी भाषांचा अभ्यास करावा, असा आदेश जेज्वीट पंथाचे संस्थापक इग्नेशिअस ऑफ लोयोला ह्यांनी काढला. त्यामुळे गोव्यात मराठी आणि कोकणी भाषेच्या अभ्यासाला गती मिळाली. काही मिशनऱ्यांनी भाषांच्या अभ्यासात इतकी प्रगती केली की, ते हळूहळू साहित्यनिर्मिती करू लागले. अर्थात, हे प्रामुख्याने धार्मिक साहित्य होते.

मराठी ख्रिस्ती साहित्याचा जनक म्हणून फादर थॉमस स्टीफन्स ह्यांच्याकडे पाहिले जाते. ते एक ब्रिटिश गृहस्थ होते. १५४९ साली इंग्लंडला त्यांचा जन्म झाला. २४ ऑक्टोबर १५७९ ला त्यांनी गोव्याच्या भूमीवर पाऊल टाकले. भारतात प्रवेश करणारे ते पहिले ब्रिटिश धर्मगुरू होते. त्यांचे सर्व आयुष्य गोव्याला गेले. अपवाद १६११-१२ ह्या वर्षांचा. त्या वर्षी त्यांनी वसई किल्ल्यातील जेज्वीट संघीय कॉलेजात मराठी भाषा शिकवण्याचे काम केले. गोव्याची ग्रंथभाषा मराठी व व्यवहाराची भाषा कोकणी यांच्यावर फादर स्टीफन्स ह्यांनी अप्रतिम प्रभुत्व मिळविले आणि त्या भाषांतून उत्कृष्ट लेखन केले. पोर्तुगीज मिशनऱ्यांना भाषा शिकता यावी ह्यासाठी त्यांनी १६४० साली कोकणीचे व्याकरण लिहिले. भारतीय देशी भाषांतील हे सर्वांत जुने व्याकरण आहे. सतराव्या शतकातील गोमंतक कोकणीचे स्वरूप समजून घेण्यासाठी ते अतिशय उपयुक्त आहे.

'ख्रिस्तपुराण' ही फादर स्टीफन्सची अजरामर साहित्यकृती आहे. हिंदू लोकांकडे शास्त्रेपुराणे होती, परंतु नव्याने ख्रिस्ती झालेल्यांसाठी कुठलेही साहित्य उपलब्ध नव्हते. ती उणीव भरून काढण्यासाठी फादर स्टीफन्सनी ख्रिस्तपुराण हा ग्रंथ रचला. त्याच्या निर्मितीसंबंधी कवी आणि श्रोते ह्यांच्यात झालेला संवाद मजेशीर आहे.

प्रार्थनेची (दौत्रिन) वेळ सरली तेव्हा-

दौत्रिनीचा वेळु सरला।
तवं एकु ब्राह्मणु पातला॥

आणि त्याने फादर स्टीफन्स ह्यांना सांगितले की, तुम्ही सांगत असलेली ख्रिस्तकथा आकर्षक आहे. परंतु आम्हांला शिकण्यासाठी काही साधन मिळाले, तर फार चांगले होईल.



दादर, मुंबई येथील पोर्तुगीज चर्च.

पण हे दौत्रिनींवाचोनि अन्य।
काहीं एक आगळे शास्त्र पुराण।।
जरी आम्हा करविते पाठण। तरि होते चांग।।१३४।।
जैसें तेंया तेयां दिपावरती। देशपरीचीं पुराणें हाती।।
तैसीं पुस्तकें कां न मिळती। आमंचा देशी।।१४२।।

नवख्रिस्ती लोकांना नव्या धर्माची आणि धर्मतत्त्वाची ओळख व्हावी म्हणून फादर स्टीफन्सने मराठी भाषेत १०,६६१ ओव्यांचे ख्रिस्तपुराण लिहिले.

या पुराणाचे प्रयोजन सांगण्यासाठी फादर स्टीफन्स यांनी गद्य प्रस्तावना लिहून मराठी साहित्यविश्वावर फार मोठे उपकार केले आहेत. मराठी भाषेत उपलब्ध असलेले संत साहित्य केवळ पद्यामध्ये आहे. (अपवाद महानुभाव साहित्याचा). त्यामुळे सोळाव्या-सतराव्या शतकातील मराठी गद्याचे स्वरूप कसे होते, हे समजावून घेण्याचा मार्ग नाही. ती उणीव फादर स्टीफन्सच्या गद्य पुराणाने भरून काढली आहे.

फादर स्टीफन्सने बायबलमधील तत्त्वज्ञान अतिशय सोप्या आणि मराठमोळ्या भाषेत मांडलेले आहे. हे खूप अवघड कार्य होते. कारण मूळ बायबलची भाषा हिब्रू आणि ग्रीक आहे. त्याचे स्वरूप रामायण-महाभारतासारखे सलग नाही. कुणा एका लेखकाने किंवा कवीने लिहिलेली ती एकटाकी कथा नाही, तर ख्रिस्तपूर्व १००० ते ख्रिस्ताब्द १०० या काळात झालेल्या विविध प्रकारच्या आध्यात्मिक लेखनांचा बायबल हा संग्रह आहे. ख्रिस्तपूर्वी झालेले लेखन जुन्या करारात समाविष्ट आहे. पुराणकथा, इतिहास, गोष्टी, काव्य, म्हणी, चरित्रकथा असे विविध साहित्यप्रकार त्यांत आहेत. नवीन करारात येशूचे जीवनकार्य आणि त्याची शिकवण ह्यांची सुसंगत मांडणी केलेली आहे. हे सारे धन मायबोली मराठीत उतरविणे हे शिवधनुष्य पेलण्यासारखे कठीण कर्म होते. फादर स्टीफन्स ह्यांनी मराठी भाषेवर प्रभुत्व मिळवून, ख्रिस्ती तत्त्वज्ञान मराठीतून व्यक्त केले आहे. ख्रिस्ती धर्माच्या देशीकरणाची ही पहिली पायरी होती. फादर स्टीफन्सच्या लेखनामुळे मराठी साहित्याच्या वृक्षाला एक जोमदार धुमारा फुटला.

म. म. दत्तो वामन पोतदार म्हणतात, ''हा ख्रिस्तपुराण ग्रंथ एकनाथकालीन जुन्या मराठी भाषेत स्टीफन्सने रचिला आहे, ही फार कौतुकाची बाब आहे. स्टीफन्सची रचना सरस व प्रौढ आहे.'' तर महाराष्ट्र सारस्वतकार वि. ल. भावे म्हणतात, ''स्टीफन्सच्या भाषेवर ज्ञानेश्वरीची छाया स्पष्ट दिसते; म्हणजे मराठी भाषाच नव्हे, तर त्या भाषेतील ग्रंथही त्याने आत्मसात केले होते असे वाटते.''

ख्रिस्तपुराणाचे अभ्यासक डॉ. सं. ग. मालशे म्हणतात, ''ख्रिस्तपुराण हे साहित्यिक आणि भाषिक दृष्ट्या साहित्य भांडारातील एक अपूर्व रत्न आहे. एका सर्वस्वी भिन्न अशा धर्मातील सर्वश्रेष्ठ आणि परमपवित्र अशा ग्रंथाच्या कथावस्तूची जोड ख्रिस्तपुराणामुळे मराठीला लाभली. या ग्रंथाची चौकट परकीय असली, तरी तिच्यावर चढविलेला वेलविस्तार थेट मराठी वळणाचा आहे.''

थोडक्यात, फादर स्टीफन्स हे मराठी भाषेच्या प्रेमात पडले होते. तसे त्यांनी आपल्या इंग्लंडमधील भावाला पात्र लिहून कळविले होते. मराठी भाषेच्या सौंदर्यासंबंधी त्यांनी काढलेले उद्‌गार उद्‌बोधक आहेत. एका ब्रिटिशाने केलेले मायबोली मराठीचे कौतुक वाचून आपला ऊर भरून येतो.

जैसी हरळांमाजि रत्नकिळा। कि रत्नामाजि हिरा निळा।।
तैसी भाषामाजि चोखळा। भाषा मराठी।।१२२।।
जैसी पुष्पामाजि पुष्पमोगरी। कि परिमळांमाजि कस्तुरी।।
तैसी भाषा माजि साजिरी। मराठिया।।१२३।।
पक्षियांमध्ये मयोरू। वृक्षियांमध्ये कल्पतरु।।
भाषेमध्ये मानु थोरू। मराठियेसी।।१२४।।
तारांमध्ये बारा राशी। सप्तवारांमाजि रवी शशी।।
यां दिपिचेआ भाषामध्ये तैसी। बोली मराठिया।।१२५।।
–(ख्रिस्तपुराण १:१२२–१२५)

### हिंदू – ख्रिस्ती सुसंवादाचा आद्य शिल्पकार

'अज्ञानांधकारात खितपत पडलेल्या भारतीयांना ख्रिस्ताचा प्रकाश दाखविण्यासाठी' मिशनरी येथे आले होते. त्यांनी तसे स्पष्टपणे नमूद केले आहे. त्यांनी ताकाला जाऊन भांडे लपविले नाही. येशू ख्रिस्ताने सांगितलेला धर्म हाच खरा धर्म असून बाकी सर्व धर्म आणि पंथ चुकीचे आहेत, अशी तेव्हा मिशनऱ्यांची भूमिका होती. त्यामुळे तत्कालीन ग्रंथांत हिंदू धर्माची आणि देवदेवतांची टीका निंदा झाली आहे. फादर पिटर क्रुवा ह्याने तर पिटर पुराण लिहून हिंदू धर्मावर जहरी हल्ले केले आहेत. हे सर्व दुःखद आहे.

आज ख्रिस्ती विचारसरणीत आमूलाग्र बदल झाला आहे. अन्य धर्मांतही चांगल्या गोष्टी आहेत. ख्रिस्ती लोकांनी अन्य धर्मांच्या धर्मग्रंथांचा विवेकपूर्वक अभ्यास करावा. त्यांतील उत्तम बाबींचा अंगीकार करावा अशी शिकवण आज चर्च देत आहे. कॅथलिक ख्रिस्ती चर्चच्या अधिकृत जाहीरनाम्यात म्हटलेले आहे, The Church, therefore, has this exhortation for her sons: prudently and lovingly, through dialogue and collaboration with followers of other religions, and in witness of Christian faith and life, acknowledge, preserve and promote the spiritual and moral goods found among these men, as well as the values in their society and culture. (Abbot Walter M., S.J. The Documents of Vatican II 1963-1965 Guild Press, New York 1966 Pgs. 662-3).

फादर स्टीफन्स हे क्रांतदर्शी होते. त्यांनी बायबलचा विचार आणि तत्त्वज्ञान व्यक्त करण्यासाठी येथील सांस्कृतिक जीवनाशी जुळवून घेतले. सुरुवातीचे नमन आपल्याला ज्ञानेश्वरीचे स्मरण करून देते. उदा.

ओं नमो विश्वभरिता। देवा बापा सर्वसमर्था।
परमेश्वरा सत्यवंता। स्वर्गपृथ्वीचा रचणारा।।
तूं ऋद्धिसिद्धीचा दातारू। कृपानिधी करुणाकरु।
तूं सर्व सुखाचा सागरू। आदि अंतु नातुडे।।

कृष्णदास शामाच्या 'श्रीकृष्ण' चरित्रातील शब्दकळेचा ख्रिस्तपुराणातील प्रभाव उघड आहे. ख्रिस्तपुराणातील मेरी आणि वनपर्वातील सावित्री ह्यांच्या चरित्रात अनेक ठिकाणी साम्य आढळते. भारतीय अध्यात्मातील अनेक प्रतिमांचा वापर फादर स्टीफन्सनी चपलखपणे केला आहे. उदा. त्रिभुवन, षड्रिपू, नवखंड पृथ्वी, भवसागर, यज्ञ, होम, वैकुंठ इत्यादी. त्यांनी ख्रिस्तासाठी वापरलेल्या उपाधी अस्सल भारतीय आहेत. उदा. स्वामी, विश्वतारक, जगद्‌गुरू, मृत्युलोकाचा दिनकर, मोक्षपदाचा दाता, महावीर, गोसावी, इत्यादी.

फादर स्टीफन्स ख्रिस्ताचा संदेश घेऊन आले होते. ते त्यांचे जीवितकार्य होते परंतु ते करताना त्यांनी हिंदूंच्या भावना दुखविल्या जाणार नाहीत ह्याची दक्षता घेतली.

येशू हेच स्वर्गलोकाचे एकमेव दार आहे, अशी त्यांची धारणा होती, तरी, प्रत्येक जण स्वधर्माचे पालन करून मोक्ष मिळवू शकतो, असेही त्यांनी मान्य केले आहे.

हिंदूंनी ग्रामदेवतांचा त्याग करून एकाच देवाची पूजा करावी आणि एकेश्वरवादाचा अंगीकार करावा, असे त्यांनी सांगितले, परंतु, ब्रह्म, विष्णू आणि शिव यांचा अधिक्षेप त्यांनी केला नाही. उलट डॉ. नेल्सन फलकाव सांगतात त्याप्रमाणे, ''All this points to the fact that Hinduism believes in One God who is called by different names. Hinduism also believes in Monism, that is, one day all will be absorbed in the ultimate Consciousness called Brahma. Stephens was well aware of the Monistic Monotheism of Hinduism. Consequently he rejected the village gods but not the other names attributed to the One God. This is clear from the fact that he accepts the whole of the Vaishnavaite tradition and attributes names like Vaikunthanatha, Vaikuntharaya, Vaikunthanayak, Vaikuntharaja and others for God the Father and the Son of God.'' (Falcao Nelson, SDB, Krishtapuran : A Christian-Hindu Encounter, Gujarat Sahitya Prakash, Anand, Gujarat, 2003, Pg. 202)

फा. स्टीफन्सप्रमाणे डॉमिनिकन, फ्रान्सिस्कन या कॅथलिक पंथांच्या धर्मगुरूंनीही विपुल साहित्यनिर्मिती केली. उदा. फ्रायर गाश्पाल द साव मिंगेल, फादर ज्युबांव द पेद्रोस, फादर थिओतिनु जोसेफ आदी धर्मगुरूंनी धार्मिक साहित्य प्रसृत करून, मराठी धार्मिक साहित्याचे दालन संपन्न केले.

स्थानिक मराठी ख्रिस्ती लोकांचे पोषण ख्रिस्तपुराण आणि तत्सम ग्रंथांतून होत होते. लोकांना आपल्या मातृभाषेतून धर्मज्ञान मिळत होते. मराठीच्या प्रभावामुळे स्थानिक ख्रिस्ती लोकांची श्रद्धा डळमळीत होईल, अशी शंका कालांतराने पोर्तुगीज राज्यकर्त्यांना येऊ लागली आणि २७.०६.१६८४ रोजी गोव्याचा व्हॉइसरॉय फ्रान्सिस द ताव्होद ह्याने फतवा काढला की, देशी भाषांचा वापर बेकायदेशीर आणि शिक्षापात्र आहे. त्याने पोर्तुगीज भाषेच्या वापराची सक्ती केली. त्यामुळे मराठी भाषेच्या अभ्यासाला आणि लेखनाला खीळ बसली.

विशेष दुःखाची बाब म्हणजे मिशनऱ्यांनी स्थानिक भाषेतील ग्रंथांची जाहीर होळी केली. त्यांनी केवळ हिंदूचेच नव्हे, तर ख्रिस्ती धर्माचेही ग्रंथ जाळले. हा असंस्कृतपणा होता. फादर स्टीफन्सचे ख्रिस्तपुराणही आगीच्या भक्ष्यस्थानी पडले. सुदैवाने फादर स्टीफनच्या ख्रिस्तपुराणाची एक प्रत मँगलोर येथील ख्रिस्ती भाविकांनी जपून ठेवली होती. ते त्याचे पठण करीत होते. त्या एका प्रतीमुळे, मराठी भाषेचे वैभव असलेला ग्रंथ आज आपल्याला वाचायला मिळतो!

फादर स्टीफन्स ह्यांनी इथे मराठियेची नगरी मायबोली मराठीतून ख्रिस्ती मराठी साहित्याचा पाया घालून, आमच्यावर अनंत उपकार केले आहेत.

### प्रॉटेस्टंटांची मराठी सेवा

ब्रिटिशांच्या आगमनानंतर मिशनऱ्यांनी मराठी साहित्य सेवेचे एक नवे दालन उघडले. १८०४ साली मिशनऱ्यांनी बायबलच्या भाषांतराची योजना मांडली. भाषांतरासाठी निवडलेल्या सात प्रमुख भारतीय भाषांमध्ये मराठीचाही समावेश होता. विल्यम कॅरी (१७६१-१८३४) ह्याने पंडित वैजनाथ ह्याच्या मदतीने नव्या कराराचे मराठीत भाषांतर केले. त्याने संत मॅथ्यूचे शुभवर्तमान हे पुस्तक १८०७ साली कलकत्त्याला सेरामपूर येथून प्रसिद्ध केले. मराठीत छापलेल्या पहिल्या पुस्तकाचा मान मॅथ्यूच्या शुभवर्तमानाला जातो.

विल्यम कॅरीने १८०१ साली मराठी शब्दकोश, १८०५ साली मराठीचे व्याकरण प्रसिद्ध केले. १८१६ साली रेव्हरंड हेरोशिओ बॉर्डवेल भारतात आला तो छपाईयंत्र घेऊनच. त्याला छपाई कला अवगत होती. तो मराठी मुळाक्षरे शिकला. १८१७ पासून त्याने बायबलवरील पुस्तके प्रसिद्ध करण्यास सुरुवात केली. १८१३ साली अमेरिकन मराठी मिशनची स्थापना झाली. मिशनने मराठीत विपुल ग्रंथनिर्मिती केली.

१८१५ साली मिशनऱ्यांनी मुंबईत पहिली मराठी शाळा सुरू केली. १८२८ साली स्कॉटिश मिशनने मुलांसाठी पहिले मराठी पुस्तक केले. त्याला प्रचंड लोकप्रियता लाभली. त्याच्या ५०,००० प्रती निघाल्या. स्कॉटिश

मिशनरी डॉ. स्टीवन्सन आणि रेव्ह. आर. डब्ल्यू. ह्यूम ह्यांनी ते तयार केले.

एकोणिसाव्या शतकाची पहाट हा महाराष्ट्राच्या ऱ्हासाचा काळ होता. १८१८ ला पेशवाई बुडाली. एका बाजूला मराठी राज्याचा अस्त होत असताना, दुसऱ्या बाजूला मिशनरी मराठी भाषेची सेवा करीत होते. व्याकरणे, कोश, क्रमिक पुस्तके ह्यांची निर्मिती करून ते मराठीला कणा देत होते. जस्टीन ॲबट, विल्यम कँडी, मोल्सवर्थ हे आघाडीचे शिल्पकार होते. छपाई कलेमुळे ज्ञानप्रसारामध्ये क्रांती झाली. शिक्षण संस्थांच्या जाळ्यामुळे साक्षरतेचा प्रसार झपाट्याने होत गेला. मुलींच्या स्वतंत्र शाळांमुळे स्त्रिया शिकू लागल्या. मिशनऱ्यांकडून प्रेरणा घेऊन पुढे महात्मा जोतिबा फुले ह्यांनी शिक्षणप्रसाराला गती दिली.

पोतृगीज मिशनरी आणि इंग्रज भारतात आले. पारंपरिक भारतीय संस्कृती आणि धर्म ह्यांच्याशी पोर्तुगीज मिशनऱ्यांचा आणि नंतर इंग्रज राज्यकर्ते ह्यांचा संपर्क आला. दोन संस्कृतींच्या संघर्षाचा हा काळ होता. त्यातून नव्या विचाराचा सूर्य महाराष्ट्रात उगवला. स्वदेश, स्वभाषा आणि स्वसंस्कृती ह्यांविषयीची अस्मिता तीव्र होत गेली. त्यातूनच पुढे भारतीय असंतोषाचे पर्व पुढे सुरू झाले.

पंडिता रमाबाई सरस्वती (१८५८-१९२२) ह्यांनी ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केला. बायबलचे मराठी भाषांतर करण्यासाठी त्या स्वतः हिब्रू आणि ग्रीक भाषा शिकल्या. त्यांनी एका हाती बायबलचे मराठीत भाषांतर केले. एका व्यक्तीने, तेही एका स्त्रीने एकहाती बायबलचे भाषांतर करण्याचा हा जागतिक विक्रम होता.

रेव्ह. नारायण वामन टिळक (१८६२-१९१९) हे कवी-पंचकातील एक कवी होते. त्यांनी ख्रिस्ती उपासना संगीताला भारतीय साज दिला. त्यांची पत्नी लक्ष्मीबाई टिळक (१८६८-१९१६) ह्यांचे 'स्मृतिचित्रे' हे पुस्तक मराठी साहित्यात अजरामर झाले आहे. रेव्ह. बाबा पदमनजी (१८३१-१९०६) ह्यांनी 'यमुना पर्यटन' ही पहिली कादंबरी लिहून, मराठी साहित्यात कादंबरी लेखनाचे दालन उघडले.

ख्रिस्ती धर्मासाठी सेवा हा श्रद्धेचा अविष्कार आहे. मानवाची सेवा हीच ईश्वराची सेवा समजून मिशनऱ्यांनी शिक्षण आणि आरोग्य या क्षेत्रांत नेत्रदीपक कामगिरी केली.

**संदर्भ :**


१. द्रागो कारिदाद, एस. जे.
येशू ख्रिस्ताची मराठीतील चरित्रे, पुणे विद्यापीठ, १९८६, अप्रकाशित, पी.एचडी. प्रबंध

२. स्टीफन्स थॉमस
क्रिस्तपुराण, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९९६

३. Falcao Nelson, SDB
Kristpuran : A Hindu-Christian Encounter, Gujarat Sahitya Prakashan, Anand, Gujarat,2003

४. Sill David L (ED)
International Encyclopedia of Social Sciences Macmillian and Free Press, New York, Vol 3-4, 1972, P.527

५. डॉ. मोरजे गंगाधर
ख्रिस्ती-मराठी वाङ्मय अहमदनगर कॉलेज, स्नेहसदन, पुणे, १९८४

६. Catholic Directory Of The Archdiocese of Bombay 1982.


* * *





# ज्यू धर्म

■ यास्मिन शेख

**कोकणपट्टीत जेथे बेने इस्राएलींनी पहिले पाऊल ठेवले, तो भाग त्या पुरातन काळात एखाद्या जंगलासारखा होता. जमीन फुकट उपलब्ध होती. तेल गाळण्याबरोबर या लोकांनी शेतीचा व्यवसायही आत्मसात केला. त्या काळात कोकणपट्टीत शिक्षणाची संधी नव्हती. पण मुळात बुद्धिमान असलेली ही जमात आपल्या कर्तृत्वाने आणि हळूहळू वाढू लागलेल्या त्यांच्या संख्येमुळे सर्व कोकणभर विखुरली गेली. दारिद्र्यातून बाहेर पडून हे लोक मध्यमवर्गीयांचे जीवन जगू लागले.**

सुमारे २१०० वर्षांपूर्वी भारतात कोकणातील अलिबाग तालुक्यातील नौगावच्या किनाऱ्यावर आलेले बेने-इस्राएल किंवा ज्यू हे मूळचे पॅलेस्टाइनमधील इस्राएलांचे वंशज होत. आशिया खंडातील असल्यामुळे ते आशियाई असून इ.स.दोन हजार वर्षांपूर्वी पॅलेस्टाइनमध्ये आब्राहम हा या धर्माचा संस्थापक होता. इस्राएली धर्माचा तो परमेश्वराचा प्रेषित किंवा संदेशवाहक मानला जातो. जुना करार (Old Testament किंवा Old Bible) हा ज्यू लोकांचा धर्मग्रंथ आहे. आब्राहम हा पॅलेस्टाइनमधील खनान (Cannan) प्रांताचा मुख्य होता. खनानी जनतेने 'एबेर' म्हणजे 'पलीकडला' या शब्दावरून त्याला व त्याच्या कुटुंबीयांना 'इब्री' आणि त्यांच्या भाषेला 'हिब्रू' हे नाव दिले. अब्राहामचा पुत्र आयझॅक याला दोन मुलगे होते. याकोब आणि येसाह. याकोब हा हारान (Haran) प्रांतात बरीच वर्षे होता. आपल्या कुटुंबीयांना भेटण्यासाठी तो पॅलेस्टाइनला येत असता वाटेत एका व्यक्तीबरोबर झालेल्या कुस्तीत तो जिंकला. ती व्यक्ती दुसरी तिसरी कोणी नसून तो देवदूत (Angel) होता. त्याने खूश होऊन

याकोब (जेकब) याला 'इस्राएल' म्हणजे 'देवाचा सरदार' हे पद बहाल केले. जेकब हा 'इस्राएल' या नावानेच परमेश्वराचा संदेशवाहक म्हणून प्रसिद्धीस आला.

### परमेश्वराचा प्रेषित मोशे

जेकबच्या बारा मुलांपैकी अकरावा पुत्र जोसेफ. त्याच्या इतर भावंडांनी दुष्टपणाने त्याला फसवून मिसर (इजिप्त) देशात गुलाम म्हणून विकून टाकले. तो अत्यंत बुद्धिमान आणि कर्तृत्वसंपन्न होता. त्या देशाचा 'फारो' हा राजा त्याच्यावर खूश झाला व त्याने जोसेफला आपल्या देशाचा सर्वश्रेष्ठ अधिकारी केले. त्याने आपल्या बुद्धिचातुर्याने त्या देशात अनेक सुधारणा केल्या. इजिप्तवर आलेल्या दुष्काळाच्या संकटावरही त्याने अनेक योजना आखून मात केली. ही घटना इ. स. पूर्व १५०० च्या सुमारास घडली. आपल्यावर ज्या भावंडांनी अन्याय केला त्यांना जोसेफने प्रेमाने इजिप्तमध्ये आणले. इस्राएली लोकांचे इजिप्तमध्ये अनेक वर्षे वास्तव्य होते. पुढे या लोकांनी स्वतःला 'बेने इस्राएल' म्हणजेच 'इस्राएलची लेकरे' (म्हणजेच जेकबची लेकरे) म्हणवून घ्यायला सुरुवात केली. या धर्मातील लोकांना 'बेने इस्राएल' म्हणतात, त्याचा हा इतिहास आहे.

मात्र नंतर राज्यावर आलेल्या फारोंना या लोकांचे वर्चस्व सहन न झाल्यामुळे त्यांनी या लोकांचा अनन्वित छळ सुरू केला. जन्मलेल्या प्रत्येक मुलाला मारून टाकण्याचा त्यांनी सपाटा लावला. त्यांच्या तडाख्यातून मोशे (मोझेझ) हा मुलगा वाचला. तो मोठा झाल्यावर त्याला आपल्या समाजावर होणारे अमानुष अत्याचार सहन होईनात. त्याने आपल्या समाजाचे नेतृत्व करून त्यांना इजिप्तच्या बाहेर काढले आणि आपल्या मूळ स्थानाकडे-जेरुसलेमकडे नेले. वाटेत त्याने आपल्या समाजाला स्थैर्य व शिस्त लागावी म्हणून 'तोरा' (अनुशासन) व दहा आज्ञा (Ten Commandments) सांगितल्या. बेने इस्राएल समाजावर या दोहोंचा विशेष प्रभाव आहे. मोशे हा परमेश्वराचा प्रेषित म्हणून मान्यता पावला.

पुढे हा समाज बारा गटांत विभागला गेला. प्रत्येक गटाला जेकबच्या मुलाचे नाव देण्यात आले. काही काळानंतर इस्राएल राज्याचे दोन भाग झाले-१) यहुदा (ज्युडा), २) बेनियामिन (बेंजामिन). इस्राएलींना 'ज्यू' हे नाव यहुदा किंवा ज्युडा याच्या राज्याचा नाश झाल्यानंतर पडले. ('ज्यू' हे ज्युडाचे संक्षिप्त रूप होय.)

इ. स. पूर्व ७३० ते ७२१ या कालखंडात रोमन लोकांनी ज्यूंवर आक्रमण केले. जेरुसलेमवर हल्ला करून ज्यूंची प्रार्थना मंदिरे उद्ध्वस्त केली. त्यांचा अनन्वित छळ केला. जीव वाचवण्याच्या धडपडीत ज्यू लोक वाट फुटेल तिथे सैरावैरा धावत सुटले. जहाजांतून समुद्रमार्गे जगाच्या पाचही खंडांत ज्यू विखुरले गेले. ज्या देशांनी त्यांना आश्रय दिला, त्या देशाला ते आपले राष्ट्र, त्या भूमीला आपली मातृभूमी आणि तेथील भाषेला आपली मातृभाषा मानून ते त्या-त्या देशाशी, तेथील समाजाशी एकरूप झाले.

स्थलांतरानंतरही ज्यांचा आपल्या पवित्र भूमीशी संबंध राहिला, ते आपला धर्म व संस्कृती जपत राहिले – स्थानिक रहिवाशांना विरोध न करता, हे विशेष.

मात्र काही ज्यूंचा परदेशात गेल्यावर आपल्या ज्ञातीच्या लोकांशी संपर्क पूर्णपणे तुटला. शतकानुशतके ज्यांचा संबंध राहू शकला नाही, अशा लोकांपैकी महाराष्ट्रातील ज्यू होत.

### ज्यूंचे भारतात आगमन

इ. स. पूर्व ७३२-७२१ च्या सुमारास बेने इस्राएलींचे भारतात आगमन झाले, ते योगायोगानेच. अरिसिअन राजाने इस्राएलींच्या दहा गटांची (Ten tribes) हकालपट्टी केल्यानंतर 'एलाथ'वरून निघालेल्या जहाजांतून ते दिशाहीन अशा अवस्थेत भरकटले, ते कर्मधर्मसंयोगाने भारताच्याच दिशेने आले. मात्र हेनेरी (Henery) व केनेरी (Kenery) बेटाजवळ वादळात सापडून त्यांची जहाजे खडकावर आपटून फुटली. ही बेटे चेऊलपासून १५ मैलांवर व नौगावपासून ५/६ मैलांवर आहेत.

या अपघातात जहाजांवरील बरेच लोक बुडून मेले. सात जोडपी (सात स्त्रिया व सात पुरुष) नौगावच्या किनाऱ्याला लागली. तेथील कोळी लोकांनी त्यांना वाचवले. जिवंत राहिलेल्या या चौदा जणांकडे अंगावरच्या वस्त्राशिवाय काहीच उरले नव्हते. त्यांचे धर्मग्रंथ, कपडे सारे-सारे समुद्रात वाहून गेले होते. त्यांची भाषा हिब्रू, पेहरावही

वेगळा. पण या संपूर्णपणे भिन्न असलेल्या लोकांना स्थानिक लोकांनी सहानुभूतीने वागवले. या घटनेमुळे भारतीय हिंदूंच्या औदार्याचा आणि माणुसकीचा प्रत्यय येतो. त्या निराधार, असहाय लोकांशी अगत्यपूर्वक वागून त्यांच्यावर काय बेतले आहे, हे जाणून ग्रामस्थांनी त्यांना आश्रय दिला.

समुद्रकिनाऱ्यावर वाहून आलेली प्रेते नौगावच्या किनाऱ्याजवळच खड्डे खणून पुरली. प्रेतांचे दफन करण्याची ज्यू धर्मात पद्धत आहे, तिला अनुसरून (वाचलेल्या लोकांच्या विनंतीवरून) त्या प्रेतांचे दफन करण्यात आले. प्रेते पुरलेल्या ठिकाणी खूण म्हणून काळ्या रंगाचे दगड बसवलेले आहेत. अगदी अलीकडे या पुरातन दफनभूतीचे जतन व्हावे म्हणून त्या भूमीभोवती कुंपण घालून एक प्रवेशद्वार बांधले आहे. त्या प्रवेशद्वाराच्या वरच्या बाजूला उजवीकडे हिब्रू, मराठी व इंग्लिश ह्या भाषांत लिहिले आहे - मराठीत 'येरूशालाईम द्वार', इंग्लिशमध्ये Jerushalem Gate द्वाराच्या डाव्या बाजूला तीनही भाषांत पुढील मजकूर आहे. मराठीतील मजकूर- 'येरूशालाईम द्वारा, देणगी: रुपये ६५००० येरुशालाईममधील भारतीय ज्यू समाजाकडून. श्री. नोहा मस्सील, अध्यक्ष अ. भा. ज्यू. सं. इस्राएल यांच्या सौजन्याने १९९७, आतमध्ये स्तूप उभारलेला आहे. त्यावर एका बाजूला देणगीदारांची नावे व त्यांनी दिलेल्या देणगीचा आकडा नमूद केलेला आहे. उरलेल्या तीन बाजूंना एकच मजकूर हिब्रू, मराठी व इंग्लिश ह्या भाषांमध्ये लिहिलेला आहे. मराठीतील मजकूर असा- ''दोन हजार वर्षांपूर्वी नवगाव किनाऱ्याजवळ जहाजाबरोबर बुडालेल्या बेनेइस्राएल ज्ञातीतील पूर्वजांची ही दफनभूमी आहे. नवगावाहून इस्राएल जात संपूर्ण भारतात पसरली. प्रारंभी हे लोक तेल गाळणे व शेती हे व्यवसाय करीत. कालांतराने त्यांनी छोटे उद्योगधंदे, सेवादल व सरकारी नोकऱ्या इत्यादी करून मोठे हुद्दे मिळवले. ते खऱ्या अर्थाने स्वतंत्र भारताचे नागरिक असून त्यांनी स्वातंत्र्याच्या चळवळीत भाग घेतला होता. १९४८ च्या इस्राएलच्या निर्मितीनंतर त्यांतील बहुसंख्य लोक इस्राएलला जाऊन आनंदाने राहत



सिनेगॉगचा दर्शनी भाग.

आहेत.''

याशिवाय, दफनभूमीत प्रवेश केल्यावर एका संगमरवरी दगडावर इंग्लिश व मराठी भाषांत मजकूर लिहिले आहे. मराठीतील मजकूर असा- 'नवगाव इस्राएली कबरस्तान' हे शीर्षक असून पुढे २००० वर्षांपूर्वीचे सर्वांत जुने भारतातील बेनेइस्राएल लोकांचे कबरस्तान.'

## शनिवार तेली

कोळी, आगरी समाजातील खेडुतांनी या पाहुण्यांना त्यांना जमतील ते व्यवसाय देऊन अर्थार्जनाच्या संधी उपलब्ध करून दिल्या. या संकटातून वाचलेल्या पुरुषांना तेल गाळण्याचा व्यवसाय अवगत होता. त्यांना तिळापासून, नारळापासून तेल काढण्याचे काम देण्यात आले. तीळ व खोबरे यांच्या तेलांना कोकणात मागणी होती. जास्तीचे तेल घाटाकडील प्रदेशांत पाठवले जाई. पॅलेस्टाइनमध्ये सॉलोमन राजाच्या कारकिर्दीत तेल गाळण्याचा व्यवसाय भरभराटीला आलेला होता. कोकणपट्टीत योगायोगाने आलेले लोक हे इस्राएलीच होते,

याचा हा सबळ पुरावाच होय. त्यांच्या या व्यवसायावरून कोकणात लोक त्यांना 'तेली' म्हणू लागले.

ज्यूंच्या धर्मात 'शनिवार' हा शाब्बात म्हणजे विश्रांतीचा दिवस समजला जातो. कोकणातील आलेले ज्यू आठवड्यातील सहा दिवस काम करत; पण शनिवारी कोणतेही काम, स्वयंपाक, पैशाचे व्यवहार करीत नसत. तेलाचा व्यवसाय आणि शनिवारी विश्रांती, यामुळे कोकणातील लोक त्यांना 'शनवार तेली' या नावाने ओळखू लागले. (आजही कोकणातील स्थानिक लोक त्यांचा याच नावाने उल्लेख करतात.) भारतातील ज्यू कालांतराने आपल्या धर्मातील अनेक रितीरिवाज विसरून गेले; पण 'शाब्बात' पाळण्याची युगानुयुगांची धार्मिक रुढी मात्र ते विसरले नव्हते, हे विशेष. भारतात कोकण किनाऱ्यावर स्थायिक झालेले लोक हे बेने इस्राएल होत, याचा हा आणखी एक सबळ पुरावा.

कोकणपट्टीत जेथे बेने इस्राएलींनी पहिले पाऊल ठेवले, तो भाग त्या पुरातन काळात एखाद्या जंगलासारखा होता. जमीन फुकट उपलब्ध होती. तेल गाळण्याबरोबर या लोकांनी शेतीचा व्यवसायही आत्मसात केला. त्या काळात कोकणपट्टीत शिक्षणाची संधी नव्हती. बेने इस्राएलींनाही त्या काळात शिक्षणाचा स्पर्शही झालेला नव्हता. शिक्षणाच्या अभावी आत्मोन्नतीलाही वाव नव्हता. पण मुळात बुद्धिमान असलेली ही जमात आपल्या कर्तृत्वाने आणि हळूहळू वाढू लागलेल्या त्यांच्या संख्येमुळे सर्व कोकणभर विखुरली गेली. दारिद्र्यातून बाहेर पडून हे लोक मध्यमवर्गीयांचे जीवन जगू लागले.

हिंदू समाजात मिसळून गेल्यामुळे ते कोकणी-मराठी भाषा बोलत. मात्र हिंदूंप्रमाणे त्यांनी मूर्तिपूजा केली नाही. हिंदूच्या मूर्तिपूजेच्या वेळी बेने इस्राएली त्यांच्या धार्मिक विधींमध्ये सहभागी होत नसत; मात्र त्यांनी हिंदूच्या मूर्तिपूजेचा कधीही उपहास केला नाही. परमेश्वर हा एक आहे (God is one) आणि तो निराकार आहे, हा धार्मिक विचार मात्र त्यांच्या हृदयात कायमचा भिनलेला होता. ते त्यांची हिब्रू ही मातृभाषा हळूहळू पूर्ण विसरून गेले, पण त्यांना त्यांची हिब्रू भाषेतील एकच 'शेमा' ही प्रार्थना येत होती, ती प्रार्थना इतकी शतके उलटली, तरी ते विसरले नव्हते. शाब्बातच्या आदल्या संध्याकाळी आणि विवाह, मृत्यू, बालकाचा जन्म अशा प्रसंगी ती एकच प्रार्थना ते म्हणत असत. विवाहित स्त्रिया हिंदूंप्रमाणे मंगळसूत्र घालत पण कपाळावर कुंकू लावत नसत.

### ज्यूंची नावे व आडनावे

हिंदू समाजात एकरूप झाल्याचा आणखी एक परिणाम म्हणजे ज्यू लोकांनी हिंदू पद्धतीप्रमाणे आडनावे लावायला सुरुवात केली. कोकणातील ज्या-ज्या गावी ते स्थायिक झाले, त्या गावची नावे पुढे 'कर' जोडून त्यांनी स्वीकारली. नौगावकर, नागावकर, किहीमकर, चौलकर, आवासकर, पेणकर इत्यादी. मात्र घाटाकडील नगरकर, पुणेकर, आगासकर इत्यादी आडनावे त्यांनी स्वीकारली नाहीत.

ज्यू लोकांनी स्थानिक लोकांना आपल्याबद्दल परकेपणा वाटू नये म्हणून आपल्या बायबलमधील नावांत (Biblical names) बदल केला. पुरुषांनी दादाजी, इसाजी, बालाजी, मुसाजी, आबाजी इत्यादी. मुलींची नावे – एसू, आका, माका, लाडी, माणिक इत्यादी.

१९ व्या शतकात ही हिंदू नावे धारण करण्याची पद्धत बंद झाली व बायबलमधील नावे ठेवण्यास सुरुवात झाली. मात्र आडनावाच्या बाबतीत फारसा फरक पडलेला नाही. आजही महाराष्ट्रातील बेने इस्राएल आपल्या बायबलमधील नावापुढे तीच आडनावे लावतात; अर्थात काही अपवाद आहेत.

भारतातील कोकणातील ज्यूंबद्दल बाराव्या शतकात कुतूहल निर्माण झाल्याचे जाणवते. ज्यू तत्त्ववेत्ता मोझेझ मायमोनिदस (Moses Maimonides) याने एका पत्रात असे लिहिले होते, ''हिंदुस्थानातील ज्यू लोकांमध्ये धार्मिकतेचा काहीच अंश उरलेला नाही. मात्र अपवाद म्हणजे ते शाब्बातला पूर्ण विश्रांती घेतात आणि मुलाची सुंता त्याच्या जन्मानंतर आठव्या दिवशी करतात.''

### ज्यू समाजात झालेली धार्मिक क्रांती

भारतात कोकणपट्टीवर स्थिरावलेल्या बेनेइस्राएलांचे वंशज आपला धर्म जवळजवळ विसरून गेले होते. शतकानुशतके त्यांचा-त्यांच्या धर्मीयांशी संबंध पूर्णपणे

तुटलेला होता. आपली काही वैशिष्ट्ये सांभाळून त्यांनी आपल्या आवतीभोवतीच्या समाजाशी मिळते घेतले होते. तत्कालीन स्त्रिया नऊवारी साड्या नेसत, काष्टा घालत, हिंदूसारखे दागदागिने घालत. पुरुषही हिंदू पेहराव करीत. हा समाज इ. स. १६५० पर्यंत आपल्या धर्मासंबंधी, आपण नेमके कोण आहोत, यासंबंधी अनभिज्ञ होता.

कोचीन येथे व्यापारानिमित्त आलेल्या ज्यूंची परिस्थिती अगदी वेगळी होती. त्यांचा आपल्या पॅलेस्टाइनमधील समाजाशी संपर्क होता. राजाश्रयामुळे त्यांची उन्नती होत होती. आर्थिकदृष्ट्या त्यांना स्थैर्य आले होते. आपला धर्म जपत असताना स्थानिक लोकांचे सहकार्यही त्यांना मिळाले. भारतातील सर्वांत प्राचीन प्रार्थनामंदिर कोचीनमध्येच आहे. मात्र कालांतराने तेथे पोर्तुगीज, अरब व युरोपीय यांच्या आगमनानंतर त्यांनी इस्राएली लोकांवर हल्ले केले. त्यांचे व्यापार हस्तगत केले. त्यामुळे कोचीन येथील इस्राएली व्यापाराचे नवे मार्ग शोधण्यासाठी कोकणकिनाऱ्यावरील बंदराकडे आले. चौल येथे त्यांची तेथील बेने इस्राएलींशी गाठ पडल्यानंतर त्यांना त्यांच्या ज्यू धर्माशी जुळत्या अशा काही चालीरीती पाहून ते ज्यू धर्माचे असावेत असे वाटले.

इ. स. १७६० ला डेविड राहाबी (राब्बाय) याने या लोकांचे जन्मविधी, मृत्यूनंतर दफन करण्याची पद्धत, जन्मलेल्या मुलाची आठव्या दिवशी सुंता करण्याची चाल, शनिवारी विश्रांती घेण्याचा रिवाज, खाण्यापिण्याच्या काही पद्धती (उदा. खवले असलेले मासेच ते भक्षण करीत.) इत्यादींवरून हे ज्यू समाजाचेच लोक आहेत, हे ओळखले. इ. स. १७६८ मध्ये राहाबीने आपल्या डच व्यावसायिकाला लिहिलेले पत्र हा बेने इस्राएलसंबंधी सबळ पुरावा आहे. ''Jews known as Israel are distributed all are Maharshtra Pravinle (now Maharashtra State), Living under the Moguls. They live in tents, they own oil presses, some of them are soldiers, they know nothing as regards their faith, except to recite the 'Shema' and rest on the Sabbath''



फोर्ट, मुंबई येथील सिनेगॉग.

ह्या पत्राचा सारांश असा की, महाराष्ट्रात विखुरलेला ज्यू (उर्फ इस्राएल समाज) मोगलांच्या अमलाखाली असून ते तेल गाळणे हा व्यवसाय करतात, त्यांच्यातील काही सैन्यात भरती झालेले आहेत. त्यांना आपल्या धर्माविषयी काहीही माहीत नाही. फक्त ते 'शेमा' ही (हिब्रू भाषेतील) प्रार्थना करतात आणि शनिवारी (शाब्बात) विश्रांती घेतात.

बेने इस्राएलींमध्ये आपल्या धर्मासंबंधी प्रथम जागृती झाली ती वर उल्लेखलेल्या डेविड राहाबी याच्या प्रयत्नामुळेच. काहींच्या मते हा डेविड राहाबी (राब्बाय) याचे इ. स. १६५० नंतर कोकणात आगमन झाले. त्याने बेने इस्राएलींना स्वधर्माची ओळख करून दिली, ज्यूंची पितृभूमी भारताबाहेर असल्याची जाणीव करून दिली, धर्मग्रंथांचा परिचय करून दिला, हिब्रू भाषेचेही शिक्षण देण्यास सुरुवात केली. जगभर विखुरलेल्या ज्यूंना हे कळल्यावर अनेक राब्बी (धर्मपंडित) भारतात आले. कोकणातील विविध ठिकाणी स्थायिक झालेल्या ज्यूंचा शोध घेऊन त्यांनी मुलगे निवडले व त्यांना धर्मग्रंथ, प्रार्थना इत्यादी शिकवण्यासाठी हिब्रू भाषेचे शिक्षण देण्यास सुरुवात केली. या राब्बींच्या प्रयत्नांमुळेच शिक्षणाचे महत्त्व या समाजाच्या लक्षात आले. महाराष्ट्रातील इस्राएली समाजाने मराठी हीच आपली मायबोली मानली. त्या काळात शिक्षणाचा अधिकार फक्त उच्चवर्णीयांना असे. कोकणी मराठी बोलणारे बेने इस्राएल यांना अनेकांच्या प्रयत्नांनी शाळांत प्रवेश मिळाला.

महाराष्ट्रातील बेने इस्राएली समाजात धर्मजागृतीनंतर दुसरी जागृती झाली ती शिक्षणासंबंधी. ब्राह्मणांच्या, उच्चवर्गीयांच्या पाठशाळांत सर्व ज्यू मुलांना प्रवेश मिळत नसे. ख्रिस्ती मिशनरी भारतात धर्मप्रसारार्थ शाळा चालवीत असत. अमेरिकन, स्कॉटिश व इंग्लिश मिशनऱ्यांनी भारतात रायगड जिल्ह्यातील महत्त्वाच्या ठिकाणी शाळा काढल्या, त्या प्रामुख्याने नव्याने धर्मजागृती झालेल्या बेने इस्राएली मुलांसाठी. त्या शाळांतून 'हिब्रू' भाषा शिकवली जाते, म्हणून ज्यू समाज त्या शाळांकडे आकर्षिला गेला. जुन्या कराराची (Old Testment किंवा जुने बायबल) त्यांनी मराठीत भाषांतरे केली. ज्यू लोक त्यामुळे ख्रिश्चन धर्म स्वीकारतील अशा कल्पनेने त्यांनी प्रयत्न सुरू केले.

याचा परिणाम मात्र उलटाच झाला. एकाही बेने इस्राएली माणसाने ख्रिस्ती धर्म स्वीकारला नाही. आपले धर्मप्रसाराचे कार्य सिद्धीस गेले नाही म्हणून ज्यू मुलांना व ज्यू शिक्षकांना बंदी घालावी असाही प्रस्ताव पुढे आला. ज्यू समाजाच्या दृष्टीने मात्र या शाळांतील बायबलच्या परिचयामुळे व हिब्रू, इंग्लिश या भाषांच्या शिक्षणामुळे त्यांच्यातील धर्मविषयक जागृती अधिक झाली. बायबलमधील कथांची व हिब्रू प्रार्थनांची त्यांनी मराठीतील कीर्तनसदृश रचना केली. इंग्लिशच्या ज्ञानामुळे त्यांची झपाट्याने प्रगती झाली, नव्या जगाशी ओळख झाली, मुंबई शहरात वास्तव्य करण्याच्या संधी उपलब्ध झाल्या आणि इतर ठिकाणच्या ज्यू बांधवांशी संपर्क साधता येऊ लागला.

कोकण किनाऱ्यावरील आंग्रे यांच्या आरमारात व सैन्यातही बेने इस्राएलींना प्रवेश मिळाला होता. मराठ्यांच्या सैन्यातही त्यांनी शिपाई म्हणून काम केल्याचे पुरावे सापडतात. मात्र 'तेली' किंवा 'शनिवार तेली' असाच त्यांचा उल्लेख आंग्रे यांच्या दप्तरात केलेला आहे. त्यांना सणानिमित्त शुभेच्छा देण्याची आंग्रे यांची पद्धत होती. त्या काळातील राघोजी आंग्रे यांनी सॅम्युअल किहीमकर यांच्याकडून त्यांच्या धर्माची माहिती लिहून घेतली होती. त्यानंतर मात्र 'शनिवार तेली' ऐवजी 'बेने इस्राएली' असा त्यांचा उल्लेख होऊ लागला.

आंग्र्यांच्या काळात बेने इस्राएलींमध्ये झालेली धर्मजागृती व शिक्षणाच्या उपलब्ध झालेल्या संधी यांमुळे त्यांची झपाट्याने प्रगती झाली ती अठराव्या शतकानंतर. त्यानंतरच महाराष्ट्राच्या प्रगतीत, जडणघडणीत त्यांचा मोलाचा सहभाग दिसून येतो. एक मात्र येथे नमूद करणे आवश्यक आहे, महाराष्ट्रातील ज्यूंनी मराठी हीच आपली मायबोली आणि भारत हीच आपली मातृभूमी मानली आहे.

**संदर्भ :**


१. Who are the Jews of India ?- Nathan Katz, Published by- University of California Press.1997
२. भारतवासी बेनेइस्राएली – रेचल गडकर, प्रकाशक ग्रंथाली २००१
३. इस्राईलची लेकरे – संध्या जोशी
४. Awas - Bunny Reuben - Published by Virgo Books 2007.
५. To Be A Jew - Rabbi Hayim Halevy Donin, Published by Basic Books, U.S.A. 1972.


* * *

# धर्म व तत्त्वज्ञान






## पारशी धर्म

■ वि. ग. जोशी

**मा**नव समाजाचा इतिहास म्हणजे केवळ युद्धाच्या घटनांचे चित्रण नसून मानवाच्या वैयक्तिक व सामूहिक उत्कर्ष-अपकर्ष व संघर्ष ह्यांचे तथ्यात्मक चित्रण असून पुढील पिढ्यांसाठी उद्बोधक, मार्गदर्शक ठरू शकणारे वर्णन असते.

इसवी सनाचे आठवे शतक म्हणजे सांप्रत काळापूर्वी सुमारे बाराशे-तेराशे शतकांचा काळ. भारताच्या पश्चिम किनाऱ्यावरील संजाण हे स्थान. तेथे राज्य होते यदुवंशी राजा जदीराणा याचे. या राजापुढे पारशी मोबेद (धर्मगुरू) नजराणे घेऊन उपस्थित झाला.

**पारशी ग्रंथ अवेस्तामधील मंत्रांचे उच्चार संस्कृत भाषेला जवळचे आहेत. पारशी समाज आर्यवंशातला मानला जातो. आपणासारखे तेही अग्नीचे उपासक आहेत. त्यांच्या विवाह संस्कारात. तसेच मुंज (व्रतबंध), उपास्य व उपासना ह्या पद्धतींत अनेक साम्यस्थळे आहेत, कारण वैदिक आर्य व इराणमधले तत्कालीन रहिवासी एकत्र होते. गृहस्थाश्रम हा एकच आश्रम ते मानतात. जातिभेद व वर्णभेद त्यांच्यात नाही.**

''आपला धर्म व आचार कोणता?'' राजाने कुतूहलाने विचारले. मोबेदने मोजक्या शब्दांत, विनम्रपणे उत्तर दिले, ''आम्ही सूर्य, चंद्र, अग्नी व जल यांची पूजा करतो, आणि कश्ती (जानवे) घालतो.'' धर्मगुरूने राजाला विनंती केली की, आम्हां निराश्रितांना आपल्या राज्यात वसण्याची परवानगी द्यावी. ती विनंती ऐकून राजाची खात्री झाली की, हे लोक धर्मनिष्ठ व निरुपद्रवी आहेत, म्हणून अगदी माफक अटी घालून जदीराणाने पारशी निर्वासितांना संजाणमध्ये वसण्याची परवानगी दिली. राजाच्या अटी अशा-

१) संजाणमध्ये वापरली जाणारी भाषा वापरावी,
२) स्त्रियांनी हिंदू स्त्रियांसारखा पोषाख करावा,

३) हत्यारे–शस्त्रे बाळगता कामा नयेत आणि

४) लग्ने रात्री लावावीत.

या सौम्य अटींचे पालन करण्यात पारशी धर्मगुरूला कोणतीही अडचण भासली नाही. अशा तऱ्हेने पारशी लोक संजाणमध्ये स्थायिक झाले व त्यांची मातृभाषा गुजराती झाली.

जागतिक इतिहासाचे अवलोकन केल्यास एक गोष्ट स्पष्ट दिसून येते की, मनुष्यांच्या ठिकठिकाणच्या समाजांवर धर्माचा पगडा नेहमी राहत आला आहे. मनुष्याचे जीवनव्यवहार धर्माधिष्ठित राहत आले आहेत. देशाच्या नावावरून तिथल्या समाजाचे नामकरण बव्हंशी झालेले आहे; जसे हिंदुस्थानातले हिंदू, जर्मनीमधले जर्मन, तुर्कस्तान मधले तुर्की त्याचप्रमाणे पर्शिया मधले (इराण मधले) पारशी. संजाण येथे निर्वासित म्हणून आगमन झालेल्या पारशी समुदायाच्या मायभूमीचा–पर्शियाचा इतिहास रोमांचक आहे. पारशी धर्माच्या संस्थापकाचे नाव जरतुश्त्र किंवा झरथुष्ट्र.

इसवी सनापूर्वी सातव्या शतकात इराणच्या वायव्येस असलेल्या अझरबैजान प्रांतातल्या रे नावाच्या एका लहानशा गावी फरवर्दीन महिन्याच्या खोर्दाद दिनी झरथुष्ट्र जन्मला त्यामुळे त्याचा जन्मदिन हाच पारशी नववर्षाचा दिवस म्हणून मानून साजरा केला जातो. झरथुष्ट्राच्या वडिलांचे नाव पोउरुषस्प, आईचे नाव दोग्धी तर कुलनाम होते स्पितम. झरथुष्ट्राच्या जन्मापूर्वीची इराणमधली सामाजिक स्थिती दयनीय होती. तिथले राजे, मांडलिक, धनिक वगैरे प्रतिष्ठित लोकांवर भोंदू पुरोहितांचे वर्चस्व होते. सारी व्यवस्था कोलमडल्याने सामाजिक अधःपतन झाले होते.

झरथुष्ट्राचा ओढा अध्यात्माकडे होता. सभोवारच्या परिस्थितीने बेचैन झालेल्या या युवकाने दहा वर्षे एकांतवासात आणि आत्मचिंतनात व्यतीत केली. अहुरमज्दशी संवाद साधण्याच्या प्रयत्नात त्याला साक्षात्कार झाला. त्याने उपदेश करण्यास आरंभ केला, कारण ‘बुडतसे जन न देखवे डोळां, येतो कळवळा’ अशी त्याची मनःस्थिती होती. भोंदू पुरोहितवर्गाकडून व त्यांच्या अनुयायांकडून त्याला विरोध होऊ लागला. त्यांच्या रोषामुळे झरथुष्ट्राला हालअपेष्टा सहन कराव्या लागल्या. तरीही त्याने चिकाटीने आपला प्रयास चालू ठेवला. हळूहळू त्याला अनुयायी मिळू लागले. अस्पाच्या वंशजांनी त्याचे अनुयायित्व स्वीकारले. त्यामुळे त्याच्या धर्माचा झपाट्याने प्रसार होऊ लागला. त्याच्या धर्माला व उपदेशाला शासनाचा पाठिंबा मिळाला. झरथुष्ट्रचे निधन वयाच्या ८०व्या वर्षी झाले, असे मानले जाते. त्याच्या धर्माची मूलतत्त्वे गाथामध्ये श्लोकबद्ध आहेत. त्यात पावित्र्य, सत्य, ऋजुता, प्रामाणिकपणा, सौजन्य यांवर विशेष भर दिला आहे. झरथुष्ट्री धर्म एकेश्वरवादी आहे. अग्नी स्वर्गातून धरतीवर अवतरला अशी या धर्माची मान्यता असून त्याची उपासना केली जाते. गाय ही मानवाला मिळालेली सर्वश्रेष्ठ देणगी आहे; असे मानून तिचा वध करू नये, पशुपालन करावे; असे या धर्मात प्रतिपादले आहे. अतिथीचा सन्मान करण्याची या धर्माची शिकवण आहे. भिक्षा मागणे निषिद्ध आहे.

धर्मग्रंथ अवेस्तामधील उदात्त शिकवणुकीनुसार श्रमयुक्त, पवित्र, समृद्ध जीवन जगणाऱ्या पारशी समाजावर इ.स.पू.३३०मध्ये सिकंदरच्या स्वारीचे संकट आले. त्यामुळे त्यांच्या समाजाचे अतोनात नुकसान झाले. पण इसवी सन ६४१ हे वर्ष इराणवर झालेल्या अरबांच्या इस्लामी आक्रमणामुळे विध्वंसक ठरले. शांतताप्रिय पारशी समाजापुढे फक्त दोनच पर्याय होते. एक म्हणजे इस्लामचा स्वीकार करा अन्यथा तलवारीच्या धारेला कंठ अर्पण करा. असंख्य लोकांची कत्तल झाली. पुष्कळशा लोकांनी निरुपायाने इस्लामचा स्वीकार केला तरी काही धर्मनिष्ठ, परंपराभिमानी कट्टर पारशी लोकांनी खोरासानच्या दुर्गम डोंगराळ प्रदेशाचा आश्रय घेतला. तेथेही अरब आलेच त्यामुळे पारशी धर्माभिमान्यांनी इराणच्या आखाताच्या मुखावरील ओर्मुझ बेटावर स्थलांतर केले. दुर्दैवाने इस्लामची धाड तेथेही पोचली आणि आपल्या प्रिय धर्माचे रक्षण करण्यासाठी अनंत हालअपेष्टा सोसत अवशिष्ट पारशी लोक जहाजात बसून थेट भारताच्या पश्चिम किनाऱ्यावरील दीव बेटावर पोचले. त्यांचे पूर्वज ज्या भारतात आले होते, तोच भारत आपल्याला सुरक्षित जीवन लाभू देईल असा विश्वास त्यांना वाटला असावा. दीव बेटावर १९ वर्षे

राहिल्यानंतर हे निर्वासित पारशी लोक संजाण येथे स्थायिक झाले. आर्यभूमीने त्यांना दिलासा दिला. हा पारशी समाज आपल्या कर्तव्याला जागला असे दिसते. महंमूद बेगडा याने संजाणवर आक्रमण केले, त्या संकट-प्रसंगी संजाणच्या राजाच्या बाजूने या लोकांनी युद्धात पराक्रम केला, परंतु पारशांचा नेता आर्देशीर आपल्या बऱ्याच सैनिकांसह युद्धात कामाला आला. मुसलमानांनी येथे खूप विध्वंस केला त्यामुळे अनेक पारशी कुटुंबांना संजाणमधून स्थलांतर करून इतरत्र वास्तव्य करणे भाग पडले. कालांतराने पारशी कुटुंबे संजाणच्या दक्षिणेकडील व उत्तरेकडील लहानमोठ्या अनेक शहरांत जाऊन राहिली.

सम्राट अकबराने १५७३ साली सुरतेला वेढा घातला होता. त्याला पारशी धर्माची तत्त्वे जाणून घ्यायची होती. त्याने नवसारीतून दस्तूर मेहेरजी राणा यांना मुद्दाम भेटीला बोलावले. त्याच्याकडून पारशी धर्माविषयी माहिती घेतली. इतकेच नव्हे, तर आपल्या दरबारात धार्मिक बाबीसंबंधी न्यायनिवाडा करण्याच्या कामी त्याने नवसारीतून पारशी पंडितांना बोलावून घेतले. या पंडितांचे नेतृत्व उपरोक्त दस्तूर मेहेरजी राणा (१५१० ते १५९१) ह्यांनी केले. अकबराच्या धार्मिक न्यायसभेत या पारशी पंडिताने १५७८ मध्ये मोलाचे सहकार्य केले व तो १५७९ मध्ये नवसारीला परतला. या पारशी सुपुत्राच्या मोलाच्या सेवेबद्दल त्याला अकबराने २०० बिघे जमीन दानपत्राने दिली. १५७९ पासून अकबराने पारशी धर्माच्या सूर्य व अग्निपूजा ह्यांचा जाहीररीत्या अंगीकार केला.

इ.स.१५८२ मध्ये १४ सुट्ट्यांसह झोरोस्ट्रिअन पंचांग सुरू झाले. मुंबई वसली त्याच्या कितीतरी अगोदरपासून सुरत हे व्यापाराचे नामांकित शहर व मोठे बंदर होते. तेथे अरब, फ्रेंच, पोर्तुगीज वलंदोजांच्या व इंग्रजांच्या मोठमोठ्या वखारी होत्या. तिथले लोकही कसलेले कारागीर होते. सुरतेचे वैभव व ऐश्वर्यच तिच्या ऐतिहासिक लुटीला कारण झाले होते. भौगोलिक स्थितीमुळे पुढे मुंबई हे सुरतेपेक्षा सोईचे व सुरक्षित बंदर म्हणून झपाट्याने विकसित झालेले दिसते. कच्छ, काठेवाड, गुजरात हा मुंबई प्रांताचाच भाग होता. इतकेच नव्हे, तर सिंध, कराची हेसुद्धा मुंबई प्रांतात समाविष्ट होते. पारशी लोकांमध्ये काही श्रेष्ठ गुण पूर्वापार होते. अलेक्झांडर हॅमिल्टनच्या (१७१०) शब्दांत 'पारशी उत्तम सुतारकाम करणारे, जहाजबांधणीतले कसबी असून कुशल विणकर व कशिदाकारीत निपुण आहेत.' १७६४ च्या उल्लेखात कर्स्टन निबुहर म्हणतो की, पारशी लोक 'कुशल व्यापारी' व 'परिश्रमी कारागीर' आहेत. १७७० मध्ये लिहिलेल्या आठवणीत जेम्स फोर्बस नमूद करतो, 'मुंबई व सुरतेमध्ये प्रमुख व्यापारी व जहाजांचे मालक ह्यांच्यामध्ये बरेचसे पारशी आहेत. हिंदुस्थानात उत्कृष्ट सुतार व जहाज बांधणी करणारे या जमातीचे लोक असून ते अत्यंत कल्पक, दणकट, विवेकी, परिश्रमी असल्याने भारताच्या पश्चिम किनाऱ्यावर कंपनीचे ते अनिवार्य घटक बनले आहेत. जेम्स मॅकिन्टॉस ने 'उत्पीडन, गरिबी व अनेक अडचणींतून वाटचाल करीत ते (पारशी) आशियातले सर्वाधिक लोकप्रिय व्यापारी म्हणून लौकिक-प्राप्त आहेत', असे त्यांना प्रमाणपत्र दिले आहे. त्यांच्या कर्तृत्वाची नोंद महाराष्ट्राच्या इतिहासाने घेतली आहे. १७५० मध्ये मुंबईत पहिला डॉकयार्ड बांधला लवजी वाडिया यांनी. १७७६ साली मुंबईत कापडगिरणी सुरू केली दादीभाई नोशेरवानजींनी, रुस्तम कावसर्जीनी १७७७ साली मुंबईत बाजारगेटमध्ये छापखाना घातला. १७८० मध्ये पहिले पंचांग छापले गेले. १६८८-८९ मध्ये सिद्दीनी मुंबई बेटावर आक्रमण केले, तेव्हा मुंबईच्या रहिवाशांना वाचवून आपल्या शौर्याची प्रचिती दिली रुस्तम दोराब यांनी. सतराव्या शतकाच्या अखेरीला रुस्तम माणेकजी हे ईस्ट इंडिया कंपनीचे पहिले देशी ब्रोकर नेमले गेले. १६७८ च्या सुमारास इंग्रजांनी मुंबईत टाकसाळ सुरू केली, तेव्हा त्यांना शिक्के पाडण्यासाठी सुरतेच्या रतनजी या पारशी कारागिराचीच मदत घ्यावी लागली. १८०६ मध्ये शेट फ्रामजी कावसर्जीनी कंपनीची नोकरी सोडून व्यापार सुरू केला. 'सालामाजी' नावाचे जहाज विकत घेऊन चीन देशाशी व्यापार सुरू केला. त्यांनी अफाट नफा मिळवला.

इसवी सनाच्या १५ व्या शतकात नरिमन होशांग हा मनुष्य इराणमध्ये गेला. तिथे त्याला काही धर्मबांधव भेटले. हिंदुस्थानी पारशी लोकांची वार्ता कळल्यामुळे त्यांना अत्यानंद झाला. परतताना नरिमनने आपल्या धर्मातील मूळ आचारविचारांची माहिती गोळा करून आणली. भारतातील

पारशी समाजात काही मतभेद उत्पन्न झाले होते, ते नाहीसे करून तो समाज संघटित करण्यासाठी या माहितीच्या फार उपयोग झाला. धर्मनिष्ठेचा मनुष्याच्या वैयक्तिक व सामूहिक सत्प्रवृत्तींच्या व गुणांच्या उत्कर्षाला आणि उदात्त आचरणाला उपयोग होऊन मानवतेचा विकास होतो, याचे श्रेष्ठ उदाहरण म्हणून पारशी धर्मीयांच्या दानधर्म, उपक्रमशीलता, धडाडी, परिश्रम, चिकाटी, सदाचार, सहकार्य इत्यादी गुणांचा उल्लेख करणे इष्ट ठरेल.

पारशी ग्रंथ अवेस्तामधील मंत्रांचे उच्चार संस्कृत भाषेला जवळचे आहेत. पारशी समाज आर्यवंशातला मानला जातो. आपणासारखे तेही अग्नीचे उपासक आहेत. त्यांच्या विवाह संस्कारात. तसेच मुंज (व्रतबंध), उपास्य व उपासना ह्या पद्धतींत अनेक साम्यस्थळे आहेत, कारण वैदिक आर्य व इराणमधले तत्कालीन रहिवासी एकत्र होते. गृहस्थाश्रम हा एकच आश्रम ते मानतात. जातिभेद व वर्णभेद त्यांच्यात नाही. द्विरुक्तीचा दोष पत्करून आवर्जून सांगण्यासारखी गोष्ट म्हणजे सर्व धर्मांत भीक (भिक्षा) मागणे अमान्य असले, तरी आज जगात एकमेव पारशी धर्म असा आहे की, त्याचे अनुयायी या धर्माज्ञेविषयी सदैव जागरूक व क्रियाशील असल्याने कुठेही, कधी पारशी भिकारी दिसत नाही. इतर धर्मीय या बाबतीत पारशी समाजाचे व्यावहारिक अनुकरण करतील, तर मानवाची खरी प्रगती झाल्याचे ते गमक ठरेल.

भारतात ब्रिटिश सत्ता प्रस्थापित झाल्यावर पारश्यांच्या उत्कर्षाला मुबलक वाव मिळाला. या बुद्धिमान, उद्योगप्रिय व 'हुनर' असलेल्या लोकांचा ब्रिटिश अधिकाऱ्यांनी व्यापार, उद्योगधंदे, प्रशासन, न्याय, शिक्षण वगैरे अनेक क्षेत्रांत भरपूर उपयोग करून घेतला. विविध व्यवसायांत यशस्वी वाटचाल करणाऱ्या पारशी लोकांनी इंग्रजांना सागाचे लाकूड, कपडे, गाड्याघोडे, बैल, मेणे, दारू वगैरे पुरवण्याची कंत्राटे घेतली. अलोट संपत्ती मिळवली, तसाच विपुल दानधर्म केला.

सध्या मुंबईच्या ज्या भागाला खेतवाडी नाव आहे, त्याचे मूळ नाव शेतवडी किंवा शेतोडी होते. त्या ठिकाणी शेतीची जमीन होती व तेथे बारमास चिखल असे. कोठे-कोठे गरीब लोक हलक्या प्रतीचा भाजीपाला उत्पन्न करीत. त्याच शेतवडीत उद्योगी व दूरदृष्टीच्या पारशी लोकांनी पाच-पाच, सहा-सहा मजली इमले उभारले. डोसाभाई फ्रामजी कामा यांनी नागदेवी स्ट्रीटवर धर्मार्थ दवाखाना उघडला. जे.जे.हॉस्पिटल, धि बॉम्बे नेटिव डिस्पेन्सरी (कुलाबा), फोर्ट मोफत दवाखाना. ही पारशी लोकांचीच देणगी होय. पारशी लोकांनी नाट्यकला, वाचनालय, शाळा, बागा, यांचेकडे मुंबईच्या नागरी जीवनाच्या भरभराटीसाठी जाणीवपूर्वक लक्ष दिले. पारशी लोकांचे गुजराती समाजामध्ये फार प्रस्थ होते. कनवाळू पारशी कुटुंबांनी गरिबांसाठी व सामान्य नागरिकांसाठी आश्रम, पांथस्थांसाठी विहिरी बांधल्या. आपल्या अस्तित्वासाठी ज्यांना झुंजावे लागले, त्यांनी मुंबईला व महाराष्ट्राला कृतज्ञतेने भरभरून दिले. अशा काही थोर पारशी घराण्यांच्या नावांचा उल्लेख करण्याचा मोह टाळता येत नाही. बाणाजी, वाडिया, दादीशेट, कामा, पेटिट, मेहेरजी, पटेल, दावर असे किती तरी! कल्पक, कष्टाळू, धाडसी, परोपकारी, पुरोगामी व बुद्धिमान पारशी कुटुंबांनी मुंबई व महाराष्ट्रासाठी शिक्षण, आरोग्य, उजेड (गॅसबत्ती), परिवहन, व्यापार-उद्योगधंदे अशा सर्व क्षेत्रांत योगदान दिले. त्यात अनेकांच्या रोजगाराची व निर्वाहाची व्यवस्था आलीच.

इसवी सनपूर्व सातव्या शतकापासून इसवी सनाच्या एकोणिसाव्या शतकापर्यंतची पारशी समाजाची ही वाटचाल आहे. महाराष्ट्राची राजधानी मुंबई हे प्रामुख्याने पारशी समाजाच्या कर्तृत्वाचे अमीट स्मारक होय.

**संदर्भ :**


१. मराठी विश्वकोश खंड - ९
२. भारतीय संस्कृती कोश-पाचवा खंड
३. पारशी धर्म : इरवर्ड परवेझ बजान, चैत्रपालवी
४. मराठी विश्वचरित्रकोश खंड-२
५. H. D. Damkhanawala
Parsi Lustre on Indian Soil, G. Clanidge & Co. Ltd., Caxton Printing Works, Frere Road, Bombay, 1939.


* * *

# संप्रदाय



## चार्वाक दर्शन

■ डॉ. मंगला आठल्ये

**चार्वाक दर्शनात अंतिम नैतिक मूल्यांना आधार सापडत नाही कारण ते दर्शन काम ह्या पुरुषार्थाला प्राधान्य देते. परंतु, कामतत्त्वाच्या आधारे धर्म व नीती यांची उपपत्ती लावण्याचा प्रयत्न मनोविश्लेषण शास्त्राने केला आहे. नीतितत्त्वे स्वयंसिद्ध असतात. चार्वाक अनुभवनिष्ठ बुद्धिवादी ठरतात, चार्वाकांचा सुखवाद व्यक्तिनिष्ठ असून, चार्वाकदर्शन समाजदर्शन म्हणता येत नाही.**

चार्वाक-दर्शन हे जडवादी, नास्तिक व देहात्मवादी म्हणून प्राचीन काळापासून प्रसिद्ध आहे. चार्वाक तत्त्वज्ञानाचा उल्लेख काही वेळा 'लोकायत' या शब्दाने केला जातो. 'लोक' हा शब्द सामान्य लोक, त्यांची विचारसरणी, त्यांची भाषा किंवा व्यवहार या अर्थाने अनेकदा येतो. म्हणून 'लोकायत' म्हणजे बहुजनांत रूढ असलेले तत्त्वज्ञान होय. चार्वाक मताचा प्रवर्तक बृहस्पती हा देवांचा गुरू होता. दैत्यगुरू शुक्राचार्य हे संजीवनी विद्या मिळवण्यासाठी शंकराची आराधना करायला गेले असता त्यांचे रूप धारण करून बृहस्पतींनी असुरांना पुरुषार्थापासून भ्रष्ट करण्यासाठी देहात्मवादाचे तत्त्वज्ञान शिकवले, अशी आख्यायिका आहे. चार्वाक हा बृहस्पतीचा बुद्धिमान शिष्य ब्राह्मण किंवा असुर असावा, चार्वाकाच्या अनुयायांनाही 'चार्वाक' नावाने संबोधिले जाते. 'चारु+वाक् म्हणजे गोड वाणी असणारा' अशीही उपपत्ती लावली आहे.

लोकायतवादाचा उल्लेख प्राचीन कालापासून ग्रंथात आढळतो. लोकायताविषयीची अवतरणे ढोबळ इतिहासक्रमाने पुढीलप्रमाणे येतात :

बृहदारण्यक, श्वेताश्वेतर, कठ, छांदोग्य इत्यादी उपनिषदांत लोकायत मताचा अनुवाद खंडनासाठी केलेला आढळतो. पाणिनीच्या अष्टाध्यायीत या दर्शनासाठी 'उक्थादि' गणात 'उक्थ, लोकायत'.....इत्यादी शब्द आहेत. बौद्ध साहित्यात 'दीघनिकाया'च्या 'सुत्तपिटका'मध्ये विद्यास्थानांची नावे आहेत. त्यात लोकायताचा समावेश आहे. 'दीघनिकाया'त विद्वान ब्राह्मण कसा असतो, हे सांगताना तो अध्यापक, मंत्रधर, तीनही वेदपारंगत, इतिहास व व्याकरणतज्ज्ञ असतो, त्याचप्रमाणे तो लोकायतशास्त्र जाणणारा असतो, असेही म्हटले आहे. 'विनयपिटका'त काही भिक्षू लोकायताच्या आहारी गेल्याचा उल्लेख आहे. लोकायतिकवादाची उपासना करू नये, असे जातकांमध्ये म्हटले आहे.

कौटिलीय अर्थशास्त्रात सांख्य व योग यांच्या बरोबरीने लोकायताला स्थान दिले असून ह्या तिघांना मिळून 'आन्विक्षिकी' असे म्हटले आहे. ही विद्या लोकोपकारक मानली आहे. याबरोबरच कामशाला, श्लोकवार्त्तिक, न्यायमंजिरी या ग्रंथांत लोकायत मताचा स्पष्ट उल्लेख आढळतो. महाभारत व रामायण या ग्रंथांत लोकायत मताविषयी अनुकूल व प्रतिकूल टीका आढळते. याज्ञवल्क्य स्मृतीवरील मिताक्षरा टीकेत, षड्दर्शनसमुच्चय या हरिभद्राच्या ग्रंथात, बाणाच्या कादंबरीत, राजशेखराच्या काव्यमीमांसेत लोकायताचे उल्लेख आढळतात. हेमचंद्राने म्हटले आहे की, उघड नास्तिक असलेला चार्वाक परवडला परंतु वेदवचनांच्या बुरख्यातला जैमिनी हा राक्षस नको. शंकराचार्यांच्या वेदान्तात, 'चैतन्यविशिष्ट देह म्हणजे आत्मा' हे लोकायतांचे मत उद्धृत आहे. अरबी पंडित अल्बेरुनी याने लोकायताचा उल्लेख हिंदुस्थानविषयक ग्रंथांत केला आहे.

थोडक्यात, चार्वाकमताचे उपलब्ध ज्ञान अपुरे असले, तरी ते दर्शन असून, उपेक्षणीय नाही, हे सर्वांनी मान्य केले आहे. आधुनिक काळात जडवादाचे वाढलेले महत्त्व चार्वाकमताला उजाळा देते.

ज्ञानमीमांसेत प्रत्यक्षप्रमाणवाद, सत्ताशास्त्रात स्वभाववाद व देहात्मवाद, नीतिमीमांसेत सुखवाद, व अनुमानावर आधारलेल्या सर्व तत्त्वज्ञानाची व विशेषतः वैदिकांची निंदा, अशी चार्वाकांची विचारसरणी आहे.

प्रत्यक्षमेव प्रमाणम्: चार्वाक फक्त प्रत्यक्ष प्रमाण मानतात : अनुमान, शब्द, अंतःप्रेरणा इत्यादी प्रमाणे त्यांना मान्य नाहीत. त्यांच्या मते, अनुमान व्याप्तिज्ञानावर अवलंबून असल्याने ते शक्य नाही. 'व्याप्ती' म्हणजे निश्चित व संदिग्ध उपाधींनी रहित असा संबंध. व्याप्तिज्ञान प्रत्यक्ष प्रमाणाने होणे शक्य नाही. तसेच व्याप्तिज्ञान आंतरप्रत्यक्षाने होणेही शक्य नाही. कारण बाह्यविषयाचे ग्रहण करण्यास अंतःकरण स्वतंत्र नाही. अनुमानानेच व्याप्तिज्ञान होते, असे मानले तर प्रत्येक अनुमानातील व्याप्तीला आणखी एका अनुमानाची गरज लागणार. यातून अनावस्था दोष निर्माण होतो.

चार्वाकांना धूमत्व, वन्हित्व अशा सामान्यांचे अस्तित्व मान्य नाही, कारण ते प्रत्यक्ष नसून कपोलकल्पित आहे. धूम व अग्नी यांच्या साहचर्याच्या अभावाची शक्यता असते. हेतू आणि साध्य ह्यांचे अभावात्मक साहचर्य सिद्ध होत नाही. व्याप्तिज्ञानासाठी आवश्यक असणारे उपाधिज्ञान व्याप्तिज्ञानावरच अवलंबून असते. म्हणून, या ज्ञानात अन्योन्याश्रयाचा दोष आहे. अनुमानाने प्राप्त होणारे ज्ञान संभाव्य असते; त्याचा विषय अमूर्त असतो. म्हणून अनुमानप्रमाण स्वीकारता येत नाही.

चार्वाकांच्या मते, प्रत्यक्षाशिवाय इतर प्रमाणात निरुपाधिक अर्थबोध होणे फार अवघड आहे; म्हणून प्रत्यक्ष हे एकमेव शुद्ध प्रमाण आहे. अनुमान जर प्रत्यक्षाने पूर्ण होणार असेल, तर व्यवहारात उपयोगी आहे. अतींद्रिय सृष्टीचे ज्ञान अनुमानाने होणार नाही.

**स्वभाववाद**

चार्वाक फक्त प्रत्यक्ष प्रमाण मानतात त्यामुळे ते जड द्रव्याचे अस्तित्व मानतात. पृथ्वी, आप, तेज, वायू ही भुते जगाचे कारण आहेत व आकाशतत्त्व प्रत्यक्ष नसल्याने ते मानत नाहीत. पदार्थांचे भिन्न-भिन्न गुणधर्म त्यांच्या स्वभावानुसार आहेत, या सिद्धान्ताला 'स्वभाववाद' म्हटले आहे. चार्वाकांच्या मते

जडतत्त्वांच्या विशिष्ट मिश्रणाने चैतन्य निर्माण होते; तोच आत्मा होय. देहाशिवाय आत्मा नसल्याने अमरत्व, पुनर्जन्म, कर्म, पाप-पुण्य, स्वर्ग, नरक हे नाहीत. ईश्वर नाही. चार्वाक नास्तिकवादी व निरीश्वरवादी आहेत.

**भोगवाद**

चार्वाकांनी अर्थ व काम हे दोनच पुरुषार्थ मानले आहेत, अर्थ हे कामाचे साधन असून, धर्म व मोक्ष खरा नाही. स्थिर आत्मा नसल्याने वर्णाश्रमादिकांच्या क्रिया विफल आहेत. वैदिक कर्मे ही बुद्धिहीन व पौरुषहीन पुरुषांनी स्वतःच्या पोटाची खळगी भरण्यासाठी लबाडपणाने रचली आहेत. वेद हे मूर्ख, धूर्त निशाचरांनी निर्माण केले आहेत.

चार्वाकांच्या ज्ञानमीमांसेचे, देहात्मवादाचे, जडवादाचे व भोगवादाचे खंडन जवळजवळ सर्व दर्शनांनी केले आहे. ज्ञानमीमांसेचे खंडन करताना, प्रत्यक्षज्ञान तरी निरूपाधिक असते काय, हा प्रश्न निर्माण होतो. तेही सोपाधिक असल्याने, एकतर सर्वच प्रमाणे व्यर्थ ठरतात, किंवा सर्व ज्ञान हे स्वयंप्रमाण मानावे लागते. वेदान्तमतांनुसार, साक्षिज्ञान सोडून इतर कोणतेही ज्ञान शुद्ध नाही.

परिणाम दिसतो, तिथे कारण असते पण कारण असेल तिथे कार्य किंवा परिणाम असतोच असे नाही; म्हणून परिणामावरून कारणाचे ज्ञान होते, तसेच प्रत्यक्ष प्रमाणाने व्यवहार सिद्ध होत नाही, त्यासाठी अनुमान, शब्दप्रमाण यांची मदत घ्यावी लागते. इष्टानिष्टाचे ज्ञान प्रत्यक्ष नसले, तरी आवश्यक आहे. चार्वाकांनादेखील इंद्रियज्ञान प्रत्यक्ष आहे हे सिद्ध करता आलेले नाही, कारण त्यात असंगती दोष आहे. कोणत्याही वाक्याचा अर्थ प्रत्यक्ष नसतो, तो अनुमानाने जाणावा लागतो. चार्वाकाचे अनुयायी त्याचा शब्द प्रमाण मानतात. म्हणून शब्दप्रमाण अपरिहार्य ठरते.

चार्वाकांनी आकाश हे भूत मानलेले नाही, हे योग्य नाही कारण भूतत्वाचे लक्षण बाह्यगुण हे इंद्रियग्राह्य असणे हे आहे, व आकाशाचा बाह्य विशेष गुण शब्द हा आहे. भूत हे अशा तऱ्हेने अनुपमेय असते.

चार्वाकांचा देहात्मवाद आधुनिक जडवाद्यांनी मान्य केलेला आहे. परंतु चार्वाकाने दिलेली विड्याची व मद्याची उदाहरणे गैरलागू आहेत. चार्वाकांच्या मते, कात, चुना, नागवेलीची पाने एकत्र केली की या घटकांत नसलेला लाल रंग त्यांच्या चर्वणाने निर्माण होतो, तसे चैतन्य जडातून विशिष्ट मिश्रणाने निर्माण होते. परंतु, या उदाहरणात कारण व परिणाम दोन्ही जडच म्हणजे एकाच जातीची आहेत. भुते व चैतन्य एकजातीय नाहीत. तसेच आत्मा या चैतन्याला जडद्रव्य विषयभूत असते, हा सर्वांचा अनुभव असतो.

सांख्यांनी म्हटल्याप्रमाणे, भूतसंघात भोग्य पदार्थ असून, आत्मा त्याचा अधिष्ठाता आहे. शरीर विकारी आहे, आत्मा अविकृत आहे. शरीर आत्म्याच्या अधीन असते. आत्म्याच्या निरंतरत्वामुळे स्मृती शक्य होते, देहात्मवाद या सर्व बाबींचे स्पष्टीकरण देऊ शकत नाही.

चार्वाकांच्या स्वभाववादालाही मर्यादा आहेत. सृष्टीची नियमबद्धता केवळ स्वभाववादाने उलगडत नाही. मानवी समाजातील नैतिकतेला स्वभाववादाने अर्थ प्राप्त होत नाही. प्राणिमात्रांची नैसर्गिक प्रवृत्ती कामाकडे असली, तरी धर्म व मोक्ष पुरुषार्थामुळे मानवी जीवन अर्थपूर्ण बनते.

चार्वाकांच्या तत्त्वज्ञानात जीवनाची व्यवस्था लावणारे व्यापक, मूलगामी विचार नाहीत. आधुनिक भौतिकवाद्यांनी मानवी समाजात स्वातंत्र्य, समता व बंधुता या शाखांत नीतीची स्थापना आवश्यक मानली आहे. मात्र शाश्वत नीतितत्त्वांना परलोकवादाची गरज नाही, हे लक्षात घेतले पाहिजे. चार्वाकांनी शेती, गोरक्षण, व्यापार, राजनीती इत्यादी चांगल्या उपायांनीच सुख भोगावे, असे सांगितले आहे.

आधुनिक काळात डॉ. प्रदीप गोखले यांनीही चार्वाकमीमांसा करताना म्हटले आहे की, चार्वाक दर्शनात अंतिम नैतिक मूल्यांना आधार सापडत नाही कारण ते दर्शन काम ह्या पुरुषार्थाला प्राधान्य देते. परंतु, कामतत्त्वाच्या आधारे धर्म व नीती यांची उपपत्ती लावण्याचा प्रयत्न मनोविश्लेषण शास्त्राने केला आहे. नीतितत्त्वे स्वयंसिद्ध असतात. गोखले यांच्या मते,

'चार्वाक अनुभवनिष्ठ बुद्धिवादी ठरतात, चार्वाकांचा सुखवाद व्यक्तिनिष्ठ असून, चार्वाकदर्शन समाजदर्शन म्हणता येत नाही.' तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी चार्वाकसमीक्षा करताना म्हटले आहे की, 'चार्वाकांचा देहात्मवाद हेच आधुनिक जीवविज्ञानाचे मौलिक गृहीतक आहे. स्वतंत्र जीवतत्त्वाच्या त्यागानेच आधुनिक जीवविज्ञान प्रगत झाले आहे. प्रत्यक्ष प्रमाण व संभावनात्मक अनुमान हीच विज्ञानाच्या प्रगतीची गमके आहेत. चार्वाकाचा ऐहिक सुखवाद विसाव्या शतकात काळाने उजळून दाखविला आहे. त्याचा गुरू बृहस्पती हा खरोखर बृहस्पती होता, हे सिद्ध होते.

**संदर्भ :**


१. प्रा. दे. द. वाडेकर (संपादक)
तत्त्वज्ञान – महाकोश, प्रथम खंड, मराठी तत्त्वज्ञान महाकोश मंडळ, पुणे ३०. १९७४.

२. डॉ. गणेश थिटे (संपादक)
चार्वाक-समीक्षा, विश्वकर्मा साहित्यालय, २०३५/२, सदाशिव पेठ, पुणे ३०. १९७८.

३. डॉ. प्रदीप गोखले
'चार्वाक समीक्षा', संपादक डॉ. गणेश थिटे, विश्वकर्मा साहित्यालय, सदाशिव पेठ, पुणे, जून १९७८.


* * *

# संप्रदाय





नवनाथ – प्रचलित चित्र.

## नाथसंप्रदाय

■ डॉ. म. रा. जोशी

**नाथपंथ म्हणजे मत्स्येंद्र–गोरक्ष यांचाच संप्रदाय समजण्यात येतो, कारण त्याचा विस्तार सर्व भारतभर आहे. त्या मानाने हरिनाथ शाखा प्राय: विदर्भापुरतीच मर्यादित राहिली. हरिनाथ शाखा ही वेदान्ताला फार जवळची, म्हणून येथे ज्ञानमार्गाला प्राधान्य मिळाले. त्यामानाने मत्स्येंद्रशाखा वेगळी दिसते. येथे योग व तंत्रविद्या यांना प्राधान्य मिळाले. नाथसंप्रदाय शिवशक्तीचे अद्वैत मानतो. त्यामुळे हरिनाथाप्रमाणे मत्स्येंद्र–गोरक्ष शाखा महाराष्ट्राततरी वेदान्तदर्शनाशी सुसंवाद करणारी ठरली.**

नाथसंप्रदाय हा केवळ मराठी जीवन–संस्कृती व वाङ्मय यांतील एक प्रमुख संप्रदाय आहे. जवळजवळ सर्व आधुनिक भाषांच्या उगमाशी या ना त्या नात्याने नाथपंथ जोडलेला आढळतो. बंगाली, हिंदी, गुजराती, मराठी या भाषांचा उद्भव व नाथपंथीय सिद्ध हे दोनही एकमेकांजवळ आहेत. भाषा, वाङ्मयनिर्मिती व वेगवेगळे उपासना संप्रदाय हे सर्व नाथसिद्ध व नाथपंथाविषयी मुखरीत दिसत असले, तरी अखिल भारतीय सांस्कृतिक पातळीवर नाथसंप्रदायाचा इतिहास तयार झालेला नाही. हिंदी अभ्यासकांचे ग्रंथ केवळ उत्तर भारतातील नाथपंथापुरते मर्यादित आहेत. त्यांनी दक्षिण भारतातील नाथसंप्रदायाचे स्वरूप व कार्य या दोहोंकडे दुर्लक्ष केलेले आहे. तसे पाहिले तर नाथसंप्रदाय ज्या सिद्धांच्या विचारधारा मानतो, त्यांमध्ये कौलादी शैव तांत्रिक परंपरेतील सिद्ध, संख्या व कार्य या दोन्ही दृष्टींनी लक्षणीय

आहेत. शैव तांत्रिकांच्या अनेक शाखा व उपशाखा आहेत. त्यांचे उपासनामार्ग व विचारविश्व यांची दखल घेतल्याशिवाय पुढे जाता येत नाही. याशिवाय ज्या सिद्धांच्या विविध नामावली उपलब्ध होतात, त्यांची सूक्ष्म चिकित्सा करूनच सिद्ध नामावलींची उकल करणे आवश्यक ठरते. कारण या सिद्ध नामावलींत काही सिद्ध बौद्ध, वज्रयान व सहजीय या पंथांचे आहेत. यांच्या अध्ययनाने जे वेगळे प्रश्न उभे राहतात, ते कोणालाही डावलता येत नाहीत. विविध शैव संप्रदाय, त्यांच्या शाखा व उपशाखा, शैव तांत्रिक, सिद्ध, वज्रयान व सहजीय, बौद्ध व वेगवेगळी वेदान्तपर दर्शने यांचा जसजसा साधार व विश्वसनीय आलेख तयार होईल, तसतसे अनेक प्रश्न व समस्या यांची उकल होत जाईल व त्यांमधून नाथसंप्रदायाचे अखिल भारतीय सांस्कृतिक स्वरूपही स्पष्ट होत जाईल. नाथसंप्रदाय हा भारताच्या सांस्कृतिक धर्मेतिहासाचे एक विलोभनीय स्वरूप आहे.

इतर संप्रदायांप्रमाणेच नाथपंथांचा उगम ईश्वरापासून झालेला आहे. भगवान आदिनाथ शिवापासून नाथपंथ प्रकटला. येथे शिवाला आदिनाथ म्हणजे पहिला नाथ म्हटले आहे. तसे शिवापासून अनेक संप्रदाय निर्माण झाले आहेत. पाशुपत, लाकुलीश, कालमुख, नागेश, वरेश, माहेश्वर, काश्मिरी शैवादी शैवसंप्रदाय हे सारे संप्रदाय भगवान शिवापासून उद्भवले असले, तरी या सर्व शैव संप्रदायांपेक्षा नाथसंप्रदाय वेगळा आहे. येथे आदिनाथ शिव आपल्या शक्तीने युक्त असतो व असा शक्तीसह युक्त असलेला शिव हाच गुरू असतो. गोरक्षनाथ म्हणतात,''शक्तियुक्त आदिनाथ हा जगद्गुरू आहे.'' अशा आदिनाथ शिवापासून ज्ञानप्राप्ती होते. येथे आदिनाथ शिवाची दोन अंगभूत लक्षणे सांगितली आहेत. १) आदिनाथ शिव हा शक्तियुक्त आहे. २) शक्तियुक्त असलेला शिव जगद्गुरू आहे.

लक्षणीय बाब अशी की, आदिनाथ हा शक्तियुक्त आहे; असे जेव्हा गोरक्षादी नाथसिद्ध सांगतात, तेव्हा शक्ती ही शिवापासून वेगळी व भिन्न नाही किंवा येथे नाथसिद्धांना शक्तीसह शिवही अभिप्रेत नाही. शक्तीसह पदाने शिव वेगळा व शक्ती वेगळी असे द्वैत कोणत्याही नाथसिद्धाला मान्य नाही. उलट शिवशक्तीची एकरूपता, समरसताच नाथसिद्धांना अभिप्रेत असते. ज्ञानदेवांनी 'अमृतानुभव' या सिद्धग्रंथात शिवशक्तीची समरसताच वारंवार सांगितलेली आहे. गोरक्षानाथही असेच प्रतिपादन करतात.

शिवस्य अभ्यन्तरे शक्तिः शक्ते अभ्यन्तरः शिवः।
अन्तरं नैव जानीयाद् चंद्रचंद्रिकयोः इत।।

शिवशक्ती समरसता स्पष्ट करण्यासाठी अमृतानुभवाचे संपूर्ण पहिले प्रकरण ज्ञानदेवांनी खर्ची घातले आहे. शक्तियुक्त शिव व त्यांची समरसता एकमेव निरुपाधिक मूळ कारण आहे.

ऐसी इये निरुपाधिके। जगचि जिये जनके।
तिये वंदिली मियां मूळिके। देवोदेवी।।

येथे देवोदेवी पदाने परशिवाचे वर्णन करून ज्ञानदेवांनी नाथपंथातील पहिले शिवतत्त्व हे जगताचे कारण आहे, असे प्रतिपादन केले आहे. यामधील 'मूळिके' पद तर त्या शिवतत्त्वाचे प्रधान लक्षण सांगणारे आहे. हा शिव उत्पत्तिविरहित आहे व तोच मूळ वस्तू आहे. हा शिव सनातन, शाश्वत व नित्यस्वयमेव आहे. गोरक्षनाथांनीही सिद्धसिद्धान्तपद्धती ग्रंथात 'अनामास्वयम् अनादि' असे शिवतत्त्वाचे स्वरूप सांगितले आहे. येथे लक्षणीय बाब अशी की, 'देवोदेवी' पदाने ज्ञानदेवांनी शिव व शक्ती अशा दोन स्वतंत्र भिन्न तत्त्वांचा उल्लेख केला नाही किंवा स्वतंत्र शक्तीला वा प्रकृतीला उत्पन्न केले, असेही प्रतिपादन केले नाही. अनादी शिवतत्त्वच आपल्या शक्तीपासून अभिन्न आहे. शक्ती सुप्त रूपात शिवात असते. म्हणून 'मूळिके देवोदेवी' असे शिवतत्त्व आहे. चंद्र व चंद्रिका या दोहोंत जसा सकमरसभाव असतो, तोच भाव 'मूळिके देवोदेवी' पदाने ज्ञानदेवांनी सांगून आदिनाथ शक्तियुक्त असतो, असे स्पष्ट केले. हे दोघेही अनादीच आहेत.

जिये प्राणेश्वरीवीण। शिवींहि शिवपण ।
थारो नेणे जे आपण। शिवे घडिली।।

या ओवीत पुन्हा एकदा शक्तीवाचून शिवाचे शिवपण टिकू शकत नाही व जी शिवात अभिन्नपणे असते, अशा शक्तियुक्त शिवाचे वर्णन येते. यालाच नाथपंथात 'आदिनाथ' पदाने संबोधले आहे. ह्या शक्तियुक्त आदिनाथाचाच संप्रदाय म्हणजे नाथसंप्रदाय होय. याचे

रसाळ वर्णन मुकुंदराजांनी 'विवेकसिंधु' ग्रंथात केले आहे. ते म्हणतात–

परमात्मा सर्वेश्वरू। सर्वज्ञ परात्परू।
तो येकुचि आदिगुरू। सकलां जीवांचा।।
वेदशास्त्रपुराण। तेया बोले अधःपतन।
जेया नाही ज्ञान। गुरुपरंपरेचे।।
म्हणौनि शिवादि गुरुपरियंत।
जाणावे अवधूत। अमूर्त मूर्तिमंत। परब्रह्म जे।।
तिन्ही देव गुरुमूर्ति। जेया देवाचिया शक्ती।
तो देखिला स्वयंज्योती। श्रीआदिनाथु।।
तत्त्वता तु निर्विकारु। ब्रह्म हे निराकारु।
जेण्हे तुवां अधिष्ठिली साकारु। सुंदर श्रीमूर्ती हे।।
शांभवी असे तुझिया वामांगी। जे विमला तन्वंगी।
तुजसी अभिन्नभावे भोगी। शिवानंदु हे।।
तुम्ही अनादी घरतवरते। दोघे निजानंदे भरीते।
अमूर्त जालासि मूर्तिमंते। भक्तानुग्रहदोणे।।

मुकुंदराज सांगतात की, शक्तियुक्त आदिनाथ शिव चैतन्यरूप तर त्याची शक्ती चित्कला आहे. शिव हा परमानंदरूप आहे तर त्याची शक्ती स्वयंप्रकाशी अनुभूती होय.

गोरक्ष व मुकुंदराज या नाथसंप्रदायी सिद्धांनी शक्तियुक्त आदिनाथ निर्गुण परमात्मा भक्तानुग्रहार्थ आपल्या शक्तीसह प्रकट झाला असून, तोच शिव सकळ जीवांचा आदिगुरू आहे. त्यांच्या परंपरेतील ज्ञानी पुरुषांना सिद्ध म्हणतात. या सिद्धांनाच अवधूत असेही संबोधतात व नाथपंथाला अवधूतपंथ या नावानेही ओळखतात.

म्हणौनि शिवादि गुरुपरियंत। जाणावे अवधूत
अमूर्त मूर्तिमंत। परब्रह्म जे।।
तरी सांधीजेताते अवधूत। जे निजानंदे भरित
जेयांचे महिमान विख्यात। लोकत्रयी।।
आदिगुरू श्रीआदिनाथु। तेथौनि श्रीहरिनाथु।
तेयांचा शिष्य श्रीरघुनाथु। जो गुणसिंधु।।
तेयां सिद्धांचे चरित्र। सांधीजैल विचित्र।
महापातक खेद खनित्र। श्रवणमात्रे।।

मुकुंदराज (शके ११११०) व ज्ञानदेव (शके १२१२) या दोघांनी मराठीत नाथपंथांचे स्वरूप स्पष्ट केले असले, तरी या दोहोंच्यापूर्वी नाथपंथ महाराष्ट्रात कार्यरत होता, हे दोघांनीही दिलेल्या गुरुपरंपरेतून स्पष्ट होते. मुकुंदराजांनी हरिनाथ–रघुनाथ या गुरुपरंपरेतील दोन प्रमाणपुरुषांचा उल्लेख केला तर सप्तशृंगपर्वतावर नाशिकजवळ चौरंगींना मत्स्येंद्र व गोरक्ष भेटले होते, असे ज्ञानेश्वर सांगतात. तसेच जालंधरनाथांचाही उल्लेख ज्ञानदेवांनी केला आहे. हे सर्व पुरावे पाहता मुकुंदराज व ज्ञानदेव यांच्यापूर्वी नाथपंथ महाराष्ट्रात सक्रिय होता, हे स्पष्ट होते. याला आधार महानुभावीय लीळाचरित्र ग्रंथातूनही मिळतो. या ग्रंथात अनेक नाथसिद्धांच्या कथा दिलेल्या आहेत. लीळाचरित्र, विवेकसिंधु, ज्ञानेश्वरी व अमृतानुभव या ग्रंथांतील उल्लेख व विवेचन लक्षात घेता, असे स्पष्टपणे दिसून येते की, नाथपंथ शके १०००–११०० दरम्यान महाराष्ट्रात सक्रिय होता.

नाथपंथात मत्स्येंद्र, जालंधर व हरिनाथ ह्या तीन नाथसिद्धांना भगवान आदिनाथ शिवापासून ज्ञान प्राप्त झाल्याची हकिकत येते. ही घटना अनुक्रमे क्षीरसागर परिसर, जालंधरपीठ व हस्तिनापूर आणि वैनगंगातीरावरील अंबानगरी येथे घडली. यांपैकी ज्ञानदेवांनी निर्देश केलेले क्षीरसागर स्थान म्हणजे आजच्या बंगालमधील गंगासागर नावाचे प्रख्यात तीर्थक्षेत्र असावे, असे दिसते. यावरून नाथपंथाच्या उगमाचे स्थान व भौगोलिक स्थान एकच नव्हते. मत्स्येंद्र बंगालचे, जालंधर पंजाबचे व हरिनाथ विदर्भाचे होते. या तिघांनाही शक्तियुक्त आदिनाथ शिवाचाच अनुग्रह असल्यामुळे या तिघांच्याही पूर्वी तंत्रपरंपरेतील शक्तियुक्त आदिनाथ स्वरूपांचे विचार शैवसिद्धांच्या विचारकेंद्रात प्रचलित होते. या विचारकेंद्रांनीच नाथसंप्रदायाला जन्म दिलेला आहे. आदिनाथ शिवाच्या आदेशामुळेच हरिनाथ व मत्स्येंद्रनाथ यांनी नाथपंथ प्रवर्तनास प्रारंभ केला.

नाथपंथांची विदर्भातली हरिनाथांची शाखा वेदान्ती आहे. हरिनाथ व मत्स्येंद्र हे दोघे आदिनाथ शिवाचे अनुग्रहित होते. यांपैकी मत्स्येंद्र शाखा अधिक प्रसिद्ध असून ती नाथपंथाचा वैचारिक गाभा साकार करणारी शाखा आहे. या शाखेचे प्रमुख सिद्ध गोरक्षनाथ असून ते मत्स्येंद्रनाथांचे शिष्य आहेत. मत्स्येंद्र गोरक्षादी नाथसिद्धांनी गुरूचे माहात्म्य वर्णन केले आहे व ते सर्व दत्तात्रेयाला गुरू

मानतात व त्याची एकनिष्ठेने उपासना करतात. गोरक्षनाथांनी प्रथमतः नाथसिद्धांच्या विचारांना पद्धतशीर वळण देऊन त्यांचे विवेचन केले. आदिनाथाच्या विचारदर्शनाला 'सिद्धान्त' हे नाव गोरक्षांनी दिले व परमेश्वराच्या शक्तिचक्राचे विवेचन केले. शिवाशी अभिन्नरूपाने व समरसपूर्णतेने असलेली शक्ती पंचरूप आहे. यालाच नाथसिद्ध शक्तिचक्र म्हणतात. निजा, परा, अपरा, सूक्ष्मा व कुंडलिनी या पाच जणींना शक्तिचक्र म्हणतात. कुंडलिनी ही चिद्‌रूपिणी त्रिपुरादेवी आहे. तिची उपासना मत्स्येंद्र–गोरक्षांनी केली. गोरक्षांनी पद्धतशीर रितीने नीटनेटक्या पद्धतीने शास्त्राचे विवेचन केले. त्याला 'शिवशक्त्याद्वैत' नाव आहे. गोरक्षनाथांप्रमाणेच मत्स्येंद्रनाथांनीही विवेचन केले. या गुरुशिष्यांचे विवेचन व ग्रंथ पूर्वसूरींच्या विचारांवर व उपनिषदांवर आधारलेले आहे. या आधारानेच गोरक्षांनी पदपिंडसामरस्याचा सिद्धान्त सादर केला आहे. ज्ञानदेवांनीही याच सिद्धान्ताचा पुरस्कार ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायात केला आहे.

गोरक्षनाथांचा शिवशक्त्यद्वैतवाद उर्फ पदपिंड–सामरस्याचा सिद्धान्त असा :

गोरक्षांनी एकमेवाद्वितीय परब्रह्म शिवतत्त्वाचा उल्लेख करून असे प्रतिपादन केले की, वस्तुतः पिंडोत्पत्ती झालेली नाही. पारमार्थिक दृष्टीने जगत्‌जीवसृष्टी निर्माण झालेली नाही. 'न अस्ति सत्यविचारेऽस्मिन न उत्पत्तिश्चाऽपिण्डायोः' येथे विवर्त व अजातवाद वेदान्तदर्शनाप्रमाणे आला आहे. परब्रह्म नित्य, शाश्वत, अनादी व शुद्ध आहे. गोरक्षांनी शक्तिचक्र क्रमाने अनाम–अनादी परब्रह्म शिवापासून अनाद्य व परशिवपिंड उत्पन्न होतो, असे म्हटले आहे. परशिवपिंड म्हणजे शिवाशी अभिन्न असणारी शक्ती होय. या शक्तीचाच आधार पिंडाला असतो. या परशिवपिंडाची शक्ती प्रसरणशील व संकोचशील असते व तीच जगाची उत्पत्ती व जगाचा संहार करते. अशा शक्तीपासून चराचरात्मक जगत निर्माण होते. नाथपंथातील शक्तियुक्त शिवच जगताचे निमित्त व उपादान कारण आहे.

जीवात्मा व परमात्मा वेगवेगळे नसून अभिन्न आहेत, असे ज्ञान शिवाच्या शक्तीमुळे होते. ही शक्तीच कुंडलिनी नावाने प्रसिद्ध आहे. जीव व जगत शिवरूप आहे.

अनाम शिवापासून पिंडोत्पत्ती होते. पिंडाच्या उत्पत्ती, संवर्धन व लय स्थितीत स्वयं शिव मात्र अविकृत असतो. गोरक्षांनी जीव व जगताचा समावेश पिंडातच केला आहे, हे पाहिले की पिंड या संज्ञेने जीव व जगत हे दोन्ही नाथसिद्धांना अभिप्रेत असतात, हे स्पष्ट होते. जीव व जगत यांची शिवतत्त्व ही एकच सत्ता आहे. वस्तुतः जगतही शिवशक्त्यात्मक आहे. हे न जाणत जीव जगताची कल्पना अज्ञानाने करतो. परंतु जीवांचे अज्ञान नाहीसे होताच समजत गेलेले जगतही निरुपाधिक शिवशक्तीच आहे, असा अनुभव येतो. अतएव शिवशक्ती हे कारण व जगत हे कार्य आहे. वेदान्तदर्शनात यालाच विवर्तवाद म्हणतात.

ब्रह्मविद्येची उपासना व विवेचन तंत्रमतातही येते. वगैल, प्रत्यभिज्ञा व नाथ ही तंत्रप्रधानच आहेत. येथे शिवाच्या स्पंदनशक्तीचे विवेचन आढळते. या स्पंदनशक्तीने दृश्याभासाचा अनुभव येतो. गोरक्षांनीदेखील स्पंदनमात्र अपराशक्तीचा उल्लेख केला आहे. स्पंदनशक्तीनेच स्फुरण होऊन निर्मिती होते. गोरक्षांनी शिवाच्या कुंडलिनीशक्तीचे वर्णन करून स्पंदनमात्र अपराशक्तीचे वर्णन केले.

पिंडोत्पत्तीमध्ये अनाद्य, परशिव, आद्य, महासाकार, प्रकृती व गर्भ असे पिंड तयार होतात. गोरक्षनाथांनी पाच प्रकारांनी पिंडविचार केलेला आहे : १) अनाद्यपिंड, २) परशिवपिंड, ३) आद्यपिंड, ४) पिंडसंवित्ती, ५) पिंडआधार पद म्हणजे शिव. अशा प्रकारे नाथपंथात पदपिंडविचार आलेला आहे. तो सर्वस्वी अभिनव व नावीन्यपूर्ण आहे, यात शंका नाही.

नाथपंथाचे प्रवर्तन हरिनाथाप्रमाणेच मत्स्येंद्रांनीही केले. परंतु नाथपंथ म्हणजे मत्स्येंद्र–गोरक्ष यांचाच संप्रदाय समजण्यात येतो, कारण त्याचा विस्तार सर्व भारतभर आहे. त्या मानाने हरिनाथ शाखा प्रायः विदर्भापुरतीच मर्यादित राहिली. या शाखेचा थोडाफार प्रसार झाला. दुसरे असे की, हरिनाथ शाखा ही वेदान्ताला फार जवळची, म्हणून येथे ज्ञानमार्गाला प्राधान्य मिळाले. त्यामानाने मत्स्येंद्रशाखा वेगळी दिसते. येथे योग व तंत्रविद्या यांना प्राधान्य मिळाले. नाथसंप्रदाय शिवशक्तीचे अद्वैत मानतो. त्यामुळे हरिनाथाप्रमाणे मत्स्येंद्र–गोरक्ष शाखा महाराष्ट्राततरी वेदान्तदर्शनाशी सुसंवाद करणारी ठरली. तथापि या शाखेत

पदपिंडविवेकाचे महत्त्व सर्वत्र आढळते. मत्स्येंद्रांनी मात्र योग व तंत्र सातत्याने पाठपुरावा केला. मत्स्येंद्रांच्यापूर्वी वज्रयानी, शाक्त व कौल सिद्ध प्रसिद्ध होते. या सर्व सिद्धांनी तंत्र व योग यांच्या साधनेवर भर दिला होता. सिद्धांचे समूह सर्व भारतात पसरलेले होते. त्यांच्या शाखा व प्रदेश भिन्न होते. मत्स्येंद्र हे कौलमार्गातील थोर सिद्ध होते. हा संप्रदाय तंत्रप्रधान शैवसिद्धांचा होता. मत्स्येंद्र व गोरक्ष यांचा प्रसार सर्वत्र झाल्याने मत्स्येंद्रविषयक दंतकथा व आख्यायिका विपुल प्रमाणात आढळतात. त्यातून मत्स्येंद्र, मीन व लुईपा यांच्या संबंधांचा प्रश्न उपस्थित होऊन, ते तिघेही वेगवेगळे होते; हे स्पष्टपणे दिसून आले. तसेच सरहपादाचे आहे. यामधून सहजीय व वज्रयानी सिद्ध व त्यांच्या परंपरेतील याद्या तयार होऊन अनेक सिद्ध नामावल्या दिसून आल्या. या नामावलीत ८४ सिद्धांची नावे आहेत, असे समजण्यात आले. आजपर्यंत ९ प्रकारच्या सिद्धसूची उपलब्ध झालेल्या आहेत. या सर्व सूचींचा सूक्ष्म अभ्यास केल्यानंतर असे दिसून आले की, या नामावलीतील सर्वच सिद्ध केवळ एकाच परंपरेतील नाहीत. त्यामध्ये शैव, कौल, शाक्त, वज्रयानी, सहजीय, कापालीक व रसेश्वर या संप्रदायांतील सिद्धही आहेत. या वेगवेगळ्या संप्रदायांतील सिद्धपुरुषांचा वा सिद्ध व्यक्तींचा, त्यात स्त्री-सिद्धही आल्या, यांचा नाथसिद्धांशी संबंध आला असावा, असे दिसते. विशेषतः योग व तंत्र या साधनमार्गांमुळे सर्व सिद्धांची एकत्र सूची वा नामावली करण्यात आली. यांतील वज्रयानी व सहजीय हे सिद्ध बौद्ध आहेत. यांनीदेखील जैनांप्रमाणे योग व तंत्रसाधने यांचा अवलंब केलेला आहे. एकमेकांविषयीच्या आदरभावामुळे हे सर्व सिद्ध व त्यांचे उल्लेख एकाच सूचीत करण्याची पद्धत येथे दिसून येते. या नामावल्या पाहून काही अभ्यासकांनी असे अनुमान काढले की, नाथपंथांचा उगम सहजीय पंथातून झाला असावा. परंतु याचे सयुक्तिक खंडनही करण्यात आले आहे.

नाथसिद्धांविषयी बौद्धांच्या अनेक उलटसुलट कल्पना आढळतात. महानुभावीय चक्रधर आदराने सहजीय लुईपाची हकिकत देतात, पण एवढ्यावरून चक्रधर बौद्ध ठरत नाहीत. तीच बाब नाथसिद्ध व सहजीय वज्रयानी यांची आहे. दुसरे असे की, नाथसिद्ध हे वज्रयानी सहजीय होते या निष्कर्षाला कोणताही आधार नाथपंथीय ग्रंथांतून मिळत नाही. सारांश सहजीय सिद्धांहून नाथसिद्ध सर्वस्वी वेगळे आहेत. नाथपंथातील सिद्ध शक्तियुक्त आदिनाथ शिवाला मानतात. सर्व नाथसिद्ध पदपिंड सामरस्यावर आपले लक्ष केंद्रित करतात, तर सहजीय सिद्ध शून्यता व करुणा यांद्वारा चित्ताच्या समत्वावर भर देतात.

आदिनाथ परंपरेतील सिद्धांनाच नाथसिद्ध म्हणतात.

नाथसिद्धांमध्ये 'नवनाथ' प्रसिद्ध आहेत. मात्र नवनाथ म्हणजे नऊ नाथ कोणते, याबद्दल एकवाक्यता नाही. नवनाथांच्या अनेक नामावल्या आहेत. नवनाथ संकल्पना ज्ञानदेवांच्या कालापासून दिसते. नवनाथ हे सिद्ध होते; पण सर्वच सिद्ध नवनाथ नाहीत. मत्स्येंद्रगोरक्षादी पंधरा प्रमुख नाथसिद्ध यांनी नाथसंप्रदायाची उभारणी केली. या पंधरांपैकी मत्स्येंद्र, गोरक्ष, मीन, चौरंगी, चर्पटी, जालंधर, नागार्जुन, भर्तृहरी व गहिनीनाथ यांनी नाथपंथाच्या इतिहासात महत्त्वाची कामगिरी बजावलेली आहे.

उपासना, संप्रदाय व तत्त्वज्ञान या दृष्टीने मत्स्येंद्रादी सर्व नाथसिद्ध हे काश्मिरी शैवांच्या व अभिनवगुप्तांच्या प्रत्यभिज्ञा तत्त्वज्ञानाहून सर्वस्वी भिन्न व वेगळे आहेत. नाथसिद्ध पदपिंड सामरस्याचा पुरस्कार करतात, उलट अभिनवगुप्तांच्या प्रत्याभिज्ञादर्शनात शक्तियुक्त जगद्गुरू आदिनाथाची उपासना नाही. तसेच प्रत्याभिज्ञादर्शनाचे अभिनवगुप्त पदपिंड सामरस्याचे विवेचनही करीत नाहीत. किंबहुना काश्मिरी शैवदर्शन व अभिनवगुप्ताचे प्रत्यभिज्ञादर्शन हे पिंडस्थ कुंडलिनीचे उत्थापन करून शिवाशी सामरस्य घडविण्याची प्रक्रिया (जी ज्ञानदेवांनी ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायात सांगितली आहे) कोठेही सांगत नाहीत. महामहेश्वर अभिनवगुप्ताचा शैवसिद्धान्त हा गोरक्षप्रतिपादित सिद्धसिद्धान्तांहून सर्वस्वी भिन्न आहे, हे सूर्यप्रकाशाइतके स्पष्ट आहे. चिद्विलास नावाचा कोणताही सिद्धान्त नाही किंवा दर्शनही नाही. ती काहींची केवळ कल्पना आहे. नाथपंथ व ज्ञानेश्वर यांचा त्या कल्पनेशी काही एक संबंध नाही.

गोरक्ष व ज्ञानेश्वर पुरस्कृत पदपिंडसामरस्यात पुढील गोष्टींचा समावेश होतो – महायोगी नाथसिद्ध पदपिंडाचे सामरस्य साधतात. अवधूत सद्गुरू विविध सिद्धान्तांचे

समन्वय कार्य करतात. नाथसिद्ध परमेश्वराच्या निजशक्तीवर म्हणजे कुंडलिनीवर लक्ष केंद्रित करतात. श्रीगुरूच्या कृपाप्रसादाने महायोगी स्वपिंडाचे निरुत्थान करून शिवशक्तीची समरस क्रिया साधतात.

आपल्या नाथपंथीय गुरुपरंपरेचा गौरवपूर्वक उल्लेख ज्ञानेश्वरीच्या अखेरीस ज्ञानदेवांनी केलाच आहे. त्याचबरोबर नाथसिद्धविषयक महत्त्वाची माहितीही पुरविली आहे. ज्ञानेश्वरीची निर्मिती शके १२१२ मध्ये (इ. स. १२९०) झाली, हे लक्षात घेतले; तर इ. स. १२९० च्या पूर्वीचा नाथपंथाचा इतिहास उलगडू लागतो. ज्ञानदेव सांगतात की, मत्स्येंद्र-गोरक्ष हे चौरंगीनाथांना सप्तशृंगी पर्वतावर भेटले. ही एकच बाब सप्तशृंगी हे नाथपंथांचे प्रमुख स्थान होते, हे स्पष्ट करणारी आहे. तसेच येथे गहिनीनाथही होते. सप्तशृंगी व त्र्यंबकेश्वर ही नाथपंथांची प्रमुख स्थाने आहेत. याचबरोबर वैनगंगातीरावरील अंबानगरी उर्फ अंभोरे हेही नाथपंथाचे स्थान होते. येथूनच विवेकसिंधु ग्रंथ निर्माण करून मुकुंदराजांनी नाथपंथाच्या ग्रंथनिर्मितीला प्रारंभ केला. ज्ञानेश्वरी, अमृतानुभव व गोरक्षअमर संवाद हे तीन ग्रंथ नाथपंथाचेच आहेत. महानुभावीय लीळाचरित्रात काही नाथसिद्धांच्या कथा, गोरक्षपदे व चौपदी आलेल्या आहेत. पुढे महानुभाव कवी दामोदर पंडिताने चौपद्या लिहिलेल्या आढळतात. तथापि या सर्व रचनाकारांत गहिनीनाथ अग्रगण्य आहेत. त्यांनी श्रीकृष्ण नामसंकीर्तनाचा प्रसार केला आणि श्रीकृष्णभक्ती व विठ्ठलभक्ती ह्यांचे माहात्म्य सांगितले. शिव हा गुरू व श्रीकृष्ण-विठ्ठल हे उपास्यदैवत म्हणून मराठी नाथसिद्धांनी मानले. गुरू व उपास्यदैवत यांत अभेद आहे, असे सांगितले.

गहिनीनाथ, निवृत्तिनाथ, सोपानदेव व मुक्ताई यांनी स्फुट स्वरूपाची अभंगरचना केली व त्यामधून योगाच्या अनुभवाचे वर्णन केले. अशा स्वरूपाची रचना पूर्वी मराठीत नव्हती. नाथसिद्धांनी योगानुभूतीवर अभंग लिहून एक नवीन प्रकार मराठी साहित्यात रूढ केला. ज्ञानदेवांप्रमाणेच सोपानदेवांचे काही अभंग आहेत. त्यांच्या नावावर गीताटीकाही आढळते. ज्ञानेश्वरभगिनी मुक्ताई या थोर योगिनी होत्या. त्यांचीही अभंगरचना असून त्यात योगाचे अनुभव वर्णन केलेले आहेत. मुक्ताईचे शिष्य चांगदेवांचीही अभंगरचना असून चांगदेवपासष्टी त्यांच्यासाठीच निर्माण झाली. नामदेव, परसा भागवतादी नाथपंथीयांचे अनुग्रहित असलेले वारकरी संत श्रीकृष्ण-विठ्ठलभक्तीचा प्रसार करीत असतानाच ज्ञानेश्वर-सोपानदेव परंपरेतील सत्यामलनाथ, सदाशिवनाथ, मुकुंद, गणेश, शिवदिन, केसरीनाथ, लक्ष्मीनाथ, सोहिरोबा व महिपतीनाथ आदींनी वेगवेगळ्या प्रकारे रचना करून मराठी साहित्य समृद्ध व संपन्न केले. कवी दास मुकुंदाने ज्ञानेश्वरांची वाट पुसत गोरक्षनाथांच्या योगमार्तंडावर मराठीत टीका लिहिली. नाथपंथीयांनी ज्ञानदेवांच्या अमृतानुभवाला प्रामाण्य दिले. या ग्रंथावर संस्कृतमध्ये टीका लिहिणारे सहजानंद हे सोपानदेव परंपरेतील नाथपंथीय सत्पुरुष होते, तर शिवकल्याण हे मुक्ताई परंपरेतील होते. श्रीनाथ यांनी अमृतानुभवावर राष्ट्रभाष्य लिहिले. प्रथम सूत्रभाष्य कल्पून हा ग्रंथ तयार झाला आहे. तसेच ज्ञानेश्वर परंपरेतील जीवनमुक्त यतींनी पदबोधिनीटीका लिहिली. अमृतानुभवाप्रमाणे भागवत दशमस्कंधावर शिवकल्याणांची टीका आहे. गुप्तनाथ, केसरीनाथ व शिवदिन यांची स्फुट रचना आहे. सिद्धान्तसार व ज्ञानप्रदीप हे दोन ग्रंथ केसरी-शिवदिन गुरुशिष्यांनी लिहिले. केसरीनाथाचा दुसरा शिष्य नारायण याने भागवत दशम स्कंध व भगवद्गीता यांवर टीका केल्या आहेत. असेच एक नाथपंथीय सत्पुरुष सोहिरोबा आहेत. त्यांचे पुढील ग्रंथ आहेत – अक्षयबोध, पूर्णाक्षरी, अद्वयानंद, सिद्धान्तसंहिता, महदनुभवेश्वरी.

गंगानाथ या नाथपंथीयाने गोरक्षगीता हा ग्रंथ लिहिला. शिवदिनपरंपरेतील नरहरीनाथ व महिपतिनाथ या गुरुशिष्यांनी विपुल पदरचना केली आहे. नवनाथभक्तिसार हा सुप्रसिद्ध ग्रंथ लिहिणारा धुंडीराज मालु नरहरिनाथांचा शिष्य होता. नाथसिद्धांच्या चरित्रकथा सांगणारा दुसरा ग्रंथ आदिनाथभैरवाचा 'नाथलीलामृत' आहे. वारकऱ्यांप्रमाणेच नाथपंथीयांचीदेखील विपुल रचना आहे. टीका, भाष्य, चरित्र, आख्यानप्रबंध व विपुल प्रमाणात अभंगपदे हे नाथपंथीयांनी निर्माण केलेले आहे. अशा रितीने गोरक्ष-ज्ञानदेवांच्या विचारधनाचे नाथपंथीयांनी मुक्त हस्ताने वाटप केले याबद्दल कोणाचेही दुमत असू नये.

* * *





श्रीबसवेश्वर.

# वीरशैव संप्रदाय

■ डॉ. श्यामा घोणसे

**वीरशैव सिद्धान्ताचे पारिभाषिक नाव ‘शक्तिविशिष्टाद्वैत सिद्धान्त’ असे आहे. यामध्ये शिव-शक्ती समान असून माया ही स्वतंत्र शक्ती आहे. वीरशैव संप्रदाय हा भारतव्यापी संप्रदाय असल्यामुळे सांप्रदायिकांनी विविध भाषांमध्ये वाङ्मयनिर्मिती केली. परंतु उपरोक्त विशिष्ट आचारधर्मामुळे, तत्त्वसंकल्पनेमुळे सर्व प्रांतीय वीरशैवांमध्ये एकात्मता आढळते. महाराष्ट्रात एक हजार वर्षांपेक्षा जुना असलेला वीरशैव मठ आजही सुप्रतिष्ठित आहे. वीरभद्र, रेवणसिद्ध, सिद्धरामेश्वर इत्यादी वीरशैव धर्मप्रचारकांची रेणावी, विटा, येडूर, सोलापूर, शहा डोंगर इत्यादी ठिकाणची मंदिरे वीरशैवेतर भक्तांनीही गजबजलेली आढळतात.**

संख्यात्मक व गुणात्मक दृष्ट्या उल्लेखनीय असे संत-साहित्य निर्माण करणाऱ्या संप्रदायांमध्ये ‘वीरशैव संप्रदाय’ याचाही निर्देश करावा लागतो.

शैवदर्शनाची एक प्रमुख शाखा ‘वीरशैव सिद्धान्त’ आहे. त्यालाच ‘शक्तिविशिष्टाद्वैत सिद्धान्त’ असेही म्हटले जाते. सर्वसामान्य बोलीभाषेत त्याला ‘लिंगायत मत’ म्हणतात. ‘कामिक वातुला’दी अठ्ठावीस आगमांच्या उत्तर भागात वीरशैव तत्त्वदर्शन आहे. शैव दर्शनातील समन्वयात्मक तत्त्वप्रणाली म्हणून त्याला मान्यता आहे. ‘विरोधरहितं शैवं वीरशैवं विदुर्बुधाः।’ असे या तत्त्वप्रणालीचे वेगळेपण सांगतात.

अर्थात ‘सिद्धान्त शिखामणी’ हा स्वतंत्र धर्मग्रंथ, ‘पंचाचार्या’सारखे स्वतंत्र धर्मसंस्थापक, ‘षट्स्थल’ ही स्वतंत्र तत्त्वकल्पना अशा धर्मासंबंधित स्वतंत्र घटकांमुळे वीरशैव हा भारतातील प्रमुख धर्म मानला जातो. जगद्गुरू श्रीरेवणसिद्ध,

जगद्‌गुरू श्रीमारुळसिद्ध, श्रीपंडिताराध्य, जगद्‌गुरू श्रीएकोरामाराध्य आणि जगद्‌गुरू श्रीविश्वाराध्य हे वीरशैवांचे धर्मसंस्थापक असून ते ‘पंचाचार्य’ या नावाने ओळखले जातात. शिवाचे पाच गणधीश्वर प्रत्येक युगात शिवाचाराची स्थापना करतात, अशी वीरशैवांची श्रद्धा आहे. हे शिवगण म्हणजेच ‘पंचाचार्य’ होय. ‘रंभापुरी’/‘कोल्लिपाक’ किंवा ‘बाळेहोन्नुर’ (कर्नाटक), ‘उज्जैन’ (मध्य प्रदेश/कर्नाटक), ‘केदार’ (हिमाचल प्रदेश), ‘श्रीशैल्य’ (आंध्र प्रदेश), ‘वाराणसी’ (उत्तर प्रदेश) ही वीरशैवांची ‘पंचपीठे’ आहेत. पंचाचार्य हे पीठाचे मूळ पुरुष मानले जातात. या पीठांवरील जगद्‌गुरूंच्या ३२४व्या पिढीपर्यंतचे इतिहास पीठांनी जपले आहेत. या पंचपीठांच्या गादीला ‘सिंहासन’ म्हटले जाते. त्यांना विशिष्ट नावे आहेत. रंभापुरीचे ‘वीर सिंहासन’, उजैनीचे ‘सद्धर्म सिंहासन’, श्रीशैल्यचे ‘सूर्य सिंहासन’, केदारचे ‘वैराग्य सिंहासन’ आणि वाराणसीचे ‘ज्ञान सिंहासन’ या पंचपीठांचे स्वतंत्र रंगांचे ध्वज असून वीरशैवांच्या विवाहप्रसंगी धार्मिक विधींमध्ये केल्या जाणाऱ्या कलशपूजनात या ध्वजप्रतिकांना विशेष मान असतो.

महात्मा बसवेश्वर व श्रीमन्मथस्वामी हे वीरशैव धर्म-संप्रदायाचे प्रमुख प्रवक्ते, पंथ प्रचारक मानले जातात. वीरशैवांमध्ये वैदिक आणि अवैदिक परंपरेशी नाते सांगणाऱ्या, अनुक्रमे ‘पंचाचार्य’ आणि ‘विरक्त’ अशा दोन परंपरा-विचारधारा आहेत. महाराष्ट्रातली वीरशैव ‘पंचाचार्य’ ही परंपरा वैदिक परंपरेकडे अधिक झुकलेली असून, कर्नाटकातील वीरशैव विरक्त परंपरेला मानतो.

‘लिंगधारणा’ हे वीरशैवांचे प्रमुख आचारवैशिष्ट्य आहे. सद्‌गुरूंनी दीक्षापूर्वक दिलेले ‘इष्टलिंग’ सोने, चांदी, वेत, लाकूड किंवा कापड यांपासून बनविलेल्या साज्जिकेत (बेल्यामध्ये) घालून ते गळ्यात धारण केले जाते. हे इष्टलिंग शरीरापासून विलग झाल्यास क्षणात आपले प्राणत्याग करणाऱ्या अनेक भक्तांच्या कथा या धर्मसंप्रदायात प्रचलित आहेत. म्हणूनच ‘वीरशैव’ नावाची एक उपपत्ती ‘इष्टलिंगाचा’ त्याग करावा लागल्यास/झाल्यास प्राणत्याग करण्याचे वीरव्रत करणारे शिवभक्त, अशी केली जाते.

लिंगधारणेच्या जोडीला मस्तकी व सर्वांगावर भस्म धारण करणे, ‘ॐ नमः शिवाय’ किंवा ‘नमः शिवाय’ हा सांप्रदायिक मंत्र गुरुमुखातून ग्रहण करणे व तो आजन्म जपणे, ‘अष्टावरण’ व ‘पंचाचार’ ह्यांचे पालन करणे हे महत्त्वाचे आचार पाळले जातात. आचारधर्मात ‘अष्टावरण’, ‘पंचाचार’ ह्यांना विशेष महत्त्व आहे. दीक्षाग्रहण केलेल्या शिवभक्ताचे कामक्रोधादी वृत्तींपासून रक्षण करीत, शिवप्राप्तीसाठी त्याला साहाय्य करणारी तत्त्वे म्हणजे ‘अष्टावरण’. गुरू, लिंग, जंगम, विभूती, रुद्राक्ष, मंत्र, पादोदक आणि प्रसाद ही अष्टावरणे आहेत. सामाजिक आचाराविषयी वीरशैवांचे असणारे पाच महत्त्वपूर्ण नियम म्हणजे ‘पंचाचार’. ते असे आहेत- शिवाचार, लिंगाचार, सदाचार, भृत्याचार आणि गणाचार.

वीरशैव तत्त्वज्ञानाचा महत्त्वपूर्ण गाभा म्हणजे ‘षट्स्थल’ ही संकल्पना होय. योग आणि भक्ती यांचा सुरेख मेळ या कल्पनेत घातलेला आहे. वीरशैवांच्या ‘सिद्धान्त शिखामणी’ या धर्मग्रंथात या कल्पनेचे सूक्ष्म व प्रदीर्घ विवेचन आहे. जिवाचा शिवाकडे होणारा सहा टप्प्यांवरील प्रवास म्हणजे ‘षट्स्थल’. ‘स्थल’ हा परशिवब्रह्मवाचक शब्द असून, त्याचे ‘अंग’ (जीव) व ‘लिंग’ (शिव) असे दोन भेद होतात. या दोन भेदांच्या -उपास्य व उपासकाच्या- योगाने षट्स्थल साधना केली जाते. वीरशैव कल्पनेनुसार ‘परशिव’ हा निर्गुण आद्यांतररहित सर्वशक्तिमान असून ‘शंकर’ हे त्याचे सगुण रूप आहे. या परशिवाचा अंश म्हणजे जीव. जिवाने शिवाशी एकरूप होणे म्हणजे ‘लिंगांगसामरस्य’ साधणे. त्यासाठी जिवाला ज्या सहा अवस्था पार पाडाव्या लागतात, ते षट्स्थल होय. ‘भक्तिस्थल’, ‘महेश्वरस्थल’, ‘प्रसादीस्थल’, ‘प्राणलिंगीस्थल’, ‘शरणस्थल’ आणि ‘ऐक्यस्थल’ ही सहा स्थले/अवस्था पायऱ्या आहेत. वीरशैव सिद्धान्ताचे पारिभाषिक नाव ‘शक्तिविशिष्टाद्वैत सिद्धान्त’ असे आहे. यामध्ये शिव-शक्ती समान असून माया ही स्वतंत्र शक्ती आहे. वीरशैव संप्रदाय हा भारतव्यापी संप्रदाय असल्यामुळे सांप्रदायिकांनी विविध भाषांमध्ये वाङ्मयनिर्मिती केली. परंतु उपरोक्त विशिष्ट आचारधर्मामुळे, तत्त्वसंकल्पनेमुळे सर्व प्रांतीय वीरशैवांमध्ये एकात्मता आढळते.

## वीरशैव आणि महाराष्ट्र यांचा अनुबंध

महाराष्ट्रात एक हजार वर्षांपेक्षा जुना असलेला वीरशैव मठ आजही सुप्रतिष्ठित आहे. वीरभद्र, रेवणसिद्ध, सिद्धरामेश्वर इत्यादी वीरशैव धर्मप्रचारकांची रेणावी, विटा, येडूर, सोलापूर, शहा डोंगर इत्यादी ठिकाणची मंदिरे वीरशैवेतर भक्तांनीही गजबजलेली आढळतात. 'पालकरिकी सोमनाथ' या बाराव्या शतकातील प्रसिद्ध तेलगू कवीच्या 'श्रीपंडित चरित्र' ग्रंथात श्रीशैल्याला आलेल्या मराठी यात्रेकरूंचे वर्णन आहे. नवीन अभ्यास-पुराव्यांच्या आधारे, हे यात्रेकरू महाराष्ट्रीय वीरशैव असल्याचे मांडता येते. त्याशिवाय या ग्रंथाधारे श्रीशैल्य-महाराष्ट्राचा, विशेषतः शिखर-शिंगणापूर आणि तुकोबारायांचा श्रीशैल्य आणि शिवरायांचा अंतरंग-संबंध स्पष्ट करता येतो. तसेच आळंदी व पंढरपूर ही आजची वारकरी श्रद्धाक्षेत्रे मुळात शिवक्षेत्रे असल्याचे दिसते. या मूळ शैवक्षेत्रांचे वैष्णवपीठात होणारे रूपांतर सांगणारा काव्यग्रंथ म्हणजे 'पुंडलिक आख्यान' पंढरपूरच्या आसपासचा परिसरही शैवभक्तीने आणि वीरशैव धर्मप्रचारकांच्या वास्तव्याने भारलेला दिसतो.

यादव राजवटीतही वीरशैवांना मानाचे स्थान असल्याचे महादेव यादवाचा महाप्रधान 'देवराज', रामदेवाचा सेनापती 'चाऊंडराज' हे वीरशैवानुयायी, त्यांच्या हाती असलेला व्यापार, अनेक शिवालयांचे पुजारी म्हणून जंगमांना यादवपूर्वकाळापासून मिळालेल्या आणि आजही त्यांच्याकडे असणाऱ्या वतनी जमिनी इत्यादींचा उल्लेख पाहता, महाराष्ट्र आणि वीरशैव ह्यांचे उत्कट नाते अधोरेखित करता येते.

## मराठी वीरशैव वाङ्मयातील दोन परंपरा

**अ) खेचर विसा परंपरा :** खेचर विसा यांच्या 'शडुस्छळि' या यादवकालीन ग्रंथाद्वारे वीरशैव तत्त्वविचारांचे मराठीतून प्रथमतः विवरण झाल्याचे आढळते. ईश्वरनिष्ठांच्या मांदियाळीत सहभागी होणे, तत्कालीन पथभ्रष्टांना वीरशैव सिद्धान्त सुगमपणे समजावून सांगणे आणि समन्वयात्मक वीरशैव तत्त्वज्ञानाधारे मूळची मराठी समन्वयशील विचारधारा विस्तृत करणे या त्रिसूत्रीतून 'खेचर विसा परंपरा' निर्माण झाली.

ग्रंथनामापासूनच वीरशैव षट्स्थल तत्त्वज्ञानाचे आणि इष्टलिंग, शिवाची 'पंचकृत्ये', शिवयोगी वर्णन इत्यादी वीरशैव संबंधित तत्त्वकल्पनांचे विवरण करणारा हा ग्रंथ आहे.

**आ) मन्मथ परंपरा** : बदलत्या कालतत्त्वानुसार दुसरी 'मन्मथ' परंपरा उदयाला आली. यादवकाळानंतर वीरशैवांची बदललेली स्थिती, मुस्लीम आक्रमणांचे अन्य समाजाप्रमाणे वीरशैवांवरही झालेले परिणाम, वीरशैवाचार्य, मठाधिपती आणि वीरशैव ह्यांच्यातील कमी झालेले संवाद, प्रभावी नेतृत्वाचा अभाव आणि सर्वांत महत्त्वाचे एकनाथांनी पुनरुज्जीवित केलेल्या वारकरी संप्रदायाकडे वीरशैव धर्मबांधवांचा वाढणारा ओढा अशा अनेकानेक घटनांमध्ये मन्मथ परंपरेची बीजे लपलेली आहेत.

काळाचे आव्हान पेलण्यासाठी शांतलिंगस्वामी आणि मन्मथस्वामी यांनी मराठीतून पुन्हा एकदा वीरशैव तत्त्वज्ञानाचे विवरण केले. अर्थात शांतलिंगस्वामींकडे वीरशैव मराठी वाङ्मयाचे जनकत्व दिलेले असले, तरी त्यांचे धर्मकार्य त्यांच्या वीरशैवेतर शिष्यांमुळे फारसे अधोरेखित झाले नाही. पांडित्यपूर्ण शैलीमुळेही शांतलिंग जनसामान्य बांधवांपासून दूर केले असावेत. मन्मथस्वामींनी ओवी छंदाप्रमाणेच अभंगवाणीचा स्वीकार केला. शिवपीठांची निर्मिती केली. खास वीरशैवी घाट असलेली कीर्तनपद्धती विकसित केली. भांबावलेल्या धर्मबांधवांना स्पष्टपणे, सुबोधपणे मार्गदर्शन करणारा 'परमरहस्य' हा टीकाग्रंथ लिहिला. सर्वांत महत्त्वाचे म्हणजे वाङ्मयप्रेमी, स्वधर्मजागर करणाऱ्या सर्जनशील वीरशैव शिष्यांची परंपरा निर्माण केली. त्यामुळे मन्मथस्वामी, पर्यायाने त्यांचे वाङ्मय मराठी वीरशैव वाङ्मयाचे कळस ठरले. अर्थात ही वाट चोखाळताना मन्मथ परंपरेचा एक धागा खेचर विसा परंपरेशी निगडित राहिला.

वीरशैव हा गुरुमार्गी धर्मसंप्रदाय. त्यांच्यात गुरू आणि जंगम विलक्षण पूज्य. त्यांच्या शब्दांना शिववाणीचे पावित्र्य. हे जणू लक्षात घेऊन शिवलिंग-मन्मथांनी मोलाची कामगिरी बजावली. श्रीशांतलिंगस्वामी हे उज्जैन पीठाचे, तर

श्रीमन्मथस्वामी रंभापुरी पीठाचे मठाधीश/आचार्य होते. परिणामतः त्यांचे अनुकरण व अनुसरण करणारी साहित्यिकांची मांदियाळी मराठी वीरशैव वाङ्‌मयात निर्माण झाली.

**मराठी वीरशैव साहित्य**

**अ) वीरशैव आणि ग्रंथवाङ्‌मय :** संख्यात्मक-गुणात्मकदृष्ट्या महत्त्वाच्या असणाऱ्या समग्र वीरशैव साहित्याचा स्थूल परिचयही येथे करून देणे अवघड आहे. चाळीसच्या आसपास ओवीग्रंथ असलेल्या या वाङ्‌मयात 'शडुस्छळि', 'सिद्धान्त शिखामणी', 'विवेक चिंतामणी', 'परमरहस्य' आणि 'लीलाविश्वंभर' या ग्रंथपंचकाला विशेष महत्त्व आहे.

उपलब्ध ग्रंथ आणि ग्रंथकार पुढीलप्रमाणे :

'सिद्धान्त शिखामणी'– **शिवयोगी शिवाचार्य**, 'शडुस्छळि'– **खेचर विसा**, 'विवेक चिंतामणी', 'करणहसुगे' आणि 'शांतबोध'– **शांतलिंगस्वामी**, 'श्रीगुरुगीता', 'अनुभवानंद', 'स्वयंप्रकाश', 'ज्ञानबोध' आणि 'श्रीपरमरहस्य'– **श्रीमन्मथस्वामी**, 'निजात्मसार'– **गणेश देवांग**, 'सिद्धान्तसार'– (कवी **अनाम** आहे), 'शिवानंदबोध' **'बसवलिंग'**, 'बसवपुराण', 'सिद्धेश्वर पुराण' किंवा 'सिद्धेश्वर माहात्म्य'– **'शिवदास'** पलसिद्ध माहात्म्य किंवा सिद्धेश्वर महात्म्य– **लक्ष्मणमहाराज**, 'लीलाविश्वंभर'–**ब्रह्मदास**, 'श्रीपलसिद्ध महाराज चरित्र'–**श्रीकृष्ण बाळापूरकर**, 'ब्रह्मांडपुराण– **विश्वनाथ**, 'शिवागम'– **नागेशदास**, 'वीरशैवधर्मनिर्णयटीका', 'अष्टावरण टीका', 'शिवागमोक्तसार', 'सत्यसंधान आख्यान', 'सानंद आख्यान' आणि 'केदार-माहात्म्य' **सयात्मज**, 'गुरुमाहात्म्य'– **विरूपाक्ष देशिकेंद्र**, 'लिंगानंद बोध'– **दास शिवभक्त**, 'वीरशैवलीलामृत'– **गुरुदास/शिवात्मज**, 'प्रभुलिंगलीला', 'सिद्धेश्वरपुराण', 'शिवरहस्य', 'बसवेश्वराख्यान'– **पंचाक्षरी स्वामी/नानाची पेंटय्या**, 'हावगीस्वामी पुराण' – **बसवलिंग हणेगावकर**, 'बसवपुराण'– **शंभु तुकाराम**, 'वीरशैव तत्त्वसारामृत'– **ना. रा. विभूते**.

या सर्व ग्रंथांचे काही विशेष सांगता येतात :

❋शांतीलिंगस्वामींच्या 'विवेकचिंतामणी' या ग्रंथाचे स्वरूप ज्ञानकोशासारखे असून त्यामध्ये वीरशैव तत्त्वविवरण आढळते.

❋मन्मथस्वामी हे या परंपरेतील महत्त्वाचे ग्रंथकार आहेत. वीरशैव तत्त्वविचारांचे, आचार पद्धतीचे मराठीतून विवरण करणारा पहिला संप्रदायमान्य ग्रंथ म्हणजे 'परमरहस्य'. मन्मथस्वामींच्या वाङ्‌मयीन मूर्तीचे, त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे सारे विशेष 'परमरहस्य'मधून प्रकटतात. 'स्वयंप्रकाश' हा ग्रंथ 'विवेकसिंधू'चे सुबोध रूप असून, 'ज्ञानबोध'मधून मन्मथस्वामी जीवात्म्याचा शिवत्वाकडे होणारा प्रवास सूचित करतात.

❋शांतलिंग-मन्मथस्वामींपासून प्रेरणा घेतलेले मराठी वीरशैव ग्रंथकार, या उभयतांप्रमाणेच आपल्या ग्रंथातून वीरशैव तत्त्वज्ञानाबरोबरच अद्वैताचेही विवरण करतात.

❋मन्मथांच्या ग्रंथावर ज्ञानेश्वरीच्या शैलीचा, तर उत्तरकालीन ग्रंथकारांवर 'ज्ञानेश्वरी' व 'परमरहस्य'ह्यांचा प्रभाव जाणवतो.

❋महात्मा बसवेश्वरांच्या क्रांतिकारक विचारसरणीचे अनुसरण करणे मराठी वीरशैवांना जमले नसले, तरी वीरशैव ग्रंथकारांनी आपल्या साहित्यरचनांमधून बसवेश्वराबद्दल आदरभाव व्यक्त केला आहे. म्हणूनच बसवेश्वरविषयक चरित्रग्रंथ अधिक आढळतात. त्याप्रमाणे सिद्धराम, अल्लमप्रभू हेदेखील या ग्रंथकारांचे आदरविषय बनलेले आहेत.

❋अल्लमप्रभूंनी नामदेवांप्रमाणेच आपल्या संघटनकौशल्याने आणि निरहंकार मनोवृत्तीने, वीरशैव धर्मप्रचार-प्रसाराचे कार्य करून लोकमान्यता मिळविली. म्हणून 'लीलाविश्वंभर', 'प्रभुलिंगलीला' ह्यांमधून त्यांचा गौरव केलेला दिसतो.

❋वीरशैव सिद्धान्ताची प्राचीनता, समन्वयशीलता आणि वैदिकता दर्शविणारा 'श्रीसिद्धान्त शिखामणी' हा प्रमुख धर्मग्रंथ संस्कृतमध्ये आहे. मराठी व अन्य भाषांमध्ये त्याचा अनुवाद झालेला असून, त्यावरील अनेक टीकाग्रंथ उपलब्ध आहेत. या ग्रंथाचा प्रमुख 'शडुस्छळि', 'परमरहस्य' आणि वीरशैव अभंगवाणीवर आढळतो.

**आ) मराठी वीरशैव अभंगवाणी :** वीरशैव अभंगवाणी ही तत्कालीन परिस्थितीची, विधायक वाङ्मयीन प्रतिक्रिया आहे, असे म्हटले तर वावगे होणार नाही. प्रतिकूल परिस्थितीत सर्वसामान्य मराठी वीरशैवांना पुन्हा एकदा संप्रदायाकडे वळविण्यासाठी मन्मथस्वामींनी अभंगवाणीचा स्वीकार जाणीवपूर्वक केला. या अभंगवाणीला शिव–वर्णनापासून आचारविचारांपर्यंत 'श्रीसिद्धान्त शिखामणी'ची बैठक आहे. वीरशैव संतकवींनी अभंगांद्वारा वीरशैवांच्या धर्मश्रद्धेला तत्त्वचिंतनाची व चित्तशुद्धीची जोड दिली. हे अभंग कसदार असून संवेदनक्षमता, मार्मिक समाजनिरीक्षण, पाखंडखंडन आणि समन्वयशील मनोवृत्ती हे त्यांचे गुणविशेष आहेत. या अभंगवाणीने तुकारामांसारखे शब्दप्रभूही मोहित झालेले दिसतात. स्वधर्मनिष्ठा, अष्टावरण, पंचाचाराचे महत्त्व, पूर्वसूरींबद्दलचा व संतांबद्दलचा आदरभाव व्यक्त करणारी वाणी शिवाचे श्रेष्ठत्व पुनःपुन्हा सांगते. पन्नासावर अभंगकार असणाऱ्या या वाङ्मयात भावंडीबाई ही एकमेव संतकवयित्री आढळते. गुणात्मक आणि संख्यात्मक दृष्ट्या वीरशैव अभंगवाणी संपन्न असून आजही हा वाङ्मयप्रकार वाहता आहे.

**इ) मराठी वीरशैवांची हिंदी रचना :** वीरशैवांचे भारतभर विखुरलेले मठ; त्यांची उत्तरस्थित काशी, उज्जैन, केदार ही त्रिपीठे; तेथील समाजाशी एकरूप झालेले विद्वान; ज्ञानोपासक पीठाचार्य, तसेच मराठवाड्याच्या दखखनीहिंदी परंपरेत वाढलेले मन्मथादी वीरशैव संत यांमुळे वीरशैवांनी हिंदीमध्ये रचना केली. या संदर्भात लक्ष्मणमहाराज आणि महादेव प्रभू यांचा उल्लेख विशेषत्वाने करावा लागतो. त्यांच्या रचनेतून जातिभेदाचा, श्रेष्ठ–कनिष्ठतेचा केलेला निषेध उल्लेखनीय आहे. त्यांच्या लेखी शिवत्व मानणारे व ते नाकारणारे अशा दोनच जाती असतात. जातीच्या चौकटीत बद्ध न होणाऱ्या या संतांना राम–अल्ला, शिव–कृष्ण, मक्का–काशी यांत एकत्व अनुभवता येते.

उत्तरकालीन साहित्यिकांनीही हिंदी अनुवादरचना, ग्रंथरचना, काव्यरचना करून वीरशैवांचे हिंदी दालन समृद्ध केले. या अन्य हिंदी रचनेचा केंद्रबिंदू महात्मा बसवेश्वर आहेत.

## मराठी वीरशैव साहित्याची वाङ्मयीन वैशिष्ट्ये

अभंग–ओवी या पारंपरिक छंदांचा वापर करणाऱ्या आणि टीकाग्रंथ, चरित्रग्रंथ, अनुवादग्रंथ, स्फुटरचना, स्वतंत्र ग्रंथरचना करणाऱ्या या साहित्यात शैलीभूत भाषाविशेष असल्याने भाषाशास्त्रीयदृष्ट्या त्यात फारसे बदल आढळत नाहीत. मात्र या वाङ्मयात खास वीरशैवी वाङ्मयविशेष दिसतात.

या वाङ्मयाच्या निर्मितीच्या संदर्भात वीरशैवांची मठसंस्कृती महत्त्वाची ठरते. त्यामुळेच शक्तिविशिष्टाद्वैत तत्त्वज्ञानाचा, अष्टावरण–पंचाचाराचा आग्रह सर्वत्र राहिल्यामुळेच अभिव्यक्तीत फरक पडूनही एकसंध मराठी वीरशैव वाङ्मय साकार होते. स्मरणीयता, सांगीतिकता, सुभाषितमयता आणि सूत्रात्मकता, संवादात्मकता, व्यक्तीप्रसंग, स्थल इत्यादींचे माहात्म्य सांगणारी वर्णनात्मकता, ठसठशीत व्यक्तिचित्रणात्मकता आणि त्यामागे असणारी मनोविश्लेषणात्मकता हे या वाङ्मयाचे विशेष आहेत. आपले विवेचन सुगम व प्रभावी करण्यासाठी हे वाङ्मयकार विविध कथांचा मुक्तपणे वापर करतात. व्यामिश्रता हे तर या वाङ्मयाचे प्रधान वैशिष्ट्य आहे.

## वीरशैव वाङ्मयाचे मराठीतील योगदान

भक्तिरसातून आविष्कृत झालेल्या मराठी वीरशैव वाङ्मयाने शांतिरसाची जोडणी केली. ग्रंथारंभापासून संवादाच्या माध्यमातून वेधक प्रश्न निर्माण करीत आणि त्यांची चतुराईने उत्तरे देत, हे ग्रंथकार क्लिष्ट तत्त्वज्ञान लोकांपर्यंत पोचवतात. मन्मथांसारखे ग्रंथकार, 'गुरुगीता' या पहिल्याच ग्रंथातून, गुरुकृपेचे सामर्थ्य, ते पेलणारी आपली योग्यता अचूकपणे मांडतात. गुरुकृपा वर्णन करताना शब्दसामर्थ्य अपुरे पडते, हे सांगून आपणास कसे लेखनसामर्थ्य मिळावे, त्याची अपेक्षा मन्मथ आपल्या सद्गुरूंकडे व्यक्त करताना म्हणतात,

*'जेथे वाचा मुरडली मनासहित।*
*जे आनीर्वाच्य न ये ध्यानात।*
*ते वस्तु कळे सांगता बोलत। तैसे बोल देई।।*

*जे ज्ञानासी झेपवेना। अनुभवासी आगवेना।*
*ते चमत्कार कळे वचना। माझी तैसा वरु दीजे।।*
*(गुरू.२७-२८)*

पहिल्याच ग्रंथात सद्गुरूंकडे असे अनोखे मागणे मागण्याचे धैर्य दाखवून मन्मथ साऱ्याच नवोदित ग्रंथकारांचे आत्मभान जागृत करतात. या आत्मशक्तीचा प्रभाव पुढे समर्थ रामदासांच्या विवेचनशैलीवर, विचारपद्धतीवर पडल्याचे दिसते. आपले विवेचन प्रभावी व्हावे म्हणून टप्पाटप्प्यात विशिष्ट वाक्यांच्या पुनरावृत्ती-सारणीचा अवलंब, मन्मथांनी रामदासांपूर्वीच आपल्या ज्ञानबोध व परमरहस्य या ग्रंथांत केलेला आहे.

वीरशैवांजवळ साहित्यरचना निवडीचाही विवेक जाणवतो. या दृष्टीने ज्ञानकोशसदृश्य रचना असणारा 'विवेकचिंतामणी' आणि 'विवेकसिंधू'वरील टीकाग्रंथ 'स्वयंप्रकाश' हे ग्रंथ उल्लेखनीय ठरतात. विशेषतः विवेकसिंधूतील मूळचा क्लिष्ट वाटणारा तपशील, योगशास्त्रीय संकल्पना यांना भाष्यकार म्हणून मन्मथांनी सुबोध केले.

वीरशैव साहित्यकारांनी कन्नड व संस्कृत या भाषांतील (शिवभक्तांच्या) पुराणकथांचे संपूर्ण मराठीकरण करून मराठी लघुकथा-बीजांना खतपाणी घातले.

समग्र वीरशैव वाङ्मयाने आपल्या साहित्यात कुठेही स्त्रीबद्दल अनुदार उद्गारही काढला नाही. ज्या मराठी संप्रदायांनी स्त्रीला आपल्या मांदियाळीत सामावून घेतले, त्या संप्रदायांतील सत्पुरुषांनी स्त्री ही मोक्षमार्गातील अडचण आहे, हा परंपरागत दृष्टिकोन स्वीकारीत, एकूण स्त्रीजातीबद्दल प्रसंगी अनुदार उद्गार काढले त्या पार्श्वभूमीवर मराठी वीरशैव साहित्यातून दिसणारे स्वतंत्र, ज्ञानोत्सुक स्त्रियांचे ठसठशीत चित्रण, या साहित्याची नवताच प्रकट करते. आजच्या ज्ञानोत्सुक स्त्रीचा हा आरंभबिंदू आहे, असे म्हटले तर वावगे होणार नाही. स्त्रीच्या आत्मसन्मानाबरोबरच मानवी भावभावनांची बूजही या साहित्याने राखली. म्हणूनच त्यांचे चरित्रनायक अवतार धारण केलेल्या विभूती असल्या, तरी 'माणूस' म्हणून त्यांच्या भावना रंगविताना हे साहित्यकार मागे पडले नाहीत.

या तत्त्वज्ञानाधिष्ठित वाङ्मयाने षटस्थल, अष्टावरण, पंचाचार इत्यादी पारिभाषिक संज्ञा, मराठीला बहाल करीत तिच्या पारिभाषिक कोशात मोलाची भर घातली.

सद्यःस्थितीत या वाङ्मयाची मोलाची कामगिरी म्हणजे आजच्या प्रांतीय विभाजनाच्या काळात महाराष्ट्र आणि कर्नाटक, महाराष्ट्र आणि आंध्र यांच्यातील नाते; या वाङ्मयाने दृढ केले आणि महाराष्ट्रीय संप्रदायांची भारतव्यापकता सिद्ध केली.

**संदर्भ :**


१. ढेरे डॉ. रा. चिं.
'श्रीशैल आणि शिखरशिंगणापूर क्षेत्रसाम्यावर नवा प्रकाश', पूर्वार्ध, संतकृपा, फेब्रुवारी १९९३, पृष्ठ २१.

२. बेडेकर निनाद
'शिव-शक्ती', रविवार सकाळ, पुणे, २४ ऑक्टोबर १९९३, पृष्ठ ८.

३. धनपलवार डॉ. माणिक
'वैष्णवांच्या पंढरीची शैव परंपरा', हैद्राबाद, १९८७, पृष्ठ ३८-३९.


* * *





श्रीचक्रधरस्वामी - प्रचलित चित्र.

# महानुभाव संप्रदाय

■ डॉ. अविनाश आवळगावकर

**महानुभावांचे साहित्य विपुल व वैविध्यपूर्ण आहे. मध्ययुगीन मराठी साहित्यात इतकी विपुलता व विविधता कोणत्याही धर्मसंप्रदायाच्या साहित्यात नाही. साधारणतः पंधराव्या-सोळाव्या शतकापर्यंत महानुभावांच्या साहित्यनिर्मितीत सातत्य दिसून येते. पुढील काळातील साहित्यात वाङ्‌मयीन गुणवत्ता आणि तत्त्वज्ञानाचा दर्जा टिकून राहिला नाही. ती काहीशी स्फुट स्वरूपाचीच अधिक असल्याचे दिसून येते. परंतु असे असले, तरी मध्ययुगीन कालखंडातील महानुभावांची ही साहित्यनिर्मिती सर्वच दृष्टींनी मराठी साहित्याचा आदर्शबिंदू ठरली.**

यादवांच्या राजवटीखाली नांदणाऱ्या इसवी सनाच्या तेराव्या शतकातील महाराष्ट्रात अनेक धर्मसंप्रदाय अस्तित्वात होते. त्या धर्मांमध्ये आणि संप्रदायांमध्ये तात्त्विकदृष्ट्या कोणतेच मतैक्य नव्हते. त्यामुळे महाराष्ट्रातील जाणकारांपासून तो सामान्य माणसापर्यंत आपला नेमका धर्म कोणता, हे समजायला कोणताही मार्ग नव्हता. जो-तो परंपरेने चालत आलेल्या आपापल्या संप्रदायातील व्रताचरण अज्ञानाने का होईना परंतु निष्ठेने करीत होता. यज्ञयागादी कल्पना, क्षुद्र देवतांचे नवससायास, यात्रा-जत्रांचे वाढलेले प्रस्थ आणि व्रतवैकल्यांचा सुळसुळाट या गोष्टींमुळे बौद्ध, जैन, नाथ, लिंगायत इत्यादी अनेक संप्रदायांनी आपापल्या वेगळ्या चुली थाटल्या होत्या. या काळातील महाराष्ट्राच्या समाजव्यवस्थेचा विचार केला, तर ती धर्माधिष्ठित होती, असे म्हणण्यापेक्षा ती रूढी-परंपरेला अधिक चिकटून होती, येवढेच

म्हणता येईल. अंधश्रद्धा वाढीस लागल्याने सामान्य माणसाला खऱ्या धर्माचा नेमका हेतू समजत नव्हता.

या पार्श्वभूमीवर याच काळात म्हणजे बाराव्या शतकाच्या उत्तरार्धात मराठी भाषेला ज्ञानभाषेचे स्थान देणारा, ज्ञान आणि भक्ती ह्यांची सांगड घालून एकेश्वरी भक्तीचा पुरस्कार करणारा, सामाजिक विषमता नाकारून सर्वांनाच मोक्षाचा अधिकार देणारा महानुभाव संप्रदाय उदयाला आला. पंथाचे संस्थापक श्रीचक्रधरस्वामी यांचे शके ११४२ मध्ये (इसवी सन १२२०च्या सुमारास) महाराष्ट्रात आगमन झाले आणि त्यांनी रिद्धपूर येथे जाऊन महानुभावांचे चतुर्थकृष्ण श्रीगोविंदप्रभूंचे दर्शन घेतले. त्यांच्याकडून त्यांनी परावरशक्तीचा स्वीकार केला आणि तेव्हापासूनच महानुभाव पंथ उदयास आला. खरे तर हा परमार्ग. पर म्हणजे परमेश्वराचे ज्ञान देणारा मार्ग. त्यानंतरच्या काळात हा महात्मा पंथ, अच्युत पंथ, भटमार्ग, जयकृष्णी पंथ म्हणून ओळखला जाऊ लागला आणि पुढे महानुभाव संप्रदाय म्हणून सुपरिचित झाला.

### महानुभाव तत्त्वज्ञान

महानुभाव संप्रदाय हा विचारप्रामाण्य मानणारा संप्रदाय आहे. म्हणूनच 'ज्ञानापसि प्रेम उत्तम' (सूत्रपाल–विचार–३०) असे म्हणून या संप्रदायाने ज्ञानाशिवाय भक्तीला महत्त्व प्राप्त होत नसल्याची जाणीव सातत्याने करून दिली आहे. 'ज्ञानमोचक' असे श्रीचक्रधरस्वामींचे सूत्रच आहे. (सूत्रपाठ– विचार–१) ज्ञानाशिवाय मोक्षप्राप्ती होत नाही, म्हणून या संप्रदायाने ज्ञानाला अधिक महत्त्व दिले आहे.

महानुभावाचे सबंध तत्त्वज्ञान हे जीव, देवता, प्रपंच आणि परमेश्वर या चार पदार्थांवर आधारित आहे. हे चारही पदार्थ नित्य आणि स्वतंत्र असे आहेत. यांतील प्रपंच या पदार्थाचे कारणप्रपंच व कार्यप्रपंच असे दोन भाग असून त्यांतील कार्यप्रपंच हा अनित्य असून कारणप्रपंच हा नित्य आहे. हे पदार्थ जसे आहेत, तसे जाणणे म्हणजे ज्ञान होय. यांपैकी प्रपंच हा जड आहे, देवता नित्यबद्ध आहेत, परमेश्वर नित्यमुक्त आहे, तर जीव बद्धमुक्त आहे. देवता नित्यबद्ध असल्या, तरी त्यांच्या ठिकाणी ज्ञान, सुख, सामर्थ्य, ऐश्वर्य आणि प्रकाश हे धर्म असतात. त्यामुळे त्या नित्यबद्ध असूनही स्वसामर्थ्याने युक्त आहेत. त्यामुळे देवतांना मोक्षप्राप्ती होऊ शकत नाही. महानुभाव तत्त्वज्ञानात देवतांची संख्या ८१ कोटी सव्वालक्ष दहा इतकी सांगितली असून ती नऊ थोव्यांत (विभागात) पुढीलप्रमाणे विभागलेली आहे– १) कर्मभूमीच्या १३ कोटी, २) अष्टौदेवयोनीच्या १३ कोटी, ३) अंतराळीच्या १३ कोटी, ४) स्वर्गीच्या ३३ कोटी, ५) सत्य–कैलास–वैकुंठीच्या ९ कोटी, ६) क्षीराब्धीच्या सव्वालक्ष, ७) अष्टभैरव ८, ८) विश्व १, ९) माया १. वरील नऊ थोव्यांत उच्चनीचक्रम आहे. कर्मभूमीच्या देवतांचा थोवा सर्वांत खाली असून माया देवतेचा थोवा सर्वोच्च आहे. हाच उच्चनीचक्रम प्रत्येक थोव्यातील देवतांतही आहे. फक्त सत्य–कैलास–वैकुंठ व अष्टभैरव ह्या थोव्यांतील देवतांमध्ये असा उच्चनीचभाव नाही. या सर्व देवतास्वरूपांत व्याप्यव्यापक भाव असल्याने वरील देवतास्वरूप खालील देवतास्वरूपाला व्यापून असते. माया ही सर्वोच्च देवता असल्याने ती सर्वांना व्यापून राहते.

अधीनत्व, अज्ञान आणि अविद्या या तीन अनादिसिद्ध बंधांनी देवतास्वरूपे नित्यासी बांधलेली असल्यामुळे देवतांना मोक्षप्राप्तीचा संबंध येत नाही. नित्यबद्ध असल्याने त्यांचा विकास वा संकोच होत नाही. देवता जीवांना त्यांच्या कर्माची फळे देतात. अर्थात ही फळे कर्मरहाटीच्या संबंधापुरतीच मर्यादित असतात. दैवरहाटीची फळे ईश्वरविषयक असल्याने त्यांच्याशी देवतांचा संबंध येत नाही. देवतांकडून मिळणारी फळे ही सुखदुःखात्मक स्वरूपाची असतात. शिवाय देवता आधी दुःखभोग व नंतर सुखभोग असा क्रम ठेवतात. जिवाचे जेवढे अर्जित असेल, तेवढेच देण्याचा त्यांचा स्वरूपधर्म आहे. गाय जशी पान्हा चोरते त्याप्रमाणे देवता आपल्या फळाचा आनंद जिवांना अवंचकत्वाने उपभोगू देत नाहीत. देवतांचे फळ च्युतिमंत आहे. पुण्याचा साठा संपला की त्या जिवाला पुन्हा पूर्वपदावर यावे लागते. देवताचक्राची मुख्य असलेल्या मायेचे फळदेखील च्युतिमंतच आहे. एकूणच देवताफळे क्षुद्र, नश्वर व वंचकत्वाने मिळणारी असल्याने अच्युतपदप्राप्ती देणाऱ्या ईश्वराच्या तुलनेने ती अत्यंत हीन असतात.

**ज्ञानदाता परमेश्वर**

परमेश्वर हा निरपेक्ष आहे. त्याच्या ठिकाणी 'दया, मया, कृपा, करुणा' हे गुण आहेत. परमेश्वराचे मुख्य कार्य म्हणजे जिवांचा उद्‌धार करणे होय. अनंत असलेले जीव अनादी व नित्य आहेत. अनादिकालापासून अविद्यायुक्त असलेल्या जिवाच्या ठिकाणी विकार, विकल्प व स्वभाव हे तीन दोष आहेत. असा जीव बद्ध असला, तरी तो मुक्त होऊ शकतो. 'अर्जकत्व' आणि 'सर्वाधिकारित्व' त्याच्या ठिकाणी असल्यामुळे तो ईश्वराच्या प्रेमाला पात्र होऊ शकतो. त्यासाठी जिवाच्या ठिकाणी असणारी अविद्या नासवावी लागते. अविद्येचा नाश ज्ञानाशिवाय होत नाही. त्यासाठी त्याला परमेश्वराचे ज्ञान होणे आवश्यक आहे. अर्थात परमेश्वर हा देवताचक्राच्या वर असल्याने त्याचे ज्ञान कोणतीही देवता देऊ शकत नाही. त्यासाठी प्रत्यक्ष परमेश्वरालाच आपले ज्ञान द्यावे लागते. 'सृष्टीमध्ये कव्हणें करणें मूंचिजेना एकें परमेश्वरेंविणः' (सूत्रपाठ– पूर्वी) या सूत्राप्रमाणे जिवाचा उद्धार फक्त परमेश्वरच करू शकतो आणि उद्धारासाठी अविद्यानाश करणे आवश्यक आहे. त्यासाठी सृष्टिरचना करावी लागते. सृष्टिरचनेची प्रवृत्ती होताच परमेश्वर ती मायेला जाणवितो. त्याबरोबर माया सृष्टीची रचना करते.

मायेच्या तमातून मनुष्यदेहात येणाऱ्या जिवाला परमेश्वर ज्ञानदान करतो. अर्थात त्यासाठी परमेश्वरालाही मनुष्यदेह धारण करून कर्मभूमीत अवतरावे लागते. 'सृष्टीमध्ये परमेश्वरु अवतरेतिः मनुष्यवेषधारीए होतिः' (सूत्रपाठ : उद्धरण) असे श्रीचक्रधरस्वामींचे वचन आहे. कारण त्याशिवाय परमेश्वर जिवांना ज्ञान देऊ शकणार नाही आणि ज्ञानाशिवाय मुक्ती नाही. परमेश्वर तीन प्रकारांनी अवतार धारण करीत असतो. १) गर्भीचा अवतार– म्हणजे सृष्टिनियमानुसार मातेच्या उदरी जन्म घेणे. २) दवडण्याचा अवतार – म्हणजे मातेच्या उदरात वाढत असलेल्या गर्भाला दवडून म्हणजेच घालवून त्या ठिकाणी परमेश्वर जन्म घेतो. ३) पतिताचा अवतार–म्हणजे एखाद्या मृत शरीरात प्रवेश करून तो देह उठवणे. श्रीचक्रधरस्वामींचा अवतार हा पतिताचा अवतार होय.

ज्ञानदाता केवळ परमेश्वरच आहे. निरामय, निराकार असलेला परमेश्वर दयाळू, कृपाळू आहे. जिवाच्या उद्धारासाठी तो अवतार धारण करतो. महानुभावांनी श्रीकृष्ण चक्रवर्ती, श्रीदत्तात्रेयप्रभू, श्रीचांगदेव राऊळ (श्रीचक्रपाणी), श्रीगोविंदप्रभू (श्रीगुंडम राऊळ), आणि श्रीचक्रधरस्वामी हे पाच कृष्णावतार (परमेश्वरावतार) सांगितले आहेत. 'कृष्ण' हा ज्ञानवाचक असल्याने पंचावतारांना 'कृष्ण' असे म्हटले आहे. 'कृपावशे सावेवो साकारू होए : अवतरे : आपलें सन्निधान देः तें दास्यमोचकः॥'' (सूत्रपाठ– पूर्वी) या सूत्राप्रमाणे परमेश्वर जिवाला आपले सन्निधान देतो.

शक्तिस्वीकाराच्या दृष्टीने परमेश्वरावताराचे तीन मुख्य प्रकार दिसून येतात. १) परदृश्यावतार (उदाहरणार्थ श्रीगोविंदप्रभू), २) अवरदृश्यावतार (उदाहरणार्थ श्रीचांगदेव राऊळ), ३) परावरदृश्यावतार (उदाहरणार्थ श्रीदत्तात्रेयप्रभू, श्रीकृष्ण आणि श्रीचक्रधरस्वामी). या तिसऱ्या प्रकारच्या अवताराला उभयदृश्यावतार असेही म्हणतात. त्या–त्या अवताराने स्वीकारलेल्या शक्तीनुसार त्या–त्या अवताराचे कार्य असते. उभयदृश्यावतार मात्र पर आणि अवर या दोन्हींचेही ज्ञान देतो. जीव, देवता, प्रपंच आणि परमेश्वर या चारही पदार्थांचे ज्ञान परमेश्वर करून देतो किंवा देववितो. त्याचा प्रत्यक्ष अनुभव आल्यानंतरच त्याला जीव आणि परमेश्वर यांतील फरक समजू शकतो. परमेश्वराने सांगितलेल्या ज्ञानमार्गाचा अवलंब करून त्याने 'एथ अधीनु होईजे: एथौनि भणितले कीजे ते अनुसरण' (सूत्रपाठ– आचार–२८३) या सूत्राप्रमाणे सर्वसंगपरित्याग करून परमेश्वराची भक्ती करावी, आचारधर्माचे पालन करावे. अशा ज्ञानी भक्ताला परमेश्वर शब्दज्ञान, अपरोक्षाला, सामान्यज्ञान व विशेषज्ञान देतो. त्यानंतरच त्याला मोक्षप्राप्ती होते.

मोक्षप्राप्ती म्हणजे ईश्वराच्या स्वरूपाचा आनंद उपभोगणे होय. महानुभाव तत्त्वज्ञान द्वैतवादी असल्याने या तत्त्वज्ञानाप्रमाणे जीव, देवता, प्रपंच आणि परमेश्वर या चारही पदार्थांमध्ये ऐक्य होणे शक्य नाही. हे चारही पदार्थ अनादी असून ते पूर्णतः स्वतंत्र आहेत. द्वैत म्हणजे दोन. ईश्वर आणि जीव हे परस्परांपासून पूर्णतः भिन्न आहेत. मोक्षप्राप्ती झाल्यावर जीव ईश्वराच्या आनंदात विलीन होतो, परंतु तो ईश्वर होत नाही. ईश्वरस्वरूपाचा आनंद तो भेदभावाने

उपभोगतो. तेथेही त्याचे स्वतंत्र अस्तित्व टिकून राहते. जीव आणि ईश्वर हे महानुभाव तत्त्वज्ञानाप्रमाणे पूर्णतः स्वतंत्र आहेत. किंबहुना या भिन्नत्वामुळेच जीव ईश्वराचा आनंद उत्तम रितीने उपभोगू शकतो. एकदा ईश्वराच्या आनंदाला प्राप्त झालेला जीव त्यापासून कधीही च्युत होत नाही.

देवताभक्तीपासून असा निरामय आनंद प्राप्त होत नाही. तो काही विशिष्ट काळापुरताच असल्याने पुन्हा जिवाला पूर्वपदावर यावे लागते. म्हणून महानुभाव तत्त्वज्ञानात देवताभक्ती नाकारली आहे. याचा अर्थ महानुभावांनी देवताशक्ती नाकारली असे नाही किंवा देवताभक्तीला हीन लेखले असेही नाही. श्रीचक्रधरस्वामींनी तर इतर देवीदेवतांचा उल्लेख अतिशय सन्मानपूर्वक केलेला आहे, आणि आपल्या भक्तांनाही तशी ताकीद दिली आहे. ''वैरियाचा देवो जाला तरि काइ दगडे फोडावा?'' श्रीचक्रधरांनी आपल्या भक्तांना विचारलेला हा प्रश्न याचेच द्योतक आहे. देवताच नव्हे तर देवताभक्तांचा अवमान केल्याबद्दल आपल्या भक्तांवर त्यांनी नाराजी व्यक्त केल्याची उदाहरणे लीळाचरित्रात आढळून येतात.

## महानुभावांचा आचारधर्म

कोणत्याही संप्रदायाच्या दोन महत्त्वाच्या बाजू विचार आणि आचार ह्या असतात. संप्रदायाच्या विचारांचे म्हणजेच तत्त्वज्ञानाचे प्रात्यक्षिक हे आचारातून दिसून येते. आचाराशिवाय विचारांचे महत्त्व स्पष्ट होत नाही. ज्ञान ही मोक्षाची पहिली पायरी आहे, तर भक्ती वा अनुसरण ही त्याची दुसरी पायरी होय. महानुभाव तत्त्वज्ञानानुसार ज्ञानप्राप्तीनंतर सर्वसंगपरित्याग करून परमेश्वराच्या अधीन होणे म्हणजे अनुसरण होय. सर्वसंगपरित्याग म्हणजे 'असतीपरी' होय. श्रीचक्रधरस्वामींनी सूत्रपाठात 'असतीपरी' नावाचे एक प्रकरणच सांगितले आहे. ते असे – ''विकार विकल्प शून्य:।।१।। स्वभावमात्रे:।।२।। निरालंबी:।।३।। देवतास्मरणे:।।४।। जो जन्मक्षेपी:।।५।। तेयासी परमेश्वरु पुनरपि आपुला संबंध देती :।।६।।'' म्हणजे विकार, विकल्पशून्य होऊन आपल्या अष्टविध स्वभावावर नियंत्रण ठेवून परमेश्वरावाचून इतर कोणावरही अवलंबून न राहता, त्याचे स्मरण करीत जो आपले आयुष्य घालवितो, त्याला परमेश्वर आपली प्राप्ती घडवितो. 'असतीपरी'च्या या सूत्रामध्ये महानुभावांच्या आचारधर्माचे सार एकवटले आहे.

इंद्रियाच्या धर्मामुळे जिवाच्या ठिकाणी विकार निर्माण होत असतात. या विकारांचा नाश करण्याचे मुख्य साधन म्हणजे वैराग्य, त्यासाठी 'स्वदेशसंबंधु त्याज्य: स्वग्रामसंबंधु त्याज्य: संबंधियांचा संबंधु तो विशेषतां त्याज्य:' (सूत्रपाठ–आचार १) हे सूत्र फार महत्त्वाचे आहे. अर्थात ते अनुसरण करणाऱ्या जिवांसाठी. देश, ग्राम, जाती, नातेवाईक या सर्वांचा त्याग केल्याशिवाय तुम्ही परमेश्वराच्या भक्तीत रममाण होऊ शकत नाही. वैराग्य हेसुद्धा मिरवणारे नको. कारण जिवाला वैराग्य मिरवायला आवडते. विषयत्याग हा महत्त्वाचा त्याग आहे. वरील सूत्रांत या सर्वांचाच त्याग येतो. ''पुरुषु जेतुलजेतुली विषयसेवा करी तेतुलतेतुला धर्मी निबळु जाए:'' (सूत्रपाठ–आचार–७) विषयवासनेच्या जास्त आहारी गेलेला जीव आपोआपच धर्मापासून दूर जातो. म्हणून स्त्रीसंबंध वर्ज्य मानलेला आहे. ''स्त्री म्हणिजे मतद्रव्यांचा रावो गा: आणिके द्रव्यें सेविलिया माजवीति: स्त्री दर्शनमात्रेंचि माजवी'' (सूत्रपाठ–आचार–९) असे स्वामींनी सांगितले आहे. हे वास्तव सत्य आहे. काही अभ्यासकांनी याचा चुकीचा अर्थ लावून महानुभवांनी स्त्रियांना कमी लेखले, असा अपप्रचार केला. उलट स्त्रीच्या ठिकाणी असलेल्या सामर्थ्याची जाणीव स्वामींनी करून दिली. विश्वामित्राची तपश्चर्या मेनकेच्या दर्शनाबरोबरच विरघळून गेली, हा इतिहास सर्वश्रुत आहे. अशी कितीतरी उदाहरणे आपल्याला शोधता येतील. समाजाचे आजचे वास्तवही यापेक्षा काही वेगळे नाही. याचा अर्थ हाच की, स्त्रीच्या ठिकाणी हे सामर्थ्य आहे आणि पुरुष त्यामुळे आकर्षित होऊ शकतो. पर्यायाने तो धर्मापासून दूर जातो.

या संदर्भात 'दृष्टान्तपाठा'तील 'कठियाचा दृष्टान्त' फार महत्त्वाचा आहे. कठिया म्हणजे पुजारी. देवीच्या मंदिरात अहोरात्र पूजा करणारा. एके दिवशी त्याला गावात जेवणाचे निमंत्रण मिळते. आग्रहाने जेवण होते. अधिक जेवण झाल्याने थोडे जाड्यत्व येते. तो मंदिरात झोपतो. झोपेत पिंडीला पाय लागतो. चूक झाल्याचे लक्षात येते. परंतु

'माझी माउली माझी एवढी चूक पदरात घालणार नाही का?' असे म्हणून तो पुन्हा झोपतो. हळूहळू चुका वाढत जातात. एके दिवशी एक स्त्री मंदिरात येऊन पुजाऱ्याला विचारते की, 'मी येथे राहून देवाची पूजा करू का?' पुजारी परवानगी देतो. हळूहळू स्नेह वाढत जातो. पुढे स्नेहाचे रूपांतर लग्नात आणि पर्यायाने संसारात होते. मुले-बाळे होतात आणि देवाकडे दुर्लक्ष होते. शेवटी गावातील लोक पुजाऱ्याला मंदिर सोडून जायला लावतात.

'चित्राची स्त्री न पाहावी' (सूत्रपाठ-आचार-१०) असेही श्रीचक्रधरस्वामींनी सांगितले आहे. चित्रातील स्त्रीसुद्धा पाहू नये. चित्र हे अधिक आकर्षक असते आणि त्यामुळे विकारवासना वाढीला लागू शकतात. उपरोक्त सूत्र काही पाठांत 'चित्रीचीही स्त्री न पाहावी' असेही आले आहे. याचा अर्थ प्रत्यक्षातील स्त्रीबरोबरच चित्रातील स्त्रीसुद्धा पाहू नये. एखादी चूकसुद्धा आपल्याला धर्मापासून कशी दूर नेऊ शकते, याचे 'कठियाचा दृष्टान्त' हे उत्तम उदाहरण ठरते. अर्थात महानुभावांनी स्त्रियांना कोठेही कमी लेखले नाही. उलट 'तुम्ही ते जीव आणि स्त्रियांची काय जिउली?' असे म्हणून श्रीचक्रधरस्वामींनी आपल्या शिष्यांना खडसावले आहे. त्यांनी स्त्री-स्वातंत्र्याचा व स्त्रीच्या शक्तीचा सत्कारच केला आहे. स्त्री-पुरुष समानतेचा त्यांनी मांडलेला विचार म्हणजे सामाजिक परिवर्तनाचा एक मुख्य प्रवाह म्हणावा लागेल. समाजातील विटाळ-चांडाळाच्या कल्पनांनाही श्रीचक्रधरस्वामींनी छेद दिला. शरीराची सर्व इंद्रिये शरीरातून घाण बाहेर टाकत असतातच, याची जाणीव करून देत स्वामींनी स्त्रियांनाही पुरुषांबरोबरच धर्माचा अधिकार असल्याची जाणीव करून दिली. परंतु महानुभावांची स्त्रीविषयक भूमिका अभ्यासकांनी नीट लक्षात न घेतल्याने त्यातून चुकीचा प्रसार होत गेला. खरे तर आजच्या स्त्रीवादी विचारप्रणालीचे बीज हे महानुभावांच्या या विचारसरणीतच दडलेले आहे.

### चातुर्वर्ण्य समानता

'या मार्गासि श्रीदत्तात्रेयप्रभू आदिकारण' (सूत्रपाठ-विचार-२८५) म्हणजे या पंथाचे आद्यप्रवर्तक श्रीदत्तात्रेयप्रभू होत, असे श्रीचक्रधरस्वामींनी सांगितले असले; तरी उभयदृश्यावतार असलेले श्रीचक्रधरस्वामी हेच खरे पंथप्रवर्तक मानले जातात. जिवाच्या उद्धारासाठी त्यांनी ब्रह्मज्ञान सांगितले. सर्व जीव समान आहेत, याची जाणीव करून दिली. एवढेच नव्हे तर महाराष्ट्रात सर्वप्रथम चातुर्वर्ण्य व्यवस्थेला विरोध केला तो श्रीचक्रधरस्वामींनीच. ब्राह्मणत्व सर्वाधमत्व असल्याची जाणीव त्यांनी भक्तांना करून दिली. त्याचबरोबर 'महारवाडाहुनि धर्मु काढावा' (सूत्रपाठ-आचार-१५०) म्हणजे धर्माचा प्रारंभ महारवाड्यापासून करण्यात यावा, ही भूमिका मांडली. 'चातुर्वर्ण्य चरेत् भैक्ष्यम्:' (सूत्रपाठ-आचार-८१) म्हणून चारही वर्ण समान मानावेत. चारही वर्णांच्या घरी जाऊन भिक्षा मागावी. एवढेच नव्हे तर 'घर न निवडीत भिक्षा की जे' (सूत्रपाठ-आचार-८२) म्हणजे कोणत्या जातिधर्माचा विकल्पच मनात येणार नाही. स्वतः श्रीचक्रधरस्वामींनी चांभाराच्या हातचा लाडू घेऊन आपल्या भक्तांना प्रसाद म्हणून वाटला होता. चतुर्थ कृष्णावतार असलेले श्रीगोविंदप्रभू हे तर दीनदलितांचे, अनाथ स्त्रियांचे माहेर होते. 'राउळ मातंगा महाराचां घरोघरी विचरताति : आणि तैसेचि दीक्षिता ब्राह्मणाचां घरी विचरताति:' त्यामुळे त्यांनी भ्रष्टाभ्रष्ट केले, असा श्रीगोविंदप्रभूंवर गावच्या महाजनांनी आरोप केला होता. (श्रीगोविंदप्रभूचरित्र- ४७). पण तरीही श्रीगोविंदप्रभू महारमातंगांच्या घरातच वावरत होते. 'राउळो : आम्ही पाणियेवीण मरत असो : तरि काइ करूं जी?' असे त्यांनी कळवळून म्हटल्यावर श्रीगोविंदप्रभूंना अनुकंपा उपजे आणि मग ते आपल्या दैवी शक्तीने त्यांच्यासाठी अमर्याद पाणी निर्माण करीत. मग महारमातंग म्हणायचे 'राउळ माय राउळ बापु राउळाचेनि प्रसादे आम्ही पाणी पीत असो :'' (श्रीगोविंदप्रभु चरित्र-४८) एकूणच चातुर्वर्ण्य व्यवस्था नाकारून महानुभाव संप्रदायाने समाजाला समानतेचा महान मंत्र दिला आहे.

'.....तुम्हां परस्परे परमप्रिति होआवी की' (सूत्रपाठ-आचार-१३६) ही महत्त्वाची जाणीव महानुभाव संप्रदायाने समाजात निर्माण करण्याचा प्रयत्न केला. मानवेतर प्राण्यांसाठीही त्यांची हीच भावना आहे. म्हणून 'मुक्तिचि चाड तेणे मुंगिए विरु न चिंतावे' (सूत्रपाठ-आचार-६०,६५) अशी जाणीव श्रीचक्रधरस्वामींनी करून दिली

आहे. याचा अर्थ कोणत्याही प्राणिमात्रांची हिंसा होणार नाही, याची काळजी घ्यायला सांगितले. ही खरी मानवतावादी भूमिका आहे. यासंदर्भात लीळाचरित्रातील 'ससीकरक्षण' (ली.क्र.४२) ही लीळा अभ्यासकांनी मुळातून पाहावी अशी आहे. अहिंसावाद हा मानवतावादाचा पाया आहे.

आचार आणि विचार यांत सुसंगती असलेले तत्त्वज्ञान महानुभाव पंथाने मांडले. महानुभावांनी चातुर्वर्ण्यव्यवस्था नाकारून सर्वांना धर्माचा अधिकार दिला असला, तरी प्रारंभीच्या काळात याकडे आकर्षित झाला तो पंडितवर्गच. कोणत्याही नव्या शास्त्राची मांडणी समाजोन्मुख व्हावी, असे वाटत असेल तर, ती शास्त्रप्रवीण पंडितांनी स्वीकृत करायला हवी. पंडितवर्ग हा वेदोपनिषदांचा अभ्यासक असल्याने, ज्ञानी असल्याने ते शास्त्रचर्चा करू शकतात. नव्या शास्त्राचे महत्त्वही समाजाला सांगू शकतात. स्वामींच्या तत्त्वज्ञानाकडे तत्कालीन ब्राह्मण पंडितवर्ग आकर्षित झाला.

## वेदांपलीकडे

मुख्य म्हणजे महानुभाव वेदविरोधी नव्हते. प्रत्यक्षात महानुभावांनी वेदांची मोक्षप्रमाणता स्वीकारली नाही. मोक्ष ही वस्तुस्थिती त्यांनी द्वैतदर्शनाद्वारे पटवून दिली. म्हणूनच वेदशास्त्रसंपन्न पंडितवर्ग हा महानुभाव तत्त्वज्ञानाकडे आकर्षित झाला. महानुभावांचे पहिले आचार्य श्रीनागदेवाचार्य, म्हाइंभट, केशिराज व्यास, दामोदर पंडित, भास्करभट्ट बोरीकर, कवी नरेन्द्र इत्यादी सर्व पंडित हे वेदशास्त्रसंपन्न होते. महानुभाव पंथाचे तत्त्वज्ञान सर्व शास्त्रांहून वेगळे व मोक्षाचा मार्ग दाखविणारे आहे, हे त्यांनी ओळखले, म्हणूनच त्यांनी महानुभाव पंथाचा स्वीकार केला. वेदांचे ज्ञानही श्रीचक्रधरस्वामींजवळ होते. दादोस उर्फ रामदेवास त्यांनी वेदांचेच ज्ञान दिले होते. आमच्याजवळ ब्रह्मविद्या आहे, ती आम्हांला विचारावी, असे सांगूनही रामदेवाने ती नाकारली आणि आम्हांला विद्यामार्गच निरूपावा म्हणून आग्रह धरला. 'मग गोसावी विद्यामार्ग निरूपिला.' (ली.क्र,उत्त.४९१) श्रीचक्रधरस्वामींजवळ सर्व शास्त्रांचे ज्ञान होते, म्हणूनच ते म्हणतात, ''सकळहि शास्त्रें या शास्त्रासि मिळेती परि हे कव्हणाही न मिळे'' (सूत्रपाठ– विचार–१५१) म्हणजे इतरत्र असणाऱ्या सर्व शास्त्रांचे ज्ञान माझ्याजवळ आहे. परंतु माझ्याजवळील ब्रह्मविद्या इतरत्र कोठेही मिळणार नाही. हीच ब्रह्मविद्या त्यांनी नागदेवाचार्यादी भक्तांना दिली. 'सूत्रपाठ' हा ग्रंथ म्हणजे महानुभवांच्या या ब्रह्मविद्या तत्त्वज्ञानाचाच ग्रंथ होय. त्यामुळे महानुभाव हे वेदविरोधी होते की वेद स्वीकारणारे होते, हा प्रश्नच निरर्थक आहे. वेदांतील उणिवा त्यांनी दाखवून दिल्या आणि वेदांच्या पुढचे तत्त्वज्ञान त्यांनी सांगितले. अभ्यासकांनी हे नेमकेपणाने लक्षात घेतले नाही.

## साहित्यनिर्मितीची प्रेरणा

महानुभावपंथातही स्मरणभक्तीला खूप महत्त्व आहे. अर्थात हे स्मरण म्हणजे, 'हे देखिले तैसे आठविजे' (सूत्रपाठ–आचार–२७) या सूत्रानुसारच. महनुभावांच्या साहित्यनिर्मितीला हे सूत्रच प्रेरणास्थान ठरले आहे. स्वामींच्या लीळा बांधू का, असे म्हाइंभटांनी आचार्य नागदेवांना विचारले; त्यामागे हीच भूमिका होती. ज्यांनी स्वामींना पाहिले नाही, त्यांना देव कसा आठवता येईल, या प्रश्नाने म्हाइंभटांना स्वामींच्या लीळा बांधण्याची कल्पना सुचली. आचार्यांनी त्यांना परवानगी दिल्यावर त्यांनी स्वामींच्या लीळा लिहून काढल्या. आचार्य नागदेवांनी प्रत्येक लीळा तपासून दिली. आवश्यक तेथे दुरुस्ती सुचविली.

परमेश्वराच्या चरित्रात कोणत्याही प्रकारचे असत्य लिहिले जाता कामा नये, या जाणिवेतून प्रत्येक लीळा तपासली गेली. अशा प्रकारे संशोधनाची शिस्त लावूनच 'लीळाचरित्र' हा मराठीतील आद्य गद्यग्रंथ निर्माण झाला. त्यानंतर लीळाचरित्राचा आदर्श मानूनच 'श्रीगोविंदप्रभूचरित्र' व इतर चरित्रग्रंथांची निर्मिती झाली.

'लीळाचरित्र' ग्रंथ हा मराठी भाषेतील, सर्वच दृष्टींनी एक आदर्श ग्रंथ ठरला. श्रीचक्रधरस्वामींच्या विलोभनीय व्यक्तिमत्त्वाचे दर्शन तर त्यातून घडतेच, परंतु यादवकालीन जीवनाचे सांस्कृतिक आकलन करण्यासही या ग्रंथाइतका आदर्श ग्रंथ दुसरा नाही, तत्त्वज्ञान, इतिहास, राज्यशास्त्र, व्यापारशास्त्र, भूगोल, कला, काव्य, नाट्य, संगीत,

साहित्यशास्त्र या सर्वांचेच उत्तम दर्शन लीळाचरित्रातून होते. 'लीळाचरित्र' हा ग्रंथ महानुभावाच्या इतर साहित्यग्रंथांची जननी ठरला. पुढे केशिराज व्यास या पंडिताने लीळाचरित्रातील सूत्रे एकत्र करून 'सूत्रपाठ' ग्रंथाची निर्मिती केली. त्याचप्रमाणे सूत्राच्या स्पष्टीकरणार्थ स्वामींनी सांगितलेले दृष्टान्त वेगळे काढून 'दृष्टान्तपाठ' तयार केला. 'स्थानपोथी' व श्रीचक्रधरनिरूपित 'श्रीकृष्णचरित्र' या ग्रंथांची निर्मितीही लीळाचरित्रातूनच झाली. सूत्रपाठातील 'लक्षण', 'आचार' व 'विचार' या प्रत्येक प्रकरणावर 'प्रमेय', 'स्थळ', 'बंद' यांसारखे भाष्यग्रंथ रचले जाऊन महानुभाव तत्त्वज्ञानाचे सुसूत्र व्यवस्थापन झाले. पुढे नागदेवाचार्यांचे चरित्र असलेला 'स्मृतिस्थळ' ग्रंथ लिहिला गेला. हा ग्रंथ केवळ चरित्रग्रंथच नाही तर तो महानुभावांच्या आचार-विचारांचा कृतिरूप आदर्श ग्रंथ ठरला. त्यानंतर 'वृद्धाचार', 'मार्गरूढी', 'चरित्र आबाब', 'हेतुस्थळ' इत्यादी गद्यग्रंथ निर्माण झाले. महानुभावांनी काव्यग्रंथांची निर्मिती करून मराठीची काव्यपरंपराही समृद्ध केली आहे. शके १२०८ च्या सुमारास निर्माण झालेले महादंबेचे 'धवळे' हे मराठीतील पहिले काव्यबिंबायन ठरले. शिवाय ते मराठीतील कृष्णविवाहकथेवरील पहिले आख्यानकाव्यही ठरले. त्यानंतर नरेन्द्राचे 'रुक्मिणीस्वयंवर', भास्करभट्ट बोरीकरांचे 'शिशुपाळवध', 'उद्धवगीता', दामोदरपंडितकृत 'वच्छाहरण', रवळोबासकृत 'सह्याद्रिवर्णन', विश्वनाथबासकृत 'ज्ञानप्रबोध' आणि नारायणबासकृत 'ऋद्धिपूरवर्णन' हे सात ग्रंथ, केशिराजव्यासांचा 'मूर्तिप्रकाश' तसेच श्रीकृष्णचरित्र आख्याने, दत्तात्रेयबाळक्रीडा, अनेक कवीकृत 'गीताटीका', स्थलमहात्म्ये व मूर्तिवर्णनपर काव्ये अशा अनेक काव्यनिर्मितींमुळे मध्ययुगीन काव्यपरंपरेचा एक वैविध्यपूर्ण व समर्थ इतिहास महानुभवांनी निर्माण करून ठेवला.

### धर्मभाषा मराठी

मराठी भाषेला धर्मभाषेचे स्थान देण्याचा पहिला मान महानुभाव पंथालाच जातो. श्रीचक्रधरस्वामी गुजरातमधून येऊनही ते मराठी अनावर बोलत होते. त्यांनी आपल्या ब्रह्मविद्येचे निरूपण मराठीतूनच केले. श्रीचक्रधरस्वामींनी निरूपण केलेल्या मराठी भाषेचाच वापर सर्वांनी करावा, असा श्रीनागदेवाचार्यांचाही दंडक होता. संस्कृतमधून प्रश्न विचारणाऱ्या दामोदरपंडित आणि केशिराजव्यास ह्यांना तर त्यांनी 'तुमचा अस्मातु कस्मातु मी नेणें गा : मज श्रीचक्रधरेंरायें मऱ्हाटी नीरूपीली: ते मी मऱ्हाटी जाणे गा : आज तियाची माते पुसावे :' (स्मृतिस्थळ ७६) असे स्पष्टच सांगितले होते.

संस्कृतमधून लिहिले गेलेले साहित्य आणि तत्त्वज्ञान भविष्यातील पिढीला कळणार नाही, याची जाणीवही नागदेवाचार्यांना होती. त्यांनी केलेले सूतोवाच खरेही ठरले. वाङ्मयीन गुणवत्तेने सकस असलेले साहित्य तर महानुभावांनी निर्माण केलेच परंतु सर्वसामान्यांनांही ते कळावे या जाणिवेतून मूळ तत्त्वज्ञान आणि त्यावरील भाष्ये-महाभाष्येही त्यांनी मराठीतूनच लिहिली. ही भाषिक बंडखोरी धर्मव्यवस्थापनाबरोबरच सामाजिकदृष्टीनेही महत्त्वाची ठरली.

### लिप्यांची निर्मिती

महानुभावांनी निर्माण केलेले हे सर्व विचारधन त्यांनी लिप्यांमध्ये बंदिस्त करून ठेवले. 'सह्याद्रिवर्णन'कर्त्या रवळोबासांनी 'सकळा' ही पहिली लिपी तयार केली. त्यानंतर सुंदरीलिपी, हंसलिपी, श्रीलिपी, अंकलिपी, पारमांडल्यलिपी, शून्यलिपी अशा एकूण चोवीस लिप्यांची निर्मिती महानुभावांनी केली. परंतु अधिकाधिक साहित्य मात्र सकळालिपीमधूनच त्यांनी जतन करून ठेवले आहे. मुख्यतः लीळाचरित्राची मूळ प्रत खालसैयाच्या धाडीत गहाळ झाल्याने, आपले हे ईश्वरीचे विचारधन कोणाच्याही हाती लागू नये म्हणून ते लिप्यांमध्ये बंदिस्त करून ठेवले जाऊ लागले. याचा एक फायदा असा झाला की, महानुभावांचे मूळ साहित्य हे अधिकाधिक शुद्ध स्वरूपात जतन केले गेले. परंतु त्या साहित्याचा जो एक प्रभाव समकालीन इतर साहित्यावर पडणे आवश्यक होते, तसे होऊ शकले नाही. कदाचित मराठीतील गद्यपरंपरा ही त्या प्रभावातून अधिक समृद्ध होऊ शकली असती. कारण महानुभावांची गद्यनिर्मिती सोडली तर पुढे बहमनीकाळापर्यंत गद्यसाहित्याची निर्मितीच झालेली नसल्याचे दिसून येते.

महानुभावांचे साहित्य विपुल व वैविध्यपूर्ण आहे. मध्ययुगीन मराठी साहित्यात इतकी विपुलता व विविधता कोणत्याही धर्मसंप्रदायाच्या साहित्यात नाही. साधारणतः पंधराव्या–सोळाव्या शतकापर्यंत महानुभावांच्या साहित्यनिर्मितीत सातत्य दिसून येते. पुढील काळातील साहित्यात वाङ्मयीन गुणवत्ता आणि तत्त्वज्ञानाचा दर्जा टिकून राहिला नाही. ती काहीशी स्फुट स्वरूपाचीच अधिक असल्याचे दिसून येते. परंतु असे असले, तरी मध्ययुगीन कालखंडातील महानुभावांची ही साहित्यनिर्मिती सर्वच दृष्टींनी मराठी साहित्याचा आदर्शबिंदू ठरली, याबद्दल कोणत्याही संशोधक–अभ्यासकांचे दुमत असू नये असे वाटते.

आजवर महानुभावांचे अनेक ग्रंथ संशोधकांच्या अफाट परिश्रमाने अभ्यासकांच्या समोर आलेले असले, तरीही अनेक हस्तलिखितांचे संशोधन झालेले नाही. लिप्यांचा अभ्यास करून या हस्तलिखितांचे संपादन करणे, संशोधन करणे ही जिकिरीची बाब आहे. परंतु मराठी वाङ्मयाचा परिपूर्ण असा इतिहास लिहावयाचा असेल, तर सर्वच धर्मसंप्रदायांचे साहित्य अभ्यासकांसमोर येण्याची आवश्यकता आहे. मध्ययुगीन साहित्याचे नव्याने आकलन आणि मूल्यमापन करण्याचीही आवश्यकता आहे. महानुभाव संप्रदाय आणि त्यांच्या साहित्यातील अनेक संदर्भांचे नीट आकलन न झाल्यामुळे गैरसमजच अधिक झाले आहेत. यासाठी महानुभाव संप्रदाय आणि त्यांच्या साहित्याचे यथायोग्य पुनःसंशोधन होण्याची आवश्यकता आहे.

**संदर्भ :**


१. नागपूरकर कृष्णमुनी, संपादक
सूत्रपाठ, उदय प्रकाशन, उल्हासनगर, १९८५.

२. कोलते डॉ. वि. भि., संपादक
लीळाचरित्र, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई, १९८२.

३. कोलते डॉ. वि. भि., संपादक
श्रीगोविंदप्रभुचरित्र, अरुण प्रकाशन, मलकापूर, १९७१.

४. आवळगावकर डॉ. रमेश, संपादक
स्मृतिस्थळ, चंद्रकला प्रकाशन, पुणे, १९९९

५. भवाळकर नी. ब., नेने ह. ना., संपादक
दृष्टान्तपाठ प्रकाशक – ह. ना. नेने, नागपूर, १९३७.


* * *

# संप्रदाय





श्रीविठ्ठल.

## वारकरी संप्रदाय

■ विद्याधर ताठे

**श्रीक्षेत्र पंढरपूर, तेथील चंद्रभागा नदीचे वाळवंट आणि श्रीविठ्ठलाची अनन्य भक्ती या वारकरी संप्रदायाच्या त्रिविध भावनिष्ठा आहेत. यज्ञ, याग, योग, कर्म, ज्ञान या सर्व साधनांपेक्षा इथे 'भक्ती'ला संप्रदायाच्या अधिष्ठानाचे स्थान देण्याचा डोळसपणा सकल संतांनी दाखविलेला आहे. जाती-वर्णाच्या भेदभिंती पाडून या संप्रदायाने सकल समाजाला 'या रे या रे अवघे जन।' म्हणत साद घातली व वेदवंचित उपेक्षित समाजाला, स्त्री-शूद्रांना आत्मविकासाचा- स्वानंदाचा भक्तिमार्ग खुला केला.**

जगद्‌गुरू संत श्रीतुकाराम महाराज यांची शिष्या, संत बहिणाबाई यांच्या अभंगात आपणास वारकरी संप्रदायाचे समग्र दर्शन घडते, तो अभंग असा –

संतकृपा झाली। इमारत फळा आली।।
ज्ञानदेवे रचिला पाया। उभारिले देवालया।।
नामा तयाचा किंकर। तेणे रचिले आवार।।
जनार्दन एकनाथ। खांब दिला भागवत।।
तुका झालासे कळस। भजन करा सावकाश।।
बहिणी म्हणे फडकती ध्वजा। निरूपण केले वोजा।।

"जगातील सर्व धर्मांत आणि हिंदू धर्मातील सर्व पंथांत संतांचा वारकरी संप्रदाय हा सर्वश्रेष्ठ धर्म आहे. विशेष म्हणजे हा अध्यात्ममार्गी असूनही संपूर्ण इहवादी आहे." हे माझे मत नसून ज्येष्ठ

अभ्यासक व साक्षेपी विचारवंत श्री.म.वा.धोंड यांचे आहे. महाराष्ट्राच्या परमपावन भूमीवर अनेक धर्म-पंथ-संप्रदाय गुण्यागोविंदाने नांदलेले आहेत. त्यामध्ये नाथ संप्रदाय, वारकरी संप्रदाय, आणि महानुभाव संप्रदाय हे सर्वांत आधीचे तर दत्त, गाणपत्य, नागेश, आनंद, माध्व, रामानुज, हरिनारायण हे संप्रदाय काहीसे नंतरच्या काळातील संप्रदाय मानले जातात. १६व्या शतकात या संप्रदायांमध्ये समर्थ संप्रदायाची भर पडली. या प्रमुख संप्रदायाशिवाय काही छोटे संप्रदायही इथे नांदले. त्याचबरोबर जैन, बौद्ध, वीरशैव हे स्वतःला स्वतंत्र धर्म मानणारे पंथही काही प्रमाणात महाराष्ट्र देशी सुखेनैव विस्तारलेले आहेत. परंतु या सर्व पंथ-संप्रदायांमध्ये वारकरी संप्रदायाला महाराष्ट्राची सत्त्वधारा मानले जाते.

थोर विदुषी इरावती कर्वे आणि थोर विद्वान राजारामशास्त्री भागवत यांनी वारकरी संप्रदायाच्या कामगिरीचा गौरव करीत वारकरी विचारधारेलाच महाराष्ट्राची सत्त्वधारा म्हटले आहे, हे लक्षात घेण्यासारखे आहे. एवढेच नव्हे तर राजारामशास्त्री भागवतांनी वारकरी संप्रदायाच्या तत्त्वज्ञानाला 'पुंडरीक दर्शन' म्हणत त्याला भारतीय दर्शनशास्त्रांचा मान दिला आहे. संत तुकोबांचे वंशज व तत्त्वज्ञानाचे ज्येष्ठ अभ्यासक-विचारवंत डॉ. सदानंद मोरे म्हणतात, ''वारकरी संप्रदाय हा मराठमोळा संप्रदाय आहे. मराठीपणाचे प्रतिनिधित्व करणारा संप्रदाय आहे. संत ज्ञानोबा व तुकोबा हेच मराठी माणसाचे 'आगम-निगम' आहेत. तसेच महाराष्ट्राला महाराष्ट्र अशी ओळख देण्याचे ऐतिहासिक कार्य वारकरी संप्रदायाने केलेले आहे.''

वारकरी संप्रदायाला महाराष्ट्रात 'माळकरी पंथ', 'भागवत धर्म', 'भागवत पंथ', 'वैष्णव पंथ', 'भक्तिमार्ग', 'विठ्ठल पंथ', 'पंढरी पंथ', अशा अनेक नावांनी ओळखले जाते. पण या सर्व पर्यायवाचक संज्ञांमध्ये 'वारकरी संप्रदाय' हेच नाव अधिक अन्वयार्थक व समर्पक आहे. मराठी विश्वकोशकार तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनीही वारकरी संप्रदायाला महाराष्ट्राची सत्त्वधारा म्हणून गौरवलेले आहे. ते म्हणतात- ''ज्ञानदेवांपासून तुकारामांपर्यंतच्या संतांनी प्रवर्तित केलेली भागवतधर्मरूपी सत्त्वधारा महाराष्ट्राच्या उच्च सांस्कृतिक, धार्मिक, नैतिक व कलात्मक जीवनाचे आत्तापर्यंत पोषण करीत आहे.'' (२)

श्रीक्षेत्र पंढरपूर, तेथील चंद्रभागा नदीचे वाळवंट आणि श्रीविठ्ठलाची अनन्य भक्ती या वारकरी संप्रदायाच्या त्रिविध भावनिष्ठा आहेत. यज्ञ, याग, योग, कर्म, ज्ञान या सर्व साधनांपेक्षा इथे 'भक्ती'ला संप्रदायाच्या अधिष्ठानाचे स्थान देण्याचा डोळसपणा सकल संतांनी दाखविलेला आहे. विठ्ठलाची एकनिष्ठ भक्ती करतानाच या संप्रदायाने 'कोणाही जिवाचा न घडो मत्सर। वर्म सर्वेश्वर पूजनाचे।' अशी विश्वव्यापक दृष्टीही जपली आहे. जाती-वर्णाच्या भेदभिंती पाडून या संप्रदायाने सकल समाजाला 'या रे या रे अवघे जण।' म्हणत साद घातली व वेदवंचित उपेक्षित समाजाला, स्त्री-शूद्रांना आत्मविकासाचा- स्वानंदाचा भक्तिमार्ग खुला केला. व्यक्तिगत साधनेपेक्षा सामूहिक भक्तीला प्राधान्य दिले. टाळ, वीणा, मृदंग ह्यांच्या साथीने ही भक्ती सुस्वर झाली व भजन-कीर्तनाने अमृताचे मळे फुलवीत गेली. विठ्ठलनामाने गीतार्थे विश्व भरीत, आनंदाचे आवार मांडीत विस्तारीत गेली.

अशा या सत्त्वधारेची, संप्रदायाची साद्यंत ओळख आपण या लेखात करून घेणार आहोत. खरे तर या सत्त्वधारेची साद्यंत माहिती घेण्यास व महती गाण्यास ग्रंथच्या-ग्रंथ अपुरे ठरणार आहेत. आजवर अनेक मान्यवर अभ्यासकांनी उपासकांनी या विचारधारेबद्दल लिहिलेलेच आहे. वारकरी संप्रदायाबद्दल, ज्ञानेश्वरी-तुकारामगाथेबद्दल मराठीत जेवढे विपुल लेखन झाले, तेवढे क्वचितच अन्य पंथ-संप्रदायांबद्दल झाले असेल. यावरूनही वारकरी संप्रदायाचे मराठी प्रांतातील प्रमुखत्व सिद्ध होते.

प्रस्तुत लेखात आपण वारकरी संप्रदायाची थोडक्यात पण साद्यंत ओळख करून घेण्याच्या दृष्टीने, वारकरी संप्रदायाची पार्श्वभूमी, वारकरी संप्रदायाचा उदय, संप्रदायाची विचारधारा, संप्रदायाचा आचारधर्म, संप्रदायाची वैशिष्ट्ये, वेगळेपण, संप्रदायातील प्रमुख संत, त्यांचे प्रमुख ग्रंथ, वारकरी फड परंपरा, दिंडी व पालखी सोहळा आणि संप्रदायाची ऐतिहासिक कामगिरी आणि

सामाजिक फलश्रुती. अशा प्रमुख मुद्द्यांचा विचार करणार आहोत.

## आरंभिक काळ : संप्रदायाचे बीजारोपण

भारतीय संकल्पनेनुसार धर्म आणि समाज केवळ परस्परावलंबीच नव्हे तर परस्परनिबद्ध आहेत. धर्माशिवाय समाज ही कल्पनाच संभवत नाही, अशी भारतीय मनाची धारणा त्या काळी होती, ती क्षीण झाली, तरी आजही विद्यमान आहे. सर्व मानवी जीवनव्यवहार त्या काळी धर्माधिष्ठित नियमांनी बद्ध होते. जन्मापासून मृत्यूपर्यंतच नव्हे तर गर्भधारणेपासून ते थेट मृत्युपश्चातही सारे मानवी जीवन आचार-विचार आणि धर्मशास्त्र ह्यांनी अनुशासित होते. 'भारतीय धर्मकल्पना ह्या वेदातील ऋत कल्पनेतून विकास पावल्या आहेत,' असे वेदमूर्ती स. कृ. देवधर यांनी प्रतिपादन केलेले आहे. अशा या पार्श्वभूमीवर आपणास वारकरी संप्रदायाच्या उदयाचा विचार करावयाचा आहे.

वारकरी संप्रदायाचा उदय नेमका कोणत्या शकामध्ये कोणत्या इसवी सनात झाला, हे ऐतिहासिक प्रमाणांनी सिद्ध करता येत नसले, तरी संत ज्ञानेश्वरांनी पूर्ववर्ती विठ्ठलभक्तीला-पंढरीच्या वारीला एक तात्त्विक अधिष्ठान देऊन या भक्तिपरंपरेला संप्रदायाचे संघटनात्मक स्वरूप दिले, हे मात्र निर्विवाद मानले जाते. म्हणूनच संत ज्ञानदेवांच्या कार्याचा गौरव 'ज्ञानदेवे रचिला पाया' अशा अभंगचरणाने एकमुखाने केला जातो. हा चरण असलेला मूळ अभंग प्रथम संत तुकारामांनी लिहिलेला आहे व त्यांची शिष्या बहिणाबाई यांनी त्या रचनेची वर्धित पुनरावृत्ती केलेली आहे. हे या ठिकाणी लक्षात घेण्यासारखे आहे. वारकरी संप्रदायाचा पाया ज्ञानदेवांनी घातला, अशी ज्ञानदेवांच्या कार्याची महती खुद्द तुकाराम महाराजांनीच वर्णन केलेली आहे. यामुळेच सर्व अभ्यासक वारकरी संप्रदायाची चिकित्सा व मूल्यमापन 'मध्ययुगीन धर्मसंप्रदाय' म्हणून करताना दिसतात.

संत ज्ञानेश्वरपूर्व काळात विठ्ठलभक्तीचा शोध घेत आपण गेलो, तर असे दिसते की, ज्ञानदेवांच्या वडिलांचे नावच 'विठ्ठल' होते. त्यांचे आजी-आजोबा म्हणजे गोविंदपंत व निराबाई यांना गहिनीनाथांकडून विठ्ठलभक्तीची दीक्षा मिळालेली होती. म्हणजे ज्ञानेश्वरांच्या घरात आजी-आजोबांपासून विठ्ठलभक्ती रुजलेली होती. संत नामदेवांनी एका अभंगात या गोष्टीचा उल्लेख केलेला आहे. त्या पूर्वीच्या काळात म्हणजे आद्य शंकराचार्यांच्या काळात पंढरपूर व श्रीविठ्ठल देवता प्रसिद्ध असावी, म्हणूनच शंकराचार्य केरळहून काश्मीरला जाताना वाटेत पंढरपुरास भेट देतात. त्यांनी रचलेले 'श्रीपांडुरंग अष्टक' हे स्तोत्र या भेटीचा अक्षर पुरावा आहे. काही जुने शिलालेखसुद्धा विठ्ठलभक्तीच्या प्राचीनत्वाची साक्ष देतात. इ. स. ५१६चा राष्ट्रकूट अविधेयाचा एक ताम्रपट उपलब्ध असून त्यामध्ये 'पांडुरंगपल्ली' नावाने पंढरी माहात्म्य व विठ्ठलाचा महिमा ह्यांचे वर्णन आहे. या ऐतिहासिक साधनाशिवाय मालुतारण ग्रंथात व पुराणांपैकी पद्म व स्कंद या पुराणांतही भक्त पुंडरीक (पुंडलिक) व विठ्ठलाच्या कथा आहेत.

अशा प्रकारे विठ्ठलभक्ती परंपरा खूपच प्राचीन म्हणजे पुराणकालीन आहे. काहींच्या मते भक्त पुंडरीक हा विठ्ठलभक्तीचा म्हणजेच वारकरी संप्रदायाचा आद्य प्रवर्तक आहे. तर काही अभ्यासकांच्या मते पुंडरीक हे 'मिथ' आहे. अभ्यासकांची ही मतमतांतरे असली तरी सर्व वारकरी संतांनी भक्त पुंडरीकालाच आद्य मान दिलेला आहे. पुंडरीकामुळे देव पंढरीस आला असाच वारकऱ्यांचा ठाम निष्ठाभाव आहे. संतांनी अनेक अभंगांतून पुंडरीकाचा गौरव केलेला आहे.

संत निवृत्तिनाथ पुंडरीकाचा कार्यगौरव पुढील अभंगाद्वारे करतात.

प्राणिया उद्धार सर्व हा श्रीधर।
ब्रह्म हे साचार कृष्णमूर्ती।।
ते रूप भीवरे पांडुरंग खरे।
पुंडलिका निर्धारे उभे केले।।

पुंडरीकाचा असाच गौरव संत ज्ञानदेवांसह बहुतेक सर्वच संतांनी केलेला आहे. पण ऐतिहासिकदृष्ट्या पुंडरीकाचा काळ नेमकेपणाने सप्रमाण सिद्ध होत नाही, ही अभ्यासकांची मोठी अडचण आहे. वारकरी संप्रदायाची नेमकी स्थापना केव्हा झाली, हे सप्रमाण सिद्ध होत नसले;




संत श्रीज्ञानेश्वर.

तरी भक्त पुंडरीकाने वारकरी संप्रदायाचे बीजारोपण केले एवढे निर्विवाद मान्य करावे लागते.

भक्त पुंडरीकाने बीजारोपण केलेल्या वारकरी संप्रदायाला संत ज्ञानदेवांनी श्रीगुरू निवृत्तिनाथांच्या मार्गदर्शनानुसार तात्त्विक अधिष्ठान पुरविले व संप्रदायाला सुसंघटित असे स्वरूप दिले. पुंडरीकाचे स्थान वारकरी संप्रदायाच्या जयघोषामध्ये ध्रुवताऱ्यासारखे अढळ असून, तो जयघोष म्हणजे 'पुंडलिक वरदा हरि विठ्ठल श्रीज्ञानदेव तुकाराम'. वारकरी संप्रदायामध्ये 'राम कृष्ण हरि' या जपमंत्राला जेवढे अनन्यसाधारण स्थान आहे, तेवढेच स्थान 'पुंडलिक वरदा हरि विठ्ठल....' या जयघोषाला आहे. पंढरपूरच्या विठ्ठलदर्शन बारीत व वारकऱ्यांच्या कोणत्याही कार्यक्रमात-मेळाव्यात हा जयघोष वारंवार केला जातो व भावभक्तीचे वातावरण निर्माण केले जाते. अगदी बस किंवा गाडीत बसल्यावर गाडी सुरू होताच वारकरी सामूहिकपणे 'पुंडलिक वरदा हरि विठ्ठल....' जयघोष करून सारा परिसर दणाणून सोडतात. 'नाम विठोबाचे घ्यावे। मग पाऊल टाकावे।' या संतोक्तीप्रमाणे वारकरी उपरोक्त जयघोषाने एकाच वेळी विठ्ठलाचे व त्याच्या लाडक्या भक्तांचे-संतांचे स्मरण करतात. देवाच्या नावाआधी भक्ताचे नाव या जयघोषात आहे. आणि ही गोष्ट हेच वारकरी संप्रदायाचे वेगळेपण आहे. अन्य कोणत्याही संप्रदायात-उपासनापंथात किंवा पद्धतीत देवाआधी त्याच्या भक्ताचे नाव, देवाच्या नावाला जोडून घेतले जात नाही. पुंडरीकाचे हे विशेष व वैशिष्ट्यपूर्ण स्थान लक्षात घेतले, तरच वारकरी संप्रदाय आपणास आकळेल.

भक्त पुंडरीकाचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे देवाला त्याने धावा करून बोलाविलेले नाही, तर देव पुंडरीकाची मातृपितृ सेवा पाहून स्वतःहून धावून आलेला आहे. पुंडरीकाव्यतिरिक्त आपल्या पुराणात व रामायण-महाभारतांत ज्या कथा आहेत, तेथे देव कुणाच्या तरी संकट-निवारणार्थ धावून गेलेला आहे. इथे ना पुंडरीक संकटात आहे, ना देवांना कोणा असुराचा वध करायचा आहे. पुंडरीकाच्या सेवाधर्माचे- मातृपितृ निष्ठाभावाचे अभिनंदन करण्यासाठी श्रीकृष्ण परमात्मा पंढरपूरला आला आहे व भक्त पुंडरीकाने दिलेल्या विटेवर विठ्ठल बनून उभा आहे.

### ज्ञानदेवे रचिला पाया

ज्या संत ज्ञानदेव तथा ज्ञानेश्वर यांना सर्व संतांनी संप्रदायाचा पाया म्हणून गौरविले, त्यांचा जन्म आपेगाव येथे शके ११९७ मध्ये (इ.स. १२७५ मध्ये) झाला. त्यांचे वडील बंधू श्रीनिवृत्तिनाथ (शके ११९५) हेच ज्ञानदेवांचे गुरू होते. ज्ञानदेवांना सोपानदेव (शके ११९९) व मुक्ताई (शके १२०१) अशी २ लहान भावंडे होती. या चार भावंडाचे वारकरी संप्रदायाच्या बांधणीत व उभारणीत अपूर्व योगदान आहे म्हणूनच 'निवृत्ती-ज्ञानदेव-सोपान- मुक्ताबाई-नामदेव-एकनाथ-तुकाराम' असा सकल संतमालिकेचा जयघोष आजही वारकरी करतात. या संतमालिकेत ज्ञानदेवादी चारी भावंडांना अग्रपूजेचा मान दिला गेला आहे. एवढेच नव्हे तर या चार भावंडांचा गौरव संतांनी 'ब्रह्मा विष्णू महेश आणि आदिशक्ती' ह्यांचे अवतार म्हणून केलेला

आहे. या भावांवरचा संत जनाबाई यांचा अभंग आपण पाहू

सदाशिवाचा अवतार । स्वामी निवृत्ती दातार ।।१।।
महाविष्णुचा अवतार । सखा माझा ज्ञानेश्वर ।।२।।
ब्रह्मा सोपान तो जाला । भक्तां आनंद वर्तला ।।३।।
आदी शक्ती मुक्ताबाई । दासी जनी लागे पायी ।।४।।

संत नामदेवांच्या घरी धुणीभांडी, दळणकांडण करणाऱ्या संत जनाबाईंचा हा भाव पाहता, तळागाळातल्या कष्टकरी वर्गातील महिलांपर्यंत ज्ञानदेवादी भावंडांच्या कार्याची भक्तिगंगा कशा प्रकारे पोचली होती हेच, दिसून येते.

संत ज्ञानदेवांचे अवतार-कार्य फक्त २२ वर्षांचे. वयाच्या १५ व्या वर्षी त्यांनी नेवासा (नगर जिल्हा) येथे भगवद्‌गीतेवर 'भावार्थदीपिका' (ज्ञानेश्वरी) नावाचा टीकाग्रंथ – भाष्यग्रंथ लिहिला. 'शके बारा शते बारोत्तरे। तै टीका केली ज्ञानेश्वरे।' अशी कालदर्शक ओवी ज्ञानेश्वरीच्या अखेरीस आपणास आढळते. या ज्ञानेश्वरीमुळे गेली अनेक शतके चालत आलेल्या विठ्ठलभक्ति-संप्रदायाला तात्त्विक अधिष्ठान मिळाले.

संत ज्ञानदेवांचे मूळ व्यक्तिमत्त्व हे निर्गुण उपासकाचे – साधकाचे. गुरू निवृत्तिनाथांनी त्यांचे विकसन केले व महाराष्ट्राला विश्वोद्धारक भक्तिप्रवर्तक मिळाला. ज्ञानदेवांच्या कार्याचा गौरव करताना प्राचार्य राम शेवाळकर म्हणतात, ''देवभाषा सोडून लोकभाषेचा स्वीकार, ज्ञानाच्या सार्वत्रिक उपलब्धीचा आग्रह, सर्ववर्णिकांना मुक्तीची सनद, जीवमात्राच्या ठिकाणी ईश्वर पाहण्याची दृष्टी, सर्वांभूती भगवद्‌भाव, मनुष्यनिर्मित भेदाभेदाला नकार, स्वकर्मकुसुमांनीच ईश्वरी पूजा करण्याची शिकवण तसेच जगाला परमेश्वराची विलासभूमी मानण्याचा प्रस्तावही ज्ञानेश्वरांच्या अवतारकार्याची व वाङ्मयकर्तृत्वाची ठळक वैशिष्ट्ये आहेत.'' आणि हाच वारकरी संप्रदायाच्या विचारधारेचा मुख्य गाभा आहे. म्हणूनच 'ज्ञानदेवे रचिला पाया' असा त्यांचा सार्थ गौरव सकल संतांनी केलेला आहे.

प्रा.म.वा. धोंड म्हणतात – ''ज्ञानदेवांनी एक अपूर्व गोष्ट केली. त्यांनी गीता हा भक्तिमार्गाचा आधारग्रंथ मानला. इतर संप्रदायांमध्ये हा मान भागवतपुराणाला दिला जातो.'' ज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरीद्वारे मराठीत ब्रह्मविद्येचा सुकाळ केला. डॉ. रा.चिं.ढेरे म्हणतात – ''ज्ञानदेवांची ज्ञानेश्वरी ही प्रेम, प्रज्ञा आणि प्रतिभा यांचे प्रयागतीर्थ आहे.'' तर डॉ.शं.गो. तुळपुळे म्हणतात – ''विद्वत्व, कवित्व आणि साधुत्व यांचा त्रिवेणी संगम ज्ञानेश्वरीत झालेला आहे.''

मराठी समाजाला मराठीतून मिळालेला पहिला धर्मग्रंथ ज्ञानदेवांनी ज्ञानेश्वरीच्या रूपाने दिला म्हणून 'ज्ञानदेवे रचिला पाया' हा गौरव समर्पक ठरतो.

सर्व लोक-भाविक-संत हे ज्ञानदेवांचा उल्लेख 'माउली' या बहुआदरणीय जिव्हाळ्याच्या नामाने करतात तसेच 'ज्ञानेश्वरी' ग्रंथालाही 'माउली' म्हणतात, हे लक्षात घेण्यासारखे आहे. ग्रंथकर्ता व ग्रंथ या दोहोंना एकाच बहुआदरणीय शब्दाने – संबोधनाने गौरविले जाण्याचे भाग्य जगाच्या पाठीवर केवळ ज्ञानदेवांनाच लाभलेले आहे.

वारकरी संप्रदायात अलीकडच्या काळात संत गाडगे महाराजांच्या शिष्या संत गयाबाई मनमाडकर या होऊन गेल्या. त्यांचे कार्य पुढे चालविणारे विद्यावाचस्पती दादासाहेब मनमाडकर म्हणतात – ''ज्ञानदेवे रचिला पाया । ही केवळ श्रद्धाभावपूर्ण स्तुती नसून ऐतिहासिक वास्तवता आहे.''

### वारकरी संप्रदायाची वैशिष्ट्ये

**वारी**: वारकरी संप्रदायाने मध्ययुगीन महाराष्ट्रातील जनतेला कर्मकांडाच्या कचाट्यातून मुक्त करून उच्च व उदात्त मूल्यांची उपासना दिली आणि तीही सामूहिक स्वरूपाची. ''या संप्रदायाने सामाजिक प्रबोधनाचे आणि पुनरुत्थानाचे कार्य केले आणि ते अगदी मूलगामी स्वरूपाचे आहे.'' असे प्रा.गं.बा. सरदार यांनी म्हटलेले आहे. केवळ भजन-पूजनच नव्हे तर जनजागृतीद्वारे एकाच वेळी धर्मरक्षण आणि राष्ट्ररक्षण हे महनीय कार्य या संप्रदायाने केलेले आहे. उदाहरणच द्यायचे तर महादजी शिंदे यांच्यासारखे अनेक पराक्रमी शूरवीर वारकरी संप्रदायाचे निष्ठावान वारकरी होते. महादजी शिंदे यांना

'वासकर फड' या संप्रदायातील प्रमुख फडाचा अनुग्रह लाभलेला होता. अशा या महाराष्ट्रास विचारशक्ती व आचारशक्ती ह्यांचे प्रदान करणाऱ्या संप्रदायाच्या वेगळेपणाची आपण प्राथमिक ओळख करून घेऊ.

सर्वप्रथम या संप्रदायाला वारी करणारा म्हणून वारकरी संप्रदाय हे नाव ज्या 'वारी' संकल्पनेमुळे मिळाले त्या वारकरी संकल्पनेची आपण माहिती घेऊ. प्रत्येक संप्रदायाची एक इष्ट देवता असते, तशी वारकरी संप्रदायाची इष्ट देवता आहे – पंढरीचा पांडुरंग. या देवतेच्या दर्शनासाठी विशिष्ट निर्धारीत काळी, निर्धारीत दिनी पंढरपूरला जाणे म्हणजे 'वारी' करणे. 'वारी' या शब्दात नियमितपणा व निर्धारीत काळ हे महत्त्वाचे घटक आहेत. विठ्ठलाच्या दर्शनाला विशिष्ट वेळी विशिष्ट दिनी वारंवार जाणे, म्हणजे वारी करणे होय. असा नियमितपणे पंढरीस जाणाऱ्या, वारी करणाऱ्या भाविक भक्तांचा संप्रदाय म्हणून या संप्रदायास 'वारकरी संप्रदाय' हे नाव प्राप्त झालेले आहे. 'पंढरीचा वारकरी। वारी चुकू न दे हरी।' अशी विठ्ठलाची प्रार्थना करीतच विठ्ठलाचा व पंढरीचा निरोप वारकरी घेत असतो. संत ज्ञानदेव व संत तुकाराम ह्यांच्या घराण्यांत पंढरीची वारी पिढी दर पिढी पुढे चालत आलेली दिसते. संत ज्ञानदेवांचे आजोबा गोविंदपंत वारी करीत होते. तोच वारसा पुढे मुलगा विठ्ठलपंतांनी व त्यानंतर नातू ज्ञानदेवांनी चालविला. संत तुकारामांचे पूर्वज 'विश्वंभर' हे ज्ञानदेव समकालीन होते. त्यांनी सुरू केलेली पंढरीची वारी थेट तुकोबांपर्यंत पिढी दर पिढी चालत आली होती. वारी हे एक व्रत आहे. वारी ही एक उपासना आहे आणि या व्रताचा– या उपासनेचा वसा एका पिढीकडून पुढच्या पिढीकडे दिला जातो व पुढची पिढी हा वसा वारसा म्हणून मोठ्या निष्ठेने जपते, हे वारकरी संप्रदायाचे व वारीचे वेगळेपण आहे. 'पंढरीची वारी। आहे माझे घरी।' हे संतवचन या दृष्टीने लक्षात घेण्यासारखे आहे. आपण बालाजीला, इतर देवी–देवतांना जातो ते आपल्या सोईने व इच्छेने. देवदर्शनाची इच्छा झाली व सवड मिळाली की भक्त अशा देवी–देवतांच्या दर्शनास जातो. त्यात काळाचा–वेळेचा–तिथीचा नेमका निर्धारितपणा नसतो. आणि या देवदर्शनाच्या आवडी व्यक्तीच्या स्वतःपुरत्या वैयक्तिक असतात. क्वचितच त्या वसा म्हणून पुढच्या पिढीकडे संक्रमित होताना दिसतात. बालाजीला जाऊन आलेला भक्त 'तिरुपतीची वारी' केली असे म्हणत नाही. पंढरीची वारी यापेक्षा वेगळी आहे. वारीकरी या शब्दापासून पुढे 'वारकरी' शब्द रूढ झालेला आहे.

काया वाचा मने जीवे सर्वस्वे उदार।
बापरखमादेवीवरु विठ्ठलाचा वारीकर॥

असे व्यापक व उदात्त स्वरूप 'वारीकरी' (वारकरी) या संज्ञेमागे असल्याचे संत ज्ञानदेव एका अभंगात वर्णन करतात. या संदर्भात संत नामदेवांचा एक अभंग–चरण मोठा हृद्य आहे. तो असा –

नामा म्हणे धन्य झाले ते संसारी।
न सांडिती वारी पंढरीची॥

पंढरीच्या वारीचे माहात्म्य सांगणारे हजारो अभंग संत–साहित्यात आहेत. पंढरपूर येथे वर्षात ४ यात्रा भरतात. पैकी आषाढी, कार्तिकी या दोन महायात्रा तर माघी आणि चैत्री या छोट्या यात्रा. पण वारकरी या यात्रांना यात्रा न म्हणता 'वारी' म्हणतात. आषाढी यात्रा नव्हे, 'आषाढी वारी' हा सूक्ष्म बारकावा समजला, तरच वारकरी संप्रदायाचे वेगळेपण आपल्या हाती लागणार आहे. वारी ही वारकरी संप्रदायाची स्वतंत्र संकल्पना आहे आणि वारी हाच वारकरी संप्रदायाचा गाभा आहे. ही वारी कशी करायची, याचेसुद्धा सांप्रदायिक दंडक आहेत. संत चोखामेळा यांनी सांगितलेले दंडक पाहा –

टाळी वाजवावी गुढी उभारावी।
वाट ही चालावी पंढरीची॥

हाताने टाळी वाजवत, खांद्यावर भगवी पताका (गुढी) घेऊन, विठ्ठलाचे नामस्मरण करीत पंढरीची वारी चालत करावयाची आहे. आणि ती एकट्याने नव्हे तर अनेक जणांनी मिळून. ''तुम्ही आम्ही खेळीमेळी। आनंदे।'' 'टाळ दिंडी हाती घेऊनि नाचा।' ही संतवचने 'वारी'चे चित्र डोळ्यांपुढे उभी करणारी आहेत. प्राचार्य शिवाजीराव भोसले 'वारी'चे महत्त्व विषद करताना म्हणतात– ''पंढरीची वारी हे महाराष्ट्राचे– मराठी संस्कृतीचे ऐश्वर्य आहे.'' 'वारी' हा तीर्थरूप महाराष्ट्राचा वडिलार्जित वारसा

आहे. मूलतः वारी हे वारकऱ्यांचे एक व्रत आहे. तिला दैवी गुणसंपदेचे अधिष्ठान आहे. पायाखाली धरती, डोईवर आकाश आणि मनात विठ्ठल देवता यांसह प्रवाही झालेले पसायदान, म्हणजे 'पंढरीची वारी'.

थोडक्यात 'वारी'वरून वारीकरी, वारकरी आणि अखेर वारकरी संप्रदाय अशी संज्ञावली निर्माण झालेली आहे.

### उपास्य देवता श्रीविठ्ठल

वारकरी संप्रदायाची दुसरी विशेषता आहे तिचे दैवत, श्रीविठ्ठल! वारकरी संप्रदायाचे उपास्य दैवत विठ्ठल हे फार मोठे आगळेवेगळे व विशेष दैवत आहे. या देवतेला 'विठ्ठल', 'पांडुरंग', 'पंढरीनाथ' अशी विविध नावे आहेत. संत नामदेव विठ्ठलाला 'केशव' म्हणतात, कोणी संत त्याला 'माधव' म्हणतात. श्रीविष्णुसहस्रनामातील व संध्येतील २४ नावांनी श्रीविठ्ठलाला संतांनी अभंगामध्ये आळवलेले आहे.

भक्त पुंडरीकाने दिलेल्या विटेवर उभा म्हणून 'विठ्ठल', असा सहजसोपा अर्थ सामान्य भाविक लावतात. पण विठ्ठल या नावामागे फार मोठा अर्थ आहे. विद् + ठ + ल मिळून विठ्ठल शब्द झालेला आहे. विद् म्हणजे ज्ञान - (ब्रह्मविज्ञान) 'ठ' म्हणजे अमृत (सत) आणि 'ल' म्हणजे रस (आनंदरूप). या अर्थाने ज्या आनंदरूपाच्या अमृतज्ञानाने भाविक आनंदरूप होतो असे आनंदाचे निधान म्हणजे 'विठ्ठल' होय!

'विठ्ठल' ही देवता एक महासमन्वय आहे, असे मत डॉ.रा.चिं.ढेरे यांनी स्वतंत्र ग्रंथ लिहूनच मांडलेले आहे. मूर्तिविज्ञानाचे विख्यात तज्ज्ञ डॉ.गो.बं. देगलूरकर यांनी 'श्रीविठ्ठलमूर्ती: एक अध्ययन' या नावाचा लिहिलेला लेख विठ्ठलाची अनेक वैशिष्ट्ये अत्यंत सूक्ष्मपणे विशद करणारा आहे. ते म्हणतात- ''विठ्ठलाची ही मूर्ती योगस्थानक प्रकारची आहे. म्हणून या विष्णूच्या मूर्तीच्या हातांत गदा व चक्र यांसारखी आयुधे नाहीत. ही मूर्ती दोनच हातांची आहे. नेहमीची विष्णूची मूर्ती चार हातांची असते. विठ्ठलाच्या दोन हातांत शंख व कमळ असून दोन्ही हात कटेवर ठेवलेले आहेत. ''म्हणूनच ज्ञानदेव एका अभंगात विठ्ठलमूर्तीचे वर्णन करताना म्हणतात- ''चोविसा मूर्तींहूनी वेगळा। हा पंचविसावा।।''

या विठ्ठलदेवतेचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे त्याच्या शिरावर महादेवाची पिंड आहे. याद्वारे हरिहर ऐक्य, शैव-वैष्णव ऐक्य व्यक्त झालेले आहे. सर्व संतांनी विठ्ठलाच्या हरिहर ऐक्यरूपाचे अभंग-वर्णन एकमुखाने केलेले आहे. 'ऐक्य रूपे हरिहर। उभा असे कटी कर।', 'विठोने शिरी वाहिला देवराणा।' असे अभंग-चरण त्या दृष्टीने महत्त्वाचे आहेत.

विठ्ठल ही प्रेमस्वरूप देवता आहे. इथे देव हा भक्तांचा सखा आहे. त्यामुळे भयाने नव्हे तर प्रेमभक्तीने भाविक विठ्ठलाची आराधना - वंदना करतात. त्याच्याशी प्रेमसंवाद करतात. इथे देवच भक्तांना बोलावितो, मला विसरू नका म्हणतो. आषाढी कार्तिकीला या म्हणून सांगतो. 'आषाढी कार्तिकी विसरू नका मज। सांगतसे गुज पांडुरंग।।' हा संत नामदेवांच्या अभंगातील चरण श्रीविठ्ठलाचे मनोगत आहे. हा विटेवरचा विठ्ठल दीनबंधू आहे, करुणाकर आहे, भक्तवत्सल आहे, एवढेच नव्हे तर संतांच्या जीविचा जिव्हाळा, प्रेमाचा पुतळा, आनंदाचे कंद आहे. ज्ञानदेव त्याचे वर्णन 'ज्योतीची निज ज्योती' असे ज्योतिस्वरूप करतात.

ख्रिश्चन, इस्लाम ह्या धर्मांमध्ये आज्ञा आहेत व तेथे देव पिता आहे व भक्तगण प्रजा. तेथे प्रजेला देवाचे भय वाटते म्हणून ते त्याची प्रार्थना करतात. इथे वारकरी संप्रदायात ज्ञानदेवादी संतांनी देवाशी प्रथम नाते जोडले ते सखा म्हणून आणि दुसरे नाते निर्माण केले ते म्हणजे आई-लेकराचे. 'तू माझी माउली। मी तुझा तान्हा।' असे विठ्ठलाकडे आई-माउली म्हणून पाहण्यास ज्ञानदेवादी संतांनी वारकऱ्यांना शिकवले. संत देवाला मोठ्या लाडिकपणाने 'विठुमाउली' म्हणतात आणि त्याच्याकडे प्रेमभक्ती मागतात. वारकरी-भाविक विठ्ठलाला कधी नवस करीत नाहीत, कारण नवस हे काम्यभक्तीचे लक्षण आहे. वारकरी विठ्ठलाकडे ना संपत्ती मागतात, ना मुलबाळ मागतात, ना मोक्ष मागतात. मग वारकरी मागतात तरी काय? तर प्रेमसुख मागतात. मोक्ष न मागणारा वारकरी संप्रदाय हा जगाच्या पाठीवरील एकमेव संप्रदाय आहे.

कारण त्यांना विठ्ठल भक्तीचे प्रेमसुख सोडून कोठेही जाण्याची इच्छा नाही. विठ्ठलाचे प्रेमसुख मोक्षापेक्षा अधिक मोलाचे आहे. वारकरी संप्रदायाची ही आणखी एक प्रमुख विशेषता आहे. नामभक्ती हे वारकरी संप्रदायाचे आगळेवेगळे वैशिष्ट्य आहे. म्हणून वारकरी संप्रदायाला 'भक्ति-संप्रदाय' असे म्हणतात.

भक्तीतही सगुण आणि निर्गुण असे भेद केले जातात. वारकरी सगुण-निर्गुणात अद्वैत आहे. भक्तीतही अनेक प्रकार आहेत. वारकरी संप्रदायात त्यांपैकी 'नामभक्ती'लाच मुख्य स्थान आहे. नामस्मरण, नामजप, नामघोष, नामसप्ताह ही वारकरी भक्तीची साधने आहेत. आणि त्यातही व्यक्तिगत भक्तीपेक्षा सामूहिक भक्तीला म्हणजेच भजन, कीर्तन यांना वारकरी संप्रदायात अनन्यसाधारण स्थान आहे.

'गर्जती नाचती आनंदे डोलती। सप्रेम स्फुंदती विठ्ठलनामे ।।';

'सोपे वर्म आम्हा सांगितले संती। टाळ दिंडी हाती घेऊन नाचा ।।'

'नामा परते तत्त्व नाही रे अन्यथा।' असे सांगत ज्ञानदेवांनी नामाला म्हणजे नामस्मरणाला 'तत्त्व' म्हणून स्थान व मान दिलेला आहे. वारकरी संप्रदायातील नामभक्तीचे प्राधान्य लक्षात घेऊन काही लोक या संप्रदायास 'नामधारकांचा संप्रदाय' म्हणतात.

विठ्ठल विठ्ठल गजरी। अवघी दुमदुमली पंढरी।।
होतो नामाचा गजर। दिंड्या पताकांचा भार।।
हरि कीर्तनाची दाटी। तेथे चोखा घाली मिठी।।

संत चोखामेळ्यांच्या या अभंगात नामगजर, दिंड्या याचबरोबर हरिकीर्तनाचा उल्लेख आहे आणि तो विशेष महत्त्वाचा आहे. भजन-प्रवचनाबरोबरच वारकरी संप्रदायात 'कीर्तनाला' अनन्य असे महत्त्व आहे. कीर्तन हेच वारकरी संतांच्या भक्ती प्रचाराचे मुख्य व प्रभावी साधन आहे. 'नाचू कीर्तनाचे रंगी। ज्ञानदीप लावू जगी।' असे म्हणत संत नामदेवांनी भक्तिपताका थेट पंजाबात नेली. 'कीर्तन चांग चांग। होत काया हरिरूप।।' अशा कीर्तनभक्तीद्वारे देह देवरूप होतो. अशी वारकऱ्यांची धारणा व अनुभूती आहे.

भजन-प्रवचन आणि कीर्तन ही वारकरी संप्रदायाची प्रमुख अंगे होत. भजनाद्वारे विविध संतांचे अभंग सामूहिकरीत्या टाळ-मृदंगाच्या साथीने सुस्वर गायले जातात. या वारकरी-अभंग-गायनाच्या चाली म्हणजे अस्सल मराठी गानठेवा आहे. प्रवचन हे, संत वाङ्मयाचे व्याख्यानसदृश विवरण असते. त्यात ज्ञानाला प्राधान्य असते, तर कीर्तनामध्ये भक्तीला प्राधान्य दिले जाते. अशा प्रकारे भक्ती व ज्ञान या दोन मार्गांचा सुंदर समन्वय आपणास वारकरी प्रवचन-कीर्तनात दिसतो. वारकरी कीर्तन हे पारंपरिक नारदीय हरिदासी कीर्तनापेक्षा खूपच निराळे व पूर्णतः वेगळे आहे.

हरिदासी कीर्तन ज्याला ते 'कथा' म्हणतात, ती मंदिरातच होत असे. त्या मंदिरात बंदिस्त असलेल्या कथेला वारकऱ्यांनी मंदिराबाहेर मोकळ्या जागेत - समाजात - वाळवंटात आणले. त्यामुळे मंदिरात ज्यांना प्रवेश नव्हता अशा बहुजन समाजातील भाविकांना वारकरी संप्रदायाने कीर्तनाच्या श्रवणसुखाचा परमानंद प्राप्त करून दिला. संत गाडगे महाराज यांनी वारकरी कीर्तनाला खेड्यापाड्यांत नेले व त्याला समाजाशी संवाद हे स्वरूप दिले. वारकरी कीर्तनामुळे विठ्ठलभक्तीची गंगा खेड्यापाड्यांत राहणाऱ्या तळागाळातील उपेक्षित समाजाच्या दारी गेली. त्यामुळेच गावोगावचे लोक जातिभेद विसरून भजन करीत, विठ्ठलनामाचा घोष करीत मोठमोठ्या दिंड्या घेऊन पंढरपुरी जाऊ लागले. अशा प्रकारे वारकरी संतांनी वेदवंचित समाजाला नामघोषाचा मंत्र व आत्मविश्वास दिला आणि परमार्थाचा महामार्ग दाखविला.

### वारकऱ्यांचा आचार धर्म

वारकरी संप्रदायाच्या आचारांत संतांनी अत्यंत सोपेपणा व सकल जन सुलभतेचा विचार केलेला आहे. या आचारांमागे संतांचा उदात्त व व्यापक असा विचार आहे. तो समजून घेऊन आचार करणे महत्त्वाचे आहे. या आचारांपैकी आपण इथे लेख-मर्यादा लक्षात घेऊन फक्त प्रमुख आचारांचाच विचार करणार आहोत. प्रमुख आचार असे -

१) पंढरीची वर्षातून किमान एकदा किंवा दर महिन्याच्या शुद्ध एकादशीला वारी करणे.

२) गळ्यामध्ये तुळशीची माळ धारण करणे.

३) शाकाहार करणे, मांस, मद्य वर्ज्य करणे.

४) 'राम कृष्ण हरी' मंत्राचा जप करणे.

५) परस्त्री मातेसमान मानणे. परद्रव्याचा लोभ न करणे.

६) प्राप्त कर्म हे ईश्वरी कर्म समजून पार पाडणे.

७) हरिपाठ, ज्ञानेश्वरी, गाथा यांचे संकल्पपूर्वक व नित्यनेमाने यथाशक्ति वाचन करणे.

८) प्राप्तकर्म हे ईश्वरी कार्य समजून पार पाडणे.

९) कोणाही जिवाचा न घडो मत्सर, अशा वृत्तीने सर्व प्राणिमात्रांबद्दल भगवद्भाव राखणे.

या आचारांमध्ये 'पंढरीची वारी' मुख्य. वारी सुरू करण्यापूर्वी कोणाही वारकरी फडप्रमुखाकडून, महाधिपतीकडून तुळशीची माळ विधियुक्त धारण करून वारकरी संप्रदायाचा अनुग्रह घेणे महत्त्वाचे आहे. असा अनुग्रह – तुळशीची माळ घेण्याचा अधिकार सर्वांना खुला आहे. 'सकळासी येथे आहे अधिकार' अशा प्रकारे स्त्री–शूद्रांनाही वारकरी संप्रदायाने पारमार्थिक विकासाची समान संधी दिलेली आहे.

वारकरी संप्रदाय हा कर्मकांडाचे अवडंबर न करणारा संप्रदाय असल्यामुळे तुळशीची माळ– अनुग्रहविधीही अगदी साधेपणाने केला जातो. अनुग्रह घेऊन अधिकृत वारकरी होऊ इच्छिणारी व्यक्ती बाजारातून दोन–तीन रुपये किमतीची तुळशीच्या १०८ मण्यांची माळ विकत घेते व बुक्क्याच्या पुडीसह वारकरी फडप्रमुखाकडे जाते. फडप्रमुख इच्छुकाच्या कपाळाला बुक्का लावून 'राम कृष्ण हरी' म्हणत त्याच्या गळ्यात तुळशीची माळ घालतो व पंढरीची वारी करण्यास सांगतो. पंढरीत भरणाऱ्या चार वाऱ्यांपैकी नेमकी कोणती वारी करणार, ते माळ धारण करणाऱ्याने फडप्रमुखांना सांगायचे. तेथून पुढे दरवर्षी व्रत म्हणून वारी न चुकता करीत राहायचे. अनेक घरांत ही वारी वारकरी आपल्या इस्टेटीप्रमाणे मुलाकडे व अशा प्रकारे पिढ्यान्‌पिढ्या पंढरीच्या वारीचे व्रत निष्ठेने जपले जाते.

तुळशीची माळ गळ्यात घालणे म्हणजे देहावर तुळस ठेवून तो विठ्ठल–देवतेला अर्पण करणे, असा भाव आहे. आपणाकडे पूजाविधीमध्ये देवाला नैवेद्य दाखविताना त्यावर तुळशीचे पान ठेवतात. तसे हे देहावर तुळशीपत्र ठेवणे आहे. आता हा देह देवाचा झाला, म्हणून तो शुद्ध पवित्र राखणे महत्त्वाचे. त्यासाठी शुद्ध सात्त्विक शाकाहार करणे, मद्यपान न करणे, परस्त्री मातेसमान मानणे ही पथ्ये पाळावी लागतात. 'जेणे विठ्ठल मात्रा घ्यावी। तेणे पथ्ये संभाळावी।' असे संतवचन आहे.

पंढरीची वारी आज जरी गाड्या–मोटारींद्वारे केली जात असली, तरी पूर्वी ती पायीच केली जात असे. वारकरींच्या मार्गावर संतांची अभंगवचने गात संत आणि विठ्ठल ह्यांचे स्मरण व अनुसंधान केले जाते. पंढरीमध्ये सर्व वारकरी वाळवंटात जमतात. चंद्रभागेचे स्नान, भक्त पुंडरीक दर्शन हे करून महाद्वारी जातात; तेथे संत नामदेव पायरीचे दर्शन करून विठ्ठल मंदिरात जातात. देवदर्शनानंतर पंढरपूरची नगरप्रदक्षिणा करतात. आणि भजनात भाग घेतात किंवा कीर्तन–प्रवचन ऐकतात. 'चंद्रभागे स्नान आणि विधी तो हरिकथा' असे वारीतील दोन प्रमुख विधी संत तुकोबांनी सांगितलेले आहेत. विठ्ठलाच्या दर्शनाएवढेच वारीत 'हरिकीर्तन' ऐकणे महत्त्वाचे मानले गेले आहे. त्यायोगे वारकऱ्यांना 'सत्संग' घडतो व त्याची पारमार्थिक मनोभूमिका पक्की होते. वारकरी संप्रदायात संतसंगाला विशेष महत्त्व आहे. 'न लगे मुक्ती धनसंपदा। संतसंग देई सदा।' असे संत तुकारामांचे मागणे आहे. यावरून संपत्ती व मोक्ष यांपेक्षा संतसंग थोर मानल्याचे दिसते.

### वारकरी विचारधारा – तत्त्वज्ञान

कोणताही संप्रदाय असो त्याला त्याचे असे एक स्वतंत्र तत्त्वज्ञान असते. संत ज्ञानेश्वर हे वारकरी संप्रदायाचे आचार्य आहेत. सर्व संतांनी त्यांना गुरुस्थानी मानले व ज्ञानेश्वरांनी त्यांच्या विविध वाङ्मयांत मांडलेला तत्त्वविचार पुढे सकल संतांनी आपापल्या अंगाने अभंगांद्वारे व्यक्त केलेला आहे.

संत ज्ञानदेवांनी आपल्या 'ज्ञानेश्वरी', 'अमृतानुभव' या ग्रंथरचनेद्वारे जीव–जगत आणि जगदीश्वर या संबंधाविषयी

मांडलेले तत्त्वज्ञान आणि परतत्त्वाच्या परमप्राप्तीसाठी सांगितलेला साधनामार्ग हे वारकरी तत्त्वज्ञानाचे मुख्य अधिष्ठान आहे. त्यामुळे 'ज्ञानेश्वरी' हा वारकरी संप्रदायाचा 'वेद' आहे. संत एकनाथांचे 'नाथ भागवत' व संत तुकारामांची 'अभंगगाथा' यांमध्ये संत ज्ञानदेवांच्या तत्त्वविचाराचाच विस्तार आहे.

वारकरी संप्रदाय हा वैदिक (वेद मानणारा) संप्रदाय आहे. अद्वैत भक्ती ही संप्रदायाची स्वरूपस्थिती आहे. आद्य शंकराचार्य व अन्य वैदिक आचार्य 'ब्रह्म सत्य जगन् मिथ्या' मानून जगाला माया मानतात तर संत ज्ञानदेव जगाला मिथ्या न मानता ईश्वराच्या सत्तेचा विलास मानतात. ज्ञानदेवांच्या या विचारास 'चिद्‌विलास वाद' म्हटले जाते.

स्वतः वारकरी असलेले व पुणे विद्यापीठाने डी.लिट. देऊन सन्मानित केलेले डॉ.भा.पं. बहिरट म्हणतात– ''परमात्मा, जीव व जगत यांच्याकडे पाहण्याचा वारकरी संतांचा दृष्टिकोन निरोगी, खेळकर, तात्त्विक आणि शुद्ध दृष्टीचा आहे. जग क्रीडांगण असून जीव हा परमात्म्याचा खेळगडी–सवंगडी आहे. म्हणूनच संत नामदेवांनी जिवास 'खेळीया' म्हटले आहे ... वारी, भजन, कीर्तन, दैनंदिन व्यवहार या सर्व गोष्टी भगवंताशी प्रियपणाने केलेली क्रीडा आहे. या तऱ्हेची श्रेष्ठ पातळीची क्रीडा जीवनास कल्याणकारी आहे, असे संतांचे कळकळीचे सांगणे आहे.''

चिद्‌विलासाच्या तात्त्विक विचारसरणीस अनुसरून ज्ञानदेवांनी भक्तीचे स्वरूपही विशद केलेले आहे. पारंपरिक विचारात धर्म, अर्थ, काम व मोक्ष असे चार पुरुषार्थ मानलेले आहेत. पैकी तीन साधनीभूत तर चौथा मोक्ष हा साध्य मानले होते. मोक्षप्राप्ती हेच जीवनाचे साफल्य मानले गेले, पण ज्ञानदेवांनी भक्तीला पाचवा पुरुषार्थ मानले. 'चहु पुरुषार्थ शिरी। भक्ति जैसी।।' (ज्ञा.१८:८६७) याचा अर्थ वारकऱ्यांनी मानवी जीवनाचे अंतिम साफल्य मोक्ष नव्हे तर 'भक्ती' हे मानले आहे व मोक्षप्राप्ती नाकारलेली आहे. मोक्ष नाकारणारा वारकरी संप्रदाय हा जगाच्या पाठीवरील एकमेव संप्रदाय असावा.

ज्ञानेश्वर व शंकराचार्य डॉ. शं.दा. पेंडसे ह्या दोघांचेही तत्त्वज्ञान एकच आहे, दोघे मायावादी आहेत; असे म्हणतात. पण प्राचार्य सोनोपंत दांडेकर शंकराचार्यांना केवलाद्वैतवादी तर ज्ञानदेव हे पूर्णाद्वैतवादी होते, असे मानतात.

संतांचा देवोदेवी विचार, शून्यवादाचे खंडन असे विषयही तत्त्वज्ञानविचारात येतात, पण इथे आपण ठळक गोष्टींचाच विचार केलेला आहे.

### वारकरी संत व वारकरी वाङ्मय

संत निवृत्तिनाथ (१३ वे शतक) ते संत निळोबा (१७वे शतक) अशी वारकरी संप्रदायास लाभलेल्या संतांची महनीय परंपरा आहे. एवढी प्रदीर्घ संतपरंपरा लाभलेला वारकरी संप्रदाय हा भारतभूमीवरील एकमेव संप्रदाय आहे. या संतमालिकेत अगदी अलीकडच्या काळात संत गाडगे महाराज (१९वे शतक), संत तुकडोजी महाराज यांचीही कामगिरी, योगदान अपूर्व आहे.

संत ज्ञानदेव, संत नामदेव, संत एकनाथ आणि संत तुकाराम आणि संत गाडगे महाराज हे पाच संत वारकरी संप्रदायाचे पंचप्राण आहेत. ज्ञानेश्वर–नामदेव हे समकालीन, एकत्र कार्य केलेले, संप्रदायाचा पाया रचणारे संत आहेत. संत ज्ञानेश्वरांच्या प्रभावळीत त्यांची दोन भावंडे मुक्ताबाई व सोपानदेव, संत नामदेव, संत गोरोबा कुंभार, संत सावता माळी, संत चोखामेळा असे अनेक संत झाले. या संतांचा काळ इसवी सनाचे १३वे शतक म्हणजे वारकरी संप्रदायाचा सुवर्णकाळ होय.

संत ज्ञानदेवांनी या संप्रदायाचा १३व्या शतकात पाया घातला. संत नामदेवांनी थेट पंजाबपर्यंत संप्रदायाचा विस्तार केला. संत एकनाथांनी या संप्रदायास 'भागवत' व 'भावार्थ रामायण' लिहून बळकटी आणली आणि संत तुकारामांनी (१६वे शतक) आपल्या कार्याने कळस चढविला आणि संत बहिणाबाईंनी ध्वजा फडकविली.

वारकरी संप्रदायाचे भाग्य थोर की संप्रदायाला अनेक परिवारांचे संत म्हणून लाभले. ज्ञानदेवादी चार भावंडे, नामदेव परिवार, चोखामेळ्याचा परिवार, चोखामेळ्याच्या बहिणीचा परिवार या सर्वांच्या अभंग–रचना या वारकरी

वाङ्मयाचे वैभव आहे. चोखामेळा, त्याची पत्नी सोयराबाई, चोखामेळ्याचा मुलगा कर्ममेळा, चोख्याच्या बहिणीचा नवरा बंका अशा सर्वांची अभंगसंपदा उपेक्षित-दलित समाजात वारकरी संप्रदायाने केलेल्या आत्मविश्वास जागरणाचेच दर्शन आहे.

वारकरी संप्रदायाचे आणखी एक भाग्य म्हणजे या संप्रदायाला लाभलेले बहुतेक सर्व संत हे कवी आहेत. त्यामुळे संतकवींचा संप्रदाय म्हणजे वारकरी संप्रदाय, अशी सार्थ ओळख रूढ झाली. या सकल संतांचे वाङ्मय म्हणजे मराठी भाषेचे ऐश्वर्य आहे. मराठी भाषेला या संतांनी अभंग, ओवी, भारूड अशी छंदांची लेणी देऊन सत्त्वसंपन्न केलेले आहे.

वारकरी संप्रदायाच्या भजनांमध्ये 'ज्ञानोबा-तुकोबा' असे एक भजन- जयघोष प्रसिद्ध आहे. ज्ञानोबा-तुकोबा हे वारकऱ्यांच्या हातातील दोन टाळ आहेत. ज्ञानोबा-तुकोबा हे वारकरी संप्रदायाचे दोन डोळे आहेत.

'ज्ञानोबा-तुकोबा' या जयघोषात केवळ दोन संतांचाच गौरव करण्याची भूमिका नाही तर या दोन नावांमध्ये सकल संत मालिकेचा समावेश आहे. थोर विचारवंत विनोबा भावे याविषयी म्हणतात- "'ज्ञानोबा-तुकोबा' हा मध्यमपदलोपी समास आहे." या दोन नावांत सर्व आधीच्या व नंतरच्या संतांचा समावेश आहे.

वारकरी संप्रदायाएवढे विपुल व विविधांगी वाङ्मय अन्य कोणत्याही संप्रदायाकडे नाही. संत निवृत्तिनाथांपासून ते संत निळोबांपर्यंत आपणास प्रत्येक संताचे अभंग-वाङ्मय मिळते. संत ज्ञानेश्वरांची 'ज्ञानेश्वरी', 'अमृतानुभव' आणि हरिपाठ हे संप्रदायाच्या तत्त्वविचाराचे मुख्य अधिष्ठान मानले जातात. तसेच संत एकनाथांचे 'नाथ भागवत' व 'भावार्थ रामायण' आणि संत नामदेव व संत तुकाराम यांच्या 'अभंग गाथा' हे वारकरी संप्रदायाचे मुख्य वाङ्मय होय. या वाङ्मयातील ज्ञानेश्वरी, नाथ भागवत व तुकाराम गाथा या तीन ग्रंथांना वारकरी संप्रदायाची प्रस्थानत्रयी म्हटले जाते. वारकरी वाङ्मयामध्ये संत मुक्ताबाई, संत कान्होपात्रा, संत सोयराबाई, संत जनाबाई, संत बहिणाबाई या महिलांच्या अभंगांचे एक विशेष प्रकारचे योगदान आहे. या महिलांच्या सामाजिक स्तराकडे पाहता मुक्ताई या ज्ञानदेवांच्या भगिनी आहेत, सोयराबाई गावकुसाबाहेर राहणाऱ्या संत चोखामेळ्याची पत्नी आहे. कान्होपात्रा एका वेश्येची मुलगी आहे, जनाबाई नामदेवांच्या घरातील दासी आहे आणि बहिणाबाई प्रापंचिक गृहिणी आहेत.

एका संताची एक अभंग-रचना नव्हे तर एक अभंग-चरण (ओळ) इथे द्यायचा म्हटले, तरी एक ग्रंथ होईल. त्यामुळे कोणाच्याही अभंगाचा नमुना न देता आपण 'वारकरी संप्रदायाची प्रस्थानत्रयी' म्हणून ज्या ग्रंथांना गौरविले जाते त्यांचा थोडक्यात परिचय करून घेऊ.

### ज्ञानेश्वरी

संत ज्ञानेश्वरांनी श्रीगुरू निवृत्तिनाथ यांच्या अनुज्ञेनुसार शके १२१२ मध्ये अहमदनगर जिल्ह्यातील नेवासे येथे भगवद्गीतेवरील हा टीकाग्रंथ लिहून पूर्ण केला. यापूर्वीचे आचार्य हे ब्रह्मसूत्रावरच भाष्य लिहीत होते व तेही संस्कृत भाषेत, पण ज्ञानदेवांनी चाणाक्षपणे भगवद्गीतेची निवड भाष्यग्रंथासाठी केली व आपले भाष्य मराठीतून लिहिले. गीतेच्या ७०० श्लोकांवर ज्ञानदेवांनी ९००० ओव्यांची प्रदीर्घ टीका लिहिली आणि वारकरी संप्रदायाला अधिष्ठान ठरणारा एक ग्रंथ दिला. 'ज्ञानेश्वरी'वर आजवर शेकडो अभ्यासकांनी प्रबंध लिहून पीएच.डी. केलेली आहे. मराठी भाषेच्या उदयकाळातील पण साहित्य वैभवाने नटलेला असा हा तात्त्विक ग्रंथ समस्त मराठी मनाचे-मराठी विश्वाचे भूषण आहे. हा ग्रंथ केवळ वारकऱ्यांनाच नव्हे तर अनेक अभ्यासकांना भुरळ पाडणारा असा आशयसंपन्न ग्रंथ आहे. वारकरी प्रस्थानत्रयीत या ग्रंथाला अग्रमानाचे स्थान आहे. या ग्रंथाची महनीयता अनेक थोर विचारवंतांनी व व्यासंगी अभ्यासकांनी गायलेली आहे. जागेअभावी आपण त्यापैकी एखादा अभिप्राय पाहू.

प्रा. म.वा धोंड म्हणतात- "गीतेवरील अन्य सर्व टीका भाष्यग्रंथांपेक्षा ज्ञानेश्वरी वेगळी आहे. ज्ञानेश्वरी हा ज्ञानदेवांचा गीतानुभव आहे, असे ज्ञानेश्वरीचे पहिले अधिकारी श्रोते संत नामदेवांनी सांगितलेले आहे. (तुवा जो ग्रंथानुभव। गीतेसी दाविला भाग।।) ग्रंथानुभव हा अनुवाद, टीका, भाष्य, निरूपण यांसारखा स्वतंत्र वाङ्मय



संत श्रीतुकाराम.

प्रकार मानला; तर त्या स्वरूपाचा ज्ञानेश्वरी हा जगाच्या साहित्यातील एकमेव ग्रंथ ठरतो.''

संत साहित्याचे साक्षेपी अधिकारी श्री. ल.रा. पांगारकर म्हणतात– ''ज्ञानेश्वरीत कर्म आहे पण कर्माची कटकट नाही, भक्ती आहे पण ती भोळीभाबडी नाही, ज्ञान आहे पण केवळ शब्दज्ञान नाही.''

ज्ञानेश्वरीने योगमार्गाला भक्तीची बैठक दिली आहे आणि भक्तीला ज्ञानाचा डोळाही दिला आहे. हा संगम खरोखरच अपूर्व आहे. ज्ञानेश्वरी हा एकाच वेळी तत्त्वज्ञानाचा ग्रंथ आहे त्याच वेळी आणि तो अनुपम असा काव्यग्रंथही आहे. ज्ञानदेवांनी 'नवरसी वर्षेन मी' असे म्हटले असले, तरीही ज्ञानेश्वरी 'शांत' रसाची मेजवानी आहे. नवरसांत भक्तिरसाची भर ज्ञानदेवांनी घातली आहे. गुरुदेव रानडे ज्ञानेश्वरीबद्दल म्हणतात– ''उपमा, भाषा, सौंदर्य, तत्त्वज्ञान, साक्षात्कार, भक्ती आणि अद्वैत यांची सांगड; अलौकिक निरीक्षणशक्ती; अप्रतिहत कवित्वशैली; अलोट वाङ्मयमाधुर्य या सर्व गुणांच्या संमिश्रणाने ज्ञानेश्वरी हा ग्रंथ 'न भूतो न भविष्यति' असा झाला आहे.'' आचार्य विनोबा भावे म्हणतात– ''ज्ञानेश्वरी हा मराठी भाषिकासाठी एकच धर्मग्रंथ सुपर्याप्त आहे.''

**संत एकनाथांचे 'भागवत'**

वारकरी संप्रदायाचे दैवत श्रीविठ्ठल हा भगवान गोपाळकृष्णाचाच अवतार आहे. ज्ञानदेवांनी श्रीकृष्णाच्या भगवद्‌गीतेवर भाष्य लिहून वारकरी संप्रदायाला 'ज्ञानेश्वरी'चे अधिष्ठान दिले आणि संत एकनाथांनी 'श्रीमद्‌भागवत' या संस्कृत ग्रंथावर मराठीत भाष्य लिहिले व वारकऱ्यांना 'नाथ भागवत' हा श्रीकृष्णलीला वर्णनाचा ग्रंथ मिळाला. गीता हे श्रीकृष्णाचे तत्त्वज्ञान आहे तर भागवत हे श्रीकृष्णाचे लीलारूप जीवन–चरित्र आहे. अशा प्रकारे संत एकनाथ यांनी वारकरी संप्रदायातील त्रुटी दूर करून तो परिपूर्ण केलेला आहे.

संस्कृतमधील 'श्रीमद्‌भागवत' हा अनेक स्कंधाचा प्रचंड ग्रंथ आहे. त्यातील ११ व्या स्कंधावर एकनाथांनी भाष्य केलेले आहे. गीतेत जसा कृष्णार्जुन संवाद आहे, तसा भागवताच्या ११ व्या स्कंधात उद्धव–श्रीकृष्ण संवाद आहे. काही जण त्यास 'उद्धवगीता' असेच म्हणतात. संत एकनाथांच्या मराठी भागवतात १८ हजार ओव्या आहेत म्हणजे ज्ञानेश्वरीच्या दुप्पट. ह्या ग्रंथाच्या लेखनाचा प्रारंभ एकनाथांनी पैठण येथे केला, पण बहुतेक सर्व भाग वाराणशी येथे पूर्ण केला आहे. खरे तर श्रीमद्‌भागवतावर मराठीत भाष्य लिहिण्यास वाराणशीच्या संस्कृत पंडितांचा विरोध होता, पण शेवटी नाथमहाराजांच्या मराठी टीका–ग्रंथाची वाराणशीतील पंडितांनी हत्तीवरून मिरवणूक काढली (इ.स.१५७३).

भक्ती हा राजमार्ग आहे, हे श्रीमद्‌भागवताचे मुख्य प्रतिपादन आहे. नाथांच्या मराठी भागवतावर ज्ञानेश्वरीची दाट छाया आहे. त्यामुळे वारकरी संप्रदायात ज्ञानेश्वरी समजण्यासाठी नाथांचा भागवत ग्रंथ आधी वाचला जातो. संत तुकाराम महाराजांनी नाथ भागवताची अनेक पारायणे केलेली आहेत. व 'शरण शरण एकनाथा। पायी माथा ठेविला।' अशी वंदनाही केलेली आहे.

''ज्ञानेश्वरांच्या 'ब्रह्मसाम्राज्यदीपिका' अर्थात ज्ञानेश्वरी सारखा अध्यात्मविषयावरील महत्त्वाचा प्रबंध–ग्रंथ मराठीत दुसरा झालेला नाही. नाथांचे भागवत वारकरी संप्रदायाच्या धर्ममंदिराचा आधार स्तंभ आहे.'' संत

बहिणाबाई यांनी तसा नाथांचा गौरवही केलेला आहे. वारकरी संप्रदायाचे अध्वर्यू ह.भ.प. धुंडामहाराज देगलूरकर यांचा हा अभिप्राय नाथ भागवताचे नेमके महत्त्व विशद करणारा आहे. अनेक जण नाथांच्या भागवताला ज्ञानेश्वरीचा नवा अवतार मानतात.

**श्रीतुकारामगाथा**

ज्ञानदेवांच्या ज्ञानेश्वरीला 'ब्रह्मसाम्राज्यदीपिका' म्हणून गौरवले जाते तर तुकाराम महाराज यांच्या अभंगगाथेला वारकरी 'पाचवा वेद' मानतात. सुमारे चार-साडेचार हजार अभंग त्यांच्या नावावर आहेत. त्यांच्या अभंगांतून ज्ञानेश्वरी व नाथ भागवत यांतील भक्तीचाच बोध होतो. या दृष्टीने तुकाराम महाराज भागवत धर्ममंदिराचे कळस ठरतात. संत नामदेव पांडुरंगासह स्वप्नात आले व त्यांनी अभंग लिहिण्याची आज्ञा व प्रेरणा दिली असे संत तुकाराम आपल्या अभंग लेखनाबद्दल सांगतात. वारकरी संप्रदायात 'ज्ञानाचा एका' आणि 'नामाचा तुका' अशी जोडी मानली जाते. काही खोडसाळ अभ्यासक ज्ञानदेव-नामदेव-एकनाथ यांच्यापासून तुकारामांना वेगळे काढतात व स्वतंत्र दाखवितात, पण हा तुकोबांवरच अन्याय आहे. खुद्द तुकोबाच-ज्ञानदेव-एकनाथ-नामदेव यांना जो वडीलकीचा व पूर्वसुरींचा मान देतात तो हिरावून घेणारे आपण कोण? तुकाराम गाथेतील अभंग हे ज्ञानेश्वरी, नामदेवगाथा, भागवत यांमधील तत्त्वाचाच नवा आविष्कार आहे.

संत तुकोबांचे दहावे वंशज व संतसाहित्याचे आणि तत्त्वज्ञानाचे थोर चिंतक-अभ्यासक डॉ. सदानंद देहूकर यांची धारणा पुढीलप्रमाणे सांगता येईल- ''वारकरी संप्रदाय हा मराठी संस्कृतीचा मुख्य प्रवाह आहे. तुकोबांना समजून घेतले म्हणजे वारकरी परंपराच समजली, म्हणजेच मराठीच्या आकलनाची कळच हातात आली. तुकोबांचे विचार हे वेगळे आणि स्वतंत्र दर्शन आहे. त्याच्या मांडणीची सुरुवात प्रथम ज्ञानदेवांनी केली. तुकोबांनी ती पूर्णतेला नेली.''

प्रा. राम बापट म्हणतात- ''आमुचा स्वदेश। भुवनत्रयामाजी वास।।'' असे म्हणणाऱ्या तुकोबांच्या आत्मप्रत्ययाचा आवाका देश, धर्म, जात ह्यांच्या सीमा ओलांडून एकूण मानवतेला कवेत घेणारा आहे.''

या वारकरी प्रस्थानत्रयीशिवाय संत नामदेवांची अभंग गाथा, नाथांचे रुक्मिणी स्वयंवर, विविध संतांचे हरिपाठ आणि स्फुट अभंग हे वारकरी संप्रदायाने मराठी सारस्वताला दिलेले अपूर्व ऐश्वर्य आहे.

**वारकरी फड-परंपरा**

वारकरी संप्रदायामध्ये 'संत परंपरा' जेवढी महत्त्वाची आहे, तेवढीच संत तुकारामोत्तर काळात विशेष जोमाने उत्कर्ष पावलेली 'फड-परंपरा' महत्त्वाची व अनन्यसाधारण आहे. वारकरी संप्रदायाची सध्याची सुदृढ संघटनरूपी भव्यदिव्य इमारत ज्या मजबूत पायावर उभी आहे, तो पाया व मुख्य ढाचा (स्केलेटन) आहे वारकरी फड-परंपरा!

ही फड-परंपरा संत नामदेवांपासून प्रारंभ झाल्याचा संत तुकारामांचाच अभंग आहे. ''शिंपीयाचा पोर एक खेळीया नामा । ......... तेणे सतत फड जागविला रे ।।'' संत तुकोबांचाही फड होता. पण फड-परंपरेला खरी ऊर्जितावस्था आणून जोमाने उत्कर्ष केला तो मल्लप्पा वासकर यांनी. त्यांना संत तुकोबांचा साक्षात अवतार मानले जाई.

फड म्हणजे वारकऱ्यांच्या विशिष्ट समूहाचा एक गट. प्रत्येक फडाचा एक संस्थापक असतो व त्या संस्थापकाला आपला गुरू समजून, त्याच्याकडून वा त्याच्या गादीवरील अधिकारी उत्तराधिकाऱ्याकडून, ज्याला वारकरी व्हायचे आहे, असे भाविक तुळशीची माळ व वारीचे व्रत अनुग्रहरूपाने स्वीकारतात. आणि असा अनुग्रह घेणाऱ्यांचा गट त्या विशिष्ट फडाचे वारकरी म्हणून ओळखला जातो. वारकरी संप्रदायात असे अनेक 'फड' आहेत. अनेक फड व त्या फडांचे हजारो-लाखो अनुग्रहीत वारकरी, हे या संप्रदायाचे स्वरूप आहे. फड-मठ-दिंड्या ही वारकरी संप्रदायाची संघटनात्मक रचना आहे.

डॉ. भा. पं. बहिरट आपल्या 'वारकरी संप्रदाय उदय व विकास' या ग्रंथात वारकरी फडाची व्याख्या पुढीलप्रमाणे

करतात– फड म्हणजे वारकरी प्रमुख व त्यांच्या शिष्य मंडळींचा संघटित समुदाय. प्रत्येक फडाची पंढरपूर येथे आपली अशी जागा असते. तेथे त्या फड प्रमुखाच्या आधिपत्याखाली त्या–त्या फडाचे दिवसभराचे धार्मिक कार्यक्रम होतात. वारकरी पंढरपूरला वारीला येतो, तेव्हा आपल्या गुरूच्या फडावर जातो व वारी संपेपर्यंत त्याचा मुक्काम फडावर असतो. फडावर पहाटेपासून रात्री उशीरापर्यंत भजन–प्रवचन व कीर्तन असे कार्यक्रम होतात. या सर्व कार्यक्रमांचे स्वरूप सामूहिक असते. त्यामुळे फडांवरील सर्व वारकरी या भजनात भाग घेतात व प्रवचन–कीर्तनाचे श्रवणसुख लुटतात. विशेष म्हणजे प्रत्येक फडावर २४ तास एक वीणावादक 'जय जय रामकृष्ण हरी'चे नामस्मरण करीत असतो. यालाच अखंड नामाचा जागर म्हटले जाते. साधारणतः ४ तास– ६ तासांनी वीणाधारक वारकरी बदलले जातात पण वीणावादन व नामस्मरण अखंड चालू ठेवण्याचा कटाक्ष संभाळला जातो.

## 'फड' मराठीचे सांस्कृतिक वैभव

'फड' या शब्दाला मराठीमध्ये विशेष व वैशिष्ट्यपूर्ण स्थान आहे. मराठीत ४ फड प्रसिद्ध आहेत.

१) वारकरी फड (भक्ती)

२) कुस्तीचा फड (शक्ती)

३) तमाशाचा फड (कला)

४) उसाचे फड (उद्योग)

वारकरी फडांनी भक्तीचे, कुस्तीच्या फडांनी शक्तीचे, तमाशाच्या फडांनी कलेचे आणि उसाच्या फडांनी कृषिउद्योगाचे जतन–संरक्षण व संवर्धन केलेले आहे. मराठी राष्ट्रदेवता या ४ फडरूपी हातांनी चतुर्भुज झालेली आहे. हे ४ फड हेच मराठी मनाचे ४ पुरुषार्थ आहेत.

चंद्रभागेचे स्नान, पुंडरीक दर्शन, नगर प्रदक्षिणा, विठ्ठल दर्शन आणि फडावर होणारे भजन–प्रवचन–कीर्तनाचे कार्यक्रम असा प्रत्येक वारकऱ्याचा वारीतील दिनक्रम असतो. पंढरपूरजवळ असलेल्या गोपाळपूर येथे पौर्णिमेला 'काला' नावाचा कार्यक्रम होतो व काल्याचा प्रसाद घेऊन वारकरी वारी पूर्ण झाल्याच्या आनंदात– समाधानात आपल्या गुरूची आज्ञा घेऊन गावी परत जातो. एकादशीचा उपवास, द्वादशीची क्षीरापत आणि पौर्णिमेचा गोपाळकाला यांना वारकऱ्यांच्या 'वारी'मध्ये अनन्यसाधारण असे महत्त्व आहे. या सर्व गोष्टींचे संतांनी त्यांच्या अभंगांतून सविस्तर वर्णन प्रतिपादलेले आहे. इथे विस्तारभयास्तव त्या अभंग रचना देता येत नाहीत त्याबद्दल क्षमस्व. तुका म्हणे 'काला'।वैकुंठी दुर्लभ।। असे काल्याचे दुर्लभत्व संत तुकारामांनी सांगितलेले आहे. ज्वारीच्या लाह्या–दही–साखर–मीठ–मिरच्या या पदार्थाच्या मिश्रणातून 'काला' हा प्रसाद बनविला जातो. हरिकीर्तनानंतर सर्व जण एकमेकाला 'काला' देतात, एकमेकांना तोंडात भरवितात. सारा वारकरी समाज एक आहे, इथे भेदाभेद नाही, स्पृश्य–अपृश्य भाव नाही, हे एकमेकांच्या तोंडात काला भरवून, वारकरी संप्रदाय कृतीने दाखवून देतो. वारकरी संप्रदायातील 'काला' हे वारकरी समतेचे सर्वोच्च कृतिरूप दर्शन आहे. रोटी व्यवहारातील ही कृतिरूप समता वारकरी आचारधर्माचा प्रमुख भाग आहे.

## प्रमुख 'फड', मठ आणि दिंड्या

संत नामदेव महाराजांचा फड, श्रीतुकाराम महाराजांचा देहूकर फड आणि संत तुकाराम महाराजांचा विद्यावंश मानल्या गेलेल्या वै. मल्लाप्पा वासकर यांचा वासकर फड; हे संप्रदायातील मुख्य आद्य फड मानले जातात. या तीन प्रमुख आद्य फडांपासून पुढे अनेक शाखा–उपशाखा निघाल्या. वारकरी संप्रदायाच्या विस्तारासाठी अनेक उपफडांची, शाखांची निर्मिती झाली. अनेक मठ निर्माण झाले. हजारो दिंड्या निघाल्या.

संत ज्ञानेश्वरांपासून ते संत तुकाराम महाराजांपर्यंत म्हणजे १३ वे ते १६ वे शतक असा तीनशे–साडेतीनशे वर्षांचा वारकरी संप्रदायाच्या वाटचालीचा प्रवास हा एखादा प्रमुख संत व त्याची प्रभावळ याभोवती केंद्रीभूत होता. संत ज्ञानेश्वर, संत नामदेव, संत एकनाथ आणि संत तुकाराम यांनी त्यांच्या काळातील वारकरी भक्ती चळवळीचे नेतृत्व केले, पण संत तुकारामांनंतर संत बहिणाबाई, संत निळोबा, संत शंकरस्वामी सिऊरकर हे संत झाले. पण

संप्रदायांचा विस्तार व संघटनात्मक वाढ फड-परंपरेच्या अंगाने झाली. एका प्रमुख संताऐवजी विविध फडांचे प्रमुख आणि मठाधिपती यांनी संप्रदायाचे सामूहिक नेतृत्व करीत भागवत धर्माची चळवळ खेडोपाडी रुजवली. व्यक्तीकडून संस्थागत सामूहिक नेतृत्वाकडे झालेले वारकरी संप्रदायातील हे परिवर्तन विशेष अभ्यासण्यासारखे आहे.

आज संप्रदायामध्ये नामदेवमहाराजांचा फड, देहूकरांचा फड, वासकर महाराजांचा फड या तीन प्रमुख फडांशिवाय आजरेकरांचा फड, गंगूकाका शिरवळकरांचा फड, ठाकूरबुवांचा फड, बेलापूरकरांचा फड, राशिनकरांचा फड, कऱ्हाडकरांचा फड, दादामहाराज सातारकरांचा फड, बंकटस्वामींचा फड, साखरेमहाराजांचा फड, धोंडोपंतदादांचा फड, औसेकर महाराज फड हे वारकरी फड प्रसिद्ध आहेत.

फडांनंतर वारकरी संघटनेतील आणखी एक प्रमुख अंग म्हणजे विविध मठ व त्या मठांचे मठाधिपती. पंढरपूर क्षेत्री आजही अनेक मठ वारकरी भक्ती परंपरेचे जोमाने वहन करीत आहेत. त्यामध्ये महिपतीमहाराज मठ, अंमळनेरकर महाराजांचा मठ, चातुर्मास्ये महाराजांचा मठ, तनपुरे महाराज मठ, मनमाडकर महाराजांचा मठ, कुकुरमुंडे यांचा मठ, पुणेकर मठ, वडगावकर मठ, जळगावकर मठ, चोपडकर मठ, गुंडामहाराज मठ, खंदारकर महाराजांचा मठ असे प्रमुख मठ आहेत. त्या-त्या मठांचे वर्तमान उत्तराधिकारी आपला भक्ति वारसा जतन करीत आहेत. फडा-प्रमाणेच प्रत्येक मठाचे दिवसभराचे विविध प्रकारचे भजन-पूजन, प्रवचन, कीर्तन, पारायण असे कार्यक्रम परंपरेने ठरलेले आहेत.

'फड' आणि 'मठ' यांप्रमाणेच फडाशिवाय म्हणजे स्वतःचा स्वतंत्र फड न स्थापता, काही आध्यात्मिक अधिकारी व्यक्तींचे वारकरी संप्रदायाच्या कार्यातील योगदान ऐतिहासिक स्वरूपाचे आहे. या महनीय व्यक्तींमध्ये कै. शं.वा. तथा मामासाहेब दांडेकर, ह.भ.प. धुंडामहाराज देगलूरकर, केशवबुवा देशमुख, विष्णुपंत जोग, शंकरमहाराज कंधारकर, रंगनाथ महाराज परभणीकर, यशवंतबुवा जालनापूरकर यांचे कार्य नोंद घेण्यासारखे आहे. मामासाहेब दांडेकर व धुंडामहाराज यांना वारकरी संप्रदायातील राम-लक्ष्मणाची जोडी असे गौरवाने म्हटले जाते व संप्रदायाचे 'अध्वर्यू' मानले जाते.

फड, मठ अध्वर्यू महनीय व्यक्तींनंतर वारकरी संप्रदायाच्या संघटनेतील अखेरचा-तळातला प्रमुख घटक म्हणजे 'दिंडी'! वारकऱ्यांचा भजन करणारा सुसंघटित व विशिष्ट रचना असणारा घटक म्हणजे दिंडी. या दिंडीची रचना मोठी वैशिष्ट्यपूर्ण असते. या दिंडीत वारकऱ्यांची संख्या कमीजास्त कितीही असते. किमान १५पासून कमाल १५०० पर्यंत असू शकते. दिंडीत सर्व वारकऱ्यांजवळ टाळ असतात. दिंडीत गरजेनुसार एकापेक्षा अधिक मृदंगवादकही असतात. पण एका दिंडीत एकच वीणेकरी हा दंडक आहे. टाळ, मृदंग, वीणेकरी यांच्यानंतर दिंडीत भगवी पताका खांद्यावर घेणारा एक गट असतो तसेच तुळशीवृंदावन डोक्यावर घेऊन दिंडीत बरोबर चालणारी एक महिला वारकरी असते. तसेच एक महिला वारकरी डोक्यावर पाण्याचा हंडा घेऊन दिंडीत चालत असते. ती गरजेनुसार दिंडीतील वारकऱ्यांना पिण्यास पाणी देते. कारण तहान लागली तरी वारकरी दिंडी सोडून जात नाहीत, तसा दंडक आहे. दिंडीत तुळस ही श्रीकृष्ण परमात्म्याचे म्हणजेच श्रीविठ्ठलाचे प्रतीक मानले जाते. 'देवाच्या सान्निध्यात, देवाला सोबत घेऊन, देवाची वारी करणे हे दिंडीचे स्वरूप आहे.' ही वारकरी धारणा व मनोभूमिका सर्वस्वी वैशिष्ट्यपूर्ण आहे.

साधारणतः एका गावाची एक वारकरी दिंडी असते. काही मोठ्या गावांत अनेक दिंड्याही असतात तर काही वेळा अनेक गावांतील वारकरी एकत्र येऊन एकच दिंडी बनवितात. ही दिंडी एकाच विशिष्ट फड-प्रमुखाच्या शिष्यपरिवाराची असते. एका फडाशी अशा शेकडो दिंड्या संलग्न असतात. संत ज्ञानेश्वर व संत तुकाराम ह्यांच्या आळंदी ते पंढरपूर पालखी सोहळ्यात या दिंड्यांना परंपरेने एक मानाचे स्थान आहे. अशा प्रकारेच महाराष्ट्रातील विविध संतांच्या ज्या पालख्या आषाढी महायात्रेसाठी पंढरपुरी येतात. त्या प्रत्येक पालखी सोहळ्यात अनेक दिंड्या सहभागी असतात. दिंडीत केव्हा कोणते अभंग म्हणायचे, हे दिंडीचालक या नात्याने वीणेकरी ठरवितो.

दिंडीच्या पायी वाटचालीचे संचलन सुसूत्रपणे होण्यासाठी दिंडीप्रमुखाच्या मार्गदर्शनाखाली काही चोपदार महत्त्वाची भूमिका पार पाडत असतात. दिंडीची एखाद्या संताच्या गावापासून पंढरीकडे होणारी पायी वाटचाल ही केवळ प्रवास वा पायपीट नसते तर भावपूर्ण श्रद्धायुक्त अंतःकरणाने भजन करीत, अभंग गात केलेली आनंदयात्रा असते. ईश्वराचे सततचे नामस्मरण व अनुसंधान हा दिंडीचा अंतरंग स्थायिभाव असतो. त्यामुळे या पायी वाटचालीतील ऊन, वारा, पाऊस, पूर ही नैसर्गिक संकटे किंवा खाण्यापिण्याच्या गैरसोई या साऱ्या अडचणी वारकऱ्यांना कधीच त्रासदायक वाटत नाहीत. या संकटांच्या रूपांतही आम्हांला विठ्ठलच दिसतो, असे वारकरी म्हणतात तेव्हा त्यांच्या मनातील दुर्दम्य कोटीचा भक्तिभाव व्यक्त होतो.

**पालखी सोहळे**

पंढरपूरला दरवर्षी चार यात्रा भरतात. आषाढी, कार्तिकी, चैत्री आणि माघी. या चार यात्रांपैकी आषाढी यात्रेला महायात्रा म्हटले जाते. आषाढी यात्रेसाठी महाराष्ट्राच्या विविध भागांतून, वेगवेगळ्या गावांतून निरनिराळ्या संतांच्या नावे पालख्या निघतात व पायी पंढरपूरला जातात. या संतांच्या पालखी सोहळ्यातील मुख्य पालखी सोहळा म्हणजे आळंदी ते पंढरपूर अशी वाटचाल करणारा संत ज्ञानेश्वरांचा पालखी सोहळा होय! त्यानंतर देहू येथून निघणारा संत तुकोबांचा पालखी सोहळा.

याशिवाय महाराष्ट्राच्या विविध भागांतून पुढील संतांच्या पालख्या पंढरीस येतात - संत निवृत्तिनाथ (त्र्यंबकेश्वर), संत सोपानकाका (सासवड), संत मुक्ताबाई (एदलाबाद), संत नामदेवमहाराज (पंढरपूर), संत नरहरी सोनार (पंढरपूर), संत रोहिदास (पंढरपूर), संत चोखोबा व संत बंका (मंगळवेढे–मेहुणपुरा), गुरू जनार्दनस्वामी (औरंगाबाद), संत एकनाथ (पैठण), संत दामाजी (मंगळवेढे), संत जयरामस्वामी (वडगाव), संत शेकूबाबा (शिरसावडी), संत घाडगेबाबा (कोळे), संत तपकिरीबुवा (चिंचगाव), मच्छिंद्रनाथ (मच्छिंद्रगड), गोरक्षनाथ (शिराळा), संताबाई (पंढरपूर), रुक्माबाई (कौंडिण्यपूर – अमरावती), संत शंकर महाराज (माहुली – अमरावती), संत ज्ञानेश्वर महाराज (नेवासे), संत समर्थ रामदास (सज्जनगड), संत सावता महाराज (अरणभेंडी), संत गोरोबाकाका (तेरेढोकी), संत कूर्मदास (लहूळ), संत निळोबाराय (पिंपळनेर), संत नृसिंहस्वामी (मेहेकर–बुलढाणा), स्वरूपानंद (थानेगाव – बुलढाणा), संत श्रीभूतेश्वर महाराज (नागपूर), संत श्री. निंबराज महाराज (दैठण – श्रीगोंदा), पूर्णानंद (भोगनूल – बेळगाव), संत गजाननमहाराज (शेगाव), संत श्रीगुलाबमहाराज (विदर्भ), संत श्रीसाधुमहाराज (कंधार,जि. नांदेड), संत चैतन्यमहाराज (ओतूर), संत वटेश्वर महाराज (सासवड), संत शेषनारायण (वाढवणे – चांदूर) इत्यादी. पालखी सोहळ्यात समाविष्ट होणाऱ्या या पालख्या सर्व प्रसिद्ध आहेत.

अवघ्या महाराष्ट्रातून ६०–७० संतांच्या पालख्या वाटेतील गावांशी संपर्क करीत १८ ते २२ दिवस पायी प्रवास करीत पंढरपूरला आषाढी महायात्रेला जातात. ज्ञानदेवांच्या पालखी समवेत २०० दिंड्यांमध्ये दीड–दोन लाख वारकरी चालत पंढरीस येतात. त्यानुसार इतर संतांच्या पालखी सोहळ्यातही हजारो वारकरी सहभागी होतात. या सर्व पालख्या आषाढ शुद्ध नवमीला पंढरपूरजवळ ‘वाखरी’ येथे एकत्र येतात व दुसरे दिवशी दशमीला वाखरी ते पंढरपूर अंतर एकापाठोपाठ एक चालत पंढरीनगरीत प्रवेश करतात. पंढरीत भरणाऱ्या चार वाऱ्यांपैकी फक्त आषाढीलाच अशा पालख्या पायी येतात. अन्य चार यात्रांना – वारींना वारकरी आपल्या सोईनुसार वाहनाने येतात. ही आषाढी वारीची परंपरा ज्ञानदेवकाळापासून चालू आहे. म्हणजे सामूहिक वारी सोहळ्यास हजार वर्षांची प्रदीर्घ परंपरा आहे. संत तुकाराम महाराज देहूहून प्रथम आळंदीस व तेथून पंढरीस जात होते. तुकोबांचे चिरंजीव नारायण महाराज यांनी देहू येथून तुकाराम महाराजांच्या पादुका व आळंदी येथून संत ज्ञानदेवांच्या पादुका घेऊन सोहळ्याच्या रूपात पंढरीची वारी सुरू केली. पुढे ही पद्धत काही वर्षे बंद पडल्याने ह.भ.प. हैबतबाबा यांनी आळंदी येथून संत ज्ञानदेव

पालखी सोहळा सुरू केला. म्हणून त्यांना पालखी सोहळ्याचे प्रवर्तक मानले जाते. त्यांनी पालखी सोहळ्याला राजवैभवी स्वरूप दिले व लष्करी शिस्त लावली. हैबतबाबांनी नव्याने प्रारंभ केलेल्या या पालखी सोहळ्यातील भजनादी अन्य व्यवस्था करण्यामध्ये आळंदीकर, विठोबा वासकर आणि खंडुजीबाबा यांचे विशेष योगदान लाभले. १८२७ मध्ये ह.भ.प. हैबतबाबांनी सुरू केलेला आळंदी-पंढरपूर पालखी सोहळा गेली १८२ वर्षे अव्याहतपणे सुरू आहे.

विविध संतांचे हे पालखी सोहळे म्हणजे एक जनजागरण आहे. हा जनप्रबोधनाचा नामसोहळा आहे. भक्तिसुखाचा वर्षाव करीत या पालख्यांनी अवघ्या महाराष्ट्रात भक्तीचे मळे फुलविलेले आहेत. पालख्यांची पायी वाटचाल, वाटेतील गावे, नित्यनैमित्तिक भजन, प्रवचन, कीर्तन हरिजागर यांविषयी सविस्तर लिहिण्यासारखे आहे पण लेखमर्यादेमुळे तपशील देत नाही. या प्रतिवर्षीच्या पालख्या व त्यायोगे होणाऱ्या अमृतसिंचनामुळेच अवघा महाराष्ट्र वारकऱ्यांनी भक्तीने भारावून टाकला आहे व त्यामुळेच वारकरी विचारधारेला महाराष्ट्राची सत्त्वधारा होण्याचे भाग्य लाभलेले आहे.

**समारोप**

उपरोक्त लेखात आपण वारकरी संप्रदाय पूर्व स्थिती, संप्रदायाचा उदय-विस्तार, संप्रदायाची विशेषता, विचारधर्म, आचारधर्म; प्रमुख संत, त्यांचे प्रमुख वाङ्मय या विषयांची वरवर माहिती घेतली आहे. सूक्ष्म बारकाव्याचा तपशीलवार विचार केलेला नाही. कारण हा लेख वारकरी संप्रदायाची तोंडओळख अशा स्वरूपाचा आहे.

वारकरी संप्रदायाची तीर्थक्षेत्रे, पालखी सोहळे, फड परंपरा व दिंड्या, विविध मठ, विठ्ठल मंदिरातील सोहळे, पंढरीनगरीचे माहात्म्य, वारकरी संप्रदायाचे सामाजिक योगदान असे अनेक मुद्दे- विषय आहेत.

प्राचीन भारतीय विचारधारेत संप्रदायाचे मूलतः ४ प्रकार कल्पिलेले आहेत. प्रकाश, स्वरूप, आनंद आणि चैतन्य असे ते मूल संप्रदाय (स्कूल) होत. या ४ पैकी वारकरी संप्रदाय हा 'प्रकाश' स्कूलमध्ये मोडणारा संप्रदाय आहे. समर्थ संप्रदाय 'स्वरूप' वर्गात मोडतो. मध्ययुगीन काळात महाराष्ट्रातील सर्व संप्रदायांमध्ये वारकरी हा सर्वांत प्रमुख संप्रदाय राहिला म्हणूनच त्याला महाराष्ट्राची सत्त्वधारा असा गौरव प्राप्त झाला. ''महाराष्ट्रात या काळात अनेक संप्रदाय होते. पण त्यात वाद नव्हता तर सुसंवाद होता.'' डॉ. रा. चि. ढेरे म्हणतात- ''हिंदू धर्माचा मूलतः व्यापक व समन्वयी दृष्टिकोन या सर्व संप्रदायांत कमीअधिक प्रमाणात रुजलेला दिसतो. या सांप्रदायिक समन्वयाचे रहस्य मराठी संतांच्या शुद्ध विवेकनिष्ठेत आहे.''

वारकरी संप्रदायाची कामगिरी पाहता वारकरी संप्रदायाचे योगदान, सामाजिक फलश्रुती काय? हा प्रश्न विशेष महत्त्वाचा आहे. वारकरी संप्रदायाच्या योगदानातील ठळक मुद्दे जाणवतात ते असे- सर्वप्रथम वारकरी संप्रदायाचे मुख्य कार्य पारमार्थिक क्षेत्रातील असून त्याचे सामाजिक व वाङ्मयीन कार्य आनुषंगिक स्वरूपाचे आहे, हे लक्षात घेऊन आपण त्याच्या योगदानाचा विचार केला पाहिजे.

वारकरी संप्रदायाने वेद मानले पण त्यातील उणिवा सोडून. म्हणून वेदाऐवजी चारी वर्णांना मुक्त प्रवेश अशा भगवद्गीतेवर ज्ञानदेवांनी लोकभाषेत भाष्यग्रंथ लिहिला. पारमार्थिक समता निर्माण केली. जन्म, विद्या आणि धन इत्यादी बाह्य गोष्टींमुळे येणारा न्यूनगंड वारकरी संतांनी दूर केला व मनुष्य कितीही हीन दशेत असला, तरी त्याला भक्तीचा अधिकार आहे. हे प्रत्यक्ष आचाराने सिद्ध करून दाखविले. दासी जनीचा संत जनाबाईपर्यंतचा झालेला व्यक्तिविकास याचे ढळढळीत उदाहरण आहे.

कर्मकांड, योग, यागविधी यांना दूर सारून सर्वजन सुलभ नामभक्तीला आणि नीतिमूल्याधिष्ठित आचाराला वारकरी संतांनी प्रस्थापित केले. तळागाळातील वेदवंचित समाजबांधवांना भक्तिप्रेमाने जवळ करीत त्यांना नाममंत्र देऊन आत्मविश्वासाने पारमार्थिक विकासाच्या मार्गात आणले. स्त्री-शूद्रादिकांना आत्मविकासाचा मार्ग खुला करून दिला.

वारकरी संतांचे कार्य पारमार्थिक असले, तरी त्यांचे वाङ्मयीन कार्य अभूतपूर्व व अपूर्व स्वरूपाचे आहे. ते

तत्कालीन नसून सार्वकालिक आहे. ‘ज्ञानेश्वरी’ व ‘तुकाराम गाथा’ हे आता केवळ वारकऱ्यांचेच नव्हे तर युनेस्को प्रचारामुळे अवघ्या मानवजातीचे ग्रंथ ठरले आहेत.

‘‘वारकरी संप्रदायाने केलेल्या लोकजागरणामुळेच महाराष्ट्रात छत्रपती शिवाजी महाराजांच्या हिंदवी स्वराज्याला पोषक व प्रेरक पार्श्वभूमी तयार झाली.’’ असे सांगून न्या.रानडे यांनी संतांचे कार्य सर्वांच्या लक्षात आणून दिले. मराठी भाषा, मराठी संस्कृती यांमध्ये वारकरी संप्रदायाचे योगदान अनन्यसाधारण आहे. म्हणूनच राजाराम शास्त्री भागवत, इरावती कर्वे यांनी वारकरी संप्रदायाला महाराष्ट्राची ‘सत्त्वधारा’ म्हणून सार्थपणे गौरविलेले आहे. वारकरी संतांच्या लोकोत्तर कार्याचा परिचय करून देताना डॉ. मुकुंद दातार म्हणतात – ‘‘संत ज्ञानदेवांनी आपणास ‘स्नेहधर्म’ शिकविला, संत एकनाथांनी ‘लोकधर्म’ शिकविला तर श्रीतुकारामांनी ‘विश्वधर्म’ शिकविला. वारकरी संप्रदाय आपणास नेहमीच समतेचा, ममतेचा आणि एकतेचा संदेश देणारा आहे.’’

**संदर्भ** :

१. श्रीज्ञानेश्वरी, श्रीतुकाराम गाथा
२. श्रीनाथ भागवत
३. सकल संत गाथा
४. वारकरी संप्रदायाचा इतिहास, प्राचार्य शं. वा. दांडेकर.
५. वारकरी संप्रदाय– उदय विकास, डॉ. भा. पं. बहिरट.
६. वारकरी संप्रदाय, दादामहाराज मनमाडकर.
७. हरिपाठ विवरण, धुंडामहाराज देगलूरकर.
८. ऐसा विटेवर देव कोठे, म. वा. धोंड.
९. ज्ञानेश्वरी दर्शन, डॉ. वि. रा. करंदीकर.
१०. तुकाराम दर्शन, डॉ. सदानंद मोरे.
११. विठ्ठलः एक महासमन्वयः डॉ. रा. चिं. ढेरे.
१२. विवेकः वारकरी विशेषांक (१९९० ते १९९५), संपादक विद्याधर ताठे.
१३. वारकरी पंथाचा इतिहास, शंकर विठोबा पाटील.
१४. वारकरी संप्रदायाची प्रस्थानत्रयी, डॉ. मुकुंद दातार.
१५. भारतीय संप्रदाय, डॉ. शंकर अभ्यंकर.
१६. जीवन साधना, प्राचार्य अ. दा.आठवले.
१७. Cult of Vithoba, जी. ए. दलरी.

* * *





संत रामदास स्वामी.

# समर्थ संप्रदाय

■ सुनील चिंचोळकर

**स्वतः समर्थांनी आपल्या संप्रदायाला समर्थ संप्रदाय असे नाव कधीच दिले नाही. ते तर रामचंद्रांना समर्थ म्हणत असत. आपल्या दासबोध ग्रंथाला ते 'समर्थ कृपेची वचने' म्हणतात. 'समर्थाचिया सेवका वक्र पाहे' या श्लोकातही त्यांनी रामालाच समर्थ म्हटले आहे. रामाबद्दलची कृतज्ञता व्यक्त करताना एका करुणाष्टकात ते म्हणतात – 'समर्थे दिले सौख्य नाना परीचे'. समर्थांनी आपल्या शिष्यांना जे नियम किंवा जी आचारसंहिता सांगितली होती, तीच समर्थ संप्रदायाची घटना ठरली.**

संप्रदाय याचा अर्थ सद्‌गुरूकडून पारंपरिक ज्ञान शिष्याला सम्यक प्रदान होणे. संप्रदाय म्हणजे जाणत्याकडून नेणत्याकडे ज्ञान प्रवाहित होणे. पूज्यपाद शंकराचार्यांनी हिंदुस्थानाच्या चारही दिशांना चार मठ स्थापन करून चार प्रकारचे संप्रदाय स्थापन केले. स्वरूप, प्रकाश, आनंद आणि चैतन्य अशी नावे त्यांनी त्या चार मठांना दिली. आज भारतात संप्रदायांच्या या चार प्रकारच्या शाखा सर्वत्र आढळतात. यांतील समर्थ संप्रदाय हा स्वरूप संप्रदाय आहे. खुद्द समर्थांच्या शब्दांत सांगायचे झाल्यास –

'स्वरूप संप्रदाय अयोध्या मठ।<br>
जानकी देवी श्रीरघुनाथ दैवत।<br>
मारुती उपासना नेमस्त।<br>
वाढविला परमार्थ रामदासी।।'

स्वतः समर्थांनी आपल्या संप्रदायाला समर्थ संप्रदाय असे नाव कधीच दिले नाही. ते तर रामचंद्रांना समर्थ म्हणत असत. आपल्या दासबोध ग्रंथाला ते 'समर्थ कृपेची वचने' म्हणतात. 'समर्थाचिया सेवका वक्र पाहे' या श्लोकातही त्यांनी रामालाच समर्थ म्हटले आहे. रामाबद्दलची कृतज्ञता व्यक्त करताना एका करुणाष्टकात ते म्हणतात – 'समर्थे दिले सौख्य नाना परीचे'. समर्थांच्या शिष्यांनी त्यांच्या पश्चात या संप्रदायाला 'समर्थ संप्रदाय' असे नाव दिले. समर्थांनी आपल्या शिष्यांना जे नियम किंवा जी आचारसंहिता सांगितली होती, तीच समर्थ संप्रदायाची घटना ठरली.

मूलभूत तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने महाराष्ट्रातील सगळे प्रमुख संप्रदाय शंकराचार्यांच्या अद्वैत वेदान्ताशी मिळते–जुळते आहेत. प्रपंचाची असारता, दृश्य जगताचे मिथ्यत्व, मनाचे स्वरूप, मन निर्वासन करणे, मोक्ष ही संकल्पना, सद्‌गुरू आणि सद्‌शिष्य, नवविधा भक्ती, सगुण उपासना, निर्गुण उपासना, सगुण–निर्गुण समन्वय, वर्ण व्यवस्था आणि आश्रम धर्म, चार प्रकारचे योग, नरदेहाची दुर्लभता, भगवंताचे स्वरूप हे सर्व विषय सर्वच संतांनी सांगितले. या विषयांच्या बाबतीत सर्व संतांमध्ये मतैक्यदेखील आढळते. तरीदेखील समर्थ संप्रदाय महाराष्ट्रात वेगळा समजला जातो. याचे कारण समर्थांनी 'श्रीमद् दासबोध' या समर्थ संप्रदायाच्या प्रधान प्रवृत्तिवादाचा अथवा प्रपंचकारणाचा ठामपणे पुरस्कार केला. सर्वच संतांनी त्रिगुण विचार मांडताना सत्त्वगुणाचा पुरस्कार केला आणि रजोगुण–तमोगुण त्याज्य मानले.

समर्थ रामदासांनी मात्र रजोगुणाचा पुरस्कार ठामपणे केला. प्रपंचाची नश्वरता समर्थांनीदेखील सांगितली आहे. भारतभ्रमण केल्यानंतर समर्थांनी वैयक्तिक मोक्षापेक्षा राष्ट्रहिताला जास्त महत्त्व दिले. केवळ एकट्या माणसाने आत्मज्ञानी व्हायचे आणि हजारो माणसांनी अज्ञानाच्या अंधकारात चाचपडत राहायचे, ही गोष्ट समर्थांच्या मनाला रुचली नाही. समर्थांनी त्यासाठी रजोगुणाचा पुरस्कार केला. प्रपंच आणि परमार्थ यांचा समन्वय साधून माणसाने मोक्षाची साधना करावी असा विचार त्यांनी मांडला. प्रपंच हा परमार्थाला विरोधी नसून पूरक आहे, हा क्रांतिकारक विचार समर्थांनी मांडला. सामान्य माणूस प्रपंचाचा पूर्ण त्याग करू शकणार नाही, ही वास्तवता समर्थांनी स्वीकारली. ते म्हणतात –

'आधी प्रपंच करावा नेटका। मग घ्यावे परमार्थ विवेका।।
येथे आळस करू नका। विवेकी हो।।
प्रपंच करावा नेमका। पहावा परमार्थ विवेक।।
जेणे करीता उभय लोक। संतुष्ट होती।।
प्रपंची जो सावधान। तोच परमार्थ करील जाण।
प्रपंची जो अप्रमाण। तो परमार्थी खोटा।।
प्रपंच सुखनैव करावा। परी काही परमार्थ वाढवावा।
परमार्थ अवघाचि बुडवावा। हे बरे नव्हे।।'

अनेकदा परिस्थिती अनुकूल नसली किंवा कर्तृत्व नसले म्हणजे माणसे परमार्थाच्या मागे लपून त्यागाची भाषा बोलू लागतात. हा त्याग आहे की पलायनवाद आहे, याची सीमारेषा लक्षात येण्यासाठी अत्यंत सूक्ष्म बुद्धी हवी. समर्थ थोर मानसशास्त्रज्ञ असल्यामुळे समाजाची नाडी त्यांनी ओळखली. यवनांच्या अनन्वित अत्याचारामुळे हवालदिल झालेला हिंदू समाज नैराश्यापोटी वैराग्याची कास धरीत होता. समर्थांच्या मनाला ही गोष्ट खटकली. सत्त्वगुणाच्या नावाखाली तमोगुणाची जोपासना करण्यापेक्षा रजोगुणाचा उघडउघड स्वीकार करण्यात पुरुषार्थ आहे म्हणून समर्थांनी आदर्श कुटुंब संस्थेचा पुरस्कार केला.

राजकारणाचा अंतर्भाव हे तर समर्थ संप्रदायाचे व्यवच्छेदक लक्षण सांगावे लागेल. प्रपंचाच्या पुरस्काराच्या दोन–चार ओव्या अन्य संतांच्या वाङ्मयात शोधल्यास सापडतील. पण राजकारणाचा उघड–उघड पुरस्कार फक्त समर्थांनी केला. समर्थ म्हणतात – 'प्रवृत्तीस पाहिजे राजकारण। निवृत्तीस पाहिजे पंचीकरण।' मानवी जीवनाची आधिभौतिक आणि आध्यात्मिक अशी दोन अंगे आहेत. आधिभौतिक अंगाला अभ्युदय म्हणतात तर आध्यात्मिक अंगाला निःश्रेयस म्हणतात. भौतिक उत्कर्ष ही गोष्ट राष्ट्रीय अस्मिता अबाधित राखण्यासाठी आवश्यक असते. राज्यकर्ते कोणत्या धर्माचे आहेत, यावरून प्रजेचा धर्म ठरत असतो ह्याला इतिहास साक्ष आहे. जेते लोक आपला धर्म प्रजेवर लादतात याचा कटू अनुभव आपण यापूर्वी घेतला आणि अजूनही घेत आहोत. मुस्लीम आक्रमकांनी आमची

हजारो मंदिरे उद्‌ध्वस्त केली तर ख्रिश्चन आक्रमकांनी हजारो हिंदूंचे ख्रिश्चनीकरण केले. समर्थांनी संप्रदायात राजकारणाचा अंतर्भाव केला आणि राज्यकर्ते हिंदूच असले पाहिजेत, असा आग्रह धरला त्यालाच समर्थांचा महाराष्ट्र धर्म म्हणतात. हिंदू राष्ट्रवाद हे समर्थ संप्रदायाचे आधिभौतिक अंग होते तर आत्मसाक्षात्कार हे आध्यात्मिक अंग होते. म्हणून त्यांनी स्वतःहून शिवछत्रपतींना पत्र पाठवले. राज्यकर्ते जर हिंदू असतील, तरच सर्वधर्मसमभाव शक्य असतो. अन्य धर्मीय राज्यकर्ते त्यांचा धर्म सर्वांवर लादण्याचा प्रयत्न करतात.

समर्थांनी आणखी एका गोष्टीचे निरीक्षण केले की, त्या वेळचे यवन राज्यकर्ते अनाचारी आणि दुराचारी होते. राजा जर भ्रष्ट असेल, तर शासकीय यंत्रणादेखील भ्रष्टाचारी होऊन जाते. राजा जर चारित्र्यसंपन्न असेल, तर प्रजेच्या हिताची अनेक कामे तो निःस्पृहपणे करतो. त्या वेळचे यवन राज्यकर्ते चैनी, विलासी आणि व्यसनाधीन होते. त्यांचे हे सारे खेळ सामान्य जनतेच्या पैशातून चालत. त्या काळी पुण्यश्लोक जिजाबाईंच्या प्रेरणेने छत्रपती शिवाजी महाराजांसारखे चारित्र्यसंपन्न नेतृत्व राजकीय क्षेत्रात उदयाला आले होते. आपली संघटना शिवछत्रपतींना उपयोगी पडल्यास महाराजांचे साम्राज्य विस्तार पावेल आणि ज्या-ज्या ठिकाणी महाराजांचे स्वराज्य असेल, त्या-त्या ठिकाणी बाया-बापड्या गुण्या-गोविंदाने नांदतील तसेच सामान्य जनांना धर्माचरण शक्य होईल. या सर्व गोष्टींचा विचार करून समर्थांनी धर्मकारण आणि राजकारण यांचा समन्वय साधला. समर्थ केवळ आत्मसाक्षात्कारवादी संत नव्हते. ते मठस्थापना करणाऱ्या आचार्यांच्या परंपरेतील असल्यामुळे धर्मसंस्थापना, धर्मरक्षण आणि धर्मप्रसार या तीनही स्तरांवर त्यांना काम करायचे होते. म्हणून त्यांनी आपल्या संप्रदायाची चतुःसूत्री घोषित केली -

'मुख्य हरिकथा निरूपण। दुसरे ते राजकारण।
तिसरे ते सावधपण। सर्वविषयी॥
चौथा अत्यंत साक्षेप। फेडावे नाना आक्षेप।
अन्याये थोर अथवा अल्प। क्षमा करीत जावे॥'

संत सहसा प्रशासक नसतात. संघटना, मठ स्थापना, प्रसार या गोष्टी ते करीत नाहीत. पण समर्थ हे कुशल संघटक आणि शिस्तबद्ध प्रशासक होते. त्या काळी समर्थांनी अकराशे मठ स्थापन केले होते, असे सांगितले जाते. एवढेच नव्हे तर या सर्व मठांमध्ये समन्वय आणि सुसंवाद होता. मठपतीला तीन वर्षांतून एकदा समर्थांना भेटून आपल्या कार्याचा अहवाल सादर करावा लागे. कधी-कधी एखाद्या मठाला समर्थ अचानक भेट देत आणि तेथील कार्य ठीक चालले आहे की नाही ते पाहत. संप्रदायातील साधकाला रामदासी म्हटले जाई तर नेत्याला महंत म्हटले जाई. संप्रदायाचा स्वीकार करणाऱ्या साधकाला समर्थांनी पुढीलप्रमाणे आचार-संहिता सांगितली होती -

'प्रथम लिहिणे दुसरे वाचणे।
तिसरे सांगणे अर्थांतर॥१॥
आशंकानिवृत्ति ऐसी चौथी स्थिति।
पाचवी प्रचीति अनुभवें॥२॥
सहावें तें गाणें सातवें तें नाचणें।
ताळी वाजविणें आठवें तें ॥३॥
नवा अर्थभेद दाहावा प्रबंद।
आक्रावां प्रबोध प्रचीतीसीं॥४॥
बारावें वैराग्य तेरावा विवेक।
चौदावा तो लोक राजी राखे॥५॥
पंध्रावें लक्षण तें राजकारण।
सोळावें तें जाण अवेग्रता॥६॥
प्रसंग जाणावा हा गुण सत्रावा।
काळ समजावा सर्वा ठाई॥७॥
अठ्रावें लक्षण वृत्ति उदासीन।
लोलंगता जाण तेथे नाही ॥८॥
येकोणिसावें चिन्ह सर्वांसी समान।
राखे समधान ज्याचें त्याचे॥९॥
विसावें लक्षण रामउपासना।
वेध लावी जना भक्तिरंगे ॥१०॥
भक्तिरंगे देव देवाल्यें शिखरें।
वोटे मनोहरें वृंदावनें ॥११॥
बावी पोखरणी रम्य सरोवरे।
मंडप विवरे धर्मशाळा॥१२॥
धर्मशाळा नाना नाना दीपमाळा।
तेथे रविकुळा वाखाणावें॥१३॥

तरूवर पुष्पवाटिका जीवनें।
पावनें भुवने होमशाळा।।१४।।
उदंड ब्राह्मण ब्रह्मसंतर्पण।
पुराणश्रवण आध्यात्मिक।।१५।।
जन्मासी येऊनी अध्यात्म साधावें।
नित्य विवरावें सारासार।।१६।।
असार संसार येणे साधे सार।
पाविजेतो पार भवसिंधु।।१७।।
आयुष्य हे थोडे फार आटाआटी।
कठीण सेवटी वृद्धपण।।१८।।
येकलें चि यावे येकले चि जावें।
मधें चि स्वभावें मायाजाळ।।१९।।
मायाजाळ तुटे तरी देव भेटे।
दास म्हणे खोटें भक्तिहीण।।२०।।'

ही सारी समर्थ संप्रदायाची लक्षणे आहेत. लिहिणे, वाचणे आणि प्रबोधन करणे यांवर समर्थांचा विलक्षण भर होता. समर्थांच्या मठातून साक्षरतेचे वर्ग चालवले जात. हस्ताक्षर सुंदर असावे, याबाबतीत समर्थांचा कटाक्ष होता. हस्ताक्षराच्या संदर्भात श्रीमद् दासबोधातील दशक १९ समास १ मधील सूचना रशियात जागतिक कॅलिग्राफी परिषदेत स्वीकारल्या गेल्या. समर्थांच्या शिष्यांनी लिहून काढलेले सुमारे पाच हजार ग्रंथ आजही धुळे येथील समर्थ वाग्देवता मंदिरात पाहायला मिळतात. स्वतः समर्थांनी वयाच्या पंधराव्या वर्षी संस्कृत भाषेतील वाल्मिकी रामायण लिहून काढले होते. मठात राहणाऱ्या शिष्यांना विविध संप्रदायांतील ग्रंथांचा अभ्यास करावा लागे. विविध वारकरी संतांच्या अभंगांच्या शेकडो नकला समर्थांच्या शिष्यांना केल्या होत्या. समर्थांनी शंभरहून अधिक प्रवचनकार आणि कीर्तनकार तयार केले होते. असे प्रचारक एकांगी नसावेत म्हणून त्यांना नृत्यकला, गायनकला, टाळी वाजवणे, सर्वांना राजी राखणे, प्रसंगावधान राखणे, लोकांना उपासनेला लावणे या सर्व गोष्टी शिकाव्या लागत.

संप्रदाय वाढावा म्हणून समर्थांनी आपल्या हयातीतच अनेक शिष्यांना अनुग्रहाचे अधिकार दिले होते. भिक्षेच्या निमित्ताने हिंडणारे समर्थ-शिष्य माणसांची पारख करीत आणि त्यांना संप्रदायाच्या कार्यात लावत. समर्थ म्हणतात -

'कुग्रामे अथवा नगरे। पहावी घरांची घरे।
भिक्षामिसे लहान थोरे। परिक्षून सोडावी।।
भिक्षेने वोळखी होती। भिक्षेने भ्रम चुकती।
सामान्य भिक्षा मान्य करीती। सकळ प्राणी।।

भिक्षा हे अर्थार्जनाचे साधन नव्हते तर माणसे जोडण्याचा सेतू होता. एखाद्या उदार माणसाने जास्त भिक्षा दिली, तर त्यातील मूठभर भिक्षा ठेवून घ्यायची आणि बाकी परत करायची असा दंडक होता. अशी निःस्पृहता दिसून आली म्हणजे लोकांना रामदासी मंडळींच्या कार्याबद्दल आत्मीयता वाटे. समर्थ म्हणतात -

'आमुची प्रतिज्ञा ऐसी। काही न मागावे शिष्यासी।
आपणामागे जगदीशासी। भजत जावे।'

लोकसंग्रह वाढावा आणि संघटना मजबूत व्हावी यासाठी समर्थांनी रामनवमी आणि हनुमान जयंती हे दोन उत्सव मोठ्या प्रमाणात सुरू केले. महाराष्ट्रामध्ये रथाची परंपरा नव्हती. समर्थांनी चाफळला रथाची पद्धत सुरू केली. भिक्षेत मिळालेल्या धान्यातून उत्सवातील अन्नदान होई. समर्थांनी शिवथर घळीत तर गणेशोत्सव महिनाभर साजरा केल्याची नोंद 'समर्थ प्रताप' या ग्रंथात आहे.

देश, देव आणि धर्म या तिन्हींचा सुंदर समन्वय समर्थांचे जीवन आणि कार्य यांमध्ये पाहायला मिळतो. लोकसंग्रह आणि सद्गुण-संवर्धन या दोन गोष्टींचे समर्थांना वेडच होते. तिरसटपणाने आणि तुसडेपणाने संसाराचा त्याग करणाऱ्यांच्या वैराग्याला समर्थ मुळीच किंमत देत नाहीत. त्या काळात आणि आजही समर्थांची आपल्या भक्तांकडून नेमकी काय अपेक्षा होती याचे फार सुंदर चित्र पुढील स्फुट कवितेत पाहायला मिळते -

'लिहितां जोडितां येना। व्यासंग करितां नये।
जड संसार सांडेना। चालिला सर्व सांडुनी।।१।।
स्वदेश राहिला मागे। विदेश लागला पुढें।
आचार राखणे आधी। स्नानसंध्या पवित्रता।।२।।
आचुक शुद्ध ल्याहावें। वाचावें नीटनेटके।
साकल्य अर्थ सांगावा। येथातथ्य प्रचीतीने।।३।।
बोलावें न्यायनीतीने। मर्यादा राखणे जनीं।
अभ्यास करावा आधी। ताळबद्ध पाठांतरे।।४।।
प्रसंग मान जाणावे। बाणावे बहुतांपरी।

भक्ति भाव असो द्यावा। घालावा भार ईश्वरी।।५।।
प्रत्यही मागणें भिक्षा। मिळाली न मिळे तरी।
नित्य नूतन हिंडावें। धुंडावे भक्त प्रेमळ।।६।।
कथा ते करावी आधीं। बाधी ते दुराशा नको।
उपाधी आतळावे ना। जावे ना वैभवाकडे।।७।।
सर्वत्र लोक शोधावे। बोधावे भक्तीच्या गुणें।
राहावे दुर्बळाचथें। देवाल्यें कां नदीतीरी।।८।।
पर्वतीं उदकापासीं। संन्निध चि येकीकडे।
फार येकांत सेवावा। अभ्यास नित्य नूतन।।९।।
साहावी सीतउष्णादि। पाहावी रम्यसीं स्थळें।
करावे आपण कष्ट। बांधावी ते हळु हळु।।१०।।
वोळखी कराव्या दाटा। येके ठाई स्थिरों नये।
वादवेवाद तो खोटा। दाटावा मद मत्सर।।११।।
उद्धट बोलणे खोटें। बोलावी मृद उत्तरें।
नेटकी पाहिजे दीक्षा। रक्षावी भक्ति आदरें।।१२।।
वर्णावी कीर्तीची द्वारें। अद्भुत बहुतांपरी।
प्रबंद जाड बोलावे। चालावे योग्य मानसें।।१३।।
भक्ति ज्ञान असों द्यावें। शुद्ध वैराग्य नेटकें।
धरावीं कीर्तीची द्वारें। तरावी भाविके बहु।।१४।।
तगावें बहुतां ठाई। उपाधी नसतां बरे।
सद्गुण सार द्यावे ते। ने घावे अवगुण ते।।१५।।
भक्तीस लोक लावावे। पावावे परपार ते।
उपाधी पाहातां नाही। पाहो जातां उदंड हि।।१६।।
परंतु सर्व देवांचे। आपुले तन हि नसे।
मनांत वावरे देवो। देव देव चहुंकडे।।१७।।
अत्यंत साक्षपी व्हावें। न व्हावे आळसी कदा।
घ्यावा या देह्याचा लाहो। जायाचे हे म्हणोनिया।।१८।।
मरोनि कीर्ति उरवावी। नुरवावी अपकीर्ति ते।
धन्य धन्य म्हणे लोक। सत्क्रिया करितां बरी।।१९।।
पुण्यमार्ग प्रतिष्ठावा। लावावी धर्मवासना।
देवाल्यें करावी मोठी। वापी कूप सरोवरें।।२०।।
वाटिका वृक्ष लावावे। पुष्पे फळें परोपरी।
करावी कपाटे टाकी। भुयरीं विवरें गव्या।।२१।।
वृंदावनें दीपमाळा। धर्मशाळा बहुविधा।
पाईऱ्या वोवऱ्या वोटे। यात्रा धबके हरिकथा।।२२।।
सावधु सकळां ठाई। न्याननीति चळों नये।
सकळांसी सख्य राखावें। वर्तावे ते मनोगते।।२३।।
वैभवे सर्व देवांचे। वाद्यें छेत्रें परोपरी।
किती म्हणोनि सांगावी। सांभाळावी समस्त हि।।२४।।
दास्य तें करावें ऐसें। यामधे घडेल तसें।
देव सांग करी सर्वे। भावार्थ पाहिजे बरा।।२५।।

हे स्फूट प्रकरण म्हणजे भारतीय आध्यात्मिक विचारधारेचा आत्मा होय. नवनवे भक्त शोधण्यासाठी समर्थ हिंडत राहिले. कीर्तन हेसुद्धा त्यांचे लोकसंग्रहाचेच माध्यम होते. खरा भारत गरिबाच्या झोपडीत अथवा मध्यमवर्गीयांच्या पर्णकुटीत दडलेला आहे. म्हणून समर्थ आपल्या कार्यकर्त्यांना गरिबाकडे उतरायला सांगतात. महंताने लोकसंग्रह करताना वैयक्तिक अभ्यासाकडे दुर्लक्ष करू नये. त्यासाठी एकांत आणि उपासना सांगितली. प्रचारक विलासी असता कामा नये. त्याची राहाणी साधी असावी. त्याने नवनवीन ओळखी करून घ्याव्यात. वादविवाद आणि उर्मटपणा यांमुळे त्याने माणसे तोडू नयेत. भक्ती, ज्ञान, विवेक, वैराग्य या चार गोष्टी त्याने स्वतः सांभाळाव्यात आणि लोकांकडून करवून घ्याव्यात. महंत आळशी असता कामा नये. वृक्षारोपण, पर्यावरण, मंदिरांची सामाजिक बांधिलकी या मुद्द्यांनाही समर्थ स्पर्श करतात.

दुर्दैवाने, सोवळे-ओवळे आणि कर्मकांड यांच्या अतिरेकामुळे, संप्रदायापासन बहुजन समाज दुरावला गेला आणि हा संप्रदाय ब्राह्मणांचाच आहे, असा लोकांचा गैरसमज निर्माण झाला. कालानुसार योग्य नेतृत्व न मिळाल्यामुळे समर्थांची खरी शिकवण बाजूला पडली. परंतु सूर्य झाकला गेला तरी नाहीसा होत नाही. ढगांचे आयुष्य थोडे असते, सूर्य चिरंतन असतो. लोकांना समर्थांचे महत्त्व निश्चितच कळेल आणि ते पुन्हा राष्ट्रगुरू पदावर आरूढ होतील. तसे घडण्यातच देशाचे हित आहे. कै. शंकर श्रीकृष्ण देव म्हणतात ते योग्यच आहे.

'समर्थांचे स्मरण म्हणजे राष्ट्राचे जीवन,
समर्थांचे विस्मरण म्हणजे राष्ट्राचे मरण.'

* * *





सुफी.

# सुफी संप्रदाय

■ मधू जामकर

**सुफी संताची कविता ही प्रियकर–प्रेयसीच्या रूपकातून व्यक्त होते. सुफी काव्यात उत्कट ईश्वरप्रेमाचे नशेसारखे भारलेपण असते. या नशेत सुफी संताला जगाचं भान राहत नाही. संसारात लौकिक अर्थाने त्याला रस उरत नाही. अशी समर्पणातून निर्माण होणारी वैराग्यभावना कबिराच्या कवितेतून व्यक्त होते.**

सातव्या–आठव्या शतकात मध्य आशियात निर्माण झालेल्या इस्लामी धर्माची लाट युरोपमध्ये पसरली. तिचा प्रभाव हिंदुस्थानातही पडला. अकराव्या शतकाच्या प्रारंभी महंमद गजनीने स्वाऱ्या करून एक नव्या आक्रमक संस्कृतीशी भारताची ओळख करून दिली. सोळाव्या शतकापर्यंत उत्तरेत मोगलाईची स्थापना झाली. याचा परिणाम महाराष्ट्राच्या जीवनावर झाला. रितीरिवाज, पोषाख, भाषा, साहित्य इत्यादींवर या नव्या संस्कृतीचा परिणाम होणे अपरिहार्य होते. तसेच मराठी भाषेवर फारसी–अरबी भाषेचा प्रभाव फार मोठा झाला. इथे दोन संस्कृतींतील विचारांची व आचारांची देवाणघेवाण झाली. या सामाजिक व धार्मिक परिवर्तनाबरोबर तत्त्वविचार व अध्यात्मविचार यांवरही इस्लामी धर्मपंथाचा प्रभाव पडत राहिला. यातूनच इस्लामी धर्मात निवृत्तीने राहून परमेश्वराचा साक्षात्कार करू

इच्छिणारे सुफी साधुपुरुष निर्माण झाले. पैगंबराच्या वचनांचा आध्यात्मिक अर्थ लावून वेदान्ताच्या तत्त्वज्ञानाशी याची तुलना होऊ लागली. यातून अबू हाशीम, अबू याजीद, अबू सुलेमान आणि अबू तालिन इत्यादी अभारतीय सुफींनी आपले तत्त्वज्ञान दृढ केले. त्यातून साक्षात्काराची एक परंपरा सिद्ध झाली. मुहीउद्दीन चिस्ती शेख सलीम, सईद जलाल आणि शेख फरीदुद्दीन शकररांज अशा भारतीय सुफींनी पुढे या विचारांत विकास केला. यातूनच भारतात १) चिश्ती, २) कादरी, ३) सुहारा वर्दी, ४) नक्शबंदी असे चार सुफी उपपंथ निर्माण झाले.

सुफी संप्रदाय अरबस्तान–इराणमध्ये अस्तित्वात आला. हा संप्रदाय फारसी भाषेतील साहित्य उजेडात आणतो. कर्मठ इस्लाम धर्मातील मुसलमान या पंथाच्या विरोधी आहेत. या संप्रदायाची मूलतत्त्वे विशेषतः 'मी सत्य आहे' (अपलूहक) इस्लामच्या तत्त्वाशी अनुकूल नाही. जीव आणि शिव यांचे अद्वैत प्रपंचाच्या अडसरामुळे द्वैत होते यावर सुफीची श्रद्धा आहे. पुढे भक्तीने जिवाला शिवाशी एकरूपता साधता येते. इथे भक्त स्वतःकडे प्रियकराची भूमिका घेऊन तो परमेश्वररूपी प्रेयसीस आळवितो. हा प्रवास सात अवस्थांमधून घडत असतो. भारतीय मधुराभक्ती याच प्रकारची आहे. विराण्या आणि सुफी परंपरा एकच वाटतात. फक्त फरक एवढाच की, विराण्यांत भक्त प्रेयसीच्या भूमिकेतून वावरत असतो.

सुफी संत तेराव्या शतकात महाराष्ट्रात आले. या वेळी सिद्धांची वाणी (वैरागी भाषा) अध्यात्म चर्चेची बोध–भाषा असल्याने ती सुफींनी दत्तक घेऊन फारसी लिपीतून या भाषेत साहित्य लिहिले. वैरागी भाषाच पुढे दखनी भाषा झाली. सुफींनी दत्तक घेतलेली दखनी भाषा प्रकृतिधर्माने मराठी आहे. मध्ययुगीन संस्कृतीत ही देवाणघेवाण महत्त्वाची आहे. दखनी भाषेतून साहित्यनिर्मिती करणारे सुफी संत धर्माने मुसलमान होते, तरीही त्यांनी भारतीय संस्कृतीच्या अंगांसह दखनी भाषेचा स्वीकार केला. या साहित्यातले संपूर्ण वातावरण भारतीय आहे. मात्र मुसलमानांनी आपले धर्मांतराचे कार्य सुलभ व्हावे म्हणून सुफीचा उपयोग मध्ययुगात करून घेतला. सांस्कृतिकदृष्ट्या भारत एकात्म असल्याने अन्य भाषांतील



सुफींची आराधना.

साहित्यातही मराठी साहित्याची परंपरा व प्रवाह एकमेकांचे झाले. ही देवाणघेवाण सुफी संप्रदाय आणि इस्लाम धर्म यांचे मूळ शोधताना त्यातली सांस्कृतिक प्रक्रिया स्पष्ट दाखवून देते.

मध्ययुगीन मराठी साहित्यातील सांस्कृतिक धागेदोरे समजण्यासाठी सुफी संप्रदायाच्या मर्यादाही लक्षात घ्याव्या लागतात. या दृष्टीने मुसलमान मराठी संत व सुफी संप्रदाय यांचे वाङ्मयीन व सांस्कृतिक कार्य कालसापेक्षाच्या मर्यादेने संकुचित झालेले दिसते. विशेषतः वारकरी संप्रदायाच्या पार्श्वभूमीवर त्यांचे हे अपयश नजरेत भरते. सुफी संप्रदायाची काही वैशिष्ट्येही आहेत. इस्लामी शरीयतीच्या चौकटीतील तत्त्वज्ञान सांगणाऱ्यापासून अत्यंत खडतर तपश्चर्या करण्याचा आग्रह धरणारे सर्वच सुफी संप्रदायात येतात. सुफी तत्त्वज्ञान मानवी मुक्ती व्यक्तिगत बाब मानते. इस्लामेतर धर्मामध्ये सुफीप्रणाली आहे. त्यात गूढवाद आहे. इस्लाम पुरस्कृत सुफीत नमाज म्हणजे परमेश्वराशी साधलेला संवाद असतो. त्यामागे एक मानसिक व आंतरिक जाणीव असते. नमाजात आपल्या सर्व चित्तवृत्ती एकाग्र झाल्या पाहिजेत. ते कर्मकांड नाही. सुफी संप्रदायात

परमेश्वरप्राप्तीने होणारा आनंद वर्णनातीत आहे. हा आनंद प्राप्त होणे हे सुफीचे महत्त्व आहे. सुफी तत्त्वज्ञान साधकाला सांसारिक मोहातून बाहेर काढते. त्यावर उपनिषदांचा प्रभाव आहे. मात्र उपनिषदांमध्ये आणि शंकराचार्यांच्या अद्वैतामध्ये जे मायेसंबंधी विवेचन आले आहे, ते सुफी संप्रदायाशी जुळत नाही.

कबीर हा सुफी संप्रदायाचा पुरस्कर्ता मानला जातो. आत्मा आणि परमात्मा यांना जोडणारा प्रेममार्ग आणि भक्तिमार्ग सुफी संत स्वीकारतात. सुफी संत हे इस्लामी परंपरेत बंडखोर मानले जातात, याचे कारण ते निखळ अनुभूतिवादी आहेत. आध्यात्मिक अनुभव हा एक व्यक्तिगत अनुभव आहे, तो संघटित किंवा देऊळबंध होत नाही, असे सुफी मानतो. या अर्थाने ते बंडखोर आहेत. त्यात प्रार्थनेची घोकंपट्टी स्वीकारता येत नाही. ईश्वराशी होणाऱ्या मीलनासाठी त्याला कुठल्याही प्रेषिताची मध्यस्थी लागत नाही. तो आपल्या अंतरीच्या ऊर्मीतून ईश्वरतेला भिडत असतो. खरे तर हे बंड नसून प्रेम असते. पण धर्माने आखून दिलेल्या चाकोरीबाहेर धर्म असूच शकत नाही, असे मानणारी माणसे त्याला बंडखोर ठरवितात. कबीर या दृष्टीने बंडखोर आहे. त्यात स्वभावातली उत्कटता, परंपरेने चालत आलेल्या अनेक गोष्टी नाकारण्याची त्याची हिंमत, त्याची तळमळ या गोष्टी आहेत. सुफी संताची कविता ही प्रियकर–प्रेयसीच्या रूपकातून व्यक्त होते. सुफी काव्यात उत्कट ईश्वरप्रेमाचे नशेसारखे भारलेपण असते. या नशेत सुफी संताला जगाचं भान राहत नाही. संसारात लौकिक अर्थाने त्याला रस उरत नाही. अशी समर्पणातून निर्माण होणारी वैराग्यभावना कबिराच्या कवितेतून व्यक्त होते. कबीर हा उत्तरेचा असून महाराष्ट्रातील शेख महंमद ह्या संतास कबिराचा अवतार समजले जाते.

या सुफीच्या आत्मसाधनेत कधी राजकीय रंगही चढत असे. फंदफितुरी, बाटवणे, देवमंदिरांचा विध्वंस करणे असेही प्रकार सुफीच्या आवरणाखाली दिसतात. गुलबर्गा येथे सुफीची केंद्रे स्थापन झालेली आहेत. दौलताबादेत तर राजसत्ताच त्यांच्या पाठीशी होती. मुंतजनीद्दिन, जैनुद्दिन इत्यादी सुफींचे कार्य दक्षिणेत सुरू झाले. पैठणच्या निजामुद्दिनच्या परंपरेत तर नाथपंथातील कनिफनाथ याच परंपरेतला आहे. सुफी पंथात योगाभ्यास, सिद्धीची साधना, अतिरिक्त प्रेमभावना, दिलाची तडफ, कुर्बानीची हौस, चमत्काराची चलती झाली. शाहपलंग पोष, शहानूर, शहाजानुल्ला यांचा प्रचार औरंगाबादेतून होत राहिला. नाथ पंथामधील जोगी आणि सुफी यांचे जमत चालले. महाराष्ट्रातील भागवत धर्म भूमिकेने पक्का असल्यामुळे काही थोडा अपवाद वगळता सुफीचा फारसा प्रभाव मराठी तत्त्वपरंपरेवर पडला नाही, असे सेतुमाधवराव पगडी यांनी आपल्या ग्रंथात म्हटले आहे. भारतीय मुस्लीम सुफींवर ख्रिश्चन सुफींचा प्रभाव आहे.

सारांश सुफींच्या नैतिकतेमुळे समाजात त्यांची लोकप्रियता वाढली. त्यांनी अन्याय निवारण्याचे कार्य केले. सर्व प्राणिमात्रांची सेवा केली. त्यामुळे त्यांच्यात समदृष्टी निर्माण झाली. मुस्लीम राष्ट्रांत या समदृष्टीला महत्त्व आहे. भारतीय समाज विषमतेने पोखरला गेला असल्याने सुफींच्या या दृष्टीला महत्त्व आहे. सुफींनी भारतीय तत्त्वज्ञानाला आणि परंपरेला दिलेले योगदान महत्त्वाचे आहे. मात्र या संप्रदायाची भारतीय जनसमाजावरील पकड ढिली झाली आहे. धर्मप्रचारासाठी सुफींनी भारतीय साधने वापरली. त्यामुळे धर्प्रचारामुळे आलेली कटुता ते टाळू शकले. सांस्कृतिक जडणघडणीच्या दृष्टीने हे महत्त्वाचे आहे. या जडणघडणीत संत कवी शेख महंमद, हुसेन अंबरखान, असमखान आणि शेख सुलतान या सुफी संतांकडे प्राचीन रचनाबंध म्हणून पाहता येते. हे सारे पाहता मुसलमान मराठी संत व सुफीसंप्रदाय यांचे वाङ्मयीन व सांस्कृतिक कार्य काव्यसापेक्षाच्या मर्यादेने संकुचित झालेले दिसेल.

* * *

# संप्रदाय



## नागेश संप्रदाय

■ डॉ. संगीता देशमुख

**नागेश संप्रदाय हा सर्वसंग्राहक व सर्वसमावेशक संप्रदाय आहे. नागेशांचे शिष्य धनगर, तेली, ब्राम्हण, लिंगायत, मुसलमान असे अनेक जातींचे व विविध पंचांतील होते. या संप्रदायात स्त्रियांनाही सन्मान होता. या संप्रदायाचे तत्त्वज्ञानही असेच सर्वसमावेशक व व्यापक स्वरूपाचे आहे. नाथ, दत्त, चैतन्य, शैव, वारकरी आदी संप्रदायातील वैशिष्ट्यपूर्ण तत्त्वे या संप्रदायाच्या तत्त्वज्ञानात समाविष्ट केलेली आढळतात.**

महाराष्ट्राच्या लोकमानसावर प्राचीन काळापासून विविध संप्रदायांनी प्रभाव पडलेला दिसतो. इ. स. च्या १२ व्या शतकात महाराष्ट्र – कर्नाटक परिसरात 'नागेश संप्रदाय' उदयास आला. या संप्रदायाविषयी आजवर फारसे संशोधन झालेले नाही. तसेच अन्य संप्रदायाप्रमाणे हा संप्रदाय फारसा ज्ञात नाही.

नागेश संप्रदायाचे प्रवर्तक 'नागेश' किंवा 'नागनाथ' हे आहेत. ह्याच नागेशांना 'वडवाळसिद्ध नागनाथ' हे नामाभिधान दिले गेले आहे.

श्री. शं. श्री. देव यांनी'भा. इ. सं. मंडळाच्या', शके १८३५ च्या वार्षिक इतिवृत्तात 'वडवाळसिद्ध नागनाथ' हा लेख या संप्रदायावर लिहून प्रथमच प्रकाश टाकला. प्रा. पंडित आवळीकरांनी 'महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या' जून १९६१ च्या अंकात नागेशांचे शिष्य 'कवी अज्ञानसिद्ध' या लेखात गुरू नागेशांचा उल्लेख केला आहे.

डॉ. यू. म. पठाण यांनी १९६३ साली 'नागेश संप्रदाय' ही पुस्तिका प्रकाशित केली. त्या पुस्तिकेत त्यांनी संप्रदाय, परंपरा व तत्त्वज्ञान यांविषयक थोडक्यात विवेचन करून नागेश संप्रदायाची तोंडओळख करून दिली.

श्री. पा. ना. कुलकर्णी यांनी अज्ञानसिद्धांचे 'नागेशमाहात्म्य' संपादित करून प्रकाशित केले आहे.

श्री. विनायकबुवा मोहोळकर यांनी 'संकटहरणी' ग्रंथाच्या सहाशेव्या प्रकटदिनाच्या निमित्ताने सांप्रदायिक माहितीसह या संप्रदायातील शिष्यांनी रचलेल्या पदांचे संकलन करून 'नागेशदर्पण' हा ग्रंथ प्रकाशित केला आहे.

कवी भास्कर या नागेशशिष्याने रचलेल्या 'नागेशलीलामृत' या सांप्रदायिक ग्रंथात नागेशांसंबंधी व त्यांच्या संप्रदायासंबंधी माहिती मिळते, पण तो ग्रंथ अलीकडच्या काळातील आहे. उद्धवचित्घनाने लिहिलेले 'नागेश चरित्र', अज्ञानसिद्धांनी लिहिलेले सांप्रदायिक ग्रंथ व पदे, अन्य शिष्यांनी लिहिलेले ग्रंथ व पदे यांच्या आधारे नागेशांसंबंधी व नागेश संप्रदायासंबंधी विवेचन करावे लागेल.

### नागेश उर्फ वडवाळसिद्ध नागनाथ यांचे चरित्र

वडवाळसिद्ध नागनाथ हे नागेश संप्रदायाचे मूलस्थान आहेत. 'नागनाथ' हे 'नाथ' या पदामुळे नवनाथांत अंतर्भूत असावेत असा काहींचा समज होता. 'नागेशलीलामृत'कार कवी भास्करांनी आपल्या ग्रंथात स्पष्ट शब्दात म्हटले आहे की– 'नाथनामावरूनी। नाथसंप्रदायी म्हणो नये।।

महिपती या कवीने लिहिलेल्या 'भक्तविजय' या ग्रंथात बहिसा पिसा याचा उद्धार करणारे वडवाळसिद्ध नागनाथ यांची कथा वर्णन केलेली आढळते. तेच हे वडवाळसिद्ध नागनाथ आहेत.

वडवाळसिद्ध नागनाथ उत्तरेकडून भक्त हेग्रसांकरिता दक्षिणेकडे आले. येता–येता माणूर येथे एकलिंग तेली याच्यावर नागेशांनी कृपा केली. वरदम्मा या भाविक स्त्रीस जीवनदान देऊन तिला पुरुष बनविले. पुढे मारडी या गावी बातकव्वावर कृपा करून तिथे काही काळ वास्तव्य केले. पुढे देगाव येथे नरसिंह, बोलेराम, सहज बोधे व शिवाप्पा दंडे या भक्तांवर कृपा केली. हेग्रसांना दिलेल्या वचनाप्रमाणे ते मोहोळ येथे आले. या प्रवासात त्यांनी अनेक भक्तांवर कृपा केली.

अंगावर गाईचे (?) चर्म पांघरले आहे. सर्वांगाला कुष्ठ झालेले आहे अशा फकीर वेषात मोहोळला ते आले. हेग्रसांनी आपल्या गुरूस तत्काळ ओळखले. गुरू नागेशांना म्हणजेच या फकिरवेषातील माणसाला आपल्या घरी नेले. त्यांची मनोभावे सेवा केली; पण एका ब्राह्मणाने फकिराची सेवा करणे, त्याच्याबरोबर राहणे, खाणे–पिणे मोहोळवासियांना पटले नाही. गावातील लोकांनी हेग्रसांना वाळीत टाकले. त्यांचा खूप छळ केला. नागेशांनी मोहोळ सोडून जवळच असलेल्या वनात प्रवेश केला. मोहोळ गाव दृष्टिआड झाले. त्या ठिकाणी एक वाळलेल्या वडाचे झाड होते. गुरू नागेशकृपेने त्या झाडाला पालवी फुटली, वाळलेल्या वडाला पुनर्जिवित करणारे सिद्ध म्हणून भक्तगण तेव्हापासून त्यांना 'वडवाळसिद्ध नागनाथ' असे संबोधू लागले. आपला हातातील खड्गाने नागनाथांनी विहीर खणली. तेच 'खर्गतीर्थ'. आजही ते वडाचे झाड व खर्गतीर्थ हे नागनाथांच्या पवित्र स्पर्शाने पावन झालेली स्थळे मानून सांप्रदायिक या स्थळांस वारीसाठी येत असतात. या ठिकाणी वडवाळसिद्ध नागेशांनी पैठणच्या बहिऱ्या पिशाचा उद्धार केला. सरकाळाचे गाडे करून त्याला सापाचे दोर लावून मुंग्यांना जुंपून मोठे–मोठे धोंडे या ठिकाणी आणले. आजही ते 'मुंगीचे धोंडे' तेथे या प्रसंगाची साक्ष देतात. ज्या–ज्या ठिकाणी नागेशांचे वास्तव्य झाले त्या–त्या ठिकाणी भक्तांनी नागेशमंदिरे उभारली आहेत.

नागेशांच्या कालखंडाविषयी निश्चित अनुमान काढता येत नाही. केंदूर गावचे कान्होपाठक ह्यांच्यावर श्रीगुरू नागनाथांचा प्रत्यक्ष अनुग्रह झालेला आहे. कान्होपाठकांनी संत ज्ञानेश्वरांच्या समाधीच्या वेळी कीर्तन केल्याचा उल्लेख आहे. या संदर्भावरून हेग्रस, कान्होपाठक व नागेश हे समकालीन मानावयास हरकत नसावी.

नागेशभक्त हेग्रसांच्या मुलीचा मुलगा म्हणजेच नागेश संप्रदायाचे आद्याचार्य श्रीअज्ञानसिद्ध. अज्ञानसिद्धांचा कालखंड सुमारे शके १२८० ते १३४० असा मानला आहे. त्यांचे आजोबा हेग्रस यांनी आपले शिरकमळ गुरुचरणी अर्पण केल्यानंतर नागनाथांपाशी नवस

बोलल्यामुळे अज्ञानसिद्धांचा जन्म झाला, यावरून शके १२०० ते १२६०च्या दरम्यानचा कालखंड गृहीत धरावयास हरकत नाही.

### श्रीगुरू नागेशांची शिष्यपरंपरा

श्रीगुरू नागेश हेग्रसांवर कृपा करण्यासाठी उत्तरेकडून दक्षिणेत आले. हेग्रस हे एक निमित्त होय. लोकांचा उद्धार करणे, त्यांना भक्तिमार्गाला लावणे, कर्मकांडाचे महत्त्व कमी करून सर्वसामान्यांच्या उद्धारासाठी सर्वसमावेशक; सुलभ; सुगम असा भक्तिमार्ग दाखविणे या हेतूने नागेश दक्षिणेत आले. नागेश तथा वडवाळसिद्ध नागनाथ हे एक सिद्ध योगी–विभूती होते. नागेशांचे अवतारकार्य, त्यांच्या संप्रदायाचा प्रसार, त्यांचे शिष्य ह्या सर्वांसंबंधीचे विवरण 'नागेशलीलामृत' या ग्रंथाच्या संप्रदाय प्रकरणात सतराव्या अध्यायात येते. त्यावरून नागेशांचे शिष्य महाराष्ट्रात तसेच महाराष्ट्राबाहेरही होते, हे 'नागेश संप्रदाय' या डॉ. यू. म. पठाण यांच्या ग्रंथाधारे मांडता येते.

नागनाथांच्या शिष्यशाखा याप्रमाणे आहेत – तिमण्णा धनगर, कृष्णा (हिवरे), कान्हो पाठक (केंदूर), एकलिंग तेली (माणूर), हेगरस (मोहोळ – अज्ञानसिद्ध (नरंदे)), वरदम्मा ऊर्फ वरदबसवण्णा (माणूर), बदकव्वा ऊर्फ बातकव्वा (मारडी), नरसिंह बनसोड (आपेगाव), बहिरंभट (पैठण), अलंखान ऊर्फ अलंप्रभू (कोल्हापूर), मन्मथस्वामी (कपिलधार).

नागेश संप्रदायातील अनेक शिष्यांनी सांप्रदायिक साहित्यनिर्मिती केली. एकलिंग तेली (माणूर) यांनी 'आत्मसार' ग्रंथ लिहिला. बहिरंभट (पैठण) पूर्वायुष्यात 'भैरवीटीका' हा ग्रंथ व नंतर पदे लिहिली. आलमखान – अध्यात्मपर, गुरूभक्तीपर मराठीतील पदरचना. अज्ञानसिद्ध – वरदनागेश (प्रकाशित), संकटहरणी (प्रकाशित), नागेशमाहात्म्य (प्रकाशित), पंचीकरण प्रमेय, कालज्ञान (नुकतेच प्रकाशित), सप्तकोटेशमाहात्म्य (अप्रकाशित), काळज्ञान (प्रकाशित), स्वरूप निर्वाण, अकाळज्ञान, सिद्धांत पंचीकरण, जीवब्रह्माभेदलक्षण, श्रीगुरू सामाज्य, अकळकांड पृच्छापत्र इतर स्फुट काव्य, पदे, अभंग, भारूड, आरत्या, स्तोत्रे, पोवडे, साकी, फाकी, कडिबंद पदे यांसारखी रसाळ पदे व फारसी, मराठी आणि कानडी भाषेतील पदे असे विपुल त्यांनी साहित्य रचले आहे.

त्यांचे अन्य साहित्य पुढीलप्रमाणे आहे – विदेहसिद्ध – तारकब्रह्म, उद्धवचिद्धन – बहिरंभट चरित्र २) नागनाथ चरित्र, अनंतबल्लाळ – नागेशचरित्र २) बहिरंभटचरित्र, भानजी त्रिबंक – नागेशलीलामृत हा चाळीस अध्यायांचा ग्रंथ, मन्मथस्वामी – परमरहस्य, स्वयंप्रकाश, अनुभवानंद ग्रंथ, चवंडा – नागनाथ चरित्र, दामोदर – आत्मसार.

याबरोबरच अनेक शिष्यांनी संप्रदायातील पदांमध्ये मोलाची भर घातलेली दिसते. श्री. विनायकबुवा शास्त्री मोहोळकर यांनी १९९१ साली संप्रदायातील स्फुट पदे 'नागेशदर्शन' या ग्रंथरूपाने संपादित करून सांप्रदायिकांच्या हाती मोलाचा खजिनाच दिला आहे.

### नागेश संप्रदायाचे तत्त्वज्ञान

नागेश संप्रदाय हा सर्वसंग्राहक व सर्वसमावेशक संप्रदाय आहे. नागेशांचे शिष्य धनगर, तेली, ब्राम्हण, लिंगायत, मुसलमान असे अनेक जातींचे व विविध पंचांतील होते. या संप्रदायात स्त्रियांनाही सन्मान होता. या संप्रदायाचे तत्त्वज्ञानही असेच सर्वसमावेशक व व्यापक स्वरूपाचे आहे. नाथ, दत्त, चैतन्य, शैव, वारकरी आदी संप्रदायातील वैशिष्ट्यपूर्ण तत्त्वे या संप्रदायाच्या तत्त्वज्ञानात समाविष्ट केलेली आढळतात. नागेश स्वतःच अद्वैतमतवादी होते; त्यामुळे या संप्रदायात अद्वैतावर आधारित तत्त्वज्ञान आहे. नागेश ऊर्फ नागनाथ यांना 'शिवयोगी' म्हणून संबोधले आहे. तसेच 'आदिनाथ' असेही म्हटले आहे. नागेशसंप्रदायाने चैतन्यसंप्रदायाचे मूलतत्त्व स्वीकारले आहे.

''चैतन्य सांप्रदाय यातून। विलसे नागनाथाची सुपूर्ण।।
मुमुक्षु ऐक निश्चयवचन। संप्रदाये चैतन्य श्रीगुरूसी।।

– नागेशलीलामृत

तैसे नव्हे ज्ञान। जे परिपूर्ण शुद्ध चैतन्य।
ते सद्गुरूमुखे अनुभवून। पाहिजे ज्ञानद्रिष्टी ।।१×१२५।।

– वरदनागेश

या संप्रदायातील संतांना 'सिद्ध' ही उपाधी लावली जाते. जसे – अज्ञानसिद्ध (हेग्रसांचे नातू) सिद्धलिंग,

दत्तचैतन्यसिद्ध. एवढेच नव्हे, तर नागेशसंप्रदयाचे प्रवर्तक श्रीगुरू नागेश यांनाही 'वडवाळसिद्ध नागनाथ' असे संबोधले जाते.

नागेश संप्रदायाचे तत्त्वज्ञान शिष्यांच्या ग्रंथांतून, पदांतून प्रकट झाले आहे. त्यात अज्ञानसिद्धांनी या संप्रदायाच्या तत्त्वज्ञानाची बैठक आपल्या ग्रंथातून खूपच विस्ताराने मांडलेली आहे. त्याबरोबरच संप्रदायाचा आचारधर्मही त्यांनी प्रतिपादला आहे. जसे –

चरणावरूनि उठविला। स्वस्थानी बैसविला।
उपदेशक्रम दाविला। विधियुक्त मार्ग।।
आपुली संप्रदायाची विधी। करूनि स्थिरावला सुखसमाधी।
तेथे अज्ञान शक्तीचा बुद्धी। नास्ती जाहल्या।।

सांप्रदायिक परंपरेने आजही माणूर, मारडी, देगाव, नरंदे, खिल्लारी, वडवाळ व मोहोळ येथे दरवर्षी ठरावीक दिवशी उत्सव होतात, यात्रा भरतात. सांप्रदायिक पदे, भजन, रचना, गण म्हटले जातात. या संप्रदायात 'त्रिस्थळी' यात्रेचे फार महत्त्व आहे. नागेशस्थळांच्या यात्रेबरोबर संप्रदायातील नागेशशिष्यांची स्थानेही संप्रदायात महत्त्वाची व पवित्र मानली गेली आहेत. जसे अज्ञानसिद्धांचे नरंदे येथील समाधिस्थान, महागाव (जि. गुलबर्गा) वरवंड (जि. सोलापूर) व खिल्लारी (लातूर) या स्थानांना सांप्रदायिक संस्थाने म्हणून मान्यता प्राप्त झालेली आहे. ही चारही स्थाने अज्ञानसिद्धांच्या शिष्यांची आहेत.

नागेशसंप्रदायात योगमार्गाला महत्त्व दिलेले असले, तरी सामान्य जनांसाठी भक्तिमार्गावरच भर दिलेला आढळतो. या भक्तियोगास 'सिवयोग' असे संबोधले जाते. या संप्रदायात अपरंपार गुरुभक्ती, गुरुमहिमा वर्णिला आहे. शिवरात्र, शिवपूजन, शिवनामस्मरणालाही यात खूप महत्त्व आहे. इतर देवदेवतांचेही पूजन मान्य आहे. गणेश, महालक्ष्मी, रेणुका, कैकाय, दत्त, विठोबा, अल्ला आदी देवतांची भक्ती करण्यास मान्यता आहे. अद्वैत तत्त्वज्ञानाधिष्ठित, सर्वसमावेशक, शिव देवतेला श्रेष्ठ मानणाऱ्या, ज्ञान, भक्ती व कर्म त्रयींचा संगम असलेल्या या संप्रदायाचा प्रसार व प्रचार तेराव्या शतकापासून आजपर्यंत कोल्हापूर, सोलापूर, गुलबर्गा, लातूर या जिल्ह्यांत महाराष्ट्र तथा कर्नाटक सीमापरिसरात झालेला दिसून येतो.

या संप्रदायात कडक आचारधर्म नाही, योगावर अतिरिक्त भर नाही, कर्मकांडाचे प्राबल्य नाही, जातिपातींचे बंधन नाही; सर्व सामान्य माणसाला पेलता येईल, असा आचारधर्म या संप्रदायास अभिप्रेत आहे.

### नागेश संप्रदायाचे उत्सव

नागेशसंप्रदायात त्रिस्थळी यात्रेला जसे महत्त्व आहे, तसेच परंपरेने चालत येणाऱ्या; प्रत्येक स्थळाचे महत्त्व असलेल्या उत्सवांना व यात्रेलाही महत्त्व आहे. प्रत्येक स्थळी होणारे उत्सव थोडक्यात पुढीलप्रमाणे आहेत.

**मोहोळ** – येथे चैत्र आमावास्येस श्रीनागेशास सुगंधी तैलस्नान, वैशाख शुद्ध तृतीयेस खर्ग उत्सव, वैशाख शुद्ध षष्ठीस पालखी, वैशाख शुद्ध सप्तमीस उत्सवाची सांगता होते.

**वडवाळ** – चैत्र पौर्णिमेस श्रीनागेशास सुगंधी तैलस्नान, चैत्र चतुर्थीस खर्ग उत्सव पालखीसह वडवाळ येथे मोहोळहून भजन करीत येणे. त्या वेळी भक्ताला भेट देण्याचा सोहळा होतो. पेरणीसंबंधी भविष्य वर्तविणे आदी कार्यक्रम होतात.

**देगाव** – भाद्रपद कृष्ण अमावास्येस श्रीनागेशास सुगंधी तैलस्नान. आश्विन शुद्ध अष्टमीस खर्ग उत्सव, आश्विन शुद्ध दशमीस रात्री गण होतो. येथे चक्री भजनाचे महत्त्व आहे.

महाशिवरात्र, श्रावणी सोमवार, दसरा, गुढीपाडवा, दिवाळी पाडवा हेही दिवस भक्तगण मोठ्या भक्तिभावाने साजरे करतात. विशेषतः महाशिवरात्रीस निघणारा छबिना, जागरण व नंतर महाप्रसाद हे विशेष साजरा होतात.

चैतन्य संप्रदायाच्या गंगोत्रीतून उगम पावलेला, विविध संप्रदायातील वेचक तत्त्वे समाविष्ट करून आजचे सर्वधर्मसमभावाचे तत्त्व तेराव्या शतकापासून समाजाला आचरणातून शिकवणारा; साधा, सोपा असा 'नागेश संप्रदाय' आज महाराष्ट्राबरोबरच अन्य प्रांतांतूनही खळखळून वाहत आहे व असाच पुढेही वाहत राहील.

* * *





# महत्त्वाचे अन्य संप्रदाय

■ ॐ श्रीश दत्तोपासक

भारतातील अनेक पंथ व संप्रदाय हे पुरातन आहेत. त्यांतील काही उपासनापंथ कालौघात टिकून राहू शकले नाहीत, पण काही निवडक उपासनापंथ व संप्रदाय आजही आपणास आढळतात. येथे सौर, शाक्त, गाणपत्य, दत्त आणि अवधूत या महत्त्वाच्या संप्रदायांची थोडक्यात ओळख करून दिलेली आहे.

**प्रमुख प्राचीन उपासना पाच मानल्या जातात. त्या म्हणजे सौर, गाणपत्य, शैव, वैष्णव आणि शाक्त या होत. यांपैकी सूर्यदेवता तेजप्रधान आहे. गणपती हा ज्ञानसंयुक्त आहे. भगवान शंकर सत्प्रधान आहे. महाविष्णू चिद्प्रधान आहे. देवी ही शक्तिप्रधान आहे. ही 'पंचायतन' पूजा भारतीय धर्मसंप्रदायात एकात्मता निर्माण करण्याचा प्रयत्न करू शकली.**

### सौर संप्रदाय

सूर्यदेवतेच्या उपासनेचा उद्गम वेदवाङ्मयापर्यंत पोहोचतो. सूर्योपासना ही अत्यंत प्राचीन आहे. तिचे महत्त्व जगन्मान्य आहे. त्यातही पौर्वात्य देशांत, भारतवर्षात सूर्योपासनेचे महत्त्व सर्वार्थाने जास्त आहे. सौर उपासक संपूर्ण भारतात आहेत. मात्र सौर संप्रदायाचे स्वतंत्र अस्तित्व आणि संघटित स्वरूप आज दिसत नाही. सूर्य हा जगाचा आत्मा मानला गेला आहे. 'सूर्य आत्मा जगतस्तस्थुषश्च' असा उल्लेख आहे. संपूर्ण सृष्टीची धारणा सूर्यामुळेच होते. वैदिक वाङ्मयात सूर्याचा गौरव परोपरीने केलेला दिसतो. 'चांक्षुष्मती विद्या' म्हणजे प्रखर सूर्योपासनेचे फळ आहे, असा निर्देश महाभारतात आला आहे. सूर्य हा नवग्रहांचा

अधिपती आहे. परमपवित्र गायत्रीमंत्र हा सर्व मंत्रांत प्रधान असून तो अनन्यनिष्ठ सूर्योपासनेचा मंत्र आहे. तो महर्षी विश्वामित्रांना स्फुरलेला आहे. भगवद्‌गीतेतील विभूतियोगात सूर्याचा सादर उल्लेख आहे. अशा सूर्याचे देवस्वरूप पूजन करणारा तो सौर संप्रदाय आहे.

कोणार्कचे सूर्यमंदिर ही शिल्पकलेतील अप्रतिम मानवंदना आहे. खजुराहो येथील सूर्यमंदिरही प्रसिद्ध आहे. रथसप्तमीच्या उत्सवाचे महत्त्वही मोठे आहे. स्वस्तिक चिन्ह हे सूर्यदेवतेच्या कल्याणकारी कृपेचे प्रतीक मानले जाते. तो आपली सुवर्णध्वजा नित्य उंच उभारून, सर्व प्राणिमात्रांना जागृत करतो आणि कार्यप्रवण करतो. सौर संप्रदायात सूर्यदेवतेची अनन्यनिष्ठ भक्ती सांगितली आहे. तीच एक संरक्षक देवता असून, सर्व देवता अंतिमतः तिलाच येऊन मिळतात, असे मानले जाते. याच्याच उपासनेतून परब्रह्म स्वरूपाशी अद्वैत साधना येते, अशी धारणा आहे.

सूर्याचा अष्टाक्षरी मंत्र जपला जातो. सूर्यनारायण, सूर्यविनायक असे परंपरेतील उल्लेख आहेत. प्रातःसंध्या, सायंसंध्या यांतून सूर्यबिंबातील आदित्यदेवतेचे मनःपूर्वक ध्यान केले जाते. उपनिषदे सांगतात की, चंद्रापासून आत्मज्योतीपर्यंत सर्व रूपे आदित्याची आहेत. जे सत्य ते आदित्य आहे. ब्रह्मपुराणात सूर्याची १०८ नावे उद्‌धृत आहेत. या उपासनेने पुढे तांत्रिक वळण घेतल्याचे दिसते. तांत्रिक कल्पनेत सूर्योपासकांचा वेष-परिवेष आणि आचार या गोष्टी निश्चित करण्यात आल्या. कपाळी रक्तचंदनाचा टिळा आणि रक्तपुष्पधारण या सूर्योपासकांनी आपल्या खुणा ठरविल्या.

पुढे हा सौर संप्रदाय पुढील सहा श्रेणींत विभक्त झाला.

१) या श्रेणीचे लोक सूर्याला सृष्टिकर्त्या विधात्याच्या स्वरूपात मानतात आणि प्रातःकालीन सूर्यबिंबाला हैम ब्रह्मांडाचे प्रतीक मानून त्याची उपासना करतात. २) या श्रेणीचे लोक सूर्याला विश्वसंहारक शिवाच्या स्वरूपामध्ये परिकलिपत करून मध्यान्हकाली त्याची उपासना करतात. ३) या श्रेणीचे लोक सूर्याला जगत्पालक विष्णू मानून अस्तसमयी त्याची उपासना करतात. ४) या श्रेणीचे लोक प्रातःकाळ, मध्यान्ह व सायंकाळ या काळात सूर्याची उपासना करतात. ५) या श्रेणीचे लोक सूर्यबिंबाच्या ठिकाणी स्वर्णश्यश्रू व स्वर्णकोश अशा परमेश्वराची कल्पना करतात. यातल्याच काहींना सूर्यमंडळव्रती म्हणतात. हे लोक सूर्यदर्शन झाल्यावाचून अन्नोदक घेत नाहीत. ६) या श्रेणीचे लोक सूर्यबिंबासारख्या वाटोळ्या तप्तमुद्रा आपले मस्तक, भुजदंड व हृदय यांच्यावर उठवतात.

प्रसिद्ध सूर्यनमस्कारात मित्र ते भास्कर अशी आदित्याची बारा नावे आहेतच. भारतवर्षातील गुप्त सम्राट हे सूर्योपासनेचे पुरस्कर्ते होते. आज मात्र या संप्रदायाचे पृथगात्म वाङ्मय आढळत नाही. तरीही मयुरकविकृत 'सूर्यशतक' आणि अन्य स्तोत्रे सूर्योपासकांना प्रिय असलेली दिसतात. सूर्य ही चराचर सृष्टीतील आणि मनुष्यमात्राच्या मानससृष्टीतीलही तेजस तत्त्वाची, तेजाची देवता म्हणून मात्र सर्ववंद्य आहे.

वेदवाङ्मयात भग-सविता-सूर्य-विष्णू असा देवताक्रम विकास दिसतो. ही चारही एकाच तेजस्वी देवाची नावे आहेत. संत एकनाथांच्या घरात पिढ्यान्‌पिढ्या सूर्योपासना होती. त्यांचे पणजोबा भानुदास, आजोबा चक्रपाणी, वडील सूर्यनारायण ही सर्व नावे घराण्यातील सूर्योपासनेचाच वारसा सांगतात. श्रीराम हा सूर्यवंशतिलक आहे. त्याची कथा, एकनाथांनी त्यांच्या भावार्थ रामायणातून गायिली. समर्थ रामदासस्वामींच्या घराण्यातही सूर्योपासना होती. त्यांनीही सूर्यवंशीय श्रीरामाच्या पराक्रमाचे गुणगान केले आहे. समर्थांच्या वडिलांचे नाव सूर्याजी होते. समर्थांनी चाफळच्या मंदिरात स्थापन केलेली मूर्ती सूर्याची आहे. ही सर्व उदाहरणे मराठी संतांच्या सूर्योपासनेची द्योतक आहेत. सौर संप्रदायाच्या आचार्यांनी सौर माहात्म्याची स्थापना करण्यासाठी पुरुषसूक्त व यजुर्वेदातले शतरुद्रिय या सूक्तांवर सौरतत्त्वाला अनुसरून भाष्ये लिहिली आहेत.

### शाक्त पंथ

विराट सामर्थ्याच्या एका स्त्रीदेवतेचा साक्षात्कार वैदिकांनाही झाला होता. ऋग्वेदातील 'उषासूक्त' किंवा 'रात्रिसूक्त' ही याची द्योतक आहेत. केनोपनिषदात आद्या शक्ती उमा हैमवतीच्या रूपात इंद्राला उपदेश करताना आढळते. भारतीय दर्शनात तंत्रशास्त्र हे एक वेगळे दर्शन आहे. त्यात आढळणारे शक्तीचे स्वरूप दिव्योदात्त आहे.

तांत्रिकांनी तिला सृष्टीचे आदिकारण मानले आहे. पुराणकाळात देवीविषयक अनेक पुराणे निर्माण झाली. त्यांनी शक्तीचे निग्रहानुग्रहसामर्थ्य विविध कथांच्या रूपाने लोकमानसात ठसवले आणि भल्याभल्या देवांनाही शक्तीपुढे नतमस्तक व्हायला लावले. उदाहरणार्थ ब्रह्मवैवर्तपुराणात स्वतः शंकराने केलेली दुर्गेची स्तुती अलौकिक आणि अत्यंत हृद्य आहे. सामान्य लोकही मातृभावाने शक्तीला भजतात. सौभाग्यवती स्त्रिया आपले सौभाग्य चिरकाल टिकावे म्हणून शक्तीची उपासना करतात. त्यांच्या लेखी शक्ती ही जगदंबा म्हणजे सर्व जगाची आई आहे.

**दहाशक्ती (दशमहाविद्या)**

अकर्ता, चित्स्वरूप आणि प्रकाश असलेला परमेश्वर सृष्टिनिर्मितीचे कार्य स्वतंत्रपणे करू शकत नाही. त्याच्यात जेव्हा शक्ती संचरीत होते, तेव्हा या चराचराची निर्मिती होते. या शक्तीलाच प्रकृती म्हणतात. तीच कर्ती, चित्स्वरूप, विमर्श आहे. तिचीच उपासना शाक्तपंथीय करीत असल्यामुळे त्यांच्या उपासनेला भौतिक उपासनेचे अधिष्ठान प्राप्त झाले. दशमहाविद्येचे निरूपण म्हणजे संपूर्ण मूलगामी निरूपण होय. आगम आणि निगम ही दोन्ही शास्त्रे विश्वाचे निरूपण करतात आणि म्हणून या दोन्ही शास्त्रांना मिळून 'विद्या' असे म्हणतात. संपूर्ण विश्वाच्या विद्येला 'महाविद्या' म्हणतात. पुरुष प्रकृतीपासून अविभक्त असल्यामुळे स्वाभाविकपणे निगममूलक आगमशास्त्रही सृष्टिविद्येचे दहा शक्तींद्वारे निरूपण करते. महाकाली, तारा, षोडशी, भुवनेश्वरी, छिन्नमस्ता, भैरवी, धूमावती, बगळामुखी, मातंगी, कमळा अशी या शक्तींची नावे आहेत. त्या-त्या शक्तींचा एकेक पुरुषही भिन्न नावांनी ओळखला जातो.

देवीपुराणात पराशक्तीने दशमहाविद्येचे रूप कसे धारण केले, त्याचे विस्तृत वर्णन आले आहे. मूळ जी आद्याशक्ती आहे, तिला दुर्गा म्हणतात. या दुर्गेनेच पुढे देवकार्यासाठी आणि मानवकल्याणासाठी प्रसंगाप्रसंगाने तीन रूपे घेतली. महाकाली, महालक्ष्मी, महासरस्वती ही ती तीन रूपे होत. ही रूपे त्रिगुणात्मक आहेत. या प्रत्येक रूपात आणखी दोन-दोन रूपे प्रविष्ट होऊन तिघींचे त्रिवृत्करण झाले. मग त्या नऊ रूपांना नवदुर्गा हे नाव मिळाले. शैलपुत्री, ब्रह्मचारिणी, चंद्रघंटा, कूष्माण्डा, स्कंदमाता, कात्यायनी, कालरात्री, महागौरी, सिद्धिदात्री ही नवदुर्गांची नावे आहेत. शक्ती उपासनेत नऊ हे शक्तीचे अंकप्रतीक ठरले आहे.

शक्तीची उपासना पुढील तीन पद्धतींनी होते.

१) सामान्य शिष्ट पद्धती - हिच्यात अन्य देवतांप्रमाणे शक्तीची षोडशोपचारादी पद्धतींनी पूजा केली जाते. तिच्यात जप, ध्यान, होम या गोष्टीही अंतर्भूत असतात. ही पद्धती पूर्णपणे अहिंसक असते.

२) भयानक पद्धती - या पद्धतीत देवीला पशुबली आवश्यक मानला जातो. प्राचीन काळी नरबलीही देत असत. या उपासनेचा संबंध कापालिक व काळामुख या उग्र शैवांशी आहे.

३) भावात्मक पद्धती - या पूजेत उपासक हा उपास्य देवतेशी स्वतःचे तादात्म्य स्थापित करून शक्तीची पूजा करतो. या पद्धतीची उपासना करणाऱ्या लोकांनाच शाक्त असे म्हणतात. पहिल्या व दुसऱ्या वर्गांना अनुक्रमे स्मार्त व शैव म्हटले जाते.

शाक्त पंथात शिवोपासना, शक्तीची उपासना व कैवल्यपद प्रापक योग यांचा परस्परसंबंध अविभाज्य आहे. शाक्त साहित्याचा आढावा घेताना वरील तिन्ही विषयांच्या साहित्याचा विचार करावा लागतो. ऐतिहासिक दृष्टीने अशा साहित्याचे स्थूलमानाने तीन कालविभाग पडतात.

१) बुद्धपूर्व काळ - या काळातले साहित्य ग्रंथस्थ व उत्खननातून उपलब्ध झालेले असे द्विविध आहे. चारही वेद, ब्राह्मणे, अरण्यके, सूत्रे व उपनिषदे हे या काळातले मुख्य ग्रंथ होत. वैदिक कर्मकांड पुष्कळदा शाक्ततंत्राशी समांतर चालत असल्याचे दिसून येईल. ऐतरेय आरण्यकात जे महाव्रताच्या विधीचे वर्णन आहे, त्यात शाक्त मार्गातील क्रिया-कलाप आढळेल. पोंडरीक यागातही बरीच शाक्तप्रक्रिया आहे. ब्राह्मण ग्रंथातील सृष्टीच्या उत्पत्तीचे विचार एकत्र केल्यास ते शाक्तांच्या सृष्टिज्ञानाशी जवळीक दाखवतील. उपनिषदांत उपासना व ज्ञान यांनी प्राधान्य आहे. शाक्तमार्गही याच विषयांना प्राधान्य देतो व त्यामुळे त्याचा उपनिषदांशी मेळ जमतो. त्रिपुरा, त्रिपुरातापिनी, देवी, भावना, सौभाग्यलक्ष्मी, सीता, कौल, काली, तारा इत्यादी उपनिषदे शाक्त उपासनेसाठीच निर्माण झाली आहेत.

मोहेंजोदडो व हडप्पा येथील उत्खननांतून देवी उपासनेच्या प्राचीनतेविषयी पुरावे उपलब्ध होतात.

२) बुद्धोत्तर काळ– या काळात शक्तीविषयक साहित्याचा बराच विस्तार झाला. बाह्य, स्थूल प्रतीकांची पूजा मोठ्या प्रमाणावर सुरू झाली. वैदिक कर्मकांड मूर्तिनिरपेक्ष होते, ते या काळात मूर्तिसापेक्ष झाले. त्यामुळे देवी उपासनेत पूजा, जप, ध्यान इत्यादी तपशील प्रविष्ट झाला. महाभारताच्या शांतिपर्वात जी सांख्य–योग–ज्ञान यांची मांडणी आहे, त्याच पद्धतीने शाक्त तत्त्वज्ञान साकारले आहे. या काळात शिव, शक्ती, विष्णू या तिघांच्याही उपासना तंत्रबद्ध झाल्या. शिव व शक्ती यांच्या उपासनेचे साहचर्य पूर्वी होते तसेच चालू राहिले. फरक इतकाच झाला की शैवांनी शिवाला प्रधान व शक्तीला गौण मानले. वैष्णव उपासनेच्या तंत्रातही शिव–शक्तीच्या उपासनेतील बरीच तंत्रे स्वीकारली गेली. वरील मोठ्या कालखंडातील केवळ शाक्तांच्या साहित्याचा विचार करायचा झाल्यास त्याचे चार भाग पाडता येतील.–१) सूत्रसाहित्य २) आगमग्रंथ ३) पुराणे ४) स्तोत्रसाहित्य.

परशुरामकृत कल्पसूत्रे, अगस्त्य, भारद्वाज व नागानंद यांची शक्तिसूत्रे; अंगीरसाची दैवी मीमांसासूत्रे, गौडपादांची श्रीविद्यारत्नसूत्रे व प्रत्यभिज्ञामताची शक्तिसूत्रे हे एवढे सूत्रसाहित्य शाक्तमताचा प्रसार करते.

आगमसाहित्य तर याहून विशाल आहे. गौडपाद व शंकराचार्य यांनी ६४ शाक्ततंत्रांचा उल्लेख केला आहे. याशिवाय वामकेश्वर या नावाचेही एक तंत्र आहे. या व्यतिरिक्त ज्ञानार्णव, कुलार्णव, रुद्रयामल इत्यादी शाक्त आगम ग्रंथही बरेच आहेत. इ.स.च्या ११व्या शतकात विद्यारण्य या आचार्याने शाक्तमतावर ‘श्रीविद्यार्णव’ नावाचा प्रचंड ग्रंथ निर्माण केला. ब्रह्मयामल, पिंगलमत, जयद्रथयामल या ग्रंथांतही शाक्तमताचेच विवेचन केलेले आहे. शिवोपासना व योगमार्ग यांचा शाक्त उपासनेशी घनिष्ठ संबंध आहे. याबद्दल प्रमाणभूत आगमग्रंथही फार प्राचीन काळापासूनचे उपलब्ध आहेत. इ. स. च्या ११व्या शतकातील अभिनव गुप्ताने शक्तीविषयक प्रचंड ग्रंथसंपत्ती निर्माण करून ठेवली आहे. त्याने आपल्या ग्रंथांत अनेक पूर्वाचार्यांचे उतारे देऊन शैवप्रक्रियेचे शाक्तप्रक्रियेशी साम्य दाखवले आहे. शक्तीच्या उपासनेतील योग हे अंगही प्राचीन आहे. बरेच योगी शक्तिउपासक होते. ज्ञानेश्वरांचा योग हा शक्तिउपासनेचेच अंग आहे. ज्ञानेश्वरांच्या परमगुरूंचे परमगुरू मत्स्येंद्रनाथ यांना श्रीशंकरांनी क्षीराब्धीच्या उदरात शांभव योगाचे ज्ञान प्राप्त करून दिले होते. या मत्स्येंद्रनाथांच्या नावावर कौलज्ञाननिर्णय नावाचा ग्रंथ प्रसिद्ध आहे. त्यात प्रतिपादन केलेले ज्ञान व प्रक्रिया ही आगमोक्त ज्ञान–प्रक्रियांशी जुळतात.

३) शंकराचार्योत्तर काळ – या कालखंडात पुराणांची परिवर्धित संस्करणे बनून गेली होती. शिवशक्तीच्या पुराणांतून शक्ती उपासनेचे महत्त्व विशद केले जाणे साहजिक आहे. कारण शिव–शक्तींचे ऐक्य हा मूळ सिद्धान्तच आहे. शिवावाचून शक्तीची व शक्तीवाचून शिवाची उपासना सिद्ध होऊच शकत नाही. पण वैष्णव पुराणातही विष्णू व त्याची शक्ती यांचा अभेद वर्णिला आहे. कालिकापुराण, देवी भागवत, मार्कंडेयपुराण, सूतसंहिता इत्यादी ग्रंथ शक्तीच्या उपासनेलाच प्राधान्य देतात.

हिंदी साहित्याच्या प्रारंभिक युगात शाक्तमताचा प्रभाव विशेष दिसून येतो. ८४ सिद्धांमधला एक प्रसिद्ध सिद्ध म्हणजे मत्स्येंद्र हा होय. संपूर्ण नाथसंप्रदायच कौलमताशी निःसंशय स्नेहबद्ध आहे. सिद्धसाहित्य, नाथसाहित्य व संतसाहित्य यांमध्ये शक्तिसाधनेचा स्पष्ट प्रभाव आहे. नाद, बिंदू, पंचमकार इत्यादी शाक्तांची प्रतीकभाषा वरील साहित्यातही वापरली गेली आहे. त्याचबरोबर प्राचीन हिंदी साहित्यात शाक्तांची प्रखर निंदाही केलेली आढळते. त्यावरून असे वाटतो की नाथसिद्धांच्या काळात शाक्तमत विकृत झाले होते. त्यात अनेक दुष्ट, अनैतिक रीती व रुढी प्रविष्ट झाल्या होत्या.

शक्तीच्या उपासनेसाठी अनेक आगम व तंत्रग्रंथ निर्माण झाले आहेत. दुर्गासप्तशती हा मार्कंडेयपुराणातला ग्रंथही त्याचसाठी निर्माण झाला असून शाक्त उपासक त्याचे उलटे–सुलटे, सपल्लव, संपुट पद्धतीचे अशा अनेक प्रकारे पाठ करतात. विविध कामनांसाठी पाठाच्या पद्धतीही विविध आहेत.

शाक्तांच्या विविध ग्रंथांत सृष्टिनिर्मितीविषयी विविध मते आढळून येतात. पण त्यांच्या विचारप्रणालीत बाह्यतः जरी

भिन्नता दिसून आली, तरी त्यातही एक सुसंगत असे तत्त्व आहे. शाक्त हे अद्वैती आहेत. पण त्यांनी शंकराचार्यांचा विवर्तवाद न स्वीकारता परिणामवाद स्वीकारून आपल्या अद्वैताची उभारणी केली आहे. म्हणूनच त्यांना शक्तिविशिष्ट अद्वैती असे म्हणतात. त्यांच्या मते आद्य शक्ती हे सृष्टीचे मूल तत्त्व होय. ब्रह्माच्या हातून सृष्टिनिर्मितीचे काम नीट होईना, तेव्हा त्याने शक्तीला त्याविषयी प्रार्थिले. त्या वेळी शक्तीने विमर्श किंवा स्फूर्ती बनून बिंदुरूप धारण केले. मग शिवाने प्रकाश किंवा तेज यांच्या रूपाने त्या बिंदूत प्रवेश केला. त्यातून पुढे नाद नावाचे तत्त्व निर्माण झाले. नाद आणि बिंदू एकरूप झाल्यावर त्यांना अर्धनारीश्वर किंवा संयुक्त बिंदू हे रूप प्राप्त झाले. श्वेत आणि रक्त असे आणखी दोन बिंदू शाक्त मानतात. त्यांना अनुक्रमे स्त्री व पुरुष असे म्हणतात. हे दोन्ही मिळून कला निर्माण करतात. अशा प्रकारे संयुक्त बिंदू, रक्त व श्वेत बिंदू हे तिन्ही मिळून कामकलेला जन्म देतात. या चार तंत्रांच्या संयोगातून सृष्टी उत्पन्न होते. कामकला ही सृष्टीची नियामक शक्ती होय. साख्यांप्रमाणेच शाक्तही ३६ तत्त्वे मानतात. या तत्त्वांचे तीन विभाग पडतात. शिवतत्त्व, विद्यातत्त्व व आत्मतत्त्व. शिवतत्त्वाचे दोन विभाग होतात. शिवतत्त्व आणि शक्तितत्त्व. विद्यातत्त्वात सदाशिव, ईश्वर व शुद्ध विद्या ही तीन तत्त्वे येतात. आत्मतत्त्वात पुढील ३१ तत्त्वे येतात. आत्मा, माया, कला, विद्या, राग, काल, नियती, पुरुष, प्रकृती, बुद्धी, अहंकार, पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये, पाच विषय आणि पंचमहाभूते.

पराशक्तीच्या हृदयात विश्वसृष्टीची इच्छा उत्पन्न झाली की लगेच तिची शिव आणि शक्ती अशी दोन रूपे होतात. शिव प्रकाशरूप आहे. तर शक्ती विमर्शरूपिणी आहे. पूर्ण अकृत्रिम, अहम्‌ची स्फूर्ती म्हणजे विमर्श होय. यालाच चित्, चैतन्य, स्वातंत्र्य, कर्तृत्व, स्फुरण इत्यादी नावे आहेत. प्रकाश व विमर्श सदैव एकत्र राहतात. प्रकाश किंवा शिव याला संवित् म्हणतात विमर्शाला युक्ती किंवा मनन म्हणतात. याच शिवशक्तीच्या आंतर निमेषाला सदाशिव व बाह्य उन्मेषाला ईश्वर म्हणतात. परा संवितचे शिवशक्त्यात्मक रूप सर्गात्मक असते. शिवतत्त्वात 'अहम्' हा विमर्श, सदाशिव तत्त्वात 'अहमिदम्' हा विमर्श व ईश्वर तत्त्वात 'इदमिदम्' हा विमर्श राहतो. या तिन्ही विमर्शांत प्रत्येकामध्ये प्रथम पदाचे प्राधान्य असते. शुद्ध विद्यातत्त्वात अहम् व इदम् या दोहोंनाही समान महत्त्व असते. इथून पुढे माया तत्त्वाचे कार्य सुरू होते. ही माया अहम् व इदम् या दोहोंना समान महत्त्व असते. इथून पुढे माया तत्त्वाचे कार्य सुरू होते. ही माया अहम् व इदम् या दोहोंना पृथक करते. अहम् हा अंश पुरुष होतो व इदम् हा अंश प्रकृती बनते. शिवाला पुरुषरूपात येण्यासाठी माया पुढील उपाधींची सृष्टी करते– कला, विद्या, राग, काल व नियती. या पाचांना मिळून कंचुक किंवा आवरण असे पारिभाषिक नाव आहे. एवढा विस्तार झाल्यावर पुढचा सृष्टिविकास सांख्य दर्शनाप्रमाणे होतो. ज्या क्रमाने सृष्टीचा आविर्भाव होतो, त्याच्या उलट क्रमाने तिरोभाव होतो. शैवांच्या त्रिक दर्शनातही वरील तत्त्ववाद मान्य केलेला आहे. वैदिक तत्त्वज्ञान केवलाद्वैत, विशिष्टाद्वैत, शुद्धाद्वैत, द्वैत इत्यादी भेद आहेत. शाक्त तत्त्वज्ञानातही हे सर्व प्रकार दिसून येतात. मात्र या मार्गात जी त्रिपुरोपासना आहे, ती मात्र पूर्ण अद्वैतनिष्ठ आहे. पूर्णाद्वैत हा त्रैपुर सिद्धान्त शंकराचार्यांच्या पूर्णाद्वैताशी पूर्णतया एकरूप वाटतो.

काश्मीर, कांची व कामाख्या ही शाक्त पंथाची तीन प्रमुख केंद्रे होत. पहिली दोन ही श्रीविद्येच्या उपासनेची केंद्रे होती. कामाख्या हे कौलमताचे फार मोठे केंद्र होते व आजही इथल्या शाक्तांच्या उपासनेवर अनार्य तिबेटी तंत्राचा विशेष प्रभाव आहे. कौलाचारी पंचमकारांचा वाच्यार्थाने उपयोग करू लागले, हा त्यांच्यावर पडलेला तिबेटी तंत्रप्रभाव होय, असे विद्वान मानतात.

शाक्त तंत्रांची संख्या विपुल आहे. त्यांतली बरीचशी अद्यापि अप्रकाशित आहेत किंवा ती मुद्दाम गुप्त ठेवलेली आहेत. प्रकाशित तंत्रांवरूनही त्यांच्या उदात्त सिद्धान्ताचा परिचय होतो.

भगवान शंकराच्या पाच मुखांपासून पाच आम्नाय निर्माण झाले. पूर्वाम्नाय, दक्षिणाम्नाय, पश्चिमाम्नाय, उत्तराम्नाय व ऊर्ध्वाम्नाय अशी त्यांची नावे होत. कुलार्णव तंत्राच्या तिसऱ्या उल्लासात त्यांचे विशद वर्णन आहे. पूर्वाम्नाय हा सृष्टिरूप असून मंत्रयोग आहे. दक्षिणाम्नाय हा स्थितिरूप व भक्तियोग आहे. पश्चिमाम्नाय हा संहाररूप व

कर्मयोग आहे. उत्तराम्नाय हा अनुग्रहरूप व ज्ञानयोग आहे. ऊर्ध्वाम्नाय हा दिव्यभावाशी हा संबद्ध आहे. ऊर्ध्वाम्नाय हा आपल्या मताचा आहे, असे कौलाचारी समजतात, तर समयाचारी तो आपल्या मताचा मानतात. शाक्तांनी भारत व आशिया महाद्वीप एवढा भूप्रदेश तीन भागांत वाटला आहे. भारताचा उत्तर व पूर्व भाग म्हणजे विंध्यापासून चटगावपर्यंतची भूमी, हिला विष्णुक्रांता म्हणतात. उत्तर-पश्चिम भागाला रथक्रांता म्हणतात. यात तिबेटचाही अंतर्भाव होतो. विंध्यापासून दक्षिण समुद्रापर्यंतची भूमी ही अश्वक्रांता होय. या तीन क्रांतांमध्ये ६४ प्रकारची तंत्रे प्रचलित असल्याचे शाक्तांनी लिहून ठेवले आहे.

### गाणपत्य संप्रदाय

गाणपत्य पंथाचा उदय पाचव्या शतकानंतर आणि नवव्या शतकापूर्वी केव्हातरी झाला, असे डॉ. भांडारकर यांचे मत आहे. इतिहासाचार्य वि.का.राजवाडे गणपतीचा काल २३०० पासून २५०० वर्षांइतका प्राचीन ठरवितात. ज्ञानकोशकारांनीही ही देवता वेदपूर्वकालीन आहे, असेच अनुमान काढले आहे. डॉ. मिराशी यांनी मुख्यतः हालाच्या 'गाथा सप्तशती'वरून अनुमान करून इ. स. च्या सहाव्या शतकाच्या प्रारंभी गणपती उपासना प्रचलित होती, हे मान्य केले आहे.

गणपतिदेवतेचे प्राचीनत्व सिद्ध असले, तरी याज्ञवल्क स्मृतीत व इसवीसनाच्या आठव्या शतकात होऊन गेलेल्या भवभूतीच्या 'मालती-माधव' या नाटकात गणेशाचे स्तवन प्राधान्येकरून आहे. इसवी सनाच्या आठव्या व नवव्या शतकातल्या शिलालेखात गणेशाचे व गाणपत्यांचे उल्लेख आढळतात. गणेशोपासनेचे सर्व ग्रंथ याच काळात निर्माण झाले, असे म्हणायला हरकत नाही.

आनंदगिरीने लिहिलेल्या 'शांकरदिग्विजय' या ग्रंथात पुढील सहा गाणपत्य संप्रदायांचा निर्देश आहे.

महागणादिपतीची उपासना करणारा. या पंथाचे लोक गणपतीला अनाद्यनन्त मानून त्याची उपासना करतात.

हरिदागणपतीची उपासना करणारा. या पंथाचे लोक गणपतीला परब्रह्म मानून त्याची उपासना करतात व ऋग्वेदाच्या दुसऱ्या मंडळातले २३ वे सूक्त प्रमाण मानतात.

उच्छिष्ट गणपतीची उपासना करणारा, या पंथाचे लोक गणपतीची हेरंब या नावाने पूजा करतात. यांचा गणपती डाव्या सोंडेच्या असतो. हे गणपतीची पूजाही डाव्या हातानेच करतात. देवीला गणपतीची शक्ती मानतात. हे जातिभेद आणि विवाहबंधनही मानीत नाहीत. हा एक गुप्त पंथ होता व त्यात स्त्री-पुरुषांमधले लैंगिक व्यवहार स्वैरपणे चालत. शांकरदिग्विजयात यांना वाममार्गी म्हटले आहे. या पंथाचे उपासक तोंडात तोबरा भरून मंत्र म्हणत. म्हणून त्यांच्या देवाला उच्छिष्टगणपती हे नाव पडले, असे सांगतात.

नवनीत-रचर्ण-संतान गणपतीचे आणखी तीन उपासक. हे स्वतःला 'श्रुतिमार्गी' म्हणवतात व संपूर्ण विश्व हीच गणेशाची मूर्ती मानतात. सांप्रत हे पंथ इतर शैव-वैष्णव पंथांप्रमाणे प्रचारात राहिलेले नाहीत.

गणपतिनामनीय उपनिषद, गणपत्युनिषद, गणेशसंहिता, ब्रह्मवैवर्तपुराणाचा गणेशखंड, गणपतिकल्प, गणपतिकवच, गणपतिपंचरत्न, पंचावरण स्तोत्र, पुरश्चरणविधी, मंत्रविधान, रत्नप्रद्वीप, गणपतिरहस्य, वेदपाद स्तोत्र, गणपतिसहस्रनाम, गणपतिसूक्त, स्तवराज, गणेश माहात्म्य इत्यादी वाङ्मयसंपदा प्रसिद्ध आहे.

गणेशसांप्रदायिकांना प्रिय असणारे संस्कृत भाषेमधील ग्रंथ म्हणजे, गणेशपुराण (यात उपासना खंडात ९१ आणि क्रीडाखंडात १४५ अध्याय आहेत.) मुद्‌गल पुराण (यात ४२८ अध्याय आहेत) हे होत. गणेशगीता (अध्याय ११, एकूण श्लोक ४१०) हा ग्रंथ म्हणजे प्रसिद्ध अशा गणेशपुराणाचाच एक भाग आहे. याशिवाय 'गणपती अथर्वशीर्ष उपनिषद' प्रसिद्ध आहे. या उपनिषदांच्या आवर्तनांनी केलेला अभिषेक श्रीगणरायाला अत्यंत संतोष देतो असे मानले जाते.

गणपती हाच साक्षात परमात्मा असून त्यानेच सकळ ब्रह्मांडाची निर्मिती केली. त्याच्यापासूनच सर्व देव निर्माण झाले. तो अजर, अमर, निर्गुण निराकार असा देवाधिदेव आहे, असे गाणपत्य तत्त्व आहे.

गणपतीची उपासना दोन प्रकारे करावी, असे सांगितले आहे. गणपती हा परमात्मा मानून त्याचे ध्यान करणे, हा पहिला प्रकार व त्याच्या मूर्तींची पूजा करणे हा दुसरा प्रकार.

गणपती हा शिवपुत्र असला, तरी शिवाने त्याला प्रसन्न करून घेण्यासाठी दहा वर्षे तपश्चर्या केली व आपल्या हातून त्रिपुरासुराचा वध व्हावा, असा वर मागून घेतला. राधेनेही गणपतीची उपासना केल्याचे ब्रह्मवैवर्त पुराणात सांगितले आहे. या संप्रदायात श्रीगणपतीला ॐकार स्वरूप मानून त्याची उपासना केली जाते. परमात्म्याचे पहिले स्फुरण नादमय आहे. त्यामुळे ॐकार हेच विश्वाचे आदी म्हणजे पहिले घटक द्रव्य ठरते. त्या ॐकाराचे व्यक्त रूप म्हणजे गणपती होय. महर्षी पतंजली यांनी योगशास्त्रात 'तस्य वाचकः प्रणवः' (१.२७) अशा सूत्राने ईश्वरोपासना सांगितली आहे. ती प्रणवोपासना म्हणजे ॐउपासना आहे. श्रीगणेश हा ॐकार रूपाने निर्गुण ब्रह्म तर शिवपार्वती पुत्र य रूपाने सगुण ब्रह्म आहे. गृत्समद (शौनक) ऋषींनी य संप्रदायाचे प्रवर्तन केले. त्यांनीच 'ब्रह्मणस्पति' हे सूक्त रचले. त्यात 'ॐ गणांना त्वां गणपतिं हवामहे।' या मंत्रात गणपतीचा स्पष्ट उल्लेख आहे.

ऋग्वेदाच्या आठव्या, दहाव्या मंडलांतही गणेशस्तवन आहे. मैत्रायणी संहितेत (२.९,१.६) 'तत्कराटाय विद्‌महे हरिमुखाय धीमहि तन्नोदंति प्रचोदयात्।' असे गणरायाचे वर्णन येते. हे वर्णन वराहमिहिराच्या बृहतसंहितेतील वर्णनाशी जुळणारे आहे. हा ऋग्वेदातील तेजस्वी गणेशच पुढे पुराणकाळात शिवपार्वतीचा पुत्र बनून 'गजानन' रूप पावला. तो सुखकर्ता, दुःखहर्ता, सकल मंगळाचा निर्माता आणि बुद्धिवैभवाचा दाता आहे. तो ऋद्धी (चातुर्य, बुद्धी, मुमुक्षत्व) आणि सिद्धी (वैभव, कीर्ती, ऐश्वर्य) विनायक आहे.

'श्री गणेशाय नमः।' हा आपल्या जीवनशिक्षणाचा पहिला पाठ मंगलाचरणी मंत्र असतो. चौदा विद्या आणि चौसष्ट कला यांच्या आराधनेला हा संप्रदाय महत्त्व देतो. गणेश हा तर संगीत नृत्यादी कलांचाही अधिष्ठाता ईश्वर आहे. या संप्रदायाने सर्वांना गणेशविद्या लेखनविद्या यांचे प्रसाददान दिले. तसेच ॐकार स्वरूप आराधना, शब्दब्रह्माची उपासना, अनन्यनिष्ठेने सांगितली, तसेच योग मार्गालाही महत्त्व देणारा आहे. 'एवं ध्यान यन्ति, यो नित्यं, स योगी योगिनांवरः।' असे अथर्वशीर्ष उपनिषदाचे म्हणणे आहे.

गृत्समद, मेधातिथी, भृशुंडी, वरेण्य इत्यादी महान गाणपत्य भारतात होऊन गेले. मोरया गोसावी (इ.स.१३७५-१४६१) जनी जनार्दन, राघवचैतन्य (इ.स.चे १५ वे शतक), मध्वमुनीश्वर (१७ वे १८ वे शतक) यदुमाणिक (१८ वे शतक), गोसावी नंदन (इ.स.१७ वे शतक), निरंजन स्वामी कऱ्हाडकर (इ.स.१६३७-१७२७) निरंजनदास बल्लाळ, शंकरदास (इ.स.१८वे शतक) इत्यादी कित्येक गणेशभक्त सत्पुरुष महाराष्ट्रात होऊन गेले. यांपैकी कित्येकांनी मराठी भाषेत गणपतीविषयक विपुल वाङ्मय निर्माण केले. खास गाणपत्यांनी रचलेल्या गणेशभक्तिपर वाङ्मयाव्यतिरिक्त अन्य परंपरांतील संतांनी व कवींनीही गणेशविषयक वाङ्मय रचले आहे.

पुणे जिल्ह्यातल्या आंबवडे (ता.भोर) या गावी असलेला गणपती शिवाजी महाराजांनीच स्थापला आहे. त्यांनी मोरया गोसावी यांचे वंशज नारायण गोसावी यांच्याकडून अनुग्रह घेतला असावा, असेही समजले जाते. पेशवे हेही गणेशभक्त होते. गणपती हा त्यांचा कुलस्वामीच होता. नानासाहेब पेशवे (इ.स.१७४०-१७६१) यांनी शनिवारातल्या आपल्या वाड्यात गणपतिपूजेचा व उत्सवाचा प्रघात पाडला. सवाई माधवरावांनी इ.स.१७८४मध्ये पर्वतीजवळच्या तळ्यात गणपतीची स्थापना केली.

गणपती वेदकाळी होता की नाही, ते दैवत आर्य की अनार्य हा वाद विद्वान संशोधकांत वर्षानुवर्षे चालू असला, तरी जनमानसात गणपती हे श्रद्धास्थान म्हणून अढळ आहे. त्याची उपासना वाढतच आहे. पण यासाठी गणेशपूजन-स्मरण करणारे सर्वच काही सांप्रदायिक किंवा दीक्षा घेतलेले गाणपत्य नाहीत. शैव, वैष्णव, शाक्त अशा सर्वच पंथांतील उपासक आपापल्या उपास्य दैवतांची उपासना करूनही गणेश आराधना करतात. कित्येकांची गुप्त उपासना निराळी व प्रकट उपासना निराळी असते, अशांच्या बाबतीतही गणेश-उपासना गुप्त असते. कोणत्याही विशिष्ट पंथाचे नसलेले सर्वसामान्य लोकही आपल्या आवडीप्रमाणे गणेशाची उपासना करताना आढळतात. महाराष्ट्रात गणेशोपासना सार्वत्रिक आहे. दक्षिणेत कर्नाटक आदि

प्रांतांत प्रतिदिवशी गणेशविषयक हवन, तर्पण करण्याची पद्धत अनेक घरांतून आढळते.

### दत्त संप्रदाय

दत्त संप्रदायाच्या स्वरूपावर दत्त देवतेच्या मूळ स्वरूपाचा प्रभाव विशेष आहे, परंतु त्याच्या घडणीत व आचारविचारांत दत्तावतारी महापुरुषांचाही मोठा वाटा आहे. दत्तात्रेयाच्या उपासनेच्या क्षेत्रात वर्णाश्रमोचित आचारधर्माचे काटेकोर आचरण करणे, हा महत्त्वाचा भाग ठरला आहे. नरसिंह सरस्वती हे शांकर परंपरेतील संन्यासी होते. नंतरच्या काळात स्थित्यंतरे घडली, परंतु दत्तोपासनेच्या क्षेत्रातले हे वैशिष्ट्य प्रभावी राहिले. अक्कलकोटच्या स्वामींसारखी एखादी अवधूतवृत्तीची विभूती किंवा माणिकप्रभूंसारखे हिंदू-मुसलमानांना दत्तोपासनेत समानतेने सामावून घेणारे सत्पुरुष सोडले, तर दत्तसांप्रदायिकांच्या सनातन श्रद्धांना फारसा धक्का लागलेला दिसत नाही. दत्तोपासनेच्या बळावर सिद्ध पुरुषांना शक्ती प्राप्त होतात आणि त्या शक्तीच्या प्रभावाने ते लोकांची दुःखे दूर करून त्यांना साधनेच्या मार्गावरूनही सांभाळून नेऊ शकतात, अशी जी भावना सर्वसामान्य लोकांच्या मनात रुजत गेली, त्या भावनेतच दत्त संप्रदायाच्या लोकप्रियतेचे रहस्य दडलेले आहे. महाराष्ट्रातील भक्तिपरंपरेची एक सनातन आणि समन्वयवादी धारा म्हणजे 'दत्त संप्रदाय'.

नृसिंह सरस्वतींनी दत्तसंप्रदायाचे प्रवर्तन केले, असे लौकिकार्थाने मानले जाते. तथापि, नृसिंह सरस्वतींनी अशा प्रकारे प्रत्यक्षरीत्या संप्रदायप्रवर्तन न करता परंपरेने चालत आलेल्या दत्तोपासनेचा एक गुरुमार्ग प्रवर्तित केला. त्यालाच पुढे 'दत्त संप्रदाय' म्हटले जाऊ लागले. वैदिक परंपरेतील एक उपासनामार्ग म्हणून त्याला अद्वैत तत्त्वज्ञानाचे अधिष्ठान प्राप्त झाले. विशिष्ट उपासना-पद्धतीतून विशिष्ट आचारधर्म आकाराला आला. दत्तोपासक अवतारी पुरुषांच्या वास्तव्यामुळे त्या-त्या स्थानांना तीर्थक्षेत्रांचे माहात्म्य प्राप्त झाले. गुरुमाहात्म्य सांगणारा, उपासना मार्गाचे प्रतिपादन करणारा, आचारधर्माचे निरूपण करणारा असा सांप्रदायिक प्रमाणग्रंथ म्हणून या परंपरेत 'गुरुचरित्र'ला प्रतिष्ठा प्राप्त झाली. अशा रीतीने दत्तात्रेयाच्या उपासनेभोवती अद्वैताच्या अधिष्ठानावर दत्त संप्रदाय हा एक साधनमार्ग चौदाव्या शतकात महाराष्ट्रात उदयाला आला.

हा संप्रदाय सगुणोपासक आणि गुरुभक्तिप्रधान आहे. त्यामुळे दत्तात्रेयाच्या सगुण साक्षात्कारासाठी दत्तभक्त कठोर अनुष्ठानाचे आचरण करतात. काही अंशी कायाक्लेशावर किंवा आत्मक्लेशावरही त्यांचा भर असतो. दत्तात्रेयाचे सालंकृत सगुण रूप असले, तरी बऱ्याच ठिकाणी मूर्तीऐवजी दत्तात्रेयाच्या पादुकांचे पूजन केले जाते. दत्त हा योगी आहे त्यामुळे संप्रदायात योगमार्गावर अधिक भर दिला जातो. मूलतः आचारातील शुद्धता, सर्वाभूती ईश्वर ही भावना अंतरंगातील प्रेमभावना, नामस्मरण, ध्यान इत्यादी उदात्त आचारातून प्राप्त होणारा साक्षात्कार किंवा उन्मनी अवस्था संप्रदायातील सत्पुरुषांना अभिप्रेत आहे. चित्तशुद्धीचे एक साधन म्हणून नृसिंह सरस्वती यांनी शास्त्रोक्त आचारधर्मावर भर दिला आहे. गुरुचरित्रातील ३६ व ३७ या अध्यायांत ब्राह्मणांसाठी आचारधर्म सांगितला आहे. काही प्रमाणातील अतिरेक सोडला तर वेदाचार, शास्त्राचार, श्रेष्ठाचार, वृद्धाचार, कुळाचार, देशाचार, जनाचार, लौकिकाचार इत्यादी आचार निश्चितपणे उदात्त विचारसरणीतून निर्माण झालेले आहेत. संप्रदायाचा आचारधर्मावर विशेष भर दिसून येतो. नृसिंह सरस्वती ज्या कालखंडात अवतरले, त्या काळातील सामाजिक, धार्मिक परिस्थितीही याला कारणीभूत आहे. वैदिक धर्माचे संरक्षण व संवर्धन ब्राह्मणांकडून व्हावे, म्हणूनच त्यांनी इतकी अचूक आचारसंहिता निर्माण केली असावी, असे वाटते.

दैवताच्या नावावर ग्रंथ असलेले ऐकिवात नाही. तथापि दत्तात्रेयाच्या नावावर १) अवधूतोपनिषद् २) जाबोलोपनिषद ३) अवधूतगीता ४) त्रिपुरोपासनापद्धती ५) परशुराम कल्पसूत्र हे ग्रंथ सांगितले जातात. 'गुरुचरित्र' ग्रंथ संप्रदायात वेद म्हणून मान्यता पावला आहे. सरस्वती गंगाधर हा त्याचा कर्ता. 'दत्तमाहात्म्य' या ग्रंथाची रचना वासुदेवानंद सरस्वतींनी केली असून त्यात दत्तचरित्राबरोबर तत्त्वविवेचनही केले आहे. 'गुरुलीलामृत' हे अक्कलकोटच्या स्वामी महाराजांचे चरित्र स्वामीच्या अंतेवासीयांपैकी वामनबोवांनी लिहिले आहे. याशिवाय दत्तात्रेय हा गुरुसंस्थेचा परमोच्च आदर्श असल्याने

गुरुमहिमा गाणारा 'गुरुगीता' हा १७६ श्लोकांचा संस्कृत ग्रंथ दत्तसंप्रदायात मान्यता पावला असून त्याचे अनेकांनी मराठी अनुवाद केले आहेत. जनार्दनस्वामी दत्तसांप्रदायिक त्यामुळे त्यांचे शिष्य एकनाथ हेही दत्तसांप्रदायिक. नाथांनी भागवताच्या आरंभी नमनाच्या ओव्यांत दत्तात्रेयाला 'आचार्यांचा आचार्य' या शब्दांत गौरविले आहे व ग्रंथरचनेचे श्रेय दत्तात्रेयाला दिले आहे. 'त्रिगुणात्मक त्रैमूर्ती' ही दत्तात्रेयाची एकनाथकृत आरती आजही म्हटली जाते. दासोपंत हे सर्वांत श्रेष्ठ दत्तसांप्रदायिक ग्रंथकार. त्यांची एकूण तीन लाखांपेक्षा अधिक भरेल अशी काव्यरचना दत्तभक्तीने प्रभावित झालेली आहे. वासुदेवानंद सरस्वती तथा टेंबेस्वामी यांनी 'गुरुसंहिता' हे गुरुचरित्राच्या संस्कृत रूपांतरानंतर लिहिलेले दत्तपुराण, ओवीबद्ध दत्तमाहात्म्य, सप्तशती गुरुचरित्र ग्रंथ तत्त्वज्ञान, आचार, कर्मकांड या सर्व बाबतींत सांप्रदायिक परंपरा अनुसरणारे आहेत. दत्त संप्रदायाचे तत्त्वज्ञान हे अद्वैत वेदान्ताला अनुसरून आहे. तत्त्वज्ञानाचे विवरण स्वतंत्रपणे करणारा ग्रंथ या संप्रदायात उपलब्ध नसला, तरी त्याचे सिद्धान्त त्रिपुरा रहस्याचा ज्ञानखंड, 'दत्तप्रबोध', 'दत्तमाहात्म्य' या ग्रंथांत आहेत.

'दत्तप्रबोध' या ग्रंथात अनंतसुत विठ्ठलांनी दत्त-अनसूया संवादरूपाने जीव, जगत, ईश्वर यांसंबंधी तत्त्वज्ञान सांगितले आहे. उदाहरणार्थ ब्रह्म म्हणजे काय व ते कस जाणावे? असा प्रश्न अनसूयेने विचारला असता, दत्तात्रेय उत्तर देतात, 'ब्रह्म हे अखिल, अभंग, निरुपाधिक, निःसंग, करून अकर्ते, भोगून अभोक्ते, शुद्ध, शांत, निर्गुण, निरामय, नित्यानंद असे आहे. ब्रह्मांड रचणारे आणि इंद्रियांना प्रेरणा देणारे तेच आहे. ते जगद्रूपाने नटले आहे. त्याला ज्ञानदृष्टीने जाणता येते. याच प्रश्नोत्तर स्वरूपात पुढील तत्त्वविवरण केले आहे. प्रकृतीचे स्वरूप सांगताना तिला मूळ परब्रह्माची त्याहून निराळी नसलेली जी इच्छाशक्ती, ती प्रकृती असे म्हटले आहे. ही इच्छाशक्ती अपरिचित असून, तिच्यातून त्रिगुणात्मक माया, भूतसृष्टी व तिन्ही लोक ह्यांची उत्पत्ती होते.

जिवासंबंधी 'जे मूळ परब्रह्मरूप आहेत, परंतु भिन्न-भिन्न देह धारण केल्यामुळे ते भिन्न दिसतात' असे म्हटले आहे. ईश्वराचे स्वरूप पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे. ''ब्रह्मा, विष्णू, महेश, सूर्य, अग्नी इत्यादी ईश्वरांची अनेक रूपे अनेकांनी मानली आहेत. परंतु ती एकाच देवाची रूपे आहेत. हा ईश्वर शारीरी वा स्थूलस्वरूप नसून तो केवळ चैतन्यमय आहे. हे स्वरूप कोणाला दिसण्यासारखे आहे, ते कसे आहे, हे सांगता येणार नाही, तेच आत्मस्वरूप होय. ईश्वर आणि आत्मा हे भिन्न नाहीत. जगत्स्वरूपाविषयीचे विचार सारांशाने पुढीलप्रमाणे सांगता येतील, ''दृष्टीला भासणारे जड जगत चैतन्याहून निराळे नाही. सृष्टीच्या पूर्वी स्वतंत्र असलेल्या परमेश्वराने इच्छास्वातंत्र्याने हे ब्रह्मांड निर्माण केले. हे जग त्याच्या संकल्पातून निर्माण होते, राहते व लयही पावते. आरशातील प्रतिबिंबाप्रमाणे जगत परमेश्वराच्या स्वरूपावर प्रकट झाले आहे.''

अन्य संप्रदायांनीही दत्तात्रेयाविषयीचा श्रद्धाभाव व्यक्त केला आहे. महाराष्ट्रात वारकरी संप्रदायाचे पायाभरण करणाऱ्या ज्ञानदेवांनी 'दत्तात्रेय योगिया'ला आपल्या अंतरात स्थान दिले आहे. तुकारामांनीही 'तीन शिरे सहा हात' असलेल्या दत्तात्रेयाला भक्तिभावाने दंडवत घातले आहे. चैतन्य संप्रदायातील आद्य सत्पुरुष राय व चैतन्य यांनी गिरनारवर तप करून दत्तात्रेयाची कृपा संपादन केली होती. आनंद संप्रदायाचा आदिगुरू दत्तात्रेय असल्यामुळे त्याला दत्त संप्रदायच म्हणायला हवे. समर्थांनाही दत्ताने दर्शन दिल्याची कथा सांप्रदायिक ग्रंथांत आढळते. श्रीपाद श्रीवल्लभ हे दत्तात्रेयाचे इतिहासकाळातील पहिले अवतार समजले जातात. नरसिंह सरस्वती हे दत्तात्रेयाचे दुसरे अवतार मानले जातात. दत्तोपासनेचे संजीवक अशी त्यांची ख्याती आहे. नरसिंह सरस्वतींच्या महासमाधीनंतर एका शतकाच्या आतच महाराष्ट्रात दत्तोपासनेचा प्रभाव सर्वव्यापी ठरला. इ.स.च्या सोळाव्या शतकात जनार्दनस्वामी, एकनाथ आणि दासोपंत या त्रिमूर्तीने दत्तभक्तीचा आश्रय करून दत्तोपासनेची परंपरा अधिक समृद्ध केली. गेल्या पाचशे वर्षांत दत्तोपासनेच्या क्षेत्रात अनेक महातपस्वी निर्माण झाले. त्यांपैकी काही उन्मुक्त चिंतनाने भारलेले व विधिनिषेधातीत अशा अवधूत वृत्ताने रंगलेले होते; तर काही कर्मकांडाचा पुरस्कार करणारे आणि आचारधर्माला व उपासनातंत्राला प्राधान्य देणारे होते. मुक्तेश्वर, निरंजन रघुनाथ, नारायण महाराज, जालवणकर, माणिकप्रभू,

अक्कलकोटचे स्वामी, वासुदेवानंद सरस्वती, पंत महाराज बाळेकुंद्रीकर, विष्णुदास, दीक्षित स्वामी इत्यादी अनेक दत्तभक्त होऊन गेले. या संप्रदायातही गुरु-शिष्यसंबंधांची अखंड साखळी आढळत नाही.

## अवधूत पंथ

बेळगावजवळील बाळेकुंद्री येथील श्रीपंतमहाराज हे एक थोर दत्तभक्त. त्यांचे मराठी व कन्नड भाषेत विपुल वाङ्मय आहे. बेळगावकडील मलप्रभा नदीच्या काठी असलेल्या 'पार्श्ववाड' या गावच्या श्रीबालमुकुंद उर्फ बाळावधूत यांचा अनुग्रह श्रीपंताना होता. दत्तावधूत, बाळावधूत, श्रीदत्तात्रेय (पंतमहाराज) अशी त्यांची गुरुपरंपरा आहे. या संप्रदायास कोणी श्रीगुरुदेव संप्रदाय, आनंद संप्रदाय तर कोणी अवधूत संप्रदाय म्हणतात. नावे भिन्न असली, तरी 'श्रीदत्त' हे सर्वांचे एकच दैवत आहे. मात्र अनेकांना अवधूत व दत्त या दोहोंत फरक करावासा वाटतो.

आपल्या या अवधूतपरंपरेचा मोठ्या जाणिवेने श्रीपंत उल्लेख करतात. 'अनादिसिद्ध श्रुतिसंमत संप्रदाय भला' (श्रीदत्तप्रेमहरी पद २७२५) असे त्यांनी म्हटले आहे. आपल्या पंथाच्या गुह्य ज्ञानाचे वर्णन 'आत्मज्योती' नावाच्या लेखात करताना ते म्हणतात, ''दुजाभाव दवडून अति गुप्तपणे श्रीदत्तात्रेय स्वामींनी रामचंद्र अवधूत यास ज्या गुह्य गोष्टी सांगितल्या त्याच रामावधूताने एकान्ती बसून दुजे दृष्टीस न पडेल अशा गुह्य मार्गाने श्रीबाळावधूतास उपदेशिल्या. श्रीपादगुरू बाळमुकुंदांनी जंबुनगरी निर्जन गुहेत दीन दत्तास निजबोध सांगितला.'' आणखी एक महत्त्वाची व ऐक्य बोधाची बाब अशी की; श्रीदत्तात्रेय, श्रीपादवल्लभ, श्रीनृसिंहसरस्वती व श्रीबाळावधूत हे चारही अवतार एकाच दत्ताचे होते, असे पंतांनी पुनः पुनः सांगितले आहे. 'जो पारखपुरी उद्भवला, जो अत्रिअनसूयेच्या पोटी आला, जो श्रीपादवल्लभ झाला, जो नृसिंहसरस्वती रूपाने गाणगाभुवनी खेळला; तोच अवधूत होय (१४०१) असे त्यांनी निर्धाराने म्हटले आहे. प्रेमभक्ती हे श्रीपंतांच्या परंपरेचे एकमेव सूत्र आहे. अवधूत हा त्यांच्या मते 'गगनमठीचा योगी' असल्याने त्याची गादी फक्त भक्तांच्या हृदयातच. प्रेमभक्तीवर आधारलेल्या श्रीपंतांच्या अवधूतपंथांची लक्षणे थोडक्यात पुढीलप्रमाणे आहेत. १) विधिनिषेध त्याग २) विषयवैराग्य ३) कर्म-उपासना-योग-निराकरण ४) संचित-आगामी-प्रारब्ध शून्यकरण ५) सूक्ष्माभिमान त्याग, मिथ्याभिमानखंडण, अंतरबाह्यबंधनमोक्ष ६) ऐक्यबोध व समरसभाव ७) बंधुप्रेम व अखंड शांती ८) अद्वैतभक्ती व कैवल्यमुक्ती ९) सहजानुभव, प्रकट युक्ती १०) सहजसमाधिरती, सद्गुरुचरणप्रीती, ११) निरंकुश स्थिती, सदा निश्चिंती.

अवधूत मार्गाचे वैशिष्ट्य सांगताना श्रीपंत एका ठिकाणी म्हणतात, ''वेदान्तमार्गात शरीरप्रकृती चांगली असणे जरूर आहे. कारण तेथे साधन करणे, साध्य साधणे असते; आरोग्य चांगले ठेवावे, सात्त्विक आहार असावा, बेताने व नेमाने वागावे, वाईट इच्छा ठेवू नयेत शमदमादी साधनसंपन्नता असावी, अधिकारी शिष्य असावा.'' अशी बंधने पाळणे वेदान्तमार्गात जरूर असते. कारण वेदान्तमार्गात काही बद्ध, काही मुमुक्षू, काही मुक्त अशी दृष्टी असते. अवधूतमार्ग हा वेदान्तमार्गापेक्षा श्रेष्ठ आहे. तेथे बंध नाही व मुक्तीचीही किंमत नाही. कल्पनाप्रवृत्तीने बंध झाला, तोही खोटा व कल्पनानिवृत्तीने मोक्ष झाला, तोही खोटा. स्त्री, शूद्र सर्वच अधिकारी. अवधूत-गुरुमार्ग शुद्ध प्रेमभक्तीचा. या मार्गी गुरुवचनच सर्व वेदान्त, गुरुरहाटीच सिद्धान्त गुरुवचनच श्रेष्ठ, असे असूनही श्रीपंतांना श्रुतींबद्दल अत्यंत आदर होता. श्रीपंतमहाराजांचे के.रा.दिवेकर यांनी जे अत्यंत साक्षेपी व साधार असे बोधचरित्र लिहिले आहे, त्यात ४३व्या प्रकरणात पंतांच्या अवधूत संप्रदायाची अतिशय उद्‌बोधक अशी ओळख करून दिलेली आहे.

बाळेकुंद्री, दड्डी, बेळगाव, बडोदे, अकोळ, कोंचरी, नेरली, शेट्टीहाळी, गोकाक, धारवाड, हुबळी, बेडकिहाळ, कोल्हापूर, कुरुंदवाड, मुंबई, पुणे इत्यादी ठिकाणी या परंपरेतील संप्रदाय विस्तृतपणे पसरलेला आहे. बेळगाव, पार्श्ववाड, देसनूर, कर्डेगुद्दी, दड्डी, कुरंदवाड, चिकाळगुड इत्यादी गावी पंतांचे वास्तव्य असल्याने तेथेही परंपरेचा वारसा दिसतो. श्रीपंतांचे व त्यांच्या बंधूंचे भक्त आज महाराष्ट्रात सर्वत्र विखुरलेले असून श्रीपंतांनी दाखविलेल्या भक्तिप्रेमात दंग आहेत.

* * *



संप्रदाय



खंडोबा.

# महाराष्ट्रातील दैवते

■ डॉ. अरुणा ढेरे

**शिवाइतकीच विष्णूची प्रीती महाराष्ट्राच्या मनी वसत आहे. विष्णूच्या दहाही अवतारांची शिल्पे महाराष्ट्रात सर्वत्र आढळतात. नाशिकचा सुंदर नारायण, मेहेकरचा शारंगधर, नरसीबामणीचा केशीराज, बार्शीचा भगवंत, मेथीचा श्रीविष्णू, दापोलीजवळचा कोकणातला केशवराज अशांसारखी अनेक विष्णुमंदिरे महाराष्ट्रात प्रख्यात आहेत. नाशिकचा किंवा रामटेकचा रामही भाविकांचा हृदयस्वामी आहे. शिवाय महाराष्ट्रात गावोगावी राममंदिरे आहेतच.**

महाराष्ट्राचा देव्हारा अतिपुरातन आहे. प्रागैतिहासिक काळापासूनच तो नाना देवतांनी गजबजलेला आहे; पूजा पुरश्चरणांनी सजलेला आहे; कथागाथांनी गाजलेला आहे. पुरतत्त्वज्ञांनी, मानवशास्त्रज्ञांनी आणि संस्कृतीच्या भाष्यकारांनी गेल्या शतकाभरात केलेल्या संशोधनांमुळे त्या देव्हाऱ्याचे गूढ-भव्य स्वरूप सर्वांगांनी प्रकट करून दाखवणे आता शक्यतेच्या कक्षेत आले आहे.

या देव्हाऱ्यातली दैवते नाना प्रकृतीची आहेत. त्यांच्या आकृतीही विविध आहेत. काही दैवते भयानक असूनही गुणांनी सौम्य आहेत तर काही आकारहीन शिळांच्या रूपात आहेत, पण गुणांनी भयंकर आहेत. शिवाय प्रत्येक घराच्या देव्हाऱ्यात नांदणारी कुलदैवते, प्रत्येक गावातल्या देवळात नांदणारी ग्रामदेवते, तीर्थक्षेत्रांत नांदणारी उपास्य दैवते आणि दारापारांवर, ओट्या-चव्हाट्यावर, डोंगर-माळांवर नि

बांधाबांधांवर ठाण मांडून राहिलेली भूत-पिशाचे, मुंजाबा-चेडोबा, आसरा-मावलया, म्हसोबा-जखदेव यांसारखी असंख्य क्षुद्रदैवते या साऱ्यांना महाराष्ट्राच्या देव्हाऱ्यात मानसन्मान आहे; पूजा-पुरस्कार आहे, उत्सव-महोत्सव आहे.

मराठी समाजाच्या प्रकृतीनुसार त्याच्या या दैवतमंडलातही जाती-जमाती आहेत, उच्च-नीचता आहे, गटतट आहेत, त्यांचे स्नेहबंध आहेत आणि संघर्षही आहेत. त्या सर्वांचे स्वरूप न्याहाळणे आणि त्यांची चिकित्सा करणे, हा एका मर्यादित लेखाचा अथवा एका पुस्तकाचा विषय नाही. इथे या देव्हाऱ्यातल्या दैवतमंडळाचे जे मोजके प्रभावी प्रतिनिधी आहेत, त्यांचे स्वरूपदर्शन फक्त घडवले आहे. अर्थात त्यासाठीही शैव, वैष्णव आणि शाक्त अशा प्रमुख धारा प्रथम समोर आणल्या आहेत.

**मातृदेवता**

महाराष्ट्र हा मूळचा शक्तीचा पुजारी. महाराष्ट्राच्या शक्तीच्या उपासनेतून निर्माण झालेल्या वाङ्मयाचे दर्शन जेवढे ग्रहणगूढ आहे, तेवढेच तिच्या मूर्तिरूपाचे दर्शनही आश्चर्यविमूढ बनविणारे आहे. शेंदुराने डवरलेल्या अनघड तांदळ्याच्या रूपात ती आपले प्राथमिक मूर्तिस्वरूप प्रकट करते, तर अनेक भुजांनी आणि अनेक आयुधांनी नटलेल्या रूपांत ती आपले परिणत मूर्तिस्वरूप दाखविते. या तिच्या अनेकविध रूपांमागे तिच्या उपासनेचे आणि उपासकांच्या तिच्याविषयीच्या धारणांचे गूढ धागे गुंफले गेले आहेत.

उदाहरणार्थ मातृदेवतेच्या प्राचीन उपासनेचे गूढ वलय भोवती असणारी लज्जागौरी. लज्जागौरी या देवतेचा समावेश नवलिंगांच्या समूहात होतो. तेर, नेवासे, भोकरदन, रामतीर्थ आणि माहूरझरी ह्यांसारख्या काही ठिकाणी या देवतेच्या मूर्ती मिळाल्या आहेत. बहुधा उत्तानपाद आणि शीर्षविहीन अशा तिच्या योनिस्तनयुक्तमूर्ती महाराष्ट्राच्या भूमीवर प्राचीन काळापासून पुजल्या जात असाव्यात. आज ती पूजापरंपरा खंडीत झालेली असली, तरी या देवतेचे आणि तिच्या उपासनेचे अवशेष या मातीवर प्राचीन काळी गाजत असलेल्या सर्जनाच्या देवतेचा महिमाच सांगत आहेत, यात शंकाच नाही. विश्वाचे गर्भालय किंवा पृथ्वीची योनी मानून या देवतेची पूजा आज तिच्या योनिप्रधान नग्न मूर्तीच्या रूपात होत नसली, तरी वारुळाच्या रूपात होणारी तिची पूजा आजही अस्तित्वात आहेच. विशेष करून कोकणभागात होणारी सांतेरीची पूजा किंवा महाराष्ट्रात सर्वत्र प्रचलित असलेली यल्लमाची पूजा हा योनिरूपिणी भूदेवीच्या पूजेचाच एक प्रकार आहे. या भूदेवतेची जोडी क्षेत्रपाळ देवांबरोबर आहे. यल्लमा, मातंगी, रेणुका, सातेरी या क्षेत्रदेवता आहेत आणि मुरूग, सुबह्मण्यम, जोतिबा, खंडोबा, रवळनाथ, म्हसोबा हे क्षेत्रपाळ देव आहेत.

लज्जागौरीसारखी प्राचीन मातृदेवता काय किंवा आजही उपासनेत असलेल्या महाराष्ट्रातल्या इतर प्रख्यात देवता काय किंवा इतर गौण देवता काय सर्व शक्तिदेवतांची पूजा महाराष्ट्राने महामातेच्या पूजेचा भाव मनात बाळगूनच केली आहे. शक्ती म्हणजेच देवी. साऱ्या जगाची आई. प्रत्येक कुळाचे आणि प्रत्येक गावाचे रक्षण करणारी आई, आपल्या लेकरांचा संभाळ करणारी आई. म्हणजेच ती कधी कुलदेवतेचे रूप घेऊन कुळाचा संभाळ करते तर कधी ग्रामदेवतेचे रूप घेऊन गाव राखते. तिला प्रसन्न करण्यासाठी आपण कुळधर्म कुळाचारांचा, नवससायासांचा, पूजोपचारांचा केवढा तरी पसारा मांडला आहे.

पदूबाई, कळमजाई, फिरंगाई, मेसाई, मुक्ताई, काळूबाई, कानबाई अशा अनेक नावांनी ती महाराष्ट्रात नांदते आहे. कुठे ती मोहरादेवी आहे तर कुठे मांढरदेवी आहे, कुठे वज्रेश्वरी आहे तर कुठे एकवीरा आहे. कुठे उभी शिळा, कुठे डोंगरकपार, कुठे अनघड तांदळा तर कुठे सावयव, सालंकृत मूर्ती अशा अनेक रूपांत तिची पूजा होते आहे.

माहूरची रेणुका, तुळजापूरची भवानी, कोल्हापूरची महालक्ष्मी आणि वणीजवळ सप्तशृंग गडावरची सप्तशृंगी ही देवीची साडेतीन शक्तिपीठे महाराष्ट्रात गाजती आहेत. माहूर हे मराठवाड्यातील एक प्रख्यात शक्तिपीठ. प्रचंड मोठ्या तांदळ्याच्या रूपात तिथे एका लहानशा डोंगरावर रेणुका नांदते आहे. ती मूळची धरित्रीमाताच आहे. तिचा पुत्र परशुराम. साधुसंतांना, सती-साध्वींना आणि दुभत्या गाईंना छळणाऱ्या सहस्रार्जुन राजाचे हजार हात परशुरामाने

झाडाच्या फांद्यांसारखे तोडले. तो परशुरामही आपल्या आईजवळ स्वतंत्र देवळात उभा आहे.

तुळजापुरातली आदिशक्ती श्रीभवानी ही साऱ्या महाराष्ट्राची कुलदेवता. तीही एका सतीचे शील राखण्यासाठीच तुळजापुरात प्रकट झाली. सोलापूरजवळ तुळजापुरी असलेल्या यमुनाचळावर ही देवी अधिष्ठित आहे. तिच्या प्रेरणेने महाराष्ट्रात शिवछत्रपतींनी स्वतंत्र राज्य स्थापण्याचे महाकार्य केले. एकनाथांनी भावार्थ रामायणात तिला रामवरदायिनी म्हणून संबोधिले. त्याच रामवरदायिनीच्या आशीर्वादाने रामदासांनी शिवछत्रपतींच्या राज्यस्थापनेच्या प्रयत्नांना जनसमुदायाच्या श्रद्धेचे प्रचंड बळ प्राप्त करून देण्याचा प्रयत्न केला. हनुमंत हाही बलोपासनेचे प्रेरक असे दैवत बनला. समर्थ रामदासांनी स्थापिलेल्या अकरा मारुतींनी बलोपासनेची केंद्रे म्हणून महाराष्ट्राच्या घडणीत महत्त्वाची भूमिका बजावली आहे.

'शक्तीने मिळती राज्ये। युक्तीने कार्य होतसे<br>
शक्ति युक्ति जये ठायी। तेथ श्रीमंत नांदती'

हा रामदासांचा सिद्धान्त शिवछत्रपतींच्या पराक्रमाने सोळा आणे खरा ठरला आहे. कोल्हापूरची महालक्ष्मी सुदूर दक्षिणेतल्या प्रख्यात तिरुपती बालाजीशी प्रियेचे नाते सांगत महाराष्ट्राच्या दक्षिण सीमेजवळ उभी आहे. या हरिप्रियेच्या सौम्य सात्त्विक तेजाने महाराष्ट्राचे दैवत मंडळ उजळून उठले आहे. शिलाहार नृपतींनी या देवतेचे वैभव वाढवले आहे आणि पुढेही ते अखंडपणे गाजते राहिले. या देवीचे शिल्पसुंदर मंदिर महाराष्ट्रातल्या मंदिरशिल्पांमधला एक उत्कृष्ट नमुना ठरले आहे. शक्तीची महाराष्ट्रातली आणखी अनेक ठाणी गाजती आहेत. अंबाजोगाईची योगेश्वरी, अमरावतीची अंबा-एकवीरा, पुण्याची चतुःश्रृंगी, कार्ल्याची एकवीरा, मुंबईची महालक्ष्मी अशी कित्येक लहानमोठी देवस्थाने महाराष्ट्रात विखुरलेली आहेत. काही प्राचीन आहेत तर काही अर्वाचीन आहेत.

### शिवशंकर महादेव

शक्तीचा सहचर शिव. महाराष्ट्राच्या डोंगरकड्यांवर आणि नद्यांच्या संगमांवर अनेक शिवस्थाने आहेत. सह्याद्रीने तर आपल्या अंगाखांद्यावर शिवलिंगांची लेणी ल्यायली आहेत. भारताच्या बारा ज्योतिर्लिंगांपैकी पाच ज्योतिर्लिंगे एकट्या महाराष्ट्रात आहेत. नाशिकजवळ गोदेच्या उगमाजवळचा त्र्यंबकेश्वर, वेरुळचा घृष्णेश्वर, भीमेच्या उगमाजवळचा भीमाशंकर, औंढ्याचा नागनाथ आणि परळीचा वैजनाथ.

याशिवाय साताऱ्याजवळचा किंवा शिखर शिंगणापूरचा शंभूमहादेव अशी आणखीही गाजती शिवश्रेत्रे महाराष्ट्रात आहेत. संगमेश्वर, अंबरनाथ, सिन्नर, खिद्रापूर इत्यादी ठिकाणची आठशे-नऊशे वर्षांपूर्वीची सुंदर शिवमंदिरे आपल्या शिवभक्तीची साक्ष देत आजही उभी आहेत. भीमाशंकराच्या, त्र्यंबकेश्वराच्या आणि महाबळेश्वराच्या चरणांपासून निघालेल्या भीमा, गोदा, कृष्णा, कोयना या लोकमातांनी मराठी जनांना आपल्या उरीचे अमृत पाजून तुष्ट-पुष्ट केले आहे. वेरूळचा घृष्णेश्वर हा शिवछत्रपतींच्या वाडवडिलांना वरदान देणारा देव. त्यानेच फार प्राचीन काळी राष्ट्रकूट राजघराण्याला प्रेरणा देऊन महाराष्ट्राची इभ्रत साऱ्या भारतात गाजवली होती. शिखर शिंगणापूरच्या शंभू महादेवावर मालोजीराजांपासून छत्रपतींच्या घराण्याची श्रद्धा. शिवाजीराजांनी 'हर हर महादेव' या गर्जनेने सह्याद्रीच्या दऱ्याखोऱ्यांना दणाणून टाकले होते आणि आपले 'शिव' हे नाव सार्थ केले होते.

### श्रीगणेश आणि कार्तिकेय

शिवशंकराबरोबर त्याच्या परिवारानेही महाराष्ट्राच्या देव्हाऱ्यात मानाचे स्थान मिळवले आहे. शिव-शक्तीचा पुत्र गणपती याची अनेक ठाणी महाराष्ट्रात आहेत. मोरगाव, रांजणगाव, थेऊर, ओझर, लेण्याद्री, पाली, महड, सिद्धटेक या आठ ठिकाणी नांदणारे गणपती 'अष्टविनायक' म्हणून महाराष्ट्रीय जनांच्या श्रद्धेचा विषय बनले आहेत. प्राचीन काळी रूढ असणाऱ्या प्रमुख व्यापारी मार्गांवर अथवा व्यापारी केंद्रांवर या गणपतींची स्थापना झाली असल्याचे आज लक्षात येते. तेव्हा या विघ्नहर्त्याचे संकटमोचनाचे आणि संरक्षणाचे वरद सामर्थ्य इथल्या जनजीवनाने किती प्राचीन काळापासून श्रद्धापूर्वक जगवले आहे, याचा बोध होतो.



श्रीजोतिबा.

या अष्टविनायकांच्या जोडीने विदर्भ–मराठवाड्यात गाजणारे अदासा, कळंब, नामलगाव, लिंबा गणेश, राजूर इत्यादी ठिकाणचे गणेश किंवा वाई, चिंचवड, हेदवी इत्यादी ठिकाणचे गणपती किंवा भाविकांच्या श्रद्धेने नव्याने महाकेंद्र बनलेले मुंबईच्या सिद्धिविनायकासारखे गणेश यांनी महाराष्ट्रातल्या गणेश भक्तीला गाजते ठेवले आहे.

### खंडोबा आणि जोतिबा

शिव–शक्तीचा थोरला पुत्र स्कंद– कार्तिकेय. महाराष्ट्राचा लोकदेव जो खंडोबा, तो स्कंदच आहे; अशी आपली धारणा आहे. कोणे एके काळी स्कंदाचा उत्सव ज्या दिवशी होत असे, त्या दिवसाला–मार्गशीर्ष शुक्ल षष्ठीला स्कंदषष्ठी असे नाव होते. त्याच दिवशी आपण खंडोबाचाही उत्सव करतो. आज आपण तो दिवस चंपाषष्ठी या नावाने ओळखतो. स्कंदाला दक्षिणेत दोन बायका मानलेल्या आहेत. खंडोबालाही म्हाळसा आणि बाणाई अशा दोन बायका आहेतच. जेजुरी हे खंडोबाचे महाराष्ट्रातले प्रख्यात ठाणे. नेवाशाच्या मोहिनीराजाचे नाते जेजुरीच्या खंडोबाशी जोडलेले आहे. प्रवरेच्या तीरावर पैठण परिसरात असलेले नेवासे हे श्रीविष्णूच्या मोहिनी अवताराचे क्षेत्र आहे. इथले दैवत म्हाळसा–मोहिनी म्हणून प्रसिद्ध आहे.

म्हाळसा–मोहिनीचा पती म्हणजे मल्लारी–खंडोबा. मणी आणि मल्ल या दोन दैत्यांचा संहार करण्यासाठी शिवाने जो अवतार घेतला तो मल्लारी अवतार. तोच खंडोबा होय, अशी त्याची अवतारकथा 'मल्लारी माहात्म्या'त आहे. माहात्म्य कथेनुसार या मल्लारीचे सैन्य सात कोटी होते. सात संख्येला कन्नडमध्ये येळ म्हणतात. हा देव मूळचा कर्नाटकातला असल्यामुळे त्याच्या सात कोटी सैन्याचा जयजयकार 'येळकोट' या कानडी शब्दाने केला जातो. घोड्यावर आरूढ होऊन आणि हाती खंडा घेऊन दैत्यांचा वध करण्यासाठी निघालेला हा देव महाराष्ट्रातल्या ग्रामीण जनतेचा प्रिय देव आहे. खंडोबाला प्रिय अशा बेलभंडाराला स्पर्श करून, वचन पाळण्यासाठी प्राण पणाला लावणारी श्रद्धा मराठी जनांनी अनेकवार प्रकट केली आहे.

खंडोबाचा सखा–सोयरा जोतिबा. माहात्म्य कथेला अनुसरायचे तर कोल्हापूर येथील महालक्ष्मीच्या साहाय्यासाठी धावून आलेला हा देव कोल्हापूरजवळ 'रत्नागिरी' नावाच्या डोंगरावर विसावला आहे. तो हिमालयातल्या केदारनाथाचा अवतार आहे, अशी भाविकांची श्रद्धा आहे. यमाई म्हणजे रेणुका ही त्याची पत्नी. खरे म्हणजे हा देव खंडोबाप्रमाणे भैरवनाथाच्या वर्गातला आहे; म्हणजे क्षेत्रपाळ आहे. यमाई ही भूदेवता तिचा पती हा क्षेत्रपती किंवा क्षेत्रपाळ होय. 'केदार' या शब्दाचा अर्थसुद्धा शेतजमीन असाच आहे. त्यावरून केदारनाथ म्हणजेही क्षेत्रपती किंवा क्षेत्रपाळ देव. धरणी ही माता आणि ज्योतींनी म्हणजे नक्षत्रांनी किंवा प्रकाशानी भरलेले आकाश हा पिता. ही कल्पना वेदपूर्व काळापासून भारतीय मनात रुजलेली आहे. ही दैवी माता–पिता महाराष्ट्राच्या देव्हाऱ्यात जोतिबा–यमाई म्हणून नांदत आहेत आणि 'चांग भलं'चा नित्यघोष करणाऱ्या भक्तांची पूजा स्वीकारत आहेत.

शिवाइतकीच विष्णूची प्रीती महाराष्ट्राच्या मनी वसत आहे. विष्णूच्या दहाही अवतारांची शिल्पे महाराष्ट्रात सर्वत्र आढळतात. नाशिकचा सुंदर नारायण, मेहेकरचा शारंगधर,

नरसीबामणीचा केशीराज, बार्शीचा भगवंत, मेथीचा श्रीविष्णू, दापोलीजवळचा कोकणातला केशवराज अशांसारखी अनेक विष्णुमंदिरे महाराष्ट्रात प्रख्यात आहेत. नाशिकचा किंवा रामटेकचा रामही भाविकांचा हृदयस्वामी आहे. शिवाय महाराष्ट्रात गावोगावी राममंदिरे आहेतच. परशुराम तर कोकण-गोमंतकाच्या भूमीचा निर्माता आहे. नाशिक, परोळा, वाशीम किंवा आता कर्नाटकात असलेल्या पण पटवर्धनांचे संस्थान असलेला जामखिंडीजवळचे कल्हळी अशा ठिकाणी अनेक शतके नांदत असलेला व्यंकटेश हेही विष्णूचेच एक रूप आहे.

भागवतात विष्णूचे चोवीस अवतार सांगितलेले आहेत. त्यात एक दत्तात्रेय आहे. दत्तात्रेयाची भक्ती एकट्या महाराष्ट्रानेच भारतात गाजवली आहे. श्रीनृसिंहसरस्वतींच्या गाणगापूर निवासामुळे दत्तोपासनेचा प्रसार महाराष्ट्राप्रमाणेच कर्नाटकातही विपुल झाला आहे. गुरुचरित्राचा कर्ता सरस्वतीगंगाधर हा कावडीच होता. नाथसंप्रदायात दत्तदेवतेला महत्त्व होते आणि महानुभाव संप्रदायाचे आदिकारणही होते. त्यामुळे या संप्रदायामुळे दत्तोपासना महाराष्ट्राबाहेरही गेली, पण तिचे मुख्य केंद्र महाराष्ट्र हेच राहिले. दत्तसंप्रदायाच्या पुनरुत्थानाच्या काळातले पहिले दत्तावतार श्रीपादश्रीवल्लभ हे पीठापूरचे, मद्रास प्रांतातले. पण दुसरे दत्तावतार नृसिंहसरस्वती. त्यांच्यामुळे गाणगापूरला दत्तभक्तीच्या महाकेंद्राची प्रतिष्ठा प्राप्त झाली.

आंध्र-महाराष्ट्राच्या सीमेवरचे माहूर हे रेणुकेप्रमाणेच तिच्या पुत्राचे परशुरामाचे आणि दत्तात्रेयाचेही मोठे प्रभावी स्थान आहे. दत्तोपासनेत रमलेले दासोपंत आंध्रातील परमानंदतीर्थ किंवा दत्तसंप्रदायातील एकनाथ हे प्रसिद्ध दत्तसंप्रदायी पंडित यांच्या परंपरेतल्या अनेक दत्तोपासकांनी महाराष्ट्रातल्या दत्तोपासनेलाच नव्हे तर वाङ्मयालाही लक्षणीय योगदान दिले आहे. औदुंबर, नरसोबाची वाडी, लाडकारंजे यांसारखी दत्तात्रेयाची स्थाने महाराष्ट्रातल्या दत्तोपासकांची श्रद्धाकेंद्रे म्हणून आजही गाजती आहेत.

### चोविसावेगळा 'श्रीविठ्ठल'

महाराष्ट्रातल्या वैष्णवांच्या 'जीवीचे जिव्हार' बनलेला विठ्ठल मात्र विष्णूच्या अवतारांमध्ये 'चोविसावेगळा' आहे. विठ्ठल हे महाराष्ट्राचे महान दैवत आहे. ज्ञानोबांपासून निळोबांपर्यंतच्या सर्व श्रेष्ठ संतांनी त्यांच्या रूपचिंतनात जीवनाची कृतार्थता अनुभवली आहे. त्यांची वाणी त्याच्या गुणगायनाने रंगली. त्यांनी त्याला 'विष्णुसहित शिव' म्हटले आहे. 'बौद्ध' या बिरुदाने वाहिले आहे. त्याला 'जिळापुत्र' म्हटले आहे, त्याला 'दिगंबर' म्हटले आहे, 'कानडा कर्नाटकु' म्हटले आहे. याचाच अर्थ असा की, संतांनी आपल्या उदार आणि उन्नत दृष्टीतून शैव, वैष्णव, बौद्ध, जैन इत्यादी संघर्षशील धर्मधारांचा सुमधुर संगम विठ्ठलाच्या ठायी साधला आहे. अनेक भक्तिसंप्रदाय महाराष्ट्रात उगम पावले, नांदले आणि क्षीणही झाले परंतु विठ्ठलभक्तीची धारा मात्र अजूनही उभ्या महाराष्ट्राची भावभूमी भिजवत वाहत राहिली आहे.

विठ्ठल-बीरप्पा या जोडनावाने नांदणारा धनगरांचा लोकदेव पंढरपुरात कृष्ण-विष्णू बनून आला. तोच व्यंकटेशाशीही नाते सांगत राहिला आणि मूळच्या गोपजनांच्या देवाने जवळजवळ एक सहस्रकाचा काळ महाराष्ट्राच्या धर्मभावनेवर अधिराज्य केले. माणसे कोणत्याही जातीची असोत वा वंशाची असोत, कोणत्याही धर्माची असोत वा प्रदेशाची असोत, ग्रामीण असोत वा नागर असोत सर्व प्रकारचे भेद दूर ठेवून गेली आठ-नऊ शतके मराठी माणसे पंढरीची वारी करत आली आहेत. आषाढी-कार्तिकी एकादशीला कुणीही न बोलावता या माणसांचे पाय पंढरीची वाट चालत आहेत.

विठ्ठल या दैवताचा महाराष्ट्राच्या जडणघडणीत फार मोलाचा वाटा आहे. अत्यंत प्रभावी अशा भागवतधर्मीय संतांची परंपरा या दैवताच्या भक्तीतून निर्माण झाली. तिने परकीय आक्रमणांनी गांजलेल्या, अंतर्गत सांस्कृतिक पडझडीतून निस्तेज आणि निर्बल झालेल्या, भेदांनी पोखरलेल्या, दुहीने आणि धर्मसंबद्ध अविचाराने ग्रासलेल्या महाराष्ट्राच्या समाजाला नवसंजीवनी दिली. धर्माधिष्ठित समाजाला धर्मात शिरलेल्या विकृतींवर मात करणारी, शोषण आणि अन्याय यांच्यापासून दूर करू पाहणारी, समताधिष्ठित, सरळ-सोपी आणि मानवता-केंद्रित अशी भक्तीची एक विचारधारा दिली. उपासनेची सरळ साधी रीत

दिली. कर्मकांडाला पर्याय दिले. ढोंगाची आणि अत्याचाराची मुळे उखडण्याचा प्रयत्न केला.

त्याचबरोबर पुरोहितवर्गाचे व्यवस्थेतले वर्चस्व कमी करणारी, सामान्य माणसाच्या जगण्यावरचे प्रचंड दाब आणि जाचक निर्बंध दूर करणारी एक पर्यायी व्यवस्था पारमार्थिक क्षेत्रापुरती त्यांनी उभी केली. माणसांना त्यांनी स्वतःकडे पाहायला लावले. स्वच्छ चारित्र्याचा आग्रह धरला. ही एक प्रकारे मानवशुद्धी होती; समाजशुद्धी होती.

संस्कृताच्या संपुटातले विशिष्ट वर्गापुरतेच असलेले ज्ञान खुले करून त्यांनी ते बहुजनसमाजापर्यंत नेले आणि उन्नतीच्या वाटा स्त्रीशुद्रांसाठी खुल्या केल्या. ज्ञान ही केवळ मूठभर उच्चवर्णीयांची मिजास न राहता ते सर्वांच्या विकासाचे साधन बनले. या प्रयत्नात देशभाषेचे महत्त्वही अधोरेखित झाले. मराठी भाषेचे सामर्थ्य आणि सौंदर्य संतांनी परोपरीने प्रकट केले. संस्कृत हीच एकमेव ज्ञानभाषा असल्याचा समज दूर सारून मराठीला त्यांनी ज्ञानभाषेचा श्रेष्ठ दर्जा मिळवून दिला. मराठी भाषेच्या विकासात विठ्ठलभक्त संतांनी उचललेला हा मोलाचा वाटा आहे.

मराठी साहित्यावर विठ्ठल या दैवतोपासनेचे फार मोठे ऋण आहे. विठ्ठलभक्तांची जी एक मोठी मांदियाळी तेराव्या शतकापासून सोळाव्या शतकापर्यंत विठ्ठलभक्तीपर आणि एकूणच परमार्थपर रचना मराठीत करीत आली, तिने मराठी साहित्याच्या आणि साहित्याभिरुचीच्या जडणघडणीत फार मोठा हातभार लावला. या रचनेने लोकपरंपरेतल्या अनेक लयींना, छंदांना, घाटांना प्रतिष्ठा दिली, ताठरपणाच्या जागी लवचीकपणा, कृत्रिमपणाच्या जागी सहजता, यांत्रिक कसरतींच्या जागी सोपेपणा आणि सरलता, पोकळ डौलाच्या जागी साधी भावगम्यता यांची स्थापना केली, साहित्याच्या प्रेरणा, हेतू आणि परिणाम या तीनही पातळ्यांवर या वाङ्मयाने आमूलाग्र बदल घडवला. हा बदल अर्थातच मराठी साहित्याच्या स्वरूपाचे पुढच्या कित्येक शतकांसाठी दिशादर्शन करणारा ठरला.

एका दैवताच्या उपासना संप्रदायाने संपूर्ण महाराष्ट्राच्या वाङ्मयीन जाणिवांवर केलेला, भाषेवर केलेला, केवळ पारमार्थिकच नव्हे तर सामाजिक व्यवस्थेवरही काही प्रमाणात विधायक रितीने केलेला हा परिणाम अंततः उदारीकरण, समानता, सहृदयता यांच्या आधाराने केलेला होता. महाराष्ट्र-मानस घडवण्यात हा परिणाम लक्षणीय ठरला यात शंका नाही.

महाराष्ट्रातल्या दैवतांचा अभ्यास त्यांच्या अवतारकथा आणि माहात्म्य कथा, त्यांचे संप्रदाय आणि उपासनापद्धती, त्यांची पूजा, विधिविधाने आणि यात्रा-उत्सव, त्यांचे उपासक आणि भक्त, त्यांची क्षेत्रे आणि क्षेत्रमाहात्म्ये, त्यांची उपासनाकेंद्रे आणि उपासना विस्तार अशा विविध अंगांनी करता येतो. इथे त्या दैवतांचा परिचय करून देताना केवळ महाराष्ट्राच्या घडणीतले त्यांचे स्थान आणि प्रभाव यांचाच आढावा घेतला आहे.

(डॉ. रा. चिं. ढेरे ह्यांच्या साहित्यातून केलेले संकलन आहे.)

* * *

# सामाजिक वाटचाल





## समाजजीवन

■ डॉ. ओमप्रकाश समदानी

**महाराष्ट्रात मानवाच्या आद्य वसाहती मोठमोठ्या नद्यांच्या खोऱ्यांत आढळतात. तापी, गोदावरी, कृष्णा, भीमा, प्रवरा येथे वसाहती होत्या. उत्खननामुळे आणि संशोधनातून आता स्पष्ट झाले आहे की, साधारणपणे इ. स. पूर्व दोन हजार वर्षांपासून प्रांताच्या वैशिष्ट्यांना स्पष्ट करणाऱ्या खाणाखुणा दिसून येत होत्या. जोर्वे आणि नेवासे, प्रकाशे आणि सावकडा, ब्रह्मगिरी आदी संस्कृतींचा उल्लेख या दृष्टीने करता येईल. ख्रिस्तपूर्व १५०० ते ८०० या कालखंडात या संस्कृती नांदत होत्या असा निष्कर्ष पुरातत्त्व अभ्यासकांनी काढला आहे.**

महाराष्ट्र प्रदेश आणि महाराष्ट्र समाज यांची काही गुणवैशिष्ट्ये आहेत. 'महाराष्ट्रीयत्व' या संज्ञेने या सर्व गुणवैशिष्ट्यांना अधोरेखित करता येईल. मराठी मन कसे घडले, महाराष्ट्रीयांची जडणघडण कशी झाली, समाजातील वैचारिक प्रेरणा ह्या सामाजिक पैलू आणि सांस्कृतिक जीवन ह्यांना विशिष्ट आकार देत असतात. वस्तुतः समाजासंबंधीचा इतिहास हा अधिक मूलगामी आणि व्यापक स्वरूपाचा असतो. त्यामुळे इतिहासाचा विचार सामाजिक संदर्भात होणे अधिक महत्त्वाचे असते. सुप्रतिष्ठित, समृद्ध महाराष्ट्रीयत्वाच्या संकल्पनेला आकार देणाऱ्या सामाजिक संस्थांचा इतिहास केंद्रस्थानी ठेवून याचा विचार करावा लागतो.

सर यदुनाथ सरकार यांनी मराठ्यांच्या कर्तबगारी संदर्भात म्हटले आहे की, विद्वत्ता आणि युद्ध या दोन्हींमध्ये महाराष्ट्रीय समाजाने जसे नेते व वीर निर्माण केले आहेत, तसे इतर कोणत्याही भारतीय समाजात क्वचितच आढळतात. तसेच, ब्रिटिश राजवटीच्या सरत्या साठ-सत्तर वर्षांमध्ये महाराष्ट्राने निर्माण केले, तशा प्रकारे सुधारलेल्या-आधुनिक पद्धतीचे विधायक कार्य करणारे देशभक्त भारतातील इतर कोणत्याही

प्रांताने निर्माण केले नाहीत. सरकार पुढे असे नमूद करतात, ''मराठ्यांची चिकाटी आणि निष्ठा, राजकीय चळवळीपुरतीच मर्यादित नाही. त्यांनी विधायक स्वरूपाची केलेली कामगिरीही टिकून राहण्यासारखी आहे.'' इतिहासाच्या एका विद्वान भाष्यकाराने महाराष्ट्र समाजाचा केलेला हा गौरव आहे. असा समाज आणि अशी संस्कृती का व कशी घडते? या जडणघडणीमागे असते ती त्या विवक्षित समाजाची वैचारिक बैठक. समाजाचे अंतरंग आणि सामाजिक परिवर्तनाचा इतिहास हा सामाजिक संस्था आणि संघटना ह्यांच्या माध्यमातून घडत असतो. समाजाचा संपूर्ण इतिहास म्हणजे सामाजिक परिवर्तनाचा इतिहास. बहुजन समाजस्थितीचा आणि त्या स्थितीत परिवर्तन घडवून आणणाऱ्या विचारांचा इतिहास, असे इतिहासाचा सामाजिक वेध घेत असताना स. मा. गर्गे यांनी म्हटले आहे.

**महाराष्ट्राचे प्राचीनत्व**

महाराष्ट्राच्या इतिहासाची प्राचीनता समजून घेणे आवश्यक आहे. ह. धी. सांकलिया यांच्या मते या भागाला गेल्या पंधराशे वर्षांपासून 'महाराष्ट्र' म्हणून संबोधले जाते. पुराणकाळात हा भाग दंडकारण्य म्हणून ओळखला जात होता. सांकलिया यांनी नमूद केल्याप्रमाणे, मानवाच्या भौतिक संस्कृतीच्या प्रगतीचे पहिले दर्शन इ. स. १९५५–५६ साली नेवासे येथे झाले. या संशोधनानंतर महाराष्ट्रातील विविध ठिकाणे प्रकाशात आली. अश्मयुगीन मानवापासून ते मध्याश्मयुगीन मानवी जीवनाची उत्क्रांती आणि विकास स्पष्ट होत गेला. शेती, घरे उभारली गेली. जीवनाला स्थैर्य आले. महाराष्ट्रातील नाशिक, जोर्वे, नेवासे, चांडोली, सोनगाव, इनामगाव, दायमाबाद आदी ठिकाणच्या वसाहती आता ज्ञात झाल्या आहेत. खानदेशातही प्रकाशे, सावकडा, आडणे, बहुरूपे, बहाळ आदी ठिकाणी वसाहती होत्या; हे उजेडात आले आहे. सांकलियांच्या मते या वसाहतीचा काळ ख्रिस्तपूर्व पंधराशेच्या जवळपासचा आहे. मनोरम अशा या वसाहतीचे वर्णन करताना सांकलिया यांनी म्हटले आहे की, त्या काळी मानवी जीवनाच्या दैनंदिन गरजा पुरवणारी स्वयंपूर्ण खेडी सर्वत्र होती. गावासमोर नदीचे नयनमनोहर दृश्य पाहता येई. नदीचे पाणी बारमाही वाहणारे असून ते आरोग्यदृष्ट्या स्वच्छ, शुद्ध असे... त्यांची निवासस्थाने म्हणजे एक लहान खोलीवजा झोपडी असे...... अशा प्रकारची छोटी, टुमदार खेडी अगदी इतिहासकाळापर्यंत, एवढेच नव्हे तर अगदी परवा–परवापर्यंत म्हणजे मोठ्या शहरांची निर्मिती होईपर्यंत....टिकून होती.

महाराष्ट्रात मानवाच्या आद्य वसाहती मोठमोठ्या नद्यांच्या खोऱ्यांत आढळतात. तापी, गोदावरी, कृष्णा, भीमा, प्रवरा येथे वसाहती होत्या. उत्खननामुळे आणि संशोधनातून आता स्पष्ट झाले आहे की, साधारणपणे इ. स. पूर्व दोन हजार वर्षांपासून प्रांताच्या वैशिष्ट्यांना स्पष्ट करणाऱ्या खाणाखुणा दिसून येत होत्या. जोर्वे आणि नेवासे, प्रकाशे आणि सावकडा, ब्रह्मगिरी आदी संस्कृतींचा उल्लेख या दृष्टीने करता येईल. ख्रिस्तपूर्व १५०० ते ८०० या कालखंडात या संस्कृती नांदत होत्या असा निष्कर्ष पुरातत्त्व अभ्यासकांनी काढला आहे. महाराष्ट्रात गोदावरी आणि प्रवरा ह्या नद्यांच्या खोऱ्यांत दायमाबाद, नेवासे, पैठण, इनामगाव येथे उत्खननात उपलब्ध झालेले पुरावे तत्कालीन जीवनाचे स्वरूप उजागर करणारे आहेत.

महाराष्ट्रातील आद्य वसाहतींमधील मानवी संस्कृती 'जोर्वे' नावाने संबोधली जाते. नेवासे येथेही मोठ्या प्रमाणात उत्खनन झाले. उत्खननात भांडी उपलब्ध झाली. आणि 'जोर्वे–नेवासे संस्कृती' म्हणून ही संस्कृती ओळखली गेली. उत्खननात सापडलेल्या भांड्यांपैकी काही भांड्यांवर प्राण्यांची चित्रे काढणे सार्वत्रिक होते. परंतु महाराष्ट्राचे वैशिष्ट्य स्वस्तिकामध्ये आहे व ते प्रथमच दिसून येते.

महाराष्ट्राच्या ऐतिहासिक कालखंडाचा प्रारंभ मौर्यकालापासून होतो. सम्राट अशोकाच्या साम्राज्यात दक्षिण भारताचा बराच भाग समाविष्ट होता. अशोकाचे शिलालेख महाराष्ट्रात सापडले आहेत. या काळात महाराष्ट्रात बौद्धधर्माचा प्रसार झाला असावा. सम्राट अशोकाच्या मृत्यूनंतर विस्तृत आणि बलाढ्य अशा मौर्य साम्राज्याचे विघटन झाले. अनेक छोट्यामोठ्या सत्तांचा उदय झाला. या पार्श्वभूमीवर दक्षिण भारतात सातवाहन सत्तेचा उदय झाला. सातवाहन सत्तेचा कालावधी महाराष्ट्राच्या

इतिहासाला झळाळी देणारा देदीप्यमान कालखंड आहे. सातवाहन हेच महाराष्ट्रातील आद्य घराणे होते. भारताच्या इतिहासात चारशे वर्षांपेक्षा अधिक काळ सत्ता टिकवून ठेवणारे हे एकमेव घराणे होय. महाराष्ट्र संस्कृती आणि मराठी मन यांच्या जडणघडणीचा हा कालखंड होता. महाराष्ट्र संस्कृतीची पृथगात्मता आणि गुणवैशिष्ट्ये यांना अधोरेखित करता येते, ते सातवाहन कालखंडापासून. डॉ. रा. श्री. मोरवंचीकरांनी नमूद केल्याप्रमाणे असामान्य प्रगतीच्या अनेक कसोट्या लावल्यास सातवाहन युग एक सुवर्णयुग ठरते.

## समाजजीवन

सातवाहनांच्या कालखंडात महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनाचा प्रारंभ झाला. सातवाहनांचा आणि दक्षिण गंगेचा, गोदावरी नदीचा अविभाज्य संबंध. या कालखंडातील संस्कृतीची गोदावरी ही जन्मदात्री आहे. आद्य मराठी मनाच्या सांस्कृतिक जडणघडणीचा हा कालखंड. महाराष्ट्र समाजाच्या पृथगात्म सांस्कृतिक वैशिष्ट्यांच्या प्रारंभाचा हा कालखंड; सातवाहन सत्तेपासून यादव सत्तेच्या विनाशापर्यंतचा हा कालखंड; महाराष्ट्राच्या सामाजिक आणि सांस्कृतिक जीवनाच्या बहुमुखी विकासाचा कालखंड; सातवाहन, वाकाटक, चालुक्य, राष्ट्रकुल आणि यादव या घराण्यांच्या 'अधिसत्ता' या काळात होऊन गेल्या. इ. स. पूर्व २३० हा सातवाहन सत्तेचा प्रारंभबिंदू. इ. स. १३१८ मध्ये यादव सत्तेचा पाडाव झाला. सुमारे दीडहजार वर्षांचा हा कालखंड महाराष्ट्राच्या इतिहासाचा पहिला टप्पा. महाराष्ट्राच्या अस्मितेचा हा कालखंड.

समाज जडणघडणीच्या दृष्टीने सामाजिक संस्था आणि संघटना यांचा चिरंतन प्रभाव असतो, हे सर्वश्रुत आहे. राजकारण आणि राजसत्ता यांपेक्षा कायम टिकणारा आणि मूलगामी असा हा प्रभाव असतो. समाजसंस्थाचे स्थान व्यापक असते. सामाजिक संस्था जेवढ्या सुप्रतिष्ठित आणि कार्यक्षम असतात, तेवढा समाज स्वावलंबी आणि सतेज असतो. म्हणूनच समाजजीवन म्हटल्यानंतर रूढ अर्थाने ज्या बाबींचे विवेचन केले जाते, त्याऐवजी समाजाला आकार देणाऱ्या संस्था, संघटना व त्यांमागील वैचारिक प्रेरणांना केंद्रस्थानी ठेवून या कालखंडाचा वेध घेण्याचा हा प्रयत्न आहे.

सामान्यपणे दोन हजार वर्षांच्या कालखंडाची विभागणी निम्ननिर्दिष्ट पद्धतीने करता येऊ शकते.

१. सातवाहन ते यादव सत्ता.
२. मुस्लीम सत्तांचा कालखंड
३. शिवशाही कालखंड
४. पेशवाई

## सातवाहन ते यादव

समाजाच्या विविध घटकांचा आणि त्या घटकांच्या परस्परसंबंधाचा विचार येथे करण्यात आला आहे. कुटुंब, जाती, वर्ण, विवाहसंस्था, स्त्रीजीवन, ग्रामसंस्था, स्पृश्यास्पृश्यता विचार हा समाजकारणाचा मुख्य विषय आहे.

**जातिसंस्था / वर्णव्यवस्था :** भारतीय समाजजीवनाचा विचार करताना, प्रदेश कोणताही असला, तरी चातुर्वर्ण्य आणि जाती ह्यांचा विचार अग्रक्रमाने करावा लागतो. विशेष म्हणजे या संदर्भात विद्वानांमध्ये पराकोटीचे मतभेद आहेत. आर्य उत्तर भारतातून दक्षिणेत आले. त्यांच्याबरोबर त्यांचे तत्त्वज्ञान आणि समाजरचना आली, असा एक समज आहे. आर्यांच्या मूळ वस्तिस्थानाविषयी वाद आहेत. आर्यांच्या पूर्वी वसवलेला भारत कोणी वसवलेला आहे, हासुद्धा वादाचा मुद्दा आहे. नरहर कुरुंदकरांनी जातिवर्णाच्या संदर्भात आणखी मूलभूत प्रश्न निर्माण केले आहेत. इरावती कर्वे यांच्या संस्कृती ग्रंथाच्या 'श्रद्धांजली' या प्रस्तावामध्ये कुरुंदकरांच्या प्रतिपादनाचा आशय असा आहे– जातिव्यवस्था आधीच प्रचलित होती. जातिव्यवस्थेने साकार समाजावर आर्यांनी वर्णव्यवस्था लादण्याचा प्रयत्न केला हा मुद्दा चुकीचा आहे. कुरुंदकर पुढे असे म्हणतात की, वर्णव्यवस्था ही शेतीप्रधान, स्थिर संस्कृतीची व्यवस्था आहे. पशुपालनाच्या अवस्थेत असणाऱ्या भटक्या टोळ्यांची ही व्यवस्था नाही. शेतीप्रधान संस्कृती निर्माण झाल्यानंतरच क्षत्रिय, वैश्य, शूद्र अशी विभागणी शक्य आहे. जाती आधीपासून अस्तित्वात होत्या. वर्णापासून जाती हा आपल्याकडचा प्रचलित समज आहे. परंतु जाती ही

कल्पना अधिक मान्यताप्राप्त आहे. परस्परविरोधी अशी ही भूमिका आहे. कुरुंदकरांचे आणखी एक मत नमूद केले पाहिजे. ते म्हणतात, '' हिंदुस्थानात भेदांची विविधता आहे, जातींची विविधता आहे, चालीरितींची विविधता आहे; याचे महत्त्वाचे कारण म्हणजे, कुणीच कुणाच्या समाजरचनेत जाणीवपूर्वक हस्तक्षेप केला नाही, हे आहे. वर्णापासून जाती व जातींतून पुन्हा पोटजाती हे म्हणणे खरे नाही. ह्या परस्परविरोधी असणाऱ्या अशा भूमिका आहेत, हे समजून घेणे गरजेचे आहे. उपर्युक्त कालावधीतील या बाबतची स्थिती याप्रमाणे होती.

सातवाहन कालखंडामध्ये जातिव्यवस्थेवर आधारलेली समाजरचना होती. सातवाहन काळाच्या पूर्वी चातुर्वर्ण्यपद्धती समाजरचनेचा भाग झाली होती. आर्य-अनार्य असा काही संघर्ष आता राहिला नव्हता. यज्ञसंस्थेचे महत्त्व कमी झाले होते. परिणामी ब्राह्मणांचे महत्त्वही कमी होऊ लागले होते. असे शेणोलीकरांचे मत आहे. शेणोलीकर असेही नमूद करतात की, चातुर्वर्ण्यामधून जातिसंस्थेचा उदय होण्यास प्रारंभ झाला होता. आभीर, गोप, चण्डाल, दास, पुलिंद आदी जमाती सातवाहनकालीन महाराष्ट्रात होत्या. या काळात जातींच्या निकषावर गुन्हेगारांना शिक्षा देण्याची पद्धत रूढ होती. समाजजीवनातील अनेक घटक आणि जातिव्यवस्था एकरूप झाले होते. बौद्ध आणि जैन धर्मांच्या तत्त्वज्ञानामुळेसुद्धा जातिव्यवस्थेच्या स्वरूपात आणि प्रभावात कोणताही फरक पडला नव्हता. हा कालखंड जातीयतेच्या समर्थनाचा होता. सातवाहनकालीन समाजरचनेच्या मुळाशी मनुस्मृती होती. ''मनुस्मृती सातवाहनकालीन समाजरचनेची मूलभूत प्रेरणा होती.'' असे रा.श्री. मोरवंचीकरांनी म्हटले आहे. सातवाहन स्वतः चातुर्वर्ण्याचे संरक्षक म्हणवितात. ते स्वतः ब्राह्मण होते व त्यांनी ब्राह्मणधर्माचा पुरस्कार केला.

सातवाहनकालीन समाजव्यवस्थेत मनूने ब्राह्मणांना अग्रक्रम दिला. ब्राह्मणांचे ऋग्वेदी, यजुर्वेदी, सामवेदी व अथर्ववेदी असे पोटभेद अस्तित्वात होते. ब्राह्मणांना अध्ययन, अध्यापन, यजन, याजन, दान आणि प्रतिग्रह अशी सहा प्रकारची कर्तव्ये करावी लागत होती, असे मोरवंचीकरांनी नमूद केले आहे. दुसरा वर्ग होता क्षत्रियांचा. शत्रूंपासून संरक्षणाची जबाबदारी, हे त्यांचे कर्तव्य होते. उपनयन करण्याचा व वेदाध्ययनाचा अधिकार त्यांना होता. वैश्य हा क्षत्रियांनंतरचा तिसरा वर्ग होता. सातवाहन काळ भरभराटीचा आणि व्यापारासाठी प्रसिद्ध आहे. पैठण आणि तेर ही या काळातील प्रगत व्यापारी केंद्रे होती. आर्थिकदृष्ट्या संपन्नतेचा हा कालखंड होता. त्यामुळे वैश्यवर्गाला समाजव्यवस्थेत महत्त्वाची जबाबदारी होती व त्यांचे स्थानही महत्त्वाचे होते. शूद्र हा या समाजरचनेतील शेवटचा घटक होता. या वर्गाचे जीवन कष्टप्रद होते. एक संमिश्र जातिवर्ग या काळात होता. आंतरजातीय विवाह होत होते. हीन जाती व अंत्यज यांचा स्वतंत्र वर्ग या कालखंडात अस्तित्वात होता.

गुप्तांच्या पूर्वी भारतावर परकीयांची आक्रमणे झाली. या काळात अव्यवस्था आणि अंदाधुंदीही निर्माण झाली होती. अशा वेळी वाकाटकांनी राज्य स्थापन केले. गुप्तांच्या विजयाने सांस्कृतिक आणि सामाजिक प्रगतीसाठी अनुकूलता निर्माण झाली होती. स्थैर्य, शांतता व संपन्नता याचबरोबर वैदिक धर्माच्या वर्चस्वाचा हा कालखंड होता. ब्राह्मणांना महत्त्व होते. चातुर्वर्ण्य पद्धतीला नव्याने महत्त्व प्राप्त झाले होते. सामाजिक व्यवस्थेत परकीयांच्या आक्रमणामुळे व ते इथे स्थायिक झाल्यामुळे काही प्रश्न निर्माण झाले होते. परकीय जमातींनी इथली भाषा, चालीरिती, पंथ आदी घटकांशी जुळवून घेतले. इथल्या धर्ममार्तडांनी त्यांना चातुर्वर्ण्य व्यवस्थेत सामावून घेतले. त्यांना क्षत्रिय म्हणून स्थान मिळाले. समाजरचना वर्णाधिष्ठित होती व प्रत्येक वर्णाची विहित कर्तव्ये निश्चित होती. चांडाळ, भटक्या आणि रानटी जमातींना मात्र समाजाने स्वीकारले नव्हते. त्यांच्याशी कोणताही संबंध नव्हता. विशेष म्हणजे वर्ण व व्यवसाय यांत बदल होत असत. ब्राह्मण शेती करीत होते आणि क्षत्रिय व्यापार करीत होते, असे तत्कालीन साहित्यातून कळते. समाजजीवन समृद्ध होते. परंतु चातुर्वर्ण्य व्यवस्थेने जातीबाबत विषमता निर्माण केली होती. अस्पृश्यता होती. चांडाळांसारख्या काही बहिष्कृत जाती होत्या.

राष्ट्रकूट कालखंडाच्या उत्तरार्धात समाजजीवनात मोठे बदल झाले. याच कालखंडात महाराष्ट्राशी मुसलमानांचा संबंध आला. समाज वर्णव्यवस्थेने बद्ध होता. चार वर्णांव्यतिरिक्त अन्य गट समाजात निर्माण झाले होते. जातिनिर्बंध अधिक तीव्र झाले होते. वैश्य व शूद्र यांच्यावर धार्मिक बंधने अधिक मोठ्या प्रमाणात लादली गेली होती. प्रामुख्याने वैश्यांच्या स्थितीत बदल होऊन त्यांचा सामाजिक स्तर शूद्रांच्या पातळीवर गेला होता. सर्वसामान्य समाज सामाजिक आणि धार्मिक बंधनाच्या ओझ्याखाली भरडला जात होता. अनुलोम विवाह बंद झाले होते. सहभोजने बंद झाली होती. कनिष्ठ वर्गांची स्थिति शोचनीय होती. चांभार, कोळी, धोबी, बुरूड हे कनिष्ठ वर्गात मोडत होते. चांडाळांना गावाबाहेर राहावे लागत होते, त्यांना अस्पृश्य समजले जात होते.

दहाव्या-अकराव्या शतकांत समाजव्यवस्थेचे स्वरूप अधिक ताठर झाले. भिन्न जातींतील रोटी-बेटी व्यवहार बंद झाले. श्रेष्ठ-कनिष्ठत्वाच्या कल्पना अधिक तीव्र झाल्या. सोवळे-ओवळे आणि पावित्र्य ह्या कल्पनांना महत्त्व प्राप्त झाले. ब्राह्मणांमध्येसुद्धा श्रेष्ठ-कनिष्ठत्वाच्या कल्पना निर्माण झाल्या. वैदिक धर्माचे आचरण, पूजाअर्चा, पुराणग्रंथाचे अध्यापन ब्राह्मणाकडून केले जात असे. कायदा, ज्योतिष, काव्य या विषयांचे अध्ययन केले जात होते. सनातनी, कर्मठ विचारांच्या प्रभावाचा हा कालखंड होता. 'देवलस्मृती'मध्ये धर्मभ्रष्टांना सामावून घेण्याबाबतचा दृष्टिकोन नाकारला गेला. अनेक अनिष्ट प्रथा सुरू झाल्या होत्या. केशवपन आणि सतीपद्धती ह्यांचे प्रभावी समर्थन केले जात होते. विषमता, उच्चनीच भाव, सामाजिक-धार्मिक बंधने ह्यांच्या वाढत्या प्रभावाचे दुष्परिणाम पुढील काळात झाल्याचे दिसून येते.

यादवकाळ हा आधुनिक महाराष्ट्राच्या स्थापनेचा काळ. महाराष्ट्र संस्कृतीच्या जडणघडणीचा आणि मराठी मनाच्या अस्मितेचा हा कालखंड, मराठी भाषेच्या राजमान्यतेचा आणि विद्वत्मान्यतेचा हा कालखंड, महाराष्ट्राच्या वैभवाची साक्ष देणाऱ्या अनेक खाणाखुणा आजही उपलब्ध आहेत असा हा कालखंड. राजकीयदृष्ट्यासुद्धा यादवांच्या सामर्थ्यसंपन्नतेचा हा कालखंड होता. परंतु पुढील काही वर्षांत हा समाज आणि यादव सत्ता कोलमडून पडली. शेजवलकरांनी या अनुषंगाने केलेली सैद्धान्तिक मीमांसा समजून घेण्यासारखी आहे. त्यांनी नमूद केले आहे की, आस्ते भगः आसिनस्य ऊर्ध्व तिष्ठति तः तिष्ठ। शेते निपद्यमानस्य चराति चरतो भगः।। या वचनात व्यक्तीचे भाग्य तिच्या चरत्वावर, म्हणजे जगाशी स्वभावतः असणाऱ्या तिच्या अविसंवादित्वावर अवलंबून ठेवले आहे. जगाच्या गतीबरोबर आपली गती ठेवणारा असा जो प्रगत पुरुष, तोच यशाचा अधिकारी, असे या वचनात सांगितले आहे. हा चरतेचा, गतिमानतेचा विचार जोपर्यंत प्रभावी होता, तोपर्यंत नित्यनवे जग पादाक्रांत होत होते. परंतु यादवकाळात ''तस्मात चरैव चरैव'' हा मंत्र मागे पडला. सर्वत्र नांदणारी रमणीयतासुद्धा लोप पावत गेली. या काळात समाजजीवनाला विषमतेची वाळवी लागली. नवी शास्त्रे, नव्या कला, ज्ञानाची नवी क्षितिजे शोधण्याची प्रवृत्ती नष्ट झाली. समता लोप पावली. आणि समतेशिवाय स्वातंत्र्य टिकत नसते, याच्या विस्मरणाचासुद्धा हाच कालखंड होता. कर्मकांड आणि विपुल व्रतवैकल्ये यांच्या चक्रव्यूहात समाजमन अडकून पडले. पारलौकिक जीवनाचा विचार प्रामुख्याने महत्त्वाचा ठरला. स्पृश्यास्पृश्यता, जातिश्रेष्ठत्वाच्या निरर्थक कल्पना यांनी समाजजीवनाचे विघटन झाले. समाजमन पारंपरिक, गतानुगतिक गोष्टींना कवटाळून बसले. ज्या यादवकाळात महाराष्ट्राने प्रगतीचे शिखर गाठले होते, त्याच काळात अनिष्ट प्रथा, परंपरा निर्माण झाल्या. कर्मकांडांना अवास्तव महत्त्व प्राप्त झाले. हेमाद्रीपंतानी लिहिलेल्या व्रतखंडात धर्मनिष्ठ माणसालासुद्धा एका जन्मात पूर्ण करता येणार नाहीत, एवढी व्रते सांगितली आहेत. दानखंड, तीर्थखंड, मोक्षखंड, प्रायश्चित्त खंड हे सर्व याच काळात लिहिले गेले. या सर्व सामाजिक आणि धार्मिक स्थितीचा परिणाम असा झाला की, निःसंदिग्ध स्वातंत्र्य उपभोगणारा महाराष्ट्र, खिलजीच्या आक्रमणामुळे आपले स्वातंत्र्य गमावून बसला.

**स्त्रीजीवन :** सातवाहन काळातील एकूण समाजजीवन समृद्ध आणि समंजस होते. धर्मसहिष्णूता होती. स्त्रीजीवनाबाबत विचार करताना ही सामाजिक स्थिती लक्षात घ्यावी लागते. या काळातील आर्थिक, राजकीय स्थितीसुद्धा

सुबत्तापूर्ण आणि स्थैर्याची होती. या सर्व अनुकूलतेचे प्रतिबिंब स्त्रीजीवनामध्ये दिसते. रितीरिवाज आणि परंपरा यांनी ते प्रभावित होते. त्याचप्रमाणे तत्कालीन सामाजिक संस्थांनी स्त्रीजीवनाला आकार दिला होता. 'हालाची गाहासत्तसई', शिलालेख आणि धर्मसूत्रे यांच्या आधारे स्त्रीजीवनाचे स्वरूप इतिहासकारांनी अभ्यासले आहे.

'महाराष्ट्र संस्कृती' या ग्रंथात सहस्रबुद्धे यांनी नमूद केले आहे की, महाराष्ट्राच्या प्रारंभिक हजारबाराशे वर्षांच्या काळात समाज वर्णजातींनी बद्ध असला, तरी वर्णजातिव्यवस्थेला कडक रूप मुळीच आलेले नव्हते. मिश्रविवाह होत होते. सातवाहन कुळात वर्णसंकर प्रारंभापासून चालू होता. सातकर्णी पहिला याची राणी नागनिका ही नाग कुळातील होती. वसिष्ठपुत्र सातकर्णी याची राणी शकराजाची कन्या होती. नाग, शक यांच्याशी वर्णसंकर झाला, तरी चातुर्वर्ण्याला बाधा येत नाही असे या राजाचे मत होते. प्रतिलोम विवाहाची उदाहरणे ही गुप्त, वाकाटक यांच्यातील राजपुरुषांचीही दिसून येतात. ब्राह्मण, क्षत्रिय, नाग, शूद्र अशी भिन्न वर्णांची व वंशांची घराणी महाराष्ट्रात व आसपास झाली. या सर्व घराण्यांचे परस्परांत विवाहसंबंध होत असत. त्यामुळे राजघराण्याच्या प्रतिष्ठेला कुठेही कमीपणा आला नाही. सातवाहन, गुप्त, वाकाटक, चालुक्य, कदंब, कलचुरी, राष्ट्रकूट या घराण्यांत मिश्रविवाहाची अनेक उदाहरणे आहेत. आंतरवर्णीय विवाह केवळ राजघराण्यात होत होते असेही नाही. प्रतिलोम विवाहांना प्रतिष्ठा होती. या कालखंडात अनुलोम विवाहही नित्याचीच गोष्ट होती. आंतरवर्णीय विवाह साधारणपणे इसवीसनाच्या दहाव्या-अकराव्या शतकापर्यंत होत होते. नंतरच्या काळात मात्र ते बंद झाले. प्रतिलोम विवाहाबाबत अभ्यासकांमध्ये मतभेद दिसून येतात याची नोंद घेणे गरजेचे आहे.

सातवाहन काळामध्ये राजकीय क्षेत्रांमध्ये स्त्रियांचे स्थान महत्त्वपूर्ण होते. सातवाहन सत्ता बलिष्ठ बनविण्यासाठी 'नागनिका' गौतमी बलश्रीचे योगदान अधोरेखित करावे लागते. गुप्त, वाकाटक काळात स्त्रियांना समाजात मान होता. वंशावळीत पित्याच्या नावाबरोबर मातेचे नाव आढळते. प्रभावती गुप्ताने काही काळ राज्यकारभार पाहिल्याचेही दिसते. धार्मिक अनुषंगाने स्त्रियांना या कालखंडात वेदाध्ययनापासून वंचित ठेवण्यात आले. वेदाध्ययन नाही म्हणून यज्ञ करण्याचा अधिकार नाही, अशी स्थिती होती. या विशिष्ट संदर्भात स्त्रियांवर बंधने असली; तरी लिहिणे, वाचणे, नृत्य, संगीत आदी गोष्टींच्या बाबतीत स्त्रियांना अध्ययन करता येत होते. डॉ. मोरवंचीकर यांनी म्हटल्याप्रमाणे सातवाहन काळातील स्त्री वेदकालाइतकी शिक्षित नसली, तरी ती सुशिक्षित होती हे निश्चित! कालौघात यात बदल होत गेले.

संयुक्त कुटुंबपद्धती अस्तित्वात होती. अपरिहार्यपणे स्त्रियांची प्रमुख भूमिका गृहिणीची होती. सामान्यपणे तिचे विश्व घराच्या चार भिंतींत मर्यादित होते. पडदापद्धती मात्र अस्तित्वात नव्हती. सण-समारंभ आणि घर यांमध्ये गुंतवून ठेवणारी अशी एकूण व्यवस्था होती.

ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य या वर्णांत स्त्रियांचे स्थान व महत्त्व मान्य असले, तरी सर्वसामान्यपणे स्त्री बऱ्याच सामाजिक हक्कांपासून वंचित होती. शूद्र स्त्रियांचे जीवन अत्यंत दुःखी आणि उपेक्षित होते.

**अस्पृश्यता** : अस्पृश्यता प्रथेचा हा प्रारंभ होता. वेदांचे अध्ययन, अध्यापन श्रेष्ठ दर्जाचे अशी व्यवस्था निर्माण करून त्यापासून बहुजन समाजाला वंचित ठेवण्याचा प्रयत्न होता. तो गुन्हेगारी, अपराध आणि त्या संदर्भातील दिल्या जाणाऱ्या शिक्षांमधून विषमता दिसून येते. शूद्रांना सांगितलेल्या शिक्षांबाबत कमालीची वर्णविषमता स्पष्टपणे दिसून येते. सर्व प्रकारचे अपराध आणि त्यासाठी दिल्या जाणाऱ्या शिक्षा यांबाबत ही विषमता स्पष्टपणे दिसते.

चांडाळाच्या बाबतीत अधिक भयानक स्वरूप दिसून येते. काळाबरोबर अस्पृश्यतेचे स्वरूप अधिक अमानवी आणि भीषण होत गेले. सरंजामशाहीच्या काळात अस्पृश्यता अधिक व्यापक व भयानक स्वरूपाची झाली.

चालुक्य, राष्ट्रकूट काळात समाजजीवनात खूप बदल झाले. चातुर्वर्ण्याशिवाय समाजामध्ये वेगळे गट निर्माण झाले होते. चांभार, कोळी, धोबी यांचे समाजरचनेतील स्थान कनिष्ठ, तर चांडाळांना अस्पृश्य समजले जात होते.

अस्पृश्यतेचा मागोवा घेत असताना जयंत गडकरींनी असे नमूद केले आहे की, अस्पृश्यता पद्धत दुसऱ्या

समाजसमूहांना वाळीत टाकण्यासाठी, त्यांचा मनोभंग करण्यासाठी व त्यांना मोडून काढण्यासाठीची व्यवस्था आहे. ही व्यवस्था विशिष्ट ऐतिहासिक हेतूने निर्माण करण्यात आली. अस्पृश्यतेचा परिघ मध्ययुगात अधिकाधिक वाढत गेला.

**ग्रामसंस्था :** सद्यःस्थितीत असणारे महाराष्ट्रातील ग्रामीण जीवनाचे प्रारूप हे थोड्याफार फरकाने प्राचीन भारताच्या इतिहासाने दिलेल्या वारशाचे निदर्शक आहे. प्राचीन भारताच्या इतिहासापासून ग्रामसंस्थांनी गौरवास्पद कामगिरी केली आहे. ग्रामसंस्था भारतीय समाजाच्या आणि संस्कृतीच्या मुख्य आधार ठरल्या आहेत. भारतीय समाज व संस्कृती अप्रतिहतपणे टिकून राहिले त्याचे महत्त्वाचे कारण अस्तित्वात असणाऱ्या स्थानिक स्वराज्य संस्था. वस्तुतः सातवाहन काळापासून यादव सत्तेच्या काळापर्यंत प्रस्थापित राजसत्ता अनियंत्रित स्वरूपाच्या होत्या. सत्ता अनियंत्रित होत्या ही जरी वस्तुस्थिती असली; तरी प्रथा, परंपरा यांची आणि धर्मसत्तेची बंधने राजसत्तेवर होती. राजसत्तेला साह्यभूत ठरलेल्या ग्रामसंस्थांनी, सभांनी भारतावर अनेक आक्रमणे झाली असली, तरी भारतीय समाजाला व सांस्कृतिक जीवनाला अबाधित ठेवले.

ग्रामसंस्थांमुळे समाजाच्या स्थितिगतीशी आपण सर्वार्थाने जोडले गेलो आहोत ही प्रगतीच्या दृष्टीने आवश्यक भावना समाजमनामध्ये रुजली. एकसंधता, सामूहिकता, ही स्थिती बौद्धिक गुणांच्या विकासासाठी अनुकूल होती. प्राचीन काळात अशा संस्था भारतात आणि महाराष्ट्रातसुद्धा अस्तित्वात होत्या. सभा आणि समिती या नावाने ओळखली जाणारी प्रतिष्ठित मंडळे होती. शासन व्यवस्थेचा हा प्रभावी घटक होता. स्थानिक प्रशासनात प्रजेला प्रतिनिधीत्व देऊन प्रगतीच्या दृष्टीने समाजशक्ती संघटित व कार्यप्रवण करण्यात आली होती. सभेचे व समितीचे सदस्य महाजन, महत्तर या नावांनी ओळखले जात असत. राज्यप्रमुखापासून ग्रामप्रमुखापर्यंतची ही व्यवस्था तत्कालीन समाजकारणाचे वैशिष्ट्य होती, याविषयी दुमत असण्याचे कारण नाही.

ग्रामसभांचा कारभार स्वायत्त होता. प्रशासनासाठी सर्वांत छोटा असणारा घटक ग्राममहत्तरामुळे अत्यंत प्रभावीपणे स्थानिक पातळीवर सक्षम होता. गावाच्या संरक्षणासाठी ग्रामपती अत्यंत दक्ष राहत. पु. ग. सहस्रबुद्धे यांनी ग्रामसभांचे महत्त्व स्पष्ट करताना असे नमूद केले आहे की; संरक्षण, न्यायदान व करवसुली यांप्रमाणेच गावातील उद्योगधंदे, पाटबंधारे, तळी, विहिरी, रस्ते, देवळे, शिक्षण वगैरे अनेक प्रकारची जबाबदारी ग्राममहत्तर पार पाडीत असत. अनेक शतके ही व्यवस्था अस्तित्वात होती आणि कार्यक्षम होती. यामुळे खेडी म्हणजे स्वतंत्र प्राजके वा गणराज्ये होती.

उपरोक्त स्थानिक स्वराज्य संस्थांबरोबर व्यावसायिक संस्थांनासुद्धा त्या काळात महत्त्व होते. व्यापाऱ्यांच्या श्रेणी असत. व्यापाऱ्यांच्या संस्था ह्या श्रेणी किंवा पुग या नावाने ओळखल्या जात असत. अत्यंत सक्षम आणि प्रबळ स्वरूपाच्या या श्रेणी असत. आपल्या संदर्भात कायदे करण्याइतपत त्यांचे स्वरूप स्वायत्त होते व त्यांनी केलेल्या कायद्यांना राजाची मान्यता असे. एकूण अशा प्रकारच्या संस्था महाराष्ट्रात अस्तित्वात होत्या. सामाजिक जीवनामध्ये त्या वेगवेगळ्या क्षेत्रांचे दायित्व अत्यंत जबाबदारीने वहन करीत होत्या, असे निःसंदिग्धपणे नमूद करता येऊ शकते.

यादवकाळात ग्रामकूटाला पाटील म्हणत असावेत. महाराष्ट्रामध्ये पाटीलकीचे वतन वंशपरंपरेने चालत आले आहे. महाराष्ट्राच्या वेगवेगळ्या विभागांमध्ये ग्रामकूट हे पाटील, चौधरी, चौफुला म्हणून ओळखले जात असत. गाव मोठे असेल आणि तिथे बाजारपेठ असेल, तर चौधरी आणि पाटील असे दोन अधिकारी काम पाहत असत. खेड्यामध्ये पाटील-ग्रामकूट हा एकच अधिकारी असे. स्थानिक पातळीवर विविध स्वरूपाची कामे आणि कायद्याची व सुव्यवस्थेची जबाबदारी ग्रामकूटाची होती. 'यादवकालीन महाराष्ट्र' या ग्रंथात पानसे यांनी नमूद केले आहे की, पाटीलकी बहुधा क्षत्रिय, मराठा किंवा कुणबी मंडळींकडे असायची. १२व्या, १३व्या शतकापासून 'पाटील' बहुमानाचे संबोधन होते, व या काळात पाटील हा कामाच्या संदर्भात हुद्दा होता पद होतं ते जाती निष्ठ नव्हते तथापी सामान्य कुणबी माणसालादेखील पाटील संबोधण्याची पद्धत प्रचलित होती. जबाबदारी आणि मान असणारा कुलकर्णी हा आणखी एक अधिकारी खेड्यामध्ये



एकेक कुटुंब असायचे. ग्रामीणजीवन कृषिप्रधान होते. अपरिहार्यपणे शेतकरी हा ग्रामीणजीवनाचा मुख्य आधार होता. त्याच्या दैनंदिन गरजा आणि शेतीविषयक आवश्यक गरजा भागविणारी ही व्यवस्था होती. ही पद्धती फार प्राचीन असून त्यामुळे ग्रामीण जीवनात स्वयंपूर्णता निर्माण झाली होती. या व्यवस्थेमध्ये गावातील शेतकऱ्यांची कामे गावातील कारागीर करीत असत आणि त्यांच्या मोबदल्यात शेतीतील उत्पन्नाचा निश्चित भाग 'बलुते' म्हणून त्यांना दिला जात असे. बलुते हे बलुतेदारांच्या कायम उत्पन्नाचे साधन होते. बलुतेदारी मध्ययुगीन महाराष्ट्रातील समाजजीवनाचा महत्त्वाचा भाग होती.

होता. कुलकर्णीपण ब्राह्मणाकडे असे. जमिनीची मोजणी, लागवडीची व पडीत जमिनीची नोंद, शेतीचे उत्पन्न, त्याचा वसूल, गावातील कारागीर, व्यापारी, शेतकरी, आदी सर्व माहिती कुलकर्णी ठेवत असत. गावकीच्या कामात पाटील, कुलकर्णी यांव्यतिरिक्त वेसकराचा वाटा महत्त्वाचा होता. जागला, तराळ या नावानेसुद्धा वेसकराला ओळखले जात असे. हा गावाचा राखणदार होता.

यादवकाळात गावपंचायतीची भूमिका आणि महत्त्व आजच्या ग्रामपंचायतीसारखे होते. गावपातळीवरील गुन्हे, संघर्ष, तकरारी यांबाबतचे निर्णय ग्राममहत्तर करीत असत. गावामधील अनुभवी, प्रतिष्ठित बलुतेदार ग्राममहत्तर असत. ते स्थानिक असल्यामुळे त्यांना गावाची पूर्ण माहिती आणि गावाविषयी ममत्व असे. गावातले मतभेद गावातच सोडविले जात. गावाच्या गरजा गावामध्ये पूर्ण होत होत्या. न्यायदानाचे काम बहुधा देवळात होत असे. दिव्य करवून घेतले जात असे. ग्रामसमिती गुन्हेगाराला शिक्षा देण्याचे काम करीत असे.

**बलुतेदार** : बलुतेदारी ग्रामीण जीवनाचा अविभाज्य भाग होती. बलुतेदारांची संख्या वाढतवाढत बाराव्या–तेराव्या शतकामध्ये अठरापर्यंत गेली. प्रारंभी ही संख्या पाच ते सात असावी. प्रत्येक खेड्यामध्ये वेगवेगळे व्यवसाय करणारे

काही कारणांमुळे या व्यवस्थेमध्ये स्थळकाळानुरूप बदल झालेले दिसून येतात.

महाराष्ट्र समाजजीवनाचा सातवाहन ते यादव काळापर्यंतचा हा पहिला टप्पा. या कालखंडात समृद्धी, स्थैर्य होते. हा कालखंड सर्वांगीण विकासाचा होता. सत्ता प्रतिष्ठित होत्या. यादवपूर्व कालखंडात महाराष्ट्र–कर्नाटकाच्या सीमा अस्पष्ट होत्या. महाराष्ट्र समाज, संस्कृती, मराठी भाषा, मराठी मन ही सर्व वैशिष्ट्ये यादवकाळामध्ये आकाराला आली. महाराष्ट्र संस्कृतीचे पृथगात्म स्वरूप या काळापासून ठळकपणे अधोरेखित करता येते. परंतु यादव काळात इतिहासाला कलाटणी मिळाली. अल्लाउद्दीन खिलजीच्या आक्रमणामुळे यादव सत्तेचा पराभव झाला. पराभव आणि पारतंत्र्य यांचा हा प्रारंभ होता. यादव काळातील जातिभेद, कर्मकांड, निवृत्तिवाद, चातुर्वर्ण्य विषमता, शब्दप्रामाण्य या सामाजिक कारणांमुळे शक्तिक्षय होऊन छिन्नविच्छिन्न समाज अवनत झाला आणि परिणामी पराभूत झाला.

## मुस्लीम कालखंड

यादव काळातील सुबत्तेनंतर पराभव का? पराभवाची कारणे कोणती? या पराभवासाठी सामाजिक परिस्थितीचे

संदर्भ कितपत कारणीभूत आहेत ? असे अनेक प्रश्न निर्माण होणे अपरिहार्य आहे. सामाजिक अंतरंगाचा तटस्थतेने घेतलेला मागोवा– शोध कदाचित उज्ज्वल भवितव्यासाठी उपयुक्त ठरू शकतो. खिलजीच्या आक्रमणानंतर महाराष्ट्राच्या राजकीय व सामाजिक जीवनाला प्रचंड धक्के बसले. सामाजिक जीवनात बदल झाले. नवी संस्कृती, भिन्न जीवनदृष्टी, भिन्न मूल्ये, भिन्न धर्म या सर्वार्थाने भिन्न असणाऱ्या संस्कृतीने समाजजीवन प्रभावित केले. महाराष्ट्राची सांस्कृतिक एकसंधता नष्ट झाली. या काळात धर्मांतरे झाली. राजकीय स्वतंत्र सत्तेची आणि अस्मितेची जागा पारतंत्र्याने घेतली. महाराष्ट्राचे मन पिचून गेले. पराभवाचा आणि पारतंत्र्याचा हा साडेतीनशे वर्षांचा प्रदीर्घ कालखंड होता. भिन्न विचारप्रणालींचा प्रवेश हे या काळातील अधोरेखित करता येण्यासारखे वैशिष्ट्य होते. इतिहासाची उलथापालथ झाली होती, असे म्हटल्यास वावगे ठरू नये. बहुतेक मराठी इतिहासकारांनी या तीन–साडेतीनशे वर्षांच्या काळाचा उल्लेख महाराष्ट्राच्या जीवनातील 'तमोयुग' असाच केला आहे. या तमोयुगातील आणखी एक वास्तव समजून घेतले पाहिजे. म. श्री. माटे यांनी या संदर्भात नमूद केले आहे की, तीन–साडेतीनशे वर्षांच्या या सबंध राजवटीत गावगाड्याचा सगळा कारभार हिंदुधर्मीय नाडगौडा, पाटील, देसाई, कुलकर्णी अशा मंडळींच्या हातात होता...... या उलथापालथीच्या काळातसुद्धा महाराष्ट्र हा मराठीच राहिला, हिंदूच राहिला, मात्र परकीय शासक, परधर्म यांच्या संपर्काने मराठी समाज, भाषा, जीवनपद्धती यांमध्ये अनेक नव्या गोष्टी आल्या. अनेक बदल झाले.

**जातिव्यवस्था** : महाराष्ट्राच्या समाजजीवनामध्येच नव्हे, तर भारतीय समाजामध्ये जातिव्यवस्था फार पूर्वीपासून अस्तित्वात होती. मौर्य, सातवाहन सत्तांच्या काळात चातुर्वर्ण्य व्यवस्था समाजजीवनाचा कायम भाग झाली होती. ही व्यवस्था उत्तरोत्तर अधिक बळकट होत गेली. जाती आणि त्या अंतर्गत उपजातींच्या संख्येमध्ये भर पडत गेली. इ. स. दहाव्या–अकराव्या शतकापासून ब्राह्मणांमध्ये पोटजाती निर्माण होऊ लागल्या. ब्राह्मण वर्णामध्ये प्रादेशिक संदर्भातून सामाजिक विघटनास सुरुवात झाली होती. सामाजिक विघटनाचे विश्लेषण करताना शेणोलीकरांनी नमूद केले आहे की, महाराष्ट्रापुरता विचार केल्यास देशस्थ, कोकणस्थ, कऱ्हाडे, पळसे इत्यादी पोटजाती अकराव्या–बाराव्या शतकात नामरूपास आलेल्या दिसून येतात. महाराष्ट्र संस्कृतीच्या घडणीमधील आणि विकासामधील ही सामाजिक प्रक्रिया महत्त्वपूर्ण असून या प्रादेशिक स्वरूपाच्या पोटभेदामुळे कालांतराने ब्राह्मण समाजातही श्रेष्ठ–कनिष्ठ वाद निर्माण होऊन फुटीर वृत्तीला खतपाणी मिळाले. गोत्राऐवजी आडनाव लावण्याच्या पद्धतीचा प्रारंभ तेराव्या शतकापासून झाला, असेही शेणोलीकरांनी म्हटले आहे.

महाराष्ट्राच्या सामाजिक जीवनामध्ये जातिजातींमधील विषमता वाढत गेली. उच्चनीचतेच्या कल्पनेचा परिणाम रोटीबेटी व्यवहारावर बंधने येण्यामध्ये झाला. सामाजिक विघटनामुळे आणि उच्चनीचतेच्या दृष्टिकोनामुळे आर्थिक विषमता वाढली. समाजाचे ऐक्य नष्ट झाले. ऐक्याच्या अभावाचा फायदा इस्लामी आक्रमकांना झाला. मुस्लीम सत्ता आणि संस्कृती यांच्या प्रसरणशीलतेसाठी ही सर्व अनुकूल सामाजिक स्थिती होती.

या काळात मुस्लिमांमध्येसुद्धा मतभेद होते. तुर्की मुसलमान भारतीय मुस्लिमांना दुय्यम दर्जाचे म्हणून वागणूक देत असत. धर्मांतरित मुसलमानांबाबत जेत्यांच्या मनात आपपरभाव होता. स्थानिक धर्मांतरित मुस्लिमांना उच्च पदावर नियुक्त केले जात नसे. शिया–सुन्नी असाही भेद होता. जेते धर्मांतरित मुस्लिमांना अंतरावर ठेवत असले, तरी याच काळात मुस्लिमांच्या संख्येत वाढ झाली. बहामनी काळातील मुस्लिमांतर्गत कलहाचे स्वरूप स्पष्ट करताना आणखी एक वैशिष्ट्य दिसून येते. 'दखनी' मुसलमान व 'अफाकी' मुसलमान यांच्यातील कायम संघर्ष, दखनी मुसलमान म्हणजे स्थानिक, अफाफी म्हणजे भारताबाहेरील देशातून भारतात येऊन बहामनी राज्यात स्थायिक मुसलमान. या कलहाचे स्वरूपसुद्धा अत्यंत तीव्र होते.

महाराष्ट्र आणि लगतचा प्रदेश इथे मुस्लीम सत्ता चार शतके अस्तित्वात होती. चार शतकांच्या राजवटीचे धार्मिक, सामाजिक, राजकीय आणि आर्थिक परिणाम होणे अपरिहार्य होते. बहुसंख्याक हिंदू प्रजेवर इस्लामी

राज्यकर्त्यांनी सत्ता स्थापित केली. ही स्थिती सामाजिक गुलामगिरीची होती, असाही विचार या संदर्भात केला जाऊ शकतो. विशेष म्हणजे मुस्लीम राज्यकर्त्यांनी आपली सत्ता टिकवून ठेवण्यासाठी परंपरेने चालत आलेल्या व्यवस्थेला अबाधित ठेवले. किंबहुना हिंदू समाजातील कनिष्ठ जातींना व्यवस्थेत सामावून घेण्याचा दृष्टिकोन या काळातील राज्यकर्त्यांचा होता आणि त्याचाच परिणाम म्हणून मध्ययुगीन महाराष्ट्रात तीव्र स्वरूपाचा विरोध राज्यकर्त्यांना झाला नाही.

मध्ययुगीन जातिव्यवस्थेमुळे समाजात विषमता निर्माण झाली. संकुचित वृत्ती, स्पृश्यअस्पृश्यता, उच्चनीचतेची भावना, ऐक्याचा अभाव या सर्व कारणांमुळे समाज स्वातंत्र्य गमावून बसला.

**स्त्रीजीवन** : इ. स. १३१८ नंतर पुढील तीन शतके महाराष्ट्रावर मुस्लिमांची सत्ता होती. बहामनी राजवटीचे परिणाम महाराष्ट्रात आणि कर्नाटकामध्ये दूरगामी स्वरूपाचे झाले. मुस्लीम सत्तांतर्गत कलह हे या काळाचे विशेष. दखनी-आफाकी, शिया-सुनी संघर्षांबरोबर दक्षिणेमधील पाचही मुस्लीम सत्तांमध्ये कायम संघर्ष होत होते. सततच्या अंदाधुंदीमुळे स्त्री विषयक विशिष्ट दृष्टिकोन निर्माण झाला असावा. स्त्रिया आणि शूद्र यांचा सामाजिक दर्जा समान गणला गेला. स्त्री-जीवन सर्वार्थाने आणि संपूर्णपणे परावलंबी झाले. सती प्रथेला प्रतिष्ठा मिळाली. जिवंत राहून हालअपेष्टा भोगण्यापेक्षा स्त्रिया सती जाणे पसंत करीत असत. विधवा स्त्रीने कुटुंबासाठी सर्व जीवन व्यतीत करावे, व्रतवैकल्ये, उपासतापास करावे असे बंधन होते.

मुस्लीम स्त्रियांवर अशा प्रकारची बंधने नव्हती. हिंदू स्त्रियांच्या तुलनेत काही बाबतीत तिला स्वातंत्र्य होते. ती पुन्हा विवाह करू शकत असे. यादव सत्तेच्या विनाशापासून श्रीशिवछत्रपतींच्या उदयापर्यंतच्या कालखंडामध्ये इस्लामी संस्कृतीने महाराष्ट्रातील समाजजीवनाला प्रभावित केले होते. महाराष्ट्राची अस्मिता लोप पावली होती. या काळात मोठ्या प्रमाणात धर्मांतरे झाली. मराठे शेतीकडे वळले. समाज समतोल गमावून बसला. या विश्लेषणाबरोबर आणखी वेगळा दृष्टिकोन मांडला जातो की, सत्ता टिकविण्यासाठी सुलतानांनी हिंदूंना व्यवस्थेमध्ये सहभागी करून घेतले. राज्यकारभारात सामावून घेण्याचे धोरण स्वीकारले. त्यांची वाटचालसुद्धा क्रमाने भारतीय संस्कृती आणि परंपरा यांकडे होत होती. हिंदूंना फार प्रतिष्ठा नसली, तरी त्यांच्यावर फार अत्याचारसुद्धा केले जात नव्हते. या संदर्भात डॉ. कुंटे म्हणतात, ''धार्मिकदृष्ट्या हिंदूंवर अत्याचार झाले नाहीत. किंवा हिंदू आणि मुसलमान संस्कृती गुण्यागोविंदाने नांदत असताना त्यात वितुष्ट आणण्याचा प्रयत्न बहामनी राज्यकर्त्यांनी कधीच केला नाही.''

## शिवशाही - कालखंड

यादवकाळातील महाराष्ट्राच्या समाजस्थितीमध्ये शिवकाळात फारसा फरक पडला नाही. एक अधोरेखित करण्यासारखे स्थित्यंतर मात्र या काळात दिसते. समाज चैतन्याने भारावलेला दिसून येतो. संपूर्ण समाज एकत्रित होऊन पारतंत्र्याच्या जोखडातून मुक्त होण्यासाठी श्रीशिवछत्रपतींच्या नेतृत्वाखाली संघटित झाला. सर्व समाजाचे चित्र बदलले. संतांच्या कार्यामुळे समाजमन निरोगी होऊ शकले. विषमतेची धार बोथट झाली.

शिवकाळात अलुतेदार-बलुतेदार, पाटील, कुलकर्णी, देशमुख-देशपांडे यांचे परंपरागत स्थान आणि अधिकार कायम होते. बलुते मिळते तो 'बलुतेदार' आणि आलुते मिळते तो 'आलुतेदार'. कारू व नारू हा या संदर्भातील आणखी एक समानार्थी शब्दप्रयोग, 'गावगाडा'मध्ये आत्रे यांनी नमूद केले आहे की, ''कुणब्याने आपल्याबरोबर गावात अडाणी आणले, प्रथम कारू आणि नंतर नारू आले. कुणब्याला अवश्य असा व्यवसाय करणारा तो कारू, आणि ज्याच्या व्यवसायावाचून कुणब्याचे नडत नाही किंवा क्वचित नडते तो नारू. कारूला बलुतेदार आणि नारूला आलुतेदार म्हणतात.''

शिवकाळात बलुतेदारी व्यवस्था भरभराटीला आली होती. सेवेची कामे करणारा स्वतंत्र असा शूद्र वर्ग निर्माण न करता समाजधारणेसाठी ही व्यवस्था प्रभावी ठरली. बलुतेदारांची संख्या बारा होती. या संख्येत स्थलकालपरत्वे वाढ झालेली दिसते. बलुतेदारांचे तीन विभाग होते. बलुतेदार ठरविण्याचा हक्क गावातील लोकांचा होता.

१. ठरावीक मोबदला घेऊन वर्षभर लोकांची सेवा करणारे या विभागात सुतार, कुंभार, लोहार, न्हावी, परीट, चांभार यांचा समावेश होता.

२. महार, मांग, तराळ, रामोशी, या गटात समाविष्ट होते. खेडेगावातील हा सेवक वर्ग होता.

३. धार्मिक सेवा देणारा जोशी, गुरव, ठाकूर, जंगम, मुलाणी हा एक गट होता. धार्मिक सेवा, सामाजिक कामं हे पार पाडत असत.

महाराष्ट्र समाजाच्या ग्रामीण जीवनाची वैशिष्ट्ये स्पष्ट करताना शेणोलीकरांनी म्हटले आहे की, महार जमातीकडे गावाच्या रक्षणाचे काम होते. त्यांना वेसकर असे म्हणत. खळ्याच्या रक्षणाचे काम करणाऱ्यांना खळे वेसकर म्हणत. बलुतेदारांमध्ये मुलाणी या मुस्लीम कारागिराचा समावेश हा महाराष्ट्र ग्रामीण संस्कृतीचे वेगळेपण अधोरेखित करतो.''

गावामध्ये सर्वसामान्यपणे चार सत्ता होत्या. गावाच्या संरक्षणासाठी दिवाणसत्ता. गोतसत्ता ही दुसरी सत्ता ग्रामसत्ता म्हणूनसुद्धा ओळखली जात होती. गोतसभेत गावातील सर्व प्रमुख लोक असत. आलुते-बलुतेदार, वतनदार आणि रयत यांत असत. धर्मसत्ता ही तिसरी प्रमुख सत्ता. ही सत्ता महत्त्वपूर्ण असून या सत्तेने घेतलेले निर्णय बदलता येत नसत. व्यापारी सत्ता ही महत्त्वाची असणारी चौथी सत्ता.

महाराष्ट्र समाजामध्ये यादवकालापासून वतनदारांची परंपरा होती. मुस्लीम राजवटीच्या तीन-चार शतकांच्या कालावधीत वतनदारी व्यवस्था जोपासली गेली. वतनाविषयी आसक्ती आणि प्रेम हे या काळाचे वैशिष्ट्य होते. रयतेचे शोषण करणारी आणि अत्याचार करणारी ही व्यवस्था श्रीशिवछत्रपतींना मात्र मान्य नव्हती. ही व्यवस्था मोडून काढण्याचा त्यांचा पक्का विचार आणि प्रयत्न होता. परंतु प्रत्यक्षात ही व्यवस्था एवढी खोलवर रुजली होती की, संपूर्ण वतनव्यवस्था मोडून काढणे मोठे अडचणीचे होते. देशमुख, देशपांडे, देसाई यांच्यापासून पाटील-कुलकर्ण्यांपर्यंत सर्व लहानमोठे वतनदार होते. या सर्वांची वतने काढून घेणे म्हणजे स्वराज्य स्थापण्याच्या कार्यातील अडचणी वाढविणे. तरीही छत्रपतींनी वतने मोडली. गुंडपुंड वतनदारांना आणि त्यांच्या अत्याचारांना शिवाजी महाराजांनी मोडून काढले. शिवाजी महाराजांची ही ऐतिहासिक कामगिरी नमूद करताना सभासद म्हणतो, ''मुलखात जमीनदार, देशमुख व देसाई यांचे जप्तीखाली कैदेत रयत नाही. याणी 'साहेबी' करून नागवीन म्हटलियाने त्यांच्या हाती नाही.'' अमात्यांनीसुद्धा नवी इनामे देऊ नयेत असेच म्हटले आहे. रयतेवर वतनदारांची सत्ता असू नये, या धोरणाचा पुरस्कार शिवछत्रपतींनी केला होता.

एकूण शिवकालीन समाज सर्व दृष्टीने उन्नत होता. म्हणूनच या काळात प्रचंड कर्तबगारी गाजविणारे प्रतिभावंत, उद्यमशील लोक पुढे आले. शिवपूर्वकाळातील औदासिन्य नष्ट होऊन समाज गतिमान झाला. मराठी मन, मराठी संस्कृती आणि महाराष्ट्राची अस्मिता यांच्या प्रभावी प्रत्ययाचा हा कालखंड होता.

## पेशवाई

यादवकालीन अवनत सामाजिक जीवन आणि त्याचे झालेले परिणाम पुन्हा एकदा मध्ययुगीन इतिहासाच्या कालखंडात पेशवाईमध्ये दिसतात. या कालखंडात वर्णव्यवस्था खोलवर रुजली होती. उपजाती, जातींतील अंतर्गत संघर्ष, अस्पृश्यता, आदी समस्यांनी समाजजीवन दुभंगले होते. आपली जात दुसऱ्या जातीपेक्षा श्रेष्ठ आहे, अशी सार्वत्रिक समजूत होती. राज्यकर्ते ब्राह्मण असल्यामुळे अपरिहार्यपणे ब्राह्मणांचे वर्चस्व वाढले होते. परंतु ब्राह्मणवर्ग त्यांच्या पारंपरिक कर्तव्यांपासून आणि ब्राह्मण्यापासून दूर गेला होता. ब्राह्मणांचे वर्चस्व असले, तरी ब्राह्मणांमध्ये बहुविध कारणांमुळे ऐक्याचा अभाव आणि संघर्ष होता. ब्राह्मण-मराठा वाद तर होताच परंतु ब्राह्मण-ब्राह्मण वादाची तीव्रताही अधिक होती. कोकणस्थ-देशस्थ-कऱ्हाडे, देशस्थ-कऱ्हाडे असे सामाजिक श्रेष्ठत्वासाठी शाखांतर्गत वाद होते. या वादाचे एक कारण म्हणजे भ्रामक धार्मिक श्रद्धा, असे शेणोलीकरांनी स्पष्ट केले आहे. ब्राह्मणांच्या या वादाबद्दल वा. कृ. भावे म्हणतात, ''भिक्षुक वर्गामध्ये अनेक पोटभेद असून त्यांच्यात अहमहमिकेमुळे तंटे होते, मारामाऱ्या होत व ग्रामण्येही माजत.'' ''कोकणस्थ आणि देशस्थ वादाचे स्वरूप सकृत्दर्शनी राजकीय असले, तरी वास्तवात स्वजातीविषयी वाटणारा अतिरिक्त

अभिमान हे यामागील महत्त्वाचे कारण होते. '' असे डॉ. मोरवंचीकरांनी म्हटले आहे.

या काळाचे आणखी एक नमूद करण्यासारखे वैशिष्ट्य म्हणजे छत्रपती क्षत्रिय होते, मराठा होते. परंतु क्रमाने सत्ता क्षत्रियाकडून ब्राह्मणाकडे संक्रमित झाली होती. क्षत्रिय आणि वैश्य या दोन्ही वर्णांना वेदाधिकार असला, तरी त्यांनी मागील काही शतकांपासून यास फाटा दिला होता. वैदिक संस्कार, विद्या याबाबतीत हे दोन्ही वर्णीय मागे पडले होते. 'पेशवेकालीन महाराष्ट्र' या ग्रंथात या अनुषंगाने भावे यांनी नमूद केले आहे की, विशेष वर्गाच्या मदतीशिवाय राज्यसरकार चालणार नसल्यामुळे राज्यकारभाराचा भार ब्राह्मणावर पडला होता. बहुतेक सर्व वरिष्ठ आणि कनिष्ठ पदावर ब्राह्मण होते.

शिवकालाप्रमाणे अलुतेदार-बलुतेदार याही काळात होते. जातिबंधने अधिक कडक झाली होती. महार, मांग, ढोर, चांभार या अतिशूद्र जाती होत्या. या जाती अस्पृश्य होत्या. या सर्व स्पृश्यअस्पृश्य जातींमध्ये पोटजाती होत्या. प्रत्येक जातीत कडू व गोड असा भेद होता. त्यांच्यामध्ये कमालीचे ताणतणाव, मानापमान आणि संघर्ष होते. असे संघर्ष नाहीत अशी जात सापडणे कठीण होते. शूद्र-अतिशूद्र गणल्या गेलेल्या जातींमध्ये सामाजिक श्रेष्ठत्वासाठी संघर्ष होता.

**ग्रामव्यवस्था :** प्राचीन काळापासून भरभक्कम असणारी ग्रामव्यवस्था या काळात थोड्याफार फरकाने कायम होती. गावामध्ये पाटील-कुलकर्णी होते. पाटील गावाचा प्रमुख आणि कुलकर्णी हा प्रधान. त्यांच्या मदतीसाठी बलुतेदार-अलुतेदार होते. शेतीसाठी आवश्यक उद्योग-व्यवसाय करणारा तो बलुतेदार. अलुतेदाराशिवाय शेतकऱ्याचे फारसे अडत नसे. गावामध्ये पाटील-कुलकर्णी या वतनदारांशिवाय चौगुला, महार, सुतार, लोहार, चांभार, कुंभार, न्हावी, सोनार, जोशी, परीट, गुरव, कोळी हे बलुतेदार होते. अलुतेदारांची संख्या अठरा होती. अर्थात संख्या आणि त्यांची प्रतवारी यासंदर्भात स्थलकालाप्रमाणे फरक आढळून येतो.

'सामाजिक संस्था' या दृष्टीने नमूद करण्यासारखे या काळचे वैशिष्ट्य म्हरजे जाती अंतर्गत संघर्ष सोडविण्यासाठी कार्यरत असललेल्या गोमसभा. ज्ञानी, अनुभवी, वयोवृद्ध व्यक्तींचा समावेश गोतसभेमध्ये असे. जाती उपजाती, जाती अंतर्गत असणारे तणाव व संघर्ष लक्षात घेता गोतसभेच्या कार्याचे महत्त्व स्पष्ट होते.

**गुलामगिरी :** भारतीय गुलामगिरीचे स्वरूप पाश्चिमात्य जगातील गुलामगिरीसारखे नव्हते. मध्ययुगीन कालखंडात महाराष्ट्रात गुलामगिरीची प्रथा अस्तित्वात होती. राज्यकर्ते शूद्र जातीच्या लोकांचा उपयोग सामाजिक आणि आर्थिक दृष्टीने करून घेत असत. या काळात गुलाम व्यक्तीस कुणबी आणि स्त्रीस कुणबीण म्हणत. कुणबिणी म्हणजे घरकाम करणाऱ्या स्त्रिया. देहविक्री करणाऱ्या स्त्रियांस बटीक म्हणत असत. गुलामांची खरेदी-विक्री केली जात असे. स्त्री गुलामांची खरेदी-विक्री जास्त होत असे. अविवाहित, सुंदर स्त्रियांचा भरणा यात अधिक होता. घरकामासाठी वापरल्या जाणाऱ्या कुणबिणी या शूद्र जातींतील असत. गुलाम स्त्रियांना तारण ठेवून कर्ज काढले जात असे. गुलाम स्त्रियांना त्यांनी केलेल्या गुन्ह्यासाठी नाक, जीभ कापण्याची किंवा कडेलोटाची शिक्षा दिली जात असे. अशा दास-दासींची सरंजामदाराकडील संख्या शेकडोंनी असे.

**वेठबिगारी :** काही मोबदला न देता काम करून घेण्याची पद्धत म्हणजे वेठबिगारी. पेशवेकाळात ही पद्धत होती. वेठबिगारीचे काही प्रकार होते. सरकारी वेठबिगारी, सरकारी-खासगी कार्यालयातील वेठबिगारी, चौकी-पहारे, लष्करी कामाच्या निमित्ताने प्रचलित असणारी वेठबिगारी अशा स्वरूपाची कामे विनावेतन करून घेतली जात असत. शूद्र जातीतील लोक वेठबिगारी पद्धतीचे बळी होते.

**अस्पृश्यता :** हिंदू समाज आणि या समाजाच्या धार्मिक, सामाजिक प्रथापरंपरा फार प्राचीन काळापासून अस्तित्वात आहेत. चातुर्वर्ण्य व्यवस्था, जाति-उपजाती यांनी हा समाज बद्ध आहे. या समाजातील काही जातींच्या लोकांना अस्पृश्य समजले गेले आहे. स्पर्श करण्यास अयोग्य त्याला अस्पृश्य समजले गेले आहे. पेशवाई काळातील समाज अत्यंत कर्मठ, धर्मभोळा, शिवाशीव पाळणारा जातिजातींमध्ये विभागलेला समाज होता. महार, मांग, चांभार या

पेशवेकाळातील प्रमुख अस्पृश्य जाती. अस्पृश्यांची वस्ती गावकुसाबाहेर असे.

विशिष्ट जातीसाठी विशिष्ट काम ठरलेले होते. तो त्या–त्या जातीचा कायम व्यवसाय होता. जातिनिष्ठ व्यवसायामुळे कायमचा हीनदर्जा प्राप्त झालेल्यांना त्यामधून सुटका नव्हती. त्यामुळे अस्पृश्यांच्या वाट्याला निम्नस्तरीय कामे व कामामुळे हीन दर्जा आला होता.

**महाराष्ट्र समाजमन**

सातवाहन काळापासून घडत गेलेले असे हे महाराष्ट्र समाजमन आणि अशी ही महाराष्ट्र समाजसंस्कृती उण्यापुऱ्या दोन हजार वर्षांच्या काळातील विविध सामाजिक संस्था आणि प्रवृत्ती ह्यांच्या माध्यमांतून प्रभावित झालेल्या, घडलेल्या समाजाचे हे अंतरंग. न्या. रानडे यांनी 'मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष' या ग्रंथात महाराष्ट्रीय माणसाची गुणवैशिष्ट्ये स्पष्ट केली आहेत.

न्या. रानडे म्हणतात की, भिन्न वंशांच्या महाराष्ट्रीयांत योग्य मिश्रणामुळे त्यांच्या संस्था व धर्म यांच्याद्वारे भारताच्या इतर भागात क्वचित दिसणारा समतोल राखला आहे.... विशिष्ट परिस्थितीमुळे एकमेकांना मदत करण्याची व स्वतंत्रता राखण्याची सवय लोकांना लागली. सांप्रदायिकता व जातिभेदाचा अतिरेक हे दोष महाराष्ट्रीयांत आढळत नाहीत.... विभक्तपणाची आवड हे महाराष्ट्रीयांचे खास वैशिष्ट्य आहे. धार्मिक बाबतीत उत्तर भारतात मुसलमानी भाषा व वाङ्मय यांची छाप पडलेली दिसून येते, पण महाराष्ट्रात मात्र मुसलमानी राजवटीतसुद्धा मराठी भाषेचा विकास होत गेला. याचा संबंध मराठी माणसाच्या अभिमानी स्वभावाशी आहे.

**संदर्भ :**


१. समाज आणि धर्म : जयंत गडकरी
प्रकाशक सुदेश हिंगलासपुरकर, ऑक्टोबर १९८९

२. महाराष्ट्र संस्कृती : पु. ग. सहस्रबुद्धे
कॉन्टिनेन्टल प्रकाशन, १९७९

३. महाराष्ट्र संस्कृती घडण आणि विकास
ह. श्री. शेणोलीकर, डॉ. प्र. न. देशपांडे, मोघे प्रकाशन, १९७२.

४. गांव–गाडा
त्रि. ना. आत्रे, ह. वि. मोटे प्रकाशन, तियावृत्ती, १९५९

५. सातवाहनकालीन महाराष्ट्र
डॉ. रा. श्री. मोरवंचीकर, प्रकाशन अरुण पारगावकर, १९९३

६. यादवकालीन महाराष्ट्र
मु. ग. पानसे, मु. म. ग्रंथसंग्रहालय, १९६३

७. मराठी लोकांची संस्कृती
इरावती कर्वे, देशमुख आणि कंपनी, द्वितीयावृत्ती १९६२

८. मराठ्यांचा इतिहास (खंड–२)
संपादक, अ. रा. कुलकर्णी, ग. ह. खरे, लेखन : डॉ. रा. श्री. मोरवंचीकर, पेशवेकालीन सामाजिक परिस्थिती

९. मध्ययुगीन संस्था व संकल्पना, भाग १ ते ३,
चिटणीस, कृ. ना., पुणे.


* * *

# सामाजिक वाटचाल





## स्त्रीजीवन

■ डॉ. अरुणा ढेरे

**इतिहासाच्या सातवाहनखंड आणि पुढच्या गुप्त-वाकाटकांचा कालखंडही गाथा सप्तशतीसारख्या साहित्यातून अस्पर्शित राहिलेल्या आणि समकालीन चित्रशिल्पांमधून निःशब्द कुतूहलाचा विषय झालेल्या स्त्री-अस्मितेचा प्रभावी अध्याय पुराव्यानिशी उलगडणारा आहे. या काळात महाराष्ट्रभूमीवर नांदणाऱ्या राजकुलांची नाणी, शिलालेख आणि त्यांनी निर्माण केलेल्या वस्तू-वास्तू-शिल्पे यांच्या साहाय्याने या काळातल्या स्त्रीच्या कर्तबगारीची आणि सार्वजनिक जीवनातल्या तिच्या वैशिष्ट्यपूर्ण सहभागाची कल्पना करता येते.**

महाराष्ट्राच्या उदयापासून आजपर्यंतच्या दोन-अडीच हजार वर्षांच्या सामाजिक-सांस्कृतिक इतिहासात स्त्रीजीवनातल्या स्थित्यंतराचा आलेख महत्त्वपूर्ण आहे. सातवाहन काळापासून इंग्रजी राजवटीपर्यंतच्या विस्तृत कालखंडात स्त्रीच्या कौटुंबिक आणि सार्वजनिक जीवनाचे सर्वसाधारण स्वरूप आणि तिचे कर्तृत्व यांचा विविधांगी वेध घेत असतानाच तिचे बदलते सामाजिक स्थानही या आलेखातून स्पष्ट होत जाते.

इतिहासावर दृष्टिक्षेप टाकताना महाराष्ट्रातील स्त्रीजीवनाच्या प्रगतीचा आलेख आपण न्याहाळला, तर तो खरोखरच थक्क करून टाकणारा आहे. परंतु हा आलेख पूर्णांशाने सिद्ध करण्यासाठी केवळ ऐतिहासिक साधने पुरेशी नाहीत. समकालीन वाङ्मय, चित्र, शिल्प, धर्मसंप्रदाय आणि लोकपरंपरा ह्यांच्या आधारे त्याची सिद्धता करावी लागते. समग्रलक्ष्यी दृष्टीने काही अनुमाने करावी लागतात. तशा प्रयत्नातून समोर येणारा स्त्रीजीवनाचा पट मात्र अनेक अर्थांनी लक्षणीय आहे.

## सातवाहन काळ ते यादव काळ



या काळातले स्त्रीजीवन मुख्यतः समजून येते ते हाल सातवाहनाच्या 'गाथा सप्तशती' या ग्रंथामधून, जुन्नर, नाणेघाट, नाशिक परिसरातील पुरावशेष आणि शिलालेख यांच्यावरून, या काळातल्या दानलेख-नाण्यांवरून आणि अजंठा लेण्यांसारख्या कोरीव लेण्यांमध्ये आढळणाऱ्या चित्रांवरून आणि शिल्पांवरून.

या काळातल्या स्त्रियांची वेषभूषा आणि अलंकार यांची ओळख करून देणाऱ्या साधनांमध्ये अजिंठ्याच्या चित्रशिल्पांचे ऋण सर्वाधिक आहे. विविध तऱ्हांनी केस बांधणाऱ्या त्यांच्या वळशावेढ्यांमध्ये सुंदर अलंकार खोचणाऱ्या, टपोऱ्या मण्यांच्या आणि मोत्यांच्या माळा घालणाऱ्या स्त्रियांनी अजिंठ्याचे कलाविश्व गजबजून गेले आहे. फारशी लांबीरुंदी नसलेली त्यांची अधोवस्त्रे आणि बंद असलेल्या कंचुकीवर त्यांनी घेतलेली उत्तरीये यांची सळसळ आणि झगमग शतकांचे उंबरे ओलांडून आपल्याला ऐकू यावी, दिसावी इतकी या विश्वातल्या रंग-रेषांची ताकद आहे. मस्तकावर उष्णीव बांधणाऱ्या स्त्रियांबरोबर उष्णीव न बांधणाऱ्या व उत्तरीय न घेणाऱ्या स्त्रियाही येथे दिसतात.

गाथा सप्तशतीतले स्त्रीजीवन कवींच्या प्रातिभस्पर्शाने रसरशीत, मोकळे आणि विविधांगी स्वरूपांत समोर येणारे आहे. हाल सातवाहनाने या ग्रंथात सात कवयित्रींच्या गाथाही समाविष्ट केल्या आहेत, याची नोंद आवर्जून करायला हवी. सकच्छ नेसणाऱ्या, तंग कंचुकी घालणाऱ्या गाथा सप्तशतीमधल्या स्त्रिया समाजाच्या सर्व थरांमधून वावरणाऱ्या आहेत. कुटुंबाची प्रतिष्ठा जपणाऱ्या, मर्यादाशील, गुणी, गृहकृत्यदक्ष स्त्रिया जशा इथे भेटतात; तशा गावाच्या नजरा खेचून घेणाऱ्या नटमोगऱ्या, उनाड स्त्रियाही दिसतात. निरागसकुमारी, नवयौवना, मुग्धा, नवपरिणिता वधू, अस्मितासंपन्न प्रौढा, सुजाण वृद्धा आशा वेगवेगळ्या अवस्थांमधल्या या स्त्रिया आहेत. अंशुक, दूकुल, पट, पटक, साउली, सिचय अशी त्यांची नेसती वस्त्रे आणि कंचुक, कंचुकिका, कूर्पास अशी स्तनाभरणे कशी असतील, याची केवळ कल्पनाच गाथांमधल्या त्रिदर्शी वर्णनांवरून आपण आज करू शकतो. देशी पोताच्या लाल-निळ्या-कुसुंबी वस्त्रांमधल्या या वेगवेगळ्या वयांच्या आणि वेगवेगळ्या स्वभावांच्या स्त्रिया समकालीन शिल्पांमधल्या स्त्रियांपेक्षा थोड्या वेगळ्या आहेत. सातवाहनकालीन शिल्पांत आढळणाऱ्या उष्णीवांचा, उत्तरीयांचा आणि नीवीसारख्या अधोवस्त्राचा वापर गाथेतल्या स्त्रिया करत नाहीत. समकालीन शिल्पांत स्तनांशुक विरहित अशा स्त्रिया दिसत असल्या, तरी गाथेत त्या तशा नाहीत.

त्यांचे अलंकार तरी किती परींचे! सुवर्णाची किंवा रत्नखचित कुंडले, पाचू-माणके जडवलेली कंठिका, सोन्या-मोत्यांचे हार, सुवर्णाचे जालवलय, कृष्णमण्यांची मेखला, सोन्याचे कडदोरे, जाळीच्या बांगड्या, रुप्याचे पैंजण आणि सोन्या-मोत्यांच्या अलंकारांना मागे टाकत वनकन्यांनी केसांत खोवलेली मोरपिसे, कानावर खोचलेली कमळे आणि अंबाड्यावर माळलेले गजरे-खास महाराष्ट्रीय स्त्रिया वेगळेपणाने ओळखू याव्यात, असे हे अलंकार आणि अशी त्यांची वस्त्रांची नेसणही.

सातवाहन काळातल्या अथवा गुप्त-वाकाटकांच्या काळातल्या सर्वसाधारण स्त्रियांची मुख्य भूमिका गृहिणीची! उत्तम सून, उत्तम पत्नी, उत्तम आई आणि घरादाराचा- प्रपंचाचा उत्तम सांभाळ करणारी कर्ती स्त्री असे या काळातल्या स्त्रीचे चित्रण साहित्यात झाले आहे. स्त्रीचे पुरुषापेक्षा दुय्यम असे निश्चित झालेले समाजातले

स्थान आणि स्त्रीत्वाचे निश्चित झालेले आदर्श यांची कल्पना या साहित्यातून येतेच, पण त्यापेक्षाही अधिक लक्षात येते ती तिच्या अंगभूत गुणावगुणांमुळे तिला मिळणारी प्रतिष्ठा किंवा अप्रतिष्ठा, तिने मर्यादांचा स्वीकार करूनही मिळवलेले कर्तबगारीचे स्वातंत्र्य, तिची निर्भयता आणि तिची संवेदनशीलता. अशिक्षित स्त्रियांबरोबरच या साहित्यात कलानिपुण आणि शिक्षित स्त्रियांचेही दर्शन घडते. पतीवर निरतिशय प्रेम करणाऱ्या सत्त्वशीलेबरोबरच व्यभिचाराचा आनंद निर्धास्तपणे घेणाऱ्या चंचलांचेही दर्शन घडते. कुटुंबाच्या सुखात विरघळून गेलेल्या गृहिणींबरोबरच गणिकांचे आणि वेश्यांचेही दर्शन घडते. स्त्रीजीवनाचे अनेकांगी दर्शन घडवणारा 'गाथा सप्तशती' हा ह्या काळातील प्रातिनिधिक ग्रंथ मानला, तर प्राचीन भारतीय तरुणांच्या स्त्रीविषयक अपेक्षांचे नव्हे तर मराठी मातीत मळलेल्या खऱ्याखुऱ्या, स्त्रीच्या आयुष्यरंगाचे वास्तव मर्यादित पण अतिशय थेट आणि अस्सल स्वरूपात या साहित्याने आपल्याला दिले, असे म्हणता येईल.

इतिहासाच्या सातवाहनखंड आणि पुढचा गुप्त-वाकाटकांचा कालखंडही गाथा सप्तशतीसारख्या साहित्यातून अस्पर्शित राहिलेल्या आणि समकालीन चित्रशिल्पांमधून निःशब्द कुतूहलाचा विषय झालेल्या स्त्री-अस्मितेचा प्रभावी अध्याय पुराव्यानिशी उलगडणारा आहे. या काळात महाराष्ट्रभूमीवर नांदणाऱ्या राजकुलांची नाणी, शिलालेख आणि त्यांनी निर्माण केलेल्या वस्तू-वास्तू-शिल्पे यांच्या साहाय्याने या काळातल्या स्त्रीच्या कर्तबगारीची आणि सार्वजनिक जीवनातल्या तिच्या वैशिष्ट्यपूर्ण सहभागाची कल्पना करता येते. नृत्य, गीत, वाद्य, चित्र यांमध्ये पारंगत असलेल्या कितीतरी स्त्रिया या काळात दिसतात. राजघराण्यात राज्यकारभार आणि युद्धशास्त्र या दोहोंचेही शिक्षण मुलींना दिले जात असावे. सातवाहन राजकुळातल्या पहिल्या सातकर्णीची राणी नागनिका हिचे महत्त्व आणि वर्चस्व दाखवणारी कितीतरी प्रमाणे आज उपलब्ध आहेत. जुन्नर-नाणेघाट परिसरातल्या पुरातन अवशेषांनी आणि शिलालेखांनी तिची थोरवी जतन करून ठेवली आहे. तिच्याप्रमाणेच नाशिक लेणे खोदवणारी राज्यव्यवहारनिपुण राजमाता गौतमी बलश्री, क्षत्रपराजा ऋषभदत्ताची कर्तबगार पत्नी दक्षमित्रा पतिनिधनानंतर दहा वर्षे यशस्वी राज्य करणारी चंद्रगुप्तकन्या आणि वाकाटक राज्ञी प्रभावतीगुप्ता, किंवा मोठ्या कुशलतेने राज्यशकट चालवणारी सातव्या शतकातली चालुक्यराज्ञी विजयभट्टारिका यांनी सातवाहन आणि गुप्त-वाकाटक कालखंडावर आपली नाममुद्रा स्वतंत्रपणे उमटवली आहे.

या कालखंडात सार्वजनिक जीवनात आणि नृत्यसंगीतादी कलांच्या विश्वात वावरणाऱ्या स्त्रीचे सामाजिक-कौटुंबिक स्थान हळूहळू गौण ठरत गेले, आणि यादवकाळापर्यंत अनेक मर्यादांमध्ये अडकलेला, कर्मकांडांच्या भोवऱ्यात गरगरणारा एक दुःखी, निर्बल जीव अशीच तिची बहुतांशी ओळख ठरली. आठव्या-नवव्या शतकापर्यंत समाजाच्या वरिष्ठ वर्गातल्या आणि सत्ताधारी वर्गातल्या स्त्रियांना शिक्षण दिले जात असल्याचा उल्लेख राजशेखराच्या काव्यमीमांसेत आहे. शिवाय त्याने शीलाभट्टारिका, विज्जिका अशा काही प्रतिभाशाली कवयित्रींचा उल्लेख आपल्या सुक्तिमुक्तावलीत केला आहे. मंडणमिश्रांची बुद्धिमती पत्नी सरस्वती आज सर्वज्ञात आहे. मात्र यादवकाळात हे चित्र बदललेले दिसते.

## यादवकाळ ते शिवकाळ

अकराव्या शतकापासून चौदाव्या शतकापर्यंतचा काळ म्हणजे कल्याणीचे चालुक्य आणि देवगिरीचे यादव यांच्या कर्तबगारीशी संबद्ध असा काळ. प्रथम कल्याणीच्या चालुक्यांचे मांडलिक असणारे यादव पुढे स्वतंत्र झाले आणि पाचव्या भिल्लमापासून त्यांनी सम्राट म्हणून देवगिरीच्या किल्ल्यावरून महाराष्ट्र-कर्नाटकाचे राज्य चालवले.

या काळतले स्त्रीजीवन मुख्यतः समोर येते ते विविध पुराणांमधून, मिताक्षरा टीका किंवा वेदव्यासस्मृतीसारख्या काही ग्रंथांमधून, चतुर्वर्गचिन्तामणी किंवा व्रतखंड यांसारख्या निवारण ग्रंथांमधून आणि महानुभावीय तसेच भागवतसंप्रदायी साहित्यामधून. या लिखित शब्दांमधून उमटलेले स्त्रीजीवनाचे चित्र फारसे आनंददायी नाही. स्वातंत्र्य, समृद्धी आणि सन्मान यांची हकदार असलेली स्त्री

या काळापर्यंत हळूहळू गौण स्थानावर फेकली गेली. कारणे राजकीय असतील, सामाजिक-सांस्कृतिकही असतील, पण पुरुषसत्ताक जीवनपद्धतीत तिचा दर्जा घसरत गेला हे नक्की. धर्मकृत्यांमध्ये तिला पुरुषाच्या बरोबरीचे स्थान उरले नाही. मेगेस्थेनिसने नोंद केली आहे की, 'ब्राह्मण आपले तत्त्वज्ञान स्त्रियांस शिकवीत नाहीत.' स्त्रियांची कर्तव्ये समाजाने नियत केली होती आणि ती मुख्यतः कुटुंबधारणेचीच होती.

बारा-तेरा वर्षांची मुलगी लग्नाला योग्य समजली जात होती. अर्थातच हे लग्न मुलीच्या नव्हे तर तिच्या आई-वडिलांच्या संमतीनेच होई, असे अल्बेरूनीने म्हटले आहे. दहाव्या शतकापर्यंत स्त्रीने विवाहानंतर एकत्र कुटुंबाचा भार संभाळला. अकराव्या शतकापासून विभक्त होणारी कुटुंबे अधूनमधून दिसू लागली. मात्र मालमत्तेवर तिचा हक्क नव्हता. विधवेचा वारसाहक्कही अनेक शास्त्रकारांनी अमान्य केला होता. विज्ञानेश्वराचा खणखणीत अपवाद वगळता बहुतेक शास्त्राकारांचे मत संपत्तीचे अधिकार पुरुषाकडेच असावेत, असे होते. तरीसुद्धा अधूनमधून मुलीच्या वाट्याला वडिलार्जित स्थावर-जंगम मालमत्ता असल्याचेही उल्लेख सापडतात. मात्र द्रव्य विनियोगाचे स्वातंत्र्य स्त्रीला बहुधा नव्हतेच.

लीळाचरित्र आणि स्मृतिस्थळ या महानुभाव ग्रंथांत सामान्य महाराष्ट्रीय स्त्रीचे जे जीवन आले आहे, त्यात ती बहुतेक साधी भोळीभाबडी आणि गृहकृत्यांनी वेढलेली अशी आहे. तिला सासुरवास तर होताच पण ती सर्व बाजूंनी पराधीनही होती. कष्ट करणाऱ्या नवऱ्याची मारहाण सोसणाऱ्या, उरलेसुरले अन्न मुकाटपणे खाणाऱ्या, सासू रागवेल म्हणून भयग्रस्त असणाऱ्या, नवऱ्याला आवडली नाही म्हणून सासू-सासऱ्यांसह सर्वांनी घराबाहेर हाकललेल्या, दारिद्र्याने पिचलेल्या अशा कितीतरी स्त्रियांचे चित्रण लीळाचरित्रात आले आहे.

विधवांची स्थितीही फार करुणाजनक होती. पतीमागे पत्नीने सती जावे, अशीच समाजाची धारणा होती. सतीचा गौरव केला जात होता. आणि सतीची सक्तीही केली जात होती. खुद्द रामदेवराव यादवाच्या पत्नीला-कमाइसेला तिच्या सावत्र मुलाने- सिंघणाने जबरदस्तीने सती जायला लावल्याची नोंद स्मृतिस्थळाच्या आधारे मु.ग.पानसे यांनी 'यादवकालीन महाराष्ट्रा'तील स्त्रीजीवनाचा आढावा घेताना केली आहे.

सती न जाता विधवेचे जिणे जगणाऱ्या स्त्रियांनी आपले उर्वरित आयुष्य साधुसंतांच्या सेवेत वा परमार्थ चिंतनात घालवावे, अशी जनरीत होती. तरीही तरुण विधवा पुरुषदृष्टीपासून सुरक्षित नसत. शिवाय कर्मकांडाचे अवडंबर आणि भोंदू साधु-महाराजांकडून होणारी फसवणूक यांचाही त्या सहज बळी होत. पुराणकाळातले हे अवनत आणि दयनीय अवस्थेला पोहोचलेले स्त्रीजीवन पाहता भागवत संप्रदायातील संतांनी तिला खुली करून दिलेली मुक्तीची वाट किती मोलाची होती, हे लक्षात येते.

परमार्थ मार्गावर चालणाऱ्या कर्तबगार, संवेदनशील, प्रतिभावंत आणि बुद्धिमान स्त्रियांचा उल्लेख जसा महानुभाव वाङ्मयात तसाच वारकरी वाङ्मयातही सापडतो. धवळे म्हणजे नवऱ्या मुलाकडून लग्नगाणी रचणारी, अनुभवाने आणि बुद्धीने समृद्ध म्हातारी महदंबा आणि महदाइसा तशाच आऊसा, बाईसा, उमाइसा अशा काही स्त्रिया महानुभाव वाङ्मयातून स्वतंत्र अस्मितेचे दर्शन घडवतात आणि मुक्ता, जनी, बहिणा, कान्होपात्रा ह्या वारकरी संप्रदायातल्या स्त्रिया आपल्या चरित्र-चारित्र्यानेच नव्हे तर अभंगरचनेनेही स्त्रीसामर्थ्याचा उज्ज्वल आविष्कार घडवतात. या स्त्रियांना आपल्या स्त्रीत्वाची त्या स्त्रीत्वाला जखडणाऱ्या सामाजिक बांधणीची, एकूणच असाहाय्य आणि दुःखित अशा स्त्रीजीवनाची आणि परमार्थक्षेत्रात संतकृपेने त्यांना मिळलेल्या स्वातंत्र्याची स्पष्ट जाणीव होती. आणि त्या जाणिवेला त्यांनी उद्गारही दिला आहे.

या काळातल्या स्त्रीनिर्मित वाङ्मयातून स्त्रीच्या अंतरविश्वाची झलक पाहायला मिळते आणि इतर वाङ्मयातून तिचे कौटुंबिक-सामाजिक जीवन कसे असेल, याची कल्पना येते. बाहुल्यांशी खेळणाऱ्या, पिंगा घालणाऱ्या, फुगड्या धरणाऱ्या लहान मुली; स्वयंपाक करणाऱ्या, वाटण वाटणाऱ्या, पंगती वाढणाऱ्या, पाणी शेंदणाऱ्या, पतिसेवा करणाऱ्या, सासुरवास सोसणाऱ्या विवाहिता; मुलांसाठी नवस बोलणाऱ्या, पुत्रजन्मासाठी आतुर झालेल्या, मुलांसाठी अंगाई गाणाऱ्या, त्यांना भरवणाऱ्या, कष्ट सोसून वाढवणाऱ्या माता; संगीत आणि

नृत्य ह्यांच्या आश्रयाने शरीरविक्रय करून पोट भरणाऱ्या आणि म्हातारपणी असह्य दुःख भोगणाऱ्या वेश्या आदीयादवकालीन स्त्रियांची वाङ्‌मयात उमटलेली प्रतिबिंबे अत्यंत परिणामकारक आहेत.

रांगोळी, कशिदा, पाककला, शिवणकला, वादन आणि नृत्य या त्यांच्या कलांचे कितीतरी उल्लेख प्राचीन मराठी वाङ्‌मयात विखुरलेले आहेत. त्यांची मेंदी, त्यांचे गोंदण, त्यांची नाना प्रकारची प्रसाधने; रेशमी, सुती, जरी, भरजरी अशा त्यांच्या नाना प्रकारच्या वस्त्रांचा; सकच्छ आणि परवटा साड्यांचा आणि त्यांच्या नखशिखांत अलंकारांचा, खोपा-अंबाड्यासह त्यांच्या विविध केशरचना आणि त्यांच्या भावजीवनाच्या केंद्रस्थानी असलेल्या सौभाग्यचिन्हांचा उल्लेखही अनेकदा, अनेक ठिकाणी, अनेक प्रकारांनी झालेला दिसतो.

## शिवकाळ व पेशवेकाळ

पुराणकाळात स्त्रीचे गौणस्थान निश्चित झाले. सामाजिक सांस्कृतिक जीवनातल्या तिच्या मर्यादाही निश्चित झाल्या. शिवकाळ आणि पेशवेकाळ हे त्या स्थानाचे आणि समाजाने बाळगलेल्या स्त्रीविषयक दृष्टिकोनाचे भलेबुरे परिणाम प्रकर्षाने प्रकट करणारे काळ होते. मुलीचे लग्नाचे वय या काळात आणखी कमी होत गेले आणि बालविवाहाची प्रथा सर्वत्र रूढ झाली. जिजाबाईंचे लग्न त्यांच्या वयाच्या नवव्या-दहाव्या वर्षीच झाले असावे आणि शिवाजीराजांचे सईबाईंशी लग्न झाले तेही सईबाईंच्या वयाच्या सातव्या-आठव्या वर्षीच. अर्थात लग्न लवकर झाले, तरी वयात येईपर्यंत मुलगी बहुधा माहेरीच असे. ऋतुप्राप्तीनंतर ती सासरी येई. गृहकृत्यांचे कुटुंबाने चालवलेल्या रूढी-परंपरांचे, सांस्कृतिक आणि धार्मिक प्रथांचे, रिवाजांचे, सणासमारंभाचे शिक्षण तिला दोन्ही घरांमधून मिळत असे. लेखन-वाचनाशी आणि औपचारिक शिक्षणाशी तिचा संबंध नव्हता आणि एकूणच धर्मप्रधान समाजव्यवस्थेचे परिणाम पुरुषवर्गापेक्षा स्त्रीवर्गावर जास्त असल्यामुळे तिच्या ज्ञानसंपादनाचा रोख धर्माकडेच वळलेला असणे स्वाभाविक होते. त्यातही कर्मकांड आणि व्रतवैकल्ये ह्यांचा भाग अधिक होता.

लेखन-वाचन करणाऱ्या स्त्रिया संख्येने अगदी कमी. त्यातही सधन आणि सत्ताधारी वर्गातच त्यांचा अढळ. पोथीवाचन किंवा पत्रव्यवहार हीच बहुधा लेखन-वाचनाची उद्दिष्टे आणि इतिश्रीही. पेशवेकाळात बाळाजी विश्वनाथांची पत्नी राधाबाई आणि कन्या थिऊबाई, पहिल्या बाजीरावाची पत्नी काशीबाई, नारायणरावांची पत्नी गंगाबाई याशिवाय सगुणाबाई, आनंदीबाई अशा काही साक्षर, बहुश्रुत, ज्ञानप्रेमी, वाचनवेड्या स्त्रियाही आढळतात. सगुणाबाईचा स्वतःचा ग्रंथसंग्रह होता. राधाबाईचे वाचनही विविधांगी होते.

आनंदीबाई ही तर अनेक अर्थांनी कर्तबगार आणि बुद्धिमान स्त्री होती. तिला राज्यकारभाराचे ज्ञान होते. शिवाय ती मोठी महत्त्वाकांक्षी होती. शिवकालीन स्त्रियांची कर्तबगारी तर सर्वश्रुत आहे. जिजाबाई लहानग्या शिवाजीराजांना जवळ बसवून न्यायनिवाडे करत. मराठ्यांचे स्वतंत्र राज्य व्हावे, ही प्रेरणा त्यांचीच. त्यांची आणि पुढे येसूबाई, ताराबाई, शाहू छत्रपतींच्या राण्या तसेच दाभाडे, शिर्के, होळकर इत्यादी नामवंत घराण्यांमधल्या स्त्रियांचीही अनेक पत्रे उपलब्ध आहेत.

चतुर, मुत्सद्दी, विवेकी, खंबीर आणि बुद्धिमान अशा राजकारणी स्त्रियांप्रमाणेच या काळात प्रत्यक्ष युद्धात उतरून पराक्रम गाजवणाऱ्या स्त्रियाही दिसतात. 'शिवदिग्विजय' काव्यात वेलवाडी किल्ल्याच्या ठाणेदाराच्या पत्नीच्या युद्धकौशल्याचे अप्रतिम वर्णन आले आहे. उत्तम घोडेस्वारी करणारी महाराणी येसूबाई किंवा कोल्हापूरच्या गादीची रणझुंजार राणी ताराबाई किंवा शाहू महाराजांचे सेवासरखेल खंडेराव दाभाडे यांची आक्रमक, पराक्रमी विरांगना पत्नी उमाबाई किंवा महादजी शिंद्यांनंतर सेनेचे नेतृत्व करून युद्धात अग्रभागी लढणाऱ्या त्यांच्या दोन स्त्रिया लक्ष्मीबाई आणि यमुनाबाई यांसारख्या इतरही काही स्त्रियांची मर्दुमकी इतिहासाच्या पानांवर नोंदली गेली आहे. अहिल्याबाई होळकरांचे राज्यकारभाराचे आणि दानशूरतेचे कर्तृत्व तर सर्वश्रुत आहेच. अहिल्याबाई होळकर आणि एकोणिसाव्या शतकाच्या मध्यात मध्य-भारतात झाशीला राज्य करणारी मूळची मराठी राणी लक्ष्मीबाई यांचा अभिमानास्पद

वारसा पुढे ब्रिटिश सत्तेशी संघर्ष करणाऱ्या स्त्रियांनी जपला, असे म्हणावे लागेल.

अर्थात सर्वसामान्य स्त्रियांच्या आयुष्याची कल्पना या स्त्रियांचे आयुष्य समोर ठेवून काही अंशी करता येत असली, तरी ती तशी सर्वार्थाने करता येणार नाही. सण–उत्सवांमध्ये रमलेल्या, व्रतवैकल्यांमध्ये गुंतलेल्या या काळातल्या सर्वसामान्य स्त्रियांचे दर्शन या काळातल्या वाङ्मयात आणि ऐतिहासिक कागदपत्रांत सहज होते. त्यांचे नऊवारी नेसणे, गाठीची चोळी घालणे. कुलीनतेचा दर्शक असा डोक्यावरून पदर घेणे, अंगावर शाल किंवा शेल पांघरणे, लहान मुलींनी परकर–चोळी घालणे, विधवा स्त्रियांनी बाहेर जाताना अंगावर शाल किंवा चौघडी पांघरणे; सुवासिनींचे मंगळसूत्र, नथ, तोडे, जोडवी इत्यादी दागिने; इतरही नाना प्रकारचे अलंकार आणि विधवांचे अलंकारविहीन असणे यासंबंधी कितीतरी उल्लेख आणि सचित्र उल्लेखही आढळतात.

या स्त्रियांचे ते समारंभांनी भरलेले, चैतन्यमय आयुष्य आणि त्यांची वस्त्रालंकारांनी नटलेली विविध रूपे कल्पनेने अनुभवताना होणारा आनंद त्यांच्या बांधवांची आणि सामाजिक स्थानाची जाणीव झाल्यावर मात्र मावळल्याखेरीज राहत नाही. बहुपत्निकत्वाच्या प्रथेचा स्वीकार त्यांनी कसा केला असेल? पातिव्रत्याची बेडी त्यांच्या पायात घालण्याची व्यवस्थेची रीत त्यांनी कशी समजून घेतली असेल? सत्तर–ऐंशी टक्के स्त्रिया त्यांच्या वाट्याला येणारे आयुष्य आंधळेपणाने स्वीकारत होत्या हे खरे. शिवाय त्या काळातील कर्मकांडाचे अवडंबर त्यांना आयुष्यभर बांधून ठेवणारे होते. बायकांचे नवस, व्रताच्या दक्षिणा, पेशवाईत दक्षिणेसाठी गोळा झालेल्या लाचार विधवा यांच्या तत्कालीन कागदपत्रांमधल्या नोंदी अंगावर अक्षरशः काटा आणणाऱ्या आहेत. स्त्रियांना अर्थार्जनाचे स्वातंत्र्य नसल्याने, पुरुषवेषात शिपाईगिरी करणाऱ्या एका स्त्रीची हकिगत पेशवे दप्तरात आली आहे. वर्षानुवर्षे पिढीजात चालत आलेले उद्योगही पुरुषाला मदत म्हणून, त्यांच्या संमतीनेच स्त्री करू शकत असे. ते सोडून दुसरी कामे करणाऱ्या स्त्रीला वाळीत टाकल्याचीही उदाहरणे आहेत.

रक्षा किंवा नाटकशाळा म्हणून स्त्रीला बाळगण्याची सर्वसंमत चाल होती. उदरनिर्वाहाचा हा एक मार्ग अडचणीतल्या किंवा निर्धन स्त्रियांसाठी खुला होता. काही समाजांमध्ये वेश्याव्यवसाय रूढच होता. काही स्त्रिया कीर्तने करणाऱ्याही आढळत तशा कुणबिणी किंवा बटकी म्हणून काही स्त्रिया काम करत. पेशवाईच्या अखेरपर्यंत त्यांची मोठ्या प्रमाणात खरेदीविक्री होत होती.

स्त्रियांना संपत्तीवर वारसाहक्काने अधिकार नव्हता. राज्यकर्ते किंवा सधन सत्ताधारी असे इतर लोक पुष्कळ वेळा परिवारातल्या लेकी–सुनांना जमिनी किंवा गावे इनाम देत. चोळीबांगडीसाठी किंवा दूधभातासाठी अशी इनामे दिल्याच्या नोंदी शिवकालीन तसेच पेशवेकालीन कागदपत्रांत आणि दानलेखांत पाहायला मिळतात. शिवाय मुलीच्या लग्नात तिच्या पित्याच्या घरून तिला मिळालेले धन, वस्तू–वास्तू, अलंकार हे तिचे स्त्रीधन तिच्याच हक्काचे असे. तो हक्क तिला किती राबवता येत असे, हा प्रश्न निराळा.

आपला जातीचा अथवा व्यवसायाचा अधिकार नसतानाही देवळात जाऊन देऊळ भ्रष्ट करणे, चोरी करणे, मूल पळवणे, पळून जाण्यासाठी एकीने दुसरीला मदत करणे, परधर्मीयांशी संबंध करणे, करणी करणे, व्यभिचार करणे आणि क्वचित दरोडे घालून लूटमार करणे आशा स्त्रियांनी केलेल्या गुन्ह्यांचा आणि त्यासाठी त्यांना झालेल्या शिक्षांचा तपशीलही लिखित साधनांमधून इतिहासाने आपल्यासमोर ठेवला आहे.

अल्पशिक्षित, श्रद्धाळू, भाबड्या, अविकसित बुद्धी आणि मन घेऊन मर्यादित वर्तुळात समाजमान्य संकेतांना शरण जात वावरणाऱ्या बहुसंख्य स्त्रिया आणि काही संवेदनशील प्रगल्भ कवयित्री, संत तसेच बुद्धिमान, कार्यकुशल राजकारणी आणि युद्धपटू, वीरांगना अशा कर्तृत्ववान स्त्रिया– शिवकाळापासून पेशवाईच्या अस्तापर्यंतच्या कालखंडाचे स्त्रीजीवनाच्या संदर्भाचे दर्शन अशा प्रकारचे आहे.

इंग्रजी अमलात इथे मिशनऱ्यांनी मुलींसाठी शाळा सुरू केल्या आणि एकोणिसाव्या शतकाच्या मध्यापर्यंत त्या शाळांमधून शिकणाऱ्या तुरळक मुली या मुख्यतः

समाजाच्या तळामधून आलेल्या आणि अत्यंत हलाखीत कुटुंबांमधून आलेल्या मुली होत्या. इंग्रजी शिक्षणाने नव्या ज्ञानविज्ञानाची ओळख झाल्यानंतर स्त्रीजीवनाचा विचार सहानुभूतीने करू लागलेल्या उच्चशिक्षित तरुण वर्गाने सुरू केलेल्या शाळा आणि बहुजन समाजाला ज्ञानी करण्याच्या तळमळीतून महात्मा फुले यांनी सुरू केलेल्या शाळा यांचा उदय एकोणिसाव्या शतकाच्या मध्यावर झाला आणि हळूहळू या शिक्षणाचा झिरपा मोठ्या प्रमाणावर होत गेला. स्त्रिया आणि मुली धिटाईने शिकू लागल्या. मुलींसाठी शाळा, प्रौढ स्त्रियांसाठी झनाना स्कूल किंवा अंतर्गृहातले शिक्षण स्त्रियांच्या सभांमधून सुरू झालेले विविध प्रकारचे शिक्षण-वर्ग यांमुळे शतकाचा उत्तरार्ध स्त्री आणि स्त्रीविषयक नव्या जाणिवांनी गजबजून गेला.

या काळात स्त्रियांच्या शिक्षणाचा प्रश्न इतर सर्वच स्त्रीप्रश्नांशी जोडला गेला. बालविवाहाला आणि जरठ-कुमारी विवाहाला विरोध, संमतीवयाचा आग्रह, उच्चवर्गीय विधवांच्या केशवपनाला विरोध, पुनर्विवाहाचा आग्रह हे आणि इतर स्त्रीविषयक प्रश्न स्त्रीशिक्षणाच्या प्रश्नातच गुंतून होते आणि त्यावर मोठ्या प्रमाणावर विचारमंथन होत होते. मुलामुलींना समान शिक्षण, सहशिक्षण, सक्तीचे प्राथमिक शिक्षण हेही प्रश्न होतेच. विसाव्या शतकाच्या प्रारंभी मतदानाचा हक्कही स्त्रियांनी आत्मविश्वासाने मागितला.

एकीकडे महात्मा फुले, गोपाळराव आगरकर, महर्षी कर्वे, पंडिता रमाबाई, रमाबाई रानडे यांच्यासारखे इतरही श्रेष्ठ सुधारक विचारवंत आणि दुसरीकडे काशीबाई नवरंगे, काशीबाई हेर्लेकर, रेबेका सिमिअन, शांताबाई विकंबे, जनाक्का शिंदे, जगूताई जोशी यांच्यासारख्या कितीतरी बुद्धिमान, शिक्षित स्त्रिया. एकोणिसाव्या शतकाचा उत्तरार्धात आणि विसाव्या शतकाचा पूर्वार्ध यांनी गाजवला आहे. महात्मा फुले यांच्या कार्यात मोलाचा वाटा उचलणाऱ्या सावित्रीबाई फुले, 'स्त्री-पुरुष तुलना' ह्यासारखा विलक्षण परखड निबंध लिहिणाऱ्या ताराबाई शिंदे, पहिल्या भारतीय स्त्री-डॉक्टर आनंदीबाई जोशी, चिंतनशील उत्तम लेखिका काशीबाई कानिटकर, लक्ष्मीबाई टिळक, बहिणाबाई चौधरी आणि अशा आणखीही कित्येक कर्तबगार स्त्रियांनी या काळात एकूणच स्त्रीजीवनाचे विकासोन्मुख दर्शन मोठ्या धैर्याने घडवले आहे.

या काळात स्त्रीजीवनात जो बदल घडला, तो शेकडो वर्षांचा इतिहास पाहता फार मोठा, वेगवान आणि आमूलाग्र बदल होता. केवळ कुटुंबाच्या परिघात वावरणारी स्त्री या काळात बाहेर पडली. सार्वजनिक जीवनात वावरू लागली. प्रारंभ काळात जरी शिक्षण आणि शुश्रूषा ही दोनच क्षेत्रे तिला मिळाली, तरी हळूहळू इतरही सामाजिक क्षेत्रांमध्ये ती काम करू लागली. अर्थार्जन करू लागली. तिने मतदानाचा हक्क मिळवला. ती कायदेकौन्सिलमध्ये प्रविष्ट झाली. क्वचित क्रांतिकारकांच्या चळवळीत शिरली. गांधीजींनी सारा देश हलवला आणि प्रभात फेऱ्यांमधून, सत्याग्रही तुकड्यांमधून, पिकेटिंग करणाऱ्या गटागटांमधून, खादीचा प्रचार करणाऱ्या समूहांमधून हजारो सर्वसाधारण स्त्रिया रस्त्यावर आल्या.

हे चित्र थक्क करणारे होते. हा बदल केवळ पृष्ठस्तरीय नव्हता. जाकीट घालून आणि जोडे घालून घराबाहेर वावरणारी स्त्री केवळ पोशाखातल्या बदलामुळे लोकांना चकित करीत नव्हती. तिने स्वतःची बंधने स्वतःच्या हिमतीने तोडली होती. उदार, सहृदयी, सुधारक पुरुषांचा आधार घेत; त्यांच्या मार्गदर्शनाने आणि मदतीने ती स्वतःच प्रगतीच्या वाटा चोखाळत होती. सामाजिक टीका, बहिष्कार, छळ यांचा धैर्याने स्वीकार करत या काळातल्या स्त्रियांनी जे यश संपादन केले, त्याचे मोल त्यांनी दिलेली किंमत पाहता, फार मोठे आहे यात शंकाच नाही. या काळातली नियतकालिके, छायाचित्रे, संस्थांचे अहवाल, ललित कला, ललित साहित्य आणि विविध सामाजिक स्तरांमधल्या स्त्री-पुरुषांची चरित्रे आणि आत्मचरित्रे यांमधून स्त्रीजीवनाचा जो पट उलगडला गेला आहे, तो खरोखरच आश्चर्यकारक आहे. समाजात जनावरापेक्षाही नीच स्थानावर असलेली स्त्री ही शिक्षणाच्या बळावर स्वातंत्र्यापर्यंतच्या अवघ्या दीडशे वर्षांत महाराष्ट्राच्या सर्वांगीण प्रगतीला हातभार लावण्यासाठी जीवनाच्या सर्व क्षेत्रांत अग्रस्थानी झेपावल्याचा हा अभिमानास्पद इतिहास आहे.

* * *







# आहार पद्धती

■ प्रा. मोहसिना मुकादम

**लाडवांप्रमाणेच वडे हादेखील महाराष्ट्राचा खास खाद्यप्रकार. मग तो कोकणात कोंबडी किंवा काळ्या वाटाण्याच्या उसळीसोबत खायचा. तांदूळ-उडीद डाळीचा वडा असेल, किंवा नारळाच्या चटणीसोबत खायचा मिश्र धान्याचा भाजणीचा वडा असेल, किंवा वेगवेगळ्या डाळींचा विदर्भातील चंद्रपुरी वडा असेल, महाराष्ट्राच्या खाद्यसंस्कृतीची प्राचीनता स्पष्ट करणारा हा आणखी एक पदार्थ. पातंजलीच्या काळात वटाकनी पौर्णिमेला वेगवेगळ्या प्रकारचे वडे बनवून त्यांचा आस्वाद घेण्याची प्रथा महाराष्ट्रात होती.**

प्रत्येक प्रांताची खास ओळख असते; जी भाषा, वेषभूषा, कला, साहित्य आणि स्थापत्य अशा वेगवेगळ्या माध्यमांतून व्यक्त होत असते. त्या प्रांतात केले जाणारे खाद्यपदार्थही प्रांतीय अस्मितेचे प्रतीक असतात. १३ व्या शतकापासून म्हणजेच यादव काळापासून महाराष्ट्राला एक पृथक ओळख मिळाली. त्या कालखंडापासून महाराष्ट्राच्या खाद्यसंस्कृतीचा एक धावता आढावा घेण्याचा प्रयत्न प्रस्तुत लेखात आहे. को हम्? ह्याचे उत्तर खाद्यसंस्कृतीच्या माध्यमातून देता येईल का? हे शोधण्याचा प्रयत्न आहे. Brillat Savarin म्हणतो 'Tell me what you eat I will tell you what you are' हे त्याचे विधान आपल्या बाबतीत तर खूपच महत्त्वाचे ठरते. आपला दैनंदिन आहार काय आहे, सणासुदीला कोणते पदार्थ केले जातात, कोणते पदार्थ निषिद्ध आहेत ह्यांवरून धर्म, जात, सामाजिक स्थान व आर्थिक स्तर हे सर्व सहज कळू शकते.

स्थानिक आहारशैली सर्वप्रथम आकार घेते, ती तिथे उपलब्ध असलेल्या पदार्थांपासून. निसर्ग आणि आहार ह्यांच्यात एक नैसर्गिक समतोल असतो. त्या-त्या प्रदेशातील रहिवाशांचा आहार, भूगोल व पर्यावरण यांनुसार ठरतो. कालांतराने त्याला जोड मिळते, ती धार्मिक आणि सामाजिक प्रथांची. आहारशैली खाद्यसंस्कृतीत बदलण्याची ही प्रक्रिया असते. ह्या प्रक्रियेत धर्म, आरोग्य, ऋतू, हवामान ह्या सर्व गोष्टींचा समावेश असतो. सणासुदीला बनवल्या जाणाऱ्या पदार्थांच्या मागे जेवढी श्रद्धा असते, तेवढीच तो सण कोणत्या ऋतूत येतो; त्या वेळी हवामान काय असते; शरीराला कोणत्या गोष्टींची आवश्यकता असते; कोणकोणती फळे-भाज्या-धान्य त्या वेळेस होतात ह्या सर्वांचा सूक्ष्म विचारही असतो. आहारावर वेळोवेळी घातलेले निर्बंध म्हणजे समाजाच्या खाद्यजीवनाला शिस्त लावायचा चविष्ट मार्गच म्हणायला हरकत नाही. ह्या सर्व नियमांचा पडताळा आपल्याला महाराष्ट्राच्या खाद्यसंस्कृतीत येतो.

महाराष्ट्राच्या खाद्यसंस्कृतीचा पाया ताम्रपाषाणयुगात घातला गेला, असे म्हणायला निश्चित आधार आहे. आद्य पुराश्मयुगात महाराष्ट्रात राहणारा आदिमानव हा शिकार करून जगत असे अथवा फळेकंदमुळे खात असे. ताम्रपाषाणयुगात त्याला शेतीचे ज्ञान झाले. जोर्वे-इनामगाव येथील उत्खननात असे दिसते की; जव, मसूर, कुळीथ, गहू, ज्वारी, बाजरी, तांदूळ व नाचणी ही प्रमुख धान्ये होती. पुरातत्त्वशास्त्रज्ञ डॉ. मधुकर ढवळीकर ह्यांच्या म्हणण्यानुसार बाजरी व ज्वारी ही पिके इथे कदाचित आफ्रिका खंडातून आली असावीत. करडई, गहू, हरभरा, नाचणी, वाल, मटार व ज्वारी ही धान्ये मौर्य-सातवाहनकालीन उत्खननात आढळली आहेत. ही धान्ये भाजून मग पाट्यावर वाटून त्या पिठापासून भाकरी भाजत, ह्याचे पुरावेही जोर्वे-इनामगाव इथे सापडले आहेत. आपल्या आहाराचे जे भोज्य, भक्ष्य, लेह्य, चोश्य, पेय व खाद्य असे वर्गीकरण केलेले आहे, त्यांपैकी भोज्य व भक्ष्य ह्या प्रकारांत मोडणारे पदार्थ आजही ह्याच धान्यांपासून बनवले जातात. कोकणात तांदुळाची क्वचित प्रसंगी नाचणीची भाकरी तर घाटावर तसेच खानदेशात मोत्यासारखी किंवा मोगऱ्याच्या कळीप्रमाणे दिसणारी शुभ्र ज्वारीची भाकरी. ज्वारीच्या भाकरीमुळेच फलटण, माणदेशाला ढालतलवारीचा देश म्हणतात. खोलगट तव्यावर भाजलेली ज्वारीची पातळ भाकरी ढाल आणि त्यासोबतची मिरची म्हणजे तलवार. जिथे बाजरी जास्त, तिथे कृष्णसावळ्या बाजरीची भाकरी.

## गव्हाची अपूर्वाई

तांदूळ, ज्वारी व बाजरी ह्यांच्या तुलनेत गहू कमी पिकत असल्याने रोजच्या आहारात गव्हाची पोळी नसायची. तिचा आहारातील समावेश हा हल्लीचा. जे दुर्मीळ, ते खास प्रसंगासाठी राखून ठेवण्याची प्रवृत्ती आहे. त्यामुळे गव्हाचा वापर साठीसहामाशी, सणा-उत्सवापुरता मर्यादित होता. लग्नाच्या जेवणावळीत पुऱ्या असतात, अशा प्रसंगी भाकरी करणे किंवा मागणे हे कमीपणाचे समजले जाते. अगदी केळवण्याच्या जेवणातही भाकरी केली जात नाही. महानुभाव पंथाचे गुरू श्रीगोविंदप्रभू ह्यांनी एकदा लग्नाच्या जेवणात भाकरीची मागणी केली असता, 'वऱ्हाडी भाकरी कैसी जी' असे उत्तर देण्यात आले. कोकणात तर तांदुळाचे उत्पन्नच मुख्य असल्याने गहू तसाही अप्रुपाचा. गव्हाच्या ह्या दुर्मीळतेमुळेच कोकणात 'जावई नव्हे जावयाचा भाऊ, उगाच रांडेचे सांडलेस गहू' ही म्हण रूढ झाली असावी.

विसाव्या शतकाच्या सुरुवातीपर्यंत गव्हाची ही अपूर्वाई महाराष्ट्राला वाटत होती असे दिसते. कॅम्लिनचे संस्थापक श्री. दांडेकर ह्यांनी आपल्या 'उंटावरचे शहाणे' ह्या आत्मचरित्रात गव्हाच्या पोळ्यांच्या नवलाईबद्दल लिहिले आहे. ते म्हणतात, ''गहू आणि गव्हाच्या पोळ्या लहानपणी कधी पाहिल्याच नाहीत. पोळ्या खाणे हा प्रकार श्रीमंतात आणि सणासुदीलाच.'' महाराष्ट्राच्या खाद्यसंस्कृतीत गव्हाचे स्थान स्पष्ट करताना श्री. न. र. फाटक म्हणतात, ''एक काळ असा होता की जेव्हा, पोळी म्हणजे पुरणपोळी असाच बोध व्हावयाचा. पहिले महायुद्ध संपल्यावर ऑस्ट्रेलियातून गहू आयात होऊ लागला त्यामुळे पोळ्या/चपात्या सरसकट बनू लागल्या.'' म्हणूनच ते पुढे असे म्हणतात, पुरणपोळीत आता पुरण राहिले नाही.

गव्हाच्या ह्या दुर्मीळतेमुळेच तर महाराष्ट्राची आद्य पक्वान्ने म्हणजे मांडे, पुरणपोळी, वळीवट, वेगवेगळ्या

प्रकारच्या गोड पोळ्या ह्यांना खाद्यसंस्कृतीत महत्त्वाचे स्थान असावे. त्यांपैकी वळीवट म्हणजे महाराष्ट्राची खासियत. वळीवटांपैकी शेवया सर्वत्र होतात पण त्याच जिन्नसांपासून अतिशय निगुतीने आणि नजाकतीने करायचा पदार्थ म्हणजे गव्हले, नखुले, फेणोले, बोटवे, मालत्या, सखले, परड्या, वाळके हे वळीवटांचे प्रकार इतके नाजूक, की त्यांची तुलना मोती आणि कळ्या यांच्याशी करण्याचा मोह कवींना आवरला नाही ह्यात नवल ते काय?

## सुकुमारा इडुरिया

महाराष्ट्राच्या खाद्यपदार्थांच्या प्राचीनतेवर प्रकाश टाकणारा पहिला ग्रंथ म्हणजे कल्याणीच्या चालुक्य घराण्यातील तिसरा भूलोकमल सोमेश्वर लिखित अभिलाषार्थ चिंतामणी उर्फ मानसोल्लास हा १२ व्या शतकात लिहिलेला संस्कृत ग्रंथ होय. ह्यात उल्लेखलेले पदार्थ त्या काळापासून महाराष्ट्रात बनत असावेत. त्यातील अन्नभोग ह्या प्रकरणात मंडक (मांडे), पुरीका (पुरी), कटकर्ण (कडकणे), धारिका (घारगे), वाटिमा (वडे), धोसक (धिरडे), इडरिया (इडली) हे सर्व पदार्थ आजही महाराष्ट्रात बनतात. त्यांपैकी धोसक आणि इडरिया हे पदार्थ १२ व्या शतकापासून आहारात होते का? अशी शंका येणे स्वाभाविकच आहे. पण मानसोल्लासात दिलेली धोसकाची कृती काहीशी अशी आहे– 'चण्याच्या डाळीचे चांगले पीठ तयार करून तेलाचा लेप लावलेल्या तव्यावर स्वयंपाक्याने धोसक भाजावेत. अशाच प्रकारे उडीद, चवळी व वाटाणे ह्यांचेही धोसे तयार करावे. हे धोसे म्हणजे आपले धिरडेच. १३ व्या शतकातील महानुभाव साहित्यातही धिरड्याची जी पाककृती दिली आहे, ती ह्यापेक्षा वेगळी नाही. ही धिरडी ज्वारी, बाजरी, लांका, ऐसी, फुलसोजी अशा वेगवेगळ्या धान्यांपासून बनवीत व ती धिडेरे, आहिता, ऐसोले, धिढेरे अशा वेगवेगळ्या नावांनी ओळखली जाई.

इडली मात्र महाराष्ट्रात इडरी/इडरिया ह्याच नावाने ओळखली जाई. पूर्णचंद्राचा अनुकरी चोखाळपणे भाजेजी इडरी, असे ह्या पदार्थाचे वर्णन श्रीऋधीपूरवर्णन ह्या १४ व्या शतकात लिहिलेल्या ग्रंथात आढळते. संत एकनाथांच्या रुक्मिणी स्वयंवर या ग्रंथात 'सुकुमारा इडुरिया' असा उल्लेख आहे. न. र. फाटक त्याचा अर्थ एक पक्वान्न असा मोघमच देतात, तर दाते–कर्वे शब्दकोशात इडली असाच अर्थ आहे. १८ व्या शतकात रघुनाथ नवहस्ते यांनी लिहिलेल्या भोजनकुतूहल या ग्रंथाला मराठी पाककलेचा शब्दकोश म्हटले जाते. त्या ग्रंथात इडलीची पाककृती आहे. निरंजन माधव लिखित सुभद्रा चंपू ह्या काव्यात 'केलिया ईडरिया आहेत चोखट। रविमंडळे जैसी' असे वर्णन आहे. मानसोल्लासात दिलेली इडलीची कृती काहीशी अशी आहे– उडीद पीठ आंबवून ते गोलाकार वाट्यांत घालून वस्त्रात लपेटून शिजवावे. नंतर खाली उतरून त्यांना तूप माखावे व त्यांवर काळ्या मिरीची पूड पसरावी. हिंग व मिरे यांची फोडणी द्यावी. मानसोल्लासात उल्लेखलेले सर्व पदार्थ आजही केले जातात, पण इडलीचे काय? तिचे नाव बदलले कारण ही पाककृती खाऱ्या सांदणासारखी आहे.

असाच आणखी एक पदार्थ विस्मरणात गेला असावा किंवा नव्या नावाने ओळखला जात असावा तो म्हणजे अमृतफळ. १३ व्या ते १५ व्या शतकात त्याचे उल्लेख सारखे आढळतात. १९ व्या शतकाच्या उत्तरार्धात सूप शास्त्र ह्या मराठीत लिहिलेल्या पहिल्या पाककलेच्या पुस्तकात मात्र त्याची कृती आढळत नाही किंवा नंतरच्या पुस्तकांतही आढळत नाही. वेगवेगळ्या काव्यांत ह्या पदार्थाचे जे वर्णन आढळते, त्यावरून तो साधारणतः कसा बनत असावा, तो कशा प्रकारे खात असावेत, ह्याचा अंदाज लावता येतो.

ना तरी केवळ दुधाची आटीव फळे : वरी उजले दिसताती वर्तुळे

तैसी मिरवताती अमृतफळे : अमृताची पै

असे वर्णन नरेंद्र लिखित रुक्मिणी स्वयंवरात आहे. तर श्रीऋधीपूरवर्णनात त्याच्या पाककृतीची थोडीफार कल्पना येते.

गोक्षीरधाम धवळे : भीतरू भरला साकरगुळे

की देवाचिये सिन्निध्धिअमृतफळे : पावली जाली

मागील दोन्ही वर्णनांवरून हा पदार्थ गाईच्या दुधाप्रमाणे शुभ्र रंगाचा, आत साखरगुळाचे सारण भरलेला आहे, हे स्पष्ट होते. तो ऊनऊन साजूक तुपासोबत खात. अमृतफळाचे रंगरूप, त्यातील सारण खाण्याची पद्धत

ह्यांवरून हे मोदकाचेच नाव असावे का? दातेकर्वे शब्दकोशात मोदक हेच नाव आढळते. पण मोदकाचा आकार थेट प्राचीन काळापासून अंजिराप्रमाणे तर अमृतफळ वर्तुळाकार. ज्या ग्रंथात अमृतफळांचा उल्लेख आहे, त्यात मोदकाचाही आहे. म्हणजे हे दोन वेगवेगळे पदार्थ असावेत. भोजनकुतूहलात अमृतफळाला सोजीचा लाडू म्हटले आहे आणि हाच पर्याय योग्य वाटतो. कारण सोजी तांदुळापासून बनवतात. तांदुळाची उकड काढून आत साखरगुळाचे सारण भरून जर लाडू वळला, तर तो नक्कीच अमृतफळाप्रमाणे होणार रवा-बेसनाच्या लाडवांच्या लोकप्रियतेमुळे हा पदार्थ विस्मरणात गेला असावा.

**लाडूसम्राट**

खाद्यपदार्थाच्या प्राचीन ते आधुनिक ह्या प्रवासात असे अनेक पदार्थ आहेत की, ज्यांच्या पाककृतींत जराही बदल झालेला नाही. अशा पदार्थांची जर नोंद करायची म्हटले, तर एक ग्रंथच होईल. बदल म्हटला, तर तो खाणाऱ्यांच्या आवडीमध्ये झाला असेल. ह्याचे एक प्रातिनिधिक उदाहरण म्हणून लाडवांचा उल्लेख करता येईल. महाराष्ट्रात खाद्यसंस्कृतीच्या धावत्या आढाव्यातही मराठी माणसाची लाडवांची आवड अधोरेखित होते. उगाच नाही डॉ. अरुण टिकेकर असे विधान करत की, ‘उभाआडवा महाराष्ट्र लाडूसम्राट होता.’’

सणासमारंभापासून ते मधल्या वेळेच्या खाण्यापर्यंत वेगवेगळ्या प्रकारचे लाडू करण्याची प्रथा आहे. पक्वान्नांच्या यादीत लाडवांना महत्त्वाचे स्थान आहे. वेगवेगळे संकेत व्यक्त करण्यासाठी पदार्थांचा वापर केला जातो, त्यात लाडवांचा वापर प्रामुख्याने होतो. आज महाराष्ट्रात किमान शंभर प्रकारचे लाडू होतात; पण महाराष्ट्राला आद्य लाडू कोणता असे जर विचारले, तर उत्तर शेवखंडाचे लाडू असे येईल. गव्हाच्या पिठाच्या शेवया वळून त्या तेलात किंवा तुपात तळून पाकात घालून हे लाडू करीत. लग्नप्रसंगी आणि दिवाळीला ते मुख्यतः करण्यात येत. आज तिळाचे लाडू जरी संक्रांतीपुरते उरले असले, तरी एके काळी ते नित्यनेमाने होत. रुखवतावर तर ते असायचेच. महाराष्ट्रात किती प्रकारचे लाडू ह्याचा एक अंदाज वेणाबाईच्या सीतास्वयंवर काव्यातील पुढील ओळीवरून येऊ शकतो.

सेवलाडू साखर लाडू। द्राक्षलाडू गुंजलाडू
खारीकलाडू खोबरेलाडू। खसखसेचे बांधले
येक चारोळ्याचे सुंदर। लायाचे लाडू परिकार
गोडंब्यांचे अपार। जिनसावर चालले

हे प्रकार म्हणजे कवयित्रीचा कल्पनाविलास निश्चितच नव्हे, कारण ह्यांपैकी बहुतेक लाडू तसेच आणखीही अनेक लाडवांचा उल्लेख आपल्याला भोजनकुतूहलात आढळतो. ह्या ग्रंथात उडिदापासून बनवलेल्या लाडवांना रत्नलाडू म्हटले आहे. मोत्याच्या चुऱ्याप्रमाणे दिसणारा मोतीचूर लाडू उत्तरेकडून आलेला पण कडक बुंदीचा लाडू ही महाराष्ट्राची खासियत. मराठी माणसाचे लाडूप्रेम एवढे की, युद्धाच्या धामधुमीतही ते विसरता आलेले नाही. कर्नाटक मोहिमेवर असताना पेशवे नानासाहेबांना तिथे चाखलेला मूगडाळीचा लाडू एवढा आवडला की नमुना म्हणून त्यांनी तो गोपिकाबाईंना पाठवला व तो चाखून तसे लाडू करावेत, अशी इच्छा व्यक्त केली.

लाडवांप्रमाणेच वडे हादेखील महाराष्ट्राचा खास खाद्यप्रकार. मग तो कोकणात कोंबडी किंवा काळ्या वाटाण्याच्या उसळीसोबत खायचा तांदुळ-उडीद डाळीचा वडा असेल, किंवा नारळाच्या चटणीसोबत खायचा मिश्र धान्याचा भाजणीचा वडा असेल, किंवा वेगवेगळ्या डाळींचा विदर्भातील चंद्रपुरी वडा असेल, महाराष्ट्राच्या खाद्यसंस्कृतीची प्राचीनता स्पष्ट करणारा हा आणखी एक पदार्थ. पातंजलीच्या काळात वटाकनी पौर्णिमेला वेगवेगळ्या प्रकारचे वडे बनवून त्यांचा आस्वाद घेण्याची प्रथा होती. ती उत्तरेत सुरू होती की नाही, हे माहीत नाही पण महाराष्ट्रात मात्र होती असे आढळते. श्री. गोविंदप्रभू ह्यांच्या आग्रहावरून अनेक वेळा वडेप्रधान उपाहार करण्यात येई. त्या वेळी आंबीलवडे, ताकवडे, कढीवडे, असे प्रकार बनत. बांदोडे येथील आलेखात नैवेद्यासाठी वडे करायचा आदेश दिलेला आढळतो. आज महाराष्ट्रात घारगे आणि वडे हे वेगवेगळे प्रकार आहेत, पण १२ व्या शतकात हे दोन्ही एकाच जिन्नसापासून बनवत; फरक

एवढाच की, वडे अख्खे असत तर घारग्यांना पाच ते सात छिद्रे असत.

मागे उल्लेखलेली उदाहरणे ही मराठी खाद्यसंस्कृतीतील सातत्य स्पष्ट करतात. अगदी प्राचीन काळापासून बनत आलेले पदार्थ थोड्याफार फरकाने आजही तशाच पद्धतीने बनवतात. पण सातत्य म्हणजे कुपमंडूक वृत्ती नव्हे. महाराष्ट्राची भौगोलिक रचनाच मुळी अशी आहे की, तिच्या संस्कृतीवर इतरांचाही प्रभाव पडला आहे. खाद्यसंस्कृती त्याला अपवाद कसा असणार? कर्नाटक, गुजरात ह्यांच्या सीमेवरील भागात तर तो प्रभाव स्पष्टपणे दिसतो. भारताच्या वेगवेगळ्या भागांतून येऊन इथे स्थायिक झालेल्या जनसमूहांनी त्यांच्यासोबत त्यांचे पदार्थ आणले असतीलच. त्यांपैकी जे आपल्या धर्म-जातींच्या चौकटीत बसले, ते सहज स्वीकारले. तसे पाहता सांस्कृतिक देवाणघेवाण एका सूक्ष्म पातळीवर सतत घडतच असते. पण काही कालखंडांत मात्र ती वेगाने झालेली दिसते. १८व्या शतकातील महाराष्ट्रातील राजकीय घडामोडींमुळे बाहेरील प्रभावांचा वेग वाढला, हे निश्चितच.

छत्रपती शाहू महाराज दख्खनेत आल्यावर त्यांनी व त्यांच्या पेशव्यांनी तसेच धावडशीच्या ब्रह्मेन्द्रस्वामींनी फळझाडांच्या लागवडीला दिलेल्या प्रोत्साहनामुळे खाद्यसंस्कृती समृद्ध झाली. आत्तापर्यंत बोर, फणस, जांभूळ, करवंद, केळी, रायवळ, उंबर ही फळे प्रामुख्याने माहीत होती. आता सफरचंद, द्राक्षे, संत्री, नासपती, कमरख, कौला संतरा अशा फळांचीही तोंडओळख झाली. काही फळे महाराष्ट्रातच नव्हे, तर भारतातही नवीन होती. १५१० मध्ये पोर्तुगिजांनी गोवा काबीज केल्यानंतर त्यांच्या दक्षिण अमेरिकेतील तसेच आफ्रिकेतील वसाहतींतून अनेक प्रकारची पिके, फळझाडे ह्यांची भारतात लागवड करायला त्यांनी सुरुवात केली. अननस, पेरू, काजू त्या वेळेस भारतात आला. त्यांपैकी अननसाची लागवड महाराष्ट्रात होऊ लागली. ब्रह्मेन्द्रस्वामींनी अननसाचे रोप शाहूमहाराजांना लागवडीसाठी पाठवले होते. नुन्याच्या बागेत पेरू लावण्यात आले होते. भुईमूग, मिरच्या ही पिकेही महाराष्ट्रात होऊ लागली. अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात मिरषेगा उर्फ मिरच्यांना आहारात महत्त्वाचे स्थान होते. किंबहुना मिरची मराठ्यांनीच उत्तर भारतात नेली, असे आझाद बिलग्रामी म्हणतो व तो पुढे असेही म्हणतो की, मराठे मिरचीचे खूपच शौकीन आहेत.

फक्त फळफळावळ, भाज्या इत्यादीच नव्हे, तर काही पदार्थही बाहेरून इथे आले आणि इथलेच झाले. चौथ, सरदेशमुखीची वसुली करण्यासाठी उत्तरेत गेलेल्या मराठ्यांचे अनुभवविश्व विस्तारले. तिथे खाल्लेल्या पदार्थांची चव जिभेवर रेंगाळल्यामुळे ते पदार्थ इथेही बनवण्याचे प्रयत्न होऊ लागले. उत्तर पेशवाई काळातील एका पत्रात खिचडीची सविस्तर कृती दिलेली आहे. ह्या खिचडीसाठी आवश्यक असलेले पेशावरचे तांदूळ, बदाम-पिस्त्याचा अर्क, गुलाबी सुवास लावलेले विलायती अनार, कस्तुरी आणि सोन्याचा वर्ख हे जिन्नस महाराष्ट्रासाठी नवीनच होते. जसे ह्या खिचडीचे जिन्नस इथले नव्हते, तसेच ते बनवणारे कारागीरही. त्या काळात उत्तरेहून जसे इतर कारागीर आले, तसेच बल्लवाचार्यही. कारण ह्या खिचडीची पाककृती ज्या पत्रातून आढळते, त्यात असेही लिहिलेले आढळते की, ''येथील कारागिरांव्यतिरिक्त हे पदार्थ होणे दुर्लभ, यादी पाठविले आहे, मर्जी असल्यास दरमहा ठरवून कारागिरास पाठवून देऊ.''

आत्तापर्यंत माहीत नसलेल्या अनेक उत्तर भारतीय पदार्थांचा समावेश या कारागिरांमुळे आहारात झाला. त्यांपैकी काही पदार्थांचे उत्तर भारतीय मूळ स्पष्टपणे दिसते. ह्यामध्ये जिलबीचा उल्लेख करणे आवश्यक ठरेल. भोजनकुतूहलात जिलबीचा उल्लेख जरी कुंडलिका अशा संस्कृत नावाने केलेला असला, तरी हा पदार्थ उत्तरेकडचा. त्याहीपेक्षा अरबस्तानातील आहे. ह्याची विस्तृत चर्चा डॉ. गोडेंनी आपल्या संशोधनलेखात केली आहे. त्यामध्ये त्यांनी असे दाखवून दिले आहे की, आपल्या आहारात जिलबीचा समावेश साधारणतः १५व्या शतकात झाला असावा. महाराष्ट्रात तो लोकप्रिय झाला तो अव्वल पेशवेकाळात. तेव्हापासून ते आजतागायत ते एक लोकप्रिय पक्वान्न झाले आहे. मालपुवा हेपण एक उत्तर भारतीय पक्वान्न. पण त्याचे उत्तर भारतीय मूळ मात्र स्पष्टपणे दिसते. १८७५ मध्ये लिहिलेल्या सूपशास्त्र ह्या पाककलेच्या पुस्तकात मालपुव्याची सविस्तर पाककृती दिल्यावर हे

पक्वान्न पुरभैये करतात. अशी टीप लेखकाने दिली आहे. लुची, कचोरी, समसूक, ढोकळा अशा काही पदार्थांचाही उल्लेख आढळतो, पण हे पदार्थ त्या काळात खूप लोकप्रिय झाले नसावेत. मांडे, पुरणपोळी, वळीवट, लाडू ह्यांच्या जोडीला जिलेबी, गुलाबजाम, मालपुवा, बर्फी ही पक्वान्ने आल्याने महाराष्ट्राचे खाद्यजीवन समृद्ध झाले, हे निश्चितच.

दगडाच्या ह्या राकट देशाला खानपानाची नजाकत ती काय माहीत असणार, असे सर्वसाधारणपणे मानले जाते. किंबहुना म्हणूनच भारतीय खाद्यसंस्कृतीचे वर्णन करताना इतर प्रांतांबद्दल भरभरून लिहिले जाते, पण महाराष्ट्राला मात्र अनुल्लेखाने मारले जाते. उत्तर भारताप्रमाणे वेगवेगळ्या प्रकारचे पुलाव, कबाब, मिठाया, सुकेमेवे, फळफळावळींची रेलचेल नाही म्हणून हा समज होणे स्वाभाविकच. इथला निसर्गही भरभरून देणारा नाही म्हणून खाण्यापिण्याचे शौक बाळगलेच नाहीत, असे मानणे चुकीचे ठरेल. मर्यादित साधनसामग्रीच्या कक्षेतही खानपानाच्या बाबतीत महाराष्ट्रीय समाज चोखंदळ होता, असे दिसते. यादवकाळात श्वेत उपहार, वडेउपाहार असे विशिष्ट पदार्थ असलेली भोजनेच आयोजित करीत. श्वेत उपाहारासाठी केले जाणारे सर्व पदार्थ पांढऱ्याशुभ्र रंगाचे असत, तर वडे उपाहारासाठी विविध प्रकारचे वडे करीत. गोपाळभोजन तसेच वनभोजनही आयोजित करीत. सवाई माधवरावांच्या लग्नाच्या मेजवानीसाठी ज्या बारकाईने तयारी करण्यात आली होती, ती आजही मेजवानीचा मानदंड ठरली आहे. वेगवेगळ्या ग्रंथांमधून आढळणारी पदार्थांची वर्णने तसेच आजही घरोघरी बनत असलेले थेट मराठी पदार्थ, त्यांची संख्या, विविधता, पदार्थ वाढण्याची पद्धत, जेवणावळीसाठीची वातावरणनिर्मिती, आहाराकडे पाहण्याचा दृष्टिकोन ह्यांवरून महाराष्ट्राची खाद्यसंस्कृती अभिरुचीसंपन्न होती असे दिसते.

**संदर्भ :**


१. मानसोल्लास, सोमेश्वर.
२. श्रीऋधीपूरवर्णन.
३. सीतास्वयंवर, वेणाबाई.
४. पेशवे-दप्तर.


* * *

# सामाजिक वाटचाल





## क्रीडा व मनोरंजन

■ नंदकुमार मेगदे

**अनेक लहान-लहान खेळांची उत्पत्ती शरीराच्या सामान्य व मूलभूत अशा मोकळ्या हालचालींत दिसते. त्याच हालचाली विशेष उद्देशाने केल्या की, त्यांनाच एक प्रकारे खेळाचे रूप येते. चालणे, पळणे, बसणे, उड्या मारणे, लंगडणे, रांगणे, हात-पाय फिरविणे अशा अनेक हालचाली सामान्यतः प्रत्येकाकडून अखंडपणे होत असतात. अशा हालचालींमधून लहान मुलांना आवडणाऱ्या अनेक प्रकारच्या खेळांची निर्मिती होत असते.**

प्रत्येक विषयाला जसा काहीतरी इतिहास असतो, तसाच शारीरिक शिक्षण, क्रीडा व मनोरंजन या विषयालासुद्धा इतिहास हा आहेच. सर्वसामान्य इतिहासाच्या अभ्यासाने जसे काही सिद्धान्त प्रस्थापित करण्यास मदत होते, तसेच शारीरिक शिक्षण, क्रीडा व मनोरंजन यांच्या अभ्यासानेसुद्धा काही सिद्धान्त मांडण्यास मदत होते.

इतर शास्त्रे व कला ह्यांचा अभ्यास सुरू होण्यापूर्वीच शारीरिक शिक्षणास अगदीच सामान्य अशा रूपात सुरुवात झाली, कारण शरीर आणि त्याचे पोषण हाच जगातील प्रत्येक मानवाचा मुख्य व्यवसाय होता. शरीराच्या भरण-पोषणासाठी आवश्यक असे अन्नपदार्थ मिळविण्याकरिता किंवा पैदा करण्याकरिता मानवाला काहीतरी खटपट करणे आवश्यक होते. पुढे-पुढे त्या विशिष्ट अशा खटपटींनाच सुसंगत रूप येऊन आणि सातत्यपूर्ण प्रयत्नांनी आज याचे स्वतंत्र असे शास्त्र बनल्याचे आपणास दिसते आहे. आपले जीवन सुखी, अर्थात कमीत

कमी त्रासाचे कसे बनेल, त्याबद्दल मानव सतत प्रयत्नशील राहू लागल्यामुळे जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात स्थित्यंतरे होत गेली. त्यास शारीरिक शिक्षण, क्रीडा व मनोरंजन हा विषयदेखील अपवाद नाही.

धनुर्वेद

वेदकालीन शिक्षणात ह्या प्रकारच्या शिक्षणाच्या एका मोठ्या भागाला स्वतंत्र असे स्थान लाभून त्यास 'धनुर्वेद' असे नाव मिळाले. अर्थात ही आधुनिक शारीरिक शिक्षण, क्रीडा व मनोरंजन ह्यांची अत्यंत प्राथमिक पायरी होय. जीवनात सुखप्राप्तीच्या आड येणाऱ्या अडथळ्यांना पार करण्यासाठी मनुष्यप्राण्यात लढावू वृत्ती किंवा स्वसंरक्षक वृत्ती जोपासली जाऊ लागली. या वृत्तीच्या जोपासनेसाठी विशेष प्रकारच्या हालचाली केल्या जाऊ लागल्या. स्वसंरक्षण आणि संरक्षितांवर प्रभुत्व मिळविण्याच्या दृष्टीने विशिष्ट हालचाली क्रमबद्ध रितीने तयार केल्या गेल्या. त्याच्याबरोबरच धनुष्य आणि बाण ह्या साधनांना विशेष महत्त्व आल्यामुळे तो शिक्षणक्रम 'धनुर्वेद' या नावाने स्थूलमानाने संबोधिला जाऊ लागला. कालांतराने यात सुधारणा होत गेल्या आणि यात द्वंद्व प्रवृत्तीचा अंतर्भाव होऊन त्यानुसार खड्गयुद्ध, गदायुद्ध, मल्लयुद्ध, मुष्टियुद्ध अशा नावांचे क्रम निर्माण झाले.

सुखी जीवन अर्थात कमीत कमी श्रमाचे जीवन, ही शैली मानवाच्या शरीरावर व मनावर आपला वाईट प्रभाव दाखवू लागली. परिणामी माणूस आळशी व निष्क्रिय बनला. आळशी आणि निष्क्रिय जीवनशैलीमुळे बिघडलेली तंदुरुस्ती औषधांनी साधण्याचा प्रयत्न सुरू झाला, हा वाग्भटीय काळ होय. शरीर संवर्धनात शारीरिक शिक्षणाबरोबरच औषधांनादेखील स्थान प्राप्त झाले. अशा प्रकारे शारीरिक शिक्षणाचे शरीर-शिक्षण व आरोग्य-शिक्षण असे दोन स्पष्ट भाग झाले व स्वतंत्रपणे वाढू लागले.

या कालखंडाच्या थोडेसे अगोदर या शिक्षणाचा आणखी एक भाग प्रचलित झाला होता ज्याला योग-शिक्षण असे संबोधिले जात असे. ह्या शिक्षणात शरीर आणि मन या दोहोंचा समन्वय साधण्याचा प्रयत्न केला जात असून शारीरिक स्वास्थ्यामधून मानसिक विकास आणि आध्यात्मिक पूर्णत्व प्राप्त करण्याचा उद्देश नजरेसमोर ठेवलेला होता. योग-शिक्षणाची मांडणी विशिष्ट नियमांनी बद्ध केली गेली होती. त्यात आरोग्याचे नियम; ज्यात वैयक्तिक आणि सामुदायिक अशा दोन्ही प्रकारांचा अंतर्भाव होता आणि शरीर व मन यांचा विकास साधून देणारे नियम यांचा समावेश केलेला होता. योग-शिक्षणाच्या माध्यमातून मानवाचा आध्यात्मिक विकास हे जरी अंतिम ध्येय असले, तरी त्यालादेखील कार्यक्षम शरीराची आवश्यकता होतीच. त्या दृष्टीने महर्षी पतंजलींनी अष्टांग योग प्रतिपादन केला.

योग व वाग्भटीय काळानंतरदेखील शारीरिक शिक्षणाच्या विविध बाबींमध्ये बदल घडतच होते. स्वास्थ्य-संवर्धनाच्या काळातून पुन्हा माणूस युद्धप्रवृत्तीकडे वळू लागला. उपरोक्त काळात सुप्तावस्थेत असलेली युद्धप्रवृत्ती पुन्हा उफाळून वर आली आणि द्वंद्व-युद्धाच्या जोडीला भाला, धनुष्य वगैरे आयुधांचे पुनरुज्जीवन झाले व याच्या वेगवेगळ्या अंगांची भर पडत गेली. वैयक्तिक शारीरिक शिक्षणाचा कल सांघिक शारीरिक शिक्षणाकडे वळू लागला.

### उपजत 'लीला' वृत्ती

प्रत्येक प्राणिमात्रात खेळण्याची उपजत वृत्ती सामान्यतः असते. फक्त ती ओबडधोबड स्वरूपात असते एवढेच. म्हणूनच आपल्याकडे या वृत्तीला 'लीला' असे म्हटले आहे. या लीलांना शारीरिक शिक्षणात महत्त्वाचे स्थान आहे. खेळामुळे मुलांच्या रोजच्या व्यवहारास आवश्यक अशा अनेक गुणांची वाढ होऊ शकते. खेळ कुठलाही असो त्यामुळे सामान्यतः यशापयश सहजपणे स्वीकारण्याची कला साध्य होते. सर्वांगीण चपळता, सांध्यांतील मोकळेपणा, मोकळ्या परंतु निर्बंधित अशा विविध शारीरिक हालचालींचे ज्ञान, सर्व गोष्टींबद्दल अवधानपूर्वक सावधानता; संतुलन साधून देणारी मानसिक व शारीरिक स्थिती, स्वसंरक्षण, अंगावर बेतणाऱ्या डावांमधून कुशलतेने निसटून प्रतिस्पर्ध्यावर डाव उलटविण्याची सवय व दक्षता, शरीराच्या विविध भागांत व हालचालींत सुंदर असा समन्वय साधणे, निरोगी राहण्यास



येतो. मुलांच्या खेळांबरोबरच मुलींचे विविध खेळदेखील आपल्याकडे प्रचलित होते, हे विशेष.

सामान्यतः मुलांचे सर्व खेळ मुलींनादेखील खेळता येण्यासारखेच असतात, नाही असे नाही. तरीसुद्धा आपल्याकडे मुलींच्या शारीरिक क्षमतांचा विचार करून त्यांच्यासाठी काही विशिष्ट खेळांची निवड केली गेलेली दिसते. विशेषतः त्यांच्या ओटीपोटाच्या दृष्टीने उपयुक्त आणि मनोरंजनाच्या दृष्टीनेदेखील या खेळांचा चांगलाच उपयोग होऊ शकतो.

लागणारी रक्ताभिसरणाची उत्कृष्ट अशी कार्यक्षमता, ओसंडून वाहणारा उत्साह, आनंद, निर्भयता, अडचणीत दुसऱ्याला साहाय्य करण्याची वृत्ती, नेतृत्व, सांघिक जबाबदारीची जाणीव अशा अनेक गुणांची वाढ व परिपोष होतो.

अनेक लहान-लहान खेळांची उत्पत्ती शरीराच्या सामान्य व मूलभूत अशा मोकळ्या हालचालींत दिसते. त्याच हालचाली विशेष उद्देशाने केल्या की, त्यांनाच एक प्रकारे खेळाचे रूप येते. चालणे, पळणे, बसणे, उड्या मारणे, लंगडणे, रांगणे, हात-पाय फिरविणे अशा अनेक हालचाली सामान्यतः प्रत्येकाकडून अखंडपणे होत असतात. अशा हालचालींमधून लहान मुलांना आवडणाऱ्या अनेक प्रकारच्या खेळांची निर्मिती होत असते. खेळ म्हणून विविध हालचाली उपयोगात आणताना त्यांवर काही निर्बंध आवश्यक असतात. या निर्बंधांमुळे एक प्रकारे सरसता आणि सामान्य औत्सुक्य अधिक प्रमाणात उत्पन्न होते. लहान वयात खेळ खेळविले जातात, तेव्हा त्यात जितके निर्बंध कमी, तितके ते खेळ अधिक प्रमाणात रंगतात. पण जसजसे खेळणारे वयाने मोठे, तसतसे ते अधिक कुशलतेने नियमबद्ध खेळ खेळून मनसोक्त आनंद उपभोगू शकतात. खेळणाऱ्यांमध्ये यातून नवी उमेद, नवा उत्साह निर्माण होऊन त्यांचे मनोरंजनदेखील होते. तसेच स्वास्थ्य-संवर्धनाच्या दृष्टीने शरीरास जास्तीत जास्त फायदा मिळविता

या खेळांच्या माध्यमातून सामान्यतः चपळता, लवचीकता, दीर्घ श्वसनातून फुप्फुसांची कार्यक्षमता मोठ्या प्रमाणात वाढविण्याचे कार्य ह्या गोष्टी सहज घडत असतात. तसेच पायांच्या, हातांच्या, पोटाच्या व कमरेच्या व्यायामांमुळे या खेळांद्वारे स्वास्थ्य-संवर्धन सहज शक्य होते. काही खेळांत विशिष्ट अशा गाण्यांची साथदेखील असते, त्यामुळे मनोरंजन प्रभावीपणे होते. आपल्याकडे प्राचीन काळापासून रूढ असलेले मुली/महिलांसाठीचे खेळ पुढीलप्रमाणे विशद करता येतील-

**१. फुगडी :** हा मुली आणि महिला ह्यांचा अगदी लोकप्रिय असा क्रीडा प्रकार आहे. याचे पुढीलप्रमाणे उपप्रकारदेखील आहेत. साधी फुगडी, दोन हातांची, एका हाताची फुगडी, दंड फुगडी, बस फुगडी, कासव फुगडी, निसर फुगडी, पाठ फुगडी, नखुल्या, चौघींची फुगडी, लोळण फुगडी किंवा गाठोडे वगैरे. या सर्व फुगड्या खेळताना बराच दम लागतो. अशा वेळी श्वास कोंडून धरणे कठीण जाते. ही दमछाक टाळण्यासाठी गीतांचा उपयोग केला जातो. वेगवेगळ्या फुगड्यांना वेगवेगळी गीते असून; त्या-त्या फुगडीच्या नावाचा उल्लेख करून त्या म्हटल्या जातात.

**२. झिम्मा :** हा दुसरा लोकप्रिय क्रीडा प्रकार आहे. हा खेळ विशेषतः उड्या मारून खेळावयाचा असतो. याचेदेखील अनेक उपप्रकार आहेत. साधा झिम्मा, खांदी



सालम साळकी, टिकरीपाणी, काचापाणी, पट वगैरे पुष्कळ खेळ आपल्याकडे प्रचलित असून त्यांतून स्त्रियांच्या स्वास्थ्य संवर्धनाबरोबरच गीतांच्या साथीने मनोरंजनाचा विचारदेखील केला गेलेला आपणास दिसतो. श्रीकृष्ण चरित्रात मुला-मुलींच्या विविध खेळांचा आलेला विस्तृत उल्लेख हा प्राचीन भारतीय समाजधुरीणांचा दूरवर विचार करण्याचा एक उत्कृष्ट नमुना आहे, असे म्हटल्यास वावगे ठरणार नाही.

तसेच महिलांसाठी घरातील कामे करताना आनंदमय मानसिकता ठेवण्याच्या दृष्टीने फुले, भाजी वगैरे वेचतानाचे गीत, तांदूळ सडतानाचे गीत, ताक करतानाचे गीत, हाटूश्श पान, नागपंचमीचे गीत, गौरी गीत, भोंडला गीत; हादगा किंवा भुलाबाई गीत वगैरे गीते म्हटली जातात. आज महिला मुक्तीच्या नावाखाली जगभर अगदी कुस्ती, भारोत्तोलन, फूटबॉल, बास्केटबॉल वगैरेंसारखे अनेक मर्दानी व मैदानी खेळ मुली/महिलादेखील खेळताना दिसतात. ह्या सामाजिक बदलांना संक्रमणाच्या काळात स्वीकारलेच पाहिजे. अन्यथा राजमाता जिजाबाई, झाशीची राणी लक्ष्मीबाई, अहिल्याबाई होळकर यांच्यासारख्या रणरागिणी मातांशिवाय महाराष्ट्राचे पौरुष अबाधित राहणे कठीण होईल.

झिम्मा, पंखी झिम्मा, फेराचा झिम्मा, गिरकी झिम्मा, लाडू झिम्मा वगैरे प्रकारच्या झिम्म्यांच्या वेळी साधारणपणे 'झिंम पोरी झिंम, कपाळाचं भिंग, भिंग गेलं फुटून, पोरी आल्या उठून,' 'अंबा पिकतो, रस गळतो, कोकणचा राजा बाई झिम्मा खेळतो' हे गाणे म्हटले जाते.

**३. पिंगा :** हा महिला/मुलींसाठीचा आणखी एक लोकप्रिय खेळ असून यात विशेष करून कमरेभोवतीच्या स्नायूंच्या सुदृढतेवर भर दिलेला आहे. याचेदेखील साधा पिंगा, उभ्या हाती पिंगा, बस पिंगा वगैरे प्रकार आहेत. पिंगा खेळताना 'पिंगा बाई पिंगा, चवळीच्या शेंगा, चवळीच्या शेंगेला दाणाच नाही, मामाच्या मुलीला नाकच नाही' अशा आशयाची गीते सामान्यतः म्हटली जातात.

**४. कीस बाई कीस :** उकिडवे बसून, लहानशी उडी घेऊन आलटून-पालटून डाव्या-उजव्या घोट्याला समोर घसरवण्याच्या ह्या महिलांसाठीच्या लोकप्रिय खेळात 'कीस बाई कीस, दोडका कीस, दोडका कीस' असे वेगवेगळे पदार्थ किसण्यास सांगण्याचे गाणे म्हणत हा खेळ खेळला जातो.

याशिवाय कोंबडा, भोर भेंडी, अबील खेळू-तबील खेळू, भाले भाल, किकीचे पान बाई की की, अशी लवे-तशी लवे, सुपारी, पाळणा, आगोट्या-पागोट्या, लाट्या बाई लाट्या, अडवळ घुम्-पडवळ घुम्, गोफ; रंगीत दोऱ्यावर सूप नृत्य किंवा नाच गं घुमा, खुर्ची का मिरची,

## मलयुद्ध आणि द्वंदद्वयुद्ध

अन्न, वस्त्र, निवारा, स्त्री आणि सत्ता या पाच बाबींसाठी सतत घडणाऱ्या संघर्षाचे मानवाने आपल्या बुद्धीच्या जोरावर हळूहळू शास्त्र बनविले. माणुसकीची भावना बाळगून नियमांच्या आधारावर स्वार्थाच्या भूमिकेतून जन्माला आलेल्या या द्वंद्वाची मनुष्योपयोगी कला बनविली.

प्राचीन भारतामध्ये द्वंद्व, मुष्टियुद्ध, नियुद्ध, बाहुयुद्ध, मल्लयुद्ध असे अनेक क्रीडा प्रकार प्रचलित होते. बुद्धिबळाचे प्राचीन रूप असलेले द्यूत, पच्चिसी, चौसर, चतुरंग वगैरे खेळ तसेच गंजिफा, दशावतार यांसारखे पत्त्यांचे खेळ हे

आपल्याकडे मनोरंजनाचे लोकप्रिय माध्यम होते. कुस्ती हा मूळचा पर्शिअन भाषेतील शब्द आहे. झोरॅस्ट्रिअन लोकप्रथेप्रमाणे आपल्या कमरेस एक मजबूत दोरी बांधून द्वंद्व लढत असत. या दोरीला ते कुस्ती म्हणत असत. द्वंद्वादरम्यान या दोरीला धरून लढण्यावरून कालांतराने या क्रीडा प्रकारालाच लोक कुस्ती असे संबोधू लागले. आपल्या भाषेतील मल्लयुद्ध ह्या शब्दाची जागा कुस्ती ह्या शब्दाने घेतली व कुस्तीच्या संदर्भातील पहिलवान, खुराक, उस्ताद वगैरेंसारखे पारिभाषिक शब्दही मराठीत आता रूढ झाले आहेत.

मल्लयुद्धाबद्दल रामायण, महाभारत, पुराणे इत्यादी प्राचीन वाङ्मयातून स्पष्ट उल्लेख आढळतात. कालमानाप्रमाणे यात सुधारणा होत गेल्याचेही आपणास आढळून येते. कुस्तीत उपयुक्त अशा चाळीस पेचांची नावे वसिष्ठांनी दिली आहेत. विश्वामित्रांच्या लिखाणातून बाहुयुद्धाचा उल्लेख आढळतो. शुक्राचार्यांनी आठ-दहा पेचांची नावे दिली आहेत. वाल्मीकींनी तर रामायणात हनुमान, वाली, सुग्रीव वगैरेंसारख्या योद्ध्यांच्या कुस्त्यांची वर्णने दिली आहेत. महाभारतात तर मल्लयुद्धाच्या बाबतीत प्रचंड सुधारणा झाल्याचे आढळून येते. हनुमंती कुस्ती हा या प्रकारातील उत्तम प्रकार म्हणून मान्यता पावला. यात शक्ती व युक्ती ह्यांच्या जोरावर प्रतिस्पर्ध्यास चीत करून विजय संपादन करण्याचा नियम बंधनकारक करण्यात आला. किमान पाच हजार वर्षांपासून हा क्रीडा प्रकार भारतात प्रचलित आहे. मुसलमानी राजवटीत व मराठेशाहीच्या कालखंडातील विविध लिखाणांतून या कलेचे उल्लेख आढळतात. इंग्रजांच्या इच्छेप्रमाणे ती नष्ट मात्र झाली नाही.

## बलोपासना

सतराव्या शतकात महाराष्ट्रात बलोपासनेची जनजागृती करण्याचे काम छत्रपती शिवाजी महाराज आणि समर्थ रामदास स्वामी यांनी केले. व्यक्तीने बलोपासना केली की समाज बलवान होतो व समाज बलवान बनला की राष्ट्र बलवान बनते, हे या दोघांनी आपल्या कर्तृत्वाने दाखवून दिले. मुसलमानी सत्तेचा बिमोड केला. पण या देशाच्या दुर्दैवाने इंग्रज आपल्या डोक्यावर बसले. समर्थ रामदास स्वामींनी जनतेतील निर्बलता, निरुत्साह घालवून देऊन धर्मप्रेम व देशप्रेम जागृत करण्याकरिता गावोगावी हिंडून कथा, कीर्तने केली. तळागाळांतील लोकांत बलोपासनेकरिता मारुती, राम यांची देवळे स्थापन केली. शक्तिशाली मनुष्यच स्वतःचे, समाजाचे, धर्माचे व देशाचे रक्षण करू शकतो. समाजोन्नती व राष्ट्रोन्नती ह्यांकरिता शक्तीची उपासना करणे आवश्यक आहे. म्हणून शक्ती प्राप्त करण्याकरिता विविध शारीरिक व्यायाम, कुस्ती, दांडपट्टा, तलवार, भाला इत्यादींचे शिक्षण घेण्याबाबत जागरूकता निर्माण करण्याचे महान कार्य या काळात केले गेले.

पेशवे काळात मल्लविद्या, लाठी-काठी, तलवार, भाला, विटा-बोथाटी, दंड, बैठका, करेल, फरी-गदगा, लेझीम, जोड्या, मुद्गल वगैरे मर्दानी खेळ प्रचलित होते व लहानथोर त्यात रस घेत असत.

कर्नाटकातील लिंगायत राजे बसवराज महाराज यांनी संस्कृत विद्वानांच्या मदतीने १७०९ साली छापून घेतलेल्या 'शिवतत्त्व रत्नाकर' या संस्कृत ग्रंथात मल्लखांबाचा उल्लेख आढळतो. मल्लखांब हा फक्त भारतातच असून १९३६ साली बर्लीन (जर्मनी) येथे संपन्न झालेल्या ऑलिम्पिकमध्ये अमरावती (महाराष्ट्र) येथील हनुमान व्यायाम प्रसारक मंडळाच्या चमूने आठ्या-तिठ्या, वेल-दसरंग वगैरेंसारख्या प्रकारांची प्रात्यक्षिके जर्मन प्रेक्षकांना करून दाखविली आणि अचंबित करणाऱ्या कसरती करून वाहवा मिळविली. मूळ मल्लखांब हा जमिनीत पुरलेला एक खांब. परंतु हल्ली टांगता, वेताचा, दोरीचा वगैरे प्रकार झालेले आहेत. एखाद्या मल्लास सरावाकरिता जोडीदार नसेल अशा वेळी मल्लखांबावर सराव करण्यास हा प्रकार उपयुक्त आहे.

मल्लविद्येचा प्राचीन भारतीयांनी अतिशय बारकाईने अभ्यास केलेला ??वरील ज्ञानकोशावरून?? दिसतो. मल्लांनी तळ्यात, विहिरीत, सरोवरात, नदीत पोहण्यास जावे; भरपूर पोहावे, उत्तम पोहावे, गळ्याइतक्या पाण्यात उभे राहून पाणी ढकलणे, उडवणे, पाण्यावर मारणे इत्यादी हातांच्या हालचाली कराव्यात. असे केल्याने हात चांगले तयार होतात, असे यात सांगितले आहे.

## आखाडे आणि तालमी

महाराष्ट्राला देशप्रेमाचे बाळकडू श्रीछत्रपती शिवाजी महाराजांनी पाजले. मोगल राजांनी इंग्रजांना व्यापाराकरिता म्हणून जागा व सोयी दिल्या. इंग्रजांनी त्याचा पुरेपूर फायदा उठवत ईस्ट इंडिया कंपनीच्या माध्यमातून आपले राज्य प्रस्थापित केले. इंग्रजांनी मराठी राज्ये खालसा केली. परंतु त्यांना मराठी ऐक्याची व सामर्थ्याची कल्पना होती व त्यामुळे इंग्रज मराठ्यांना वचकून होते. मराठ्यांची शक्तिस्थाने असलेले आखाडे व तालमी यांवर ते लक्ष ठेवून होते आणि ते मोडून काढण्याच्या विचारात होते. आखाडे, तालमी, वस्ताद, मुख्य मल्ल आणि समाज ह्यांच्यात दुही माजविण्याचे कार्य इंग्रजांनी सातत्याने चालूच ठेवले. १८५७च्या स्वातंत्र्य युद्धापासून पारतंत्र्याची खंत प्रत्येकास होती. इंग्रज लोक प्रत्येक बाबतीत आपली संस्कृती भारतीयांवर लादण्याचा प्रयत्न सतत करीत असत. खेळ आणि व्यायाम ह्या बाबतींतसुद्धा तेच झाले. या काळात महाराष्ट्रात कुस्तीसह आट्या-पाट्या, खो-खो, हुतुतू, विटी-दांडू, सूरपारंब्या ह्यांसारखे मर्दानी खेळ खेळले जात. त्यांच्या स्पर्धादेखील होत असत. पुण्यात सुरू झालेल्या डेक्कन जिमखान्यावर लाठी-काठी, फरीगदगा, बोथाटी ह्यांसारखे बलसंवर्धनाचे प्रकार लोक करू लागलेले पाहून इंग्रजांनी तालमी व इतर मर्दानी खेळ ह्यांवर बंदी आणली. व्यायामाच्या दृष्टीने जुजबी असलेला क्रिकेटसारखा खेळ इंग्रजांनी येथे सुरू केला व तो आज आपल्या छाताडावर नाचतो आहे.

अलीकडचा इतिहास

सन १९१०-१२ सालापासून विचार-आचर-मंथनातून महाराष्ट्रात विविध ठिकाणी जिमखाने, आखाडे, मंडळे अशा संस्था अस्तित्वात येऊ लागल्या. साताऱ्याला श्री. दत्तोपंत परांजपे, नागपूरला राजे भोसले, अमरावतीला शिवाजीराव पटवर्धन, पुण्याला कॅप्टन शि. वी. दामले अशा अनेक मंडळींनी जोरदार प्रयत्न सुरू करून देशी खेळांना चालना देण्यास सुरुवात केली. पुण्याचे डॉ. मो. ना. नातू व सातारचे श्री. दत्तोपंत परांजपे आणि इतरांच्या प्रयत्नांनी १९२७ साली अखिल महाराष्ट्र शारीरिक शिक्षण मंडळाची स्थापना करण्यात आली. मंडळाने अत्यंत सुसूत्र पद्धतीने अनेकांना एकत्र आणून आणि वारंवार सभा संमेलने घेऊन; देशी खेळांचे नियम ठरवले. शारीरिक शिक्षणातील विविध विषयांवर चर्चा घडवून आणून देशी खेळांचा पुनरुद्धार करण्याच्या दृष्टीने सर्व देशी खेळ नियमबद्ध करून लोकप्रिय करण्याचे ध्येय त्यांनी समोर ठेवले. १९२० साली श्री. बक नावाच्या अमेरिकन गृहस्थाने मद्रास येथे शारीरिक शिक्षण देण्याकरिता वाय. एम. सी. ए. नावाची संस्था सुरू केली. या संस्थेतर्फे विविध खेळांची नियमावली प्रसिद्ध केली जात असे. त्यात देशी खेळांच्या नियमांचासुद्धा अंतर्भाव करून घेण्याची अत्यंत मोठी जबाबदारी मंडळाने यशस्वीपणे पार पाडली व देशी खेळांच्या भरभराटीस व ऊर्जितावस्थेस हातभार लावला. सन १९३५ साली शाळा-महाविद्यालयांमध्ये शारीरिक शिक्षण व खेळ सक्तीचे करण्याची खटपट सुरू केली. प्रशिक्षित शिक्षक तयार करण्यासाठी कांदिवली, मुंबई येथे १९३७-३८ साली शारीरिक शिक्षण महाविद्यालय सुरू करून मुंबई सरकारने या विषयास चालना दिली. हे महाविद्यालय काढण्यास सरकारला भाग पाडणाऱ्यांमध्ये स्वामी कुवलयानंदजींचा मोठा वाटा होता. मराठवाड्यानेदेखील स्वातंत्र्योत्तर काळात शारीरिक शिक्षण व क्रीडा या क्षेत्रांत मोठी झेप घेतल्याचे लक्षात येते. सर्वश्री दि. गो. वाखारकर, सुधीर जोशी, डॉ. ढोकरट, डॉ. दत्ता पाथरीकर, डॉ. भारसाखळे, प्राचार्य तिवाडी अशा अनेकांनी क्रीडा क्षेत्राची चळवळ मोठी केली.

अखिल महाराष्ट्र शारीरिक शिक्षण मंडळाचे कार्य एवढ्यावरच थांबावयाचे नव्हते. त्यांनी इतर प्रांतियांच्या मदतीने अखिल भारतीय स्तरावरील संस्था निर्माण केली. 'हुतुतू' या खेळाबद्दल बऱ्याच विचार-विनिमयांनी त्याचे 'कबड्डी' असे नामकरण करण्यात श्री. शंकरराव उर्फ बुवा साळवी यांनी महत्त्वाची भूमिका बजावली. आज कबड्डी या देशी खेळाला आंतरराष्ट्रीय स्तरावर नेण्याचे महान कार्य केल्यामुळे व या खेळाला ऊर्जितावस्था प्राप्त करून दिल्यामुळे 'कबड्डी' म्हटले की श्री. साळवी असे समीकरण झालेले आहे.

१९५२च्या हेलसिंकी ऑलिम्पिकमध्ये श्री. खाशाबा जाधव या कोल्हापूरच्या राजाराम महाविद्यालयातील पहिलवानाने ब्राँझपदक मिळविले. कुण्याही भारतीयाने ऑलिम्पिक स्पर्धेतील वैयक्तिक क्रीडा प्रकारात पदक मिळविण्याची ही पहिलीच वेळ होती. प्राचीन मल्लविद्येच्या वारशाचे चीज झाल्याची भावना सबंध देशभर झाली. यानंतर भारताला २००८च्या बीजिंग ऑलिम्पिकपर्यंत कुस्तीच्या पदकासाठी दीर्घकाळ वाट पाहावी लागली, हे दुर्दैव.

सन १९५०-५२च्या सुमारास क्रीडा क्षेत्रात बरीच स्थित्यंतरे झाली. कुस्तीगीर परिषद निराळी झाली. आट्या-पाट्या, कबड्डी, खो-खो ह्या खेळांनीही वेगळी चूल मांडली. सर्व क्रीडा संघटना अखिल भारतीय ऑलिम्पिक संघटनेशी जोडल्या गेल्या. यात एक मोठे नुकसान झाले, ते म्हणजे आपले लाठी, काठी, तलवार, दांडपट्टा, भाला, सूरपारंब्या वगैरे मर्दानी खेळ व व्यायाम प्रकार मागे पडले. आज ऑलिम्पिक चळवळीचा बोलबाला आहे. त्यामुळे बहुतेक सर्व देशी खेळांची पीछेहाट झालेली दिसते.

एकीकडे क्रीडा क्षेत्राचे व्यवसायीकरण झाल्यामुळे क्रिकेट, फुटबॉल, टेनिस यांसारख्या गल्लाभरू क्रीडा प्रकारांचा बोलबाला आहे, तर शारीरिक शिक्षण व खेळ या क्षेत्रांकडे पाहण्याचा शासनाचा दुर्लक्षित दृष्टिकोन, काम करणाऱ्या तज्ज्ञांची व कार्यकर्त्यांची उदासीन वृत्ती, संघटन कौशल्यांचा अभाव, चंगळवादी व आळशी जीवनशैली यांमुळे स्वास्थ्य संवर्धन ह्या मूळ उद्देशाला हरताळ फासला जात आहे. त्यामुळे जागतिक आरोग्य संघटनेच्या move for health किंवा डॉ. राजेंद्र बर्वेसारख्या सुप्रसिद्ध मानसोपचार तज्ज्ञाच्या 'शरीराची कार्यक्षमता टिकविण्याची एकच अट, कायम वापरा नाही तर विसरा' अशा इशाऱ्यांकडेदेखील आपण अक्षम्य दुर्लक्ष करीत आहोत; याची जाणीव करून देण्यासाठी, पुन्हा चळवळ उभी करण्यासाठी एखाद्या समर्थ रामदास स्वामींचा अवतार होण्याची वाट पाहावी लागेल की काय?

**संदर्भ :**


१. शरीर-शिक्षक, लेखक - श्री. ज. बापट, १९४३.
२. भारतीय मल्लविद्या उदय आणि विकास लेखक- कृ. गो. सूर्यवंशी, १९६५.
३. मानसोल्लास : एक सांस्कृतिक अध्ययन लेखक- डॉ. शिवशेखर मिश्र, १९६६.
४. कल्याण-शिक्षाङ्क, १९८८.
५. भारतीय मल्लविद्या शास्त्र लेखक- तुकाराम लिंगोजी साबळे; उस्ताद, १९९०.
६. शारीरिक शिक्षणाची तत्त्वे व मनोरंजन लेखक- दि. गो. वाखारकर, १९९१.
७. भारतीय शारीरिक शिक्षणाचा इतिहास लेखक- गो.ना. पुरंदरे, १९९२.
८. व्यायाम विज्ञान लेखक - के. पी. भागवत, १९९५.
९. महाराष्ट्र राज्याचे क्रीडा धोरण, १९९६.
१०. लघुखेळ, महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे, २००६.
११. A History of Chess by H. J. R. Murray 1913.
१२. Studies in Social Life in Karnataka (10th to 14th Century) Ph. D. Thesis by Jyotsna Kamat, 1972.
१३. Kalpasutra Editor - Mahopadhyaya Vinayasagar, 1977.
१४. Festivals, Sports and Pastimes of India, by Dr. V. Raghavan, 1979.
१५. Dice-Play in Sanskrt Literature (A Study) by C. Panduranga Bhatta, 1985.
१६. Social Aspects of Sports in Indaia. Ph. D. Thesis by G. S. Sivia, 1988.
१७. National Sports Policy Programme of Action, Government of India, 1992.
१८. Sports Policy of India by S. R. Sharma & Dr. D. P. Gautam, 2000
१९. Websites : www.indiapress.ort http://en.wikipedia.org.


* * *





पैठणीवरील नक्षीकाम.

# वस्त्रे

■ डॉ. रा. श्री. मोरवंचीकर

**भरजरी नक्षीचा पदर व उठावदार काठ ही पैठणीची खास वैशिष्ट्ये मानावी लागतील. या पदरावर सामान्यतः असावली, अक्रोटी, गझवेल, बांगडीमोर, राघू–मैना, शिकार–खाना, अजिंठा–कमळ, हुमा–परिंदा अशा प्रकारची नक्षी विणला जात असे. काही पैठण्यांवर जरतारी बुट्टी विणल्याचे आढळते. अशा साडीला बुट्टेदार पैठणी किंवा शालू म्हणत असत. गडद रंगाच्या पैठणीला शालू म्हटले जात असे.**

कापसाचा शोध ही मानवी जीवनातील अतिशय क्रांतिकारी घटना होय. कारण या शोधामुळे मानवाची रानटी अवस्था संपून त्याची सुसंस्कृत अवस्थेकडे वाटचाल सुरू झाली. आता नखदंतावलंबी, भटके, अर्धनग्न जीवन संपून स्थिर व निश्चित जीवनास आरंभ झाला. कारण कापूस पिकविणे म्हणजे कृषिजीवन जाणणे होय. आता त्याला झाडाच्या ओबडधोबड साली नेसण्याची व मृत जनावरांची कातडी पांघरण्याची आवश्यकता नव्हती. कारण कापसापासून सहजरीतीने वस्त्रे तयार करता येत होती. तसेच ती टिकाऊ असून धुता येत होती त्यामुळे त्यांचा झपाट्याने प्रसार झाला. कापसापासून कापड तयार करण्याचे ज्ञान त्याला पशुपक्ष्यांपासून अवगत झाले असावे. स्त्रियांनी या क्षेत्रात कमालीची प्रगती साधली. स्त्रिया वस्त्र विणण्यात प्रवीण असल्याचे अनेक संदर्भ प्राचीन वाङ्मयामध्ये सतत आढळतात.

रेशमाचा शोध हीसुद्धा मानवी जीवनातील अत्यंत सुखद घटना होय. रेशीम हे कापसापेक्षा मुलायम असून त्याची वस्त्रे अधिक आकर्षक व टिकाऊ असतात. तथापि भारतीयांना रेशीम तयार करण्याने ज्ञान नव्हते,

असे अनेक इतिहासकारांचे मत आहे. कारण रेशमाची पैदास करणारा चीन हा एकमेव देश असून त्याने हे ज्ञान इसवी सनाच्या काही शतकांपर्यंत अत्यंत गुप्त ठेवले होते. आजही जगामध्ये भारतीय रेशमाच्या तुलनेत चिनी रेशीम अधिक लोकप्रिय आहे. तसेच प्राचीन साहित्यामध्ये रेशमाचा उल्लेख 'चीनसुक' अशा प्रकारे आलेला आढळतो. त्यामुळे वरील विधानास पुष्टी मिळते. त्यामुळे रेशमाचे उत्पादन व त्यापासून वस्त्र तयार करण्याची कला भारतीयांना ज्ञात नसावी, असा समज पसरण्यास मदत झाली.

असे असले, तरी पुरातत्त्व शास्त्रज्ञांना अगदी अलीकडे नवीन पुरावे उपलब्ध झाले आहेत. प्रागैतिहासिक व ऐतिहासिक स्थळांच्या उत्खननांमध्ये अगदी खालच्या थरात रेशमाचे अवशेष उपलब्ध झाले आहेत. आपल्या महाराष्ट्रामध्येही अशा प्रकारचे अवशेष अहमदनगर जिल्ह्यातील नेवासे येथील उत्खननामध्ये मिळाले आहेत. या सर्व पुरातत्त्वीय पुराव्यांवरून येथील मानवास कापसाप्रमाणेच रेशमापासून वस्त्रे तयार करण्याची कला प्रागैतिहासिक (proto-historic) कालापासून अवगत असल्याचे स्पष्ट होते. याबरोबरच त्याला जरतारीचे व भरतकामाचेही ज्ञान असल्याचे समजते.

प्राचीन साहित्यामध्ये सुती, रेशमी व भरजरी कपड्यांचे उल्लेख विपुल प्रमाणात सापडतात. ऋग्वेदामध्ये जरतारी वस्त्राचा उल्लेख हिरण्यद्रपी म्हणून आला आहे. तर महाभारतामध्ये याचा उल्लेख मणिचिरा असा करण्यात आला आहे. यामध्ये जरतारी कामाबरोबरच माणिक-मोती व मौल्यवान हिरे गुंफण्याच्या नोंदी मिळतात. अशा मौल्यवान रेशमी वस्त्रांचा उल्लेख जैन साहित्यामध्ये पट्टा या नावाने करण्यात आला आहे. आणि महाराष्ट्रातील मौल्यवान वस्त्रांचा विचार केल्यास महानुभाव साहित्यामध्ये पैठणच्या भरजरी पैठणीचा उल्लेख आढळतो. पाश्चिमात्य प्रवाशांच्या नजरेतून अशा प्रकारची वस्त्रे व ही वस्त्रे निर्माण करणारी केंद्रे सुटली नाहीत. एकंदरीत प्राचीन कालापासून भारतामध्ये अशी वस्त्रे निर्माण करण्याची परंपरा असल्याचे स्पष्ट होते.

पारंपरिक कलाकाराने निर्माण केलेली ही अमोल वस्त्रे प्रतिकूल अशा सामाजिक आणि राजकीय परिस्थितीमध्ये टिकून राहिली, यामध्येच त्यांचे मोठेपण दिसून येते. वैचित्र्यपूर्ण नक्षीकाम आणि उच्च पोत (texture) यांमुळे जागतिक बाजारपेठांतून भारतीय वस्त्रांनी एकाधिकार प्रस्थापित केला. आणि दोन सहस्रकांहून अधिक काळ हा एकाधिकार अबाधित राहिला.

सुबक विणकाम व त्यावरील गुंतागुंतीच्या विरंजन (bleaching) आणि रंगप्रक्रिया (dyeing), तसेच कोणत्याच प्रकारच्या आधुनिक तंत्राचा वापर न करता हाताने किंवा मागाच्या साहाय्याने त्यावर नक्षीकाम करणे, हे युगानुयुगांच्या परिश्रमाचे फलित मानावे लागेल. अशा प्रकारची कला ही सर्वसामान्यपणे आनुवंशिक असते. कठोर परिश्रम करण्याची तयारी, धंद्यावरील निष्ठा आणि परस्पर सहकार्याची भावना यांमधून हे नैपुण्य साध्य होत असे. कला आनुवंशिक असल्याने धंद्यातील कसब बापातूनच मुलात उतरत असे. तसेच हा धंदाही पित्याकडून पुत्राकडेच जात असल्याने धंद्यातील जीवघेणी स्पर्धा टाळण्यास त्यामुळे मदत होत असे. या पार्श्वभूमीवर प्रस्तुत लेखामध्ये महाराष्ट्राच्या शतकानुशतकांतील वस्त्रांचा इतिहास रेखाटण्याचा प्रयत्न केला आहे.

या परिसरातील सातवाहनांच्या उदयाने सांस्कृतिक विकासाचे आगळे दालन खुले झाले. त्यांच्याच नेतृत्वाखाली येथील नागरीकरणास (urbanization) गती प्राप्त होऊन तेर, नाशिक (गोवर्धन), भोगवर्धन, जुन्नर, कोल्हापूर (ब्रह्मपुरी) आदी नागरी केंद्रांचा उदय झाला. सातवाहन घराण्यांनी या परिसरावर चार शतकांहून (२३० इ.स.पूर्व ते २३० इ.स.) अधिक काळ राज्य केले. सातवाहन काळात लाभलेले राजकीय स्थैर्य आणि आर्थिक सुबत्ता हे नागरीकरण प्रक्रियेस पोषक ठरले. तसेच सातवाहन सम्राट व्यापाराबाबत अतिशय दक्ष होते. त्यांनी देशान्तर्गत व्यापारात सुसूत्रता प्रस्थापित करताच परदेशी व्यापाराची (विशेषतः पाश्चिमात्य देशांशी) जोरदार आघाडी उघडली. अल्पावधीतच त्यांनी ग्रीक व रोम येथील बाजारपेठा हस्तगत केल्या.

याच सुमारास (इ.स. ४५-४६ मध्ये) हिप्पोलसने मान्सून वाऱ्याचा (मौसमी वारे) शोध लावून त्याची व्यापारासाठीची उपयुक्तता पटवून दिली. त्यामुळे सातवाहनांच्या पश्चिमी व्यापारात मोठ्या प्रमाणात वाढ

झाली. हा सर्व व्यापार भारताच्या पश्चिम किनाऱ्यावरून होत असल्याने पश्चिम किनाऱ्याचे महत्त्व वाढले. आणि लवकरच या परिसराचे नागरीकरण होऊन तेथे भडोच, कल्याण, नालासोपारा, चौल आदी बंदरे उदयास आली. प्रस्तुत बंदरे सह्याद्री पर्वतातील घाटमार्गांनी देशावरील प्रमुख बाजारपेठांशी जोडली गेली. त्यामुळे देशभर व्यापाराचा विस्तार होण्यास मदत झाली.

पाश्चिमात्य बाजारामुळे सातवाहनांची फार मोठ्या प्रमाणात भरभराट झाली. त्यांची समृद्धी क्षत्रप या त्यांच्या राजकीय प्रतिस्पर्ध्यांना सहन झाली नाही. म्हणून कोकण–पट्टीवर व सातवाहन साम्राज्यावर प्रखर हल्ले करून पाश्चिमात्य व्यापार ताब्यात घेण्याचा प्रयत्न त्यांनी केला. तथापि गौतमीपुत्र या सातवाहन सम्राटाने क्षत्रपांचे समूळ उच्चाटन करून परराष्ट्रीय व्यापारातील पकड मजबूत केली.

मान्सून वाऱ्याचा शोध व क्षत्रपांचा पराभव यांमुळे सातवाहनांचा व्यापार फार मोठ्या प्रमाणात वाढला आणि त्यांच्या वैभवात भर पडली. व्यापारामध्ये प्रामुख्याने कापडाची फार मोठ्या प्रमाणात निर्यात होत होती. कापडामध्ये रंगीबेरंगी सुती व रेशमी कापड, रेशीम व तलम कापड यांचा मोठ्या प्रमाणात समावेश होता. व्यापार सातवाहनांना फायदेशीर असल्याने ग्रीस व रोम येथून फार मोठ्या प्रमाणात पैशाचा ओघ दक्षिण भारताकडे येत होता. या वस्त्रांनी पाश्चिमात्य जगाला वेडे केले होते. प्लिनी या समकालीन लेखकाने रोमन लोकांच्या या उधळेपणावर सडकून टीका केली आहे. हा ओघ थांबविण्यासाठी रोमन लोकसभेला या आयातीविरुद्ध प्रतिबंधात्मक कायदे करावे लागले होते. आज परिस्थिती नेमकी उलटी झाली असून आपणास पाश्चिमात्य आयातीवर बंदी घालावी लागत आहे. यालाच इतिहास चक्राची उलटी गती, असे म्हणावे लागेल.

या वैभवाचे पडसाद समकालीन पाश्चिमात्य लेखकांच्या प्रवासवर्णनांतून ठायीठायी उमटलेले दिसतात. या परिसरातील वस्त्रोद्योग हे या समृद्धीचे मूलभूत कारण होते. आणि महाराष्ट्राने वस्त्रोद्योगात एकाधिकार प्रस्थापित केला होता. तसेच या कालखंडात पैठण हे सातवाहनांच्या राजधानीचे ठिकाण होते आणि ते वस्त्रोद्योगासाठी प्रसिद्ध होते. याशिवाय तेर, नेवासे, जुन्नर, नाशिक आदी केंद्रेही वस्त्रनिर्मितीमध्ये अग्रेसर होती.

हालसातवाहनाच्या गाहा सत्तसई या प्राकृत काव्य ग्रंथातून आपणास समकालीन वैभवाची व वस्त्रप्रावरणांची कल्पना येते. प्रस्तुत ग्रंथातील गाथा क्रमांक २५५ ते २६३ आपणास विणकाम, रंगकाम, भरतकाम व शिवणकाम यांची तपशीलवार माहिती देतात.

नाशिक येथील सातवाहनकालीन शिलालेख हा उद्योगातील समृद्धीची कल्पना येण्यास फारच उपयुक्त आहे. याशिवाय पितळखोरा, कार्ले, भाजे, बेडसा, अजिंठा आदी लेण्यांतील शिल्पांवरून आपणास समकालीन वस्त्रांची कल्पना येण्यास मदत होते. भारतीय पारंपरिक पोषाखामध्ये प्रामुख्याने मागावरील तयार कपड्यांचा समावेश होतो. त्यामध्ये प्रामुख्याने साडी, शेला, धोतर, शाल, फेटा, लुंगी, पट्टी (scarf) आदी वस्त्रे येतात. सर्वसामान्यतः ही वस्त्रे सुती असत; कारण प्राचीन कालापासून हा परिसर कापूस उत्पादनासाठी प्रसिद्ध आहे.

भारतीय स्त्री आणि पुरुष यांच्या पोषाखाचा विचार केल्यास त्यामध्ये फारसा फरक आढळत नाही. स्त्रिया चोळी, कंचुकी वापरीत त्याऐवजी पुरुष उत्तरीय नावाचे वस्त्र पांघरीत असत. पोषाखात अधोवस्त्र, अंतर्वस्त्र आणि परिवस्त्र असे एकंदरीत तीन घटक असत. पुरुष डोक्यावर फेटा गुंडाळीत तर स्त्रिया अंगावरून ओढणी घेत असत.

सुती कपड्यांव्यतिरिक्त रेशमी कपडे वापरण्याची प्रथा होती. रेशमी कपड्यांवर जरतारी मिनाकारी करण्याच्या कामात येथील कारागीर आरंभापासून वाकबगार होते. सुती आणि रेशमी कपडे रंगविण्याकडे लोकांचा कल होता. अजिंठा व बाग लेण्यांतील नखरेल रंगीत चित्रे याची साक्ष होत. तसेच तलम वस्त्रे अतिशय लोकप्रिय होती. तलम वस्त्रे विणण्यात भारतीय कलाकार एकमेवाद्वितीय होता. शिल्पीनी उपरोक्त लेण्यांतील शिल्पांवर हीच वस्त्रे कोरल्याने शिल्पे अर्धनग्न किंवा नग्न भासतात. तथापि परिधान केलेली वस्त्रे अतिशय तलम असून त्यांची जाणीव केवळ वस्त्रांच्या चुण्यावरून होऊ शकते. एकंदरीत वास्तवाचा आभास निर्माण करणारा शिल्पी व वास्तव्यात इतकी तलम वस्त्रे निर्माण करणारा कलाकार उभयता श्रेष्ठ होत.

तुलनात्मकदृष्ट्या रेशमी कापड महाग व केवळ श्रीमंतांनाच परवडणारे होते. आजही या स्थितीमध्ये फारसा बदल झालेला दिसता नाही. प्राचीन काळापासून स्त्रिया पोषाखाबाबत विशेष चोखंदळ वाटतात. त्यांची वस्त्रांविषयीची आवड, रंगसंगती व वस्त्र परिधान करण्याची पद्धती वाखाणण्यासारखी होती व आहे. साडी परिधान करण्याच्या अनेक पद्धती असून ते परिसरावर अवलंबून होते. सर्वसामान्यतः आठव्या शतकापर्यंत विकच्छ साडी परिधान करण्याची प्रथा होती. नंतरच्या काळात सकच्छ साडी घालण्यास प्रतिष्ठा लाभली आणि आजही सकच्छ साडी आणि डोक्यावरून पदर हे महाराष्ट्रीय स्त्री-पोषाखाचे आगळे वैशिष्ट्य मानावे लागेल.

भारतीय पोषाखाचा विचार केल्यास ही पद्धती पारंपरिक असून त्यामध्ये बदल करण्यास फारसा वाव नाही. कारण ही वस्त्रे म्हणजे कमी-अधिक लांबी-रुंदीच्या मागावर तयार होणाऱ्या पट्ट्याच होत. यामध्ये शिवणकामास फारसे महत्त्व नाही. महाराष्ट्रही या पद्धतीस अपवाद नाही. तथापि भारतीयांचा जेव्हा परकीयांशी संबंध आला, तेव्हा त्यांनी परकीयांचे काही उपयुक्त वस्त्रप्रकार येथे रूढ करण्याचा प्रयत्न केला आणि सम्राट अलेक्झांडरच्या आक्रमणापासून ब्रिटिश आक्रमणापर्यंत ही प्रक्रिया सातत्याने चालू असल्याचे दिसते. महाराष्ट्रात याचा आरंभ क्षत्रपांच्या आक्रमणापासून होतो. सातवाहन जेव्हा क्षत्रपांच्या संपर्कात आले, तेव्हा सातवाहनांनी त्यांचे काही वस्त्रप्रकार आत्मसात केले. म्हणूनच आपणास नंतरच्या शिल्पकृतींमध्ये हा फरक जाणवतो. यामध्ये आपणास विजार, तंग विजार, शिरबंध, बंडी, झगा (पायघोळ व अर्धा), पट्ट्यापट्ट्यांची व फुलाफुलांची वस्त्रे आदी प्रकार आढळतात.

सातवाहनोत्तर कालखंडातील वस्त्रप्रकारांत थोड्याफार प्रमाणात बदल झाल्याचे बाणभट्ट, ह्यूएनत्संग यांच्या लिखाणावरून व अजिंठा आणि बाग येथील चित्रलेण्यांवरून जाणवते. आता स्त्रियांच्या अंगावर काठापदराच्या साड्या व अत्याधुनिक प्रकारची वस्त्रे आढळतात. यांमध्ये सैनिकही गणवेशात दाखविण्यात आले आहेत. नंतरच्या शतकांतही असाच पोषाख असावा; असे मार्को-पोलो, इब्न-बतूता आदींच्या लिखाणावरून वाटते.

मध्ययुगीन इस्लामी आक्रमणांनी भारतीयांच्या वेशभूषेत कमालीचा बदल घडवून आणल्याचे स्पष्ट होते; कारण पोषाखविषयक त्यांच्या कल्पना भिन्न होत्या. तसेच त्यांच्या सौंदर्य-विषयक संकल्पनाही पूर्णपणे वेगळ्या होत्या. त्यांना अतिशय तलम, जरतारी व शिवलेल्या वस्त्रांची विशेष आवड होती. शिवाय ते राज्यकर्ते असल्याने त्यांचा कल नटण्या-मुरडण्याकडे अधिक होता. समाजात त्यांच्या आवडी-निवडी त्वरित रुजल्या गेल्या. त्यांच्याच रंगसंगतीला प्राधान्य मिळाले. ते प्रामुख्याने मध्य आशियातून स्थलांतरित झालेले असल्यामुळे त्यांनी आपल्या समवेत आपल्या देशाच्या पद्धतीही आणल्या होत्या. दक्षिणेतील इस्लामच्या आगमनाने कपड्यांच्या शिलाईस व भरतकामास वेगळीच गती प्राप्त झाली. या प्रकारच्या वस्त्रांमध्ये जामा, कोट, जॅकेट, स्कर्ट, पेटीकोट आदींचा समावेश होता.

याच कालखंडात हिंदू-मुस्लीम संस्कृतींमध्ये सुसंवाद निर्माण होऊन काही नवे वस्त्रप्रकार रूढ झाले. तसेच या परिसरातील नागरीकरण प्रक्रियेस गती प्राप्त होऊन अनेक नवी केंद्रे उदयास आली. यामध्ये गुलशनाबाद (नाशिक), दौलताबाद (देवगिरी), औरंगाबाद (खडकी), मोमीनाबाद (अंबाजोगाई), येवला, जालनापूर, शहागड, अकोला, बाळापूर, पुणे, वाई, सातारा आदी प्रमुख होत.

मोगल सत्तेनंतर या परिसरात मराठ्यांचे राज्य निर्माण झाले (इ. स. १६३० ते १८२०). मराठ्यांना पारंपरिक हिंदू पोषाखाची विशेष आवड होती. तथापि त्यांनाही प्रस्थापित लोकप्रिय इस्लामी वस्त्रप्रकारांचा स्वीकार करावा लागला. या पार्श्वभूमीवर आपण या कालखंडातील वस्त्रप्रकारांचा मागोवा घेऊ या.

वाढत्या लोकसंख्येची गरज म्हणून या नवोदित नागरी केंद्रांतूनही वस्त्रोद्योगास आरंभ झाला. आणि थोड्याच कालावधीत येथील वस्त्रप्रकारांना राष्ट्रीय पातळीवर मान्यता लाभली. उदाहरणार्थ देवगिरी (आता दौलताबाद) तलम वस्त्रांसाठी प्रसिद्ध होते. महंमद तुघलकास या तलम वस्त्रांनी व येथील कलाकारांनी मोहित केले म्हणून त्याने आपली राजधानी दिल्लीहून देवगिरी येथे स्थलांतरित केली. देवगिरीचे दौलताबाद करण्यात आले (इ.स.१३२२). या

स्थलांतरामुळे येथील लोकसंख्या वाढली म्हणून वस्त्रनिर्मितीस प्राधान्य देण्यात आले. आणि कलाकारांस विशेष सवलती देण्यात आल्या. त्यामुळेच या परिसरातील पैठण, बीड, कंधार, नांदेड, लातूर आदी केंद्रे पुढे येण्यास मदत झाली.

अमीर खुश्रू या समकालीन कवीने तलम वस्त्रांचे वर्णन अतिशय मार्मिक शब्दांत केले आहे. त्याच्या शब्दांत सांगायचे झाल्यास 'चंद्राची मुलायम त्वचा म्हणजेच तलम वस्त्र होय.' शंभर यार्ड मलमल सुईच्या नेढ्यातून सहज पार जात होती. या परिसरातील रेशीमही तेवढेच लोकप्रिय व आकर्षक होते. अल्लाउद्दीन खिलजीच्या लुटीमध्ये रेशमी वस्त्रांचे हजारो प्रकार होते.

देवगिरीप्रमाणेच इतर अनेक केंद्रांमधून वस्त्रनिर्मिती होत होती. या प्रत्येक केंद्रात निर्माण होणाऱ्या वस्त्रांचे स्वतःचे असे खास वैशिष्ट्य होते. त्यामुळे त्या वस्त्रास त्या-त्या केंद्राच्या नावाने ओळखले जात होते. उदाहरणार्थ पैठणची पैठणी, शहागडची शहागडी, धनवडची धनवडी, जैनबादची जैनाबादी, कालिकतचे कॅलिको आणि मसोलची मस्लीन वगैरे.

महाराष्ट्रातील वस्त्रोत्पादन करणाऱ्या महत्त्वाच्या पेठा व त्यांचे वस्त्रप्रकार पुढे दिले आहेत.

| | |
|---|---|
| औरंगाबाद | हिमरू-मशरू |
| दौलताबाद | मलमल |
| बाळापूर | चंद्रकळा साडी |
| संगमनेर | चंद्रकळा साडी, सणंग |
| पैठण | असावली किंवा पैठणी, पीताम्बर, किमखाब, धोतरे |
| येवला | पैठणी, जामदानी, पीताम्बर |
| तेर | मलमल |
| शहागड | शहागडी (साडी), धोतरे |
| नाशिक | जरीकाठी साडी |
| नागपूर | रेशमीकाठी धोतरजोडी |
| अमरावती | पासोडी, साडी |
| सोलापूर | खण, साडी, सुती कापड |
| तुळजापूर | खण, साडी, सुती कापड |
| कोल्हापूर | खण, सुती कापड |
| अहमदनगर | सर्व प्रकारचे कापड |
| पुणे | जरतारी साडी व इतर कापड |
| धारवाड | खण |
| पंढरपूर | घोंगडी, पासोडी, पीताम्बर |
| अकोला | पासोडी, शाल, साडी |
| बीड | पासोडी, साडी |

उपरोक्त केंद्रांव्यतिरिक्त कल्याण, रत्नागिरी, मालेगाव, जालना, सातारा, दामोळ, ठाणे, चांदवड, राजापूर, वाई इत्यादी बाजारपेठांतूनही सुती व रेशमी वस्त्रे तयार होत होती. या काळातील काही महत्त्वाच्या व लोकप्रिय वस्त्रांचा आपण विचार करू या.

**पैठणी :** पैठणी साडी हा मध्ययुगीन महाराष्ट्रातील लोकप्रिय साडीप्रकार होय. गर्भरेशमी वस्त्रावर सोन्या-चांदीच्या जरीची मिनाकारी केलेल्या काठा-पदराच्या साडीप्रकारास पैठणी म्हटले जाते. रेशमाप्रमाणेच सुतावरही जरतारी काम करण्याचा प्रघात होता. तथापि रेशमाचा मुलायमपणा अशा प्रकारच्या सुती साडीमध्ये येत नव्हता. तसेच सूत आणि जर यांच्यामध्ये रेशमाइतका सुसंवाद निर्माण होत नव्हता.

पैठणीची वीण अत्यंत साधी असून हात किंवा पाय चाळ्यातील नक्षीकाम हे पैठणीचे खास वैशिष्ट्य होय. हे नक्षीकाम झाला किंवा जेकार्ड यांसारख्या आधुनिक यंत्रप्रकारांची मदत न घेता केले जाते, हे विशेष होय. केवळ ताणा-बाणा धाग्यांच्या साहाय्याने नक्षीकाम करण्याचे तंत्र विकसित करण्यात आले होते. ताणा म्हणजे आडवे धागे (warp) आणि बाणा म्हणजे उभे धागे (weft). पैठणीवरील नक्षीकाम उभ्या धाग्याच्या अनेकरंगी लडी (Extra weft technique) वापरून करण्यात येते. नक्षी सामान्यतः पदरावर व काठांवर काढली जाते. नक्षीवरून, रंगावरून व जरतारी कामासाठी वापरलेल्या सोन्याच्या वजनावरून पैठणीला निरनिराळी नावे मिळाल्याचे स्पष्ट होते.

उत्तर पेशवाईमध्ये पैठणीस कमालीची लोकप्रियता लाभली होती. मराठा काळातील पैठणीवर 'असावली'च्या फुलांचे सुंदर नक्षीकाम केलेले आढळते. म्हणून त्या साडीला असावली साडी असे नाव प्राप्त झाले होते. पैठणी

हे महाराष्ट्रातील सर्वांत किमती वस्त्र असून त्याची किंमत वापरण्यात आलेल्या सोन्याच्या वजनावरून ठरत असे.

भरजरी नक्षीचा पदर व उठावदार काठ ही पैठणीची खास वैशिष्ट्ये मानावी लागतील. या पदरावर सामान्यतः असावली, अक्रोटी, गझवेल, बांगडीमोर, राघू-मैना, शिकार-खाना, अजिंठा-कमळ, हुमा-परिंदा अशा प्रकारची नक्षी विणला जात असे. काही पैठण्यांवर जरतारी बुट्टी विणल्याचे आढळते. अशा साडीला बुट्टेदार पैठणी किंवा शालू म्हणत असत. गडद रंगाच्या पैठणीला शालू म्हटले जात असे. गडद हिरव्या रंगाचा व भरजरी काठापदराचा शालू या काळात अतिशय लोकप्रिय असल्याचे आढळते. अशा शालूची लोकप्रियता स्त्रीजगतामध्ये शिगेस पोहोचल्याचे दिसते. स्त्रियांचे या शालूचे आकर्षण हा काव्यसृष्टीतील महत्त्वाचा विषय होता. धार्मिक समारंभात हिरव्या शालूला अतिशय महत्त्व होते.

पेशवे दप्तरातील अनेक पत्रांवरून पेशव्यांना पैठणच्या पैठणीचे व अन्य वस्त्रांचे खास आकर्षण असल्याचे स्पष्ट होते. ७-१२-१७६८ च्या एका पत्राद्वारे श्रीमंत माधवराव पेशवे यांनी पैठण येथील असावली दुपट्टे, तसेच तांबड्या, हिरव्या, केशरी व डाळिंबी रंगांची वस्त्रे मागविल्याचे स्पष्ट होते. त्याचप्रमाणे ४-१२-१७६६ च्या पत्राद्वारे माधवरावांनी आपणास धोतराच्या काठावर ज्या प्रकारची नक्षी हवी आहे, ती नक्षी स्वहस्ते काढून पाठविली आहे.

नंतरच्या काळात हैद्राबादच्या निजामानेही पैठणी साडीच्या खरेदीसाठी पैठणला अनेक वेळा भेटी दिल्या होत्या. निलोफर या निजामाच्या सूनबाईने पैठणला भेट देऊन पैठणीमध्ये काही सुधारणा सुचविल्या होत्या.

कालौघात पैठणी ही लग्नसमारंभातील आवश्यक बाब बनली. राजापासून ते सर्वसामान्यांपर्यंत सारे जण लग्न समारंभात पैठणीसाठी हट्ट धरत असत. त्यामुळे पैठणीची मागणी वाढली. या वाढत्या मागणीचा पुरवठा करण्याच्या हेतूने अनेक केंद्रांवर पैठणी विणली जाऊ लागली. अशा केंद्रांपैकी येवले हे केंद्र बरेच नावारूपास आले. कोयरी पदर हे येवल्याच्या पैठणीचे वैशिष्ट्य होय. येवल्याशिवाय पुणे, नाशिक, मालेगाव येथील पैठण्याही प्रसिद्ध होत्या. महाराष्ट्र-संस्कृतीचे भिन्न धागे एकत्र करण्यात पैठणीचा सहभाग मोठा आहे.

**जामदानी :** भारतीय कलाकारांची अत्यंत वैशिष्ट्यपूर्ण कलाकृती म्हणजे जामदानी होय. तसे पाहता जामदानीची वीण अत्यंत साधी व सोपी असते. तथापि ताण्यावर (warp) नक्षी जोडण्याचे काम अत्यंत कौशल्याचे व दीर्घ मुदतीचे असते. यासाठी निष्ठा आणि चिकाटी या दोन गुणांची आवश्यकता असते. औरंगजेबास जामदानीचे खास आकर्षण होते म्हणून या वस्त्रप्रकारास नंतर औरंगजेबी म्हणून ओळखण्यात येऊ लागले. केवळ शासनमान्य कलाकारच जामदानीचे विणकाम करू शकत असत.

**हिमरू :** हा मुस्लीम जगतातील लोकप्रिय वस्त्रप्रकार होय. किमखाब या भरजरी वस्त्राची ही प्रतिकृती होय. याचे मूळ नाव हमरू असून, हमरू म्हणजे प्रतिकृती. दक्षिणेमध्ये महंमद तुघलकाने हे वस्त्र सर्वप्रथम प्रचारात आणले. यामध्ये रेशीम व सूत यांचे मिश्रण असते. यापासून सर्व प्रकारची वस्त्रे बनविली जात होती. या प्रकारात रेशमाचे प्रमाण अधिक असल्याने ते मुलायम व किमती होते. म्हणून ते सर्वसामान्यांना परवडणारे नव्हते. दौलताबाद, औरंगाबाद, पैठण, जालना येथे पूर्वी याची निर्मिती होत होती. आता हिमरू केवळ औरंगाबाद येथेच तयार होते.

**मशरू :** ही हिमरूची सर्वमान्य प्रतिकृती होय. यामध्ये सुताचे प्रमाण अधिक असल्याने ते सर्वांना परवडणारे होते. शुद्ध रेशमी वस्त्र परिधान करून प्रार्थना करण्यास प्रेषितांनी प्रतिबंध घातल्याने मशरू या वस्त्राची निर्मिती करण्यात आली. केवळ प्रार्थनेसाठी म्हणून हे वस्त्र मोठ्या प्रमाणात वापरले जात होते.

**किमखाब :** सोन्याच्या जरीची भरपूर मिनाकारी असलेले एके काळचे दक्षिणेतील लोकप्रिय सोनेरी वस्त्र होय. हे अतिशय किमती राजेशाही वस्त्र असून त्याच्या निर्मितीस कठोर परिश्रम व बराच कालावधी लागत असे. एका पर्शियन राजदूतास हे वस्त्र प्राप्त करण्यासाठी पाच वर्षे थांबावे लागले होते, कारण या वस्त्राचे विणकाम पैठणच्या हातमागावर चालू होते.

**फेटा:** डोक्याला गुंडाळ्याचे पुरुषांचे वस्त्र म्हणजे फेटा. फेट्याचे विविध प्रकार असून त्याला पगडी असेही म्हटले

जात होते. बुट्टेदार पगडी हा पगडीचा लोकप्रिय प्रकार असून हिंदू आणि मुस्लीम याचा वापर करीत असतात. जोरदार पगडी, खिडकीदार पगडी, नस्तालिक हे पगडीचे काही लोकप्रिय प्रकार होत.

**मंदिल :** हा मलमली कापडाचा फेटा असून त्यामध्ये सोनेरी जर वापरली जात असे.

**शेमला :** फेट्याचा एक वेगळा प्रकार. बत्ती, सरबत्ती, सरबंद हे शिरोवस्त्राचेच भिन्न प्रकार होत. सर म्हणजे शिर व बंद म्हणजे बांधणे किंवा गुंडाळणे. तिवटे किंवा तिवट हा व्यापारी वर्गातील लोकप्रिय पगडी प्रकार होय.

**रुमाल :** हाही फेट्याचाच एक चौरस प्रकार होय. डोक्याला गुंडाळण्यासाठी याचा वापर केला जात होता.

**दुपट्टा :** खांद्यावरून घेण्याच्या पट्टीस दुपट्टा असे म्हणतात. याच्या काठावर जरीकाम केलेले असते.

**शेला :** अंगावर घेण्याचे एक किमती वस्त्र.

**मेहमुदी :** एक प्रकारचे सुती सफाईदार वस्त्र.

**साडी :** स्त्रियांच्या पोषाखातील प्रमुख घटक.

**चंद्रकळा :** एकरंगी रेशमी किंवा सुती साडी. काळी चंद्रकळा सर्वात प्रसिद्ध होती.

**खण :** चोळीसाठी तयार केलेला खास वस्त्रप्रकार.

**पीतांबर :** पुरुषांसाठी धार्मिक सोहळ्याच्या प्रसंगी परिधान करायचे रेशमी व जरतारी काठाचे महावस्त्र. याचे काठ तुलनात्मक दृष्ट्या छोटे असून याला पदर नसतो. यालाच सोवळे, मुकटा म्हटले जात असे. येवले पीतांबरासाठी प्रसिद्ध होते.

**कुर्ता किंवा कुडता :** सैल झग्यासारखा वस्त्रप्रकार.

**खमीज :** मुस्लीम वस्त्रप्रकार.

**अंगरखा :** जाम्याखाली वापरण्याचा वस्त्रप्रकार. मिना किंवा अंगी हे कुडत्याचेच भिन्न प्रकार होत.

**मिरजी :** डगला, कुफचा, कुबा सद्रा हे अंगरख्याचे आणखी प्रकार होत.

**जामा :** मुस्लीम वस्त्रप्रकार.

**पेशदा :** रंगीत मलमलीपासून तयार करण्यात आलेले मुस्लीम परिवस्त्र.

**लहंगा, कंचुकी :** ही स्त्रियांची अंतर्वस्त्रे होत.

या परिसरातील वस्त्रोद्योगास मुस्लिमांनी पाठिंबा दिला. याशिवाय त्यांनी काही लोकप्रिय वस्त्रप्रकारही रूढ केले. महमुदी, जाफरखानी, औरंगजेबी, नाफरमानी इत्यादी मुस्लीम वस्त्रे लोकप्रिय बनली असल्याचे पेशवे दप्तरावरून स्पष्ट होते.

**रंगकाम :** भारतीयांना झळाळणाऱ्या रंगांचे खास आकर्षण आहे. त्यांची रंगांची आवड ही सामान्यतः परिसरावर अवलंबून आहे. कपड्यासाठी वनस्पतिज रंग वापरले जात होते. उदाहरणार्थ गोदावरी काठी आढळणाऱ्या लाखेपासून तांबडा रंग तयार केला जात असे. बाभळीच्या सालीपासूनही रंग तयार होत होते. काळा, हिरवा, निळा हे रंग वरील रंगांत नीळ मिसळून करीत असत. सर्वसामान्यपणे पिवळा, नारिंगी, जांभळा, हिरवा, गुलाबी, विटकरी, काळा आणि तपकिरी हे रंग अधिक प्रमाणात वापरात होते.

**भरतकाम:** वस्त्रांना खुलवण्यासाठी, सुशोभित करण्यासाठी वस्त्रांवर भरतकाम केले जात असे. भरतकाम सुती व रेशमी अशा दोन्ही प्रकारच्या वस्त्रांवर केले जाई. अगदी प्राचीन कालापासून भरतकाम करण्याची कला भारतीयांनी आत्मसात केली होती. प्राचीन साहित्यामधून भरतकामाचे अनेक संदर्भ मिळतात. पैठणी आणि जामदानी वस्त्रे त्यांच्या जरतारी मिनाकारीसाठी प्रसिद्ध होती. युरोपीय देशांमध्ये अशा प्रकारच्या वस्त्रांना फार मोठ्या प्रमाणात मागणी होती. तथापि १८७० मध्ये ब्रिटिशांनी प्रतिबंधात्मक कायदा करून भारतीय कापडाची निर्यात पूर्णतया बंद केली. त्यामुळे भारताचा व्यापार बसला. आणि व्यापार बसल्याने भारताची सुबत्ता नष्ट झाली.

आता ही पारंपरिक कला नामशेष होण्याच्या मार्गावर आहे. आता विज्ञानाने आणि तंत्रज्ञानाने विणकाम, रंगकाम, भरतकाम, जरीकाम आदी अद्ययावत केले आहे. तथापि मानवाच्या अविरत श्रमातून साकार झालेल्या कलेची बरोबरी यंत्र करू शकणार नाही. म्हणून पैठणी व तत्सम उद्योगांना संरक्षण यावे.

– मार्ग प्रकाशनाच्या सौजन्याने

* * *

# सामाजिक वाटचाल





**ऋग्वेद काळात कुटुंबावर पित्याचा अधिकार होता. ही संयुक्त तथा एकत्र कुटुंब व्यवस्था होती. पितृसत्ताक पद्धती समाजाचा अविभाज्य घटक झाली होती. समान कुळांच्या परिवारास ‘गाव’ किंवा ‘ग्राम’ असे म्हटले जाई. गो या संस्कृत शब्दाचे अनेकवचन गावाः असे होते. म्हणजेच गावाच्या अपभ्रंशातून गाव शब्द रूढ झाला. एका वस्तीतील गायींच्या भ्रमण-मर्यादा स्पष्ट करणाऱ्या क्षेत्रास गाव तथा ग्राम म्हटले जाऊ लागले. गोठा, गायठाण (गावठाण), गायरान, गोधन हे वस्तीतील गायींच्या प्रभुत्वावरून रूढ झालेले शब्द होत.**

## ग्राम व शहर

■ डॉ. रा. श्री. मोरवंचीकर

भारतीय संस्कृती प्रामुख्याने खेड्यांची संस्कृती म्हणून ओळखली जाते. ग्रामीण संस्कृती हा संपूर्ण भारतीय जीवनाचा आत्मा आहे. या ग्रामीण संस्कृतीच्या आधारावरच नागरी संस्कृतीचे भरणपोषण झाले आहे. ग्रामीण संस्कृतीला वेदपूर्व काळापासून ऐतिहासिक परंपरा लाभलेली आहे.

### ग्राम

महाराष्ट्रात मानवी वस्त्यांचे अवशेष अश्मयुगापासून मिळतात. ताम्रपाषाण काळात महाराष्ट्रात विशेषतः उपनद्यांच्या खोऱ्यांत; जेथे अल्पशा प्रयत्नाने थोडेसे पाणलोट क्षेत्र निर्माण होऊ शकते, तेथे अश्मयुगाच्या अंतिम टप्प्यातील मानवाने लहान-लहान पण स्थिर वसाहती करण्यास आरंभ केला होता. जनावरांचे कळप बाळगणे आणि ऋतुनिहाय अल्पशी शेती करणे, हे त्यांचे दोन प्रमुख व्यवसाय

होते. भरवशाची शेती साध्य झाली नसल्याने जनावरांच्या कळपांवर विशेषतः गोधनावर त्यांचा ठाम विश्वास होता. गाय तथा गोमाता हे त्यांच्या जनजीवनाचे, चलनवलनाचे मुख्य साधन– माध्यम होते. तेव्हापासूनच ग्रामीण संस्कृतीचा आरंभ झाला आणि स्थिर जीवनाच्या अंतःप्रेरणेतून गावांची, वस्त्यांची कळत–नकळत निर्मिती झाली. गायीवरूनच गाव, गोठाण, गायरान आदी शब्दसमूह प्रचारात आले. हा नवाश्मयुगाचा काळ होता. पण तुलनात्मक दृष्ट्या नवाश्मयुग आणि नंतरचे ताम्रपट युग यांमधील अंतर इतके कमी होते की, त्याचे विभाजन करणे अवघड आहे. तथापि या काळात गोधनाच्या अनुषंगाने ज्या परंपरा निर्माण झाल्या, त्या ग्रामसंस्कृतीमध्ये अद्यापही प्रचलित आहेत. ताम्रपाषाण युगात गोदावरीच्या परिसरात जोर्वे, नाशिक, कोपरगाव, नेवासे, दायमाबाद इत्यादी स्थळे तत्कालीन संस्कृतीची साक्ष दर्शवितात. तसेच तापी नदीच्या परिसरात प्रकाशे, बहाल, आदी व भीमा नदीच्या परिसरात कोरेगाव, चांदोली, इत्यादी केंद्रे ग्रामीण संस्कृतीची साक्ष पटवतात. इ.स.पूर्व ७०० पर्यंत महाराष्ट्रात जोर्वे संस्कृती अस्तित्वात होती, आणि ती ग्रामीण संस्कृतीचे उत्तम उदाहरण होती. भारतात ताम्रपाषाण युगीन संस्कृतीच्या अस्ताबरोबर ग्रामीण संस्कृतीचा उदय झाला.

सिंधू संस्कृती किंवा हडप्पा संस्कृती ही नागर संस्कृती होती तर वेदकालीन संस्कृती ही ग्रामीण संस्कृती होती. सिंधू संस्कृतीच्या अस्तानंतर भारतात वैदिक संस्कृतीचा उदय झाला. ‘आर्य’ हे या संस्कृतीचे संस्थापक मानले जातात. आर्यांच्या टोळी जीवनाला स्थैर्य प्राप्त झाल्यानंतर ते वस्ती करून राहू लागले व त्यातून ‘ग्राम’ संस्कृती विकसित झाली. विशेषतः ऋग्वेद काळात ग्राम संस्कृती विकसित झाली.

ऋग्वेद काळात कुटुंबावर पित्याचा अधिकार होता. ही संयुक्त तथा एकत्र कुटुंब व्यवस्था होती. पितृसत्ताक पद्धती समाजाचा अविभाज्य घटक झाली होती. समान कुळांच्या परिवारास ‘गाव’ किंवा ‘ग्राम’ असे म्हटले जाई. गो या संस्कृत शब्दाचे अनेकवचन गावाः असे होते. म्हणजेच गावाच्या अपभ्रंशातून गाव शब्द रूढ झाला. गायींची वस्ती. एका वस्तीतील गायींच्या भ्रमण–मर्यादा स्पष्ट करणाऱ्या क्षेत्रास गाव तथा ग्राम म्हटले जाऊ लागले. गोठा, गायठाण (गावठाण), गायरान, गोधन हे वस्तीतील गायींच्या प्रभुत्वावरून रूढ झालेले शब्द होत. ते आजही प्रचारात आहेत. आर्यांचे स्थिर जीवन अस्तित्वात आल्यानंतर भारताच्या ज्या भागांत आर्यांचा विस्तार झाला होता; त्या भागांत आर्यांची ‘कुळे’ किंवा मोठी कुटुंबे प्रस्थापित झाली होती. एका कुळात राहणाऱ्या सर्व लोकांच्या गायी एकत्र असत. अनेक कुळे मिळून ‘ग्राम’ किंवा ‘गाव’ बनत असे.

गावाचा कारभार पाहण्यासाठी ‘ग्रामिणी’ असे. हे पद आनुवंशिक असले, तरी योग्य वारश्याअभावी दुसऱ्या व्यक्तीस ‘ग्रामिणी’ या पदावर नियुक्त करण्याचा अधिकार राजाला होता. ‘ग्रामिणी’ हा बहुधा क्षत्रिय असे. गावाचा कारभार, संरक्षण व न्यायदान या ग्रामिणीच्या मुख्य तीन जबाबदाऱ्या होत्या. एवढेच नव्हे तर युद्धाच्या वेळी ‘ग्राम’ हा सैन्याचा एक विभाग असे. समान कुळ असलेल्या परिवारांच्या समूहास गाव म्हणत. अशा रितीने अगदी वैदिक काळापासून ग्राम हा भारतीय जीवनाचा मुख्य घटक आकारास आला.

‘ग्राम’ हा राज्यप्रशासनाचा अंतिम तथापि महत्त्वाचा घटक मानला जाई. ग्रामसंस्थेवर ‘विश’ नावाची एक संस्था असे. सर्व सामान्यतः वीस गावांच्या समूहास ‘विश’ म्हणत. ‘विश’ हा शब्द ऋग्वेदात वसाहत किंवा लोकसंख्येचा एक उपविभाग या अर्थाने आला आहे. ‘विश’ म्हणजे आजच्या तालुका पंचायतसमितीप्रमाणे असावे. ‘विशपती’ किंवा ‘गोप’ हा या विभागाच्या प्रशासकीय संस्थेचा प्रमुख असे. अनेक ‘विंश’ मिळून एक ‘जन’ होई. ‘जन’ म्हणजे एखादे स्वायत्त राज्य होय. त्याचा व्याप व त्यामध्ये समाविष्ट असलेल्या विंशांची संख्या निश्चित नसे. त्याच्या जनप्रमुखास राजन म्हटले जाई. जानपद किंवा गणराज्य हा प्रशासनाचा सर्वांत मोठा घटक होता; ‘ग्राम’ ते ‘जनपद’ अशी प्रशासकीय चौकट अनेक शतके कार्यरत होती व ‘ग्राम’ हा त्याचा पायाभूत आधार होता.

यातूनच पुढे महाजनपदे निर्माण झाली. ती नद्यांच्या समृद्ध खोऱ्यांत आकारास आली. या महाजनपदांचा आकार समान नव्हता, त्यांची प्रशासनव्यवस्था उपरोक्त चौकटीत समाविष्ट झालेली होती. तथापि काहींचा कारभार गणतंत्र पद्धतीने तर काहींचा राजेशाही पद्धतीने चालत असे. यादवी युद्ध हा महाजन सत्तेचा स्थायिभाव होता. मोठ्या जनपदालाच 'महाजनपद' म्हटले जाई. त्यांच्यातील परस्पर संघर्षातून मत्स्य न्यायाप्रमाणे पुढे मगधच्या सत्तेचा उदय झाला. यांपैकी काशी, कोसल, अवन्ती, लिच्छवी, कुरू, पांचाल, शूरसेन, चेटी, अश्मक, वत्स, आदी प्रमुख महाजनपदे होती.

महाजनपद काळात गावाचा कारभार हा ग्रामसमितीमार्फत चालत असे. मौर्य काळात प्रशासनाची भक्कम चौकट निर्माण झाली. चंद्रगुप्त मौर्य हा उत्कृष्ट प्रशासक होता, त्यानेच भारतीय प्रशासन व्यवस्थेचा पाया घातला; मौर्यांनी निर्माण केलेली प्रशासन व्यवस्था ही अगदी मुस्लीम आक्रमण काळापर्यंत थोड्याफार फरकाने प्रचारात होती. कौटिल्याच्या 'अर्थशास्त्र' व मेगॅस्थनिसच्या 'इंडिका' या समकालीन ग्रंथांवरून आपणास तत्कालीन प्रशासनाची माहिती मिळते. मौर्य काळात प्रांताचे प्रदेश, आहार, विषय, भुक्ती व ग्राम असे विभाग प्रचलित होते. 'ग्रामिक' हा गावाचा अधिकारी असे. तो गावातील ज्येष्ठ नागरिकांकडून निवडला जाई. त्याच्याकडे गावाची आर्थिक व सामाजिक अशी सर्व प्रकारची माहिती असे. गावाचे संरक्षण व गावाचा कारभार तो पाहत असे.

ज्याप्रमाणे उत्तर भारतात मौर्यकाळ, त्याप्रमाणे दक्षिण भारतात व प्रामुख्याने महाराष्ट्रात सातवाहन शासकांचा कालखंड हा महाराष्ट्राच्या जडणघडणीच्या दृष्टीने महत्त्वाचा ठरतो. याच सातवाहन काळात 'महाराष्ट्राचे नागरीकरण' झाले. जगाच्या नकाशावर महाराष्ट्राला झळकविणारे सातवाहन हे आद्य घराणे होय. सातवाहनांचा साम्राज्यविस्तार गोदाखोऱ्यात व्यापला असल्यामुळे त्यांच्या राजवटीस 'गोदा संस्कृती' म्हटले जाते.

सातवाहन ते यादव ह्या काळात राज्यकारभाराच्या सोयीसाठी जनपद, राष्ट्र, विषय, आहार, भुक्ती व ग्राम असे राज्याचे विभाजन केलेले आढळते. ग्राम ते जनपद यांचा कारभार स्थानिक लोकांमार्फतच चालत असे. ग्रामसभा किंवा ग्रामपंचायत हा प्रशासन व्यवस्थेचा व संस्कृतीचा मूलाधार होता. ग्रामसंस्थेचे महत्त्व विशद करताना राधा कुमुद मुखर्जी म्हणतात, ''भारतावर अनेक आक्रमणे झाली परंतु भारतीय संस्कृती अबाधित राहिली, याचे खरे श्रेय स्थानिक स्वराज्यांना आहे, अगदी मुस्लीम व इंग्रज यांच्या राजवटीतही ग्राम सभांनीच भारतीय संस्कृतीचे रक्षण केले.''

भारतीय संस्कृतीच्या इतिहासात स्थानिक स्वराज्य संस्था, ग्रामसभा अशा संस्थांना मोठे स्थान आहे. माझ्या गावचा, माझ्या प्रदेशाचा, माझ्या संस्थेचा कारभार मी पाहतो, त्याच्या उन्नति-अवनतीची जबाबदारी माझ्यावर आहे, ही जाणीव मानवी कर्तृत्वाला अत्यंत पोषक अशी आहे. महाराष्ट्रात सातवाहन ते यादव ह्या काळात अशा लोकायत्त, स्वायत्त संस्था अस्तित्वात होत्या. राष्ट्र, विषय, भुक्ती व ग्राम हे राज्याचे विभाग व त्यावर अनुक्रमे राष्ट्रपती, विषयपती, भोगपती, ग्रामपती किंवा ग्रामकूट असे अधिकारी राजाने नियुक्त केलेले असत. राजाच्या मदतीला जशी सभा-समिती असे तसेच राष्ट्र, विषय वा ग्रामाच्या प्रशासनात मदतीसाठी प्रतिष्ठित नागरिकांचे मंडळ असे. या मंडळातील सदस्यांना महाजन किंवा महत्तर म्हटले जाई.

**महत्तर सभा**

गावाच्या महत्तर (महाजन) सभेकडे गावाची सर्व जबाबदारी असे. यात संरक्षण, महसूल, न्यायदान, उद्योग, वाहतूक, पाणीपुरवठा इत्यादींचा समावेश होता. थोडक्यात 'प्रजेचे कल्याण' म्हणजे आजचे कल्याणकारी राज्य (walfare state) ह्यासारखा हेतू होता. तत्कालीन ग्रामसभांचे वैशिष्ट्य म्हणजे स्वसंरक्षणासाठी त्यांच्याकडे स्वतंत्र सैन्य असे. करवसुली, न्यायदान व संरक्षण ही महत्त्वाची कामे ग्रामसभेकडेच असल्यामुळे ग्रामसभा ही खऱ्या अर्थाने स्वायत्त होती. आपल्या गावाचे संरक्षण, भूमीचे संरक्षण करण्यासाठी प्रसंगी मरण पत्करण्याचीही गावाच्या युवकांची तयारी असे. या प्रसंगी

वीरमरण आलेल्या स्थानिक पुरुषांच्या नावाने 'वीरगळ' नावाचे पुतळे उभारले जात.

ग्रामसंस्था कार्यक्षम तर ग्राम संपन्न व ग्राम संपन्न असेल, तर राज्य संपन्न या न्यायाने ग्राम प्रमुख व ग्राम महत्तरांच्या शिरावर महत्त्वाची जबाबदारी असे. संरक्षण, न्यायदान व करवसुली यांप्रमाणेच गावातील उद्योगधंदे, शेती, पाटबंधारे, तळी, रस्ते, मंदिरे पूजाअर्चा, इत्यादी सर्व जबाबदारी त्यांच्याकडे असे. तत्कालीन खेडी म्हणजे स्वावलंबी व स्वयंपूर्ण अशी स्वतंत्र गणराज्येच (Republics) होती. त्यामुळेच ग्रामराज्य हे रामराज्य, असे महात्मा गांधींना वाटत होते; त्यामुळेच 'खेड्यांकडे चला' असा आग्रहही ते धरतात.

प्राचीन काळातील स्वायत्त संस्थांचे स्वरूप, कार्य आणि प्रत्यक्ष कारभार पाहिल्यास असे लक्षात येते की, अशा प्रकारच्या स्वायत्त व लोकायत्त संस्था त्या काळी असून सार्वजनिक, सामाजिक जीवनाच्या बहुविध क्षेत्रांत त्या जबाबदारीने कारभार करत असत. म्हणजेच समाजाच्या शासकीय कारभारात प्रजाजनांना कार्य करण्यास भरपूर वाव होता व त्यांच्या कर्तृत्वाच्या विकासाला आवश्यक त्या स्वायत्त संस्था अव्याहतपणे चालू होत्या. प्राचीन कालखंडातील भारताच्या वैभवाला या स्वायत्त संस्था बऱ्याच अंशी कारणीभूत होत्या. त्यांनी गावगाड्याला भक्कम आधार देऊन तो प्रतिकूल परिस्थितीतही कार्यक्षम कसा राहील, यावर लक्ष केन्द्रित केले होते. शेती, गायरान (कुरणे), पाणथळ जागा, पाणवठे, देवराई, वनराई सार्वजनिक उपयुक्ततेची साधने हे सारे सुरक्षित ठेवण्याचा अटोकाट प्रयत्न केला. त्याप्रमाणे गावरहाटी निर्माण केली. जबाबदारीचे विभाजन वर्गनिहाय करून परंपरेने याचे रूपांतर हक्कात झाले. त्यामुळे गावकी संबंधात भावनिक, सामाजिक, भौतिक आणि धार्मिक अशा प्रकारची बांधिलकी निर्माण झाली. महाराष्ट्रात अद्यापही अशी अनेक खेडी आहेत, जिथे जातीपातीपेक्षा गावरहाटीला प्राधान्य दिले जाते. विशेषतः ज्या क्षेत्रात अद्याप तथाकथित आधुनिकतेचे वारे पोहोचले नाही, त्या ठिकाणी मराठवाड्याच्या आणि विदर्भाच्या दूरच्या क्षेत्रांत हे माणुसकीचे निर्झर वाहत असताना दिसतात. त्यामुळे एकत्वाची जाणीव (cohesive spirit) कार्यरत आहे.

महाराष्ट्रात मोठमोठी साम्राज्ये ऊर्जितावस्थेला आली आणि उद्ध्वस्त झाली, परंतु ग्रामसंस्था मात्र लव्हाळ्याप्रमाणे तग धरून राहिली. यादव काळात ग्राम महत्तर हे ग्रामपंचायतीचा कारभार पाहत असत; ते गावातील स्थायिक, अनुभवी, प्रौढ, वतनदार असल्यामुळे स्वाभाविकपणे त्यांना गावकीच्या कामाबद्दल जिव्हाळा वाटे. ते गावकऱ्यांनी निवडलेले लोकप्रतिनिधी असल्याने त्यांना लोकायुक्त (अधिकारी) म्हणून राजाची मान्यता होती. इ.स.च्या पहिल्या शतकापासून ग्रामिणीत्व हे क्षत्रियांकडेच असल्यामुळे महाराष्ट्रात ग्रामिणी म्हणजे पाटील हे पद कालौघात क्षत्रिय मराठ्यांकडे आले; ते वंशपरंपरेने चाले. पाटील, चौधरी, देशमुख किंवा 'ग्रामकूट' या नावानेही ग्रामिणीस ओळखले जाई. ग्रामक्षेत्रातील प्रत्येक शेताचे स्वामित्व निरनिराळ्या कुटुंबांचे किंवा व्यक्तींचे असले, तरी सर्व शिवाराचे प्रभुत्व पाटलाकडेच होते. गावचे संरक्षण, गुन्ह्यांचा शोध, वादविवाद मिटविणे, इत्यादी जबाबदाऱ्याही ग्रामप्रमुख या नात्याने पाटलाकडे होत्या.

पाटलाच्या मदतीसाठी ग्रामलेखक किंवा कुलकरणी (कुलकर्णी), वेसकर हे महत्त्वाचे अधिकारी होते. (विशेषतः यादवकालीन) कुलकर्णी हा ब्राह्मण तर वेसकर हा महार जातीतील असे. वेसकर म्हणजे गावाची वेस राखणारा, राखणकर्ता होय. त्यास 'जागला' असेही म्हणत. इतर सर्व जातीजमातींची घरे गावकुसाच्या आत बांधलेली असली; तरी महार, मांग वगैरे अस्पृश्यांच्या झोपड्यांची जागा मात्र वेशीच्या बाहेर ठेवलेली असे; त्यामुळे ग्रामरक्षणाची जबाबदारी पर्यायाने महारवाड्याकडे आली आणि 'वेस' राखणाऱ्या वेसकरांचे काम 'जागला' म्हणून महाराकडे दिले गेले. तसेच तो किरकोळ गुन्ह्यांचा तपास करण्याच्या कामातही मदत करत असे. कोणत्याही शासकीय प्रकरणात त्याची साक्ष अधिकृत मानली जात असे. गावगाड्याच्या दृष्टीने त्याचे स्थान अतिशय महत्त्वाचे होते.

दक्षिण महाराष्ट्रात ग्राम महत्तरांऐवजी 'महाजन' हे गावचे पुढारी होते, तसेच विदर्भात महाजन हे गावातील प्रतिष्ठित लोक होते. गावकीच्या कामातील सल्लामसलत, पुढाकार किंवा काही मतभेद झाल्यास न्यायनिवाडा करवून घेण्यासाठी गावकरी महाजनांकडे जात. महाजनांनी दिलेला निर्णय अखेरचा मानून त्या बरहुकूम वागण्याइतका गावकऱ्यांच्या मनात त्यांच्याबद्दल आदर होता, तसा पंचायतीचाही दरारा होता. ग्रामसमितीमध्ये आदरणीय वृद्धांचा समावेश असल्याने गावातले बहुतेक वाद गावातच मिटवण्याचा प्रघात होता. गावचे सर्वच व्यवहार सुरळीत चालून गावकऱ्यांच्या बहुतेक गरजा गावात भागत. सर्वांच्या सोयीप्रमाणे एकत्र जमून समोर आलेल्या वादाची सांगोपांग चर्चा केल्यावर बहुमताने निर्णय देण्याची पंचायतीची पद्धत होती.

**बलुतेदारी पद्धत**

महाराष्ट्रातील ग्रामसंस्थेत बलुतेदारांनी महत्त्वपूर्ण कामगिरी केलेली आहे. खेड्याला जशी राजकीय स्वायत्तता होती, तशीच त्यांना औद्योगिक स्वायत्तता बलुते पद्धतीतून मिळत होती. शेतकऱ्यांची पडतील ती कामे वर्षभर करण्याच्या मोबदल्यात शेतकरी बलुतेदारांना आपल्या शेतातील पिकाचा काही ठरावीक हिस्सा 'बलुते' म्हणून देत असत. बलुत्याचे उत्पन्न कायम स्वरूपाचे असल्याने बलुतेदार हे गावातले कायमचे रहिवासी झाले. सामान्यपणे बलुतेदारांची संख्या बारा असे. यांत महार, सुतार, लोहार, कुंभार, चांभार, धोबी, न्हावी, सोनार, ज्योतिषी, गुरव, रामोशी, मांग यांचा प्रामुख्याने समावेश होता. तसेच कुलकर्णी, पोतदार, मुलाणी, कोळी, इत्यादींचा समावेश होता. स्थलकालपरत्वे व गरजेनुसार बलुतेदारांची संख्या कमी-जास्त असे. मात्र ग्रामीण जीवनास अत्यावश्यक असे पाच ते सात बलुतेदार पहिल्यापासून सर्वत्र असल्याचे दिसते.

महाराष्ट्रात बलुतेदार हे वतनदारही असत. त्यांना न्यायदानाच्या प्रक्रियेत सहभागी करून घेतले होते. निकालपत्रावर त्यांना आपले चिन्ह उमटवावे लागे. बलुतेदारी ही पद्धती संपूर्ण गावगाड्याशी निगडित होती. बलुतेदारी ही त्या-त्या जातीशी व तिच्या व्यवसायाशी निगडित असे. जातीनिहाय अर्थव्यवस्था आपले चलनवलन बलुतेदारी पद्धतीच्या रूपाने अस्तित्व राखून होती. बलुतेदार हे एका बाजूला गावचे सेवकवर्ग म्हणून काम करतात तर दुसऱ्या बाजूला जातीय व्यवहारही तितक्याच कठोरतेने पाळताना दिसतात. पण उत्तर भारतात अस्तित्वात असलेल्या जजमानी पद्धतीपेक्षा महाराष्ट्रातील बलुतेदारीचे स्वरूप हे अधिक समाजहिताचे व लोकशाही प्रक्रियेचे अंशतः जतन करणारे होते.

प्राचीन काळापासून पेशवे काळापर्यंत ग्रामजीवन व संस्थांचे स्वरूप सामान्यपणे वरील विचारसरणीस बांधलेले होते. ब्रिटिश कालखंडात या ग्रामसंस्था हळूहळू नामशेष झाल्या. त्यांच्या हक्कांचे खच्चीकरण झाले. ब्रिटिशांच्या उद्योगविषयक धोरणांमुळे भारताचा औद्योगिक ऱ्हास सुरू झाला. इंग्लंडच्या व्यापारी व औद्योगिक हितसंबंधांच्या रक्षणासाठी भारतातील पारंपरिक उद्योगधंद्यांचा बळी देण्यात आला. यामुळे स्वावलंबी भारतीय ग्रामीण अर्थव्यवस्था नष्ट झाली. ब्रिटिश काळात संपन्न शहरांतील कसबी हस्तउद्योगांचा आणि स्वयंपूर्ण खेड्यांतील कुटिरोद्योगांचाही ऱ्हास घडून आला. शेतीचे व्यापारीकरण घडून आले. 'गरजेनुसार उत्पादन' याऐवजी 'नफ्यासाठी उत्पादन' हा घटक आधारभूत बनला. अनुद्योगिकरणामुळे शेतीवरचा भार वाढला. शेतकऱ्यांचे उत्पन्न घटून दारिद्र्य वाढले. हस्तकलांमध्ये कुशल असणारे कारागीर म्हणजे प्रामुख्याने विणकर, कोष्टी, रंगारी या कापसाशी संबंधित असणाऱ्या कारागिरांवर उपासमारीची वेळ आली; असेच परिणाम अन्य व्यावसायिकांवरही झाले.

एकूणच भारतीय इतिहासाचे अवलोकन केले असता, ग्रामसंस्था ही सर्वांत पुरातन व टिकून राहिलेली संस्था आहे. ग्राम आणि वतन या दोहोंचा अतूट परस्परसंबंध अगदी आरंभापासून असल्यामुळे वतनदारीची पद्धत ग्रामसंस्थेइतकीच प्राचीन ठरते. विशेष म्हणजे इतिहासाच्या विविध कालखंडांत परंपरेने पूर्वापार चालत आलेली ग्रामसंस्थेची बहुतेक सर्व यंत्रणा कोणत्याही धर्माच्या वातावरणात अथवा राजवंशाच्या अधिराज्यात फारसा बदल न होता टिकून राहिली. मध्ययुगीन मुसलमानी

अमदानीतसुद्धा अधिकारी, वसुली इत्यादी बाबतींत मूलभूत कार्यपद्धतीमध्ये कोणताच बदल झाला नाही.

प्राचीन काळापासून इ.स.च्या पाचव्या शतकापर्यंत भारतात बऱ्याच प्रदेशांत गणराज्ये चालू होती, त्यानंतरही लोकायत्त संस्थांचे अस्तित्व टिकून होते. मात्र नवव्या, दहाव्या शतकापासून जातिभेद, संन्यासीवृत्ती यांमुळे या संस्था दुर्बल झाल्या, तसा देशही दुर्बल होऊ लागला. प्राचीन भारताच्या वैभवामध्ये ग्रामसंस्थांचे स्वातंत्र्य ही महत्त्वाची प्रेरणा होती. ती काळाच्या ओघात नष्ट होऊ लागली. 'स्वहिताचा संबंध राष्ट्रहिताशी आहे' ही भावना मोठ्या प्रमाणात निर्माण होऊ शकली नाही; तसेच प्रत्येक प्रजाजन राष्ट्राचा घटकावयव आहे, ही कल्पना भारतात दृढमूल झाली नाही. लोकांचा राजशासनाशी असलेला संबंध तुटल्यामुळे राष्ट्रनिष्ठेचा परिपोष झाला नाही.

### ग्रामसभांची स्वयत्तता

सार्वराष्ट्रिक विरोधाची पायाभरणी भारतात, महाराष्ट्रात प्रथम छत्रपती शिवाजी महाराजांनी केली. त्यांच्या पूर्वी येथे राष्ट्रभावनेचा अभाव होता. धर्मभावनेचे शैथिल्य व राष्ट्रीय औदासिन्य ही भारताच्या नाशाची कारणे होती आणि हे शैथिल्य व उदासीनता येण्याचे मुख्य कारण म्हणजे प्रातिनिधिक संस्थांचा अभाव होय, हे लक्षात घेतले पाहिजे. नंतरच्या मराठा कालखंडात महाराष्ट्रीय लोकभाषेचा, देशभाषेचा अभिमान जरूर निर्माण झाला. डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे यांनी म्हटल्याप्रमाणे, आम्ही मरहट्टजन श्रेष्ठ आहो, पराक्रमी आहो, असा अहंकार त्यांच्या ठायी बळावला; तथापि ही आमची भूमी, अशा भावनेने राष्ट्रीय दृष्टिकोनातून आपली संघटना कधीच बांधली गेली नाही. अकराव्या शतकानंतर आपल्या अधःपतनाच्या कारणांची चिकित्सा कोणीही केली नाही, ही दुर्दैवाची व चिंतेची बाब आहे. येथे हजारो वर्षे ग्रामसभा होत्या. त्यांना स्वायत्तता होती. त्यांतून ग्रामाच्या संरक्षणासाठी आत्मबलिदान करावे, ही निष्ठा निर्माण झाली हे वास्तव असले तरीपण गावाच्या सीमेपलीकडे या निष्ठेचा विकास झाल्याचे क्वचितच दिसते.

विविध राजवटींत ग्रामसभा होत्या; विषय, राष्ट्र यांच्या स्वायत्त सभा होत्या; व्यापारी, शेतकरी, कारागीर, ब्राह्मण यांच्या श्रेणी, संघ यांसारख्या व्यावसायिक संघटनाही होत्या. पण त्यातून महाराष्ट्रापुरती किंवा त्याहून लहान अशा प्रदेशापुरतीसुद्धा देशभावना किंवा सर्व समाजाच्या ऐक्याची भावना निर्माण झाली नाही. देशाच्या वा समाजाच्या शारीरी (organic) एकात्मतेचे तत्त्व येथे निर्माण होऊ शकले नाही व त्यामुळेच परचक्रांचा सामना संघटितपणे होऊ शकला नाही, हे वास्तव नाकारता येत नाही.

ग्रामसभांची स्वायत्तता जशी नष्ट होत गेली, तसे खेड्यांचे स्वावलंबन व समृद्धी नष्ट होऊन खेडी उद्ध्वस्त झाली; त्याबरोबरच ग्रामजीवनच संपुष्टात आले. आधुनिक कालखंडात तर खेड्यांचे अस्तित्वच शहरांवर निर्माण झाल्यामुळे त्यांचे ग्रामीणत्व नष्ट होऊन खेड्यांचे नागरीकरण झाले आहे. परंपरिक वतनदारी अथवा बलुतेदारी नष्ट झाली. त्यांना पर्यायी रोजगार नसल्याने ते खऱ्या अर्थाने भूमिहीन झाले आहेत. त्यामुळे गावगाड्यासमोर प्रचंड आव्हाने निर्माण झाली आहेत आणि संपूर्ण ग्रामीण संस्कृतीच अडचणीत आली आहे.

या कारणांच्या तपशिलात गेल्यावरून असे दिसते की, खेड्यात कृषी उत्पादनाचे, भरवशाचे क्षेत्र मर्यादित असल्याने; विशेषतः ओलिताखाली येणारे क्षेत्र कमी असल्याने, त्यामध्ये सहभागी होण्यासाठी स्पर्धा असे. त्यामधील आपला वाटा कायम असावा म्हणून तो बहाल करणाऱ्याशी स्वामिनिष्ठ असणे एवढेच त्यांचे कर्तव्य असे. या बाहेरील जगाशी त्यांना देणे-घेणे नव्हते आणि राज्यकर्त्यांच्या दृष्टीने हे अतिशय सोयीचे होते. प्रस्थापित प्रणालीला राज्यकर्त्यांकडून आडकाठी नको म्हणून, ग्रामसभा आणि राजनिष्ठा यांचे नाते अतूट होते. त्यामुळे राजाचे प्रत्येक गावाशी असणारे नाते, हे स्वतंत्र पातळीवरील असल्यासारखे होते. म्हणून राजाने गावाच्या मालकीत बदल केला, तरी त्याविरुद्ध कोठे उठाव झाल्याचे दिसत नाही. राजाला ग्रामसभेच्या संमतीशिवाय वतनदारीचे हस्तांतरण करता येणार नाही, असा ठराव कोणत्याही ग्रामसभेने केला नाही. त्यामुळे या पृथगात्मक

विचारसरणीवर खेडी जोपासली गेली. ती अखेरपर्यंत राष्ट्रीय पातळीवरील परिवर्तनाबद्दल अनभिज्ञच राहिली.

विशिष्ट पद्धतीच्या वतनदारीवर जोपासलेला ग्रामसंस्थेचा पिंड पिढ्यान्‌पिढ्या आपल्या वतनाशीच प्रामाणिक होता. ग्रामपोषणाइतकी सहजीवनाची भावना (cohesive spirit) त्यांना एकत्र गुंफणारे हे सूत्र होते. मात्र त्यांचे शेजारील गावांशी असणारे संबंध फारसे विधायक नव्हते. इथेच राष्ट्रनिर्मितीच्या प्रेरणेला छेद दिला गेला. पाणथळावरून, नदीच्या पाणीवाटपावरून, कुरणावरून त्यांच्यामध्ये सतत बखेडे होत असत. भारताचा इतिहास नव्याने लिहावयाचे ठरवल्यास तो ग्रामपातळीवरील यादवीच्या अनुषंगानेच लिहावा लागेल. याच वैरभावनेच्या जोपासनेमुळे परकीय राज्यकर्त्यांनी आपणास शेकडो वर्षे गुलामगिरीत ठेवले होते. थोडक्यात स्वायत्त ग्रामसंस्थेच्या उभय अंगांचा विचार होणे अगत्याचे आहे.

**नगर**

आपण भारतीय नगरांचा जेव्हा विचार करतो, तेव्हा आपणास जाणवते की शहरांची किंवा नगरांची लोकसंख्या ही ग्रामापेक्षा जास्त असते व ते एका मर्यादित भागावर वसलेले असते. नगराचे काही ठरावीक क्षेत्र शेतीसाठी उपयोगात आणले जाते किंवा शेतीविभाग नसतोही. नगरातील लोक प्रामुख्याने व्यावसायिक असतात आणि धान्य व कच्चा माल यांसाठी आसपासच्या गावांवर अवलंबून असतात. परावलंबित्वामुळे आवश्यक गरजा पूर्ण करण्यासाठी व्यापारी वर्गाचा उदय नगरात होतो. काही नगरे केवळ एखाद्या व्यवसायासाठी तर काही नगरे राजकीय, प्रशासकीय, व्यापार-उद्योग, धार्मिक केंद्र म्हणून प्रसिद्ध असतात.

नगराच्या या वैशिष्ट्यांमुळेच ते खेडेगावांपेक्षा वेगळे असल्याचे भासते. खेड्यांत जमीन मर्यादित नसते, अन्न बाहेरून आणले जात नाही. लोक स्वयंपूर्ण असल्याने येथे व्यापाऱ्यांची संख्या कमी असते. त्याचबरोबर हेदेखील तेवढेच खरे की, खेड्यांच्या केवळ लोकसंख्येत वाढ झाली, पण इतर काहीच सुविधा निर्माण झाल्या नाहीत, तर ते खेडे नगरामध्ये बदलू शकत नाही.

टॉयन्बीने म्हटले आहे की, केवळ एखाद्या वस्तूच्या मोबदल्यात अन्न मिळवण्यासाठी होणाऱ्या गर्दीच्या ठिकाणास नगर असे म्हणता येणार नाही. दाट लोकसंख्या असलेली एखादी वसाहत तेथील लोकांच्या नागरिकत्वाच्या जाणिवेशिवाय व त्यांच्या एकत्रित सामाजिक जीवनाशिवाय नगराच्या व्याख्येत बसत नाही. पण त्यासाठी महापौर आणि महानगरपालिका अशा धाटणीच्या संस्थारूपी रचनेची आवश्यकता नाही. बऱ्याच वेळा नगर म्हणविल्या जाणाऱ्या जागेत औपचारिक नागरी घटनेचा अभाव असू शकतो.

नगराच्या पूर्ततेसाठी एका अस्सल समाजरचनेची आवश्यकता असते. या प्रकारच्या समाजरचनेचे अस्तित्व त्या ठिकाणी असलेल्या सार्वजनिक वास्तू, संरक्षक तटबंदी, मनोरे, प्रवेशद्वारे, सभागृहे आदी देत असतात. सामान्यतः तेथेच व्यापारी आणि राजकीय घडामोडी आकार घेत असतात. अशा जागी नगराच्या रक्षणकर्त्या दैवतांचे कमीतकमी एक मंदिर आणि कदाचित, नगराच्या प्रशासनाला कार्यालय थाटण्यासाठी एक दिवाणखाना असण्याची आवश्यकता असते. जर नगराचे प्रशासन हे, संघटनाच्या त्या टप्प्यात पोहोचले असेल तर सिद्ध होते की, एखाद्या जागेला नगर म्हणण्यासाठी तेथे उत्क्रांत झालेल्या समाजातील लोकांचे त्या जागेवरील आत्मिक प्रेम ही आवश्यक बाब ठरते. ह्या सर्व बाबी नगरपणासाठी आवश्यक ठरतात.

नगरातील रहिवाशांच्या गरजा निश्चित झाल्याने व त्यांचे आवश्यकतेमध्ये रूपांतर झाल्याने या गरजा पूर्ण करणारे लहान-मोठे उद्योग-समूह नगरात केंद्रित होताना दिसतात. नगरात व्यापारी श्रेणीतील श्रेष्ठी व सेवक, शिक्षण क्षेत्रातील पंडित व अध्यापन करणारे, मनोरंजन करणारे, शिल्पी, सुतार, लोहार आणि अन्य मध्यमवर्गीय यांची मोठी वस्ती असते. सामान्यतः या घटकांचा शेतीशी प्रत्यक्ष संबंध नसल्यामुळे अशा शेतीशी संबंध नसणाऱ्या घटकांची नगरात मोठ्या प्रमाणावर वस्ती होत गेली.

नगर हेच परिसरातील अतिरिक्त उत्पादनांचे वितरण केंद्र असल्याने तेथे मोठ्या बाजारपेठा निर्माण झाल्या. अशा प्रकारच्या केंद्रात अन्य सवलतीही विपुल प्रमाणात, अल्पखर्चात व अल्पकाळात उपलब्ध होत असल्याने नगरातील वसाहतींना अधिक स्थैर्य लाभल्याचे दिसते. विशेषतः सिंधू संस्कृतीच्या उत्खनित अवशेषांवरून नागर संस्कृतीचे अस्तित्व लक्षात येते.

**भारताची आद्य संस्कृती**

प्राचीन काळापासून भारताची ओळखच खेड्यांचा देश अशी होती. अर्थातच खेड्यांच्या तुलनेत शहरे विकसित झाली नव्हती. सिंधू संस्कृती ही भारताची आद्यसंस्कृती होय. या संस्कृतीचा शोध लागण्यापूर्वी भारताच्या इतिहासाची सुरुवात वैदिक कालखंडापासून होत असे. परंतु सिंधू संस्कृतीच्या शोधामुळे भारताचा इतिहास आणखी २५०० वर्षे मागे गेला व भारताला ५००० वर्षांची ऐतिहासिक व सांस्कृतिक परंपरा आहे, हे सिद्ध झाले.

सिंधू संस्कृतीच्या उत्खनित अवशेषांवरून अनेक ठिकाणी शहरांचे, नगरांचे अस्तित्व वेदपूर्व काळात होते, हे लक्षात येते. मोहोंजोदारो, हडप्पा, कालीबंगन, लोथल, धोलविरा, रुपड, चन्हुदारी, रंगपूर, प्रभासपट्टम, दायमाबाद इत्यादी शहरांच्या अस्तित्वाच्या खुणांवरून प्राचीन काळात नगरांचा विकास कसा झाला होता, हे समजते. सिंधू अथवा हडप्पा संस्कृतीचे केंद्रस्थान ही नगरे होती. त्यामुळेच या संस्कृतीला 'नागर संस्कृती' असे म्हटले जाते; किंबहुना सिंधू संस्कृतीचे सर्वांत महत्त्वपूर्ण वैशिष्ट्य म्हणजे या संस्कृतीतील लोकांची नगररचना होय. अत्यंत योजनाबद्ध व अगदी आधुनिक पद्धतीची अशी नगररचना या संस्कृतीत आढळून आली. येथील रस्ते, घरांची रचना, सार्वजनिक इमारती, सांडपाण्याची व्यवस्था, वस्त्यांचे अवशेष, पाण्याच्या विहिरी, शहरांची तटबंदी, धान्याची कोठारे अशा कितीतरी वास्तू नागरीकरणाची साक्ष पटवतात. या संस्कृतीचा प्रचंड विस्तार, नियोजनबद्ध शहरे, घरांचा एकसारखेपणा इत्यादी गोष्टी पाहता या सर्व गोष्टींचे नियंत्रण करणारी कोणतीतरी केंद्रीय सत्ता नागर पातळीवर तेथे अस्तित्वात असावी, असे वाटते. एकंदरीत सिंधू संस्कृतीच्या उत्खननात नगररचनेच्या संदर्भात जे अवशेष सापडले, ते पाहता या शहरातील बांधकाम हे साधे होते, कलापूर्ण नव्हते असे दिसते. या संदर्भात डॉ.सर जॉन मार्शल म्हणतात, ''मोहोंजोदारोच्या अवशेषांमध्ये उभे राहिले असताना आपण जणू काही लँकेशायरसारख्या आधुनिक पण उद्ध्वस्त झालेल्या नगरातच उभे आहोत, असे वाटते.''

वैदिक काळात ग्रामसंस्कृती विकसित झाली. ग्रामसंस्थेच्या नंतर 'विश' नावाची एक संस्था असे. 'विश' हा शब्द ऋग्वेदात 'वसाहत' या अर्थाने वापरला गेला आहे. 'विश' नंतर 'जन' किंवा 'राष्ट्र' या संस्था होत्या. वैदिक काळात 'नगरे' अथवा 'पुरे' यांचा समावेश राष्ट्र, विषय या विभागांतच होत असला, तरी आजच्याप्रमाणेच त्यांचा कारभार त्या काळीही स्वतंत्रपणे चालत असे. नगराचा मुख्य हा 'पुरपाल' किंवा 'नगरपती' (नगरपाल) असे, ज्याची नियुक्ती राजाकडून होत असे. या पुरपालांच्या मदतीला नगरातील प्रतिष्ठित लोकांची समिती असे. या समितीला 'पंचकुल', 'गोष्ठी' किंवा 'चौकडिक' अशी नावे होती. या समितीत पाच किंवा सहा सभासद असत. मौर्य काळातही या समितीचे अस्तित्व पाहावयास मिळते. मॅगेस्थनिकसने 'इंडिका' या ग्रंथात पाटलीपुत्र शहराचे सुंदर वर्णन केले आहे. या शहराचा कारभार पाहण्यासाठी प्रत्येकी पाच सदस्य असलेल्या सहा समित्या होत्या.

**सातवाहन काळ**

सातवाहन काळात, नगराची व्यवस्था पाहण्यासाठी 'निगम सभा' नावाची समिती होती. इ.स.च्या दुसऱ्या शतकातला असा पुरावा नाशिक येथे सापडतो. राष्ट्रकूट, चालुक्य ह्या काळातही अशा निगम सभांचे अस्तित्व होते. 'निगम' या शब्दाचा अर्थ नगर असा होतो. निगम सभेत नगरातील व्यापारी, प्रतिष्ठित व वृद्ध यांमधून सभासद निवडले जात. त्यांच्यावर प्रजेच्या संरक्षणाची जबाबदारी होती. निगम सभेत भूमिदाने जाहीर करावी लागत. गुप्तकाळात नगरप्रमुखास 'पुरपाल' किंवा 'नगररक्षक'

म्हटले जाई. नगराचा कारभार पाहण्यासाठी एक परिषद असे. त्यात विभिन्न वर्गांचे प्रतिनिधी असत. नागरी सुविधा उपलब्ध करून देण्याची जबाबदारी नगरप्रमुखावर होती. एकूणच प्राचीन भारतातील नगर प्रशासनात, नगर समितीला महत्त्वाचे स्थान होते असे दिसते.

असे असले, तरी खेड्यांच्या तुलनेत नगरांची व शहरांची संख्या अर्थातच अत्यंत कमी होती. प्राचीन भारतीय संस्कृतीमध्ये धार्मिक केंद्रे सोडल्यास राजधान्यांची किंवा रोजगार निर्मितिक्षम शहरांची फार वाढ होऊ शकली नाही. फहीयानपासून आलेल्या परदेशी प्रवाशांनी इथल्या शहरांच्या भवितव्याबद्दल शंका व्यक्त केलेली आहे. इसवी सनाच्या सहाव्या शतकात भारतीय संस्कृतीत शहरांना फारसे महत्त्व नव्हते, असे वराहमिहीर म्हणतो; तर इ.स. ८५१ मध्ये आलेल्या सुलेमान या मध्य-आशियातील प्रवाशाने 'भारतात शहरेच नाहीत, असे म्हटले आहे. दहाव्या शतकात आलेल्या अल्बेरुनीनेही 'भारतात शहरांची संख्या नगण्य आहे' असे प्रतिपादन केले होते. म्हणजे मध्ययुगात शहरे नव्हती का, असल्यास त्यांची नेमकी ठिकाणे अद्यापही निश्चित करता आलेली नाहीत.

महाराष्ट्राच्या नागरीकरणाच्या संदर्भात विचार करताना आपणास सातवाहन काळातील नागरीकरणाचा अभ्यास करणे आवश्यक आहे. सातवाहनकालीन नगरातील जीवन कशा प्रकारचे होते, हे गाथासप्तशती, कथासरित्सागर, प्लिनीचे प्रवासवर्णन इत्यादी साधनांवरून कळते. सातवाहन काळातील नगरे समृद्ध व उद्योगधंद्यांची केंद्रे होती. स्थानिक उत्पादनाशिवाय अन्य नगरांतून आलेला माल एकत्र केला जात होता. अशा प्रकारचा उद्योग करणाऱ्या श्रेणी वर्षभर कार्यरत असल्याचे दिसते. म्हणजे व्यापारी श्रेणी हा या नगरांचा अविभाज्य घटक होता.

म्रच्छकटिक या नाटकावरून असे कळते की, नगरामध्ये फार मोठ्या प्रमाणात संपत्तीचा संचय होत असल्याने नगर संरक्षणाची व्यवस्था पाहणारा एक वर्ग नगरपालाचे स्वाधीन असावा. सातवाहन प्रशासन पद्धतीत नगरासाठी खास तरतूद होती. सातवाहन काळ हा व्यापारासाठी प्रसिद्ध होता. या कालखंडात महाराष्ट्रात अनेक नगरे, व्यापारी केंद्रे, बंदरे भरभराटीस आली. यात प्रतिष्ठान, तेर, जुन्नर, भोगवर्धन, नेवासा, नाशिक, कऱ्हाड, सोपारा, कल्याण, चौल इत्यादी नगरांचा समावेश होता.

सातवाहन काळात वरील नगरांमध्ये कशा प्रकारची शासनपद्धती होती, याची फारशी माहिती उपलब्ध नसली; तरी तत्कालीन शिलालेख व दानपत्रे यांमधून आपणास कल्पना येते. उदाहरणार्थ नाशिक लेण्यातील शक नहपान याचा जावई ऋषदत्त याच्या शिलालेखात निगम सभेचा उल्लेख आहे. अशा अनेक निगम सभा तत्कालीन नगरांत असाव्यात. नहपानाचा जावई ऋषभदत्तास दान देण्याआधी नियोजित दानपत्र नाशिक नगराच्या निगम सभेत वाचून दाखवावे लागले होते. या निगम सभेत नगरातील श्रीमंत, व्यापारी वगैरे मंडळी असत. निगम सभा अध्यक्षास श्रेष्ठी म्हणत. नगराचा कारभार चालवण्यासाठी असलेल्या अत्यंत महत्त्वपूर्ण व सामर्थ्यवान निगम सभेच्या श्रेष्ठींनी अनेक ठिकाणी बौद्धसंघास दाने दिल्याच्या नोंदी आहेत. निगम सभेचे कामकाज कार्यकारिणीमार्फत चालत असे व कार्यकारिणी सभासदास 'पौरवृद्ध' असे म्हटले जाई.

सातवाहन काळात जी अनेक नगरे निर्माण झाली, त्यांमध्ये अनेक प्रकारच्या उत्तुंग वास्तू, श्रीमंतांच्या हवेल्या, राजप्रासाद, मंदिरे आदींचा समावेश होता. मध्यम व कनिष्ठ वर्गीयांची घरे कशा प्रकारची होती; हे पैठण, तेर, कोल्हापूर, नाशिक, कऱ्हाड, भोकरदन येथील उत्खननांवरून कळते. सातवाहन काळात महाराष्ट्रात लोहयुगाचा आरंभ झाल्यामुळे उत्पादनात वाढ झाली आणि अनेक नागरी केंद्रे साकार झाली. लोकसंख्या माफक असल्याने नगरांच्या समृद्धीमध्ये भर पडत गेली. पाश्चिमात्य जगताशी होणारा व्यापार, मान्सून वाऱ्याचा शोध व सातवाहन शासकांनी व्यापाराला दिलेला खंबीर आश्रय; ही या समृद्धीमागील मूलभूत कारणे होती. त्यामुळे महाराष्ट्रभर नागरी केंद्रे फोफावली. मान्सून वाऱ्याच्या शोधामुळे पश्चिम किनारपट्टीचे महत्त्व वाढले व तेथे बंदरांचा विकास झपाट्याने झाला. या बंदरांना निर्यातीसाठी माल-पुरवठा करणे अगत्याचे झाले. त्यामुळे

लगतच्या सुपीक भूप्रदेशांत अनेक नागरी केंद्रे उदयास आली.

महाराष्ट्राच्या जडणघडणीत सातवाहन कालखंडाचा सिंहाचा वाटा आहे. नगर प्रशासनाची चौकट व लोकजीवन हे विविध राजवटींत थोड्याफार फरकाने सारखेच होते. ब्रिटिश कालखंडात शेतीच्या व्यापारीकरणामुळे भारताची समृद्ध अर्थव्यवस्था कोलमडली. ज्या प्रमाणात औद्योगिक क्रांतीचा विकास होत गेला; त्या प्रमाणात स्वयंपूर्ण असणारी खेडी क्रमशः उद्ध्वस्त होऊ लागली आणि खेड्यांचे आधारस्तंभ जे बलुतेदार त्यांचा धंदा नामशेष होत गेला. उदाहरणार्थ खेड्यांतील सिंचन पूर्वी 'मोटे'वरती चालत होते. मोट संस्कृती ही अनेक बलुतेदारांना एकत्र आणणारी संस्कृती होती. त्यामध्ये सुतार, चांभार, मातंग, ढोर, लोहार, माळी आदी बलुतेदारांचा मोठा सहभाग होता. मोटेची जागा विद्युतपंपाने घेतल्यामुळे मोट संस्कृती आज पूर्णपणे उद्ध्वस्त झाली आहे. ज्यांचे उद्ध्वस्तीकरण झालेले आहे, अशा लोकांना उर्वरित ग्रामव्यवस्था समावून घेऊ शकली नाही. त्यांना पर्यायी व्यवसाय देऊ शकली नाही. त्यामुळे त्यांची गणना खेड्यांतील उपेक्षित गटात झाली. म्हणून संधी मिळताच हे घटक शहरांकडे स्थलांतरित झाले. त्याच प्रकारे भिन्न-भिन्न उद्योगांतील क्रांत्यांनी खेड्यातील चांभार, कुंभार, बुरूड आदी घटकांना उद्ध्वस्त केले. याचप्रमाणे लोहार, सुतार, न्हावी, मुलाणी, खाटीक आणि कोष्टी आदींचे उद्योग नामशेष झाले.

वरील विविध उद्योग करणारे व्यावसायिक हे एके काळी खेड्यांचे आधारस्तंभ होते. ते खेड्यांतून कधी परागंदा झाले, हेच लक्षात आले नाही. शहरात स्थलांतरित झाल्यावर त्यांना फार चांगले जीवन जगायची संधी मिळाली, असाही याचा अर्थ नाही. त्यामुळे शहरांच्या बकाल वस्तीत वाढ झाली व शहरी रोजगारामध्ये जीवघेणी स्पर्धा सुरू झाली. तसेच त्यांचे पारंपरिक कौशल्य नाहीसे झाले आणि शहरांमध्ये त्यांना आपल्या कौशल्याबाहेरील रोजगारात गुंतवून घ्यावे लागले. तेथे त्यांना दुय्यम स्वरूपाचे नागरिकत्व देण्यात आले. पर्यायाने आज खेडी उद्ध्वस्त झाली. खेड्यांतील लोकसंख्येने शहरांत स्थलांतर केले आणि शहरांत वाढत्या लोकसंख्येला सामावून घेणारे रोजगार नसल्याने शहरेही मरणासन्न झाली आहेत.

**संदर्भ :**


१. सहस्रबुद्धे पु. ग.
महाराष्ट्र संस्कृती, कॉन्टिनेण्टल प्रकाशन, पुणे.
२. पानसे मु. ग.
यादवकालीन महाराष्ट्र, मुंबई, १९६२.
३. भावे वा. कृ.
पेशवेकालीन महाराष्ट्र, पुणे.
४. मोरवंचीकर रा. श्री.
भारतीय जलसंस्कृती-स्वरूप आणि व्याप्ती. सुमेरू प्रकाशन, डोंबिवली (पूर्व).
५. मोरवंचीकर रा. श्री.
सातवाहनकालीन महाराष्ट्र, प्रतिमा प्रकाशन, पुणे.
६. SARAO K. T. S.
Urban centres and Urbanisation as Reflected in 'The pali vinaya and sutta Pitakas.' Vidyanidhi Oriental Pulectcation, Delhi.
७. Ghosh A.
The City in Early Historical India, Indian Inst. of Advanced Study, Simla.


* * *





न्यायासन.

**देवगिरीचे यादवांचे राज्य इ. स. १३१८ मध्ये बुडाले. तोपर्यंत हिंदुधर्मशास्त्रे व परंपरागत पद्धतीचीच न्यायव्यवस्था भारतात सर्वत्र होती व म्हणून महाराष्ट्रातही प्रचलित होती. १३ व्या शतकात मुसलमान सत्ता महाराष्ट्रात आली. महंमद बिन तुघलक इ. स. १३२५ मध्ये सिद्धीच्या तख्तावर बादशहा म्हणून आला. महाराष्ट्राचा बराच भाग तसेच देवगिरीच्या यादव साम्राज्याचा भाग त्याच्या ताब्यात आला. त्यामुळे परंपरागत न्यायव्यवस्थेत काही महत्त्वाचे बदल झाले. ते महंमद तुघलक याने केले.**

# न्यायव्यवस्था

**■ ॲड. डी. व्ही. देशपांडे**

आगदी प्रारंभीही न्यायदानाची व्यवस्था होतीच. मानव समाज सामुदायिक जीवन जगू लागला, 'राज्य' संकल्पना अस्तित्वात आली त्याचबरोबर न्यायव्यवस्थेचा जन्म झाला.

भारतीय जीवनव्यवस्थेत वेदांचे महत्त्व फार मोठे होते. वेळकाळापासून न्यायदानाची, कायद्याची जी व्यवस्था अस्तित्वात आली, ती आपल्याला श्रमशास्त्र म्हणून माहिती आहे. भारतरत्न महामहोपाध्याय डॉ. पांडुरंग वामन काणे यांनी 'धर्मशास्त्राचा इतिहास' लिहिला आहे. तो लिहिताना त्यांनी या विषयाचा आढावा वेदकाळापासून घेतला आहे.

न्यायप्रक्रियेत 'व्यवहार' शब्द वापरलेला आहे. कायदेशीर दावा किंवा न्यायालयात चालणारी फिर्याद किंवा कायदेशीर चौकशीची कार्यपद्धती अशा अर्थाने हा शब्द वापरला गेला आहे. न्यायदान हे

राजाचे पवित्र कर्तव्य मानले आहे. स्मृतिकाळात खटला या अर्थी 'व्यवहारपद' किंवा 'विवादपद' असा शब्द होता. स्मृतींनी विवादांचे 'धनमूल' (दिवाणी) व 'हिंसामूल' (फौजदारी) असे दोनच वर्ग केले आहेत.

राजा किंवा त्याने नेमलेले न्यायाधीश यांनी न्यायदान करावे, असे सांगितले आहे. ते करताना त्यांनी आपले मन अकलुषित, निःपक्षपाती राखावे. राग अथवा लोभ यांच्या अधीन होऊ नये, सर्व लोकांच्या समक्ष चौकशी करावी आणि स्वतःच्या एकट्याच्या बुद्धीप्रमाणे निर्णय न देता, विद्वान आणि - समाज यांच्या साहाय्याने निर्णय करावा, असे स्मृतिकार सांगतात.

प्राचीन आणि मध्ययुगीन काळात भारतात सर्वच न्यायालयांना सदसद्विवेकबुद्धी आणि शास्त्रवचने यांचा समन्वय करून न्यायदान करावे लागे.

श्रमशास्त्राप्रमाणे होणारे निवाडे हे दोन्ही म्हणजे दिवाणी व फौजदारी स्वरूपाचे असत.

वेदपूर्व काळापासून ते १३व्या शतकापर्यंत सर्व भारतभर वेगवेगळ्या स्मृतींच्या आधारावर न्यायदान केले जाई. या चरित्रकोशाची मर्यादा लक्षात घेता, या प्राचीन काळातील न्यायव्यवस्थेचा तपशीलवार आढावा घेण्याचे कारण नाही. तथापि १३व्या शतकापर्यंत स्मृतिकारांनी जे धर्मशास्त्र घालून दिले, त्याच्या आधारावर न्यायदान होई; एवढे नमूद केले पाहिजे.

महाराष्ट्राची स्वतंत्र अस्मिता तशी हळूहळू उदयाला आली.

यादवांचे देवगिरीचे साम्राज्य, महाराष्ट्राच्या अस्मितेचा पहिला हुंकार मानायला काही हरकत नाही. 'विवेकसिंधु'पासून 'ज्ञानेश्वरी'पर्यंतचे प्रारंभीचे मराठी साहित्य मात्र काळातील होय. म्हणून १३व्या शतकापासून महाराष्ट्र प्रदेशात कशा प्रकारची न्यायव्यवस्था होती, त्याचा ढोबळमानाने आढावा घेणे योग्य होईल.

महाराष्ट्र म्हणून जेव्हा हा प्रदेश उदयाला येऊ लागला व पुढे हळूहळू त्याची भौगोलिक सीमा, संस्कृती, राज्य असे स्थापन झाले; तेव्हा काही आत्तासारखे महाराष्ट्र राज्य नव्हते. वेगवेगळ्या राज्यकर्त्यांच्या अमलाखाली, वेगवेगळ्या भूभागांवर अनेक राज्ये अस्तित्वात होती. ती राज्ये स्थापन होत होती, मोडत होती. त्यांचे भूगोलही बदलत होते. लहान-मोठे राज्यकर्ते आपापल्या पद्धतीने राज्यकारभार व न्यायदान करीत होते. स्थानिक भेदानुसार त्यात अनेक प्रकारचे फरकही होते.

येथे प्राचीन महाराष्ट्रातील न्यायव्यवस्थेचा परिचय ढोबळमानाने करून दिला आहे. इ.स. १३०० पासून जे प्रमुख राज्यकर्ते महाराष्ट्रावर राज्य करून गेले, त्यांची न्यायव्यवस्था कशा स्वरूपाची होती, त्याचे विहंगमावलोकन येथे केले आहे.

### महाराष्ट्रातील न्यायदान व्यवस्था

इ.स. १३०० नंतर महाराष्ट्रात जी न्यायदान व्यवस्था अस्तित्वात होती, त्याबाबत श्री. वि. त्र्यं. गुणे यांनी 'The Judicial System of Marathas' हा संशोधनपर प्रबंध प्रसिद्ध केला आहे. त्यावरून या ठिकाणी मुख्यतः विवेचन केले आहे. कारण महाराष्ट्रातील तत्कालीन न्यायव्यवस्था ज्यावरून कळून येईल, अशी निश्चित स्वरूपाची अधिकृत माहिती नाही.

श्री. गुणे यांनी तत्कालीन मजहर, निवाडापत्रे, काही मूळ अस्सल कागदपत्रे, तत्कालीन राज्यकर्त्यांच्या आज्ञा, वतनपत्रे, निकालपत्रे अशी अनेक प्रकारची कागदपत्रे अभ्यासून हा प्रबंध तयार केला आहे आणि त्यावरून ही न्यायव्यवस्था कशी होती, त्याचे निष्कर्ष काढले आहेत.

इ.स. १३०० पासून इ.स. १८१८ पर्यंतचा, म्हणजे पेशवाईचा अस्त होईपर्यंतचा कालखंड विचारात घेता, डॉ. गुणे यांनी त्याचे पाच भाग केले आहेत. ते असे -

क) महंमद बिन तुघलकाचा काळ (इ.स. १३०० ते १३४७)

ख) बहामनी सुलतानांचा काळ (इ.स. १३४७ ते १४९०)

ग) अहमदनगरच्या व विजापूरच्या सुलतानांचा काळ (इ.स. १४९० ते १६५०)

घ) शिवाजी आणि त्यांच्या वारसांचा काळ (इ.स. १६५० ते १७५०)

ङ) पेशवाईचा काळ

(इ.स. १७५० ते १८१८)

डॉ. गुणे यांनी जरी असे पाच कालखंड केले असले, तरी या एकूण ४५० वर्षांच्या काळात न्यायदान व्यवस्था सर्वसाधारणपणे एकसारखीच होती. राज्यकर्तेच बदलल्याने मात्र त्या अनुषंगाने काही बदल झाले तेवढेच.

### महंमद बिन तुघलकाचा काळ

देवगिरीचे यादवांचे राज्य इ.स. १३१८ मध्ये बुडाले. तोपर्यंत हिंदुधर्मशास्त्रे व परंपरागत पद्धतीचीच न्यायव्यवस्था भारतात सर्वत्र होती व म्हणून महाराष्ट्रातही प्रचलित होती. १३ व्या शतकात मुसलमान सत्ता महाराष्ट्रात आली. महंमद बिन तुघलक इ.स. १३२५ मध्ये सिद्धीच्या तख्तावर बादशहा म्हणून आला. महाराष्ट्राचा बराच भाग तसेच देवगिरीच्या यादव साम्राज्याचा भाग त्याच्या ताब्यात आला. त्यामुळे परंपरागत न्यायव्यवस्थेत काही महत्त्वाचे बदल झाले. ते महंमद तुघलक याने केले.

सगळ्यात महत्त्वाचा बदल असा की, त्यापूर्वी जी हिंदू न्यायदानपद्धती होती, त्यात राजाचे जे स्थान होते, ते बादशहाकडे आले.

बादशहा हा सर्वच राज्य प्रशासनाचा प्रमुख झाला. त्याला मदत करण्यासाठी मुख्य प्रधान म्हणजे 'वझीर' किंवा त्याला 'नायब' असेही म्हणत, तो नेमला गेला. इतर अधिकारी व शेकडो कारकून असा कर्मचारिवर्ग मिळून बादशहाची केंद्रीय शासनप्रणाली बनली होती. त्याने कारभाराच्या सोयीसाठी 'दिवाण' नेमून, अनेक खाती निर्माण केली व त्याप्रमाणे खातेवार प्रशासन चालवले होते. दिल्ली ही त्याची राजधानी होती. महाराष्ट्रासाठी देवगिरी येथून त्याचा या प्रदेशाचा वजीर कारभार पाहत असे.

त्याच्या ताब्यात महाराष्ट्राचा जो प्रदेश होता, त्याचे त्याने प्रशासनाच्या सोयीसाठी प्रभाग पाडले.

इक्लिम (प्रदेश) – वली किंवा नायब किंवा अमीर–उल–उमराव हा प्रमुख

शिक् (जिल्हा) – अमील, नझीम किंवा शिकदार हा प्रमुख

महिनाह (गाव) – कोतवाल किंवा अमीर

शदि (परगणा) – सुमारे १०० गावांचा प्रदेश अमीर–इ– शदाह हा प्रमुख.

या सर्व अधिकाऱ्यांच्या नेमणुका सुलतान करीत असे व ते सर्व जण त्यास जबाबदार असत. यातील वली किंवा नायब खालच्या सर्वांकडून बादशहाचे कर, शेतसारा इत्यादी वसूल करून सुलतानाकडे जमा करीत असे.

यात वैशिष्ट्य असे की, ही परगण्यापासून वरची प्रशासनव्यवस्था आहे. म्हणजे तालुका स्तरापर्यंतची व्यवस्था म्हणता येईल. मात्र 'ग्राम'पातळीवरील प्रशासनाचा यात समावेश नाही. ग्रामपातळीवर पूर्वापार जी पद्धत होती, ती तशीच चालू राहिली.

मागे नमूद केलेले अधिकारी हेच दिवाणी प्रशासन व लष्करी प्रशासन दोन्ही पाहत असत.

हिंदू राजांच्या वेळी, म्हणजे तुघलकाच्या अगोदर गावपातळीवर गावातील रहिवासी ग्रामसभेत सर्वांसमोर न्यायदान करीत, निवाडा करीत. ती पद्धत याही काळात तशीच चालू राहिली. महंमद बिन मुघलकाची कारकिर्द संपुष्टात येऊन त्याचे जागी बहामनी राज्य आले.

### बहामनी सुलतानांचा काळ

बहामनी सुलताननेही आपले राज्य चार विभागांत विभागले होते. त्या प्रत्येक विभागाला 'तर्फ' म्हणत. आपले चार मुलगे त्याने त्या विभागांवर 'तरफदार' म्हणून नियुक्त केले. आपल्याला इतिहास असे सांगतो की, हेच चार तरफदार पुढे स्वतंत्र बादशहा बनले व बहामनी राज्याचे तुकडे झाले.

अल्प प्रमाणात का होईना, पण जहागीरदारही नेमले जात. हे जहागीरदार सुलतानाच्या दरबारचे सदस्य असत व दुसरीकडे सुलतानाचे प्रतिनिधी म्हणून आपापल्या जहागिरीतील सर्व बाबी पाहत असत. विशिष्ट विभागासाठी 'मोकासदार' नेमलेले असत. सरकारी शेतसारा व कर जमा करण्यासाठी शासन जी प्रमुख

ठिकाणे नेमून देत असे, त्याला 'मोकासा' म्हणत. त्या-त्या मोकासदाराने कारकून किंवा हवालदार नेमून त्यांच्याकरवी वसूली करून घ्यावे असे होते.

त्या काळी सारावसुली, मुलकी अंमलदारांच्या अधिकारांचे विवाद, अशा स्वरूपाचे निवाडे अधिकारपरत्वे हे अधिकारी करत. असे दिसते की, ग्रामपातळीवर ज्यांचे निवाडे होऊ शकत नसत, अशा सर्वच दिवाणी व फौजदारी बाबींचे निर्णय हे अंमलदारच करीत असावेत.

बहामनी राज्यात केंद्रीय प्रशासन म्हणजे 'शाही तख्त' याचा अर्थ दरबार. हा सुलतान त्याचा मुख्य असे. वझीर, जहागीरदार, अमीर इत्यादी त्याचे सदस्य असत. वकील-इ-सुलतान म्हणजे मुख्य प्रधान. वजीर-इ-कुल म्हणजे वेगवेगळ्या खात्यांचे प्रमुख किंवा 'दिवाण' होत. मुख्य न्यायाधीशाला 'सद्र-ए-जहान' म्हणत. धार्मिक बाबी व धर्मादाय खात्याचा मंत्री म्हणूनही तो काम पाहत असे.

बहामनी राज्यात वेगवेगळ्या वझीरांना, वेगवेगळे प्रांतही नेमून दिले जात. एकीकडे ते सुलतानाचे मंत्री म्हणून काम पाहत, तर दुसरीकडे त्यांच्या-त्यांच्या प्रांतांचे 'तरफदार' म्हणजे प्रमुख म्हणूनही काम पाहत.

## अहमदनगरच्या व विजापूरच्या सुलतानांचा काळ

निजामशाहीची आणि आदिलशाहीची राज्ये हा नंतरचा टप्पा आहे. बहामनी काळातील राज्यव्यवस्थाच या शाह्यांच्या काळातही चालू राहिली. किरकोळ फेरफार केले गेले, पण ते महत्त्वाचे नव्हते.

अगदी यादवांच्या काळापासून कदाचित त्याही अगोदरपासून गावपातळीवरील तंटे सोडविण्याची व्यवस्था, पिढ्यान्‌पिढ्या कायमच राहिली. ती म्हणजे 'मजलिस' व 'गोत' पद्धती. 'गोत' यात गावचा मोकादम, कुलकर्णी, देशमुख, देशपांडे आणि इतर मिराशी हक्कदार यांचा समावेश होई. 'ठाणा गोत' असाही उल्लेख येतो. न्यायनिवाडा करण्यासाठी गोत एकत्र जमत असत त्याला 'गोतसभा' म्हटले जाई. ते आपले कामकाज सर्व ग्रामस्थांसमोर उघडपणे चालवीत.

एखाद्या प्रमुख ठिकाणी म्हणजे परगण्याचे किंवा तालुक्याचे काम 'मजलिस' पाहत असे. सहसा किल्ला हे असे केंद्र असे.

ही व्यवस्था, दिवाणी स्वरूपाचे म्हणजे वाटणीचे, हद्दीचे, वतनाचे इत्यादी खटल्यांचे निकाल करीत असे आणि स्थानिक स्वरूपाचे फौजदारी गुन्ह्यांचेही निवाडे करीत असे. फारच थोडे असे मोठे तंटे इख्तखाना म्हणजे दरबारपर्यंत जात.

मुसलमानी काळातील न्यायदान व्यवस्था सर्वसाधारणपणे कशी होती, ते मागे सांगितले आहे. पण तशी ती बांधीव, रेखीव किंवा नियमबद्ध व्यवस्था नव्हती. बादशहा, त्याचे वझीर त्यांच्या अमलातील प्रदेश; हे सर्व साचेबंद नव्हते. म्हणून सोयीनुसार किंवा त्या-त्या वेळी जे हुकूम दिले जात, त्यानुसार यात खूप फेरफार होत. त्याचा तपशील सापडणेही आता अवघड आहे.

## शिवाजी महाराज आणि त्यांच्या वारसांचा काळ

शिवाजी महाराजांच्या कालखंडात, त्यांनी आपल्या राज्यात चोख न्यायव्यवस्था व प्रशासनव्यवस्था निर्माण केली. प्रारंभीच्या काळात शिवाजी महाराज, हे पुणे जहागिरीचे जहागीरदार म्हणूनही काम पाहत होते. त्यांना त्यामुळे प्रशासन व न्यायदान या दोन्हींचा अनुभव आला. आपल्या जहागिरीच्या प्रशासनातही त्यांनी खूप फेरबदल केले होते.

इ. स. १६७४ मध्ये महाराजांना राज्याभिषेक झाला. त्यानंतर ते राज्याचे प्रमुख 'राजा' झाले. राज्यव्यवस्थेसाठी त्यांनी 'राजमंडळ' स्थापन केले. तेच अष्टप्रधान होत. त्यांत न्यायदान विभाग पाहणाऱ्या मंत्र्यांनाच 'पंडितराज' हा किताब होता. हे राजमंडळ एकीकडे राजाला कारभारविषयक सल्ला देत असे. राजाच्या वतीने निघणाऱ्या आज्ञांवर ते राजानंतर मुद्रा (सहमा) करीत. पण ज्या वेळी एखाद्या महत्त्वाच्या व मोठ्या खटल्याचा निकाल करण्यासाठी हे राजमंडळ बसत असे, त्या वेळी त्याला 'राजमुद्रा' किंवा 'राजसभा' म्हणत. न्यायदान करणे हे त्यांचे काम होते.

याच राज्यसभेला फारसी भाषेत ‘हुजूर हजिर मजलिस’ असेही म्हटले आहे. अष्टप्रधानांपैकी ज्यांना काही परगण्यांचा कारभार सोपविला असेल, त्या-त्या सुभ्यात ते प्रशासनाबरोबरच न्यायदानाचेही काम पाहत.

स्थानिक पातळीवर पूर्वीप्रमाणेच ‘गोत’ व ‘मजलिस’ न्यायदानाचे काम करीत. यात शिवकाळात असा बदल करण्यात आला की, नेहमीच्या गोतसभा किंवा मजलिसमध्ये स्थानिक सरकारी अधिकारीही भाग घेत असत. शिवाजी महाराज वेळोवेळी आपल्या अधिकाऱ्यांच्या बदल्याही करीत असत. शिवाय अशा अधिकाऱ्यांना महाराज नगद पगार देत, त्यांना जमिनी किंवा वतने नव्हती. त्यामुळे त्यांना मनमानी करता येत नसे. त्यांच्याविरुद्धच्या तक्रारीही अष्टप्रधान किंवा महाराज ऐकून घेऊन निवाडा करीत. अशा प्रकारे कारभारावर व न्यायदानावर प्रत्यक्ष राजा व अष्टप्रधान देखरेख करीत असत.

शिवकाळात न्यायाधीश किंवा पंडितराव असे मुख्य नायाधीशाचे पद निर्माण केले होते. दिवाणी, फौजदारी व धर्मविषयक असे सर्व विवाद त्यांच्या कार्यकक्षेत येत. निराजी रावजी हे शिवाजी महाराजांचे पहिले प्रधान न्यायाधीश होते. त्यानंतर प्रल्हाद निराजी, कान्हेरे जगन्नाथ, असे न्यायाधीश झाले. राजाराम महाराज जेव्हा जिंजीला गेले, तेव्हा महाराष्ट्रात त्यांच्या वतीने कारभार करण्यासाठी ‘प्रतिनिधी’ हे पद निर्माण करण्यात आले. कारण हरएक प्रसंगी जिंजीस जाणे अगर प्रत्यक्ष छत्रपतींकडून निर्णय घेणे अशक्य होते. छत्रपती शिवाजी, संभाजी, राजाराम, शाहू यांच्या कारकिर्दीत थोड्याफार फरकाने ही व्यवस्था चालू होती.

स्थानिक पातळीवर म्हणजे गाव, तालुका, परगणा या पातळीवर जी न्यायदान व्यवस्था होती; ती पेशवाईच्या अखेरपर्यंत किरकोळ फेरफार सोडून सर्वसामान्यपणे होती तशीच कामात होती. सुभेदार, सरसुभेदार, दिवाण असे अधिकारीही या न्यायव्यवस्थेचे भाग म्हणून काम करीत.

इ.स. १३०० ते १६५० म्हणजे शाहू महाराजांच्या कारकिर्दीच्या अखेरपर्यंत न्यायव्यवस्थेची रचना सर्वसाधारणपणे मागे वर्णन केल्याप्रमाणे होती.

ही व्यवस्था विचारात घेताना, त्या काळी एकूण परिस्थिती कशी होती, ते विचारात घ्यावे लागेल. वतने, वसूल, कर आकारणी, कोणाचे पद कोणाला जायचे, नेमणुका अशा बाबी म्हणजे आज आपण ज्याला रेव्हेन्यू खाते म्हणू, त्या प्रकारचे निवाडे, हे मुख्य काम न्यायदानाच्या कार्यक्षेत्रात होते व ते काम परगणा, तालुका व राज्य पातळीपर्यंतचे अधिकारी करीत. बहुधा फौजदारी गुन्ह्यांचे निवाडेही तेच करीत.

इतर दिवाणी व किरकोळ फौजदारी गुन्ह्यांचे निवाडे ‘गोत’ ‘मजलिस’ अशा स्थानिक संस्था करीत. ‘मजहर’ किंवा ‘निवाडापत्र’ या स्वरूपात मोठ्या खटल्यांचे निकाल लिखित स्वरूपात उपलब्ध आहेत. त्यावरून हे निर्णय, निदान मोठ्या खटल्यांच्या बाबतीत तरी लिखित स्वरूपात दिले जात.

### पेशवाईचा काळ

पेशवेकाळात त्यांनी पेशव्यांचे मुख्य न्यायाधीश असे पद निर्माण केले होते. रामशास्त्री प्रभुणे हे असे मुख्य न्यायाधीश होते. न्यायदानाबरोबरच राज्यातील एकूण कामकाजावरही त्यांचे नियंत्रण असे. बाकीची प्रशासनव्यवस्था व न्यायव्यवस्था पूर्वीप्रमाणेच होती.

फौजदारी खटल्यांचा निकाल करताना साक्षीपुरावे घेण्याची पद्धत तर होतीच, पण ‘दिव्य करणे’ हीही प्रथा होती. मुख्यतः दंडाची शिक्षा जास्त प्रमाणात दिली जात असे. ‘प्रायश्चित्त’ हाही प्रकार होता.

पेशवे काळात काही मोठ्या शहरांसाठी ‘कोतवाल’ हे पद निर्माण केले होते. तो पोलिसांचा प्रमुख होताच, पण त्याला काही प्रमाणात न्यायदंडाधिकारी या पदाचे अधिकारही होते.

‘हरकी’ किंवा ‘गुन्हेगारी’ या स्वरूपात कोर्ट फी घेतली जात असे, पण त्याचे निश्चित नियम नव्हते.

‘जातपंचायत’ ही त्या-त्या जातीच्या चालीरीतीप्रमाणे, रुढीप्रमाणे निवाडे करी व त्याला मान्यता होती.

धार्मिक बाबतीतील अपराध हे राजा, ब्रह्मसभा व जातिसभा यांचेद्वारे सोडविले जात. ९शिक्षा भोगायची पद्धती मात्र थोडी वेगळी होती. एखाद्या खटल्यात राजाने

किंवा त्याच्या न्याययंत्रणेने शिक्षा दिली म्हणजे ती तर भोगावी लागेच, पण त्याशिवाय गुन्ह्याचे जे पातक घडले, त्यातून मुक्ती मिळावी म्हणून 'देवदंड' किंवा 'प्रायश्चित्त' घ्यावे लागे. मगच तो समाजात वावरायला पात्र समजला जाई. हे प्रायश्चित्त प्रमुख तीर्थक्षेत्री असणाऱ्या ब्रह्मसभेकडून ठरविले जाई. ते त्याने पूर्ण केले म्हणजे, ती सभा त्याला 'दोषपत्र' म्हणजे दोष मुक्तिपत्र देत असे.

एवढ्याने संपत नसे, त्याला आपल्या कुवतीप्रमाणे आपल्या जातिबांधवांना 'गोताई' म्हणजे जेवण घालावे लागे. म्हणजे मग तो 'पंक्तिपात्र' झाला. अशी तीन प्रकारची शिक्षा भोगावी लागे. हे अर्थात धार्मिक अपराधापुरतेच होते. इतर अपराधांसाठी गोत किंवा मजलिसने दिलेली शिक्षा भोगली की भागत असे.

एकंदरीने इ.स. १३०० ते पेशवाई अखेरपर्यंत न्यायदान व्यवस्थेचे स्वरूप थोड्याफार फरकाने मागे तपशील दिल्याप्रमाणे होते. राज्यकर्ते बदलले, तरी स्थानिक स्वरूपाची न्यायदान व्यवस्था कायमच राहिली. राज्यकर्त्यांनीही तिच्यात फारशी ढवळाढवळ केली नाही.

पेशवाईच्या अस्तानंतरही इंग्रजी राजवटीत प्रभाग कंपनी सरकार होते, तेवढ्या काळात हीच न्यायव्यवस्था प्रचलित राहिली. नंतर मात्र रितसर सर्व भारतभर इंग्रजांची न्यायव्यवस्था अमलात आली.

* * *



अंबेजोगाईच्या इ. स. १२४० च्या खोलेश्वराच्या शिलालेखात संस्कृतचा मराठीत तर्जुमा सांगण्याची गरज, आंबेजोगाईच्या शिलालेखात 'मराठी भाषा ही सगळ्या महाराष्ट्राची भाषा' असल्याचा उल्लेख, पंढरपूरच्या विठ्ठलाच्या छोट्या मंदिराची धार्मिक दृष्टीने महत्त्वाची असलेली घटना मराठी भाषेत कोरलेली असणे; या घटना मराठीचा तत्कालीन समाजातील वाढता वावर सिद्ध करणाऱ्या आहेत. अकराव्या शतकातील दिवे-आगरच्या पहिल्या ठरणाऱ्या शिलालेखातही मराठी क्रियापदांची, शब्दयोगी अव्ययांची असलेली रूपे यांमधून त्यापूर्वी निदान दोन-तीन शतके तरी मराठीचा उगमकाळ मागे न्यावा लागतो. म्हणूनच आठवे-नववे शतक हा तिचा उगमकाल मानण्याकडे संशोधकांचा कल आहे.



पायथ्याशी मराठी शिलालेख असलेली बाहुबली मूर्ती

# मराठी भाषेचा विकास

■ डॉ. लीला गोविलकर

भाषेच्या विकासाशी तिच्यातील प्रवाहिततेचा संबंध अस्पष्ट असतो. जिवंत भाषेत नेहमीच बदल घडत असतो. हे बदल प्रामुख्याने कालिक, प्रादेशिक व व्यावसायिक या पातळ्यांवर लक्षात घेतले जातात. राजकीय, सामाजिक, धार्मिक स्थित्यंतरे व त्यांमुळे अन्य भाषांशी तिचा येणारा संपर्क हेही भाषाबदलांना कारणीभूत असतात. यांपैकी सगळेच बदल सखोल परिणाम करणारे असतातच असे नाही. मुख्य म्हणजे हे सर्वच बदल तिच्या विकासाला पोषक असतातच असे नाही. तिच्या विकासाला पोषक ठरणाऱ्या बदलांमुळे तिच्यात स्थित्यंतरे होत जातात. पण तिच्यातील मूल प्रवृत्तींना विरोधी ठरणाऱ्या बदलांमुळे तिच्यातून नवभाषा निर्माण व्हायला प्रारंभ होतो. मराठीच्या कालसापेक्ष स्थित्यंतराचा इतिहास हा तिच्या बदलांतून घडलेला तिच्या विकासाचा

दर्शक आहे. तर तिच्या जननीभाषेचा शोध घेण्याची प्रक्रिया ही त्या जन्मभाषेतील बदल तिच्यातून मराठीसारखी नवभाषानिर्मितीला पोषक ठरणारी घटना आहे.

कोणत्याही भाषेचा विकास लक्षात घेताना तिची जन्मभाषा, जन्मभूमी, तिचा उगमकाळ, जन्मपूर्वकालापासून तिच्यावर (तिच्या जन्मभाषेवर) परिणाम करणाऱ्या भाषाभगिनी इत्यादींचा विचार करावा लागतो. यांमधून तिचे स्वरूप घडत असते. मराठीच्या संदर्भात महाराष्ट्री-अपभ्रंश ही तिची जन्मभाषा, संस्कृत-प्राकृतादी आर्यभाषा, कन्नड, तमिळ, तेलगू या तिच्या जन्मपरिसरातील तिच्या जन्मपूर्वकालापासूनच्या भाषा, अन्यदेशीय भाषा यांमधून तिची जडणघडण व तिचा विकास साधलेला आहे. यादवपूर्व निर्माण झालेल्या या भाषेचा एक टप्पा पेशवेकाळापर्यंत मानला जातो. वर्तमानकाळापेक्षा या कालखंडाचे स्वरूप वेगळे आहे. प्रथमतः हे वेगळेपण लक्षात घ्यावे लागते.

तिचा उगमकाल निश्चित करताना संस्कृत-प्राकृत-अपभ्रंशादी भाषांमधील ग्रांथिक उल्लेख व शिलालेख-कोरीव लेख-ताम्रपट यांच्या व यादवकाळ ते पेशवेकाळ या कालखंडात हस्तलिखिते, पोथ्या, बाडे, पत्रव्यवहार यांचा आधार घ्यावा लागतो. हे सर्व मध्ययुगीन साहित्य लिखित स्वरूपातील आहे. पण त्या कालातील कीर्तने, पारायणे, भारुडादी लोकसाहित्य-संपर्कमाध्यमे ही प्रामुख्याने मौखिक आहेत. या साहित्याच्या निर्मितीतही (वक्ता-श्रोता, गुरु-शिष्य) अशा संवादमाध्यमाला महत्त्व आहे. म्हणून हे लिखितरूप म्हणजे 'मौखिकतेकडून मौखिकतेकडे नेणारा सेतू'.

या हस्तलिखितांमध्ये नकलाकारांमुळे निर्माण होणारे पाठभेद, हा फार मोठा अडथळा असतो. कालिक मौखिकतेमुळे त्याचे अर्वाचिनीकरणही होत असते. लेखन पाहण्याची सवय नसलेल्या त्या काळात, मोडीलिपी व लेखन-नियमांतील अनिश्चितता यांमुळे तिच्या भाषिक स्वरूपाबद्दल बोलताना खूप सावधानता बाळगावी लागते. विविध संप्रदायांतील उपासकांच्या निष्ठेमुळे निदान हे साहित्य टिकून राहू शकले. या काळात ज्योतिष, वैद्यक इत्यादी क्षेत्रांतही साहित्यनिर्मिती झाली आहे, असे काही संशोधक मानतात. पण ते साहित्य टिकले नाही. टिकलेल्यापैकी पुष्कळसे साहित्य पद्यरूपी आहे. या पद्यरूपामुळे तत्कालीन मराठीतील वाक्यरचनेचे निश्चित स्वरूप सांगणे अवघड जात असले, तरी तिची ध्वनिव्यवस्था, प्रत्ययव्यवस्था (रूपप्रक्रिया), शब्दसिद्धीचे प्रकार, तिची सामान्यरूप करण्याची प्रवृत्ती, तिच्यातील शब्दयोगी अव्ययांचा वाढता उपयोग व तिची शब्दसंपत्ती यांबद्दल माहिती मिळू शकते.

भाषेची जडणघडण व्यावहारिक, ललित व शास्त्रीय अशा तीन क्षेत्रांतून लक्षात घेता येते. या तीनही क्षेत्रांचा एकमेकांशी असलेला संबंध भाषाविकासाच्या दृष्टीने महत्त्वाचा असतो. व्यावहारिक पातळीवर व मुख्यतः बोलण्याच्या मार्गाने घडत असलेल्या नवनव्या भाषाविशेषांना ललित-शास्त्रीय लेखनाने स्थैर्य लाभत असते. या तीन क्षेत्रांतील भाषा-बदलांचा संबंध भाषेच्या स्थित्यंतराशी असतो. व्यावहारिक क्षेत्रात भाषेने स्वीकारलेल्या बदलांची नोंद, जेव्हा ललित-शास्त्रीय क्षेत्रातील भाषारूपात होत जाते, तेव्हा भाषेची फक्त स्थित्यंतरे होत जातात. पण जेव्हा लोकव्यवहारातील भाषेच्या बदलांचा ललित-शास्त्रीय क्षेत्रातील भाषारूपांशी असलेला संबंध दुरावत जातो, तेव्हा भाषेचा विकास मंदावतो व तिच्यातून नवभाषा निर्माण होण्याची परिस्थिती निर्माण होते. उदाहरणार्थ संस्कृतचा वैदिक, पाणिनीय व अभिजात हा कालिक विचार तिच्या स्थित्यंतरांचा इतिहास आहे. तिचा व्यावहारिक -बोलण्यातील संस्कृतशी संबंध आहे. पण हा संबंध दुरावत जाताच तिच्यातून प्राकृत भाषा निर्माण झाली. हीच स्थिती प्राकृतमध्ये उद्‌भवताच तिच्यातून अपभ्रंश भाषा निर्माण झाली व अशाच व्यावहारिक भाषारूपांचा ग्रंथ निविष्ट रूपांशी दुरावा वाढत जाऊ लागताच मराठी भाषा निर्माण झाली.

भाषेतील कोणत्या स्वरूपापर्यंतच्या बदलाला भाषेतील स्थित्यंतराचे स्थान असते, याबद्दल मतभेद असू शकतो. म्हणूनच डॉ. तगारे जिला महाराष्ट्री-प्राकृतचे कालिक स्थित्यंतर मानतात, ती भाषारूपे इतर संशोधकांना स्वतंत्र भाषा वाटतात. डॉ. तगारेंच्या मते, दहाव्या/अकराव्या शतकापर्यंतचे महाराष्ट्री-प्राकृतचे अपभ्रंश पावलेले भ्रष्ट

रूपच जैनांनी आपल्या संप्रदायाच्या प्रचारासाठी स्वीकारले आहे. (डॉ. गं. ना. जोगळेकर, मराठी भाषेचा इतिहास श्रीविद्या प्रकाशन, पृ. ६९) या त्यांच्या विधानातून ते महा–अपभ्रंशाच्या या दहाव्या/अकराव्या शतकातील रूपाला स्वतंत्र भाषा मानत नाहीत व तेच मराठीच्या जन्मभाषेचे रूप मानतात.

> जन्मभाषा निश्चित करताना तिच्या प्रादेशिक व व्यावसायिक बोलींच्या विशेषांची दखल घेतली गेलेली असतेच असे नाही, हे लक्षात घ्यायला पाहिजे. हस्तलिखितामधील भाषा ही प्रमाण भाषा असेलच असेही मानता येत नाही. ती लेखकाची प्रादेशिक पातळीवरची बोली–भाषाही असू शकते. त्यामुळे आपल्यापर्यंत न आलेल्या त्या भाषेच्या काही वैशिष्ट्यांचा नवभाषेवर परिणाम घडलेला असलेही, हे मान्य करावे लागते.

प्रत्यक्ष मराठीच्या कालिक इतिहासातही असे तत्कालीन प्रादेशिक बदलते स्वरूप जाणवले आहे. यादवकालीन लीळाचरित्र व ज्ञानेश्वरी या दोन्ही ग्रंथांतील शब्दांमध्ये बदल जाणवतो. ज्ञानेश्वरीत नसलेले अनेक शब्द लीळाचरित्रात असल्याची नोंद डॉ. शं. गो. तुळपुळेंनी केलेली आहे. (लीळाचरित्र–उत्तरार्ध २, प्रस्तावना, पृ–५५) काकू (कला), गुंफा (झोपडी), साजे (लहान देऊळ), खाटदांडी (डोली) वोहारी (बायको), वरैत (नवरा), वासना (मत) इत्यादी. हे शब्द ज्ञानेश्वरीत न येण्याचे कारण प्रादेशिक बोलीरूपे हे असू शकते. चक्रधरांच्या विदर्भ, मराठवाडा, आंध्र, नगर इत्यादी भ्रमणप्रदेशांतील मराठीची ती बोलीरूपे असू शकतील. डॉ. डोळकेंसारख्या महानुभावी संशोधकास लीळाचरित्रातील भाषा ही वऱ्हाडी बोलीचे उगमस्थान वाटते. (डॉ. सु. म. डोळके–पंचभाषिते, प्रकाशक–रा. ग. डोळके २००४ पृ. ९,७८.)

तत्कालीन शिक्षणपद्धतीमध्ये मराठीस कितपत स्थान होते, याचा विचारही तिच्या विकासामध्ये लक्षात घ्यावा लागतो. एवढी मोठी राज्ये–साम्राज्ये ज्या महाराष्ट्रात उभी राहिली, त्यासाठी आवश्यक असलेले शास्त्रीय व शास्त्रशुद्ध ज्ञान संस्कृत–मराठी वा अन्य भाषा यांच्या माध्यमातून शिक्षणपद्धतीत दिले जात असणारच. पण या क्षेत्रातील मराठीचे स्थान स्पष्ट करणारी ग्रंथसंपदा उपलब्ध नाही. धर्मशास्त्र–वेदान्त यांचा अपवाद वगळता या क्षेत्रातील ज्ञानभांडार टिकलेले नाही. पण असे साहित्य निर्माण झाले असावे, हे मत मांडताना इतिहासाचार्य राजवाडे तर ''मराठी गद्य व पद्य या लेखांपैकी सर्वांत प्राचीन म्हटले म्हणजे मराठी गद्य लेखच होत. शके ५०० पासून मराठी गद्य लेख सापडतात. मराठी पद्य शतक ११०० पासून सापडते.''(भाईगै, आश्विन–फाल्गुन शके–१८३४, पृ. १३१) गद्यलेखननिर्मितीला प्रारंभीचे स्थान असल्याचे ते मानतात. हे मान्य केले, तर संप्रदायप्रसारासाठी मौखिक प्रसारमाध्यमे स्वीकारावी लागल्याने मराठीने केलेला पद्याचा स्वीकार हा तिचा खास विशेष ठरतो. संप्रदायनिष्ठा व प्रसारमाध्यमासाठी पद्याचा स्वीकार यांमुळे हे साहित्य टिकू शकले.

**भाषिक विकास संकल्पना –** भाषेच्या विकासाच्या कल्पनेत भाषेतील वर्ण व शब्द यांचे स्थान कोणते? वर्णसंख्या हा भाषेच्या स्वतंत्र अस्तित्वाचा महत्त्वाचा व प्राथमिक विशेष मानावा लागतो. प्रत्येक भाषेची वर्णमाला ही दुसऱ्या भाषेच्या वर्णमालेसारखी तंतोतंत कधीच नसते. पण वर्णबदल हा तिच्या विकासाचा घटक नसतो. मराठीची वर्णमाला ही संस्कृत–प्राकृत–अपभ्रंशादी भाषांपेक्षा काही प्रमाणात वेगळी आहे. तिच्यात संस्कृतसारखीच. ऐ–औसारखी संयुक्त व्यंजने असली, तरी ती तत्सम व तद्भव अशा दोन्ही शब्दांद्वारे आलेली आहेत. बहामनी कालात फारसीतील 'क़,ख़' ह्यांच्या उच्चारांमुळे मराठीतील कंठयवर्णीय क–खच्या उच्चारांतही भर पडलेली आहे. 'च–ज' चे दंततालव्य उच्चारण हा तिचा विशेष आहे. तिच्या उच्चारणातील हे बदल लिखिताच्या मर्यादित कक्षेतही बदल म्हणून लक्षात येऊ शकतात. पण त्याचा तिच्या विकासाशी फारसा संबंध नसतो.

भाषेची शब्दसंख्या हा मात्र तिच्या विकासाचा द्योतक असतो. सध्या प्रमाणभाषा, बोली, व्यवसाय, अपशब्द, साधित शब्द हे सारे एकत्र केल्यास मराठीची शब्दसंख्या ५० लाख मानली जाते. मध्ययुगीन कालखंडातील मराठी शब्दसंख्या निश्चितपणे सांगता येणे अवघड आहे, कारण अध्यात्म, वेदान्त, कथात्मक वाङ्मय, राजकीय/

ऐतिहासिक पत्रव्यवहार या व्यतिरिक्तचे तत्कालीन साहित्य व प्रत्यक्ष व्यवहारात-बोलण्यात असलेल्या मराठी भाषेमधील शब्दसंख्या कळू शकत नाही. या शब्दांमध्ये तत्सम शब्दांचा भरणा विपुल आहे. बहुजनांच्या भाषेतील शब्द तत्सम-तद्‌भव-व्यावसायिक आहेत.

प्रत्येक कालखंडातील महाराष्ट्रातील बदलत्या राजकीय-सांस्कृतिक वातावरणाचा परिणाम संस्कृतादी शब्दांच्या टक्केवारीवर होत आलेला आहे. पण अमराठी शब्दांना मराठीत रुळवून घेऊन त्यांना मराठीपण देण्यामुळे यादव ते पेशवे या काळात मराठीची शब्दसंख्या झपाट्याने वाढलेली दिसते. हे मराठीपण देण्याचे तिचे कौशल्य प्रत्येक कालखंडात व प्रत्येक भाषेगणिक थोडे वेगळेही आहे. पण प्रत्यय, उपसर्ग, शब्द, धातुसाधिते यांच्या आधारे तिने आपले शब्दभांडार संपन्न केले आहे. यादवकालीन मराठीत पहुडू-उपहडू किंवा भरवंसाचे नकारार्थी अभरवंसा अशा रूपांवरून तिचे शब्दसिद्धीचे मराठी प्रयत्न दिसतात. तत्सम शब्दांचेही व्यंजनान्त उच्चारण हा मध्यमराठीत प्रकर्षाने दिसणारा विशेष तिच्या शब्दक्षेत्रात संस्कृतपेक्षा वेगळेपणा आणतो. मात्र लिखितांच्या आधारे हे भेद निश्चितपणे लक्षात घेणे अवघड आहे.

संस्कृतमधील शब्दसिद्धीच्या जवळ-जवळ सर्व पद्धती मराठीने साधित शब्द घडविताना वापरल्या आहेत. नामापासून विशेषणे, धातू किंवा विशेषणांपासून नामे, धातू अशा विविध शब्दजातींतही तिने शब्दसिद्धी साधली आहे. संदेशनासाठी आवश्यक असलेल्या वाक्यरचनेतही मराठीने केवल-संमिश्र-संयुक्त अशा रचना सिद्ध केल्या आहेत. वाक्यघडणीसाठी नामादी शब्दजातींना कर्ताकर्मादी कारकार्थ व्यक्त करण्यासाठी जोडले जाणारे विभक्तिप्रत्यय व धातूस जोडले जाणारे आख्यातप्रत्यय यांमध्ये मराठीने प्रारंभापासूनच संस्कृतपेक्षा फार मोठा वेगळेपणा आणला आहे.

१) मराठीने संस्कृतातील पद कल्पना स्वीकारली नाही व मध्यमराठीत तर प्रथमा-द्वितीया यांचे प्रत्ययही समान झाले. सध्याच्या वर्तमान मराठीत तर प्रथमेला प्रत्यय लावण्याची गरज नाही.

२) तीनही लिंगांतील व सर्व प्रकारच्या अन्त्याक्षरांतील नामांसाठी मराठीने विभक्तिप्रत्ययांचा एकच साचा कायम केला.

३) पण सामान्यरूपाच्या विशेषांनी नामाचे लिंग व अन्त्याक्षर ओळखण्यावर भर दिला (उदा. माळ-स्त्री-अकारान्त-माळेने. पण माळ पुल्लिंगी, अकारान्त माळावर. माळा - पुल्लिंगी आकारान्त - माळ्यावर इत्यादी.) (सामान्यरूप म्हणजे नामाला विभक्तिप्रत्यय किंवा शब्दयोगी अव्यय लागण्यापूर्वी नामाच्या रूपामध्ये - विशेषतः अन्त्याक्षरामध्ये होणारा बदल होय.)

४) मराठीने संस्कृतातील द्विवचन गाळले.

५) वर्तमान मराठीत तर षष्ठीचा कारकार्थ रूपदृष्टीने विशेषणात्मक झाला आहे. (उदा. तस्य गृहम्, तस्य गृहाणि संस्कृत; पण मराठीत त्याचे घर, त्याची घरे.)

६) मराठीत विशेष्याचे प्रत्यय विशेषणाने न स्वीकारणे, अशा प्रसंगी फक्त आकारान्त विशेषणाचे सामान्यरूप होणे, हा संस्कृतपेक्षा वेगळेपणा आला.

७) मराठीत कारकार्थ दर्शविण्याचे कार्य हे प्रत्यय व शब्दयोगी अव्यये करतात. (अधिकरणार्थासारखा कारकार्थ तर मराठीत- अ) विभक्तिप्रत्यय गावांत, आ) शब्दयोगी अव्यय- घरातून व इ) क्रियाविशेषण अव्यय- तो भरभर लिहितो. अशा तीन मार्गांनी सांगता येतो.)

८) संस्कृत धातुसाधितावरून सिद्ध झालेली काही आख्याते मराठीत लिंगप्रत्ययही स्वीकारतात.

आजच्या वर्तमान मराठीतील हे बदल मराठीत कोणत्या काळात जाणवू लागले आहेत, हा भाषाविकास शोधाचा मार्ग आहे. संस्कृतमधील प्रयोग ही वाक्यरूपान्तर योजना आहे. पण मराठीतील प्रयोग हा एकेरी वाक्यातील कर्ता-कर्म-क्रियापदावर आधारलेला आहे. संस्कृतमध्ये सकर्मक कर्तरी प्रयोगाचा कर्मणी प्रयोग व अकर्मक कर्तरीचा भावेप्रयोग होतो. पण मराठीत कर्तरीचा कर्मणी करताना काही धातूंच्या संदर्भात भूतकाळच करावा लागतो. संस्कृत भावेप्रयोग अकर्मक असतो. पण मराठी भावेप्रयोग मात्र सकर्मक व अकर्मक असा दोन्ही प्रकारचा असतो.

(डॉ. लीला गोविलकर, मराठी व्याकरण-मेहता, प्रकाशन २००६ पृ. २६५ ते २८४) मराठीचे हे भाषिकरूप तिला कोणत्या कालखंडात येऊ लागले? विशेषतः ज्या काळात 'त्याने अंघोळ केली' हे कर्मणी प्रयोगी वाक्य स्थिरावले व 'तो अंघोळ केला' हे वाक्य बोली पातळीवर सरकले. त्याच्या आगेमागे मराठीची प्रयोगव्यवस्था संस्कृतपेक्षा वेगळी व्हायला प्रारंभ झाला असावा.

**कालिक शीर्षके –** मराठीचा कालखंडानुसार विचार करताना प्रामुख्याने यादव, बहामनी, शिव व पेशवे अशी नावे कालखंडांना देण्याची पद्धत होती. ही नावे तत्कालीन राजसत्तेशी निगडित आहेत. प्रजेच्या भाषेवर राजसत्तेच्या भाषेचा परिणाम होत असतो, ही दृष्टी त्यामागे आहे. राजवटीमधील बदल जसे सनावळींच्या आधारे निश्चित करता येतात, तसे भाषिक बदलांबद्दल म्हणता येत नाही. ते जेव्हा ठळक रूप धारण करतात, तेव्हा त्याची नोंद अंदाजता येते.

राजसत्तेच्या भाषेचा प्रजेच्या भाषेवरचा परिणाम प्राकृत, अपभ्रंश भाषांच्या काळातही जाणवतो.

१) इ.स.पूर्व २५० ते इ. स. २५० या काळात महाराष्ट्रावर ज्या सातवाहनांची सत्ता होती, ते मराठी भाषक नव्हते. त्यांची सत्ता आंध्र-कर्नाटकावरही होती. ते बौद्धधर्माभिमानी होते. पैठण ही त्यांची राजधानी. हा महाराष्ट्री-प्राकृतचा काळ आहे. भाषासंपर्काचा भाषाबदलाशी असलेला संबंध लक्षात घेता या काळात घडत असलेल्या महाराष्ट्री-प्राकृतवर कानडी, तेलगू अशा द्राविडी भाषांचा परिणाम गृहीत धरावा लागतो. डॉ. माणिक धनपलवारांच्या मते, महाराष्ट्र व आंध्र यांना जोडणारा प्राचीन दुवा म्हणजे प्रतिष्ठानचे शातवाहन होत. याच कुळातील शातवाहन राजाच्या 'गाथा सप्तशती' (संकलन इ.स. २/३ रे शतक) या ग्रंथातील प्राकृतचे रूप काही प्रमाणात तेलुगूशी जुळते आहे, असे काही तेलुगू अभ्यासक समजतात. श्री. तिरुमल रामचंद्र यांनी 'गाथा सप्तशती'तील काही शब्द व काही शब्दरूपे ही मूलतः तेलुगू होत असे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. मराठीत रूढ असलेल्या काही शब्दांचे मूळ तेलुगूत असावे. (दाक्षिणात्य साहित्य संस्कृतीचा मराठीशी अनुबंध- राज्य मराठी विकास संस्था, मुंबई १९९७, पृ.२३६)

२) नंतरच्या अडीचशे वर्षांत महाराष्ट्रावर ज्या वाकाटक घराण्याची सत्ता होती ते कन्नड की कोणत्या भाषेचे, याबद्दल निश्चित माहिती नाही. विदर्भातील वाशीम ही त्यांची राजधानी व तेही बौद्ध धर्माभिमानी होते.

३) बदामीचे चालुक्य यांनी वैदिक धर्माचा स्वीकार केला होता.

४) नंतरचे मान्यकूटचे राष्ट्रकूट घराणे हे डॉ. तगारेंच्या मते, मराठी, पण इतर संशोधकांच्या मते कन्नड, त्यांनी यज्ञसंस्कृतीचा स्वीकार केला होता.

५) कल्याणीचे उत्तर चालुक्य घराणेही कन्नडच. या सर्व अमराठी राजसत्तांच्या 'कन्नडादी' भाषांचा व त्यांनी स्वीकारलेल्या धर्मांचा परिणाम स्वतंत्रपणे किंवा संस्कृत-प्राकृत-अपभ्रंश भाषांच्याद्वारा मराठीत आला असणे शक्य वाटते.

६) ज्या यादव घराण्याच्या काळात मराठीचे ग्रांथिक रूप उत्कर्षाला पोहोचले, ते घराणे मात्र मराठी आहे. बारावे-तेरावे शतक हा त्याचा कालखंड, देवगिरी ही राजधानी, मराठीतील ग्रंथनिर्मितीचा या प्रदेशाशी व या राजसत्तेच्या भाषेशी असलेला संबंध लक्षात येण्यासारखा आहे. राजसत्तेने स्वीकारलेल्या भाषेचा प्रभाव लोकांच्या भाषेवर असतो, हे यादवकाळातील मराठीवरील संस्कृतच्या परिणामातून स्पष्ट होते. या घराण्यातील वैदिक संस्कृतीचा हा प्रभाव मराठीवर प्रारंभकाळातही कसा आहे, हे यावरून लक्षात येते.

यादव, बहामनी, शिव व पेशवे ही राजसत्तांशी निगडित असलेली कालिक शीर्षके अगदीच चुकीची नाहीत. राजकीय सत्तांप्रमाणेच संप्रदायांचाही साहित्यावर ठसा उमटत असतो. चक्रधर, ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम इत्यादी वारकरी संतनेतृत्वांनी मराठी साहित्याला दिलेल्या प्रेरणा लक्षात घेण्यासारख्या आहेत. मराठी समाजातील बदलत्या परिस्थितीनुसार समाजाला वळण लावण्याचे त्यांचे कार्य भाषेला राजसत्तेपेक्षाही पोषक ठरले आहे. परंतु बहामनी, शिव व पेशवे या काळातील मराठीच्या भाषिक

रूपांत फारसा फरक आढळ नसल्याने या काळाला 'मध्यकाल' म्हणून त्या काळातील मराठीचा भाषिक विकास सांगता येतो.

मात्र इ.स.१३५० ते इ.स.१८५० मधील या मध्यकाल-मराठीच्या उपविभागातही काही भाषिक वेगळेपणा जाणवतो व त्याचा संबंध राजसत्ता व संप्रदाय या दोन्हींशी आहे.

बहामनी काळात मराठीचा फारसीशी संबंध आला तो जित-जेत्यांच्या स्वरूपाचा. दरबार, लष्कर, न्याय, शेती अशा काही महत्त्वाच्या क्षेत्रांवर तिचा लगेच प्रभाव जाणवतो. पण लोकव्यवहारातील, त्यातही संतसाहित्यावर चौदाव्या शतकातच फारसीचा जाणवणारा परिणाम चोखामेळा, नरहरी सोनार, सावता माळी यांच्या अभंगांतून दिसतो. (आम्ही वारीक वारीक। करू हजामत वारीक। विवेकदर्पण आयना। वैराग्य चिमटा हलवू।') वारीक, हजामत, आयना हे फारसी शब्द मराठीत धर्मक्षेत्रातही कसे घुसले होते, हे जाणवते.

नंतरच्या शिवकाळात संस्कृतच्या पर्यायी शब्दांनी, राजव्यवहारकोशांनी फारसीला थोडा पायबंद घालण्याचा प्रयत्न केला. पण रामदास-तुकारामांसारख्या संतांच्या लेखनातही फारसीपण विसरून फारसी शब्द येऊ लागले. बाजार, शहर, हरामखोर, बाकी, दया अशा अनेक फारसी शब्दांचे अमराठीपण पुसले गेले. संतवाणीतील त्यांचा हा उपयोग हेच सिद्ध करतो. पेशवेकाळात बखर व ऐतिहासिक पत्रव्यवहार यांमध्ये तर फारसी-मराठीतील उरलेसुरले अंतर जवळ-जवळ संपून गेले.

ती आपले प्रत्यय, उपसर्ग, शब्दसिद्धी यांच्यासह मराठीत मिसळून गेली. अनेक दृष्टींनी मराठीला शब्दप्रत्ययादी पातळीवर समृद्धी आणून देणाऱ्या फारसीच्या या मराठीमय होऊ पाहणाऱ्या स्वरूपाचा संबंध त्या-त्या कालखंडांशी आहे. या दृष्टीने फारसी-संस्कृत शब्दांचे मराठीने सिद्ध केलेले मराठी सामासिक रूप. १) पूर्वपद फारसी- चीजवस्तू, अर्जविनंती, २) उत्तरपद फारसी- उद्योगधंदा, धनदौलत इत्यादी) वैशिष्ट्यपूर्ण आहे.

बहामनी काळातील परकीय सत्तेचा मराठीवरचा परिणाम म्हणून मराठीचा 'महाराष्ट्र भाषा' या तिला प्राप्त झालेल्या स्थानाच उल्लेख करावा लागतो. ज्ञानेश्वरकालीन मराठी बहुजनांनी घडविलेली आहे. पण १) नाथांच्या काळात अभिजनांनी/पंडितवर्गानेही तिचा स्वीकार केलेला दिसतो. कदाचित यामागे परकीय सत्तेसमोर एकत्रितपणे आणि ठामपणे उभे राहण्यासाठी बहुजनांनाही प्रिय असलेली ही भाषा त्यांना जवळ करावीशी वाटली असेल. २) मराठीत त्यांनी केलेल्या लेखनावर त्यांच्या संस्कृताध्ययनाचा प्रभाव असल्याने यथार्थदीपिका, गीतार्णव, दासबोध या रचनांचे स्वरूप तर्कशुद्ध ठेवण्याकडे-शास्त्रशुद्ध दृष्टीने लेखन करण्याकडे त्यांनी लक्ष पुरविले. शास्त्रीय व ललित हे दोन्ही प्रांत संस्कृतमध्ये स्वतंत्र आहेत. त्याचे अनुसरण त्यांनी मराठीतील लेखनातही साधले. 'यथार्थदीपिकेत भावार्थाचे रंग मिसळू न देणे' भावार्थाने यथार्थ शबल होऊ न देणे व ललित साहित्यातील लालित्य अध्यात्माच्या प्रबोधनाने झाकोळले जाऊ न देणे अशी दक्षता या काळातील अभिजनांच्या लेखनात आली. मराठीतील तत्कालीन टीका-ग्रंथ व मुक्तेश्वरांसारख्यांचे मराठीतील भावानुवाद यांमागे हीच संस्कृत साहित्यातील भूमिका आहे. म्हणून बहुजन ते अभिजन व शास्त्रीय-ललित विभागणी हा यादवकाळापेक्षा मराठीने गाठलेला पुढचा टप्पा आहे.

बहामनी काळातील हे रूप शिवकालीन संस्कृतप्रभावी वृत्तीने अधिक ठसठशीत झाले. परमार्थाइतकेच प्रपंचाला नेटके करण्याची संतांची वृत्ती 'नल-दमयंती' स्वयंवराख्यानातून व पंडिती कथात्मक वाङ्मयातून मराठीला भाषिक विविधता आणून देऊ लागली. अध्यात्मापेक्षा करमणूकप्रधानता वाढीस लागली. विशिष्ट वर्गाला नजरेसमोर ठेवून बखरीतून मराठी गद्य विविध रचना साधू लागले.

बहुजनांची गाणी पेशवेकाळाच्या अखेरीस शाहिरी वाङ्मयात सादर होऊ लागली. मराठीच्या या बदलत्या रूपामागे राजसत्तांनी स्वीकारलेली भाषा, त्यांचा भाषिक दृष्टिकोन त्यांची संस्कृती यांचा परिणाम लक्षात घेण्याइतका स्पष्ट आहे.

# मराठी भाषेचा जन्म आणि उगम काळ

**भाषाभ्यासाची भूमिका –** भाषेचा विचार करण्याचा प्रारंभ अव्वल इंग्रजी कालखंडाच्या पूर्वार्धात झाला. संस्कृत लॅटिनच्या तौलनिक अभ्यासातून भाषाकुळे ही महत्त्वाची संकल्पना हाताशी आली. त्याच्या आधारे, भारतातील बहुविध भाषांतील आर्य व द्रविड या दोन भाषांच्या भिन्न कुळांचा अभ्यास सुरू झाला. भारताबाहेरून आलेल्या आर्यवंशीयांचे हडप्पा–विध्वंसनाच्या आधारे सिद्ध केलेले भारतावरचे आक्रमण, भारतातील विविध भाषांशी आर्यांचा व संस्कृतचा जित–जेतेस्वरूपी आलेला संपर्क, संस्कृत भाषेमध्ये होत गेलेली स्थित्यंतरे (वैदिक, पाणिनीय व अभिजात) व प्राकृत– अपभ्रंश–मराठी ही नवभाषानिर्मिती या मार्गाने मराठी भाषेच्या अभ्यासाला गती मिळाली.

भारताबाहेरून आलेल्या जेत्यांची भाषा –संस्कृत– श्रेष्ठ व भारतातील समाजभाषांच्या संपर्कांनी तिच्यामध्ये होत गेलेला बदल, या भाषिक तपशिलामागे आर्य–अनार्यांच्या श्रेष्ठ–कनिष्ठत्वाला येत असलेले महत्त्व प्राकृत– अपभ्रंश या भाषांच्या नावांमधूनही व्यक्त झालेले आहे. मात्र लोकजीवनातून मराठीच्या उगमकाळाच्या आसपास संस्कृत–प्राकृत–अपभ्रंश या अनुक्रमे अस्तंगत होत असतानाही त्यांच्यातील ग्रंथनिर्मितीत खंड पडलेला दिसत नाही. संस्कृत व जैन महाराष्ट्री–अपभ्रंशाच्या पाठीशी तर अनुक्रमे वैदिक व जैन या धर्मांची परंपरा आहे. पण त्यांच्या ग्रंथभाषांनी लोकजीवनातील त्यांच्यातील बदलांची दखल न घेतल्याने त्यांच्यातील स्थित्यंतर–प्रक्रिया खंडीत झाली व मराठीसारखी भाषा उदयाला आली.

झुल ब्लॉक, डॉ. म. अ. करंदीकर, डॉ. ना. गो. कालेलकर, डॉ. तगारे इत्यादी संशोधकांच्या मते, महाराष्ट्री–प्राकृतचे नंतरच्या काळातील स्थित्यंतर हीच मराठीची जन्मभाषा होय.

> १९२० नंतरच्या काळातील याच महाराष्ट्री–प्राकृतातील जैन साहित्य हिरालाल जैनांच्या पुढाकाराने उजेडात आले. त्याच्या आधारे, महाराष्ट्री–प्राकृतापेक्षा या साहित्यभाषेचे असलेले वेगळेपण, हे स्वतंत्र भाषा असल्याचे संशोधनान्ती सिद्ध झाले. त्यामुळे महाराष्ट्री–प्राकृत व महाराष्ट्री–अपभ्रंश यांच्या धनिव्यवस्था, रूप–प्रक्रिया, वाक्यरचना, अर्थप्रक्रिया व शब्दसंग्रह यांची मराठीतील या घटकांशी तुलना करून डॉ. शं. गो. तुळपुळेंनी महाराष्ट्री–अपभ्रंश ही स्वतंत्र भाषा असून तीच मराठीची जननी असल्याचे सिद्ध केले.

अरबादी भिन्न वंशीयांची व भिन्न धर्मीयांची महाराष्ट्रावरची आक्रमणे, त्यांच्या येथील वसाहती, त्यांचे अपभ्रंश भाषेतून चालणारे व्यवहार व मराठीच्या जन्मापूर्वी चार–पाच शतकांपासून श्रीशंकराचार्यांनी वैदिक धर्माचे केलेले पुनरुज्जीवन ही मराठी भाषेच्या निर्मितीमागील कारणे प्रामुख्याने मानली जातात. संस्कृतची प्रतिष्ठा मानणारा एक वर्ग महाराष्ट्रात कायमचाच आहे, मराठीच्या निर्मितीसाठी शंकराचार्यांच्या वैदिक धर्माच्या पुनरुज्जीवन–चळवळीची गरज होतीच, असे नाही. अपभ्रंशाच्या सुलभीकरणाच्या प्रवृत्तीबरोबरच मराठीवर तिच्या जन्मापासूनच संस्कृतचा प्रभाव होता. त्यामुळे 'मराठी ही नवी भाषा म्हणजे अपभ्रंशाचे अधिक अपभ्रष्ट रूप, असे न घडता ''संस्कृतिकरणाचा संस्कार झालेला असा उत्क्रान्त स्वरूपातील अपभ्रंश'' ठरली, हे डॉ. तुळपुळेंचे मत यादवकालीन मराठी भाषा, १९७३, आवृत्ती दुसरी, पृष्ठ. ६३) व ''अर्वाचीन देशी भाषांना या अवस्थान्तरानंतर जे रूप आले त्यात भाषाविकसनाची व त्यासाठी नवनवीन रूपे घेण्याची जशी प्रवृत्ती आढळते, तशीच भाषेला स्थैर्य प्राप्त करून देण्याचीही प्रवृत्ती आढळते.'' हे डॉ. गं. भा. ग्रामोपाध्ये यांचे मत (भाषाविचार आणि मराठी भाषा, १९६४, पृष्ठ ५२) विचारात घ्यावे लागेल.

उदयकाळातच मराठीला मिळालेल्या वेगळ्या वैशिष्ट्यांची कल्पना आणून देतात. ''अपभ्रंशाच्या जीर्ण व काहीशा बेडौल पायावर मराठीने स्वतःचे बांधकाम केले; व ते करताना तिला नवीन मालमसाला बराच वापरावा लागला; व तो अवश्य तेथे वापरून तिने आपल्या बांधकामात जुन्या–नव्याचा सांधा अपूर्वाईने जोडला.

(डॉ. तुळपुळे, यादवकालीन मराठी भाषा, पृष्ठ ६३.) सुलभीकरणाच्या प्रवृत्तीमुळे अपभ्रंशांत अर्थव्यक्तीमध्ये येणारी अस्पष्टता मराठी कमी करू लागली होती. संस्कृतातील अष्टाध्यायी, प्राकृतातील प्राकृतप्रकाश व अपभ्रंशातील देशीनाममाला या व्याकरणविषयक लेखनाची परंपरा मराठीत उतरली असती, तर मराठीचे त्या-त्या काळातील भाषिक विशेष उलगडायला मदत झाली असती.

कोणतीही भाषा निर्माण होताना ती जन्मभाषेव्यतिरिक्त सभोवतालच्या भाषांतून अनेक घटक स्वीकारत असते. मराठीला आर्यकुलोत्पन्न भाषा मानताना तिच्यात महाराष्ट्री-प्राकृत-अपभ्रंश यांद्वारा आलेले आर्यभाषेचे विशेष, तिच्या परिसरातील द्रविडकुलीय भाषांच्या तुलनेत अधिक व सखोल आहेत, असे म्हणायचे असते. पण या द्रविड-कुलोत्पन्न भाषा महाराष्ट्री-प्राकृत-अपभ्रंशामधूनही तिच्यावर परिणाम करीत असणे स्वाभाविक आहे. महाराष्ट्रीय लोकांच्या जीवनव्यवहारातील भाषेवरचा हा प्रभाव लक्षात घ्यायचा, तर 'मराठी भाषा उच्चवर्णीय महाराष्ट्री-प्राकृत आणि महाराष्ट्री पिजिन प्राकृत यांचे क्रियोलाइज्ड प्राकृत आहे.' हे महाराष्ट्री भाषातज्ज्ञ साउथवर्थसारख्या अमेरिकन संशोधकाचे इ.स.१९७१ मध्ये मांडलेले मत, येथील आर्येतर समाजाच्या भाषांचाही मराठीच्या जननी भाषा संशोधनात विचार करण्याची असलेली गरज लक्षता आणून देते.

(जेव्हा उच्चवर्णीय वसाहतकार आर्थिक संपन्नतेसाठी अन्य प्रदेशात वसाहत करतात, तेव्हा तेथील (कनिष्ठ) वर्गीयांशी संपर्क साधावा लागतो. वरिष्ठांशी संपर्क साधताना त्यांची भाषा सुलभ करण्यावर कनिष्ठांचा भर असतो. अशा संपर्कातून निर्माण होणारी 'पिजिन' ही कुणाचीच मातृभाषा नसते. पण हीच भाषा बोलणाऱ्यांच्या पुढच्या पिढीची मात्र ती मातृभाषा बनते. तिला 'क्रियोलाइज्ड' असे म्हटले जाते. मराठीच्या संदर्भात या प्रकारे जन्मभाषेचा शोध घेता येतो.)

मराठीच्या जन्मभाषेच्या निश्चितीच्या संदर्भात द्रविड भाषा कुळातील कानडी, तमिळ इत्यादींचा होणारा उल्लेख या दृष्टिकोनातून लक्षात घेता येतो. वि. रा. शिंदे, शं. बा. जोशी व विश्वनाथ खैरे या तीन संशोधकांनी कानडी, तमिळ या भाषांच्या परिसरात वावरलेल्या, जन्म घेतलेल्या मराठी भाषेचा जन्मभाषा-विचार वेगळ्या दृष्टीने केला आहे.

खैरेंच्या मते, १) मराठी व तमिळ या दोन्ही भाषा भिन्न कुळांतील आहेत हा दृष्टिकोन न बाळगता या दोन्ही भाषा ज्या लोकजीवनातून निर्माण झाल्या, त्याचा विचार मराठीच्या जन्मभाषेचा शोध घेताना प्रामुख्याने व्हावा.

भारतीय समाजात व भाषांत विभिन्नतेमध्ये असलेले एकात्मतेचे सूत्र कथा-पुराणे-मिथक यांच्यामधूनही व्यक्त झालेले आहे. याच लोकजीवनातील या दोन्ही भाषांचा विचार कुलसंकल्पनेच्या दृष्टीने करण्यापेक्षा 'भाषाकुलभेद व कालभेद' या तत्त्वांच्या आधारे करावा. भौगोलिक समीपतेच्या मुद्याला अग्रभागी ठेवून भाषाभाषांमधील संपर्क व संगतीकरण (contect and convergene) यांना भाषाशास्त्रात मान्यता दिलेली आहेच. तेच तत्त्व खैरेंनी भारताच्या उत्तर व दक्षिण प्रदेशांतील भाषांच्या संदर्भात विचारात घेतले आहे. भाषाशास्त्रीय दृष्टीने, 'अपभ्रंशाशी न थांबता अपभ्रंश आणि दक्षिणी भाषा यांच्या तुलनेच्या वाटेने प्राचीन काळात शिरून' (श्री. खैरे- मराठी भाषेचे मूळ, पृष्ठ ७०) तिच्या जन्मभाषेचा शोध घ्यायला पाहिजे. महाराष्ट्रातील अपभ्रंशपूर्व भाषेच्या स्वरूपावर तमिळचा प्रभाव सापडेल. याच्या आधारावर ते असे मत मांडतात की, मराठी शब्दांची व्युत्पत्ती संस्कृतमध्ये शोधण्यापेक्षा ती तमिळमध्ये अधिक सुसंगतपणे सापडेल. (वि. रा. शिंदेंच्या मतेही मराठीत अनेक कानडी धातू आहेत.) या तमिळमधून आलेल्या रूपांवरून संस्कृतमधील रूपे सिद्ध झालेली आहेत. या त्यांच्या विचारानुसार 'संस्कृतरूपे ही उद्भ्रंशरूपे ठरतात' या त्यांच्या मताचा विचार श्री. माधव देशपांडेंनी 'संस्कृत व प्राकृत' (शुभदा प्रकाशन, १९९५) या आपल्या ग्रंथात केला आणि मिलिंद बोकिलांनी 'अनुभव'-२००५ च्या दिवाळी अंकात या विचाराचा परिचय करून दिला आहे. त्यांच्या मते 'संस्कृत भाषेतून मराठीसारख्या लोकभाषेत शब्द येतात, हे मत स्वीकारण्यापेक्षा लोकांच्या बोलण्यातील भाषेत शब्द घडत असतात व त्यातून प्रतिष्ठितांच्या भाषेत त्यांचे संस्कृतिकरण होत असते.' रामायण-महाभारतासारखे विदग्ध साहित्य हेही लोककथांच्या संकलनातून झालेले आहे.

भारतातील ठिकठिकाणच्या प्रादेशिक भाषकांशी आर्यांचा संपर्क येत गेला. संस्कृतचा त्या भाषेवर जसा परिणाम झाला, तसाच त्या भाषांतून संस्कृतमध्येही अनेक शब्द आले व याच्या जोरावर संस्कृत ज्ञानभाषा-संपर्क भाषा म्हणून भारतीय संस्कृती संवर्धित करू शकली असावी. खैरेंना संस्कृतरूपे ही विविध भारतीय भाषांची उद्‌भ्रंश वाटतात, याचा संदर्भ असा लावता येतो.

> या संदर्भात खैरेंच्या मते, आर्य हे भारतातलेच आहेत व हडप्पा-संस्कृतीचा विध्वंस नद्यांच्या पुरांमुळे व बदलत्या पर्यावरणामुळे झाला, याचा आधार घेतल्यास भारताच्या विविधतेतील सांस्कृतिक एकात्मतेचा अर्थ सुसंगतपणे लागतो व संस्कृतच्या भारतभरच्या प्रतिष्ठेचे व विस्ताराचे स्पष्टीकरण मिळू शकते. त्यांच्या या गृहीतकात त्रुटी जाणवत असल्या, तरी त्याचा सांगोपांग व गांभीर्याने विचार करण्याची गरज नाकारता येत नाही.

त्यांच्या या गृहीतकांवरच्या आक्षेपांपैकी मराठी व तमिळ यांच्या प्रादेशिक असमीपतेच्या मुद्याचे खंडन होऊ शकते. श्रवणबेळगोळसारख्या प्रख्यात शिलालेखात (महाराष्ट्रापासूनच्या दूर असलेल्या भागात) तमिळ, कानडी व मराठी या तीनही भाषांचा प्रयोग एकत्रितपणे आलेला असल्याचे एम. एफ. कलबुर्गींचे संशोधन भाषिक साहचर्य दाखविण्यास पुरेसे आहे. अशा दूरदूरच्या प्रदेशांत यात्रेच्या निमित्ताने मराठी भाषक ये-जा करीत होता. तीच परिस्थिती तमिळ भाषकांच्या संदर्भातही. जैन धर्माची महाराष्ट्र-अपभ्रंश ही भाषा अशा तऱ्हेने महाराष्ट्राच्या आसपासच्या प्रदेशांतही बोलण्यात येत होती. या सगळ्याचा एकत्रित अर्थ लक्षात घेतल्यास, मराठीच्या जन्मभाषेच्या विचारात, तिच्या साहचर्यात असलेल्या विविध संस्कृतींच्या भाषांचाही विचार करणे गरजेचे आहे.

**मराठीची जन्मभाषा –** तमिळ ही मराठीची जननी, या खैरेंच्या गृहीतकामागे शब्द-प्रत्यय-साम्य, व्युत्पत्ती व दोन्ही भाषांच्या सांस्कृतिक साम्याची बैठक आहे. पण या गृहीतकाचा विचार करताना तमिळ व मराठी या दोन्हीमधील ध्वनिव्यवस्था, प्रत्ययव्यवस्था, वाक्यरचना, शब्दसिद्धीचे विविध प्रकार एवढेच नव्हे तर वाक्प्रचार म्हणी यांची मूळ रूपे यांच्याही साम्यभेद पद्धतीनेविचार होण्याची गरज आहे.

दोन्ही भाषांच्या संदर्भात असे दिसते –

१) तमिळमधील एकही ध्वनी मराठीत नाही. 'ळ' हा ध्वनी मात्र दोन्ही भाषांमध्ये समान आहे.

२) द्रविड भाषांप्रमाणेच मराठीतही मूर्धन्य व्यंजने (ट,ठ,ड,ठ,ण) हे ध्वनी अधिक प्रमाणात आहेत.

३) तेलगू व कानडी या भाषांमध्ये नामांचे-सर्वनामांचे ऊकारान्त एकवचनी रूप, ही प्रवृत्ती यादव-मराठीतही आहे. ही प्रवृत्ती संस्कृतमध्ये नाही.

४) च-वर्गाचे दंतमूलीय उच्चार मराठीत आहेत. संस्कृतमध्ये नाहीत. ते द्रविड भाषांमधून आले असण्याची शक्यता आहे. पण च-जचे कानडीत फक्त तालव्य उच्चारण आहे. तिच्यात अल्प प्रमाणात असलेले दंतमूलीय उच्चार हा मराठीचा कानडीवरचा परिणाम मानण्याकडेही कल आहे.

**प्रत्ययव्यवस्था –** १) कन्नडचे विभक्तिप्रत्यय, साधकप्रत्यय, आख्यातप्रत्यय व कृदन्ते ही मराठीपेक्षा वेगळी आहेत, २) मराठीच्या लिंगव्यवस्थेत, निर्जीव वस्तूंनाही लिंग आहे. पण कन्नडमध्ये सर्व निर्जीव वस्तूंना नपुंसकलिंगच असते. ३) मराठीत अनेकवचनदर्शक प्रत्यय हा शब्दाचे लिंग व त्यांचे अन्त्याक्षर यांच्याशी संबंधित आहे. कानडीत 'गळू' हा एकच प्रत्यय अनेकवचन दर्शविते.

प्रयोग-१) मराठीत सकर्मक क्रियापदांच्या संदर्भात कर्तरीचे भूतकाळी रूपांतर कर्मणी होते. (उदाहरणार्थ तो अंघोळ करतो. वर्तमान कर्तरी. पण 'त्याने अंघोळ केली, कर्मणी. पण कानडीत मात्र 'तो अंघोळ करतो, तो अंघोळ केला. 'हा प्रयोग मराठीत क्वचितच होतो.

तमिळ-मराठीतील या फरकांवरून मराठीच्या जननीचे स्थान तमिळला देता येत नाही. मराठीचे संस्कृत ध्वनिव्यवस्थेशी ऋ,ऐ,औ स्वर) ङ्, ञ्, ष् ही व्यजंने यांचे साम्य आहे. मराठीत तत्सम शब्दांचे वैपुल्य प्रत्येक कालखंडात आहे.

१) वर्ण लेखनात हे साम्य दिसत असले, तरी त्यावरून मराठीतील त्याचे उच्चारण बदलले असले, तर कळू शकत नाही.

२) 'अ–आ' चे संस्कृतमध्ये एकमेकांचे ऱ्हस्व – दीर्घ हे नाते मराठीत सध्या तरी राहिलेले नाही. ते कोणत्या काळात बदलले हे कळायला मार्ग नाही. तत्सम शब्दांच्या उच्चारणातही मराठीचा कल व्यंजनान्त उच्चारणाकडे आहे, त्याचाही मागोवा लेखनावरून कळत नाही. पण हे उच्चारण फारसीमुळे आले असावे, असे मानले जाते. मराठीचे आघात–तत्त्वही भिन्न आहे.

३) संस्कृतच्या ऋ–ॠ चे आजचे मराठीतले उच्चारण स्वराचे नाही. ते व्यंजनासारखे आहे.

४) संस्कृत शब्दांच्या उच्चारणातील मृदुता मराठी शद्बांत कमी प्रमाणात आहे. मराठीतले हे थोडेसे कर्णकर्कश, ठसठशीत उच्चारण हा वेगळेपणा लेखनचिन्हांवरून कळू शकत नाही.

५) संस्कृतमधील शब्दाच्या मध्यभागी किंवा शेवटी असलेल्या 'न' चा प्राकृतमार्गे मराठीत 'ण' होतो. उदाहरणार्थ पानीयम्◌ पाणी, नवनीत◌ लोणी.

अशी काही साम्ये दोन्ही भाषांमध्ये असूनही मराठीची संस्कृत ही जननी ठरू शकत नाही. तीच गोष्ट महाराष्ट्री–प्राकृतबद्दलही आहे. या दोन्हींमधील साम्यस्थळे पुढीलप्रमाणे–

**शब्दव्यवस्था –** अकारान्त पुल्लिंगी नामांची प्रथमा–एकवचनाची रूपे जशी महाराष्ट्री–प्राकृतमध्ये नेहमी व महाराष्ट्री–अपभ्रंशात क्वचित ओकारान्त होतात, तीच प्रथा मराठीत आलेली आहे. भूतकालवाचक, धातुसाधिताचा महाराष्ट्रातील 'उण' व मराठीतील 'ऊनि' व 'ऊन' या प्रत्ययांना जोडणारा दुवा अपभ्रंशात 'एव्विणु' व 'एप्पिणु' असा मिळतो. पण

१) मराठीत क्वचित दिसणारी सप्रत्ययी द्वितीया,

२) अकारान्त नपुंसकलिंगी नामांची प्रथमा व द्वितीया यांची दोन्ही वचनांची रूपे पुल्लिंगी नामांच्या रूपांहून निराळी करण्याचा मराठीतील गुणधर्म,

३) यादव मराठीतील स्त्री–नामांची क्वचित आढळणारी 'सी' प्रत्ययान्त रूपे महाराष्ट्री–प्राकृतातील सप्तमीच्या 'सु–सु' या प्रत्ययाची आठवण करून देतात.

४) महाराष्ट्री–प्राकृतातील 'अहम्मि' किंवा 'अम्मि' या रूपाशी मराठीतील प्रथमपुरुषी सर्वनामाचे 'मी' हे प्रथमा–एकवचनी रूप जुळणारे आहे.

५) ते अपभ्रंशात 'हऊ' असे आहे. पण 'ण' हे व्यंजन महाराष्ट्री–प्राकृतात शब्दाच्या आरंभी कधी–कधी येते. पण मराठीत ते कधीही शद्बारंभी येत नाही. या साम्याव्यतिरिक्त मराठीचे महाराष्ट्री–प्राकृतशी अधिक साम्य आढळत नाही.

या संदर्भात हेमचंद्राच्या (प्राकृत) व्याकरणावर विसंबून डॉ. भांडारकरांनी 'The dialect called Apbhrasnsha by Grammarians presents Indian Speech in a further stage of delay and occpied a middle position between these Prakrit and Modern Varnaculars to some of which, especially to the old Hindi the Brijabhasha and the Gujurati it bears striking resemblance. (Wilson Philological Lectures. P108-109) मांडलेला हा विचार महत्त्वाचा आहे.

महाराष्ट्र अपभ्रंश ही मराठीची साक्षात जननी मानली जाते. त्या दोन्हींमधील वर्ण–प्रत्ययप्रक्रिया यांमधील साम्ये पुढीलप्रमाणे–

१) यादव–मराठीची ध्वनिव्यवस्था म्हणजे अपभ्रंशातील ध्वनिव्यवस्थेची उत्क्रान्त अवस्था होय,

२) यादव–मराठीने नामांची–सर्वनामांची प्रत्ययी विभक्तिरूपे अपभ्रंशातून घेतली,

३) क्रियापदाची प्रत्ययी रूपे व धातुसाधित रूपे मराठीने अपभ्रंशातून घेतली. तर संयुक्त क्रियापदे तिने स्वतंत्रपणे बनविली.

४) यादव–मराठीतील शब्दसिद्धीचे निरनिराळे प्रकार अपभ्रंशातील प्रकारांवरून आलेले आहेत.

५) तृतीया व सतिसप्तमी या नावांनी ओळखल्या जाणाऱ्या भावेप्रयोगाशी संबंध असणाऱ्या दोन प्रकारच्या वाक्यरचनांचे अपभ्रंशातील तत्सदृश रचनांशी पुष्कळ साम्य आहे.

असे असले तरी तिच्यातील अपभ्रंशापेक्षा वेगळे असलेल्या विशेषांच्या उगमाचा शोध घ्यायला पाहिजे. मराठीच्या या वेगळेपणाचे स्वरूप डॉ. तुळपुळेंनी पुढीलप्रमाणे व्यक्त केले आहे. ते म्हणतात, ''संस्कृतमधील द्विस्वरान्तर्गत व्यंजनलोपामुळे निकट येणाऱ्या स्वरांच्या लिबलिबीत उच्चारांनी लडबडलेल्या व द्वित्त व्यंजनांच्या कर्णकटू वाटणाऱ्या अपभ्रंशाची चाल तिने सोडून दिली व एक नवीन ठसठशीत उच्चारपद्धती रूढ केली. तसेच भाषेच्या संश्लेषणात्मक स्वरूपामुळे निर्माण होणारे अपभ्रंशातील शब्दरूपांचे संभ्रामक वैचित्र्य तिने विश्लेषणात्मक रूपव्यवस्थेला प्रारंभ करून थोडे कमी केले.'' (यादवकालीन मराठी, पृष्ठ ६३) अर्थव्यक्तीमध्ये अपभ्रंश संभ्रमित होती. म्हणून अर्थव्यक्तीच्या स्पष्टतेसाठी मराठीने आपले नवे विशेष निवडले, असे डॉ. तुळपुळेंच्या विधानातून स्पष्ट होते. मराठी संस्कृत-प्राकृत अपभ्रंशातील संश्लेषणात्मक रूपव्यवस्था नाकारून शब्दयोगी अव्ययांच्या वापराने विश्लेषणात्मक रूपव्यवस्था स्वीकारली. उच्चारातील ठसठशीतपणा व ही विश्लेषणात्मक पद्धती तिने कोणत्या भाषेपासून उचलली किंवा तिच्यामध्ये हे विशेष कोणत्या परिस्थितीने आले, याचे कारण कदाचित तिच्या जन्मकालीन सांस्कृतिक व भाषिक वातावरणाशी संबंधित असू शकेल.

या दृष्टीने, इ. स. ११८९ मधील पंढरपूरचा विठ्ठलदेवाचा शिलालेख व त्यानंतरचा ८४ वर्षांनंतरचा पंढरपूरचा चौऱ्यांशीचा शिलालेख (इ.स.१२७२) यांचा तपशील उपयुक्त ठरू शकेल. इ.स.११८९ च्या शिलालेखात 'विठ्ठल देऊ नायके' हा विठ्ठलाचा उल्लेख, अवघा (अर्घव), मटु (मठ), काज (कार्य) अशा तद्भव रूपांचे अस्तित्व, कन्नड-तेलगू शब्दांचा वापर नसणे व मंदिराचा 'लानु मटु केला' असा उल्लेख, पुढच्या ८४च्या शिलालेखाची पार्श्वभूमी आहे. याच 'लानु मटु' ला विस्तृत रूप देण्यासाठी इ.स.१२७२ मध्ये ज्या विविध फडांनी अर्थसाह्य केले त्यांची नावे या ८४च्या शिलालेखात कोरलेली आहेत. त्यांमध्ये कर्नाटक-तेलंगणातील अनेक व्यक्ती असल्याचे लक्षात येते.

कन्नडमधील वीरशैव-साहित्याचे मराठीतील लेखन, पंढरपूरचे वीरशैव संप्रदायातील लक्षणीय महत्त्व, पंढरपूरचे भौगोलिक स्थान हे लक्षात घेता, विठ्ठल या दैवताबरोबर कानडी संस्कृतीचे अनेक विशेष मराठी संस्कृतीत व मराठी भाषेत जन्मकाळापासून आले असण्याची शक्यता मान्य करावी लागते.

तत्कालीन जीवनात यात्रांच्या निमित्ताने मराठी भाषक श्रवणबेळगोळसारख्या दूरच्या ठिकाणी जात होता, हे तेथील मराठी वाक्यावरून स्पष्ट आहे. पंढरपूरचे विठ्ठलाच्या 'लानु मटु'चे मंदिर भव्य करण्यासाठी अर्थसाह्य देणारा कन्नड-तेलंगणातील समाज पंढरपूरच्या परिसरात येत-जात असणार. भक्तीवर आधारलेल्या ज्या संप्रदायांनी मराठी घडविली, ती भक्तिपरंपरा दक्षिणेतून आलेली आहे. याचा संदर्भ मराठीतील वेगळ्या विशेषांसाठी शोधता येतो.

**मराठीचा उगमकाळ –** मराठीच्या उगमकाळाचा शोध घेताना तिची जननी म्हणून ज्या महाराष्ट्री-अपभ्रंशाचा निर्देश केला जातो, तिचा अस्तकाल लक्षात घ्यावा लागतो. इ.स.३/४ थ्या शतकात उदयाला आलेली महाराष्ट्री-अपभ्रंश ११व्या शतकापर्यंत ग्रंथरूपात वावरताना सापडते. याच सुमारास तिच्या जागी हिंदी, मराठी, गुजराती या भाषा आलेल्या दिसतात. जेव्हा एका भाषेची जागा दुसरी नवी भाषा, त्या मूळ भाषेत बदल होऊन स्वीकारते; तेव्हा त्यासाठी काही काळ जाणे गृहीत धरावे लागते. याचा अर्थ ११व्या शतकाआधी अपभ्रंशातील बदलांना प्रारंभ झाला असावा. पण तिच्यातील हे बदल तिच्या स्थित्यंतराचे दर्शक न ठरता तिच्यातून मराठीसारखी एक नवी भाषा उदयाला आली.

प्राकृत-अपभ्रंशादी भाषांमधील मराठीविषयक उल्लेखही या दृष्टीने उपयुक्त ठरतात. चालुक्यवंशीय दुसऱ्या विक्रमादित्याच्या सोमेश्वर नावाच्या मुलाने रचलेल्या 'मानसोल्लास तथा अभिलषितार्थ चिंतामणी' (इ.स.११२९) या प्राकृत ग्रंथात दळण-कांडण करताना मराठी स्त्रीच्या तोंडी असलेली (मराठी) गीते दिलेली

आहेत. 'राजमतिप्रबोध' नामक नाटकात नायिकेच्या सौंदर्याची प्रशंसा एक 'महाराष्ट्रीक' करतो असा प्रसंग आहे. 'कुवलयमाला' (इ.स.७७८) या प्राकृत ग्रंथात अठरा देशी भाषांचा उल्लेख असून त्यांच्या खास लकबीही सांगितलेल्या आहेत. त्यात मराठी भाषकाचे 'दिण्णले, गहिले, तत्थ मरहट' असा उल्लेख आहे. या ग्रंथातील मराठी माणसाचे स्वभावविशेष व त्याच्या भाषेतील शब्द (विशेषतः क्रियापदे) यांवरून मराठीचा दैनंदिन जीवनातील व्यवहारभाषा म्हणून असलेला वापर जाणवतो. ११व्या शतकात कोरलेल्या धार-शिलालेखातील एका काव्यात सात भाषांमधील रचना दिलेली असून त्याच्या दुसऱ्या कडव्यात मराठी भाषक नायिकेचे वर्णन आहे. या महाराष्ट्राबाहेर आढळणाऱ्या मराठीच्या निशाणीवरून तिचा उगमकाळ ठरविण्याला मदत होऊ शकेल. १३व्या शतकातील सोमनाथ कवीच्या 'पंडिताराध्य चरित्र' या तेलगू ग्रंथात मराठीतील एक पद आहे. 'रंभामंजिरी' या चौदाव्या शतकातील प्राकृत ग्रंथातही एक मराठी पद असल्याची माहिती मिळते. भिन्न भाषा व भिन्न प्रदेश यांमधील हे संदर्भ पाहता 'शके ५००पासून मराठीत गद्यलेख आढळतात.' हे राजवाडेंचे मत डॉ. श्री. रं. कुळकर्णींना अगदीच असंभवनीय वाटत नाही. (प्राचीन मराठी गद्य प्रेरणा व परंपरा, मेहता प्रकाशन, द्वितीय आवृत्ती, १९९१, पृष्ठ १६)

या प्रारंभकाळाच्या शोधात इ.स.१२७८मधील लीळाचरित्र, इ.स.१२९०मधील ज्ञानेश्वरी यांसारख्या परिणतावस्था गाठलेल्या मराठी साहित्याचा आधार घेता येतो. कोणत्याही भाषेत अशी ग्रंथसंपदा रचली जायला काही काळ जावा लागतो. १३व्या शतकातील या ग्रंथांच्या पूर्वी ३००/४०० शतके तरी मराठीचा उगमकाळ असावा, असा अंदाज बांधता येतो. (ज्ञानेश्वरीपूर्व १०० वर्षांपूर्वीचा समजला गेलेला विवेकसिंधू हा मुकुंदराजाचा ग्रंथ तिच्या भाषेवरून व अन्य पुराव्यांवरून १४व्या शतकातील ठरतो.) इ.स.१०३९ मधील श्रीपतीचा 'जोतिषरत्नमाला' हा ज्योतिषविषयक ग्रंथ, श्रीपतीबद्दलची काही विश्वसनीय माहिती न मिळाल्याने आद्यग्रंथ मानणे संभवनीय ठरत नाही. कदाचित संप्रदायाचे कवच नसल्याने असे शास्त्रीय लेखन नष्ट झाले, असे मानले तरी जोपर्यंत त्याच्या अस्तित्वाची काहीच लक्षणे मिळत नाहीत, तोपर्यंत ते मानता येत नाही.

यानंतर शिलालेख, कोरीव लेख, ताम्रपट यांच्यातील आधारांकडे वळावे लागते. यांपैकी कोणत्या लेखांत मराठीतील शब्द, विभक्ति-आख्यातप्रत्यययुक्त पदे, शब्दयोगी अव्यये, वाक्यरचना किंवा मराठी नावे-आडनावे आढळतात; हे पाहावे लागते. तिच्यातील वाक्यरचनेच्या आधारे उगमकाळ ठरविता येतो. यांपैकी पुष्कळसे लेख संस्कृतात आहेत. पण तोच मजकूर तर्जुमा करून मराठीत देण्याची किंवा मठाची मोडतोड होऊ नये म्हणून शापवाणी मराठीत देण्याची रीत ही मराठीचे सर्वसामान्यांतील व्यवहार भाषा म्हणून असलेले तिचे स्थान स्पष्ट करतो. ज्यांना केवळ मराठी म्हणता येईल, असे लेख चार/पाचच निघतात. महाराष्ट्रातील या लेखात काही कन्नडमधील लेखही आहेत.

> महाराष्ट्रापासूनच्या दूरच्या प्रदेशांतही मराठी लेख सापडतात. यावरून भाषिक संमिश्रणाचे तत्कालीन स्वरूप कळू शकेल. पुष्कळसे लेख मठ-मंदिरांसारख्या धार्मिक अधिष्ठान असलेल्या सार्वजनिक स्थळी आहेत. धर्म, राजसत्ता व समाजातील एक मोठा प्रतिष्ठित वर्ग याच्यामध्ये संस्कृत भाषेचे स्थान कोणत्याही काळात कसे स्थिर होते, याचे ते प्रतीक मानता येईल. असे स्थान प्राकृत-अपभ्रंश या भाषांच्या संदर्भात फारसे दिसत नाही.

शिलालेखांच्या वाटेने मागच्या काळात शिरताना काही महत्त्वाचे शिलालेख:

१) पंढरपूरच्या चौऱ्याऐंशींच्या शिलालेखाचा (इ.स.१२७२ ते इ.स.१२७७) संदर्भ महत्त्वाचा आहे. मराठीच्या काही प्रवृत्ती या लेखात दिसतात 'आधी गावाचे नाव व नंतर व्यक्तीचे नाव' ही लीळाचरित्रात आढळणारी पद्धती या लेखात दिसते. या मंदिराची मोडतोड करणाऱ्याला धातुद्रोही (आपल्या आई-वडिलांशी द्रोही करणारा) अशी वेगळी शापवाणी दिलेली आढळते. मंदिराला राजाश्रय आहे व महाराष्ट्र-आंध्र-कर्नाटक-तेलंगण येथून लोकाश्रयही आहे. महाराष्ट्राच्या वारकरी संप्रदायाच्या विठ्ठलाचे हे स्थान.

या दृष्टीने येथील विठ्ठलाबरोबरच मराठीचाही स्वीकार व विकास साधत गेला.

२) इ.स.१२२८ व इ.स.१२४० चे आंबेजोगाईचे दोन शिलालेख- यांमधील संस्कृत मजकुरापुढे 'तदेव महाराष्ट्रभाषया अत्र लिख्यते।' असे म्हणून पुढे सहा ओळींत मराठीत मजकूर आहे.

३) यादव सिंघणाचा पाटण-शिलालेख- इ.स.१२०६- भास्कराचार्याच्या नातवाने बांधलेले हे विद्याकेंद्र आहे. या मठाच्या जवळून व्यापारी मार्ग जातो. जवळच्या परिसरात तेल गाळण्याचा व्यवसाय चालतो, तेलाचे घाणेही आहेत. प्रत्येक घाण्यामागे काही तेल(द्रव्य) या मठास देण्याची सिंघणदेवांची आज्ञा होती. तेल-व्यवसायातील विविध वजनेमापांची नावे हा या लेखाचा वेगळेपणा. ही भाषा अहिराणी आहे, असे काहींचे मत असले; तरी संस्कृत शब्दांच्या या लेखाची भाषा मराठीच समजली जाते.

४) इ.स.९८३ चा श्रवणबेळगोळ शिलालेख. हे स्थान कर्नाटकातले आहे. गोमटेश्वर या जैन सांप्रदायिकाच्या तीर्थंकरांच्या ५२ फुटी उंचीच्या मूर्तीच्या पायाशी असलेल्या शिळेवर वेगवेगळ्या दोन-तीन भाषांमध्ये (तमिळ, कानडी-मराठी) मूर्तीसंबंधी परिचय देणारा लेख कोरलेला आहे. त्यांपैकी मराठीतील 'श्रीचावुण्डराजे करवियले', 'श्रीगंगराजे सुत्ताले करवियले' अशी दोन वाक्ये आहेत. श्री चावुण्डराज हा कर्नाटकातील गंगराज घराण्यातील राजाचा प्रधान होता. हे राजे जैनधर्मीय होते. दुसऱ्या ओळीतील 'गंगराज' हा होयसळ वंशातील होता. 'सुत्ताले' हा शब्द कन्नडमधील आहे. (आवार, प्राकार) गंगराज होयसळाच्या कारकिर्दीत हे काम झाले, असे हुटस (Hultez) या जर्मन संशोधकाचे मत मानले, तर या लेखाचा काळ इ.स.१११६ ठरतो. पण द.वा.पोतदारांच्या मते, पहिली ओळ, इ.स.९८३ मधील व दुसरी ओळ नंतरच्या शतकातील आहे.

बहुसंख्य संशोधकांच्या मते, अशा लेखाला आद्यत्वाचा मान देता येत नाही. या ठिकाणी येणाऱ्या यात्रेकरूंमध्ये मराठी माणूस असावा, हे त्याला तीर्थस्थानाची माहिती मिळण्यासाठी मराठीत असलेल्या वाक्यांमुळे स्पष्ट होते.



श्रवणबेळगोळ येथील शिलालेख.



अक्षी येथील शिलालेख.

५) शिलाहार केशीदेवाचा अक्षीचा शिलालेख इ.स.१०१२ काहींच्या मते हा लेख इ.स.१२१० चा ठरतो. यातील 'बोडण' हा शब्द, लेखाच्या शेवटी असभ्य भाषा न वापरता 'महालषुमीची आण' असे म्हणून इशारा देणे, लेख कोरणाऱ्याचे नाव, 'जगी सुष संतु' अशी व्यापक प्रार्थना; हा वेगळेपणा आहे. संस्कृत शब्दांची अशुद्ध रूपे,'भइर्जु, प्रधानु, सकु, संवतु' अशी उकारी रूपे हे प्राचीनत्वाचे लक्षण या लेखात दिसते.

६) इ.स.१०६० च्या दिवे-आगरच्या ताम्रपटात 'षडंगविद' विशेषण अनेक व्यक्तींच्या नावामागे लावलेले दिसते. हा मराठीतील आद्य शिलालेख ठरतो. या लेखात- 'ठविलयी, जाणति, लिहिले' अशी क्रियापदे 'योगक्षेमु, देवळु' अशी प्रथमा एकवचनाची रूपे, 'पासी, पासे' अशी शब्दयोगी अव्यये, 'स्थानहचा, दिवेचा' अशी षष्ठीची रूपे आढळतात. असे शिलालेख सापडले आहेत.

अंबेजोगाईच्या इ.स.१२४० च्या खोलेश्वराच्या शिलालेखात संस्कृतचा मराठीत तर्जुमा सांगण्याची गरज,

आंबेजोगाईच्या शिलालेखात 'मराठी भाषा ही सगळ्या महाराष्ट्राची भाषा' असल्याचा उल्लेख, पंढरपूरच्या विठ्ठलाच्या छोट्या मंदिराची धार्मिक दृष्टीने महत्त्वाची असलेली घटना मराठी भाषेत कोरलेली असणे; या घटना मराठीचा तत्कालीन समाजातील वाढता वावर सिद्ध करणाऱ्या आहेत. अकराव्या शतकातील दिवे-आगरच्या पहिल्या ठरणाऱ्या शिलालेखातही मराठी क्रियापदांची, शब्दयोगी अव्ययांची असलेली रूपे यांमधून त्यापूर्वी निदान दोन-तीन शतके तरी मराठीचा उगमकाळ मागे न्यावा लागतो. म्हणूनच आठवे-नववे शतक हा तिचा उगमकाल मानण्याकडे संशोधकांचा कल आहे.

पण इतिहासाचार्य राजवाडेंच्या मते मराठीचा जन्म चौथ्या शतकापर्यंत मागे नेता येतो. ''बदामी चालुक्यांच्या काळात प्रचलित असलेली मराठी बोली त्या वेळच्या 'अधिकृत' लेखातून प्रवेश मिळविण्यासाठी धडपडत होती.'' (नाईक एन. बी., Inscription of the Deccan Bulletin of the Deccan College, Research Institute, December 19/ Page 48, 57) या विधानाचा आधार घेऊन डॉ. श्री. रं. कुळकर्णीही, बदामी चालुक्यांचा काळ इ. स. ५०० ते इ. स. ७०० हा असल्याने मराठीचे अस्तित्व सहाव्या शतकापर्यंत मागे नेऊ पाहतात. (डॉ. श्री. रं. कुळकर्णी, तत्रैव पृष्ठ १४) पण मराठीतील वैद्यक, ज्योतिष इत्यादी शास्त्रीय लेखन कालदृष्ट्या नंतरचे ठरते आणि डॉ. गुणे-राजवाडे यांनी आधारासाठी घेतलेले ताम्रपट बनावट व नंतरच्या काळातील आहेत, हे सिद्ध झालेले आहे. म्हणूनच वैदिक धर्माच्या पुनरुज्जीवनाची धार्मिक क्रांती, महाराष्ट्री-अपभ्रंश भाषेतील अंतर्गत घडामोडी व भिन्न समाजगटांतील अभिसरण यांच्या कमीअधिक परिणामातून मराठी आठव्या-नवव्या शतकात निर्माण झाली, हे मत मानले जाते.

## मराठी भाषा – आदिकाळ

**मराठी भाषा व बहुजन-अभिजन समाज:** मराठी भाषा ही मराठी बहुजनांच्या बोलण्यातून व व्यवहारातील वापरातून घडली. शिलालेखांतील व प्राकृत ग्रंथांतील उल्लेखांवरून मराठी समाजातील बहुसंख्यांची ती भाषा होती व महाराष्ट्री-अपभ्रंशापेक्षा तिचे वेगळे विशेष घडत होते, हे स्पष्ट होते. नामदेवांच्या नेतृत्वाने या वर्गाने लिखिताचीही वाट अनुसरायला प्रारंभ केला. अठरापगड जातींतला हा समाज आपले विठ्ठलभक्तीचे भाव लेखनातून आविष्कृत करू लागला होता. लिखाणाचा संस्कार नसलेल्या वर्गाला लेखनरूपासाठी कुणा वरिष्ठ वर्गातील लेखकवर्गाचे साह्य घ्यावे लागले. पण असे लेखन करण्याची संधी त्यांना मराठीने दिली. माळी, सोनार, शिंपी इत्यादी वर्गांतील संतप्रवृत्ती व्यक्त करणारे हे लेखन मराठी भाषेला विविधता आणून देणारे आहे. त्यांच्या जीवनजाणिवा, त्यांची सुखदुःखे व त्यांना सापडलेला हा विठ्ठलभक्तीचा मार्ग लेखनविष्ट होण्याची संधी मराठीने त्यांना मिळवून दिली.

त्यांना अशी लेखनसंधी संस्कृतमध्ये मिळू शकत नव्हती. पण आजूबाजूच्या सांस्कृतिक जाणिवांमधून संस्कृत भाषेच्या संस्कारांना ते पारखे नव्हते. म्हणूनच संस्कृत-तत्सम, तद्भव, अन्य भाषा यांच्याशी त्यांचा असलेला बोलण्यातील परिचय यादव-मराठी लेखनात उतरलेला आहे.

याच काळात मराठीला संस्कृतसारखी प्रतिष्ठा आणून देण्याचा प्रयत्न संस्कृत-अनुवादातून मराठीत होऊ लागला होता. विठ्ठल गलांडच्या आयुर्वेद-शास्त्रावरच्या संस्कृतमधील ग्रंथाचा मराठी अनुवाद त्याने स्वतः इ. स. १३०० मध्ये केलेला दिसतो. या संस्कृतमधील मराठी अनुवादित ग्रंथाचा उल्लेख करून डॉ. कुलकर्णी म्हणतात, ''चौदाव्या शतकातील गद्य साहित्य हे वैद्यकासारख्या लोकोपयोगी शास्त्रापुरतेच मर्यादित राहिले.'' (डॉ. श्री. रं. कुलकर्णी-तत्रैव, पृ. २५)

संस्कृततज्ज्ञ अभिजनांचा हा प्रयत्न जसा मराठीला प्रतिष्ठा देणारा होता, तसाच मराठी भाषकांचा वाढता प्रभावही व्यक्त करणारा होता.

पण जीवनाचे साफल्य ज्या अध्यात्मविद्येत आहे, ती विद्या मराठीत अनुवादित झाल्याशिवाय मराठीला प्रतिष्ठा प्राप्त होत नव्हती. (तत्रैव, पृष्ठ ५) महानुभावियांनी तिच्यात केलेले तात्त्विक लेखन व 'अमृताते पैज जिंकण्या'ची होड लावीत ज्ञानदेवांनी रचलेले गीताभाष्य ही अभिजनांची रचना मराठीचे भाषिक सामर्थ्य व बहुजनांचा मराठीसंबंधीचा रेटा लक्षात आणून देते. त्यांच्या लेखनामधील मराठीचे कौतुक हे कदाचित अभिजन वर्गास तिच्याकडे आकर्षित कण्यासाठीही असेल.

नागदेवाचार्यांच्याही संस्कृतमधून लेखन करणाऱ्या एका पंथीयाला ''माझिया म्हातारीया नागवतील गा!' म्हणून विरोध केला. त्याचे कारण ही मराठी भाषा बहुजनांनी घडविलेली आहे. ज्यांना संस्कृतचा अधिकार नव्हता, अशांनी या भाषेतून प्रथम व्यवहार सुरू केला व नंतर तिला लेखनरूप दिले व त्यातही अध्यात्मविद्येशी समांतर अशी भक्तिप्रेरित रचना करून तिला प्रतिष्ठा मिळवून दिली. अभिजनांपैकी महान भाविकांनी व ज्ञानदेवांसारख्या नाथपंथियांनी या प्रादेशिक भाषेला तात्त्विक लेखनाची बैठक देऊन संस्कृतइतकी प्रतिष्ठा आणून दिली. महानुभावियांनी तर मराठीतील लीळाचरित्राचा काही भाग 'रत्नमालास्तोत्र' या नावाने संस्कृतमध्ये अनुवादित करून मराठीच्या क्षमतेची ग्वाही संस्कृतद्वारा सर्वदूर पोहोचविली.

बहुजनांनी घडविलेल्या मराठीच्या यादवकाळातील या रूपाची विविधता नामदेवादिकांची अभंगवाणी, लीळाचरित्र व ज्ञानेश्वरी या सांप्रदायिक साहित्यकृती यांच्या आधारे आकलन होऊ शकतात.

**आदिकालातील उत्तरायण –** यादवपूर्वकालापासून आकारास येत असलेल्या मराठीचे यादवकाळातील कळसाध्याय रचणारे भाषिक रूप असे त्रिवेणी संगमासारखे आहे. यांपैकी वाक्यरचनाविशेष हे लीळाचरित्रासारख्या गद्यस्वरूपी लेखनावरून जाणता येतात. निर्मितीनंतर अल्पकाळातच हे लेखन गुप्तलिपीत बंदिस्त झाले. पण त्यामुळे त्याच्या भाषिक रूपामध्ये फारसा फरक पडला नाही. त्यामुळे यादव-मराठीचे पुष्कळसे अविकृत स्वरूपातील रूप लीळाचरित्रातून मिळू शकते. नामदेवांची पद्यरूपी अभंगवाणी आणि ज्ञानेश्वरी यांमधून शब्द, प्रत्यय, सामान्यरूप, शब्दयोगी अव्यये यांसारखे मराठीचे विशेष लक्षात घेता येतात.

अभंग-ओवीसारख्या स्फुटरचना लोकांच्या तोंडी असतात; व त्यामुळे त्यांच्या भाषेचे अर्वाचिनीकरण होत असते. नामदेवांच्या अभंगवाणीतील भाषेचे स्वरूप ही शक्यता गृहीत धरून समजून घ्यावे लागते. संस्कृतचा सर्वच समाजावर असलेला प्रभाव त्याच्या १) देवांगना, ऋद्धिसिद्धी, पंढरी माहात्म्य इत्यादी सामाजिक रचनांमधून जाणवतो, तसेच २) बोचकी-लुगडी, सुवर्णमडकी, चरणचाली, ठेवाठेवी, ओढीओढी, सर्पपिला अशी; अर्धमराठी, अर्धसंस्कृत अशा शब्दांनी साधलेली सामासिक रचनाही या अभंगांत खूप आहे. ३) चोविसा (पेक्षा) वेगळा, निर्गुणा (पेक्षा) निराळा, सहस्रा (पेक्षा) आगळा, ही एक वेगळी खास लकब आहे. ४) लेकुरवाळा, कांचनिक हे शब्दप्रयोगही लक्षात राहण्यासारखे आहेत. ५) चराचर, देवाधिदेव अशा संधियुक्त रचनांबरोबरच स्वअंगे, आदिअंती, अशी संधिविरहित रूपेही योजलेली आहेत. ६) त्यासही अशा काही ठिकाणी 'ही' हे शुद्ध शब्दयोगी अव्ययही आढळते. ७) बोलण्यासारखे लेखन- आलात (आला आहात), सांगताहेत (सांगत आहेत) ८) 'न' अव्यय योजून नकारार्थी क्रियापदरूपे- नावडे, नेणती, नवजे ९) नकारार्थी क्रियापदरूपे- देऊ नये, सोडविना, बोलू नये, सुटो नेणो. ही भाषा त्यांच्या सततच्या सहवासातील आहे, म्हणूनच तिचे कौतुक करण्याची गरज त्यांना वाटत नाही.

यादव-मराठीचे तात्त्विक स्वरूपदर्शन घडविणारी ज्ञानेश्वरी ही नुसती गीता-टीका नाही. तो साहित्यनिर्मितीचा, संस्कृतमध्येही नसलेला एक अद्भुत प्रकार आहे. काव्य व शास्त्र यांना एकत्र आणणारा हा साहित्यप्रकार म्हणजे 'शांताचे घर' आहे. अभिनवगुप्तांसारख्या संस्कृत साहित्यशास्त्रकाराने, बाराव्या शतकात 'शांतरस हा नुसता नवरसांपैकी एक रसच आहे, असे नसून तो महारस आहे.' हे संस्कृत साहित्यशास्त्रात सिद्ध केले. त्याचेच प्रत्यंतर ज्ञानदेवांच्या या ग्रंथराजाने

परतत्त्वस्पर्शाचा प्रत्यक्ष अनुभव आणून देऊन साध्य करून दाखविले. ज्ञानदेवांच्या व्यक्तिमत्त्वामध्ये अध्यात्मवादी दर्शनकार व प्रतिभासंपन्न कवी या दोन्ही भूमिका एकवटलेल्या आहेत. म्हणूनच हा तत्त्वदर्शी ग्रंथ श्रेष्ठ काव्यानुभूतीची प्रचिती आणून देतो.

शैव परंपरेतून आलेला शांतरस व नामदेवादी संतांनी साकार केलेला भक्तिरस यांना प्रधान मानून वारकरी संप्रदायांनी रचिलेले हे यादवकालीन साहित्य मराठीचा संस्कृतपेक्षा वेगळ्या मार्गावरचा आविष्कार मानला जातो. मराठी समाज-संस्कृती-मन यांच्या वेगळेपणाचे दर्शन त्यातून घडते. संस्कृतमध्ये प्रिय असलेल्या 'शृंगाराचे माथा पाय ठेवी' अशा शांत-भक्तिरसाला साकार करण्याची गरज, आध्यात्मिक पातळीवरच्या प्रबोधनातून समाजप्रवृत्तींना 'मार्गाधारे' ठेवण्याची वृत्ती, काव्य-शास्त्र यांची एकत्रित कलात्मक-आत्माविष्कारक्षमता. बहुजनसमाजाच्या अंतःशक्तीच्या जागृतीसाठी त्यांच्या तोंडच्या भाषेचा स्वीकार तात्त्विक लेखनासाठी करण्याचा क्रांतिकारी निर्णय, हे सर्व घटक यादव-मराठीने सहजपणे व्यक्त केलेले आहेत. तात्त्विक-ललित, बहुजन-अभिजन, शैव-वैष्णव, लोकसाहित्य-विदग्ध साहित्य या सगळ्यांमधून काही स्वीकारत, काही नाकारत मराठीने ही भाषिक विकासाची वाट अनुसरली आहे. मात्र आपल्यासमोरचे ज्ञानेश्वरीचे भाषारूप पुष्कळसे एकनाथकालीन असण्याची शक्यता नाकारता येत नाही.

ज्ञानेश्वरी, नामदेवांचे अभंग किंवा लीळाचरित्र यांमधील प्रक्षिप्त भाग काढून हे भाषाविशेष लक्षात घ्यावे लागतात. लीळाचरित्र व ज्ञानेश्वरी हे ग्रंथ अभिजनवर्गांनी लिहिलेले आहेत. लीळाचरित्राच्या शिष्यपरिवारातील बहुसंख्य वर्ग हा अभिजन आहे. त्यांनी धर्मभाषा म्हणून मराठीचा स्वीकार केला असल्याने अभिजन व बहुजन अशा दोन्ही वर्गांसाठी त्यांनी लेखन केले आहे. पंडिती वळणाचे सूत्रबद्ध ग्रंथ हे अभिजनांसाठी असल्याने त्यांच्या भाषेचे स्वरूप संस्कृतप्रचुर शब्द, रचना, पारिभाषिक शब्दांचा वापर अशा प्रकारचे आहे. पण लीळाचरित्रासारख्या चरित्रग्रंथाचा उद्देश बहुजनांना महानुभाव-तत्त्वज्ञान-कथनाचा असल्याने त्याचा ढंग लोककथेच्या भाषेचा ठेविलेला आहे. लीळा या प्रकारात-गोष्टी, मात, कथा, वार्ता व आख्यायिका येतात. त्यांचे प्रयोजन ज्ञानप्राप्ती व संदेहनिवृत्ती हेच असते. या संप्रदायात या दोन्ही प्रकारच्या लेखनाचे स्थान समान मानले आहे.

लीळाचरित्रासारखे लेखन तेराव्या शतकापूर्वी आढळत नाही. नंतरही अशा प्रकारच्या लेखनाची परंपरा राहिलेली नाही. याच्या उगमाचा शोध घेताना डॉ. श्री. रं. कुलकर्णींना तो उगम जैन वाङ्मयात जैन अपभ्रंशात सापडला. जैन अपभ्रंशामध्ये जैन तीर्थंकर व इतर श्रेष्ठ पुरुषांची चरित्रे जैन संप्रदाय प्रसारार्थ रचलेली आहेत. आठव्या शतकानंतर वऱ्हाड व मराठवाडा या प्रदेशांत असे लेखन करणारे अनेक जैन ग्रंथकार होऊन गेले. त्याच प्रदेशात महानुभाव संप्रदायाचा प्रसार होत असल्याने त्याच शैलीचा व कथनपद्धतीचा आदर्श लीळाचरित्रासमोर असणे स्वाभाविक आहे. घाट चरित्राचा व प्रसंगोपात्त उपदेश असेच स्वरूप लीळाचरित्राने जैन साहित्याच्या पद्धतीचे केलेले दिसते. (डॉ. श्री. रं. कुळकर्णी, तत्रैव पृष्ठ ७८,७९)

> विविध प्रदेशांतील व्यक्ती, त्यांची बोलीभाषा, त्यांचे व्यवसाय, त्यांची जीवनसरणी, त्यांच्या श्रद्धा, खाद्यपदार्थ, वस्त्रप्रावरणे यांचे भांडारच लीळाचरित्रात उघडले जाते. हा जैन अपभ्रंश भाषेतील लेखनादर्श समोर असल्याने मराठीतील हे लेखन नवखे वाटत नाही. प्रसंगचित्रण, व्यक्तिदर्शन, नोंद, कथा या सगळ्याच चित्रणात ''ती अडखळल्यासारखी वाटत नाही. ती सहजपणे बोलत जाते आणि इकडे चित्र उमटू लागते. साऱ्या रंगांनिशी जिवंत आणि ठसठशीत असे चित्रण निर्माण होते.'' (डॉ. व. दि. कुळकर्णी, लीळाचरित्र- एक अभ्यास, व्हिनस प्रकाशन, द्वितीय आवृत्ती १९७८, पृष्ठ ७८)

हे तिचे साहित्यरूप लक्षात घेतल्यास जैन अपभ्रंशाचे भाषिक व साहित्यिक विशेष तिने कसे आत्मसात केले आहेत, ते कळून येते. लीळाचरित्रासारखे घटनाप्रधान ललित लेखन व त्याला प्रमाण मानून रचलेले महानुभावीय तात्त्विक शास्त्रीय लेखन, ही काव्य व शास्त्र यांना जवळ

आणणारी भूमिका, संस्कृत साहित्य-संस्कृतीपेक्षा वेगळी दृष्टी आहे. कदाचित जनसामान्यांच्या आकलनक्षमतेत कथा-घटनादी साहित्यामुळे येणारी सुलभता लक्षात घेतली असावी.

अभिजनवर्गीय लेखक-श्रोत्यांची बहुसंख्या लक्षात घेता, या लेखनात तत्सम व तत्सम पारिभाषिक संज्ञा विपुलतेने असणे स्वाभाविक आहे. पण मराठीने त्यांमध्ये अर्थविस्तार व अर्थसंकोचही केल्याचे 'लीळा'सारख्या संज्ञांवरून जाणवते. 'लीळा' ह्या शब्दाचा संस्कृतमधील अर्थ 'परमेश्वराने चेतनाबरोबर केलेल्या सहेतुक क्रीडा' असा आहे व जडाबरोबर केलेल्या क्रीडांना 'चेष्टा' असा शब्द आहे. पण लीळाचरित्रात 'लीळा' ही संज्ञा या दोन्हींसाठी योजलेली आहे. एवढेच नव्हे तर, स्वामींच्या स्वतःबरोबरच्या क्रीडा, एका गावाहून दुसऱ्या गावी जाणे यांनाही 'लीळा' असेच संबोधिले आहे. तसेच काही स्वतंत्र परिभाषाही लीळाचरित्रात योजलेली दिसते. चक्रधर ही व्यक्तिरूपात वावरणारी व्यक्ती असली, तरी ती परमेश्वरी शक्ती, अवतार आहे; हे स्पष्ट करण्यासाठी ते स्वतःबद्दल 'हे, एथ, एथौनि' ही सर्वनामे योजतात. ही भाषा आत्तापर्यंतच्या कोणत्याही अवताराच्या संदर्भात योजलेली नाही.

चक्रधर व इतर व्यक्ती यांच्यातील वेगळेपणा व्यक्त करणारी परिभाषाही लीळाचरित्रात योजलेली दिसते. उदाहरणार्थ जेवण-खाण, निद्रा, मुखशुद्धी या चक्रधरांच्या क्रियांना 'मर्दना-मार्दन, आरोगण, पहूड-उपहूड, ताट, विडा इत्यादी संज्ञा; पण इतरांच्या संदर्भात मात्र उटणे, न्हाणे, जेवणे, निजणे, उठणे, ठाय, तांबुळ इत्यादी संज्ञा योजलेल्या आढळतात.

संन्यासधर्मावर भर असलेल्या या संप्रदायात गावोगावी किती कालावधीत वास्तव्य केलेले आहे, यालाही महत्त्व असते. म्हणूनच 'आसन'- घटका दोन घटका विश्रांती. 'वसती'- रात्रीचा मुक्काम व 'अवस्थान'- एकाहून अधिक दिवसांचा निवास. अशा संज्ञा रूढ झालेल्या दिसतात. हे शब्द तत्सम असले, तरी फक्त रूपदृष्टीने आणि त्यांचा अर्थ मात्र संप्रदायपोषक आहे. मराठीची नवपरिभाषा घडविण्याची क्षमता यांद्वारा जाणवते. मराठी भाषेच्या अशा नवनिर्माणक्षमतेचे दर्शन व त्यातील विविधता या बृहद्स्वरूपी ग्रंथातील एकाक, पूर्वार्ध व उत्तरार्ध या तीनही विभागांतून प्रकटली आहे.

लीळाचरित्रकाराला संस्कृतशब्दसिद्धीचा परिचय होता. त्याप्रमाणे त्याने पोफळफोडणा: म्हातारदाम, दूधकरटा, उठाउठी, सेणामाती असे नवे शब्द घडविलेले दिसतात. नवल म्हणजे 'अडकित्ता'सारखा कन्नडमधून आलेला शब्द योजण्यापेक्षा, 'पोफळफोडणा' असा संस्कृतधर्तीचा शब्द योजण्यावर लीळाचरित्रकाराचा भर आहे. शब्दसिद्धीची ही प्रवृत्ती नंतरच्या बहामनी-पेशवेकाळातील फारसी शब्दांच्या संदर्भातही मराठीत योजलेली दिसते.

संस्कृतमधून घेतलेल्या शब्दांमध्येही मराठीने अर्थबदल केला. हे 'सासुरवास'सारख्या शब्दाच्या मराठीतील अर्थावरून (सासरी वास- संस्कृत, सुनेला सासरी होणारा त्रास- मराठी) लक्षात येतो. अशा प्रकारच्या सामासिक शब्दांनी भाषेत भारदस्तपणा येतो, हा अनुभव या अभिजनवर्गीय लेखकांना संस्कृतच्या परिचयाने आलेला होता. त्याचा उपयोग मराठीच्या शब्दघडणीस मिळाला. संस्कृतमधील संधीचाही मराठीत स्वच्छंदपणे वापर केलेला लीळाचरित्रात दिसतो. एकाच शब्दाची संधियुक्त व संधिविरहित रूपे वापरात दिसतात. उदा. पूजावसर- पूजा अवसर, आइकिले- ऐकिले, आरत- आर्त, अंतराळ- अंत्राळ इत्यादी. या स्वरूपाच्या लेखनातून शुद्धलेखनाच्या नियमांची अनिश्चितता किंवा प्राथमिक अवस्था जाणवते. विभक्तिप्रत्ययांच्या जोडीला कारकार्थ-व्यक्तीसाठी शब्दयोगी अव्ययांचा वापर विपुल प्रमाणात आढळतो. उदाहरणार्थ उपरियेवरी, वडाखाली, अवश्रुतापासि, मालाकडौनि या उपयोगांप्रमाणेच- माझीये-(माझ्या), गोसावीयांसि (गोसाव्यासी) अशी रूपेही योजलेली आहेत. सामान्यरूपाची प्रवृत्ती प्रथमा व द्वितीया या विभक्तींच्या संदर्भात यादव-काळात त्यांना प्रत्यय असूनही कमी आहे.

संयुक्त क्रियापदे हा यादव-मराठीचा आणखी एक विशेष आहे. ''संयुक्त क्रियापदे (compound verb) हे आख्यातविभक्तीचे तिसरे व परिणत स्वरूप आहे. आख्यातविभक्तीची प्रत्ययी रूपे कमी होऊन त्यांच्या ठिकाणी धातुसाधिते येणे व पुढे या धातुसाधितांना सहायक

धातूची जोड मिळून सामासिक स्वरूपाची किंवा संयुक्त क्रियापदे निर्माण होणे हे भाषेच्या विकासाला धरूनच आहे. नामविभक्तीत शब्दयोगी अव्ययांचे जे स्थान, तेच आख्यातविभक्तीत सहायक क्रियापदाचे आहे. 'या परिणत अवस्थेत मुख्य धातूचे कृदन्त रूप व सहायक धातूचे आख्यातरूप यांचा संयोग होऊन संयुक्त क्रियापद सिद्ध होते.'' (डॉ. तुळपुळे यादवकालीन मराठी भाषा, पृ. १७) अशा प्रकारे– 'अस्' व 'हो' या धातूंचे साह्य घेऊन साधलेली संयुक्त क्रियापदे– ('बोबात असति', 'बांधत असे', 'करीत होते' इत्यादी) व 'जळो लागले' 'बांधु आदरिला' 'बोलावा जा' 'जावो ने दिजे' अशी 'लाग' 'आदर', 'जा' इत्यादी धातूंचे साह्य घेतलेली संयुक्त क्रियापदेही आढळतात.

यादव–मराठीच्या भूत–वर्तमान आख्यातात विशेषणांचे गुणधर्म येऊ लागले होते. 'आख्यातविभक्तीची प्रत्ययीरूपे कमी होऊन त्यांच्या ठिकाणी धातुसाधित येणे' म्हणजेच धातुसाधितांचा वापर क्रियापदांसारखा होणे होय. वर्तमान–भूत–रीती या आख्यातातील अशी रूपे लिंगविकारही स्वीकारताना दिसतात. धातुरूपेशाच्या लिंगवचनाप्रमाणे क्रियापदाचे रूप बदलण्याची पद्धती बंगाली–मराठी अशा काही थोड्याच भाषांमध्ये आहे. मराठीत प्रयोगव्यवस्था बदललेली असल्याने या अशा प्रयोगात कर्ता–कर्म यांपैकी कोणतेही पद धातुरूपेश असते. (**विद्यार्थी** धडा वाचतो– कर्तरिप्रयोग, कर्ता धातुरूपेश, विद्यार्थ्याने **धडा** वाचला. कर्मणिप्रयोग– कर्म धातुरूपेश व 'रामाने रावणाला मारले– भावेप्रयोग– धातुरूपेश पद नसते.) ही रचना खास मराठीत आहे, संस्कृतमध्ये नाही व त्याचा संबंध धातूने लिंगविकार स्वीकारण्याशी आहे. (डॉ. गोविलकर– तत्रैव पृष्ठ २३५) संस्कृत–अपभ्रंश–मराठी अशा साच्यातून मराठी वाक्यरचनेचा विचार करून 'सते चतुर्थीच्या साच्यात मराठीच्या एखाद्या वाक्यरचनेला बसविण्यापेक्षा' ''मराठीची चिकित्सा तिच्या स्वतःच्या रूपावरून केली पाहिजे. आपण निर्माण केलेल्या तिच्या संस्कृत छायेवरून नव्हे'' ही डॉ. तुळपुळेंची भूमिका मराठीचे विशेष व तिचा विकास समजून घेण्याच्या दृष्टीने योग्य ठरते. (डॉ. तुळपुळे, तत्रैव पृष्ठ २६६)

लीळाचरित्राच्या गद्यातूनही वाक्यरचनेचे विशेष स्पष्ट होतात. 'तेणे हाक दिधली: गोसावी सीव्ह नादु केला' अशा वाक्यातील कर्ता–कर्मादी विभक्ती लक्षात येते. कर्ता–कर्मादी पदे गृहीत धरण्याची पद्धतीही दिसते– (हो घोडा अमुकी ये जातीचा: अमुका गुण: अमुके लक्षण) कधी नुसतीच क्रियापदे येतात (सर्वज्ञे म्हणितले: पाहिजे: प्रसीजे: चर्चिजे) मात्र ही केवळ वाक्ये एकमेकांशेजारी ठेवली, तर त्यांतून संमिश्र संयुक्त वाक्यरचनाही जाणवते. (हा, गा, तुम्ही अवघे आलेतिं: डांगरेश न येतिचि तें काइः) या दोन वाक्यांत 'परी' हे उभयान्वयी अव्यय अध्याहृत आहे. (डॉ. गं. ना. जोगळेकर, तत्रैव, श्रीविद्या प्रकाशन, २००५, पृष्ठ १४४, १४५)

वरवर साहित्याचे रंग असलेली ही भाषा अंतरंगात मात्र तात्त्विक विचारांच्या बैठकीवर आधारलेली आहे. हे साधणे सोपे नाही. तिच्यात वाक्प्रचार–म्हणी, सुभाषिते यांचीही रेलचेल आहे. तत्कालीन जीवनाशी संबंधित नामसाह्य घेणारी क्रियापदे– बीजे करणे (निघणे), मुद्रा घालणे (बंद करणे), अवसर देणे (भेटणे), टाळी चेतविणे (समाधी उतरविणे) किंवा ढोरे राखणे, कपाळी घालणे यांसारख्या आजच्या मराठीत लुप्त झालेल्या रचना लीळाचरित्रात आहेत. वाक्प्रचार–म्हणींमध्ये 'हाती गुढिला निका दिसे। जोगी मुंडिला निका दिसे।' किंवा 'फुटला तरी डोळा, मोडिली तरी काठी।' सुभाषितांमध्ये 'स्नेहाच्या ठायी उचित स्फुरे।' 'महान्मेनि प्रीयवक्तया होआवे' यांमधून तत्कालीन जीवनसरणी व महानुभाव संप्रदायाची संन्यासप्रवणता, तात्त्विक विचारसरणी यांचे दर्शन घडते.

अशी वाक्यरचनेची वैशिष्ट्ये ज्ञानेश्वरीसारख्या पद्यरूपी ग्रंथात कमी आढळतात. पण शब्द, प्रत्ययव्यवस्था, सामान्यरूप करण्याची मराठीची प्रवृत्ती, कारकार्थासाठी शब्दयोगी अव्ययांचा वापर, कधी–कधी संधी टाळण्याकडे प्रवृत्ती (पांडवाआतु, सैन्याआंतु), संयुक्त क्रियापदे, शब्दसिद्धीचे विविध प्रकार इत्यादी यादव–मराठीचे विशेष भाषेत उरलेले जाणवतात. ज्ञानेश्वरीच्या ग्रांथिक ओवीमध्ये

असलेल्या या निरूपणात मराठीचे व्यावहारिक पातळीवरचे विशेष कमी आढळतात. ती पसरटपणाकडे व नादमधुरतेकडे झुकलेली आहे. (उदाहरणार्थ माझिया, सुखीया, कोवळिकोचेनि इत्यादी) कौतुके-(कौतुक करावे अशी), किंवा आपणपेंयासारिखे-(आत्मौपम्येन) असे वेगळे शब्द ज्ञानेश्वरीने घडविलेले आहेत. गोडिसपणे, झाकलेपणी या पणे-पणी रचनेतही वेगळेपणा आहे. आंग नेघे (बाळसे धरत नाही), गजबज जाहली, दळभार सरसे करणे, रथु पेलणे असे शब्दप्रयोग मराठीच्या शब्दघडणीचे सामर्थ्य लक्षात आणून देतात.

धातुसाधित विशेषणांचा उपयोग (**धडधडीत** अंबर, **उचंबळत** सागर, **क्षोभले** चराचर) करून वातावरणनिर्मिती साधणे हा विशेष ज्ञानेश्वरीत खूप ठिकाणी आहे. लांबलचक सामासिक शब्दयोजना हा विशेषही तिच्या पानोपानी आहे. उदाहरणार्थ: संयमाग्नीहोत्री, हृदयकमळआरामु, लावण्यगुणकुळवती, विश्वप्रगटिया गभस्ती ही विशेषण विशेष्य रचनाही वेगळी आहे. श्रीकृष्ण-अर्जुनाची अनेक नावे (कृष्ण- शाङ्‌र्गधर, रमानायक, अच्युत, योगीश्वर, अनंत, गोसावीया इत्यादी अर्जुन- धनुर्धरा, पार्था, सुभटा, कौंतेय, कुंतिसुता, पांडुसुता इत्यादी) व त्यांचे योग्य स्थळी उपयोजन हे मराठीचे शब्दवैभव संस्कृतमधील 'अमरकोशा'चे स्मरण देणारे आहे.

या तिहेरी स्वरूपातील मराठीचे भाषिक/व्याकरणिक विशेष पुढीलप्रमाणे-

**ध्वनिव्यवस्था –** महाराष्ट्री अपभ्रंशात नसलेले ऋ, ॠ व श, ष, स हे तीन उष्मे यादव-मराठीत आहेत 'ष' ऐवजी 'ख' योजण्याची प्रवृत्ती (विषो- विखो, पुरुष- पुरुखो इत्यादी) 'ळ' हा वर्ण द्राविडी किंवा पाली या भाषांतून आला असावा. च-ज या दंतमूलीय व्यंजनोच्चाराचा प्रारंभ याच काळात असावा असे जे, जो या संबंधी सर्वनामांवरून करिजे, बोलिजे, अवधारिजो या आख्यातरूपांवरून जाणवते. मराठीचे लेखन ऱ्हस्वान्त आहे. ऐ, औ हे स्वर तत्समद्वारा व तद्भवद्वाराही साधलेले दिसतात. प्रतिज्ञाÕपइज्जÕपैज, चतुर्थÕचउत्थÕचौथ 'ऋ'ची अ, आ, इ, उ, ए अशी रूपे, कृष्ण – किसन, मृदु – मऊ गृह-गेह, कृष्ण- कान्हा इत्यादी ऋ- र ऋतु- रितु. 'ण' कधीही शब्दारंभी नाही.

**प्रगृह्य निवारण –** संस्कृतातून शब्द प्राकृतात येताना त्याच्या ध्वनींमध्ये विशेष परिवर्तन होते. खूपदा आद्येतर स्थानी असलेल्या क्, ग्, च्, त्, द् यांसारख्या व्यंजनांचा लोप होतो. त्यामुळे अर्थव्यक्तीत अस्पष्टता येते. अशा वेळी या प्रगृह निवारणासाठी- १) यश्रुती- पसायदानÕ पसादारानÕ पसायदान २) वश्रुती- घातÕ घाओÕ घाव ३) स्वरसंक्षेप- अजगरÕ अंअअरÕ आर ४) संयुक्त स्वर- प्रतिष्ठानÕ पइठ्ठाणÕ पैठण, ५) स्वरभक्ती- आदर्शÕ आरिसा, ६) मध्यमस्वरलोप- वरहाटकÕ वऱ्हाड, ७) स्वराचे अनुनासिकीकरण- शतम्Õ शे, ८) स्वरांचे निर्नासिकरण कूष्मांडÕ कोहळा

**रूपविचार –** लिंगाच्या सामान्यीकरणाला या काळात प्रारंभ झाला. पुल्लिंगाची स्त्रीलिंगीरूपे इ, ईण हे प्रत्यय लावून होऊ लागली. (गोसावीÕ गोसावीण, राणाÕ राणी इत्यादी.) यादवकालीन मराठीसारखी भाषा निसर्गसिद्ध, अर्थसिद्ध लिंगाला सोडून नामाच्या अंत्यवर्णावरून त्याचे लिंग करताना दिसते. वचनांच्या संदर्भात मराठीत दोन वचने, प्रत्यय फक्त अनेक वचनदर्शक, पुष्कळदा त्याला अनुस्वार-साह्य. विभक्तिप्रत्यय- द्वितीया-चतुर्थी प्रत्यय समानता, चतुर्थी षष्ठी-सप्तमी यांसाठी 'आ' प्रत्यय, तृतीया-ऐ, चतुर्थी-ति, पंचमी- औनि, षष्ठी- चा. षष्ठीची वैशिष्ट्यपूर्ण रूपे- मऱ्हाटीयेचिये, जयाचे इत्यादी. सर्व सर्वनामे-नामे यांच्यासाठी विभक्तिप्रत्ययांचा एक समान साचा १) सामान्यरूपामुळे शब्दाचे लिंग व अंत्याक्षर कळण्याची सोय- याचा अर्थ संस्कृतमध्ये लिंग-अंत्याक्षराकलनासाठी प्रत्ययांचे स्वतंत्र असलेले साचे मराठीने टाकून दिले. पण ती त्यांच्या आकलनाची सोय सामान्यरूपाद्वारा केली. २) शब्दयोगी अव्ययांद्वारे कारकाभिव्यक्ती, प्रत्ययी व शब्दयोगी अव्ययसाधित यांच्यामधली अवस्था म्हणजे अर्धप्रत्ययसाधित नामविभक्ती होय. मराठीतील तृतीयेचा नि (संस्कृत सहितम्), चतुर्थीचा सि (संस्कृत आर्थे) ते-थे (संस्कृत

अर्थे) षष्ठीचा च (संस्कृत चैव किंवा कृत्य) हे प्रत्यय मुळातील सार्थ अशा शब्दांतून आलेले आहेत. प्रत्ययी व अर्धप्रत्ययी रूपांत सामान्यरूपाचा वापर नसला, तरी शब्दयोगी अव्ययांच्या संदर्भात त्याचा वापर सुरू झाला होता. या सामान्यरूपाला षष्ठीचे अधिष्ठान आहे. शेषे षष्ठी या संस्कृतातील सूत्राप्रमाणेच प्राकृत अपभ्रंशात अनेक विभक्तींचे काम षष्ठी करीत असे. या सामान्य विभक्तीच्या आधारेच सामान्यरूप आले आहे. यादव-मराठीत द्वितीया, तृतीया, चतुर्थी व सप्तमी या चार विभक्तींना जोडून शब्दयोगी अव्यये येतात. आख्यातविभक्ती- वर्तमानकालवाचक- जाए, पोहति, धरु, जाणा पुरेति, पुसे, करी, पाहो. भूतकालवाचक- करवियले, रीतिभूतकालवाचक- जाई, करी. भविष्यकाळची रूपे वर्तमानकाळाप्रमाणे आणील, होईल, करीन इत्यादी. 'ई' आख्यात सर्वगामी म्हणता येईल. भूतकालवाचक व भविष्यकालवाचक धातुसाधिते सर्वत्र वापरात होती. 'उनि' किंवा औनि या प्रयत्नांनी युक्त अशी ल्यबन्ते आणि 'उं' व 'ओं या प्रत्ययांनी युक्त अशी तुमन्ते तसेच सहाय धातू, संयुक्त धातू व प्रयोजक धातू यांचीही उदाहरणे आढळतात. कर्मणिप्रयोग मुख्यतः 'इज' प्रत्ययान्त व विध्यर्थ प्रामुख्याने 'व' प्रत्ययान्त आढळतो. संयुक्त क्रियापदाबद्दल पूर्वी लिहिले आहेच. धातुसाधितांचे स्वरूप कधी-कधी विशेषणात्मकही असते-निजैले बैसले ठायी इत्यादी.

लीळाचरित्र व ज्ञानेश्वरी यांच्या संदर्भात अर्थविचार आलेला आहे. शब्दसंग्रहाच्या संदर्भात तत्सम, तद्भव, देशी, कन्नड, तेलगू, तमिळ अशा अनेक भाषांतून मराठीचा शब्दसंग्रह व्यापलेला आहे. धर्म, तत्त्वज्ञान, नीतिविचार, भक्तिमार्ग, ज्ञानोपासना इत्यादी क्षेत्रांत तत्सम, व्यावहारिक क्षेत्रात तद्भव विपुल प्रमाणात आहेत. अंधार, खीर, घर, तण, दही असे काही अपभ्रंश भाषेतील शब्द मराठीत तसेच्या तसे तर आणा-आण, खंभ-खांब असे काही अपभ्रंशात बदल होऊन मराठीत आले. आरोगणे, उजगरा असे देशी शब्दही आहेत. पोट (होट्टी- कन्नड) गढी (गडी- कानडी) असे काही देशी शब्द कन्नडशी साम्य दाखवितात.

मराठी ही आर्य व द्रविड या संस्कृतींचा संगम आहे, असे डॉ. माणिक धनपलवार आग्रहाने सांगतात (डॉ. माणिक धनपलवार तत्रैव, पृष्ठ १) त्यांपैकी कन्नडमधून आलेले अनेक शब्द गोंधळ (गद्दर्ला), अडकित्ता (अडकी कित्तु) भीड (संकोच) असे काही कन्नड शब्द अजूनही टिकून आहेत. भांगार, अंदु, हडपु असे काही कन्नड शब्द फक्त यादव-मराठीतच आढळतात. काही नादानुकारी, सादशब्द यांमध्ये चोर-बीर, पुस्तक-बिस्तक, हा 'ब' कन्नडप्रवृत्ती समजली जाते. कन्नडखेरीज, जाडी (पांघरण्याचे जाड वस्त्र) अरूवार (मृदू), बरड (नापीक जमीन) असे काही तेलगू शब्द; पिलू (पिल्लई) यासारखे नातेवाचक तमिळ शब्द मराठीत आढळतात. 'तुरूक'सारखा एखादा फारसी शब्दही सापडतो.

या शब्दांबरोबर मराठीतील वर्ण, प्रत्यय यांचे ठसठशीत उच्चारण, शब्दयोगी अव्ययांचा व संयुक्त क्रियापदांचा वापर इत्यादी अनेक स्वभावविशेषांशी या विविध भाषांचा संबंध किती आहे, हे याचा तपशीलवार विचार करून ठरविण्याची गरज खैरेंसारख्यांच्या गृहीतकांनी निर्माण केली आहे.

## मराठी भाषा – मध्यकाल

आदिकालानंतरचा हा मराठीचा दुसरा कालखंड- 'मध्यकाल'- इ.स. १३५० ते १८५०. इ.स. १३१८ च्या यादवांच्या पराभवाने व महाराष्ट्राचे स्वातंत्र्य नष्ट करणाऱ्या बहामनी कालखंडाने 'मध्यकाला'चा प्रारंभ होतो. इ.स. १३५० ते इ.स. १६०० या कालखंडात फारसीशी तिचा संपर्क जेत्यांची भाषा म्हणून आला. नंतरच्या इ.स. १६०० ते इ.स. १७०० या कालखंडात फारसीचा प्रभाव कमी करण्याचा प्रयत्न शिवकाळाने केला आणि नंतरच्या इ.स. १७०० ते इ.स. १८५० पेशवेकाळात महाराष्ट्रावर मराठी भाषकांचीच सत्ता असली, तरी मराठीपेक्षा संस्कृत-फारसीचे राजदरबारी असलेले वजन तिला टाळता येण्यासारखे नव्हते.


ए.भा.

॥श्रीगणेशायनमः॥श्रीएकनाथायनमः॥अथचतुःश्लोकीप्रमेव
टिकाभागवतद्वितीयस्कंधनवमोध्यायटीकाप्रारंभः॥श्लोक॥॥
गुरुचरणप्रतापेंपुण्यपापेंजळालींत्रिभुवनसमतीर्थेंतानगंगेमि
ळाली॥रूपअरूपअपहतांभावनारामस्तळीनिश्चिंदिनिंगुरुराया
उन्मनीसोंपआली॥१॥आदींवंदूंगणनायका॥नरकुंजराअळो
किका॥नरगजस्वरूपेंतूंएका॥नमनश्रीविनायकासद्गुरू॥१॥
तुम्नसद्भावेंकरितांनमन॥विघ्नचिहोयनिर्विघ्न॥यापरितुसीकृपा
राम पूर्ण॥चैतन्यघनगणराजा॥२॥सालंकृतरूपकुमारी॥हंसारूढपर १
मेश्वरी॥सद्गुरुरूपेंवागेश्वरी॥म्यांमजमाझारींवंदिली॥३॥वाचाव

एकनाथी भागवत - हस्तलिखित पोथीचे प्रारंभीचे पृष्ठ.

इ. स. १८१८ नंतरच्या ब्रिटिश सत्तेच्या इंग्रजीचा प्रभाव मराठीवर पडायला काही काळ जावा लागतो. या दृष्टीने मध्यकाल हा सन १८५० पर्यंत मानला जातो.

या ५०० वर्षांच्या कालखंडातील मराठीचे भाषिक स्वरूप एकसारखे असणे शक्य नाही. बहामनी- पूर्व व उत्तर, शिव व पेशवे या कालखंडाने तिच्यात काही भाषिक वेगळेपणा आणलेला असणेही नाकारता येत नाही. पण आदिकालीन मराठी भाषिक स्वरूप व मध्य कालातील भाषेचे स्वरूप यांमध्ये जसे लक्षात येण्याइतके अंतर आहे; तसे बहामनी, शिव व पेशवे या कालखंडांतील मराठीत जाणवत नाही. या कालखंडांत मराठीत काही समान सूत्रेही आहेत. उदाहरणार्थ १) राजदरबारी तिचे अस्तित्व फारसीने वेढलेले आहे व २) अभिजनांच्या लेखनात तिला संस्कृतीकरण टाळणे सोपे नाही. ३) आदिकालीन मराठीपेक्षा ती वर्तमान मराठीला जवळची वाटावी इतपत सुलभ/सोपी झाली. ४) अरबी-फारसी, तुर्की-युरोपिअन-संस्कृत अशा विविध भाषांच्या आलेल्या संपर्कांतून तिच्या शब्दसंग्रहात अफाट वाढ झाली. ५) यादवकालीन बहुजनप्रमुख असलेली मराठी, अभिजनांनीही स्वीकारल्याने ती 'महाराष्ट्र भाषा' या पातळीवर पोहोचली. ६) शास्त्रीय व ललित लेखन यांमध्ये तिने खूप मजल मारली. ७) संस्कृत शब्दांची मोडतोड करताना व फारसीच्या शब्द-प्रत्यय-उपसर्ग यांना मराठीत रुळवून घेताना तिच्यात जाणवणारा आत्मविश्वास लक्षात येण्याइतका स्पष्ट आहे.

तरीही बहामनी, शिव व पेशवे या कालखंडांचे काही विशेष स्पष्टास्पष्टपणे व्यक्त झाल्याशिवाय राहत नाहीत. बहामनी- पूर्व कालखंडातील फारसी शिव-पेशवेकाळात मराठीत मिसळून गेल्याने तिचा वेगळेपणा खूप कमी झालेला आहे. बहामनी उत्तरकाळापासूनचा संस्कृतचा मराठीत असलेला वावरही मराठीने नंतरच्या काळात आपलासा करून घेतला आहे.

संप्रदायाच्या प्रेरणांनी मराठी भाषा साहित्यात स्थिरावली, पण संप्रदायांचे प्रेरणास्रोत शिवकाळाच्या उत्तरार्धात मंदावले व पेशवेकाळात तर संतसाहित्यप्रवाह दुय्यम पातळीवर पोहोचला. बहामनी काळाच्या उत्तरार्धात नाथांच्या लेखणीने सुरू करून दिलेला पंडिती साहित्याचा प्रवाह पेशवेकाळात बहरला. या अभिजनवर्गीय साहित्यावर त्यांच्या संस्कृताध्ययनाचा प्रभाव असणे स्वाभाविकच आहे. यातूनच यथार्थदीपिकेसारखे तर्कशुद्धतेवर भर देणारे तर्ककर्कश लेखन, कथात्मक साहित्यापेक्षा वेगळे रूप घेऊन आले. यथार्थदीपिका, गीतार्णव, (काही प्रमाणात एकनाथी भागवतही), दासबोध या शास्त्रीय भूमिकेतून रचलेल्या वैचारिक ग्रंथांचे

भाषारूप, ज्ञानेश्वरीपेक्षा व रुक्मिणीस्वयंवरासारख्या कथात्मक लेखनापेक्षा वेगळे आहे. अशा लेखनाला आवश्यक असलेली परिभाषा व शब्दांचा काटेकोर वापर, तर्क पेलून धरणारी वाक्यरचना इत्यादी वेगळेपणा मध्यकाल-मराठीचा भाषिक विशेष ठरू शकतो.

अभिजनांच्या कथात्मक साहित्यात महाभारत व रामायण यांच्या कथांचे झालेले अनुवाद हे प्रबोधन व करमणूक या दोन्हींवर भर देणारे आहेत. शांत-भक्तिरसापेक्षा त्यांना आकर्षण शृंगार-वीरादी प्रापंचिक जीवनातील रसांचे आहे. ते संस्कृत ललित साहित्याचा मराठी अवतार म्हणता येईल. मात्र धर्मप्राधान्य मानणाऱ्या या साहित्याला कीर्तनपरंपरेने सादरीकरणातील नाट्यमयता आणून दिली. त्यामुळे काव्य, नाट्य, संगीत, वादन, अभिनय अशा इतर कलांसह मराठी भाषा बहुजन-अभिजनांसमोर येत राहिली. मराठीचे हे भाषिक रूपही तिचे वेगळेपण व्यक्त करणारे आहे. कीर्तनाचा श्रोता बहुजन व अभिजन अशा दोन्ही पातळ्यांवरचा असल्याने या दोन्ही वर्गांची भाषा सरमिसळीने कथात्मक साहित्याच्या निरूपणात आलेली दिसते, हे नाथांच्या 'भावार्थरामायणा'वरूनही स्पष्ट होते. अभिजनांना असभ्य व असंस्कृत वाटणारी भावार्थरामायणातील काही प्रसंगींची भाषा ही त्यांच्यासमोरचा विविध श्रोतृवर्ग लक्षात आणून देते.

अभिजनवर्गीय लेखकांच्या भाषेत असे लोकभाषा विशेष येणे स्वाभाविक आहे. कारण या काळात नाथ, दासोपंत यांच्यासारख्या अभिजनांकडूनच भारुडे, गौळणी, विरहिणी, वासुदेव, बाळसंतोष इत्यादी लोकवाङ्मयप्रकार रचले गेले आहेत. नंतरच्या काळातही तुकारामांचा अपवाद वगळता रामदासादी अभिजनांकडूनच बहुजनांसाठी जाणीवपूर्वक साहित्यनिर्मिती झालेली आहे. अभिजनवर्गीय लेखन बहुसंख्येने असलेल्या या काळात सर्व समाजाच्या भाषेचे प्रतिबिंब कमी-जास्त प्रमाणात उमटलेले पाहायला मिळते. (नाहीतरी नामदेव-चोखामेळा-कान्होपात्रा यांच्या लेखनातही त्यांच्या-त्यांच्या बोलींचे प्रतिबिंब, त्यांचे लेखन करणाऱ्या 'लेखक'वर्गाच्या मराठीच्या रूपासह आलेले असते.)

बहामनी काळातील नाथ-दासोपंत-मुक्तेश्वर या अभिजनवर्गीयांच्या मराठी साहित्यामध्ये मराठीबद्दलचा अभिमान अनेकदा प्रकटलेला दिसतो. पण पेशवेकाळातील मराठीमध्ये मात्र असे मराठी भाषेबद्दल पुनः पुनः गौरवोद्गार काढण्याची गरज संपावी असे संस्कृतच्या बरोबरीचे, प्रतिष्ठेचे स्थान तिला (खूप प्रमाणात) मिळविता आलेले दिसते. व्यावहारिक व ग्रांथिक आणि बोलणे व लेखन या दोन्ही पातळ्यांवरचा तिच्यामध्ये असलेला सुसंवाद, तिला हे स्थान प्राप्त करून घ्यायला उपयुक्त ठरला आहे.

आदिकालापेक्षा मध्यकालात मराठी खूप विस्तारलेली आहे. भाष्यग्रंथ, अभंगरचना, पद-स्तोत्र-आरती, चरित्र, कथाप्रधान दीर्घ-प्रदीर्घ काव्ये, लावण्या, पोवाडे, बखर, आज्ञापत्रे, राजकीय पत्रव्यवहार यांच्या जोडीला भारुडादी लोकवाङ्मय असे बहुविध साहित्य भाषिक पातळीवरही प्रत्येक प्रकाराची विविधता व्यक्त करणारे आहे. बहुजन-अभिजन, लोकसाहित्य-विदग्ध लिखित साहित्य, गद्यात्मक-पद्यात्मक, शास्त्रीय-ललित (ललितात- कथात्मक व आरती – स्तोत्र – पद – अभंग – स्वरूपी), आध्यात्मिक –व्यावहारिक, शांत – भक्तिरस-पूर्णशृंगार – वीररसात्मक, प्रबोधनपर – करमणूकप्रधान, अनुवादित-स्वतंत्र, काव्यमय-नाट्यपूर्ण इत्यादी विविध प्रकारे विकसित झालेल्या मराठीचे भाषिक रूपही तेवढेच विविधतापूर्ण व विकासक्षमता प्रकट करणारे आहे. त्या दृष्टीने या सर्व वाङ्मय प्रकारांचा भाषिक दृष्टीने अभ्यास करण्याची गरज आहे.

नमुन्यादाखल स्तोत्रवाङ्मयाची विविधता लक्षात घेऊ. स्तोत्र-आरती हे या कालखंडातील महत्त्वाचे लेखन मानावे लागते. या कालखंडात ते विपुल प्रमाणात व विविध दैवतांसंदर्भात रचलेले दिसते. त्याला संस्कृतची परंपराही आहे. संगीत-वादन यांच्या साह्याने आविष्कृत होणारी ती सामुदायिक प्रार्थनागीते आहेत. मराठीत आलेल्या या वाङ्मयात संस्कृत शब्दांची विशेषतः नामांची रेलचेल असणे स्वाभाविक आहे. पण तरीही त्यांचे मराठीपण

जपण्याचे कार्य त्या रचनेतील मराठी क्रियापदांनी व मराठी सर्वनामांनी साधलेले आहे. उदाहरणार्थ गणेश-वंदन- विघ्नभीती **नसे त्याला**। मारुतिस्तोत्र- ब्रह्मांडे **माइली नेणो,** नेत्राग्नी **चालिल्या** ज्वाळा।, देवीची आरती-चारी **श्रमले** परंतु **न बोलवे** काही। इत्यादी उदाहरणांवरून या वाङ्मयातले वेगळेपण, क्रियापदे-सर्वनामे यांतून मराठीने कसे जपले आहे, ते कळू शकते. भाषेमध्ये अर्थव्यक्तीच्या दृष्टीने वाक्य महत्त्वाचे, व वाक्याचे मुख्य सामर्थ्य क्रियापदात असते, हे मराठीने अचूकपणे लक्षात घेतले. बहुजन-अभिजनांच्या तोंडी असलेल्या या मराठीने संस्कृतातील तत्सम-तद्भव शब्दांचे संस्कार समाजावर करताना स्वभाषेचा ठसा त्यावर या प्रकारे उमटवीला आहे. 'मनाचे श्लोक' यामध्ये हीच प्रवृत्ती दिसते-'समर्थाचिया सेवका वक्र **पाहे**। **असा** सर्व भूमंडळी **कोण आहे**।।' संस्कृत भाषेचे मराठीकरण करण्याची ही अद्भुत पद्धती, हे मराठीचे वैशिष्ट्य या काळात अनेक प्रकारच्या साहित्यांत दिसते. रघुनाथपंडिताच्या 'नलदमयंतीस्वयंवराख्यान' यातही 'औषध **नलगे मजला**। किंवा 'म्हातारी **उडता नयेचि तिजला,** माता मदिया **अशी**। त्राता **त्या** उभयास **मी, मज** विधी घातास **योजितसे**। हातामाजी नृपा, तुझ्या **गवसलो** आता **करावे कसे**?।' शब्दयोगी अव्यये (हातामाजी), सामान्यरूपे (घातास **त्या**) यांच्यातून व्यक्त होणाऱ्या मराठीपणाला क्रियापदे व सर्वनाम यांची मदत घेतल्याने तिच्या रचनेतील संस्कृतचा प्रभाव आपोआपच कमी झाला. हा विशेष तत्कालीन सर्वच मराठीत दिसत असेल, तर तो या कालखंडाचा भाषिक विशेष ठरू शकतो.



दासबोधातील शिवाजी महाराज व समर्थ रामदास (सरस्वती महाल लायब्ररी, तंजावर)

या अभिजन वर्गाने संस्कृतशी विरोध न घेता, मराठीला कसे वेगळेपण आणून दिले आहे, हे यावरून लक्षात येते. याच संस्कृतच्या आधाराने 'राज्यव्यवहारकोश' याची निर्मिती करून तिने फारसीचे वाढते आक्रमण थोपविण्याचा केलेला प्रयत्न भाषिक दृष्टीने लक्षणीय ठरतो. मात्र या कोशात फारसीला पर्यायी दिलेल्या शब्दांमध्ये मराठी शब्दांचा भरणा कमी असून संस्कृतमधील पर्यायी शब्दच विपुल आहेत. सर्वसामान्यांना उपयोजन करता येण्याची दृष्टीही शब्द देताना पाळलेली आहे. पण संस्कृतीकरण व फारसीचा प्रभाव यांतून मराठीने आपले रूप कसे प्रकट केले आहे व आपले नवे विशेष कसे घडविले आहेत, हे पाहणे भाषिक विकास दर्शविणारे आहे.

या पंडितवर्गावर आर्ष-पंचमहाकाव्ये व पुराणे यांचा प्रभाव आहे. तो कीर्तनकारांच्या व प्रवचनकारांच्या निरूपणातून परिपुष्ट होत असल्याने त्यांची मराठी ही संस्कृताश्रयी आहे. त्यांचा श्रोता मात्र बहुजन-अभिजन असा दोन्ही स्तरांवरचा आहे. त्यांच्या कानावर पडणाऱ्या या संस्कृताश्रयी मराठीचे संस्कार लक्षात घेतल्यास सर्वसामान्यांच्या जीवनातही संस्कृतला असलेले स्थान मान्य करावे लागते. मुक्तेश्वरादी पंडितांच्या कथांमध्ये संस्कृतरूपे शुद्ध स्वरूपात आहेत. पण वामनपंडित, रामदास यांच्या तात्त्विक रचनांमध्ये संस्कृत शब्दांची मोडतोड केलेली आहे. डॉ. वि. भि. कोलतेंनी 'दासबोधाची भाषिक पाहणी' या आपल्या लेखात दासबोधातील संस्कृत शब्दांच्या विकृत रूपांवर प्रकाश टाकला आहे. (रामदास आणि रामदासी, संपादक शं. श्री. देव, सत्कार्योत्तेजक सभा, धुळे, वर्ष २२, शके १८६६, अंक २५५-२५६, पृष्ठ ११३ ते १२६) संस्कृतचा पूर्ण परिचय असलेल्या या कवींनी अशी विकृत रूपे योजण्यामागची भूमिका मराठीचे महत्त्व जपण्याची असू शकेल, हे लक्षात घेतल्यास मराठीचे वाढते सामर्थ्य ओळखता येते.

या काळात मराठीवर संस्कृतइतकाच फारसीचा प्रभाव आहे. त्यातल्या त्यात बखर वाङ्मयासारख्या राजक्षेत्रांशी निगडित असलेल्या गद्यरूपी लेखनात तो अधिक लक्षात येतो. या लेखनाची निर्मिती ही एका विशिष्ट वर्गाच्या दरबारी श्रोतृवर्गासाठी आहे. तिचा लेखकही विशिष्ट संस्कार असलेला आहे. पौराणिक पद्धतीने राजकीय क्षेत्रातील पराक्रमी व्यक्तींच्या संदर्भातील महत्त्वाच्या घटना सांगणे, हा बखरीचा हेतू असतो. बखर या शब्दामध्येच फारसी 'खबर'चा अंश आहे. त्यामुळे या लेखनात संस्कृतपेक्षाही फारसी शब्दांचा, प्रत्ययांचा, वाक्यरचनांचा वापर प्रभावी झालेला आहे.

बहामनीकाळापासून मराठीच्या सर्व क्षेत्रांत फारसीचा मुक्त वापर असला; तरी राजकीय क्षेत्र, लष्करव्यवस्था इत्यादी क्षेत्रांत तो अधिक आहे. पेशवेकाळात विकसित झालेल्या या गद्यामध्ये तर या शब्दांचे फारसी म्हणून असलेले दुराव्याचे नातेही मराठीच्या जवळ सरकलेले आहे. तिने मराठी ध्वनिव्यवस्थेत केलेला बदल पुढीलप्रमाणे- १) मराठीने फारसीमधील क-खच्या वैशिष्ट्यपूर्ण उच्चाराला कंठ्य 'क, ख' मध्ये बसवून टाकले. कदाचित त्याचे प्रत्यक्ष उच्चारण मराठीने स्वीकारले असले, तरी त्यासाठी स्वतंत्र लेखनचिन्ह नसल्याने ते उच्चार मराठीत रुळून गेले. २) 'आ'नंतर आलेल्या 'अ'चा 'य'- काअदाÕ कायदा ३) कधी-कधी त्याचा लोप- पैदाअसÕ पैदास, ४) शब्दारंभीच्या 'आ'चा 'अ'- आब्रुÕ अब्रू ५) 'ई'नंतर जोडाक्षर आल्यास 'इ'- ईमानÕ इमान ६) काही ठिकाणचे द्वित्व नाहीसे करणे- कव्वालीÕ कवाली, ७) काही ठिकाणी द्वित्व आणणे- अस्लÕ अस्सल, ८) प्राकृत काळात लोप पावलेली व्यंजनान्त शब्दोच्चाराची प्रथा फारसीच्या प्रभावाने परत उदयाला आली. ९) मराठीतील च-वर्गीय दन्त्यतालव्योच्चारणावरही फारसीचा परिणाम आहे. अशा ध्वनीच्या बदलांमुळे मराठीने त्या शब्दांचे फारसीशी असलेले मूळ उखडून टाकल्यासारखे झाले.

रूपप्रक्रियेच्या संदर्भातही मराठीने फारसीचे मराठीकरण केले. ध्वनिव्यवस्था व रूपव्यवस्था यांबद्दल डॉ. यू. म. पठाण म्हणतात, ''उच्चार व्यवस्थेतील वेगवेगळ्या प्रक्रियांवरून फारसी शब्दांवर मराठीने आपल्या प्रकृतीप्रमाणे संस्कार करून ते आत्मसात करून घेतल्याचे दिसते. प्रत्यय-प्रक्रियेतही हीच गोष्ट दिसते. प्रत्ययव्यवस्थेत फारसी व मराठी व्याकरणव्यवस्थेचा अपूर्व संगम झाल्याचे दिसते. मात्र तुलनादृष्ट्या पाहता मराठी व्याकरण-व्यवस्थेची छाप अधिक पडलेली दिसते. फारसीच्या व्याकरणव्यवस्थेच्या खुणा जागोजाग दिसतात, पण मराठी व्याकरणव्यवस्थेत त्यांची भर पडली, असे फार तर म्हणता येते. त्यांना वेगळे अस्तित्व नाही.''

### मराठी बखरीतील फारसीचे स्वरूप

१) मराठीतील द्वितीयेचा 'ला' हा प्रत्यय फारसीतील 'रा'वरून आला. २) फारसीतून आलेला षष्ठीचा 'इ' प्रत्यय नामा-सर्वनामामागे लागतो. किल्ला रायगड- किल्ले रायगड, ३) आधी विशेष्य व नंतर विशेषण ही संस्कृतपेक्षा वेगळी प्रथा मराठीने कधी-कधी अनुसरली. धडा पहिला माहे जून. ४) गुजरणे, नावाजणे यांसारखे अनेक **धातू**; खास, अजिबात, फक्त यांसारखी **क्रियाविशेषण अव्यये**; खेरीज, शिवाय, बिगर यांसारखी **शब्दयोगी अव्यये**; व, अगर, की यांसारखी **उभयान्वयी अव्यये** ही मराठीत मिसळून गेली. ५) संयुक्त शब्दयोगी अव्यये- दर्मियानÕ दरम्यान. ६) उपसर्गघटित शब्द- बेकायदा, हरवक्त. ७) उपसर्ग फारसी-अरबी व उत्तरपद मराठी- गैरकारभार. ८) अरबी-फारसी प्रत्ययघटित शब्द- रवानगी इत्यादी सगळ्याच पातळ्यांवर फारसी शब्द, शब्दसिद्धीचे प्रकार, प्रत्यय, उपसर्ग, शब्दजाती या सगळ्यांना मराठीने आपल्या व्याकरणव्यवस्थेत नीटपणे बसवून टाकले.

इतर भाषांमधून शब्द स्वीकारल्याने भाषा समृद्ध होते, हे अरबी-फारसी-तुर्की-संस्कृत या भाषांमधून मराठीने स्वीकारलेल्या शब्दांमधून लक्षात येते. त्यांना मराठीच्या सामान्यरूप, लिंगव्यवस्था-प्रत्यय, इत्यादी विशेषांनी मराठीपण येऊ शकते. पण फारसीच्या प्रत्यय-उपसर्गादिकांचा स्वीकार करतानाही मराठीने त्यांना संस्कृत

प्राकृतादीवरून आलेल्या साच्यात फिट्टपणे बसवून टाकले. उलट त्यांच्या आधारे मराठीत सूक्ष्म अर्थच्छटा व्यक्त करण्याची क्षमता मिळविता आली. कदाचित व्यावहारिक, शास्त्रीय व ललित अशा विविध क्षेत्रांतील मराठीशी आलेला हा फारसीचा संपर्क मराठीतील बोलणे-लिहिणे या पातळ्यांवर सारखा पारखून घेतला जात असल्याने त्यावर मराठीचा ठसा उमटणे सहजपणे घडले असेल.

या कालखंडात मराठीचा संपर्क अनेक भाषांशी आला. गलीम/गनीम/घनिम, जवाहीर, फकीर, सदर, मामला असे अरबी शब्द; एल्गार, खोत असे तुर्की शब्द; पागा, तनखा, उस्तवारी असे फारसी शब्द विपुल प्रमाणात मराठीत आले. अर्थविस्तार, अर्थसंकोच, रूपकात्मक अर्थप्रक्रिया इत्यादी अर्थपरिवर्तनाच्या विविध मार्गांनी त्यांच्या मूळ अर्थांतही खूप बदल घडून आला. फारसीच्या संदर्भात तर फारसी-संस्कृत सामासिक शब्द सिद्ध करून (हालअपेष्टा, शिपाईगडी, पांढरासफेत, धनदौलत इत्यादी) एक वेगळीच प्रथा रूढ केली.

> फारसी भाषा ही मराठी भाषक सत्ताधारी असतानाही जेत्यांच्या भाषेसारखीच वावरत होती. पण तरीही मराठीने तिला आपल्यात मुरवून टाकले. फारसीसारख्या भाषांतील या शब्दांच्या स्वीकाराने मराठीचे शुद्ध रूप गढूळ झाले, असे न जाणवता ती अनेक क्षेत्रांत यशस्वी मुलूखगिरी करू शकली. विशेषतः दप्तरदार, वाकेनवीस, बाजीराव, शहाजी इत्यादी आडनावेही फारसीतून मराठीत आलेली आहेत. राजवाडेंना ही भ्रष्टपणाची कमाल वाटते आणि तरीही मराठीला या कालखंडात 'फारसी-मराठी' कसे टाळता आले, हे शोधणे एक आव्हान आहे.

या कालखंडाच्या आध्यात्मिक प्रवृत्तीही प्रपंचाकडे वळलेल्या जाणवतात. 'संसारी असावे। असूनी नसावे।' ही वृत्ती मागे पडून तिची जागा 'आधी प्रपंच करावा नेटका। मग लागावे परमार्थाच्या मार्गा।' अशी प्रापंचिक गोष्टीत रस घेणारी होऊ लागली आहे. प्रपंचात रस घेणाऱ्या धार्मिक वृत्तीमुळे समाजाच्या व्यावहारिक जाणिवा व्यक्त करणारी शब्दसंपत्ती भाषेत निर्माण होऊ लागली. सभेत कसे वागावे, अक्षर कसे असावे, पोशाख कसा करावा, यांसारखे विशेष सांगण्यात दासबोधाला रस वाटू लागला. 'पहिले हरिकथा निरूपण।' पण 'दुसरे ते राजकारण।' असा सभोवतालच्या राजकीय, सामाजिक जीवनाकडे लक्ष पुरविण्याचा आग्रह धरण्याची गरज संतांना वाटली. यामधून (तुकारामांनाही 'पाइकीचे अभंग' रचावेसे वाटले) लौकिक जीवनाकडे वळलेला समाज लक्षात येतो. आणि त्यामुळे केवळ भक्ती, अध्यात्म, तत्त्वविचार यांच्या जोडीला जीवनात व्यापून टाकणाऱ्या अनेक क्षेत्रांत मराठी भाषा वावरू लागली, लेखन करू लागली. आज्ञापत्र, बखरलेखन, राजपत्रव्यवहार हे सर्व लिखित संचित मराठीच्या भाषिक व्याप्तीचे द्योतक आहे.

लावणी, पोवाडे हे शाहिरी वाङ्मय हीच लौकिकात रंगून जाणाऱ्या वृत्तीचे दर्शन घडविते. विशेषतः या साहित्याचा लेखक, त्याचा श्रोतृवर्ग व त्या साहित्याचा नायक यांचा विचार या भाषेच्या संदर्भात करावा लागतो. महिलांचा वावर नसलेल्या या मानवी नायकाच्या पराक्रमाच्या गाथा गाणारा वर्गही सामान्यपणे बहुजनवर्गातील आहे. त्यामुळे मराठीचे एका वेगळ्या थरातले भाषिक रूप, शृंगारादी रसांचे सादरीकरण करताना नृत्य, नाट्य, संगीत-वादन इत्यादी अनेक कलांचे साहचर्य स्वीकारत आहे. ही पेशवेकाळातील मराठी संस्कृत-फारसीच्या प्रभावापेक्षा मराठीकडे अधिक वळलेली आहे.

या सगळ्या मराठी साहित्याचा भाषिक विशेष सांगणे सोपे नाही. त्यातच ख्रिस्तपुराणासारखे जेजुइटपंथाचे लेखन या काळातले असले, तरी त्याच्यातील भाषिक प्रवृत्ती यादवकालीन आहेत. पण ख्रिस्ती धर्म संकल्पनांच्या अनुरोधाने अनेक नवीन शब्दांची भर मराठीत पडली. हा भाषिक विशेष लक्षात घेण्यासारखा आहे. म्हणून मध्यकाल मराठीचे भाषिक रूप काहीसे ल.सा.वि.च्या पद्धतीने सांगावे लागते.

**ध्वनिव्यवस्था –** १) मध्यकाल मराठीतील स्वर हे संस्कृतप्रमाणेच आढळतात. तत्सम शब्दात ते अविकृत राहतात. परंतु तद्भव शब्दात मराठीने स्वतंत्रपणे बनलेले दिसतात. नृत्य◌̃नाच, शृंग◌̃शिंग, ग-ङचा अ, ई, रु, र ही प्रक्रियाही दिसते. २) अविकृत राहिलेले अंत्य स्वनिम-



श्रीपतीकृत ज्योतिषरत्नमाला, मराठी (नाथविठ्ठल हस्तलिखित संग्रह, ऐतिहासिक संग्रहालय, अहमदनगर).

अवयवÕआवेव. विकृत झालेले अन्त्य स्वर- तिथीÕतीथ. लज्जा- लाज. ३) 'य' श्रुती, 'व' श्रुती ४) उपान्त्यस्वर विकृत होणे- कुमारीÕकुमरी, उत्सवÕउत्साव किंवा नियम सिद्ध करणारी अशी काही उदाहरणे विपुल प्रमाणात मिळतात. उच्चारसुलभता किंवा अन्य कारणे शोधण्यापेक्षा तत्सम शब्द बदलून त्यांना मराठी रूप देण्याचे कार्य साधले जात असावे. ५) विशेषतः तालव्य 'च, ज' च्या उच्चारणातील स्पष्टता च्यार (चार) प्रज्या (प्रजा) या लेखनातून स्पष्ट होते. मराठी स्वर किंवा व्यंजन यांच्यावर प्रामुख्याने संस्कृतचा (व काही प्रमाणात फारसीचा) प्रभाव त्यामुळे दूर होत होता व शब्दाला सहजतया मराठी रूप मिळत होते. अर्थातच दंततालव्य व तालव्य असे च-जचे दोन्ही प्रकारचे उच्चारण मध्यमराठीत होते. ६) महाप्राण आगम- ओठÕहोट पाशÕफास या उदाहरणांमध्ये मूळ दुसऱ्या अक्षरातील महाप्राण हा प्रथम अक्षरात येऊन हे दुसरे अक्षर महाप्राणविरहित होते. ७) महाप्राण लोप- झमीनÕजमीन, झिक्रÕजिकीर. संस्कृतेतर भाषांतल्या ध्वनींच्या संदर्भात हा फरक दिसतो. ८) आदिकाळात रूढ असलेली मूर्धन्यीकरणाची प्रक्रिया या काळातही तशीच आहे-धवलÕढवळा, दंशÕडंख ९) संयुक्त व्यंजनांचे सुलभीकरण; भिन्न व्यंजनांपैकी एकच व्यंजन ठेवणे; अनुनासिक असेल, तर त्याचा लोप करणेÕ वल्लभ-वालभ, अक्काÕआका, गुह्य-गूज इत्यादी. १०) सुलभीकरणाच्या दृष्टीने स्वरलोप, स्वरभक्ती- प्रसंग-परसंग, अंतराळ-अंत्राळ ११) उकारान्त नामांचा अकारान्त १२) फारसीच्या संपर्काने क, ख यांच्या उच्चारात भर पडली.

**रूपप्रक्रिया –** १) दोन वचने, तीन लिंगे, आजच्यापेक्षा काही सर्वनामे व नामे यांची लिंगे मध्यकाल-मराठीत भिन्न जे, ते- स्त्रीलिंग, तर दैन्य, महिना, विधी- स्त्रीलिंगी. २) नामादी शब्दांची प्रत्ययी, अर्धप्रत्ययी व शब्दयोगी युक्त रूपे योजली जात. ३) प्रथमा व द्वितीया- एकरूप ४) सामान्यरूप करण्याची प्रवृत्ती. पण कधी-कधी सामान्यरूप न केलेलेही दिसते. ५) क्रियारूपे पुढीलप्रमाणे संस्कृतवरून- जपणे, पुजणे; प्राकृत धात्वादेश होऊन- जाणणे, छिनणे; नामधातूवरून नवसणे, घामेजणे; फारसी क्रियावाचकावरून- नावाजणे, गुजरणे; नादानुसारी- किलबिलणे, रणाणणे; फारसीवरून क्रियारूपे घडण्याची क्रिया मध्यकाल-मराठीत सुरू झाली. ६) आख्यातव्यवस्था आजच्या म्हणजे वर्तमान मराठीसारखीच. रीतिवर्तमान व रीतिभूतची रूपे आदिकालीन मराठीप्रमाणे, ई-आख्याताची- निरोपी, अर्पी अशी लिंग-निरपेक्षरूपे. पण त्याबरोबरच म्हणतो-म्हणते अशी लिंगदर्शक रूपेही आढळतात. पण यादवकालीन मराठी व आजची मराठी यांचा मधला टप्पा मध्यकाल-मराठीत आढळतो. ७) कृदन्ताचा यादवकाळातील उपयोग रुळलेला दिसतो. त-ता साधित कृदन्ते; लिंगानुसारी वा-आवा ही भविष्यकृदन्ते; विध्यर्थी, इज प्रत्ययान्त विध्यर्थी

रूप ८) क्रियेचे अकरण रूप सिद्ध करताना अस-हो धातूंच्या नकारात्मक रूपाचे साह्य घेणे (जाले नाही, बोलो नये) किंवा 'न' हा नकारात्मक प्रत्यय क्रियापदापूर्वी योजणे (ना बोलो; न ठेवावे) ९) अव-अवि प्रत्यय लावून प्रयोजक- अशा अनेक प्रकारांत यादवकालाचे अनुसरण आढळते.

**वाक्यविचार –** आज्ञापत्र, बखर किंवा ऐतिहासिक पत्रव्यवहारातील गद्याच्या आधारे या कालातील वाक्यविचार करता येतो. पण हे गद्य एका विशिष्ट दरबारी प्रवृत्तीशी निगडित आहे. त्यामुळे त्याच्या आधारे मध्य कालातील सर्वच गद्याबद्दल काही निष्कर्ष काढण्याला मर्यादा येते. वाक्यरचनांमध्ये केवल-संयुक्त-संमिश्र या रचनाप्रकारांचा व विधानार्थी, आज्ञार्थी, प्रश्नार्थक, प्रयोजक, शक्य या अर्थदृष्टीने येणाऱ्या रचना यादवकाळातच मराठीत वापरात आहेत. या काळात याच्यामध्ये एकात एक मिसळून गुंतागुंतीची रचना. मराठीत येऊ लागली. अ) लीळाचरित्रातील वाक्यरचनेत जसे कधी कर्ता, कधी कर्म तर कधी क्रियापद गृहीत धरलेले किंवा एकेकटेच योजलेले दिसते, तसेच मध्य मराठीतही आहे.

१) कर्ता अध्याहृत- केवळ नूतन सृष्टीच निर्माण केली (आज्ञापत्र)

२) कर्म अध्याहृत- 'तुम्हीही सांगावे कळेल तसे (ऐतिहासिक लेखसंग्रह)

३) क्रियापद अध्याहृत- 'त्याच वंशी निर्माण जालो असता या राज्याचा यैसा विस्खलित प्रसंग हे तो परम अनुचित.' असे शब्द गृहीत धरण्याने वाक्यास डौल येतो व त्यांची परिणामकारकता वाढते. सगळ्याच ठिकाणी अशीच वाक्यरचना आहे, असे समजण्याचे कारण नाही. पण या रचनेचा स्वीकार जाणीवपूर्वक झालेला जाणवतो.

अ) तृतीयान्त कर्ता व प्रथमान्त क्रियापद अशी रचना अनेक ठिकाणी आहे. (उदाहरणार्थ त्यांनी एवढा पराक्रम करून मारता-मारता मेले- भाऊसाहेबांची बखर) पण कर्ता-क्रियापद यासंबंधीची जाणीव नसावी, असे यावरून म्हणता येत नाही. आ) विशेष्य-विशेषण क्रमाबाबतही फारसीचा कधी-कधी प्रभाव दिसतो. 'तेणेकरून आपली रीत युद्धाची सोडून यवनांची रीत धरली' (नाना फडणवीस आत्मचरित्र)

**शब्दसंग्रह –** मध्यकालातील शब्दसंग्रहामध्ये फारसी-संस्कृत, तत्सम, तद्भव, अरबी अशा अनेक भाषांतून आलेल्या शब्दांनी मराठीचे शब्दभांडार समृद्ध झालेले आहे. विशेषतः या विविध भाषांमधील शब्दांना मराठी करून घेण्यात मराठी यशस्वी झालेली दिसते. विविध शास्त्रे (न्याय, लष्कर, तत्त्वज्ञान, इतिहास इत्यादी) कलादालने (संगीत, नृत्य, लावणी, लोककला) कथात्मक स्फुट- दीर्घ, प्रदीर्घ, ओवी, अभंग, अलंकरण, वृत्ते, स्त्रीगीते, मनाच्या श्लोकासारखे प्रसार-प्रचार साहित्य, कीर्तन-प्रवचनादी प्रसारमाध्यमे व लोकव्यवहारातील भाषा-व्यापार यांमुळे मराठीचे भाषिक स्वरूप सखोल, व्यापक व विस्तृत झाले आणि शब्दसिद्धीच्या विविध मार्गांनी तिने आपल्या अर्थ-भाव-व्यक्तिकरणाच्या कक्षा खूप रुंदावून टाकल्या.

**समारोप –** आदिकालातील 'इवल्याशा रोपाचा' हा विस्तार तिच्या यादवकालीन स्वरूपातील भाषिक विशेषांना परिपक्वता आणून देणारा आहे, हे या दोन्ही कालांतील मराठीचे रूप पाहताक्षणीच जाणवते. यादवकालापेक्षा काही प्रमाणात तिने वर्ण-ध्वनिव्यवस्थेत वेगळेपणा आणला. प्रत्ययव्यवस्थेतही-लिंग-वचन-विभक्ती-आख्यात यांमध्ये अल्प बदल केला. सामान्यरूप, शब्दयोगी अव्यय यांचा वापर, संयुक्त क्रियापदे, विशेषण-विशेष्य संबंध, षष्ठीचे रूपदृष्टीने विशेषणाच्या जवळ सरकणे व प्रयोगव्यवस्थेतील बदलांचा प्रारंभ लिंगदर्शक आख्यात प्रत्ययांनी साधणे; हेच मराठीचे खास विशेष या दोन्ही काळांतील मराठीने पक्के केले.

गद्यपरंपरा आधीपासून होती, याचा पुरेसा पुरावा उपलब्ध नाही. पण संप्रदायनिष्ठता व कीर्तनादी प्रसारमाध्यमे यांच्यासाठी पद्यरूपावर भर देण्याची पद्धती यादवकाळात सुरू झाली आणि नंतरच्या काळात निर्माण झालेली वैविध्यपूर्ण मराठी ही भाषिक वैभव वाढविणारी ठरली. या वाङ्मय सादरीकरणासाठी गद्याचे लयबद्ध निवेदन हा कागदोपत्री जतन न झालेला पण कल्पना करता येणारा गद्यनमुनाही पद्याच्या आधारे कळून येऊ शकतो.

आजची मराठीही संस्कृतच्या प्रभावाखाली आहे. फारसीचे आक्रमण केव्हाच मराठीत मिसळून गेले आहे. इंग्रजीचा प्रभावही ती आज पचनी पाडत आहे. वाढत्या प्रवासमाध्यमांनी, मुद्रणकलेने द्राविडी भाषांनाही मराठी भाषेच्या जवळ आणले आहे. आजच्या जागतिकीकरणाच्या रेट्यात मराठीस आपल्या सर्व सामर्थ्यानिशी उभे राहायचे असेल, तर परत आपल्या आदिकाळातील प्रवृत्तींचे नूतनीकरण करून पाहायला हवे. वर्ण, प्रत्यय, शब्दसिद्धी या सगळ्या विशेषांत आपले वर्तमान परत एकदा पारखून घ्यायला हवे.

### संदर्भ :


१) व. दि. कुलकर्णी- लीळाचरित्र: एक अभ्यास, व्हीनस प्रकाशन, द्वितीय आवृत्ती, १९७८.

२) डॉ. श्री. रं. कुलकर्णी- प्राचीन मराठी गद्य: प्रेरणा व परंपरा- मेहता प्रकाशन, द्वितीय आवृत्ती, १९९१.

३) श्री. विश्वनाथ खैरे-

अ) मराठी भाषेचे मूळ- मराठी संशोधन मंडळ प्रकाशन १९७९.

आ) अडगुलं-मडगुलं-साधना प्रकाशन, १९८१.

इ) लोकभाषा आणि संस्कृत- संमत प्रकाशन, २००४.

ई) द्रविड महाराष्ट्र- साधना प्रकाशन, १९७७.

उ) भारतीय मिथ्यांचा मागोवा- संमत प्रकाशन, १९८६. या डॉ. खैरेंच्या लेखनाचा एकत्रित अन्वयार्थ

४) डॉ. र. रा. गोसावी- मराठीचे ऐतिहासिक भाषाशास्त्र-स्नेहवर्धन प्रकाशन, २००४.

५) डॉ. लीला गोविलकर- मराठीचे व्याकरण- मेहता प्रकाशन चौथी आवृत्ती २००६.

६) डॉ. गं. भा. ग्रामोपाध्ये- भाषाविचार आणि मराठी भाषा प्रकाशन, १९६४.

७)डॉ. गं. ना. जोगळेकर- मराठी भाषेचा इतिहास- श्रीविद्या प्रकाशन, २००५.

८) डॉ. सु. म. डोळके- पंचभाषिते- डोळके प्रकाशन, २००४.

९) डॉ. शं. गो. तुळपुळे- यादवकालीन मराठी भाषा- व्हीनस प्रकाशन, दुसरी आवृत्ती, १९७३.

१०) डॉ. शं. गो. तुळपुळे- लीळाचरित्र-उत्तरार्ध-२ प्रस्तावना.

११) श्री. माधव देशपांडे- संस्कृत व प्राकृत- शुभदा प्रकाशन, १९९५.

१२) डॉ. माणिक धनपलवार- दाक्षिणात्य साहित्य संस्कृतीचा मराठीशी अनुबंध (प्रशासकीय अधिकारी) राज्य मराठी विकास संस्था प्रकाशन, १९९७.


### लेख :


१) म. रा. कोल्हटकर: भारतीय भाषाकूळ: विभक्त की अभेद? प्रचलित ऐतिहासिक भाषाशास्त्र व विश्वनाथ खैरे यांचा संमत विचार- समाज प्रबोधन पत्रिका जुलै-सप्टेंबर २००६, पृष्ठे २६६-२७०

२) एन. बी. नाईक- Inscription of the Deccan Bulletin of the Deccan College, Research Institute, December 48.

३) श्री. मिलिंद बोकील- संस्कृतीचा बंडखोर शोधक- अनुभव- दिवाळी अंक २००५

४) इतिहास संशोधक राजवाडे-भाईत्रै-आश्विन-फाल्गुन शके १८३४.

५) रामदास आणि रामदासी-संपादक शं. श्री. देव-सत्कार्योत्तेजक सभा धुळे, वर्ष २२, शके १८६६ अंक २५५-२५६.


* * *






# बोली भाषा

■ डॉ. अलका मटकर

**वाढता शिक्षणप्रसार, नागरी जीवनाची ओढ, बदलत जाणारी सामाजिक मूल्ये यांमुळे बोलीकडे पाहण्याची दृष्टी बदललेली दिसते. या अभ्यासाची गरज काय आहे, असाही एक तुच्छतादर्शक, उदासीन सूर सर्वत्र ऐकू येतो. पण जेव्हा खऱ्या अर्थाने आपण आपल्या सामाजिक जीवनाचा ऐतिहासिक अंगाने सर्वांगीण विचार करू लागतो, तेव्हा बोलींकडे पाहण्याची आपली दृष्टी बदलते. सगळे पूर्वग्रह नाहीसे होतात.**

दर बारा कोसांवर भाषा बदलते, असे म्हटले जाते. मराठीचा क्षेत्रविस्तार पाहता तो अफाट आहे व मराठी भाषकांची सध्याची लोकसंख्या आठ कोटींहून अधिक आहे. विस्तृत क्षेत्रफळ, अफाट लोकसंख्या व जातीजमातींची विविधता यांमुळे मराठी भाषेची प्रादेशिक रूपे वेगवेगळी असणे अगदी स्वाभाविक आहे.

मराठीच्या प्रादेशिक रूपांचा म्हणजेच बोलींचा अभ्यास करण्यापूर्वी आपल्याला 'बोली' ही संज्ञा उलगडून पाहावी लागेल.

'एखाद्या विशिष्ट लोकसमुदायातील किंवा भौगोलिक प्रदेशातील व्यक्तींच्या अंगवळणी पडलेले, त्यामुळे प्रायः मुद्दाम शिकावे न लागणारे व विचारांची देवाणघेवाण करण्यासाठी, सहजगत्या उपयोगी पडणारे ध्वनिरूप साधन म्हणजे बोली.' अशी बोली ह्या संज्ञेची व्याख्या देऊन डॉ. ना. गो. कालेलकर यांनी 'भाषा : इतिहास आणि भूगोल' या

ग्रंथामध्ये म्हटले आहे, '.... बोली हे दैनंदिन व्यवहाराचे स्वाभाविक साधन आहे. परिस्थितीला अनुरूप अशा भाषिक सामग्रीचा ती उपयोग करते. मुखपरंपरेने आल्यामुळे तिच्या अंगी एक प्रकारचा जिवंतपणा असतो. ती साधी पण परिणामकारक असते. प्रतिष्ठेच्या आरशात आपले रूप पाहून इतरांना ते आकर्षक वाटेल असे करण्याचा प्रयत्न करायला तिला वेळ नसतो. तिची स्वाभाविकता हेच तिचे वैशिष्ट्य. काहींना ते मोहक वाटेल, काहींना ते ओंगळ वाटेल. हा ज्याच्यात्याच्या मनोवृत्तीचा, संस्काराचा प्रश्न आहे.' अशी डॉ. ना. गो. कालेलकर यांसारख्या ज्येष्ठ भाषावैज्ञानिकाने बोलींकडे पाहण्याची त्यांची दृष्टी प्रकट केलेली आहे. बोली हे भाषेचे पूर्वरूप असून तिचे सौंदर्य अंगभूत असते. ते वरून लादलेले नसते. त्या भाषेला एका परीने संस्कारित करीत जातात.

अशा या मराठी बोलीचा जेव्हा आपण अभ्यास करू लागतो, तेव्हा साहजिकच भारतीय भाषांचा अभ्यास करणाऱ्या जॉर्ज ग्रिअर्सन या पाश्चात्त्य भाषावैज्ञानिकाचे नाव सर्वप्रथम डोळ्यांपुढे येते. १८९८ ते १९२७ या काळात जॉर्ज ग्रिअर्सन याने तत्कालीन हिंदुस्थानच्या भाषिक पाहणीचे १ ते ९ खंड 'लिंग्विस्टिक सर्व्हे ऑफ इंडिया' या नावाने प्रकाशित केले. त्यांतील सातव्या खंडामध्ये मराठी व तिच्या बोली यांचाही अभ्यास त्यांनी मांडलेला आहे. जॉर्ज ग्रिअर्सन त्याचप्रमाणे अन्य मराठी भाषा-वैज्ञानिकांनी मराठीच्या वऱ्हाडी, नागपुरी, हळबी, पोवारी, डांगी, अहिराणी व कोकणी या प्रमुख बोलींचा परिचय आपण या ठिकाणी करून घेणार आहोत.

**वऱ्हाडी –** या बोलीचे क्षेत्र अतिशय विस्तृत आहे. या बोलीची सीमा बुलढाण्याच्या मध्यातून थेट तापी नदीपर्यंत पोहोचते. तेथून पूर्वेकडे एलिचपूर, बैतूल, छिंदवाडा, शिवणी, बालाघाट यांचा दक्षिण भाग नंतर भंडारा, चंद्रपूरचा वायव्य भाग, वणी, वाशिम या प्रदेशांना वेढून परत बुलढाण्यापर्यंत पोहोचते.

वऱ्हाडी माणूस बोलू लागला की त्याच्या बोलीवर कमी-जास्त प्रमाणात हिंदी भाषेचा प्रभाव दिसू लागतो. याचे कारण हिंदी व मराठी भाषांची क्षेत्रे जवळजवळ आहेत. याचबरोबर अगदी यावनी अमलाखाली असल्यापासून हिंदीच्या हाडीमाशी खिळलेले अरबी-फारसी शब्द वऱ्हाडीने पूर्णपणे पचविलेले आहेत.

वऱ्हाडीची उच्चारप्रक्रिया पाहता, प्रमाण मराठीतील दीर्घ उच्चारांचे वऱ्हाडीत ऱ्हस्वीकरण होताना दिसते. उदाहरणार्थ आषाढ ⟶ आखाड, आकाशदिवा ⟶ अगसदिवा, कासार ⟶ कसार इत्यादी. याखेरीज स्वरभक्ती होताना रक्त ⟶ रगत, फ्रॉक ⟶ फराग, शुक्र ⟶ सुकीर, कर्मगती ⟶ करमगती, ग्रहण ⟶ गिराण; मध्यस्वरलोप होताना दहा ⟶ धा, शहाणा ⟶ शाणा, उपाहार ⟶ उपार, शहनाई ⟶ सैनी; महाप्राणामध्ये कुंकू ⟶ कुखू, किस्सा ⟶ खिस्सा, ती ⟶ थी अशी रूपे होताना दिसतात. याशिवाय ग्यान, जलम, निवतन, वाजात्र, लब्बर, कयंक, इचू अशा अनेक शब्दांमध्ये लक्षणीय व्यंजनक्रिया घडून येताना दिसते. बोलीचे हे विशेष आपण प्रमाण-मराठीच्या तुलनेत तपासून घेणार आहोत. प्रमाण मराठीपेक्षा वऱ्हाडीतील सर्वनामरूपांत वेगळेपणा जाणवतो. तृतीय पुरुष सर्वनामांपैकी ते-ती ही वऱ्हाडीत थे-थी अशी होतात. मले, तुले, मास या द्वितीया व चतुर्थीच्या रूपांबरोबरच म्यां, तू, त्वा, तुवा, मीन्, तुन्, मीनं, तुनं ही रूपेही प्रचलित असताना दिसतात. प्रमाण मराठीतील माझा, तुझा या रूपांबरोबर महा, तुहा, मापला, तुपला, तुझ्यावालं, तुझ्यावानी अशी रूपेही आढळतात. त्याचप्रमाणे प्रश्नार्थक वाक्य उच्चारावयाचे झाल्यास 'काय' या सर्वनामाची रूपे वऱ्हाडीत 'काहून' 'काव्हून' 'काम्हून' अशी वेगवेगळी होताना दिसतात.

विभक्ती प्रत्ययांचा विचार करता अन्त्य स्वरोच्चार आखूड करण्याच्या वऱ्हाडीच्या प्रवृत्तीनुसार नपुंसकलिंगी 'ए' प्रत्ययाचा 'अ' होतो. उदाहरणार्थ चांगली माणसे⟶चांगले मानस, तृतीयेमध्ये 'देवाशीन', 'माह्याशीन' असा नामांना 'शीन' प्रत्यय लागतो.

आख्यातविभक्ती होताना लिंगभेदानुसार क्रियापदरूप बदलत नाही. स्त्रियांच्या तोंडीही पुरुषांप्रमाणे 'मी जातो' असा शब्दप्रयोग दिसतो. भूतकाळामध्ये त्यानं धाडलन्, सांगितलनि असे 'न' व 'नि' हे अधिकचे प्रत्यय लागताना दिसतात. तर अपूर्ण भूतकाळ हा 'नेल्ता', 'गेल्ता' असा संक्षेपरूपाने दाखविला जातो. 'ला' या कृदंताऐवजी

वऱ्हाडीबोलीमध्ये 'ले' हे कृदन्त आढळते. उदाहरणार्थ कराले, धराले, इत्यादी भविष्यकाळाची रूपे 'अशीन', 'मारील', 'जाशीन' अशी होताना दिसतात. आज्ञार्थ होताना जाय, खाय ही रूपे दिसतात. आज्ञार्थ भविष्यकाळामध्ये 'जो' हा प्रत्यय लागतो. तेथे आज्ञेपेक्षा विनंतीचाच भास होतो. उदाहरणार्थ - करजो, घेजो, जाजो. इत्यादी वऱ्हाडीमध्ये 'देऊन दिलं', 'मी काम केलो', 'करून राह्यलो' ही वैशिष्ट्यपूर्ण रूपे सहजपणे आढळतात. वऱ्हाडीतील स्त्रीवाचक त्याचप्रमाणे पुरुषवाचक नातेदर्शक शब्दांमध्ये आगळीक जाणवते. उदाहरणार्थ बय, फुई, जटानी, ननदुली, साळी ही नाती अनुक्रमे आई, आत्या, जाऊबाई, नणंद, जीजी–मावशी त्याचप्रमाणे पुरुषवाचक– बा–बाप, बाबाजी–आजोबा, सासरा, बुगा (आजोबा) मोठाबा– थोरला चुलता भाटवा–जावई, महाल्प्पा (मोठा सावत्र भाऊ) असे या बोलीतील महत्त्वाचे नातेदर्शक शब्द दिसतात. वऱ्हाडीत काही शब्द लक्षणीय स्वरूपात आढळतात. उदाहरणार्थ आकू (कुत्रा), हाड्या (कावळा), चाहाय (चाहूल), मून (म्हणून), बोने (पक्वान्न), डोळयी (बादली) इत्यादी.

वऱ्हाडी बोलीचे हे सर्वसाधारण रूप दिसते, पण ती सर्वत्र सारखी बोलली जात नाही. तिचे स्थानिक भेद– हळबी, नागपुरी, बालाघाटी– असेही दिसतात; विविध जाती–जमातींनुसार त्याचप्रमाणे व्यवसायानुसारही. उदाहरणार्थ पोवारी, झारपी असे उपभेद आढळतात. वऱ्हाडी बोलींच्या या अंतर्गत भेदांपैकी काही बोलींची अगदी थोडक्यात ओळख करून घेऊ.

**हळबी –** महाराष्ट्रातील चंद्रपूर, भंडारा तसेच एलिचपूर टापू आणि मध्य प्रदेशातील बस्तर, कांकेर, रायपूर, इत्यादी प्रदेशांतील हळब लोकांची बोली ती हळबी. हळब लोक हे या प्रदेशातील, आर्य येण्यापूर्वीचे, रहिवासी मानले जातात. त्यांनी आर्यांची संस्कृती, त्यांचा धर्म, भाषा यांचा स्वीकार केला. हळबी बोलीमध्ये आपल्याला मराठी, बंगाली, उडिया तसेच छत्तीसगडी या भाषांचे मिश्रण आढळते. उदाहरणार्थ 'मी देखलो नाही' यांसारख्या वाक्यांत 'देख' हा शब्द हिंदी असला, तरी त्याची एकूण प्रक्रिया मराठीसारखीच आहे. हळबी भाषेवर हिंदीचाही प्रभाव आहे.

हळबीची स्वनिमप्रक्रिया पाहता 'ड्' आणि 'ळ्' चा 'र्' होताना दिसतो. कपडा→कपरा, डोळा→डोरा, पळ→परा त्याप्रमाणे 'व्' चा 'ब्' होणे, 'ण्' चा 'न्' होणे या प्रक्रियाही घडतात. वीर→बीर, पाणी→पानी

हळबी बोलीची व्याकरणप्रक्रिया पाहता नामास अनेकवचनदर्शक विभक्तिप्रत्यय लागल्यावर त्याचे सामान्यरूप होत नाही. चतुर्थी– 'क', पंचमी–'ले', 'लगे', षष्ठी–'चो', 'के', सप्तमी, 'मे, ने'. हळबीत प्रमाण मराठीतल्याप्रमाणे क्रियापदानंतर 'ना' हे पूरक रूप येताना दिसते. उदाहरणार्थ जाव, ना, तुई, नेली, ना, इत्यादी. हळबीची सर्वनाम प्रक्रिया ही हिंदी–बंगाली यांच्या सरमिसळीतून येते. उदाहरणार्थ मई, मोके, आमी, माचो इत्यादी.

अशा प्रकारे हळबी बोलीवर हिंदी, बंगाली आणि काही प्रमाणात उडिया, छत्तीसगडी ह्या भाषांचाही प्रभाव जाणवतो. प्रमाण मराठीपेक्षा ती बऱ्याच प्रमाणात वेगळेपणा दाखवत असल्याने तिचा मराठीच्या बोलींत अंतर्भाव करावा किंवा नाही, हा पश्न बोलींच्या अनेक अभ्यासकांच्या मनात निर्माण झालेला आहे.

**पोवारी बोली –** डॉ. सु. बा. कुलकर्णी या मान्यवर भाषावैज्ञानिकांनी सदर बोलीचा शास्त्रशुद्ध अभ्यास केला आहे. पोवारी ही पोवार नावाच्या शेतकरी जमातीची बोली आहे. पोवार यांचे वास्तव्य महाराष्ट्रातील भंडारा जिल्ह्यामध्ये आणि मध्य प्रदेशातील बालाघाट जिल्ह्यामध्ये आहे. हे पोवार मुळातील परमार कुळातले रजपूत असून गेल्या काही शतकांपासून ते मध्य प्रदेश व वऱ्हाड ह्या भागांत स्थायिक झाले आहेत. राजस्थानी, बघेला व मराठी यांचे मिश्रण असणाऱ्या या बोलीचे नागपूर जिल्ह्यामध्ये बोलल्या जाणाऱ्या कोष्टी बोलीशी साम्य आढळते. पोवारी बोलीतील ऐंशी टक्के शब्द प्रमाण मराठीशी जुळणारे आहेत. फक्त व्याकरणामध्ये ती मराठीपेक्षा वेगळी दिसते. उदाहरणार्थ, पोवारीच्या विभक्तिप्रत्ययाला सप्तमीचा 'मा' हा प्रत्यय गुजरातीचा आहे. उदाहरणार्थ हात्मा (हातात), कयिद्मा (कैदेत) इत्यादी. षष्ठीचा पूर्वहिंदीचा 'का' हा प्रत्यय पोवारी

बोलीतही आढळतो. झाडको (झाडाचा), दुनियाकी (जगाची). पोवारीतील सार्वनामिक विशेषणे राजस्थानी वळणाची आहेत. येत्रो (एवढा), अम्को (अमका), असो, तसो (असा, तसा). पोवारी बोलीतील क्रियापद-प्रत्ययही राजस्थानी बोलीशी जुळणारे आहेत. उदाहरणार्थ देखुसु (मी पाहतो), खासेस् (तू खातोस), भुकसे (तो भुंकतो) इत्यादी.

सतत फिरता, स्थलांतर करणारा हा समाज वेगवेगळ्या परभाषा स्वीकारीत-स्वीकारीत पुढे जातो. त्यातून त्याचे भाषिक रूप कसकसे परिवर्तित होते, याचा नमुना म्हणून आपण पोवारी बोलीचा थोडक्यात परामर्श घेतला.

**नागपुरी बोली –** नागपूर, वर्धा, चंद्रपूर व भंडारा हे आजच्या महाराष्ट्र राज्यातील चार आणि शिवनी, छिंदवाडा, बालाघाट व रायपूर हे आजच्या मध्य प्रदेश प्रांतातील चार अशा एकूण आठ बोली मिळून नागपूर क्षेत्र तयार होते. नागपुरी बोलीच्या क्षेत्राचे थोडक्यात वर्णन करावयाचे, तर वर्धा आणि वैनगंगा या नद्यांच्या दुआबाचा प्रदेश, असे वर्णन करता येईल. १९७२ साली डॉ. व. कृ. वऱ्हाडपांडे यांनी या बोलीचा आपल्या ग्रंथातून अतिशय विस्तृत असा विचार केलेला आहे.

नागपुरीची स्वनिमप्रक्रिया पाहता नागपुरीत अ, आ, इ, उ, ए, ओ असे सहा स्वर आहेत. 'ऐ' या स्वराचे उच्चारण नागपुरीमध्ये 'अर', 'आइ' किंवा 'आय्' असे होते. उदाहरणार्थ बैल ⟶ बइल्, ऐक ⟶ आइक, हैवान ⟶ हय्वान इत्यादी. त्याचप्रमाणे 'औ' चे उच्चारण अव्, अड, आड असे होते औषधे ⟶ अवसीद, दौत ⟶ दउत्, हौस ⟶ हाउस इत्यादी. प्रमाण मराठीतील ण्, ष्, ळ् ही व्यंजने नागपुरीत आढळत नाहीत. त्याऐवजी 'न्', 'श्', 'र्' ही रूपे दिसतात. उदाहरणार्थ पाणी ⟶ पानी, विषय ⟶ इशेय, केळ ⟶ केर, 'र'च्या जागी कधी-कधी 'ड्'ही आढळतो. उदाहरणार्थ कोरडा ⟶ कोड्डा इत्यादी.

नागपुरी बोलीच्या व्याकरण प्रक्रियेचे थोडक्यात ठळक असे विशेष सांगता येतील. प्रमाण मराठीतील 'घोडा'चे सामान्यरूप नागपुरीतही 'घोड्या' असेच होताना दिसते. पण 'हत्तीचे' सामान्यरूप मराठीप्रमाणे 'हत्ती' न होता 'हत्त्या' असे होते. नागपुरी बोलीचे द्वितीयेचे व चतुर्थीचे प्रत्यय प्रमाण मराठीपेक्षा वेगळे आहेत. ते वऱ्हाडी बोलीप्रमाणेच एकवचनी 'ल' व अनेकवचनी 'इस्' असे होताना दिसतात. उदाहरणार्थ- मले, तुले, देवाले, त्याहिस, लोकाहिस इत्यादी. नागपुरी बोलीमध्ये संख्यावाचक विशेषणात वेगळेपण दिसते. उदाहरणार्थ दहा ⟶ धा, बेचाळीस ⟶ बेचार/बेतालीस, त्रेपन्न ⟶ तिरूपन इत्यादी. नागपुरी बोलीमध्ये प्रमाण मराठी बोलीतील शब्दांऐवजी फारसी, अरबी व हिंदी शब्दही आढळतात. उदाहरणार्थ खबर, जमाना, पागल, बिमारी, सफेदी, हयरान इत्यादी. नागपुरीत प्रथम पुरुषी व द्वितीय पुरुषी क्रियापदरूपे कर्त्याच्या लिंगानुसार बदलत नाहीत. मात्र प्रथमपुरुषी भूतकाळी स्त्रीलिंगी क्रियापदरूपांना प्रमाण मराठीतील 'ल'ऐवजी 'ला' प्रत्यय लागतो-'मी गेली, करून राह्यली, पाहून राह्यली, चाल्ले गेले, देल्ती (दिली होती) यांसारखी क्रियापदरूपे 'त' (तर) हे उभयान्वयी अव्यय; त्याचप्रमाणे 'य' (ही), परस (पेक्षा), बगर (शिवाय) ही शब्दयोगी अव्यये; 'काऊन' हे प्रश्नार्थक तर सन्या-'करूनसन्या', 'म्हणूनसन्या' ही पादपूर्णार्थक अव्यये; हे नागपुरी बोलीचे विशेष म्हणता येतील.

नागपुरी बोलीविषयीचे आपले निरीक्षण मांडताना डॉ. वसंत वऱ्हाडपांडे म्हणतात, 'वऱ्हाडीप्रमाणेच आपल्या स्वतंत्र व्यक्तिमत्त्वाने आपल्या पृथक अस्तित्वाचा परिचय घडविणारी नागपुरी ही एक महत्त्वाची बोली होय.' पुढे ते लिहितात, 'नागपुरी ही प्रारंभकाळापासून आजतागायत मराठी भाषेत झालेल्या स्थित्यंतराच्या काही खुणा जपून ठेवणारी बोली आहे.' अशा प्रकारे डॉ. वऱ्हाडपांडे यांनी नागपुरी बोलीचे सांस्कृतिक तसेच ऐतिहासिक महत्त्व निर्विवादपणे मांडलेले आहे.

**अहिराणी बोली –** अहिराणी किंवा खानदेशी या नावाने ओळखली जाणारी बोली ही मराठीची एक वैशिष्ट्यपूर्ण बोली आहे. खानदेशातील आभीर (आजचे अहीर) लोकांची बोली म्हणून तिला 'अहिराणी' हे नाव पडलेले आहे. धुळे हा अहिराणीचा केंद्रप्रदेश मानला जातो. तिच्या प्रमुख अशा भाषिक क्षेत्रावरून 'खानदेशी' हे दुसरे नाव पडले आहे.

अहिराणी या बोलीचे क्षेत्र पाहता बऱ्हाणपूर, धुळे, जळगाव हे जिल्हे; नाशिक जिल्ह्याचा उत्तर भाग व तिकडून पुढे ती थेट नेमाड–बुलढाण्यापर्यंत पोहोचते. बागलाणी आणि नंदुरबारी असे तिचे पोटभेदही मानले जातात. 'बागलाणी' बोली नाशिक जिल्ह्यातील बागलाण, कळवण, मालेगाव या तालुक्यांत बोलली जाते. 'नंदुरबारी' नंदुरबार, तळोदे या भागांत बोलली जाते. जातीजमातींनुसार अहिराणीचे पावरी, भिल्ली, लाडशिक्की असेही उपभेद होतात.

अहिराणी भाषेवर गुजराती भाषेचा अधिक प्रभाव असल्याने ती मराठीची बोली आहे की गुजरातीची बोली आहे, हा एक वादग्रस्त प्रश्न आहे. जॉर्ज ग्रिअर्सन यांनी 'लिंग्विस्टिक सर्व्हे ऑफ इंडिया' या ग्रंथाच्या सातव्या खंडाच्या तिसऱ्या भागात खानदेशी, डांगी तसेच ठाणे जिह्यातील कातकरी, वारली, वाडवळ, सामवेदी यांसारख्या बोलींचा गट हा गुजराती व मराठी यांमधील दुवा असून एकंदरीत त्या मराठीपेक्षा गुजरातीला अधिक जवळच्या आहेत, असे दाखवून दिले. ग्रिअर्सनने आभीर हे भिल्ल असावेत व 'भिल्ल' हा शब्द आभीरपासून आलेला आहे, असेही आपले मत नोंदविले आहे. मनूने आभीर ही अंबुष्ट स्त्री व ब्राह्मण यांची संतती मानून त्यांना शूद्रांत गणलेले आहे. महाभारतातही काही ठिकाणी आभीरांचे उल्लेख आढळतात. महाभारतातील उल्लेखानुसार आभीर हे सिंधुतटी राहणारे म्लेंच्छ लढवय्ये होते. ते कौरवांच्या बाजूने लढले, असेही निरीक्षण आढळते. 'अहीर' या शब्दातील 'अही' या रूपावरून 'अहीर' हे नागवंशीय असावेत, असेही एक मत मांडले गेले आहे. प्रा. कृ. पां. कुलकर्णी यांनाही अहीर परकीय असावेत, असे वाटते. अशा रितीने आभीर किंवा अहीर हे अनार्य होते, अशी एक मतप्रणाली आहे. तथापि डॉ. पां. ना. चांदोरकर, श्री. भा. र. कुलकर्णी यांना आभीर किंवा अहीर हे आर्यवंशीय वाटतात. या वादाचा विचार करण्यासाठी १९३५ मध्ये श्री. ना. गो. चाफेकर, प्रा. कृ. पां. कुलकर्णी, श्री. वि. ह. निजत्सुते आणि श्री. चिं. ग. कर्वे या तज्ज्ञांची एक समिती नेमली होती. या तज्ज्ञांनी अनेक पुराव्यांनिशी पुढील निष्कर्ष काढून अहिराणी ही मराठीची बोली असल्याचे मत नोंदविले. समितीचे निष्कर्ष असे होते–

१) अहिराणीतील मराठी–गुजराती शब्दांचे प्रमाण १००:४१ असे आहे.

२) षष्ठी विभक्ती वगळता अहिराणीतील सर्व विभक्ती मराठीप्रमाणे आहेत.

३) आख्यातप्रक्रियाही एक ल्यबन्त वगळता मराठीप्रमाणे आहे.

४) अहिराणीच्या स्वनिमप्रक्रियेवर मराठीचाच प्रभाव अधिक जाणवतो.

अहिराणी बोलीची भाषिक वैशिष्ट्ये पाहता स्वनिमप्रक्रियेमध्ये अहिराणीत 'स' बद्दल 'छ' येतो– सावली ⟶ छावली, सोड ⟶ छोड, 'ळ'च्या जागी 'य' येतो. केळ ⟶ केय, मिळते ⟶ मियते, मोळी ⟶ मोयी इत्यादी. प्रमाण मराठीतील शब्दारंभी येणाऱ्या 'वि'ऐवजी अहिराणीत 'इ' असा उच्चार होतो. उदाहरणार्थ विमान ⟶ इमान, विस्तव ⟶ इस्तू, वीस ⟶ इस इत्यादी. काही वेळा 'र' व्यंजनापाठोपाठ 'ड' येत असल्यास तेथील 'र'चा उच्चार 'ल' असा होतो. उदाहरणार्थ रडण ⟶ लडणे, रोड ⟶ लोड इत्यादी. अभ्यस्त शब्दांतही तांदूयबिंदूय (तांदूळबिंदूळ), यकलंदुकलं (एकटंदुकटं) अशी रूपे होताना दिसतात.

अहिराणीची व्याकरणिक प्रक्रिया पाहता, मराठीप्रमाणेच अहिराणीत तीन लिंगे आहेत. स्त्रीलिंग होताना 'ईण'/'ईन' हा प्रत्यय लागतो. उदाहरणार्थ देशमुखीण, पाटलीन इत्यादी. अहिराणीत तिन्ही पुरुषांत क्रियापदाचे एकच रूप दिसते. कर्त्याच्या लिंगाचा परिणाम क्रियापदावर होत नाही. तिन्ही लिंगांची रूपे सारखीच राहतात. उदाहरणार्थ–'मी करस, तू करस, तो करस, आम्हू करतस, तुम्हू करतस, त्या करतस' (वर्तमानकाळ). धातूचे मूळ रूप वापरून अहिराणीमध्ये भूतकाळ दर्शविला जातो– करणे⟶कयणे. शब्दसंग्रहाचा विचार करता बिस्लरवाट, डिक्रा, लिइ, छे यांसारख्या शब्दांवर गुजराती भाषेचा प्रभाव जाणवतो तर डोंगा (लहान होडी), धल्डा (म्हातारा), आंडोर (मुलगा), झापड (पहाट), खेसर (थट्टा) यांसारखे अपरिचित शब्दही आढळतात. प्रदेशाच्या सान्निध्यामुळे अहिराणीवर

गुजरातीचा परिणाम काही अंशी दिसला, तरी अहिराणी ही मराठीची बोली असून ती बोलणारे लोकही मराठीचा अभिमान बाळगणारे आहेत. अहिराणी भाषेला लेखनाची परंपरा अलीकडेच प्राप्त झालेली आहे. मुळात तिचे रूप बोलभाषिक आहे. कवयित्री बहिणाबाई चौधरी यांची अहिराणीतील काव्यरचना आज मराठी साहित्याचे लेणे ठरलेली आहे. याशिवाय सोपानदेव चौधरी, बालकवी, वारकरी संप्रदायाचे अध्वर्यू कवी पळशीकर यांच्यापासून बा. सी. मर्ढेकर यांच्यापर्यंत अनेक मान्यवर कवींची प्रतिभा याच अहिराणी मातीतून फुललेली आपल्याला दिसते.

**डांगी बोली –** सध्याच्या गुजरात राज्यातील 'डांग' या नावाने ओळखल्या जाणाऱ्या भौगोलिक प्रदेशात बोलली जाणारी डांगी ही मराठीच्या बोलीसमूहांपैकी एक बोली आहे. 'डांगी' हे प्रदेशवाचक त्याचप्रमाणे लोकवाचक नाव आहे. 'डांग' हा प्रदेश गुजरात व महाराष्ट्र यांच्या सीमाभागात पश्चिमेस आहे. सोनगड व व्यारा ही उत्तर सीमा, नाशिक जिल्ह्यातील साक्री ही पूर्वसीमा, कळवण (नाशिक) आणि सुरगणा संस्थान ही दक्षिणसीमा आणि धरमपूर व बांसडा संस्थाने ही पश्चिमसीमा अशा डांगच्या चतुःसीमा होत. डांग हा प्रदेश सुमारे ६५० चौरस मैल क्षेत्रफळाचा असून तो डोंगराळ व दाट जंगलाचा आहे. यामुळेच 'डांग' हा शब्द जंगल वा अरण्य या अर्थी येणाऱ्या 'दांग' या शब्दाचा अपभ्रंश असावा, असे प्रा. कृ. पां. कुलकर्णी यांचे म्हणणे आहे. येथील हवामान विषम आहे. या प्रदेशात भिल्ल, कोकणा, वारली, कुणबी, काथोडी इत्यादी जमातींची वस्ती आहे. डांगमधील या सर्व जमाती हिंदू असून त्या देवदेवतांचे पूजन करतात. पुनर्जन्म, भूतपिशाच इत्यादींवर त्यांचा दृढ विश्वास आहे. ते दिवाळी, तेर अवस, होळी यांसारखे सण साजरे करतात.

डांग प्रदेशात बोलली जाते ती डांगी, असे जरी ग्रिअर्सन व त्याच्या नंतरच्या अभ्यासकांनी गृहीत धरले असले; तरी वस्तुस्थिती तशी नाही. तेथील भिल्ल, कुणबी, वारली इत्यादी जमातींनुसार डांगीची वेगवेगळी बोलीरूपे दिसून येतात. प्रसिद्ध भाषावैज्ञानिक डॉ. सु. बा. कुलकर्णी यांच्या मते डांग प्रदेशात बोलल्या जाणाऱ्या बोली एकमेकींपासून वेगळेपण दाखविणाऱ्या असून त्या सर्व बोली मराठी व गुजराती या दोन्ही भाषांपेक्षा अनेक बाबतींत वेगळ्या आहेत, असे असले तरी डांगी बोलीचे सर्वसाधारण स्वरूप पाहता येईल. डांगीची स्वनिमप्रक्रिया पाहता तालव्य आणि दन्त्य स्पर्शसंघर्षी स्वनिमात फरक करणे, हे डांगी बोलीचे वैशिष्ट्य होय. डांगीतील ऑ हे उच्चारण 'प्वॉट', 'प्वॉर' यासारख्या शब्दांच्या उच्चारांशी जुळणारे आहे. ऐ, औ या संयुक्त स्वरांचे अइ, अउ, आऊ असे उच्चार आढळतात. उदाहरणार्थ बैल $\longrightarrow$ बहल, दौत $\longrightarrow$ दऊत. डांगीमध्ये प्रमाण मराठीप्रमाणे हा, जो, तो या सर्वनामांची तिन्ही लिंगी भिन्न–भिन्न रूपे होतात. चतुर्थीचा ला– भाउसला, मास्तोरला व पंचमीचे दुन, हुन वागदुन (वाघापेक्षा), गाव्हुन (गावाहून) हे विभक्तिप्रत्यय मराठीप्रमाणेच आहेत. डांगीत 'छे' हे गुजराती रूप नाही. ते रूप 'से' असे आहे. डांगीमध्ये मराठीतील उसरान (उशिरा) यासारखी कालवाचक क्रियाविशेषणे, खाल, वर, मोहरे (समोर), दूर अशी स्थलवाचक क्रियाविशेषणे आढळतात. हे साम्य पाहता डांगी ही मराठीची बोली नाही, असे म्हणता येत नाही. पण डांग हा गुजरात राज्यात गेल्याने प्रशासकीय गुजराती भाषा, राजकीय संबंध, शिक्षण इत्यादींमुळे डांगी बोली मराठीला दुरावत जाईल की काय, अशीही एक भीती व्यक्त केली जात आहे.

**कोकणी बोली –** सह्याद्री पर्वतामुळे पश्चिम महाराष्ट्राचे देश आणि कोकण असे दोन भाग पडतात. सह्याद्रीच्या पश्चिमेकडे अरबी सागरापर्यंत दमणपासून गोवा–कोचीनपर्यंतची जी किनारपट्टी आहे, तिला 'कोकण' असे म्हणतात आणि तेथे बोलल्या जाणाऱ्या बोलींना स्वाभाविकपणे 'कोकणी बोली' म्हटले जाते. पाचशे किमीहून लांब असलेल्या या प्रदेशात सर्वत्र एकाच प्रकारची कोकणी बोली बोलली जात नाही. ग्रिअर्सन यांच्या भाषिक पाहणीनुसार तिसाहून अधिक बोली या कोकणी बोली ठरवाव्या लागतील. तरीदेखील साधारणपणे दमणपासून राजापूरपर्यंतचा भाग उत्तर कोकणीमध्ये येतो. गोव्याच्यावर सावंतवाडी भागात त्याचप्रमाणे सावंतवाडीच्या आसपास वेंगुर्ले–मालवण–रत्नागिरीपर्यंतच्या भागास 'मध्य कोकणी' व कोकण किनारपट्टीच्या थेट दक्षिणेस म्हणजे गोवा–कारवारपर्यंत 'दक्षिण कोकणी' बोलली जाते. अशा प्रकारे ऐतिहासिक व

सांस्कृतिकदृष्ट्या कोकणीचे १) उत्तर कोकणी २) मध्य कोकणी ३) दक्षिण कोकणी असे उपभेद सांगितले जातात.

वरील प्रादेशिक भेदांच्या अंतर्गत दमणची कोकणी, बाणकोटी, संगमेश्वरी, कुडाळी, गोमंतकी इत्यादी स्थानिक भेद होताना दिसतात. त्याचप्रमाणे विविध जातींनुसार व समाजातील भिन्न-भिन्न स्तरांनुसार चित्पावनी बोली, गौड सारस्वतांची बोली, ठाकरी बोली, कुणबी बोली, किरिस्ताव बोली असेही भेद पडताना दिसतात.

उत्तर कोकणी व मध्य कोकणी ज्या प्रदेशांत बोलल्या जातात, ते प्रदेश सांस्कृतिक व प्रशासकीय कारणांनी प्रमाण मराठीच्या प्रदेशांशी जोडलेले असल्याने या दोन्ही प्रकारच्या कोकणी बोली प्रमाण मराठीला जवळच्या आहेत. दक्षिण कोकणीबाबत प्रश्न उरतो. त्या ठिकाणी म्हणजे गोव्यावर प्रदीर्घ काळ पोर्तुगिजांची राजवट होती, त्याखालच्या कर्नाटक भागातील लोक जीवनाच्या अनेक क्षेत्रांत कन्नडचा वापर करीत होते.' त्यामुळे कोकणी मराठीची बोली आहे की स्वतंत्र भाषा आहे, हा वाद निर्माण झाला. 'कोकणी ही व्याकरणदृष्ट्या संस्कृतला जवळची आहे. तिचा व मराठीचा शाखासंबंध नाही', या डॉ. दाल्गाद यांच्या विधानाने या वादाला आरंभ झाला. या विधानाला विठ्ठल रामजी शिंदे यांनी आक्षेप घेतला. कोकणी ही स्थानिक बोली नसून ती उपरी आहे, असे मत त्यांनी मांडले. 'कोकण' या शब्दाची फोड, कोंग+आण ('कोंग' जातीचा देव + आण = कोंगाण) म्हणजे कोकण या शब्दाची फोड त्यांनी केली. कोंग आर्य नव्हते असे वि. रा. शिंदे म्हणतात. त्यांचे मत श्री. वा. र. वालावलीकर यांनी खोडून काढले. त्यासाठी त्यांनी 'कोकणी व मराठी' हा लेख लिहिला. त्यामध्ये कोकणी ही स्वतंत्र भाषा असून कोकणवासीय हे आर्य आहेत, असे प्रतिपादन केले.

डॉ. सु. म. कर्त्रे यांनी 'कोकणीची व्याकरणी बांदावळ' (१९४९) व 'फॉर्मेशन ऑफ कोकणी' (१९४२) या आपल्या ग्रंथांमध्ये कोकणी ही स्वतंत्र भाषा असल्याचा सिद्धान्त मांडलेला आहे. कोकणीच्या अनेक रूपांची त्यांनी भाषाशास्त्रीय चिकित्सा केलेली आहे. जॉर्ज ग्रिअर्सन, पां. दा. गुणे या बोलीच्या तज्ज्ञांनी कोकणीला मराठीची बोली मानले होते. पुढे प्रा. अ. का. प्रियोळकर यांनीही केवळ कोकणी शब्दच नव्हे तर कोकणीचे वैशिष्ट्यपूर्ण प्रत्ययही जुन्या मराठीमध्ये कसे आढळतात, ते दाखवून दिले. डॉ. वि. बा. प्रभुदेसाई यांनी कोकणीला मराठीची बोली मानले तर डॉ. ना. गो. कालेलकर यांनी ती स्वतंत्र भाषा असल्याचा दावा केला. अशी परस्परविरोधी मते मांडली जात आहेत. सारांशाने सांगायचे तर मराठी-कोकणी वाद हा जटिल स्वरूपाचा आहे. एवढे मात्र निश्चित की, भौगोलिक वेगळेपण असलेल्या कोकण प्रदेशातील कोकणी ही मराठीच्या इतर बोलींपेक्षा अनेक स्वरूपांत आपले वेगळेपण राखून आहे.

कोकणीची स्वनिमव्यवस्था पाहता ती सर्वसाधारणपणे मराठीच्या स्वनिमव्यवस्थेपेक्षा फार वेगळी नाही. नासिक्य उच्चारांचे वैपुल्य हा कोकणीचा ठळक विशेष आहे. कोकणीमध्ये अनुनासिक स्वर फार आहेत. मराठीत आता ते जवळजवळ नाहीसे झाले आहेत. व्याकरणिक प्रक्रिया पाहता वयात न आलेल्या किंवा खालच्या वर्गातील स्त्रियांची नामे नपुंसकलिंगी मानली जातात. उदाहरणार्थ चेडू (मुलगी), मंजूळ (विशेषनाम), मानवेतर प्राण्यांतील नर-मादीत्व दाखविताना 'दादलो' व 'बायली' हे शब्द वापरले जातात. कोकणीतील 'घोडो, रेडो' यांसारख्या ओकारान्त नामांचे अनेकवचन मराठीप्रमाणे एकारान्त घोडे, रेडे असे होते. नपुंसकलिंगी नामांचे अनेकवचन आकारान्त होते. उत्तर ⟶ उत्तरा, नाव ⟶ नावा इत्यादी.

कोकणीची व्याकरणव्यवस्था पाहता द्वितीया व चतुर्थी विभक्तींमध्ये मराठी प्रमाणबोलीपेक्षा वेगळा 'का' हा प्रत्यय कोकणीत लागतो, तो हिंदीतील 'को'शी साधर्म्य दाखवितो. माका, म्हाका इत्यादी. त्याचप्रमाणे षष्ठीचा 'चो' हा प्रत्यय मराठीतील 'चा' प्रत्ययाशी जुळणारा असून त्याद्वारे मराठीतल्याप्रमाणे विशेषणाचा अर्थ व्यक्त केला जातो. कोकणीतील अकरणरूपामध्ये संक्षेपजन्य सुलभता दिसते. उदाहरणार्थ मरिनासताना (मारले नसताना), घेनासताना (घेतले नसताना). कोकणीतील प्रयोजकरूप वैशिष्ट्यपूर्ण आहे. ही रूपे संस्कृत 'अय' प्रत्यय लागून होतात ती मराठी 'अव'शी साम्य दाखवितात. श्रवणबेळगोळ येथील शिलालेखामध्ये 'श्रीचावुण्डराजें करवियले, गंगराजे सुत्ताले करवियले' या वाक्यरूपात ते आढळते.

कोकणीचा शब्दसंग्रह पाहता तिचे एकाच वेळी मराठीशी साधर्म्य तसेच वैधर्म्य दिसते. उदाहरणार्थ: विचारू, तुम्मि (तुम्ही), आम्मि (आम्ही), बा (बाप) यांसारखे काही शब्द मराठीशी जवळीक साधणारे आहेत. पण घोव (नवरा), भुरगे (लहान मूल), अड्डि (हरकत), ओपारी (म्हण), कुमार (कुंभार), चोंबो (समुदाय) यांसारखे शब्द मराठी भाषकाला पूर्वाभ्यासाशिवाय समजणार नाहीत.

महाराष्ट्रातील ठळक बोलींचा हा थोडक्यात परामर्श आपण घेतला. पण आजही महाराष्ट्राच्या कोनाकोपऱ्यांत कित्येक बोली शिल्लक आहेत की ज्या सहजासहजी आपल्याला समजणार नाहीत. या बोली बोलणाऱ्या व्यक्तींनी आज प्रमाणभाषेच्या संपर्कात येऊन आपापल्या बोलींना अधिकाधिक प्रतिष्ठा देण्याचा प्रयत्न करावयास हवा. वाढता शिक्षणप्रसार, नागरी जीवनाची ओढ, बदलत जाणारी सामाजिक मूल्ये यांमुळे  बोलीकडे पाहण्याची दृष्टी बदललेली दिसते. या अभ्यासाची गरज काय आहे, असाही एक तुच्छतादर्शक, उदासीन सूर सर्वत्र ऐकू येतो. पण जेव्हा खऱ्या अर्थाने आपण आपल्या सामाजिक जीवनाचा ऐतिहासिक अंगाने सर्वांगीण विचार करू लागतो, तेव्हा बोलींकडे पाहण्याची आपली दृष्टी बदलते. सगळे पूर्वग्रह नाहीसे होतात. आपण आपली जी बोली म्हणतो, ती कोठपर्यंत पसरलेली आहे, ती कसकशी पसरली आहे, तिने कोणकोणती रूपे घेतलेली आहेत, किती लोक ती बोली आज बोलतात, महत्त्वाच्या बोलींचे वर्गीय तसेच देशीय भेद कोणते आहेत, त्यांचे इतर बोलींशी असलेले संबंध, त्याचप्रमाणे त्या-त्या बोलींचे सांस्कृतिक, साहित्यिक महत्त्व काय आहे, अशा सर्व प्रश्नांची उत्तरे बोलींच्या अभ्यासातून मिळतात. स्वदेश, समाज, स्वभाषा जाणून घेण्यासाठी आज प्रत्येक व्यक्ती, शासन, महाराष्ट्रातील विविध विद्यापीठे, साहित्यसंस्था यांनी एकत्र येऊन बोलीच्या अभ्यासाचे महत्त्व अधिकाधिक जाणून घ्यावयास हवे. बोलीकडे पाहण्याची समाजातील उदासीनता झटकून भविष्यकाळात आज उपेक्षित असलेल्या अनेक बोलींचा परिचय होऊन, त्याद्वारे आपल्या महाराष्ट्र संस्कृतीचे संचित खात्रीने जतन करून ठेवता येईल.

* * *





# पंतसाहित्य

■ डॉ. यशवंत पाठक

पंतसाहित्य वा पंडिती काव्य हा मराठी काव्यातला ठळक प्रवाह आहे. महाकवी कालिदास, भारवी, माघ, श्रीहर्ष अथवा महा भवभूती, भास यांसारखे नाटककार; बाण, सुबंधू, दंडी यांसारखे गद्यकार; पं. जगन्नाथ, भर्तृहरी, चम्पूकार यांसारख्या संस्कृत लेखकांचा प्रभाव पंडित कवींवर पडला, आणि त्यांनी संस्कृत वळणाच्या अभिजात पठडीचा नमुना डोळ्यांसमोर ठेवून पंडिती काव्य लिहिले. मराठीतील भक्तिरस आणि संस्कृतातील नवरस यांचा मिलाफ पंतसाहित्यात साधला. अनेक पंडित कवींनी आख्यान काव्ये लिहिली. मराठी आख्यान कविता हा स्वतंत्र काव्यप्रकार निर्माण झाला.

दामोदर पंडित, नरेन्द्र, भास्करभट्ट बोरीकर या महानुभाव कवींनी पंत काव्य लिहिले. आख्यानकाव्यात एकनाथांचे रुक्मिणी स्वयंवर अग्रभागाने आले. पंडिती काव्य विषयनिष्ठ असले, तरी महाकाव्यातील आत्मनिष्ठा त्यात आहे. प्रदीर्घ रचना हा त्यांच्या कलानुभवाचा अवकाश आहे. कल्पनाविलासाला भावनाविष्काराची बैठक आहे. अलंकारांच्या कसरतीतून प्रासादिकतेच्या जागा पंतसाहित्यात थोड्या प्रमाणात मिळतात. नादमाधुर्य, रचनासौष्ठव, वर्णनचातुर्य हे पंत काव्याचे विशेष आहेत. वस्तुनिष्ठ काव्याचा तो नमुना म्हणावा. याचा रसिकवर्ग अभिजन

**पंत साहित्याने मराठीत, स्वतःचा अभिजातवाद निर्माण केला. नवनवीन शब्द घडवले. बोध, भक्ती हे त्यात असले, तरी जीवनाला व्यापलेली सारी अंगे पंतांनी काव्यातून अभिव्यक्त केली. प्रौढ वाङ्मयाची आणि निबंधमालेची सुप्रभात पंत साहित्याने दाखवली. हे पंतसाहित्याचे ऋण सुज्ञ नक्की मान्य करेल.**

किंवा संस्कृत जाणणारा असा होता. भाषेचा भारदस्तपणा पंडितांनी आणला. स्वयंवराख्यानांचा स्वतंत्र प्रकार निर्माण केला. मराठीला अभिजातत्वाचा सुडौल पंत साहित्याने दिला, हे नमूदच करायला हवे.

मुक्तेश्वर (इ. स. १५७४-१६४५) हा पंडित कवींमध्ये अग्रगण्य आहे. याने मराठीत महाभारत आणले. याच्यापूर्वी विष्णुदास नामा या कवीने महाभारत अनुवादिले होते. मुक्तेश्वराने श्लोकबद्ध रामायण लिहिले. ते विविध वृत्तांत सांगितले. मुक्तेश्वर हा एकनाथांचा नातू. एकनाथांची मुलगी गोदावरी, हिचा मुलगा. वडील चिंतामणी. कोल्हापूरची महालक्ष्मी ही कुलस्वामिनी. मुक्तेश्वर व्युत्पन्न आणि अभ्यासू होता. मुक्तेश्वराची 'भारतरचना' महत्त्वाची आहे. याशिवाय 'गीताटीका', 'हरिश्चंद्राख्यान', 'शुकरंभासंवाद', 'एकनाथचरित्र', 'गजेन्द्रमोक्ष', 'हनुमंताख्यान', 'विश्वामित्रभोजन', 'शतमुखरावणवध', 'मूर्खांची लक्षणे' ही प्रकरणे लिहिली आहेत. रामायणातल्या 'भरतभेटीचा प्रसंग' किंवा 'सीतास्वयंवर' हे प्रसंग महत्त्वाचे आहेत. महाभारतात सर्व रस येतात, निसर्गवर्णने येतात. 'हा पावसाळा नसून इंद्राचा पृथ्वीला अभिषेक आहे' अशी भव्य कल्पना यात येते.

मुक्तेश्वरी भारतातील रसाळता, वातावरणनिर्मिती लक्षणीय आहे. पण त्यात उत्तान वर्णने आहेत. ग्राम्यता आहे. दुष्यंताच्या राज्यात फिरंगी, इंग्रज, पारसी, डच यांचे उल्लेख कालविपर्यास करतात. काही ठिकाणी पाल्हाळीक तपशील अकारण येतात. तरीही त्याने कवितेला डौल दिला. त्याच्या भाषाप्रभुत्वाने वामन, श्रीधर, मोरोपंत यांना प्रभावित केले. तो आपल्या कवितेविषयी लिहितो.

''मुक्तेश्वराचीं गुणसुढाळे। वचन-शुक्तिका-मुक्ताफळें। सज्जन-राजहंस-पाळें। भाग्यगळें सेविती।। (विराटपर्व - १अ. ओ. १२९)

'सुश्लोक वामना'चा हे ब्रीद असलेले वामनपंडित हे पंत साहित्यातले आदरयुक्त नाव आहे. (इ. स. १६०८-१६९६). हे विजापूरचे. उपनाव शेषे. यांनी काशीत विद्याभ्यास केला नि महाराष्ट्रात काव्यसाधना केली. यांना फार्सी उत्तम येई. विजापूरच्या आदिलशहाने यांना मुस्लीम करायचे ठरवले. या धाकाने वामनपंडितांनी विजापूर सोडले. मलयाचलावर सच्चिदानंदस्वामींनी त्यांना उपदेश दिला. त्यांचा तुकाराम-समर्थ रामदास यांच्याशी संबंध आल्याने ते विनम्र भक्त झाले. त्यांची काव्यरचना चाळीस हजारांच्या आसपास आहे. ज्ञानयुक्त सगुणभक्ती, हे त्यांच्या साहित्याचे प्रयोजन आहे, असे त्यांनी सांगितले आहे. श्रीमद्‌भवगतगीतेचे यथार्थ विश्लेषण त्यांच्या 'यथार्थदीपिका' या ग्रंथात आहे. 'निमसार' हा त्यांचा वेदान्तपर ग्रंथ आहे. यात भार्गवीवारुणी विद्येचे विवेचन आहे. 'कर्मतत्त्व', 'ब्रह्मस्तुती', 'चित्सुधा', 'श्रुतिसार' ही आध्यात्मिक प्रकरणे वामनपंडितांनी लिहिली. 'भक्तांचिया काजासाठी। साधुचिया प्रेमासाठी। सोडिली मी लाजरे।।' ही पदे प्रसिद्ध आहेत.

महिपतीबुवा ताहराबादकरांनी 'भक्तविजय', 'संतलीलामृत', 'भक्तलीलामृत' असे संतग्रंथ लिहिले. भक्तिमनाला जशा संतकथा भावल्या, तशा त्यांनी सांगितल्या. निरंजनमाधवांचा 'ज्ञानेश्वरविजय', 'चिद्बोधरामायण' हे काव्यग्रंथ भक्तिपर असून ते भाविकांत वाचले जातात. यांचे 'ज्ञानेश्वराष्टकम्' हे स्तोत्र रमणीय आहे. 'मजवरि का अजुनि दया न ये दयाघना!' हे पद आज देवळांतून गातात.

पंतसाहित्यातले महत्त्वाचे आणि शेवटचे कवी मोरोपंत पराडकर. (इ. स. १७२९-१७९४). त्यांचे घराणे राजापूरजवळ असणाऱ्या सौंदळचे. वडील रामजीपंत, आई लक्ष्मी. रामजीपंत काही दिवस पन्हाळगडावर राहिले. तिथून बारामतीला बाबूजी नाइकांच्या आश्रयाला आले. मोरोपंतांनी संस्कृतचा खोल अभ्यास केशव पाध्ये व गणेश पाध्ये यांच्यापाशी केला. कुशाग्र बुद्धीच्या मोरोपंतांनी संस्कृत काव्ये, व्याकरण, दर्शने अभ्यासली. त्यांचे कविमन प्रेमळ, सत्प्रवृत्त, समतोल होते. 'आपण काही तरावया गावे' ही त्यांची धारणा होती. त्यांची एकूण काव्यसंपदा पाऊण लाख आहे. त्यांनी लिहिलेले आर्या वृत्तातले आर्याभारत कीर्तनांत म्हटले जाते.

भारत, रामायण, भागवत हे मोरोपंतांच्या, काव्याचे मुख्याधार आहेत. त्यांनी १०८ रामायणे लिहिली. मंत्रभागवत, अमृतमंथन, हरिवेश हेही ग्रंथ लिहिले. त्यांची 'केकावली' आत्मनिष्ठ काव्याचा नमुना ठरली.

शरणागतीचा परमोच्च बिंदू असलेल्या 'संशयरत्नमाला'ने काव्याचे वेगळेपण दाखविले. 'सीतागीता'तील आणि 'सावित्रीगीता'तील प्रसादिकता आनंद देते. हंसकाकीय कथा; कोल्हेसिंहकथा या रूपककथा आख्यानकाव्यात समर्पकपणे येतात. 'बालिश बहु बायकात बडबडला'; 'झाले बहु, होतील बहु, आहेतहि बहु, परंतु या सम हा'; 'हांसत कर्म करावे भोगावे रडत तेंचि परिणामी' ही सुभाषिते वाङ्मयात चिरंजीव आहेत. 'सुसंगती सदा घडो सुजन वाक्य कानी पडो...' हे पंतकाव्याचे पसायदान आहे. भारतातील युद्धवर्णनात पानिपतचे युद्ध येते.

संयम हा पंतकाव्याचा गुण आहे. मोरोपंत मूळ कथानकावर लक्ष केंद्रित करतात. आर्यावृत्त कथानकाला गती देते. असामान्य भाषाप्रभुत्वासोबत त्याला क्लिष्टता येते. मराठी भाषेचा लवचीकपणा आणि डौल मोरोपंतांनी आपल्या काव्यातून दाखविला. संस्कृत पंडितांना हे सक्रिय उत्तर होते. मराठीत अर्थबहुलता आणि शब्दभांडार समृद्ध आहे, हे मोरोपंतांनी आपल्या विशाल वाङ्मयरचनेतून सिद्ध केले. 'हंसे मुक्ता नेली, मग केला कलकलाट काकांनी...' ही कृष्णरुक्मिणी विवाहाची अखेर; किंवा 'जातां स्वर्गी मिरवीत, निजगुरुसुतरत्न, देवयानी ते। वर्णिति किति दैत्यांते, किति कवितें, कितिक देवयानीतें।। हा कचदेवयानी कथेचा शेवट योजनाबद्ध आहे. मोरोपंतांनी आपल्यातील 'शक्ती' व 'व्युत्पत्ती' यांनी मराठी समृद्ध केली. आर्येला वैभव दिले. 'नित्य तुम्ही प्रभुपाशी; पेढे बर्फी नवा खवा खावा। तरि म्यां एके दिवशी रेवडिचा स्वाद कां न चाखावा।।' अशी अपेक्षा व्यक्त केली. यात पंतांच्या कवितेचे मोठेपण आहे. मराठीला संतकाव्याने दिलेले विशिष्ट परिमाण मोरोपंतांनी आदराने स्वीकारून पंडिती काव्याचे दालन समृद्ध केले.

### पंतसाहित्याचे मूलाधार

रामायण, महाभारत, भागवत हे पंतसाहित्याचे मूलाधार होते. पंतसाहित्य कीर्तनांतून सादर केले गेले. आख्यान काव्यांची स्वतंत्र परंपरा निर्माण झाली. कटाव; कडाका; चूर्णिका; चम्पू; वृत्ते असे अनेकविध काव्यप्रकार अस्तित्वात आले. ही कविता प्रामुख्याने सादरीकरणाची झाली. गद्यातून पद्यात, आणि पद्यातून गद्यात जाण्याची लीलया किमया पंतकाव्याने केली. मौखिकी परंपरेला हे प्रकार अनुकूल ठरले. राम–सीता; कृष्ण–रुक्मिणी; राधा–कृष्ण किंवा दिलीप–सुदेष्णा; नळ–दमयंती; द्रौपदी–अर्जुन यांच्या कथा हे निमित्त होते. यांतून त्यांनी कथांत नावीन्य निर्मिले. कथांत कल्पनाशक्तीचे मिश्रण करून नवीन पात्रे उभी केली. पंतांचा राम; किंवा श्रीधरांचा कृष्ण किंवा रघुनाथपंडितांचा नळ अशी मुद्रा उमटवली. त्या–त्या काळाचे चित्र आख्यानांतून उमटले.

क्लिष्टता, अतिरेक, पाल्हाळ हे सारे दोष मान्य करून पंत साहित्याने मराठीत, स्वतःचा अभिजातवाद निर्माण केला. नवनवीन शब्द घडवले. बोध, भक्ती हे त्यात असले, तरी जीवनाला व्यापलेली सारी अंगे पंतांनी काव्यातून अभिव्यक्त केली. प्रौढ वाङ्मयाची आणि निबंधमालेची सुप्रभात पंत साहित्याने दाखवली. हे पंतसाहित्याचे ऋण सुज्ञ नक्की मान्य करेल. शृंगाररस आणि करुणरस ह्यांनी युक्त नळ–दमयंती कथेतला हंस सरस आहे. 'म्हातारी उडता नयेचि तिजला माता मदीया अशी' असे तो आपले गाऱ्हाणे नळाला आर्जवाने सांगतो. दमयंतीला नळाचे वर्णन ऐकवताना तो तिचा आप्त बनतो. नळ आपल्याला सोडणार नाही, असे वाटताच तो आईच्या आठवाने व्याकूळ होतो. हे भाव रघुनाथ पंडिताने नेमकेपणाने व्यक्त केल्याने नळाला आणि दमयंतीला आगळे व्यक्तित्व प्राप्त होते. ही कविता नारदीय कीर्तनातून प्रसृत झाली. उत्तररंगात आख्यानातून हरिदासांनी ही कविता विविध रागदारीत गायली. आख्यानकाव्यात श्लेषांच्या हव्यासाने क्लिष्टता आणि अर्थाला काहीशी बाधा येते. तरीही 'होय शृंगारा करुणरसा थारा' ही प्रतिज्ञा पंडिताने सार्थ केली आहे.

संत एकनाथ, गोविंद गुरू, भागवत पुराण ही परंपरा जपणारे कष्टदयार्णव (इ. स. १६७४–१७४०) भागवताच्या दशम स्कंधावरील 'हरिवरदा' या ग्रंथाने विख्यात पावले आहेत. ते भिक्षेवर जगले. संसारात त्यांना रक्तपितीची व्याधी जडली. गोविंदगुरूंच्या आज्ञेने त्यांनी 'हरिवरदा' टीका लिहिली. या ग्रंथात विद्वत्ता आणि बहुश्रुतता आहे. या ग्रंथातून त्यांचे सखोल अध्ययन व

व्यापक अनुभव हे व्यक्त होतात. ह्या ग्रंथात हरिगुणकथा रसाळपणे सांगितली आहे. यातली वर्णने वेधक-पाल्हाळीक आहेत. भाषा प्रासादिक आहे. भागवतावरील महत्त्वाच्या टीकांत या ग्रंथाचा समावेश करतात.

पंडिती काव्यातले लोकप्रिय कवी श्रीधरस्वामी नाझरेकर (इ. स. १६५८-१७९२) हे होत. पंढरपुराजवळ नाझरे गावचे हे पंडित कवी होते. आई सावित्री, वडील ब्रह्माजीपंत. आडनाव देशपांडे. श्रीधरांनी पंढरपुरात आपला अभ्यास केला. संस्कृतातील व्याकरण, न्याय, धर्म, ज्योतिष, वेदान्त, योग इत्यादी शास्त्रांचा उत्तम अभ्यास केला. सोबत ज्ञानदेव, एकनाथ, मुक्तेश्वर, वामन, तुकाराम, रोहिदास, गोरा कुंभार, सांवता माळी ह्यांच्या वाङ्मयाचे सखोल परिशीलन केले. 'हरिविजय', 'रामविजय', 'वेदांतसूर्य', पांडवप्रताप', 'पंढरीमाहात्म्य', 'व्यंकटेशमाहात्म्य', 'मल्हारिविजय', 'ज्ञानेश्वर-चरित्र' अशी विपुल आणि विविध ग्रंथरचना श्रीधरांनी केली. 'शिवलीलामृत' हा ग्रंथ श्रीधरांनी बारामतीला सिद्धेश्वर देवालयात लिहिला. 'रामचंद्र ध्यानम्', 'राघवाष्टकम्', 'प्रश्नोत्तरमालिका', 'महावाक्यविवरणम्' अशी काही संस्कृत प्रकरणे त्यांच्या नावावर आहेत.

'हरिविजया'तील कृष्णकथा मराठी घराघरांत पोहोचली आहे. ओवीवृत्तातील ही रचना मौखिक परंपरेने पिढ्या न् पिढ्यांनी सांभाळली. कृष्णकथेतून भारतीय पुरुषार्थ शिकविले. भक्तीला सामाजिक शक्ती मानले. 'रामविजया'त कर्तव्य आणि नीती ह्यांची शिकवण दिली. 'मुख्य धर्म परोपकार। अधर्मनाम साचार। परपीडा करणे हे।।' हे जीवनसूत्र दिले. कोणत्याही आक्रमणाला तोंड देताना आपण कृष्ण-समर्थ झाले पाहिजे. यावर श्रीधरांनी भर दिला. त्यांच्या 'शिवलीलामृता'चे पठण आजही सर्व थरांत निरनिराळ्या हेतूंनी होते. श्रीधरांनी लेखनासाठी भरपूर परिश्रम केले. मनोवेधक कथन, बहुश्रुतता, सुलभता या गुणांनी श्रीधर लोकप्रिय झाले.

मध्वमुनीश्वरांची कविता कीर्तनातून लोकमनात पोहोचली. हे नाशिकचे माध्व सांप्रदायी असले तरीही पंढरपूरची वारी करीत. वृद्धापकाळामुळे वारी करणे जमेना. म्हणून त्यांनी सैंदूरवाड्यात विठ्ठलमंदिर स्थापिले. मध्वमुनीश्वर उत्तम कीर्तनकार होते. त्यांची एकूण पदे ६६९ आहेत. यात देवतावर्णने, क्षेत्रवर्णने, काही चरित्रे, आरत्या; हिंदी-संस्कृत रचना आहेत. उदा. 'उद्धवा शांतवन कर जाऽ', 'तू माझा यजमान रामा!', 'मनमोहन वाजवी वेणू।।' ही पदे आजही म्हटली जातात. 'सजणी लागली मजला नीज' ही लावणी महत्त्वाची आहे. 'पिंगा', 'सौरी', 'दळणकांडण', 'टिपरी' अशी आध्यात्मिक रूपके आहेत. वर्णनशैली मनोरम व आकर्षक आहे. यातून भक्तीविषयक उपदेश येतो. 'माझें अचडें बचडें छकडें वो ।।' हे पद सर्वश्रुत आहे.

अमृतराय मध्वमुनीश्वराचे पट्टशिष्य. (इ. स. १६९८-१७५३). यांची कविता कीर्तनात खूप गातात. कटाव हा स्वतंत्र रचनाबंध अमृतरायांनी निर्माण केला. अध्यात्म, भक्ती, नीती यांची त्रिवेणी अमृतरायांच्या काव्यात आहे. नवरस आहेत. 'संतपदाची जोड दे रे हरी!', 'प्राण्या बोलावे बहु गोड', 'स्मरता नित्य हरी। मग ती माया काय करी ।।', लिहिली. 'अनुभूतीलेश', 'सिद्धांत विजय', 'श्रुतिकल्पकता' हे संस्कृत ग्रंथ लिहिले. 'गीता समश्लोकी', 'समश्लोकी अपरोक्षानुभूती', 'जगन्नाथ पंडितांची गंगालहरी', 'भर्तृहरीची त्रिशतके' या संस्कृत ग्रंथांचा अनुवाद केला. वामनपंडितांनी मराठी श्लोक समृद्ध केला. रसवत्ता, वर्णनकौशल्य आणि नादमाधुर्य यांनी वामनांचे श्लोक लोकमुखी झाले. उत्कृष्ट अनुप्रासाचे उदाहरण म्हणून 'वनसुधे'तील पुढील श्लोक पहा-

पाळीयुक्त तळीं, अशीं न सुतळीं, स्वर्गीं न वा भूतळीं।
वायूतें विमळीं जळीं, सकमळीं जी पाळितीं शीतळीं।
अन्तर्बाह्य अळी, महाशतदळी, भ्रंगावळी सांवळीं।
बिन्दू त्याच दळीं कसा डळमळी घे पैज मुक्ता-फळीं ।।
(वनसुधा ४-९)।

श्रीकृष्ण आपल्या सवंगड्यांसह ज्या वनात खेळण्यासाठी गेले त्यातील तळ्यांचे हे 'अळी' अनुप्रासयुक्त वर्णन आहे. यात 'अळी' तेरा वेळा, नुसता 'ळी' पंधरा वेळा आला आहे. 'ळ' हा कठोर आहे. पण या श्लोकात तो कोमल होऊन आला आहे. 'त्या तळ्याभोवती काठ किंवा पौळी (पाळी) बांधलेली होती. अशी सुंदर तळी स्वर्ग, मृत्यू (भूतळी) किंवा पाताळ(सुतळी) ह्या ठिकाणी नव्हती. त्या तळ्याच्या

स्वच्छ पाण्यात (विमळी जळी) कमळे होती. त्यातील शीतळाईमुळे तेथील गार वारा सुगंधित होई. अनेक पाकळ्यांच्या कमळांच्या आत-बाहेर अनेक काळे भ्रमर गुंजारव करीत होते. त्या पाकळ्यांवर जलबिंदू पडले की ते हालत. जणू काही ते मोत्यांशी स्पर्धा करीत आहेत.''

वामनपंडितांची 'नामसुधा', 'वनसुधा', 'वेणुसुधा' ही काव्यप्रकरणे रसयुक्त आहेत. यमुनेच्या काठावर गोपगड्यांसमवेत दिसणारा कृष्ण वामनपंडित नेमकेपणाने कसा रेखाटतात ते पहा-

अंग वक्र अधरीं धरी पावा, गोप-वेष हरि तोचि जपावा।

वामबाहुवरि गालहि डावा, तो ठसा स्वत्हृदयात पडावा।।

वामनपंडितांनी राम-सीतास्वयंवरास जीवशिवाचे मीलन मानले आहे. काही ठिकाणी शृंगाराचा अतिरेक आहे. पुनरुक्ती आहे. क्लिष्टता आहे. तथापि वामनांनी मराठीला सुमधुर श्लोक दिले हे निश्चित.

'रुक्मिणीहरण' व 'मुद्‌गलासन' लिहिणाऱ्या साम्राज्यांनी (इ. स. १६१३-१७००) कृष्णचरित्रात भक्तीला प्राधान्य दिले. सगुणभक्तीची अद्वैतबोधाशी सांगड घातली. यातली भाषा फारशी विद्वज्जड नाही. कवी नागेशांचे, 'सीता-स्वयंवर', 'रुक्मिणी स्वयंवर', 'शारदाविनोद', 'रसमंजिरी', 'चंद्रावळीवर्णन' ही पाच काव्ये वैशिष्ट्यपूर्ण आहेत. कवीने कल्पकतेतून काही आख्यानांत विनोद निर्मिला आहे. विठ्ठल बीडकर (इ. स. १६२८-१६९०) याने 'रुक्मिणीस्वयंवर', 'सीतास्वयंवर', 'द्रौपदीवस्त्रहरण', 'पांचालीस्तवन', 'बिल्हणचरित्र', 'रसमंजरी', 'विद्वज्जीवन' अशी सात काव्ये लिहिली. या आख्यानांत अलंकारांची रेलचेल झाल्याने मूळ काव्यानुभव हरवला आहे.

कवी आनंदतनय यांचा व्याही रघुनाथपंडित हा 'नल-दमयंती स्वयंवर' हे एक आख्यानकाव्य लिहून पंत साहित्यात अक्षर ठरला. या काव्याने मानदंड निर्माण केला. शिवकाळातील प्रसिद्ध असलेल्या सात कर्तबगार पंडितांतला हे आख्यान काव्य लिहिणारा पंडित कोण याबद्दल वाद झडले आहेत. प्रज्ञावंत, सुसंस्कृत, रसिक, असा हा रघुनाथ पंडित कवी मात्र व्यवहारी आणि शिवाजीराजांच्या राजदरबारात वावरलेला असावा. तो आपल्याला समर्थ रामदासांचा शिष्य म्हणवून घेतो. काव्यातील नलराजाचे वर्णन, त्याचा पोषाख, फारसी शब्दांची योजना, गड-सुरुंग इत्यादी लष्करी शब्दांचा उपयोग आणि एकूण संपन्न वातावरण यांत शिवकालाचा ठसा स्पष्ट दिसतो. यातील 'हंसा'चे मानवीकरण करून जी स्वतंत्र पात्रनिर्मिती केली, ती असाधारण आहे. दमयंतीच्या भावमनांचे कंगोरे सूक्ष्मतेने या काव्यात रेखाटले आहेत. त्यामुळे हे काव्य स्वतंत्र वाटते, परभत वाटत नाही. 'कठीण समय येता कोण कामास येतो' ही चिरंजीव ओळ रघुनाथपंडिताने लिहिली आहे. हे सुभाषित आजही आपण बोलता-बोलता सहज वापरतो. हंस-नलाचा संवाद मन हेलावून सोडतो.

* * *





# बखर साहित्य

■ डॉ. यशवंत पाठक

**बखर वाङ्‌मयातील चरित्रनायक प्रत्यक्ष इतिहासातील असतात. त्यांचे पराक्रम अलौकिक आहेत, अशी बखरकारांची धारणा असते. ते ईश्वराचे अवतार आहेत, असे बखरकार मानतात. बखरीत राजकीय इतिहासाबरोबर तत्कालीन समाज आणि संस्कृती ह्यांचे दर्शन घडते. राजकीय इतिहासाचे सुसंगत कथात्मक निवेदन बखरीत असते. बखरीत आत्मनिष्ठ लेखन असते.**

बखर हा इतिहासाच्या संदर्भातला महत्त्वाचा शब्द आहे. ‘खबर’ या शब्दाचा वर्णविपर्यय म्हणजे ‘बखर’. अशी बखरीची ढोबळ व्युत्पत्ती देण्यात येते. मोल्सवर्थच्या शब्दकोशात ‘बखर म्हणजे प्राकृत भाषेत राजादिकांचे लिहिलेले गद्यरूप चरित्र’ असा बखरीचा अर्थ दिलेला आहे. ग्रँन्ट डफ मराठ्यांचा इतिहास लिहीत होता, त्या काळातली ही संकल्पना आहे. बखर म्हणजे इतिहास, बातमी, वार्ता, आख्यायिका असे विविध अर्थ बखरीत येतात. इतिहासाचार्य राजवाड्यांनी हा प्रकार पुरातन काळापासूनचा आहे, असे म्हटले आहे. याला डॉ. गं. ब. ग्रामोपाध्ये दुजोरा देतात. बक्‌=बोलणे. बकणे. या धातुपासून बखर हा शब्द मराठीत आला असावा. मुसलमानांच्या तवारिखा पाहून मराठ्यांनी बखरी लिहिण्याचा प्रघात पाडला असावा. शं. ना. जोशींना बखर हा पत्रकार वाटतो. डॉ. श्री. रं. कुलकर्णींनी वृत्तान्त या अर्थाने बखर हा शब्द आला असावा, असे म्हटले आहे. राज्यव्यवहार कोशात बखैर म्हणजे आख्यायिका अशी स्पष्ट नोंद आढळते. या सगळ्यांचा विचार करता बखैर–बखेर–बखर असा ‘बखर’ या शब्दाचा प्रवास झाला असावा, असे वाटते. बखैर हा फारसी

शब्द असला, तरी इतिहासकथेच्या संदर्भात मराठीने याला 'बखर' ही विशिष्ट अर्थच्छटा दिली. बखर हा मऱ्हाठमोळा शब्द झाला नि तो प्रचलित ठरला.

प्राचीन गद्य वाङ्मयात ऐतिहासिक कथा अथवा ऐतिहासिक व्यक्तिदर्शन म्हणून 'बखर' हा वाङ्मयप्रकार अस्तित्वात आला. याला पौराणिक मिथके जोडून पौराणिक बखरीही लिहिल्या गेल्या. मराठ्यांच्या ऐतिहासिक परंपरेचा एक सूत्रबद्ध आलेख बखरींमुळे मिळतो. ऐतिहासिक संदर्भातल्या सर्व कागदपत्रांना बखर समजण्याचे कारण नाही. इंग्रजी काळात मुद्रणाच्या शोधाने क्रांती झाली. परंतु पुराणकथा गद्यात छापल्या. त्यांना 'बखर' संबोधण्यात आले. बकासुराची बखर, चंद्रहासाची बखर, ही काही उदाहरणे. इतिहासाच्या साधनसंभारातले कैफियत, वाका, हकिकत, शकावली, करीना, तकरीर अशा विविधतेने नटलेल्या कागदपत्रांपेक्षा बखर वेगळी ठरली. शकावलीत मुसलमानी राज्यव्यवहारातली रोजनिशी आहे. ही लेखन परंपरा शिवाजीमहाराजांनी आपल्या राज्यव्यवस्थेत आणली. जेधे शकावली, सहा कलमी शकावली; पेशव्यांची शकावली इ. इ. यादी म्हणजे स्मरणार्थ टिपण उदाहरणार्थ छत्रपतींची १७७४मधील यादी. सवाई माधवरावांच्या खर्ड्याच्या स्वारीवरील मुक्कामाची यादी. करीना म्हणजे एखाद्या घराण्याने कोणकोणत्या ऐतिहासिक प्रसंगांत भाग घेतला याची हकिकत होय. उदाहरणार्थ जेधे यांचा करीना. हकिकतीत आंग्र्यांची हकिकत प्रसिद्ध आहे. कैफियत हीही एक प्रकारची हकिकत होय. या साऱ्यांचा समावेश बखरीत होत असला, तरी बखर हा स्वतंत्र लेखनप्रकार आहे.

## बखरींचे प्रकार

इतिहासविषयक गद्यलेखन या अर्थाने बखरींचा विचार केल्यास पुढीलप्रमाणे त्याचे स्थूल प्रकार पडतात. १) चरित्रात्मक बखर: ९१ कलमी बखर, सभासद बखर, चिटणीशी बखर, शिवदिग्विजय, श्रीशिवाजी प्रताप इत्यादी २) युद्धकथात्मक बखर: राक्षसतागडीची बखर, भाऊसाहेबांची बखर, पानिपतची बखर इ. ३) दौलतीची कथात्मक बखर: महिकावतीची बखर, पेशव्यांची बखर, होळकरांची कैफियत इत्यादी ४) स्फुट कथात्मक बखर: खर्ड्याच्या स्वारीची बखर, नारायणराव पेशव्यांची बखर इ. या वर्गीकरणातून बखर वाङ्मयाची विविधता दिसते. तरी शिवपूर्वकाल, शिवकाल आणि पेशवेकाल ही त्याची मर्यादा आहे.

बखरींचे लेखन राजाश्रयाने झालेले आहे. त्यामुळे बखरीत राजाज्ञांचे उल्लेख येतात. त्यांच्या अखेर फलश्रुती असते. अधूनमधून पौराणिक दाखले येतात. त्यामध्ये अद्‌भुतता असते. बखर वाङ्मयातील चरित्रनायक प्रत्यक्ष इतिहासातील असतात. त्यांचे पराक्रम अलौकिक आहेत, अशी बखरकारांची धारणा असते. ते ईश्वराचे अवतार आहेत, असे बखरकार मानतात. बखरीत राजकीय इतिहासाबरोबर तत्कालीन समाज आणि संस्कृती ह्यांचे दर्शन घडते. राजकीय इतिहासाचे सुसंगत कथात्मक निवेदन बखरीत असते. बखरीत आत्मनिष्ठ लेखन असते. हे लेखन ऐतिहासिक घटितांची संगती लावते. त्याला कथारूप देते. व्यक्तींच्या भावभावनांचे अंतरंग उलगडून दाखविते. त्याला एक स्वतंत्र घाट देते. बखरकार ऐतिहासिक काटेकोर नोंद घेण्याऐवजी तो ऐतिहासिक घटना निवडतो आणि त्यातून राजकीय काळाचा पट उलगडून दाखवितो. बखरींची आविष्कारपद्धती चरित्रपर, आठवणीपर, आख्यायिकापर अथवा एखाद्या युद्धप्रसंगपर असते. ती एखाद्या राजघराण्याचा विशाल पट उभा करते. यात चमत्कार येतात. संस्कृत-फारसीतील अभिजात साहित्यथाटाची भाषाशैली बखरीत असते. ऐतिहासिक चुका शक्य तो टाळून, उणिवा वगळून वाचकांच्या श्रद्धेला तडा न जाऊ देता बखरकार कौशल्याने व्यक्तिचित्रण करतो. पराक्रमी पुरुषांबरोबर स्त्रियांचे व्यक्तिदर्शन बखरीत येते. जिजाबाईंपासून आनंदीबाईंपर्यंतची अनेक स्त्रियांची चित्रणे बखरीत येतात. वीरत्वाची गरज भासली की, बखर जन्मते. बखरी केवळ पराक्रमाच्या गाथा नाहीत;

## शिवकालिन बखरी

त्यातल्या काही पराभवाच्या करुण कहाण्या आहेत. बहुतेक शिवचरित्रपर बखरींची निर्मिती मराठी सत्तेच्या उत्तरार्धात झाली आहे. उदा. कृष्णाजी अनंत सभासद ज्या

वस्तुनिष्ठ तटस्थतेने बखरलेखन करतो, ती तटस्थता पेशवेकालीन बखरीत कमी आढळते. चित्रगुप्त जेव्हा शिवचरित्रकथेचा विषय निवडतो, तेव्हा त्याच्यासमोर बखरीचे प्रारूप असते. यानंतर मल्हार रामराव चिटणीसांनी शिवचरित्रपर बखर लिहिली आहे. ही बखर इतिहासाचे अधिक वस्तुनिष्ठ तपशील देते. मराठीतील आख्यान परंपरेचा परिणाम यावर झालेला आढळतो. श्रीशिवाजी प्रताप बखरकार महाकाव्याच्या धर्तीवर बखर लिहू धजतात.

सभासदाच्या बखरीत (इ. स. १६९७) शिवाजी महाराजांचे व्यक्तित्व विविध अंगांनी मांडले आहे. चित्रगुप्त बखरीत (इ. स. १७६१) महाराजाचा आदर्श राज्यकारभार, त्यांचे कौटुंबिक भावजीवन, क्षात्रधर्माचे यथोचित पालन आदींचे वर्णन येते. यशवंतराव शिंद्यांच्या पदरी असलेला खंडोबल्लाळांचा पुतण्या रघुनाथ यादव चित्रे म्हणजे चित्रगुप्त होय. इ. स. १८२९च्या सुमारास सयाजीराव महाराज गायकवाडांच्या आज्ञेवरून 'श्री शिवाजीराव' ही बखर लिहिली गेली. इ. स. १७६०–१७७० या काळात ९१ कलमी बखर आली. हिचा कर्ता दत्ताजी त्रिमल वाकेनवीस हा होय. हा शिवाजी राजांच्या मंत्रिमंडळात होता. सातारच्या प्रतापसिंह महाराजांचा चिटणीस मल्हार रामराव याने इ. स. १८१० च्या सुमारास 'सप्तप्रकरणात्मक शिवचरित्र', 'मराठ्यांची बखर', 'इतर पाच छत्रपतींची चरित्रे' अशी दांडगी ग्रंथरचना केली. धाकट्या शाहू महाराजांच्या आज्ञेने मल्हार रामरावांनी 'सप्तप्रकरणात्मक शिवचरित्र' लिहिले. यातील निवेदन गतिमान आहे. वर्णनपद्धती चित्रमय आहे. राजांची बुद्धिमत्ता, गुणग्राहकता, दूरदृष्टी, मुत्सद्दीपणा या गुणांचे चित्रण या बखरीत होते. 'शिवदिग्विजय' बखरीत शिवाजीराजांच्या धर्माभिमानावर बखरकाराने अधिक लक्ष केंद्रित केले आहे. इ. स. १८०३ मध्ये 'भोसलेवंशचरित' ही बखर तंजावर येथील बृहदीश्वराच्या देवळातील शिलालिखित स्वरूपातील आहे. चोल देशाधिपती सरफोजीराजांच्या आज्ञेवरून बाबूराव चिटणिसांनी भोसले घराण्याचा सर्व इतिहास यामध्ये दिला आहे. यातला इतिहास तितका विश्वसनीय नाही. तंजावरकडील मराठी वळणाची बखर म्हणून हिचे महत्त्व आहे. शेडगावकर बखरीत सजणसिंहजी राणा शिसोदे वंश यांच्यापासून सातारकर छत्रपती प्रतापसिंह यांच्यापर्यंतचा भोसले घराण्याचा इतिहास आला आहे. या बखरीत शकसंवत्सरादी विपुल कालनिर्देश आहेत. 'लाख मरावे परंतु लाखांचा पालणारा कायम राहावा.' 'ज्याची जसी नेत (नियत) तसी त्यांस बरकत.' अशी आज वापरली जाणारी सुभाषिते यातली आहेत.

अशा या शिवकालीन बखरी आहेत. शिवरायांच्या कर्तृत्वाचा गौरव या बखरींत आहे. सभासद, चिटणीस यांसारख्यांना तत्कालीन राजकारणाचा परिचय होता. इतिहासातली वस्तुनिष्ठता बखरीत नाही. सत्याचा अपलाप बखरीत झाला, तरी बखरीतून तो काळ नक्की उभा राहतो.

बखरींचा विकास पेशवेकालात झालेला दिसतो. पेशवेकालात बखरींच्या वर्ण्यविषयात विविधता आली. इ. स. १७०८ ते १८१८ या काळात चरित्र–आत्मचरित्रपर, विशिष्ट प्रसंगपर, घराण्यांच्या हकिकती, कैफियती असे विविध प्रकार बखरीत आले. एका पानिपतच्या प्रसंगावर किमान आठ बखरी उपलब्ध आहेत. या शिवकाळापेक्षा काळातली साधने अधिक उपलब्ध झाल्याने या बखरी विश्वसनीय ठरल्या आहेत. शिवकालीन बखरींतली अद्‌भुतता किंवा दैवी चमत्कार या बखरींत नाहीत. यातील वर्णने वास्तव आहेत.

शाहू महाराजांच्या मृत्यूनंतर 'श्रुत करावें म्हणोन आज्ञापिल्यावरून' 'श्री शाहू महाराज यांची बखर' (इ. स. १७४९) तयार केली. गोविंद खंडेराव चिटणीस यांनी तोंडी सांगून ही बखर सिद्ध झाली. शाहू, बाजीराव–चिमाजी यांचे गुरू ब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकर यांच्या 'चरित्राची बखर' या सुमारास त्यांच्या शिष्यांपैकी कुणीतरी सांप्रदायिक आदराने लिहिली. यात चमत्कारकथा आहेत. पण यातली भाषा रसाळ आहे. समर्थ रामदासांचे ज्येष्ठ बंधू गंगाधर 'श्रेष्ठ' यांच्या नातवाच्या टिपणावरून तयार केलेली हनुमंतस्वामीकृत 'समर्थांची बखर' (इ. स. १७९३) ही महत्त्वाची बखर आहे. शिवराय–समर्थ भेटीबाबत या बखरीत चर्चा आढळते. समर्थ पंचायतनातले जयरामस्वामी वडगावकर यांच्या चरित्राची बखर (इ. स. १८०८–१८१३) या काळात येते.

## भाषासामर्थ्य

आत्मचरित्रपर बखरीत 'नाना फडणविसांचे आत्मचरित्र' विशेष महत्त्वाचे आहे. ते अपूर्ण आहे. माधवरावांना पेशवेपद मिळाल्याचा वृत्तान्त यात आहे. नानांच्या आयुष्यातला पूर्वार्ध आणि त्यांच्या कुळाची माहिती यात येते. 'गंगाधर शास्त्री पटवर्धन यांचे आत्मचरित्र' हेही वैशिष्ट्यपूर्ण आत्मचरित्र आहे. पटवर्धनांनी वयाच्या आठव्या वर्षी कारकुनीला आरंभ केला. त्यानंतर ब्रिटिश रेसिडेन्ट वॉकर याने त्यांना गायकवाड सरकारशी बोलणे करण्यासाठी नेमण्यापर्यंतचा वृत्तान्त त्यांच्या आत्मचरित्रात येतो. सवाई माधवरावांच्या नंतरची पेशवाईची हकिकत यात विस्तृत आणि सत्यरूपात लिहिलेली आहे.

प्रसंगपर बखरीत 'साष्टी उर्फ ठाण्याची बखर'; 'वसईचा दुईर धर्मसंग्राम' या बखरी येतात. यात चिमाजी अप्पांनी वसईसाठी फिरंग्यांशी जो यशस्वी धर्मसंग्राम केला तो आहे. साष्टीच्या बखरीत वसई प्रांत मराठ्यांनी काबीज केल्यानंतरची हकिकत आहे. यात गंगाजी नाईक हा वीरनायक आहे. यात उत्कृष्ट वर्णने आहेत. यातील फिरंग्यांच्या जुलमाचे वर्णन साक्षात डोळ्यांपुढे उभे राहते. गोपिकाबाईंच्या आज्ञेवरून रघुनाथ यादव चित्रगुप्ताने 'पानिपतची बखर' पानिपतच्या युद्धानंतर दोन वर्षांच्या आत लिहिली. यातल्या काही तिथ्या/तारखा इतिहासाशी जुळत नाहीत. तरीही माहीतगाराने त्याच काळात लगेच लेखन केल्याने यातील माहितीला काहीसे प्रामाण्य आलेले असावे. सदाशिवराव भाऊसाहेबांच्या क्षात्रधर्माचे दर्शन त्यांच्या उक्ती आणि कृती यांतून तेजस्वीपणे व्यक्त झाले आहे. 'संपूर्ण वसुंधरेचे राज्य करीन किंवा इंद्रपदीचे घेईन' या भाऊसाहेबांच्या उद्‌गारातली क्षात्रधारणा असाधारण आहे. पानिपतची बखर दुःख आणि अभिमान यांची धीरोदात्त सांगड घालते. दिल्लीच्या रोखाने चाललेला 'सेनासागर दिवसेंदिवस अधिक उचंबळत चालला.' भाऊसाहेबांनी जाराच्या व इराणीच्या वकिलाला ठणकावून सांगितले, ''आम्ही फरजंद लहान माणूस नहो....इराणींचा हिशेब कोण धरतो? आमचे खातरेत नाही.'' भाऊसाहेबांचा हळवेपणा, विश्वासरावावरील प्रेम, अपयशाची खंत यांचे प्रत्ययकारी चित्रण बखरीत येते. युद्धाच्या वेळी भाऊ 'कल्पांतीचा आदित्य' भासला. 'रामचंद्रासाठी भरताने अयोध्यापूर सोडून नंदीग्रामी राहून वैराग्यवत् उदास जाहले. तद्वत रावनानांनी आरंभिले.' हे वाचता-वाचता बखरकाराचे भाषासामर्थ्य कळते. वीर आणि करुण रसपूर्ण अशी ही बखर वैशिष्ट्यपूर्ण आहे.

पानिपतावर लिहिलेली 'काशीराजाची बखर' सुजाउद्दौला व मराठे यांच्यात मित्रत्व राखू पाहणाऱ्या काशीराज पंडित या वकिलाने लिहिली आहे. 'मराठे-दुराणी' युद्धाच्या दृष्टीने ही बखर विश्वसनीय मानतात. त्रिंबक सदाशिव पुरंदरेकृत 'भाऊसाहेबांची कैफियत' ही बखर राजवाडे ऐतिहासिकदृष्ट्या प्रमाण समजतात. कृष्णाजी श्यामरावांची 'भाऊसाहेबांजी बखर' सरस आहे. यातील शैली ओजस्वी आहे. उत्तरेतल्या राजकारणाची इत्थंभूत माहिती यात आहे. 'बचेंगे तो और भी लढेंगे' हे दत्ताजी शिंद्यांचे उद्‌गार प्रसिद्ध आहेत. यात कुंभेरीच्या किल्ल्याचे यथोचित वर्णन येते. 'तेणेकरून पृथ्वीस पालाण घातले'; 'तुमचे मागे अवघ्याच गोष्टी आटोपल्या.' ही अर्थपूर्णता या बखरीत आहे. 'होळकरांची थैली' ही होळकरांच्या बाजूने सादर केलेली पानिपतची हकिकत आहे. पानिपतच्या पराभवाचे दुःख यात विवेचिले आहे. पटवर्धन घराण्यावर मराठे-हैदरअल्ली यांच्या सावसीकुंदगोळच्या लढाईत जे अपयश आले, त्याची कहाणी 'पटवर्धनी वाका' या बखरीत आढळते. १७९५चे निजाम-मराठे यांतील मराठ्यांचा पराभव ही बोचणारी घटना आहे. तर खर्ड्याची लढाई ही मराठ्यांच्या विजयध्वजाची पताका आहे. याचे वर्णन 'खर्ड्याच्या स्वारीच्या बखरी'त आहे.

घराण्यांच्या इतिहासात 'नागपूरकर भोसल्यांची बखर', (काशीराव गुप्ते), 'मराठ्यांची बखर' (मल्हार रामरावांच्या मदतीने ही बखर ग्रन्ट डफने तयार केली), (कृष्णाजी विनायक सोवनी) 'पेशव्यांची बखर', 'हरिवंशाची बखर' (बाळकृष्ण हरिहर पटवर्धन), 'आज्ञापत्र' (रामचंद्रपंत अमात्य), थोरले संभाजी महाराज यांचे चरित्र, थोरले राजाराम महाराज चरित्र, मल्हार रामरावांचे 'राजनीती' हे एक प्रकरण आज्ञापत्राच्या विषयावरचे उल्लेखनीय आहे. असे विविध विषय आहेत.

याशिवाय मराठीतील ऐतिहासिक पत्रव्यवहार प्रचंड आहे. शिवाजीचे फौजेच्या अधिकाऱ्यास पत्र, शिवाजीचे व्यंकोजीस पत्र, 'पळ्याचे पारिपत्य करा–' असा आदेश देणारे पहिल्या बाजीरावाचे पत्र, होळकर-शिंदे यांच्या भांडणात मध्यस्थी करताना शिंदे यांची कानउघाडणी करणारे नानासाहेब पेशव्यांचे पत्र, निजाम दरबारचे वकील गोविंदराव काळे यांचे नाना फडणविसास पत्र अशी काही पत्रे उल्लेखनीय आहेत.

**अल्पाक्षररमणीयता**

बखर हा इतिहासाशी समांतर असा गद्य वाङ्मय ओघ आहे. तो विशिष्ट काळापुरता असला तरी काही वाङ्मयकृतींनी बखर ही त्याच्या भावार्थासकट ललित कलाकृतींच्या शीर्षकात स्वीकारली. उदा. बखर एका राजाची त्र्यं.वि.सरदेशमुख, अंताजीची बखर– नंदा खरे, इ. इ. ऐतिहासिक व्यक्तींच्या अलौकिकत्वाचे आकलन करताना त्यांच्यातली मानुषता बखरकारांनी आपापल्या सामर्थ्याने मांडली. बहुतांश बखरी इतिहासाशी वा ऐतिहासिक कालखंडाशी प्रतारणा करीत नाहीत. घटना आणि त्यांतील सूचक भावना यांचे अद्वैत बखरीत असते. बखरकार राजाश्रयी असल्याने तो आपल्या धन्याविषयी चांगलेच लिहिणार. पराभव लिहिताना तो पराभवाचे खापर नशिबावर फोडणार. लढाईत मरण पावलेला वीरनायक देवादिकांना दिसत नाही, तर मानवाला काय दिसणार? हा बखरकाराचा पलायनवाद ध्यानात येतो.

'ज्याची खावी पोळी, त्याची वाजवावी टाळी' या न्यायाने सर्व बखरकार वरवर नायकाला पूरक असे विश्लेषण करतात. मानवी वृत्ति-प्रवृत्तींचे द्वंद्व दाखवितात. चित्रगुप्ताच्या बखरीतील पत्नी व आई अशा द्विविध पातळ्यांवरील सईबाईचे चित्रण प्रभावी वाटते. मल्हार रामरावांच्या 'थोरले संभाजी महाराज' यांच्या चरित्रपर बखरीत आणि शिवदिग्विजय बखरीत सोयराबाईंची व्यक्तिरेखा बखरकार संशयास्पदरीत्या रेखाटतात. 'थोरले संभाजी महाराज' व 'राजाराम महाराज' या मल्हार रामरावांच्या बखरीतून महाराणी येसूबाईंचे स्वभावचित्रण नेटकेपणाने केलेले आढळते. 'शाहू महाराजांच्या बखरी'तील ताराबाई आणि सकवारबाईंची व्यक्तिरेखा हिमती आणि मनस्वी वाटतात. अहिल्यादेवी होळकरांचे कैफियतीतील संयत व्यक्तिचित्र आणि भाऊसाहेबांच्या बखरीतील मलकाजमानीचे शब्दचित्र ही अर्थपूर्ण आहेत.

अल्पाक्षररमणीयता हा बखरींचा ठळक विशेष आहे. व्यक्तिवर्णनातील दृक्प्रत्ययाने बखरीस वाङ्मयीन मूल्य प्राप्त होते. संस्कृतप्रचुर वस्तुनिष्ठ सांकेतिकता जशी बखरीत येते, तशी फारसी-मराठीतील मऱ्हाटमोळी सांकेतिकता व्यक्त होते. स्थलवर्णनांना वेगळे व्यक्तित्व लाभते. समुदायांची वर्णने प्रभावीपणे येतात. इतिहासातील पात्रप्रसंगांना बखरकार नवे रूप देतो नि ते आपल्या गुणदोषांसकट मर्यादित अवकाशात जाणीवपूर्वक जाणतेपणाने व्यक्त करतो.

* * *

# सामाजिक वाटचाल





## शाहिरी काव्य

■ डॉ. सतीश बडवे

**स्वराज्याकांक्षेच्या काळात शिवरायांच्या पराक्रमाने महाराष्ट्राचे वातावरण वेगळे भासू लागले. या काळात तलवारींचा खणखणाट आणि घोड्यांच्या टापा यांचे आवाजही प्रेरक ठरत होते. या पराक्रमाला साथ मिळाली ती 'कीर्तिकाव्या'ची. ढोलकी, संबळ, डफ या वाद्यांच्या साथीने पराक्रमाची गीते गायली गेली. अगिनदासाचा पोवाडा हा सर्वांत जुना पोवाडा आहे.**

शिवकालात जन्माला आलेली आणि पेशवेकाळात बहरलेली कविता म्हणून शाहिरी काव्याचा उल्लेख मध्ययुगीन वाङ्मयात प्रामुख्याने केला जातो. यादवकालीन वाङ्मयात शाहीर, गोंधळी, भट यांचे थोडेफार उल्लेख आढळतात. त्यामुळे तेव्हापासून ही कविता अस्तित्वात होती असे म्हटले, तर ते फारसे चुकीचे ठरत नाही. अच्युत बळवंत कोल्हटकर यांनी या काव्याला 'मराठी काव्याची प्रभात' असे संबोधले, तर विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनी या कवितेला मराठी भाषेची 'आद्य कविता' असे म्हटले. ही विधाने थोडी अतिशयोक्त आहेत.

म. ना. सहस्रबुद्धे यांनी तर या वाङ्मयाचे मूळ थेट वैदिक वाङ्मयापर्यंत नेलेले दिसते. प्र+स्तुती म्हणजे प्रशस्ती. याचाच अर्थ ठासून स्तुती करणे असा होतो. याला 'पोवाडा गाणे' असेही म्हटले जाते. इंद्राला सम्राटपदाचा अभिषेक झाल्यानंतर विश्वदेवांनी 'अभ्युत्क्रोश' केला हे ऐतरेय ब्राह्मणातले वर्णन म्हणजे इंद्रस्तुती

करणारा इंद्राचा पोवाडाच होता. यादवकाळातही असे उल्लेख सापडतात. उदा.'निवृत्ति मुक्ताबाई चांगदेव गाढा। हरिचा पवाडा झेलताति' किंवा 'तुव संग्रामी हरू जिंकिला। पवाडा तुवा केला, गंधर्वासी' हे ज्ञानेश्वरकालीन उल्लेख लक्षणेने पराक्रमाचे वर्णन करणारी रचना या अर्थाने घेता येतात. थोडक्यात स्तुतीपर कवनरचनेची परंपरा मौखिक वाङ्मयात व लिखित प्राकृत-अपभ्रंशातही असणार असे म्हणण्यास वाव मिळतो.

स्वराज्याकांक्षेच्या काळात शिवरायांच्या पराक्रमाने महाराष्ट्राचे वातावरण वेगळे भासू लागले. या काळात तलवारींचा खणखणाट आणि घोड्यांच्या टापा यांचे आवाजही प्रेरक ठरत होते. या पराक्रमाला साथ मिळाली ती 'कीर्तिकाव्या'ची. ढोलकी, संबळ, डफ या वाद्यांच्या साथीने पराक्रमाची गीते गायली गेली. अगिनदासाचा पोवाडा हा सर्वांत जुना पोवाडा आहे. जिजाबाईंच्या सांगण्यावरून अफझलखानाच्या वधावरचा हा पोवाडा इ.स. १६५९ ला लिहिला गेला. तुळसीदास शाहिराने तानाजीचा पराक्रम प्रत्यक्ष पाहून 'शूर मर्दाचा पोवाडा, शूर मर्दाने ऐकावा' असे म्हटले आहे.

शिवकालीन चार पोवाडे, शाहूकालीन तीन पोवाडे, पेशवेकालीन सुमारे दीडशे पोवाडे व अन्य पोवाडे अव्वल इंग्रजी काळातले आहेत. सुमारे तीनशे पोवाडे आज उपलब्ध होऊ शकतात. शाहिरांच्या या रचना कोणाच्या तरी आज्ञेवरून झाल्याने त्या स्वयंस्फूर्त आहेत, असे म्हणता येत नाही. अगिनदास, तुळसीदास आणि यमाजी हे शिवाजी-बाजी यांचे आश्रित तर अनंतफंदी हा पेशवेदरबाराचा भाट होता. या शाहिरांना त्यांच्याकडून इनामे मिळालेली दिसून येतात. मराठ्यांच्या लौकिक जीवनातील सुखदुःखांचे क्षण, उत्कर्ष व अवनती, विजयाचा आनंद, अपयशाचे दुःख, गतवैभवाच्या स्मृती यांविषयीच्या प्रांजळ प्रतिक्रिया त्यांच्या पोवाड्यांतून व्यक्त होताना दिसतात.

संतपरंपरेतील शृंगारिक गौळणी, विरहिणी, पंडित कवींची राधा-कृष्णविलासाची आख्याने, कृष्ण-गोपींच्या क्रीडा यांच्याशी नाते सांगणारी लावणी विविध प्रकारची आहे. आध्यात्मिक, भक्तिपर अशाही स्वरूपात लावणी आढळते. पण तिचा खरा नवरा शृंगाररसात अधिक रंगतो. प्रपंचलालसा आणि भोगेच्छा यांचे उत्कट दर्शन लावणीकारांनी घडविले. लावण्यगीत हे लावणीचे खरे रूप. पण शृगांरासमवेत वैराग्यपर व आध्यात्मिक विचारही लावणीतून व्यक्त झालेले दिसतात.

काही ठळक व प्रमुख शाहीर पुढीलप्रमाणे आहेत –

### रामजोशी

सोलापूरचे रहिवासी असलेल्या रामजोशी यांनी बाळा पाध्ये यांच्याकडे अध्ययन केले होते. शाहिरांमधील पंडित अशी त्यांची ख्याती होती. स्वतःला 'कविराय' म्हणविणाऱ्या रामजोशींच्या लावण्यांत नायक-नायिका, विलास, रासक्रीडा यांची वर्णने येतात. 'सुंदरा मनामधि भरली', 'कोण्या ग सुभगाची मदनमंजिरी' या त्यांच्या लोकप्रिय लावण्या आहेत. संस्कृतप्रचुर, अलंकारिकता यांनी नटलेल्या त्यांच्या लावण्यांत कल्पकता व भाषाप्रभुत्व यांचा संगम आढळतो.

'भला जन्म हा तुला लाभला' या सारख्या उपदेशपर लावण्याही त्यांनी लिहिल्या. छेकापहनुतीमधील राधा व तिची सखी यांच्यातील संवादामध्ये त्यांच्या रसिकतेची साक्ष पटते. याशिवाय दुष्काळाची स्थिती, पेंढाऱ्यांची लुटालूट यांवर त्यांनी पोवाडे लिहिले होते. मोरोपंतांच्या सांगण्यावरून त्यांनी उतारवयात कीर्तनेही केली.

### अनंतफंदी

नगर जिल्ह्यातील संगमनेर येथील या ज्येष्ठ कवीने 'चंद्रावली'ची लावणी लिहिली. पूर्वजांचा धंदा गोंधळ घालण्याचा होता. तरुणपण उनाडक्या करण्यात गेलेले, पण तेव्हापासूनच काव्यरचनेचा छंद त्यांना होता. तमाशाचे फडही त्यांनी चालविले. कटाव, फटके, लावण्यांची रचना त्यामुळेच त्यांनी केली.

अहिल्याबाई होळकरांच्या सांगण्यावरून त्यांनी तमाशाचा पेशा सोडला व कीर्तने केली. 'माधवनिधन' हे काव्य लिहिणाऱ्या या शाहिराने खर्ड्याच्या लढाईवर प्रसिद्ध पोवाडा लिहिला आहे. बाजीरावावरील त्यांच्या पोवाड्यात "... घडीत व्हावी सौम्य मुद्रा" घडीत यावा

कोप रूद्रा। घडीत घ्यावी क्षणैक निद्रा। स्वेच्छाचारी प्रभु हा।।'' असे बाजीरावाचे दोषही त्यांनी स्पष्टपणे नोंदवले. त्यांच्या काही लावण्या भडक व उत्तान आहेत. पण त्यांची बिकट वाट वहिवाट नसावी। धोपट मार्गा सोडू नको... कष्टाची बरी भाजी भाकरी तूपसाखरेची चोरी नको' यासारखी फटक्यांची रचना मात्र चांगली आहे. वाङ्‌मयीन कलात्मकता त्यात कमी प्रमाणात आढळते.

**प्रभाकर**

रत्नागिरी जिल्ह्यातील मुरूड गावात जन्मलेल्या प्रभाकर दातार पुण्यातला रास्त्यांकडे कारकुनीचे काम करीत होता. पुण्याच्या चैनी व विलासी वातावरणातच त्याने पोवाडे व लावण्या लिहिल्या. गंगू हैबती, महादबा सुतार यांनी त्याची कवने गायली.

तमासगिरांचे जे फड त्या काळी होते, त्यांचा कवी म्हणून त्याला मान्यता होती. अन्य शाहिरांपेक्षा त्याची लावणी अधिक उत्तान व भडक आहे. शृंगारिक शरीरचेष्टा, पतिपत्नीच्या नात्यातील विलासवर्णने आणि ढंगदार शब्दरचना ही प्रभाकराच्या रचनेची वैशिष्ट्ये. सवाई माधवरावांच्या कारकिर्दीवरील त्याचा 'रंगाचा पोवाडा' प्रसिद्ध पावला. नाना शंकरशेठ, स्प्रिंगलसाहेब, पेसानजी शेठ यांच्यावरही त्याने पोवाडे लिहिले. रसिकांसाठी कवने रचणारा हा कवी आहे.

**परशराम**

सिन्नर तालुक्यातील (जि.नाशिक) वावी गावच्या शिंपी समाजातील हा कवी. पेशवे सरकारचे वतन नाकारणाऱ्या या गंगाथडीच्या शाहिराने 'सुईदोऱ्याला हयात असू द्या। तेचि इनाम मोकासा। चैनीखातर आम्ही राया। पडलो नाही या फंदात' असे निःस्पृहपणे सांगितलेले आढळते. या विठ्ठलभक्त शाहिराने संतकवितेचा अभ्यासही केला होता. विठोबाखली यांच्या आदेशावरून त्याने लावण्या लिहिल्या. बाबा सातभाई, मलुराज, बाकेराव या तमाशाच्या धंद्यातील लोकांनी त्याच्या लावण्या लोकप्रिय बनविल्या. बडोदे, इंदौर, ग्वाल्हेर या संस्थानांमध्ये मुलूखगिरी करून आलेल्या या शाहिराने देशस्थितीवर तीन पोवाडे रचले आहेत. इंग्रजी राजवटीतील स्थित्यंतराविषयी उद्वेगजनक वर्णन त्यात केले आहे. पौराणिक व आध्यात्मिक विषयांवरील त्याच्या लावण्या संतांच्या 'सौदी', 'कुंटण' या रूपक परंपरेत समाविष्ट होतात. तुकारामासारखी प्रासादिक व प्रभावी रचना करणाऱ्या या शाहिराने पेशवाईच्या दुरवस्थेचे प्रभावी वर्णन केले आहे.

**सगनभाऊ**

जेजुरीला राहणारा, हत्याराला धार लावण्याचा म्हणजेच शिकलगारीचा धंदा करणारा हा कवी धर्माने मुसलमान होता. बाजीरावाच्या काळातील रामा गोंधळी याने सगनभाऊंच्या लावण्यांना लोकप्रियतेच्या शिखरावर नेले. होनाजी गवळ्याच्या प्रतिस्पर्धी गटाचा हा शाहीर रावळांच्या फडासाठी रचना करीत असे. पेशवाईतील मराठी वीर, संत, हिंदू दैवते, तीर्थक्षेत्रे-धर्मक्षेत्रे यांच्याविषयी या मुसलमान संतकवीने आदरपूर्वक रचना केलेल्या दिसतात. याच्या लावणीतील शृंगार संयमशील आहे. खडकीच्या लढाईनंतर तो सातारला छत्रपतींच्या आश्रयास गेला. बाजीरावाच्या पलायनानंतर पुण्याची केविलवाणी अवस्थाही त्याने वर्णिली आहे.

**होनाजी बाळा**

पुणे प्रांतातील हा कवी सगनभाऊशी कलगीतुऱ्याचे सामने करण्यासाठी जसा प्रसिद्ध होता, तसाच तो 'घनश्याम सुंदरा श्रीधरा अरुणोदय झाला' या भूपाळीने आजही सर्वपरिचित आहे. सात्त्विक आणि श्रद्धायुक्त रचना हे त्याचे वैशिष्ट्य.

तो शाहिरी घराण्याचा वारसा सांगणारा कवी आहे. त्याचे आजोबा सातप्पा शिलारखाने हे पेशव्यांचे आश्रित व तमासगीर. चुलता बाळा हाही प्रसिद्ध लावणीकार होता. होनाजीलाही पेशव्यांचा आश्रय होता. सरकारवाड्यासमोर तमाशा करण्यासाठी त्याला वर्षाकाठी तीनशे रुपये वर्षासन मिळत असे. पेशवाई बुडल्यावर बडोदेकरांनीही त्याला वर्षासन चालू ठेवले होते. मारेकऱ्यांनी खून केल्याने त्याचा अंत झाला. त्याने पाच पोवाडे रचले. त्यातील तीन

बाजीरावावरील आहेत. यानेही 'रंगाचा पोवाडा' लिहिला. बाजीरावावरील त्याच्या लावण्या ढंगदार आहेत. मधुर आणि सुलभ रचना, शब्दलालित्य यामुळे त्याने लावणीला रागदारीच्याही सुरात बसवले. बाळा करजकर त्याच्या लावण्या गात असे. 'लटपट लटपट तुझं चालणं मोठ्या नखऱ्याचं। बोलणं गं मंजुळ मैनेचं' हे मराठी माणसांच्या मनातलं गीत म्हणजे होनाजीचीच लावणी आहे. ख्याल, टप्पे गाणाऱ्या कलावंतिणींही बैठकीमध्ये होनाजीच्या लावण्या पेश करीत. यावरून त्याच्या लोकप्रियतेची कल्पना येऊ शकते.

अध्यात्मभावाबरोबरच समाजस्थितीचे वास्तव दर्शन घडविणाऱ्या लावणीकारांचे कार्य मराठी वाङ्मयात महत्त्वाचे आहे. शाहिरांमध्ये सर्व जातींच्या व सर्व पेशांच्या लोकांचा समावेश झालेला दिसतो. अनेक थरांतील लोकांनी निर्माण केलेले हे वाङ्मय असल्याने, ते मराठी मनाचे प्रातिनिधिक दर्शन घडविणारे आहे. शाहीर कलागुणसंपन्न होते. त्यांची भाषा तालबद्ध व खटकेबाज होती. ठसकेबाजपणा व मराठी बाणा म्हणूनही ही शाहिरी कविता लोकप्रिय आहे. डफावर थाप पडली की मराठी माणसांचा ऊर अभिमानाने भरून येतो आणि घुंगरांच्या तालावर पावलं थिरकली की मराठी माणसाचे काळीज घायाळ होते. अशी ही पोवाडे-लावण्या लिहिणाऱ्यांची मराठी परंपरा आजही सर्वांना आकर्षित करणारीच आहे.

* * *







एलिफंटा लेणी येथील अंधकासुरवध.

> **अनेक हिंदू व जैन लेणी आजही वापरात आहेत. अबाधित धार्मिक परंपरेमुळे तेथे आजही त्या-त्या देवतांची पूजा होते. परंतु बौद्ध लेण्यांचे काय? अनेक शतकांपूर्वी भारतातून बौद्ध धर्म उत्थापित झाला होता. या लेण्यांमध्ये अनेक लोकदेवता वसल्या; जसे कल्याला एकवीरा, लेण्याद्रीला विनायक, विरारची जिवदानी, जुन्नरची तुळजा, चौलची हिंगुळजा एक ना दोन. अनेक बौद्ध लेणी शेवटी नाथसंप्रदायाच्या प्रभावाखाली आली. पन्हाळेकाझीसारख्या काही लेण्यांनी त्याच्या खुणा बाळगल्या तर अनेक लेणी नाथसिद्धांच्या समाधीमध्येच हरवून गेली.**

# गिरिशिल्पे-लेणी

**■ डॉ. सूरज पंडित**

महाराष्ट्राच्या स्थापत्य वारशाचे दोन ठळक पैलू म्हणजे लेणी आणि गड-किल्ले. महाराष्ट्राच्या सांस्कृतिक घडणीमध्ये त्यांचे मोलाचे योगदान आहे.

भारतामध्ये अंदाजे १२०० लेणी आहेत. त्यांपैकी ७५% लेणी महाराष्ट्रात आहेत. याचे प्रमुख कारण म्हणजे महाराष्ट्राची भौगोलिक घडण आणि ऐतिहासिक पार्श्वभूमी.

येथील अग्निजन्य खडकापासून तयार झालेल्या पठाराच्या स्तरयुक्त घडणीमुळे हा भूभाग लयन स्थापत्यासाठी आदर्श आहे. लयन स्थापत्यामध्ये पाषाणस्तर कोरून पोकळी निर्माण केली जाते. यासाठीच अशा स्तरयुक्त रचनेचे महत्त्व अनन्यसाधारण आहे.

भारतातील सर्वांत प्राचीन मानवनिर्मित लेणे हे बिहारमध्ये सापडले आहे. गयेजवळील बाराबर डोंगरात कोरलेली ही लेणी 'आजीवाक'



पन्हाळेकाझी लेणी, महाचंद्ररोशन.

सुरुवातीलाच काही महत्त्वाच्या मुद्यांविषयी चर्चा करणे गरजेचे आहे. त्यापैकी एक म्हणजे लयन स्थापत्याचा उगम कसा झाला. या बाबतीत दोन विचारप्रवाह पाहायला मिळतात. काही विद्वान असे मानतात की, मौर्य काळात पर्शियाच्या राजघराण्याशी व संस्कृतीशी भारतीयांचा संपर्क झाला आणि यातूनच भारतीय कला-स्थापत्यावर अनेक संस्कार झाले. त्यांपैकीच एक म्हणजे लयन स्थापत्य होय. तेथील लेणी ही भारतातील लेण्यांपेक्षा प्राचीन असली, तरी त्यांची घडण आणि प्रयोजन पूर्णपणे वेगळे आहे. दुसऱ्या गटातील विद्वान प्रामुख्याने लयन स्थापत्याच्या भारतीय उगमाचा पुरस्कार करतात. भारतातील, प्रामुख्याने दख्खन आणि दक्षिण भारतातील महापाषाणीय संस्कृतीच्या लोकांना दगड फोडण्याची तसेच त्यांच्या मृत पूर्वजांसाठी गुहाश्रय बनवण्याची कला ज्ञात होती, हे पुरातत्त्वीय अवशेषांवरून स्पष्ट होते. कदाचित यातूनच भारतीय लयन स्थापत्याची सुरुवात झाली असावी. काही विद्वान असेही मानतात की, भारतातील इतिहासपूर्वकालीन गुहांमधून पुढे इतिहासकालीन लयन स्थापत्याची उत्क्रांती झाली असावी.

संप्रदायाला दान दिलेली आहेत. त्यांच्या तौलनिक अभ्यासावरून आणि पुराभिलेखीय पुराव्यांच्या आधारे त्यांची घडण मौर्य काळात इ.स.पूर्व ३ऱ्या शतकात झाली असावी, असे मानले जाते. येथूनच पुढे लयन स्थापत्याचा विकास झाला. यापूर्वीही मानव नैसर्गिक गुहांमध्ये राहत होता. हळूहळू त्या नैसर्गिक गुहाश्रयांमध्ये मानवाने लहान-सहान बदल करण्यास सुरुवात केली. याची अंतिम परिणती संपूर्णपणे मानवनिर्मित अशा लयन स्थापत्यामध्ये झाली. महाराष्ट्रातील लेणी प्रामुख्याने ३ प्रकारांत विभागली जातात. बौद्ध लेणी, हिंदू लेणी आणि जैन लेणी.

एक गोष्ट मात्र निश्चित की, इतिहासकालीन लेण्यांचा आणि नागरीकरणाच्या परिपूर्णावस्थेचा संबंध जवळचा आहे. महाराष्ट्रात नागरीकरण आणि लयन स्थापत्य यांचा प्रसार एकत्रच झाला. महाराष्ट्रात इतिहासपूर्वकालातही मानव राहत होता. प्रागैतिहासिक काळातील मानवी वसाहतींचे अवशेषही मिळालेले आहेत. परंतु इतिहासकाळात उत्तरेतील नागरीकरणाचे वारे प्रथम उत्तर कोकण आणि विदर्भ येथेच शिरले. महाराष्ट्रातील लयन स्थापत्याच्या उगमाचा संबंध हा सातवाहन राजघराण्याच्या उदयाशी बऱ्याचदा जोडला जातो. परंतु असे मानण्याचे कोणतेही स्पष्ट कारण दिसत



पन्हाळेकाझी लेणी, नाथ संप्रदाय गुंफा.

नाही. उत्तरेतून येणाऱ्या व्यापारी आणि बौद्ध भिक्षूंनी या लयन स्थापत्याचा पाया घातला असावा. मौर्य काळात राजाश्रयामुळे पसरलेल्या बौद्ध मतास महाराष्ट्रात फार मोठ्या प्रमाणावर लोकाश्रय मिळाला. त्यांनीच अनेक दाने देऊन ही लेणी खोदून घेतली. जरी सातवाहन राजवंशाच्या सुरुवातीच्या काळापासून अनेक राजांनी बौद्ध लेणी खोदण्यास दाने दिली असली, तरीही सातवाहन राजवंशाच्या उदयामुळे महाराष्ट्रातील लयन स्थापत्याची सुरुवात झाली; असे म्हणणे योग्य ठरणार नाही. आपण असे म्हणू की, त्यांच्या या कृत्याने महाराष्ट्रातील लयन स्थापत्याच्या विकासाला चालना मिळाली.

## महाराष्ट्रातील बौद्ध लेणी

मौर्यपूर्वकाळातच महाराष्ट्रात बौद्ध धर्माची ओळख झाली होती, असे म्हणण्यास वाव आहे. सम्राट अशोकाने बौद्ध धर्माच्या प्रचारासाठी जे विशेष प्रयत्न केले, त्यात भिक्षू धर्मरक्षीत आणि भिक्षू यवन धर्मरक्षीत या दोघांना अनुक्रमे 'महाराष्ट्र' आणि 'कोंकण' येथे पाठवण्यात आल्याचे उल्लेख आहेत. हे प्रदेश बहुतेक पौनी व सोपारा हे असावेत. येथे भिक्षू संघाचा पाया घातला गेला आणि यातूनच पुढे लयन स्थापत्याची सुरुवात महाराष्ट्रात झाली.

महाराष्ट्रात साधारणतः ९०० बौद्ध लेणी आहेत. ही लेणी का खोदली, कोणी खोदली, कोणी खोदवली आणि कशी खोदली यांचा थोडा विचार होणे गरजेचे आहे.

थेरवाद बौद्ध मतानुसार भिक्षूंनी एकाच ठिकाणी कायम वास्तव्य करू नये. फक्त वर्षा ऋतूत एके ठिकाणी निवास करावा. याचमुळे सुरुवातीच्या काळातील लेणी ही 'वर्षावास' स्वरूपाची होती. यांची घडण अत्यंत साधी असून यांच्या परिसरात कोठेही जलसाठ्याची व्यवस्था नसे. नंतरच्या काळात मात्र निदान काही भिक्षू तरी कायम स्वरूपी निवास करू लागले. यामुळे लेण्यांचे स्थापत्य बदलले. पूर्वी एकटी-दुकटी विखुरलेली लेणी आता समूहाने दिसू



अंजनेरी जैन गुंफेचा अतर्भाग.

लागली. त्यांच्या रचनेत आणि आखणीत एक सुसूत्रता आली. इतकेच नव्हे तर आता कायमस्वरूपी जलस्रोत आणि जलसाठा यांचा विचार होऊ लागला. यातही दोन प्रकारचे भिक्षू आणि भिक्षू संघ होते. ते म्हणजे ग्रामवासी आणि अरण्यवासी. आजपर्यंत ज्ञात असलेल्या लेण्यांमध्ये बेडसा येथील लेणी ही 'अरण्यवासी' भिक्षुसंघाची लेणी असावीत असे पुराभिलेखीय पुराव्यांवरून वाटते. या लेण्यांसाठी समाजाच्या सर्व स्तरांतून दाने येत होती. राजघराणी, मंत्री-अमात्य, राजकीय अधिकारी असा राजाश्रय तर व्यापारी, ब्राह्मण अथवा समाजाच्या अनेक स्तरांतून पुढे येऊन दान देणाऱ्या स्त्रिया असा लोकाश्रय या भिक्षुसंघांना होता. भिक्षू संघांच्या गरजेनुसार लेण्याची प्राथमिक आखणी होत असे. स्थपती व लेण्याचे अधिकारी साधारण खर्चाचा अंदाज बांधत. यानंतर दानकर्त्यांकडून धन गोळा केले जाई. आणि शेवटी भिक्षुसंघातील काही भिक्षूंच्या देखरेखीखाली स्थपती काम सुरू करत असे.

लेणी खोदण्याचे मुख्य काम स्वतः भिक्षू अथवा स्थपती करत नसत. कामगार-कारागिरांचे काही गट या कामी कार्यरत असत. आखलेल्या विधानानुसार कारागीर वरून-खाली आणि बाहेरून आत असा डोंगर फोडत. पहिला समूह दगड फोडून त्याचे मोठे तुकडे बाहेर काढण्याचे काम करी. यांच्या कामात कोणताही स्थापत्य-विशेष निर्माण करण्याचे कसब नसे. त्यांनी सोडलेले दगडी ठोकळे अथवा चौकोन दुसऱ्या समूहाच्या छिन्नी हातोड्यांच्या घावांमुळे स्तंभ, दरवाजे, खिडक्या अशा स्थापत्य घटकांचा आकार घेत. तिसरा समूह या सर्वांवर अलंकरण करे. जर या लेण्यांत मुलामा देऊन चित्रे काढायची नसली, तर हा पृष्ठभाग सपाट करून त्याला झिलई दिली जाई. अन्यथा त्या मुलाम्यावर चित्रण व रंगकाम केले जाई. अशा प्रकारे फारच थोड्या अवधीत लेणे बनवले जाई.

या कारागिरांकरता शिलालेखांत 'शेलवढकी' असा शब्द वापरला आहे. त्या काळी विविध माध्यमांत काम

करणारे कारागिरांचे समूह असावेत. सुरुवातीची लेणी ही बांधीव स्थापत्याची दगडात कोरलेली प्रतिकृती भासतात ती कदाचित याचमुळे. मग असाही एक प्रश्न पडतो की, ती माणसे घरे बांधायची सोडून लेणी खोदायला का लागली? या प्रश्नाची अनेक उत्तरे अनेक विद्वानांनी दिलेली आहेत. लेणी ही उन्हाळ्यात थंड आणि हिवाळ्यात उबदार असतात. ही लेणी चिरकाल टिकतात आणि त्यांच्या डागडुजीवर खर्च कमी येतो. दानकर्त्यामधील एक विशिष्ट भावना शिलालेखात परिवर्तित होते, ती म्हणजे दिलेले दान जोपर्यंत वापरात आहे, तोपर्यंत त्याचे पुण्य मिळत राहते. त्यामुळे दानकर्ते लेण्यांकरता दान देण्यासाठी सरसावले असावेत. लेणी खोदणे हे जास्त कष्टाचे, वेळ खाऊ आणि कदाचित अधिक खर्चाचे काम असावे. या लेण्यांच्या परिसरात अनेक बांधीव वास्तूंचे अवशेष पाहायला मिळतात, ते कदाचित मुळे याच तिसरे महत्त्वाचे कारण म्हणजे येथील भिक्षुसंघाची आदर्श आणि शिस्तबद्ध व्यवस्थापन पद्धती. ही पद्धती विश्वासार्ह तर होतीच परंतु पारदर्शकही होती.

जसजसा भिक्षुसंघाचा विकास होत गेला, तसतसे लयन स्थापत्यात बदल घडत गेले. महाराष्ट्रातील बौद्ध संघाचा विकास हा फारच रंजक आहे. भारतातील बौद्ध मताच्या विकासात येथील भिक्षूंचे फार मोठे योगदान आहे. श्रावकयान ते बोधिसत्त्वयान आणि बोधिसत्त्वयान ते मंत्रयान हा प्रवास व त्यांतील स्थित्यंतरे बौद्ध लयन स्थापत्यांतही दिसतात. कारण बौद्ध मत त्यातील मताचार, तत्त्वाचार हे या बौद्ध लयन स्थापत्याचा आधार आहे.

सुरुवातीच्या काळात भिक्षुसंघ खऱ्या अर्थी 'भिक्षुसंघ' होता. हळूहळू यात बदल घडून येऊ लागले. आणि हा भिक्षुसंघ 'अध्ययन' केंद्र बनला. त्यांचा सुरुवातीस स्थानिक समाजावर बराच पगडा होता, परंतु जसजसा हा भिक्षुसंघ लोकाभिमुखतेकडून 'अंतर्मुख' होऊ लागला; त्याचे जनमानसातील स्थान ढळू लागले. याच काळात कान्हेरीसारख्या मोठ्या भिक्षुसंघाचे 'विद्यापीठ' झाले. परंतु इ. स. च्या ६ व्या शतकानंतर काही महत्त्वाचे लयन समूह सोडल्यास तेथे वास्तव्य करणाऱ्या भिक्षुसंघांचा अस्त झाला. वेरूळ, कान्हेरी आणि पन्हाळेकाझी यांसारख्या भिक्षुसंघांची यापुढची वाटचाल मंत्रयान किंवा तांत्रिक बौद्ध मताकडे होऊ लागली. सुदूरच्या पूर्वेकडील बौद्ध संघांशी त्यांचे संबंध वाढू लागले.

**बौद्ध लयन स्थापत्याचे प्रकार व कालक्रम**

बौद्ध लेण्यांचे मुख्यत्वे दोन प्रकार पडतात.

१) चैत्यलेणी : ही प्रार्थनास्थळे असून त्यांत मोठ्या मंडपाच्या एका टोकाला 'स्तूप' असतो. याच स्तूपाची येथे पूजा केली जाते. या मंडपांचा वापर धार्मिक प्रवचने देण्यासही होत होता. यांचे प्रमुख तीन उपप्रकार पडतात. ते म्हणजे–

अ) चापाकार विधानाचे चैत्य.

आ) आयताकार विधानाचे चैत्य.

इ) वर्तुळाकार विधानाचे चैत्य.

या प्रत्येकाचे 'स्तंभासहित' आणि 'स्तंभविरहित' असे दोन प्रकार आहेत.

२) विहार : विहार या भिक्षूंच्या राहण्याच्या खोल्या असून थेरवादी विहारांचे डॉ. नागराजू यांनी दोन प्रकारांत वर्गीकरण केले आहे. त्याचे प्रकार व उपप्रकार पुढील प्रमाणे :

१) एकच खोली असलेला विहार

अ) समोरचा भाग खुला असलेल्या चौरस आणि आयताकृती खोल्या.

आ) मुख भिंती आणि दरवाजाने युक्त असलेल्या खोल्या.

इ) असाच दरवाजा आणि ओसरी असलेल्या खोल्या.

ई) ओसरीयुक्त दालनाला लागून असलेली अरुंद व खोल कक्ष.

२) अनेक खोल्या असलेले विहार.

अ) ओसरीच्या मागे असलेली खोल्यांची ओळ.

आ) मोठ्या खुल्या दालनाभोवती खोल्या असणे.

इ) ओसरीयुक्त मोठ्या दालनाभोवती खोल्या असणे.

याशिवाय या दोन्ही मुख्य प्रकारच्या एकत्रीकरणातून आपणास 'चैत्य-विहार' प्रकारची लेणीही पाहायला मिळतात. यात ओसरीयुक्त मोठ्या दालनाभोवती खोल्या असलेल्या विहाराच्या मागील भिंतीत एक कक्ष खोदून त्यात

स्तूप अथवा मूर्ती बसवलेली असते. याशिवाय या लेणीसमूहांत आपल्याला 'मंडप', पाण्याची टाकी अथवा 'पोढी', बसण्याची बाके असे अनेक प्रकारचे स्थापत्य पाहायला मिळते.

या लेण्यांच्या कालक्रमाचा विचार करताना प्रथम एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे, ती म्हणजे चैत्यांचा कालक्रम हा जरी प्रातिनिधिक असला; तरी विहारांच्या कालक्रमाचा विचार केल्याशिवाय लयन स्थापत्याच्या विकासाची पूर्ण कल्पना येणार नाही. गेल्या शतकात विद्वानांनी त्यांना उपलब्ध असलेल्या सामग्रीच्या आधारे एक अध्ययन पद्धती निश्चित करून प्रथम चैत्यांचा कालक्रम लावला. यावरून त्यांनी एक गृहीतक मांडले, ते असे- 'लयन स्थापत्याचा विकास एकसंध नसून त्याच्या विकास-टप्प्यांमध्ये काही ठहराव आहेत.' याच्याच आधारे विहारांचा कालक्रम मांडला गेला. आज आपणास ज्ञात असलेल्या लेणीसमूहांच्या अध्ययनातून असे 'ठहराव' नसल्याचे स्पष्ट झाले आहे. या लेण्यांच्या कालक्रमाचा विचार आपण पुढील तक्त्यात ३ पातळ्यांवर करू.

१) लेणी समूहातील चैत्याचा काळ.

२) लेणी समूहातील विहार खोदण्यास लागलेला काळ.

३) भिक्षुसंघाचा कार्यकाळ.

बरेचदा या तिन्हीची गफलत होते. लेणी खोदून झाल्यानंतरही अनेक वर्षे तेथे भिक्षुसंघ कार्यरत असतो. यामुळेच भिक्षुसंघाच्या अस्ताचा काळ ठरवणे बरेचदा कठीण जाते. (लेण्यांच्या कालक्रमासाठी बाजूच्या पानावरील तक्ता पाहावा.)

याशिवाय पश्चिम महाराष्ट्र, मराठवाडा आणि कोंकण प्रांतात आगाशिव, आंबिवले, खेड, गोमाशी, चौल, पाटण, पातूर, पोहाळे, येरफळ, शिरवळ आणि खडसांबडे अशा अनेक लेणी आहेत. तसेच विदर्भामध्ये चांडाळ, सातभोकी गुहा, गारपैली, जागीनकोपची लेणी, वैनगंगा काठची कोरंभाची लेणी, मोहाडीची लेणी, रामटेकच्या गुहा आणि भांदकची विजांसन लेणी असे अनेक ज्ञात-अज्ञात समूह आहेत. यांचा शास्त्रशुद्ध अभ्यास होणे गरजेचे आहे.

इ.स.च्या ६व्या-७व्या शतकापासूनच महाराष्ट्रातून बौद्ध धर्म नामशेष होण्यास सुरुवात झाली. त्याचबरोबर ही लेणी ओस पडू लागली. नंतरच्या काळात तेथे लोकदेवतांनी निवास केला आणि त्यांचे पावित्र्य राखले. वेरूळसारख्या एखाद्याच ठिकाणी आपणास लेण्यांच्या धर्मांतराचा पुरावा मिळतो. वेरूळचे दशावतार लेणे खोदण्यास सुरुवात केली, तेव्हा तेथे एक बौद्ध लेणे योजले होते. परंतु काळाच्या ओघात जेव्हा ते पूर्णत्वास गेले, तेव्हा ते हिंदू लेणे होते. परंतु येथे संघर्षाच्या कोणत्याच खुणा दिसत नाहीत. राष्ट्रकूट काळात बौद्ध धर्म जवळ-जवळ संपला आणि त्यानंतर पन्हाळेकाझी, कान्हेरी आणि महाकाली या तीनच लेणीसमूहांत भिक्षुसंघ कार्यरत होता.

### महाराष्ट्रातील हिंदू लेणी

महाराष्ट्रात बौद्ध लेणी फार मोठ्या प्रमाणावर असली, तरी लयन स्थापत्याचे अचंबित करणारे आविष्कार हिंदू लेण्यांमध्येच पाहायला मिळतात. यांचे सौंदर्य वेगळेच आहे. अनेक हिंदू लेणी भव्य आहेत. त्यांतील शिल्पे अधिक बोलकी आहेत. आज तर वेरूळच्या 'कैलास' लेण्याने आणि घारापुरीच्या शैव लेण्यांनी जगातील अनेक कलावीदांना स्तंभित केले आहे. आज जगात बौद्ध लेणी भित्तीचित्रांसाठी तर हिंदू लेणी त्यांतील शिल्पसंपदेसाठी सर्वश्रुत आहेत.

बौद्ध आणि हिंदू लयन स्थापत्यांत काही मूलभूत फरक आहेत. मुळात बौद्ध भिक्षुसंघ आणि हिंदू मठ यांची रचनाच वेगळी आहे. त्यामुळे त्यांचे स्थापत्य भिन्न असणे अपरिहार्य आहे. शैव आणि वैष्णव लेणी ही पूजाअर्चेची ठिकाणे होती. छोट्या राहण्याच्या खोल्यांचा अभाव, प्रदक्षिणापथ आणि अतिशय बोलके व प्रभावी मूर्तिपट हे तीन प्रमुख बदल हिंदू लेण्यांत करण्यात आले.

या लेण्यांमध्ये फारच थोडे शिलालेख सापडले आहेत. त्यामुळे यांचे दानकर्ते, कारागीर, स्थपती इत्यादींबद्दल फारच थोडी माहिती आज उपलब्ध आहे. परंतु बौद्ध, हिंदू आणि जैन लेणी कोरणारे कारागीर एकाच पठडीतील असावेत, असे त्यांच्यातील कलाशैलीच्या साम्यावरून दिसते. डॉ. अ. प्र. जामखेडकरांनी त्यांच्या 'महाराष्ट्र : इतिहास - प्राचीन काळ' स्थापत्य व कला या ग्रंथात हिंदू लेण्यांचे वर्गीकरण केले आहे. ते मुख्यत्वे कालक्रम व

| क्र. | प्रमुख लेणीसमूह आणि प्रदेश | इतर लेणीसमूह | प्रमुख चैत्याचा काळ | विहारांचा काळ | भिक्षुसंघाचा कार्यकाळ |
|---|---|---|---|---|---|
| ०१ | औरंगाबाद समूह | अंजिठा, वेरुळ,<br>औरंगाबाद,<br>पितळखोरे,<br>घटोत्कच, इत्यादी | इ.स.पू.२रे–इसी १ले शतक/५वे शतक,<br>इ.स.पू.६वे शतक, इ.स. पू.१ले शतक, इ.स.पू.२रे शतक, | ------''------<br>------''------<br>------''------<br>इ.स.५/६ शतक<br>-----''-------<br>इ.स.५ वे शतक | इ.स.पू २रे ते इ.स. ८वे शतक<br>इ.स.पू ६वे ते इ.स. ८वे शतक<br>इ.स.पू १ले ते इ.स. ८वे शतक<br>इ.स.पू २रे ते इ.स. ७वे शतक<br>इ.स.पू ५–६ वे शतक |
| ०२ | कान्हेरी समूह | कान्हेरी,<br>जिवदानी,<br>मागाठणे,<br>महाकाली<br>(कोंदीवटे)<br>लोणाड, इत्यादी | इ.स.२रे शतक<br>---<br>---<br>इ.स.१ले शतक<br>---- | इ.स.पू १ ते इ.स.६<br>इ.स.पू ३–२<br>इ.स. ६<br>इ.स.१ ते ६<br>इ.स.५ वे शतक | इ.स.पू.१– इ.स.११<br>---<br>इ.स. ६ ते ११<br>इ.स. १ ते ११<br>इ.स. ५ ते ६ |
| ०३ | जुन्नर समूह | तुळजा लेणी<br>भीमाशंकर लेणी<br>अंबिका लेणी<br>भूतलिंग लेणी<br>लेण्याद्री गट १<br>लेण्याद्री गट २<br>शिवेनरी लेणी. | इ.स.पू. १ले शतक<br>इ.स.पू १ ते<br>इ.स.पू २ रे शतक<br><br>इ.स १–२ रे शतक | इ.स.पू १ ते इ.स.१<br><br>इ.स.पू.१ ते<br>इ.स.३ रे शतक<br>इ.स.१ले शतक<br>इ.स.३ रे शतक<br>इ.स.१ ले ते ३ रे शतक | इ.स.पू १ ते इ.स. ६–७ वे शतक. |
| ०४ | कराड समूह | कराड लेणी<br>३ समूह<br>(जखीणवाडीची लेणी) | इ.स.३ रे शतक | इ.स. २ रे ते ४ थे शतक | इ.स.२ रे ते ६ वे शतक |
| ०५ | नाशिक लेणी | पांडव लेणी समूह | इ.स.१ले शतक | इ.स.१ ले ते इ.स. ६ वे शतक | इ.स.पू. १ ले ते इ.स.१० वे शतक |
| ०६ | कुडा–महाडलेणी | कुडा<br>महाड<br>पाले<br>ठणाळे इत्यादी | इ.स.२ रे–३ रे शतक<br>इ.स.१ले–२रे शतक<br>इ.स.पू.१ ले शतक ते २रे शतक | इ.स.१ ले ते<br>इ.स.४थे शतक<br>इ.स.पू१ ते<br>इ.स.३रे शतक | --- |
| ०७ | कार्ले–भाजे समूह | कार्ले<br>भाजे<br>बेडसे<br>कोंडाणे<br>शेलारवाडी इत्यादी | इ.स.१ले शतक<br>इ.स.पू.२रे शतक<br>इ.स.१ले शतक<br>इ.स.पू.२– इ.स.१ले शतक | इ.स.१ ते ६ शतक<br>इ.स.पू.२ ते इ.स.३ शतक<br>इ.स.१ ते २ शतक<br>इ.स.पू २–इ.स. १ शतक<br>इ.स. २–३ शतक | इ.स ६–७ शतकापर्यंत |
| ०८ | पन्हाळे काझी | पन्हाळे काझी | ---- | इ.स.२रे ते ४ शतक | इ.स. २ रे ते ११ वे शतक. |

| | अनु.क्र. | लेणे | ठिकाण | जिल्हा | काळ / राजाश्रय |
|---|---|---|---|---|---|
| गट – १ | ०१ | वैष्णव लेणे | भांदक | चंद्रपूर | इ.स.४०० ते ५०० |
| | ०२ | वैष्णव लेणे | भटाळा | चंद्रपूर | वाकाटक |
| | ०३ | शैव लेणे | पातूर | अकोला | |
| | ०४ | धाराशिव (वैष्णव लेणे) | उस्मानाबाद | उस्मानाबाद | |
| | ०५ | शिऊर | शिऊर | नांदेड | |
| गट – २ | ०१ | जोगोश्वरी (शैव) | जोगेश्वरी | मुंबई उपनगर | इ.स.६वे शतक |
| | ०२ | मंडपेश्वर (शैव) | बोरिवली | मुंबई उपनगर | |
| | ०३ | घारापुरी (शैव) | घारापुरी बेट | रायगड | |
| | ०४ | धुमार लेणे | वेरूळ (क्र.२९) | औरंगाबाद | कलचुरी |
| | ०५ | अंकाई–टंकाई (शैव) | अंकाई–टंकाई | नाशिक | |
| | ०६ | माहूर | माहूर | नांदेड | |
| | ०७ | टाकळी ढोकेश्वर | टाकळी ढोकेश्वर | अहमदनगर | |
| | ०८ | शैव लेणी व एकात्म मंदिरे | पळसांबे | कोल्हापूर | |
| गट – ३ | ०१ | लेणी क्र. १४, १७, १८, | वेरुळ | औरंगाबाद | सुरुवातीचे राष्ट्रकूट |
| | ०२ | १९, २१, २२, २६, २७, | | औरंगाबाद | |
| | | २८ घाट नांद्रा देवी लेणे | घाटा नांद्रा | | |
| गट – ४ | ०१ | लेणी क्र.२५,२३,२४ वेरूळ | वेरूळ | औरंगाबाद | राष्ट्रकूट, कलचुरी |
| | ०२ | गणेश लेणे | | औरंगाबाद | |
| | ०३ | भोकरदन | भोकरदन | पुणे | |
| | ०४ | पाताळेश्वर | पुणे | बीड | |
| | ०५ | आंबाजोगाई (शैव लेणी) | अंबाजोगाई | लातूर | |
| | ०६ | खरोसा (शैव) | खरोसा | चंद्रपूर | |
| | | भांदक (शैव) | भांदक | | |
| गट – ५ | ०१ | शृंगार चावडी | पाटणे | जळगाव | शिलाहार, यादव. |
| | ०२ | नाथपंथी आणि इतर लेणी | पन्हाळे काझी | रत्नागिरी | |
| | ०३ | नाथपंथी लेणे | हरिश्चंद्रगड | अहमदनगर | |
| | ०४ | भामेर किल्यातील शैलगृह | भामेर | धुळे | |

स्थापत्य वैशिष्ट्ये यांवर आधारित आहे. त्यासाठी वरील तक्ता पाहावा.

यांपैकी चौथ्या गटात वेरूळचे कैलास लेणे येते. हे एक एकपाषाणीय द्रविड पद्धतीचे मंदिर आहे. गट क्र. ३ मधील लेण्यांचे दोन उपप्रकार पडतात. ते म्हणजे–

१) प्रदक्षिणापथयुक्त लेणी (सांधार लेणी)

२) प्रदक्षिणापथ नसलेली लेणी (निरंधार लेणी)

इ.स.च्या सहाव्या शतकापासून हिंदू लेणी मोठ्या प्रमाणावर खोदली गेली. यांपैकी बरीचशी शैव विशेषतः पाशुपत संप्रदायाची असून काही मोजकी लेणी वैष्णवांची आणि देवीची आहेत. इ.स.च्या १०व्या शतकापर्यंत लेणी खोदण्याची प्रक्रिया जोमाने चालू होती आणि त्यानंतर अचानक ती थंडावली. येथून पुढे जैन लेण्यांचे युग सुरू झाले. यादव–सुलतान काळात जरी अनेक जैन लेणी कोरली गेली, तरी हिंदू लयन स्थापत्याच्या भव्यतेला व कलात्मकतेला तोड नाही.

## महाराष्ट्रातील जैन लेणी

महाराष्ट्रातील जैन लेणी हा विषय बराच दुर्लक्षित राहिला आहे. आज जरी सर्वोत्कृष्ट जैन लेणी म्हणून वेरूळच्याच जैन लेण्यांना उल्लेख केला जात असला, तरीही इतर लेण्यांकडे पाठ फिरवून चालणार नाही. जैनांचेही



अंजनेरी जैन गुंफा.

वैभवशाली लयन स्थापत्य आहे. जरी संख्यात्मकदृष्ट्या ती थोडी असली आणि वास्तुशास्त्रीयदृष्ट्या आणि सौंदर्यदृष्ट्या फारशी आकर्षक नसली, तरीही महाराष्ट्राच्या संस्कृतीवर त्यांचा फार मोठा प्रभाव आहे.

पाले येथील एका लहानशा लेण्यामध्ये 'नमो अरिहंताणं' हा जैन शिलालेख आढळला आहे. डॉ. ह. धी. सांकलिया व डॉ. शोभना गोखले यांच्या मते हा लेख इ. स. पूर्व पहिल्या शतकातील असावा. यावरूनच जैन लेण्यांची परंपरा इ. स. पूर्व पहिल्या शतकापर्यंत मागे जाते. महाराष्ट्रातील सर्व प्राचीन लेणी समूह हे बौद्ध समजले गेले आहेत. उपरोक्त उदाहरणावरून त्या सर्वांचा पुनर्विचार करणे गरजेचे वाटते. वाकाटक कालीन (इ.स.५व्या शतकातील) बौद्ध लेण्यांच्या तलविन्यासावर आधारीत आज जैन म्हणून ज्ञात असलेली धाराशिवची लेणी महत्त्वाची आहेत. हीच खऱ्या अर्थाने जैन लयन स्थापत्याची महाराष्ट्रातील सुरुवात मानली जाते. हे जरी खरे मानले, तरी यादव काळालाच जैन लयन स्थापत्याचा सुवर्णकाळ मानावे लागेल.

या सुवर्णयुगाची सुरुवात ९-१०व्या शतकात वेरूळ येथे झाली. छोटा कैलास, इंद्रसभा आणि जगन्नाथ सभा ही ३ जैन लेणी वेरूळच्या शिल्पवैभवात उल्लेखनीय आहेत. ही लेणी जशी शिल्पांसाठी प्रसिद्ध आहेत, तशीच विलोभनीय चित्रांसाठीही सर्वश्रुत आहेत. वेरूळचे लेणे क्र. ३१ जे अपूर्णावस्थेत आहे, आणि पार्श्वनाथ टेकडीवरील काही लेणी, या परिसरात लयननिर्मिती उत्तरचालुक्य काळापासून यादव काळापर्यंत चालू असल्याची साक्ष देतात. लातूरमधील खरोंसा येथील हिंदू लयन समूहामध्ये ९व्या शतकातील एक जैन लेणेही आहे.

यानंतर कालक्रमाने येणारा वैशिष्ट्यपूर्ण जैन लेणी समूह म्हणजे नाशिक जिल्ह्यातील अकाई-टंकाई लेणी समूह. येथील १० लेण्यांचा हा समूह येथील मूर्ती आणि शिलालेखांची अक्षरवाटिका यावरून राष्ट्रकूट-यादव काळातील (सुमारे इ. स. १० वे ते १३ वे शतक) मानला जातो. यानंतर मात्र औरंगाबादच्या व खानदेशच्या परिसरात जैन लेण्यांचे खोदकाम करण्यात आले. यात वेरूळची



महाकाली लेणी येथील बुद्ध प्रतिमा.

पार्श्वनाथ टेकडी, दौलताबाद किल्ल्याचा परिसर या औरंगाबाद जिल्ह्यातील जैन लेण्यांचा समावेश होतो तर पाटणे (जळगाव), चामरलेणे, अंजनेरी, पांडव लेण्यातील एक जैन गुंफा (सर्व नाशिक परिसरातील लेणी), आणि भामेर (धुळे) या सर्व लेण्यांचा समावेश होतो.

पुण्याजवळच्या महादेवाचा डोंगर हा आपल्याला तुकाराम महाराजांमुळे माहीत आहे. याच डोंगरातील एका लेण्यात तुकाराम महाराज भजन करण्यास जात, अशी वदंता आहे. या लेण्याचा अनेक वेळा जीर्णोद्धार झाला आहे. हे मुळातील एक जैन लेणे आहे. अनेक वेळा झालेल्या जीर्णोद्धारामुळे याचा काळ ठरवणे कठीण झाले आहे.

आत्तापर्यंत आपण लयन स्थापत्याशी संबंधित अनेक विषय बघितले आणि काही विषयांवर थोडक्यात चर्चाही केली. यावरून या विषयाचा आवाका लक्षात येईल. लेणी आणि व्यापारीमार्ग, लेणी आणि त्यांची भौगोलिक पखरण, लेण्यांमधील जलव्यवस्था, लेणी समूहांचे परस्परांशी असलेले संबंध आणि विविध पंथ-संप्रदायांचा त्यांच्या स्थापत्यांवरील परिणाम असे अनेक मुद्दे चर्चिण्याचे येथे टाळले आहे. त्यामुळे लेखाचा पसारा आणि आवाका वाढला असता. येथे ते प्रयोजन नाही. महाराष्ट्रातील लेणी समूहाबद्दल अनेक प्रश्न उपस्थित केले जातात. या लेखात अशा साधारण प्रश्नांची उत्तरे देण्याचा प्रयत्न केला आहे.

यादव काळापासून पुढे शैलगृह निर्मितीच्या तंत्राचा इतर अनेक कामांसाठी वापर केला गेला. किल्ला अभेद्य बनवण्यासाठी कडे तासणे, किल्ल्यातील प्रवेशमार्ग बिकट करण्यासाठी भुयारी मार्ग खोदणे (उदाहरणार्थ देवगिरीचा किल्ला), पाण्याच्या टाक्या खोदणे, किल्ल्याच्या दरवाजाजवळ खोल्या, पायऱ्या आणि दरवाजा खोदणे (भामेरचा किल्ला) अशा एक ना दोन अनेक कारणांसाठी या कारागिरांच्या परंपरेचा आणि तंत्राचा वापर वारंवार केला गेला. या तंत्राचा वापर उपयुक्त व लौकिक स्थापत्य उभारणीसाठी होऊ लागला. अनेक हिंदू व जैन लेणी आजही वापरात आहेत. अबाधित धार्मिक परंपरेमुळे तेथे आजही त्या-त्या देवतांची पूजा होते. परंतु बौद्ध लेण्यांचे काय? अनेक शतकांपूर्वी भारतातून बौद्ध धर्म उत्थापित झाला होता. या लेण्यांमध्ये अनेक लोकदेवता वसल्या; जसे कर्ल्याला एकवीरा, लेण्याद्रीला विनायक, विरारची जिवदानी, जुन्नरची तुळजा, चौलची हिंगुळजा एक ना दोन. अनेक बौद्ध लेणी शेवटी नाथसंप्रदायाच्या प्रभावाखाली आली. पन्हाळेकाझीसारख्या काही लेण्यांनी त्याच्या खुणा बाळगल्या तर अनेक लेणी नाथसिद्धांच्या समाधीमध्येच हरवून गेली.

या सर्व लेण्यांना स्वतःची एक 'कथा' आहे. प्रत्येक लयन समूहाच्या कथेच्या 'उत्तरार्धाची' येथूनच सुरुवात होते. म्हणूनच महाराष्ट्राच्या सांस्कृतिक प्रगतीचा, धार्मिक अधिष्ठानाचा विचार करताना या लेण्यांना अनन्यसाधारण महत्त्व प्राप्त होते. ही लेणी आपल्याला सदैव काहीतरी सांगत असतात. गरज असते ती ऐकणाऱ्या कानाची आणि मनाची.

* * *



# कला व स्थापत्य



द्राविड शैलीचे शिखर, कैलास लेणे – वेरूळ

नागर, द्राविड, वेसर आणि भूमिज यांपैकी कोणत्या प्रकारात कोणते मंदिर मोडते, हे त्यावरील शिखराच्या रचनेवरून ठरवता येते, कारण ते याबाबतीत महत्त्वपूर्ण आणि निर्णायक ठरते. ज्या मंदिरांची शिखरे कालौघात पडून गेली, अशा मंदिरांवरील शिखरांची रूपकेही याबाबतीत उपयोगी पडतात. यांपैकी काही मंदिरांची शिखरे, मंदिर प्रस्तरातले असले तरी, विटांची आहेत, तर काही प्रस्तरांचीच आहेत. शिवाय येथील मंदिरे एक, दोन वा तीन गाभाऱ्यांचीही आहेत. यांना एकदल, द्विदल वा त्रिदल मंदिरे असे संबोधता येईल.

## मंदिरे व मूर्तिशिल्पे

■ डॉ. गो. बं. देगलूरकर

महाराष्ट्रात बौद्ध, हिंदू आणि जैन ह्यांचे धार्मिक स्थापत्य आढळते. पैकी बौद्धांचे धार्मिक स्थापत्य– स्तूप, विहार इत्यादी हे ख्रिस्तपूर्व काळातील दुसऱ्या शतकापासूनचे आहे, तर हिंदू व जैन यांचे ख्रिस्तोत्तर काळातले आहे. या स्थापत्याच्या उभारणीसाठी विटा, लाकूड आणि दगड यांचा उपयोग केलेला आहे. बांधकाम सामान्यतः शुष्कसांधी (ड्राय मेसनरी) पद्धतीचे आहे. अशी मंदिरे इसवी सनाच्या १४व्या शतकापर्यंत उभारली जात होती. पुढे या सर्व बाबतींत बदल होत गेल्याचे दिसते.

बौद्ध स्थापत्यात स्तूप, चैत्यगृह आणि विहार यांची गणना होत असली, तरी यांचे वास्तुअवशेषच आढळतात. पवनी, तेर, कोल्हापूर, कान्हेरी आणि महाकाली गुंफा येथे विटांत बांधलेले स्तूप आहेत. पैकी काही क्षितिग्रस्त आहेत आणि काही उत्खननामुळे दृग्गोचर झाले आहेत.

ते साहजिकच अवशेषरूपात आहेत. तेर (उस्मानाबाद) येथे उत्खननात चैत्यगृहाचे अवशेष आढळले. हे चैत्यगृह (बौद्ध मंदिर) चापाकृती (ॲप्सिडल) असून त्याच्या अर्धवर्तुळाकृती भागाच्या मध्यात स्तूप होता. तो १.२५ मीटर व्यासाचा होता. पक्क्या विटांत बांधलेल्या मंदिराचा आकार ९ मी. × ५.५ मी. एवढा होता.

महाराष्ट्रातले पहिले सम्राटघराणे सातवाहनांचे. त्यांच्या काळातील म्हणजे इसवी सन पूर्व २ ते इसवी सनाच्या २ ऱ्या शतकातील मंदिरांचे तुरळक उल्लेख हाल राजाच्या गाथा–सप्तशतीत आढळतात. पुढे वाकाटक, कलचुरी, राष्ट्रकूट, कल्याणी चालुक्य, यादव, शिलाहार या राजकुलांच्या कारकिर्दीच्या काळात येथे मंदिरे उभारली गेली. यांपैकी अपवाद वगळता प्रारंभीची बहुतेक सर्व मंदिरे विटांची होती. त्यांची प्रवेशद्वारे लाकडी असत. इसवी सनाच्या ११ व्या ते १४ व्या शतकात उभारलेली मंदिरे मात्र प्रस्तरातील आहेत.

मंदिर स्थापत्याच्या प्रगतीचा विचार केला, तर लक्षात येते की पर्णकुटी, छोटेखानी देवघर, गाभारा व मंडप असलेली सपाट छताची मंदिरे, नंतर गाभारा व मंडप यांना सांधणारे अंतराल नामक दालन, शिखरयुक्त मंदिरे अशी या स्थापत्यप्रकारांत वाढ झाली. या टप्प्यावर मंदिराचे ‘घरपण’ मागे पडून त्याला प्रासादाचे स्वरूप प्राप्त होते.

वर उल्लेख केल्याप्रमाणे आधीची मंदिरे विटांत बांधली गेली होती. महाराष्ट्रात पैठण, मांढळ (जि. नागपूर), नागरा (जि. भंडारा), वाशीम (जि. अकोला आता वाशीम जिल्हा), तेर (जि. उस्मानाबाद), घृष्णेश्वर (वेरूळ), हरिणे व परिंचे (जि. पुणे– बहुधा चालुक्य–राष्ट्रकूट काळ), मूलचेरी (जि. गडचिरोली) येथे ही मंदिरे आढळतात. ही सर्व मंदिरे उत्खननात आढळल्यामुळे अवशेषरूपातच आहेत. मात्र तलविन्यासावरून आणि जवळच सापडलेल्या अन्य घटकांवरून कळते की, गर्भगृह आणि मंडप असलेली ही मंदिरे शैव आणि वैष्णव संप्रदायांची असावीत.

यांपैकी मांढळ, नागरा, वाशीम, मूलचेरा येथील विटांची मंदिरे इ. स. २५० ते ५१० या म्हणजे वाकाटकांच्या काळातली होती तर तेर येथील मंदिरे मात्र निरनिराळ्या कालखंडांतील आहेत. उदाहरणार्थ त्रिविक्रम मंदिर (इसवी सनाचे ३ रे ते ५ वे शतक), उत्तरेश्वर मंदिर (६वे शतक) तर कालेश्वर आणि नीलकंठेश्वर मंदिरे (८ वे ते ९ वे शतक). पुणे जिल्ह्यातील हरिणे व परिंचे येथील मंदिरांचे फक्त तलविन्यासाचेच अवशेष आढळले पण ती चालुक्य–राष्ट्रकूट काळातील असावीत असे तज्ज्ञ मानतात. या सर्व मंदिरांपैकी तेर येथील मंदिरे सुदैवाने अजून उभी आहेत, तर नागरा येथील मंदिर या सगळ्या मंदिरांत आकाराने खूपच मोठे होते. २७ मी. × ४२ मी. आकाराच्या ओट्यावर पश्चिमाभिमुख असे ते होते. हे शिवाचे मंदिर होते. महाराष्ट्र राज्याच्या पुरातत्त्व विभागाने येथे उत्खनन केल्यावर या मंदिराची वैशिष्ट्ये लक्षात आली.

महाराष्ट्रामध्ये दगडांत बांधलेली सर्वांत आधीची मंदिरे वाकाटककालीन असून ती रामटेक जि. नागपूर येथे आहेत. विशेष म्हणजे येथील भग्नावस्थेतील त्रिविक्रम मंदिरच वाकाटक काळचे म्हणून आत्तापर्यंत मानले जाई. मात्र येथील अन्य पाच मंदिरेही याच काळची आहेत, असे आता सिद्ध झाले आहे. पैकी लेणेवजा बांधीव गुप्तराम मंदिर, साध्या मंडपाचे वराह मंदिर आणि दोन गाभाऱ्यांचे भोगराम मंदिर ही स्थापत्यातील प्रगतीचे दर्शक ठरतात. केवल–नरसिंह आणि रुद्र–नरसिंह मंदिरेही प्रेक्षणीय आहेत. ही दोन्ही मंदिरे मोठ्या जोत्यावर उभी असून गाभारा सांधार आहे (छतयुक्त प्रदक्षिणामार्गाची सोय असलेले मंदिर). या मंदिरांना अंतराळ नाही. स्तंभांच्या विशिष्ट रचनेमुळे गर्भगृह व त्यासमोरील मंडप विभक्त झाले आहेत. गाभारा चौरस नसून आयताकृती आहे. मंडपाच्या भिंती वेदिकेप्रमाणे आहेत. त्यात छोटी देवकोष्ठे आणि अर्धस्तंभांचे अलंकरण आहे. या दोन्ही देवळांच्या गाभाऱ्यांत भूमीवर टेकलेल्या चक्रावर उजवा हात ठेवून बसलेली नरसिंहाची भव्य मूर्ती आहे.

सामान्यतः चौरस गाभाऱ्याची (केवल–नरसिंह मंदिराचा अपवाद) कलाकुसरयुक्त शाखांच्या प्रवेशदाराची, अंतरालविरहित आणि सपाट छताची अशी या मंदिरांची रचना आहे. एका खोलीची वा लहान घराची असावी अशीच ठेवण येथे आढळते; देवघरच म्हणा ना.

आधी उल्लेख केलेल्या तेर येथील विटांच्या मंदिरांपैकी उत्तरेश्वर (शिव) मंदिर हे इसवीसनाच्या सहाव्या शतकाच्या

उत्तरार्धातले असून ते कलचुरी घराण्याच्या कारकिर्दीतील असावे. या मंदिराचे एक वैशिष्ट्य आवर्जून नोंदवावे लागले. याच्या गर्भगृहाच्या प्रवेशदाराची चौकट लाकडी असून कलाकुसरयुक्त आहे. द्वारशाखांवर उडते विद्याधर कोरले आहेत. ललाटावर ब्रह्मा, विष्णू, शिव आणि लकुलीशही कोरलेले आहेत. (ही चौकट तेर येथील वस्तुसंग्रहालयात ठेवलेली आहे.) आता गर्भगृहावरील भिंतींवर दोन थरांच्या छपरावर टोकाशी स्तूपिका आहे शिवाय येथे शालाशिखर आणि कूटशिखर यांची रचना केलेली आहे. द्राविड शैलीतील मंदिर-शिखरावर अशी रचना असते.

महाराष्ट्रावर राज्य करणाऱ्या राष्ट्रकूट आणि उत्तरकलचुरी घराण्यांच्या काळातील मंदिरांची ओळख आता अभ्यासकांना पटली आहे. राष्ट्रकूट घराण्याच्या तीन शाखा महाराष्ट्राच्या निरनिराळ्या भागांवर राज्य करीत होत्या, हे आता इतिहाससिद्ध आहे. या काळात (इसवी सनाचे ५ वे शतक आणि पुढे) बांधलेली विटांतील मंदिरे भांदक म्हणजे भद्रावती (जि. चंद्रपूर) व काळेश्वर मंदिर, तेर येथे तर दगडातील मंदिरे रामटेक व दुसरे वाकेश्वर, जि. नागपूर येथे आहेत. भटाळा येथील शिवमंदिराची दोन वैशिष्ट्ये सांगता येतील. मंदिर उंचीच्या दृष्टीने खूपच उंच आहे, विशेष म्हणजे ते दुमजली आहे आणि मंडोवर (मंदिराची बाह्यभिंत) त्रिजंघायुक्त आहे (मंडोवरावरील आडव्या तीन पट्टिका).

येथून पुढे महाराष्ट्रातील मंदिरांची विभागणी नागर, द्राविड, वेसर आणि भूमिज अशी करावी लागते. यांपैकी कोणत्या प्रकारात कोणते मंदिर मोडते, हे त्यावरील शिखराच्या रचनेवरून ठरवता येते, कारण ते याबाबतीत महत्त्वपूर्ण आणि निर्णायक ठरते. ज्या मंदिरांची शिखरे कालौघात पडून गेली, अशा मंदिरांवरील शिखरांची रूपकेही याबाबतीत उपयोगी पडतात. यांपैकी काही मंदिरांची शिखरे, मंदिर प्रस्तरातले असले तरी, विटांची आहेत, तर काही प्रस्तरांचीच आहेत. शिवाय येथील मंदिरे एक, दोन वा तीन गाभाऱ्यांचीही आहेत. यांना एकदल, द्विदल वा त्रिदल मंदिरे असे संबोधता येईल. कर्नाटकात तीन गाभाऱ्यांच्या मंदिरांवर प्रत्येकी एक प्रमाणे तीन शिखरे असतात म्हणून त्यांना त्रिकुटेश्वर असे संबोधतात. महाराष्ट्रात मात्र अशा मंदिरांच्या फक्त मुख्य गाभाऱ्यावरच शिखर असते.

चंडिका मंदिर, भांदक; मार्कंडी येथील मंदिरे; अंजनेरी येथील जैन मंदिरे; घोडांबे येथील श्रीकृष्ण मंदिर; लोणाड येथील शिवमंदिर; रामटेक येथील राम-लक्ष्मण मंदिरे; लोहारे येथील शिवमंदिर; राजुरा, जि. गडचिरोली येथील शिवमंदिर; यवतमाळ जिल्ह्यातील महागावचे द्विदल मंदिर; काटोल जि. नागपूर येथील मंदिरे; संगमेश्वर जि. रत्नागिरी येथील सोमेश्वर व काशीविश्वेश्वर मंदिरे, ही सर्व मंदिरे नागर शैलीतील होत. एव्हाना मंदिर-स्थापत्य चांगलेच प्रगत झाले होते. गर्भगृह, अंतराल, मंडप आणि मुखमंडप असे घटक निर्माण झाले होते. शिवाय काही मंडपांना एका ऐवजी तीन दिशांना एक एक प्रवेशद्वार केले गेले तर काही मंडपांभोवती वामनभिंत (हाफ वॉल) तर काहींभोवती पूर्ण भिंत बांधली जाई. अशा मंडपांना गूढ मंडप म्हणतात आणि सर्वांत महत्त्वाचे म्हणजे गाभाऱ्यावरील शिखर. काळ लोटत गेला तशी शिखराची उंचीही वाढत गेली. येथील उपरोल्लिखित मंदिरांचे घडकावयव उद्‌धृत असल्याप्रमाणे आढळतात. यांना आपण परिपूर्ण मंदिर म्हणू शकतो. शिखरांची उभी रचना हे नागरशैलीचे व्यवच्छेदक लक्षण म्हणता येईल. उभ्या पट्ट्यांनी युक्त शिखराला रेखा देऊळ म्हणायचे. शिखराच्या चारही दिशांना मधोमध एक उभी (नक्षियुक्त) पट्टी असते, ती त्याच्या पायथ्यापासून आमलाकापर्यंत जाते. हिच्या आजूबाजूच्या अशाच पण आकाराने लहान पण उभ्याच पट्ट्या असतात. या सर्व जेथे पोचतात तेथे असतो स्कंधभाग, त्यावर आमलक आणि कलश. अशीच रचना पण या पट्ट्यांवरील वेगळाले घटक नागर शैलीतील प्रादेशिक भिन्नता दर्शवितात. उदाहरणार्थ उडिसा येथील मंदिरांची शिखरे उभ्या ठेवणीची आहेत. यांतील उभ्या पट्टिकांपैकी मधलीला रहपग, तिच्यालगत असलेल्या दोहो अंगांच्या पट्टिकांना अनुरथपग तर कडेच्या पट्टिकांना कोनकपग असे म्हणतात. खजुराहोची मंदिरेही नागर शैलीतलीच. मात्र येथे मधोमधच्या रहपगावर मूळ शिखराच्या प्रतिकृती एकाचे छातीवर दुसरी, तिचे छातीवर तिसरी यांप्रमाणे बांधली जातात. या

प्रतिकृतींना तेथील परिभाषेत उरुश्रृंग असे यथोचित नाव दिले आहे.

महाराष्ट्रात द्राविड शैलीतील मंदिरेही उभारली गेली आहेत. नांदेड जिल्ह्यातील मुखेड, होट्टल; बीड जिल्ह्यातील धर्मपुरी, औरंगाबाद जिल्ह्यातील वेरूळ आणि सिन्नर जिल्ह्यातील या ठिकाणची मंदिरे वानगीदाखल घेता येतील. यांची शिखरे आडव्या, एकावर एक बांधलेल्या, लहान-लहान होत जाणाऱ्या पायऱ्यांची असतात आणि वरच्या टोकास आमलकाऐवजी स्तूपिकेची योजना केलेली, अशी असतात. प्रत्येक पायरीच्या दोन्ही कडेला कूट (मंदिराची इवलीशी प्रतिकृती) आणि मध्ये शाला (गजपृष्ठाकृती छताचे छोटे मंदिर) या दोन प्रकारच्या मंदिरांच्या छोट्या प्रतिकृतींची योजना केलेली असते. ही मंदिरे आतून व बाहेरून शिल्पव्यापृत असतात. येथे आणखी एक गोष्ट सांगितली पाहिजे. नागर शैलीतील मंदिरांच्या सभामंडपांच्या छपरावर अशी द्राविड शिखरेच (असल्यास) असतात. त्यांना फासना म्हणतात. अशा शिखरांच्या पायऱ्यांवर घंटांच्या रांगा असल्या (उदाहरणार्थ अंबरनाथ मंदिराच्या मंडपाचे छप्पर) की त्यास संवरणा म्हणतात. महाराष्ट्रभूमीने मंदिरासाठी द्राविड शैली निवडली, पण आपला असा वेगळा ठसा त्यावर उमटविला. तो दिसतो तो वेरूळ येथील कैलास लेणीच्या रूपात. द्राविड शैलीचे हे मंदिर आहे खरे, पण कितीतरी बाबतींत आपले वैशिष्ट्य प्रकट करीत ते उभे आहे. महाबलीपूरम येथील धर्मराजरथाच्या पद्धतीवर कोरलेले, कांची येथील कैलासनाथ मंदिराच्या भोवतालच्या ओवऱ्या व त्यातील मूर्तिशिल्पे यांप्रमाणे रचना असलेले हे कैलासमंदिर 'आधी कळस मग पाया रे।' या पद्धतीचे एकमेवाद्वितीय असे आहे. महाराष्ट्राच्या प्रकृतीतील दणकटपणा दर्शविणारे तसेच त्यातील नाजूक कलाकुसरीवरून व कमनीय बांध्याच्या शेलाट्या स्त्री-प्रतिमांवरून मेणाहून मऊ होणारी ही प्रकृती आहे, त्याची जाणीव करून देणारे हे मंदिर आहे.

महाराष्ट्राने नागर शैलीतील आणि द्राविड शैलीतील मंदिर-रचना मोकळ्या मनाने स्वीकारली आणि त्यात आपले असे काही भरीस टाकले (उदाहरणार्थ भूमिज मंदिरे). जणू काही भारतीय संस्कृतीलाच येथे महाराष्ट्रीय वळण दिले गेले. समन्वयाच्या धोरणाने संस्कृति-संगम घडविण्यासाठी महाराष्ट्र सतत तत्पर आहे, हे मंदिर रचनेद्वारे सिद्ध केले असेच म्हणायचे.

भूमिज प्रकारची मंदिरे हे महाराष्ट्राचे वैभव आणि एक वैशिष्ट्य आहे. येथील व एकूणच अशा मंदिरांना 'भूमिज' संबोधायचे हे प्रसिद्ध विदुषी स्टेला क्रॅमरिश यांनी सिद्ध केले आहे. त्यासाठी भोजकृत समराङ्गणसूत्रधार याचा आधार घेतला आहे. यापूर्वी महाराष्ट्रातील मंदिरे साधारणतः हेमाडपंती म्हणून ओळखली जात. हेमाडपंत वा हेमाद्री हा तेराव्या शतकातील यादव नृपतींचा विद्वान आणि धार्मिक वृत्तीचा पंतप्रधान होता. याने चतुर्वर्गचिंतामणी नामक मोठा ग्रंथ रचला होता. महाराष्ट्रात (गुजरात व मध्यप्रदेशातही) इतस्ततः आढळणारी सामान्यतः एकाच तोंडवळ्याची अनेक मंदिरे पाहून हे कार्य भरपूर धन, अफाट सत्ता आणि आवश्यक श्रद्धा असणाऱ्या व्यक्तीचेच असणार, अशा भावनेने लोकांनी अशा मंदिरांचे 'हेमाडपंती' या नावाने बारसे केले असणार. महाराष्ट्रातील पहिले किंबहुना भूमिज प्रकारातील पहिले मंदिर इसवी सनाच्या अकराव्या शतकात उभारले गेले आणि हेमाडपंतांचा काळ तेराव्या शतकातला, हे ध्यानी घेता अशा प्रकारची मंदिरे उभारणीशी त्यांचा काही संबंध नसावा, असे मानावे लागते.

भूमिज मंदिर प्रकारातील पहिले मंदिर अंबरनाथ जि. ठाणे येथे आहे. मंदिराच्या मंडपाच्या उत्तर द्वारावरील शिलेवर एक लेख आहे. त्यात म्हटले आहे की, शिलाहार नृपती मुम्मुणीराज याने शक संवत ९८२ (सन १०६०) या साली या मंदिराच्या पुनर्बांधणीचे (समुद्धरीत) काम पूर्ण केले.

हे मंदिर पश्चिमाभिमुख आहे. याचे गाभाऱ्यात स्वयंभू शिवलिंग आहे आणि ते ओढ्याच्या अगदी काठावर आहे. किंबहुना त्यामुळेच तेथील लहान देवळाच्या जागी मोठे मंदिर उभारताना ते पश्चिमाभिमुख करावे लागले असणार. या मंदिराच्या ढासळलेल्या शिखराच्या अवशेषभागावरून कळते की, भूमिज मंदिराच्या परिणत शिखराच्या आधीचा हा टप्पा आहे. येथे कूटाच्या रांगा नसून स्तंभकूटांची योजना केलेली आहे. मंदिराचा तलविन्यास गाभारा (पायऱ्यांनी उतरून जावे लागते), प्राग्रीव (अरुंद अंतराल), तीन

प्रवेशद्वारांचा मंडप व तीन मुखमंडप अशा प्रकारचा आहे. मंदिर तारकाकृती आहे. गाभारा व मंडप हे घटक एका लहानशा व मोठ्या चौकोनांचे कोन एकमेकांस छेदणाऱ्या, अशा तलविन्यासाचे आहेत. मंडपाचे छप्पर संवरणा पद्धतीचे आहे. अंतरालाचे छप्पर शुकनासिका आकाराचे आहे. हे मंदिर अंतर्बाह्य आणि नखशिखांत शिल्पव्यापृत आहे. याचे अधिष्ठानावर मात्र कीर्तिमुखथर, गजथर आणि नरथर आहेत; औंढा नागनाथ वा पेडगाव येथील मंदिरावर आहेत, तसे अश्वथरासह चार थर येथे नाहीत.

इतर बाबतीत थोडाफार फरक असलेली पण अशीच शिखरे असलेली भूमिज मंदिरे बलसाणे, सिन्नर, झोडगे, खिद्रापूर, अंजनेरी, सातगाव, साकेगाव, रतनवाडी, अकोले, जागजी, फलटण, कोकमठाण, गुरसाळे, शिंगणापूर येथे आहेत. धारासूर व जागजी या ठिकाणची शिखरे मात्र विटांची आहेत.

भूमिज मंदिरांचे व्यवच्छेदक लक्षण म्हणजे त्यांची विशिष्ट ठेवणीची शिखरे. या प्रकारच्या शिखराची स्तंभकूट पद्धतीची सुरुवात अंबरनाथ येथील शिवमंदिराच्या शिखराद्वारे आपण पाहिली, त्याची परिणती वर उल्लेखिलेल्या मंदिर-शिखरांत आढळते. या शिखराच्या चारी अंगांच्या मध्यातून थेट आमलकापर्यंत जाणारी 'लता'पट्टी असते, तिच्यामुळे शिखराचे चार चतकोर भाग होतात. त्या प्रत्येकात मूळ शिखराच्या लघुप्रतिकृती एकावर एक रचलेल्या असतात. एका उभ्या ओळीत जितक्या शिखर-प्रतिकृती तितक्या भूमींचे (मजल्यांचे) हे शिखर असते, असे समजले जाते. म्हणूनच या मंदिरांना भूमिज (भूमीतून भूमी उद्‌भवते) असे म्हणतात.

**उपसंहार**

महाराष्ट्राच्या मानचित्रावर एक दृष्टिक्षेप केला, तरी असे दिसते की येथे सर्वत्र मंदिरांची उभारणी झाली होती. इसवीसनाच्या चौथ्या-पाचव्या शतकापासूनची मंदिरे येथे अद्यापि तग धरून आहेत. पुढे ११ व्या ते १३ व्या शतकात मंदिरे उभारणी येथे चालू होती, त्याच काळात गुजरातेत सोळंकी, माळव्यात प्रतिहार आणि कर्नाटकात चालुक्य यांच्या कारकिर्दीत मंदिरांची उभारणी होत होती.



वितानाची नक्षी, सातगाव, जि. बुलडाणा.

येथील मंदिरांचा तलविन्यास चतुरस्र वा वृत्तसंस्थान (तारकाकृती) आहे. पैकी काही मंदिरे त्रिदल म्हणजे तीन गाभाऱ्यांची तर क्वचित द्विदल आहेत. मंडप मात्र अशा मंदिरात समाईकच असतो. अनेक मंदिरांत असे आढळते की, गाभारा आतून चौकोनी व अनलंकृत असतो तर बाहेरून तो तारकाकृती असतो. ही मंदिरे साधारणतः पूर्वाभिमुख असतात. शिव, विष्णू आणि सूर्य यांची मंदिरे दक्षिणाभिमुख नसतात. त्यातल्या त्यात शिवाची व देवीची पूर्व वा पश्चिम दिशेस तोंड करून तर विष्णूची उत्तराभिमुखही असतात असे दिसते.

मंदिरे ही गर्भगृह, अंतराल आणि मंडप ह्यांनी युक्त असतात, हे आपण पाहिलेच आहे. याच्या भिंतींचे अधिष्ठान, मंडोवर आणि कपोत असे भाग पडतात. खूर, पद्म, कणी, उपान, कुंभ, कीर्तिमुख, गज, अश्व इत्यादी थरांचे (आडव्या पट्ट्यांचे) अधिष्ठान (पीठ) असते. त्यावरच्या भिंतीच्या भागाला म्हणतात मंडोवर. मंडोवरावरील शिल्पयुक्त पट्टीस म्हणतात जंघा. महाराष्ट्रातील बहुतेक प्राचीन मंदिरांवर एकच जंघाभाग असतो. याला अपवाद औंढा येथील नागनाथ मंदिर, त्याला दोन जंघा आहेत तर मार्कंडी (जि. गडचिरोली) येथील मार्कण्डेयमंदिर



शिवाचे कटिसममुद्रानृत्य, रामेश्वर लेणे, वेरूळ.

तीन जंघा आहेत, मध्य प्रदेशातील खजुराहो येथील मंदिराला असतात तशा.

### मंदिरांचे छप्पर आणि छत

बहुतेक मंदिरांची छपरे सपाट आहेत. भूमिज देवळाच्या गाभाऱ्यावरच्या शिखरांचे वर्णन वर आलेच आहे. अंतरालाचे छप्पर गजपृष्ठाकृती असते व त्याच्या दर्शनी बाजूच्या कोनाड्यात देवतामूर्ती असते. अशा छपरास शुकनास असे संबोधतात. मंडपाचे छप्पर फणसना वा संवरण पद्धतीचे असते.

महाराष्ट्रातील मंदिरात मंडपाचे छत सपाट (समतल) असते. काही ठिकाणी ते करोटक वितान पद्धतीचे आढळते. अंबरनाथ, अन्वा, कोकमठाणा, कुंभारी, संगमेश्वर, ताहाकारी येथील मंडपांचे वितान उत्क्षिप्त प्रकाराचे आहे. या प्रकारात समतल-क्षिप्त, नाभिच्छंद, क्षिप्तोक्षिप्त सभामंडारक इत्यादी प्रकार असतात.

गाभाऱ्याच्या प्रवेशदाराच्या चौकटीला ७,५,४,३ व १ शाखा असतात. स्थूलमानाने ज्येष्ठद्वार, मध्यमद्वार व कनिष्ठद्वार अशा प्रकारची ती ठेवण असते. द्वारललाटावर गणेश, गजलक्ष्मी वा शेषशायी यांच्या प्रतिमा असतात. यास ललाटबिंब असे म्हणतात.

महाराष्ट्रातील मंदिरांचा आढावा घेतला, तर लक्षात येते की दक्षिणेतील मंदिरांसारखी उत्तुंग मंदिरे येथे नाहीत. मात्र अंबरनाथ, खिद्रापूर, औंढा आणि विशेष म्हणजे मार्कण्डी येथील मंदिरे शिल्पसमृद्ध आहेत, देखणी आहेत आणि स्थापत्याचा वैशिष्ट्यपूर्ण नमुना म्हणून लक्षात राहावीत अशी आहेत.

### महाराष्ट्रातील मूर्ती

संस्कृती ज्या-ज्या अंगाने बहरते, फुलारते; त्या-त्या अंगांना आत्मसात करण्याचे सामंजस्य महाराष्ट्रीयांनी अंगीकारले होते, हे जसे येथील मंदिरांद्वारा दिसते, तसेच ते येथल्या मूर्तींवरूनही लक्षात येते.

विविध देवतांच्या मूर्ती निर्माण झाल्या त्या केवळ पूजेकरिता म्हणूनच, असे वाटणाऱ्यांना मूर्तिशास्त्राचा गाभा गवसला नाही, असे म्हणावे लागते. खरे तर मूर्तींवरून समाज परिवर्तन, समाज प्रबोधन आणि सामाजिक अभिसरण या प्रक्रियांची कल्पना येते. धर्म, तत्त्वज्ञान, लोकरिती आणि लोकजीवन यासंबंधींची माहिती देणारे प्रमुख आणि महत्त्वाचे साधन म्हणून त्यांच्याकडे पाहायला हवे. मूर्तींच्या माध्यमाद्वारे महाराष्ट्रात गिरिजन आणि अभिजन, त्याचप्रमाणे उत्तर व दक्षिण भारतीय परंपरा यांच्यामध्ये समन्वय साधला गेला होता. शिवाय अव्यक्त मूर्ती आणि व्यक्त मूर्ती त्याचप्रमाणे वैदिक, पौराणिक, बौद्ध, जैन या संप्रदायांच्या मूर्तींमध्येही समरसता निर्माण करण्याचा प्रयत्न पूर्व-पंडितांनी केला होता, असे जाणवते.

तत्त्वज्ञान, धर्म-सिद्धान्त आणि मिथिका यांचे दृश्यरूप म्हणून मूर्ती आकाराला आलेली असते. महाराष्ट्रात काही अव्यक्त आणि काही व्यक्त रूपांतल्या मूर्ती आहेत. अव्यक्त रूपातील मूर्तींचेही दोन प्रकार असतात. पहिल्या प्रकारात

जाखाई, यमाई, म्हसोबा इत्यादी लोकदेवतांचे तांदळे समाविष्ट आहेत तर दुसऱ्यामध्ये शिवलिंग व शालग्राम (शाळीग्राम) यांचा अंतर्भाव केला जातो. या अव्यक्त प्रतीकांचे दोन प्रकार करायचे कारण असे की; यमाई, म्हसोबा, मरीआई इत्यादी देवता कायमच्या त्याच स्वरूपात राहिल्या तर दुसऱ्या प्रकारच्या प्रतीकांना विविध देवता-रूपांत व्यक्त केले गेले. शिव आणि विष्णू क्रमाने लिंगरूपात व शालग्रामरूपातही पुजिले जातात. पण त्यांच्या प्रतिमाही घडविल्या गेल्या. महाराष्ट्राने या सर्व अव्यक्त आणि व्यक्त प्रतिमांना समान लेखले आणि आपल्या अंतःकरणात त्यांना जागा दिली. येथे आणखी एका गोष्टीचा निर्देश करणे आवश्यक आहे. पहिल्या प्रकारच्या अव्यक्त प्रतिमांची पूजा करणारा समाज कालांतराने प्रगतही झाला आणि तरीसुद्धा या देवतांना व्यक्तरूप देण्याऐवजी तो त्यांची मूळरूपातच उपासना करीत आला. येथील काही नागर कुटुंबांत कुळधर्म-कुलाचाराच्या परंपरेचे सातत्य टिकवायचे म्हणून पौराणिक देवतांच्या मूर्तींसवेच यमाई वा म्हसोबा किंवा तत्सम देवतांचीही उपासना केली जाते. यावरून दिसते ते असे की, उपास्य मूर्तींच्या आधारे समाजातील दोन वर्ग जसे ओळखता येतात, तसेच त्यांतील एका वर्गाची सुधारणेच्या दिशेची झेपही ओळखता येते. महाराष्ट्राची संस्कृती ऊर्ध्वगामी कशी, हेही यावरून अजमावता येते.

महाराष्ट्रात शिवाच्या अनुग्रह व संहार अशा दोन्ही प्रकारच्या तसेच दक्षिणामूर्ती प्रकारच्या मूर्ती आढळतात. रावणानुग्रह, मार्कण्डेयानुग्रह, अर्जुनानुग्रह तसेच अंधकासुरवधमूर्ती, गजहामूर्ती, कालारीमूर्ती, त्रिपुरान्तकमूर्ती लेण्यांतून व मंदिरांच्या बाह्यभिंतींवर आढळतात. केवलशिव, वृषवाहनशिव, सोमास्कंद, लिंगोद्भव, महायोगिशिव, कल्याणसुंदर, व्याख्यान दक्षिणामूर्ती आणि नटराजाच्या मूर्ती येथे आहेतच, पण याहून काही दुर्मीळ प्रकारच्या मूर्तीही येथे आहेत. पैकी मांढळ जि. नागपूर येथे उत्खननात मिळालेल्या इसवी



गजलक्ष्मी कैलास लेणे, वेरूळ.

सनाच्या पाचव्या शतकातील शिवमूर्ती लक्षवेधक आहेत. त्यात अष्टमूर्तिशिव, द्वादशसर्वपार्श्वमुखशिव, सदाशिव या मूर्तींचा समावेश करता येईल. शिवाय मार्कण्डी जि. नागपूर येथील मंदिराच्या बाह्यभिंतीवरच्या विलक्षण चतुष्पादसदाशिव मूर्तींचा विशेष उल्लेख करावा लागेल. अशा दोन मूर्ती खजुराहो येथेही आहेत. महाराष्ट्राचे भाग्य हे की येथे वेरूळ, परळी, औंढा, भीमाशंकर नि त्र्यंबकेश्वर येथे ज्योतिर्लिंगाची मंदिरे आहेत.

येथे विष्णूच्या दशावतारांच्या, केशवनारायणादी चोवीस प्रकारच्या तसेच शेषशायी, धन्वन्तरी, श्रीनिवास, विष्णू-लक्ष्मी, अनंत, करिवरद, कपिल, दत्तात्रेय, हयग्रीव, मधुकैटभारी, विश्वरूप, योगीश्वर, राधाकृष्ण अशा प्रकारच्या मूर्तीही आहेत. विशेष म्हणजे श्रीविठ्ठल आणि वैकुंठ यांच्या मूर्ती. महाराष्ट्र संस्कृतीचा मागोवा एकाच मूर्तीद्वारे घ्यावा लागला, तर तो विठ्ठलमूर्तीवरून घेता येईल. विठ्ठल हे महाराष्ट्राचे दैवतच होय. हे एकच दैवत वारकरी संप्रदायासारखा स्वतंत्र संप्रदाय निर्माण करू शकते. शिवाय याचे एकच पीठ-पंढरपूर. श्रीविठ्ठल ही विष्णूची पंचविसावी अवस्थिती होय. 'चोविसामूर्तींहूनी वेगळा। तो हा पंचविसावा।' असे त्याचे वर्णन संतांनी केले आहे. मूर्तिशास्त्राधारे ही विठ्ठलमूर्ती योगस्थानक मूर्ती ठरते. वैकुंठ प्रकारची विष्णुमूर्ती खजुराहो आणि काश्मिरात आढळते. विशेष म्हणजे महाराष्ट्रात मेथी (जि. धुळे) येथील लक्ष्मी



धम्मचक्र प्रवर्तन मुद्रेतील बुद्ध, चैत्यगृह लेणे, वेरूळ.

मंदिराच्या मागील देवकोष्ठात गरुडारूढ वैकुंठाची एकमेव प्रतिमा आहे.

शैव आणि वैष्णव या संप्रदायांप्रमाणेच येथे शाक्त आणि गाणपत्य असे संप्रदाय आहेतच. येथील तुळजापूर, कोल्हापूर, माहूर वगैरेंसारखी शक्तिपीठे आणि अष्टविनायकांची मंदिरे प्रसिद्धच आहेत. शिवाय दुर्गा, महिषासुरमर्दिनी, तपश्चर्यारत पार्वती, लक्ष्मी, भूदेवी, गजलक्ष्मी इत्यादी देवतांच्या मूर्ती आहेत आणि नृत्यगणेश, उच्छिष्ट गणेश यांच्या मूर्तीही आहेत. कार्तिकेयाच्या षडानन, मयूरवाहन, स्कंद इत्यादी प्रकारच्याही मूर्ती आहेत.

महाराष्ट्रात सौर संप्रदायाचा फारसा प्रभाव होता, असे दिसत नाही तरी सूर्योपासना होतीच. समर्थ रामदासांनी गोदावरीत (टाकळी येथे) बारा वर्षे सूर्योपासना केली होती. सूर्याच्या प्रतिमा मात्र येथे अनेक ठिकाणी आढळतात. कोकणातील कशेळी येथील कनकादित्याचे मंदिर प्रसिद्ध आहे. इतरत्रपेक्षा कोकणात सूर्याच्या स्वतंत्र मूर्तींचे प्रमाण अधिक आहे. सूर्याच्या रथाला तीन, चार वा सात अश्वांची योजना केलेली दिसते. विशेष म्हणजे उत्तर भारतात आढळतात तशा पावसाळी बूट (हाय बूट) घातलेल्या, सैनिकी वेशातील सूर्यमूर्ती आणि दक्षिणेतील मूर्तींप्रमाणे पादत्राणविरहित मूर्तीही येथे आहेत.

महाराष्ट्रात आढळणाऱ्या आणखी काही प्रकारच्या मूर्तींचा उल्लेख येथे करावयास हवा. या मिश्रमूर्ती होत. हरिहर, अर्धनारीश्वर, ब्रह्मेशानजनार्दनार्क इत्यादी प्रकारच्या या मूर्ती होत. या मूर्ती म्हणजे समन्वयी विचारसरणीचे उत्तम द्योतक होय. येथे शिव-विष्णू त्याचप्रमाणे पुरुष-प्रकृती आणि ब्रह्मा, शिव, विष्णू आणि सूर्य यांच्या मिश्र व संयुक्तमूर्ती देवतांत दुजाभाव नसतो/नाही, असे दाखविण्यासाठी निर्माण केल्या गेल्या. येथील अशा व अन्य प्रकारच्या मूर्तींवरून लक्षात येते की महाराष्ट्राने पराक्रमाची पूजा केली, 'शिव जे त्याची कांस धरली, परित्राणाय साधुनाम। विनाशायाच दुष्कृताम।' हे धोरण

अंगीकारले, बुद्धिगर्भ प्रकाशाची इच्छा बाळगली आणि हे करताना सामंजस्याचे व समन्वयाचे धोरण ठेवले.

### बौद्ध प्रतिमा

इसवीच्या ६व्या-७व्या शतकापर्यंत महाराष्ट्रातील लेण्यांतून बुद्धाच्या अनेक प्रतिमा कोरल्या गेल्या, तशाच बोधिसत्त्व आणि बोधिशक्तींच्याही. बुद्ध प्रतिमांत पद्मासनात धर्मचक्रप्रवर्तन मुद्रेतील प्रतिमा विशेष महत्त्वाच्या ठरतात. शिवाय भूस्पर्शमुद्रेतीलही प्रतिमा आहेत. या दोन प्रकारच्या मूर्ती नेहमीच आसनस्थ असतात. बुद्धाच्या स्थानक प्रकारच्या प्रतिमाही येथे आढळतात. विशेष म्हणजे सप्तध्यानी बुद्ध, वैरोचन, अक्षोभ्य, रत्नसंभव, अमिताभ, अमोघसिद्धी, वज्रसत्त्व आणि वज्रराज आणि सप्तमानुषी बुद्धाच्या विपश्यी, शिखी, विश्वभू, क्रकुच्छंद, कनकमुनी, काश्यप, शाक्यसिंह (गौतमबुद्ध) अशा प्रतिमाही येथे आहेत. बुद्धाची ध्यानासनातील एकमेव प्रतिमा कंधार (जि. नांदेड) येथे मिळाली. ती ८व्या-९व्या शतकातली असून तिच्या पादशिळेवर लेख कोरलेला आहे. शिवाय मैत्रेय अवलोकितेश्वर (पद्मपाणि), वज्रपाणि, जंभाल, ज्ञानकेतू, स्थिरचक्र, मंजुश्री हे बोधिसत्त्व आणि तारा, भृकुटी, चुंडा, हारिती या बोधिशक्तींचे शिल्पांकन येथे आढळते. बोधिसत्त्वात अवलोकितेश्वर अधिक महत्त्वाचा. याच्या संकटमोचन (अष्टसंकटांपासून सुटका करणाऱ्या) आणि एकादशमुखाच्या (कान्हेरी लेणी) प्रतिमा महाराष्ट्रात दुर्मीळ प्रकारच्याच होत.

### जैन प्रतिमा

चोवीस तीर्थंकरांच्या प्रतिमा, महावीर चोविसी, पार्श्वनाथ चोविसी, शिवाय प्रतिमा सर्वतोभद्र (शिळेच्या चारी बाजूंवरील) प्रकारच्या प्रतिमा येथे आहेत. शिवाय पार्श्वनाथाच्या, बाहुबलीच्या विशेष प्रकारच्या प्रतिमाही येथे आढळतात.


पार्श्वनाथ, इंद्रसभा, वेरूळ.

### महाराष्ट्रातील शिल्पकला व चित्रकला

प्राचीन काळात येथे विविध माध्यमांतून लौकिक आणि धार्मिक विषयांवरील शिल्पे निर्माण झाली. प्रारंभी मृण्मूर्ती तयार झाल्या. त्यांपैकी काही कच्च्या मातीच्या तर काही पक्वमृदा प्रकारच्या आहेत. नेवासे, कोल्हापूर, पैठण, तेर, भोकरदन, आडम, पवनार, नाशिक येथील उत्खननांतून त्या उपलब्ध झाल्या. पैकी तेर आणि पैठण येथे मिळालेल्या मृण्मूर्ती संख्येच्या आणि प्रकारांच्या दृष्टीने अजोड ठरतील अशाच आहेत. या सर्व इसवी सनाच्या १ल्या ते ४थ्या शतकापर्यंतच्या आहेत. सातवाहनांच्या काळात यांना खरा बहर आला होता.

शिल्पकलेच्या दृष्टीने पाषाण शिल्पांचा आढावा पूर्वइतिहासकाळापासून ते इसवी सनाच्या तेराव्या शतकापर्यंत सलगपणे घेता येतो (इसवी सन पूर्व २रे शतक ते इसवी सनाचे १३वे शतक). ही पाषाणशिल्पे सामान्यतः लेण्यांतून पाहायला मिळतात; आणि नंतरची मंदिरांच्या बाह्यभिंतींवर आढळतात. याशिवाय क्वचित अन्यत्रही आढळतात. उदाहरणार्थ पवनी, जि. भंडारा येथील उत्खनित स्तूपाभोवतीच्या कठड्याच्या (वेदिकेच्या) स्तंभावर एका स्त्रीचे व पुरुष भक्तांचे शिल्पांकन आहे. हे इसवी सनापूर्वीच्या २ऱ्या-१ल्या शतकातील ठरते. याशिवाय सिंहासन व मुचलिंद नागाचे लेखासहित शिल्प आहे. हे सर्व अर्ध उठावात (bas relief) आहे.

### इसवी सनाचे २रे व ४थे शतक

भाजे, कोंडाणे, पितळखोरे, नाशिक, बेडसे, कार्ले येथील लेण्यांतून प्रारंभीच्या काळातील शिल्पे आढळतात. ती माणसांची तसेच प्राण्यांचीही आहेत. यात यक्ष-प्रतिमा, दंपती शिल्पे, द्वारपालांच्या प्रतिमा व व्यालशिल्पे इत्यादींचा समावेश करता येतो. काही लेण्यांतून हत्तीवर वा घोड्यावर बसलेली भक्तांची जोडपी स्तूपाला वंदन करताना दिसतात तर काही ठिकाणी गंधर्व, विद्याधर इत्यादी अंतराळात विहार करताना आढळतात; आणखी कोठे चवरीधारीही कोरलेले आहेत. पितळखोरे येथील शस्त्रधारी प्रतिहारी कलेच्या दृष्टीने प्रेक्षणीय आहेत. तेथीलच 'राजाराणी'चे शिल्प तर अप्रतीम म्हणून प्रसिद्ध आहे. याच काळातील कलेवर ग्रीक कलेचा प्रभाव दिसतो. त्यामुळे त्यांच्याशी येथील कलावंतांचा संपर्क असावा, असे वाटते.

या काळातच तेर, भोकरदन, पैठण इत्यादी ठिकाणी उत्खननात हस्तिदंती, हाडे व शिंपले ह्यांच्या कलाकृती उपलब्ध झाल्या. हस्तिदंतातील स्त्री-प्रतिमा, कंगवे, (हाडाचेही) उल्लेखनीय आहेत. तेर येथील स्त्री-प्रतिमा उभट चेहऱ्याची, शेलाट्या बांध्याची, अलंकार ल्यालेली आहे. भोकरदन येथील प्रतिमा भंगलेली आहे. तिच्या कमरेचा वरचा भाग तुटलेला आहे. मात्र आहे त्या उपलब्ध भागावरून लक्षात येते की, तिचा उपयोग आरशाची मूठ म्हणून करीत असत. तिच्या पुष्ट मांड्या, बांधेसूद पोटऱ्या, त्यांचे आजूबाजूस उभ्या असलेल्या छोट्या प्रतिमा या शिल्पाच्या कलाकृतींची उंची दाखवतात. भोकरदन येथील उत्खननात सापडलेल्या या प्रतिमेचे विलक्षण साम्य पाँपी (इटली) येथील उत्खननात सापडलेल्या स्त्री-प्रतिमेत आढळते, इतके की या दोघी जुळ्या बहिणी वाटाव्यात. (सध्या ही भोकरदन प्रतिमा मराठवाडा विद्यापीठाचे वस्तुसंग्रहालय, औरंगाबाद येथे आहे.)

### इसवी सनाचे ४थे व ५वे शतक

या कालखंडात महाराष्ट्रावर वाकाटक घराण्याचे राज्य होते. अजिंठे, पवनार, नगरधन, मांढळ, रामटेक, नागर, नांदपूर, मन्सर इत्यादी ठिकाणी लेण्यांतील, उत्खननांतील व मंदिरांतील मूर्तिशिल्पांचा विचार येथे केला आहे.

अंजिठे येथील बुद्ध, बोधिसत्त्व इत्यादींच्या मूर्ती वगळता तेथील लौकिक प्रकारच्या शिल्पांचा विचार करता हे लक्षात येते की, या आधीच्या कालखंडातील शिल्पांपेक्षा ही शिल्पे प्रगत धाटणीची आहेत. द्वारपालांच्या प्रतिमा, मार-विजय प्रसंगातील मार-कन्या, जंभाल-हारिती पटातील विद्यार्थी इत्यादी शिल्पांवरून आता शिल्पकला अभिजात वा परिणत स्वरूपाची झाली, असे म्हणता येते. देहसौष्ठव, अवयवांची प्रमाणबद्धता, मानवी भावभावनांना दृग्गोचर करण्याची कलाकारांनी हातोटी इत्यादींमुळे या काळचे शिल्प मोठे प्रत्ययकारी ठरते.

अजिंठे येथील शिल्पाशिवाय वर उल्लेखिलेल्या ठिकाणची शिल्पे उत्तरेतील गुप्तशिल्पशैलीशी साम्य दर्शवितात. ही सर्व शिल्पे अभिजात गुप्तशैलीतील समजली जात होती. गेल्या ३०-४० वर्षांतील सर्वेक्षणानुसार व शिलालेखांतील, ताम्रपत्रांतील माहितीवरून ती वाकाटक कालखंडातील आहेत, हे स्पष्ट झाले आहे. या शिल्पांत आवर्जून उल्लेख करावा लागतो तो मांढळ येथील प्रमथ, आयुधपुरुष, रामटेक येथील महाकाय द्वारपाल, पवनार येथील अजोड स्वरूपवान देखणी गंगा, कंसवध, कथाकथन या शिल्पपटातील चाणूर, मुष्टिक, कंस या शिल्पांचा.

## इसवी सनाचे ६ वे व ७ वे शतक

या काळात मौर्य, कलचुरी, चालुक्य इत्यादी राजघराण्यांचे महाराष्ट्राच्या विविध भागांवर राज्य होते. वेरूळ, जोगेश्वरी, घारापुरी, मंडपेश्वर, माहूर, अंकाई-टंकाई येथील लेण्यांतून या काळातील शिल्पे आढळतात. डौलदार देहयष्टी, चेहऱ्यावरील शांत भाव, संयत हालचाली यांसाठी ही शिल्पे वाखाणली जातात. या ठिकाणच्या लेण्यांतून देवदेवतांच्या मूर्तींसमवेत काही लौकिक प्रकारची शिल्पे आढळतात. पैकी वेरूळ, जोगेश्वरी, घारापुरी येथे महाकाय द्वारपालांची शिल्पे उठून दिसणारी आहेत. शिवाय कथाकथनपर शिल्पपटातून मानवी प्रतिमांचे शिल्पांकन झालेले आहे. शिव-पार्वतीच्या द्यूतक्रीडेच्या शिल्पपटातील पंख्याने वारा घालणारी दासी, पार्वतीची केशरचना ठाकठीक करणारी सैरंध्री, शालभंजिका व तिची मंजूषा पाठीवर घेतलेली छद्मी सखी ही शिल्पे म्हणजे कलेचे उत्तम नमुने ठरतात. तसे तर कथाकथनपटातील प्रतिमा देव-देवतांच्या असल्या तरी त्या मानवीच समजाव्या लागतात. त्यांच्या भावना, विकार, हालचाली, प्रयोजन हे सारे मानवीच असते.

या काळच्या कलेचे आणखी एक वैशिष्ट्य आहे. या ठिकाणांतील कथाकथनपटातील शिल्पे कमी उठावातील, अर्धउठावातील, अधिक उठावातील आणि पूर्ण उठावातील (स्कल्पचर इन द राउंड) अशी वेगवेगळ्या पातळ्यांवरील आहेत. त्यामुळे त्रिमितीचा भास होतो.

## इसवी सनाचे ७ वे ते १० वे शतक

या कालखंडावर लत्तलूर म्हणजे लातूरच्या राष्ट्रकूट घराण्याची अधिसत्ता होती. या घराण्यात पराक्रमी राजे होऊन गेले. त्यांनी निर्मिलेली लेणी त्यांच्या कलारसिकत्वाची साक्ष देतात. वेरूळ येथील दशावतार (लेणे १५) व कैलास (लेणे १६) या लेण्यांतून सर्वांगपरिपूर्ण अशा कितीतरी शिल्पाकृती कलावंतांच्या दृष्टीला भुरळ पाडणाऱ्या आहेत.

दशावतार लेणीतील नृत्यमंडपाच्या भिंतीवरील, लोभस युगुलशिल्पे, वरच्या मंडपाच्या स्तंभावरील शीर्षस्थानीची युगुले, राजा बळी, शुक्राचार्य यांची प्रत्ययकारी शिल्पे कलेच्या दृष्टीने प्रेक्षणीय ठरतात. कैलासमधील शिल्पांना तर तोड नाही की जोड नाही. पैकी दक्षिणेकडील रावणानुग्रहमूर्तिपटातील घाबरून धूम ठोकणारी दासी (वा पार्वतीची सखी), रामायण प्रसंगातील वानरे, (वाली-सुग्रीव, हनुमान), सेतू बांधण्यात मग्न झालेली नलादी वानरे, यज्ञशाळेच्या प्रवेशाजवळच्या भुरळ पाडणाऱ्या सेविका, सप्तमातृकांसमवेतची राणी, कामक्रीडेत मग्न असलेली मिथुने, छोटेखानी सूर्यमंदिराच्या (?) आजूबाजूच्या जलकुंभवाहिन्या, अनेक ठिकाणचे द्वारपाल यांचा उल्लेख अपरिहार्यपणे करावा लागतो. ही सर्व शिल्पे भारतीय शिल्पकलेच्या इतिहासातील महत्त्वाचा टप्पा दर्शविणारी आहेत. (यातच या कालखंडातील जैन लेणी इंद्रसभेतील सिद्धायिका (किंवा अंबिका) हिचा उल्लेख करावा लागेल) प्रचंड आकारातील भव्य शिल्पे, भावनोत्कट व्यक्तिरेखा, आक्रमकता आणि गतिमानता ही या काळच्या (राष्ट्रकूट) कलेची वैशिष्ट्ये होत. शिल्पे मोठ्या आकाराची तरी प्रमाणबद्ध, पाषाणात कोरलेली तरी 'जिवंत' हालचाल करणारी व भावनांचा कल्लोळ दर्शविणारी अशी आहेत.

## इसवी सनाचे ११ वे ते १४ वे शतक

या कालखंडातील शिल्पांवर महाराष्ट्राच्या सीमेवर असलेल्या इतर प्रांतांतील शिल्पशैलींचा प्रभाव जाणवतो. उदाहरणार्थ महाराष्ट्रालगत पूर्वेकडे वा दक्षिणेकडे कर्नाटकाची सीमा, त्यामुळे चालुक्यशैलीचा प्रभाव तर खानदेश, कऱ्हाड या प्रदेशांवर दक्षिण गुजरात शैलीचा (सोळंकी) प्रभाव दिसतो.

आता येथील मंदिरे आकाराने मोठी आणि अलंकरणामुळे दर्शत झाली आणि विशेष म्हणजे त्यांची विताने, स्तंभ, मंडोवरावरील जंघा भाग शिल्पांकित झाले. कर्णदर्दुरक, गजतालू, लूम इत्यादी प्रकारच्या कलाकुसरींनी व्यापृत अशी एककेंद्री वरच्या भागात लहान-लहान होत जाणाऱ्या वर्तुळांच्या वितानांची निर्मिती झाली, तर स्तंभांच्या दंड भागावर चौकटीत विविध प्रसंगांची (रामायण, महाभारत, पुराणे) शिल्पांकने आली.

गर्भगृहाच्या प्रवेशदाराच्या शाखांवर गंधर्व, विद्याधर, सैनिक, वाद्यवादक यांची लघुशिल्पे तर शाखांच्या तळाशी गंगा-यमुना, द्वारपाल, कुबेर इत्यादींची शिल्पे आली.

विशेष म्हणजे मंडोवरावरील जंघा भागावर सुरसुंदरींची लोभस व मोहक शिल्पे आली. मर्दला, दर्पणा, केतकीभरणा, शुभगामिनी, पुत्रवल्लभा यांशिवाय स्त्री व विंचू, तसेच स्त्री व माकड अशी शिल्पांकने आली. या सर्व स्त्रिया प्रमाणबद्ध आणि सौंदर्याच्या निकषाला उतरणाऱ्या अवयवांच्या घडविल्या गेल्या. पृथुल नितंबिनी गमन विलंबना वा श्रोणीभरादलसगमना अशा त्या आहेत. त्या मांसल अवयवांच्या सुखवस्तू जाणवतात. मराठवाड्यातील पानगाव, निलंगे, धर्मपुरी, होट्टल इत्यादी ठिकाणच्या तसेच कोल्हापूर खिद्रापूर येथील आणि मार्कंडी (विदर्भ) या देवालयांवर त्या आहेत.

### प्राचीन महाराष्ट्रातील चित्रकला

प्रागैतिहासिक चित्रकला महाराष्ट्रात होती, असे म्हणणे सीमित रूपातच घ्यावे लागते. त्यासंबंधीचे फारसे पुरावे उपलब्ध नाहीत. या काळच्या चित्रकलेचे अस्तित्व आढळते ते उत्खननातून उपलब्ध झालेल्या मृद्‌भांड्यांच्या अवशेषांद्वारे. त्यावर काळ्या व गेरूच्या रंगाने भौमितिक आरेखने आणि हरीण, वाघ, नाग, मासे इत्यादी आकृतींच्या चित्रणावरून या काळच्या कलेचे अस्तित्व जाणवते.

पूर्वेतिहास काळातील चित्रकला अजिंठे येथील ९ व्या व १० व्या लेण्यांत आहे. इसवी सनपूर्व २ रे-१ ले शतक म्हणजे सातवाहनांचा काळ. या भित्तीचित्रांत (म्यूरल्स) काही जातकांच्या समावेश आहे. छद्दंत जातकातील प्रसंग तर खरोखरच प्रत्ययकारी आहेत. मातृपोषक जातकही तितक्याच समर्थपणे चितारले आहे. भावपरिपोषासाठी अजिंठ्यातील चित्रे विख्यात का आहेत, हे त्यावरून कळते. पुढे पाचव्या शतकातील चित्रे अजिंठ्याच्या १६, १७, १ व २ या लेण्यांत आहेत. येथील अभिलेखावरून कळते की वाकाटक नृपती हरिषेण याचा मंत्री वराहदेव व खानदेशातील मांडलिक राजा ह्यांनी यांपैकी काही लेणी खोदवली. या लेण्यांतील कथाचित्रांत विश्वंतर, विधुरपंडित, महाजनक, चांपेय, इत्यादी जातकांवर आधारित चित्रांचा समावेश आहे. त्यांतील जनपदकल्याणी (मृत्युशय्येवरील), पद्मपाणी, काळी राणी, नर्तिका यांची चित्रांकने वास्तवदर्शी म्हणून प्रत्ययकारी ठरतात.

विष्णुधर्मोत्तरातील चित्राध्यायानुसार रूपभेद, प्रमाण, भावयोजन, लावण्ययोजन, सादृश्य आणि वर्णिकाभंग या सहा आदर्शांचे प्रतिबिंब येथे आढळते, असे सी. शिवराममूर्तीचेही मत आहे. ही चित्रे टेंपरा पद्धतीने म्हणजे भिंतीवरील गिलावा व चुन्याचा पातळ थर वाळल्यावर काढलेली आहेत, ती फ्रेस्को प्रकारची नाहीत, असे आता तज्ज्ञांचे मत झाले आहे. शिवाय येथे रंग वापरले आहेत ते नैसर्गिक द्रव्यांपासून तयार केले गेले आहेत.

यापुढील चित्रकला वेरूळ येथील कैलास व इंद्रसभा या लेण्यांत आढळते. ती इसवी सनाच्या ८ व्या व १२ व्या शतकांतील आहे.

### संदर्भ :


१. देगलूरकर गो.बं., १९७६ टेम्पल आर्किटेक्चर ॲन्ड स्कल्प्चर ऑफ महाराष्ट्र, नागपूर.
२. देगलूरकर गो.बं., २००४ सुरसुंदरी, पुणे
३. देगलूरकर गो.बं., २००७ विष्णुमूर्ते नमस्तुभ्यम्, आपटे फाटा, जि.रायगड.
४. देव शां.भा., १९७३, मार्कण्डी टेम्पल्स, नागपूर
५. जामखेडकर अ.प्र., २००२ महाराष्ट्र : इतिहास-प्राचीन काळ (खंड १, भाग २) स्थापत्य व कला, गॅझेटिअर विभाग, मुंबई.
६. जोशी. नी. पु. १९७९ भारतीय मूर्तिशास्त्र, नागपूर.
७. पर्सिब्राऊन १९६५ इंडियन आर्किटेक्चर भूखंड १, पाचवी आवृत्ती, मुंबई.


* * *





वटेश्वर मंदिर, सासवड.

# वैशिष्ट्यपूर्ण स्थापत्ये

**■ नरेंद्र डेंगळे**

ब्रिटिशपूर्वकाळातील मराठी वास्तुकलेकडे केवळ ऐतिहासिक दृष्टिकोनातूनच न पाहता वास्तुकलेच्या अनुषंगाने पाहायचा या लेखाद्वारे प्रयत्न आहे. वास्तुकला सहा कोटींमध्ये तपासता येते; त्या म्हणजे १.आदिम/पर्यावरणीय २.लोक ३.धर्मसंबंधीत ४.गरजू ५.विकाऊ व ६.कला या होत. या कोटींचे निकष, उद्दिष्टे व संदर्भ परस्पर भिन्न असल्याने सरसकट एकाच चष्म्यातून सर्व वास्तुकला पाहणे गोंधळाचे ठरेल.

**चौदाव्या शतकातील यादव मंदिरे आणि त्यांचे अठराव्या शतकातील पेशवेकालात केलेले पुनर्स्थापन या दोन्ही घटनांमुळे यादव वास्तुकलेचे ऐतिहासिक महत्त्व द्विगुणित होते. विशेषतः सासवडजवळील वटेश्वर व संगमेश्वर ही मंदिरे यादव घाटाच्या पुनरुज्जीवनाची किंवा नव-यादव शैलीची उत्कृष्ट उदाहरणे आहेत. ०**

ऐतिहासिक दृष्टिकोनातून वास्तुकलेकडे विशिष्ट राजकीय-सामाजिक-आर्थिक संदर्भ व परंपरा, वास्तव व मिथक यांना तोलून पाहता येते. परंतु वास्तुकलेची समकालीन सौंदर्यतत्त्वे, बांधकाम शिस्त व तंत्र, अवकाशाची उतरंड, प्रमाणबद्धतेचे निकष, हवामान व दैनंदिन राहणी-व्यवहार यांना समजूनही बघता यावे. वास्तुकला ही एक अवकाश-अनुभवजन्य कला आहे आणि तिचे आकलन सर्वप्रथम दृष्यसंवेदनेतूनच होत असते. तिचा अर्थ लावणे, परंपरांची साखळी तपासणे, तत्कालीन इतर कलाविषय दृष्टिकोनाशी तिची सांगड घालणे ह्या चर्चात्मक व संश्लेषणात्मक प्रक्रियांना नंतरच चालना मिळते, हे मान्य केल्यास


सभामंडपाचे छप्पर, त्र्यंबकेश्वर, नाशिक.

वास्तुकलात्मक दृष्टिकोनाला एक स्वतंत्र आणि स्वायत्त स्थान प्राप्त होते.

किल्ले, तलाव, तटबंदी, बंदरे, नदी-घाट, पागा, समाध्या, बागा, तुरुंग इत्यादी; तसेच देवळे, धर्मशाळा, मठ, बाजारपेठा, कारखाने इत्यादी; घरे, वाडे, वाड्या, वस्ती इत्यादी; राजवाडे, हवेल्या, नाट्यगृहे, करमणुकीच्या वास्तू, रंगमहाल, शहररचना इत्यादी अनेक प्रकारची वास्तुकला वर दिलेल्या सहा कोटींमध्ये तपासता येईल. या सर्वांचा येथे परामर्श घेणे अशक्य असल्याने लोक-वास्तुकला व धर्मनिगडित वास्तुकला यांचे काही नमुने येथे मांडायचा प्रयत्न मी करणार आहे. या नमुन्यांची निवड करताना मी दोन निकष गुह्य धरले आहेत. पहिला म्हणजे या नमुन्यांशी माझी प्रत्यक्ष ओळख आहे. दुसरा म्हणजे आज जागतिकीकरणाच्या पार्श्वभूमीवर मला या नमुन्यांचा सांस्कृतिक, स्थानिक व दृश्य संदर्भ महत्त्वाचा वाटतो.

धर्मनिगडित वास्तुकलेचे उदाहरण घेताना सर्वप्रथम आवर्जून लक्ष वेधून घेतले जाते, ते आज ज्यांना हेमाडपंती मंदिर म्हणण्यात येते त्या यादव पद्धतीच्या मंदिरांकडे. शके १२९३ मध्ये (इ.स.१३७१) श्रीज्ञानेश्वर महाराजांनी म्हटले आहे, 'सकल कला निवास, यदुवंशविलास, न्यायाते पोषी क्षितिज श्री रामचंद्र....' या यादवकालीन रामचंद्रांचे राज्य सुरू झाले तेव्हा त्यांचे प्रधान श्री करणाधिप हेमाद्री उर्फ हेमाडपंत होते. हेमाडपंत मोठे विद्वान असून त्यांनी अनेक ग्रंथ लिहिले, राजकारण केले, तसेच मोडी लिपी प्रचारात आणायचे श्रेयही याच हेमाडपंतांना दिले जाते. परंतु आज याचा विचार करताना असे दिसते की वास्तुकला ही काही कोणीतरी एका व्यक्तीने निम्नवेळ जोपासण्याची कला नक्कीच नाही. वर उल्लेखलेले अनेक व्याप सांभाळून त्यामध्ये मौलिक भर टाकून शिवाय दमदार, पुनरावृत्ती टाळून कसबदार वास्तुकला साधणे ही सोपी गोष्ट नाही. मला तर ती असाध्यच वाटते. दर्शन, दृश्यकला इतर प्रयोगकला ह्यांचा स्थपतीने ध्यास घेणे आवश्यक असतेच. तसे वास्तुकलेतील सर्व ग्रंथांचेही म्हणणे आहे. पण परस्पर भिन्न बाबी- राजकारण, ग्रंथ निर्मिती.. इत्यादींमध्ये सखोल काम करून वास्तुकलेतही प्रवीण व्हायचे, हे अवघडच वाटते.

या मंदिर-शैलीत निष्णात असा कोणीतरी स्थपतीही असायला पाहिजे, अशी माझी धारणा आहे. फक्त त्याचे नाव व व्यक्तिमत्त्व इतिहासात कोठेतरी लुप्त झाले असावे! पंडित नेहरूंना आधुनिक भारताचा आर्किटेक्ट म्हटले जाते किंवा ताजमहाल शहाजहाननेच बांधला (म्हणजे जणू त्याचा वास्तुकार कोणी नव्हताच!) असेच काहीसे हेमाडपंथी देवळांबाबत म्हणायला हवे. वास्तुसंकल्पनेचे मनन, तिचे विश्लेषण-विस्तार करून सर्व बारकाव्यांचा दृष्टसंवेदनेने रूपवेध घेऊन, पुनरावृत्ती टाळून, कौशल्याने व सातत्याने वास्तुनिर्मिती करणे हा एक गंभीर, सर्जनशील, काहीसा त्यागी, व्याप असतो, हे मी ओळखतो. इमारतींची खरेदी-विक्री व धंदा यांपासून वास्तुकलेचा मार्ग अधिक भिन्न व खडतर असतो. वास्तुकलेची अभिव्यक्ती बौद्धिक, दृश्य व कौशल्य-तंत्र या तीन गोष्टींची सांगड घातल्याखेरीज होत नसते, असे मी जाणले आहे. असे असले, तरी आज

हेमाडपंती शैली असे ओळखल्या जाणाऱ्या वास्तुकलेची किंमत त्यामुळे कणभरही कमी ठरत नाही, हेही तेवढेच सत्य.

अशा यादव मंदिरांची रचना व बांधकाम दख्खनी ट्रॅप (Basalt) दगडात असून त्यामध्ये चुन्याचा वापर सांधे जोडण्यासाठी केलेला नसतो, हे त्या रचनेचे वैशिष्ट्य म्हणायला हवे. म्हणजेच बांधकाम कोरड्या दगडातले असते. चुन्याशिवाय आणि गिलाव्यारहित काम साधायला वास्तुसंकल्पना, तिचा विस्तार, बांधकामाचे तंत्रज्ञान व तपशील यांचे स्वच्छ व सखोल ज्ञान हवे, तसेच पूर्ण झालेल्या वास्तूचे रूप व प्रमाणबद्धता साकार करायला सर्जनशील आत्मविश्वास हवा. हे नसेल तर सगळेच पितळ उघडे पडेल! कॉंक्रिटचा गिलावा दिलेल्या वास्तूंमध्ये सगळ्या चुका झाकून टाकता येतात! तोडफोड करून, निर्णय बदलून वास्तूचा आकार बदलता येतो; वास्तूला नटवता, सजवता येते; इत्यादी. परंतु वास्तू दगडात घडवून ती न झाकता प्रामाणिकपणे समोर मांडायला दृष्टी, रचना-कौशल्य आणि बांधकाम साहित्याचे ज्ञान असावेच लागते. यादव मंदिरांचे सौंदर्य खुलून दिसते ते तेथील कोरीव कामामुळेच नव्हे तर दगडातून साधलेल्या प्रमाणबद्ध, शिस्तबद्ध आणि डौलदार वास्तुघाटामुळे. या पद्धतीच्या बांधकामात पारंपरिक तत्त्वे, वास्तुशास्त्रीय ज्ञान हे जसे समाविष्ट आहे, तसेच त्यातून भविष्यातील संदर्भात्मक नवा आकार घडविण्याचे बीज आहे. स्तंभ, छप्पर, शिखर यांची रचना काळजीपूर्वक, शास्त्रोक्त आणि भूमितिसंपन्न असते आणि प्रत्येक वास्तुघटकाचे लहान-लहान स्नायूंमध्ये व अवयवांमध्ये विभाजन केलेले असते, यामुळेच हेमाडपंथी रचना-तत्त्व हे प्री-कास्ट कॉंक्रिट किंवा प्री-फॅब स्टील तंत्रज्ञानाच्या जवळचे भासते. या पद्धतीच्या वास्तूमध्ये प्रत्येक स्नायू व अवयव वेगळे करता येत असल्याने त्यांची पुनर्निर्मिती, पुनर्योजन करता येण्यासारखे असते. दौलताबाद येथील 'भारतमाता' मंदिराचे बांधकाम पाहिल्यास हे सहज ध्यानात यावे. म्हणून ही वास्तुकला टिकाऊ किंवा आजच्या परिभाषेत Sustainable ठरते. याउलट ज्या दगडा-विटांना चुना-सिमेंटने पक्के सांधले जाते त्यांचा पुनर्वापर करताना कष्ट अधिक आणि वाया जाणाऱ्या साहित्याचे प्रमाणही मोठे असते.

चौदाव्या शतकातील यादव मंदिरे आणि त्यांचे अठराव्या शतकातील पेशवेकालात केलेले पुनर्स्थापन या दोन्ही घटनांमुळे यादव वास्तुकलेचे ऐतिहासिक महत्त्व द्विगुणित होते. विशेषतः सासवडजवळील वटेश्वर व संगमेश्वर ही मंदिरे यादव घाटाच्या पुनरुज्जीवनाची किंवा नव-यादव शैलीची उत्कृष्ट उदाहरणे आहेत.

शिखरे आणि सभामंडपांची छपरे यांच्या घाटांमध्ये विविध शैलींच्या प्रभावाचे दर्शन घडते. सोलापूर जिल्हा आणि दक्षिण सातारा या भागात कर्नाटकामधील मंदिरांचे आराखडे आणि बांधकामतंत्र ह्यांचा प्रभाव दिसतो. तर नाशिक जवळील काळाराम किंवा त्र्यंबकेश्वर ह्यांच्या सभामंडपांचे छत नागरी शैलीच्या जवळ जाते. असेच छत आणि भूमितितत्त्व वास्तुपाल तेजपालांनी केलेल्या मंदिरात शत्रुंजय पर्वतावर आपण पाहतो. विमलसहा मंदिराच्या (१३२०) सभामंडपाच्या छपराचे नीट निरीक्षण केले, तर बाळाजी बाजीरावांनी बांधलेल्या त्र्यंबकेश्वराच्या सभामंडपाच्या (१७४०-६१) भूमिति- तत्त्वाशी ते जुळते. परंतु पेशवेकालीन वास्तुकलेवर राजस्थान आणि मोगल वास्तुकलेचा प्रभाव होता व तो त्यांच्या राजकारणातून आला होता, हे आपण जाणतो. म्हणून या प्रभावाला माळवा व नागरी शैलीशी जोडले आहे.

चालुक्यांच्या कारकिर्दीत मध्य दख्खनला वास्तुकलादृष्ट्या महत्त्व आले म्हणतात व याच सुमाराला 'कोकण विषय' म्हणून कोकण प्रांत ओळखला जाऊ लागला. याच कोकणातील घरे आणि मंदिरे लोककलेच्या दृष्टीने महत्त्वाची आहेत. पेशवाईतील वाडे आजही पुणे, नाशिक, सातारा, सासवड, वाई इत्यादी ठिकाणी पाहायला मिळतात. या वाड्यांचे प्रमुख बांधकाम लाकडामधले तर भिंती दगड-माती, विटा-माती, विटा-दगड असे मिश्र साहित्याने केलेले दिसते. अशा पद्धतीच्या घरांची परंपरा महाराष्ट्रात जुनी असून ती खेड्यापाड्यांत, देश-कोकण-खानदेश-मराठवाडा व विदर्भ अशी सर्वत्र थोड्याफार फरकाने पाहायला मिळते. या परंपरेला मराठी लाकडी किंवा मिश्रबांधकामाची परंपरा म्हणून ओळखायला अडचण वाटू

नये. वास्तुशास्त्रीय ग्रंथांमधून घरांचे प्रकार वर्णन केले आहेत. त्यामध्ये कोठे अंगण किंवा ओसरी असेल, तर त्या प्रकाराला काय म्हणायचे, इत्यादी स्पष्ट केले आहे. वाड्यांचा वास्तुप्रकार या वास्तुशास्त्रीय परंपरेशी जोडता येतोच. अर्थात लाकडी वाड्यांची किंवा तत्सम हवेली-गढ्यांची परंपरा हिंदुस्थानात सर्वत्रच होती, कारण लाकूड हे साहित्य परिसरात सहजपणे आणि मुबलकपणे उपलब्ध होते. पण देश-कोकणातील घरे 'मराठी' म्हणून ओळखायला येतात ती त्यांच्या अंतर्गत मांडणीपुढे आणि स्वतःच्या वास्तुवैशिष्ट्यामुळेच. पेशवाईतील वाड्यांना सजविणारे दुय्यम घटक म्हणजे कमानी, महिरपी, तक्तपोशीवरील नक्षी इत्यादी घटक म्हणजे राजस्थान आणि मोगल ह्यांच्या वास्तुकलेचा प्रभाव म्हणायला हवा. अर्थात वेगळेपणाचे आकर्षण वाटणे, नवीन पद्धतीच्या वास्तुरचनेने प्रभावित होणे, त्यांची नक्कल करणे, उत्तरेच्या कारागिरांना महाराष्ट्रात निमंत्रित करून त्यांच्याकडून कसबी कारागिरी करून घेणे किंवा या नव्या वास्तुकलेच्या अध्यायातून धडे घेऊन नवीन निर्वचित वास्तुघाट साधणे, हे स्वाभाविकच आहे. महत्त्वाचा मुद्दा असा की त्यामुळे स्थानिक, मौलिक अनुभवजन्य अशा वास्तुघाटाला मुळातच तडा जातो की तो अधिक खुलतो, हे! कोकणातील घरे आजही मूळ स्वरूपात आणि बाह्य, परदेशी दिखाऊपणापासून अलिप्त राहिलेली दिसतात. कोकण रेल्वे झाल्यापासून अर्थातच तेथे शहरी प्रतिमांचे रोपण भराभर केले जाणारच. परंतु तेथे टिकून असलेली जी कोकणी घरे आहेत त्यांची मांडणी, वास्तुघटकांची परस्पर योजना, अनेक घरांना संकुलात गुंफणारी 'वाडी'; या सर्वांमुळे मराठी घरांची वास्तुपरंपरा स्पष्ट होते. दुसरे महत्त्वाचे कारण म्हणजे कोकणातल्या फळबागा. नारळी, पोफळी, रातांबा, फणस, काजू, आंबा इत्यादींची लागवड आणि फळांवर करायचे संस्कार जोपर्यंत कुटुंबामधून होणे चालूच राहील - मग भले ते यांत्रिकीकरणाद्वारे असो वा नसो - तोपर्यंत कोकणी घराचे सत्त्व अबाधित राहील. ह्या वाड्यांची परंपरा गुजरातमधील 'खडकी', किंवा 'देवळी' यापेक्षा नक्कीच वेगळी ठरते. या वाड्यांचे रोपण नंतर शहरांतही केलेले आढळते व त्याचे उत्तम उदाहरण म्हणजे गिरगावातील 'खोताची वाडी', 'वाडी' या वास्तु-संकुल प्रकाराला नवी वाचा फुटली ती मुंबईतल्या 'चाळींद्वारे' परंतु ती इंग्रज राजवटीत! 'वाडा' हा वास्तुप्रकार बराच चर्चिला गेला आहे, त्याविषयी येथे अधिक चर्चा न करता, कोकणामधील सिंधुदुर्ग जिल्ह्यातील काही घरे-मंदिरे यांची वास्तू-ओळख येथे थोडक्यात करून देतो.

देशावरचे वाडे आणि कोकणी घरे यांमध्ये एक घटक असा की बहुतेक कोकणी घरांना आंतरांगण (चौक) नसते. त्याची जागा माजघर घेते. ही घरे जमिनीच्या भौगोलिक उंचसखल खळ्यांमध्ये बांधलेली असतात. टेकड्यांच्या बेचक्यात गोड्या-खाऱ्या नदीच्या दुतर्फा ह्या वाड्या असतात. तेथेच फळबागा जोमाने वाढलेल्या असतात. घरे त्यांमध्ये छपून गेलेली असतात. याचे उत्तम उदाहरण म्हणजे परुळे, खानोली यांसारखी गावे. सर्वसाधारणतः घरांची बांधणी तेथे उपलब्ध असलेल्या जांभा दगडात आणि सांगाडा लाकडात केलेला असतो. मंगलोरी कौल लाकडी पट्ट्यांवर ठेवून उतरत्या छपराखाली माळा तयार होतो. तळमजल्यावर ओटा, पडवी, ओसरी, माजघर, देवघर, अडसर, कोठार, गोठा, स्वयंपाकघर तसेच नंतर जोडलेली स्नानगृहे, संडास यांची स्वतंत्र वास्तू अशी खोल्यांची उतरंड दिसते. घरे एक किंवा फारतर दुमजली असल्याने निसर्गाशी स्पर्धा करीत कोठेच अंगावर येत नाहीत, बऱ्याच ठिकाणी सुतार व कुंभार यांच्या युतीने कंत्राट घेऊन ही घरे बांधली जातात. कोकणातील घरे आजही अशी बांधली जातात. कोठे-कोठे सिरॅमिक टाइल्स, ॲल्युमिनियमच्या खिडक्या, ॲसबेस्टॉसची पडवी असे विडंबनात्मक रूप पाहायला मिळते, हेही खरेच! परंतु मुख्य पर्यावरणीय फायदा असा होता की, वेगवेगळ्या झाडांचे लाकूड बांधकामाला यायचे आणि ती झाडे लावलीही जात. आंबा, फणस, शिसम, साग इत्यादी झाडांचे लाकूड, सांगाडा-तुळया, खांब यांसाठी किंवा जाळ्या, पट्ट्या, दारे-खिडक्या, जुजबी फर्निचर, जिने इत्यादींसाठी वापरले जाई व ही झाडे पुनः पुन्हा लावली जात. आज वृक्षतोड आणि लागवड यांचे प्रमाण व्यस्त झाल्याने लाकडाचा बांधकामासाठी वापर करणे हे पर्यावरण-विरोधी भासू लागले आहे. बहुसंख्य पाश्चात्त्य



सातेरीदेवी मंदिर, वेंगुर्ले.

देशांत- अमेरिकेत, सर्वसामान्य घरे लाकडातच केली जातात. मग भले ती लाकडे मलेशियाची जंगलतोड करून आयात केलेली असोत किंवा नसोत. त्यांना तेथे सररास sustainable या शीर्षकाखाली वापरले जाते! ज्या दराने वृक्ष-तोड होते आहे, त्याहून बऱ्याच अधिक दराने झाडे लावून व मुख्य म्हणजे ती प्रत्यक्ष तगवून दाखविली, तर काही प्रमाणात का होईना लाकडी बांधकाम करता येणे पर्यावरणविरोधी ठरणार नाही.

कोकणातील घरांचे परिमाण ठरते ते सहा-सात फुट लांबीच्या तुळया; खांब व तुळया भक्कम सरळ व ४''×४'' ते ९'×९'' पर्यंत जाडीच्या लाकडातून कापून रंधा मारून काढता येतात म्हणून. साहजिकच ते प्रमाण माणसाच्या उंचीशी जुळते ही जमेची गोष्ट. घराचे तार्किक आणि उपयुक्त असे परिमाण म्हणूनच ६''×६'' च्या आसपास नक्की केलेले आहे. त्यामागे अनेक पिढ्यांच्या अनुभव व श्रम आहेत हे नक्की. प्रत्येक खोलीची व खणाची योजना याच मूळ परिमाणातून होते. येथील खोल्यांची मांडणी आधुनिक गरजांना बरीचशी निरुपयोगी ठरेल यात संशय नाही. पण येथील अवकाश-योजना, उतरंड आणि स्थानिक टिकाऊपणाचे सूत्र या सर्वांमधून काही संकेत जरूर घेण्यासारखे आहेत. येथील छपरे उतरती आणि हवेशीरपणासाठी छपरांचे दोन पदरही दिसतात. ज्याला clerestorey पद्धतीची प्रकाश-हवा योजना म्हणतात, ती येथील दमट हवेला चपखल ठरते. या घरांमध्ये मोठ्या उद्योगांनी निर्माण केलेल्या गोष्टींचा वापर जवळजवळ नाहीच. त्याउलट कुटीर-उद्योगाला प्रोत्साहन, स्थानिक व्यवसाय आणि पारंपरिक कारागिरी यांना तगविण्याचे सूत्र नक्कीच आहे. येथील शेणाने सारवलेली जमीन आणि झावळ्यांचा मंडप, हे जरी आजच्या काळात अवघड प्रकार वाटले, तरीही त्यांचा पर्यावरणीय फायदा व भूमिका निर्विवाद कालातीत आहे.

कोकणातील मंदिरे ज्यांना लोकवास्तुकला म्हणूनच ओळखावे लागेल. त्यांची रचना कोकणातील गरम-दमट हवामानाला योग्य तऱ्हेने सामोरी जाते. या मंदिरांना मूलभूत बाज बहुसंख्य हिंदू मंदिरांप्रमाणे असला तरीही त्यांचे छप्पर आणि प्रकाश योजना - कोकणातील स्थानिक हवामान आणि संस्कृती यांचे भान ठेवून - थोड्याफार फेरफाराने केली गेलेली दिसते. अनेक छोट्या मंदिरांमध्ये दगडांमध्ये किंवा विटांमध्ये गर्भगृह पूर्णपणे बांधून त्याच्या डोक्यावर उंच मंगलोरी कौलांचे उंचावलेले छप्पर-शिखरासारखे केलेले दिसते. रोकडोबा, वेतोबा अशा लोका देवतांची मंदिरेही त्यांना आणि त्यांच्या मिथकांना

साजेशी केली गेली असून तेथे आजही दशावतारासारखे खेळ होत असतात. नगाऱ्याची जागा पक्की असते आणि कोणीही येऊन तो नगारा वाजवू शकतो. बऱ्याच ठिकाणी अनेक देवतांसाठी छोटी-छोटी मंदिरे आहेत. सणाला किंवा रामनवमी, महाशिवरात्र इत्यादी महत्त्वाच्या दिवशी रथामधून मिरवणूक होते. एरवी या रथांना एका गॅरेजवजा (रथगृह) जागेत ठेवलेले असते. संकुलाच्या समोर पाण्याचे तळे, टाके किंवा छोटेसे बांधीव कुंड जरूर असतेच. मंगलोरी कौलांनी रचलेल्या उंच शिखरांचा घाट केरळमधील मंदिरांप्रमाणे बेतलेला आहे. आणि हवामानानुसार दोनही प्रांत समुद्रपट्टीजवळचे असल्याने त्यांमध्ये साधर्म्य आढळून येते. मंदिरांचे अंगण सभोवतालच्या जमिनीपासून प्रसंगी भरणी करून उंचावलेले असते. यामुळे मंदिराला योग्य ते महत्त्व प्राप्त होते.

परुळ्याचे आदिनारायण मंदिर, नेरूरचे कलेश्वर मंदिर, वालावलीचे लक्ष्मी-नारायण मंदिर, वेंगुर्ल्याचे सातेरी देवीचे मंदिर ही काही वैशिष्ट्यपूर्ण कोकणी मंदिरे म्हणायला हवीत. यांच्या जोडीला काही अतिशय टुमदार पण रचनाबद्ध मंदिरेही आहेत. त्यांतील परुळे येथील रवळनाथाचे मंदिर बघण्यासारखे आहे. त्याची भूमितिप्रधान, रेखीव आणि बांधेसूद अष्टकोनी वास्तू लक्ष वेधून घेते. सभामंडपाचे खांब किंचित बोजड असले, तरीही तेथील बाके उत्तम असून, तेथे बराच वेळ शांत बसता येते, वामकुक्षी घेता येते. परूळच्या आदिनारायणाच्या मंदिराचा वास्तुघाट फारच रेखीव होता. गिलावा दिलेले खांब आणि दुतर्फा कमानी, उंच मंगलोरी शिखर, रंगकामातून केलेली नक्षी इत्यादींनी त्या मंदिराचे रूप अधिकच खुलले आहे. याचबरोबर सभामंडपामधील मंद नैसर्गिक प्रकाश आणि प्रदक्षिणापथावरील झरोके या दोन गोष्टींमुळे येथील वातावरण अधिकच शांत व गंभीर होते. परंतु गेल्या पाच वर्षांत सभामंडपाचा विस्तार ज्या पद्धतीने केला गेला आहे, त्यामुळे मंदिराचे मूळचे रूप विद्रूपच झाले आहे. ज्या मंदिरांमध्ये भक्तांची वाढती संख्या आणि वाढता विश्वास आहे, तेथील विश्वस्तांकडे आर्थिक पाठबळही भरपूर आहे पण वास्तुकलेकडे बघायची दृष्टी नसल्यामुळे मंदिरांच्या वास्तूंचे सररास आणि प्रसंगी फिल्मी विडंबन सुरू झाले आहे.

वेंगुर्ल्याचे सातेरी देवीचे मंदिर मुद्दाम पाहण्यासारखे आहे. सातेरीदेवी ही वेंगुर्ल्याची ग्रामदेवता आहे आणि या मंदिराचा वास्तुघाट परदेशी प्रभावाखाली आलेला स्पष्ट जाणवतो. वेंगुर्ल्याच्या डच वखारींमधील बांधकाम तंत्र आणि युरोपमधील तळघरांचे बांधकाम तंत्र येथे वापरण्यात आले आहे.

युरोपमधील अनेक राजवाडे व हवेल्यांच्या तळघरात मद्य-कक्ष असतात. त्यामध्ये अशीच स्तंभांपासून चारही दिशांना झुकणाऱ्या कमानी-घुमट (Vaults) यांनी छत पेललेले असते. हा घनाकृतिबंध पक्क्या युरोपीय बाजाचाच. सातेरी देवीसारख्या ग्रामदेवतेच्या वास्तूसाठी तो वापरात आणायचा, हे एक धाडसच म्हणायला हवे. त्यातून नवी मिश्र शैली संभवते. छपराची रचना पारंपरिक पण छोटे घुमट वापरून केल्याने मंदिर काही नवे पायंडे घालू पाहते. मधोमध आलेल्या दगडी स्तंभांनी सभामंडपाचा बराच भाग व्यापल्यामुळे तेथील सोहळे आणि रिवाज यांमध्ये नक्कीच फरक पडला असणार. उदाहरणार्थ ज्या सभामंडपांमध्ये लाकडी स्तंभ आहेत, तेथे पारदर्शकता अधिक. लोकांचा नृत्य, गायन-कीर्तनातील सहभागही जास्त आत्मीय. येथे ते साध्य होणे अवघड वाटते. म्हणून सातेरी देवीच्या मंदिराची वास्तुकला मूलतः एक भिन्न वळण घेते, असे मानायला हवे. ते स्तुत्यही म्हणायला हवे, कारण त्यामध्ये नवे तंत्रज्ञान पारंपरिक गरजांसाठी राबवायचा धाडसी प्रयत्न आहे. ते कदाचित थोडे फसले आहे, ते सभामंडपातील कार्यक्रमांच्या दृष्टीने. पण त्याचमुळे सांस्कृतिक लवचीकपणा येथे कसाला लागतो.

मागे विशद केलेली तीन उदाहरणे- यादव परंपरा, लोकवास्तूचे कोकणातील स्थान आणि नवीन-बांधकाम-तंत्रज्ञानाच्या प्रभावाखाली आलेले सातेरी देवीचे मंदिर. माझ्या दृष्टीने इंग्रजपूर्व कालापर्यंतची काही वास्तुकला नमुनेदार आहे. मराठी वास्तुकलेला अशी उदाहरणे सतत नवा विचार, दिशा दाखवताना पुनः पारंपरिक गाभा तपासायला प्रवृत्त करतात, हे महत्त्वाचे.

**संदर्भ :**

१. 'आस्वाद व संज्ञापन', 'झरोका' लेखक नरेंद्र डेंगळे, ब्रेन टॉनिक प्रकाशन गृह, नाशिक २००७.
२. महाराष्ट्रीय ज्ञानकोश (इ) ५३ विभाग २१ श्री. व्यं. केतकर
३. महाराष्ट्र महोदयाचा पूर्वरंग, ना. कृ. गद्रे, सं. ग. ह. खरे, म. रा. सा. सं. मं.-१९७१
४. Temples & Legends of Maharashtra, M. S. Mate. Bhartiya Vidya Bhavan, Bombay 1988
५. 'A Monument interpreted' by M. S. Mate & J. C. Sonar, Bulletain of Deccan College, Research Institute. Volume 46, 1987, page 65-68, pune
६. 'Marathas Wadas, a way of life', G. K. Kanhere, Marg 1982
७. 'The Introvert & Extrovert Aspects of the Marathi House' Narendra Dengle, in 'House and Home in Maharashtra' edited by lrina Glushkova, Anne Feldhaus, oup india 1998.

* * *

# लौकिक स्थापत्य

■ डॉ. अरुणचंद्र पाठक

लयन आणि मंदिर स्थापत्याबरोबर महाराष्ट्रामध्ये मोठ्या प्रमाणावर ज्या स्थापत्याची निर्मिती झाली, त्याचा समावेश रूढ अर्थाने लौकिक स्थापत्य या सदरात करता येईल. या स्थापत्याला संकीर्ण वास्तू असेही म्हणता येईल. त्याची तोंडओळख या प्रकरणात करून देण्यात येत आहे. वस्तुतः महाराष्ट्राच्या कलेतिहासामध्ये अशा अनेक लहानसहान बाबींचे स्वतःचे असे स्थान आहे.

**नगररचना**

कौटिलीय अर्थशास्त्रामध्ये जनपद वसविण्याच्या बाबतीमध्ये असे स्पष्ट निर्देश दिले आहेत की, जाणीवपूर्वक वसाहती निर्माण कराव्यात, एक वसाहत १०० ते ५०० कुटुंबांची असावी, अशा स्थानांची सरहद्द निश्चित करताना नदी, जंगल, डोंगर यांसारख्या निसर्गदत्त उपलब्ध स्थानांचा उपयोग करावा, वसाहतविषयक वाढता क्रम देताना दहा गावांचे मिळून एक 'संग्रहण', दोनशे गावांसाठी मिळून एक 'कार्वटिक', चारशे गावांचे मिळून एक 'द्रोणमुख' व आठशे गावांचे मिळून एक 'स्थानीय' अशा लहानमोठ्या आकारांची शहरे असावीत,* नगरांसाठी त्यांनी विविध आकार सुचविले आहेत. मौर्यांच्या राजधानीचे सुंदर वर्णन मेगॅस्तिनेसच्या इंडिका या ग्रंथात आले आहे. सातवाहनांच्या राज्यात तटबंदी असलेली तीस शहरे होती, असे प्लिनी याने सांगितले आहे.[१] समराङ्गणसूत्रधार (अकरावे शतक) व अपराजितपृच्छा (बारावे शतक) यांमध्ये नगररचनेच्या नोंदी मिळतात. विशेषतः समराङ्गणसूत्रधार या ग्रंथात 'पुरनिवेश' म्हणजे शहर वसवणे यावर चर्चा केली असून अशा वसाहतीसाठी निवडावयाचा भूभाग, नगराचा होणारा विस्तार यांचा तपशील नोंदविला आहे. वसाहतीच्या आधारे त्यांची वैशिष्ट्यपूर्ण नावे दिली आहेत. या ग्रांथिक नोंदींबरोबर प्रत्यक्ष अभिलेखीय पुरावेही उपलब्ध होतात. अशा नोंदी कमी असल्या तरी लक्षणीय आहेत.

महाराष्ट्रात प्रारंभिक ऐतिहासिक काळापासून, विशेषतः सातवाहन काळापासून वसाहती झाल्याचे दिसते, किंबहुना महाराष्ट्राच्या नागरीकरणाची सुरुवात खऱ्या अर्थाने याच काळात झाली. या काळात 'तगर' (तेर), 'प्रतिष्ठान' (पैठण) 'भोगवर्धन' (भोकरदन), 'ब्रह्मपुरी' (कोल्हापूर), 'निधिनिवास' (नेवासे) अशा स्थानांचा मोठ्या प्रमाणामध्ये विकास झाला. पूर, नगर, कटक यांबरोबर विषय, भुक्ती, पथ, देश, ही स्वतंत्र प्रशासकीय केंद्रे म्हणून विविध राजवटींत विकसित झाली. वाकाटक काळामध्ये द्वितीय पृथ्वीसेनाच्या माहुरझरी ताम्रपटामध्ये तत्कालीन

ग्रामप्रशासन व्यवस्थेचे आदर्श चित्र रेखाटले आहे, तर 'वाशीम' (जिल्हा वाशीम), 'रामटेक' (जिल्हा नागपूर) हे वाकाटककालीन वसाहतींचे पुरावे होत. राष्ट्रकूट कृष्ण तिसरा यांच्या काळात कंधार (जिल्हा नांदेड) येथील शिलालेखात नगर किती जाणीवपूर्वक वसविले जात होते, त्याचा विकास कशा पद्धतीने करण्यात येई, याची अत्यंत तपशिलात नोंद दिली आहे. डॉ. शोभना गोखले यांनी काही प्रमाणामध्ये या शिलालेखाधारे राष्ट्रकूटकालीन कंधारचा शोध घेण्याचा प्रयत्न केला आहे.[२] राष्ट्रकूट राजांनी मण्यार नदीच्या काठावर सर्व बाजूंनी निसर्गतः संरक्षण लाभलेल्या भूभागावर आपली राजधानी वसविली. 'काळमेघ' या व्यक्तीने दिलेल्या दानाच्या प्रसंगी येथील अभिलेख खोदण्यात आला. त्यातील नोंदीवरून हे स्पष्ट होते की, राष्ट्रकूट राजा कृष्ण तिसरा याने या नगरात अनेक सोयी उपलब्ध करून दिल्या होत्या. हे शहर म्हणजे तत्कालीन नगररचनेचा एक वस्तुपाठ ठरावा. राष्ट्रकूट काळामध्ये लातूर, धारूर, वेरूळ ह्यांलगतचा प्रदेश, मान्यखेट येथे नागरी वसाहतीचा विकास निश्चितपणे झाला होता. पैठण व तेरसारख्या स्थानांना तर सातवाहनांपासून थेट शिलाहार-यादव काळापर्यंत वसाहतीचे सातत्य लाभले होते. याविषयीचा पुरावा तत्कालीन अभिलेख व उपलब्ध पुरातत्त्वीय वास्तुअवशेष देतात.

अशाच प्रकारे वसाहतरचनेचा एक पुरावा चालुक्यकालीन धर्मापुरी (जिल्हा बीड) येथील शिलालेख व वास्तुअवशेषांमुळे उपलब्ध आहे. दिनांक २३ जुलै ११३४ रोजी दिलेल्या दानलेखात तत्कालीन स्थानाचे वर्णन आले आहे, ते असे 'भूलोकमल्लसोमेश्वर' या चालुक्य राजाच्या काळात जगप्रसिद्ध अशी धर्मापुरी नावाची नगरी होती. ही नगरी म्हणजे पृथ्वीच्या कपाळावरील तिलकच होय. अनेक उंच प्रासाद येथे असून त्यावर मयूर विराजमान असत. गावात सुंदर बाजारपेठा असून त्यावरील रस्त्यांवरून रथ धावत असत. रस्ते लोकांनी गजबजलेले असत. प्रासादाच्या गच्चीवर नृत्यगान चालत असे. चालुक्यांची ही नगरी इंद्रनगरीशी स्पर्धा करणारी होती.'' हे वर्णन काव्यमय असले, तरी प्रत्यक्ष स्थानावर सर्वेक्षण केले, तेव्हा येथील उपलब्ध वास्तू आणि शिल्पावशेष तसेच शिलालेख (सहा शिलालेख) यांतून या स्थानाच्या संपन्नतेची व विस्ताराची कल्पना येते.[३] या प्रकारे लोणार (जिल्हा बुलढाणा), अंबाजोगाई (जिल्हा बीड), सगरोळी व अर्धापूर (जिल्हा नांदेड) येथे उपलब्ध झालेल्या अभिलेखीय नोंदी यादव, कल्याणीचे चालुक्य यांच्या काळात विकसित झालेल्या वसाहतींची साक्ष देतात. तसेच चारठाणा (जिल्हा परभणी) आणि कोल्हापूर येथे असलेल्या मंदिर वास्तुअवशेषांचा अभ्यास करताना यादव व शिलाहार काळात येथे झालेल्या वसाहतींची व नागरीकरणाची कल्पना येते. विविध अभिलेखीय नोंदी व ग्रंथांतील वर्णनांवरून असे स्पष्ट होते की, नगराच्या विकासात आज प्रमाण मानलेल्या अनेक बाबी तेव्हाही विचारात घेतल्या जात होत्या.

कंधार, धर्मापुरी, अंबाजोगाई या व अशा स्थानांवरील उपलब्ध शिलालेख पाहताना पुढील बाबींची नोंद मिळते. नगराला प्राकार असत, भव्य राजप्रासाद असे, याबरोबरच आराम स्थल (बागा), धर्मशाळा, पुण्यस्थळ, मठ, मंदिरे उभारली जात. जलाशयांची निर्मिती होई. तसेच विविध बाजारपेठा व मंडपीकांची उभारणी करत. शहराच्या विविध भागांत उन्हाळ्यामध्ये पाणीपुरवठा करणाऱ्या 'प्रप्पा' (पाट) असत, तर हिवाळ्यात सर्वसामान्यांना ऊब मिळावी म्हणून आंगठ्यांची (अग्निष्ठिकांची) सोय असे. याशिवाय गाईंना व जनावरांना चारा मिळावा (गोग्रास) याची काळजी घेतली जाई. राजविलासीनी पाटण अशी स्वतंत्र वसाहत असे.

## दुर्ग

कौटिल्याच्या अर्थशास्त्रामध्ये दुर्गरचना व त्यांचे विविध प्रकार दिले आहेत. तसेच 'मनुस्मृति' आणि 'महाभारत' यांमध्येही दुर्गांचे उल्लेख आहेत. 'अभिलाषितार्थ चिंतामणी'चा कर्ता सोमेश्वरदेव याने दुर्गांचे विविध प्रकार सांगितले आहेत. हा ग्रंथ अकराव्या शतकाच्या उत्तरार्धात निर्माण झाला. महाराष्ट्राच्या संदर्भात विचार करता यादवांची राजधानी ही प्रारंभी चंद्रादित्यपूर व नंतर देवगिरी या दुर्गांवर होती. कोल्हापूरच्या शिलाहारांचे वास्तव्य पन्हाळा किल्ल्यावर होते. महाराष्ट्रामध्ये किल्ल्यांची निर्मिती राष्ट्रकूट-चालुक्य काळापासूनच निश्चितपणे होत असावी.

दुसऱ्या तैल चालुक्याने अठ्ठ्याऐंशी किल्ले घेतले, असे मानगोळी येथील लेखात म्हटले आहे. सातारा परिसरात असलेले सामनगड, वैराटगड, वसंतगड, भूदरगड, पांडवगड, बावडा, चंदन-वंदन, खेळणा, रांगणा, नांदगिरी, पन्हाळा, इत्यादी किल्ले दुसरा भोजराजा याने बांधल्याची नोंद आहे. मयूरखंडासारखे इतर कित्येक डोंगरी किल्ले तेराव्या शतकाच्या पूर्वीचेच असावेत, यासारखी नोंद मु.ग.पानसे आपल्या ग्रंथात करतात.[४]

### जलाशय

नगर वसताना ज्या ठिकाणी निश्चित व कायम स्वरूपाचा पाणीपुरवठा उपलब्ध होईल, अशा ठिकाणाचा शोध घेऊन जलाशयाची निर्मिती केली गेली. महाराष्ट्रामध्ये कान्हेरी लेण्यांच्या परिसरात विविध पातळीवर कुंडांची निर्मिती करून जलप्रवाहाचे सुयोग्य नियोजन केल्याचे स्पष्ट होते. यासंदर्भात अनेक शिलालेखांत नोंदी उपलब्ध आहेत. वाकाटक काळात मनसर, मांढळ (जिल्हा नागपूर) ही स्थळे जलाशयाच्या काठावर विकसित झाली. वाकाटक राजा देवसेन याच्या हिस्सेबोरळा शिलालेखात म्हटल्याप्रमाणे वत्सगुल्मलगत (वाशीमलगत) चंद्रसरोवरची निर्मिती करण्यात आली. त्याचे नाव 'सुदर्शन' असेच ठेवले होते.[५] वाकाटक राजा द्वितीय पृथिवीषेण याने माहुरझरी येथे 'पृथिवीसमुद्र' या जलाशयाची निर्मिती केली. राष्ट्रकूट राजा कृष्ण तिसरा याने कंधारपूर (कंधार, जिल्हा नांदेड) येथे 'जगत्तुंगसमुद्र' या जलाशयाची निर्मिती केली, तर चालुक्य राजा विक्रमादित्य सहावा याच्या गणेशवाडी (तालुका निलंगा, जिल्हा लातूर) येथील शिलालेखात म्हटल्याप्रमाणे 'भीमसमुद्र' या सरोवराची निर्मिती केली.[६] तसेच या काळात 'कल्लुबर' या ठिकाणी अन्य एका जलाशयाची निर्मिती करण्यात आली. चालुक्य-यादवकाळात महाराष्ट्रामध्ये अर्धापूर, सगरोळी, माहूर (जिल्हा नांदेड) या स्थानांवर जलाशय निर्माण करण्यात आले होते. शिलालेखातील नोंदी आणि प्रत्यक्ष पुरातत्त्वीय सर्वेक्षण यांच्या आधारे हे स्पष्ट होते की, महाराष्ट्रात जाणीवपूर्वक जलाशय निर्माण करण्याची व त्याचा योग्य उपयोग करून घेण्याची परंपरा असून एक सातत्य याबाबत लाभले आहे.

प्राचीन जलसिंचनाच्या व शेतीच्या दृष्टीने ही बाब विशेष उल्लेखनीय ठरते. जलाशयाबरोबर सभोवताली बारवांचीही निर्मिती जाणीवपूर्वक होत होती. या काळामध्ये मंदिरांव्यतिरिक्त अन्य कितीतरी वास्तूंची निर्मिती मोठ्या प्रमाणात झाली. त्यांची नोंद आपण त्या-त्या स्थानावर बारकाईने सर्वेक्षण केल्यास मिळू शकते. उदाहरणार्थ भद्रावती (तालुका वडोदरा, जिल्हा चंद्रपूर) या ठिकाणी निर्माण करण्यात आलेला नवव्या शतकाच्या उत्तरार्धातील पूल हा ४० × २.३० मीटरचा असून पूल निर्मितीचे हे आदर्श उदाहरण मानावे लागते. माहूर (जिल्हा नांदेड) येथील भोजंता तलावाजवळ असाच एक पूल यादव काळात बांधलेला आहे, तर पैठण येथे असलेल्या लहान-मोठ्या पुलांचे उल्लेख खाडी (काजवे) म्हणून आले आहेत. याबाबत महानुभवीय साहित्यात नोंद आढळते.

### मानस्तंभ

तत्कालीन स्थापत्याचा आणखी एक उल्लेखनीय प्रकार म्हणजे मानस्तंभ किंवा कीर्तिस्तंभ होय. चारठाणा (जि.परभणी) येथील जैन मंदिराच्या परिसरात उभारलेला मानस्तंभ उत्कृष्ट असून यादव काळातील कीर्तिस्तंभ (ता.पैठण जि. औरंगाबाद) येथे उभा आहे. अशाच प्रकारचा पण तुलनेत अत्यंत साधा असणारा मानस्तंभ परळी (जिल्हा सातारा) येथे आहे. याशिवाय तत्कालीन काळात मोठ्या प्रमाणात आढळणाऱ्या कथापटांचाही उल्लेख समाजजीवन समजून घेण्यासाठी आपणाला करता येतो. असे कथापट एखाद्या वास्तूच्या अंगावर खोदलेले शिल्पपट असत. त्याची उत्कृष्ट उदाहरणे पवनार येथील वाकाटककालीन शिल्पपट, वेरूळच्या कैलास मंदिरात असलेले महाभारताचे व रामायणाचे कथापट ही आहेत, तर औंढा-नागनाथ येथील मंदिरावरील कथापट तसेच माणकेश्वर (जि.उस्मानाबाद) या मंदिराच्या पादपीठावर असलेले शिल्पपट हे उत्कृष्ट कथापटांचीच उदाहरणे आहेत. सुट्या स्वरूपामध्येही काही ठिकाणी असे शिल्प आढळते.

**स्मारकशिळा (वीरगळ)**

सातवाहन काळात नाणेघाट येथे प्रतिमागृहाची निर्मिती झाली. येथे एकूण आठ प्रतिमा असून त्यात सिमुख सातवाहन, नागनिका; श्रीसातकर्णि इत्यादी नावे आढळतात. असे प्रतिमागृह कुषाण सम्राट कनिष्ठ यांच्या काळात मथुरेजवळ माट या जागी निर्माण करण्यात आले होते.७ भासाच्या प्रतिमा या नाटकावरून स्पष्ट दिसते की, व्यक्तीच्या निधनानंतर अशा प्रकारची स्मारके उभारण्याची प्रथा होती. प्रतिमालेख नागार्जुनकोंडा येथेही मिळाले आहेत. भंडारा जिल्ह्यात पवनी येथे रुपीअम्माचा छायास्तंभ उपलब्ध झाला असून तो नागपूर येथील मध्यवर्ती संग्रहालयात हालविण्यात आला आहे. वसिष्ठपुत्र पुळुमावी याने आपल्या पट्टराणीच्या स्मरणार्थ छायास्तंभ उभारला होता. अशा छायास्तंभावर संबंधित व्यक्तीची प्रतिकृतीही कोरली जात असे. अशा प्रकारच्या स्मृतिस्तंभांना 'यष्टि' असेही म्हणत. यष्टीचा नाश केल्यास त्याला दंडाची शिक्षा 'मनुस्मृति'मध्ये सुचविली आहे. श्रीधरवर्मन याचा मध्य प्रदेशातील सागर जिल्ह्यात एरण येथील स्तंभलेख हा स्मृतिलेख असून श्रीधरवर्मन याचा सेनापती सत्यनाग याने एरण येथे धारातीर्थी पडलेल्या सेनेच्या स्मरणार्थ हा स्तंभलेख उभारला.८

महाराष्ट्रामध्ये दिसणाऱ्या वीरगळाची मूळ प्रेरणा ही सातवाहनकाळा इतकी मागे जाऊ शकेल. तरीही वीरगळ हे नाव मूलतः कन्नड भाषिक आहे. पूर्वज किंवा मृत योद्ध्यांच्या स्मारकशिळा उभारण्याची पद्धत भारतात सर्वत्र आढळते. असे असले, तरी पश्चिम भारतात व त्यातही राजपुताना, गुजरात, माळवा या भागांत ती मोठ्या प्रमाणात रूढ होती. गाईचे रक्षण करताना मरण पावलेल्या योद्ध्यांच्या स्मरणार्थ उभारलेल्या स्मारकशिळांना पश्चिम भारतामध्ये 'गोवर्धन' या नावाने, तर पूर्वजांच्या स्मृतिप्रीत्यर्थ उभारलेल्या स्मारकशिळांना 'पालिया' या नावाने संबोधतात. महाराष्ट्रात व कर्नाटकामध्ये अशा स्मारकशिळांना 'वीरगळ' अथवा 'कोदळ' म्हटले जाते. कांदळ याविषयी कै. राजवाडे याचे विवेचन उल्लेखनीय आहे.९ अशा वीरयोद्ध्याबरोबर सहगमन करणाऱ्या सतीच्या स्मरणार्थ सतीशिळाही उभारत. यावर सतीचा हात व क्वचित ठिकाणी तिची प्रतिमा कोरलेली असते. कोल्हापूर, सोलापूर, उस्मानाबाद, सातारा या जिल्ह्यांत मोठ्या प्रमाणामध्ये वीरगळ उभारल्याचे आढळते. सागरी युद्धात मरण पावलेल्या नाविक योद्ध्यांच्या स्मरणार्थ बोरिवलीजवळ एकसर येथे वीरगळ आहेत.

काही वेळा आध्यात्मिक कारणासाठी मृत्यूला सामोरे जाणाऱ्या व्यक्तिंच्या स्मरणार्थही स्मारकशिळा उभारीत. सोपाऱ्याजवळील निर्मल येथे बौद्ध व शैव साधूंच्या स्मरणार्थ शिळा उभारल्या आहेत. शं. गो. तुळपुळे ह्यांनी संपादित केलेल्या 'प्राचीन मराठी कोरीव लेख' या ग्रंथात वेळापूर (जिल्हा सोलापूर), राणेबेन्नूर (जिल्हा धारवाड) आणि मठगाव (जिल्हा सिंधुदुर्ग) येथील वीरगळांचा उल्लेख केला असून त्यांवर लेख आहेत. आळंदी (जिल्हा पुणे) येथे एका दाम्पत्याचा स्मारकलेख आहे, तर फुलंबरी (जिल्हा औरंगाबाद) येथील स्मारकलेख हा माधवकुमार नावाच्या योगी पुरुषाशी संबंधित आहे.१० असाच वीरगळावरील लेख सावरगाव (जिल्हा परभणी) येथेही आहे.

वीरगळावरील कोरीवकाम करण्याची सर्वसाधारण एक ठरलेली पद्धत दिसते. चौकोनी स्तंभाच्या आकाराच्या वीरगळावर मृताशी संबंधित देवदेवतांची शिल्पेही कोरलेली असत, तर सपाट शिळांवर एखादी इष्टदेवता कोरण्याची पद्धत दिसते. वीरगळ शिळेवरील प्रसंग अनुक्रमे तीन किंवा चार चौकोनांत विभागलेला असतो. तळाच्या चौकोनातील वर्ण्यविषय म्हणजे वीरांचे युद्ध व त्याचा मृत्यू, मधील चौकटीत त्याचे स्वर्गारोहण व वरील चौकटीमध्ये वीर स्वर्गात करीत असलेली ईशपूजा; यांप्रमाणे एकूण दृश्ये चित्रित केलेली असत. थोडक्यात, वीरगळ म्हणजे वीर पुरुषाचा एक संक्षिप्त चित्रपट असतो. यातून विशिष्ट घटनेची स्मृती जतन करण्याचा प्रयत्न असतो. अनेक गावांत आढळणारे वीरगळ हे गोरक्षण करणे किंवा संकटसमयी मंदिरासारख्या एखाद्या वास्तूचे संरक्षण करणे, प्रसंगी ग्रामरक्षण करणे अशा अनेकविध हेतूंनी हौतात्म्य प्राप्त झालेल्या घटनांशी संबंधित असतात.

**मठ**

अमरकोशातील व्याख्येनुसार 'मठ' म्हणजे छात्र वगैरेंचे निवासस्थान. सामान्यतः संन्यस्त वृत्तीने राहणारे उदाहरणार्थ ब्रह्मचारी भिक्षुक, साधू, स्त्री-पुरुष यांचे वास्तव्य मठात असे. वेगवेगळ्या संप्रदायांचे स्वतंत्र मठ असत. केवळ आध्यात्मिक केंद्र म्हणूनच नव्हे, तर एक विद्यालय, न्यायपीठ, विश्वासाने ठेव ठेवण्याची जागा नीतिदर्शक केंद्र म्हणून याला महत्त्व प्राप्त झाले. महाराष्ट्रात अगदी प्राचीन काळापासून गुरुकुल परंपरा अस्तित्वात असली, तरी एक संस्था म्हणून तिचा विकास उत्तर काळात झाला. साधारण दहाव्या ते तेराव्या शतकामध्ये सार्वत्रिकपणे अशा मठांची उभारणी झाली असे दिसते. मध्ययुगाचा काळ हा राजकीयदृष्ट्या सामंतशाहीचे आणि धार्मिकदृष्ट्या सिद्धसाधकांचे युग होते. याचा परिणाम म्हणून एकछत्री साम्राज्याच्या लयाबरोबर सुरू झालेली विघटन प्रक्रिया व लहानमोठ्या सामंतांचा विकास होय. सामंतांच्या सिद्धसाधकांचा वरदहस्त मिळविण्यासाठी असलेल्या मानसिकतेतून या मठस्थापत्याचा विकास होत गेला. मध्ययुगीन मठांचा उल्लेख महानुभाव साहित्यात आढळतो. हे मठ प्रारंभिक मठांप्रमाणे गिरीकपारींत, निसर्गाच्या सान्निध्यात नसून ते गावाच्या मध्यवस्तीत उभारले जात. मठाच्या स्थापत्य प्रकारावरून तसेच उपयुक्ततेवरून पाषाणमठ, काष्ठमठ, शास्त्रमठ, राजमठ अशा संज्ञा स्थानपोथीतून आल्या आहेत. महाराष्ट्रामध्ये बाराव्या-तेराव्या शतकात उभारण्यात आलेल्या अशा वास्तूंचा उल्लेख तत्कालीन शिलालेखांतसुद्धा मिळतो. मंदिराशिवाय कीर्तन, मठ, मढी, प्रासाद, गृह, धर्मस्थळ, पुण्यस्थळ, घटिकास्थान अशांसारखे शब्द प्राचीन मराठी कोरीव लेखांतून आले आहेत. ह्या सर्व संज्ञा मंदिरासाठी उपयोगात येत नव्हत्या. कलचुरी काळातील 'मत्तमयुरी' हा शैवपंथीयांचा मठ आठव्या शतकातील असावा. याची चर्चा वा.वि.मिराशी यांनी आपल्या ग्रंथात केली आहे.[११] कल्याणीचा चालुक्य राजा सोमेश्वर तृतीय याच्या काळातील 'मुरारी मठ' हा धर्मापुरी (जिल्हा बीड) येथे आहे.[१२] याच वास्तूचा उल्लेख देमरस हा दुसरा चालुक्य अधिकारी महाग्रहार (वेदाध्ययन केंद्र) असा असतो. शिलाहार काळातील कौतुकमठीची नोंद मिळते.[१३] या मठास जोडून पाठशाळा व अन्नछत्र असे. यादव नृपती सिंघण याचा पाटण येथील लेख या दृष्टिने उल्लेखनीय आहे. यात भास्कराचार्यांच्या विद्यालयाचा उल्लेख आहे, तर पैठण येथील सोमेश्वरदेवाच्या काळातील लेखात पैठणच्या 'सस्त्रमठा'ची (शास्त्रमठ) नोंद आहे.

मंदिरापेक्षा वेगळ्या असलेल्या वास्तुविधानांचा विचार करता यांची तीन गटांत वर्गवारी करता येते. प्रथम गटामध्ये असलेल्या वास्तू केवळ एक मंडप व त्यास असलेले मुखमंडप या स्वरूपाच्या आहेत. एखाद्या मंदिराच्या प्राकारांतर्गत असलेल्या किंवा स्वतंत्र अस्तित्व असलेल्या या वास्तू आहेत. देवगाव (जिल्हा औरंगाबाद) येथील चावडी ही वास्तू, टाकळीभान (जिल्हा अहमदनगर) येथील विठ्ठल मंदिराची वास्तू, डोमेगाव (जिल्हा अहमदनगर) येथील उंचमठ म्हणून ओळखली जाणारी वास्तू तसेच गंगाखेड (जिल्हा परभणी) येथील लक्ष्मीनारायण मंदिर म्हणून ओळखली जाणारी वास्तू, घोटण (जिल्हा अहमदनगर) येथील मल्लिकार्जुन मंदिरातील बळीराजा मंदिराची वास्तू व लोणार (जिल्हा बुलढाणा) येथील दैत्यसूदन मंदिर प्राकारातील वास्तू ह्यांची या गटात वर्गवारी करता येते. यांचा उपयोग प्रामुख्याने विशेष प्रकारच्या उपासना, ध्यानधारणा, अध्ययन व अध्यापन केंद्र, वेदपठण, अनुष्ठाने यांसाठी होत असावा. गटातील दुसऱ्या वास्तू ह्या मंदिराच्या परिसरातील दुय्यम वास्तू नाहीत, तर मोठे सभागृह, मंडप त्याचा मुखमंडप आणि परिसरात एखादे लहान मंदिर अशा स्वतंत्र अस्तित्व असलेल्या वास्तू आहेत. या स्वरूपाच्या वास्तूंत धर्मापुरी (जिल्हा बीड) येथील तुकाईदेवी मंदिराचा विशेषत्वाने उल्लेख करावा लागले. चालुक्यकालीन अभिलेखात 'मुरारी मठ' म्हणून या वास्तूचा उल्लेख आढळतो. या मठासाठी म्हणून विशेष प्रकारची दाने व वृत्ती विविध व्यापारी श्रेणींच्या वतीने दिल्याची नोंद अभिलेखात आहे. यावरून तत्कालीन वेदाध्ययन केंद्र 'महाग्रहार' असेच याला म्हणता येईल. यात भव्य बंदिस्त मंडप, समोर लहानसे गर्भगृह, त्यात महिषासुरमर्दिनीची मूर्ती आणि बाहेरील बाजूस आयताकार

अर्धमंडप व त्याच्या दोन्ही बाजूंना लहान उपगृहे आहेत. या वास्तूलगत एक लहान आकाराचे त्याच काळात बांधलेले स्वतंत्र छोटे मंदिरही आहे. अशा वास्तू शुष्कसांधी वास्तू प्रकारात मोडतात. याचे वितान हे समतल वितान आहे. मानूर (जिल्हा बीड) येथे अशी उल्लेखनीय वास्तू आहे.

तिसऱ्या गटामध्ये प्रामुख्याने निवास व्यवस्थाही आढळते हे विशेष. एका अर्थाने या वास्तू म्हणजे तत्कालीन गृहरचनेचे एक विकसित स्वरूप आहे. अशा वास्तू परभणी जिल्ह्यातील परभणी व वालूर या ठिकाणी आहेत. विहामांडवा (जिल्हा औरंगाबाद) आणि चकलांबा (जिल्हा बीड) या ठिकाणी आढळलेली वास्तू ही मठस्थापत्य या प्रकारातील सर्वाधिक विकसित झालेली वास्तू असून ती तेराव्या शतकातील आहे. चकलांबा येथील वास्तूचे स्वरूप पाहता या मठाची असलेली तत्कालीन प्रतिष्ठा स्पष्ट होते. गावाच्या मध्यवस्तीमध्ये तयार केलेल्या एका उंचवट्यावर (जोत्यावर) ही वास्तू असून मध्यभागी मोठे मैदान राखून त्याच्या तिन्ही बाजूंना सलग असे मंडप उभारले आहेत. समोरील भागात एक मोठे सभागृह (भांडारगृह), त्यानंतर एक लहानसे पण पूर्ण विकसित मंदिर, त्यालगत मुख्य मठाधिपतीची नेहमी बसण्याची खोली आणि त्यानंतर पुन्हा एक प्रशस्त असे सभागृह व या सर्वांना सांधणारा मोठा आयताकार मुखमंडप असे या वास्तूचे स्वरूप असून, वास्तूत असलेल्या मुख्य मैदानातच एक आड आहे. ही वास्तू उभारताना मध्यभागी पूर्व-पश्चिम १० मीटर व उत्तर-दक्षिण २५ मीटर असे खुले मैदान राखून ठेवले आहे. यावरून या वास्तूच्या भव्यतेची कल्पना यावी. राजसत्तेचे प्रतीक म्हणून या वास्तूच्या चारही कोपऱ्यांत बाहेरील बाजूने चार बुरूज उभारण्यात आलेले होते.[१४] जवळ असलेल्या अंबाजोगाई येथील यादव सेनापती खोलेश्वर याच्या काळातच या वास्तूचा विकास झाला असावा. यांसारख्या वास्तू निश्चितपणे रूढ अर्थाने मंदिरस्थापत्यापेक्षा काहीशा वेगळ्या आहेत.

**बारव स्थापत्य**

महाराष्ट्राच्या जलव्यवस्थापनात असाधारण महत्त्व असलेल्या पायविहिरी, बारव स्थापत्य यांचा अभ्यास फारसा झालेला नाही. एका विशिष्ट कालखंडामध्ये मंदिरांची उभारणी आपल्याकडे फार मोठ्या प्रमाणात झाली. सामान्यपणे यादवशैलीची (हेमाडपंती) म्हणून अशी मंदिरे ओळखली जातात. याच काळात बारव स्थापत्याची निर्मितीही मोठ्या प्रमाणात होत होती.[१५] डॉ. ए. व्ही. नाईक यांनी आपल्या प्रबंधात याविषयीची काहीशी नोंद घेतली आहे. असे असले तरी प्राचीन साहित्य, आद्य मराठी वाङ्मय आणि रूढ मराठी बोली भाषा यांत जलाशयाला अनेक पर्यायी शब्द रूढ आहेत. अगदी प्रारंभिक काळात लयननिर्मितीबरोबरच 'पाणीयपोढी' किंवा 'पाणपोढी' म्हणजे पिण्याचे पाणी साठविण्याची टाकी आणि 'न्हानकोढी' म्हणजे स्नानासाठी व अन्य उपयोगासाठी लागणाऱ्या पाण्याचा साठा करण्यासाठी विविध आकारांच्या टाक्या खोदण्यात आल्या. किल्ल्याची निर्मिती होत असताना सर्वप्रथम निश्चित जलस्रोताचा शोध घेऊन आवश्यक त्या ठिकाणी टाक्या व कूप तयार केल्याचे दिसतात. गोदावरी, कृष्णा, मांजरा, चंद्रभाग अशा नद्यांच्या परिसरात ज्या ठिकाणी वसाहती निर्माण झाल्या, त्या ठिकाणी प्रामुख्याने घाट बांधण्यात आले. निसर्गतः उपलब्ध नदीच्या काठाचा योग्य उपयोग करून घेण्याच्या दृष्टीने अशा वैशिष्ट्यपूर्ण घाटांची निर्मिती सातवाहन काळापासून होत असावी. अन्य स्थानांवर नगरे वसवताना मात्र भूगर्भातील जलाशयाचा शोध घेऊन विविध प्रकारचे आड, विहिरी, बारव व पोखरणी यांची निर्मिती करण्यात आली.

दक्षिण भारतामध्ये रामेश्वरसारख्या जंबूद्वीपावर अनेक तीर्थे व पुष्करिणी यांची निर्मिती जाणीवपूर्वक झाली. केवळ रामेश्वर मंदिरामध्ये २२ बावी खोदण्यात आल्या. महाराष्ट्रामध्ये लोणार (जिल्हा बुलढाणा) येथे उल्कापातातून निर्माण झालेल्या विवराच्या परिसरात अनेक बारवांची निर्मिती करण्यात आली. विविध राजवटींतील प्रमुख स्थाने व तीर्थक्षेत्रे उदाहरणार्थ त्र्यंबकेश्वर, परळी-वैजनाथ, औंढा-नागनाथ, माहूर, तुळजापूर, कोल्हापूर अशा ठिकाणी अनेक कुंड, कल्लोळ यांची निर्मिती झाली. या स्थानांवरील जनसमूहाची पाण्याची गरज भागविण्याच्या दृष्टीने अशा वास्तूंची निर्मिती होत असतानाच पुण्यप्राप्तीविषयक संकल्पनाही जनमानसात रुजविली गेली.

यातून लोणार, चारठाणा, ईडोळी, सिंदखेडराजा, पिंगळी इत्यादी ठिकाणी प्रशस्त बारवांची निर्मिती झाली. एका मोठ्या बारवेच्या बांधकामासाठी घ्यावे लागणारे परिश्रम हे एका मंदिर संकुलाची उभारणी करता येईल एवढे असत. बारवेच्या संदर्भामध्ये त्यांचे पावित्र्य जपण्याच्या दृष्टीने अनेक लोककथा रूढ झाल्याचे विविध स्थलमाहात्म्यांतून दिसते व पौराणिक संदर्भही याला पुष्टी देतात. बारव निर्मितीचे तंत्र आणि त्यांचे आकार-प्रकार यांविषयी प्राचीन ग्रंथांतून उल्लेख आढळतात. श्री. भुवनदेव यांनी लिहिलेल्या अपराजितपृच्छा (सन ११७५ ते १२५०) या ग्रंथात 'वापीकूपतडशगादिनिर्णयो नाम' या मथळ्याचे प्रकरण आहे. यात म्हटल्याप्रमाणे नगराच्या बाहेर व आत निरनिराळ्या प्रकारचे जलाशय असावेत. विहीर, वापी हे कूपाचे प्रकार होत. कुंड म्हणजे तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी स्नानासाठी बांधलेले मोठ्या आकाराचे पण उथळ हौद होत. कूपाचे दहा, वापीचे चार, कुंडाचे चार व तडागाचे सहा प्रकार या ग्रंथात दिले आहेत. नंदा म्हणजे एक मुख व तीन कूट असलेली वापी. मुख म्हणजे विहिरीच्या पाण्याच्या पातळीपर्यंत जाण्यासाठी विहिरीस असलेला प्रवेश मार्ग, तर कूट म्हणजे चौरसाकृती खोली, मंडप किंवा माड होय. हे आकाराने चौरस किंवा आयताकृती असतात. नंदाच्या नंतर भद्रा (दोन मुख व सहा कूट), जया (तीन मुख व नऊ कूट), विजया (चार मुख व बारा कूट) असे प्रकार दिले आहेत. याज्ञवल्क्य, कात्यायन यांनी वापी, कूप तडाग यांच्या व्याख्या दिल्या आहेत.

नगररचनेचा विचार करता बारवेला स्वतंत्र असे स्थान होते. बृहत्कल्पसूत्रभाष्य या ग्रंथात याविषयी नोंद आढळते. ज्या गावात मध्यभाग सखल व इतर भाग उंच आहे, ज्या गावात मध्यभागी बारव आहे आणि तेथील घरांची रचना वर्तुळाकार आहे अशा वस्तीला 'उत्तन मल्लकाकार' असे संबोधले जाई. बारव निर्मितीची प्रेरणा स्मृतिग्रंथांनी व पुराणांनी सतत दिली आहे. बारव स्थापत्याच्या विकासाबरोबरच त्यातील देवताविषयक संकल्पनाही स्पष्ट होत गेल्या. कंधार येथील राष्ट्रकूटकालीन विहिरीमध्ये देवता ठेवण्यासाठी रिक्त जागा मुद्दाम ठेवली असली, तरी देवकोष्ठ बांधलेले नाही. सप्तमातृका किंवा नागदेवता यांची स्थापना विहिरीलगत करणे येथपासून अष्टदिक्पाल तसेच विष्णूच्या चोवीस रूपांची स्थापना बारवेत करणे यांसारख्या बाबींचा विकास झाला. जागजी (जिल्हा उस्मानाबाद), पिंगळी (जिल्हा परभणी) या ठिकाणी अशा मूर्तींची स्थापना झाली. ईडोळी (जिल्हा जालना) येथे एकादशरुद्रमूर्तीची स्थापना करण्यात आली, तर लोणार येथील बारवेत आज मूर्ती नसल्या, तरी तेथे असलेल्या देवकोष्ठावरून एकूण एकतीस देवतांची स्थापना झाली असावी असे दिसते.

मध्ययुगीन बारवांच्या संदर्भामध्ये शेषशायी विष्णुमूर्ती ही प्रमुख देवता असल्याचे स्पष्ट होते. गुजरातमधील अनहिलवाह-पाटण जवळील 'राणी की बाव' या ठिकाणी एकूण सात मजली विहीर साळुंकी वंशाने निर्माण केली. ज्यात २५० पेक्षा अधिक देवतामूर्ती होत्या. एवढी मोठी महाराष्ट्रात आढळत नाही. असे असले तरी सिंदखेडराजा येथील पुतळा बारव किंवा त्र्यंबकेश्वर येथील अठराव्या शतकातील कुशावर्त हे तीर्थ तीन कूट व एक प्रवेश असलेले उल्लेखनीय कुंड आहे.

महाराष्ट्रातील बारवांची वर्गवारी अनेक प्रकारे केली जाऊ शकते. उदाहरणार्थ त्यांचे रूढ नाव, त्यांचे विधान, त्यांचा उपयोग, त्यांतील देवकूलीकांची संख्या इत्यादी बारवांचे स्थापत्यशास्त्रीय वैशिष्ट्य, त्यांचे विधान व प्रवेश (मुख) विचारात घेता त्यांची वर्गवारी पुढीलप्रमाणे करता येईल.

**कुंड :** कुंड म्हणजे तीर्थस्थानाच्या ठिकाणी स्नानासाठी बांधलेला मोठ्या आकाराचा उथळ हौद. यांचा आकार साधारणतः २ ते २.५ मीटर खोल व १० चौरस मीटर रुंद असा आढळतो. तेर (जिल्हा उस्मानाबाद) येथे राज्य पुरातत्त्व विभागाने केलेल्या साफसफाईच्या वेळी आढळलेले कुंड हे महाराष्ट्रातील सर्वांत प्राचीन कुंड असून ते विटांनी बांधलेले आहे. ८.३० चौ.मी. आकाराच्या या कुंडाची तळापासून उंची २.७० मी. आहे व ९० से.मी.चा एक टप्पा असे तीन टप्पे यात आहेत. इ.स.च्या पहिल्या शतकातील सातवाहन काळातील हे कुंड आहे. तर विदर्भातील मांढळ (जिल्हा नागपूर) येथे चौथ्या शतकातील विटांनी बांधलेले कुंड उपलब्ध झाले आहे. हे वाकाटककालीन असून वाकाटक राजा दुसरा प्रवरसेन व दुसरा पृथिवीषेण यांचे ताम्रपट येथे मिळाले आहेत. कुंड या

प्रकारात येणाऱ्या वास्तूंची उदाहरणे होट्टल, मुखेड, माहूर (जिल्हा नांदेड), पाली (जिल्हा बीड), त्र्यंबकेश्वर (जिल्हा नाशिक) इत्यादी ठिकाणी आहेत. मुद्दाम तयार केलेल्या जलाशयालगतसुद्धा प्रसंगी कुंडांची निर्मिती करण्यात येई.

**विहीर :** एक प्रवेश असलेली वापी म्हणजे विहीर. याला पायविहीर असेही म्हणतात. यामध्ये वर्तुळ, अष्टकोन व चौरस असे आकार आढळतात. बहाद्दरपूरा, (तालुका कंधार, जिल्हा नांदेड) येथे राष्ट्रकूटातील पुरातत्त्व क्षेत्र असलेल्या भागात सन १९९५ मध्ये रस्त्याचे काम चालू असताना चौरस आकाराची एक पायविहीर उघडकीस आली. तळणी (तालुका हदगाव, जिल्हा नांदेड) येथे असलेली विहीर विटांनी बांधलेली असून प्रवेशासाठीच्या पायऱ्या दगडी चिऱ्यांच्या आहेत. यामध्ये दोन देवकोष्ठ आहेत. वर्तुळाकार विहिरीची उदाहरणे आपणाला कंधार (जिल्हा नांदेड), चकलांबा (जिल्हा बीड), पानगाव (जिल्हा लातूर) या ठिकाणी मिळतात. अष्टकोनी आकाराची विहीर धर्मापुरी (जिल्हा बीड) व लासूर (जिल्हा औरंगाबाद) या ठिकाणी आहे.

**आड :** द्वारहीन जलाचा संग्रह म्हणजे कूप. यालाच आड असे म्हणता येईल. ही केवळ मर्यादित उपयोगासाठी बांधलेली वास्तू असून याला प्रवेशमार्ग नसतो. आडाचा आकार साधारणपणे एक मीटरपेक्षा कमी व्यासाचा असतो. यामध्ये प्रामुख्याने चौरस, अष्टकोनी आकार आढळतात. कंधार येथे अष्टकोनी आकारातील आड असून त्याची रचना वैशिष्ट्यपूर्ण आहे. एखादी टोपली विणावी त्याप्रमाणे दगडी शिळांची रचना असलेला हा आड खालील बाजूस निमुळता होत जातो. मुखेड (जिल्हा नांदेड) येथील चालुक्यकालीन दाशरथेश्वर मंदिराजवळील चौरस आड ९०×९० सें.मी.चा आहे. अर्धापूर, माहूर, मुकुट (जिल्हा नांदेड) या यादवकालीन स्थानांवर असे आड आहेत.

**कल्लोळ :** कुंड या वास्तू प्रकारचे थोडे विकसित स्वरूप म्हणजे कल्लोळ. हे प्रामुख्याने मंदिराच्या समोर किंवा प्राकारात बांधलेले असतात. याला बारवेसारखे प्रवेशमार्ग व टप्पे असतात, पण बारवेच्या तुलनेत आकार व विस्तार लहान असतो. हतनूर (जिल्हा परभणी) येथील कल्लोळ हे यादवकालीन असून शके १२२३ मध्ये (सन १३०१) या स्थानाचा जीर्णोद्धार केल्याचा लेख उपलब्ध आहे.

**बारव :** कुंड हा मुळात या वास्तुप्रकाराचा आधारभूत घटक ठरतो. या कुंडाच्या वर विशिष्ट पायऱ्या ठेवून एक पटांगण–सोपान (टप्पा) ठेवतात. त्यानंतर दुसरा व तिसरा सोपान ठेवून झालेला विस्तार बारव स्थापत्यात पाहावयास मिळतो. थोडक्यात, एकात एक लहान होत जाणारे कुंड असे याचे स्वरूप असते.[१६] बारवेत विविध देवतांची स्थापना केली जाते. त्यासाठी असलेली देवकोष्ठे सर्वांत वरच्या सोपानावर स्वतंत्र अशी किंवा अगदी संरक्षक भिंतींत आणि प्रवेश मार्गाच्या दोन्ही बाजूंना ठेवतात. बारवेत प्रामुख्याने चौरस आकार आढळतो. आयत व क्वचित अष्टकोनी आकार पाहावयास मिळतात. बारवेस एक ते चार मुख–प्रवेश असतात. एक प्रवेश व चौरस आकार असलेल्या एरगी (तालुका देगलूर, जिल्हा नांदेड) येथील बारवेत तीन टप्पे आहेत. आयत आकाराची बारव मुखेड (जिल्हा नांदेड) येथे असून १६×१०.५० मी. आकाराची ही एक वैशिष्ट्यपूर्ण बारव आहे. बारवेच्या प्रवेशावर असलेला सज्जा आज अस्तित्वात नाही. विविध सोपानांवरून खाली उतरण्यासाठी असलेल्या पायऱ्या व एकूण रचना पाहता कर्नाटकातील हंपी (जिल्हा बल्लारी) येथील उत्खननात मिळालेल्या बारवेशी हिचे साम्य आढळते. या परिसरातील शिलालेख व अन्य वास्तू पाहता ती बारव चालुक्यकालीन असून ती बाराव्या शतकातील आहे असे म्हणता येते. एक प्रवेश असलेली व अष्टकोनी आकाराची बारव मरळक (खु.) (जिल्हा नांदेड) येथे असून या बारवेलगत दगडी हौद आहे. बारवेतील पाणी रहाटाद्वारे उपसून ते प्रणालीद्वारे हौदात जमा केले जाई. मोटेची व्यवस्था असलेली उत्कृष्ट अशी चौरसाकार बारव येवती (तालुका बिलोली, जिल्हा नांदेड) येथे आहे. मंचर (जिल्हा पुणे) या ठिकाणी शिलालेख असलेली चौरसाकार बारव आहे, तर दोन प्रवेश असलेल्या बारवेमध्ये सिल्लोड (जिल्हा औरंगाबाद), गुरसाळे (जिल्हा सातारा), पुरंदर (जिल्हा पुणे) येथील बारवा उल्लेखनीय असून या प्रकारातील सर्वांत चांगली बारव जागजी (जिल्हा

उस्मानाबाद) येथे आहे. २४ चौ.मी. आकाराची ही बारव एकूण पाच टप्प्यात पूर्ण केलेली आहे. प्रथम सोपान आहे, त्याच ठिकाणी भिंतीलगत चारही बाजूंना मिळून एकूण २४ देवकोष्ठांची निर्मिती करण्यात आली आहे. यात विष्णुमूर्ती असून देवकोष्ठांचे शिखर द्राविड व भूमीज शैलीतील आहे.

**तीन प्रवेशयुक्त बारव :** वस्तुतः बारव या स्थापत्य प्रकारामध्ये चार प्रवेश हा सर्वसामान्य प्रकार आढळतो. पण काही वेळा उपलब्ध क्षेत्र व स्थानिक काही कारणांमुळे तसेच पाण्याच्या कमीअधिक उंचीवरील उपलब्धतेमुळे मूळ आराखड्यात काही बदल केल्याचे दिसतात व यातूनच तीन प्रवेशयुक्त बारवांची निर्मिती झाली असावी. अशा बारवा एरगी (तालुका देगलूर, जिल्हा नांदेड), एरंडेश्वर (जिल्हा परभणी), जालना (जिल्हा जालना), तोंडापूर (जिल्हा जळगाव), कातरखटाव (जिल्हा सातारा), मानूर (जिल्हा बीड), वेळापूर (जिल्हा सोलापूर) येथे आहेत.

**चार प्रवेशयुक्त बारव :** बारव स्थापत्यात सर्वत्र रूढ असलेला हा प्रकार असून माहूर (जिल्हा नांदेड), अंबड (जिल्हा जालना), वालूर व गौर (जिल्हा परभणी) येथे अशा बारवा आहेत. या स्थापत्य प्रकारातील चांगली बारव पिंगळी (जिल्हा परभणी) येथे असून २५.३० चौ.मी. आकाराची ही चौरस बारव आहे. सहा पायऱ्यांनंतर प्रथम सोपान लागतो. यात एकूण पाच सोपान असून प्रथम सोपान ९५ सें.मी. रुंद आहे. दुसरा व तिसरा सोपान ८८ सें.मी. रुंदीचा आहे. बारवेस असलेल्या संरक्षक भिंतीनंतर सुरू होणाऱ्या प्रथम सोपानावर प्रत्येक बाजूस दोन असे एकूण आठ देवकोष्ठ बांधलेले आहेत. बारवेलगत त्रिदल पद्धतीने मंदिर असून या बारवेच्या निर्मितीस नाथपंथी तंत्रसाधकांचे प्रोत्साहन असावे, असे येथील शिल्पपट व 'मकरध्वज जोगी ७०००' या लेखावरून वाटते. शाक्त पंथीयांच्या पंचमकार साधनेत मैथुनाचीही नोंद आहे. 'जलकेणी' जलक्रीडा यासाठीसुद्धा कदाचित बारवेचा उपयोग होत असावा. तंत्रदृष्ट्या ही बारव अतिशय प्रमाणबद्ध व रेखीव आहे.

याच प्रकारातील सिंदखेडराजा (जिल्हा बुलढाणा) येथील बारव उल्लेखनीय आहे. बारवेवरील विपुल शिल्पांकनामुळे ही 'पुतळा बारव' या नावानेही ओळखली जाते. अलंकरणाच्या दृष्टीने पाहता महाराष्ट्रातील बारवेची ही स्वामिनी ठरते. १५.७० चौ.मी. आकारातील ही बारव एकूण सात टप्प्यांत पूर्ण केली आहे. मधोमध असलेले कुंड व त्यावर विकसित होत जाणारे टप्पे, मुख्य सोपानानंतर असलेली संरक्षक भिंत व चारही बाजूंनी असलेला प्रवेश अशी याची रचना आहे. संरक्षक भिंत उभारताना एक सलग गजथर उभारून त्यावर विविध देवदेवतांसाठी स्वतंत्र अशी २४ देवकोष्ठे निर्माण केली आहेत. याशिवाय विविध देवता, देवांगना, देवानुचर, देवता परिवार व असुर यांचे शिल्पांकन येथे आहे. विविध प्रकारची भौमितिक नक्षी, अश्वारूढ योद्धे, त्यांच्या कवायती यांशिवाय हंसथर व नृत्यांगना येथे पाहावयास मिळतात. बारवेची एक बाजू निखळलेली आहे. देवकोष्ठ उभारताना विकसित मंदिराची लहान प्रतिकृतीच साकार करण्याचा प्रयत्न केला आहे. ही तंत्रदृष्ट्या एक परिपूर्ण बारव असून, बारवेच्या रचनेत भद्र, प्रतिभद्र, सौभद्र यांचा उपयोग केला आहे. या बारवेची निर्मिती साधारणपणे बाराव्या शतकाच्या उत्तरार्धात झाली असावी.

ईडोळी (तालुका परतूर, जिल्हा जालना) येथील बारव ३१ चौ.मी. आकाराची आहे. चार प्रवेश व पाच सोपान असलेली ही बारव असून मुख्य सोपानावर असलेली संरक्षक भिंत २.५० मी. उंचीची आहे. या भिंतीमध्ये अनेक देवळ्यांची निर्मिती केली आहे. देवतांसाठी बांधलेली ही लहान मंदिरे असून गर्भगृह (१.३० चौ.मी.) व त्यापुढे मुखमंडप (१.५० चौ.मी.) आहे. या मंदिरासमोर प्रशस्त सोपान (पटांगण) आहे. एकूण १६ मंदिरे व १० देवकोष्ठ या बारवेत आहेत. बारवेतील मंदिरावर विटांत बांधलेले शिखर होते हे विशेष. बारवेच्या एकूण बांधकामाची उंची नऊ मीटर आहे. बारव स्थापत्याच्या दृष्टीने बारवेची रचना उत्कृष्ट आहे, तथापि काही स्थानिक अडचणींमुळे सगळ्यात शेवटच्या टप्प्यातील कुंड तंत्रदृष्ट्या परिपूर्ण वाटत नाही. या कुंडाची रचना करताना दगडी दट्टे, तोडशिळा तसेच गळबंध यांचा पुरेसा उपयोग योग्य जागी न केल्यामुळे येथील काही भाग निखळला आहे.

**मंडपयुक्त बारव– जलमांडवी**

बारव स्थापत्यामध्ये विविध आकार व प्रकार आढळतात. तसेच बारवेत कूट किंवा मंडपपण दिसतात. लोकभाषेत अशा बारवांना 'माड' म्हणतात. बारवेची पुढील विकसित अवस्था म्हणजे कूट, भिट्ट, सज्जायुक्त मंडप होय. हे चौरस आकारातील व बहुतांश आयताकार असतात. बारवेत जसे एक ते चार प्रवेश आढळतात. तसेच एका बाजूपासून सर्व बाजूंनी विकसित झालेला मंडप आढळतो. महानुभाव साहित्यात अशा बारवांना 'जलमांडवी' म्हटले आहे. सामान्य बारवेच्या बांधकामापेक्षा हे काम जास्त खर्चीक असते. बारवनिर्मितीची हौस व या स्थापत्याची उपयुक्तताच यातून स्पष्ट होते.

**एकमंडपयुक्त बारव :** अशा बारवा महाकाळा (जिल्हा जालना), मुदखेड (जिल्हा नांदेड), उपळा (जिल्हा उस्मानाबाद) या ठिकाणी आहेत. लोणी भापकर (तालुका बारामती, जिल्हा पुणे) येथे या प्रकारातील एक चांगली बारव आहे. या बारवेत एक मंडप असून २८ देवकोष्ठ आहेत. मंडपाच्या स्तंभावरील व चौथऱ्यावरील अलंकरण लक्षणीय आहे.

**दोन मंडपयुक्त बारव :** या प्रकारातील उल्लेखनीय बारव अंबड (जिल्हा जालना) येथे आहे. ती कावंदी या नावाने ओळखली जाते. बारवेचा आकार पूर्व–पश्चिम २३.४० मी. व उत्तर–दक्षिण १९.८० मी. आहे. या बारवेस तीन टप्पे आहेत. उत्तर–दक्षिण बाजूंना दोन स्वतंत्र मंडप बांधलेले असून बारवेच्या उत्तर बाजूस असलेला मंडप हा खालील मुख्य कुंडापर्यंत पुढे आलेला आहे. दक्षिण भिंतीतील मंडप आयताकार आहे. या रचनेचे मुख्य वैशिष्ट्य म्हणजे दोन्ही मंडपांच्या पातळ्यांमध्ये ८० सें.मी.चा फरक असून बारवेत वेगवेगळ्या पातळ्यांवर पाणी असताना त्याचा उपयोग करणे शक्य होई. तसेच उत्तर बाजूकडील मंडपातील अगदी शेवटच्या कुंडात असलेले पाणी उसपून घेणे शक्य होई. या बारवेचे जतनविषयक काम स्थानिक स्वराज्य संस्थेने केले आहे. या प्रकारातील वास्तू भोकरदान (जिल्हा जालना), टाकळी (जिल्हा अहमदनगर), बिडकीन (जिल्हा औरंगाबाद) या ठिकाणी पाहावयास मिळतात.

**तीन मंडपयुक्त बारव :** तीन मंडपयुक्त बारवेचे आदर्श उदाहरण त्र्यंबकेश्वर (जिल्हा नाशिक) येथे 'कुशावर्त'च्या स्वरूपात पाहावयास मिळते. मुळात यादवकालीन अष्टकोनी कुंडाची संपूर्ण पुनर्बांधणी होळकरांनी अठराव्या शतकात केली. चार मंडपयुक्त बारवेमध्ये चारठाणा (तालुका जिंतूर, जिल्हा परभणी) या बारवेची नोंद करावी लागते. गोकुळेश्वर मंदिराच्या ईशान्य बाजूस ही बारव आहे. प्रवेशाच्या दृष्टीने तीन मुख्य व मुखाच्या दोन्ही बाजूंना कूट असलेली ही जलमांडवी 'भद्र' या प्रकारात मोडते. २३ चौ.मीटर आकाराची ही बारव असून संरक्षक भिंतीस लागून मंडपाची निर्मिती करण्यात आली आहे. या बारवेत एकूण २७ देवकोष्ठे असून पूर्व–पश्चिम भागास दोन मोठी गर्भगृहे ठेवली आहेत. एकात एक अशा सहा टप्प्यांत पूर्ण झालेली ही बारव मंडपासाठी महत्त्वाची ठरते. या बारवेसाठी एकूण २४ पूर्ण स्तंभ व ४४ अर्धस्तंभ ह्यांची निर्मिती करण्यात आली आहे. लोणार (जिल्हा बुलढाणा) या ठिकाणी लिंबी बारव ही एक महत्त्वपूर्ण बारव असून गावात अन्य कुंडेही आहेत. केंद्रीय पुरातत्त्व विभागाने संरक्षित केलेली ही वास्तू २६ चौ.मी. आकाराची असून एकूण पाच टप्प्यांत पूर्ण करण्यात आली आहे.

बारवेत सर्वांत शेवटी असलेल्या कुंडानंतर पाच पायऱ्या ठेवून त्यावर एक सोपान ठेवला आहे. हा २५ से.मी. रुंदीचा आहे. या टप्प्यावरील पायऱ्यांना कोठेही पुढे आलेला दट्टा अथवा तोंडशिळा दिसत नाही. यावरील दुसरा सोपान पाच पायऱ्यांनंतर असून तो ७० से.मी. रुंदीचा आहे. त्यानंतरचा सोपान ७३ सें.मी. रुंदीचा आहे. यावरील सोपान सर्वांत रुंद असून तो २.१० मी. आहे. या सोपानावर सर्व बाजूंनी मंडप बांधलेला होता. मुळात असलेला हा मंडप आज अस्तित्वात नसून केंद्रीय पुरातत्त्व विभागाने केलेल्या जतनविषयक कामानंतरसुद्धा येथे दिसणाऱ्या अवशेषांवरून या मंडपाची कल्पना स्पष्ट होते. मंडपातून बाहेर पडणारे प्रवेशमार्ग हे उत्तर–दक्षिण व पश्चिम बाजूस आहेत. ही तीन मुख्य प्रवेश–मुखे १.९० मी. रुंदीची असून त्यांत प्रत्येकी दहा पायऱ्या आहेत. येथे योग्य जागी सोपान ठेवलेला आहे. मंडपाची उंची २.५० मीटर होती. सभोवताली असलेल्या संरक्षक भिंतींशी संलग्न असे

हे मंडप असून बारवेच्या एकूण बांधकामाची उंची तळापासून १०मी. आहे. प्रत्येक पायरी २५ सें.मी. उंच व रुंद आहे. या बारवेस मंडप उभारताना एकूण ७६ अर्धस्तंभ व ५४ पूर्ण स्तंभ असे १३० स्तंभ मूलतः वसविलेले असावेत.

बारवेच्या पूर्व भागास प्रवेश नाही. या बाजूस असलेल्या मंडपाच्या केंद्रभागी एक गाभारा (२१०×२१० चौ.मी.) ठेवलेला आहे. गाभाऱ्याची विभागणी गर्भगृह व अंतराळ अशी करून मंडपाच्या पुढील भागात निर्माण केलेला अर्धमंडप दिसतो. चार स्तंभांवर उभा असलेला हा अर्धमंडप कक्षासयुक्त आहे. यावर लहान स्तंभ व कूट शिखर तसेच भौमितिक नक्षीचे अलंकरण आहे. बारवेच्या मंडपात गर्भगृहासह अन्य तीस देवकोष्ठे आहेत. या वास्तूचे अन्य एक विशेष म्हणजे मंडपाच्या पुढे दर २.३०मी. अंतरावर म्हणजे मुळात मंडपास असलेल्या पूर्ण स्तंभांच्या पुढे मुद्दाम बसविलेल्या दगडी चौरंग (८२.६८से.मी. आकार) आहेत. येथे बसून काही विशिष्ट धार्मिक विधी पूर्ण करता येत असावेत. तसेच दीपोत्सवासारख्या उत्सवाची शोभा अवलोकन करता येई. प्रमाणबद्धता व सुनियोजित परिपूर्ण रचना यांसाठी ही बारव श्रेष्ठ ठरते. स्थलमाहात्म्यामध्ये 'वायुतीर्थ' असा या स्थानाचा उल्लेख आहे. चित्रसेन राजाची कन्या नंदा हिला या ठिकाणी सूर्यनारायण प्रसन्न होऊन गतजन्मीच्या पापापासून मुक्ती मिळाली, यासारखे कथानक सांगितले जाते. बारवेच्या पूर्व बाजूस असलेले भद्र व त्यातील गर्भगृहात मुख्य मूर्तीची अधिष्ठान-शिळा असून (७२×१३६×४०सेमी.) त्यावर गणेशासह अष्टदिक्पाल दर्शविले आहेत. यावर कदाचित शेषशायी विष्णूची मूर्ती असावी. आज हे स्थान व अन्य देवकोष्ठे रिक्त आहेत. येथील शिल्पाचा व स्थापत्याचा विचार करता या बारवेची निर्मिती बाराव्या शतकात झाली असावी.

**पोखरणी :** पोखरणी हा शब्द यादव काळात पुष्करिणी यासाठी रूढ होता. पोखरणी हे पुष्करिणीचे प्राकृत रूप होय. लीळाचरित्रातूनही ही संज्ञा येते. बारवेपेक्षा विस्तीर्ण जलाशय म्हणजे पोखरणी. याचे स्थापत्य-शास्त्रीय वैशिष्ट्य म्हणजे कमी खोलीवर विस्तीर्ण असा भाग तळाशी ठेवून बांधकाम करतात. स्वाभाविकपणे यात टप्पे असत नाहीत. बारवेच्या तुलनेत कमी रुंदीचे बांधकाम असते. पोखरणीचे ठळक वैशिष्ट्य म्हणजे समतल भाग जास्तीतजास्त मोठे ठेवून कमीतकमी टप्प्यांत पूर्ण केलेले बांधकाम होय. अशा वास्तूचे वर्णन करताना कमलवेलींनी युक्त असलेला जलाशय म्हणजे पुष्करिणी असेही म्हटले जाते. याच्या मध्यभागी काही वेळा मंडप उभारतात. विशेषतः दक्षिण भारतात अशा वास्तू आढळतात. मद्रास येथील कपिलेश्वर मंदिराजवळील जलाशय, तिरूपती व मदुराई येथील जलाशय उल्लेखनीय आहेत.

महाराष्ट्रामध्ये औढा नागनाथ (जिल्हा परभणी), अंबड (जिल्हा जालना), त्र्यंबकेश्वर (जिल्हा नाशिक), होट्टल (जिल्हा नांदेड) व याच जिल्ह्यातला माहूर येथील मातृतीर्थ तसेच वाशिम (जिल्हा वाशिम) येथील कंकालेश्वर मंदिर हे एका विस्तीर्ण जलाशयात (९५.५०×७७.२५मी.) उभारले आहे. पोखरणीमध्ये बऱ्याचदा पाणी उपसण्यासाठी मोटेची व्यवस्था असते. (याला बगाड म्हणतात.) त्या ठिकाणी तळाशी चौरस किंवा आयत खड्डा (कुंडा) खोदलेला असतो. ही बाव अंबड ( जिल्हा जालना) व होट्टल (जिल्हा नांदेड) येथील पोखरणीवरून स्पष्ट होते. वेल्हे (जिल्हा पुणे), रांजणगाव (जिल्हा अहमदनगर) येथे पुष्करिणी आहेत.

**तडाग :** पोखरणीपेक्षा मोठ्या जलाशयाला तडाग-तळे किंवा तलाव म्हणतात. निसर्गतः उपलब्ध पाणलोट क्षेत्राची निवड करून योग्य ठिकाणी बंधारा बांधून निर्माण केलेला जलाशय म्हणजे तडाग. याची नोंद यापूर्वी केली आहे.

महाराष्ट्राच्या संदर्भामध्ये तेर किंवा मांढळ येथील विटांतील कुंडांनंतर आढळणाऱ्या बारवा या प्रामुख्याने आठव्या-नवव्या शतकांपासूनच्या आहेत. या वास्तूंची मोठ्या प्रमाणात निर्मिती अकराव्या ते तेराव्या शतकांत झाली. अभिलेखीय नोंद उपलब्ध असलेल्या बहुतांश बारवा या बाराव्या शतकातील आहेत. उदाहरणार्थ गणेशवाडी येथील विक्रमादित्य सहावा याच्या काळातील लेख, होट्टल येथील चालुक्यकालीन शिलालेख, लातूर

येथील भूतनाथ मंदिरातील लेख किंवा धर्मापुरी येथील शिलालेख. आज अस्तित्वात असलेल्या बारवांचा विचार करता त्या तंत्रदृष्ट्या उत्कृष्ट होत्या, असे म्हणता येईल. तसेच त्या-त्या स्थपतीने बारव निर्मितीसाठी निवडलेले क्षेत्र व शोधलेले जलस्रोत हे अचूकपणे शोधले होते. त्यामुळे आजही अशा वास्तू कमी-अधिक प्रमाणात उपयोगात आणल्या जातात. ज्या ठिकाणी बारव, जलमांडवी, पोखरणी आहेत, त्या ठिकाणी उपलब्ध शिलालेखांचा अभ्यास करताना हे स्पष्ट होते की, अशा वास्तूंची निर्मिती होत असताना केवळ कुठल्या एका विशिष्ट राजवंशाची सत्ता नव्हती; किंबहुना राष्ट्रकूट, कल्याणचे चालुक्य, शिलाहार, कलचुरी, यादव या राजवंशांची सत्ता असताना त्या-त्या स्थानावरील महत्त्वाकांक्षी सेनानी, सामंत, श्रेष्ठी व क्वचित जागी सामान्य गणिकांनीही याची निर्मिती स्वतंत्रपणे केली आहे. रूढ आराखड्यांना स्वाभाविकपणे स्वीकारून ही निर्मिती झाली असली, तरी काही स्थानिक वैशिष्ट्येही त्यातून व्यक्त झाली आहेत.

उत्तर काळात साधारणतः चौदाव्या शतकानंतर यादव शैलीतील मंदिरांची निर्मिती कमी झाली, तसेच अशा प्रकारच्या बारवांची निर्मितीही थांबली. यानंतर चौरस व वर्तुळाकार आणि एका बाजूने प्रवेश असलेल्या विहिरी निर्माण झाल्या. प्रामुख्याने ज्या राजवटींत प्रार्थनामंदिरांवर गोलघुमट बांधण्यात आले, त्या काळात कटोरा बावडी हा प्रकार लोकप्रिय झाला. मोठ्या आकाराचे अनेक मजले व दालने असलेल्या विहीरींचीही निर्मिती झाली. यांना कुपागार म्हणणे योग्य ठरते. उत्तर काळातसुद्धा शाश्वत मूल्य असलेल्या बारवांची जपणूक झाली.

**संदर्भ :**


१. कंगले, र. पं. (अनुवादक), कौटिलीय अर्थशास्त्र, प्रकरण १९, श्लोक १ ते ४, दुर्ग निर्देश, श्लोक १ ते १०. महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई, १९८२.

२. 'हिस्टरी ॲण्ड कल्चर ऑफ दि इंडियन पिपल' राज ऑफ इंपिरियल युनिटी, खंड २, पृ. २१०; देव, शां. भा., महाराष्ट्र : एक पुरातत्वीय समालोचन मुंबई, १९६८, पृ. ५३

३. गोखले, शोभना, ''कंधार थ्रु एपिग्राफ ॲण्ड आर्किऑलॉजी'', जर्नल ऑफ एपिग्राफिकल सोसायटी ऑफ इंडिया, व्हॉ.७, १९८०, पृ.२२-२४, एपिग्राफिया इंडिका, व्हॉ.३५, पृ. १०५-११४

४. कोलते, वि.भि.,''धर्मापुरी येथील शिलालेख'', भारतीय इतिहास आणि संस्कृति, त्रैमासिक, मुंबई, एप्रिल १९७२, पृ.५-२९; पाठक, अ.शं., ''धर्मापुरी : ए आर्किऑलॉजिकल सर्व्हे'', अनुसंधान पत्रिका, व्हॉ. ८, आंबेजोगाई, १९९१, पृ. १६ ते २५

५. पानसे, मु. ग. यादवकालीन महाराष्ट्र, मुंबई, १९६३, पृ. ४९

६. कोलते, वि. भि., ''देवसेनाचा हिस्सेबोराळ शिलालेख'', महाराष्ट्रातील काही ताम्रपट व शिलालेख, मुंबई, १९८७, पृ. २०-२१

७. कित्ता, गणेशवाडी शिलालेख, पृ. १५५

८. मिराशी, वा. वि. सातवाहन आणि पश्चिमी क्षत्रप यांचा इतिहास व कोरीव लेख, मुंबई, १९७९, पृ. १४५

९. मिराशी, वा. वि., (संपा.), कॉर्पस् इन्स्क्रिप्शनम् इंडिकेरम्, १९५५, व्हॉ. ४/२, पार्ट, पृ. ६१०

१०. राजवाडे, वि. का., संकीर्ण निबंध - लेखसंग्रह, भाग ३, पृ. २४२

११. तुळपुळे, शं. गो., प्राचीन मराठी कोरीव लेख, पुणे, १९६०, प्रस्तावना, पृ. २५

१२. मिराशी, वा. वि., कलचुरी नृपति आणि त्यांचा काळ, नागपूर, १९५६, पृ. ६८

१३. कोलते, वि. भि.,''धर्मापुरी येथील शिलालेख'', पूर्वोक्त, पृ. ५-२८; संशोधक, वर्ष ५८, अंक ४, डिसेंबर १९९०, धुळे, पृ. ३४-४०

१४. मिराशी, वा. वि. शिलाहार राजवंशाचा इतिहास आणि कोरीव लेख, नागपूर, १९७४, लेख क्र. १२, पृ. ८५.

१५. पाठक, अ. शं., ''मध्ययुगीन मठ स्थापत्य'', संशोधक, डिसेंबर १९९०, वर्ष २८, अंक ४, धुळे, पृ. ३४-४२; ''चकलांबा येथील मध्ययुगीन मठ स्थापत्य : एक चिंतन'', संशोधक, डिसेंबर १९९९, वर्ष ६७, अंक ४, धुळे, पृ. ३१ ते ३८

१६. पाठक, अ. शं. बारवस्थापत्य : एक आढवा, ''डॉ. देविसिंह चौहान गौरवग्रंथ'' लातूर, १९९८, पृ. ४०१-४६८.

१७. कित्ता.


(महाराष्ट्र राज्य गॅझेटिअर विभाग, स्थापत्य व कला, मुंबई, २००२, यांच्या सौजन्याने.)

* * *



# कला व स्थापत्य



किल्ले प्रतापगड.

> **महाराष्ट्रात आहेत, तसे-तितके अन् विविध प्रकारचे किल्ले जगात अन्यत्र कोठेही नाहीत. महाराष्ट्राचा ज्ञात इतिहास सुरू होतो. दोन हजार वर्षांपूर्वीपासून. सातवाहन काळानंतर राष्ट्रकूट, चालुक्य, शिलाहार, यादव, बहामनी, मोगल, दक्षिणी पातशाह्या, हबशी, पोर्तुगीज, इंग्लिश, डच अशा अनेक राजवटी झाल्या. पण मध्ययुगात म्हणजे १७ व्या शतकात श्रीशिवछत्रपतींनी जे दुर्गकारण केले ते अद्वितीयच मानावे लागेल. ''... संपूर्ण राज्याचे सार ते दुर्ग...'' अशा शब्दांत रामचंद्रपंत अमात्य लिखित 'आज्ञापत्र' या ग्रंथात किल्ल्यांचे महत्त्व अधोरेखित केलेले आढळते.**

## गिरिशिल्पे-दुर्गसंपदा

■ **प्र. के. घाणेकर**

महाराष्ट्र हा दुर्गांचा देश. सह्याद्रीत कुठेही उभे राहून चहूबाजूंना नजर फिरवली, तर दर चार-दोन शिखरांआड एखादे शिखर तटबुरुजांचा शेला-पागोटे चढवून, उभे राहिलेले आढळते. यांतील बहुतेक गड-कोट- दुर्गांनी श्रीशिवछत्रपतींची चरणधूळ आपल्या मस्तकी धारण केली आहे. त्या शिवस्पर्शाने पावन झालेली ही सारी महाराष्ट्राची धारातीर्थे आहेत. या गड-कोट-किल्ले अन् दुर्गांमधून इये देशीचे पुत्र ताठ मानेने वावरले आहेत. या बळिवंत दुर्गांच्याच आधारावर शिवरायांनी दिल्लीश्वरालाही नामोहरम केले अन्

**या भूमंडळाचे ठायी, धर्मरक्षी ऐसा नाही।**
**महाराष्ट्रधर्म राहिला काही, तुम्हा कारणे।।**

ही समर्थोक्ती सार्थ केली. शिवरायांच्या पाऊलखुणांचा शोध घेत केलेल्या दुर्गयात्रांमध्ये आपल्याला आपल्याच गौरवशाली इतिहासाची

खरी ओळख पटते. महाराजांच्या मुलखात केलेल्या भटकंतीत शिवरायांच्या दुर्गविज्ञानाचाही परिचय घडतो. या स्फूर्तिदायी इतिहासाचा एखादा क्षण जगण्यासाठी, त्याच स्थळी जाऊन इतिहासाचा मागोवा घ्यावा, शिवस्मरणाचा सुगंधी आनंद घ्यावा अन् कृतकृत्य व्हावे.

महाराष्ट्रात आहेत, तसे-तितके अन् विविध प्रकारचे किल्ले जगात अन्यत्र कोठेही नाहीत. महाराष्ट्राचा ज्ञात इतिहास सुरू होतो. दोन हजार वर्षांपूर्वीपासून. सातवाहन काळानंतर राष्ट्रकूट, चालुक्य, शिलाहार, यादव, बहामनी, मोगल, दक्षिणी पातशाह्या, हबशी, पोर्तुगीज, इंग्लिश, डच अशा अनेक राजवटी झाल्या. पण मध्ययुगात म्हणजे १७ व्या शतकात श्रीशिवछत्रपतींनी जे दुर्गकारण केले ते अद्वितीयच मानावे लागेल. ''--- संपूर्ण राज्याचे सार ते दुर्ग---- '' अशा शब्दांत रामचंद्रपंत अमात्य लिखित 'आज्ञापत्र' या ग्रंथात किल्ल्यांचे महत्त्व अधोरेखित केलेले आढळते.

मध्ययुगामध्ये गड-कोट-किल्ले अन् दुर्ग ही सर्वच राज्यकर्त्यांची भूराजनैतिक गरज होती. परंतु महाराष्ट्राची भौगोलिक रचना लक्षात घेऊन, सिंधुसागर अन् सह्याद्रीच्या कुशीत किल्ल्यांची उभारणी करणारा अन् त्यांचा योग्य वापर करणारा शिवाजी हा पहिला अन् शेवटचा राजा झाला. पोटात विध्वंसक अस्त्रे घेऊन जेव्हा पहिल्यांदा विमान आकाशात उडाले, तेव्हाच जगभरातील सर्वच किल्ल्यांचे महत्त्व संपले. पण मध्ययुगातील या किल्ल्यांचे सामरिक महत्त्व अनन्यसाधारण होते.

आपल्याच पूर्वजांनी घामाचा पाऊस पाडून हे किल्ले उभारले आणि रक्ताचा सडा शिंपून इथे इतिहास घडवला, त्यामुळेच ही धारातीर्थे म्हणजे स्फूर्तीचा अखंड स्रोत आहेत. केवळ हा गौरवशाली इतिहास स्मरण्यासाठीच इथे जावे असे नाही. गेल्या कित्येक शतकांत इथला निसर्ग डहुळला गेला नाही, त्यामुळे निसर्गप्रेमींनीही इथे जावे. शिवरायांनी बांधलेल्या ५-२५ किल्ल्यांवर त्यांनी केलेले विज्ञानाधारित दुर्ग उभारणीचे प्रयोग पाहावेत अन् थक्क व्हावे. शहरी जीवनाचा उबग आणणाऱ्या धकाधकीपासून दूर जाऊन चार निवांत क्षण अनुभवावेत म्हणूनही तिथे जावे. हिमालयाच्या उत्तुंग शिखरांना गवसणी घालण्याची इच्छा असणाऱ्यांनी सह्याद्रीत उदंड भटकंती करावी, इथले डोंगरकडे अन् सुळके ह्यांच्याशी झोंबी घ्याव्यात अन् अनुभवसंपन्न व्हावे. अशा साऱ्या आवडीनिवडीच्या मंडळींसाठी महाराष्ट्रातील शेकडो गड-किल्ले आवतन देत आहेत.

किल्ल्यासंबंधीचे उल्लेख ऋग्वेद, अथर्ववेद, अग्निपुराण, रामायण, महाभारत, कौटिल्याचे अर्थशास्त्र, वराहमिहिराची बृहत्संहिता, सोमेश्वरदेवाचा अभिलाषितार्थ चिंतामणी, मनुस्मृती, मयमत, मानसार, शिल्पशास्त्र, कामांदकी, शुक्रनीती, आकाशभैरवकल्प अशा अनेक प्राचीन ग्रंथांमध्ये आढळतात. पण १३ व्या शतकातील यादवांच्या दरबारातील लाला लक्ष्मीधर यांच्या 'देवज्ञविलास' या ग्रंथातील उल्लेख खूप महत्त्वाचा. कारण हा लेखक व त्याला अभिप्रेत असणारे किल्ल्यांचे प्रकार महाराष्ट्रातील आहेत.

प्रथमं गिरीदुर्गंच वनदुर्गं द्वितीयकम्।
तृतीयं गव्हरंदुर्गं, जलदुर्गं चतुर्थकम्।।
पंचमं कर्दमं दुर्गं, षष्ठम् स्थान्मिश्रकं।
सप्तमं ग्रामदुर्गं स्थान्। कोष्ट दुर्गं तथाकष्टकम्।।

किल्ल्यांच्या प्राधान्यक्रमाने डोंगरी किल्ले, वनदुर्ग, गुहांचा किल्ल्यासारखा वापर, पाणकोट, चिखल-दलदलीच्या प्रदेशातील किल्ले, मिश्रदुर्ग, गावकुसू व मेढेकोट असे प्रकार या श्लोकात सांगितले आहेत.

कठीण प्रसंग येता, राजाने अशा अभेद्य किल्ल्यात राहून राज्याचे रक्षण करावे, असे मनुस्मृतीमध्ये म्हटले आहे.

म्हणजेच राज्य-प्रजा व राजा यांच्या रक्षणासाठी, प्रामुख्याने व्यापारी मार्गांच्या आसपास दुर्गमस्थळी, किल्ले उभारावेत असा संकेत होता. किल्ल्यांच्या आधारे शत्रूंशी उत्तम झुंजता येते, हे अनुभवसिद्ध ज्ञान, पिढ्यान् पिढ्यांनी जतन केले होते.

### महाराष्ट्रातील किल्ल्यांचे वेगळेपण

जवळपास सर्वच खंडांमध्ये अन् देशांमध्ये किल्ल्यांची उभारणी झाली. बहुसंख्य ठिकाणी तेथील स्थानिक राजसत्तांनी असे किल्ले वेळोवेळी बांधले. पण गोवा आणि महाराष्ट्र इथे मात्र दुर्गबांधणी काळातील आणि दुर्गरचनाकार राजवटींमधील वैविध्य ध्यानी येते.

मोगल-बहामनी आणि दक्षिणी पातशाह्या यांच्याकडे नोकरी करणाऱ्या, मध्य आशियातून आलेल्या, सरदारांनी व

सुभेदारांनी काही किल्ले उभारले आहेत. त्यांमध्ये अफगाणिस्तान-इराण-इराक-उझबेकिस्तान-किरगिजीस्तान-तुर्कस्तान अशा अनेक देशांच्या व वंशांच्या लोकांचा समावेश होतो. पुणे जिल्ह्यातील दौंडजवळचा भीमेकाठी असणारा बहादूरगड हा औरंगजेबाचा दूधभाऊ असणाऱ्या मध्यआशियाई बहादूरखान कोकलशान याने उभारला.

बहमनी सत्ता व त्यापासून निर्माण झालेल्या पाच दक्षिणी पातशाह्या यांच्या पदरी आफ्रिका खंडातील पूर्व किनाऱ्यावरच्या ॲबिसिनिआ-सोमालिया-हरिट्रिया या ॲबिसिनिअन सरदारांची भरती केली जात असे. बहामनी वजीर महंमद गावान हे एक उदाहरण. या ॲबिसिनिअन म्हणजे हबशी लोकांपैकी जंजिरामुरुडच्या सिद्दी लोकांनी मुरूडजवळचे जंजिरा आणि उंदेरी हे किल्ले उभारले.

मध्ययुगाच्या उत्तरार्धात अनेक युरोपिअनांची सत्ता इथल्या छोट्या-छोट्या भूभागांवर होती. त्यांमध्ये पोर्तुगीज-इंग्लिश-डच आदींनी महाराष्ट्राच्या प्रदेशात किल्ले बांधले. वसई-साष्टी या उत्तर फिरंगाणात म्हणजे ठाणे जिल्ह्यात आणि गोव्यामध्ये पोर्तुगिजांनी त्यांच्या पद्धतीने किल्ले बांधले.रेवदंड्यासारखा पोर्तुगीज बांधणीचा किल्ला तर रायगड जिल्ह्यात आहे. इंग्लिशांच्या कारकिर्दीत मुंबईच्या 'फोर्ट जॉर्ज' हा किल्ला उभारला गेला. त्याचे अवशेष आजही छत्रपती शिवाजी टर्मिनस जवळ (पूर्वीचे बोरीबंदर) पाहावयास मिळतात. त्या भागाला फोर्ट हे नावही याच किल्ल्यामुळे मिळाले. वेंगुर्ला (जि. सिंधुदुर्ग) येथील डचांची वखार म्हणजे खंदकयुक्त भुईकोट किल्लाच आहे.

म्हणजे मध्य आशिया-आफ्रिका-युरोप येथील सत्तांनीही एतद्देशीय राजवटींप्रमाणेच महाराष्ट्रात दुर्गबांधणी केली. महाराष्ट्राच्या अनेक शतकांच्या दुर्गरचना-इतिहासात हे जे वैविध्य आढळते, ते जगात अन्यत्र कोठेही नाही. संपूर्ण महाराष्ट्र हाच एक 'दुर्गसंग्रहालय' आहे.

## दुर्ग-साहित्य

महाराष्ट्रातील किल्ल्यांची आधुनिक पद्धतीने माहिती जमा करून प्रसिद्ध करण्याची सुरुवात ब्रिटिशांनीच केली. 'गव्हर्नमेन्ट लिस्ट ऑफ सिव्हिल फोर्ट्स- १८६१' हा ग्रंथ म्हणजे किल्ल्यांबाबत माहिती संकलित करून प्रसिद्ध करण्याचा पहिला प्रयत्न असावा. (याची काजळप्रत म्हणजे प्रतिरूपमुद्रित प्रत किंवा झेरॉक्स कॉपी माझ्या ग्रंथसंग्रहात आहे.) यानंतर जिल्हा दार्शनिका म्हणजे डिस्ट्रिक्ट गॅझेटिअर्समध्ये किल्ल्यांची जिल्हावार माहिती संकलित केली गेली. जेम्स डग्लसचे 'बुक ऑफ बॉम्बे' आणि इतरही तत्कालीन ग्रंथांमध्ये किल्ल्यांची माहिती मिळते.

गोविंद बाबाजी जोशी, विष्णू वासुदेव जोशी, चिंतामण गंगाधर गोगटे (महाराष्ट्र देशातील किल्ले भाग, १-२), पंडित महादेवशास्त्री जोशी (महाराष्ट्राची धारातीर्थे भाग, १-२) कॅप्टन मोडक, (प्रतापगडचे युद्ध), दुर्गपंडित अप्पासाहेब दांडेकर उर्फ गो.नी.दा., शिवशाहीर ब.मो.तथा बाबासाहेब पुरंदरे, शांताराम विष्णू आवळसकर (रायगडची जीवनकथा), य.न.केळेकर (वसईची मोहीम) आणि इतरही अनेकांनी वेगवेगळ्या पैलूंमधून किल्ल्यांची माहिती देणारी पुस्तके लिहिली आहेत.

दुर्गप्रेमी आनंद पाळंदे, प्र.के.घाणेकर, गोपाळराव चांदोरकर, तुकाराम जाधव, प्रा. रमेश देसाई, हरिष कपाडिया, भगवान चिले, इंद्रजित सावंत, प्रमोद मांडे, सतीश अक्कलकोट, महेश तेंडुलकर, पांडुरंग पाटणकर आणि इतरही अनेकांनी दुर्ग-साहित्यात आपापल्या परीने भर टाकली आहे.

मात्र महाराष्ट्रातील प्रत्येक किल्ल्याचे भौगोलिक स्थान दर्शविणारा, प्रत्येक किल्ल्यावरील ठिकाणे दर्शविणारा असे किमान दोन नकाशे असणारा, भरपूर प्रकाशचित्रे असणारा, इतिहास उलगडून दाखविणारा 'दुर्गकोश' अद्याप सिद्ध झालेला नाही. किल्ल्यांवरील वास्तू-मंदिरे-मूर्ती-तोफा-शिलालेख-दुर्गबांधणी यांचा मागोवा घेण्यास अजूनही खूप वाव आहे. असा प्रयत्न होण्याची नितांत गरज आहे.

## दुर्गसंपदा

महाराष्ट्रात अनेक प्रकारचे किल्ले पाहायला मिळतात. त्या-त्या भूप्रदेशाच्या वैशिष्ट्यांप्रमाणे व आवश्यकतेप्रमाणे या किल्ल्यांची उभारणी वेगवेगळ्या काळात झाली. नंतरच्या राजवटींमध्ये त्यात अनेक बदलही केले गेले.

शिवनेरी, सिंहगड, राजगड, पुरंदर, रायगड अशा



किल्ले मुरूड-जंजिरा, जलदुर्ग.

किल्ल्यांना गिरीदुर्ग किंवा डोंगरी किल्ले म्हटले जाते. चाकण सोलापूर, नळदुर्ग, औसा, परंडा, कंधार, बेळगाव असे किल्ले सपाटीच्या प्रदेशात आहेत. त्यांना स्थळदुर्ग किंवा भुईकोट म्हणतात. कोकणात सागरकिनाऱ्याच्या सान्निध्यामुळे खाडीच्या तोंडाशी किंवा समुद्रकिनाऱ्यावर असणारे किल्ले 'किनारी किल्ले' या गटात समाविष्ट होतात. रत्नागिरी, जयगड, कोर्लई, विजयदुर्ग, आग्वाद ही या प्रकारची उदाहरणे आहेत. समुद्रात असणाऱ्या बेटांवर किल्ले उभारले गेले आहेत. त्यांना जलदुर्ग किंवा पाणकोट म्हणतात. खांदेरी, उंदेरी, जंजिरा, सुवर्णदुर्ग, सिंधुदुर्ग, अंजदीव, अर्नाळा ही जलदुर्गांची उदाहरणे आहेत.

याशिवाय आणखी एका प्रकारचे किल्ले महाराष्ट्रात आहेत. ते कोणत्याही एका गटात समाविष्ट होऊ शकत नाहीत. देवगिरीचा अद्वितीय किल्ला एका टेकडीच्या माथ्यावर बालेकिल्ला आहे म्हणून त्याला डोंगरी किल्ला म्हटले, तर त्याबाहेरचा विस्तृत तटबंदीत समाविष्ट असलेला किल्ला सपाटीवरच्या भुईकोटासारखा आहे. रायगड जिल्ह्याची राजधानी असणाऱ्या अलिबागच्या किनाऱ्यावर कुलाबा किल्ला आहे. समुद्राला भरती येते, तेव्हा त्याच्या सर्व बाजूंना पाण्याचा वेढा पडतो. तो एखाद्या जलदुर्गासारखा जंजिरा वाटतो. पण ओहोटीच्या वेळी तेथे सहज चालत जाता येते. बीदरचा किल्ला एका बाजूने भुईकोट तर दुसऱ्या बाजूने डोंगरी किल्ला आहे, असे जाणवते. हे सर्व किल्ले 'मिश्रदुर्ग' या प्रकारात मोडतात.

महाराष्ट्रात अगदी शेजारी-शेजारी असणारे जोड किल्लेही आढळतात. पुणे-सातारा रस्त्याजवळ भुईंज किंवा किकली गावाशेजारी चंदन-वंदन ही जोडगोळी आहे. शंभूछत्रपती आणि सवाई माधवराव पेशवा यांची जन्मभूमी असणाऱ्या

पुरंदरला जोडून वज्रगड उर्फ रुद्रमाळ किल्ला आहे. पुणे-मुंबई रस्त्यालगत लोहगड-विसापूर हेही जोड किल्ले आहेत. महाराष्ट्रातील सर्वांत उंच किल्ला साल्हेर व त्याचा छोटा सोबती सालोटा हे जोड किल्लेच आहेत. मोरा-मुल्हेर-हरगड, माहुली-भंडारगड-पळसगड ही दुर्गत्रिकुटे आहेत.

'आज्ञापत्र' या रामचंद्रपंत अमात्यांच्या ग्रंथामध्ये या जोडकिल्ल्यांच्या निर्मितीबद्दल सूचक उल्लेख आढळतो. ''--- किल्ल्यासमीप दुसरा पर्वत किल्ल्यास मुदायी असू नये. कदाचित असला तरी सुरुंग लावून पाडून गडाचे आहारी आणावा. सुरुंगास असाध्य असा असला तरी तोहि जागा मोकळा न सोडिता बांधून मजबूत करावा.----'' म्हणजे गरज पडेल, तेव्हा अशा जोडकिल्ल्यांची निर्मिती केली जात होती.

## दुर्गसाखळ्या व दुर्गसमूह

सर्वसाधारणपणे प्रत्येक सुटा किल्ला स्वतंत्र दिसत असला, तरी काही वेळा तुलनेने एकमेकांजवळ असल्यामुळे मध्यभागी एक महत्त्वाचा किल्ला आणि त्याच्या चहूबाजूंना छोटे-छोटे उपदुर्ग अशी रचना केलेली आढळते. दुर्गदुर्गेश्वर राजधानी रायगडाभोवती पाचाड, पन्हाळघर, लिंगाणा, कोकणदिवा, चांभारगड उर्फ महेंद्रगड, सोनगड असे किल्ले आढळतात. अशा दुर्गरचनेला दुर्गगुच्छ किंवा दुर्गसमूह म्हणता येईल. वासोटा उर्फ व्याघ्रगड, महिपतगड, सुमारगड, रसाळगड, मकरंदगड, प्रतापगड अशी दुर्गसाखळीही लक्षात येते.

दुर्गसाखळी असो किंवा दुर्गसमूह असो, व्यापारी मार्गाचे नियंत्रण करणे, अडचणीच्या वेळी शत्रूपासून संरक्षण मिळवणे व शत्रूच्या वेढ्याला दाद न देता, पुरेशा साधनसामग्रीच्या बळावर तो किल्ला प्रदीर्घ काळ लढवणे या गोष्टींना मध्ययुगात खूप महत्त्व होते.

सिद्दी जोहरचा पन्हाळगडाचा वेढा किंवा नाशिकजवळच्या रामशेज किल्ल्याचा मोगली सैन्याचा ५ वर्षांहून अधिक काळ चाललेला वेढा ही याची उदाहरणे आहेत. कमी सैन्यबळाची कमतरता दुर्गम दुर्गांच्या मदतीने भरून काढून, संख्याबळाने किंवा शस्त्रबळाने भारी असणाऱ्या शत्रूला तोंड देता येते.

## कलारग्याची झाडी

गेल्या शतकामध्ये महाराष्ट्रातील बरीचशी झाडी-जंगले तोडली गेली. परंतु लोहगडासारख्या किल्ल्याच्या उतारावर अजूनही झाडी टिकून आहे. डोंगरी किल्ल्याच्या उतरणीवर असणाऱ्या या झाडीला 'कलारग्याची झाडी' असे म्हटले जात असे. या संदर्भात आज्ञापत्रात आलेला उल्लेख महत्त्वाचा आहे. ''.....गडाची राखण म्हणजे कलारग्याची झाडी. ते झाडी प्रयत्ने वाढवावी. त्यामध्ये एक काठीही तोडो न द्यावी. बलकुबलीस त्या झाडीमध्ये हशम बंदुके घालावे, या कारणाजोगे असो द्यावे.....''

## गडावरील पाणी व पाणवठे

गडावर लढाऊ सैनिक, उत्तम निर्णय घेणारे अधिकारी, पुरेसा शस्त्रसाठा व दारूगोळा आणि पुरेसे धान्य एवढेच असून पुरत नाही. किल्ल्यावर भरपूर पाणी असण्याची गरज आहे. पाण्याविना किल्ला ही कल्पनाच करवत नाही. आज्ञापत्रात पाण्याबद्दलचा उल्लेख किती सावधानतेने केला आहे, हे पाहणे मनोरंजक ठरते.

''.....गडावर आधी उदक पाहून किल्ला बांधावा. पाणी नाही आणि ते स्थळ तो आवश्यक बांधणे प्राप्त झाले, तरी आधी खडक फोडून तळी, टाकी पर्जन्यकाळपर्यंत संपूर्ण गडास पाणी पुरे अशी मजबूत बांधावी. गडावरी झराही आहे, जसे तसे पाणीही पुरते, म्हणून तितकियावरीच निश्चिती न मानावी. किंनिमित्य की, झुंजामध्ये भांडियाचे (तोफांचे) आवाजाखाली झरे स्वल्प होतात आणि पाणियाचा खर्च विशेष लागतो, तेव्हा संकट पडते. याकरिता तसे जागी जखिरियाचे पाणी म्हणून दोन-चार टाकी तळी बांधावी. त्यातील पाणी खर्च होऊ न द्यावे, गडाचे पाणी बहुत जतन राखावे.....''

## गडांचे व्यवस्थापन

गडकोट संरक्षणाचे कार्य फार नाजूक. त्याबद्दलची सावधानता थक्क करणारी आहे. तेथील उसनवारी व प्रशासन यांबाबत अतिशय कडक नियम होते. किल्लेदार म्हणजे हवालदार हा किल्ल्यावरच्या लढाऊ शिबंदीचा

प्रमुख म्हणजे सरनोबत. किल्ल्याचा आर्थिक हिशेब व मालपुरवठा-व्यवस्था यांचे काम सबनिसांचे. त्यांची पात्रता, त्यांची परीक्षा, त्यांच्याबाबत घ्यावयाची काळजी, त्यांचे कालावधी, त्यांच्याबद्दल संशय आला तर करावयाची उपाययोजना, त्यांचा गुन्हा शाबीत झाला तर द्यावयाची कठोर शिक्षा आदींबद्दलचे शिवप्रभूंचे विचार आज्ञापत्रात कमालीच्या स्पष्टतेने नोंदविले आहेत. ते मुळातूनच वाचणे आवश्यक आहे.

''---किल्ल्याची सेवा परम कठीण शासन परम उग्र, शासन न करिता, किल्ले याचे काम सर्वसाधारण होऊन जाणार असे सर्व थैव न करावे----'' हा उल्लेखही महत्त्वाचा आहे.

## शिवछत्रपतींचे दुर्ग-विज्ञान

शिवरायांच्या ताब्यात सुमारे साडेतीनशे किल्ले होते. यांतील बहुसंख्य किल्ले शिवकाळापूर्वीच बांधलेले होते. शिवनिर्मित किल्ल्याची संख्या फारतर १५-२० पर्यंत जाते. परंतु या किल्ल्यांची बांधणी आणि पूर्वीच्या किल्ल्यांची रचना यांत फार मोठे फरक जाणवतात. शिवनिर्मित किल्ल्यांवर वैज्ञानिक दृष्टिकोन ठेवून मुद्दाम केलेले दुर्गबांधणीचे प्रयोग दिसतात. डोळे उघडे ठेवून हे सारे नीट समजावून घेणे महत्त्वाचे आहे.

दुर्गबांधणी तंत्रात अनेक वैज्ञानिक प्रयोग करणारे शिवाजी महाराज हे अतिशय थोर दुर्गरचनाकार होते. शिवाजी महाराजांकडे जरी सुमारे साडेतीनशे किल्ले होते, तरी त्यांनी बांधवून घेतलेल्या किल्ल्यांनी संख्या १५-२० इतकीच आहे. प्रतापगड-राजगड-रायगड यांसारखे डोंगरी किल्ले आणि सिंधुदुर्ग-खांदेरी-कुलाबा असे काही सागरी किल्ले हे विशेष उल्लेखनीय शिवनिर्मित किल्ले आहेत.

विशेष विचार करून मिळवलेले किंवा वापरलेले ज्ञान म्हणजे विज्ञान! ज्याप्रमाणे एखादा शास्त्रज्ञ आपल्या यशस्वीनी व उपयुक्त शोधांसाठी खूप प्रयोग करतो, त्याप्रमाणेच शिवरायांच्या दुर्गनिर्मितीचे आहे. गड-कोट-किल्ले-दुर्ग-जंजिरे-गढ्या यांची निर्मिती आणि ते ताब्यात ठेवणे, ही मध्ययुगीन राज्यकर्त्यांची भूराजनैतिक गरजच होती. त्यामुळेच पूर्वीच बांधलेले अनेक लहानमोठे किल्ले शिवरायांना आयतेच तयार मिळाले. अर्थात त्यांतील त्रुटी, वैगुण्ये यांचा डोळस अभ्यास करून, किल्ला जिंकायला येणाऱ्या शत्रूच्या दृष्टीने गैरसोयीच्या ठरतील अशा दुर्गबांधणीमधील खुब्या शिवरायांनी अभ्यासल्या आणि मग स्वतःचे असे वेगळे विज्ञाननिष्ठ दुर्गबांधणी तंत्र विकसित केले.

रायगड जिल्ह्याची राजधानी असणाऱ्या अलिबागच्या पुढ्यात समुद्रातील एका खडकाळ बेटावर त्यांनी एक पाणकोट उभारला. त्या जलदुर्गाचे नाव आहे कुलाबा. या किल्ल्याचे तट आणि बुरूज बांधताना एक वेगळेच तंत्र त्यांनी वापरले. सर्वसाधारणपणे दगड किंवा विटांचा एक थर, त्यावर चुना किंवा सिमेंट वाळूचा थर, परत दगड किंवा विटांचा थर असेच नेहमी केले जाते. परंतु कुलाब्याच्या तट-बुरुजांकडे आपण नीट लक्ष देऊन पाहिले, तर दगडांच्या दोन थरांदरम्यान चुना किंवा अन्य कोणतेही 'सिमेंटिंग मटेरियल' वापरलेले नाही. हे असे का? याचे उत्तर सोपे आहे. या किल्ल्याच्या तटबंदीवर सतत धडका देणाऱ्या लाटांचा प्रचंड तडाखा असतो. त्यामुळे तिथे बांधकाम करताना या लाटांमधले पाणीच कमी करता आले, तर ते उपयुक्त ठरेल. लाटेत पाणी जितके जास्त, तितका तडाखा जोरदार. लाटेत पाणी जितके कमी तितका हादरा कमी. दोन दगडांमधील फटींमधून आपटणाऱ्या लाटांमधील पाणी आत जाते. अन् लाटेचा आघात कमी होतो. हे दगडही जरा जास्त मोठ्या आकाराचे वापरल्यामुळे हे बांधकाम लाटांमुळे खिळखिळे होऊन ढासळण्याची शक्यताच कमी होते.

जंजिऱ्याजवळच्या मुरूड गावाच्या पुढ्यात पद्मदुर्ग उर्फ प्रदुर्ग किंवा कासा किल्ल्याच्या बाबतीत एक वेगळाच प्रयोग केलेला दिसतो. समुद्रातील बेटावरचा किल्ला गेली तीन-साडेतीनशे वर्षे हा आपटणाऱ्या लाटांशी सतत सामना करतो आहे. लाटा तटबंदीवर आपटल्या की घर्षण होते. या सततच्या घर्षणामुळे दगडांची झीज होते. पद्मदुर्गाच्या बांधणीत वापरलेला चुना इतका भक्कम आहे की, त्या बांधकामातले दगड लाटांच्या आघाताने झिजले आहेत, पण चुना मात्र पूर्ण शाबूत आहे. त्यामुळे झिजून ७-८ सेंमी आत गेलेल्या तटबंदीच्या दगडी चिऱ्यांदरम्यानचा चुना न

झिजता तसाच राहिला आहे. अशा भक्कम चुनानिर्मितीचे तंत्रज्ञान शिवरायांनी अवगत करून घेतले होत. हे पद्मदुर्गाच्या बांधणीवरून सहज ध्यानी येते.

याच परिसरात थळ-वायशेतसमोर खांदेरी बेटावर शिवछत्रपतींनी एक बलाढ्य जलदुर्ग बांधून घेतला. हा किल्ला म्हणजे एक अचल युद्धनौकाच होती. जंजिरेकर सिद्दी आणि मुंबईकर इंग्लिश या स्वराज्याच्या कट्टर शत्रूचे आपापसातील सागरी दळणवळण रोखण्यासाठी ह्या जलदुर्गाची निर्मिती करणे शिवछत्रपतींनी भाग पडले. पण त्यातील धोका ओळखून मुंबईकर इंग्रजांनी खांदेरी किल्ल्याच्या उभारणीत सतत व्यत्यय आणला. त्याचे आरमार या बेटाभोवती सातत्याने घिरट्या घालीत होते. रसद पुरवठ्यावर आघात करीत होते. साहजिकच शिवरायांना हवे तितके बांधकाम इथे करता आले नाही. त्यावर त्यांनी एक अफलातून युक्ती शोधून काढली. खांदेरी बेटाभोवतीच्या समुद्रात त्यांनी वेगवेगळ्या आकारांचे लहान मोठे खडक आणि धोंडे इतस्ततः विखरून पेरले. त्यांतील काही जवळजवळ तर काही एकमेकांपासून लांब-लांब आहेत. काही खडक भरतीच्या वेळीही समुद्रपातळीच्या वर दिसतात तर काही ओहोटीच्या वेळीही पाण्याच्या पातळीखालीच बुडालेले राहतात. या खडकांवर बारनॅकल्स म्हणजे घट्ट चिकटून वाढणारी कालवं (शंख-शिंपल्यांच्या जातीतील प्राण्यांच्या वसाहती) वाढली आहेत.

सागरी लाटा प्रथम या खडकांच्या राशींवर आपटतात, त्यामुळे तटबंदीशी पोहोचेपर्यंत त्यांची आघातशक्ती कमी झालेली असते. शिवाय इथे वाढणाऱ्या कालवांच्या धारदार कडांमुळे त्यावर उतरून वावरणे शत्रूला अशक्य ठरते. समुद्रातून डुचमळत, सागरी लाटांवर हेलकावे खात येणाऱ्या होडी-मचवे-छोट्या बोटी या खडकांवर आपटून फुटण्याचा धोकाही शत्रूच्या मनात धडकी भरवी. म्हणजेच शिवरायांनी आपल्या दुर्ग-विज्ञानाच्या मदतीने प्रतिकूलतेवर मात केली होती. हा मंत्र पुढे मुंबईच्या मरीन ड्राइव्ह म्हणजे नेताजी सुभाषचंद्र मार्गासाठी ३०० वर्षांनंतर वापरला गेला.



किल्ले पुरंदर, गिरिदुर्ग.

तेथे अनियमित खडकांऐवजी सिमेंटचे कृत्रिम टेट्रापॉडस् वापरले. ते रचताना यांत्रिक क्रेन्सचा वापर केला गेला.

तत्कालीन महाराष्ट्रात एकही अनुदानित किंवा विनाअनुदानित अभियांत्रिकी किंवा रचना तंत्र (आर्किटेक्चर) महाविद्यालय नव्हते. जागतिक बँकेचे कर्ज किंवा परकीय ज्ञानाची उसनवारी नव्हती. तीनशे वर्षांपूर्वी हे सारी दुर्गरचनातंत्र वापरले गेले. तीन-साडेतीनशे वर्षांनंतरही भक्कमपणे उभे असलेले किल्ले त्या यशस्वी तंत्राची ग्वाही देत आहेत.

असेच काही प्रयोग गिरिदुर्ग म्हणजे डोंगरी किल्ल्यांबाबत केलेले दिसतात.

रायगडाच्या बाबतीत बोलायचे तर अद्वितीय संरक्षण व्यवस्था येथे साकारलेली आहे. रायगडच्या पायथ्याशी असलेल्या पाचाड खिंडीत महादरवाजापाशी आपण वाहनातून पायउतार होऊन पायऱ्यांच्या वाटेने पोहोचतो. डोंगराच्या सुमारे दोन-तृतीअंश उंचीवर ही तटबंदी आहे. महादरवाजाकडे येताना वरची तटबंदी वर येणाऱ्या व्यक्तीच्या उजवीकडे राहते. गडसंरक्षणासाठी सिद्ध असणाऱ्या सैनिकांनी टेनिसच्या चेंडूएवढ्या आकाराचे दगड वरून खाली मारायला सुरुवात केली, तर उजव्या हातातील तलवारीने ते अडवणे गैरसोयीचे होते, कारण त्यामुळे तलवारीची धार बोथट होई. वरून येणाऱ्या दगडांच्या माऱ्यापासून डाव्या हाताला बांधलेली ढाल संरक्षण व्हावे



किल्ले शिवनेरी, शिवरायांचे जन्मस्थान.

अशी अरुंद जागा तयार करावी, किल्ल्यावर येणाऱ्या वाटेतील पायऱ्यांची उंची पायात गोळे आणणारी असावी, अडचणीच्या वेळी पाण्याच्या टाक्यांमधील पाणीच दुर्गरक्षणासाठी करण्याची युक्ती रायगडाच्या महादरवाज्यात वापरलेली आढळते.

सागरी किल्ल्यांबाबत तर पराकोटीचा विचार करून दुर्गउभारणीचे वैज्ञानिक प्रयोग केलेले आढळतात. कुलाबा किल्ल्याच्या तटबंदीच्या व बुरुजांच्या उभारणीसाठी चुन्याचा उपयोग अजिबात केलेला नाही, तर पद्मदुर्ग किल्ल्याच्या उभारणीत लाटांच्या माऱ्यामुळे दगडी चिरे झिजून गेले, पण दरवाज्यांमधील चुना अजूनही शाबूत आहे, असे दिसते. खांदेरी किल्ल्याच्या उभारणीच्या काळात मुंबईकर इंग्रजांनी दिलेल्या त्रासामुळे तटबंदीलगत बाहेरच्या बाजूला मुद्दाम टाकलेल्या ओबड धोबड खडकांच्या राशी व त्यांची उपयुक्तता आजही समजावून घेता येते. सिंधुदुर्गाच्या पायारचनेत उकळत्या शिशाच्या रसाचा केलेला वापर, सुवर्णदुर्ग किल्ल्याभोवतालचा सपाटीकरण केलेला खडकमाथा, विजयदुर्गजवळ भर समुद्रात बांधलेली व कायम पाण्याखाली राहणारी अद्भुत तटबंदी, रायगड किल्ल्यावरील मलनिस्सारण व्यवस्था, रायगडावरील दरबार दालनात आजही प्रत्ययास येणारा ध्वनिचमत्कार यामागचे विज्ञान आपण समजावून घेतले पाहिजे. अशा या विज्ञाननिष्ठ शिवछत्रपतींचे हे उपेक्षित व अद्याप फारसे न अभ्यासले गेलेले दुर्गविज्ञान मोठ्या अभिमानाने आपण जगासमोर मांडले पाहिजे.

जगाच्या इतिहासातील सर्वोच्च दुर्गरचनाकार म्हणजे श्रीशिवछत्रपतीच होते, हे आपण समजावून घेणे आणि सर्वांपुढे मांडणे अगत्याचे आहे.

यासाठी वापराली तर तसे करताना पायात पाय अडखळून पडायला होई. त्या वेळी वरून येणारा भाला, बाण किंवा बंदुकीची गोळी शत्रुसैनिकांचा अचूक वेध घेई.

या महादरवाजाकडे येताना २-३ वेळा आपली दिशा बदलते. कारण ही रचना गोमुखी पद्धतीची आहे. अशा प्रत्येक वेळी शत्रू सैनिकांची पाठ तटावरील मावळ्यांकडे होत असल्यामुळे, त्यांचा वेध घेणे सोयीचे होईल.

या दरवाजापर्यंत शत्रू सैनिक आलेच, तर लगतच्या कड्यात असणारी खूप मोठी पाण्याची टाकी सुरुंग लावून फोडून टाकायची. तो अचानक येणारा पाण्याचा लोंढा पाहून शत्रू गर्भगळीत होईल व त्यांच्यापैकी काही त्या लोंढ्यात वाहूनही जातील. हे पाणी टाक्यातून कड्यावरून खाली येताना दगड-धोंडे-माती-झाडझुडूप व सारा मलबा खाली आणील. त्या चिखलातून हालचाल करणेही शत्रूला मुश्कील होईल. अशा आघातानंतर १/३ किल्ला वर चढून जाऊन, तेथील शिबंदीशी दोन हात करण्याएवढा उत्साह आणि मनोधैर्य, शत्रू सैनिकांमध्ये राहणार नाही.

किल्ल्यांच्या महादरवाज्याकडे येणाऱ्या वाटा कशा असाव्यात? डोंगरी किल्ल्यांवर महादरवाजा किती उंचीवर असावा? प्रवेशद्वार दर्शनी नसावे- तेथे गोमुखी रचना असावी, किल्ल्याच्या दारांजवळ शत्रूला अडचणीची ठरेल

**संदर्भ :**


घाणेकर, प्र. के., शिवरायांचे दुर्ग-विज्ञान, स्नेहल प्रकाशन


* * *



# कला व स्थापत्य



पद्मपाणी बोधिसत्त्व, अजिंठा लेणी.

## चित्रकला

■ **रमेशचंद्र पाटकर**

**भित्तिचित्रे, लघुचित्रे, पटचित्रे, पोथीचित्रे, काचाचित्रे यांसारखे चित्रकलेचे विविध प्रकार व त्यांतील शैलींची विविधता, यांमुळे महाराष्ट्रातील चित्रकला समृद्ध व संपन्न झाली आहे. प्राचीन काळापासून मध्ययुगाच्या समाप्तीपर्यंत चित्रकलेबरोबरच जनजीवनाशी एकरूप झालेल्या रांगोळी या कलांना अविभाज्य स्थान आहे. ह्या चित्रशैलींनी महाराष्ट्रातील चित्रकलेला एक लक्षणीय आयाम प्राप्त करून दिला आहे.**

प्राचीन आणि मध्ययुगीन महाराष्ट्रातील चित्रकलेचा आपण या लेखात विचार करणार आहोत. इ. स. पूर्व पाचव्या शतकापासून इ. स. च्या अकराव्या शतकापर्यंतचा साधारण दीड हजार वर्षांचा काळ हा ‘प्राचीन काळ’ तर इ.स.च्या अकराव्या शतकापासून ते इ. स. एकोणीसाव्या शतकाच्या पूर्वार्धापर्यंतचा म्हणजे १८१८ साली पेशवाई समाप्त होईपर्यंतच्या काळाला मध्ययुगीन काळ समजला जातो. इतक्या प्रदीर्घ कालखंडातील कलेचा आपण अगदी थोडक्यात परामर्श घेणार आहोत. प्रथम एक गोष्ट लक्षात घ्यायला हवी ती म्हणजे १ मे १९६० रोजी अस्तित्वात आलेल्या महाराष्ट्र राज्याच्या सीमा गतकाळात प्रवाही व बदलत्या होत्या. त्यामुळे सध्याच्या महाराष्ट्र राज्यात न मोडणाऱ्या, परंतु गतकाळात मोडल्या जाणाऱ्या व त्याच्याशी संलग्न असणाऱ्या चित्रकलेचा विचारही आपल्याला करायचा आहे.

प्रागैतिहासिक काळात महाराष्ट्रात मानवी वस्ती नव्हती, असा समज रूढ झाला होता. त्यामुळे महाराष्ट्रातील कलेचा विचार हा सातवाहन काळापासून करण्याचा सर्वसामान्य प्रघात पडला होता. पण अलीकडील संशोधनातून महाराष्ट्रात अश्मयुगीन मानवाचे अस्तित्व होते, याचे पुरावे हाती आले आहेत. उदाहरणार्थ, साधारण एक लाख वर्षांपूर्वी या प्रदेशात वास्तव्य केलेल्या मानवाने तासणी (Scrapers) व अणी (Points) यांसारखी छोटी हत्यारे बनवायला सुरुवात केली होती. साधारणपणे २५००० वर्षांपूर्वी गारगोटीच्या दगडापासून छोटी-छोटी हत्यारे तयार केली जात होती. जळगाव जिल्ह्यातील चाळीसगावमधील पाटणे गावात अशा प्रकारची हत्यारे सापडली आहेत.

साधारणपणे इ. स. पूर्व १४०० च्या सुमारास महाराष्ट्रात एका नव्या संस्कृतीचा उदय झाला. 'जोर्वे' संस्कृती या नावाने ती ओळखली जाते. अहमदनगर जिल्ह्यातील जोर्वे गावाजवळ या संस्कृतीचे पुरावे सापडले म्हणून तिला या गावाचे नाव देण्यात आले. या प्रदेशातील माणसे स्वतःची वैशिष्ट्यपूर्ण रंगीत भांडी, गारगोटीची हत्यारे व तांब्याचे दागिने वापरत. इ.स. पूर्व १२०० च्या सुमारास या संस्कृतीच्या जडणघडणीच्या प्रक्रियेस सुरुवात झाली असावी. पुण्याजवळील इनामगावी केलेल्या उत्खननात, साठवणीच्या घागरी किंवा लाल भांडी, बांगड्या, माशाचा गळ, चिमटा, पाती, लोखंडी सळी, न भाजलेल्या चिकणमातीची दहा स्त्री-शिल्पे हे सारे सापडले आहे.

इ. स. पूर्व पहिल्या सहस्रकाच्या मध्यास या प्रदेशातील लोहयुगीन संस्कृती परिपक्व होत होती. नागर संस्कृतीच्या पाऊलखुणा त्यातून दिसत होत्या. याच सुमारास सोळा महाजनपदांपैकी 'अश्मक' हे महाजनपद, औरंगाबाद व अहमदनगरच्या आसपास भरभराटीला आले होते. 'तगर' (उस्मानाबादमधील 'तेर') हे नगरराज्य याच सुमारास उदयाला येत होते. या प्रदेशाचा तत्कालीन मौर्य साम्राज्यात समावेश झाला होता.

महाराष्ट्राचे प्राचीनत्व सिद्ध करू पाहणारे भूगर्भशास्त्रीय पुरावे हाती आलेले असले आणि त्यांतून कलेची धुळाक्षरे दिसत असली, तरी सातवाहनांच्या काळाला सुरुवात होईपर्यंत कलेच्या जडणघडणीचे चित्र रेखाटता येईल असे पुरावे, दुर्दैवाने जवळ-जवळ नसल्यातच जमा आहेत. त्यामुळे महाराष्ट्रातील कलेच्या विकासाचा मागोवा घ्यायला सातवाहनांपासूनच प्रारंभ करावा लागतो.

विविध कालखंडांतील विविध राजवटी, राजेमहाराजे, सधन व अभिजन वर्ग यांच्या संदर्भात भारतीय कलेच्या विकासाचा जसा विचार होऊ शकतो, तसाच सर्वसामान्य जनांच्या संदर्भातही विचार केला जाऊ शकतो. ज्याला आपण सामान्यपणे 'लोककला' किंवा 'जनकला' म्हणतो, त्या कलेचा या दुसऱ्या वर्गात अंतर्भाव होतो. महाराष्ट्रातील चित्रकलेचा विचार करताना या परिप्रेक्षाचे (Perspective) भान आपण बाळगायला हवे.

दुसरी गोष्ट म्हणजे धर्माबद्दल असलेली उत्कट ओढ हे भारतीय कलेप्रमाणे महाराष्ट्रातील चित्रकलेचे एक महत्त्वाचे प्रयोजन होते. पण धार्मिक प्रयोजनाबरोबरच धर्मनिरपेक्षतेचेही प्रयोजन दुर्लक्ष करण्यासारखे नाही. आणखी एका ठळक वैशिष्ट्याचा इथे उल्लेख करायला हवा. भारतीय कलेप्रमाणे महाराष्ट्रातील वास्तुकलेमुळे चित्रकला आणि शिल्पकला यांचा विकास झाला. दुसऱ्या शब्दांत सांगायचे तर महाराष्ट्रातील वास्तुकला, शिल्पकला आणि चित्रकला यांचा अविभाज्यपणे आविष्कार झाला आहे.

### अजिंठ्याची भित्तिचित्रे

सातवाहनांच्या काळात महाराष्ट्राचे नागरीकरण झाले होते. महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनाला प्रारंभ झाला होता. चार शतकांहून अधिक काळ (इ. स. पूर्व २३० ते इ. स. २३०) सातवाहनांची राजवट महाराष्ट्रात होती. या काळात अजिंठा (प्रारंभीची लेणी), पितळ खोरे, भाजे, कार्ले, नाशिक, जुन्नर इत्यादी ठिकाणी लेणी खोदली गेली.

सातवाहनांनंतर महाराष्ट्रात त्रैकूट, वाकाटक, चालुक्य, राष्ट्रकूट आणि देवगिरीचे यादव यांनी राज्य केले. (वाकाटकांच्या काळात अजिंठ्याची १६,१७ व १९ या क्रमांकाची लेणी खोदली गेली. याच काळात भित्तिचित्रकलेचा विकास झाला.) अल्लाउद्दिन खिलजी या उत्तरेकडील सुलतानाने यादवांचा इ. स. १२९६ मध्ये पराभव केला. इ. स. १३१० मध्ये यादवांची सत्ता लयाला गेली आणि एका राजकीय पर्वाचा अस्त झाला.

अल्लाउद्दीन खिलजीने बहामनी घराण्याची स्थापना दक्षिणेत केली. पण १६ व्या शतकात या राजवटीचे विघटन होऊन आदिलशाही, इमादशाही, निजामशाही, बरीदशाही आणि कुतुबशाही अशी पाच स्वतंत्र राज्ये अस्तित्वात आली. त्यानंतर शिवाजीने स्वराज्याची स्थापना केली. शिवकालानंतर पेशव्यांनी राज्यकारभाराची सूत्रे हाती घेतली. पेशवाईच्या अस्ताबरोबरच (इ. स. १८१८) मध्य युगाचा अस्त झाला आणि इंग्रजी राजवटीबरोबर आधुनिक युगाचा प्रारंभ झाला.

या प्रदीर्घ काळात महाराष्ट्रात चित्रकलेची जडणघडण होत होती. भित्तिचित्रे (Frescos/Murals) लघुचित्रे, पटचित्रे, पोथीचित्रे, काचचित्रे, वारली व चित्रकथाचित्रे अशा विविध स्वरूपांत चित्रकला साकार झाली आहे. या प्रत्येक चित्रकला प्रकाराची स्वतःची अशी वैशिष्ट्ये आहेत. पण त्याचबरोबर या प्रदीर्घ काळात झालेल्या राजकीय स्थित्यंतरांचाही प्रभाव प्रत्यक्षाप्रत्यक्षपणे त्यांच्या निर्मितीवर पडला आहे.

सातवाहन आणि वाकाटक ह्यांच्या काळात खोदली गेलेली अजिंठ्याची लेणी ही शिल्पकला, चित्रकला आणि वास्तुकला यांसाठी फार प्रसिद्ध आहेत. काही लेण्यांतील भिंती, स्तंभ आणि छत यांवर कथांचे चित्रण झाले आहे.

अजिंठ्यातील चित्रकला शैलीचा विकास कसकसा होत गेला, ते प्रारंभीच्या आणि नंतरच्या काळातील चित्रांवरून आपल्या लक्षात येते. प्रारंभीच्या काळातील चित्रशैली ही शिल्पाकृतींच्या शैलीशी जवळीक साधणारी होती, हे क्रमांक ९ आणि १० या लेण्यांतील भित्तिचित्रांवरून लक्षात येते. भाजा व अमरावती येथील भित्तिचित्रांवरही शिल्पशैलीचा प्रभाव होता. पण उत्तर कालखंडातील चित्रशैली त्या प्रभावातून मुक्त होऊन स्वतःच्या स्वतंत्र शैलीचा प्रत्यय देते. उदाहरणार्थ गुहा क्रमांक १७ मधील इंद्र व अप्सरा यांचे चित्र. पद्मपाणी बुद्धाच्या गृहपरित्यागाच्या निर्णयाला अभिवादन करण्यासाठी अप्सरा, गंधर्व, किन्नर व यक्ष यांचा समूह आकाशातून उडत येत असल्याचे दृश्य त्यात रेखाटले आहे. अजिंठ्याच्या चित्रांत फारसा उपयोग न केलेल्या निळ्या रंगाचा वापर या चित्रात केला आहे. आकाशाच्या निळ्या



अप्सरा अजिंठा लेणी क्र. १७.

पार्श्वभूमीवर पांढऱ्या रंगातील इंद्र उठून दिसतो. त्याचा मुकुट व चेहरा यांच्या बाह्य रेषा जाडसर आहेत. त्यामुळे त्रिमितीचा किंचित आभास निर्माण होतो. (गुहा क्र. १ मध्ये राजवाड्याच्या रेखाटलेल्या चित्रांतही उंचीतूनही त्रिमितीचा आभास निर्माण केला आहे.) हे चित्र पाहताना आपण खरोखरच जमिनीवरून आकाशातील हे अभूतपूर्व दृश्य पाहत आहोत, असे वाटते.

अजिंठ्याच्या भित्तिचित्रांचा थोड्या बारकाईने विचार केला तर चित्रकारांनी सामान्यपणे एका तत्त्वाचा उपयोग केल्याचे दिसून येईल. ही चित्रे भिंतींवर व छतांवरही काढली आहेत. पण ही चित्रे प्रेक्षकाला विनासायास पाहता यावीत म्हणून त्याच्या दृष्टीच्या पातळीवर रेखाटली आहेत. त्यामुळे पाहणाऱ्याची नजर त्या पातळीपासून वर-वर जाते आणि चित्रावकाशात रेखाटलेल्या व रंगवलेल्या चित्राकृतींवरून ती सहज व मोकळेपणे फिरते.

जाड-पातळ व लयबद्ध रेषांनी आकारास आलेल्या चित्राकृती, तसेच लाल, पिवळा, हिरवा, पांढरा, काळा



राणी (बुद्धजन्म) अजिंठा लेणी क्र. २.

अशा मोजक्याच रंगांचा किंवा त्यांच्या मिश्रणांचा केलेला वापर आणि अलंकरणात्मक चित्रण हा भारतीय कलेचा विशेष अजिंठ्याच्या चित्रात ठळकपणे नजरेस पडतो. काळ्या व पांढऱ्या या दोनच रंगांचा वापर करून काढलेले छतावरील चित्र (गुहा क्र.११) हे या संदर्भात लक्षात घेण्यासारखे आहे. रूपभेद प्रमाण, भाव, लावण्य योजना, सादृश्य आणि कर्णिका भंग अशी चित्रकलेची सहा अंगे 'कामसूत्रात' सांगितली गेली आहेत. अजिंठ्यातील बहुतेक सर्व चित्रांत या अंगांचे विषयानुरोधाने चित्रण केले आहे. 'विष्णुधर्मोत्तर' पुराणातही सत्यं (वास्तवचित्रे), नागरं (सर्वसामान्यांसाठी काढलेली चित्रे), वैणिकं (काव्यमयता असलेली चित्रे) आणि मिश्रं (या तीनही प्रकारांचे मिश्रण असलेली चित्रे) असे चित्रांचे चार प्रकार सांगितले आहेत. या सर्व प्रकारांत मोडणारे चित्रण कमी-अधिक प्रमाणात अजिंठ्याच्या चित्रांत झाले आहे.

वर उल्लेखिलेली कला-तत्त्वे व चित्रप्रकार यांचे भान ठेवून अजिंठ्याच्या चित्रकारांना चित्रे काढावी लागली. त्यामुळे साहजिकच कलाविष्कारात स्वातंत्र्य घेण्यावर बंधने आली असावीत. पण काही वेळा त्यांनी ही बंधने दूर सारून चित्रनिर्मिती केली आहे. उदाहरणार्थ, गुहा क्र. १७ मधील बुद्ध, यशोधरा व राहुल यांचे भावपूर्ण चित्र किंवा याच लेण्यातील बुद्धाच्या चरणांवर अर्पण करण्यासाठी आपल्या हातांत फुले घेऊन लगबगीने निघालेल्या बुद्धभक्ताचे व्यक्तिचित्रे किंवा शृंगार प्रसाधन या विषयावरील राजकन्या व तिच्या दासी यांचे मुक्तपणे रंगवलेले चित्र.

दृश्य-कथनपरता (visual narrative) हा अजिंठ्याच्या चित्रांचा एक खास विशेष. कथेतील मुख्य पात्राला महत्त्व देऊन त्याच्या सभोवार केलेली इतर कथा घटकांची जुळणी व त्यांतून आकारास येणारी चित्ररचना हा दृश्य-कथनपरतेचा एक महत्त्वाचा पैलू आहे. दुसरी गोष्ट म्हणजे कथेचे चित्रण नेहमीच त्यातील घटना-प्रसंगांचा क्रम राखून केलेले आहे असे म्हणता येत नाही. तरीपण कथेतील घटना-प्रसंगांचा क्रम आणि चित्ररचना यांचा तोल बऱ्याच चित्रांत सांभाळलेला दिसतो.

अजिंठ्याच्या चित्रांत जातक-कथांचे बव्हंशी चित्रण केलेले असले तरी माणूस आणि त्याच्याभोवतीचे पर्यावरण हा त्याचा केंद्रबिंदू आहे. मानवी जीवनातील सुखदुःखांचे, सौंदर्याचे-कुरूपतेचे, भावना-विकारांचे; चित्रगत व्यक्तींच्या बाह्य रूपांचे; हत्ती, हरण, ससा, माकड, अस्वल यांसारख्या प्राण्यांचे, हंस, बगळे यांसारख्या पक्ष्यांचे; विविध शस्त्रांचे, वाद्यांचे, दागदागिन्यांचे, वस्त्रप्रावरणांचे, भांड्यांचे, वृक्ष-वनराईवास्तूंचे अतिशय रेखीव, लक्ष्यवेधी व कलात्मक चित्रण अजिंठ्याच्या चित्रकारांनी केले आहे. तसेच तत्कालीन समाज व संस्कृती यांनी अधोरेखित केलेले भौतिक व आध्यात्मिक विश्व त्यांनी संवेद्यपणे साकार केले आहे.

या चित्रांसाठी कोणत्या प्रकारचे तंत्र वापरण्यात आले, याबद्दल तज्ज्ञमंडळींत एकवाक्यता नाही. काहींच्या मते फ्रेस्को तंत्रपद्धतीचा, तर काहींच्या मते टेम्परा तंत्रपद्धतीचा उपयोग केला आहे. फ्रेस्को तंत्र पद्धतीत भिंतीवरील विलेपनात चुन्याचा वापर करण्यात येत असे व पृष्ठभाग ओलसर असताना चित्र रंगवण्यात येत असे. हे रंग पाण्यात मिसळणारे असत. टेम्परा तंत्रपद्धतीत रंगाचा

जाडसर थर देताना अनावश्यक रंग खरडून काढण्यात येत असे. रंगाचा लेप घट्ट बसल्यामुळे चित्रातील उठाव व ताजेपणा टिकून राहत असे. पाण्यात मिसळणारे रंग विशिष्ट प्रकारच्या गोंदासारख्या चिकट पदार्थांत मिसळून त्यांचे आलेपन करणे, हा या तंत्रपद्धतीचा विशेष सांगितला गेला आहे.

यादवकालीन चित्रकलेच्या इतिहासाची नीट संगती लागत नाही; कारण त्याबद्दल फारशी माहिती उपलब्ध नाही. पण सापडलेल्या चित्रांवरून दक्षिण भारतात पहिल्या ते बाराव्या शतकापर्यंत चित्रकलेची परंपरा चालू होती, असे समजायला आधार आहे. डॉमिंगो पेस या प्रवाशाने कृष्णदेव रायाच्या कारकिर्दीत (१५०९-१५३०) विजयनगर शहराला भेट दिली होती. त्याने राजवाड्याच्या केलेल्या वर्णनात, प्रवेशद्वाराजवळील भिंतीवर कृष्णदेव व त्याचे वडील, तसेच इतर व्यक्ती यांची चित्रे असल्याचा उल्लेख केला आहे. राजवाड्याबरोबर मंदिरेही चित्रांनी सजवली जात, असे उल्लेखही आढळतात. विजयनगर साम्राज्यात अनेगोंदी आणि लेपाक्षी मंदिरांतील भिंतींवर शिवाच्या विविध अवतारांचे चित्रण केल्याची माहितीही उपलब्ध आहे. अजिंठ्याच्या चित्रांत जातक-कथांचे जसे दृश्यरूपात कथन केले आहे तसे स्वरूप या मंदिरातील चित्रांचे नाही. मध्यभागी इष्ट देवदेवता आणि त्यांच्या दुतर्फा एका ओळीत भक्त उभे असावेत, तसे चित्रण केलेले आढळते.

### दख्खनी कला

बहामनी कालाचा उदय आणि नंतर त्या राजसत्तेचे पाच स्वतंत्र राज्यांत झालेल्या परिवर्तनाच्या काळातील महाराष्ट्राचा प्रदेश हा 'दख्खनचा प्रदेश' या नावाने ओळखला जात होता. (त्यापूर्वी तो 'दक्षिणापथ' म्हणून ओळखला जायचा) त्यामुळे या काळातील कलेचा 'दख्खनी कला' असा उल्लेख केला जातो.

या कलाशैलीचा ठळक विशेष जर कोणता असेल, तर तो म्हणजे पर्शियन कलेचा पडलेला प्रभाव, हा होय. भित्तिचित्रे, पटचित्रे, पोथीचित्रे, लघु-चित्रे असे चित्रकलेचे प्रकारही आढळतात. उदाहरणार्थ, विजापूरच्या आसर महालातील भित्तिचित्रे. ती तैलरंगात रंगवलेली असून हे चित्रकाम स्थानिक चित्रकारांचे नसून युरोपीय चित्रकारांचे असावे, असा काही तज्ज्ञांचा तर्क आहे. कारण स्थानिक चित्रकार जलतरंगांचा वापर करत आणि त्यांची शैली ही या भित्तीचित्रांतील शैलीपेक्षा भिन्न आहे.

१७व्या शतकात गोवळकोंड्यातील कुतूबशाहीच्या राजवटीत औरंगाबादला 'कलमकारी' चित्रनिर्मिती होत होती. ही चित्रे दोन गटांत मोडतात. त्यांपैकी एक गट म्हणजे भिंतीवर टांगून ठेवायची रंगीत पटचित्रे. दुसऱ्या गटातील चित्रे आकाराने मोठी असत. स्थानिक राजघराण्यांसाठी ती तयार केली जात. कपड्यावरील पटचित्रांची परंपरा बराच काळ चालू होती.

४थ्या आणि ५व्या शतकापासून ताडपत्रांच्या पोथीत चित्रे काढली जात. पण नंतर ताडपत्रीऐवजी कागदाचा उपयोग केला जाऊ लागला. एका बाजूला मजकूर आणि दुसऱ्या बाजूला मजकुराला पूरक असणारी चित्रे, असे पोथ्यांचे दृश्यरूप नजरेस पडते. ११व्या शतकानंतर संपूर्ण पानभर चित्रे काढली जाऊ लागली.

'तारीफ इ हुसेनशाह बादशाह इदकन' हा दख्खनी शैलीतील सचित्र हस्तलिखित ग्रंथ प्रसिद्ध आहे. इ. स. १६६५ मध्ये हुसेन निजामशाह याच्या नेतृत्वाखाली विजयनगरच्या झालेल्या पराभवावर अहमदनगरच्या आफताबी या कवीने फार्सी भाषेत लिहिलेला हा ग्रंथ आहे. ४९ पानांच्या या ग्रंथात एकूण १४ चित्रे होती. पण आता १२ चित्रे उपलब्ध आहेत. या ग्रंथातील स्त्रियांचे चित्रण हे लेपाक्षीच्या भित्तिचित्रातील स्त्री-चित्रण शैलीची आठवण करून देणारे आहे. शिवपार्वती किंवा लक्ष्मीविष्णू यांच्या चित्ररचनेसारखी रचना हुसेनशाह व त्याची बेगम यांच्या चित्रांकनात आहे. प्राचीन संस्कृत वाङ्मयातून वर्णिलेल्या 'दोहद' या प्रसंगाचेही यात चित्रण केले आहे. (अशोकवृक्ष हा सुंदर स्त्रीच्या पायांच्या स्पर्शाने किंवा तिच्या आलिंगनाने बहरतो, असा वाङ्मयीन संकेत होता. त्या विशिष्ट कृतीला 'दोहद' म्हटले जात असे.) या ग्रंथातील चित्रांवर पर्शियन शैलीचा प्रभाव स्पष्टपणे जाणवतो.

भारतीय आणि पर्शियन चित्र शैली यांचे दर्शन घडवणारा दुसरा प्रसिद्ध सचित्र हस्तलिखित ग्रंथ म्हणजे 'निमितनामा' हा होय.

भित्तिचित्रे, पटचित्रे, पोथ्या किंवा हस्तलिखित ग्रंथातील चित्रे असोत; त्यातून भारतीय चित्रकलेचे एक ठळक वैशिष्ट्य जाणवते, ते म्हणजे चित्राकृतींचे जाडपातळ रेषांनी केलेले लयबद्ध रेखांकन. दुसरी गोष्ट म्हणजे पोथ्यांतील किंवा हस्तलिखित ग्रंथांतील चित्रशैली ही लघुचित्रशैलीशी नाते सांगणारी आहे.

## माळव्यातील कला

चौदाव्या शतकापासून ते आठराव्या शतकाच्या पूर्वार्धापर्यंत माळवा प्रदेश इस्लामी सत्तेखाली होता. हा प्रदेश देशाच्या मध्यभागी असल्यामुळे इथे देशाच्या अनेक भागातील कलाप्रवाहांचा प्रभाव पडत होता. या विविध कलाप्रवाहातून एका नव्या स्वरूपाविशेषांच्या चित्रशैलीचा उदय झाला. पेशव्यांच्या इथल्या राजवटीच्या काळात निर्माण झालेल्या कलानिर्मितीतून तिच्या काही पैलूंचा प्रत्यय येतो.

१८ व्या शतकाच्या मध्यास माळव्यात (आत्ताच्या मध्यप्रदेशात) पेशव्यांचा अंमल सुरू झाला. महेश्वर, इंदूर, उज्जैन, धर ग्वाल्हेर या ठिकाणी पेशव्यांनी नेमलेल्या मराठी सरदारांची राजवट सुरू झाली. या सरदारांचे वाडे ह्या भित्तिचित्रांची मुख्य केंद्रे होती. या काळात मोठ्या प्रमाणावर भित्तिचित्रे रंगवली गेली ती मंदसौर शहरात. येथे मारवाडी व जैन हा व्यापारी समाज राहत होता. त्यांच्या हवेल्या होत्या. त्यांनी मंदिरेही बांधली होती. या हवेल्या व मंदिरे यांतील भिंती चित्रांनी सजवल्या होत्या. राजवाड्यातील व हवेलीतील भित्तिचित्रांत मुख्यतः राजघराण्यातील व्यक्तींची चित्रे काढलेली आढळतात; तर मंदिरांतील भित्तिचित्रांत रामायण, महाभारतातील घटनाप्रसंगांचे चित्रण झाले आहे. विठ्ठल-भक्तीच्या प्रभावातून उज्जैनच्या जैन मंदिरातील भिंतींवर ज्ञानेश्वर, एकनाथ, नामदेव, जनार्दन स्वामी यांची चित्रे काढली आहेत. एका भिंतींवर 'करकटी' ठेवलेल्या विठ्ठलाचेही चित्र आहे.

माळव्यातील चित्रनिर्मिती ही मुख्यतः स्थानिक चित्रकारांनी केली आहे. पण त्यांच्या चित्रशैलीतील एकसंधता प्रत्ययास येत नाही. उदाहरणार्थ, मंदसौरमधील चित्रकामावर शेजारच्या मेवाड राज्यातील चित्रशैलीचा, तर ग्वाल्हेरमधील चित्रकामावर दातिया, ओरछा ह्या चित्रशैलींचा प्रभाव आहे. १८१८ मध्ये जरी पेशवाईची राजवट समाप्त झालेली असली, तरी माळव्यातील मराठा समाजाने चित्रकलेला आपला अश्रय सुरूच ठेवला होता. राजघराणी, सरदार, जहागिरदार यांच्याप्रमाणे स्थानिक धनिक वर्गही चित्रकलेचा चाहता होता.

## शिवकाल-पेशवेकालातील कला

शिवकालापासून ते पेशवेकालापर्यंत म्हणजे साधारणपणे १७ व्या शतकापासून ते १९ व्या शतकापर्यंत महाराष्ट्रातील चित्रकलेचा विचार दोन टप्प्यांत करता येतो. स्वराज्य-स्थापनेच्या काळापासून ते साताऱ्याच्या शाहू महाराजांचा काळ हा पहिला टप्पा आणि पेशव्यांची राजवट हा दुसरा टप्पा. स्वराज्य-स्थापनेच्या कार्यात गुंतल्यामुळे शिवाजी महाराजांच्या कारकिर्दीत कलानिर्मितीला फारसा वाव मिळाला नसावा. तरीपण या काळात लघुचित्रे काढली जात होती, अशी माहिती इतिहासाच्या काही अभ्यासकांनी दिली आहे.

इतिहासाचार्य वि. का. राजवाडे यांच्या मतानुसार शहाजीराजे व शिवछत्रपती यांच्या संग्रही शेकडो चित्रे पूर्वकालीन व स्वकालीन असावीत. प्रसिद्ध स्त्री-पुरुषांप्रमाणे स्वतःच्या कुटुंबांतील व्यक्तींच्या तसबिरी काढून घेऊन त्यांचा संग्रह करण्याची हौस होती. पण शिवकालातील चित्रकामाच्या अभावी त्याविषयी सांगणे कठीण आहे.

शाहू महाराजांच्या कारकिर्दीत चित्रनिर्मितीला वाव मिळाला होता आणि त्याचे प्रत्यंतर त्यांनी बांधलेल्या रंगमहालातील भित्तिचित्रांवरून येते. या कालखंडातील चित्रकलेवर एका बाजूने मोगल-रजपूत शैलीचा, तर दुसऱ्या बाजूने दक्षिणेकडील शैलीचा प्रभाव पडलेला दिसून येतो. उदाहरणार्थ, श्रीरंगपट्टण येथील टिपू सुलतानाच्या राजवाड्यातील भित्तिचित्रे आणि सातारा व इतर ठिकाणी असलेल्या वाड्यांतील भित्तिचित्रे यांत चित्ररचना व तांत्रिक विशेष याबाबतीत साम्य दिसून येते.

पेशव्यांनी राज्यकारभाराची सूत्रे आपल्या हाती घेतल्यावर सत्तेचे केंद्र साताऱ्याहून पुण्यास आले. कला-संस्कृतीच्या दृष्टीने पुण्याला महत्त्व प्राप्त होऊ लागले. या

काळात इमारतींचे बांधकाम मोठ्या प्रमाणात होऊ लागले. त्यामुळे साहजिकच भित्तिचित्रकलेला विशेष वाव मिळाला.

शनिवारवाडा पेशवाईतील एक महत्त्वाची वास्तू. १७३० साली पहिल्या बाजीरावाने ती बांधायला सुरुवात केली. या वाड्यातील लाकडी कोरीव छतावर विविध प्रकारच्या सुंदर वेलबुट्ट्या रंगवल्या होत्या. झाडे, वेली, फुले, तसेच रामायणातील, महाभारतातील कथा-प्रसंगांचे चित्रण भिंतीवर केले होते. दिवाणखान्यातील चित्रे काढण्यास भोजराज या निष्णात चित्रकाराला जयपूरहून खास आमंत्रित केले होते. १८२७ मध्ये लागलेल्या आगीत हा कलेचा वारसा नष्ट झाला, जे काही अवशेष शिल्लक राहिले त्यात नगारखान्याच्या भिंतीवरील चित्रांचे नमुने उरले आहेत.

नाना फडणीस हे राजकीय मुत्सद्दी कलेचे रसिक होते. त्यांनी आणि तत्कालीन इतर महत्त्वाच्या व्यक्तींनी नाशिक, चांदवड, वाई, निपाणी, मेणवली यांसारख्या ठिकाणी वाडे बांधले. त्यांतील भित्तिचित्रे हा या वाड्यांना एकत्र आणणारा एक समान दुवा आहे.

१८७४ साली नानांनी पुण्यात स्वतःसाठी बांधलेल्या वाड्यातील भिंतींवर आणि छतावर रंगीत चित्रे काढली होती. १७६५-१७६६ साली पुण्यात बांधलेल्या विष्णुमंदिरातील मंडपाच्या छतावरील कोरीव पट्ट्यांवर चित्रे काढली होती. साताऱ्यात मेणावली गावी त्यांनी बांधलेल्या वाड्यातील भित्तिचित्रे ही विशेष लक्षणीय होती. या भित्तिचित्रांचे विषय पौराणिक होते. पण त्यांच्या झालेल्या चित्रीकरणात, विशेषतः पोषाख, दागदागिने व पर्यावरण यांत स्थानिक संस्कृतीचे अस्तित्व जाणवते. उदाहरणार्थ विष्णूचे चित्रण पंढरपूरच्या विठ्ठलाच्या रूपात झाले आहे.

या वाड्यातील 'रंगमहाल' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या खोलीच्या भिंतीवर वैविध्यपूर्ण व कलापूर्ण भित्तिचित्रे आहेत. गीतोपदेश, दुर्गा देवी, दशावतार, कृष्ण व गोपी, कृष्ण व अष्टनायिका (गोपी व अष्टनायिका मराठी पद्धतीच्या साड्या नेसल्या आहेत आणि त्यांनी मराठी पद्धतीचे दागिने घातले आहेत, असे चित्रण केले आहे), रामपंचायतन यांसारखी चित्रे पाहायला मिळतात. लाल, पिवळा, निळा, हिरवा, काळा अशा मोजक्याच रंगांचा केलेला वापर हा या चित्रांचा एक ठळक विशेष आहे. गडद व उजळ रंगांच्या योजनेमुळे ही चित्रे भिंतीचा अविभाज्य भाग असल्याचा प्रत्यय येतो.

पेशवाईच्या सरत्या काळात 'काचचित्रे' (glass painting) हा पाश्चात्त्य देशातील व चीनमधील चित्रप्रकार महाराष्ट्रात लोकप्रिय झाला होता, पण लघुचित्रे, पोथीचित्रे यांची परंपराही टिकून राहिली होती.

सवाई माधवरावाच्या काळात पुण्याचा इंग्रज रेसिडन्ट मॅलेट याने जेम्स वेल्स या ब्रिटिश चित्रकाराकडून इंग्रज, मराठे व टिपू सुलतान यांच्यात १७९० साली झालेल्या तहाचे किंवा पेशवे दरबाराचे चित्र तयार करून घेतले. याच वेल्सने १७९२ च्या सुमारास सवाई माधवराव, नाना फडणीस व महादजी शिंदे यांचीही तैलरंगात व्यक्तिचित्रे काढली. एवढेच नव्हे तर १८९१ च्या सुमारास वेल्सच्या मार्गदर्शनाखाली युरोपीय वळणाचे कलाशिक्षण देणारी एक शाळा शनिवारवाड्यात सुरू केली. या शाळेत शिकलेले व नावारूपाला आले दोन एतद्देशीय चित्रकार म्हणजे शांताराम नवगिरे व गंगाराम तांबट हे होत. पेशवे दरबारचे चित्र तयार करण्यासाठी वेल्सने जी अभ्यास चित्रे तयार केली, त्यांत या दोघांचा सहभाग होता.

पेशवाईचा अस्त झाल्यानंतर १८५६ साली मुंबईत युरोपीय शैलीतील शिक्षण देण्यासाठी 'सर जे. जे. स्कूल ऑफ आर्ट' ही कलाशाळा सुरू केली. ब्रिटिश राजवटीच्या आरंभ-काळात भित्तिचित्रांची परंपरा सुरू होती. पौराणिक दृश्ये व देवदेवता यांच्या चित्रांनी काही घरांच्या भिंती रंगवल्या जात होत्या. पुणे व त्याच्या अवतीभवती परंपरागत स्थानिक चित्रशाळांत कलानिर्मिती होत होती, पण ब्रिटिश वसाहतवादी राजकीय स्थित्यंतरामुळे युरोपीय कला-संस्कृतीचे महत्त्व प्रस्थापित होऊ लागले होते. त्यामुळे एतद्देशीय कला परंपरा निस्तेज झाली.

## आदिवासी कला

पण बदललेल्या परिस्थितीत दोन चित्रकलांची किंवा लोककलांची परंपरा टिकून राहिली होती. त्यांपैकी वारली आणि ठाकर या दोन आदिवासी जमातींच्या महाराष्ट्रातील कला आहेत.

आपल्या देशात फार प्राचीन काळापासून आदिवासी जमाती भिंतीवर चित्रे काढत आल्या आहेत. उदाहरणार्थ, संथाल (बिहार), साओरा (ओरिसा), गोंड (मध्यप्रदेश) या आदिवासी जमाती. महाराष्ट्रातील ठाणे जिल्ह्यातील वारल्यांच्या भित्तिचित्रांनी, भारतीय भित्तिचित्रांच्या परंपरेला एक अनोखे व स्वारस्यपूर्ण परिमाण प्राप्त करून दिले आहे.

वारल्यांची भित्तिचित्रे ही झोपडीच्या आतील व दर्शनी भिंतीवर काढली आहेत. त्यांच्या चित्र काढण्याच्या पद्धतीला 'चौक काढणे' असे म्हटले जाते. मुख्यतः सणासुदीला व विवाहप्रसंगी चित्रे काढली जातात. विवाहप्रसंगी काढल्या जाणाऱ्या चित्रांना 'पाचवीची चित्रे' आणि ज्या चौकात ती काढली जातात त्याला 'देव चौक' म्हणतात. ही चित्रे मुख्यतः स्त्रियाच काढतात. क्वचितच भगतदेखील चित्रे काढतो.

कुडाची भिंत सारवून तयार केल्यावर मग आंबवलेल्या तांदळाच्या पिठाने त्यावर चित्रे रेखाटली जातात. पाण्यात मुरलेल्या पिठात गवताची किंवा डाहळीची काडी बुडवून चित्राकृती काढल्या जातात. चित्राकृतींची व नक्षीकामांची विविधता हा या कलेचा एक ठळक विशेष आहे.

सामाजिक-सांस्कृतिक रितीरिवाज, भोवतालचे पर्यावरण यांच्याशी त्यांचे चित्र-विषय निगडित आहेत. भातशेतीचे खाचर, बेडूक, खेकडा, विंचू यांसारखे प्राणी, पक्षी, कीटक, नद्या-नाले, डोंगर या विषयांबरोबरच झोपडी बांधणे, ताडी काढणे, तारपा नृत्य हे विषयही त्यांच्या चित्रांतून साकार झाले आहेत. आधुनिक काळातील काही बदलही त्यांच्या चित्रांतून आढळतात. उदाहरणार्थ, बस, आगगाडी यांची चित्रे.

चित्रविषय आणि नक्षीकाम यांची प्रेरणा वारली चित्रकारांना सभोवतालच्या निसर्गातून मिळालेली असली तरी वर्तुळ, अर्धवर्तुळ, त्रिकोण चौकोन अशा भौमितिक आकारांनाही त्यांच्या चित्रांत स्थान मिळाले आहे. किंबहुना भौमितिक आकारांतून आपल्या जीवनाचे चित्रण ते करतात, असेही म्हणता येईल.

वारल्यांच्या चित्रातील भौमितिक आकारांच्या चित्रांना व नक्षीकामाला प्रतीकात्मक अर्थ आहे, असे काही अभ्यासकांचे म्हणणे आहे. या प्रतीकांचा अर्थ पूर्णपणे उलगडला गेला नसला, तरी काही प्रतीकांचा अर्थ लावला गेला आहे. उदाहरणार्थ, देवीपूजेच्या चित्रात येणारा सर्पाकार हा कधी कुळाचार म्हणून येतो, तर कधी कोळ्याच्या जाळ्याच्या शेजारी आला की तो शोषणाचे प्रतीक बनतो. चित्राच्यावरील भागात असलेला वर्तुळाकार हे सूर्यदेवाचे प्रतीक असते, तर धार्मिक पूजेच्या संदर्भात काढलेल्या चित्राच्या चौकटीत काढलेले वर्तुळ हे भूमातेच्या सावलीचे प्रतीक म्हणून येते. दोन त्रिकोण त्यांच्या शीर्षभागी जोडून तयार होणारे चित्र हे सुफलनाची व वनस्पतीची देवता पालघट हिचे प्रतीक असते.

वारल्यांची चित्रकला ही त्यांच्या सामाजिक व सांस्कृतिक जीवनाचा अविभाज्य भाग आहे. आदिवासी मनाचा व कल्पनेचा सामूहिक रूपाने झालेला तो आविष्कार आहे. भास्कर कुळकर्णी या चित्रकाराने आणि पुपुल जयकर यांनी वारल्यांची चित्रकला जगासमोर आणली. जीवा सोमा म्हसे, रत्ना बुधा धुलसाडा, कृष्णा जेठ्या पासारी, दामा मांगल्या देसक, जानू भिवा रावते इत्यादी अलीकडच्या काळातील काही महत्त्वाचे वारली चित्रकार आहेत.

वारल्याप्रमाणेच ठाकरांच्या चित्रकथीची परंपरा फार प्राचीन आहे. सोमेश्वराच्या 'मानसोल्लास' या प्राचीन ग्रंथात चित्रकथीचा उल्लेख आला आहे. चित्रकथी म्हणजे चित्रांद्वारा रामायण, महाभारत व पुराणे यांतील कथांचे कथन करत गावोगावी फिरणारी एक जमात, अशी चित्रकथींची माहिती दिली जाते. चित्रकथेची चित्रे भूर्जपत्र, ताडपत्र, कापडी पट व नंतरच्या काळात कागदावर काढली जात. त्यांतूनच सचित्र हस्तलिखित ग्रंथाच्या परंपरेचा जन्म झाला असावा, असे काही अभ्यासकांचे मत आहे.

१७व्या शतकात विशिष्ट प्रकारच्या लोककला शैलीत काढल्या जाणाऱ्या चित्रांचे पैठण हे एक केंद्र होते. पैठण हे त्या काळात एक तीर्थक्षेत्र होते. या तीर्थक्षेत्राला भेट देणाऱ्या यात्रेकरूंसाठी मोठ्या आकारातील चित्रे काढून, प्रसंगानुरोधाने कथांचे निवेदन करणारे लोक त्या काळी होते. सिंधुदुर्ग जिल्ह्यातील कुडाळ तालुक्यातील पिंगुळी या गावी ठाकर जमातीने ही परंपरा चालू ठेवली आहे.

चित्रकथांच्या पोथ्या म्हणजे दुबंदी पानांचे एक मोठे पुस्तक होय. मोठ्या आकाराच्या कागदाचे चौकोनी तुकडे

गोंदाने पाठोपाठ चिकटवून पान तयार केले जात असे. या पानांवर एकाच कथेतील चित्रे काढली जात. ही चित्रे स्वतः चित्रकथीच काढत. याचा अर्थ चित्रकार व कथनकार अशा दोन भूमिका वठवणारा हा कलावंत होता. राम, सीता, रावण, पांडव, अर्जुन, रुक्मिणी–स्वयंवर, रुक्मिणीहरण, राजा हरिश्चंद्र यांच्या कथांच्या चित्रपोथ्या चित्रकथा तयार करत.

नाट्यपूर्ण विषय, ठसठशीत रंगयोजना, कुंचल्याचे जाड फटकारे हे या चित्रशैलीचे ठळक विशेष होत. स्थानिक कलाशैलीचा या चित्रांवर प्रभाव पडला आहे. ठसठशीत रेखीव चित्राकृती या कलाप्रकाराला अनुरूप होती. कथाकथनाला उपयुक्त होईल अशा प्रकारे चित्रांची रचना केली आहे. चित्राची पार्श्वभूमी न रंगवण्याचे महाराष्ट्रातील लोककलेचे वैशिष्ट्य याही चित्रात आढळते.

चित्रकथा कलाशैलीचे दोन प्रकार दिसून येतात. एका प्रकारात रेखांकनाचा उपयोग ठळकपणे केलेला दिसून येतो. त्यामुळे चित्रात गतीचा एक आभास निर्माण होतो. दुसऱ्या प्रकारातील चित्रांत रेखांकनाचा जरी वापर केलेला असला, तरी त्यातून संथ गतीचा प्रत्यय येतो. पोथ्यांतील लघुचित्रे आणि मंदिरांतील भित्तिचित्रे या दोहोंचा कलापूर्ण व अर्थपूर्ण समन्वय चित्रकथींच्या चित्रांत साधला गेला आहे. चित्रकथीची परंपरा पिंगुळीच्या ठाकरवाड्यातील बाबू लक्ष्मण मसके, लक्ष्मण बाबू मसके, आत्माराम अर्जुन मसके ह्या मसके घराण्यातील कलावंतांनी राखून ठेवली होती. आज ही परंपरा क्षीण झाली आहे.

**रांगोळी**

आदिवासींच्या चित्रकलेबरोबर आणखी एका चित्रकला प्रकाराचा उल्लेख करायला हवा आणि तो म्हणजे रांगोळीचा. भारतीय संस्कृतीत रांगोळीची परंपरा प्राचीन आहे. या परंपरेचा एक आविष्कार महाराष्ट्रातही आढळतो आणि तो आहे 'ठिपक्यांच्या रांगोळी'चा. ज्या वस्तूचे चित्र रेखाटायचे आहे, त्याचा बाह्य आकार प्रथम पांढऱ्या रांगोळीच्या ठिपक्यांनी आरेखित करायचा; नंतर ते ठिपके त्याच रंगाच्या रेषांनी जोडून चित्रवस्तूचे मूर्त रूप साकार करायचे आणि नंतर त्यात लाल, पिवळा, नारिंगी, हिरवा असे रंग भरून चित्रवस्तू आकर्षक व उठावदार बनवायची, अशी रांगोळी काढण्याची साधी पण कौशल्यपूर्ण पद्धत आहे.

भल्या सकाळी उठून जात्यावर बसून ओवी गायची हा जसा स्त्रियांचा दैनंदिन रितीरिवाज होता तसा सकाळी शेणाने सारवलेल्या जमिनीवर घरापुढे किंवा अंगणातील तुळशीपुढे ठिपक्यांची रांगोळी काढण्याचा प्रघात होता. सूर्य, चंद्र, तारे, फुले–पाने, स्वस्तिक यांसारख्या निसर्ग व धार्मिक प्रतीकांप्रमाणे, काही वेळा तांत्रिक विद्येशी संबंधित असणारी प्रतीकेही रेखाटली जात असत. दसरा, दिवाळी यांसारख्या सणासुदीच्या दिवसांत, गणेशोत्सव, कोजागिरी पौर्णिमा, महाशिवरात्र यांसारख्या प्रसंगीही घरांबरोबर मंदिरातही रांगोळ्यांचे नक्षीकाम केले जात होते. खास यजमानांच्या ताटाभोवती किंवा देवाला प्रसाद म्हणून वेगळ्या काढलेल्या ताटाभोवतीही रांगोळीची वेलबुट्टी काढण्याचा रिवाज होता.

बदलत्या काळाबरोबर धार्मिक, पारंपरिक विषयांबरोबरच सामाजिक, राजकीय व लोकप्रिय विषयांवर रंगीत रांगोळ्या काढायला सुरुवात झाली. अशा रांगोळ्यांची प्रदर्शनेही भरवली जाऊ लागली. प्रसिद्ध व्यक्तींच्या चित्रांबरोबरच, निसर्गदृश्यचित्रे, गालिचे हा अशा प्रदर्शनांच्या आकर्षणाचा एक लोकप्रिय विशेष बनला. ही चित्रे 'स्वतंत्रपणे' काढलेली नसत, तर कॅलेंडर, चित्रांची पुस्तके, छायाचित्रे यावर आधारलेली असत आणि ती मूळ चित्राबरहुकूम काढण्याला प्राधान्य दिले जात असे.

रांगोळी काढण्याच्या परंपरागत तंत्राबरोबर पाण्यावर रांगोळी काढण्याची, फळा–फुलांच्या माध्यमातून रांगोळ्या काढण्याची नवी तंत्रेही वापरली जाऊ लागली. रांगोळी हा हळूहळू लोकप्रिय चित्रप्रकार बनत गेला आणि 'हौशी' व 'व्यवसायिक' रांगोळीकार अशी ह्या कलावंतांची विभागणी केली जाऊ लागली. पुण्याचे वसंत थिटे, मुंबईचे गुणवंत मांजरेकर, कमलाकर गोंजी, कांबळी यांसारख्या व्यावसायिक रांगोळीकारांचा उल्लेख या संदर्भात करता येईल. 'खास स्त्रियांचा' म्हणून समजल्या जाणाऱ्या या कलाप्रांतात पुरुषांनीही आपले नैपुण्य दाखवायला सुरुवात केली होती. ठिपक्यांची रांगोळी कशी काढायची, याची माहिती देणाऱ्या पुस्तिकाही प्रसिद्ध केल्या जात होत्या.

अलीकडच्या काळात हा कलाप्रकार सणासुदीच्या प्रसंगांपुरता मर्यादित झाला आहे.

### समारोप

बहुविधता हा भारतीय संस्कृतीचा आणि कलेचा एक ठळक व मूलभूत विशेष आहे. महाराष्ट्रातील संस्कृती व कलाही त्याला अपवाद नाही. संस्कृती आणि कला यांचा अति निकटचा व परोपजीवी संबंध लक्षात घेतला, तर इतर दृश्यकलाप्रकारांप्रमाणे महाराष्ट्रातील चित्रकलेतही तो दिसून येतो. महाराष्ट्रातील चित्रकलेवर परंपरागत कलाशैलींप्रमाणे रजपुत, मोगल, पर्शिअन तसेच आंध्र, कर्नाटक यांसारख्या दक्षिणेकडील कलाशैलींचा प्रभाव पचवून स्वतःची 'ओळख' (identity) निर्माण करण्याची तिची धडपड जमल्यावाचून राहत नाही.

भित्तिचित्रे, लघुचित्रे, पटचित्रे, पोथीचित्रे, काचाचित्रे यांसारखे चित्रकलेचे विविध प्रकार व त्यांतील शैलींची विविधता, यांमुळे महाराष्ट्रातील चित्रकला समृद्ध झाली. प्राचीन काळापासून मध्ययुगाच्या समाप्तीपर्यंत चित्रकले–बरोबरच जनजीवनाशी एकरूप झालेल्या रांगोळी कलेलाही अविभाज्य स्थान आहे. ह्या चित्रशैलींनी महाराष्ट्रातील चित्रकलेला लक्षणीय आयाम प्राप्त करून दिला.

१८व्या शतकाच्या अखेरीस मराठी राज्यकर्ते, त्यांचे सरदार–दरकदार यांचा युरोपिय चित्रकलेशी संबंध येऊ लागला होता. १९व्या शतकाच्या उतरार्धात म्हणजेच अर्वाचीन काळाच्या प्रारंभी, ब्रिटिश राजवटीत सर जे. जे. स्कूल सारख्या कलाशाळेतून युरोपिय चित्रकलेचे शिक्षण देण्याची अधिकृत व्यवस्था अस्तित्वात आली. महाराष्ट्रातील सामाजिक व सांस्कृतिक जीवनात होऊ लागलेल्या बदलांबरोबर चित्रकलेच्या परंपरागत रूपातही बदल होऊ लागले होते. अर्वाचीन काळातील जनजीवन व कला यांत होणाऱ्या बदलांमुळे आणि नव्यानव्या गरजांमुळे भारतीय चित्रकलेप्रमाणेच महाराष्ट्रातील चित्रकलेचे प्राचीन व मध्ययुगीन चित्रकलेशी जोडली गेलेली नाळ उत्तरोत्तर क्षीण होत गेली आणि आधुनिक चित्रकलेच्या वाटचलालीला सुरुवात झाली.

**संदर्भ :**


१. अजिंठा, राम अनंत थत्ते, अक्षरमुद्रा प्रकाशन, नाशिक २००४.
२. आदिवासी कलाविष्कारातील सौंदर्यप्रेरणा, नरेन्द्र विश्वनाथ बोखारे. संज्ञापन विद्या व ललितकला. संपादक: रमेश नारायण वरखेडे, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक, २००३.
३. आदिवासी कलाविश्व, डॉ. गोविंद गारे, उत्तमराव सोनावणे संपादन : सुधीर जोग, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, महाराष्ट्र शासन, पुणे, १९८६.
४. प्राचीन भारतीय कला, म. श्री. माटे, महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथ निर्मिती प्रकाशन, पुणे, १९७४.
५. भारतीय चित्रकलेची परंपरा, श्री. भि. वेलणकर, लोकप्रभा, वर्ष ७ वे, अंक ३२८, ६ एप्रिल १९८०.
६. मध्ययुगीन कला भारती, म. श्री. माटे, कमल चव्हाण, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, २००२
७. महाराष्ट्र, संपादिका : शरयू दोशी, मार्ग पब्लिकेशन, मुंबई, १९८५
८. महाराष्ट्र संस्कृती, पु. ग. सहस्रबुद्धे, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, १९७९.
९. वारली संस्कृती, डॉ. गोविंद गारे, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, २०००.
१०. विजयनगरकालीन चित्रकला, श्री. एस. परमशिवन विजयनगर स्मारक ग्रंथ भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे १९३६.
११. सातवाहनकालीन महाराष्ट्र, डॉ. रा. श्री. मोरवंचीकर, प्रतिमा प्रकाशन, पुणे, १९९३.
१२. सिंधुदुर्ग जिल्ह्यातील आदिवासी ठकार, मोहन रणसिंगे, लोकवाङ्मय गृह, मुंबई – २००७.
१३. लेणी महाराष्ट्राची, दाऊद दळवी, ग्रंथाली, मुंबई २००४.
१४. Chitrakathi, Folk Paintings of Paithan, Raja Dinkar Kelkar Musium Publication, Pune, 1996.
१५. Homage to Kalamkari, Marg Publication Mumbai, Reprint 1979.
१६. Introduction to Project Menavali, J. D. Gondhlekar (unpublished document).


* * *



# कला व स्थापत्य



## संगीत

■ माधव इमारते

अठराव्या शतकापर्यंतचा महाराष्ट्रातील सांगीतिक इतिहासाचा आढावा घेताना महाराष्ट्रात आदिम संगीत, लोकसंगीत, धर्मसंगीत/ भक्तिसंगीत, जनप्रीय संगीत, कला संगीत संगम संगीत या प्रमुख संगीताच्या कोटींमधून विविध संगीत रूपधारा वाहत होत्या असे दिसते. त्यामुळेच महाराष्ट्रात सांगीतिक समृद्धी विपुल प्रमाणात होती, असे निश्चितपणे म्हणता येईल महाराष्ट्र हा 'मध्यराष्ट्र' म्हणून मानला जात होता. आजच्या महाराष्ट्राच्या नकाशापेक्षा पूर्वीच्या महाराष्ट्राच्या सीमारेषा या निश्चितच वेगळ्या होत्या.

उत्तर आणि दक्षिण या दोन सीमांमध्ये येणाऱ्या या प्रदेशात या दोन्ही प्रदेशांच्या संस्कृतीचा प्रभाव महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जडणघडणीत झाला असणे अपरिहार्य वाटते. त्यामुळेच की काय संगीत-संस्कृतीतूनदेखील हा प्रभाव दिसून येतो. अर्थात महाराष्ट्रातील संगीत-समृद्धी बहुविध संपन्न झाली. अनेक दिशांकडून येणारे प्रवाह महाराष्ट्राच्या सामाजिक तसेच धार्मिक जडणघडणीशी एकरूप होत राहिले. त्यामुळे संगीतच नव्हे तर महाराष्ट्रातील इतर कलाविष्कारांमधूनदेखील हे प्रभाव आपल्याला दिसून येतात.

**भक्तिसंगीत ही अत्यंत महत्त्वाची व चारशेहून अधिक वर्षे अखंड असलेली अशी परंपरा आहे. समाजाच्या सर्व थरांमध्ये भक्तिसंगीताची लोकप्रियता दिसते. नामसंकीर्तन, पठण, गायन यांतून भक्तिसंगीत प्रतीत होते. एकतारी, मंजिरी, खंजिरी, चिपळ्या, टाळ, अशी वाजवायला सोपी आणि सांभाळायच्या दृष्टीने सुलभ वाद्ये यांत वापरतात.**

संगीताच्या दृष्टीने महाराष्ट्राचा म्हणजेच या 'भौगोलिक क्षेत्राचा' की जो 'महाराष्ट्र' म्हणून ओळखला जात होता, असा विचार करण्यापेक्षा 'मराठी भाषा' बोलणाऱ्यांचा प्रदेश म्हणून जर केला, तर जास्त सोपे जाते असे वाटते. अर्थात हे ढोबळपणानेच म्हणता येईल भाषेचा विचार एवढ्याचसाठी की, ज्या भाषेतून इतर सर्व जनव्यवहार होत होते, त्याच भाषेतून संगीत-रूपे घडत होती, आकाराला येत होती. सांगीतिक धारा त्याच भाषेतून वाहत होत्या, त्यामुळे भाषा महत्त्वाची ठरते. मराठीचे पहिले रूप हे प्राकृत ही 'प्राकृत-महाराष्ट्री' भाषा सांगीतिक आहे असे म्हटले गेले आहे. याचे कारण यात 'स्वरांचा' (vowels) जास्त भाग आहे असे म्हटले जाते. या प्राकृतनंतर मराठी हळूहळू प्रगत झाली. आजच्या मराठीपासून जरी ती वेगळी असली, तरी आजची मराठीशी त्या मराठीची नाते सांगणारी आहे, हे निश्चित. शिवाय संगीत हे मौखिक परंपरेशी विशेष निगडित असल्यामुळे त्यातील सांगीतिकता सहज प्रवाही राहिली. आजही निरनिराळ्या मराठी बोली असलेल्या या महाराष्ट्रात भाषेतून असलेली अप्रत्यक्ष सांगीतिकता दिसून येते. प्रत्यक्ष संगीत नसतानाही, अप्रत्यक्षपणे संगीत भासणाऱ्या भाषेमधून ज्या महाराष्ट्रात व्यवहार चालत होता व अजूनही सुरू आहे, त्या महाराष्ट्रातील सांगीतिक संवेदनक्षमता ही निश्चितच अधिक असावी. यावरूनदेखील महाराष्ट्रातील जनसामान्यांची सांगीतिक संवेदनक्षमतेची पातळी काही अंशी समजते. महाराष्ट्राचा संगीत-व्यापार समृद्ध होण्याकरिता काही अंशी भाषेचा वाटादेखील असावा.

आदिम संगीत, लोकसंगीत, भक्तिसंगीत, लोकप्रिय वा जनप्रिय संगीत व कलासंगीत म्हणजे शास्त्रोक्त व रागदारी संगीत व संगम संगीत अशा पाच सहा कोटींनी संगीत-व्यवहार समृद्ध होत असतो; संगीत-संस्कृती घडत असते. महाराष्ट्रात अगदी सातवाहनांपासून याच संगीत-कोटींची नोंद घेतली गेली आहे. अर्थात काही कालखंडांतील विशिष्ट सामाजिक व राजकीय परिस्थितीमुळे काही संगीत-कोटींना (कॅटेगिरीज) विशेष जोर आलेला दिसतो. उदा. 'कलासंगीत' म्हणून ज्याला म्हणता येईल अशा संगीताचे पुरावे आपल्याला इ.स. २०० इतक्या जुन्या काळापासून दिसत असले, तरी पेशवाईनंतर आणि ब्रिटिशांच्या काळात कलासंगीताला विशेष जोर आला असे दिसते. तसेच शिवाजीच्या काळात सामाजिक व राजकीय परिस्थितीमुळे 'पोवाडा' या प्रकाराला विशेष महत्त्व आलेले होते. तर वारकरी संप्रदायातून भक्तिसंगीताला जास्त जोर आला होता, असे दिसून येते. त्यामुळे असे दिसते की, विशिष्ट राजकीय, तसेच सामाजिक परिस्थितीत काही संगीत प्रकारांचा जोर विशेष प्रचलित असतो, असे म्हणता येईल. या पाच संगीत-धारांबरोबरच खास महाराष्ट्राचे वैशिष्ट्य म्हणता येईल असे दोन संगीत प्रकार महाराष्ट्रात १९ व्या शतकात उदय पावले व ते महाराष्ट्रीयांना म्हणजे मराठी माणसांना विशेष रुचले, असे म्हणता येतील. खरे म्हटले तर या दोन प्रकारांचे रसायन मुख्य प्रमुख संगीत-कोटीतूनच रसायन बनल्यासारखे वाटते. पण महाराष्ट्राच्या म्हणजेच मराठी मनाला भावणारे आणि त्यांच्या सर्वसाधारण रसिकतेला जपणारे असे दोन प्रकार म्हणजे 'नाट्यसंगीत' आणि 'भावगीते'. १९ व्या शतकाच्या मध्यास, नाट्यसंगीत जोरदार व समर्थ सांगीतिक प्रकार महाराष्ट्रात विकसित झाला. शास्त्रीय संगीत आणि रंजक संगीत यांचे अनोखे मिश्रण असलेले हे रूप मध्यमवर्गीय व उच्च मध्यमवर्गीय या दोन स्तरांवरील रसिकांची मध्यम दर्जाची सांगीतिक तृष्णा भागवू शकलीच पण यामुळे उच्च सांगीतिक अभिरुचीदेखील वृद्धिंगत झाली.

तसेच पुढे भावगीत हा गायन प्रकारही रूढ झाला. यांत काव्यवाचन-काव्यगायन- यानंतरची पायरी म्हणून हा प्रकार आला. 'सुरावट गाऊन दाखविता येणारी कविता' असे या भावगीताचे रूप पुढे खूपच विकसित झाले. अगदी विविध भाव-कवितांची वेगवेगळी रूपे आणि लोकसंगीत, रागदारी संगीत, भक्तिसंगीत, पाश्चात्त्य संगीतातील वाद्ये, या सर्वांतून हा प्रकार विकसित झाला, आणि लोकप्रिय झाला. 'नाट्यसंगीत' आणि 'भावगीत' हे संगीतातील दोन विशेष प्रकार आज 'महाराष्ट्राचे' खास वैशिष्ट्य म्हणून मानले जाते. याशिवाय त्या सुमारास म्हणजे १९३१ नंतर चित्रपटाच्या माध्यमातूनही एक वेगळे असे जनमानसात रुजणारे, भावणारे असे 'चित्रपट संगीत' आले. अनेक गोष्टींमुळे हे सर्वसामान्य जनात रुजले. दृश्य माध्यमामुळे व यातील

संगीताच्या विविध उपयोगांमुळे विविध देशी भाषांचा उपयोग यांमुळे हे चित्रपट संगीत विलक्षण परिणामी ठरले. विशेष म्हणजे सर्वसाधारण माणसाच्या गळ्यातूनदेखील ही गाणी गुणगुणली गेली. वेगवेगळे संगीत-दिग्दर्शक, गायक, वाद्यवृंद, रेकॉर्डिंग अनेकविविध खासियत असलेल्या आवाजांच्या गायक-गायिका यांमुळे चित्रपट संगीताचा प्रसार झपाट्याने झाला. विशेष म्हणजे 'मुंबई' हेच चित्रपटसृष्टीचे केंद्र असल्यामुळे महाराष्ट्रातील जनमानसावर या संगीताचा परिणामही विपुल प्रमाणात झाला. आजही चित्रपटसंगीताचे हे सामर्थ्य अबाधित आहे, असे म्हणता येईल. अर्थात ह्या झाल्या १९व्या शतकातल्या गोष्टी.

महाराष्ट्राच्या सांगीतिक इतिहासाचा आढावा घेताना, स्वातंत्र्यापूर्वीच्या म्हणजे १८व्या शतकापर्यंतच्या एकंदर कालखंडात पूर्व सातवाहन (इ.स.पूर्व ७३- इ.स. २१८) सातवाहन (इ.स.२१८- इ.स.९८३), चालुक्य-राष्ट्रकूट (इ.स. ११८७- इ.स. १३४६) यादव (इ.स. ११८७- इ.स. १३४६), मुस्लीम (इ.स. १३४७- इ.स. १६३०) शिवाजी (इ.स. १६३१- इ.स. १६८०) मराठा (इ.स. १६८१- इ.स. १८२०) ब्रिटिश (इ.स. १८२१- इ.स. १९४७) व त्यानंतरचा स्वातंत्र्योत्तर कालखंड एवढा कालावधी विचारात घ्यावा लागतो. या सर्व कालखंडात महाराष्ट्रातून कशा-कशा प्रकारचे संगीत स्रवत आले याचा ढोबळपणाने वा स्थूलपणाने आलेख घेता येईल. प्रस्तुत लेखाचा उद्देश कुठल्या प्रकारच्या संगीत-कोटींचा प्रभाव कुठल्या खंडात विशेष होता, व प्रत्येक संगीत-कोटीत किती विविध प्रकार निर्माण झाले व प्रचलित झाले, आणि या संगीत-कोटींची प्रमुख व ठळक लक्षणे काय, एवढ्यापुरताच मर्यादित ठेवला आहे. त्यामुळे महाराष्ट्राच्या इतिहासाच्या इतर तपशिलात जाण्याला फारसे महत्त्व दिले नसून आवश्यक त्या ठिकाणचीच नोंद घेतली आहे. त्याचप्रमाणे या प्रमुख सहा संगीत-कोटींच्या आधारानेच, संगीत प्रकारांची ओळख करून देणे जास्त सुलभ ठरेल व समर्पकही ठरेल असे वाटते. कारण या संगीत-कोटींचा संबंध विविध सामाजिक-मानसिकतेशी जडलेला असून त्या-त्या समाजव्यवस्थेत ती 'कोटी' अधिक प्रचलित व प्रसारित झाली, व विकसितही झाली, असे म्हणता येईल.

या सहाही कोटींतील पहिली जी 'कोटी' आहे, ती म्हणजे आदिम-संगीताची.

संस्कृतीच्या प्रगतीबरोबरच संगीतही प्रगत होत जाते. आदिम संगीत हे कुठल्याच संगीताचे संस्कार न झालेले असे. 'ज्या निरक्षर लोकांच्या जीवनात लोकसंगीताशेजारीच संस्कारित शिष्ट वा कलासंगीतासारख्यांची धारा वाहत नसते, त्यांचा स्पर्श त्यांना नसतो' अशा प्रकारचे वर्णन आदिम संगीताबद्दल केलेले आहे. सर्वसाधारणपणे आदिवासी, वनवासी, तसेच पर्वतराजींच्या सान्निध्यात राहणाऱ्या लोकांचे संगीत म्हणजे आदिम संगीत म्हणता येईल. आपल्याकडील वारली, कातकरी, गोंड, भिल्ल, पारधी, ठाकर इत्यादी जमातींचे संगीत हे आदिम संगीत म्हणता येईल. निसर्गाच्या सान्निध्यात राहणाऱ्या व मानवी सभ्य समाजापासून दूर असलेल्यांचे हे संगीत. यांत काही वेळा 'निसर्ग-संगीतही' येते. सामूहिकता, गीताबरोबर नृत्याला दिलेले महत्त्व व सुरावटीपेक्षा लयीवर/ठेक्यावर भर, असे आदिम संगीताचे एक ढोबळ वर्णन करता येईल. रंजक अशा संस्कारांनी परिपूर्ण झालेल्या नादांपेक्षा ध्वनिविशेषावर महत्त्व, हे लक्षण दिसते. या एकंदर समाजातच सामुदायिकतेवर भर, निसर्गावर अवलंबून असलेले जीवन काही धार्मिक विधींवर गाढा विश्वास यांतून झालेली निर्मिती ही आदिम संगीताची लक्षणे. जन्ममृत्यू, रात्र-दिवस व सहा ऋतुंचे चक्र यांचा प्रतिसाद त्यांच्या आविष्कारातून दिसतो. आदिम संगीत हे सादरीकरणापेक्षा काही विशिष्ट प्रसंग व थेट भावाभिव्यक्तीकरिता राबविले जाते, जीवनातील अनेकविध घटना म्हणजे जन्म, बारसे, मृत्यू, विवाह प्रसंग इत्यादी प्रसंगांकरिता ह्या संगीताची निर्मिती होते. गाणे, नाचणे व वाद्य वाजविणे यांतून हे संगीत साकार होते. नैसर्गिक अवस्थेतील वस्तूपासूनच यातील वाद्येही घडविली जातात. बांबू, भोपळे, मडके अशा वस्तूंपासून ही वाद्ये तयार केलेली असतात. यांत आपल्याला ढोल, बासरी, घासून वाजणारी चर्मवाद्ये, तारपासारखी फुंकून वाजणारी इत्यादी वाद्ये दिसतात. लयीची वाद्ये जास्त दिसतात.

महाराष्ट्राच्या इतिहासाच्या संदर्भात महत्त्वाच्या गणला जाणारा 'गाथा सप्तशती' ह्या हाल राज्याच्या ग्रंथातून, हा संगीतविषयक ग्रंथ नसला, तरी त्यातून संगीत विषयक काही संदर्भ मिळतात. यातून आदिम संगीताचा सरळ उल्लेख जरी नसला, तरी संगीताच्या चारही कोटींची सूचकता यातून दिसते. यानंतरच्या काळात म्हणजे, यादवपूर्व काळात आपल्याला संगीताविषयीचे अनेक भक्कम पुरावे मिळतात. सोमेश्वराच्या मानसोल्लास या ग्रंथात (११३०) आपल्याला 'ओवी' या महाराष्ट्रातील संगीत प्रकारचा संदर्भ मिळतो, तसेच 'भिल्ल-नृत्याचाही' संदर्भ मिळतो.

आदिम संगीतानंतरची महत्त्वाची कोटी म्हणजे 'लोकसंगीत'. महाराष्ट्राचे लोकसंगीत विपुल व समृद्ध आहे. महाराष्ट्रात रागदारी संगीत नव्हतेच व महाराष्ट्राचे अस्सल संगीत म्हणजे 'लोकसंगीत' असे सरसकट विधान करण्याइतकी विपुलता महाराष्ट्रीय लोकसंगीतात आहे, असे दिसून येते. या वादात न शिरताही महाराष्ट्र हा लोकसंगीताने 'भारलेला' प्रदेश आहे, याची प्रचिती मात्र अजूनही आहे, हे निर्विवादपणे म्हणता येईल. महाराष्ट्रातील मराठी भाषा विविध प्रकारे वेगवेगळ्या विभागांत; खानदेश, कोकण, वऱ्हाड, मराठवाडा, इत्यादींत बोलली जाते. त्यामुळे त्या-त्या विभागातून निर्माण झालेल्या लोकगीतांच्या सुरावटी, काव्य, यांचे कितीतरी प्रकार दिसणे स्वाभाविक आहे. तरी लोकसंगीताचे काही प्रमुख घटक म्हणून दिसतात, ते पाहायला हवेत.

लोकसंगीतात साधारणपणे कंठ-संगीताची मुबलकता असते. वाद्यसंगीताचा स्वतंत्र आविष्कार नसतोच, असे म्हणता येणार नाही. पण मुळातच लोकसंगीतात वाद्ये ही साथी करताच वापरतात. सामूहिकता हे लोकसंगीताचे प्रमुख लक्षण मानले जाते. 'लोक' या शब्दातूनच हे लक्षण ठळकपणे आपल्याला दिसते. प्रादेशिकता हा गुणही महत्त्वाचा ठरतो. कारण त्या-त्या प्रदेशातील भौगोलिक संदर्भ, सामाजिक रूढी, भाषा वगैरेंनी बद्ध झालेली व विशिष्ट प्रादेशिकता जपणारे हे संगीत असते. लोकसंगीताचा उगम सामूहिक आविष्कारातून होतो. व्यक्तिगत भाव-आविष्कारापेक्षा सामूहिक भावनिक आशयाच्या प्रकटनावर विशेष महत्त्व दिले जाते. या कोटीतील काही संगीत प्रकार 'मंचीय' सादरीकरणाच्या पातळीपर्यंत जातात. अर्थात लोकसंगीताचे मंचीय सादरीकरण झाल्यानंतर ते खऱ्या अर्थाने लोकसंगीत राहते का? हा प्रश्न असला तरी लोकसंगीतातून स्फूर्ती घेऊन आजपर्यंत अनेक संगीत प्रकार तयार झालेले दिसतात, किंवा अनेक संगीत प्रकारांत याचा वापर असतो असे म्हणतात. लोकसंगीताचे आणखी एक महत्त्वाचे लक्षण म्हणजे त्यात निश्चित आशयाचे एक गीत असते, त्याला स्वरधून असते. हे गीत खूप कडव्यांचे असते असे नाही. निश्चितच हे गीत गुणगुणण्यासारखे असते. कलासंगीत/रागदारी संगीत व लोकसंगीत यांचे एक नाते असते. यातूनच 'धनू उगम' राग, वगैरेंची निर्मिती झाली आहे. लोकसंगीतावर संस्कार करून विशेषनिर्मिती देखील झाली आहे, हे सर्व संगीत-रसिकांना ज्ञातच आहे.

महाराष्ट्रातील लोकगीतांची व लोकसंगीताच्या प्रकारांची यादी फार मोठी आहे. यात स्त्री-गीते आहेत. 'लौकिक-गीते' आहेत. 'निसर्ग-गीते' आहेत. श्रम-गीते आहेत, अंगाई-गीते, 'पाळणे', 'क्रीडागीते', 'संस्कार गीते', 'कथा गीते', 'धार्मिक गीते', 'नृत्यगीते' इत्यादी लोकसंगीताचे प्रकार महाराष्ट्रात आढळतात. अजूनही यांतील बरेच प्रकार वावरत आहेत, इतकेच काय लोकसंगीताचा वापर सध्याच्या संगीतातदेखील तरुण संगीत-दिग्दर्शक करत असताना दिसतात. महाराष्ट्रात जवळ-जवळ साठाहून अधिक लोकसंगीताचे प्रकार दिसतात.

लोकसंगीताच्या दृष्टीने ऐतिहासिक पुरावे पाहता, गाथा सप्तशतीचा उल्लेख करणे क्रमप्राप्त आहे. गाथा म्हणजे गायले जाणारे पद्य. त्यामुळे त्या गायल्या जात होत्या. महाराष्ट्रातले सामान्य जनजीवन कसे होते, याची कल्पना या ग्रंथावरून येऊ शकते. त्या वेळच्या महाराष्ट्रात दुदुंभी, नगारा, वीणा, मृदंग, बासरी, इत्यादी वाद्ये प्रचलित होती. व्यावसायिक स्त्री-गायिका होत्या, विवाह गीते होती. पतीच्या वाद्यवादनाच्या साथीवर गाणारी पत्नी होती. भरघोस पिके आल्यावर गाणारा गायक (शेतकरी) होता. इत्यादी पुराव्यांवरून लोकसंगीताची लक्षणे असलेली ते संगीत होते, हे निश्चित.

त्यानंतर म्हणजे यादवपूर्व काळातील राजा सोमेश्वराने रचलेल्या मानसोल्लास वा अभिलवितार्थ चिंतामणी (इ.स.११२९–११३१) ह्या कोषात्मक ग्रंथात मात्र लोकसंगीतातील काही प्रकारांचा उल्लेख आहे. ते लोकसंगीत आजही प्रचलित आहे. 'ओवी' या प्रकाराचा उल्लेख आहे. 'महाराष्ट्रातील स्त्रीया धान्य दळताना ओवी गातात' असा यात निर्देश असून 'विवाह–गीतांचाही' उल्लेख आहे. मत्स्यावताराची स्तुती / गुणगान केलेले एक पूर्ण कडवे यात आहे. लोकगीताचे पहिले पूर्ण कडवे म्हणून याचा उल्लेख आहे.

'मानसोल्लास' हा ग्रंथ संगीत–विषयक अनेक गोष्टींवर प्रकाश टाकतो. 'गीत–विनोद' आणि 'वाद्य–विनोद' या प्रकरणांत, वाचनतंत्राचे तपशील, विविध संगीत प्रकारांचा निर्देश वगैरे असून त्या काळची महाराष्ट्राची संगीत परंपरा बरीच व्यापक आणि गुंतागुंतीची असेल. छंदशास्त्राचा उपयोग करून घडविलेली सांगीतिक रूपे, 'संगीत' घडविण्यात देशी (विविध प्रांतीय) भाषेचा केलेला संयोग, इत्यादींमुळे मानसोल्लास हा ग्रंथ महत्त्वाचा ठरतो. आज प्रतीत होणाऱ्या दोन शास्त्रोक्त संगीताच्या पद्धती व अनेक देशी संगीत परंपरा यांची आरंभिक अवस्था १२व्या शतकापासून प्रतीत होऊ लागली होती, असे तज्ज्ञांचे मत आहे.



अजिंठा लेणी – वाकाटककालीन विविध वाद्ये.

गाथा सप्तशतीनंतर जवळ–जवळ १२व्या शतकापर्यंत संगीतावर ग्रांथिक पुरावा मिळत नाही. पुढील सुमारे १००० वर्षांच्या काळात 'वाकाटक' व 'राष्ट्रकूट' यांची राज्ये झाली. वाकाटकांच्या राज्यात राज्यशासन कार्यक्षम होते. त्यांच्या प्रजांना समृद्धी, शांती, सुव्यवस्था लाभली. वाकाटकांनी इ. स. २५० ते ५५० असे तीनशे वर्षे राज्य केले. यानंतरच्या राष्ट्रकूट घराण्याच्या कारकिर्दीत अजंठ्याची भित्तिचित्रे व वेरुळची लेणी झाली. भित्तिचित्रांचा कालखंड ख्रिस्तपूर्व २०० ते इ. स. ७०० असा, तर वेरुळच्या लेण्यांच्या इ. स. ४०० ते इ. स. १२०० यांच्या दरम्यान. यात चित्रित झालेल्या काही प्रसंगांवरून व त्यांतील वादकांच्या चित्रांतून त्यावेळच्या संगीत–जीवनाविषयी मात्र फारसा अंदाज येऊ शकत नाही.

लोकसंगीताचे अनेक प्रकार वारकरी संप्रदायातूनही मिळतात. अर्थात हा भाग जास्त करून भक्तिसंगीताच्या

कक्षेत येतो. पण वारकरी संप्रदायातून भक्तिपंथीय चळवळीला जोर चढला. भजन, कीर्तन, विराण्या, गौळणी, भारुडे, ओवी, इत्यादी रचना यांत झाल्या आहेत. शिवाजी महाराजांच्या काळात 'पोवाडा' या प्रांगणीय संगीत-रूपाला महत्त्व आले. तर पेशव्यांच्या काळात बैठकीची लावणी, फडाची लावणी, शाहिरी गीते यांना जोर आला.

यानंतरची महत्त्वाची कोटी (कॅटेगिरी) ही भक्तिसंगीत/धर्मसंगीताची. अनेक धर्म, विविध देवदेवता, वेगवेगळे पंथ आणि संप्रदाय यांमुळे भारतातच भक्तिसंगीत/धर्मसंगीत हे विपुल प्रमाणात प्रचलित आहे. भक्तिसंगीताचे प्रामुख्याने दोन प्रवाह दिसून येतात. एक प्रवाह कलासंगीताशी जवळीक ठेवून असतो तर दुसरा लोकसंगीताशी, यात सामूहिकता/सांघिकता याला विशेष महत्त्व असते. काहींत एकल गायनालाही महत्त्व असते. सर्वसाधारण जनतेपर्यंत पोहोचण्याचे तसेच त्यांना सामावून घेण्याचे उद्दिष्ट असल्यामुळे कठीण सुरावटीपेक्षा, साध्या सुरावटी व लय हे जास्त परिणामकारक असतात. राग-तालांचाही वापर दिसतो. पण अर्ध-तालांचा, चार किंवा आठ मात्रांचा.

भक्तिसंगीत ही अत्यंत महत्त्वाची व चारशेहून अधिक वर्षे अखंड असलेली अशी परंपरा आहे. समाजाच्या सर्व थरांमध्ये भक्तिसंगीताची लोकप्रियता दिसते. नामसंकीर्तन, पठण, गायन यांतून भक्तिसंगीत प्रतीत होते. एकतारी, मंजिरी, खंजिरी, चिपळ्या, टाळ, अशी वाजवायला सोपी आणि सांभाळायच्या दृष्टीने सुलभ वाद्ये यांत वापरतात.

महाराष्ट्रातील भक्तिसंगीताचा वेध घेताना १२व्या शतकाच्या अखेरीपासून घ्यावा लागेल. महानुभव पंथातील माहिमभट्टांनी लिहिलेल्या लीळाचरित्र या ग्रंथातूनदेखील काही संगीत प्रकार मिळतात. पण साधारणपणे १२व्या शतकाच्या शेवटच्या कालखंडापासून ते १६व्या शतकापर्यंत वारकरी संप्रदायाचा प्रभाव होता. या वारकरी पंथाच्या संतांनीच भक्तिसंगीताची विविध रूपे दिलीच, याशिवाय भक्तिसंगीताचा प्रचारही केला. संगीताच्या दृष्टीने वारकरी पंथातून काही विशेष संगीत रूपे आकाराला आली. देवाच्या नामाचा गजर, नामस्मरण, नामसंकीर्तन, पद, विराणी, खेळिया, अभंग, ओवी, भारूड, कीर्तन, आरती, पाळणा, भूपाळी इत्यादी संत ज्ञानेश्वर, नामदेव, तुकाराम, एकनाथ, दासोपंत, रामदास, इत्यादी महाराष्ट्रातील संतांचे योगदान महाराष्ट्राच्या भक्तिसंगीत प्रवाहात दिसते. यांतील अनेक भक्तिसंगीताचे प्रकार अजूनही मोठ्या प्रमाणावर प्रचलित आहेत. महाराष्ट्राच्या सांगीतिक साक्षरतेत भक्तिसंगीताने निश्चितच भर घातली. विशेषतः वारकरी पंथाने सामूहिकतेवर भर दिल्यामुळे संगीताने समाज भारला गेला व संगीत समाजमुखी झाले. अर्थात 'संगीत' हा या पंथाचा उद्देश नव्हता. याशिवाय मुस्लिमांच्या सत्तेच्या अमलाखाली महाराष्ट्राची राज्यव्यवस्था ढासळली व महाराष्ट्र अनेक संकटांना सामोरा गेला, त्या परिस्थितीत वारकरी पंथातील संगीताने समाजाचे नैतिक धैर्य वाढविण्यास मदत केली.

कीर्तन प्रकारातूनही महाराष्ट्रात अनेक प्रकारचे संगीत जनताभिमुख झाले. १९व्या शतकात महाराष्ट्रात अतिशय लोकप्रिय झालेल्या 'नाट्यसंगीत' या प्रकारावरही कीर्तनाचा प्रभाव दिसतो. नारदीय कीर्तन आणि वारकरी कीर्तन व कीर्तनाच्या इतर अनेक उपशाखांमधून मराठी मनावर संगीताचे खोल संस्कार झाले आहेत.

कलासंगीत/रागदारी संगीत वा शास्त्रोक्त संगीत जरी ब्रिटिशांच्या काळात म्हणजेच आधुनिक कालखंडात अत्यंत भरभराटीस आले असले व त्याचा प्रसार झाला असला, तरी त्याची पाळेमुळे महाराष्ट्राच्या इतिहासात दिसून येतात. 'अभ्यासपूर्ण परंपरेतील सूत्रबद्ध व्याकरण असलेले संगीत' असा कलासंगीताचा साधारण अर्थ करता येईल. अशा प्रकारचे संगीत इ.स. २००पासूनच अस्तित्वात आहे, असे तज्ज्ञांचे म्हणणे आहे. 'प्रबंध', 'चौपदी' यांसारखे प्रकार महाराष्ट्रात पूर्वीपासूनच होते. संत नामदेवांच्या 'ग्रंथसाहेब' या शिखांच्या धर्मग्रंथात समाविष्ट असलेल्या काही रचनांना रागदारीतील चाली दिसतात, तर दासोपंतांच्या (इ.स. १५५१-इ.स. १६१५) भक्तिपर रचनांनाही रागातल्या चाली दिसतात. पुढे रामदासांच्या (इ.स. १६०८-इ.स. १६८१) या ग्रंथांतून ताल, राग, छंद यांचाही संदर्भ दिसतो. यावरून असे दिसते की, पुढील काळात हिंदुस्थानी शास्त्रीय म्हणून मान्यता पावलेले कलासंगीत महाराष्ट्राने कितीतरी आधीच निवडले होते, असे

दिसते. सोळाव्या शतकाच्या सुमाराला उत्तर भारतीय पद्धती निश्चितपणे प्रचलित होती. तसेच नंतर पेशवाईच्या काळात तर इतर संगीत प्रकार ध्रुपद, धमार, ख्याल, टप्पे इत्यादी संगीत प्रकार; सारंगी, सतार, पखवाज इत्यादी वाद्ये; लावणी, पोवाडा, भजन, कीर्तन, पद, भारुडे यांसारखे लोकसंगीताचे प्रकार; तसेच नारदीय कीर्तन व बैठकीची लावणी हे प्रकारही रूढ होते. थोडक्यात ब्रिटिशपूर्व काळातही महाराष्ट्रात ख्यालगायकी होती, पण १९ व्या शतकाच्या मध्यापर्यंत ख्याल गायकीच्या संदर्भात महत्त्वाच्या मानल्या जाणाऱ्या घराण्यांची पताका रोवली. महाराष्ट्राची सांगीतिक संस्कृती चौफेर फुलली.

कलासंगीताचे महत्त्वाचे लक्षण म्हणजे एकल सादरीकरणाला महत्त्व. सांगीतिक कल्पनांच्या विस्तारात व कलावंताच्या सांगीतिक विस्तारक्षमतेस दिलेले महत्त्व. त्याचप्रमाणे कलावंताचा स्वतःचा ठसा उमटवायचा प्रयत्न त्यातून असतो. 'कलात्मकता', 'सौंदर्य' या पातळ्यांवर आपले आविष्कार पोहोचावेत असा कला-संगीताविष्कारवाल्यांचा प्रयत्न असतो. सादरीकरणात श्रोत्यांकडून प्रतिसादाची अपेक्षा असते. कलासंगीताचा श्रोता सर्वसामान्यांपेक्षा निश्चितच सुजाण असतो (समजला जातो). कलासंगीताच्या कलावंताला संगीतशास्त्राचा अभ्यास तसेच त्यातील तांत्रिक कौशल्येही आत्मसात करावी लागतात. कलावंत व श्रोता या दोघांच्या सहवासाने कलासंगीताचा आविष्कार सिद्ध होतो. साधारण कलासंगीताची ही ठळक लक्षणे म्हणता येतील.

कलासंगीतात ध्रुपद, धमार, बडा खयाल, छोटा खयाल, टप्पा, तराना, चतुरंग, त्रिवट, लक्षणगीत इत्यादी शास्त्रीय; तसेच उपशास्त्रीय संगीतातील ठुमरी, गझल, दादरा, चैती, कजरी, सावन आदी प्रकारांचा समावेश होतो.

महाराष्ट्रात १८/१९ व्या शतकात कलासंगीताचा प्रसार जास्त झाला. जयपूर-अचोली, ग्वालियर, आग्रा, किराणा ही चार प्रमुख घराणी महाराष्ट्रात स्थिरावली इतकेच नव्हे तर त्यांची कर्मभूमी ठरली. महाराष्ट्रातील काही कलावंतांनीही उत्तरेकडून जाऊन गानविद्या शिकून महाराष्ट्रात आणली व आपले शिष्य तयार केले. पंडित विष्णू नारायण भातखंडे व पंडित विष्णू दिगंबर पालुस्कर या दोन विष्णुद्वयींने संगीत शास्त्राचा प्रचार आणि प्रसार तर केलाच, याशिवाय कलावंतांना समाजात योग्य मान व आदर मिळावा म्हणूनही प्रयत्न केले. गायनशाळा, विद्यापीठ यांतून संगीत वर्ग भरू लागले. सुरुवातीच्या काळात राजाश्रय, मंदिरे, सरदार-कदरदार यांच्या आश्रयांनी वाढलेल्या कलेला आणि कलावंतांना सामाजिक संस्था, संगीत संस्था, व्यापारी वर्ग यांच्याकडून प्रोत्साहन व आश्रय मिळू लागला. आज या कलेचा / कलासंगीताचा जो चाहता उच्चभ्रू वर्ग तयार झाला व या कलावंतांना समाजात जो मान मिळाला. हा याचाच परिपाक.

'जनप्रिय संगीत' हे जनांसाठी असलेले संगीत म्हणता येईल. जाहिरातीतील संगीत, जिंगल्स, चित्रपटसंगीत इत्यादी जनसामान्यांना आकर्षित करणारे, काही संदेश देणारे व नवीन सांगीतिक रसायनांचा मेळ घालून चटपटीत असणारे हे संगीत. परिस्थितीप्रमाणे बदलत राहणे वर्तमानाबरोबर राहणे, ध्वनिवैशिष्ट्यांवर भर देणे अशी या संगीताची लक्षणे. १९ व्या शतकात या संगीताने विशेष जोर धरला.

साधारणपणे १८ व्या शतकापर्यंतच्या महाराष्ट्रातील सांगीतिक इतिहासाच्या स्थूल व संक्षिप्त नोंदी घेऊन महाराष्ट्रातील संगीत-प्रकार (रूपे) यांबद्दल या लेखात धावती नोंद घेतली आहे. तपशील टाळला आहे. महाराष्ट्राचे एकंदरीत संगीत १८ व्या शतकापर्यंत कसे होते, कुठली रूपे परंपरेने आली आणि ती अजूनही काही प्रमाणात अस्तित्वात आहेत, प्रचलितही दिसतात. हे यावरून थोडेफार स्पष्ट होईल, असे वाटते. महाराष्ट्रातील सांगीतिक रूपरेखांचे, हे जलद रेखाटन आहे, असे म्हणता येईल.

* * *





**पारंपरिक लोकाविष्काराच्या संदर्भात विचार करताना त्याच्या समाजजीवनातील प्रचलित राहण्यामागील प्रयोजन आणि कार्य यांसंबंधी विचार करावा लागेल. नाट्यात्म अविष्कारांच्या संदर्भात हा विचार अधिक महत्त्वाचा ठरातो. कारण नाट्यात्म आविष्काराची समाजसंवेद्यताही येथे लक्षात घ्यावी लागते. सांस्कृतिक घटकांच्या संदर्भात असे दिसते की, ते सतत प्रवाही असतात. निरनिराळ्या काळात पिढ्यान्‌पिढ्या प्रचलित राहतात. या समाजाच्या परंपरेने चालत आलेल्या एकूण जीवनप्रवाहालाच संस्कृती म्हटले जाते.**

# लोकसंस्कृती

**■ डॉ. प्रभाकर मांडे**

प्रत्येक राष्ट्राला त्याची स्वतंत्र सांस्कृतिक ओळख असते. राष्ट्राच्या या सांस्कृतिक निराळेपणातूनच त्या राष्ट्राची अस्मिता निर्माण होते. शतकानुशतकांच्या सांस्कृतिक वारशातून, परंपरेतून हे निराळेपण निश्चित झालेले असते. राष्ट्राची सांस्कृतिक अस्मिता त्या राष्ट्रातील समाजाच्या जीवनसरणीतून, धारणांतून अभिव्यक्त होते. एखाद्या राष्ट्राचे लोक कसे जगतात, त्या लोकांचे विचारविश्व, श्रद्धाविश्व काय आहे, यांवरून त्या राष्ट्राचे सांस्कृतिक वेगळेपण पाहता येते.

या संदर्भात भारताच्या निरनिराळ्या प्रदेशांत प्रचलित असलेल्या रुढी, विधी, समजुती इत्यादींचे स्वरूप पाहिले, तर असे दिसून येते की, त्यांच्या मुळाशी भारतीयांची निराळी मानसिकता निश्चित आहे.

भारताच्या सर्व प्रांतांतील लोकजीवनात प्रचलित असलेल्या पारंपरिक रुढीविधींचा सण-उत्सवांचा अभ्यास केला, तर असे दिसते की समाज त्याची मानसिक प्रतिक्रिया कलाविष्कारांच्या माध्यमांतून

प्रकट करतो. शेते हिरवीगार झाली तर शेतकरी नृत्य करतो, गातो. समृद्धी घरात आली की चित्रे काढतो. म्हणजेच संगीत, नृत्य, नाटक, चित्र या कलांच्या माध्यमांतून तो आपली मानसिक प्रतिक्रिया व्यक्त करतो. जीवनासंबंधीच्या धारणा व्यक्त करतो. हेच त्याचे मानसिक निराळेपण आहे.

महाराष्ट्राच्या संदर्भात विचार केला, तर यापेक्षा निराळा अनुभव येत नाही. इथेही भारताच्या निराळ्या संस्कृतीचे, सांस्कृतिक वास्तवाचे दर्शन घडते. पारंपरिक लोककलाविष्कारांतून महाराष्ट्रातील सांस्कृतिक आशयाचे व वास्तवाचे दर्शन घडते असे निर्विवादपणे म्हणता येते.

या निमित्ताने भारताच्या विविध प्रांतांतील सणांचे, उत्सवांचे, विधींचे स्वरूप पाहिले; तर असे दिसून येईल की, त्यांचा संबंध उपासनेशी नाही. सर्वसाधारणपणे religion या अर्थी जो धर्म शब्द वापरण्यात येतो, त्या अर्थाने धर्माशीही नाही. ते सगळे सण, उत्सव खऱ्या अर्थाने Secular आहेत. प्राण्यांविषयी कृतज्ञतेचा भाव प्रकट करणे, कृषिजीवनाच्या संदर्भात घडणाऱ्या घटनांची मानसिक प्रतिक्रिया देणे, सृष्टीमध्ये घडणाऱ्या विविध घटनांना आपल्या सण-उत्सवांतून स्थान देणे, हे सगळेच भारतीयांचे निराळेपण, सांस्कृतिक निराळेपण, व्यक्त करते.

निसर्गामध्ये होणाऱ्या बदलांच्या संदर्भात भारतीय समाज आपल्या भावना उत्सवाच्या स्वरूपात व्यक्त करतो. नक्षत्रांच्या स्थितिगतीचा, त्यांच्या भ्रमणाचा भूगोलावर, तेथील निसर्गावर परिणाम होतो. जसे सूर्य मकर राशीत आला, तर त्याचा परिणाम ऋतूंवर, कालमानावर होतो. हा बदल जीवनावरही परिणाम करणारा असतो. त्यामुळे भारतीय समाजमानस सणांच्या व उत्सवांच्या स्वरूपात या बदलांचे स्वागत करते.

नाट्यात्म लोकाविष्काराच्या संदर्भात ते विशेषत्वाने घडते. देवतांतरणाचे नाट्य असो की विधिनाट्यात देवता प्रत्यक्ष आल्या आहेत, असा मानस अनुभव असो; यामागे एक समान तत्त्व दिसते. देवतासंचारातून याच तत्त्वाचा प्रत्यय येतो. आदिवासींची दंडासारखी नृत्यनाट्ये यापेक्षा फारशी निराळी नाहीत. सर्व पारंपरिक लोकाविष्काराच्या मुळाशी काही प्रमुख तत्त्वे आढळतात.

१. सादृश्यानुगामी यातुक्रियेचे तत्त्व (आदिवासींची शिकार नृत्ये, विवाहविधीतील गोपा, लग्नविधीचे नाट्य इत्यादी)

२. लौकिकाचे अलौकिकीकरण करणे.

३. देवतांचे अवतरणांचे नाट्य: प्रत्यक्ष किंवा प्रतीक रूपात अनुभवणे.

४. देवतांच्या अवतरणाचा मानस अनुभव घेऊन शक्तभार रंगभूमीवर लीलागायन लीलादर्शन करणे-घडवणे.

५. रंजनप्रधान नाट्यात्म आविष्कार. यातही विधिनाट्याचा आकृतिबंध कायम ठेवणे.

६. संवादमाध्यम म्हणून लोकरंगभूमीचे उपयोजन करणे.

महाराष्ट्रातील लोकरंगभूमीचे उपरिनिर्दिष्ट स्वरूप पाहिले तर असे स्पष्ट दिसते की, धर्मप्रेरणा हेच या लोकसांस्कृतिक घटकांच्या मागे प्रेरक तत्त्व आहे. सामाजिक परिवर्तनाचा परिणाम म्हणून सांस्कृतिक वास्तवाचे किंवा आशयाचे स्वरूप बदलण्याच्या प्रक्रियेला प्रारंभ झाला असून, त्यामुळे विधिस्वरूपी किंवा विध्यंगभूत रंगाविष्कारांचे लौकिकीकरण होत आहे. ज्या प्रमाणात त्याचे लौकिकीकरण होते आहे, त्याच प्रमाणात त्यांचे रंजनमूल्य किंवा प्रसारमाध्यम म्हणून मूल्य वाढत आहे.

अलीकडच्या काळात आदिवासी, ग्रामीण आणि नागर यांच्या आविष्कारातील सीमारेषा अस्पष्ट होत आहेत. परस्परांच्या आविष्कारामागील प्रेरणांचे आदानप्रदान होत आहे. परिणामस्वरूप पारंपरिक नाट्याविष्कार रूपांतरण प्रक्रियेमधून जात आहे.

समाजात परंपरेने चालत आलेल्या लोक-सांस्कृतिक घटकांचे परस्परसंबंध एका तत्त्वाने नियंत्रित केलेले असतात. हे तत्त्व सर्व अभिव्यक्त बाबींच्या मुळाशी असते; प्रेरक आणि नियंत्रक असते आणि तेच सर्व अभिव्यक्त घटकांतून अनुभवास येते. त्याला आपण संस्कृतीचा गाभा म्हणू शकतो. परंपरेने चालत आलेल्या

सांस्कृतिक बाबींत मूर्त आणि अमूर्त अशा दोन घटकांतील संबंध समजून घेणे ज्याप्रमाणे महत्त्वाचे, त्याचप्रमाणे अनेकविध अभिव्यक्त घटकांच्या परस्परसंबंधांच्या व संदर्भाच्या आकलनातून सांस्कृतिक स्वत्वाच्या आकलनाचा प्रयत्न करणे आवश्यक आहे. त्याशिवाय कोणत्याही संस्कृतीचे यथार्थ आकलन होऊ शकत नाही.

### पारंपरिक लोकाविष्कारांचे सांस्कृतिक संदर्भ

समाजजीवन ज्या कृति-उक्तींनी व्यक्त होते, त्यांत दोन प्रकारच्या बाबी असतात. त्यांतील काही घटक परंपरेने आलेले असतात. म्हणजे मागच्या पिढीकडून वारशाने मिळालेले असतात. नंतरची पिढी मागच्या पिढीकडून त्याच बाबींचा स्वीकार करते आणि प्रचलित ठेवते; ज्यांना त्यांच्या काळात अर्थपूर्णता असते. समाजजीवनातील एखाद्या कृतीची अर्थपूर्णता किंवा त्या बाबीचे असणे आणि संभवणे त्याच्यामागील प्रेरणा, त्याचे समाजजीवनाच्या संदर्भातील कार्य आणि त्याच्या असण्यामागील प्रयोजन या बाबींमुळे निर्धारित होते. म्हणूनच समाजात परंपरेने चालत आलेल्या बाबींचे यथार्थ आकलन करून घेण्यासाठी त्यांच्यासंबंधीचे समाजातील संदर्भ पाहावे लागतात. परंपरेने चालत आलेल्या एखाद्या घटकाचे आकलन, समाजजीवनातील इतर घटकांशी त्याचा असणारा परस्परसंबंध आणि त्याच्याशी संबंधित अनेकविध संदर्भ यांच्या यथार्थ आकलनानेच होऊ शकेल. अशा वेळी प्रामुख्याने दोन प्रश्नांची उत्तरे शोधावी लागतात. त्या सांस्कृतिक घटकाच्या असण्या मागचे आणि संभवण्यामागचे उद्दिष्ट काय आणि तो सांस्कृतिक घटक समाजजीवनाच्या संदर्भात कोणते कार्य करतो किंवा त्याच्याकडून कोणते कार्य घडते? या दोन प्रश्नांची उत्तरे मिळाली, तर समाजजीवनातील सांस्कृतिक घटकांचे आकलन होऊ शकते.

आपण असे पाहिले की माणसाच्या भोवती दोन पर्यावरणे असतात. एक निसर्गदत्त आणि दुसरे मानवनिर्मित. मानवनिर्मित पर्यावरणालाच संस्कृती, असे म्हटले जाते. यातील प्रत्येक घटक समाजजीवनाच्या संदर्भात उपयुक्त, काहीतरी प्रयोजन व कार्य असलेला, म्हणजेच समाजजीवनाच्या संदर्भात अर्थपूर्ण असतो. अर्थपूर्णतेचा शोध घेण्यासाठी किंवा स्वरूप समजून घेण्यासाठी अनेकविध संदर्भ पाहावे लागतात. समाजातील घटकव्यक्तींच्या कोणत्या गरजा त्यातून पूर्ण होतात. त्याचप्रमाणे एकूण समाजाच्या संदर्भात त्याच्या असण्यामुळे कोणते कार्य घडते, ते तपासावे लागते. सांस्कृतिक घटकांच्या असण्यामागील किंवा संभवण्यामागील उद्दिष्ट आणि त्याचे व्यक्तीच्या किंवा समाजजीवनाच्या संदर्भातील कार्य क्षीण झाले, तर एक म्हणजे त्याचे असणे किंवा संभवणे खंडित होते किंवा त्याच्या स्वरूपात परिवर्तन होते.

पारंपरिक लोकाविष्काराच्या संदर्भात विचार करताना त्याच्या समाजजीवनातील प्रचलित राहण्यामागील प्रयोजन आणि कार्य यांसंबंधी विचार करावा लागेल. नाट्यात्म अविष्कारांच्या संदर्भात हा विचार अधिक महत्त्वाचा ठरातो. कारण नाट्यात्म आविष्काराची समाजसंवेद्यताही येथे लक्षात घ्यावी लागते. सांस्कृतिक घटकांच्या संदर्भात असे दिसते की, ते सतत प्रवाही असतात. निरनिराळ्या काळात पिढ्यान्‌पिढ्या प्रचलित राहतात. या समाजाच्या परंपरेने चालत आलेल्या एकूण जीवनप्रवाहालाच संस्कृती म्हटले जाते.

जसे आणि जे व्हावे, असे आपल्याला वाटते त्याची नक्कल करण्यात येते आणि त्यातून नाट्यमय रुढी अस्तित्वात आल्या आहेत. या नाट्याविष्काराचे स्वरूप यातुक्रियात्मक असते. शिकारीला जाण्यापूर्वी शिकारीचे नृत्यनाट्य करणे, विवाहसोहळा निर्विघ्न पार पडावा म्हणून विवाहाचे नाटक करणे; या बाबी यातुक्रियात्मक आहेत. यामागे यातूसंबंधीची व यातुशक्तीला कार्यप्रवण करण्यासंबंधीची परंपरेने चालत आलेली धारणा असते. ही धारणा क्षीण झाली, तर अशा यातुक्रियात्मक नृत्यनाट्याचे समाजजीवनातील प्रयोजन आणि कार्य क्षीण होते व ते संपुष्टात येते. शिकारी जीवनसरणी बदलली, तरीही शिकारी नृत्याचे अस्तित्व धोक्यात येते; हे जसे यातुक्रियात्मक नृत्यनाट्याच्या स्वरूपात तसेच विधिनाट्याच्या स्वरूपातदेखील म्हणता येईल. समाजाच्या कल्पना

समजुती बदलल्या, तर विधिनाट्याच्या स्वरूपावर त्याचा परिणाम होतो. अमुक एक केल्याने इष्ट घडेल किंवा अनिष्ट घडेल, अशा समजुतीमागे काही मूलभूत धारणा असतात. या धारणा बदलल्या तर विधी व विधिनाट्यावर त्याचा परिणाम होतो आणि त्याचे स्वरूप बदलू लागते.

समाजात होणाऱ्या परिवर्तनाचा परिणाम परंपरेने चालत आलेल्या बाबींवर म्हणजेच सांस्कृतिक घटकांवर होत असला, तरी त्यांत काही शाश्वत घटक असतातच. ते अबाधित असतात. मानवी जीवनाच्या मूळ प्रेरणांशी संबंधित असतात. हेच परंपरेने चालत आलेल्या बाबींतील अचल घटक होत. समाजजीवनातील हे शाश्वत घटक अबाधित राहून समाजजीवनात होणाऱ्या बदलांशी सतत जुळवून घ्यायला व्यक्तीला साह्य करतात. परिवर्तनातही आपले मूळचे सांस्कृतिक निराळेपण व लय कायम टिकवण्यासाठी ज्याप्रमाणे साह्य करतात, त्याचप्रमाणे जगण्याची प्रेरणा देतात. हे घटक निरनिराळ्या स्वरूपांत अभिव्यक्त होतात. हे अभिव्यक्त घटक संवेद्य असतात, बदलणारे असतात, म्हणजेच चल असतात. याचा अर्थ असा की, पारंपरिक समाजजीवनात अचल व चल घटक दोन्हीही असतात. अचल घटक शाश्वत, अमूर्त, संस्कृतीची लय कायम टिकविण्याचा प्रयत्न करणारे, जीवनाच्या गाभ्याच्या स्वरूपाचे असतात. याउलट चल घटक संवेद्य, समाजातील परिवर्तनाशी जुळवून घेणारे, अभिव्यक्त आकृती असलेले असतात.

## अमूर्त तत्त्वांची मूर्त रूपे

येथे आकार आणि आकृती या संकल्पनांच्या आधारे हा मुद्दा स्पष्ट करता येईल. आकार अमूर्त असतो, स्थिर असतो तर आकृती परिवर्तनशील, बाह्य घटकांशी अनेकविध संदर्भांनी संबद्ध असलेली म्हणजे संदर्भयुक्त असते. आकार आणि आकृती यालाच आपण आशय आणि अभिव्यक्ती म्हणू. हे एकमेकांपेक्षा वेगळे जाणवत असले, तरी त्यांचे मूर्त रूप एकात्मच असते. समाजात परंपरेने चालत आलेल्या सांस्कृतिक बाबींमध्येदेखील ही दोन घटकद्रव्ये दिसतात. प्रत्येक समाजाच्या संस्कृतीची एक आंतरिक लय असते. त्यातून त्या समाजाचे सांस्कृतिक निराळेपण व्यक्त होते. ही आंतरिक लय किंवा सांस्कृतिक निराळेपण अमूर्त असते. अबाधित असते. हाच त्या समाजाच्या जीवनाचा आशय असतो. यालाच त्या समाजाचे सांस्कृतिक स्वत्व, असे आपण म्हणू शकतो. हे सांस्कृतिक स्वत्व किंवा संस्कृतीचे निराळेपण अनेकविध मूर्त व संवेद्य घटकांच्या माध्यमांतून व्यक्त होते. कृतिउक्तींतून अनुभवास येते. परिवर्तनशील असते. हे सांस्कृतिक परंपरेतील चल घटक असतात. समाजजीवनातील परिवर्तनाशी सतत जुळवून घेतात. समाजाची सांस्कृतिक लय किंवा त्याचे सांस्कृतिक स्वत्व आणि त्याची अभिव्यक्त रूपे ही निरनिराळी जाणवत असली, तरी एकात्मच असतात. म्हणजेच सांस्कृतिक निराळेपणाचे दर्शन कृतिउक्तींच्या माध्यमांतून घडते. रूढी, विधी, आचार, पारंपरिक कलात्मक आविष्कार, समजुती यांतून कोणत्याही समाजाच्या संस्कृतीचे दर्शन घडते. समाजाचे निराळेपण, त्याचे व्यक्तिमत्त्व अनुभवाला येते. मात्र ही अभिव्यक्त रूपे म्हणजे संस्कृती नव्हे. या अभिव्यक्त रूपांचा आशय म्हणजे संस्कृती. विविध पारंपरिक बाबींतून समाजाच्या संस्कृतीचे निराळेपण दिसते. सांस्कृतिक वास्तवाचा अनुभव येतो. हे सांस्कृतिक वास्तव पारंपरिक बाबींतील अचल घटक असते. आदिम काळापासून अप्रत्यक्षपणे समाजाचे नियंत्रण करते. समाजजीवनाला दिशा देते. स्वतः परिवर्तित न होता परिवर्तनाला प्रेरणा देते, चल घटकांचे नियोजन करते. त्यांतील बदल स्वीकारून त्याला रूप देते. या अनेकविध रूपांत एकच एक लय, आणि एकच एक सांस्कृतिक आशय अनुभवास येतो. समाजातील परंपरेने चालत आलेल्या बाबींतून या सांस्कृतिक आशयाचा अनुभव घेणे, म्हणजे संस्कृतीचे यथार्थपणे आकलन करणे होय.

येथे आपल्याला महाराष्ट्रातील परंपरेने चालत आलेल्या लोकाविष्कारांचे स्वरूप पाहावयाचे आहे. या आविष्कारातील निराळेपण शोधावयाचे आहे. आपण असे पाहिले की, महाराष्ट्रातील परंपरेने चालत आलेले लोकाविष्कार मग ते यातुक्रियात्मक असोत की विधिस्वरूपी असोत, की नाट्यमय असोत, कलालक्षी

नसतात; जीवनलक्ष्यी असतात. जीवन जगण्यासाठी त्यांचा आविष्कार संभवलेला असतो. जीवनाच्या संदर्भात त्यांना प्रयोजन असते, कार्य असते आणि अर्थपूर्णता असते. म्हणूनच ते त्यांच्या जीवनाचे अंग असतात. त्यांचे केवळ 'असणे' असे केव्हाही नसते. हे आविष्कार निरपेक्ष नसतात तर सापेक्ष, संदर्भयुक्त असतात. हे संदर्भ सामाजिक, धार्मिक, लौकिक जीवनव्यवहाराच्या संदर्भात असतात. यांतही अचल आणि चल असे दोन घटक असतात. अचल घटकांतून महाराष्ट्राच्या समाजाची, त्याच्या सांस्कृतिक निराळेपणाची ओळख पटते. संस्कृतीचे निराळेपण अनुभवास येते. विशिष्ट मानसिकतेचा प्रत्यय येतो. चल किंवा परिवर्तनशील घटक हे काळाशी सदैव संवादी असतात. त्यांतील काही गळून पडतात तर काही नवे दाखल होतात. त्यांच्या संदर्भात देवाणघेवाण ही प्रक्रिया घडते. बाह्यप्रभाव दिसून येतो. नागरीकरण, विज्ञानातील व तंत्रज्ञानातील प्रगती यांमुळे महाराष्ट्रातील पारंपरिक अभिव्यक्तींतील मूर्त, संवेद्य असे चल घटक बदलले आहेत, बदलत आहेत. तरीही महाराष्ट्रातील संस्कृतीचा गाभा मात्र कायम आहे. हेच महाराष्ट्राचे सांस्कृतिक वास्तव आहे, स्वत्व आहे, निराळेपण आहे. चल आणि अचल घटकांच्या या संबंधातच लोकाविष्कारांतील लवचीकतेचे मर्म साठविले आहे. याचे आकलन म्हणजेच महाराष्ट्रातील पारंपरिक आविष्कारांच्या रूपांचे आणि सगळ्यांमधून अभिव्यक्त होणाऱ्या सांस्कृतिक वास्तवाचे, स्वत्वाचे आकलन होणे होय.

## संस्कृतीतील सातत्य आणि परिवर्तन

प्रत्येक समाजाची एक संस्कृती असते. म्हणूनच एका दृष्टीने समाज एक 'सांस्कृतिक गट' असतो. संस्कृतीमुळे मानवप्राणी संघटित स्वरूपात राहतात. संस्कृती ही सदैव प्रवाही असते, गतिशील असते. अविचल अशी कधीही नसते. प्रवाही असणे, हे ज्याप्रमाणे संस्कृतीचे एक लक्षण असते, त्याचप्रमाणे अखंडता, सातत्य हेदेखील संस्कृतीचे महत्त्वाचे लक्षण असते. संस्कृतीचे एका पिढीकडून दुसऱ्या पिढीपर्यंत अखंडपणे संचारण आणि वहन चालूच असते. संस्कृतीत मानवनिर्मित वस्तूंचा, वैयक्तिक प्रेरणांचा आणि कृतिउक्तींचा अंतर्भाव असतो. ती प्रतीकरूप असते. ही प्रतीके अर्थपूर्ण असतात. त्यापासून सांस्कृतिक समाजगटाला काहीतरी बोध होत असतो. या प्रतीकांना, कृतिउक्तींना समाजजीवनात काहीतरी प्रयोजन असते. या बाबींची आपण मागे विस्ताराने चर्चा केली आहे. येथे आपल्याला फक्त एवढेच पाहावयाचे आहे की संस्कृती ही प्रतीकव्यवस्था असते आणि त्याला अनुसरून समाजगटाचे अर्थपूर्ण सुसंघटित असे वर्तन असते. या वर्तनाची एक सांस्कृतिक व्यवस्था असते. या व्यवस्थेनुसार संस्कृतींच्या अनेक अंगांची एक संरचना झालेली असते, संघटन झालेले असते; म्हणून संस्कृती अभंग आणि एकजिनसी वाटते.

सातत्य आणि परिवर्तनशीलता ही वरकरणी परस्परांच्या विरोधी दिसणारी तत्त्वे लोकसंस्कृतीत एकाच वेळी विद्यमान असतात. पारंपरिकतेमुळे, विकार-विरोधामुळे लोकसंस्कृतीत सातत्य राहते आणि संदर्भान्वितता, विकारक्षमता यांमुळे त्यात परिवर्तनशीलता निर्माण होते. येथे संदर्भान्वित घटक संदर्भ बदलला; वेळ, काळ, परिस्थिती यांत बदल झाला की बदलतात. या बदलणाऱ्या घटकांनाच सांस्कृतिक बाबींतील चल घटक असे म्हणतात.

लोकसंस्कृतीचे बाह्य आविष्कृत, संवेद्य घटक संदर्भान्वित असल्यामुळे सतत बदलत असले, तरी काही बाबी अशा असतात की, ज्यामुळे त्यांतील सातत्य जाणवते. त्यांनाच आपण संस्कृतीतील 'अचल' घटक म्हणतो. अचल ह्याचा अर्थ कधीही न बदलणारे, स्थिर असा मात्र घेता येणार नाही. हा मुद्दा स्पष्ट होण्यासाठी आपण नदीचा दृष्टान्त पाहू. नदी प्रवाही असते, तिचे पात्र सतत बदलत असते. प्रत्येक ठिकाणचे तिचे 'रूप' वेगळे असते. तेथील परिस्थितीने निश्चित केलेले असते. तिच्यात प्रत्यही नवे पाणी दाखल होते. आधीचे बाष्प होऊन, भूमीत जिरून, वापरून कमी होते. असे असले, तरी उगमापासून ते समुद्राला मिळेपर्यंत प्रवाह एकच असतो, तोच असतो. हा प्रवाह म्हणजे नदीला गतिमान ठेवणारी, तरी सातत्य टिकवणारी उर्जा असते. ती अमूर्त असते परंतु तिचे असणे जाणवते. अगदी असेच काहीसे सांस्कृतिक

प्रवाहाचे असते. यातील संदर्भान्वित घटक सदैव बदलतात. मात्र, त्यातील आत्मतत्त्व, गाभा, जीवनप्रवाहाचे सातत्य टिकवणारे घटक अचल असतात. नदीचे आत्मतत्त्व ज्याप्रमाणे तिचा प्रवाह असतो, त्याचप्रमाणे संस्कृतीची आणि त्यातही विशेषत्वाने लोकसंस्कृतीची लय आत्मतत्त्व, गाभा हे त्यातील अचल घटक होत. या अर्थाने त्याला 'अचल' म्हटले आहे. सातत्यनिदर्शक म्हणून अचल म्हटले आहे, हे येथे लक्षात घ्यावयास हवे. त्यातच सांस्कृतिक स्वत्व असते. निराळेपण असते. समाजाच्या विश्वकल्पनेचे, श्रद्धाविश्वाचे, कल्पनाविश्वाचे, धारणांचे स्वरूप स्पष्ट होते.

एखाद्या सांस्कृतिक गटाची विश्वकल्पना (World View) बदलली, जीवनदृष्टी बदलली, त्यात आमूलाग्र परिवर्तन झाले की त्याची संस्कृती नष्ट होते. नाईल नदीच्या काठी असलेल्या समाजावर मुसलमानांचा अंमल आल्यावर तेथे असे घडले. कवी इक्बाल यांनी यूनान, मिस्त्र, रूम सब मिट गये जहाँ से। अब तक मगर है बाकी हिंदोस्तां हमारा' असे जे म्हटले, त्याचा अर्थ स्पष्ट आहे. भारताची संस्कृती अबाधित आहे कारण येथील सांस्कृतिक वास्तवाचा आधार असलेली विश्वकल्पना (World View) प्राचीन काळापासून समाजजीवनात सातत्य टिकवून आहे. भारतात निरनिराळ्या भाषा बोलणारे समाजगट आहेत. त्यांच्यात काही सांस्कृतिक विशिष्टताही आहेत. असे असले तरी त्यांचे सांस्कृतिक स्वत्व एक आहे. त्यांचा सांस्कृतिक गाभा एक आहे. कारण त्यांची विश्वकल्पना (World View) एक आहे. त्याची प्रदेशविशिष्ट अभिव्यक्त रूपे बदलणारी, चल, संदर्भान्वित आहेत. मात्र त्यांचे आत्मतत्त्व एक आहे. भारतातील सगळ्या प्रांतांतील पारंपरिक लोकाविष्कारांत किंवा लोकसंस्कृतीत बाह्यात्कारी काही भेद दिसत असले, तरी आंतरिक सारखेपणा दिसतो. त्याचे कारण त्यांचे सांस्कृतिक स्वत्व एक आहे हेच होय. त्याचे आकलन झाले की, येथील पारंपरिक लोकाविष्कारांचे किंवा लोकसंस्कृतीचे यथार्थ आकलन होऊ शकेल.

एखादा समाज कमीत कमी काळामध्ये बदलला, तर त्यातील घटकव्यक्तींच्या वागण्याबोलण्याचे स्वरूप संमिश्र दिसते. लोकसंख्येची वाढ, शास्त्रांचा शोध, संस्कृतीचे आदानप्रदान, ऐतिहासिक व सामाजिक घटकांचा प्रभाव, समाजपरिवर्तनाच्या या प्रक्रियेत कितपत साह्यभूत होतात; यासंबंधीही विचारमंथन चालू आहे. निर्मिती, पुनर्निर्मिती, घटना, पुनर्घटना यांतून समाजातील व्यक्ती आणि व्यक्तींचे गट अभिव्यक्त होत असतात. कोणताही सुनियंत्रित समाज त्यातील घटक व्यक्तींच्या अभिव्यक्तीला वाट करून देतो. तसेच अप्रत्यक्ष नियोजनही करतो. त्याच्यासमोर मानकेही निश्चित करतो. तरीही समाजात परिवर्तनाची प्रक्रिया सतत होतच असते. ती अत्यंत गुंतागुंतीची असते. त्याचप्रमाणे ती प्रक्रिया ही समाजातील व्यक्तींच्या परस्परसंबंधांच्या परिघातच घडत असते. दोन प्राण्यांचा परस्परसंबंध किंवा सजीव-निर्जीव वस्तूंचा परस्परसंबंध आणि व्यक्तींचे परस्परसंबंध यांच्यात मूलतः फरक असतो. या परस्परसंबंधांना निश्चित दिशा असते. तरीही ते सतत बदलत असतात. व्यक्तींच्या परस्परांशी असलेल्या संबंधांवर आणि त्यांतून त्यांच्यात निर्माण होणाऱ्या क्रिया-प्रतिक्रियांवर समाज आधारित असतो. समाजातील परिवर्तनाची बीजेदेखील या संबंधातच असतात.

### सामाजिक संरचना व समाजपरिवर्तनाची कारणे

एका दृष्टीने समाज म्हणजे व्यक्तींच्या सामाजिक संबंधांची सतत परिवर्तित होणारी संरचना. समाजातील घटकव्यक्तींच्या परस्परसंबंधांच्या मुळाशी एक मान्यतेचे तत्त्व असते. परस्परांत असणाऱ्या काही समान तत्त्वांचा आधार असतो. प्रत्येक सामाजिक घटकाला संरचनेच्या संदर्भात प्रयोजन असते, कार्य असते आणि म्हणून अर्थपूर्णताही असते. यात कोणताही बदल झाला, तर सामाजिक परिवर्तनाच्या प्रक्रियेला प्रारंभ होतो.

सामाजिक संरचनेत कोणताही बदल झाला, तरी सामाजिक परिवर्तनाच्या प्रक्रियेला प्रारंभ होतो. हा बदल अंतर्गत कारणांनी किंवा बाह्य प्रभावाने होऊ शकतो. समाजामध्ये ज्या निरनिराळ्या संस्था निर्माण होतात. त्यांतील परिवर्तनाच्या मागेही हीच तत्त्वे असतात. समाजाच्या परिवर्तनाचे स्पष्टीकरण करणाऱ्या घटकांच्या संदर्भात पुढील कारणे सांगण्यात आली आहेत. तंत्रज्ञानात

बदल, अर्थव्यवस्थेतील बदल, सामाजिक-सांस्कृतिक धार्मिक संघर्ष, आदर्शांमध्ये बदल आणि सांस्कृतिक आदानप्रदान, यापैकी एक किंवा अधिक कारणांनी समाजातील परिवर्तनाला सुरुवात होते किंवा त्याला गती मिळते.

### समाजपरिवर्तनाची गती

आधुनिक काळात नवीन वैज्ञानिक शोधांमुळे तसेच तंत्रज्ञानातील प्रगतीमुळे समाजातील परिवर्तनाला गती मिळाली आहे. कधी-कधी नवीन शोध हा व्यक्ती-व्यक्ती, व्यक्ती-पर्यावरण आणि व्यक्ती-विश्व यांच्यातील परंपरेने चालत आलेल्या संबंधांचा अन्वयार्थच बदलून टाकतो.

### विज्ञान आणि तंत्रज्ञानातील वाढ

कधी-कधी वस्तूंना नवे संदर्भ प्राप्त होतात. त्यामुळे समाजात परिवर्तनाची प्रक्रिया सुरू होते. आधुनिक दळणवळणाच्या साधनांनी भारतातील स्पृश्यास्पृश्यता घालविण्याला मदत केली आहे. नळ, वीज, यामुळेदेखील परिवर्तनप्रक्रियेला चालना मिळाली. तंत्रज्ञानाच्या वाढीमुळे अनेक समजुती, रूढी यांत बदल झाला. हे बदल कृषिजीवनामध्ये फारच झपाट्याने झाले. मळणीयंत्रामुळे राशीखाली परीस ठेवणे इतिहासजमा झाले. वाफ-धावणी, आंबील-ढवारा यासंबंधीच्या रूढी निकालात निघाल्या आहेत. मळणी यंत्रामुळे बैलांच्या तुडविण्याचे मळणीचे तंत्र बदलले. त्यामुळे मेढ रोवणे, खळे शिंपडणे आणि त्याच्या मोबदल्यात मातंगांनी मातेरे घेणे या प्रथा बंद झाल्या. विज्ञानातील शोध व तंत्रज्ञानातील वाढ यांमुळे समाजात परिवर्तन कसे घडते, हे यावरून स्पष्ट होते.

पाऊस मागण्याची नाट्यमय रुढी, लग्नातील गोपा, मारवाडी समाजातील स्त्रियांनी करायचे लग्नाचे नाटक या नाट्यमय रूढीविधींचे स्वरूप झपाट्याने बदलत आहे. परंपरेने चालत आलेल्या नाट्यविधींचे सजीवावशेषरूप होणे आणि काळाच्या ओघात समाजजीवनातील त्यांचे कार्य संपुष्टात येऊन गळून पडणे, ही प्रक्रिया समाजपरिवर्तनाच्या या काळात, त्यातही विशेषत्वाने तंत्रज्ञान-विज्ञान यांच्या प्रगतीमुळे झपाट्याने होत आहे.

महाराष्ट्रातील डक्कलवाराचे बाड दुर्मीळ झाले आहे. स्वाभाविकपणे त्यांचे पारंपरिक कथाकथन आता रंगत नाही. रायरंदाची फेरी गावात क्वचितच दिसते. अनेक जातींचे लोक व्यवसाय म्हणून बहुरूपी झालेले आढळतात. नाथाजोगी, गोसावी बहुरूप्याचे काम करतात, तर अनेक मुसलमानांनी निरनिराळी सोंगे घेऊन करमणूक करण्याचा व्यवसाय स्वीकारला आहे. समाजामध्ये घडलेल्या स्थित्यंतरांमुळे भिक्षा मागणे आता कमीपणाचे मानले जाते. मातंगांमध्ये सुधारणा होऊ लागली आहे. त्यांच्या संघटना होऊ लागल्या. मातंगांच्या मेळाव्यात हलगी-डफाची होळी पेटू लागली. परिणामी, पोतराज होणे बंद होऊ लागले. यापूर्वी पोतराजाचे पथनाट्य विपुल प्रमाणात गावोगाव दिसत असे. आता ते क्वचित आषाढ मासातच दिसते. तेही कमी होऊ लागले आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या प्रेरणेने पूर्वास्पृश्य महार बौद्ध झाले आहेत. त्यांच्यातील पूर्वापार चालत आलेल्या रूढी (विधी) अस्तंगत झाले आहेत. त्यांच्या जीवनातील विधींचे किंवा रूढींचे प्रयोजन संपुष्टात आले आहे. भादवा हा सण इतिहास जमा झाला आहे. मरीआईच्या जत्रेतील त्यांचा सहभाग संपला आहे. समाजातील सर्वच समाजगटांच्या संदर्भात असे घडत आहे. समाजजीवनातील परिवर्तनाच्या प्रक्रियेत पारंपरिक बाबींची अर्थपूर्णता संपुष्टात येणे, त्यांचे रूपांतरण घडणे हे अनिवार्य असते. कोणताही सुजाण आणि पुरोगामी नागरिक या बदलांचे स्वागतच करील. किंबहुना सुजाण नागरिकाने परिवर्तनाची ही प्रक्रिया गतिमान कशी होईल, या दृष्टीने प्रयत्नशील राहिले पाहिजे.

परिवर्तन तर व्हावे परंतु समाजाची सर्जनशीलता, त्यांच्यातील कलात्मक आविष्कार नष्ट होऊ नये. त्याचे परिवर्तनानुसार रूपांतरण व्हावे. परंपरेतील पोषक घटक संपन्न व्हावेत, विकसित व्हावेत, त्यांना कालसंवादी रूप प्राप्त व्हावे. ते होताना दिसत नाही. परंपरेने चालत आलेल्या नाट्यात्म आविष्काराचे स्वरूप बदलून त्याला कालसंवादी नवे रूप प्राप्त होत नाही, हा खरा प्रश्न आहे.

आर्थिक पुनर्रचना व औद्योगिकीकरण यांमुळे मोठ्या प्रमाणावर नागरीकरण होत आहे. लोक खेड्याकडून

शहराकडे धाव घेत आहेत. ग्रामीण भागातून शहराकडे जाणाऱ्या या लोंढ्यांचा परिणाम त्यांच्या पारंपरिक जीवनावर होणे अपरिहार्य आहे. शहरी जीवनात त्यांच्या कलाविष्कारांचे रसरसलेपण कोमेजून जात आहे. त्यांची फेरावरची गाणी, सामूहिक नृत्यखेळ, त्यांच्यातील नाट्यात्म आविष्कार अक्रसून गेला आहे. धकाधकीच्या गतिशील जीवनात त्यांची पारंपरिक सर्जनशीलता आटून गेली आहे. या सगळ्या परिवर्तनाचा परंपरेने चालत आलेल्या नाट्यपूर्ण आविष्कारावर प्रतिकूल परिणाम होत आहे. महानगरातील तोंडवळ्याचे समाजगट कसेबसे जीवन कंठीत आहेत. समाजातील या अनिष्ट बदलांचा पारंपरिक नाट्याविष्कारावर विपरीत परिणाम होत आहे.

## आर्थिक संबंधांची पुनर्रचना

उत्पादनांच्या साधनांतील बदलांवर समाजरचना अवलंबून असते. म्हणून समाजातील व्यक्तींचे किंवा वर्गांचे आर्थिक संबंध बदलले, तर समाजरचनेत परिवर्तन होते, हा मार्क्सचा विचारदेखील महत्त्वाचा आहे. समाजातील राजकीय, धार्मिक संस्था यांच्या मुळाशी आर्थिक अधःसंरचना (Infra-structure) असते. त्यामधील परिवर्तनानुसार सामाजिक संस्थांमध्येदेखील परिवर्तन होते. सामाजिक संरचना ही आर्थिक संबंधांची निर्मिती असते. औद्योगिक आणि यांत्रिक क्रांतीमुळे समाजाची अर्थरचना बदलते आणि परिणामस्वरूप सामाजिक परिवर्तनाची प्रक्रिया गतिमान होते. महाराष्ट्रात मेढंगी समाजात एक मेंढदार आणि त्याच्या काही मेढीला बांधलेल्या असाम्या असत. 'मेंढदार त्यांच्या गरसुळीचा धनी असे.' म्हणून लग्नविधीच्या वेळी त्याला गूळ–खोबऱ्याचा मान दिला जात असे. औद्योगिक क्रांतीमुळे सगळेच बदलले. व्यवसायमुक्तीचे धोरण स्वीकारल्यामुळे पारंपरिक व्यवसाय व त्यावर आधारलेले समाजगटांचे परस्परसंबंध यांत बदल झाले आहेत. आजच्या काळात समाजाची पुनर्रचना होण्याची प्रक्रिया गती घेत आहे. समाजातील जातिजमातींचे परस्परसंबंध बदलत आहेत. त्यांची सामाजिक–आर्थिक संबंधांमध्ये परिवर्तन होत आहे. परंपरेने चालत आलेली ग्रामरचना खिळखिळी झाली असून, आता उत्पादक कामांच्या संबंधांतील वतनकल्पना पूर्णपणे नष्ट झाली नसली, तरी नष्ट होण्याच्या मार्गावर आहे. बलुतेपद्धती क्षीण झाली आहे. सुतार, न्हावी यांचेच काय ते बलुते काही गावांत अजून टिकून राहिले आहे. आता कोणत्याही जातीचे लोक 'आम्ही अमुक जातीचे मागते आहोत.' असे सांगण्यात अभिमान बाळगत नाहीत. पूर्वी मेगांचे मागते डक्कलवार कोणताही व्यवसाय करीत नसत. आता ते मोलमजुरी करू लागले आहेत. मातंगांसमोर मोर नाचवणे व किंगरी वाजवून बसवपुराण गाणे सांगणे अजून प्रचलित असले तरी त्याचे प्रमाण फारच कमी झाले आहे. मोर नाचविण्याची कला आता तरुणांना येत नाही.

## रूपांतरणाची प्रक्रिया

आपण जेव्हा समाजासंबंधी बोलतो तेव्हा समाजगट, समाजातील संस्था, रूढी, परंपरा, आदर्श इत्यादींसंबंधीचा एक संकल्पनाव्यूह आपल्यासमोर येतो. जीवन आणि त्यांचे पर्यावरण, व्यक्ती आणि भोवतीचे वातावरण, कुटुंब, जातीगट, वर्ग, वंश; आर्थिक, सामाजिक, सांस्कृतिक संस्था या सर्वांसंबंधी पर्यायाने आपण बोलत असतो. या सगळ्या बाबींवर जनसामान्यांच्या परंपरेने चालत आलेल्या जीवनसरणीचा फार मोठा प्रभाव असतो. समाजाचे नियंत्रण परंपरेने होत असते. प्रत्येक समाजाची एक संरचना असते व त्यात बदल होणे, त्याचे विकसन होणे तसेच त्यांतील काही बाबी संपुष्टात येणे, ह्या प्रक्रिया सतत घडत असतात. समाजाच्या रूपांतरणाची ही प्रक्रिया अव्याहत चालू असते. परंपरेने चालत आलेल्या जीवनसरणीचा फार मोठा प्रभाव असतो. समाजाचे नियंत्रण परंपरेने होत असते. परंपरेने चालत आलेल्या काही बाबी समाजात टिकून राहण्याचा प्रयत्न करतात. त्याचबरोबर काहींत सतत परिवर्तन होते. परंपरिकता आणि परिवर्तनशीलता दोन्हीही वरकरणी परस्परविरोधी दिसणारी तत्त्वे एकाच वेळी समाजात असतात. समाजात सातत्य असते, तरीही समाज परिवर्तनशील असतो. समाजजीवनातील सातत्य टिकवणे ही मानवी स्वभावातील प्रवृत्ती असते, तर परिवर्तन हे उपरोक्त स्पष्ट केलेल्या अनेकविध कारणांनी होत असते.

## लोकपरंपरेतील स्थिर व गतिशील तत्त्वे

भारतीय संस्कृतीचे अभ्यासक भारतीय संस्कृतीच्या सातत्यासंबंधी अधिक बोलतात. निरनिराळ्या ताणतणावांनी आणि बाह्य प्रभावांनी होत असलेल्या व झालेल्या परिवर्तनासंबंधी फार कमी चर्चा होते. आपला वारसा, आपले सांस्कृतिक संचित हे प्रामुख्याने लोकजीवनाच्या संदर्भातच पाहता येते आणि त्यामुळे लोकजीवन व लोकपरंपरेत असलेली स्थिर व गतिशील तत्त्वे व त्या दोहोंचे परस्परसंबंध यासंबंधी अधिक गंभीरपणे विचार करणे गरजेचे आहे. समाजजीवनातील काही अचल घटक तर काही चल घटक आहेत. म्हणजेच काही शाश्वत तर काही परिवर्तनशील. समाजजीवनात होणाऱ्या परिवर्तनाच्या संदर्भात या अचल व चल घटकांचे तसेच शाश्वत व परिवर्तनशील घटकांचे परस्परसंबंध तपासून पाहणे अगत्याचे ठरते.

लोकविद्या किंवा लोकसंस्कृती ही असाक्षर, ग्रामीण अनागरांचीच असते, हा विचार आता मागे पडला आहे. सामाजिक आणि सांस्कृतिक संरचनेतील परिवर्तनामागे लोकसंस्कृतीतील गतिशील तत्त्व असते. लोकविद्या आणि लोकसंस्कृतीला पर्यायाने सर्व पारंपरिक लोकाविष्कारांनाही समाजपरिवर्तनाच्या प्रक्रियेत नवे रूप प्राप्त होत असते. संस्कृतीत काही शाश्वत व काही बदलणारे घटक असतात. परंपरेने चालत आलेली लोकतत्त्वे आणि लोकजीवनातील पारंपरिक घटक यांतदेखील परिवर्तन होते आणि समाजाच्या परिवर्तनाला ते कारणीभूत होतात.

समाजात आणि समाजाच्या संरचनेत परिवर्तन होत असतानाच सांस्कृतिक परंपरेतही बदल होत असतो. समाजाला गतिशील ठेवणारे चैतन्यही त्यात विद्यमान असते. परिवर्तनशील समाजाचे सातत्य अबाधित ठेवूनही त्याला प्रवाही ठेवणारे तत्त्व त्यात असते.

## लोकसंस्कृती आणि लोकाविष्कार

महाराष्ट्रातील लोकसंस्कृती व लोकाविष्कार यांसंबंधीचा विचार समाजजीवनातील परिवर्तनाच्या संबंधात अजून कुणीही केलेला नाही. खरे तर लोकाविष्कारांतदेखील अंतर्गत सामाजिक संघर्षाचे प्रतिबिंब सतत दिसत असते. लोकगीते, लोककथा यांतून ते पाहता येईल. त्याचा प्रभावी आविष्कार लोकरंगभूमीवर प्रत्यही होताना दिसतो. राजा-सावकार, पुरोहित व छळणारे अधिकारी यांना तमाशाच्या रंगभूमीवर एवढेच नाही तर लळितातदेखील सतत हास्यविषय केलेले असते. जातिनिष्ठ समाजातील जातीजमातींच्या परस्परसंबंधांतील तणाव, तसेच आदिवासी आणि इतर जमाती यांच्यातील तणावांचे दर्शन लोकाविष्कारात सतत घडते. दंडार, खडी गंमत या नाट्यात्म लोकाविष्कारांचा या दृष्टीने अभ्यास करता येईल.

## नव्या जीवनमूल्यांचा लोकपरंपरेवरील प्रभाव

आधुनिक सामाजिक संस्थांची गुंतागुंतीची रचना हे समाजातील परिवर्तनाचेच फलित आहे. भौतिक आणि मनोमय संस्कृतीमध्ये झपाट्याने बदल होत आहेत. कालच्या श्रद्धा व समजुती यांचे रूपांतर लोकभ्रम व अंधश्रद्धा यांत होत आहे. समाजाची गृहीते बदलत आहेत. एवढेच नाही तर जीवशास्त्रीय संशोधनामुळे व्यक्तिव्यक्तिंच्या परस्परसंबंधांकडे बघण्याची नवी दृष्टी निर्माण होत आहे. विशेषतः पाश्चात्त्य समाज, त्यांची जीवनसरणी, भौतिक प्रगती यांच्या संपर्कातून आधुनिक समाजाच्या जाणिवा बदलत आहेत. समता, बंधुता, स्वातंत्र्य या जीवनमूल्यांच्या स्वीकारामुळे एकूण सामाजिक संरचनेत महत्त्वपूर्ण बदल होत आहेत. या सर्व बाबींचा परिणाम पारंपरिक घटकांवर होणे अनिवार्य आहे. ग्रामीण व नागर यांच्या जीवनसरणीतील सीमारेषाही धूसर होत असल्याचा परिणाम लोकपरंपरेवर होणे अपरिहार्य आहे.

या तथ्यांच्या प्रकाशात समाजजीवन परंपरेने चालत आलेल्या बाबींचा, विशेषतः पारंपरिक कलात्मक आविष्काराच्या बदलत्या स्वरूपाचा विचार करणे अगत्याचे ठरते.

✻ ✻ ✻



## कला व स्थापत्य



**धर्म, भाषा, व्यवसाय अशा वैशिष्ट्यपूर्ण घटकांवर आधारित समूहातील व्यक्तिमन आपापल्या परंपरा जोपासत असत. या सर्व जीवनविशेषांचा आविष्कार आपल्याला नृत्य, चित्र, शिल्प या कलामाध्यमांतून पाहावयास मिळतो. तसेच विधी, शकून, नवस, आचार, विचार, पोषाख ह्यांच्या परंपरांतून प्रथा दिसून येतात. परंपरेने चालत आलेल्या संस्कृतीलाच लोकसंस्कृती संबोधले जाते. मौखिक किंवा अलिखित स्वरूपातील परंपरेने चालत आलेल्या कलेलाच लोकविद्या असे म्हणतात व लोककला हा लोकसंस्कृतीचाच एक भाग होय.**

# लोककला

■ **सुपर्णा कुलकर्णी**

लिखित स्वरूपातील वाङ्मय उपलब्ध होण्याच्याही आधीच्या काळापासून जीवनराहाटीचे पुरावे आपल्याला प्रामुख्याने दोन स्रोतांपासून सापडतात. परंपरेतून संक्रमित झालेले ते दोन स्रोत म्हणजे चित्रलिपी आणि मौखिक वाङ्मय हे होय. मानवी जीवनात सातत्य असते. सातत्यातूनच जीवनाला प्रवाहीपण प्राप्त झालेले असल्यामुळे कल्पना, सवयी, रूढी, संकेत यांचे संक्रमण एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे आपोआपच होत असते. परंपरेने चालत आलेल्या या कृतींना आणि उक्तींना कोणत्याही शास्त्राचा आधार आवश्यक असतोच असे नाही. परंपरेतून चालत आलेल्या आणि संक्रमित झालेल्या या सर्व कृतींमधून आणि उक्तींमधून त्या काळातील संस्कृतीचे दर्शन घडते. मानवाची जुन्यात जुनी उपलब्ध असणारी समाजाची अवस्था प्रकट होते.

## लोककला

मानव हा समूहप्रिय प्राणी असल्यामुळे सर्व अलिखित जीवनाभिव्यक्ती ही कुणा एका व्यक्तीची न राहता ती समूहाची असते. समूहाच्या संवेदना, भावना यांची अभिव्यक्ती असते. धर्म, भाषा, व्यवसाय अशा वैशिष्ट्यपूर्ण घटकांवर आधारित समूहातील व्यक्तिमन आपापल्या परंपरा जोपासत असत. या सर्व जीवनविशेषांचा आविष्कार आपल्याला नृत्य, चित्र, शिल्प या कलामाध्यमांतून पाहावयास मिळतो. तसेच विधी, शकून, नवस, आचार, विचार, पोषाख ह्यांच्या परंपरांतून प्रथा दिसून येतात. परंपरेने चालत आलेल्या संस्कृतीलाच लोकसंस्कृती संबोधले जाते. मौखिक किंवा अलिखित स्वरूपातील परंपरेने चालत आलेल्या कलेलाच लोकविद्या असे म्हणतात व लोककला हा लोकसंस्कृतीचाच एक भाग होय. युरोपात सतराव्या शतकात या विषयाकडे संशोधकांचे व इतिहासकारांचे लक्ष गेले आणि एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धात लोककलेच्या अभ्यासाला खरी सुरुवात झाली. हा अभ्यास अनेक दृष्टींनी केला जातो उदाहरणार्थ भाषाशास्त्रीय, मानववंशशास्त्रीय व मानसशास्त्रीय इत्यादी.

## लोकसाहित्य

लोकविद्येतील शब्दबद्ध आविष्कारालाच लोकसाहित्य असे म्हटले जाते. या सर्व संबोधनांमध्ये येणारा 'लोक' हा शब्द परंपरेने चालत आलेल्या संस्कृतीचे दर्शन घडविणाऱ्या वर्गाचे निदर्शन करतो. लोकसाहित्य मौखिक किंवा लिखित स्वरूपात एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे संक्रमित होत असते. भाषेचा प्रवाहीपणा लोकसाहित्याच्या बाबतीतही दिसून येतो. वेगवेगळ्या काळात त्यावर विभिन्न संस्कार होत जातात आणि त्याचे स्वरूप सतत बदलत जाते. लोकसाहित्य हे व्यक्तिनिर्मित नसून ती एक समूहमनाची निर्मिती असते. त्यामुळे त्यात समाजजीवनाची भावना खोलवर रुजलेली असते. कथा, कोडी, उखाणे असे गद्यात्मक स्वरूप तर स्त्रीगीते, श्रमगीते, खेळगीते ते बडबडगीते, विधिगीते, फेराची गाणी, भगतांची गाणी असे पद्यात्मक स्वरूप आपल्याला लोकसाहित्यात पाहावयास मिळते. कथांमध्ये दैवतकथा, दंतकथा, परीकथा, ज्योतिषकथा असे वर्गीकरण करता येते. पद्याचा भाग काव्यात्म मंगलदायक असला, तरी कधीकधी त्याचा दर्जा दुय्यमही असतो. लोकवाङ्मयाच्या या प्रवाहीपणामुळे लोकजीवन समृद्ध होत जाते व त्याचे पोषणमूल्यही वाढते. लोकसाहित्याची भाषा ही लोकांची बोली भाषा असल्याने त्यात जिवंतपणा, रसरशीतपणा असतो. व्याकरणाचे व शास्त्राचे बंधन त्याला नसल्याने लोकसाहित्य समूहातल्या प्रत्येकाला आपलेसे वाटते, हेच लोकसाहित्याचे वैशिष्ट्य म्हणावे लागेल. लोकसाहित्याचा अभ्यास ज्या रूपातून लोकसाहित्य आविष्कारित होते, त्या तीन प्रकारांवरून करता येतो. एक म्हणजे शब्दबद्ध आविष्कार म्हणजेच 'भाषिक आविष्कार'. यात कथा, गीते, म्हणी, उखाणे समाविष्ट केले जातात. दुसरे म्हणजे 'अभाषिक आविष्कार'. यात लोकचित्रे, लोकनृत्ये, लोकशिल्पे, लोकवाद्ये, लोकनाट्ये ह्यांचा समावेश होईल. तिसरे 'लोकचाररूप आविष्कार' यात सण, उत्सव, दैवते, खाणेपिणे, वेशभूषा, खेळ, जादूटोणा, चेटूक इत्यादी.

लोककथांमध्ये दोन प्रकार आढळतात. एक कथागीते व दुसरा गद्यकथा. विशेष प्रसंगी किंवा सणाला गीतकथा म्हटली जातात तर कथा ह्या बहुधा स्त्रियांच्या व्रतवैकल्यांशी निगडित असतात. याची भाषा गद्य-पद्यात्मक असते. लहान-लहान वाक्ये, वेचक शब्द यांमधून कथेचा प्रारंभ व शेवट केला जातो. लोकगीतांची भिन्नताही त्या-त्या प्रकाराच्या आविष्कारावर अवलंबून असते. ध्वनिपरिणाम साधणारी गीते, उदाहरणार्थ नंदीवाल्याची गीते, पोतराजाची गीते, नाट्यात्म परिणाम साधणारी गीते म्हणजे लळीत, भारूड, बहुरूप्याची गीते इत्यादी. भुलाबाईची, भोंडल्याची किंवा हादग्याची, गौरीची गाणी व अंगाई ही संस्कार करणारी गाणी होत. लावणी, भलरी व मोटेवरची गीते ही श्रमगीते ह्या प्रकारात येतात. डहाका, पोवाडा, कलगीतुऱ्याची, जोगती-जोगतिणीची गाणी गायनगुणावर आधारित असतात.

## लोकनाट्य

मानवी जीवनाचा व निसर्गाचा परस्पर संबंध हा एखाद्या गोफाप्रमाणे असतो. त्यामुळे मानवाच्या सर्व भावभावना, इच्छा-आकांक्षा यासुद्धा निसर्गाशी निगडित असतात. विश्वाचे नियंत्रण करणारी सर्वश्रेष्ठ शक्ती या रूपात तो नेहमीच निसर्गाकडे बघत आहे. साधारणतः ज्या वेळी धान्य शेतात उभे राहते म्हणजेच सुगीच्या दिवसात या निसर्गाप्रती, आणि देवाप्रती असलेला कृतज्ञता भाव दर्शवण्यासाठी सणांचे व उत्सवांचे आयोजन केले जाते. आणि म्हणूनच लोकनाट्य हा प्रकार धार्मिक बैठकीवर अधिष्ठित आहे. सर्व लोकसाहित्याची निर्मिती ही समूहमनाच्या प्रेरणेतून होत असते त्यामुळे त्याचे संगोपनही समूहाद्वारे होत असते. लोकनाट्यामध्ये अंतर्भूत असलेल्या लोकरंगभूमीचे दोन प्रकार पडतात. एक आदिवासी रंगभूमी व दुसरा नागर रंगभूमी होय. महाराष्ट्राच्या बाबतीत बोलायचे झाल्यास या दोन्ही प्रकारांचे सादरीकरण आजही होत असल्याचे लक्षात येते.

## आदिवासी रंगभूमी

अन्न मिळवणे, स्वसंरक्षण व वंशसातत्य ह्या जगण्याच्या तीन प्रेरणा आदिम माणसासमोर होत्या. जीवन प्रमुख प्रेरणा निसर्गावर अवलंबून असल्याने भूकंप, वादळे, अतिवृष्टी, महापूर, रोगराई यांसारख्या संकटांना त्याला नेहमीच सामोरे जावे लागे. ही सर्व संकटे एखादी अदृश्य शक्तीच घडवून आणते, असे त्याला वाटत असे; त्यामुळेच या शक्तीला प्रसन्न केले, शांत केले, तिची भक्ती केली; तरच आपले जीवन आनंददायी होईल या विश्वासातूनच तो व्रताचार, धर्माचार विधी असे करू लागला. आणि ही भक्तिगीते गाऊन, नाट्यरूपातून, नृत्यातून दर्शविण्यात येऊ लागली. यातूनच आदिवासी नाटकाचा जन्म झाला.

## दंडार

आदिवासी नाटक हे या समाजातील, संस्कृतीतील सामूहिक कर्म होय. यातीलच एक प्रकार म्हणजे 'दंडार' हा होय. 'दंडार' हा आदिवासींचा वैशिष्ट्यपूर्ण विधिनाट्यप्रकार होय. गोंड, कोलाम आणि आंध या आदिवासी जमातींत हा नाट्यप्रकार धर्मकार्य म्हणून सादर केला जातो. 'दंडार' या शब्दाचा मूळ अर्थ. दंद म्हणजे भांडण व आर म्हणजे उंच सुरात म्हणावयाचे गाणे. त्याचप्रमाणे दंड म्हणजे टिपरू. 'लहान दंडार', 'मोठे दंडार', 'चौताळी दंडार' असे गोंडाच्या दंडाराचे प्रकार आहेत तर 'कोताल भोगी' व 'कोया भोगी' हे कोलामांच्या दंडाराचे प्रकार आहेत. दंडार ही एक प्रकारची रासक्रीडा होय. दूर पहाडात राहणाऱ्या श्रीकृष्ण भगवंताला प्रसन्न करण्यासाठी 'दंडार' केले जाते. या नाट्यशैलीचे 'पूर्वरंग' व 'उत्तररंग' असे दोन भाग पडतात. देवाचे मुखवटे ज्या पेटाऱ्यात ठेवतात, त्याला दंडारी पेटारा असे म्हणतात. मुखवटा पूजनाला 'कोडाल पूजन' असे म्हणतात. दंडारात ढोल, डफ, शहनाई, तिळबुळी, ढोलकी असा वाद्यमेळ असतो. शिवाय टिपऱ्यासुद्धा वाजवतात. पूर्वरंगात देवतापूजन तर उत्तररंगात जीवनातील लहान लहान प्रसंग विडंबनात्मक पद्धतीने सादर केले जातात. आदिवासी जमातीच्या धर्मभावना, सांस्कृतिक धारणा, समजुती, मूल्यविचार, सौंदर्यभावना यांचे दर्शन दंडारातून होत असल्यामुळे याला मुक्ताविष्कारी नाटक असे म्हटले जाते.

## मादळ

आदिवासी रंगभूमीवरील दुसरा नाट्यप्रकार म्हणजे 'मादळ' हा होय. 'मादळ' हा एक वाद्यप्रकार होय. ठाणे जिल्ह्यातील वारली, कोकणा, ठाकूर ह्या आदिवासी जमातींल मृदंगासारख्या असणाऱ्या परंतु शाई नसलेल्या या वाद्याला देवाची निर्मिती मानतात. या वाद्याच्या साथीने केलेला नाट्यप्रकार म्हणून याला 'मादळ' असे संबोधले जाते. मादळ मुख्यतः लग्नात सादर करण्याचे विधिनाट्य होय. आदिवासी जमातीत शिक्षणाचा अभाव असल्यामुळे लग्नाच्या वेळी पति-पत्नीला गृहस्थधर्माचे शिक्षण देण्यासाठी, रंजनाबरोबरच नीतिबोध देण्याच्या दृष्टीने मादळ सादर केले जाते. कधी-कधी नवसपूर्तीसाठी किंवा होळीच्या वेळीसुद्धा

मादळ सादर करतात. पूर्वरंगात नमन, आदिशक्तीला आवाहन, देवता-पूजन केले जाते. उत्तररंगात स्वतंत्र कथानक असलेले लहान प्रसंग सादर केले जातात. याला 'विगुत' (गोष्ट) असे म्हणतात. यात सिक्केवाला - सूत्रधार, मादळ वादक, घुंगुरवाला, मुख्य गायक, टाळकरी, पावरी वादक ही मंडळी भाग घेतात. आदिवासी जीवन दुःखमय आणि कष्टी असल्यामुळे हे प्रसंग औपरोधिकतेने व विडंबनात्मक रितीने 'मादळ' नाटकात सादर केले जातात. गायन-वादन-नृत्य-अभिनय आणि देवता-पूजन असे आदिवासी नाटकाचे स्वरूप असल्याने 'दंडार' व 'मादळ' हे दोन्ही आदिवासी रंगभूमीवरील समर्थ कलाविष्कार होत, यात शंका नाही.

## लोकरंगभूमी किंवा नागररंगभूमी

मानवी संस्कृतीच्या आदिमपर्वातील समूहमन हे यातुश्रद्धेने भरलेले होते. हळूहळू समाज यातुश्रद्धेकडून देवताविषयक श्रद्धावस्थेकडे झुकू लागला. लोकनाट्यामध्ये याच यातुश्रद्धेतून व इष्टदेवतेच्या उपासनेतून विधिनाट्याचा जन्म झाला. समूहाच्या इष्टकामनेच्या पूर्तीसाठी गंभीर धार्मिक विधी श्रद्धेने केला जाऊ लागला. याच समूहाचे दीर्घकालीन ताण म्हणजेच अन्न, वस्त्र, भविष्य यांची चिंता; हे सुसह्य करण्याच्या दृष्टीने श्रद्धा व रंजन दोहोंचा संगम साधून लोकनाट्य केले जाऊ लागले. 'गोंधळ', 'जागरण', 'दशावतार', तमाशा हे आजही सादर केले जाणारे महाराष्ट्रातील लोकनाट्याचे प्रकार होत.

## गोंधळ

महाराष्ट्रात अनेक घराण्यांचा कुलाचार म्हणून देवीचा गोंधळ घालण्याची अतिप्राचीन परंपरा आहे. 'गोंधळ' या विधिनाट्याचा उगम कुठे व कसा झाला, यावर विविध तज्ज्ञांची मतमतांतरे आहेत. हा एक उपासनेचा कुळाचार विधी आहे. म्हणूनच याला विधिनाट्य असेही म्हटले जाते. महाराष्ट्रात माहूरची रेणूका माता व तुळजापूरची तुळजा भवानी ही दोन शक्तिपीठे आहेत. म्हणूनच गोंधळ या विधिनाट्याचे 'रेणूराई' व 'कदमराई' असे दोन प्रकार आढळतात. कुटुंबकल्याणासाठी, विवाहोत्तर वंशवृद्धी-साठी शिवाय व्रतबंधनाच्या निमित्ताने गोंधळ घातला जातो. गोंधळ हा घराच्या अंगणातील मांडवात घालतात म्हणून त्याला अंगणीय नाट्यप्रकार असेही संबोधले जाते. अंगणात सडासारवण केल्यावर उपलब्ध असलेल्या धान्यराशीवर देवतेची स्थापना केली जाते. पूर्वरंगात देवतेचे पूजन होते. यात संबळासोबतच तुणतुणेसुद्धा वाजवले जाते. गोंधळात गण, गवळण (राधाविलास), देवतापूजन व देवतेच्या भक्तिसामर्थ्याचे आख्यान सादर केले जाते. उत्तररंगात संवाद, सवालजवाब, नृत्य, गायन या सर्व प्रकारांचा प्रभावीपणे वापर केला जातो. कीर्तन, भराड, तमाशा या सर्व कलाप्रकारांची बीजे आपल्याला 'गोंधळ' या विधिनाट्यात दिसून येतात म्हणूनच स्वतःची रंगशैली घेऊन वेगळेपणाने सादर केला जाणारा 'गोंधळ' हा महाराष्ट्रातील महत्त्वाचा लोकनाट्यप्रकार आहे.

## जागरण

लोकनाट्य प्रकारातील जागरण म्हणजे खंडोबा देवाच्या भक्तीसाठी वाघ्या-मुरळी यांनी केलेला जागर म्हणजे होय. महाराष्ट्र, कर्नाटक तसेच आंध्र प्रदेश या प्रातांत खंडोबाची उपासना केली जाते. या उपासनेप्रीत्यर्थ खंडोबाचे जागरण करण्याची प्रथा आहे हेसुद्धा एक विधिनाट्य आहे. गेल्या साताठशे वर्षांपासून ही परंपरा महाराष्ट्रात जोपासली जात आहे.

जागरणाचे सादरीकरण वाघ्या-मुरळी करीत असल्यामुळे यजमान वाघ्या-मुरळींना आमंत्रण देतात. पूजाविधीमध्ये पाच पावली, खंडोबाची स्थापना, कोटंबा पूजन, घटस्थापना गादी भरणे इत्यादींचा समावेश असतो. जागरणातील पूर्वरंगाच्या सादरीकरणामध्ये गणगायन, देवतावतरण, खंडोबाच्या दोन राण्या म्हाळसाई व बाणाई यांचे स्तुतिगायन होते. उत्तररंगात खंडोबा देवाचे आख्यान सादर केले जाते. सादर करते वेळी मुरळीच्या हाती घाटी (घंटी) असते. कथा पुढे नेण्यासाठी प्रश्न विचारून वाघ्या तिला साथ देतो. गायन-वादन-नृत्य-संवाद-अभिनय-

कथन इत्यादी गुणांमुळे जागरण चित्तवेधक व मनाची पकड घेणारे ठरते. पहाटे जागरणाची समाप्ती होते.

**दशावतार**

लोकनाट्य प्रकारातील 'दशावतार' हा कोकणातील अतिशय लोकप्रिय नाट्यप्रकार आहे. मंदिरातील देवतेच्या स्थापनेचा दिवस म्हणजे देवतेचा वाढदिवस. ह्या दिवशी दशावतार सादर करण्याची प्रथा आहे. दशावतारी देवतांच्या तिथी ठरलेल्या असतात, त्या तिथींना दशावतारी खेळ होतात. कोकणातल्या काही दशावतारी मंडळींना ही नाटके सादर करण्याची वर्षासने शेकडो वर्षापासून प्रचलित आहेत. ती आजतागायत चालू आहेत. त्यांतील मुख्य नऊ मंडळे अशी: १) वालावलकर दशावतारी मंडळ, २) गोरेबंधू दशावतारी मंडळ, ३) पार्सेकर दशावतारी मंडळ, ४) आजगावकर नाटक मंडळ ५) खानोलकर नाटक मंडळ, ६) मोचेमोडकर नाटक मंडळ ७) नाईक मोचेमाडकर नाटक मंडळी ८) परुळेकर दशावतारी मंडळ ९) आरोलकर दशावतारी मंडळी.

विष्णूच्या दहा अवतारांतील लीलादर्शन घडविणारे नाटक म्हणून दशावतारी नाटक. हा एक विशिष्ट नाट्यप्रकार आहे. ढोलवादन, देवतापूजन, जांभ देणे, देवतेस ग्रामविधीचे गाऱ्हाणे व नेम देणे – म्हणजेच सर्व गावकऱ्यांनी एकत्र नांदण्याची शपथ घेणे, देवतेची ओटी भरणे, पालखी सोहळा, पेटारा पूजन, वाद्यवादन, बसवा व गोपाल नृत्ये, गणपती आगमन, भटजी आगमन, सरस्वती स्तवन, ब्रम्हदेव स्तवन, शंकासूर आगमन इत्यादी विधींनी पूर्वरंगाची समाप्ती होते. उत्तररंगात श्रीविष्णूच्या महिम्यावर आख्यान सादर केले जाते. हे नाटक रात्रभर चालते व पहाटे काला खेळून याची समाप्ती केली जाते. रंगभूषा, वेशभूषा, गायन, वादन, नृत्य, संवाद इत्यादी प्रभावी गुणांमुळे दशावतारी नाटकातील कलावंताचे कार्यात्मक कौशल्य वाखाणण्यासारखे आहे. कलात्मक आविष्कारातून सामाजिक आचार-विचार, नीति-नियम, समूह भावनेचे जतन कलागुणांची जोपासना इत्यादी समाजापर्यंत पोचविण्याचे काम या नाटकातून केले जाते.

**तमाशा**

महाराष्ट्रातील परंपरागत लोकनाट्य प्रकारांतील सर्वाधिक लोकप्रिय नाट्यप्रकार म्हणजे तमाशा होय. तमाशा ही संज्ञा अरबी असून तिचा अर्थ दृश्य, क्रीडा, खेळ, नाट्यप्रयोग असा होतो. सातवाहनाच्या काळात संगीत, गायन, संवाद यांचे कार्यक्रम सादर केले जात. या कार्यक्रमांत कलावंतिणी भाग देत असत. याला 'रतिनाट्य' असे म्हटले जाई. आजच्या तमाशाचे स्वरूप पाहिले, तर हे रतिनाट्याचे परिष्कृत रूप असावे. सतराव्या शतकाच्या अखेरीस आणि अठराव्या शतकाच्या प्रारंभीच्या काळात तमाशाचा जन्म झाला. पेशवाईच्या काळात तमाशाचा उत्कर्ष झाला. शाहीर रामजोशी, अनंतफंदी, गंगू हैबती, होनाजी बाळा यांसारखे शाहीर उदयाला आले आणि तमाशाचे 'फड' उभे राहिले. याच काळात तमाशात लावणीचा समावेश झाला. पौराणिक कथाविषयांमधून शृंगाराबरोबरच अध्यात्माची जोड दिली गेली व म्हणूनच तमाशा जनमानसात रुजला गेला. आधुनिक तमाशातील प्रमुख अंगे म्हणजेच नृत्यांगना, सोंगाड्या आणि वग ही होत. पेशव्यांचे मुख्य दैवत गणपती म्हणून तमाशात गण आला व देवाधर्माचा शृंगार म्हणून गौळण आली. तमाशाच्या पूर्वरंगात 'गण', 'मुजरा', 'गौळण', 'लावणी', 'बतावणी' असते. बतावणीमध्ये शाहीर आणि सोंगाड्या यांच्या अचाट कल्पनेची थाप असते. विनोदी गोष्ट सांगून ते परस्परांना चकित करतात. प्रेक्षकांचे मनोरंजन व उत्तुंग प्रतिभेचे कल्पनावैभव बतावणीत असते.

उत्तररंगाचे मुख्य अंग म्हणजे 'वग' होय. पौराणिक कथाविषयावर वेगवान कथानाट्य सादर होते. लहान-लहान प्रसंगांची पेरणी करीत कथानक पुढे सरकते. कथानक कोणतेही असले, तरी त्याचा संबंध विद्यमान काळाशी जोडीत व्यंगात्मक टीकाटिप्पणी करीत ते संपते. गतिशील अभिनय, द्व्यर्थी संवाद, सूचक व बोधात्मक कथानक हे तमाशाचे खरे सामर्थ्य होय. तमाशाची रंगभूमी ही खरी देशी रंगभूमी आहे. अनेक कलाप्रकारांना समाविष्ट

करीत रंजन व श्रद्धा असे दोन्ही पदर सांभाळीत ती आजही आपले अंग जोपासून आहे.

### लावणी

हावभावांसह विशिष्ट ढंगात गायले जाणारे शृंगारिक गीत म्हणजे लावणी असे जरी प्रचारात असले; तरी लावणीतील काव्यरचना ही बहुविध स्वरूपाची असते. शृंगारिक गीतांप्रमाणेच, कलगीतुऱ्याचे सवालजवाब, विलासवैभव, दुष्काळ, दंगा, नगरे, तीर्थक्षेत्रे, गौळणी, उपदेशपर फटके, पौराणिक कथा, डोहाळे, न्हाणुली असे अनेक विषय लावणीत येतात. लावणीमध्ये संतकवींच्या रचनेप्रमाणे आध्यात्मिक भक्तिपर गौळणी येतात, पंडितकवींच्या काव्याप्रमाणे पौराणिक विषय येतात परंतु त्यांचा आविष्कार मात्र निराळा आहे. शृंगारिक गीते गाऊन मनोरंजन करणाऱ्या स्त्रियांचे दोन प्रकार आहेत. एक म्हणजे स्थायी, ज्या स्वतःच्या घरी टप्पा, ठुमरी, ख्याल गायन करतात. दुसरा प्रकार फिरत्या स्त्रियांचा. राजे-महाराजे आणि श्रीमंत ह्यांच्या घरी जाऊन शृंगारिक गीते गाऊन मनोरंजन करतात. या फिरत्या स्त्रियांचे उल्लेख हेमचंद्राचे 'काव्यानुशासन' (बारावे शतक), कल्हणाची 'राजतरंगिणी' (बारावे शतक) आणि ज्ञानेश्वरांची ज्ञानेश्वरी (१२९०) यांत आलेले आहेत. पेशवाईच्या अखेरीस आणि इंग्रजी राज्याच्या सुरुवातीस तमाशात गाणाऱ्या पुरुषांची जागा स्त्रियांनी घेतली आणि आजची संगीत बारी सुरू झाली. नृत्यगान करणाऱ्या कलावंतिणी तमाशात शिरल्या तशीच लावणीसुद्धा टप्पा- ठुमरीच्याबरोबरीने गायली जाऊ लागली. लावणीचे पाच प्रकार आढळतात: १) कलगीतुऱ्याची कवने, २) शृंगारिक गीते, ३) पोवाडासदृश रचना ४) कीर्तनसदृश रचना ५) लोकगीतांच्या स्वरूपाची रचना. संतांच्या आणि पंडितांच्या रचनेला काव्य म्हटले जाते तर शाहिरांनी रचलेली ती लावणी. अभंग-ओवीसारख्या छंदातील व संस्कृत वृत्तांतील रचना ते काव्य आणि जाति-छंदातील रचना ती लावणी किंवा आध्यात्मिक व भक्तिपर रचना ते काव्य आणि लौकिक रचना ती लावणी. या लौकिक रूपामुळे या काव्यप्रकाराला लावणी असे नाव पडले. मराठी लावणीची परंपरा ज्ञानेश्वरकालापासूनची असली, तरी आज मुख्यत्वे राम जोशी, प्रभाकर, अनंतफंदी, होनाजी, सगतभाऊ, परशराम यांच्या लावण्या उपलब्ध आहेत.

अप्रगत स्थितीकडून प्रगत स्थितीकडे जाणाऱ्या मानवी जीवनाला एक सूत्र आहे. आजचा प्रगत शहरवासी मानव कधीकाळी वन्यजीवन जगणारा होता. त्याची ग्रामवासी, नगरवासी अशी स्थित्यंतरे झाली. सुरुवातीच्या काळातील यात्वात्मक धारणा बदलून भावनात्मक झाली व नंतर ती बुद्धिवादी झाली. या सर्व प्रवासात मौखिक परंपरेने झालेल्या ज्ञानाच्या व चालीरितींच्या कल्पना त्याच्याबरोबरीने पुढे आल्या. आचार, विचार, नीती, रिती, संकेत, भाषा इत्यादींची जपणूक करीत सौंदर्यभावनेची व मूल्यभावनेची निर्मिती करीत आलेला समूह म्हणजेच लोकसाहित्यातील 'लोक' होय व या समूहाचे साहित्य म्हणजेच लोकसाहित्य. लेखनकलेचा विकास हे मानवाच्या जीवनात क्रांतिपर्व ठरले त्यामुळे मौखिक परंपरा हळूहळू मागे पडली. म्हणूनच एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे संक्रमित झालेले साहित्य आजही आपल्याबरोबर आहे. बदलेल्या जीवनशैलीमुळे लोककला हळूहळू अस्तंगत होते आहे. लोककलेला जिवंत ठेवणारे समाजघटक बदलत्या समाजव्यवस्थेत त्यांना नेमके स्थान नसल्यामुळे नामशेष होण्याच्या मार्गावर आहेत. कलेचे माहेरघर म्हणविणाऱ्या महाराष्ट्राने लोककलेच्या अभ्यासाला पर्यायाने जोपासनेला प्राधान्य दिले, तरच लोककलेचे हे सळसळते चैतन्य टिकून राहील हे निश्चित.

### संदर्भ :


१. मांडे प्रभाकर, लोकसाहित्याचे अंतःप्रवाह, पुणे (१९७५).
२. भवाळकर तारा, लोकनागर रंगभूमी, पुणे (१९८९).
३. भागवत दुर्गा, लोकसाहित्याची रूपरेखा, (१९७७).
४. मांडे प्रभाकर, लोकसाहित्याचे स्वरूप, (१९७८).
५. मराठी वाङ्मयकोश - 'समीक्षा-संज्ञा' खंड चौथा, समन्वयक संपादक - विजया राजाध्यक्ष, (प्रकाशन.वर्ष २००२) महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.


* * *





# अर्थव्यवस्था

■ डॉ. नीळकंठ बापट

प्राचीन काळापासून ते अर्वाचीन काळापर्यंतच्या महाराष्ट्रातील हजार–दोन हजार वर्षांतील आर्थिक घडामोडींचे समालोचन ह्या छोट्याशा प्रकरणात करणे जरा कठीणच आहे. पण अर्थव्यवस्थेची जी प्रमुख वैशिष्ट्ये आहेत, ती येथे मांडली आहेत. अभ्यासाच्या सोयीसाठी ह्या प्रदीर्घ काळाचे तीन भाग कल्पिले आहेत. ते पुढीलप्रमाणे – क. प्राचीन काळ (सातवाहन ते यादव). ख. पूर्व–मध्ययुगीन काळ (यादव ते मुस्लीम काळ) ग. उत्तर–मध्ययुगीन काळ (शिवकाळ ते पेशवेकाळ) काळ हा सतत पुढे जात असतो, त्याचप्रमाणे आज जसा महाराष्ट्र दिसतो तसा पूर्वी नव्हता, त्याच्या भौगोलिक कक्षा सतत बदलत असत. तसेच त्यावर राज्य करणारेही फक्त महाराष्ट्रावर राज्य करत नव्हते, कधी राजा महाराष्ट्राबाहेरचा असे तर कधी महाराष्ट्रातील राजाचे राज्य महाराष्ट्राबाहेर विस्तारलेले असे. ह्यामुळे सोबतचे वर्णन हे प्रातिनिधिक म्हणून समजावे.

अर्थव्यवस्थेविषयी माहिती मिळवणे दुरापास्तच होते. कारण आजपर्यंत इतिहासाचा अभ्यास हा राजघराणी, राजदरबार, तेथील कटकारस्थाने, युद्ध ह्यांपुरताच मर्यादित असे. आर्थिक बाबींबाबत चर्चा कमीच आढळते. मानवी जीवनातील आर्थिक बाबीच फक्त वेगळ्या करून त्याचा अभ्यास करणे कठीणच असते. जीवन हे

**सातवाहन काळात पश्चिमी देशांशी व्यापारी संबंध मोठ्या प्रमाणावर प्रस्थापित झाले होते. पश्चिमेकडील इजिप्त, पर्शिया, ग्रीस आणि रोम ह्या प्रमुख राष्ट्रांशी परदेशी व्यापार संपन्न झाला. पश्चिमेकडील समुद्र खोल असल्याने तेथील बंदरे विकसित झाली. शक, क्षत्रप ह्यांच्याशी सातवाहनांचे संघर्ष होत त्यामुळे पश्चिमी व्यापारास अडथळे निर्माण झाले. समुद्रावरील चाचेगिरी हीही व्यापारातील अडचण होती. तरीपण व्यापार वृद्धिंगत झाला.**

एकसंध असते. अनेक वेळा एखादा व्यवहार धार्मिक स्वरूपाचा दिसतो, पण त्याला अनेक आर्थिक पैलू असतात. उदाहरणार्थ देवालय बांधणे हे धार्मिक कार्य आहे. त्याचप्रमाणेच आर्थिक कार्यही आहे. तसेच अनेक आर्थिक व्यवहार आज चुकीचे वाटतात, पण त्या वेळी ते अर्थपूर्ण होते. उदाहरणार्थ वतन ही संकल्पना आज बरोबर वाटत नाही, पण महाराष्ट्रात जेव्हा वस्ती नव्हती व नव्या वसाहती स्थापन करावयाच्या होत्या तेव्हा वस्ती करणाऱ्यास उत्तेजनार्थ अनेक सवलती द्याव्या लागत होत्या. वतनामुळे त्यास जीविताची शाश्वती मिळत असे.

पूर्वीच्या काळी धर्म हा व्यक्तिजीवन व्यापणारा होता. त्यामुळे मानवी जीवन धर्माने बांधलेले असे व राजा व प्रजा ह्यांचा कोणत्याही प्रकारचा अभ्यास करताना धर्माचा विचार करावाच लागतो, आज धर्म व देव हे देवळापुरतेच मर्यादित आहेत, त्यामुळे धर्माची आर्थिक जीवनातील ढवळाढवळ आजच्या अभ्यासकांस अवाजवी व अनाकलनीय वाटते, पण ते बरोबर नाही.

सातवाहन, यादव व पेशवेकालीन माहिती देताना प्रामुख्याने नागरी व ग्रामीण अशी विभागणी करून मांडणी केलेली आहे. प्रत्येक ठिकाणची अर्थव्यवस्था भिन्न स्वरूपाची होती. ग्रामीण अर्थव्यवस्था शेतीशी निगडित होती. तर नागरी अर्थव्यवस्था व्यापार, उद्योगधंदे व राज्यशासन ह्यांच्याशी निगडित होती. ग्रामीण भागांची माहिती देताना वतन, जमिनीसंबंधीचे व्यवहार, दान, शेती, त्यांतील पिके, त्यांची वाटणी, मशागतीची पद्धती, बलुतेदार, गावाची रचना, गावाची वसाहत इत्यादी माहिती दिलेली आहे तर नगरअर्थव्यवस्थेची माहिती देताना नगरातील विविध अर्थव्यवहारांची माहिती देण्याचा प्रयत्न केला आहे. वस्तू, संस्था, कर–आकारणी इत्यादींची माहिती दिली आहे.

### क. प्राचीन काळ

**सातवाहनकालीन अर्थव्यवस्था :** सातवाहनांची अधिसत्ता ही प्रामुख्याने गोदावरी व कृष्णा ह्या नद्यांच्या परिसरात होती. ह्या दोन्ही नद्यांच्या खोऱ्यांची समृद्धी हे सातवाहनांच्या समृद्धीचे प्रमुख कारण होते. ह्या समृद्धीचे वर्णन प्लिनो, टोलेमी पेरिप्लस ह्यांसारख्या परकीय प्रवाशांनीही केलेले आढळते. ह्याच काळात उद्योगीकरण मोठ्या प्रमाणावर झाले. नवीन नगरे आणि बंदरे उदयास आली. आंतरराष्ट्रीय व्यापारही मोठ्या प्रमाणावर वाढला. धर्मतत्त्वे व परंपरा ह्यांनुसार व्यापार, उद्योग व अन्य अर्थव्यवहार केले जात. सातवाहन काळात प्रदीर्घ काळ राजकीय स्थैर्य लाभल्यामुळे त्या काळातील महाराष्ट्र हा एक संपन्न प्रदेश होता.

त्या काळात पाऊस पुरेशा प्रमाणात पडत असे. त्यामुळे भातासारखे पीक मोठ्या प्रमाणावर घेतले जाई.या प्रदेशातील जमीन गहू, कापूस व कडधान्ये पिकवण्यासाठी उपयुक्त होती. जव, गहू, ज्वारी, कापूस ही पिके सार्वत्रिक घेतली जात होती. त्याचप्रमाणे एरंडी, हरभरा, भुईमूग व अन्य कडधान्ये यांची पीकेही घेतले जात होती.

शेतीसाठी विविध अवजारे वापरली जात. छोटे व मोठे नांगर वापरात होते, त्यास हाल म्हणत, विहिरीमधून पाणी काढण्यासाठी रहाटगाडगे वापरले जाई. मशागतीसाठी बैलाचा वापर होई. शेतीतून दोन वा तीन पिके घेतली जात. शेती मान्सूनवर अवलंबून होती. त्यामुळे कधी अवर्षण तर कधी अतिवृष्टी असे. या काळात उत्तरेतील आर्यांचे दक्षिणेकडे मोठ्या प्रमाणावर स्थलांतर झाले. आर्यांना शेतीचे चांगले ज्ञान होते. शेती करण्यासाठी जमीन आवश्यक होती. जंगलतोड करून ती मिळवण्यात आली. शेतीस प्रोत्साहन देण्यासाठी जो जंगलतोड करेल, त्याला ती जमीन मिळत असे. शेतीचा विकास झपाट्याने झाल्यामुळे शेती उत्पादने वाढली व त्याचा नवी नगरे वसवण्यासाठी उपयोग झाला.

भूदान हे मोठे पुण्य समजले जाई. राजा जंगलतोड करून शेती करण्यास जमीन दान देत असे; त्याप्रमाणे शिक्षणाचा प्रसार करणाऱ्या ब्राह्मणांना अग्रहार– गावे दान दिली जात. राजाची सेवा करणाऱ्या अधिकाऱ्यांनाही जमीन दान दिली जात असे. जमिनीची चांगली मशागत केली जाणे अपेक्षित होते. नाहीतर जमिनीचा उपभोग घेता येत नसे.

अनेक वेळा महापूर येत. गावेच्या गावे उद्ध्वस्त होत. पैठण शहराला अशा महापुरांचा अनुभव अनेक वेळा आलेला आहे. महापुराप्रमाणे सातवाहनकाळात

पावसाअभावी दुष्काळालाही सामोरे जावे लागे. मान्सूनची अनिश्चितता हे त्याचे प्रमुख कारण. प्रत्येक दशकात एकदातरी दुष्काळ पडत असे. बेभरवशाच्या पावसामुळे लोक दैववादी बनले.

शेतजमिनीची मालकी तीन प्रकारची होती. राजाची जमीन, जमीनदारांची जमीन व शेतकऱ्याची जमीन. शिवाय जमीन नसलेले कारागीर व शेतमजूरही गावात असत. शेतसारा हा राज्याच्या उत्पन्नाचे महत्त्वाचे अंग होते. शेतसारा कोणत्या तत्त्वावर आधारित होता, ह्याविषयी फारशी माहिती उपलब्ध नाही. पण अधिकाधिक जमीन लागवडीखाली आणली जावी ह्या उद्देशाने कर-आकारणी होत असावी, हेही तितकेच खरे. त्या काळातील ताम्रपटांवरून हे समजते की, जमिनीवरील वैयक्तिक मालकीहक्क राजाला मान्य होता. जमीन कोणालातरी दान करायची इच्छा राजाला असली, तरी त्याला जमीन विकत घ्यावी लागे व मग त्याचे दान केले जाई. शेतीला पाणीपुरवठा करण्यासाठी विहिरी-तळी खोदली जात असत. धान्याप्रमाणेच फळझाडेही लावण्यात येत.

शेतसाऱ्याशिवाय अन्य प्रकारेही राजाला उत्पन्न मिळत असे. लोकांकडून आलेले नजराणे, अन्य उत्पादनांवरील कर, जकात, गुन्हेगारांना दिलेल्या शिक्षा, राजाच्या मालकीचे उद्योग व राजाच्या मालकीच्या शेतजमिनीपासून मिळणारे उत्पन्न, व्यापार व उद्योग यांवरील कर अशी अनेक उत्पन्नाची साधने राजाला उपलब्ध होती.

शेतसाऱ्याशिवाय उत्पन्नाचे महत्त्वाचे साधन म्हणजे व्यापारावरील कर होते. सातवाहन काळात राजकीय स्थैर्य लाभले त्यामुळे व्यापार व उद्योगधंदे ह्यांचा मोठ्या प्रमाणावर विकास झाला. व्यापारवृद्धीसाठी चांगल्या रस्त्यांची जरुरी असते. त्या वेळी उत्तरापथ व दक्षिणापथ असे दोन महत्त्वाचे पथ होते. त्यांपैकी दक्षिणापथ अधिक महत्त्वाचा होता. रेशीम, कापड, मौल्यवान खनिजे, हस्तिदंत, मसाल्याचे पदार्थ ह्या वस्तू व्यापारासाठी विशेषतः निर्यात व्यापारासाठी फार महत्त्वाच्या होत्या व त्यांची ह्याच भागात मोठ्या प्रमाणावर उपलब्धी होती. शिवाय पूर्व व पश्चिम किनाऱ्यावरील बंदरेही आयात-निर्यातीसाठी उपलब्ध होती. पश्चिम किनाऱ्यालगतची पैठण, नगर, जुन्नर, नाशिक, भोगवर्धन, कोल्हापूर इत्यादी महत्त्वाची शहरे उदयास आली. ती केंद्रे व बंदरे एकमेकांना चांगली जोडली गेली होती. पैठण हे सातवाहनांचे राजधानीचे शहर. ते मोठे व्यापारी केंद्रही होते. ते भारतातील व भारताबाहेरील प्रमुख बाजारपेठांशी जोडले होते. त्या काळात महत्त्वाचे मार्ग उत्तरापथ, पश्चिमीपथ, दक्षिणापथ उत्तरेकडे जाणारा महामार्ग माळवा व अवन्तीमधून जातो. हा मार्ग गोदावरी, तापी व नर्मदा ह्यांच्या खोऱ्यांतून जातो. तो अजिंठा पर्वतातून जातो. ह्या मार्गावरील भोगवर्धन, बऱ्हाणपूर, महिष्मती, उज्जैन ही महत्त्वाची ठिकाणे आहेत. उत्तरापथ महत्त्वाचे होते, कारण ते मध्य आशियातील व्यापारी केंद्रांना जोडले होते आणि जलमार्गापेक्षा ते अधिक सुरक्षित होते. याच मार्गाद्वारे सातवाहनांना रोमशी संबंध जोडता आले. ह्या मार्गावर आपले प्रभुत्व राहावे म्हणून सातवाहनांचा क्षत्रपांशी अनेक वेळा संघर्ष झाला.

पश्चिमी व्यापारी मार्ग हे किनाऱ्यावरील बंदरांशी जोडलेले होते. भडोच, नालासोपारा व कल्याण ही ह्या पथावरील प्रमुख केंद्रे. उज्जैन, पैठण व नगरमधील माल ह्याच पथांद्वारे पाठवला जाई. पैठणमधून गोमेद व तेरहून कापड पाठवले जात असे. गोदावरीकाठी गोमेद, ॲगट, कार्नेलिअन असे मौल्यवान दगड मिळत. त्यांना विविध आकार देऊन त्यांचा उपयोग दागिने बनवण्यासाठी केला जाई. ज्योतिरस, सूर्यकांत, चंद्रकांत ह्यांसारखी रत्नेही ह्या भागात मिळत होती व त्यांची किंमत खूप असे. कानेलियमपासून व ॲगटपासून अनेक प्रकारचे मणी बनवले जात. त्यावर रासायनिक प्रक्रियेद्वारे रेखांकन केले जाई. रत्नमणी, काचमणी, शंखमणी, रेखांकित मणी, प्राण्यांच्या आकाराचे मणी, नजर मणी, मातीचे मणी असे मण्यांचे विविध प्रकार होते.

सातवाहन धातू उद्योगही विकसित झालेला होता. तांबे, लोह शिसे, हस्तिदंत व मानवी हाडे यांचा उपयोग कलाकुसरीच्या मौल्यवान वस्तू तयार करण्यासाठी केला जाई. कर्णभूषणे, कज्जल-शलाका, बांगड्या, तलवारीच्या व चाकूच्या मुठी बनवल्या जात.

सातवाहन कालात रेशमी व सुती कापड मोठ्या प्रमाणावर निर्यात केले जात होते. ह्या भागात कापूस मोठ्या प्रमाणावर पिकवला जाई. त्यापासून तलम सूत

काढण्यासाठीची कला त्या काळातील कारागिरांनी प्रगत केली होती. पैठण व तेर येथील तलम कापड मध्य आशिया, युरोप व इजिप्त ह्या ठिकाणी अत्यंत लोकप्रिय होते. रेशमी कापडही मोठ्या प्रमाणावर निर्यात होत असे. रेशमी कापडावर कलाकुसर, जरतारी नक्षीकाम हे प्रसिद्ध होते. पैठणीसारखे महावस्त्र याच काळात विकसित झाले. ह्या तलम कलाकुसरीने नटलेल्या रेशमी कापडाने रोमन लोकांना इतके मोहित केले होते की, रोमच्या लोकसभेने त्याच्या आयातीवर बंदी घातली. सुती व रेशीम उद्योगाने सातवाहनांच्या समृद्धीस निश्चितच हातभार लावला.

निर्यातीनिमित्त मोठ्या प्रमाणावर वस्तूंचे उत्पादन, एकत्रीकरण व वितरण हे व्यवहार मुख्यत्वे केले जात. हे व्यवहार कार्यक्षमतेने होण्यासाठी संघटित प्रयत्नांची आवश्यकता असते. सातवाहनकाळात प्रत्येक उद्योगधंद्यात अशा संघटना कार्यरत असल्याचे आढळते. ह्या संघटनांना श्रेणी असे म्हणत. श्रेणीचा दैनंदिन कारभार पाहण्याचे काम श्रेणीप्रमुख करे. त्याची समाजात एवढी प्रतिष्ठा असे की, राजा त्यालाच कोषाधिपती म्हणून नियुक्त करित असे. त्यांना शासनाच्या प्रशासन, न्यायदान, शिक्षण इत्यादी विविध विभागांत अधिकारपदे दिली जात. गुणाढ्याच्या बृहत्कथाकोशात व गाथासत्तसई यांमध्ये श्रेणींचे व प्रमुखांचे वर्णन आढळते. व्यापारासंबंधीचे तंटेही श्रेणीद्वारे सोडवले जात. श्रेणीमध्ये सर्वांना प्रवेश असे.

श्रेणींचे व्यवहार अत्यंत सचोटीचे होते. त्यामुळे अनेक जण आपला पैसा त्यांच्याकडे ठेव म्हणून ठेवत. राजासुद्धा श्रेणींच्या व्यवहारात भांडवल गुंतवत असे व त्यातून होणाऱ्या फायद्यापासून उत्पन्न मिळवे. ठेव ठेवणारे त्यातून मिळणाऱ्या व्याजाचा विनियोग कसा करावा, याचाही निर्देश करत असे. त्या व्याजाच्या रकमा एखाद्या मठाला दिल्या जात. श्रेणींचे अनेक व्यवहार आधुनिक बँकांसारखे होते. एका ठिकाणाहून दुसरीकडे पैसा पाठवणे, गरजू लोकांना कर्ज देणे, लोकांचे पैसे ठेव म्हणून स्वीकारणे, धंद्यातील जोखीम पत्करणे इत्यादी व्यवहार श्रेणींमार्फत केले जात.

**सार्थवाह:** व्यापारवृद्धीमध्ये सार्थवाहचा महत्त्वाचा सहभाग असे. सार्थवाह म्हणजे मार्गदर्शक व्यापारी केंद्र, निर्यात केंद्र यांकडे सुरक्षितपणे माल घेऊन जाणारा नेता. त्या काळी विविध कारणांनी प्रवास धोक्याचा होता. चोर-दरोडेखोर यापासून संरक्षण मिळवणे जरुरीचे होते. सार्थवाहला रस्त्यामधील अडथळे, पाण्याचे साठे, निबिड अरण्ये, चोरांची ठिकाणे, बाजारभाव, बाजारपेठांची वैशिष्ट्ये. ह्यांची सर्व माहिती सार्थवाहास असे. हे सार्थवाह ज्या मार्गाने जात असत, त्यास सार्थवाहपथ म्हणत. हे सार्थवाहपथ व सार्थवाह ह्यांच्यासंबंधी लेणी, ताम्रपट यांत उल्लेख आढळतात.

सातवाहन काळात पश्चिमी देशांशी व्यापारी संबंध मोठ्या प्रमाणावर प्रस्थापित झाले होते. पश्चिमेकडील इजिप्त, पर्शिया, ग्रीस आणि रोम ह्या प्रमुख राष्ट्रांशी परदेशी व्यापार संपन्न झाला. पश्चिमेकडील समुद्र खोल असल्याने तेथील बंदरे विकसित झाली. शक, क्षत्रप ह्यांच्याशी सातवाहनांचे संघर्ष होत त्यामुळे पश्चिमी व्यापारास अडथळे निर्माण झाले. समुद्रावरील चाचेगिरी हीही व्यापारातील अडचण होती. तरीपण व्यापार वृद्धिंगत झाला.

**सातवाहनकालीन नगरे:** संपन्न अर्थव्यवस्थेचे एक लक्षण म्हणजे संपन्न नगरे. नगरांमध्ये संपत्तीचे केंद्रीकरण झालेले आढळते. शेतीबाह्य अर्थव्यवस्थेचे प्राबल्य शहरातून आढळून येते. राज्यशासनव्यवस्था, लष्कराचे वास्तव्य, उद्योगधंद्यांचे केंद्रीकरण, वित्तसंस्थांचे जाळे, घाऊक व किरकोळ व्यापारांची वस्ती, कारागिरांची उपलब्धी ही नगरांची वैशिष्ट्ये आहेत. सातवाहन काळात अशी वैशिष्ट्ये असणारी अनेक नगरे उदयास आली. नगराभोवती तटबंदी असे. उदाहरणार्थ तेर ह्या गावातील उत्खननात अशी तटबंदी आढळली. पैठण, तेर, जुन्नर, नेवासा नाशिक ही सातवाहन काळातील महत्त्वाची शहरे होत. सोपारा, कल्याण ही महत्त्वाची बंदरे होती. शहराचा कारभार निगमसभेमार्फत पाहिला जाई. निगमसभेत शहरातील प्रतिष्ठित व्यक्ती होत्या. त्यांना श्रेष्ठी म्हणत. दैनंदिन कारभार पाहण्यासाठी कार्यकारिणी असे. नगरामध्ये उंच इमारती, राजप्रासाद, मंदिरे होती.

मृच्छकटिक, बृहत्कथाकोश यांतील वर्णनावरून त्या वेळच्या श्रीमंतांचे प्रासाद, हवेल्या व त्यांचे विलासी जीवन यांची कल्पना येते. व्यापारी, धनाढ्य व्यक्ती, राजा व त्यांचे अधिकारी हे मोठ्या प्रमाणावर दान करत. त्यांच्या आश्रयाने

अनेक कलाकृती, कारागीर ह्यांना उत्तेजन मिळाले. मोसमी वाऱ्यांचा शोध लागल्यामुळे पश्चिम किनाऱ्यावर अनेक बंदरे व व्यापारी केंद्रे उदयास आली. त्या वेळच्या समाजाला नगररचनेची माहिती होती. प्रतिष्ठान तथा पैठण, जुन्नर, नाणेघाट, ॲडम, तेर, रामटेक, मनसर, कऱ्हाड, कोल्हापूर, नाशिक ही सातवाहन काळात भरभराटीस आलेली नगरे होती. पैठण हे भारतातील सर्वांत प्राचीन नगर होय. ते गोदावरी काठी वसले आहे. वैदिक, जैन व बौद्ध वाङ्मयात ह्या नगरीचा वारंवार उल्लेख येतो. लेणी, मंदिरे, विहार, सांची स्तूप, ताम्रपट, ग्रंथ, बृहत्कथा, गाथासत्तसई, शिलालेख ह्यांमधील वर्णनावरूनही ह्या नगरातील संपन्नता लक्षात येते. जुन्नर हे पुण्यापासून ९० किलोमीटरवर वायव्य दिशेस आहे. ते कुकडी नदीच्या खोऱ्यात वसलेले आहे. शक व क्षत्रप ह्यांच्या राजधानीचे हे शहर होते. राजकीय केंद्र, धार्मिक केंद्र व आर्थिक केंद्र म्हणून विकसित झाले. डोंगर व टेकड्या ह्यांनी ते शहर वेढलेले आहे. डोंगरातील दगड एकसंध असल्याने लेणी, गुहा, विहार बांधण्यासाठी हा परिसर सुयोग्य होता. आरंभीच्या काळात ह्या प्रदेशावर सातवाहनांचे राज्य होते. प्रतिष्ठानकडून कल्याणकडे जाणाऱ्या रस्त्यावर हे शहर वसलेले असल्याने येथे मोठ्या प्रमाणावर व्यापारिवर्ग वस्ती करून होता. हे एक पुरवठाकेंद्र म्हणून विकसीत झाले. सातवाहनांच्या संपन्नतेत जसजशी वाढ होत गेली, तसतसा जुन्नरमधील व्यापारही वाढला व व्यापाऱ्यांच्या संख्येतही वाढ होत गेली. तशीच लेण्यांचीही संख्या वाढली. लेण्यांसाठी समाजातील सर्व थरांतील लोकांकडून व परकीय प्रवाशांकडून दान मिळत असे. जुन्नरच्या वायव्य दिशेस प्रसिद्ध नाणेघाट आहे. जुन्नरहून कल्याणला जाणारा मार्ग नाणेघाटातून जातो. तेर हे त्या काळातील आणखीन एक महत्त्वाचे शहर. ते उस्मानाबादपासून १८ किलोमीटरवर आहे. ते तेरणा ह्या नदीकाठी वसलेले आहे. मसलीपट्टम ते पैठण या व्यापारी मार्गावरील ते महत्त्वाचे केंद्र होते. पूर्व किनाऱ्यावरून निघणारे मार्ग पुढे तेरवरून पश्चिम किनाऱ्यावरील बंदरांकडे पोहोचत असत. पूर्वेकडून व दक्षिणेकडून येणाऱ्या कच्च्या मालावर तेर येथे प्रक्रिया केल्या जात असत. शंख, गोमेद, हस्तिदंत, कापूस यांवर प्रक्रिया करणारे मोठे उद्योग येथे उभारले होते. नंद–मौर्यकाळात या परिसराचे वसाहतीकरण झाले. तेर व रोम यांचे संबंध प्रस्थापित झाले होते. हे संबंध दर्शविणाऱ्या अनेक वस्तू तेरमध्ये सापडतात. उदाहरणार्थ दीप, नाणी, मातीची शिल्पे, मद्यकुंभ, रोमन भांडी, मणी, इत्यादी. येथे उत्तम प्रकारचे तलम–सुती कापड तयार होत होते. तेर येथील मातीची भांडी जगप्रसिद्ध होती. ती कलापूर्ण होती. उमरेड तहसिलामधील ॲडम गावही प्रसिद्ध व्यापारी केंद्र होते. तेथे सापडलेल्या रोमन नाण्यांवरून त्यांचा परदेशी केंद्रांशी संबंध होता, हे दिसते. वाशीम व त्रिपुरी यांना जोडणाऱ्या प्राचीन व्यापारी मार्गावर ॲडम गाव होते. रामटेक व मनसर ही दोन बौद्धकेंद्रे नागपूरजवळ आढळून येतात. सातवाहन काळातील प्रसिद्ध बौद्ध तत्त्वज्ञानी नागार्जुन याचे वास्तव्य ह्याच भागात होते. येथे अनेक गुहा व शिल्पे सर्वत्र विखुरलेली आढळतात. अनेक शिलालेखांत करहाटकचा उल्लेख आढळतो. त्याचेच आत्ताचे नाव कऱ्हाड. ते कृष्णा व कोयना ह्यांच्या संगमावर वसले आहे. याच्या आसपास अनेक बौद्ध लेणी आहेत. कुंभार्ली घाटातून कऱ्हाड हे चिपळूण बंदरास जोडलेले आहे. कृष्णेच्या पंचगंगा ह्या उपनदीवर कोल्हापूर शहर वसलेले आहे. पूर्वी हे शहर ब्रह्मपुरी म्हणून ओळखले जाई. ते राजापूर बंदराशी जोडलेले होते. देवगड व विजयदुर्ग ह्या बंदरांनाही कोल्हापूर येथून पुरवठा होत असे. शिलाहार काळात त्याचा मोठा विकास झाला. ते मोठे पुरवठा केंद्र होते.

पतंजलीचे महाभाष्य, वराहमिहिराच्या बृहत्संहिता व पांडवलेण्यांतील शिलालेखांवरून सातवाहनकाळात नाशिक हे एक मोठे शहर होते. ते गोदावरी काठी वसलेले आहे. सातवाहन काळात काही काळ नाशिक परिसरावर क्षत्रपांचे राज्य होते. पण गौतमीपुत्र सातकर्णी ह्याने क्षत्रपांचा पराभव केला व आपले स्वामित्व प्रस्थापित केले. भडोचकडे जाणाऱ्या महामार्गावर नाशिक हे मोठे व्यापारी केंद्र होते. बौद्ध काळात नाशिक हे एक सुंदर यक्षाचे स्थान म्हणून समजले जाई. नाशिकच्या परिसरात बौद्ध व जैन लेणी आढळतात.

सातवाहनकाळात अनेक बंदरे उदयास आली. चिंचणी, डहाणू, कल्याण, सोपारा, वसई, जयगड, खेड, ठाणे,

घौल, महाड, मंदार, गोरेगाव, म्हसळे, देवगड, विद्यादुर्ग, संगमेश्वर, शिरवळ ही बंदरे विकसित झाली. चिंचणी हे बंदर ठाणे जिल्ह्यातील डहाणू तालुक्यात आहे. येथे कोळी लोकांची वसाहत होती. कोळीवाडा, भंडारवाडा व वाणीवाडा यांचा त्यात समावेश होता. तेथे साचे बनवण्याचा उद्योग भरभराटीस आला होता. त्यासाठी पोलाद व तांबे हा कच्चा माल लागत होता. त्या काळात पोलाद भारतातून निर्यात होत असे. डहाणू हे ठाणे जिल्ह्यातील महत्त्वाचे तालुक्याचे ठिकाण आहे. तेथे प्राचीन काळी वसाहत होती. ते महत्त्वाचे मच्छीमारी केंद्र होते. प्राचीन काळी ते एक नैसर्गिक बंदर होते, ह्या बंदरात शिडाची जहाजे व मासेमारी बोटी नांगरण्याची व्यवस्था होती. साचे बनवण्याचा येथील उद्योग प्रगत होता. ठाणे जिल्ह्यातील कल्याण हे महत्त्वाचे बंदर होते. ते उल्हास नदीच्या काठावर आहे. नदीचे पात्र खोल असल्याने जहाज कोठेही नांगरता येई. पैठण, नाशिक, तेर, जुन्नर ह्या व्यापारी पेठांशी ते जोडले होते. काही काळ त्याच्यावर क्षत्रपांचा अंमल होता. त्यामुळे सातवाहन अडचणीत आले. परंतु पुढे सातवाहनाने ते परत जिंकून घेतले येथे पितळी भांडी व कापड यांचा मोठा व्यापार होता. येथे कोळी लोकांची मोठ्या प्रमाणावर वस्ती होती. ठाणे जिल्ह्यातील वसई तालुक्यातील सोपारा हेही प्रसिद्ध बंदर होते. येथे बौद्ध स्तूप होते, शिलालेखात सोपाराचा उल्लेख वारंवार येतो. तेथे अनेक जलाशय होते व पाण्याच्या टाक्या बांधल्या होत्या. ठाणे जिल्ह्यातील वसई हे नदीच्या रुंद मुखाजवळ वसलेले आहे. ते एक पवित्र स्थान म्हणून ओळखले जाते. रत्नागिरी जिल्ह्यातील जयगड हे संगमेश्वर नदीजवळ वसलेले. नदीचे पात्र खोल असल्याने शिडाची जहाजे तेथे नांगरली जात. टॉलेमी, परिप्लस, स्ट्रॅबोने या परकीय प्रवाशांनीही ह्या बंदराची माहिती दिली आहे, पण वेगळ्याच नावाने. रत्नागिरी जिल्ह्यातील खेड हे बंदर जगबुडी नदीच्या काठी आहे. तेथून लहान जहाजांनी वाहतूक होत असे. हे बंदर टेकड्यांनी वेढलेले आहे. ठाणे हे बंदर प्राचीन काळात फारसे उपयोगात नव्हते. कल्याण बंदर जोपर्यंत चालू होते, तोपर्यंत ठाणे मागासलेले राहिले. ते तलम वस्त्रांसाठी प्रसिद्ध होते.

अलिबाग तालुक्यातील चौल हे बंदर प्राचीन काळातील महत्त्वाचे बंदर होते. त्यास दीर्घकाळ वैभव लाभले. ते कुंडलिका नदीच्या रुंद मुखाशी वसलेले आहे व त्यामुळे वाहतुकीसाठी सुरक्षित होते. त्यात अनेक तलाव होते. स्थायिक वस्ती मोठ्या प्रमाणावर होती अनेक मंदिरे असल्याने चौल हे महत्त्वाचे यात्रा केंद्र होते. ठाणे जिल्ह्यातील बंदरे क्षत्रपांच्या हल्ल्यांमुळे असुरक्षित झाल्याने चौलची प्रगती झपाट्याने झाली. रायगड जिल्ह्यातील महाड हे अंतर्गत बंदर असून ते सावित्री व गंधारी ह्या नद्यांच्या संगमावर आहे. तेथे अनेक लेणी आहेत. जहाजे समुद्रातून येऊन बाणलोट खाडीत प्रवेश करत व सरस्वतीमार्गे महाडला पोचत. ते दख्खनच्या पठाराला पारघाट खिंडीद्वारे जोडलेले आहे. ते व्यापारी मालाचे वितरण केंद्र होते. कापड, तांदूळ, काजू, नारळ ह्या वस्तू महाडमधून निर्यात केल्या जात, मांदाड व गोरेगाव ही रायगड जिल्ह्यातील दोन बंदरे त्या काळात प्रसिद्ध होती. मांदाडच्या खाडीतून राजापूर बंदरात जाता येत असे. गोरेगाव सावित्रीच्या उपनदीवर वसले आहे. येथे आखातातून आयात केलेल्या घोड्यांची विक्री केली जात असे. हे सुती कापडाचे मोठे केंद्र होते. सिंधुदुर्ग जिल्ह्यातील देवगड हे नैसर्गिक बंदर आहे. ते खाडीच्या किनाऱ्यावर वसले आहे. ते सुरक्षित बंदर होते. फोंडा घाटाने ते कोल्हापूरला जोडलेले आहे, तसेच विजयदुर्ग खाडीच्या मुखाजवळ वसलेले आहे.

### ब. पूर्व-मध्ययुगीन काळ

**यादवकालीन ग्रामीण अर्थव्यवस्था :** ग्रामसंस्था ही फार प्राचीन आहे. तिला दोन हजार वर्षांचा इतिहास आहे. उत्तरेकडील आर्य दक्षिणेकडे सरकू लागले व महाराष्ट्रात नवीन वसाहती उदयाला आल्या. वसाहतींबरोबर वतनेही अस्तित्वात आली. आणि ह्यांतूनच वसाहतींना संस्थात्मक रूप आले. ह्या ग्रामसंस्थांना दीर्घायुष्य लाभले. राजघराणी बदलली तरी ग्रामसंस्था अखंडपणे चालू राहत. त्यांचे सातत्य हे वाखाणण्यासारखे आहे. गावाचे तीन भाग- पांढरी, काळी व वन. पांढरी भागात गावकरी राहत असत, काळी भागात शेती केली जाई व वनात गावकऱ्यांची गुरे चारण्यासाठी जागा असे. गावाच्या संरक्षणासाठी

गावाभोवती भिंत असे व भक्कम वेशी असत. पाणीसाठा पाहून वस्ती केली जाई. नदी, ओढे, तळी ह्यांच्या आसपास गाव वसत असे.

ग्रामसंस्था व्यवस्थित चालावी म्हणून राजाकडून अनेक अधिकारी नेमले जात, त्यांतील महत्त्वाचा अधिकारी म्हणजे ग्रामकूट. तो पाटील, चौधरी किंवा कामगावुंड ह्या नावांनीही ओळखला जाई. पाटलाकडे गावाचे संरक्षण करण्याची जबाबदारी असे. त्यामुळे ते काम क्षत्रियाकडे दिले जाई. पाटीलकीचे वतन होते व हे वतन वंशपरंपरागत चाले. त्यामुळे त्यात सातत्य होते. त्याला शेतीपासून उत्पन्न मिळे. त्याला मिळालेली जमीन ही करमुक्त व बाधारहित असे. याशिवाय त्याला अन्य मार्गांनीही उत्पन्न मिळे. विवाह, यज्ञ, गुन्हेगाराला केलेला दंड, मुंज, पर्वदिवस ह्या दिवशी त्याच्या मानपानासाठी काही जिनसा त्याला दिल्या जात. काही वेळा राजा ब्राह्मणास संपूर्ण गाव दान करी (अग्रहार). त्या वेळी त्याला पाटीलकीही मिळे. ग्रामसंस्थेतील दुसरा महत्त्वाचा अधिकारी म्हणजे कुलकर्णी. हे पद सहसा ब्राह्मणास दिले जाई. जमिनीची मोजणी करणे व पडीत जमिनीची नोंद ठेवणे हे त्याचे काम होते. त्याचप्रमाणे गावाच्या शेतीचे उत्पन्न, होणारा वसूल, गावातील कारागीर, उदमी, शेतकरी यांची नावानिशी जंत्री ठेवणे हेही त्याचे काम होते. गावकीच्या कामात वेसकराचाही वाटा होता. त्याचे काम गावाचे संरक्षण करण्याचे होते. गावातील किरकोळ गुन्हे शोधणे हेही त्याचे काम असे.

गावात घडणारे गुन्हे, गावकऱ्यांची एकमेकांतील भांडणे कौटुंबिक तकरारी निवारण्याचे काम ग्रामहत्तर करत असे. गावातील प्रौढ अनुभवी लोक पंचायतीचे काम करत. त्यांची नेमणूक गावकरी करत. त्यास राजमान्यताही असे. अनेक गावांत अशांना महाजन असेही म्हणत. एकत्र जमून समोर आलेल्या वादाचा सर्व बाजूंनी विचार करून बहुमताने न्यायनिवाडा होई. वाद जर पैशासंबंधी असतील, तर न्यायनिवाड्याचे काम श्रेणी वा सावकार करत. न्यायनिवाड्याची अंमलबजावणी न झाल्यास राजा हस्तक्षेप करत असे. गावातील तंटा गावात न सुटल्यास तो वाद राजापर्यंतही पोहोचविले जाई. न्यायनिवाड्यास पावित्र्य लाभावे म्हणून पंचायतीच्या सभा देवळात घेतल्या जात.

गावामध्ये बलुतेदार पद्धत चालत असे. गावातील लोकांचा मुख्य धंदा शेती होता. शेतीस साहाय्य करणाऱ्या इतरेजनांना बलुतेदार म्हणत. शेतकऱ्यांची वर्षभरात पडणारी कामे बलुतेदार करत व त्याच्या मोबदल्यात शेतकरी कामगारांना बलुते म्हणून शेतमाल देत असे. हे उत्पन्न कायमस्वरूपी असल्यामुळे बलुतेदार गावात कायमची वसती करून राहू लागले. असे बारा बलुतेदार गावात असत. मोठ्या गावांत त्यांची संख्या जास्त असे तर लहान गावांत संख्या कमी असे. बलुतेदारीही वंशपरंपरेने चाले व पुढे जाऊन तीही वतनेच झाली.

महाराष्ट्रात वतनदारी पद्धत फार प्राचीन काळापासून कार्यरत आहे. गावाचा मानाने सर्वांत मोठा वतनदार म्हणजे पाटील, त्यानंतर कुलकर्णी. त्यांचे कार्यक्षेत्र गावापुरतेच मर्यादित होते. अनेक गावांसाठी नेमलेला पाटील म्हणजे देशमुख व कुलकर्णी म्हणजे देशपांडे. अनेक वेळा देशमुखास सैन्य बाळगावे लागे व वेळ पडल्यास राजाला तो आपले सैन्यही उपलब्ध करून देई. अशा वेळी तो लोकप्रतिनिधीही राजप्रतिनिधी म्हणून कार्य करी. वतनदारी पद्धतीमुळे ग्रामव्यवस्थेत सातत्य आले. राज्यकर्ते बदलले तरी ग्रामव्यवस्थेत फारसे बदल झाले नाहीत. ग्रामपातळीवरच्या नोंदी कायम स्वरूपाच्या होत्या. देशमुख देशवहीत नोंदी करत असत. वतनदारांप्रमाणेच दुसरी महत्त्वाची आसामी म्हणजे वाणी. गावातील लोकांना त्यांच्या गावात न पिकणाऱ्या अनेक वस्तूंची गरज भासे. जसे मीठ, कापड इत्यादी वस्तू. ह्या वस्तू उपलब्ध करून देण्याचे काम गावातील वाणी करत असे. तो शेतमाल व बिगरशेतमाल लोकांना गावातच उपलब्ध करून देई. गावातील वाण्याप्रमाणे आठवडे बाजाराच्या व यात्रेच्या ठिकाणी भरलेला बाजार हाही महत्त्वाचा आहे. वाण्याकडे न मिळणाऱ्या वस्तू अशा बाजारात मिळत असत. बाजारात विक्रीस येणाऱ्या वस्तूंवर कर आकारला जाई. लाकडाच्या मोळीपासून सोन्या-चांदीच्या दागिन्यांपर्यंत अनेक वस्तू ह्या बाजारात मिळत. भोळ्या अनाडी ग्राहकाला किंमत, माप, दर्जा ह्यांबाबत व्यापारी फसवत असत. अर्थात अशी

फसवणूक करणाऱ्यास धर्मशास्त्रात शिक्षा सांगितली आहे. गावातील वाणी व्यापाराबरोबर सावकाराचाही धंदा करे. व्याजाचा दर 'सवाई'. दिडी, दुणी'असा असे. कर्ज घेणाऱ्यास अनेक वेळा संसारातील वस्तूही गहाण ठेवाव्या लागत. काही जणांना रोजच्या अन्नखर्चासाठीही कर्ज घ्यावे लागे.

प्रत्येक गावात शेतजमिनीशिवाय गावाकरता राखलेले चराऊ रानही मोठे असे. गावाच्या बाहेर लागवडीखाली नसलेली जमीन राजाची असे. तो ती कोणालाही दान करू शके. दान केलेली जमीन लागवडीखाली आणली जाई. लागवडीखालील जमीन जर एखाद्याच्या मालकीची असेल व ती राजाला पाहिजे असेल, तर राजा त्या जमिनीची किंमत मालकाला देई. कुटुंबाची जमीन जर विकायची असेल, तर मुलाची परवानगी लागे. पण राजाच्या परवानगीची जरूरी नव्हती. देवालयाच्या जमिनी मात्र सहजरीत्या विकता येत नसत. कारण त्यात एका व्यक्तीचे हितसंबंध नसत तर व्यक्ती-समूहाचे संबंध असत. राजा हा भूपती असला, तरी तो राज्यातील सर्व जमिनीचा मालक नव्हता. अनेक वेळा राजाच्या वतीने जमिनीवरील करवसुलीचे अधिकार काही जणांना मिळत. परंतु अशा वेळी त्या जमिनीची मालकी त्यास मिळत नसे.

भूमीदान हे मोठे पुण्यकर्म समजले जाई. त्यामुळे मध्ययुगात विविध निमित्ताने जमिनीचे दान केले जाई. लोकांना वसाहत करण्यास प्रवृत्त करण्यासाठी, मठ वा मंदिराची देखभाल करणाऱ्यांच्या उपजीविकेसाठी, विद्यार्थ्यांना शिक्षण देणाऱ्या संस्थांना वा व्यक्तींना, पुजारी, वादक, नर्तिका इत्यादींना त्यांच्या-त्यांच्या कौशल्याप्रित्यर्थ, बलुतेदार व वेसकरांना त्यांच्या ग्रामसेवेसाठी जमीन दान दिली जाई.

जमीन दान देताना त्यावरील हक्कांचीही नोंद केली जाई. जमीन ज्याला दान दिली त्याचे मालकीहक्क अबाधित राहतील अशी व्यवस्था केल्याचे दानपत्रात नमूद केले जाई. भोगवटा एकाच व्यक्तीकडे असेल (एकभोग्य) किंवा व्यक्तिसमूहाने उपभोगावयाचे हक्क गणभोग्य म्हणून ओळखले जात. अशा गणभोग्य जमिनीचे उत्पन्न सर्वांच्यात समान वाटले जाईल ह्याची व्यवस्था दानपत्रात स्पष्ट केली जाई. भोगवटा कोणत्याही प्रकारचा असला, तरी जमिनीतील उत्पन्न आठ प्रकारचे असे व त्याचे मालकीहक्कही दिले जात. निधी, निक्षेप, जल, पाषाण, अक्षिणी, आगामी, सिद्ध व साध्य अशी आठ प्रकारची उत्पन्ने जमिनीतून मिळत. राजाने गाव दान दिले तरी त्यापूर्वी ज्यांना जमिनी दान मिळालेल्या असत त्यांचे मालकीहक्क अबाधित राहत. गावच्या सीमा सहसा बदलत नसत. त्यात झालेल्या बदलांची कुलकर्णी आपल्या वहीत नोंद करत.

जमीन दान करताना त्यावरील सरकारी कर, बलुतेदारांची देणी व गावाने आकारलेली पट्टी हे सारे माफ आहे की नाही, ह्याचा उल्लेख दानपत्रात असे. दान दिलेल्या जमिनींचे 'मान्य' आणि 'अर्धमान्य' असे दोन प्रकार होते. देवालयाची वा मठाची देखभाल ठेवण्याचे काम जमीन मालकास करावे लागे. जमिनीची मशागत विविध तऱ्हांनी केली जाई. काही जण जमीन स्वतः कसत तर काही जण मजुरांच्या साहाय्याने कसत. तर काही खंडाने कसत, जमीन मजुरांच्या साहाय्याने लागवडीखाली आणली जात असेल, तर मजुरांचे वेतन ठरवावे लागे. साधारणपणे उत्पन्नाचा दहावा हिस्सा मजुरांना दिला जाई. मालकांची हत्यारे योग्य तऱ्हेने वापरायची जबाबदारी मजुरांवर होती. जमीन खंडाने दिली असल्यास खंडाची रक्कम ठरवली जाई. खंड रोख रकमेत वा शेतमालरूपाने दिला जाई. साधारणपणे दोन हिस्से मालकाचे व एक हिस्सा कुळाचा असे. खंड थकल्यास कुळाला काही मुदत दिली जाई. तरीही त्याने खंड न दिल्यास जमीन दुसऱ्यास दिली जाई.

शेती ही पाण्यावर अवलंबून असते, म्हणून विहिरी, तलाव, कालवे खोदून जलाशय निर्माण करणे हे पुण्यकर्म समजले जाई. जलाशय निर्मितीला पुत्रप्राप्तीइतके महत्त्व होते. जमीन दान करताना वा खरेदी करताना त्यातील पाणवठ्याच्या उपभोगाचा हक्कही दिला जाई. राजाजवळ जलशास्त्राचा अनुभव असणारे तज्ज्ञ असत. त्यांच्या देखरेखीखाली जलाशयाची कामे केली जात. जलाशयाची मोडतोड करणे पाप समजले जाई. असे करणाऱ्यास गळ्यात दगड बांधून पाण्यात बुडवले जाई. पाण्यावर कर आकारला जात नसे.

शेतातील पिकांचे रक्षण करावे लागे. चोर व मोकाट सुटलेली जनावरे ह्यांच्यापासून पिकास हानी पोचत असे. जनावरांमुळे शेतीचे नुकसान झाल्यास जनावराच्या मालकास नुकसान भरून द्यावे लागे, पण जनावर जर देवाला सोडलेले असेल, तर त्याच्याविरुद्ध तक्रार केली जात नसे. वैरभावाने कोणी पिकाची हानी केली, तर त्यास मोठी शिक्षा केली जाई.

शेतसारा भरणे सक्तीचे होते. न भरल्यास थकबाकीवर व्याज आकारले जाई. परंतु अवर्षण वा पूर वा अन्य नैसर्गिक कारणांमुळे पिकाचे नुकसान झाल्यास करात योग्य ती सूट दिली जाई किंवा करवसुली तात्पुरती थांबवली जाई. करआकारणी ही पिकाच्या दहा ते पन्नास टक्के असे. दुष्काळात सरकारला कमी उत्पन्न मिळे तर पीक चांगले आल्यास जास्त मिळे. भाजीपाल्यासारख्या नाशवंत पिकावरील कर राजाच्या नावाने वसूल होई परंतु त्याचा उपभोग स्थानिक अधिकारीच घेत कारण त्याचा साठा करणे शक्य नसे. काही कर तात्कालिक स्वरूपाचे होते. गावात सरकारी अधिकारी आल्यास त्याच्या पाहुणचारासाठी खर्च करावा लागे, तेव्हा तात्कालिक कर आकारला जाई.

गावातील जमिनीची खरेदी-विक्री करताना खरेदीदार व विक्रेते ह्यांचे नातेवाईक व गावपंच हजर असत. त्याची लिखापढी होई. सरकारी दप्तरात त्याची नोंद होई. गावच्या महाजनांना काही शुल्क द्यावे लागे. स्थानिक व राजा ह्यांच्या नियमांप्रमाणे खरेदीखत (ताम्रपट) तयार केले जाई.

खरेदीविक्रीची नोंद असलेल्या ताम्रपटाची मूळ प्रत राजाच्या संग्रही असे. त्यात राजाची मुद्रा व सही व अटी नमूद केलेल्या असत.

जमिनीच्या खरेदी-विक्रीप्रमाणे काही वेळा गावाचीही खरेदी-विक्री होत असे. गावातील लोकांकडून करवसुली करण्याचा अधिकार विकला जाई. गावातील लोकांच्या हक्काला त्यामुळे बाधा येत नसे परंतु कर वसुलीचे अधिकारी बदलले आहेत, हे अशा दस्तऐवजांमुळे गावातील लोकांना कळत असे. अधिकारक्षेत्र वाढवण्यासाठी अशी गावे खरेदी केली जात. काही वेळा प्रापंचिक उपयोगासाठीही अग्रहार गावांची खरेदी-विक्री होई. दान केलेली जमीन दात्याच्या मालकीचीच असे नाही, अनेक वेळा दाता दुसऱ्यांकडून जमीन खरेदी करी व मग तिचे दान करे, जमिनी देवस्थानाच्या जवळच असत असे नाही. दूरवर असलेल्या खेड्यातील जमिनीही दान केल्या जात. सौराष्ट्रातील सोमनाथ मंदिराच्या जमिनी कोकणातही होत्या.

खरेदी-विक्रीबाबतचे तंटे गावातच सोडवले जात. परंतु हे तंटे दोन गावांतील रहिवाशांमध्ये असत, अशा वेळी ग्रामस्थांना नगरातल्या न्यायालयात जावे लागे. अनेक सरकारी अधिकारी व व्यापारी ह्यांना कामानिमित्त अनेक गावांत फिरावे लागे. त्यांना खंडवसुली, जमिनी खरेदी-विक्रीचे व्यवहार करावे लागत, तेव्हा एकाच गावाच्या कक्षेपुरते हे प्रश्न मर्यादित राहत नसत.

**यादवकालीन नागरी अर्थव्यवस्था :** नगरांची निर्मिती आणि त्यांचा विकास विविध कारणांनी घडून आल्याचे आढळते. राजाने निवडलेले आपल्या राजधानीचे गाव हे दाट लोकवस्तीचे गाव असते आणि त्यामुळे तेथे शहर वसते. अनेक वेळा राजा काही कारणाने राजधानी सोडून अन्य ठिकाणी जातो. त्याच्याबरोबर त्याचा लवाजमा असतो. त्यांच्या गरजा भागवण्यासाठी त्या भागातील व्यापार वाढतो आणि शहर निर्मितीसाठी अनुकूल वातावरण निर्माण होते, तसेच युद्धकाळात लष्कराला काही ठिकाणी छावण्या उभाराव्या लागत. तेथेही शहर वसले जाई. धर्मकार्य व उत्सवानिमित्त बहुसंख्य लोकांची ये-जा चालू असते. ही परिस्थिती व्यापारवृद्धीसाठी व शहर वसण्यासाठी अनुकूल असे अनेक कारागीर या ठिकाणी एकत्रित होत. लोकरंजनाचे कार्य करणारी मंडळीही येथे जमा झालेली आढळतात. नगराचे महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे तेथील दाट लोकवस्ती जी व्यापारवृद्धीसाठी उपयोगी असते. समाजाच्या आर्थिक विकासाचे एक प्रमुख गमक म्हणजे नागरीकरण. राजकीय, धार्मिक, लष्करी, व्यापारी कारणांमुळे अनेक शहरे उदयास आलेली आढळत. यादवकालात उदयास आलेल्या मिरज, विजापूर ह्यांसारख्या व्यापारी पेठा, देवगिरी, ठाणे, चौल इत्यादी उत्पादन केंद्रे; परदेशी व्यापारात गुंतलेली गोवा, दाभोळ, सोपारा, कल्याण ही बंदरे; एलिचपूर, ऋद्धिपूर, पंढरपूर ह्यांसारखी तीर्थक्षेत्रे ही महत्त्वाची शहरे होत.

आजच्या शहराच्या मानाने यादवकालीन शहरे लहान होती. त्या वेळी खेडे, नगर, खर्वट अशी लोकवस्तीनुसार व गावातील शेतजमिनीच्या प्रमाणानुसार गावांची वर्गवारी केलेली आढळते. ज्या गावात लागवड केलेल्या जमिनीमध्ये चारशेहून जास्त 'धनु' चे क्षेत्र पडीक असले तर ते नगर. नगरांच्या निर्मितीला आणि विकासाला राजाचे धोरण कारणीभूत. राजाने वस्ती करण्यासाठी दिलेल्या विविध सवलतींमुळे नगरे वसवण्यास प्रेरणा मिळत असे. शहराला परचक्राचे नेहमीच भय असे. चोर, दरोडेखोर ह्यांच्यापासून शहराचे संरक्षण करणे जरुरीचे असे. कारण शहरात संपत्तीचे केंद्रीकरण झालेले असते. आणि शहरे चोर-दरोडेखोर ह्यांना नेहमीच आकर्षित करतात. बहुतेक शहरांच्या भोवती भिंती उभारलेल्या असत. चौल, दाभोळ, गोवा ही शहरे बंदिस्त होती. शहरात येण्यास महाद्वार असे. अशा शहरांत मठ, मंदिर, धान्याची कोठारे, व्यापारमालाची कोठारे, अन्नछत्रे, उपाहारगृहे, बागा, विश्रामशाळा, वेदशाळा, चांभारगल्ली, कुंभारवाडा आदी विभाग आढळून येतात. अनेक नगरांत रात्रीची गस्त असे व रस्त्यावर दिवाबत्तीची व्यवस्थाही असे. नगरे स्वयंपूर्ण राहतील अशी व्यवस्थाही केली जाई.

देवगिरी ही यादवांची राजधानी होती. ती जवाहिराच्या व्यापारासाठी ख्याती होती. हिरे, माणिक ह्यांना पैलू पाडणे, सोन्या-चांदीची कलाकुसरीची कामे ह्यांसाठी देवगिरी प्रसिद्ध होती. तेथे विविध तऱ्हेचा मोठा व्यापार होत असल्याचे मार्को पोलो ह्या परदेशी प्रवाशाने नमूद केलेले आहे.

महाराष्ट्रातले व्यापारी शेजारच्या प्रांतात धंद्यासाठी जात असत. काही वेळा ते दूरच्या प्रदेशातही जात. गंगातीरचे 'चाटे' गुजरातला कापड घेऊन जात, मिरजेचे व्यापारी तेलंगणात जात, विजापूरचे जवाहिरे सुरतेला हिरे-माणके पाठवत. बेळगाव हे अशा व्यापारासाठी प्रसिद्ध होते. तेथे सोने, चांदी, तेल, कापड, कापूस, तांदूळ, गूळ, सुगंधी द्रव्ये, हळद, हिंग, मिरे, विड्याची पाने, ऊस, कडबा, बैल, म्हशी, घोडे अशा विविध वस्तूंचा व्यापार होत असे. ह्या वस्तूखरेदीसाठी परप्रांतातूनही लोक येत. मिरजेची बाजारपेठ मोठी होती. कोल्हापूर येथील धान्यबाजार व लसूणबाजार प्रख्यात होता. मोठे व्यापारी परप्रांताशी व्यापार करीत तर छोटे व्यापारी आपल्याच येथे आठवडे बाजारात व्यापार करीत. भुसार माल विकणारे वाणी गावोगावी सामान घेऊन जाणारे वणिजारे (वंजारी) व घोडे विकणारे हेडाऊ अशी गट करून राहणारी मंडळी गावोगावी फिरून आपला माल विकत असत.

यादव काळातील महाराष्ट्रात अनेक उद्योगधंदेही विकसित झाले होते. विशेषतः मलमली, मखमली, तलम, सुती व रेशमी कापड विणण्याचे उद्योग आंतरराष्ट्रीय बाजारपेठेत आपला माल पाठवत. त्यासाठी पैठण, नगर, ठाणे, चौल ही ठिकाणे प्रसिद्ध होती. ह्या गावांत मोठ्या प्रमाणावर विणकर राहत असत. ठाणे शहरात पाच हजार विणकर राहत होते व ते मखमलीचे कापड तयार करत, चौल येथील तलम सुती व मखमली कापड जगप्रसिद्ध होते. पैठण येथे अत्यंत नाजूक, तलम, रेशमी धाग्याने विणलेल्या व त्यावर जरतारीचे नक्षीकाम केलेल्या पैठणी तयार होत. तलम कापडे बांबूच्या नळीत घालून ठेवण्याची पद्धत होती. चामडे बनवण्याचा उद्योगही महाराष्ट्रात भरभराटीत होता. पाण्याच्या मोटा, पखाली, पादत्राणे इत्यादी चामड्याच्या वस्तू इथे तयार होत. बारीक कलाकुसरीची कामेही येथे केली जात. कातड्याचे पट्टे विणून केलेले नक्षीकाम, त्यावरच्या बेलफत्या, जनावरांची व पक्ष्यांची चित्रे, सुती, रेशमी व जरीच्या धाग्यांची कलाकुसर; विविध प्रकारचे सोन्या-चांदीचे अलंकार बनवणे, हिऱ्याला पैलू पाडणे ही नाजूक कामे करण्यात देवगिरीचे व नंदूरबारचे कारागीर अतिशय कल्पक होते.

वसई बंदरात जहाजे बांधणारी गोदी होती. देशी वाहतूक करण्यासाठी बैलगाडीचा वापर होई. त्यासाठी अनेक सुतार कार्यरत होते. खाद्य, अखाद्य व सुगंधी तेले काढण्यासाठी हातघाणे व बैलघाणे होते. तीळ, एरंडी व खोबरे ह्यांपासून तेल काढले जाई. यादवकालीन महाराष्ट्रात शिंप्याची वेगळी जात होती. मापासाठी एक कपडा देऊन दुसरा शिवणे, जुने कपडे देऊन त्यातून नवा कपडा शिवणे इत्यादी शिंपीकामे केल्याचे दाखले साहित्यात मिळतात. शिंप्यावर कर आकारले जात. त्यापासून सरकारला उत्पन्न मिळे.

यादवकालीन शहरी समाजाच्या आर्थिक, धार्मिक व सामाजिक गरजा भागविण्यासाठी संघटना उभारलेल्या

आढळतात. अशा व्यावसायिक संघटनेला 'श्रेणी' असे म्हणत. त्यात निरनिराळ्या जातींतील लोकांचा समावेश असे. सर्वसाधारणपणे त्या काळी लोक आपली जात सोडून अन्य जातींचे व्यवसाय करत नसत. अनेक शहरांत विणकर, तेली, बुरूड, काची वगैरे धंदेवाल्यांचे संघ होते. घाऊक व्यापार करणाऱ्या व्यापाऱ्यांचे संघ एकाच गावापुरते मर्यादित न राहता अनेक गावांत ते कार्यरत असत. मुळगुंद, वीरबळुंज, मिरज, कोल्हापूर येथील श्रेणी विविध शहरांत कार्य करत. संघाचे काम करण्यासाठी नऊ-दहा लोकांची कार्यकारिणी असे. तिच्या वेळोवेळी बैठका होत व दैनंदिन प्रश्न सोडवले जात. परंतु काही महत्त्वाचे निर्णय घ्यायचे असल्यास सर्वसाधारण सभा बोलावली जाई. सर्वानुमते निर्णय घेतले जात. संघाचे नियम सर्वांना बंधनकारक असत. त्यांचे उल्लंघन करणाऱ्यास दंड केला जाई. संघाच्या अंतर्गत कार्यात राजाही हस्तक्षेप करत नसे. सभासदाचे निधन झाल्यास त्याची मालमत्ता देवस्थानास दिली जाई.

श्रेणीपेक्षा उच्च दर्जाची 'पूग' ही संस्था होती. श्रेणीच्या सभासदाला श्रेणीकडून न्याय मिळाला नाही, तर सभासद 'पूग'कडे न्याय मागू शके. श्रेणी व पूग ह्या दोन्ही संस्थांना राजमान्यता होती. त्यांचे कार्य शासनास साह्यकारी असे. त्यामुळे राजदरबारी त्यांना मानाने वागवले जाई. अनेक श्रेणी आपल्या सभासदांच्या व्यापारास व त्यांच्या वस्तूंच्या वाहतुकीस संरक्षण देण्यासाठी सैन्य बाळगत. आपत्काली ह्या सैन्याचे राजाला साहाय्य लाभे. अनेक प्रतिष्ठित श्रेणींना छत्र-चामर बाळगण्याचा अधिकार दिला जाई.

श्रेणीच्या संपत्तीचा व उत्पन्नाचा उपयोग हा सभासदांच्या धंद्याच्या वृद्धीसाठी केला जाई. पण काही वेळा त्याचा उपयोग सार्वजनिक कार्यासाठीही केला जाई. दानधर्म, देवालये ह्यांसाठीही खर्च होत असे. सार्वजनिक कार्यासाठी श्रेणी काम करत असल्यामुळे शहराच्या व्यवस्थापनाचे कार्यही त्यांच्याकडे सोपवले जाई. अनेक वेळा राज्यकारभारासाठी वा परचक्र आल्यास संरक्षणासाठी राजाला पैशाची गरज भासे. अशा वेळी पैशाची गरज श्रेणी भागवत असत. अनेक वेळा नगरातील प्रतिष्ठित व्यापारी शत्रूवर चालून जाणाऱ्या सैन्याच्या बरोबर जात व प्रवासात सर्व व्यापारी नगरात एकत्र राहत. त्यांची दुकानेही तेथेच असत. तो नगर विभाग त्यांच्या नावाने ओळखला जाई. उदाहरणार्थ गादगेहाट, सोवनहाट, माळीहाट वगैरे.

श्रेणीचे कार्य वेगवेगळ्या नगरांतून चाले. त्यामुळे एका गावातील व्यापाऱ्यास पैसे पाठवायचे असतील, तर तशी व्यवस्था होत असे. त्या व्यावसायिकांचा हा भ्रातृभाव महत्त्वाचा होता. ह्यामुळे कोणत्याही शहरात पैसा उभा करणे सोयीचे होई. व्यापारात अनेक वेळा अनेक जणांच्या मदतीची जरुरी असते. एकाच माणसाच्या हातून सर्व कारभार होणे कठीण असते. अशा वेळी भागीदारीत धंदा केला जाई. भागीदाराने धंद्यात घातलेल्या भांडवलाच्या प्रमाणात त्याला नफा मिळे किंवा एकमेकांतील कराराने नफ्याचे प्रमाण ठरवले जाई. हे व्यापारी मुख्यतः कापूस, सूत, कापड, चामडे, नीळ, हस्तिदंत, चंदन, नारळ, तीळ इत्यादी माल परगावी पाठवत व येताना सोने, तांबे, कथील, शिसे, घोडे असा माल बरोबर आणत. किनाऱ्यावरील व्यापार हा मुसलमानांच्या ताब्यात होता. अनेक अरब कुटुंबे कोकणात स्थायिक झालेली होती.

महाराष्ट्राच्या पश्चिम किनाऱ्यावर भडोच आणि सोपारा बंदरे महत्त्वाची होती. महाराष्ट्रातील अनेक वस्तू या बंदरांतून परदेशी जात. महाराष्ट्रातील कल्याण बंदरही तेवढेच महत्त्वाचे होते. परंतु ठाणे बंदराची अधिक भरभराट झाली होती. चौल हे आणखी एक महत्त्वाचे बंदर होते. चौल येथे रेशमी, सुती, तलम कापड आणि सुगंधी द्रव्ये यांची मोठी बाजारपेठ होती. दाभोळ हे आणखी एक महत्त्वाचे बंदर.

गावातील जत्रेत व आठवडेबाजारात किरणा-भुसार माल, कापड, कांबळी, बैल, घोडे अशा अनेक वस्तू विक्रीस असत. अनेक ठिकाणचे व्यापारी तेथे एकत्र जमत व सामुदायिकरीत्या देवस्थानास दान देत.

व्यापारी मालावर कर आकारला जाई. गावात तयार होणाऱ्या मालावर व बाहेरून येणाऱ्या मालावर वेगळ्या दराने कर आकारला जाई. करातील काही भाग दानधर्म म्हणून दिला जाई किंवा देवालयाला दिला जाई. कराची वसुली वस्तुरूपात वा रोकड रूपात होई. कापड, धातू, जवाहीर अशा टिकाऊ वस्तूंवर रोकड रूपात व खारीक, सुपारी, खोबरे, भाजीपाला अशा नाशवंत वस्तूंवरील कर वस्तुरूपात घेतला जाई. काही वस्तूंवरील कर मापानुसार तर

काही वस्तूंवरील कर गठ्ठ्यानुसार आकारला जाई. जकातीचे प्रमाण पंचवीस टक्क्यांपर्यंत होते.

यादवांनी निपुत्रिकाच्या मालमत्तेवर कर आकारला, पण मालमत्ता कुटुंबाजवळच ठेवली. पूर्वी निपुत्रिकाची मालमत्ता सरकारजमा होत असे. किनारी वाहतुकीवर अल्पदराने कर आकारून देशी व्यापारास चालना दिली. गाव वसवताना करारासंबंधीचे अधिकार राजा स्पष्ट करत असे. बहुतेक करार सशुल्क होते. अनेक वेळा त्यातील काही जणांना कर आकारणीतून सवलत दिली जाई. पण जकात चुकवणाऱ्यास शिक्षा केली जाई. मालाच्या खरेदी-विक्रीचा व्यवहार व्यापारी व ग्राहक ह्यांच्यात होत असे. त्यांच्यात अडत्यासारखा मध्यस्थ नसे. त्यामुळे बाजारभावात गैरवाजवी चढउतार होत नसे. अवाजवी भावाने माल विकणाऱ्या व्यापाऱ्यांस दंड द्यावा लागे.

वस्तूचे माप ठरवण्यासाठी सरकारने विशिष्ट प्रमाण ठरवलेले असे. धान्य मोजण्यासाठी कुडव, पावशेर, शेर, दुशेरी, ऐढशेरी, पासरी, मण, खंडी ही मापे होती. तेलासाठी पळी व डोही ही मापे होती. मौल्यवान वस्तुमापनासाठी गुंज, वाल, जव, पळ, मासा, तोळा, दुतोळा अशी वजने होती. जमिनीची मोजदाद करण्यासाठी अंगुल, हस्त, निवर्तन, कम्म, मत्तर ही मापे होती. वजनमापांतील फसवणूक किंवा विक्रीच्या मालात भेसळ करणाऱ्यास शिक्षा केली जाई. चिंचोरे, कवडे, चामडे यांचाही उपयोग नाण्यांसारखा होई. यादवांच्या नाण्यांवर गरुडचिन्ह असे. यादवकाळात अनेक प्रकारची नाणी बाजारात होती. त्यांतील काहींची नावे अशी होती- कवडी, द्रम्म, निष्क, भैरव, गद्याण, होन, धरण, वीस, हण, दामनी, इत्यादी. त्यांतील काही नाणी सोन्याची होती. ह्या नाण्यांचे एकमेकांतील प्रमाणही ठरवले जाई. उदाहरणार्थ २ होन्नु = १ वराह, १६ पण = १ द्रम्म; १६ द्रम्म = १ निष्क, २ वीस = १ कासु इत्यादी. नाणी पाडण्याचे काम सरकारी टाकसाळीत होत असे. त्याचप्रमाणे सोनारांनाही नाणी पाडण्याची परवानगी दिली जाई. अनेक ठिकाणी परराज्यातील नाणीही चलनात असत. कोणती नाणी स्वीकारायची हे अनेक वेळा व्यापारीच ठरवायचे. आर्थिक जीवनावरही अनेक वेळा धर्मभावनेचा परिणाम होत असे.

आर्थिक व सांस्कृतिक क्षेत्रांत नगरातील लोक अधिक उत्साही असतात. नगरात नाना प्रकारचे लोक एकत्र येतात. त्यामुळे तिथे प्रत्येक क्षेत्रातील विविधता दिसते. शहरातील लोक आपापल्या उद्योगांत गुंतलेले असतात. मोठ्या नगरांत लोकांना लागणाऱ्या सर्वच वस्तू स्थानिक असू शकत नाहीत. लोकांना लागणाऱ्या गोष्टी बाहेरून आणाव्या लागतात. शहरातील लोकांचे विविध लोकांशी संबंध येतात. त्यामुळे शहरी लोकांची मनोवृत्ती वेगळीच असते. ह्या तुलनेने ग्रामीण जीवन वेगळेच असते. त्यांचे कार्यक्षेत्र मर्यादित असते. त्यांची दृष्टीही त्यामुळे मर्यादितच असते. गावात शेतीसारखा एकच धंदा व त्याला पूरक असलेले पाच-सहा धंदे एवढेच मर्यादित क्षेत्र असत.

**मुस्लीम राजवटीतील अर्थव्यवस्था:** अल्लाउद्दीन खिलजीने यादवांचा पराभव केला आणि महाराष्ट्रातील काही भाग मुस्लीम प्रभावाखाली आला. ह्यापूर्वी उत्तर हिंदुस्थानावर मुस्लीम राज्यकर्ते राज्य करत होते, पण त्यांचा महाराष्ट्राशी फारसा संपर्क आला नाही. पुढे मोगल काळातही हुमायुन, बाबर, अकबर, जहांगीर ह्यांचे राज्य महाराष्ट्रात पोहोचले नव्हते. शहाजहानच्या कारकिर्दीत मोगलांचा महाराष्ट्राशी संबंध आला व पुढे औरंगजेब दक्षिण विजयासाठी महाराष्ट्रात तीस वर्षे मुक्कामास राहिला. पण त्याचा बहुतेक काळ युद्धातच गेला. ह्या कारणाने मुस्लीम राजवटीचा येथील आर्थिक जीवनावर फारसा परिणाम झाला नाही. जो काही परिणाम झाला, तो नगरांपुरता मर्यादित राहिला. ग्रामीण जीवनावर वा ग्रामीण अर्थव्यवस्थेवर अल्प परिणाम झाला. मोगलांप्रमाणेच बहमनी राजे व त्यांचा पाडाव झाल्यावर उदयास आलेल्या आदिलशाही, निजामशाही, बिदरशाही इत्यादी शाह्यांचाही आर्थिक जीवनावरील परिणाम अल्पच राहिला. पुरातन काळापासून चालत आलेली वतने, बलुते, पाटील, कुलकर्णी, देशपांडे, देशमुख ह्यांची नोकरशाही चालूच राहिली. त्यात फारशी ढवळाढवळ झाली नाही. तरीही राज्यव्यवस्थेवर मुस्लीम धर्मसंकल्पनांचा परिणाम काही प्रमाणात झालाच. येथे त्याविषयीची थोडीफार माहिती देण्याचा प्रामाणिक प्रयत्न केला आहे.

मोगलराजपदाच्या महत्त्वाच्या पाच संकल्पना अशा होत्या: स्वकेंद्रित सत्तेचा सिद्धान्त (बाबर), ईश्वरी स्फूर्तीचा सिद्धान्त (हुमायुन) ईश्वरदत्त राजसत्ता (अकबर), ईश्वरदत्त सिद्धान्तावरील हिंदू संकल्पनांचा प्रभाव (शहाजहान) मुसलमान विचारांची पुनर्स्थापना (औरंगजेब). राज्यकारभार पाहण्यासाठी मोगल काळात मनसबदारी पद्धत उदयास आली. मनसबदारी व्यवस्था पिरॅमिडसारखी असे, सर्वांत वरती राजा व सर्वांत कनिष्ठ जागेवर सर्खेल. सिपाहसालार, अमीर, मलीक, खान हे अन्य मनसबदार होते, मोगल नोकरशाहीत परदेशी अंमलदारांचा भरणा मोठ्या प्रमाणावर होता. त्यात तुराणी, दुराणी, उझबेक, तुर्की अशांचे मिश्रण होते. परदेशी व देशी उमरावांत स्पर्धा असे व ते एकमेकांत कट-कारस्थाने करीत. याशिवाय हिंदुस्थानातील स्थानिक हिंदू मनसबदार होते. राजा मानसिंग, जयसिंग,जसवंतसिंग हे हिंदू मनसबदार मोठ्या हुद्यांवर होते. नोकरशहात शिया व सुन्नी असेही भेद होते. मनसबदारांच्या मृत्यूनंतर त्याची संपत्ती व हुद्दा सरकारजमा होत असे, पण बऱ्याच वेळा मयताच्या वारसाकडून काही रक्कम नजराणा म्हणून स्वीकारली जाई व मनसबदारी पुढील पिढीतही चालू राही. मनसबदार एकाच ठिकाणी राहिल्यास तोच राजा म्हणून मिरवण्याची शक्यता असे, म्हणून मनसबदारांच्या बदल्याही केल्या जात. मनसबदारांची नेमणूक बादशहा स्वतः करे. मनसबदरीसारखी जहागिरीची पद्धतही होती. त्याचे वेगळेपण एवढेच की अनेक वेळा जहागीरदाराला जमीनही दिली जाई व त्यास सरकारी करआकारणीचे अधिकार दिले जात. ते अधिकार काही वेळा मक्त्याने दिले जात. जहागीरदाराचीही बदली होत असे.

मोगल काळात जमीन महसुलाच्या अनेक पद्धती अस्तित्वात होत्या. घल्ला-बक्षी पद्धत, हस्त-ओ-बुद, कानकूट, नसक, पेरणी-क्षमता व नांगर पद्धती. ह्या पद्धती वापरात होत्या. घल्ला पद्धतीत शेतकऱ्याकडून त्याच्या जमिनीत आलेल्या धान्याच्या काही हिस्सा सरकारजमा होई. हस्त-ओ-बुद पद्धतीत उभ्या पिकाच्या आधारावर जमीन महसूल निश्चित केला जाई. कानकूट पद्धतीने जमीन मोजली जाई नंतर निवडक शेतातील उत्पन्नाचा अंदाज घेतला जाई. व पिकाचा दर ठरवला जाई. तो दर सर्व क्षेत्राला लागू होई. उत्पन्नाची शेतमालक व राजा ह्यांत विभागणी होई व सरकारी हिश्शाचे रोख रकमेत रूपांतर केले जाई. नमक पद्धतीत पिकाची अंदाजे किंमत केली जाई. जमीन महसूल रोख रकमेत निश्चित केला जाई. गेल्या बारा वर्षांतील सरासरी जमीन महसुलाचा विचार केला जाई. पेरणी-क्षमता पद्धतीत दिलेल्या जमिनीच्या तुकड्यात लागवड करण्याकरता आवश्यक असलेल्या बियाण्याचे प्रमाण विचारात घेतले जाई. झब्त पद्धत ही जमीन आकारणीची पद्धत होती; ह्या पद्धतीत जमिनीचे वार्षिक मोजमाप केले जाई व आकारणीचे दर निश्चित केले जात. मोगल साम्राज्यातील जमिनीची विभागणी खालसा जमिनी व जहागिरीच्या जमिनी अशा भागांत केली जाई. खालसा जमिनीवरील सरकारी महसूल वसुली ही सरकारी अधिकारी करीत. जहागिरी जमिनीवरील सरकारी कर जहागीरदाराचे वसूली अधिकारी करत.

मोगल काळात साम्राज्याचे अनेक सुभे/प्रांत पाडण्यात येत. प्रांताचे सरकार/जिल्हे पाडण्यात येत. सरकारची विभागणी परगण्यांत केली जाई व परगण्यात अनेक खेडी असत. परगण्यास महाल असेही म्हणत. खेडे पातळीवर दोन महत्त्वाचे अधिकारी मुकादम/पाटील व पटवारी/कुलकर्णी. ही अधिकारपदे वंशपरंपरेने चालत व त्यांची खरेदी-विक्रीही होत असे. पाटील व कुलकर्णी ह्यांना त्यांच्या कामाचा मोबदला दिला जाई. काही मोबदला महसूल-वसुलीच्या प्रमाणात असे तर काही प्रमाणात खेड्यातूनच मिळे त्याला खुराक/शिधा असे म्हणत. महसुलाची कागदपत्रे (पट्टे) हाताळण्याचे काम पटवारी करे. तो जमिनीची माहिती ठेवे. पटवाऱ्याच्या वरचा अधिकारी अमीन होता. तो जमीन महसुलाची आकारणी करण्याचे काम करी. तो परगण्याचा प्रमुख होता. आपल्या परगण्यामध्ये लागवडीयोग्य असलेली जमीन पडीक न राहू देणे, जमीन महसूल जमा करणे, हिशेबाच्या नोंदवह्या ठेवणे, त्या वरिष्ठांकडे पाठवणे, चौधरी-कानुंगोसारख्या अधिकाऱ्यांचे प्राप्तीचे हक्क निश्चित करणे ही अमिलाची प्रमुख कामे होती. खजिन्यात ठेवलेल्या रकमेची जबाबदारी अमीन, फौजदार व अमील ह्यांच्यावर होती. सरकाराची मागणी दाखवणारा तक्ता तयार केला जाई. जमा झालेल्या पैशाची वाटणी करण्याचे काम अमील करे. खजिन्याची

व्यवस्था पाहण्याचे काम खजिनदार करे. कानुंगो व चौधरी हे परगण्याचे वंशपरंपरागत अधिकारी होते. महसुलाच्या कामाची स्थानिक कागदपत्रे राखून ठेवण्याचे काम त्यांचे होते, जमिनीविषयीची सर्व माहिती कानुंगोस असे. खजिन्यासंबंधी बिटकची व खजिनदार हे अधिकारी होते. खजिन्याचा प्रांतिक प्रमुख दिवाण-इ-सुबा हा असे; तो बादशहाच्या दिवाणाला जबाबदार असे. त्याची नेमणूक बादशहा करे. महसुलासंबंधीची सर्व जबाबदारी त्याच्यावर असे. सर्वोच्चपदी दिवाण-इ-विझारत असे.

**मुसलमान कालखंडातील उद्योगधंदे:** भारत हा बहुतेक सर्व वस्तूंबद्दल स्वयंपूर्ण होता. आयात केलेल्या वस्तूंत धातू, कच्चा माल, चैनीच्या वस्तू, फळे, उत्तेजक पदार्थ, मखमल, रेशीम लोकरीचे कापड, सोने, चांदी, जस्त, कथील, तांबे, शिसे, हस्तिदंत, पोवळे, कासवांची कवचे, अँबर, टाकणखार, गंधक ह्या होत्या. सर्व कच्चा माल भारतात उपलब्ध असे आणि या वस्तूंच्या उत्पादनासाठी लागणारी अवजारेही येथेच होत. भारतीय सुती कापडाला देशात व परदेशांत मोठी मागणी होती. आफ्रिका, अरबस्तान, इजिप्त, ब्रह्मदेश, मलाक्का या देशांना कापड निर्यात होई. समुद्राजवळ असलेल्या प्रदेशांत कापड तयार होत असे. खंबायत व दाभोळ ही मोठी निर्यात केंद्रे होती. सुती कापडाप्रमाणे रेशमी कापडाचेही मोठे उत्पादन होई. देशातील श्रीमंत लोक रेशमी कापड वापरत व त्याची निर्यातही होई. इराण, पूर्व आफ्रिका, तुर्कस्तान, सीरीया, अरबस्तान, इथिओपिया येथे रेशमी कापड पाठवले जाई. रेशमी कापड चीन व अन्य पूर्वेकडील देशांतून आयातही केले जाई. कापडास आवश्यक असणारे रंगही भारतात तयार होत. निळा, पिवळा, जांभळा हे रंग येथेच तयार होत. रंग बंधकही येथेच तयार होत. कापड छापण्याची पद्धतही प्रचलित होती. लाकडी ठसे वापरून छपाई केली जाई. मोगल साम्राज्याच्या विस्ताराबरोबर उद्योगधंदेही विस्तारले. राजाने अनेकांना जकात माफ केली. अनेक नागरी केंद्रे उदयास आली. मोगल साम्राज्यात अनेक ठिकाणी लोखंडाच्या खाणी होत्या. लोखंडापासून अनेक प्रकारच्या वस्तू तयार केल्या जात. शेती, लष्कर, इतर उद्योग व घरगुती कारणासाठी लोखंडी वस्तू लागत. त्या साम्राज्यात तयार तांब्याची, पितळीची भांडी घरात वापरली जात असत व ती भांडी तयार करण्याचे उद्योग प्रगत होते. समुद्र, तळी व यांतून मीठ तयार केले जाई. खनिज मीठही तयार होई. साखर, कागद इत्यादी उद्योग भरभराटीत होते.

मोगल काळात व्यापारवाढही चांगली झाली. परदेशी व्यापार मुस्लिमांच्या ताब्यात होता. पुढे त्यांना पोर्तुगिजांनी आव्हान दिले. भारतातील पश्चिम व पूर्व किनाऱ्यांवरील बंदरांमार्फत जगभर माल पाठवला जाई. भारतीय निर्यात व्यापार आयात व्यापारापेक्षा मोठा होता. त्यामुळे सोने, चांदी, मोठ्या प्रमाणावर आयात होई; बादशहा व त्याचे सरदार मोठ्या प्रमाणावर परदेशी व्यापारात भाग घेत. मोगलकालीन अंतर्गत व्यापार समुद्र किनारा, नद्या व खुश्कीच्या माग ह्यांमधून होई. औद्योगिक केंद्रे, व्यापारी केंद्रे व बंदरे एकमेकांना रस्त्यांद्वारे जोडली होती. महामार्ग उत्तम व्यवस्थेत होते. परंतु ही सर्व केंद्रे उत्तर हिंदुस्थानात होती. महाराष्ट्राला त्यापासून फारसा लाभ झाला नाही.

## ग. उत्तर-मध्ययुगीन काळ

**शिवकालीन अर्थव्यवस्था :** शिवकालीन महाराष्ट्र हा मुख्यत्वेकरून ग्रामीण होता. शिवकाळात राज्यकारभार हा किल्ल्यावरून केला जाई. राज्यकारभाराच्या निमित्ताने विकसित झालेल्या नागरी राजधान्या ह्या काळात आढळून येत नाहीत. भूभागाचे संरक्षण करण्याच्या दृष्टीने किल्ल्यांना अनन्यसाधारण महत्त्व प्राप्त झाले. ग्रामीण भागांत मुख्य व्यवसाय शेती हा होता. शेतकऱ्याला आपली शेती विकसित करण्यासाठी सुरक्षिततेची जरुरी भासते. आपण विकसित केलेली जमीन भविष्यकाळातही आपल्याच मालकीची राहील, याची त्याला शाश्वती पाहिजे असते. त्या दृष्टीने महाराष्ट्रात वतनदारी विकसित झाली. वतनदाराला मिळालेली जमीन विकता येत असे व त्याला वंशपरंपरेने उपभोगता येई. वतने विविध प्रकारची होती, काही धार्मिक इनामे होती. देवस्थानास दिलेली जमीन शेतकऱ्याला कसण्यासाठी मिळत असे. अशा जमिनीवरील करात सवलत दिली जाई. राजाला वतन देण्याचा व काढून घेण्याचा अधिकार असे. शिवाजी महाराजांच्या काळात वैयक्तिक वतने फारशी दिली जात नव्हती. रयतवारी

पद्धतीला अधिक प्रोत्साहन मिळे. ह्या पद्धतीत शेतकरी व शासन ह्यांचा प्रत्यक्ष संबंध येई. त्यांच्यामध्ये इनामदारासारखा मध्यस्थ नसे. काही विशेष प्रसंगी वैयक्तिक सेवेसाठी वतन दिले जाई. रयतवारी पद्धतीत शेतकऱ्याकडून सरकारी अधिकारी शेतसारा वसूल करत. इनामदारी पद्धतीत इनामदार कर वसूल करून तो सरकारजमा करी. इनामदाराच्या लहरीवर वसुली अवलंबून राही. अनेक वेळा शेतकऱ्यावर अन्यायकारक वसुली लादली जाई. करआकारणी रोख रकमेत केली जाई. ती पिकावर अवलंबून असे. जमीन लागवडीखाली आहे का पडीक आहे, यावर करआकारणी ठरत असे. लागवडीखालील जमिनीचेही सरस, मध्यम, कनिष्ठ असे तीन भाग होते व जमिनीच्या मगदुरावर कर अवलंबून राही. बागायती जमिनीवर जिरायती जमिनीपेक्षा जास्त दराने कर घेतला जाई. नगदी पिके व इतर पिके असेही पिकांचे प्रकार होते. ऊस, कपाशी, फळे, भाजीपाला ही नगदी पिके. धान्यांबाबत खेडी स्वावलंबी असत. शिवकाळात राजकीय अस्थिरता होती. युद्ध काळात लुटालूट जास्त होई. शिवकाळात लष्करी व्यवसायात तरुण मंडळी आकर्षित होत. त्यामुळे शेतीसाठी मनुष्यबळ कमी पडे. त्यात दुष्काळामुळेही शेती किफायतशीर राहत नसे. त्यामुळे अनेक कुटुंबे गाव सोडून जात. अशा प्रतिकूल परिस्थितीला तोंड देता यावे म्हणून शिवाजी महाराजांकडून मदत केली जाई.

सरकारकडून शेतसारा वसूल करण्यासाठी विविध अधिकारी नेमले जात. सुभेदार, मुजुमदार, हवालदार, पाटील, चौगुले, कुलकर्णी हे ते अधिकारी होत. पाटील, कुलकर्णी हे खेडेपातळीवरील अधिकारी तर सरकारकून हा प्रांताचा अधिकारी होता. जमीन महसूल निश्चित करण्यासाठी जमिनीची मोजणी केली जाई. त्यासाठी 'शिवशाही काठी' प्रचलित होती. मोजणीचे काम गावातील महार करे. जमीन महसूल आकारणीची पद्धत ठरवण्यात दादोजी कोंडदेव, मोरोपंत पिंगळे व आण्णाजी दत्तो ह्यांचा मोठा सहभाग होता.

शिवकाळात उत्पन्नाची अनेक साधने होती. त्यांतील प्रमुख साधने पुढीलप्रमाणे : जमीन महसूल, वैयक्तिक उत्पन्न, विविध व्यवसाय, मालमत्तेवरील कर, इनामपट्टी, देशमुखपट्टी, मिरासपट्टी, सराफपट्टी, धनगरपट्टी, मागटका, पायपोसी, कारागिरांवरील कर, मोहतरफा, हेजिबपट्टी, अनेक अप्रत्यक्ष करांतूनही जकातीसारखे उत्पन्न मिळे. उरीदलाली, कापडावरील जकात, शिंगोटी कर (जनावरांवरील) गुलामांची खरेदी-विक्री, मिठावरील कर, सादीलवारपट्टी, खर्चापट्टी, लग्नटका, नुकसानपट्टी, नाडी टोकरा, (नावेवरील कर), मादक पदार्थांवरील कर, तंबाखू कर, न्यायालयीन शुल्क, वनचराई, टांकसाळेपासून मिळणारे उत्पन्न, खाण उद्योगापासूनचे उत्पन्न, जाती, जहाजफुटी, गावखर्चासाठीचा खर्च, जंगमपट्टी, दसरापट्टी, तोरण भेटी, ठाणेपट्टी, मोहीमपट्टी, युद्धातील लूट अशा विविध मार्गांनी शिवकाळात उत्पन्न मिळवले जाई. समाजातील प्रत्येक वर्गाकडून कररूपाने उत्पन्न मिळे. करविषयक कायदे नव्हते. त्यामुळे करपद्धतीत लवचीकता होती.

शिवकाळात विविध गोष्टींवर खर्च केला जाई. राजावरील खर्च, प्रशासनावरील खर्च (मुलकी व लष्करी), शेतीवरील खर्च, राजकुटुंबाचा खर्च, राजधानीवरील खर्च, राजासाठीचे कपडे, अलंकार, राज्याभिषेक खर्च, गरिबांना मदत, धार्मिक खर्च, शिक्षणावरील खर्च हे खर्चाचे प्रमुख प्रकार होते.

शिवाजी महाराजांनी आपल्या काळात स्वतःचे नाणेही प्रसृत केले होते. त्याचे नाव शिवराई असे होते. हे नाणे विजयनगरच्या 'होन' ह्या नाण्याच्या धर्तीवर होते. त्या काळात इतरही नाणी प्रचारात होती. उदाहरणार्थ देवराई होन, रामचंद्राई होन, धारवाडी होन, एलोरी होन, इत्यादी. विजापूर, गोवळकोंडा, पोर्तुगीज, इंग्रज ह्यांच्या प्रदेशांतून आलेली नाणी चलनात होती. नाण्याची किंमत ही त्यात वापरलेल्या धातूवर अवलंबून असे. नाणी तपासण्याचे काम सराफ करत असत. नाणे आगीत टाकून त्याचा कस पाहिला जाई, शिवकालात तांबे, चांदी व सोने यांची नाणी प्रचलित होती. 'होन' ही सुवर्णाची लहान नाणी होती. त्यांची प्रचलित नावे अशी होती. प्रताप, दरण, चवल, दुवल, पल, बेले इत्यादी. शिवकाळात चांदीची नाणी प्रचलित होती. पण ती इतर राज्यांतून आलेली होती रुपया, लारी, पटका, अश्रफी, अब्वासी, रियाल, महमुदी ही चांदीची

नाणी होत. शिवाजी महाराजांनी चांदीची नाणी पाडली नव्हती. काही नाणी तांब्याची होती त्यांची नावे अशी होती. शिवराई, सजगणी, तिरुका, पैसा, दाम, अडका, जितल इत्यादी.

शिवकाळात सावकाराकडून वित्तपुरवठा केला जाई. कर्जावर व्याज आकारले जाई. दीर्घ मुदतीची कर्जे दिली जात नव्हती. व्याज दरमहा आकारले जाई. घेतलेल्या कर्जाची परतफेड करणे, ही नैतिक जबाबदारी होती. कर्ज न फेडणाऱ्यास पुन्हा कर्ज मिळत नसे. शेतकरी शेतीकामासाठी कर्ज घेत असे. शिवकाळात व्याजाचे दर पूर्वीपेक्षा जास्त होते. शिवकाळात आपत्काली कर्ज सरकारही देत असे व ते हप्त्याने वसूल केले जाई. एका ठिकाणाहून दुसरीकडे पैसे पाठवावयाचे असल्यास हुंडी काढली जाई. त्याला वरात म्हणत. ती सावकारी पेढीवर काढली जाई. प्रशासनातील काही जणांचे पगार देण्यासाठी सावकारी पेढीवर हुंडी काढली जाई.

शिवकाळात विविध प्रकारचे उद्योगधंदे कार्यरत होते. कापड उद्योग, धातुकाम, मीठ, साखर, लाकूडकाम, जहाजबांधणी, कागद, मच्छीमारी, काच, कुलूप हे उद्योग प्रचलित होते. शेती हा प्रमुख उद्योग होता, शेतीच्या अनुषंगाने इतर अनेक उद्योग केले जात. खेडे हे स्वयंपूर्ण असे. आवश्यक असणारे कारागीर गावातच उपलब्ध होत. त्यांनी गाव सोडून जाऊ नये, म्हणून त्यांच्या उपजीविकेची व्यवस्था गावच करे, काही वेळा कारागिरांनी गावात स्थायिक व्हावे म्हणून त्यांना जमीन दिली जाई. सोनार, लोहार, तांबट, सुतार, चांभार, कुंभार, विणकर, दोरखंड वळणारे, तेली, बुरूड, शिंपी, न्हावी, परीट, माळी, कोळी, गवंडी, रंगारी असे अनेक कारागीर खेड्यात काम करत. प्रत्येक कारागिरी स्वतंत्र जातीची मक्तेदारी होती. एका जातीचे लोक दुसऱ्या जातीचे व्यवसाय सहसा करत नसत. सोनाराचा धंदा विशेष तेजीत होता.

चौल, दाभोळ, कल्याण, भिवंडी, राजापूर, वेंगुर्ला ही किनाऱ्यावरील महत्त्वाची बंदरे होती. ह्यातून आयात निर्यात व्यापार होत असे. येथे निर्यात होणाऱ्या वस्तूंचे उत्पादन होत असे. तसेच आयात होणाऱ्या वस्तूंवर प्रक्रिया करणारे उद्योगही किनारी केंद्रात चालू होते. अंतर्गत व्यापार हा आठवडे बाजार, यात्रा, जत्रा, पेठा ह्या ठिकाणी होत असे. तेराव्या शतकात यादवांचे राज्य बुडाल्यावर महाराष्ट्रातील राजकीय अस्थिरतेमुळे व्यापार धोक्यात झाला. पुढे सतराव्या शतकात महाराष्ट्रात शिवाजी महाराजांच्या रूपाने नवीन नेता मिळाला आणि राजकीय स्थैर्य प्राप्त झाले. त्यांच्या धोरणांमुळे स्थानिक उद्योगांना व व्यापाराला चालना मिळाली. शिवाजी महाराजांनी आरमारही वाढवल्यामुळे सागरी स्थैर्य प्राप्त झाले व परदेशी व्यापारास चालना मिळाली. शिवकाळात नदीमार्गे होणारा व खुश्कीच्या मार्गे होणारा व्यापार वाढीस लागला. डोंगराळ भागात शांतता राहावी म्हणून 'घाटपांडे' हा अधिकारी कार्यरत असे.

**पेशवेकालीन ग्रामीण अर्थव्यवस्था :** पेशवे कालात लोकांचा प्रमुख व्यवसाय शेती होता. शेती करण्यासाठी शेतकरी समुदायाने राहत. ह्यास ग्राम किंवा खेडे म्हणत. मोठे खेडे (कसबा), मध्यम खेडे (मौजे), व लहान खेडे (मचरे). खेड्याची व्यवस्था प्रामुख्याने दोघे पाहत. एक पाटील व दुसरा कुलकर्णी, पाटलास पाटीलकीच्या कामाबद्दल जमीन इनाम असे. गावातील रहिवासी निपुत्रिक असेल, तर त्याच्या निधनानंतर त्याची जमीन सरकारजमा होत असे. त्यास मिराशी जमीन म्हणत. ही जमीन पाटलास मिळत असे. शिवाय गावच्या सारावसुलीच्या दहावा हिस्सा पाटील व कुलकर्णी ह्यांच्यात २:१ ह्या प्रमाणात वाटला जाई. पाटील पदाचे कुलकर्णीपदाचे हक्क वंशपरंपरेने मिळत. पाटलाला विविध प्रकारचे हक्क व मानपान मिळत. गावातील रहिवाशांनी त्याचा मानपान कसा करावा व आपल्या उत्पन्नातील कितवा भाग पाटलाला द्यावा, ह्याविषयी नियम होते. पाटलाच्या खालोखाल कुलकर्ण्याचे हक्क व मानपान होते. ते बहुधा पाटलाच्या निम्मे असत. पाटील व कुलकर्णी यांचे उत्पन्न पुष्कळ असे. त्या मोबदल्यात त्यांना गावाची विविध कामे करावी लागत. गावाच्या संरक्षणाची व सरकारी वसुलाची जबाबदारी त्यांच्यावर होती. परचक्र आल्यास सैन्य जमवून शत्रूशी मुकाबला करावा व शत्रूने खंडणी मागितल्यास ती द्यावी. रहिवाशांच्या गरजा भागवण्याचे काम गावातील बलुतेदार व अलुतेदार करत. चौगुला, महार, सुतार, लोहार, चांभार, कुंभार, न्हावी, सोनार, जोशी, परीट, गुरव व कोळी हे बारा

बलुतेदार व तेली, तांबोळी, साळी, सनगर, शिंपी, माळी, गोंधळी, डौरी, भाट, ठाकर, गोसावी, जंगम, मुलाणी, वाजंत्री घडशी, कलावंत, तराळ, भोई हे अलुतेदार होत. प्रत्येकाकडे गावकीचे कोणते ना कोणते काम असे. काम वैयक्तिक असेल तर काम केल्याबद्दल त्यास मोबदला मिळे व गावकीच्या कामासाठी जमीन इनाम म्हणून मिळे. सरकारी नोकरास पैशाच्या रूपात वा धान्यरूपात मोबदला दिला जाई. गावात जो सरकारी कर वसूल होई, त्यापैकी पंधरावीस टक्के वसूल गावातील कामासाठी राखून ठेवला जाई.

खेड्यातील व्यवसायाचे काळी व पांढरी असे दोन भेद होते. काळीत काम करणारे ते शेतकरी व पांढरीत काम करणारे ते पांढरपेशे. मिरासदार व उपरे असे दोन प्रकारचे शेतकरी होते. मिरासदार जोपर्यंत सारकारी कर भरत आहे, तो पर्यंत त्याला जमीन कसायचा व तिची खरेदी-विक्री करण्याचा अधिकार होता. उपऱ्याला तसे अधिकार नव्हते. गावातील पांढरपेशांच्या व्यवसायातही मिरासदार व उपरे असा फरक होता. पांढरपेशा वर्गात मराठे, ब्राह्मण, वाणी, उदमी, सोनार, शिंपी, न्हावी, कोळी हे प्रमुख होत. शेटे हे वाणी-उदमींपैकीच. गावच्या पेठेचे काम त्यांच्याकडे असे. नवीन पेठा वसवणे, बाजार सुरू करणे, वजने-मापे नियंत्रित करणे ही कामे त्यांच्याकडे होती. त्यास गावकामगारा-सारखेच हक्क होते.

बलुतेदारांची कामे तीन प्रकाराची असत. एक सरकार उपयोगी, दुसरे ग्राम उपयोगी व तिसरे कुल उपयोगी. वतनदारी पद्धतीत गावासंबंधी हरएक काम अखंडितपणे सतत चालू राहण्याचा टिकाऊपणा आहे पण त्यात वतन उपभोगणाऱ्यांच्या पात्रतेचा विचार केला जात नसे. त्यामुळे काही ठिकाणी दुराचरणी माणूसही वतन चालवताना दिसे. गावात दोन प्रकारचे खटले असत. एक फौजदारी व दुसरे दिवाणी. महाराष्ट्रात फौजदारी खटले कमी असत.

### पेशवेकालीन जमीनमहसूल पद्धती

महाराष्ट्रात जमीन महसुलाची शास्त्रीय पद्धतीची व्यवस्था सतराव्या शतकात मलिकंबर व छत्रपती शिवाजीमहाराजांनी केली. जमिनीची सरस व निरस अशी प्रत ठरवली व उत्पादनाच्या १/३ भाग राजाला कररूपाने द्यायचा असे ठरवले. सर्व गावासाठी एकरकमी कर ठरवला जाई व त्याची व्यक्तीनुसार विभागणी करण्याचे काम पाटलाचे असे. पुढे नानसाहेब पेशव्याने वसुलाची घडी नीट बसवून दिली व ती पुढे इंग्रजी अमलातही चालू राहिली. त्याने जमिनीची अव्वल, दुय्यम व सीम अशी विभागणी केली व त्यांचे आकार अनुक्रमे बिघ्याला २ रुपये, १०.५रुपये व १ रुपया असे ठरविले. बागायती जमिनीचे दोन प्रकार पाटस्थळ व मोटस्थळ असे होते. त्याचप्रमाणे शेतकऱ्याने कोणते पीक घेतले यावरही शेतसारा अवलंबून होता. हा जमीनधारा पाच वर्षांसाठी असे. त्यानंतर त्यात बदल होई. अनेक वेळा परिस्थितीनुसार वसुलीबाबत सवलत दिली जाई. दुष्काळ, युद्ध, सैन्याची छावणी पडणे इत्यादी अस्मानी-सुलतानी गुदरली असता वसुलीत सवलत असे. वसुलीसाठी मामलेदार हा अधिकारी नेमला जाई व तो पाटील व कुलकर्णी यांच्या साहाय्याने वसुली करत असे.

नवीन मुलूख जिंकल्यावर सारा आकारणी नव्या पद्धतीने केली जाई. पण काही काळ जुन्याच पद्धतीने वसुली होई. मामलेदारास अनेक कामे करावी लागत. विशेषतः कुळांना तगाई देणे, पाटाची डागडुजी करणे, बागा खंडाने लावणे, शेतकऱ्यांस धीर देऊन शेतजमीन कसणे, गावाचे संरक्षण करणे इत्यादी कामे त्यास करावी लागत. त्याला कधी वार्षिक पगार मिळे किंवा मक्ता मिळे. मामलतीवर नेमावयाची माणसे ऐपतदार व पत असलेल्या घरची असत व त्यांच्याकडून किती वसुलीची अपेक्षा आहे, हेही नेमणुकीच्या वेळी स्पष्ट केलेले असे. अनेक वेळा ती रक्कम आगाऊ भरावी लागे. कोकणात अनेक गावे खोताने वसवलेली असत. खोत हाच गावाचा पाटील व कुलकर्णी असे. दूरस्थ मामलेदार आपल्याकडील वसुली हुंडीद्वारे पेशव्यांना पाठवत असत. शेतसाऱ्याशिवाय कराच्या इतर अनेक बाबी होत्या. दुकानदार, लोहार, जत्रेतील पाल, लग्न, दगडाच्या खाणी खोदणारे बेलदार; म्हैस, बकरी ह्यांसारखे प्राणी, प्रवाशांना डोलीने नेले जाई त्या डोलींवर, खाडीतून वाहतूक करणारी गलबते ह्या सर्वांवर कर आकारणी केली जाई. पेशवाईत दारू पिणे निषिद्ध मानले

जाई. त्यामुळे दारूवरील करापासून मिळणारे उत्पन्न अल्प होते.

सारावसुली ही उत्पन्नाची महत्त्वाची बाब. त्यामुळे पेशवे काळात त्यासाठी मोठी यंत्रणा उभारली होती. सुभेदार, सरदेशमुख, देशमुख, देशपांडे व गावपातळीवरील पाटील, कुलकर्णी व त्यांचे साहाय्यकारी चौगुला, महार इत्यादी वतनदार लोक हे सारावसुलीचे काम करत. त्या वेळची अस्थिर राजकीय परिस्थिती, वाहतुकीच्या साधनांचा अभाव, रस्त्यांची वानवा ह्यांमुळे सारावसुली हे काम जिकिरीचेच होई. त्यामुळे वतनदारीचे जरी अनेक तोटे असले, तरी त्यावर भिस्त ठेवणे पेशव्यांना भाग पडत असे. त्यामुळे यंत्रणेला शाश्वत स्वरूप प्राप्त झाले. एवढ्या मोठ्या प्रदेशावर राज्य करायचे, तर तीस शाश्वत स्वरूप असणे आवश्यक असे. नोकरांच्या नेमणुका सतत करण्याची वा त्यांच्या बदल्या करण्याची जरुरी नव्हती, तरी वतनदारांना मिळालेल्या सुरक्षेचा त्यांनी दुरुपयोग करू नये व मध्यवर्ती सरकारविरुद्ध उठाव करू नये; ह्याची काळजीही घेतली जाणे जरुरीचे होते, व त्या विचारानेच एक पर्यायी यंत्रणाही उभारली होती. ती म्हणजे मामलेदार, कमावीसदार व त्यांचे साहाय्यक ह्यांच्या नेमणुका केल्या जात. ते सरकारला प्रामाणिक राहत. त्यांना मोठा पगार दिला जाई, शिवाय त्यांना अन्य सवलतीही दिल्या जात.

पेशवाईत लोकांचा शेती हाच मुख्य व्यवसाय होता. त्यामुळे राज्यकर्ते शेतीला उत्तेजन देण्यासाठी अनेक प्रयत्न करत. त्या काळात स्वतंत्र असे शेतकी खाते नव्हते. पण शेतीवर देखरेखीचे काम मामलेदार, कमावीसदार व ग्रामस्थ यांच्याकडेच होते. राज्यकर्त्यांकडून शेतीसाठी दोन प्रकारचे साहाय्य मिळे. एक आपत्कालीची मदत व दोन शेती उत्पादन वाढावे म्हणून देण्यात येणाऱ्या सवलती. आग, कोरडा व ओला दुष्काळ ह्यांमुळे शेतकऱ्यांचे नुकसान होई. त्या वेळी साऱ्यात सूट वा सारा भरण्यास जादा वेळ दिला जाई. तसेच धान्य रूपात वा पैसा रूपात परतफेडीच्या बोलीवर कर्ज दिले जाई. अधिक जमीन लागवडीखाली यावी वा आहे त्या जमिनीतून अधिक उत्पादन मिळावे म्हणून जमीनदारास विविध प्रकारे मदत केली जाई. कोकणात समुद्राचे पाणी शेतजमिनीत घुसे व जमिनीची धूप होई. हे थांबण्यासाठी जमिनीभोवती बांध घालण्यासाठी आर्थिक मदत व साऱ्यात सूट दिली जाई. तसेच शेतीला पाणी मिळावे, म्हणून विहिरी खणणे वा ओढा वा नदी ह्यांवर बंधारा बांधणे जरुरीचे असे. शेतकऱ्याने अशा गोष्टींसाठी खर्च केल्यास त्याला मिळणाऱ्या जादा उत्पादनावरील करात सवलत दिली जाई.

**फुलबाग व फळबाग:** महाराष्ट्रातील हवामान फुले व फळे ह्यांच्या वाढीसाठी अनुकूल आहे. परंतु राजाचे त्याकडे विशेष लक्ष नसल्याने फूले व फळे यांच्या बागांची संख्या फारच थोडी आढळून येते. शिवापूरची शहाबाग ही शिवकाळातील प्रसिद्ध बाग, अशा बागांना मोठ्या प्रमाणावर प्रोत्साहन देणारा पहिला राजा म्हणजे शाहू महाराज. शाहू महाराजांचा तारुण्यातील काळ मोगलांच्या सहवासात गेला. त्यांनी मोगलांनी वाढवलेल्या बागा पाहिल्या होत्या. त्या काळी औरंगाबाद हे फळबागांसाठी प्रसिद्ध होते. शाहू महाराज सातारच्या गादीवर विराजमान झाल्यावर त्यांनी फळबागा व फूलबागा मोठ्या प्रमाणावर विकसित केल्या. त्यासाठी ते औरंगाबादहून झाडांची रोपे मागवत. महाराजांनी मागवलेल्या झाडांची पुढील यादी लक्षात राहण्यासारखी आहे. विही, शेव, अबू, शकताळू, बेदाणा, नाशपती, गलगल, चकोतरा, कौला, संगतरा, कमरंद, फणस, बदाम ही फळझाडे व केतकी, मदपोय, बटमोगरा, सुरू, बनमजसली ही फूलझाडे महाराजांनी औरंगाबादहून मागवली व आपल्या बागेत लावली. पेशवा बाजीराव, त्याचा भाऊ चिमाजी अप्पा व ब्रह्मेंद्रस्वामी ह्यांनीही महाराजांच्या या प्रयोगाचे अनुकरण केले व अशाच बागा वाढवल्या. त्या काळात बागांसाठीही प्रसिद्धीस आलेली महत्त्वाची गावे अशी: सातारा, आरळे, धावडशी, नुते, लिंब, शिवापूर. ही गावे साताऱ्याच्या आसपासची आहेत. ती फळबागांसाठी प्रसिद्ध होती. ह्याच बागांतून वाढलेली फळे इतरत्रही पाठवून दिली जात व त्यांच्या बियांपासून फळझाडे लावली जात. फळबागांचा प्रसारही शाहू महाराजांनी मोठ्या प्रमाणावर केला.

शाहू महाराजांप्रमाणेच पेशव्यांनीही फळबागांना उत्तेजन दिले. त्यांनी गावोगावी आंब्याची झाडे लावली. पुणे, सुपे,

अंबी, अहमदनगर, संगमनेर, खानदेश, राहुरी इत्यादी ठिकाणी फळांचे वृक्ष बहरल्या नोंद इतिहासात आहे.

बाजीराव, चिमाजी, नानासाहेब, राघोबादादा ह्या पेशवे घराण्यातील व्यक्तींनी बागबगिच्यांकडे विशेष लक्ष पुरवले. पेशवे व त्यांचे सरदार परमुलखात संचार करीत असताना ते तिकडील निवडक जिन्नस महाराष्ट्रात आणत. सन १९४७ला पुण्याच्या आसपास पेशवे व त्यांचे सरदार ह्यांच्या ३१ बागा होत्या. पुढे सन १७९१ मध्ये पुण्याच्या आसपास पेशव्यांच्या पुढील बागा प्रसिद्ध होत्या– हिराबाग, सारसबाग, वसंत बाग, मोती बाग, पर्वती बाग, बंगला बाग, वानवडी बाग, हिंगणे बाग, रमण बाग, वडागांव बाग, माणीक बाग, पाषाण बाग, कात्रज बाग. दुसऱ्या बाजीरावाने १८१३ साली त्याच्या बंगला बागेसाठी पुढील झाडे विकत घेतल्याची नोंद आहे. ४५७ संत्री, ५०५ द्राक्ष, १०० अंजीर, १४२ डाळिंब, २५७ पेरू, ८२१ मोतिया, २०० गुलाब, २५७ बेलिया, १७०० जाई, २०० पपई, १५०० हदगा, ३५८ मदनबाण, २५ सोनचाफा, १८ रामफळ, २५ बटमोगरा, १ दवणा.

**पेशवेकालीन व्यापार व उद्योगधंदे :** फार पूर्वीपासून महाराष्ट्राचा व्यापार युरोपशी विशेषतः पोर्तुगालशी होता. पश्चिमेकडील बंदरांचा ते विशेषकरून वापर करीत. घोडे, साटीण, चिनी रेशीम, पोवळी इत्यादी वस्तू ते विकत व तलम कापड खरेदी करत. डच, फ्रेंच व इंग्रज हेही ह्या व्यापारात होते. सुरत, दाभोळ, राजापूर, चौल ही प्रमुख बंदरे होती. तेथे त्यांच्या वखारी होत्या. ते नीळ, माणिक, छीट, डिंक व कापड खरेदी करत. इंग्रज हे लोखंड, जस्त, शोभेचे ग्रंथ, थैल्या, सुरे, तलवारी इत्यादी वस्तू विकत. विशेष चैनीच्या, कल्पकतेच्या व शोधकपणाच्या वस्तू ही युरोपमधून आयात होत. पेशव्याचे प्रतिनिधी मुंबईत असत व ते पेशव्यांना पाहिजे त्या वस्तू मिळवून पुण्याला पाठवत. दुर्बिणी, घड्याळे चष्मे, चांगल्या प्रतीचा कागद व काच, फोटोग्राफी इत्यादी युरोपने नव्यानेच शोधलेल्या वस्तूंना महाराष्ट्रात मागणी होती. बंदरांतील मालाची वाहतूक लमाण लोक करत. ते वाहतुकीसाठी बैलांचा वापर करत. दहा–दहा हजार लोक व बैल लमाणांच्या तांड्यात असत. मराठे लोकही वाहतुकीचे काम करत. गोसावी लोक घोडे व उंट परप्रांतांतून आणत. कान्होजी आंग्रे हा मराठी आरमाराचा प्रमुख. त्यामार्फत मराठे परदेशी माल आणत.

कोकणपट्टीच्या किनाऱ्याने होणारी वाहतूक ही मराठ्यांच्या हाती होती. त्यांच्या बोटी सुरत ते कोचीन ह्या पट्ट्यातील समुद्रकिनाऱ्यावर होत्या. जे लोक जहाजे बांधत वा गलबताने वाहतूक करीत, त्यांना पेशव्यांकडून उत्तेजन मिळत असे. जकात माफी, खोती, लोखंड, राहण्यास व वखारीसाठी जागा, घरे दिली जात.

शहरात येणाऱ्या मालावर नियंत्रण ठेवणारा अधिकारी म्हणजे चौधरी. तो वस्तूंच्या किमतीवर नियंत्रण ठेवत असे. काही ठिकाणी सरकारने आपली दुकाने उघडली होती. सावकार हे पैशाचा पुरवठा करत. शंभर रुपयांवर दरमहा एक रुपया व्याजदर असे. पेशवे हे नेहमीच पैशाच्या अडचणीत असत. ते सावकारांकडून कर्ज घेत. ग्रामीण भागात पैशाची अडचण भासे. तेथे वस्तुविनिमयाद्वारे खरेदी–विक्री होई. लोकांचे पगारही वस्तुरूपाने दिले जात.

त्या काळी पश्चिम भाग मागासलेला होता. तुलनेने खानदेश, वऱ्हाड हे प्रांत अधिक सधन होते. खानदेशातील कापड व त्यापासून तयार केलेल्या पासोड्या हे प्रसिद्ध होते. अकोट, बाळापूर येथे सतरंज्या, पागोटी व कापड तयार होत असे. देऊळगाव–राजा येथे लुगडी व खण, खोलपूर व अंजनगाव येथे रेशमी कापड, मुकटे व कद होत. करजगाव येथे धातू गाळून घंटा व इतर सामान होई. कारंजा व देऊळगाव–राजा येथे कुंकू व वणी येथे लाकडी व दगडी काम होत असे. बाळापूर येथे दौलताबादी कागदाच्या तोडीचा कागद बनवला जाई. वऱ्हाड प्रांतात बांधकामातील कारागिरीही अत्यंत प्रगत होती.

महाराष्ट्राबाहेरही पेशव्यांचे उद्योग होते. मौजे डाकोरे येथील व बुंदेल खंडातील हिऱ्यांच्या खाणी पेशव्यांच्या मालकीच्या होत्या. पुणे–सातारा प्रांत मागासलेला होता, कलाकुसरीच्या फारशा वस्तू येथे निर्माण होत नव्हत्या. पेशव्यांनी परप्रांतांतले कारागीर आणून त्यांना येथे स्थायिक करण्याचा प्रयत्न केला. परंतु त्या प्रांतातील राजे कारागिरास सोडत नसत. दिल्लीतील बादशाही बुडाल्यामुळे दिल्ली, आग्रा येथील कारागीर गाव सोडून गेले होते. त्यामुळे तेथूनही

कारागीर मिळत नव्हते. पेशव्यांच्या उत्तेजनाने विणकामकलेचा प्रसार चांगला झाला. त्याचबरोबर वस्तूंची प्रत चांगली राहावी ह्यासाठी पेशवे काळजी घेत. तरीपण परदेशी वस्तूंचा व्यापारही मोठा होता. पेशव्यांनी इंग्रजांकडून काचेच्या आरगिनी, स्टँड, हंड्या, झुंबरे, मोठाले आरसे, हिरेजडित घड्याळे, दुर्बिणी ह्या वस्तू घेतल्याच्या नोंदी आहेत. आपल्या वस्तूंचा व्यापार वाढावा म्हणून इंग्रज पेशव्यांना नजराणे देत. त्या वस्तू दुरुस्त करण्याचे कौशल्य स्थानिक लोकांनीही मिळवले होते व त्यांच्या दुरुस्तीची उपकरणेही संग्रही ठेवली जात. होकायंत्र, लोहचुंबक ह्या वस्तूही इंग्रजांकडून घेतल्या जात. अनेक वस्तू महाराष्ट्रातही होत असत. इंग्लिश मालाची प्रत चांगली असे. त्यामुळे देशी मालापेक्षा इंग्लिश माल खरेदी केला जाई. उदाहरणार्थ मेणबत्ती, काच, कागद, घोड्याच्या गाड्या देशीही होत्या पण त्यांची प्रत व सुबकपणा हे इंग्लिश मालासारखे नव्हते.

पेशव्यांना अनेक परदेशी वस्तूंची माहिती होती. परंतु त्यांनी त्या वस्तू इथे तयार करण्याचा प्रयत्न केल्याचे आढळत नाही. त्याचे एक कारण म्हणजे येथील मागणी मोठ्या प्रमाणावर नव्हती. तेव्हा आवश्यक असणाऱ्या दोन-चार गोष्टी इंग्रजांकडून खरेदी करणेच सोयीचे होते. दुसरे असे की, इंग्रजांचे शास्त्रीय तंत्र व उपकरणे एकोणिसाव्या शतकात उपलब्ध झाली. अव्वल पेशवाईच्या काळात युरोपिअन देशांची फारशी प्रगती झालेली नव्हती. तेथील शिक्षणव्यवस्थाही सामान्य होती. त्यामुळे पेशवेकाळात इंग्रजांकडून घेण्यासारखे फारच थोडे होते. यामुळे युरोपशी असलेल्या संपर्काचा देशी उद्योगधंद्याच्या वृद्धीसाठी फारसा उपयोग झाला नाही. इंग्लंडमधील तंत्रज्ञान व आर्थिक प्रगती मुख्यत्वेकरून पेशवाई बुडाल्यावर झालेली आहे.

पेशवेकालात महाराष्ट्रात मोठ्या प्रमाणावर कापूस पिकवला जाई. त्यामुळे कापूस पिंजणे, सूत काढणे व कापड विणणे हे उद्योग प्रगत होते. कापडापासून अनेक प्रकारची वस्त्रे तयार केली जात. पांघरण्यासाठी तीन प्रकारची वस्त्रे प्रचलित होती. निजताना पांघरण्याचे, उबेकरता पांघरण्याचे व दरबारात परिधान करण्याची घोंगडी व पासोडी सामान्य लोकांची वस्त्रे. ही वस्त्रे पांघरण्यासाठी व अंथरण्यासाठी वापरली जात. पासोडी दुसऱ्यास भेट म्हणून दिली जाई. धाबळी व रजईही वापरात होती. रजई, दुलई, शालजोडी ही पांघरुणे श्रीमंत लोक वापरत. शालजोड्यांचा पुरवठा दिल्लीहून होई. चादर, शेले व दुपट्टे उच्च स्तरांतील प्रतिष्ठित लोक वापरत.

पेशवाईत डोक्याला पागोटे, तिवट, पटका, मंदिल, फेटा, बत्ती ही शिरोभूषणे वापरली जात. सर्व सभ्य व प्रतिष्ठित लोक पागोटी घालीत. पटका व फेटा छिचोर अल्लड पोशाखात वापरत. लहान मुलांच्या डोक्याला बंदाच्या टोप्या असत. काही टोप्या मखमलीच्या असत. त्या श्रीमंत लोक वापरत. सामान्य शेतकरी बुरणुसाच्या टोप्या पांघरीत.

झगा, अंगरखा, डगला, कुडते, अंगडे हे अंगात घालायचे कपडे होत. झगा दरबारप्रसंगी घालत. ते चुणावयास नोकर असत. झगा घोट्याइतका लांब असे, अंगरखा गुडघ्याइतका लांब असे, अंगडे मांड्याइतके लांब व कुडते कंबरेइतके लांब असे. अहेरासाठीही कपडे दिले जात. सामान्यांना साडेतीन वस्त्रे देत, त्यावरच्या नोकरांना चार तर पंतप्रधान, सेनापती ह्यांना पाच वस्त्रांचा अहेर केला जाई. स्त्रियांच्या पोशाखात शिवलेले कपडे थोडे असत. परकर, वोढण्या, लहंगा, काचोळी यांचा वापर होत असे. लुगडी, साड्या, चिरड्या, पातळे, शालू, पैठण्या ही वस्त्रे नेसली जात. अंगावर शेले घेत. पुरुष धोतर नेसत. माहेश्वर, नागपूर, पैठण, अष्टी, चांदवड, सोलापूर ह्या पेठांची धोतरासाठी प्रसिद्धी होती, अंगात आतून कुडते, वरून अंगरखा, डोक्याला पागोटे, खाली पायजमा अगर धोतर अंगावर शेला, पायांत जोडे हा मराठी पुरुषाचा पोशाख होता. अशा पोशाखांची किंमत रु. १०० ते रु. १००० होती. ते सामान्यांना परवडत नसत. त्यामुळे ते लंगोटी, अंगावर घोंगडी, डोक्याला चिंधी घालत. त्यांना शिवलेले वस्त्र क्वचितच मिळे. कारण ते महाग होते. पण ते लष्करात असतील; तर त्यांना चोळणा, अंगरखा व पागोटे मिळे. लढाईत चिलखतेही घातली जात.

कपड्यासाठी विविध प्रकारचे कापड वापरले जाई. त्यांची नावे अशी: छीट, चादर, सुशी, औरंगजेबी, महसुदी, जाफरखानी, गजनी, बादली, तापता, किनखाप, मलमल, चिरा, सकलाद, मश्रू, मलमल, पसमी, इलाचा.

छीट, महसुदी, मलमल ही सुती कापडे होती. गजनी, तापता, मखमल, इलाचा ही रेशमी वस्त्रे होती. किनखाप, बादली, चिरा ही जरीची वस्त्रे होती. हिंदुस्थानात सर्व प्रकारचे कापड तयार होत असे. त्यामुळे लोक पोशाखाचा षोक करत. वस्त्रांच्या महत्त्वाच्या बाजारपेठा अंशा: पैठण, महेश्वर, नागपूर, सोलापूर, बऱ्हाणपूर, खंबायत, जालना, धनवड, अण्टी, चांदवड, चंदेरी, शहागड, सुलतान, सिरोज, डाक्का. सर्व प्रकारचे कापड इथे होत असल्याने कारागिरांना मोठ्या प्रमाणावर रोजगार मिळत असे. प्रत्येक गाव विशिष्ट कापडासाठी प्रसिद्ध होते. पैठण व चंदेरी येथे बत्त्या, पागोटी, धोतर-जोड्या, पैठण्या व पीतांबर; नागपूर, सोलापूर, चांदवड येथे धोतरजोड्या; महेश्वर खंबायत, धनवड येथे लुगडी; काशी व बंगाल येथे ताम्रा व अन्य रेशमी वस्त्रे; मुलतानात छीट; काश्मीर व लाहोर येथे गालिचा व पशमी. बहुतेक सर्व रंग कापडांतून आढळत. ह्या सर्व कापडांची युरोप येथे निर्यात होत असे. त्यांची वाहतूक इंग्रज, फ्रेंच, पोर्तुगीज करत असत. काही बंदरांत कारागिरांचीही वस्ती असे. चौल, राजापूर येथे कोष्ट्यांची वस्ती होती. वखारवाले इंग्रज, पोर्तुगीज, फ्रेंच हे कारागिरांना वखारीच्या ठिकाणी वस्ती करण्यास प्रोत्साहन देत. इंग्रजांच्या ताब्यात मुंबई आल्यावर त्यांनी चौल येथील कारागीर मुंबईस आणले. अठराव्या शतकाच्या अखेरीपर्यंत कापड हिंदुस्थानातून युरोपला जात असे, पण एकोणिसाव्या शतकात मात्र वाफेवरच्या इंजिनाचा शोध लागला आणि इंग्लंडमधील स्वस्त कापड हिंदुस्थानात आयात होऊ लागले व येथील कापडउद्योग बुडला.

**नगरे :** देश सुधारण्याचे प्रमुख काम म्हणजे नवीन शहरे वसवणे. पेशव्यांपूर्वीचे मराठी राजे किल्ल्यावर राहत. शाहू माहाराज हे पहिलेच राजे की ज्यांनी आपली राजधानी साताऱ्यासारख्या सपाटीवरच्या गावात वसवली. सातारा जरी किल्ल्यावर नसले, तरी ते डोंगरांनी वेढलेले आहे. त्यामुळे त्याच्या विकासास मर्यादाच होत्या. पेशवे सुरुवातीला सासवडला राहत, पण पुढे त्यांनी पुणे येथे आपले वास्तव्य हालवले. पुणे मैदानी प्रदेशात असल्यामुळे त्याच्या विस्तारास जास्त वाव होता. मुळाच्या पुणे, कुमारी व कासारी ह्या तीन खेड्यांच्या पुणे गावात पेशव्यांनी आसपासची अनेक खेडी विलीन केली व नवीन पेठा बसवल्या. आदितवार (१७४०), बुधवार (१७४०), शुक्रवार (१७४८), गुरुवार (१७५०), व नाना पेठ (१७८९), नारायण पेठ अशा नव्या पेठा पेशव्यांनी वसवल्या व त्याचे व्यवस्थापन शेटे लोकांकडे मक्तेदारीने दिले.

पुण्यात जरतार व कलाबतू कामे करण्यासाठी परगावाहून कारागीर आणून वसवले. गुसलीवाले, पावटेकरी, किनारी गोट करणारे, किनखाप व मसरू विणणारे इत्यादी दहा ताफे आणून वसवले व त्यांना करमाफी दिली, राहण्यास जागा दिली, सावकारांकडून कर्जे मिळवून दिली.

त्या काळी शहरांतून असलेली सधनता शत्रूच्या नजरेत येई व ते शहरांवर हल्ले करून लुटालूट करीत. १७६२ मध्ये निजामाने पुणे शहर लुटले. त्यात पुणे शहर जळले. त्यामुळे बाहेरून धान्य वा इतर वस्तू पुण्यात आणणाऱ्यास जकात माफी दिली. घरे बांधण्यासाठी आर्थिक साहाय्य दिले व पेशव्यांपैकी कोणीतरी पुण्यात राहील ह्याची व्यवस्था करण्यात आली. त्यामुळे व्यापारी गावात वस्ती करू लागले. नाशिक व धारवाड ह्या गावांच्या विकासासाठी अनेक सवलती दिल्या. त्यामुळे धारवाडला टाकसाळ सुरू करता आली. औरंगाबाद शहर पेशव्यांच्या ताब्यात आल्यावर आमदानगर व देवगिरी ह्या नव्या पेठा बसवल्या. नाशिकशेजारी चावडस (आनंदवल्ली) गाव होते, ते वाढवत नाशिकपर्यंत नेले. पेशव्याप्रमाणे त्यांचे सरदारही आपापल्या जहागिऱ्यांतून शहरे, गावे व क्षेत्रे वसवण्याचे कार्य करत. वाई हे गाव रास्त्यांनी वसवले.

**इमले व देवालये :** पेशव्यांनी पुण्यामध्ये सुंदर व भव्य इमारती बांधल्या आणि शहराच्या सौंदर्यात व भव्यतेत भर घातली. त्यांनी सन १७२९ मध्ये सुमुहूर्तावर शनिवार वाड्याचे बांधकाम सुरू केले. त्यासाठी स्वतंत्र अधिकारी नेमला. बाजीराव स्वतः कलाप्रिय होता. त्यामुळे त्याने वाड्यात आस्तरगिरी, कारंजी, बेलपत्ती अशा ऐश्वर्य दाखवणाऱ्या गोष्टी उभारल्या. जयपूरहून कारागीर आणून त्याने आपला दिवाणखाना सजवून घेतला. त्यात चार चौक व सहा मजले होते. कारंजी, हौद व तळी उभारण्याचे काम पेशव्यांनी केले. पर्वती, पर्वतीजवळचे तळे, अंबील

ओढ्यावरील तळे, व त्याभोवतालच्या आमराया व बागबगीचे यांमुळे पुण्याच्या सौंदर्यात भरच पडली. त्यासाठी हजारो माणसे खपत होती. कर्नाटकातून त्याने बांधकामासाठी वडार व इतर कारागीर आणले. शनिवार वाडा दोनशे यार्ड लांब व दोनशे यार्ड रुंद होता. त्याला ९ बुरूज व पाच दरवाजे होते, दहा चौक होते. अनेक कारंजी होती. दिवाणखाने कलमदानी होते. इंग्रज रेसिडेन्ट मॅलेट, कॉटन मूर इत्यादी अनेक परदेशी लोकांनी ह्या वाड्याचे यथार्थ वर्णन केलेले आहे. प्रत्येक पेशव्याने आपापल्या परीने शनिवारवाडा अधिक भव्य व सुशोभित करण्याचा प्रयत्न केला.

दुसऱ्या बाजीरावाने अनेक नव्या इमारती बांधल्या कोथरूडच्या बागेतील आरसे महाल व जलमंदिर बांधले. शुक्रवार वाडा, विश्रामबाग वाडा, बुधवार वाडा इत्यादी अनेक नव्या इमारती बांधल्या व जुन्यांची दुरुस्ती केली. पेशव्यांच्या सरदारांनीही पुण्यात आपापल्या हवेल्या बांधल्या. शाहू महाराजांच्या हयातीत साताऱ्यात अनेक इमारती बांधून झाल्या. त्यांनी अनेक बागाही वाढवल्या.

पेशवे नेहमी क्षेत्राच्या ठिकाणी जात. त्यामुळे तेथे राहण्यासाठी त्यांनी वाडे बांधले. त्यांचे वाडे झाल्यामुळे त्याच्या आसपास व्यापारी, सावकार अशा प्रतिष्ठित व्यक्तीही वाडे बांधत, त्यामुळे तेथे बाजारपेठाही स्थापन झाल्या. एखादे छानदार देवालय, त्यांच्या शेजारी पुष्करिणी, पुष्पवाटिका यांची मांडणी करून रमणीय स्थळे निर्माण केली. काशीपासून ते रामेश्वरपर्यंत पेशव्यांनी अनेक मठ, वाडे, घाट बांधले. पुरंदर किल्ला; सासवड, बनेश्वर पर्वतीवरील देवदेवेश्वराचे मंदिर, कृष्णेच्या पात्रात वडूथ येथील शकुन्तेश्वराचे देवालय; नाशिक व त्र्यंबकेश्वर येथे सुंदर देवालये उभारली. देवालये ही माणसाची आध्यात्मिक गरज भागवतात व लोकांना सत्संग करण्याची संधी देतात. नाना फडणिसानेही अनेक वाडे व देवालये बांधली. त्यांनी मेणवलीला वाडा व घाट बांधला व त्यासाठी अनेक ब्रिटिश इंजिनिअर लोकांची मदत घेतली. पेशव्यांचे सरदार रास्ते ह्यांनी वाई हे गाव सुशोभित केले व अनेक पेठा वसवल्या. पेशवाईत शेकडो सरदार निर्माण झाले. त्यांना वेगळा मुलूख तोडून देण्यात आला. तेथे त्यांनी साजेशी राजधानी वसवणे, वाडे व किल्ले बांधणे ही कामे उत्साहाने केली.

मुलूखगिरी करून मराठे पैसा मिळवू लागले व त्यांनी वाडे, मजबूत घरे, सुंदर देवालये, घाट व रस्ते इतक्या मोठ्या प्रमाणावर बांधले की त्यामुळे अखिल महाराष्ट्र नव्याने बांधून निघाला. हे विलक्षण चैतन्य व उत्साह सर्व समाजात पसरले.

शहरांची वाढ पाणीपुरवठ्याशिवाय होऊ शकत नाही. त्यांनी हौदाची युक्ती अमलात आणून पुण्यातील अनेक पेठांतील रहिवाशांना फुकट पाणी उपलब्ध करून दिले. पर्वतीजवळील तळ्याच्या बांधकामामुळे आसपासच्या विहिरींना पाणी येऊन वस्ती वाढली. पेशव्यांच्या इतर सरदारांनी ह्यापासून स्फूर्ती घेऊन आपापल्या गावी पाण्याची व्यवस्था केली. गावोगावी स्वयंप्रेरणेने गावातील लोक पाणीपुरवठ्याची योजना करत, त्यास जमीन व पैसा पेशवे उपलब्ध करून देत.

**मूर्तिकला व चित्रकला:** हिंदू लोक मूर्तिपूजक असल्यामुळे त्यांच्याकडून मूर्तिकलेस पुष्कळच उत्तेजन मिळाले. त्यांनी कोरलेली व बांधलेली हजारो देवळे सर्वत्र पसरली होती. देवळांतून उत्कृष्ट मूर्ती बसवल्या. त्यांचे पुतळेही अवाढव्य असत. रामेश्वर, कुंभकोणम, मदुरा येथील देवळांएवढी मोठी देवालये महाराष्ट्रात आढळत नाहीत.

**प्राणिसंग्रहालय:** शाहू महाराजांचा ऐन तारुण्यातील काळ मोगलांच्या अटकेत गेला. मोगलांचा ऐशआराम, विलास हे प्रख्यातच आहे. ह्या विलासी जीवनाची त्यांना चांगलीच ओळख होती. साताऱ्च्या गादीवर विराजमान झाल्यावर त्यांना आपले शौक संभाळता आले. त्यांतला एक महत्त्वाचा शौक म्हणजे प्राणिसंग्रहालय. महाराजांना प्राण्यांची आवड होती. कुत्रे व घोडे हे उपयुक्त प्राणी होते. धनगरांची मेंढरे, शेतकऱ्यांची शेते, सावकारांची घरे व सरदारांच्या शिकारी ह्या साऱ्यांसाठी कुत्र्यांची गरज असे. घोडा हे प्रवासाचे साधन होतेच, पण लष्करात त्याचा मोठ्या प्रमाणावर उपयोग होता. म्हणून जातिवंत कुत्रे व घोडे बाळगण्याचा व त्यांची पैदास करण्याचा शौक मराठ्यांना होता. शाहू महाराजांनी महाराष्ट्राचे दृष्टिक्षेत्र फार

व्यापक केले. विविध तऱ्हेचे जातिवंत पशुपक्षी मिळवण्याकरता ते काबूल, कंदहार, इराण, इराक, अरबस्तान व काश्मीर हे मुलूखही शोधू लागले. महाराज पशुपक्षांचे जाणकार होते व चिकित्सकही होते. त्यांना अधिकाऱ्यांनी आणलेले पशुपक्षी पसंत पडणे कठीणच असे. बदके, कबुतरे, मोर, वनगाई, कस्तुरीमृग, हुमे हे पक्षी, वाघ, बहिरी ससाणा, लावापक्षी, चित्ता, हत्ती हे पशुपक्षी शाहू महाराजांच्या संग्रहात होते. शाहू महाराजांच्या निधनानंतर गादीवर बसलेले रामराजे ह्यांना पशुपक्ष्यांची फारशी आवड नव्हती; परंतु पेशव्यांनी मोठ्या प्रमाणावर प्राणिसंग्रह केल्याचा इतिहास आहे.

बाजीरावांपाशी त्यांच्या दिवाणखान्यात पोपट, मैना, साळुंखी इत्यादी पक्ष्यांचे पिंजरे असत. नानासाहेबांनीही चितळ, भेकर, मोर, डुक्कर, गवे, कबुतरे असे नानाविध पशुपक्षी जमा केले होते. त्या शिकारखान्यांसाठी विशेष अधिकारी नेमले होते. थोरले माधवराव, नाना फडणीस, सवाई माधवराव, दुसरा बाजीराव ह्यांचे शिकारखाने होते. त्यांतील काही प्राण्यांचा उपयोग सर्कशीत करत. इंग्रजांचा पुण्यातील रेसिडेन्ट चार्ल्स मॅलट ह्यांनी अशा सर्कशीचे वर्णन केलेले आहे.

शिकारखान्यातील प्राण्यांशिवाय गायी, घोडे, उंट, हत्ती इत्यादी उपयुक्त प्राण्यांचा संग्रहही पेशव्यांजवळ होता. त्यांनी उत्तम जनावरांची अवलाद जवळ बाळगली होती व त्याचा प्रसार सामान्य जनतेत व शेतकऱ्यांत केला. त्यांनी शेकडो गाई जवळ बाळगल्या होत्या. काही प्रमाणात गाई फुकटही मिळत असत. विशेषतः लढाईत शत्रूच्या मुलखातील लुटीत गाईही मिळत.

पेशव्यांच्या घोड्याच्या पागाही मोठ्या होत्या. हुजूर पागेत दहा हजार घोडे होते. चांगल्या घोड्याची किंमत दोन हजार रुपये असे. त्यांचा संभाळ करण्यासाठी मोतद्दार नेमले होते. जातिवंत अवलाद निपजण्यासाठी वळूही पाळले जात. हत्तीकरता पीलखाना होता. त्यात शंभर हत्ती होते. त्यासाठी माहूत नेमले होते. हत्ती फारच मौल्यवान असे. त्यांच्या आजारांसाठी औषधालयही होते. त्यांच्या चाऱ्यासाठी खास ऊस लावला जाई. पेशव्यांनी उंटही बाळगले होते. त्यांच्या उष्टरखान्यात एक हजार उंट होते.

**गायन–वादन–नर्तन :** पेशवे काळातील राजदरबारी कलावंत माणसे होती. शाहू महाराजांना संगीताची आवड होती व दूरदूरच्या ठिकाणांहून गवई, नट, भाट, नायकिणी इत्यादींचा संच जमवला जाई. प्रांताप्रांतांतून नायकिणी आणणे खर्चाचे होते म्हणून त्यांनी महाराष्ट्रातच मुली मिळवून त्यांना नृत्यकलेत तरबेज करण्याची योजना आखली. शाहूच्या मरणानंतर हे कार्य पेशव्यांनी चालवले. त्यांच्यापाशी पगारदार गवई, नायकिणी, नटवे, संगीतराव होते. त्यांचे कार्यक्रम गणेशोत्सवात होत. रघुनाथ पेशव्यास ललित कलेचा विशेष नाद होता. नटवे बहुरूप्याप्रमाणे वेगवेगळी सोंगे आणत. सणावारी व विशेष प्रसंगी राजदरबारात गायन व नृत्य होई. नाना फडणीसही परप्रांतांतील कलावंतांवर लक्ष ठेवून असे. त्याने निजामाच्या दरबारातून चंद्री कलावंतिणीस आणले. नायकिणीस दर महा हजार रुपये व गवयास तीनशे रुपये देऊन त्यांना संभाळले जाई. शिमग्याच्या सणात नायकिणी, नटवे यांचे खेळ होत असत. भवाई गुजराती गवई व व्यंकट नरसी गायिका ही नावे गाजली होती. तसेच दशावतारी व कर्नाटकी खेळ पेशवाईत होत. दुसरा बाजीराव ललित कलेच्या शौकाखातर प्रसिद्ध होता. त्याने त्यावर पुष्कळ पैसा खर्च केला. त्याने नवे–नवे उत्सव सुरू केले व गुणिजनांना उत्तेजन दिले.

**संदर्भ :**


१. डॉ. मोरवंचीकर रा. श्री., सातवाहनकालीन महाराष्ट्र.
२. भावे वा. कृ., पेशवेकालीन महाराष्ट्र.
३. पानसे मु. ग. यादवकालीन महाराष्ट्र.
४. Mujumdar R. C. (Editor), Advance History of India.
५. डॉ. चिटणीस कृ. ना., मध्ययुगीन भारतीय संकल्पना व संस्था, भाग १/२.


* * *





# पारंपरिक कृषिपद्धती

■ डॉ. दि. मा. मोरे, वि. म. रानडे

**वैदिक काळापासून म्हणजेच रामायण-महाभारत कालावधीच्या पूर्वीपासून भारतात माणूस आणि पाळीव प्राणी यांच्यासाठी अन्नधान्य व चारा ह्यांचे उत्पादन करणे आणि त्यांचा साठा करून वर्षभर पुरवणे ह्या हेतूने कृषितंत्रात सतत विकास करणे, हा विचार रुजलेला होता. प्राचीन काळापासून कृषी ही एक बहुआयामी, व्यापक प्रक्रिया राहिलेली आहे. त्यामध्ये अन्नधान्य, डाळी, तेलबिया यांचे उत्पादन; फलोत्पादन, औषधी वनस्पतींचे संवर्धन आणि पशु-संगोपन इत्यादी बाबींचा अंतर्भाव होता.**

सुरुवातीला माणूस रानटी अवस्थेत जगत होता, त्या वेळी माणूस आणि वन्यप्राणी यांच्या जीवनपद्धतींत फारसा फरक नव्हता, कारण दोघेही कंदमुळे फळे खाऊन किंवा तृणभक्षी प्राण्यांची शिकार करून जीवन व्यतीत करीत होते. विकसित होणाऱ्या मेंदूचे वरदान लाभलेल्या माणसाने सुमारे ११-१२ हजार वर्षांपूर्वी जेव्हा पशुपालनास सुरुवात केली (दूध आणि मांस यांसाठी), तेव्हा मात्र दोघांमधला महत्त्वाचा फरक दिसू लागला. तरीही जनावरांना वर्षभर पुरेसा चारा मिळावा, यासाठी त्यांना सतत भटकंती करावी लागत होती. त्याच्या पुढचा प्रगतीचा टप्पा म्हणजे त्याने शेती करण्यास सुरुवात केली तो.

शेतीचा विकास त्या काळात फार मंद गतीने झाला असावा. रानावनात निसर्गतः वाढणाऱ्या ज्वारी, बाजरी, तांदूळ, जव या पिकांच्या बिया जंगलतोड करून साफ केलेल्या जमिनीवर टाकल्यानंतर पावसाच्या पाण्यावर वाढतात आणि पिकाची पूर्ण वाढ झाल्यानंतर एका बीपासून कित्येक पटींत बीजनिर्मिती होते, असा अनुभव त्याला आला. भुसभुशीत व सपाट जमिनीवर उगवलेले पीक आणि टणक जमिनीवर उगवलेले पीक यांमधील फरक लक्षात आल्यानंतर चांगल्या उत्पादनासाठी जमीन भुसभुशीत असावी लागते, असे लक्षात आले व

त्यातूनच लाकडी अवजारांद्वारे जमिनीच्या मशागतीला सुरुवात झाली असावी.

शेतात पिकवलेले धान्य बराच काळ साठवता येत असल्यामुळे माणसाची भटकंती थांबून तो स्थिरावू लागला. शेती व पशुपालन यांसाठी काही कुटुंबांना एकाच ठिकाणी वस्ती करणे सोईचे होत होते. सुपीक जमिनीवरील जंगल तोडून वा जाळून तेथे जरी शेती केली जात असली, तरी जमिनीची उत्पादकता दरवर्षी कमी-कमी होत होती; हे जेव्हा अनुभवातून त्याला समजले, तेव्हा ती जमीन तशीच सोडून दुसऱ्या ठिकाणचे जंगल तोडून/जाळून (स्लॅश ॲन्ड बर्न) शेती केली जाऊ लागली. ज्या मोठ्या नद्यांच्या पुरांबरोबर येणाऱ्या गाळामुळे जमिनीची सुपीकता कायम राहत होती, त्या नद्यांच्या खोऱ्यांत वस्ती वाढत जाऊन मानवी समूहाची समाज या संकल्पनेकडे प्रगती झाली. सुरक्षिततेसाठी मोठे कळप करून राहणाऱ्या तृणभक्षी प्राण्यांपेक्षा, किंवा शिकार करण्याच्या सोईसाठी लहान समूहात एकत्र राहणाऱ्या काही मांसभक्षी प्राण्यांपेक्षा माणसाची ही वाटचाल त्याचे वेगळेपण दर्शविणारी होती. त्यातूनच धर्म, सामाजिक नियम, कला यांचा विकास होऊन संस्कृती विकसित होत गेल्या. तैग्रीस-युफ्राटिस, नाईल, सिंधू, हो हँगहो यांसारख्या मोठ्या नद्यांच्या काठांवर गेल्या ५-६ सहस्रकांत वेगवेगळ्या प्रगत संस्कृती निर्माण झाल्या.

या संस्कृतींचे स्थैर्य, सातत्य व विकास हे सारे शेतीच्या उत्पादनातील सातत्य व त्यांमुळे निर्माण झालेली सुबत्ता यांवर अवलंबून होते. कालांतराने, सामुदायिक प्रयत्नांतून नद्यांचे पाणी शेतीसाठी कालव्यांद्वारे वळवून उत्पादनवाढीचे तंत्रही माणसाने आत्मसात केले. नद्यांच्या पुराबरोबरच येणाऱ्या गाळामुळे सुपीकता वाढत असली, तरी एखाद्या वर्षी येणाऱ्या मोठ्या पुराबरोबर काठावरील मानवी वस्ती वाहून जाण्याचीही बरीच उदाहरणे आहेत. दुष्काळामुळे नद्यांना पूर आले नाहीत व शेती-उत्पादनात घट झाली तर जीवितहानीही मोठ्या प्रमाणावर होत होती. हे सर्व आघात सोसत संस्कृतींचा विकास होत होता आणि त्याचबरोबर काही संस्कृती कालौघात नष्टही झाल्या होत्या.

मोठ्या नद्यांच्या खोऱ्यांतील काठांवरची सुपीक जमीन सोडल्यास इतर बहुतेक सर्व ठिकाणची शेती ही ठरावीक वर्षानंतर स्थळपालट अशा स्वरूपाची (शिफ्टिंग कल्टिव्हेशन) होती. कारण वनजमीन शेतीखाली आणल्यानंतर त्यातील सेंद्रीय पदार्थांचा (ह्यूमस) व पोषण द्रव्यांचा (न्युट्रिअंट/मिनरल्स) वापर धान्यपिकाकडून जसजसा होईल, तसतशी ती निकृष्ट होत असल्याने, ती जमीन तशीच सोडून दुसऱ्या ठिकाणी शेती करणे भाग पडत असे. मोकळ्या सोडलेल्या जमिनीवर २५-३० वर्षांत जंगल पुन्हा आपोआप वाढेल तशी तिची सुपीकता पुन्हा वाढत होती. परंतु बऱ्याच ठिकाणी अशा जमिनींवरील उघडी पडलेली माती पावसाबरोबर धुपून जाऊन ती जमीन कायमची उजाड होण्याचा धोकाही निर्माण होत होता.

## प्राचीन ग्रंथांतील कृषिविषयक महत्त्वाच्या नोंदी

वैदिक काळापासून म्हणजेच रामायण-महाभारत कालावधीच्या पूर्वीपासून भारतात माणूस आणि पाळीव प्राणी यांच्यासाठी अन्नधान्य व चारा ह्यांचे उत्पादन करणे आणि त्यांचा साठा करून वर्षभर पुरवणे ह्या हेतूने कृषितंत्रात सतत विकास करणे, हा विचार रुजलेला होता. प्राचीन काळापासून कृषी ही एक बहुआयामी, व्यापक प्रक्रिया राहिलेली आहे. त्यामध्ये अन्नधान्य, डाळी, तेलबिया यांचे उत्पादन; फलोत्पादन, औषधी वनस्पतींचे संवर्धन आणि पशु-संगोपन इत्यादी बाबींचा अंतर्भाव होता. या बाबींवर प्रकाश टाकणाऱ्या अनेक पुरातात्त्विक संशोधनांचा आणि पराशर, सुरपाल अशा महान वैज्ञानिकांनी कृषिविषयावर लिहिलेल्या ग्रंथांचा संदर्भ मिळू शकतो. मौर्य, सातवाहन, वाकाटक, चालुक्य, राष्ट्रकूट, यादव, विजयनगर इत्यादी राजवटींमध्ये अन्नधान्याची उत्पादकता वाढविण्यासाठी आणि जनावरांची उत्कृष्ट पैदास करण्यासाठी स्थानिक पातळीवर अनेक योजना कार्यान्वित केलेल्या दिसून येतात. या संदर्भग्रंथांमध्ये शेतकऱ्यांनी अवलंब केलेल्या सुलभ अशा कृषि-पद्धतींचे विश्लेषण आधुनिक, वैज्ञानिक जाणिवांच्या आधारावर केलेले आढळते. पर्जन्य-मोजणी, पर्जन्याचे अनुमान, कृषि-पंचांग, बीज गुणवत्ता व व्यवस्थापन, पिकांवर होणारे रोग, पीक घेण्यासाठीचा कालावधी, पीक आणि पशू यांना पाणीपुरवठ्यासाठी विहिरी खोदणे, भूजलाचे अनुमान बांधणे, रोपवाटिका

निर्माण करणे, सिंचनाच्या सुविधा निर्माण करणे, इत्यादी बाबींवर विशेष लक्ष दिले गेले होते, असे दिसून येते.

प्राचीन भारतीय कृषि-साहित्याच्या ग्रंथांत म्हणजेच 'वराहमिहीर - बृहत्संहिता' (इ.स.पूर्व ५००), 'कृषि-पराशर' (इ.स.पूर्व ४००), 'कौटिल्याचे अर्थशास्त्र' (इ.स.पूर्व ३००), कश्यपाचे कृषिसूक्त (इ.स. ८००), वृक्षआयुर्वेद (इ.स. १०००) यांमध्ये भारतीय कृषि-साहित्याची माहिती येते.

प्राचीन भारतीय कृषि-विधीच्या काही विशेष बाबी पुढे दिल्या आहेत - मातीचे वर्गीकरण पर्यावरण-आधारित सिंचनप्रणालींचा विकास; जमिनीची, बियाण्यांची व पिकांची गुणवत्ता सुधारण्याच्या हेतूने पीकरचनेत व क्रमवारीमध्ये बदल, कीटकनाशकांचे तंत्र, औषधी आणि वनस्पतींच्या रोपवाटिकेचा विकास; तांबे, लोखंड, कातडी आणि लाकूड यांचा कृषि-उपकरणांसाठी उपयोग, सिंचनासाठी रहाट आणि मोट ह्यांचा वापर, अधिक गुणवत्ताधारक (६० दिवसांत येणारा भात) बियाण्यांचा वापर; आले, वेलची, दालचिनी, लवंग, कस्तुरी, जायफळ, कापूर इत्यादी मसाले व सुगंधित खाद्यसामग्रीच्या शेतीचा विकास; गाय, बैल, घोडे, हत्ती, कुत्रे, रेडे इत्यादी पशूंचे कृषीसाठी पालन-पोषण; आयुर्वेदीय उपचारांच्या संकल्पनेचा विकास; कालवे, बंधारे, तलाव ह्यांच्या निर्मितीमधून सिंचनप्रणालींचा विकास; इत्यादींचा उल्लेख करता येईल. याबरोबरच वर्षा-पूर्वानुमान, कृषिपंचांग, वर्षामापन, प्रदूषण आणि सामाजिक आरोग्य ह्यांबद्दल जागरूकता या बाबींचापण विकास झाल्याचे आढळून येते.

### प्राचीन कृषिपद्धती

शेतीवरच शेतीचे खाद्य-खत तयार करणे, ग्रीष्म कालात शेतीची मशागत करून कीटाणूंच्या सुप्त बीजाणूंचा सौर किरणांद्वारे प्रभाव कमी करणे, आलटून-पालटून पीक घेणे, भातासारखे पीक घेतल्यानंतर रोगकारक कीटाणूंचा नायनाट करण्यासाठी जमीन भाजून काढणे. पीक-पद्धतीचा वापर करणे, भाजीपाला आणि अन्न ह्यांची साठवण करणे (अस्तरसह पेवात धान्य साठविणे), अन्नधान्य साठविण्यासाठी कडुनिंबाच्या पाल्याचा वापर इत्यादी प्रक्रियांचा अवलंब केला होता असे दिसते. भूमिगत भांडारात ऑक्सिजन कमी असतो व कार्बन-डाय-ऑक्साइड अधिक असतो. यामुळे कीटाणूंची वाढ होत नाही. साठवण करण्याअगोदर बियाण्यांवर कोळशाच्या राखेचा उपचार केला जावा, त्यामुळे बियाण्यांचे किडीपासून संरक्षण होत असे. शेतामध्ये कडुनिंबाच्या पेंडीचा उपयोग केला जात होता आणि त्यामुळे कडुनिंबाच्या वृक्षांची वाढ मोठ्या प्रमाणात करण्याची परंपरा विकसित झालेली दिसून येते.

कृषिपंचांगाचा वापर मोठ्या प्रमाणात होऊन वर्षाअनुमान हे शास्त्र विकसित झालेले आढळून येते. बियाण्यांच्या शुद्धतेवर फारच बारीक लक्ष ठेवण्यात येत होते. बियाण्यांना उन्हामध्ये वाळविणे, त्यांची स्वच्छता राखणे, त्यांची योग्य प्रकारे साठवण करणे, यांची विशेष काळजी घेतली जात होती. एकाच आकाराच्या बियांपासून उत्पादन अधिक होते आणि त्यामुळे समरूप बियाण्यांचा वापर जास्त करण्याच्या विधीचा अवलंब होत होता. पिकांवरील रोगनिवारणात प्राणी आणि वनस्पतिजन्य जडी-बुटी ह्यांचा (जनावराचे शिंग, राख, दूध, मध, शेण, गोमूत्र) वापर केला जात असल्याचे दिसते. कोणत्या पिकाची कोणत्या कालावधीमध्ये पेरणी करावी, याचीही नीती ठरलेली होती. जमिनीवर उगवलेल्या वृक्षांनुसार ती जमीन कोणत्या पिकासाठी अनुकूल आहे, याचेही शास्त्र त्या काळात अवगत झालेले होते. जांभूळ वृक्षाच्या शेतीत हरभरा आणि तीळ ही पिके चांगल्या प्रकारे येतात, असे त्यांचे काही ठोकताळे बसविलेले होते. झाडांवर फळे व फुले सतत आणणे इत्यादींबाबतचे विज्ञान या कालावधीत विकसित झालेले होते, असे या कृषी ग्रंथसंपदेच्या माध्यमातून कळून येते.

### शेतीतंत्रातील सुधारणा

शेतीचे तंत्र, पेरणी, वखरणी, कोळपणी, काढणी व मळणी आणि त्यांसाठी लागणारी अवजारे, त्यांसाठी जनावरांच्या बळाचा वापर वगैरे टप्पे अनुभवातून तसेच इतरांच्या अनुकरणातून पार पडले असावेत. जोपर्यंत खुश्कीच्या मार्गाने किंवा समुद्रपर्यटन करून दुसऱ्या भागात,

देशात जाता येत नव्हते, तोपर्यंत प्रत्येक संस्कृतीमध्ये किंवा देशामध्ये तेथील शेतकऱ्यांच्या उपक्रमशीलतेनुसार विकासाचे टप्पे साध्य केले जात होते.

केवळ धान्यपिकांच्या माध्यमातून माणसाचे भरणपोषण होऊ शकत नव्हते. त्यासाठी गळिताची धान्ये; वस्त्रनिर्मितीसाठी कापसासारखे पीक; प्रथिनांच्या पुरवठ्यासाठी डाळी व द्विदल पिके; फळे, भाजीपाला यांची गरज भागविण्यासाठी रानावनांतून अशा वनस्पती निवडून, पारखून त्यांची लागवड करणे; हे टप्पेही वेगवेगळ्या ठिकाणी स्वतंत्रपणे गाठले गेले व विकसित झाले असले पाहिजेत व प्रत्येक पिकासाठी / वनस्पतीसाठी विवक्षित हवामान (तापमान), पर्जन्यमान व ठरावीक प्रकारची जमीन यांची आवश्यकता असते; त्यामुळे कोणत्या प्रदेशात कोणत्या प्रकारची पिके घेता येतील, यावर पर्जन्याधारित (कोरडवाहू) शेती-प्रकारांत मर्यादा पडत होत्या. सिंचनसुविधा निर्माण करून त्यावर अंशत: मात केली जात होती. आवश्यकतेनुसार दुग्धजन्य पदार्थ व पाळीव / वन्य तृणभक्षी प्राण्यांचे मांस यांचा अंतर्भाव आहारात केला जात होता.

नंतरच्या काळात जेव्हा वेगवेगळ्या मार्गांनी प्रवास करून देशातील इतर लोकांशी संपर्क होऊ लागला किंवा एका देशाकडून दुसऱ्या देशावर आक्रमण केल्यावर दोन्ही देशांतील शेतीतंत्र व पिकांचे प्रकार यांची माहिती एकमेकांत होत गेली, तेव्हा माहितीच्या आदानप्रदानामुळे शेती उत्पादनात वाढही होत गेली, आणि पिकांची विविधताही वाढू लागली. विवक्षित हवामानात व पर्जन्यमानात पिकाचा जो वाण तग धरू शकतो व उत्पादनही चांगले होते, त्याचा प्रसार होऊन इतर वाण मागे पडत गेले. ज्या शेतीतंत्रामुळे, पीकपद्धतीमुळे व पिकांचा फेरपालट केल्यामुळे जमिनीचा मगदूर चांगला राहून उत्पादन वाढते; त्या तंत्राचा वापर वाढत गेला. सेंद्रीय पदार्थ (जनावरांचे शेण, कुजलेला पालापाचोळा वगैरे) जमिनीला दिल्यास तिचा कस वाढतो व उत्पादन वाढते, हे ध्यानात आल्यावर त्याचा वापर वाढला. धान्य खाणाऱ्या पक्ष्यांपासून तसेच आसपासच्या जंगलातून होणाऱ्या तृणभक्षी प्राण्यांच्या आक्रमणापासून पिकाची राखण आणि पिकावर पडणाऱ्या किडीच्या नियंत्रणासाठी वापरण्यात येणाऱ्या अनुभवजन्य जैविक उपायांमुळे उत्पादनातील घट कमी होत होती. हवामान, पर्जन्यमान आणि जमिनीचे प्रकार यांच्या आधाराने भारताच्या वेगवेगळ्या भागांत शेतीतंत्राच्या पद्धती, पिके ह्यांचा विकास झालेला दिसून येतो.

**उपसंहार**

वरील विवेचनावरून असे दिसून येते की, भारतीय कृषीला हजारो वर्षांचा इतिहास आहे. वनात राहणारा, कंदमुळे-फळे खाणारा, शिकार करून अन्न मिळविणारा मानव हा फार जुन्या काळातला (किमान १०,००० वर्षांपूर्वीचा) होता. त्यानंतरच्या कालखंडात मानवाचा विकास झाला आणि त्याबरोबरच त्याने जगण्याचे, अर्थार्जनाचे आणि सहजीवनातून प्रगती करण्याचे एक साधन म्हणून कृषीचा आधार घेतलेला दिसतो. हजारो वर्षांपासूनची ही परंपरा आतापावेतो प्रगतीचे वेगवेगळे टप्पे ओलांडत अखंडपणे चालू आहे, असे म्हटले तर वावगे ठरू नये. प्रथम दगडाची / लाकडाची हत्यारे व अवजारे, त्यानंतर प्रगत अशी धातूची हत्यारे व अवजारे यांच्या साहाय्याने जमिनीची मशागत, मेहनत करून विविध प्रकारची अन्नसंपदा निर्माण करण्याचे कसब मानवाने स्वत:च्या शहाणपणातून वाढविलेले आहे. आजची शेतीची अवस्था ही प्रगत अवस्था आहे, असे म्हटले तर अतिशयोक्ती ठरू नये. त्या-त्या ठिकाणचे पर्जन्यमान आणि हवामान यांनुसार जास्त उत्पादन देईल अशा अन्न बियाण्याची निवड, जमिनीची मशागत, पावसाच्या पाण्याने जमीन धुपून न जाता जास्तीत जास्त ओलावा टिकून राहील, अशी शेत-बांधणी, जमिनीतून बाष्पीभवनाने होणारा नाश टाळण्याच्या पद्धती, किडीवरील नियंत्रण, पीक-संरक्षण, जमिनीचा पोत सुधारणाऱ्या सेंद्रीय खताला आवश्यक तेवढी रासायनिक खताची जोड यांद्वारे पर्जन्याधारित शेतीतूनही जास्तीत जास्त उत्पादन करण्याची किमया आज देशातील शेतकऱ्यांनी साधली आहे. कृषिविद्यापीठामध्ये होणाऱ्या संशोधनांचा, सुधारित कृषितंत्राचा प्रसार हळूहळू पण निश्चितपणे क्षेत्रीय स्तरावर होत आहे. तरीही पाणी या मूलभूत घटकाची उपलब्धता ही सर्वस्वी पर्जन्यावर आणि तो ओलावा या

स्वरूपात साठवून ठेवणाऱ्या जमिनीच्या क्षमतेवर अवलंबून असल्यामुळे उत्पादनवाढीसाठी इतर निविष्ठांचा पुरेपूर व अनुकूलतम वापर करण्यामध्ये बऱ्याच मर्यादा पर्जन्याधारित शेतीवर पडतात, हे विसरून चालणार नाही. दर पिढीमागे वाटणीमुळे कुटुंबाकडे असणाऱ्या क्षेत्राचे प्रमाण ५० वर्षांत बरेच कमी झाले आहे. त्यामुळे कमी झालेल्या क्षेत्रातून चरितार्थ चालविण्यासाठी वरील विविध तंत्रांचा वापर करून उत्पादन वाढविण्यास कोरडवाहू शेतकऱ्यांपुढे दुसरा पर्याय नाही. सिंचित शेतीच्या पर्यायाचा विचार दुसऱ्या प्रकरणात केला आहे. एखाद्या वनस्पतीपासून, पिकापासून जास्तीत जास्त उत्पादन घ्यायचे, हे निश्चित करून त्यानुसार मातीच्या माध्यमातून मुळांद्वारे आवश्यक ती मूलद्रव्ये व खते पाण्यामध्ये विद्राव्य करून जमिनीच्या खाली देण्याचे कौशल्य आज मानवाने आत्मसात केले. याचे सार्वत्रिकीकरण होण्याची गरज आहे. काळ जसजसा पुढे जाईल, तसतसा हा प्रगतीचा आलेखपण पुढे-पुढे सरकत राहील.

सिंधू संस्कृतीच्या ज्या खाणाखुणा उत्खननातून डोळ्यांपुढे आल्या, त्यांतून हे स्पष्ट दिसून येते की, त्या काळात मानव हा प्रगत होता. शेतीशास्त्र, पशुपालन, वनस्पतिशास्त्र, पाणी-व्यवस्थापन, बी-बियाण्यांची जपणूक, कीड-नाशकांचा वापर, सेंद्रीय खतांचा वापर, अन्न-धान्य साठवणुकीचे प्रकार इत्यादी बाबी त्याच्या अंगवळणी पडलेल्या होत्या, तो समाज समृद्ध होता. समाज-जीवनात सुबत्ता नांदत होती, हेच यावरून दिसून येते. त्यानंतरचा काळ रामायण-महाभारताचा येतो. या दोन महाकाव्यांच्या वर्णनांतून असे स्पष्टपणे जाणवते की, आजचा मानव आणि त्या काळचा मानव यांमध्ये खान-पान, राहणीमान वगैरे बाबतीत फार फरक नसावा. त्यानंतरचा कालखंड हा जैन व बुद्ध यांचा. तदनंतर अनेक राजवटींनी जसे; मौर्य, सातवाहन, वाकाटक, राष्ट्रकूट, चालुक्य, यादव, विजयनगर, मोगल, मराठी आणि शेवटी इंग्रज यांनी या खंडप्राय देशावर राज्य केले. शेतीतून अधिक उत्पादन काढण्यासाठी शेतीला मानवनिर्मित प्रणालींद्वारे (तलाव, कालवे इत्यादींच्या माध्यमातून) पाण्याचा आधार देण्याची गरज त्या-त्या काळातील समाजाच्या लक्षात प्रकर्षाने आली आणि म्हणून लहान-लहान तलाव आणि कालवे ह्यांचे जाळे देशभर निर्माण झाले. म्हणूनच या देशाचे यथार्थ वर्णन तलावांचा देश, कालव्यांचा देश असे करण्यात आले आहे. आर्य चाणक्य निर्मित **अर्थशास्त्र** या ग्रंथात पाणी-व्यवस्थापनाच्या अनेक उपांगांवर स्पष्टपणे केलेले विवेचन, हे याचा पुरावा आहे. शेतीच्या विकासाचे हे टप्पे साधारणतः इ. स. १३०० च्या अखेरपावेतो घडून आले. तदनंतरचा काळ म्हणजे परकीयांच्या आक्रमणाचा काळ आणि या प्रदीर्घ अशा गुलामीच्या, जुलमी कालखंडात काही अपवाद वगळता शेती करण्याच्या पद्धतीत काही विशेष घडल्याचे, नवीन उपक्रमांची भर पडल्याचे दिसून येत नाही. विजयनगरच्या २००-२५० वर्षांच्या कालखंडात १६ व्या शतकाअखेर मात्र दक्षिण भारतात मोठ्या प्रमाणात तलाव, बंधारे, कालवे यांचा विकास झालेला दिसतो.

शेती म्हणजेच शेतीच्या आधारावर होणारे पशुपालन आणि त्यातून निर्माण होणारी संपदा यांचा अंतर्भाव होणारच. गोपालन, त्यातून शेती करण्यासाठी उपलब्ध होणारी बैलांची पैदास आणि त्यांच्या मलमूत्रातून निर्माण होणारे सेंद्रीय खत हा शेतीचा आधार होता. कृषिव्यवस्थापन ही माती, पाणी आणि पशुधन या तीन खांबांवर समर्थपणे वाढलेली व्यवस्था होती. १८१८ पर्यंत किंबहुना त्याच्याही पुढे थेट १९७२ पर्यंत या व्यवस्थेमध्ये काही बदल झालेला दिसत नाही. मेंढीपालन, त्यापासून लोकर, सेंद्रीय खतांची निर्मिती हादेखील फार मोठा व्यवसाय त्या कालखंडात उत्कर्षाप्रत गेलेला होता. बैलाबरोबरच शेतीमध्ये म्हशीचा, रेड्यांचा, उंटांचा, घोड्यांचासुद्धा वापर स्थलकालानुसार केला जात होता. एकूणच शेती, कृषी ही पशुआधारित होती. पशूविना शेती हा विचारच केला जाऊ शकत नव्हता.

१३ व्या शतकाच्या अखेर व त्याही पुढे ब्रिटिश सत्ता येईपर्यंत शेती ही सामूहिक व एकमेकांच्या सहकार्याने, सहभागातून केली जात होती, हे प्रकर्षाने जाणवते आणि ही एकत्रितपणाची भावना, परंपरा पुढे थेट १९७०-७२ पर्यंत शेतीव्यवस्थेमध्ये तुटक-तुटकपणे टिकून राहिली. शेती करण्याच्या वेगवेगळ्या उपक्रमांतून हा सामूहिकपणा

आपल्याला दिसून येतो. हा उपक्रम शेतीच्या नांगरणीचा असेल, खतांच्या पुरवठ्याचा असेल, पेरणीचा असेल, खळ्यांचा असेल, राशीचा असेल, धान्य विक्रीचा असेल, आंबे उतरवण्याचा असेल, विहीर खोदण्याचा असेल, मोटेने पाणी काढण्याचा असेल, बागायती शेतीचा असेल, गुऱ्हाळाचा असेल, हुरड्याचा असेल, पिकाला पाणी देण्याचा असेल, पडीक जमिनीचे रूपांतरण वहितीयोग्य जमिनीत करण्याचा असेल. या सर्व व्यवस्था बहुतांशी सामूहिकपणे म्हणजेच **ईरजीक** या पारंपरिक व्यवस्थेच्या आधाराने चालायच्या. शेतीचे क्षेत्र व्यक्तीनिहाय, कुटुंबनिहाय हे वेगळे, पण प्रत्येक शेतकऱ्याकडे बैल, बैलगाडी, नांगर, मोट, गुऱ्हाळाची, पेरणीची अवजारे असतीलच असे नाही. लहान शेतकरी आहे, अडचणीत, संकटात आलेला शेतकरी आहे, अशांची शेतीही गावव्यवस्थेमध्ये सामूहिक तत्त्वाच्या आधाराने केली जात असे. एखादा शेतकरी सगळ्या बाजूने अडचणीत येतो, हतबल होतो, घरात अन्न नाही, दावणीला बैल नाही, वावर पडीक आहे, अशा वेळी गावातील इतर शेतकरी आपले बैल, नांगर, औत घेऊन त्याची पडीक शेती वहीत करून देतात. 'तो अडचणीत आहे, पण मला काय त्याचे' हा विचार नव्हता. त्याच्यासाठी आपण एक किंवा दोन दिवस देऊ, मग ते काम नांगरटीचे असो, पेरणीचे असो, कुळविण्याचे असो, काढणीचे असो, इतरांचीपण अडचण दूर करावी, हा भाव जनमानसात रुजलेला दिसायचा. असे करतानासुद्धा उपकार भावना नव्हती. उत्साहाने कामे पार पाडली जायची.

डोंगराळ, दुर्गम भागात कोळी, गोंड अशा जमातींमध्ये **ईरजीक** पद्धतीने शेती निर्माण करण्याचा प्रयत्न होत असे. पुणे जिल्ह्यातील आंबेगाव तालुक्यात **डिंबे** धरणाच्या परिसरात कोळी लोक डोंगरी चढउताराच्या जमिनीचे रूपांतरण शेतीलायक जमिनीत **ईरजीक** प्रणालीच्या वापराने आजपण करतात. या सामूहिक पद्धतीच्या उपक्रमाला ते **पडकई** या नावाने संबोधतात.

आज ही पद्धत ग्रामीण जीवनातून नाहीशी झाली. **ईरजीक** ही संस्कृती बदलली. अडचणीत आलेला, हतबल झालेला शेतकरी आज एकटा आहे. कर्ज काढतो, बैल विकतो, जमीन विकतो आणि आत्महत्या करतो. कालौघात झालेला हा फरक प्रकर्षाने जाणवतो. आजच्या बदललेल्या मानसिकतेच्या कालखंडात ती टिकली नाही, असेच म्हणावे लागेल. अलीकडे मग ते काम पेरणीचे असेल, नांगरटीचे असेल, आंबे उतरविणे असेल, गुऱ्हाळ असेल, अशी सर्व कामे आत्मकेंद्रित वृत्तीच्या वाढीमुळे पृथकपणे, स्वतंत्रपणे केली जातात.

कृषी आणि महिला ह्यांचे नाते हे फार अतूट आहे. शेती, घर, मुले, नवरा हे सारे म्हणजे स्त्रियांचा एक हळुवार कोपरा आहे. आजच्या बदललेल्या काळातसुद्धा हा कोपरा महिलांनी जपला आहे. याची प्रचिती दररोजच्या जीवनामध्ये आपल्याला येते. पुरुषांनी घरकामात सहभागी व्हावे; असे म्हणत घरातील सर्व कामे स्वत:च उरकून; आवरून बाहेरचे (ऑफिस, दवाखाना, शिक्षण) कामही तत्परतेने उरकणारी; मुलांच्या गृहपाठात सहभागी होणारी; घराचे घरपण जपणारी; शेतीवर, पिकावर, गाई-म्हशी, वासरांवर हात फिरविणारी स्त्री ही सार्वत्रिकपणे सारखीच. सगळ्या कामांमध्ये पुढाकार घेणाऱ्या स्त्रीचे मन निसर्गाने वेगळ्याच पद्धतीने बनविलेले आहे, असे वाटून जाते. या सर्वांसाठी जबाबदार ती स्वत:च आहे, असेही म्हटले जाते. ती चोखंदळ आहे, सहनशील आहे, श्रम स्वीकारण्यात पुढाकार घेणारी आहे.

शेतीची सुरुवात कशी झाली असावी, याच्या खोलात गेल्यानंतर असे सहजपणे लक्षात येते की, सामान्यतः स्त्रिया या वनस्पती, फळे व कंदमुळे गोळा करीत असत व पुरुष बाहेर शिकार करत असत. पाऊस वा थंडीत दुर्गम भागात फळे, कंदमुळे गोळा करणे शक्य होत नसे, तेव्हा स्त्रियांनी कदाचित नवीन जिवाला जन्म देण्याची स्वत:मधील शक्ती तसेच निसर्गातील सर्जनक्षमता यांच्यातील साधर्म्य शोधण्याचा प्रयत्न केला असेल. एखादे बीज जमिनीत रुजलेले तिने पाहिले असेल. ते अंकुरलेले, वाढलेले दिसले असेल. यातूनच कदाचित शेतीची सुरुवात झाली असेल, असाही अंदाज काही अभ्यासकांनी मांडलेला आहे. याच प्रक्रियेतून पुढे कुटुंबवत्सल समाजव्यवस्था आकाराला आली असावी आणि याला स्त्रीच कारणीभूत झाली, असाही विचार मांडला जातो. अन्न, वस्त्र, निवारा यांसाठी होणारे

परस्परांचे सहकार्य, सामूहिक जीवनप्रणालीचा विकास आणि एकूणच मानवजातीचे सामाजिकीकरण या प्रक्रिया परस्परावलंबी ठरल्या असाव्यात. थोडक्यात शेतीतून अन्ननिर्मिती करणे, कुटुंबवत्सलता वाढविणे, परस्पर सहकार्य व सामूहिकता यांतून सामाजिक जीवन वाढविणे यांच्या मुळाशी महिला आहे, हे आपणास विसरता येत नाही.

शेतातले पीक निघाले, सुगी संपली, जमीन नांगरावी लागते. त्यामुळे जमिनीला खोलवर हवा मिळते. जमिनीतले तण मरते, जमिनीत पाणी मुरते व जमीन सुपीक बनते हे शेतीचे विज्ञान शेतकऱ्याला माहीत होते. चारबैली, सहाबैली, आठबैली, बाराबैली नांगर. इतके बैल कोठून आणायचे ? आणि मग एकोप्याने शेती हे तत्त्व पुढे यायचे. तिघांनी, चौघांनी मिळून एकत्र येऊन सावड करून अशी नांगरणी केली जायची. हेच **सावडीचे** तत्त्व पुढे पाळ्या घालण्यासाठी, पेरण्यासाठी, कुळवण्यासाठी, कोळपणीसाठी वापरले जायचे.

जनावरांचे मलमूत्र, घरातला कचरा, शेतीतील कचरा, चुलीतील राख यांच्या मिश्रणातून घराच्या बाजूला असलेल्या उकिरड्यातूनच सेंद्रीय खताची निर्मिती केली जायची. हा उकिरडा म्हणजेच सेंद्रीय खत-निर्मितीचा कारखाना असेच म्हणावे लागेल. वर्षभरातील काडी-कचरा कुजल्यामुळे खत तयार व्हायचे आणि हे खत बैलगाडीत भरून दूर अंतरावरील शेतावर नेऊन पसरवायचे. खत उकिरड्यातून काढून बैलगाडीद्वारे घेऊन जाण्यासाठी गावातल्या पानंदीच्या कच्च्या रस्त्यावरून वाहतूक करण्यासाठी किमान चार बैलांची आवश्यकता असे. सगळ्याच शेतकऱ्यांकडे चार बैल, चार माणसं, बैलगाडी असेलच असे नाही आणि मग हे कामपण एकोप्याने, सामूहिकपणे सावड पद्धतीने केले जायचे. साधनांची उपलब्धता नाही म्हणून शेतीतले कोणतेही, कोणाचेही काम अडून राहत नसे. कृषि-संस्कृतीत सावड हा प्रकार होता. काळाच्या ओघात हा प्रकार लोप पावलेला दिसून येतो.

उसाची तोडणी, ऊस एकत्रित करणे, लाकडी किंवा लोखंडी चरख्याद्वारे रस काढणे आणि रस तापवून त्याच्या गुळाच्या ढेपा तयार करणे यांसाठी फार मोठी मनुष्यशक्ती आणि पशुशक्ती लागत असे. उसाचा रस काढण्यासाठी चरकाला बैल जुंपत असत. दर तीन-चार तासाला बैलजोडी बदलावी लागत असे. वावरातून ऊस वाहून आणण्यासाठीपण बैलगाड्या लागत असत. एक एकरातील ऊस गाळण्यासाठी पाच-सहा दिवसांचा कालावधी लागतो. गुऱ्हाळाचा काळ दोन-तीन महिने चालत असे. शिवारात ठिकठिकाणी असे **गुऱ्हाळ** दहा-बारा शेतकरी मिळून एकत्रितपणे सावड पद्धतीने उरकत असत. उसाचा रस उकळण्यासाठी मोठ्या प्रमाणात इंधन म्हणून लाकूडफाटा लागत असे. गुळाच्या ढेपी बैलगाडीमध्ये घालून घरातील खोलीत वा सरळ बाजारात विक्रीसाठी घेऊन जात असत. गुऱ्हाळ म्हणजे दर वर्षी शेतीवर चालणारा एक उत्सवच म्हणायला पाहिजे. बागायती जमिनीचे प्रमाण कमी आणि म्हणून सगळ्यांच्या घरी ऊस पिकवला जात नसे. शेजारी, नातलग या उत्सवापासून दूर राहू नयेत म्हणून सर्वच लोकांना या उत्सवात सामील करून घेतले जात असे. काम करण्यासाठी मदतपण व्हायची आणि या व्यवस्थेचा लाभ सर्वांनाच मिळायचा. गुऱ्हाळ हा शेती संस्कृतीचा आविष्कार करतो. आज हा प्रकार दिसून येत नाही. आपली मने बदलली, भावना बदलल्या. त्या अनुरूप आपण अवजारेपण निर्माण केली.

शिवारातील पिकाची काढणी झाली की, हाताच्या मापाने गोलाकार खळी बनविली जायची. खळे मोठे असेल आणि कणसे खूप असतील तर खळ्यातून बैलगाड्यापण फिरविल्या जायच्या. दाणे व पीस असलेली कणसे दाताळ्याच्या मदतीने वेगळी केली जायची. खळ्यात काही दाणे मातीत मिसळत. मातीतून बाजूला केलेल्या अशा दाण्याला **मातरं** म्हणत. खळ्यातच एका बाजूला ज्वारीचा ढीग केला जायचा. त्या ढिगास **मदन** असं म्हणत. शेतकरी वाट पाहायचा तो वाऱ्याची. वारा मात्र अशा वेळी हमखास हुलकावणी देत राहायचा. कधीतरी रात्रीच वारा सुटायचा. सगळे जण खडबडून जागे होत. ज्वारी उधळून घेतली की; त्यातील कूस, काडी, पिसे आपोआप बाजूला होत व खळ्यामध्ये ज्वारीचा ढीग वावडीच्या खाली पडे. या ढिगालाच रास म्हटले जायचे. ही रास म्हणजे साक्षात लक्ष्मीच. ही ज्वारी पाटीने पोत्यात भरून तिची पूजा करून

बैलगाडीतून ही पोती घरी आणून कणगी भरायचे. सगळे धान्य कणगीत भरले गेले आणि शेतात कडब्याची गंज लागली की पेरणीपासून ते रास करण्यापर्यंतची सारी धावपळ संपून निवांतपणा निर्माण व्हायचा. पिकाची रास हे एक सामूहिकतेचे आदर्श उदाहरण आपल्या कृषिसंस्कृतीत रुजलेले होते.

अनेक माणसे या खळ्याभोवती राबायची. कापणी, काढणी, मोडणी, मळणी, कणगी भरणे, गंजी लावणे हा सगळा कृषिसंस्कृतीचा आविष्कारच म्हणावा लागेल. किमान महिना-दीड महिना हा खेळ चालत असे. अशा वेळी खळ्यावर येणारे बलुतेदार, डबेडूबे दुरुस्त करणारे कारागीर, औषधे देणारे वैदू, तुंमडीवाले, माकडवाले, अस्वलवाले, दरवेशी, पूजा घालणारे गोसावी, केस कापणारे न्हावी, गावाचे राखण करणारे रामोशी अशांचा राबता असे. हे सर्व लोक जमेल तेवढा वेळ देऊन स्वयंस्फूर्तीने शेतकऱ्याला मदत करीत असत. वर्षभर ज्यांनी फुकट काम केले, ते बारा बलुतेदार आपला वाटा नेण्यासाठी खळ्यावर येत. **या सगळ्यांना देऊन उरलेले ते आपले** या समाधानी वृत्तीने शेतकरी धान्य घरी आणत असे. ही सर्व माणसे दर वर्षी येणारी; खळ्यावर सुख-दु:खाच्या गप्पा मारणारी; गावात, शिवारात कोठे काय नवे-जुने अघटित घडले, याचा एकमेकांना निरोप देणारी; एखाद्याचे पीक कमी दिसले, तर त्याच्याकडे हट्ट न करणारी व पुढच्या खळ्याकडे निघून जाणारी असा हा सगळा राशीचा उत्सवच शेतामध्ये दरवर्षी साजरा केला जात असे.

राशीच्या दिवशी शेतावरच रात्रीच्या वेळी जेवणाचा कार्यक्रम ठेवला जायचा आणि शिवारातील आजूबाजूच्या सर्व लोकांना जात, पात, गरीब, श्रीमंत यांचा विचार न करता हाका मारून, आरोळी देऊन जेवणासाठी बोलावले जायचे. या सामूहिक जेवणाला **ढोहारा** असे म्हटले जायचे. असे पाचपन्नास लोक राशीच्या रात्री खळ्यावर जेवण करायचे. घरातल्या माउल्या पायांत घुंगरू बांधल्यागत सतत राबून चवदार जेवण (भाकर, वरण, खिचडा, आंबील व नैवेद्य) तयार करून देत असत. जेवणासाठी आलेल्या लोकांपैकी काही जण खळ्यावर मुक्काम करायचे. मळणीस, उधळणीस मदत करायचे आणि या निमित्ताने मदनाचे, राशीचे चोरांपासून संरक्षणपण व्हावयाचे. असे अनेकविध विचार या सामूहिक प्रक्रियेमध्ये सामावलेले असायचा.

भारतीय परंपरा ही पशूला संपत्ती मानत असलेली आहे. ज्याच्या दावणीला बाराबैल एक किंवा दोन घोडे, तो मोठा आसामी मानला जायचा. बैलजोडी, तीपण घरातल्या गाईपासूनच मिळालेली असायची. लहान शेतकऱ्याकडे दोन बैल असले, तरी तो शेजाऱ्याबरोबर सावड करून शेतीची कामे हातावेगळी करायचा.

शेतामध्ये पीक म्हणजे सुगीचे दिवस आणि ही कृषि-संस्कृतीची एक खूण होती. अशा काळात शिवारात आटोळा बांधणे, कोपी करणे, बांधावरची झाडेझुडपे तोडून शेकोटीसाठी व हुरड्याच्या आगटीसाठी लाकूडफाटा तोडून व एकत्र गोळा करून वाळायला ठेवणे, माळावरच्या रानगवऱ्या वेचून एकत्र लावून ठेवणे, अशी कितीतरी कामे करत. सगळे घर रानातच जाऊन बसे. या शेतकऱ्याच्या धावपळीबरोबरच बारा बलुतेदारांचीपण धावपळ आणि बाया माणसांची फिरती अविरत चालू असे. मांगवाड्यात कासरे, गोफणी बनविणे, चांभारवाड्यात वाद्या बनविणे, ढोरवाड्यात कातडे कमावणे, मोचीवाड्यात वाहणा बनविणे; सुतार, लोहार, कैकाडी, कुंभार यांची कामेसुद्धा अविरतपणे चालत असत. बायामाणसे कणगी सारवण्याचे काम मन लावून करत असत. शेतातून निवडून आणलेले कणसाचे दाणे बाजूला काढून पुढच्या वर्षासाठी बी म्हणून खालीवर कडुनिंबाचा पाला व मीठ टाकून असे बी हवाबंद **गुम्म्यात** (लहान कणगीत) ठेवत. माणसाच्या या गडबडीला संगत होती. एक उत्सवाचे स्वरूप होते. शेतीतील संपत्तीला बरकत होती. सर्वच गोष्टी पैशामध्ये मोजल्या जात नसत.

हुरडा ही चवीने खायची गोष्ट. आजूबाजूचे, शेजारी, नातेवाईक येताजाता आगटीभोवती बसून गरम-गरम हुरडा खात असत. खाऊ घालणाऱ्यालाही तृप्तता वाटत असे. माणसांप्रमाणेच जनावरांचाही हा उत्सव असे. कणसे न येणारे पीक ज्याला **बाटूक** म्हणतात, ते खाऊन बैल मुसमुसत असत. त्या पीक पद्धतीला एक संस्कृती होती.

ज्वारी, डाळ, करडी सर्वच प्रकारची पीके घेतली जायची. त्यामुळे तेलांचे घाणे बंद पडत नसत.

स्त्रियांची उन्हाळी कामे म्हणजे वर्षभरासाठी कुरड्या पापड्या, शेवया, लोणची, चटण्या, मेतकूट, तिखट, हळद, दळलेले मीठ, शिकेकाई, रांगोळी या सगळ्यांची धांदल. उन्हाळा आला म्हणजे शेतकऱ्यांची घरे या घरगुती कामांमुळे उत्सवाचे स्वरूप धारण करीत असत. ही सगळी कामे  बायका एकोप्याने, सहकार्याने, एकमेकांच्या मदतीने करत असत. प्रत्येक घरी पाच-दहा शेजारणींचा गट दिसे. पापड लाटता-लाटता, शेवया करता-करता एकमेकींच्या सुख-दुःखाला वाट मोकळी करून दिली जाई. कुरड्या, पापड करण्याची साधने एकमेकांच्या घरात फिरत राहायची. पण ती साधने धान्याने भरून परत केली जायची. एका अर्थाने ही भरलेपणाची संस्कृती वर्षानुवर्षे जपली, ती आपल्या घरात राबणाऱ्या स्त्रियांनीच. त्यामुळेच तर या खाद्यपदार्थांचीही एक संस्कृतीच बनली. लग्नकार्यातपण अशा पदार्थांची रेलचेल असे. उखळात कांडणे, जात्यावर दळणे आणि हे करत असताना ओव्या, गाणी यांच्या माध्यमातून माहेर-सासर यांबद्दलच्या भावना व्यक्त करणे, हा आतील अर्थ बाहेर पडत असे. अशा उन्हाळ्यातच विहिरींचे, आडांचे पाणी खोल जायचे आणि पहाटे-पहाटेच घागरी, हंडे, पोहरे घेऊन बायकांचा  मेळावाच आडावर जमत असे. विहिरी, बारवा, आड, नद्या यांचे आणि स्त्रियांचे नाते अगदी जवळचे. माहेरवाशिणी, सासुरवाशिणी दिवसभरातला शीण अशा पाणवठ्यावरच काढीत असत आणि पाणी भरता-भरता स्वतःची मने मोकळी करत. एकोप्याने पाणी भरणे ही आड-संस्कृती हे ग्रामीण भागाचे वैशिष्ट्य म्हणून जपले गेले होते.

ज्यांच्याकडे गाई, म्हशी असत ते उरलेले दूध विरजवून रवी लावून लोणी काढून ताक मात्र मोफत वाटून टाकीत असत. नसणाऱ्याकडे असणाऱ्याने जे काही देण्यासारखं आहे; मग ते जरी पाणीतत्सम ताक असले, तरी ते सन्मानाने वाटून टाकावे. ही आपली कृषिआधारित दुग्ध-व्यवसायाची संस्कृती होती. त्यामुळे ज्यांच्या घरी रवी लागे म्हणजे गाय वा म्हैस दुभती झाली, त्यांच्या घरी ताक मागणाऱ्यांची गर्दी होत असे. सकाळी ताक मागायला जाण्याची आपली परंपरा व संस्कृती होती. एक दुभती गाय अगर म्हैस ही जवळच्या ८-१० कुटुंबामध्ये एकोप्याची भावना निर्माण करण्यास कारणीभूत ठरत असे. ताक फुकट मिळते म्हणून ते खूप मागायचे अशी प्रवृत्ती नव्हती. शिळी भाकर व ताक ही खेड्यातल्या गरिबाघरच्या मुलांची न्याहारी होती तर श्रीमंताघरच्या मुलांची न्याहारी दूध व भाकर असे.

'शुद्ध बीजापोटी फळे रसाळ गोमटी' हा संत तुकाराम यांचा प्रसिद्ध अभंग. याचा अर्थ आहे, जेवढे बीज शुद्ध तेवढे त्याचे उत्पादन अधिक. हजारो वर्षांपूर्वी शेती करण्यास सुरुवात झाली. त्या वेळी अन्नधान्याची सर्व पिके रानावनात नैसर्गिकरीत्या वाढत असत. भारतातील महिलांनी या पिकांचे सूक्ष्म निरीक्षण केले व त्याचे पक्व झालेले दाणे निवडून घरी आणले व बी म्हणून साठवून ठेवले. पुढे त्यांची लागवड करून मशागत केली. या रोपांना पुढे कणसे आली. महिला चांगल्या प्रतीची कणसे निवडून ती तोडत. त्यांतील दाण्यांचा त्या बी म्हणून उपयोग करीत. अशा रितीने कणसांची  निवड व बियांची साठवणूक करण्याचे मोठे योगदान भारतीय स्त्रियांनी हजारो वर्षांपासून चालविले. अशा या परंपरेमुळेच भारतात अन्नधान्याच्या नामांकित जाती निर्माण झाल्या. बासमती तांदूळ हे त्याचे उत्तम उदाहरण आहे. इतक्या उच्च प्रतीचा तांदूळ जगामध्ये कुठेही पाहावयास मिळणार नाही. अशा प्रकारे निवड केलेल्या बियांमुळे दरवर्षी बासमतीचे शुद्ध बी मिळते. हिमालयाच्या पायथ्याशी तेथल्या शेतकरी महिला ४-५ जातीच्या भातांचे बी एकत्र करून पेरणी करतात. अति पावसामुळे अगर प्रतिकूल हवामानामुळे निदान एकतरी जात चांगले पीक देईल, हा त्या पाठीमागचा भाव, विचार. या जातींना जेव्हा कणसे येतात, तेव्हा महिला त्यापासून बी काढून, वाळवून त्याची काळजीपूर्वक साठवणूक करतात. ही प्रथा हजारो वर्षांपासून या भूमीमध्ये रुजलेली आहे. हा निवड करण्याचा कार्यक्रम महिला अत्यंत भक्तिभावाने सणाप्रमाणे साजरा करण्याची संस्कृतीपण या देशात रुजलेली होती. बी निवडण्याचे, उत्तम जाती वाढविण्याचे कौशल्य महिलांकडे जाते, असेच म्हणावे लागेल.

कृषि-संस्कृतीत पेरणीसारखा महाउत्सव नाही. वर्षातून दोनदा पेरणीचा मोसम येतो. एक खरिपाचा आणि दुसरा

रबीचा. दोन्ही पेरण्यांच्या वेळी गाफील राहता येत नाही. तो केवळ बी पेरत नसतो तर पेरत असतो आपल्या भविष्याची भाग्यरेषा. म्हणून तर खेड्यापाड्यांत म्हण आहे **मढं झाकाव आणि पेरणी करावी.** शेतकऱ्याचे जगणे शेतीवर असते. दु:ख  बाजूला ठेवून हातात तीनफणी (पाभर) धरावी, असा संकेत आहे.

भारतीय परंपरेनुसार शेतकरी बैलाचा वापर शेतीकामासाठी करीत आला आहे. कोकणात रेड्याचा वापरपण केला जातो. गुजरातमधील डांग भागात डांगी जनावरे वापरली जातात. महाराष्ट्राच्या दुष्काळी भागात खिलार जातीचे बैल वरदान ठरलेले आहेत. मराठवाड्यातील देवणी, विदर्भातील निमार, कर्नाटकातील हल्लीकर, आंध्रमध्ये जोंगोळ, गुजरातमधील गीर, सिंधी या जाती प्रसिद्ध आहेत. राजस्थानात उंट वापरतात. काश्मीरमध्ये याकचा उपयोग केला जातो. या वेगवेगळ्या प्राण्यांच्या मदतीने धोतर घालणारा शेतकरी शेती करत आला आहे.

आंबा म्हटले की हापूस, पायरी या कोकणातील जाती डोळ्यांपुढून सरकतात. उर्वरित महाराष्ट्रातपण आंबा मुबलक आहे. या आंब्याला गावरान, गावठी, रायवळ, देशी असे म्हटले जाते. या आंब्यांतपण काही जाती हापूसलाही मागे टाकणाऱ्या आहेत व होत्या. लातूरजवळ हरंगुळ या खेड्यात **विश्वंभर** या जातीच्या आंब्याला परिसरात व दूरदूरपर्यंत तोड नाही, असेच म्हणावे लागेल. त्याचे प्रतिझाड उत्पन्न, चव, गोडी, आकार, रंग हे उल्लेखनीय आहे. आंब्याची झाडे असणाऱ्या आमराया मोठ्या संख्येने देशभर विखुरलेल्या होत्या. या आंब्यांची त्यांच्या चवींवरून, आकारांवरून, गुणांवरून दिलेली नावे शेंदरी, शेप्या, केळ्या, भोपळ्या, नांगऱ्या, गोट्या, लंगडा अशी शेकडोंमध्ये आहेत. आंब्याची झाडे आकाराने खूपच मोठी – काही झाडे तर पाव ते अर्धा एकर क्षेत्रफळ व्यापणारी. एका आंब्याच्या झाडाला हजारोंमध्ये आणि लाखाचा आकडा ओलांडणारी फळे लागत असत. भावाभावांमध्ये शेताच्या वाटण्या झाल्या, तरी शेताबरोबर आंब्याचे झाड वाटणीला जात नसे. झाड हे सामायिक राहणार, त्याच्या फळाच्या वाटण्या मात्र हिश्शाप्रमाणे होणार. एकेका झाडाचे वाटेकरी शंभराच्याही पुढे असतील. आंब्याच्या दिवसात आंबा झाडावरून उतरवला जायचा, पाड पडायला लागल्यानंतर. आंबेसुद्धा एकत्रितपणे उतरवले जायचे आणि झाडाखाली आंब्याचा ढीग पडलेला असायचा, तो वाटून घेण्यासाठी. असा आंबा घरी खाण्यासाठी व बाजारात विकायलापण जात असे. कधीकधी रानात  उतरतानाच आंबा विकला जायचा. आंबे मोजण्याची तऱ्हा वेगळीच. भाव शंभर आंब्यांचा बोलला जायचा. मोजताना मात्र सहा आंबे द्यायचे व पाच दिले म्हणून हिशोबात धरायचे. शंभर आंबे दिले म्हणजे  प्रत्यक्षात १२० आंबे दिले जायचे. कृषीतील मोजणीची ही संस्कृतीच म्हणावी लागेल.

रायवळ आंब्याच्या जातीला बारा-पंधरा वर्षांनंतर फळे लागतात. झाड लावणाऱ्याला आंबा खायला मिळेलच असे नाही. मुलाला मिळेल, नातवाला मिळेल, कोणालातरी मिळेल; असा वात्सल्य भाव बाळगून झाडे लावणारी माणसे होती. अशा आंब्याच्या झाडाला एक वारसा होता व प्रेमाची गोडीही होती. याला कृषि-संस्कृती होती. आंबा झाडावरून उतरवल्यानंतर भाताच्या, गव्हाच्या काडात अंथरून, झाकून पिकवला जायचा. आंबे न मोजता खाण्याची प्रथा होती. एकमेकांना बोलाविणे, पुरणाच्या पोळ्यांबरोबर, पुऱ्यांबरोबर, चपात्यांबरोबर, भाताबरोबर पोटभर आमरस खाणे हा एक उत्सवच होता. आंब्याला येणारा शेवटचा बहर लोणच्यासाठी वापरला जायचा. आंबट आंब्यांच्या जाती या लोणच्यासाठीच वापरल्या जायच्या. मातीच्या मोठ्या उंच बरण्या, कैऱ्या चिरण्यासाठी विळ्या हे त्याचे वैशिष्ट्य. आंब्याच्या कोयी भाजून खाण्याची प्रथाही होती. ज्या वर्षी चिंचेचे उत्पन्न जास्त त्या वर्षी आंबा कमी आणि म्हणून तो महागणार, हेपण शहाणपण त्यांच्याकडे होते. अशा सर्व व्यवहारातून कृषीची संस्कृती प्रकट होत असे.

भारतातील जैव आणि वनस्पती यांची विविधता आश्चर्यजनक आहे. भारतात जवळ-जवळ पन्नास हजार जातींच्या वनस्पती आहेत तर एकोणनव्वद हजार जीवजंतूंची नोंद आत्तापर्यंत झालेली आहे. अनेक सूक्ष्म जीवजंतू जमिनीखाली राहून जमीन सुपीक करतात. अशा अनुपम

निसर्ग संपत्तीने नटलेला दुसरा देश जगात नाही. भारतीय संस्कृती आणि त्यावर आधारलेली जीवनपद्धती निसर्गाचे व मानवाचे संबंध निरामय ठेवणारी आहे. पिकाचे अनेक (१७०) प्रकार आहेत. एकट्या तांदूळ या पिकाच्या तीस ते पन्नास हजार जाती भारतात उपलब्ध आहेत. ज्वारीच्या व बाजरीच्या पाच हजारांपेक्षा जास्त जाती आहेत. गाईच्या शेकडो जाती आहेत. पर्यावरण-रक्षण, माणूस आणि पशुशक्तीचा समन्वय, सर्व प्रकारच्या जीवौंशांचं पुनर्चक्रीकरण या सगळ्यांच्या माध्यमातून मृदसंरक्षण आणि पाण्याचे पुनर्भरण हे शेतीच्या आणि गोपालनाच्या प्राचीन पद्धतींतून सहजगत्या साध्य होत होते. म्हणूनच दहा हजार वर्षांपासून शेती करून आजही आमची जमीन शक्तिहीन, ओसाड किंवा नापिक झालेली नाही. ती आजही सजीव आहे. शेती, गोपालन, फलोद्यान, वनीकरण, ग्रामोद्योग, जलसंरक्षण, जलपुनर्भरण ही सर्व आपल्या स्वावलंबी, आत्मनिर्भर शेतीची अंगे आहेत. कृषि-संस्कृतीची ती उपांगे आहेत. तेलघाणी, पिठाची गिरणी, चरखा, हातमाग, गूळ बनविणे, बांबूच्या टोपल्या बनविणे, दोर वळणे, वाहाणा बनविणे, माठ-विटा बनविणे, लोहार काम, सुतार काम इत्यादी सर्व उद्योग खेड्यात चालणारे होते. या अर्थाने भारतीय कृषिसंस्कृती ही सर्वसमावेशक होती आणि वसुधैव कुटुंबकम् हा जयघोष करण्यास सार्थ ठरणारी भूमी आहे. यात व्यावहारिक स्वार्थ नव्हता तर वात्सल्याची, प्रेमाची, अनेकांच्या हितांत स्वहित शोधणारी वैश्विकरणाची ही एक व्यवस्था होती. आजच्या जागतिकीकरणाचा अर्थ हा व्यवहारवादी आहे आणि म्हणून भारतीय कृषि-संस्कृतीचे ते वाहक बनू शकत नाहीत. कृषि-विकासाची वाटचाल व प्रवास सहजीवनाचा होता व यातून सुबत्तेसाठीची स्पर्धा आज करावयाची आहे. कृषीच्या या चांगुलपणातून पुन्हा कृषि-संस्कृतीची बांधणी कृषि-विज्ञानाला सोबतीला घेऊन करावयाची आहे. आपला शेतकरी तो भार निश्चितपणे पेलवणार आहे.

## कृषी विकासाची वाटचाल

**■ डॉ. वा. ब. राहुडकर**

वैदिक काळापूर्वी हरप्पा संस्कृतीत जमिनीची नांगरणी बैलांनी ओढणाऱ्या लाकडी नांगराने होत असे; आणि गहू, बार्ली व कापूस या पिकांची कोरडवाहू लागवड होत असे. १९२१ साली केलेल्या मोहेंजो-दारो येथील उत्खननावरून असे दिसून येते. ४००० ते ५००० वर्षांपूर्वी हरप्पा संस्कृतीचा विस्तार पंजाब, हरयाणा, जम्मू, उत्तरप्रदेश, राजस्थान, गुजरात व मध्यप्रदेश या ठिकाणी झालेला होता. इनामगाव (महाराष्ट्र) येथील उत्खननावरून दिसते की, महाराष्ट्रात २००० वर्षांपूर्वी गहू, ज्वारी, मूग, कुळीथ व वाटाणा या पिकांची लागवड होत असे. पिकांना नदीतील पाणी पाटाने देण्यात येत असे. दायमाबाद येथे उत्खननात खेळण्यातली काश्याची बैलगाडी सापडली आहे. या बैलगाडीची चाके भरीव आहेत. याहीपेक्षा अधिक कलापूर्ण असलेला रथ दायमाबाद येथे सापडला आहे. तो सध्या दिल्लीच्या राष्ट्रीय संग्रहालयात आहे. (अहिरराव १९९३) आर्यांच्या साम्राज्याचा विस्तार विदर्भापर्यंत झालेला होता. रुक्मिणी व नल-दमयंती ह्या विदर्भातील प्रसिद्ध व्यक्ती आहेत. श्रीरामाचा मुक्काम नाशिक-पंचवटीला असताना त्या भागात दंडकारण्य होते, असा उल्लेख रामायणात आहे.

ख्रिस्तपूर्व ४५०० ते २५०० वर्षे या कालखंडात वेदकालीन कृषी व कृषिजीवन या संबंधीची माहिती प्रामुख्याने ऋग्वेदात मिळते. आर्यांची उपजीविका प्रामुख्याने शेतीवरच होती. आजच्या शेतीच्या प्रगतीची बीजे वेदकालीन शेतीत दिसून येतात. आर्य, जमिनीची पूर्वमशागत (नांगरणी) करून बियांची पेरणी करत होते आणि तणांच्या नियंत्रणासाठी पिकात आंतर-मशागत करीत होते. जमिनीचा पोत व हवामान यांप्रमाणे पिकाची निवड करत होते. वेद वाङ्मयात नांगर, नांगराचा फाळ, जुंपणी, चाबूक, सूप, विळा इत्यादी शेती अवजारांचा व उपकरणांचा उल्लेख येतो, तर नांगर कसा तयार करावा या संबंधीचे वर्णन अथर्ववेदात आहे. ऋग्वेदात म्हटले आहे, 'हे मित्र हो, नांगर जोडा, सरी पाडा आणि त्या सरीत बी

पेरा. आमच्या प्रार्थनेमुळे पीक चांगले येईल. लवकर झालेल्या पिकावर विळाही चालू लागेल.' ऋग्वेदातील पुढील उपदेश आजही महत्त्वाचा आहे. ''फाशांनी जुगार खेळू नको, तर शेती करून संपत्तीमध्ये रममाण हो, म्हणजे तू मान्यतेला चढशील, शेतीत गाई मिळतील आणि बायकोही मिळून तुझा संसार सुखाचा होईल. ही गुप्त गोष्ट मला प्रत्यक्ष सूर्यनारायणाने सांगितली व अनुभवास आणून दिली. (श्री. के. चितळे १९९३) मॅक्स मुल्लरने ऋग्वेदाचा काळ ख्रिस्तपूर्व १५००-१२०० वर्षे सांगितला आहे.

'कौटिल्याचे अर्थशास्त्र' ख्रिस्तपूर्व ३२१ मध्ये लिहिल्याचे मानतात. त्या काळातील शेतीविषयी विस्तृत माहिती आपणास या संस्कृत ग्रंथातून मिळते. त्या काळी शेतकऱ्यांची खासगी जमीन होती, तशीच शासकीय जमीन होती. शासकीय जमिनीच्या लागवडीसाठी व देखरेखीसाठी 'सीताध्यक्षाची' नेमणूक केलेली असे. (सीता म्हणजे नांगरलेली जमीन) हा शासकीय अधिकारी कृषिशास्त्रात पारंगत असे. त्याला धान्य, भाज्या, फळे, कंद, तंतुपिके व कापूस आणि वृक्षांची लागवड ह्यांची माहिती असे. तो योग्य समयी पिकांचे बी गोळा करून गुलाम, कैदी व मजूर यांच्या मदतीने या पिकांची लागवड करत असे. अर्थशास्त्रात धान्य, गहू, बार्ली, ऊस, तीळ, मूग, उडीद, करडी, मसूर, कुळीथ, वाटाणा, हरभरा, खेसारी (लाखोळी), जवस, मोहरी, कापूस ह्या खरीप व रबी हंगामांतील पिकांचा उल्लेख आढळतो. नदीच्या पात्रात कलिंगड व काकडी यांची लागवड होत असे. अर्थशास्त्राच्या मूल्यांकनाप्रमाणे धान्याचे पीक सर्वोत्तम, भाज्यांचे पीक मध्यम आणि उसाचे पीक निकृष्ट मानले आहे. श्रम, लागवडीचा खर्च, किडींचे नियंत्रण या आधारावर हे मूल्यांकन केलेले आहे. पेरणीपूर्वी बीजप्रक्रिया करण्यात येत असे आणि पिकांच्या सिंचनाची सोय असे. शेतमालाला योग्य किंमत मिळाल्याने शेतकरी व ग्राहक खूश असत. शेतकऱ्यांना वार्षिक शेतसारा द्यावा लागत असे. पण दुष्काळात शासकीय मदत मिळत असे. शेतकऱ्याने सुपीक जमीन पडीत ठेवली, तर ती जमीन त्याचे ताब्यातून काढून दुसऱ्या शेतकऱ्यास कसण्यास देण्याचा अधिकार सीताध्यक्षास दिलेला होता. शेतकऱ्यांना शेतीसाठी बी, जनावरे व पैसा शासनाकडून मिळत असे आणि त्याची परतफेड करावी लागत असे. दुष्काळ, शत्रूसैन्याने व मोकाट वन्य प्राण्यांनी केलेले पिकांचे नुकसान, व रोगराई अशा नैसर्गिक आपत्तींमुळे शेतसारा माफ होत असे. (मीनल परांजपे १९९३) कौटिल्याने पाऊस मोजण्याची मापे देऊन पर्जन्यमानाप्रमाणे प्रदेशाची विभागणी केली आहे. सम्राट अशोकाने (ख्रिस्तपूर्व २७४-२३७) वन्य प्राण्यांची शिकार करण्यासाठी जंगलास आग लावण्यास प्रतिबंध केला होता. जगात फळबागा लावण्यास सर्वप्रथम त्याने उत्तेजन दिले. या फळबागेत आंबा, केळी, द्राक्षे, फणस व खजूर ही फळझाडे लावण्याची शिफारस केली होती.

### कृषिशास्त्राविषयी प्राचीन संस्कृत ग्रंथ

कृषिशास्त्राविषयी प्राचीन संस्कृत ग्रंथावरून आपणास त्या काळातील शेती, शेतकरी, पिके, पिकांच्या लागवड पद्धती, पिकांचे नैसर्गिक आपत्तींपासून संरक्षण, बीजप्रक्रिया, बियांची साठवण, शेतीची अवजारे, पिकांच्या जाती, जमिनींचे प्रकार व मशागत इत्यादींविषयी माहिती मिळते.

**१) कृषि-पराशर किंवा कृषिसंग्रह –** हा कृषिशास्त्रावरील संस्कृत भाषेतील जगातील पहिला ग्रंथ पाराशर ऋषींनी तयार केला. पाराशर ऋषींचे निवासस्थान ख्रिस्तपूर्व ४०० वर्षे तक्षशीला (सध्याच्या पाकिस्तानातील सियालकोटजवळ) असावे. ग्रह, नक्षत्र, ढगांचा प्रकार, हवामानाची परिस्थिती हे पाहून पावसाचा अंदाज करण्याचे ठोकताळे, शेतीच्या उत्तम व्यवस्थापनाचे महत्त्व, गुरांचे व्यवस्थापन व शेतीसाठी योग्य बैलांची निवड व जोपासना, दर्जेदार बियांचा संग्रह, शेतीची अवजारे विशेषतः नांगराविषयी व नांगरणीविषयी विस्तृत माहिती या ग्रंथात दिली आहे. नांगराच्या विविध भागांची मापे या ग्रंथात वाचण्यास मिळतात.

**२) काश्यपीय कृषिसूक्ती –** कोसल (सध्याचे उत्तरप्रदेशातील अयोध्या) राज्यातील वैष्णव संप्रदायातील काश्यप ऋषींनी कृषिशास्त्रावरील हा संस्कृत ग्रंथ इसवी सन ७०० ते ८०० वर्षांत लिहिला असावा, असे अनुमान या ग्रंथाचे इंग्रजीत भाषांतर करणारे डच विद्वान बोजटिल्रा यांनी

केले आहे. काश्यप ऋषींनी उत्तर भारतातील धानाचे शेतीप्रमाणे, कृष्णा-गोदावरी खोऱ्यातील धानाचे शेतीविषयीची माहिती या ग्रंथात दिलेली आहे. शेतीचा व्यवसाय कुलीन (थोर) असल्याने तो सर्व जातींच्या माणसांनी-ब्राह्मणांनीदेखील केला पाहिजे, असे काश्यप ऋषींचे मत होते. मनुस्मृती (ख्रिस्तपूर्व २०० वर्षे) ह्या ग्रंथात ब्राह्मणांनी शेती कसण्यास मनूने प्रतिबंध केला आहे. कारण नांगराच्या फाळामुळे जमिनीतील अनेक जिवाणूंची हत्या होते. मेधातिथी (इ.स. ८२५-९००) हा काश्मिरी पंडित मनूच्या मताशी सहमत होता. पिकांच्या भरपूर उत्पादनासाठी चांगली सुपीक जमीन आवश्यक आहे. या धान्याच्या उत्पादनामुळे संपूर्ण कुटुंब निरोगी राहते. संपत्ती (धान्य व गुरे) वाढते, सुबत्ता येते. काश्यप ऋषींनी आजच्याप्रमाणे जमिनीच्या पोताचे, गुणधर्माचे वर्णन केले आहे. 'कृषि-पराशर' या ग्रंथात पिकांच्या जिरायती लागवडीची माहिती मिळते, तर काश्यप ऋषींच्या 'कृषिसूक्ती' या ग्रंथात बागायती पिकांची- विशेषतः धान्याविषयी विस्तृत माहिती मिळते. या ग्रंथात धान्याच्या २६ जातींची नावे दिलेली आहेत. सध्याचे कृषिशास्त्रज्ञ सोनेरी तांदळाचा शोध लावल्याबद्दल स्वतःची पाठ थोपटत आहेत. काश्यप ऋषींनी 'पीतवर्ण वृही' (पिवळा तांदूळ), 'साम्बका'-'हेमा' (सोनेरी तांदूळ) या तांदळाच्या जातींचे वर्णन केले आहे. शाली, कलामा व शास्टीका ह्या तांदळाच्या तीन मुख्य जाती आहेत. शास्टीका जातीचा जाड तांदूळ ६० दिवसांत शेतात तयार होतो. काश्यप ऋषींनी लोकांच्या आरोग्याचा विचार केलेला आहे. तृणधान्य, कडधान्य, भाज्या, फळे व दूध यांच्या समतोल आहाराने माणूस निरोगी राहतो. हवामानाच्या बदलानुसार राजाने शेतीतंत्रात बदल केला पाहिजे असे काश्यप ऋषींचे मत होते.

**३) वृक्षायुर्वेद –** कृषिशास्त्राविषयी मागील दोन संस्कृत ग्रंथांप्रमाणे सुरपाल (इ.स. १०००) यांचा 'वृक्षायुर्वेद' हा वनस्पती जीवनाविषयीचा ग्रंथ महत्त्वाचा आहे. या ग्रंथातील वनस्पतींच्या व जमिनींच्या वर्णनावरून सुरपालाचे निवासस्थान बिहार-ओरिसा प्रदेशात असावे. या ग्रंथात माणसाच्या रोगावर उपचार करण्याची आयुर्वेदातील 'त्रिधातू पद्धती – कफ, पित्त व वात' वनस्पतीच्या रोगावरील उपचाराकरता सुरपालाने वापरलेली आहे. वनस्पतीच्या रोगांची लक्षणे आणि त्या रोगांवर करण्याच्या उपचारांची विस्तृत माहिती या ग्रंथात दिलेली आहे. या उपचारात वावडिंगासारख्या औषधी वनस्पतीचा लेप जखमेवर लावणे, औषधी वनस्पतीच्या काढ्याची फवारणी रोगट झाडावर करणे किंवा धुरी देणे यांचा समावेश आहे. वादळाने मोडलेली झाडाची फांदी कशी जोडावी, जंगलातील आगीने पोळलेले झाड आणि दुष्काळात सुकलेले झाड यांना पुनर्जीवन कसे द्यावे, याची माहिती या ग्रंथात दिलेली आहे.

**४) बृहत्संहिता –** वृक्षायुर्वेदाविषयीची माहिती ज्योतिषशास्त्रात पारंगत असलेल्या वराहमिहीर या विद्वानाच्या 'बृहत्संहिता' या ग्रंथात मिळते. याशिवाय या ग्रंथात पिकांचे व जनावरांचे संगोपन, वनशेती व फळबाग ह्यांविषयीही माहिती मिळते. वराहमिहीराने पिकांची विभागणी खरीप व रबी हंगामांत केली आहे (पूर्वसस्य व अपारासस्य). याशिवाय पिकांचे वर्गीकरण-१) सुकधान्य (तांदूळ, गहू, बार्ली, कोदो, प्रियांगू (कुटकी)); २) सामीधान्य (कडधान्य)- मूग, उडीद, मसूर, कुळीथ, कलाया व कनक; ३) सीतासारसापा- तीळ; ४) कापूस, सारा (ज्यूट) व अलसी (जवस) यांचा समावेश तंतूपिकांत केला आहे. याशिवाय ऊस लागवडीचा उल्लेख आहे. तलावाच्या काठावरील बागेत कोणती झाडे किती अंतरावर लावावीत, देवळाच्या परिसरात कोणती झाडे लावावीत, त्यांना कोणती सेंद्रिय खते द्यावीत हे सांगितले आहे. झाडांची अभिवृद्धी बियांपासून, रोपांच्या लावणीपासून आणि कलमापासून करण्याची शिफारस केली आहे. फणस, अशोक, केळी, जांभूळ, लिंबू, डाळिंब, द्राक्षे, पालविता व अतिमुक्ता (जस्मीन) यांची कलमे कोणत्या ऋतूमध्ये व कशी तयार करावीत ही माहिती 'बृहत्संहिता' या ग्रंथात मिळते. वराहमिहिराने भूमिगत पाणी शोधण्याचे अनेक ठोकताळे (चिन्हे) या ग्रंथात सांगितले आहेत.

**५) उपवन विनोद –** बुंदेलखंडाचा राजा हमीर याच्या दरबारातील शारंगधर या विद्वानाने 'शारंगधर पद्धती' हा कृषिशास्त्रावरील ग्रंथ तेराव्या शतकात लिहिला. या संस्कृत

ग्रंथात 'उपवन विनोद' हे प्रकरण आहे. या ग्रंथात 'तरुमहिमा' (झाडांचे महत्त्व), वृक्षांच्या जाती व लागवड, वृक्षांकरता खते, सिंचन व संरक्षण आणि वनस्पतींचे चमत्कार सांगितले आहेत. विशेष म्हणजे झाडाकरता द्रव खत (कुरपजल) कसे तयार करावे, याची माहिती या ग्रंथात दिलेली आहे. जमिनीचे मुख्य तीन प्रकार जांगल, अनुप व साधारण हे पूर्वी सांगितले आहेत. शारंगधराने रंगाप्रमाणे व रसप्रमाणे जमिनीचे ६ प्रकार सांगितले आहेत. अमरकोशात जमिनीचे वर्गीकरण १२ प्रकारांत केलेले आहे. या संस्कृत ग्रंथाचे मराठी भाषांतर वैद्यराज दत्तो बल्लाळ बोरकर, इस्लामपूर (जिल्हा सातारा) यांनी शके १८४० मध्ये प्रसिद्ध केले.

**६) विश्ववल्लभ –** मेवाडच्या महाराणा प्रतापच्या दरबारातील श्रीचक्रपाणी मिश्रा या विद्वानाने इ. स. १५७७ मध्ये विश्ववल्लभ ग्रंथ तयार केला. या ग्रंथात भूमिगत पाण्याचा शोध, वृक्षांची लागवड व रोगावरील उपचार विशेषतः किल्ल्यातील जमिनीत कोणती झाडे लावावीत यांविषयी माहिती मिळते. (नेने २००७)

## महाराष्ट्रातील सत्तापालट

महाराष्ट्रात पहिल्या शतकापासून तेराव्या शतकापर्यंत हिंदू वंशियांचे विविध राजवंश नांदले. तर तेराव्या शतकानंतर विजयनगरचे राज्य व शिवाजीचा कालखंड वगळता परकीय सत्ता राहिली.

ह्यूनत्संग या चिनी प्रवाशाने महाराष्ट्रात ६४० ते ६४१ साली प्रवास केला. त्याने नाशिकला मुलाकेसीन-२ या यादव राजाची भेट घेतली होती आणि मुक्काम केला होता. महाराष्ट्राविषयी त्याने लिहिले आहे की, हे संपन्न राज्य असून राज्यकारभार चांगला आहे. महाराष्ट्राचा उल्लेख त्याने 'मोहोलेश' असा केला आहे. ''या प्रदेशाची जमीन सुपीक असून पिकांची लागवड नियमितपणे होते आणि भरपूर उत्पादन मिळते. माणसे अभ्यासू असून पारंपरिक व धार्मिक ग्रंथांचे वाचन करतात. लोक प्रामाणिक व साधे आहेत. त्यांचा बांधा उंच असून काटक आहे. सूडबुद्धी हा त्यांचा गुणधर्म आहे. उपकारकर्त्यांचे आभार मानतात पण शत्रूंना क्षमा करत नाहीत. त्यांचा अपमान करणाऱ्याचा जीव धोक्यात घालून सूड घेतात. विपत्तीत असलेल्या माणसाला स्वतःला विसरून तत्काळ मदत करतात.''

## शेतीची परिस्थिती

महाराष्ट्रात राष्ट्रकूट राजांची सत्ता दीर्घकाळ होती. महाराष्ट्राची आर्थिक सुबत्ता शेतीवर अवलंबून होती. गुजरात, खानदेश व वऱ्हाड ह्या ठिकाणी कापूस हे प्रमुख नगदी पीक असून ते मीननगर (गुजरात), उज्जैन, पैठण व वारंगळ येथे तयार होत असे. पांढरे कॅलिको कापड बऱ्हाणपूर व विदर्भ येथे तयार होत असे. सूत व कापडाची निर्यात भडोच बंदरातून इराण, अरबस्तान, तुर्कस्तान, कैरो, इराली व पोलंड येथे होत असे. कोकणात नारळ, सुपारी, विड्याची पाने व तांदूळ ह्यांचे उत्पादन मुबलक होत असे. म्हैसूरच्या जंगलात चंदन, साग व इमारती लाकूड ह्यांचे आणि सुगंधी तेलाचे व उदबत्तीचे उत्पादन होत असे. ठाणे व सैमूर ह्या बंदरातून त्यांची परदेशी निर्यात होत असे. दख्खनची भूमी गंगेच्या खोऱ्याइतकी सुपीक नसली, तरी या भूमीत खनिजांचा भरपूर साठा आहे. कडाप्पा, बेल्लारी, चांदा, बुलढाणा, नरसिंगपूर, अहमदनगर, विजापूर व धारवाड येथे तांब्याच्या खाणी होत्या. कडाप्पा, बेल्लारी, कुर्नुल व गोलझोंडा येथे हिऱ्याच्या खाणी होत्या. मान्यखेड व देवगिरी या राजधानीत हिरे व दागिने ह्यांचा व्यापार होता. उत्तर महाराष्ट्रात चामड्याच्या वस्तू आणि म्हैसूरमध्ये हस्तिदंताचे उत्पादन होत असे. या उद्योगापासून कराच्या रूपाने राजाच्या खजिन्यात भर पडत असे. अरबी समुद्रातून होणाऱ्या परदेशी व्यापारावर राष्ट्रकुटांचे नियंत्रण होते. या बंदरातून कापसाचे सूत व कापड, मस्लीन कापड, कानडी गालिचे, नीळ, सुगंधी द्रव्ये, उदबत्त्या, विड्याची पाने, नारळ, चंदन व साग, हस्तिदंत, तिळाचे तेल इत्यादी पदार्थांची निर्यात परदेशी होत असे. आणि अरबस्तानातून खजूर, इटलीतील मध, फ्लींट काच, ॲण्टिमनी, सोन्या-चांदीची नाणी, शिसे, कथील, टोपाझ, स्टोराक्स इत्यादी पदार्थांची आयात होत असे. याशिवाय गुलामांची आणि करमणुकीकरता गाणाऱ्या मुलामुलींची



आयात या बंदरातून होत असे. घोड्यांच्या व्यापारात अरबांची मक्तेदारी होती. राष्ट्रकूट राजांना या व्यापारात कररूपाने चांगले उत्पन्न मिळत असे. कारागीर संघटित होते, ते व्यापाऱ्यांना कर्जपुरवठा करत असत. शेतकरी व खंडकरी ह्यांना नियमितपणे शेतसारा भरावा लागत असे. शेतसारा वसुलीसाठी शेतकऱ्यांवर जुलूम होत नसे. गावचा पाटील शेतकऱ्यांकडून कर गोळा करत असे. दुष्काळात सवलत मिळत असे. सरकारी खजिन्यात जमा केलेल्या करापैकी १५% कर गावच्या व्यवस्थेसाठी परत मिळत असे. बहुतेक खेडी नदीनाल्याचे काठी, उंचवट्याचे गावठाणात वसलेली असत आणि गुरांना चरण्यासाठी राखीव गायरान असे. जोडगावांना खुर्द व बुद्रुक अशी नावे होती. पाटील हा गावाचा मुख्य शासकीय अधिकारी होता. त्याच्या मदतीला कुलकर्णी (पटवारी, तलाठी) होता. महाराष्ट्रात पाटील आडनाव सर्वाधिक आहे.

पंढरपूरचा विठोबा, जेजुरीचा खंडोबा व तुळजापूरची भवानी ही महाराष्ट्राची दैवते आहेत. त्यांचे दर्शन आयुष्यात घेतलेले नाही असा मराठी माणूस दुर्मीळ आहे. संपूर्ण महाराष्ट्रातील विशेषतः शेतकरी वर्ग हा दर वर्षी आषाढ व कार्तिक ह्या महिन्यांत पंढरपूरच्या विठोबाच्या दर्शनाला पायी जातो, तेव्हा अनायासे त्यांना विविध विभागांतील शेतीचेही दर्शन होते, निरीक्षणाने शेतीचा अभ्यास होतो.

संत ज्ञानेश्वराची (इ.स. १२७५ ते १२९६) ज्ञानेश्वरी, संत तुकारामाची (इ.स. १५७७ ते १६५०) अभंगगाथा, आणि समर्थ रामदासांचा (इ.सन १६०८ ते १६८१) सार्थ दासबोध या मराठी ग्रंथांतून त्या काळातील शेतीची परिस्थिती कशी होती, याची माहिती मिळते.

**१) ज्ञानेश्वरी –** ज्ञानेश्वर म्हणतात, ''माझ्या मराठीची बोलु कौतुके, परी अमृतातें ही पैजेसी जिंके, ऐसे अक्षरे रसिके मेळवीन।'' संत ज्ञानेश्वरांनी पायी प्रवास करून शेतीचे सूक्ष्म निरीक्षण केले असे दृष्टान्त ज्ञानेश्वरीत आले आहेत. ज्ञानेश्वरीत ज्वारी, धान, गहू, मूग, हरभरा, तीळ, मोहरी, सूर्यफूल, ऊस, कापूस, नागवेल, लसूण, कांदा, मिरे, लवंग, आले, हिंग, तमालपत्र या पिकांचा; भोपळा व पडवळ या भाज्यांचा; आंबा, केळी, कापुरकेळी, द्राक्षे, नारळ, सुपारी, बोर, आवळा व कवठ या फळांचा; आणि पारिजातक, शेवंती, जाई, जुई, मोगरा, कनकचाफा, सोनचाफा व कमळ या फुलांचा उल्लेख आढळतो. त्या अर्थी महाराष्ट्रात या पिकांची लागवड होत असावी. याशिवाय ज्ञानेश्वरीत नांगर व पाभर या अवजारांचा, आणि खुरपे, कोयता, कुऱ्हाड व कातरी या उपकरणांचा उल्लेख आढळतो. म्हणून ज्ञानेश्वरीत जमीन, पूर्वमशागत, बी–बियाणे, पेरणी, खते, तण, सिंचन, पिकांची वाढ, राखण, कापणी, मळणी, उफणणी व धान्याची साठवण या शेतीतंत्राचा उल्लेख आढळतो. ज्ञानेश्वरीत मधमाशापालनाचा उल्लेख आहे. शेतीसोबत शेतकऱ्यांनी व्यापारव्यवसायाची कास धरण्यास ज्ञानेश्वरांनी सुचविले आहे. केवळ शेती करणे तोट्यात येऊ शकते म्हणून शेतीबरोबर शेतकऱ्याने

दूधव्यवसाय व व्यापारउदीम केला, तर किफायतीमध्ये वाढ होऊन शेतकऱ्यांचे जीवनमान सुधारण्यास मदत होते, असे ज्ञानेश्वरांनी ७०० वर्षांपूर्वी सांगितले आहे. शेती करण्यास जमीन, नांगर, बी-बियाणे व भांडवल ह्यांचा आधार लागतो, तरच पुष्कळसा फायदा होतो. अन्यथा शेतकरी कर्जबाजारी होतो (कुळवाडी रिणे दाटली), ज्ञानेश्वरांनी कृषि-व्यवस्थापनाचे चार प्रकार सांगितले आहेत. काही जमीन-मालक स्वतःच्या मेहनतीने शेती करतात, तर काही शेतकरी बटाईने शेती कसण्यास कुळांना देतात, काही व्यापारी पडीत जमीन खरेदी करून मेहनत-मशागतीने जमीन सुपीक करतात आणि पिकांचे भरपूर उत्पादन घेतात. चौथा प्रकार म्हणजे 'कसेल त्याची जमीन' (काळभोर १९९८)

**२) अभंग गाथा –** संत तुकाराम स्वतःच शेतकरी होते आणि त्याबद्दल त्यांना अभिमान होता (बरा देवा कुणबी केले) त्यांनी स्वतःच्या अनुभवातून कृषिशास्त्राचे तत्त्वज्ञान आपल्या अभंगांतून लोकांना सांगितले आहे. अभंगाची भाषा इतकी सोपी आहे की, ती निरक्षर माणसालाही सहज समजते.

**संत तुकाराम म्हणतात**

शुद्ध बीजापोटीं। फळे रसाळ गोमटी।।
बीजापोटी पाहे फळ। विध न करिता सकळ।।
तया मूर्ख म्हणावे वेडे ।। कैसे तुटेल साकडे।।
बीज पेरे सेती। मग गाडेवरी वाहाती।।
वायां गेले ऐसें दिसे। लाभ त्याचे अंगी वसे।।
पाल्याची जतन। तरि प्रत्यया येती कण।।
बीजी फळाचा भरंवसा। जतनसिंचनासरिसा।।
चाळविलिया आशा। काकुळती ते नाड।।

**३) श्रीदासबोध –** 'मराठा तितुका मेळवावा। महाराष्ट्र धर्म वाढवावा।।' हे समर्थ रामदासांचे ध्येय होते. त्यासाठी त्यांची सतत भ्रमंती असे. या प्रवासात त्यांनी केलेल्या निरीक्षणाचे आश्चर्य वाटते. त्यांचे मदतीला सूक्ष्मदर्शक उपकरण नव्हते. समर्थ रामदास म्हणतात, ''रेणूहून सूक्ष्म किडे। त्यांचे आयुष्य निपटचि थोडे। युक्ति बुद्धि तेणेंचि पाडे। तयामध्ये।। ऐसे नाना जीव असती। पाहों जाता न दिसती। अंतःकरण पंचकाची स्थिती। तेथेंहि आहे।।

कीटक शास्त्राप्रमाणे समर्थ रामदासांचा वनस्पती शास्त्राचा अभ्यास दांडगा होता. उदाहरणार्थ, ''बीजे उदके अंकुरती। उदक नसतां उडोन जाती। येके ठाई उदक माती। होतां बरे।।

उत्तर भारतात मोगल साम्राज्यात शेतकऱ्यांची आर्थिक परिस्थिती हलाखीची होती. रयतवारी व जमीनदारी ह्या दोन्ही पद्धती शेतसारा वसुलीसाठी अस्तित्वात होत्या. रयतवारी पद्धतीत जमीन शेतकऱ्यांच्या मालकीची होती. ही मालकी वंशपरंपरागत चालत होती. पूर्ण शेतसारा भरल्यास त्याला जमीन विकता येत होती किंवा सावकाराकडे गहाण ठेवता येत होती. जमीनदारी पद्धतीत विस्तृत क्षेत्र जमीनदाराच्या मालकीचे होते. शेतकरी वहिवाटीने ती जमीन कसत होते आणि जमीनदारावर खंडणी देत होते. ही खंडणी दुष्काळात अन्यायाने वसूल करण्यात येत असे. जमीनदार शेतकऱ्याकडून वसूल केलेल्या पैशाचा विनियोग शेतीच्या विकासाकरिता न करता स्वतःच्या चैनीसाठी करत होते. शेतकरी दैन्यावस्थेत असताना प्रचंड किल्ले, मशिदी, महाल, राजवाडे व थडगी बांधण्यात आली. या तुलनेत महाराष्ट्रातील (मराठा साम्राज्यातील) शेतकरी सुखी होता. पण जमीन गंगेच्या खोऱ्याइतकी सुपीक नव्हती, पाऊस बेभरवशाचा होता, त्यामुळे शेतीचे उत्पन्न मोजके होते. पण शेतकरी कष्टाळू होते. सैन्यात चाकरी करीत होते. दुष्काळाशी सामना करत होते. मोगल सैन्य महाराष्ट्रात येऊन टोळधाडीप्रमाणे पिकांची नासाडी करत होते. कृत्रिम दुष्काळ पडत असे.

## पोर्तुगिजांचे योगदान

भारताशी व्यापार करण्याचे उद्देशाने वास्को-द-गामा भारताच्या कालीकत बंदरात २० मे १४९८ रोजी उतरला. गोव्यात व वसईला पोर्तुगिजांची वसाहत होती. पोर्तुगिजांच्या ताब्यात ब्राझील होते. तेथून पोर्तुगिजांनी अनेक नवीन पिकांचा प्रसार आफ्रिकेत व भारतात केला आहे. ब्राझील मूलस्थान असलेल्या भुईमुगाचा प्रसार पोर्तुगिजांनी पश्चिम आफ्रिका, भारत, चीन, इंडोनेशिया येथे केला आहे. पोर्तुगिजांनी तंबाखूचा प्रसार प्रथम विजापूरला आणि त्यानंतर दिल्ली येथे अकबराच्या दरबारात केला

आहे. ब्राझीलमधून आणलेला राजगिरा हिमालयात काश्मीर ते भूतान येथे लोकप्रिय झाला. त्यांनी ब्राझीलमधून आणलेला काजू दक्षिण भारतात स्थिर झाला. पोर्तुगिजांनी ब्राझीलमधून आणलेली मिरची संपूर्ण भारतात लोकप्रिय झालेली आहे. याशिवाय पोर्तुगिजांनी सोळाव्या शतकात ब्राझीलमधून भारतात पेरू, सीताफळ, रामफळ, अननस, चिकू व स्ट्रॉबेरी ही फळे आणली आणि घायपात आणला. पोर्तुगिजांनी गोव्यात आंब्याची कलमे तयार केली. त्यातून आंब्याची जगप्रसिद्ध जात 'आल्फान्सो' निर्माण झाली आहे. दक्षिण अमेरिका खंडातील चिली, व पेरू देशातील बटाटा ह्यांचा प्रथम युरोपात प्रसार झाला आणि तेथून सतराव्या शतकात बटाट्याने भारतात प्रवेश केला.

भारताच्या पारंपरिक आर्थिक, सामाजिक व धार्मिक विषयांत शेतीला महत्त्वाचे स्थान होते. आजही महाराष्ट्रात ६० टक्क्यांपेक्षा अधिक लोकांचा व्यवसाय शेती हाच आहे. प्राचीन काळापासून जलसिंचन व शेती या संदर्भात विचारमंथन झाले आहे. शिवकाळातील दुष्काळ पडलेल्या वर्षांत शेतकऱ्यांना दिलासा देण्याकरता योजना राबविल्या गेल्या. दुबार पीक घेण्याच्या दृष्टीने जलनियोजन कसे करता येईल, याचाही विचार झाला. परंतु दख्खनच्या जमिनी सुपीक नव्हत्या व पिकांना देण्यासाठी पुरेसे पाणी नव्हते. त्यामुळे मोसमी पाऊस पडला नाही, तर दुष्काळ हा ठरलेलाच असे. मराठ्यांनी लढाईत मिळविलेले यश शेतीच्या तुटपुंज्या उत्पादनामुळे टिकवता आले नाही.

ब्रिटिशांचे राज्य आल्यानंतर कृषी क्षेत्राचा विचार अर्थशास्त्रीय दृष्टिकोनातून व्हायला सुरुवात झाली. १८६० व १८७० या वर्षांतील दुष्काळामध्ये लॉर्ड मेयो यांना मध्यवर्ती कृषिखात्याच्या स्थापनेची गरज वाटू लागली. शेतकऱ्यांनी सुधारित पद्धतीने शेती करून उत्पादन वाढविणे व वाढलेले उत्पादन टंचाईच्या काळासाठी साठवून ठेवणे हा कृषिखात्याच्या धोरणाचा गाभा होता.

महात्मा फुले यांनी 'शेतकऱ्याचा आसूड' या निबंधामधून कृषी अर्थव्यवस्थेचे महत्त्व प्रतिपादिले असून कृषी अर्थव्यवस्था सुधारण्यात अनेक क्रांतिकारी बदल सुचवलेले होते.

ब्रिटिश इस्ट इंडिया कंपनीच्या कॉर्नवालिस या अधिकाऱ्याने लेखणीच्या एका फटकाऱ्यानिशी भारतीय शेती होत्याची नव्हती करून टाकली. 'परमनन्ट सेटलमेन्ट'द्वारे स्थानिक लोकांमधील एका वर्गाला कायम मालकी हक्काने जमिनी द्यावयाच्या व त्या प्रतिनिधींनी (जमीनदारांनी) दर वर्षी ठरलेला सारा मिळवून द्यावयाचा. पिके येवोत वा न येवोत. यामुळे भारतातील सुमारे दोन कोटी अल्पभूधारक शेतकरी त्यांच्या जमिनींपासून तोडले जाऊन गुलामगिरीत लोटले गेले. यामुळे वर्गविग्रहाचे बीजारोपण होऊन सामान्य जनतेत असंतोष निर्माण झाला होता. पीक कुठले घ्यायचे, याचेही स्वातंत्र्य नव्हते. त्यांच्यावर अत्याचार करायला अधिकारी फूस देत व सावकारी पाशात आवळले जाऊन शेतकरी कर्जबाजारी होऊन देशोधडीला कसे लागतील, यातच या अधिकाऱ्यांना स्वारस्य होते. १८५७ चा उठाव दडपून टाकल्यावर ब्रिटिश राणीने इस्ट इंडिया कंपनीचा कारभार काढून आपल्याकडे घेतला. मात्र मागील परिस्थितीत विशेष फरक पडला नाही.

लोकमान्य टिळकांनी शेतकऱ्यांची दैन्यावस्था, त्यांच्यावर लादले गेलेले कर, त्यांना मिळणाऱ्या अपुऱ्या सवलती, त्यांची सावकाराकडून होणारी पिळवणूक, मालास मिळणारी तुटपुंजी किंमत यांविषयी वेळोवेळी केसरीमधून लेख लिहून परखड मते मांडली होती.

इंग्लंडमधील कारखान्यास लागणाऱ्या कच्च्या शेतीमालाचे कापूस, नीळ, तंबाखू ह्यांचे भारतात उत्पादन करून इंग्लंडमधील कारखान्यांत तयार झालेल्या पक्क्या मालाची विक्री भारतात करण्याचे ब्रिटिशांचे शेतीधोरण होते. त्यामुळे त्यांनी या नगदी पिकांच्या संशोधनावर विशेष भर दिला होता. देशी कापसाऐवजी अमेरिकन कापसाच्या संशोधनाला प्रोत्साहन दिले. सिगरेटसाठी लागणाऱ्या व्हर्जिनिया तंबाखूच्या लागवडीस प्रोत्साहन दिले. अन्नधान्याला गौण मानल्याने त्याची सतत टंचाई होती.

* * *





मुखेड येथील बारव.

# जलव्यवस्थापन

■ डॉ. दि. मा. मोरे

**देशभरात मंदिराचे जाळे आहे. याला जोडून तलाव आहेत. या मंदिरांच्या शिखरांवर वा छतांवर पडलेले सर्व पाणी तलावांमध्ये साठविण्याची परंपरा अतिशय कुशलतेने अनेक ठिकाणी राबविली गेली असल्याचे आपणास दिसून येते. पाण्याजवळ मंदिर हा आणखी एक वेगळा धागा निर्माण झालेला आहे. पाणी हे देवाचे आहे, त्याची स्वच्छता राखणे हे आपले कर्तव्य आहे, पाणी प्रदूषित करू नये, पाण्यामध्ये पाय धुऊ नये असा संदेश पाण्याजवळच्या मंदिरांमुळे नकळत मिळतो.**

हजारो वर्षांपासून मानवी संस्कृती भारतभूमीत स्थिरावली आहे. बौद्ध काळ, रामायण, महाभारत, भारतभूमीत सातवाहन ते थेट इंग्रजांच्या गुलामगिरीतून स्वातंत्र्य मिळेपर्यंतच्या या कालखंडात अनेक स्थित्यंतरे झाली. सर्वच कालखंडांतील जल-इतिहास संप्रेषित करणारे पुरावे, अवशेष आपणास सापडतीलच असे नाही. साधारणतः इसवी सनाच्या सुरुवातीपासून पुढचा कालखंड बराच बोलका असणार आहे. हे पुरावे शिलालेखांच्या स्वरूपात असतील, भौतिक सांगाड्याच्या स्वरूपात असतील वा लिखित व शब्दबद्ध स्वरूपात असतील.

इतिहास काळामध्ये उदयास आलेल्या आणि विकसित झालेल्या त्या-त्या काळाच्या विविध गरजांची पूर्तता करण्यासाठी जलपुरवठ्याच्या ज्या नानाविध व्यवस्था निर्माण करण्यात आल्या, त्यावरून नजर फिरविताना असे निश्चितपणे दिसून येते की, त्यांच्या निर्मितीमध्ये एक निश्चित असे शास्त्र आहे. त्या व्यवस्थेने अभियांत्रिकी क्षेत्रात उल्लेखनीय अशी उंची गाठलेली आहे. बांधकामाची गुणवत्ता वादातीत होती. त्या वास्तूला हाताळणारी सामूहिक शक्ती ही समर्पित भावनांनी काम करणारी होती. उपभोक्ता समाज या व्यवस्थेवर कमालीचे प्रेम करत होता. राज्यकर्त्यांनी ज्या व्यवस्था सार्वजनिक सुखसोयींसाठी निर्माण केल्या, त्यांची नावे त्यांनी अनेक ठिकाणी **राणीची बारव** म्हणून

दिल्या. तुंगभद्रा नदीच्या काठावर हंपी या विजयनगरच्या राजधानीच्या ठिकाणी चारशे वर्षांपूर्वी बंधारे बांधून काढलेल्या कालव्यांची नावे **राया** कालवा, **बसवन्ना** कालवा, **बेल्ला** कालवा अशी आहेत.

आठव्या, नवव्या शतकापासून पश्चिमेकडून परकीयांची आक्रमणे या देशावर होत होती. नवव्या शतकात महंमद गझनी आला, गुजरात भागामध्ये लूट करून परत गेला. १२व्या शतकाच्या शेवटी पृथ्वीराज चव्हाणाचा महंमद घोरीकडून पराभव झाला. उत्तरेतील हिंदू राजघराणी मोडकळीस आली. १६व्या शतकाच्या सुरुवातीपासून मोगलांचा अंमल या देशावर सुरू झाला. नर्मदेच्या दक्षिणेकडे १३व्या शतकाच्या शेवटी यादवांचे राज्य नेस्तनाबूद झाले. पूर्ण भारत काही कालखंड वगळता .. (विजयनगरचे २५० वर्षांचे साम्राज्य आणि मराठी सत्तेची शंभर ते सव्वाशे वर्ष) परकीयांच्या अमलाखाली आला. हा परकीयांचा अंमल २०व्या शतकाच्या मध्यापर्यंत राहिला. जवळ-जवळ ६०० ते ७०० वर्षांचा कालखंड त्या अर्थाने पारतंत्र्यात गेला. ज्या वैभवशाली कालखंडामध्ये या लाखमोलाच्या जलव्यवस्था निर्माण झाल्या होत्या.

११व्या शतकात राजा भोज याने त्या काळचा सर्वांत मोठा तलाव जवळ-जवळ ६५००० हेक्टर जमीन पोटात घेऊन मध्य भारतातील बेतवा नदी अडवून तयार केला. आजदेखील त्या तलावाचे आक्रसित झालेले रूप भोपाळ शहराची व आजूबाजूच्या परिसराची तहान भागविण्याचे काम करत आहे. हे धरण तसे म्हटले तर मातीचे. याच तलावातून बाहेर काढलेले पाणी पाणचक्कीसाठी वापरून धान्य दळण्याची व्यवस्थापण त्या कालखंडात केली असल्याचे दिसते. या विशाल अशा जुन्या तलावाच्या मातीच्या पाळूला संरक्षण देण्यासाठी अस्तरीकरण केलेले आहे. हे अस्तरीकरण स्थापत्य अभियांत्रिकीमधील एक आश्चर्य म्हटले तर अतिशयोक्ती होणार नाही. अनेक ठिकाणी हे अस्तरीकरण न ढळता उभे आहे.

आत्ताच्या गुजरात भागात आपण जेव्हा फेरफटका मारतो, अनेक ठिकाणी अतिसुंदर अशा बारवा दिसतात. पाटण हे वाघेला-सोळंकी राजघराण्यांच्या राजधानीचे शहर असलेल्या ठिकाणी जगातील सर्वांत सुंदर असलेली सात मजली बारव आहे. या बारवेच्या प्रत्येक दगडावर एक सुंदर असे शिल्प कोरलेले आहे. या बारवेचे नावपण **राणीची बारव** असेच आहे. आजच्या अभियंत्याला ही वास्तू आव्हान करते. पाया कठीण खडकाचा नसताना या बारवेचे महाकाय असे वजन तळातील मातीने कसे तोलून ठेवले आहे, याचे उत्तर अनाकलनीय आहे. हेच कौशल्य कावेरीवरील वाळूवर उभ्या ठाकलेल्या चौलकालीन ग्रॅन्ड ॲनिकटच्या बांधणीत दिसून येते. एक आश्चर्यकारक वास्तुनिर्मिती (हायड्रॉलिक वंडर) करण्याचे कसब हे आगळेवेगळे आहे. ही राणीची बारव सार्वजनिक पाणी पुरवठा करण्याची सोय आहे. अशीच बारव, पण आकाराने लहान, शिंदखेड राजा या ठिकाणी पुतळा बारव म्हणून आपल्याला पाहावयास मिळते.

तलावाच्या काठावर, बारवाच्या वास्तूत, किल्ल्याच्या तटबंदीत अनेक ठिकाणी जलमहाल निर्माण करण्यात आले आहेत. हे महाल प्रेमाचे उत्तम प्रतीक आहेत. सोलापूर जवळील नळदुर्ग किल्ला हे जलमहाल अभियांत्रिकी शास्त्रातील एक उत्तम नमुना आहे. दिल्ली येथील हुमायून टोम्ब या किल्लेवजा वास्तूच्या परिसरात कालव्याच्या जलगती शास्त्राने उंची गाठलेली आहे. जलगती शास्त्रातील uniform flow म्हणजे काय? याची प्रचिती घ्यावयाची असेल तर त्यांनी यमुनेकाठच्या हुमायून टोम्बला भेट द्यावी.

मध्य प्रदेशामधील राजा भोजच्या धार या राजधानीच्या ठिकाणापासून जवळ असलेल्या मांडवगड व जयपूरच्या जयगड या ठिकाणी छतावरील जल संचय (roof water harvesting) हे किती कलात्मक रीतीने केले जाऊ शकते, याचे उदाहरण आहे.

विदर्भातील गौंड राजांनी भंडारा, चंद्रपूर, गडचिरोली या भागांत वैनगंगेच्या खोऱ्यात अनेक तलाव निर्माण केले. या निर्मितीसाठी त्यांनी उत्तर भारतातून कारागीर आणलेले होते, अशा नोंदी सापडतात. हे कारागीर कोहळी समाजाचे होते. आजपण आपेगाव या ज्ञानेश्वरांच्या जन्मस्थळाच्या परिसरात आपण फेरफटका मारला, तर काळ्या मातीत अतिशय लहान आकाराच्या १०० ते १२० सें.मी. व्यास असलेल्या खोल विहिरी एक विशिष्ट कारागिरांचा गट दीड ते दोन महिन्यांमध्ये एक विहीर याप्रमाणे करतो. फलटण

परिसरातपण आपल्याला हेच दिसून येते. पूर्वीच्या काळी अशा विहिरी वीट बांधकामात अस्तरीकरण केलेल्या असायच्या. आता सिमेंट काँक्रीटचे कडे घातले जातात. ६० से.मी. आकाराच्या खोल विहिरी आपल्याला मराठवाड्यामध्ये आंबाजोगाई, परळी, बीड इत्यादी ठिकाणी पाहावयास सापडतात. या विहिरी बांधीव आहेत. येवढ्या लहान आकाराच्या विहिरी इतक्या खोलीपर्यंत कशा खोदल्या गेल्या आणि बांधल्या गेल्या, याचे उत्तर आपल्याला या कुशल कारागिरांच्या गटाकडून मिळते.

**जलव्यवस्थापनातील लोककौशल्य**

जल व्यवस्थापनाची वेगवेगळी साधने म्हणजे अभियांत्रिकी क्षेत्रातील मानवनिर्मित उत्कृष्ट कलाकृती भारतभर आहेत. या साधनांमध्ये वास्तूसौंदर्य आहे. या भौतिक सौंदर्याबरोबर आणि अभियांत्रिकी उंचीबरोबरच त्या साधनांमध्ये काळाबरोबर वाटचाल करण्याची क्षमता होती. याचे गमक त्या व्यवस्था हाताळण्यातील सोपेपणात आहे.

या सर्व व्यवस्था/साधने लोकांनी निर्माण केलेल्या होते. या व्यवस्थेची रचना व मांडणी अतिशय आकर्षक आहे व अपवाद न वगळता या साधनांच्या रचनेमध्ये सारखेपणा (symmetry) आहे. आणि म्हणून हजारो वर्षांच्या कालखंडातपण भूकंप, वादळ, पूर यांसारख्या नैसर्गिक आपत्तींना तोंड देत त्या वास्तू न ढळता उभ्या आहेत.

नळदूर्गचा जलमहाल, मदुराईचे मिनाक्षी मंदिर, हंपी येथील राणीचे स्नानगृह (queens' bath), पाटण येथील राणीची बारव, बहादूरगड येथील झेलमोट, बाळापूर अकोला येथील बागबारव या वास्तू हजारो वर्षांपासून उभ्या आहेत. रचनेतील वैशिष्ट्यांबरोबरच त्यांच्या निर्मितीसाठी वापरलेल्या साहित्याची गुणवत्ता आणि कारागिरांचा कुशलपणासुद्धा वाखाणण्यासारखा असणार.

जीवन समृद्ध करण्यासाठी इतिहास काळापासून जलव्यवस्थापनेतील वेगवेगळ्या प्रकारची साधने वेगवेगळ्या कालखंडांत निर्माण करण्यात आली.

गेल्या दोन-अडीच हजार वर्षांच्या कालखंडात या व्यवस्था निर्माण झाल्या, त्या कालखंडातील समाजाला, लोकसमूहाला, कारागिरांना भूगोलाचे ज्ञान होते. त्यांना जलविज्ञान माहीत होते, त्यांना हवामान शास्त्र माहीत होते. त्यांना जलगती शास्त्र येत होते. सायफनचे तत्त्व माहीत होते. भूस्तर ओळखण्याची ताकद त्यांच्यात होती. भूगर्भशास्त्र त्यांना माहीत होते. भूजलाची निर्मिती कशी होते व त्याच्या वापरासाठी कोणते गणित पाळावे लागते, याची त्यांना जाणीव होती. आणि म्हणूनच कोणत्याही आडाचे पाणी आटत नसे. कारण त्या आडाला पाणी पुरवठा करणाऱ्या साधनांची काळजी कशी घ्यावी, याचे ज्ञान त्यांच्याकडे होते. वाडा तेथे आड हे तत्त्व त्यांनी सार्वत्रिकपणे राबविलेले होते.

घराच्या छतावरील पाणी वाड्यात घेऊन त्याला जमिनीमध्ये मुरू देऊन, भूगर्भात पाण्याचा साठा करून त्याद्वारे स्वच्छ व टिकाऊ पाणीपुरवठा करणाऱ्या या व्यवस्थेला तोड नसावी. महाराष्ट्रातील बीड, वाशी या ठिकाणच्या आडांची घनता जास्त आहे. अशा गावांचा अभ्यास करण्याची गरज भासते. त्या समाजाने तलावांची पूजा केली, विहिरींची पूजा केली, दरवर्षी तलावातील, विहिरीतील गाळ काढून व तो शेतीत वापरून हलक्या जमिनीची सुपीकता वाढविली. याचे शिक्षण त्यांनी मागच्या पिढीकडून मिळविले. दरवर्षी पावसाळ्यापूर्वी सामूहिक शक्तीद्वारे तलावांतील, आडांतील गाळ काढण्यात येत असे. यासाठी लागणाऱ्या श्रमरूपी भांडवलाची विभागणी होत असे. घरटी एक माणूस हे त्यांचे गणित होते. तलावातील गाळ मात्र ज्याच्या त्याच्या इच्छेनुसार सामर्थ्यानुसार काढून घेऊन जाण्याची मोकळीक असे. हे काम पिढ्यान्‌पिढ्या चालत राहिले. यासाठी कोणत्याही कायद्याची गरज भासली नाही. कर्नाटकात अगदी अलीकडच्या काळात आणि काही ठिकाणी आजसुद्धा जुन्या तलावातील गाळ लोक स्वेच्छेने काढून घेऊन जातात आणि तलावाची क्षमता वाढवतात. कुंभार या बलुतेदारांनी हा गाळ काढून घ्यावा, असेपण अपेक्षित होते.

या देशामध्ये पाण्याची स्वयंपूर्णता आणण्यासाठी आड, विहीर, बारव, पुष्करणी, कुंड याची रेलचेल करण्यात आलेली आहे, असेच म्हणावे लागेल. एक शास्त्र त्यांनी पाळले आणि ते म्हणजे पुरर्भरणाच्या गुजरातमधील पाटण

येथील सात मजली राणीच्या बारवेला बारमाही करण्यासाठी लगतच सहस्रलिंग तलाव निर्माण केलेला आहे. सरस्वती नदीचा प्रवाह या तलावात आणलेला आहे. पुनर्भरणाच्या साधनाविना (तलाव, नदी, नाला) बारव, विहीर, आड यांची निर्मिती म्हणजे अपवादच असेल. परभणी जिल्ह्यातील पिंगळी येथील बारव ओढ्यालगत आहे. चारठाणा येथील बारवेस वरच्या भागातील तलावाद्वारे पुनर्भरण केले आहे. त्या काळात सिंचनपण मोठ्या प्रमाणावर भूजलावर अवलंबून होते. शेतातील विहिरीला शेतातील तलावाचा आधार देणे, हे त्यांना जमलेले होते.

मातीचे धरण, दगडी धरण, दगडी बंधारे, कालवे, बोगदे, इत्यादी व्यवस्था निर्माण करण्याची कला व शास्त्र त्यांच्याकडे पारंपरिक पद्धतीने आलेले होते. सिंचनासाठी पाण्याचा वापर, घरगुती वापरासाठी, पिण्यासाठी वेगळे पाणी, यांत्रिकी शक्तीसाठी (पाणचक्की), मनोरंजनासाठी, तापमानासाठी, स्वच्छतेसाठी, पर्यावरणासाठी, संरक्षणासाठी, सैन्यासाठी, वाहतुकीसाठी, फळाच्या व फुलांच्या बागा फुलविण्यासाठी, अशा विविध उपयोगांसाठी त्या समाजाने कौशल्य वापरून पाणी उपलब्ध करून घेतले. पाणी शुद्ध करण्याचे शास्त्रपण त्यांनी समजून घेतले होते. कंधार येथील जगतुंग समुद्र आणि मांडवगड येथील राणी रूपमतीचा महाल या ठिकाणी राबविलेल्या जलशुद्धीकरणाच्या व्यवस्था आजपण त्याच्या तेथील अवशेषांवरून दिसून येतात. माती आणि पाण्याचे संधारण करून पाणलोट क्षेत्राचा विकास घडवून आणणे, हेदेखील त्यांना जमले होते. किंबहुना त्याचा वापर ते सार्वत्रिकपणे करीत होते, हे आपणास सिंदखेड राजा, शिखर शिंगणापूर इत्यादी ठिकाणच्या जुन्या अवशेषांवरून सहजपणे लक्षात येते.

तलावाची मालिका निर्माण करणे, बंधाऱ्याची मालिका निर्माण करणे याचे कसब त्यांच्याकडे होते. कालव्यावर पूल बांधणे, सायफन पद्धतीने पाणी दुसऱ्या नदी-खोऱ्यात वळविणे हे शास्त्रदेखील त्यांना जमत होते. पाणी वाटपातील न्यायीपणा त्यांनी कृतीमधून व्यवहारात आणला होता. फड पद्धतीचे सिंचन, कोल्हापूर येथील पंचगंगा नदीवरील सिंचन, ही त्याची काही उदाहरणे आहेत. नदी वळविणे, नद्या जोडणे हा विषयदेखील त्यांना नवीन नव्हता. औरंगाबाद येथे बायजाबाई या महिलेने बायजीपुरा या जुन्या वस्तीस पळशी या गावातून पळशी नदीवर बंधारा बांधून सुखना या नदी-खोऱ्यातून खांब नदीच्या खोऱ्यात भूमिगत कालव्याद्वारे पाणी आणल्याचे उदाहरण आजपण आपण डोळ्याने पाहू शकतो. आणि म्हणून inter basin transfer, inter linking of rivers हा विषय त्यांना नवीन नव्हता, असेच म्हणावे लागेल.

जमिनीमध्ये बोगदे खोदण्याचे शास्त्र उत्तमपणे हाताळले गेले होते, असे अनेक ठिकाणच्या उदाहरणांवरून आपणास दिसून येते. फड पद्धतीच्या बंधाऱ्यासाठी मऊ मातीतपण बोगदे खोदून पाणी वाहून घेऊन जाणाऱ्या व्यवस्था आपल्या डोळ्यांपुढे आहेत. त्या हजारो वर्षांपासून आजपर्यंत कार्यरत आहेत. औरंगाबाद येथे थत्ते नहरीसाठी मराठवाडा विद्यापीठाच्या जवळील टेकडी ७०-७५ फूट खोल खोदलेली दिसते. नहर बांधल्यानंतर तो खोदलेला भाग परत भरून कालवा शास्त्रातील cut and cover हे तंत्र त्यांनी शेकडो वर्षांपूर्वी राबविलेले दिसून येते. शहरातील पाणीपुरवठा हा बंद नलिकेतून, भूमिगत कालव्यातून केला जात असे. या नलिकांना नियंत्रणासाठी कोठेही व्हॉल्व्ह (Valve) बसविलेला नव्हता. सकाळी आणि संध्याकाळी पाण्याचा वापर जास्त होतो. मधल्या काळात आणि रात्री या भूमिगत कालव्यातून, नलिकेतून अविरतपणे वाहणारे पाणी वाया जाऊ नये म्हणून शहरामध्ये हौदांचे जाळे निर्माण केलेले होते. औरंगाबाद शहरात असे अनेक हौद असावेत. हौदांची रचना बांधकाम वास्तुकलेचा उत्तम नमुना होती. नहरेअंबरी म्हणून प्रसिद्ध असलेल्या नहरीचा शेवट शहागंज येथील विस्तीर्ण अशा हौदात केला आहे. या हौदात भूमिगत नहरीतून आणि नलिकेतून आलेले पाणी मधल्या काळात (non peaking hours) साठविले जात असे. कालव्याचे, नलिकेचे बांधकाम दगड-विटांमध्ये केलेले आहे. काही नलिका दगडातपण कोरलेल्या आहेत. हिमाचल प्रदेशामध्ये झऱ्याचे पाणी वळविण्यासाठी बांबूचा वापर नलिका म्हणून केलेला आहे. कालव्यासाठी जलसेतूपण बांधलेले आहेत. आग्रा येथील ताज जलसेतू हा रोमन जलसेतूच्याही पुढे एक पाऊल

टाकतो. शिरोंचा जवळील बामणी या गावाच्या शिवारात लोक-सहभागातून निर्माण केलेल्या कालव्यासाठी झाडाचा बुंधा कोरून त्याचा वापर जलसेतू म्हणून करून आजपण सिंचन करीत असल्याचे दिसून येते. याचाच अर्थ असा होतो की, जे साहित्य स्थानिकरीत्या उपलब्ध असेल, त्याचाच वापर करून जलव्यवस्थापनातील गरजा भागविण्याला अग्रक्रम दिलेला होता. कोकणाच्या आणि सह्याद्रीच्या परिसरात मोठ्या प्रमाणात झऱ्यावर सिंचन केले जाते. बाष्पीभवनापासून पाण्याचे संरक्षण करण्यासाठी अनेक ठिकाणी विहिरी झाकलेल्या दिसतात. पुण्याजवळ धायरी येथे पुणे शहराला पाणी पुरवठा करणारी विहीरही झाकलेली आहे. मांडवगड येथील विहिरीचे नावच अंधेरीबाव असे आहे. नाशिक-मुंबई रस्त्यावर इगतपुरी येथे कलात्मक पद्धतीने विहीर झाकलेली आहे.

करमाळा येथे सात विहिरींची विहीर आहे. कोकणातील महाड येथील चवदार तळे चौदा विहिरींचे तळे आहे. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस अमृतसर शहराला पाणीपुरवठा करण्यासाठी चाळीस विहिरी एकाच ठिकाणी निर्माण केलेल्या आहेत. या विहिरींच्या समूहाला **चालीस कूं** या नावाने संबोधले जाते. या विहिरींना सोयपण केलेली दिसून येते. बुऱ्हाणपूर हे तापी नदीच्या काठावर वसलेले शहर आहे. या ठिकाणी १०० विहिरींची विहीर असल्याचे लोकांच्या आठवणीत आहे. या विहिरी म्हणजे सातपुडा पर्वताच्या पायथ्यातून काढलेल्या भूमिगत कालव्यावरील टॉवर्स (air vents) आहेत. याचा व्यास ३ ते ४ फुटांचा आहे. हवेचा पुरवठा करण्यासाठी, नियमितपणे गाळ काढण्यासाठी (desilting) या विहिरींचा उपयोग केला जात असे. भुईकोट किल्ल्याच्या खंदकाचा वापर साधन म्हणून करण्याचे कौशल्य त्या काळात रुजलेले होते. त्या-त्या ठिकाणच्या भौगोलिक परिस्थितीप्रमाणे खंदक भरण्यासाठी नदी, सिंचनाचा कालवा, तलाव, सांडवा इत्यादींचा वापर अतिशय कलात्मक पद्धतीने केल्याचे त्यांच्या अनेक ठिकाणच्या अवशेषांवरून दिसून येते. काही ठिकाणी या खंदकांची रुंदी वाढवून जलाशयपण निर्माण केलेले आहेत. धारूर येथील किल्ला आणि नळदुर्गाचा किल्ला ही त्याची उदाहरणे आहेत. धारूरच्या किल्ल्यात एका बाजूला **गोडी दिंडी** आणि दुसऱ्या बाजूला **खारी दिंडी** अशा नावाने खंदकातच पाण्याचे साठे निर्माण केलेले आहेत. बिदर येथील जवळ-जवळ ५०० एकर परिसरात पसरलेल्या भुईकोट किल्ल्यास तिहेरी खंदकांची सोय केलेली आहे. जगातील असे हे एकमेव उदाहरण असावे. हैद्राबाद शहराला जुन्या काळी बुलकापूर या मुसा नदीवरील तलावातून जवळ-जवळ बावीस किलोमीटर लांबीच्या कालव्याद्वारे पाणीपुरवठा केला जात असे, असे कळते. हा कालवा सध्याच्या हुसेन सागर या तलावात पाणी ओतत असे. बावीस किलोमीटरचा प्रवास करीत असताना वाटेतील सर्व गावांना पाणीपुरवठा करण्याची व्यवस्था त्या काळी करण्यात आलेली होती. ही व्यवस्था जलव्यवस्थापनातील सामाजिक आणि समन्यायी अंगाला स्पर्श करते.

पाण्याची स्वच्छता राखण्यासाठी, शत्रूपासून पाण्याचे संरक्षण करण्यासाठी, पाण्याला बाष्पीभवनापासून दूर ठेवण्यासाठी, देखभाल दुरुस्तीचा खर्च कमी करण्यासाठी, शहराचा पाणीपुरवठा हा भूमिगत कालव्यांद्वारे वा नलिकांद्वारे केलेला दिसून येतो. या नलिकांनी वाटेतील नदी, नाला ओलांडताना इनव्हरटेड सायफनची मदत घेतलेली आहे. विदर्भामध्ये तुमसर परिसरात आष्टी या गावी विहिरीवर दगडाची जाळी ठेवलेली आहे. ही विहीर रस्त्याला लागून आहे, असे समजते. पोहऱ्याने पाणी काढण्यापुरतीच व्यवस्था हा या पाठीमागचा उद्देश असावा.

विदर्भातील वैरागड या किल्ल्याच्या खंदकातील पाण्याचा वापर सिंचनासाठी केल्याचे दिसते. कोकणामध्ये नारळाच्या आणि पोफळीच्या बागा सुंदर अशा पाटचाऱ्या बांधून लोक अनेक वर्षांपासून करतात. भौगोलिक परिस्थिती ज्या पद्धतीने साथ देईल; त्या पद्धतीने गिरीदुर्ग, जलदुर्ग, वनदुर्ग, स्थलदुर्ग इत्यादींची निर्मिती करण्यात आलेली दिसते.

नदीचे पाणी धरण बांधून अडविले. वरच्या भागात पाणी व खाली नदीचे पात्र कोरडे. कालव्याद्वारे दूरच्या क्षेत्राला पाणी, पण जवळचे नदीपात्र कोरडे असा सुटासुटा विचार, प्रश्न निर्माण करतो. दुजाभाव व सामाजिक अस्वस्थता पेरतो. समाजबांधणीसाठी हे पूरक नाही. कावेरीवरील कालवे नदी आणि कालवे अशी दुहेरी भूमिका वठवितात.

मध्य प्रदेशामध्ये खजुराहो परिसरात रस्त्याच्या भरावाचा उपयोग धरणाची भिंत (तलाव निर्मितीसाठी) म्हणून केलेला आहे. धारूर येथील खाऱ्या दिंडीला, धारूर गावाच्या परिसरातून पाणी येते. त्या पाण्यातील गाळ, कचरा दिंडीमध्ये येऊ नये म्हणून, पाणी गाळण करण्याची (जलगती शास्त्राचा उपयोग करून) व्यवस्था केली गेल्याचे दिसून येते. ही व्यवस्था **'trash rack'** म्हणून काम करीत असावी.

विदर्भात वैनगंगा नदीचा प्रवाह वळवून पवनी किल्ल्याच्या खंदकात पाणी घेतले आहे. या किल्ल्याची तटबंदी मातीच्या भरावावर निर्माण केलेली आहे. त्या तटबंदीला आजतागायत तडे गेलेले नाहीत. भराव, तोपण मातीचा, किती शास्त्रीय पद्धतीने दबाई करून केलेला असावा, याची आपण कल्पना करू शकतो. खडक खोदून तलाव निर्माण करण्याची परंपरा याच काळात वेगवेगळ्या ठिकाणी रुजलेली दिसते. साधारणतः किल्ल्यावर अशा तलावांची निर्मिती जास्त प्रमाणात झालेली आहे. गुहा, लेणी, घाट अशा ठिकाणीपण खडक खोदून पाणी साठविण्याच्या व्यवस्था निर्माण केलेल्या आहेत. नाणेघाट म्हणजे पश्चिमेकडे व्यापार करणारा मार्ग. या ठिकाणीपण अशा टाक्या आपणास पाहावयास मिळतात. असे म्हटले जाते की, गुहा व लेण्या हे अशा मार्गांवर निर्माण केलेली विश्रामगृहे होती. व्यापारासाठी जेव्हा घोडे, उंट, बैलगाडी यांचे थवे घेऊन लोक प्रवास करीत असत, तेव्हा त्यांना थांबण्यासाठी डोंगरांमध्ये कोरलेल्या या वास्तूंचा वापर धर्मशाळेसारखा होत असावा. त्यांना पिण्याच्या पाण्याची व्यवस्था म्हणून डोंगरात पाझरणारे पाणी टाक्यांमध्ये साठवून ते वर्षभर वापरण्याची ही एक व्यवस्था होती. शत्रूच्या आक्रमणापासून संरक्षण करण्यासाठी मनुष्यवस्त्या ह्या डोंगरांच्या पोटात, डोंगरांवर असत. डोंगरी किल्ले हे त्याचे एक उदाहरण आहे. किल्ल्याला संरक्षण देण्यासाठी तटबंदीची, किल्ल्यावर वास्तव्य करण्यासाठी महालांची, बाजारपेठांची, मंदिरांची निर्मिती करणे हे ओघानेच आले. पाण्याचे साठे निर्माण करण्यासाठी तलाव बांधण्याची गरज होतीच. मातीचे बांध असलेल्या तलावांसाठी, दगडी अस्तरीकरणासाठी दगडांची गरज असणारच.

हा सर्व दगड डोंगरावर, घाटातून खडक खोदून काढला जात असे. दगड मोठ्या प्रमाणावर लागत असे. यामुळे डोंगराच्या पृष्ठभागावर वा घाटात वा पोटात दगडाच्या खाणी निर्माण करून या खाणींचे रूपांतरण अतिशय कल्पकतेने तलाव निर्मितीसाठी केलेले आढळते. रायगडावरील गंगासागर हा तलाव खाणीतून निर्माण केला गेला आहे. सिंहगड, पुरंदर, तोरणा, अशिरगढ, पावागड, अंकाई-टंकाई इत्यादी डोंगरी किल्ल्यांवर मोठ्या प्रमाणावर खडक तासून पाण्याची टाकी निर्माण केलेली आहेत. आजपण ते अस्तित्वात आहेत. खडक फोडणे, त्यातून पाण्याचे साठे निर्माण करणे; हे तसे जास्त कष्टाचे आणि खर्चीक असते. वर वर्णन केलेल्या दुहेरी वापरासाठी, हेतूसाठी, अशा टाक्यांची निर्मिती किफायतशीर ठरली असावी. केवळ पाणी साठविण्यासाठी म्हणून खडकामध्ये टाके निर्माण करणे ही बाब आर्थिकदृष्ट्या न परवडणारी आहे. त्याची गरजपण नाही. यातील बारकावा सध्याच्या काळात शिवकालीन पाणीपुरवठ्याच्या व्यवस्था राबविताना लक्षात घेण्यासारखा आहे. अन्यथा खर्च वाया जातो.

पाणी उचलण्यासाठी रहाटगाडग्याचा वापर सररासपणे होत असे. वाई येथील मोतीबागेतील रहाटगाडगे आजसुद्धा आपणास पाहावयास मिळते. विजेची उपलब्धता वाढली आणि या जुन्या खर्च न कराव्या लागणाऱ्या व्यवस्था नामशेष झाल्या; ही मोठी चूक झाली, असेच म्हणावे लागेल. सर्वच कारणांसाठी विजेचा वापर हा आर्थिकदृष्ट्या आणि उपलब्धतेच्या दृष्टीनेपण परवडणारा नाही. जिथे शक्य असेल त्या ठिकाणी अशा जुन्या साधनांना परत वापरात आणावयास पाहिजे. काळ त्याचे उत्तर देईल. अलीकडे बऱ्याचशा ठिकाणी रसवंतीगृहे बैलाच्या शक्तीने चालविली जात आहेत. बैलाच्या मोटेने पाणी उचलण्याची व्यवस्थापण कार्यान्वित होण्यास काहीही हरकत नसावी. या देशामध्ये पशुधन फार मूल्यवान आहे. एक बैलजोडी म्हणजे साधारणतः एक अश्वशक्ती (horse power) या गणिती हिशोबाने या पारंपरिक व्यवस्थेचा वापर आपण करू शकतो.

देशभरात मंदिराचे जाळे आहे. याला जोडून तलाव आहेत. या मंदिरांच्या शिखरांवर वा छतांवर पडलेले सर्व

पाणी तलावांमध्ये साठविण्याची परंपरा अतिशय कुशलतेने अनेक ठिकाणी राबविली गेली असल्याचे आपणास दिसून येते. पाण्याजवळ मंदिर हा आणखी एक वेगळा धागा निर्माण झालेला आहे. पाणी हे देवाचे आहे, त्याची स्वच्छता राखणे हे आपले कर्तव्य आहे, पाणी प्रदूषित करू नये, पाण्यामध्ये पाय धुऊ नये असा संदेश पाण्याजवळच्या मंदिरांमुळे नकळत मिळतो. याचा वापर इतिहासकाळात सररासपणे करण्यात आलेला दिसून येतो. मंदिराचा दुसरा वापर हा छतावरील पाणी साठविण्यासाठीपण केलेला आहे. मदुराई येथील मिनाक्षी मंदिर हे त्याचे एक उत्कृष्ट उदाहरण आहे. अशाच प्रकारची व्यवस्था हिमाचल प्रदेश, तामिळनाडू, केरळ, गुजरात, राजस्थान या ठिकाणीपण आपणास पाहावयास मिळते. अनेक तलावांना temple tank या नावानेच संबोधिले जाते.

गोंड राजाच्या कारकिर्दीत बल्लारशहा किल्ला वर्धा नदीच्या काठावर वसविलेला आहे. किल्ल्याची तटबंदी वर्धा नदीला खेटून आहे. शेकडो वर्षांपासून ही नदी या किल्ल्याला घासून जाते. किल्ल्याची तटबंदी स्थिर आहे. किल्ल्याचा दगड निखळलेला नाही. या किल्ल्यामुळे वर्धा नदीच्या पात्राला वळण मिळालेले आहे आणि त्या अर्थाने बल्लारशहा या ऐतिहासिक ठिकाणाचे नदीच्या पुरापासून संरक्षणपण झाले आहे. नदी सुरक्षितपणे कशी वळवावी (river training) याचे **बल्लारशहा किल्ला** म्हणजे एक उत्तम उदाहरण आहे, असेच म्हणावे लागेल.

जलव्यवस्थापनातील अनेक वास्तूंची रचना ही अचूक आहे. symmetrical बांधकाम आहे. चंद्रपूर किल्ल्यात गोंड राजवटीचे समाधिस्थळ आहे. त्या ठिकाणी आपण वावरलो तर आपणास असे लक्षात येईल की, त्या ठिकाणच्या इमारती या बांधकामातील उत्तम नमुने आहेत. नदीवर बांधली गेलेली धरणे, जमिनीवर निर्माण केलेले कालवे, यांमध्ये अचूकता होती. सातारा शहरासाठी कास तलावावरून, २२ किलोमीटर अंतर कापून अतिशय कठीण अशा सह्याद्रीच्या रांगांमधून कालवा काढलेला आपणास दिसून येतो. त्या काळी सर्वेक्षणाची साधने, तुटपुंजी असतानापण या व्यवस्था कशा निर्माण केल्या असाव्यात, याची फक्त कल्पना केलेलीच बरी. याच कालव्यावर सातारा शहराजवळ सह्याद्रीच्या रांगेचा उंचीचा फायदा घेऊन त्या काळामध्ये (विसाव्या शतकाच्या सुरुवातीला) एक लघू विद्युत गृह (५० कि.वॅ. ×२) निर्माण केल्याचे दिसून येते. याच कास तलावाचे पाणी पुढे सातारा शहरात भूमिगत कालव्याच्या मदतीने पिण्याच्या पाण्यासाठी खेळविलेले आहे, हे आजपण त्या ठिकाणच्या अस्तित्वात असलेल्या अवशेषांवरून दिसून येते.

अहिल्याबाई होळकर, राणी प्रभावती देवी, राणी दुर्गावती अशी अनेक उदाहरणे आपणास महिलांच्या सहभागाविषयी देता येतील. छतावरील पाणी साठविण्याची व्यवस्था पाहणारी ही घरातील महिलाच आहे. या इतिहासकालीन व्यवस्था हाताळण्यास सोप्या होत्या, परवडणाऱ्या होत्या, स्थानिकरीत्या दुरुस्त करण्यासारख्या होत्या. बोजड, अवघड, न समजणारे तंत्रज्ञान अंतर्भूत असलेल्या व्यवस्था ग्रामीण लोकांवर लादणे म्हणजेच त्या व्यवस्थेला लवकरच पूर्णविराम देणे, असा याचा अर्थ निघतो असाच अनुभवपण आहे. स्वातंत्र्यानंतर आपण ज्या पद्धतीने पाण्याचा प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न केला त्यातून याचे प्रत्यंतर मिळते. इतिहासातून आपण शिकावयास पाहिजे. व्यवस्था मग ती ग्रामीण असो वा शहरी, हाताळण्यास सोपी असण्याची गरज आहे.

गाव त्या ठिकाणी तलाव, त्या ठिकाणी मंदिर, त्या ठिकाणी आड, विहीर आणि याबरोबरच पर्यावरणाचा समतोल राखण्यासाठी गावाच्या जवळच देवराया निर्माण केल्याची उदाहरणेपण आपण पाहू शकतो. या देवराया म्हणजे वृक्षांचे आगर जागोजागी आहेत. हे वृक्ष म्हणजे देवाचे वृक्ष. ते कोणीही तोडू नये. तोडणे म्हणजे पाप करणे, हा भाव त्या काळी लोकांमध्ये रुजविला गेला. यामुळे हजारो वर्षांपासून असे वृक्षांचे पुंजके, देवरायांच्या स्वरूपात सध्याच्या प्रतिकूल परिस्थितीतपण शिल्लक राहिलेले आहेत. यातून खूप मोठे तत्त्वज्ञान बाहेर येते. समाज बांधणीसाठी लोकांच्या भावना वापरण्याची गरज आहे, हा यातील खोलवरचा विचार आहे.

पिण्याच्या पाण्यासाठी जे तलाव निर्माण केले, त्या तलावांतील पाण्याची शुद्धता राखणे हा एक मोठा प्रश्न असतो, तलावांतील पाणी जर प्रदूषित केले, तर ते

आरोग्याला हितकारक राहत नाही. शुद्धीकरणासाठी जास्त प्रयास करावा लागतो, खर्च जास्त येतो. यावर मात करण्यासाठी म्हणून पूर्वीच्या काळी काही ठिकाणी प्रदूषित पाणी तलावात येऊ नये म्हणून अतिशय कल्पकतेने व्यवस्था केलेल्या आहेत. अशीच एक व्यवस्था पुणे येथे कात्रज घाटाच्या पायथ्याशी कात्रज तलावाच्या बाबतीत दिसून येते. तलावाच्या पाणलोटात पडलेले पावसाचे **पहिले पाणी** पृष्ठभागावरील घाण बरोबर घेऊन येते, म्हणून ते पाणी तलावात न घेता बाजूने काढून खालच्या बाजूला नदीमध्ये वळविण्यात आले आहे. दुसरा पूर हा तलावात घेतला जातो. अशी दुहेरी दरवाजे असलेली व्यवस्था आपणास कात्रज या ठिकाणी पाहावयास मिळते. त्या समाजाने किती वेगळा विचार केला आहे, हे यातून आपणास दिसून येते. हा विचार राबविण्यासपण सोपा आहे. छतावरील पाणी साठविण्याच्या व्यवस्थेमध्येसुद्धा छतावर पडलेले पावसाचे **पहिले पाणी** टाक्यामध्ये साठवीत नाहीत. ते बाहेर वाहून जाऊ दिले जाते. या ठिकाणीसुद्धा हाच भाव आहे.

पाणी वाटपात लोकशाही असण्याची गरज आहे, लोकांच्या सहभागातून लोकशाही निर्माण होते. तापी खोऱ्यातील फड पद्धतीच्या व्यवस्थेत, विदर्भातील गोंडकालीन तलावाच्या व्यवस्थेत देशभरातील वेगवेगळ्या राज्यांतील इतिहासकालीन तलावांच्या पाणी व्यवस्थापनात लोकसहभागाचे आणि लोकशाहीचे तत्त्व अंगीकारले होते.

वाकाटाकाची राजधानी नगरधन. नागपूरपासून जवळच असलेला हा भाग पाण्याने श्रीमंत आहे. या राजवटीने प्रदीर्घ काळ संपूर्ण देशावर राज्य केले आहे, असे म्हणण्यास हरकत नाही. गुप्ता घराण्यातील कन्या आणि वाकाटाकाची सून, राणी प्रभावती, हिनेपण अडचणीच्या काळात राज्यशकट समर्थपणे चालविलेले आहे. या राणीच्या कालावधीत विदर्भामध्ये तलावांची निर्मिती झाली असल्याचे पुरावे आहेत.

नगरधन हे शहर लहान आहे. आजपण त्या ठिकाणी सोन्याचा व्यापार चालतो. रामटेकजवळ तलावाच्या मालिकेतून **खाण्याची पाने** पिकवून त्याचा मोठ्या प्रमाणावर व्यापार केला जात असे. अलीकडच्या काळात पीकपद्धतीत बदल झालेला आढळतो. सुपीक जमीन, भरपूर पाणी आणि त्यातून समृद्धी हे वाकाटाकाच्या कालावधीचे वैशिष्ट्य आहे. राजधानी म्हटल्यानंतर वस्ती करण्यासाठी जास्त जागा लागते. या परिसराचे अवलोकन केल्यानंतर असे दिसून येते की, किल्लापण मोठा नाही, आणि जवळपास कोणतेही जुने शहर नाही. अलीकडेच त्या नगरधनच्या भोवतालच्या उत्खननामध्ये असे दिसून येत आहे की, सर्व वस्त्या टेकड्यांवर होत्या. उत्खननामध्ये महाल, मंदिरे, या वास्तू दिसून येत आहेत. यावरून असे अनुमान काढता येते की, आसपासची जमीन सुपीक व बागायती असल्यामुळे त्या राजवटीने अशा सुपीक जमिनीवर मनुष्यवस्ती पसरू दिली नाही. ज्या जमिनीवर पीक येत नाही, डोंगराळ आहे, उंचवट्याचा भाग आहे अशा ठिकाणी वस्त्या करण्यास प्रोत्साहन दिलेले आहे. कालिदासाचे वास्तव्य रामटेकवर होते. यानंतरचा संस्कृत कवी, **कवी भवभूती** याचे वास्तव्यपण विदर्भामध्ये गोंदियाजवळच्या पदमपूर या ठिकाणी होते. कवी भवभूतीचे पदमपूर हे जन्मस्थळ आहे. यादवांच्या कालखंडात विदर्भ भागासाठी हे उपराजधानीचे ठिकाण म्हणून निवडलेले असावे. अवतीभोवती तलाव आहेत, परिसर श्रीमंत आहे. पडीक, नापीक आणि डोंगरी भागांत वस्त्या कराव्यात. सुपीक जमीन मनुष्यवस्तीसाठी वापरू नये, ही शिकवण वाकाटाकाच्या नगरधन या राजधानीच्या परिसरातून मिळते.

जलाशयाचे आयुष्य अल्प असत नाही. हजारो वर्ष आयुष्य असलेली जलाशये या देशामध्ये लाखोंच्या संख्येने आहेत. लोकव्यवस्थेतून गाळ काढण्याचा कार्यक्रम अनेक तलावांमध्ये प्रतिवर्षी राबविला जात होता. राजा भोज यांनी निर्माण केलेला व काळाच्या ओघात लहान झालेला तलाव आजसुद्धा भोपाळ शहराची गरज भागवितो. सातवाहनकालीन राजतडाग औरंगाबादला खेटून आजपण उपयोगात आहे. त्याचा आकार अक्रसीत झालेला आहे. कंधार येथे राष्ट्रकुटाच्या काळात निर्माण केलेला जगतुंग सागर आजसुद्धा उपयोगात आहे. कावेरी नदीवरील ग्रॅन्ड ॲनिकट हा दोन हजार वर्षांपूर्वीचा आहे. रामटेक, नगरधन या परिसरामध्ये अनेक तलाव मौर्यकालीन असल्याचेपण दिसून येते. वाशिमजवळ असाच एक जुना तीन

किलोमीटरचा तलाव आपणास पाहावयास मिळतो. हा तलाव फुटलेला आहे. गाळाने भरलेला आहे. या गाळपेर जमिनीवर उत्तम शेती केली जाते. तलाव गाळाने भरल्यानंतर त्याचा वापर कसा करावा, हे या उदाहरणावरून आपणास शिकता येते.

ग्रॅन्ड ॲनिकटमधून निघालेले कावेरीचे कालवे म्हणजे जलगती शास्त्रातील एक आश्चर्य आहे. बत्तीस शाखांमध्ये विभागलेले हे कालवे पावसाळ्यानंतर कालवे म्हणून काम करतात व पावसाळ्यात नदी म्हणून काम करतात. गंगेचे कालवे अविरतपणे वाहत आहेत. दीडशे वर्षांपेक्षा जास्त कालावधी झाला आहे. गंगेच्या कालव्यांमध्ये गाळ साठत नाही. दुरुस्तीसाठी कालवा बंद करावा लागत नाही. ही वस्तुस्थिती आहे.

तलाव निर्माण करण्यासाठी जमीन पाण्याखाली आणावी लागते. काही गावे पाण्याखाली जातात. लोकांचे विस्थापन होते. प्रजेचा राजा छत्रपती शाहू महाराज यांनी पंचगंगा खोऱ्यातील भोगवती नदीवर राधानगरी हे धरण बांधले. जमीन पाण्याखाली गेली. लोकांचे विस्थापन झाले. विसाव्या शतकाच्या सुरुवातीला या मोठ्या जलाशयाची निर्मिती झाली. तसा काळ अलीकडचाच आहे. या विस्थापित लोकांकडून, त्यांच्यावर अन्याय झाला, असा आवाज बाहेर आल्याचे ऐकिवात नाही. विस्थापितांना कसा न्याय द्यावा, याचे हे एक उदाहरण व्हावे. वैनगंगा खोऱ्यात गौंड राजाच्या कारकिर्दीत अनेक तलाव निर्माण झाले. त्यांची संख्या हजारोंमध्ये आहे. **नवेगाव बांध** हा एक गोंडकालीन जुना तलाव आहे. या तलावामध्ये विस्थापित लोकांना लाभक्षेत्रात, कालव्याच्या सुरुवातीच्या भागात, जमिनी देण्यात आल्या आहेत. जमिनीला-जमीन या तत्त्वाच्याही पुढे गेलेली ही व्यवस्था आहे. विस्थापित हा त्या प्रकल्पाचा **पहिला लाभधारक** असावयास हवा, हे तत्त्व त्यांनी प्रत्यक्षात आचरणात आणले. इतकेच नाही तर जे विस्थापित **भूमिहीन** होते, बलुतेदार होते त्यांनापण प्रकल्पाच्या लाभक्षेत्रात, कालव्याच्या सुरुवातीच्या भागात, अग्रक्रमाने जमिनी दिल्या गेल्या, आणि त्यांना न्याय दिला. **नवेगाव बांध** हा भंडारा जिल्ह्यात आहे. ज्यांनी लोकांच्या सामूहिक शक्तीला वळण देऊन या तलावांची निर्मिती केली, त्या व्यक्तीचे मंदिर तलावाशेजारी आहे, असे कळते. लोक त्याची आठवण ठेवतात. दरवर्षी आदरांजली वाहतात असेही ऐकिवात आहे. तलाव निर्माण करून विस्थापितांना न्याय कशा प्रकारे देता येतो, याचे हे एक आगळेवेगळे उदाहरण आहे. या उदाहरणाला जगात तोड नसावी. भूमिहीनांना भूमी आणि तीपण सिंचित भूमी ही पुनर्वसनाची व्याख्या आहे. याच परिसरात असोला मेंढा हा ब्रिटिश कालावधीत निर्माण झालेला तलाव आहे. या तलावामध्ये जी गावे विस्थापित झाली, पुनर्वसित झाली, त्या गावांना पुनर्वसित क्षेत्रातच नवीन तलाव निर्माण करून देऊन विस्थापितांनापण सिंचनाची सोय करून देण्यात आली आहे. ही दोन उदाहरणे आजच्या व्यवस्थेला अंतर्मुख होण्यास भाग पाडतात. छत्रपती शाहू महाराज आणि गोंड राजे आज आठवणीत राहतात. कारण ते कल्याणकारी व्यवस्थेचे जनक होते म्हणून.

वर्षा जलसंधारण, छतावरील जलसंधारण, पाणलोट क्षेत्र विकास या वाक्प्रचारांचा सध्याच्या काळात फार मोठा वापर आहे, असे दिसून येते. असेही वाटून जाते की, हा विचार आधुनिक आहे. आत्ताच्या समाजाला सुचलेला आहे. पण वस्तुस्थिती तशी नाही. हजारो वर्षांपूर्वी हे तत्त्वज्ञान आपल्या देशामध्ये वेगवेगळ्या भागांत फार मोठ्या प्रमाणावर राबविलेले आहे. **छतावरील जलसंधारण** याची राजस्थान ही खाण आहे. ज्या-ज्या ठिकाणी निसर्गातील पाण्याचे, पावसाचे प्रमाण कमी होते, त्या-त्या ठिकाणी या व्यवस्था त्या सुबुद्ध समाजाने स्वयंप्रेरणेतून स्वीकारलेल्या आहेत. लोक पाण्याचे प्रश्न, स्वत:चे प्रश्न समजून त्यावर मात करण्यात तरबेज होते. ते पंगू नव्हते. दुसऱ्यावर अवलंबून नव्हते. हाच वारसा आपल्याला या जुन्या व्यवस्थेतून मिळतो, कठीणातील कठीण कामेपण अतिशय कुशलतेने करण्यामध्ये त्यांचा हातखंडा होता. देवगिरीच्या डोंगरी किल्ल्याला खंदक आहे. तो समाज अशी अतिशय अवघड आणि कुशल कामे करण्यात निष्णात होता, हेच यातून दिसून येते.

नदी काठावरून पाणी वाहून नेणे महिलांना अवघड जात असे. नद्यांच्या काठावर अनेक ठिकाणी घाटांची निर्मिती

झालेली आहे. वाई शहराजवळचा कृष्णा नदीतील घाट पाहण्यासारखा आहे. या ठिकाणच्या नदीपात्रालगतच्या मंदिरांना पुरापासून संरक्षण देण्यासाठी cut wate ची तरतूद केलेली आहे. अशा प्रकारचे वैशिष्ट्यपूर्ण बांधकाम हे दुर्मीळच म्हणावे लागेल. अठराव्या शतकात अहिल्याबाई होळकर यांनी या कामांना प्राधान्य दिले. त्यांच्या कारकिर्दीत मोठ्या प्रमाणावर घाट, बारवा यांची निर्मिती झाली. विसाव्या शतकाच्या सुरुवातीला संत गाडगे महाराज यांनीपण मोठ्या प्रमाणावर घाटांची निर्मिती केली. देवळात जाऊन देवाची पूजा न करणारा संत, लोककल्याणार्थ असे आगळेवेगळे काम करून खऱ्या अर्थाने देवाच्या फार जवळ गेला, असेच म्हणावे लागेल. घाट-निर्मितीमागे महिलांचा त्रास कमी करणे, हा हेतू प्रमुख होता असेच यावरून दिसून येते.

इंदोर येथे होळकरांच्या राजवाड्यात स्वयंपाकघरात एक आगळीवेगळी विहीर आहे. रॉकेलच्या डब्यातील रॉकेल कधीकाळी आपण काढीत होते, इतक्या सोप्या पद्धतीने पाणी काढण्यासाठी सुलभ व्यवस्था असलेली विहीर त्या ठिकाणी निर्माण केलेली आपणास दिसून येते. महिलांचा विचार केलेली ही कलाकृती मनात घर करून राहते.

भोजराजाची राजधानी धार या ठिकाणी भुईकोट किल्ला आहे. हा किल्ला तलावांनी वेढलेला आहे. या किल्ल्यामध्ये पेशवेकाळात राघोबादादा व आनंदीबाई यांना नजरकैदेत ठेवले होते, असे इतिहास सांगतो. दुसऱ्या बाजीरावाचा जन्म या किल्ल्यात झाला.

### जलव्यवस्थापनातील सामाजिकता

**गाव तेथे तळे** आणि **तळे राखील तो पाणी चाखील** या म्हणी मागील अनेक शतकांपासून प्रचलित आहेत. पुढे तपशिलात जाऊन या म्हणींच्या अर्थांचा विचार केल्यास आपल्याला असे जाणवते की, या तलावनिर्मितीमध्ये पाणी-उपभोक्त्याचा संपूर्ण सहभाग अपेक्षित होता. हा सहभाग सुलभ व्हावा म्हणून वसाहतीमधील प्रत्येक घटकांना विशिष्ट जबाबदारी सोपविण्यात आली. त्यामध्ये गावाच्या मिराश्यापासून ते सामान्यांपर्यंत सर्वांना समाविष्ट करून काळाच्या ओघात आपल्यावर सोपविण्यात आलेल्या जबाबदारीमध्ये प्रत्येक घटकाने प्रावीण्य निर्माण केले. पुढे त्याचे रूपांतर कौशल्यात केले.

देशातील राजस्थान हा भाग सर्वांत गरम आणि कोरडा आहे. तेथे वर्षभरात फक्त १०० ते ३०० मिलिमीटर पाऊस पडतो. देशाच्या इतर भागांत एका दिवसात जितका पाऊस पडतो; तेवढा पाऊस जैसलमेर, बारमेर आणि बिकानेरच्या काही भागांत सर्व वर्षभरात कसाबसा पडतो. सूर्यसुद्धा येथे सर्वांत जास्त तळपतो. भूजलाची पातळीसुद्धा या प्रदेशात खूपच खोल आहे. पाण्याचा अभाव हाच अशा वाळवंटाचा स्वभाव असतो. अशी प्रतिकूल परिस्थिती असतानासुद्धा या भागातील समाजाने या परिस्थितीला निसर्गाचा अभिशाप न समजता अतिशय कुशलतेने या संकटावर मात केलेली आहे. जेथे तलाव नाही, पाणी नाही, तेथे गाव नाही. तलावाचे काम आधी आणि त्यानंतर त्याच्या आधारे गाव वसे. या भागातील अनेक गावांची, शहरांची नावे **सर** या शब्दावर आधारित आहेत. गावामध्ये सरोवर नाही हा अपवादच, देशातील सर्वांत कमी पर्जन्यमान, सर्वांत जास्त उन्हाळा, वाळूची वादळे, आणि पक्ष्यासारख्या इकडून तिकडे उडणाऱ्या वाळूच्या टेकड्या हे सर्व येथेच आढळते. अशा परिस्थितीत या भागात (जैसलमेर, बारमेर, जोधपूर, बिकानेर इ.) पाण्याचा अभाव सर्वांत जास्त असावयास हवा होता, परंतु प्रत्यक्षातील स्थिती अशी आहे की, या भागात १०० टक्के गावांत पाण्याची व्यवस्था आहे. यावर विश्वास बसणे थोडे कठीण वाटणे साहजिक आहे. शासकीय आकडेवारीनुसार जैसलमेरच्या ९९.७८ टक्के गावांत तलाव, विहिरी, टंका अशांसारख्या सोई आहेत, यात नळ, ट्यूबवेल अशांसारख्या नव्या सोयी कमी आहेत. फक्त १ टक्के गावांतच वीज आहे.

पूर्वीच्या जलव्यवस्थापनातील लाखोंच्या संख्येतील साधने (तलाव, बारवा, विहिरी, बंधारे, कालवे, आड इत्यादी) ही अचानक प्रकट झालेली नाहीत. येवढ्या मोठ्या प्रमाणावर तलाव-निर्मितीसाठी त्या काळी काही सिव्हिल इंजिनिअर नव्हते. परंतु तलाव निर्मितीची विद्या जाणणारे अनेक लोक देशात सर्वदूर विखुरलेले होते. गौंड, कोळी, भोई, माळी, भिल्ल, बंजारा, परिहार, सहारीया,

इत्यादी जातींचे लोक तलाव, बंधारे, कालवे, विहिरी, आड ही साधने निर्माण करण्यामध्ये जाणकार होते.

अशा निर्मितीच्या पाठीमागे लोकांचा भाव अतिशय वेगळा होता. समाजासाठी दानधर्म करणे म्हणजे पाण्याची साधने निर्माण करणे, हे समीकरण ठरलेले होते. पूर्वीच्या काळी प्रसंग सुखाचा असो वा दु:खाचा असो पाण्याचे साधन निर्माण करणे, यात लोकांना पुण्यकाम केल्याचे समाधान मिळत असे. साधनसामग्री कमी असेल, आर्थिक ऐपत कमी पडत असेल; तर लोक जुन्या तलावाच्या बंधाऱ्याचे मजबुतीकरण करणे, त्याची दुरुस्ती करणे, गाळ काढणे, इत्यादी कामे करीत असत. घरातील एखादी व्यक्ती मृत झाली, तर त्याच्या स्मरणार्थ अशी साधने निर्माण केली जात असत, दान या शब्दाचा अर्थ त्या काळात व्यापक अर्थाने स्वीकारला होता, हेच यावरून दिसून येईल. दुष्काळ पडल्यानंतरसुद्धा श्रमदान करून गावाने तलावांची शृंखला निर्माण केल्याची उदाहरणे देशात अनेक ठिकाणी आहेत. बिहारच्या मधुबनी भागात दुष्काळामध्ये निर्माण केलेले अनेक तलाव आजपण उपयोगात आहेत.

काही वेळेस पारितोषिक म्हणून तलाव निर्माण केले जात असत. तर काही वेळेला तलाव निर्माण केल्याबद्दल बक्षीस दिले जात असे. वैनगंगा खोऱ्यातील गौंड राज्याच्या सीमेत जो कोणी तलाव निर्माण करेल, त्याच्याकडील जमिनीचा सारा राजाकडून माफ होत असे. यामुळे तलाव निर्मितीला गती मिळाली. बुंदेलखंडामध्ये एखाद्या व्यक्तीने अपराध केला, तर त्याबद्दल शिक्षा म्हणून तलाव, विहीर, आड निर्माण करण्याचा आदेश जात-पंचायतीमध्ये देत असत. अशी परंपरा देशाच्या बऱ्याच भागांमध्ये (राजस्थान) आजपण आहे. एखाद्या व्यक्तीने जात-पंचायतीचा निवाडा न मानल्यास, त्याला दंड केला जाई आणि तो दंड तलावाच्या दुरुस्तीसाठी, निर्मितीसाठी वापरला जात असे.

तलाव-निर्मितीबरोबरच त्याची देखभाल-दुरुस्ती, विशेष काळजी घेण्याचे काम तो समाज जबाबदारीने पार पाडीत असे. अमावास्या व पौर्णिमा हे दोन दिवस सार्वजनिक कामासाठी शुभ मानण्यात येत होते. या दोन्ही दिवशी शेतकरी स्वत:च्या शेतात काम करीत नसे. आपल्या परिसरातील जलव्यवस्थापनाच्या साधनांची देखभाल व दुरुस्ती यांसाठी तो कुटुंबासह श्रमदान करीत असे. मनुष्य-शक्तीचे रूपांतरण श्रम-शक्तीमध्ये करणे आणि त्यातून सार्वजनिक भल्यासाठी पायाभूत सोयी निर्माण करून व्यापक हित साधणे, हे त्या समाजाने घेतलेले ब्रीद होते, असे म्हटले तर अतिशयोक्ती होणार नाही. थोडक्यात श्रम हे त्या समाजाचे भांडवल होते आणि या भांडवलाचा उपयोग ते संपत्तीपेक्षाही जास्त काटेकोरपणे सार्वजनिक हितासाठी करीत असत.

देशाच्या कानाकोपऱ्यांत अशा प्रकारची उदाहरणे विखुरलेली आहेत. परकीय सत्तेच्या काळात या सार्वजनिक व्यवस्थेची (तलाव, कालवे इ.) मालकी सत्ताधाऱ्यांनी लोकांकडून हिरावून घेऊन ती स्वत:कडे घेतली. या व्यवस्थेकडे तत्कालीन राजसत्ता उत्पन्नाचे साधन म्हणून पाहू लागली. त्याच्या देखभाल-दुरुस्तीवर खर्च करणे मात्र त्यांना नकोसे वाटू लागले. त्यामुळे या साधनांचीही खूपच उपेक्षा झाली. अनेक तलाव, बारवा गाळाने भरून गेल्या. या साधनांबाबतची ममत्वाची भावना नष्ट झाली. लोकव्यवस्था या साधनांपासून दूर गेल्या. काळाच्या ओघात पिढ्यांमागून पिढ्या जात असताना लोकांनापण या जनउपयोगी वास्तू शासनाच्याच आहेत, असे ठामपणे वाटू लागले. याचा परिणाम म्हणून या व्यवस्था हळूहळू लुप्त होत गेल्या. आजचे चित्र हेच आहे. याला उत्तर म्हणजे या सर्व व्यवस्थेमध्ये परत लोकाभिमुखता, लोकसहभाग, लोकांची मालकी, लोकांचे व्यवस्थापन, लोकांसाठी त्याचे पुनरुज्जीवन, त्याचा लाभ लोकांना इत्यादी भावना नियमांचा आधार घेऊन ठसवण्याची गरज भासते.

### जलव्यवस्थापनातील अर्थकारण

कोणत्याही पायाभूत सोयीसाठी अर्थ-निर्मितीची आवश्यकता नाकारून चालत नाही. इतिहासकालीन जलव्यवस्थापन निर्मितीसाठीपण अर्थ हे लागणारच. गेल्या दोन-अडीच हजार वर्षांपासूनच्या इतिहासातील जलव्यवस्थापनेच्या साधनांच्या उदयाचा, विकासाचा आढावा घेतल्यानंतर असे लक्षात येते की, मध्ययुगीन काळाच्या आरंभापर्यंत या पायाभूत सोयींची निर्मिती ही संपूर्णतः लोकसहभागातून झाली होती. लोकांचे श्रम म्हणजे

भांडवल, अर्थ असेच ते गणित असणार. त्या-त्या कालखंडात स्थिर राजवटीने लोकांना मुक्तपणे, लोकशक्तीतून, लोककौशल्यातून जीवन अधिकाधिक समृद्ध करण्यासाठी प्रोत्साहित केलेले आहे, असेच दिसून येते. या सर्व साधनांच्या निर्मितीसाठी राजवटीने कोषागारातून धन खर्च करून या व्यवस्था निर्माण केल्या आहेत असे काही सरसकटपणे दिसून येत नाही. राजवटीवर प्रदेशाची, प्रजेची सुरक्षितता, स्थिरता, किल्ल्यांची निर्मिती, मंदिराची निर्मिती यांचा भार जास्त असावा. राजकोषातून लोककल्याणार्थ पिण्याच्या पाण्याच्या व्यवस्था, सिंचनासाठीच्या व्यवस्था काही प्रमाणात निर्माण झाल्या असल्याचे दिसते. पाटणसारख्या बारवाची निर्मिती ही राज्याच्या कोषातून धन वापरून झाली असावी. पण असे अपवाद वगळता इतर पायाभूत सोयी मात्र लोक-वर्गणीतून, लोक-श्रमांतून, लोक-सहभागातूनच झालेल्या असणार.

पाण्याच्या स्रोतांची निर्मिती म्हणजे **पुण्यकाम** हा भाव लोकांमध्ये रुजला होता. ते लोक-शासनावर अवलंबून नव्हते. स्वत:च्या पायावर उभे ठाकण्याची प्रेरणा त्यांच्यामध्ये पारंपरिकतेने आली होती. लोकांचा पैसा, लोकांचे श्रम, लोकांसाठी व्यवस्था, लोकांतील परिसराचे ज्ञान यांतून त्यांनी त्या-त्या भागासाठी पूरक अशा व्यवस्था निर्माण केल्या.

मध्ययुगीन कालखंडात मुस्लीम राजवटीत पाणी हे जास्त सुख निर्माण करण्यासाठी वापरले गेले होते, असेच दिसून येते. यासाठी निश्‍चितच राजकोषातील धन वापरले गेले. उद्याने, जलमहाल, कारंजे, स्नानगृहे इत्यादी व्यवस्थांची रेलचेल मध्ययुगीन कालखंडात झालेली आपणास पाहावयास मिळते. पेशव्यांचा कालखंडपण यास अपवाद नसावा. श्रीमंत बाजीराव पेशवे व माधवराव पेशवे यांचा कालखंड मात्र याला अपवाद असावा. विजयनगरचे साम्राज्य मात्र स्थिर होते, समृद्ध होते त्यांनी विस्तृत प्रमाणामध्ये दक्षिण भारतात तलावांचे जाळे विणले. व्यक्तिगत जीवन चैनीचे करण्यासाठी त्यांनी या साधनांचा वापर केल्याचे दिसून येत नाही. छत्रपती शिवाजी महाराजांना मात्र वेळ मिळाला नसावा. शून्यातून मराठी साम्राज्याची स्थापना, यातच त्यांच्या कारकिर्दीचा मोठा काळ गेला. पण रयतेला मातीशी, पाण्याशी घट्ट नाते ठेवण्यासाठी प्रेरणा देणाराच त्यांचा राज्यकारभार होता. शिवरायांच्या काळातील काही बंधारे महाराजांचे पाण्याशी व प्रजेच्या हिताशी असलेले नाते सांगतात. छत्रपती संभाजी महाराज हे त्याहूनही अल्पायुषी ठरले. ब्रिटिशांच्या कालावधीत लोकप्रेरणा कमकुवत झाली आणि साधनांची निर्मिती थांबली. ब्रिटिशांनी ज्या मोठ्या व्यवस्था निर्माण केल्या; कावेरीवरील बंधारे व कालवे, गंगेचे कालवे, गोदावरीचे कालवे, मुठा नदीवरील कालवे, गिरणेचे कालवे, प्रवरेचे कालवे इत्यादी; या व्यवस्था मात्र राजकोषातून निर्माण केलेल्या व्यवस्था होत्या. थोडक्यात या budgeted योजना होत्या. ब्रिटिशांनी अर्थशास्त्र तपासून या योजना केल्या. फायद्या-तोट्याचा त्यांनी विचार केला.

स्वातंत्र्यानंतर आपण ब्रिटिशांचे अनुकरण केले आहे. साधारणत: १८व्या शतकापर्यंत लोकप्रेरणा जागी होती. तलावांची, बंधाऱ्यांची, कालव्यांची, विहिरींची, आडांची निर्मिती होत गेली. मागच्या व्यवस्थेत भर टाकण्यात आली. त्यानंतरचा कालखंड मात्र वेगळ्या विचारसरणीत अडकला गेला. शासन कर्ता झाले.

जलव्यवस्थापनातल्या या व्यवस्था जरी लोकशक्तीतून निर्माण झाल्या असल्या तरी निसर्गातून उपलब्ध झालेले पाणी हे राष्ट्राचे आहे, सर्व समाजाचे आहे, काही थोड्याच समूहांचे, लोकांचे नाही आणि म्हणून राजवटीला आर्थिक सुबत्ता देण्यासाठी पाणी-वापराबद्दल लोकांना पाण्याची किंमत मोजावी लागत असे. निसर्गातून मिळणाऱ्या पाण्यावर आम्ही साधने निर्माण केली आहेत. यातून निर्माण होणाऱ्या पाण्यावर राजाचा काहीही हक्क नाही, असा भाव निर्माण झाला नाही. चंद्रगुप्त मौर्याचा पंतप्रधान (अमात्य) आर्यचाणक्य त्यांच्या अर्थशास्त्र या ग्रंथामध्ये जल-व्यवस्थापनाच्या अर्थकारणाबाबत पुढीलप्रमाणे निर्देश देतो.

१. पायाभूत सोयी निर्माण करण्यामध्ये जे सहभाग देणार नाहीत, जे मदत करणार नाहीत, त्यांना दंड करावा, त्यांचे चाकर, बैल वेठीला धरावे.

२. राजाने प्रजेला बारवा आणि तलाव निर्माण करण्यासाठी जमीन, लाकूड, दगड, चुना इत्यादी साहित्य पुरवावे.

३. राजाने स्वत: तलावांची निर्मिती करावी.

४. तलाव, विहिरी यांची निर्मिती ज्या लोकसमूहाकडून झालेली असेल, त्यांना सुरुवातीची ५ वर्षे पाणीपट्टी माफ करावी.

५. जे लोकसमूह संस्था, तलाव, विहिरी यांची दुरुस्ती करतील, त्यांना ४ वर्षे पाणीपट्टी माफ करावी.

६. तलावाच्या व विहिरीच्या क्षमतेमध्ये जे वाढ करतील, विस्तार करतील त्यांना ३ वर्षे पाणीपट्टी माफ करावी.

७. नंतर खालच्या भागात बांधलेल्या तलावाचे पाणी अगोदरच सिंचनाखाली असलेल्या जमिनीस देऊ नये.

८. पाणचक्की, बैलाची मोट या व्यवस्थेवर पाटाखाली शेती असेल, तर या शेतीच्या मालकाने त्यांच्या उत्पन्नातून त्या विहिरीची, तलावाची नियमित दुरुस्ती केली पाहिजे.

९. जे लोक विहिरी, तलाव यांचे फायदे घेतील पण दुरुस्ती करणार नाहीत, त्यांना दुप्पटीने पाणीपट्टी द्यावी लागेल.

१०. एखाद्या शेतकऱ्याने पाच वर्षांपर्यंत तलावाची दुरुस्ती केली नाही, तर त्या तलावावरील पाणी वापराचा त्याचा हक्क कायमचा जाईल.

११. तलावातील इतर उत्पन्नावर मासे, गवत, इत्यादींवर राजाचा हक्क राहील, त्यातील उत्पन्न राज्याकडे जाईल.

१२. जे लोक स्वत: तलाव निर्माण करून आपल्या मनुष्य-शक्तीने पाणी उचलून शेती करतील, त्यांनी त्यांच्या उत्पन्नाच्या १/५ पाणीपट्टी राजाला द्यावी.

१३. जे लोक तलावातील पाणी स्वत:च्या खांद्यावर वाहून शेती करतील, त्यांनी त्यांच्या उत्पन्नाच्या १/४ पाणीपट्टी राजाला द्यावी.

१४. मोट, रहाट इत्यादी यंत्रांद्वारे पाणी घालून शेती करणाऱ्यांनी त्यांच्या उत्पन्नाच्या १/३ पाणीपट्टी द्यावी.

१५. नदी, तलाव, सरोवर, विहिरी यांचे पाणी घेऊन शेती करणाऱ्यांनी त्यांच्या उत्पन्नाच्या १/४ पाणीपट्टी राजाला द्यावी.

या पाणीपट्टी आकारणीवरून असे लक्षात येते की, राजा हा पाण्यातून अर्थ मिळवीत असे. हे त्यांना करावे लागत असे. अन्यथा प्रजेचे संरक्षण करणे, सैन्य बाळगणे, सरहद्दीची रखवाली करणे इतर लोककल्याणाची कामे करणे यासाठी कोषागारात धनसंचय होणे गरजेचे असणार. सध्याच्या पाणीपट्टीच्या तुलनेत ही पाणीपट्टी जबरदस्त होती असेच म्हणावे लागेल.

पीक-पद्धतीबद्दलही आर्यचाणक्य पुढीलप्रमाणे सांगतो –

१६. पाण्याच्या उपलब्धतेनुसार पिकाचा प्रकार घ्यावा. पाणी जास्त असेल, तर उन्हाळ्यातपण पीक घ्यावे. पाण्याचा तुटवडा असेल, तर एक हंगामी (खरीप, रबी) पीक घ्यावे. पाणी दिले जाणार नाही.

२१. दुसऱ्या शेतीत जाणारे पाणी मुद्दाम अडविण्याचा प्रयत्न केल्यास दंड द्यावा लागेल.

२२. पाटात (कालव्यात) जो शेतकरी अडथळा आणील किंवा नासधूस करील, त्यालापण दंड द्यावा लागेल.

चंद्रगुप्त मौर्याच्या सुदर्शन तलावाचे काम राज्याच्या खासगी तिजोरीतून खर्च करून पूर्ण झाले आहे, असा उल्लेख आढळतो. पाणीपट्टी, कर हे वस्तूच्या रूपात देण्याचीपण सवलत होती. पायाभूत सोयींच्या निर्मितीमध्ये श्रमदानाचीपण सोय होती. निर्मितीचा आनंद रावापासून रंकापर्यंत सर्वांना घेता यावा, ही भावना या पाठीमागे होती.

पाणी मोजून (घनमापन पद्धतीने) दिले जात होते. कारण शेतकऱ्याला ठरावीक दिवशी वेळीच पाण्याचा वापर करण्याची मुभा होती. तेवढ्या वेळेत त्यांना किती क्षेत्र भिजवावे व कोणती पिके घ्यावीत, यांवर बंधन नव्हते. म्हणून पाणीपट्टी आकारणीपण अप्रत्यक्षपणे घनमापन पद्धतीवरच आधारित असणार.

कौटिल्याच्या नीतीमध्ये सवलतीला आधार दिसत नाही. पाणी वापरणाऱ्याने पाणीपट्टी देणे हे क्रमप्राप्त होते. नंतरच्या कालखंडात (सातवाहन, वाकाटक, गुप्त, राष्ट्रकूट, चौल, शिलाहार, यादव इत्यादी) जलव्यवस्थापनेच्या साधनांच्या निर्मितीचे आणि त्यांच्या व्यवस्थापनेचे नियमन आर्य चाणक्याने घालून दिलेल्या वरील नीतिनियमांप्रमाणेच झाले असावे, असे वाटते. यापेक्षा वेगळा पुरावा दिसत नाही. त्या काळाची मौर्यकालीन राजवट पुढच्या सर्वच बाबतीत

पथदर्शक ठरली आहे. आर्यचाणक्याच्या तुलनेत त्या काळात दुसरा अर्थशास्त्रज्ञ निर्माण झाला नाही किंवा याबाबत कोणी काही भाष्य केलेले नाही. चाणक्यनीती पुढे चाललीपण असेल.

लोकांनी निर्माण केलेल्या व्यवस्था, लोकांच्या अर्थातून निर्माण झालेल्या व्यवस्था इत्यादींचा ऊहापोह करीत असताना सहजपणे अशी एक भावना निर्माण होण्याची शक्यता नाकारता येत नाही की, या सर्व व्यवस्था लोकांकडेच असल्याने राज्याला पाणीपट्टी देण्याची गरज नसेल. पण तसे दिसत नाही. राज्याला देण्यात येणारी पाणीपट्टी ही खूप जास्त होती. तरीपण लोक सुखी होते, समृद्ध होते, आनंदी होते. राजा श्रीमंत होता व प्रजादेखील श्रीमंत होती. लोकानुनय नव्हता. निर्मितीमध्ये दानकर्माला विशेष महत्त्व दिले जात होते. **पाण्याचे दान हे मोठे दान** आणि या प्रेरणेतून अशा निर्मितींमध्ये सतत भर पडत गेली आहे. दंडाची रक्कमसुद्धा पुन्हा त्याच व्यवस्थेच्या विस्तारासाठी, दुरुस्तीसाठी खर्च केली जात असे.

थोडक्यात, या व्यवस्था लोक निर्माण करत असत, त्यांची देखभाल व दुरुस्ती लोक करत असत आणि राज्याने ठरवून दिलेली पाणीपट्टीही ते देत असत. नियम तोडणाऱ्याला दंड द्यावा लागत असे. नियमाचे अनुपालन काटेकोरपणे होत असणार.

आजच्या लोकशाहीत रुजत चाललेल्या जलव्यवस्थेची, इतिहासकालीन व्यवस्थेशी तुलना केल्यानंतर यांतील वेगळेपण सहजपणे लक्षात येते. पाण्याला किंमत आहे, पाणी फुकट नाही; हा भाव इतिहासकाळात समाज-जीवनात रुजलेला होता.

मध्ययुगीन कालखंडापासून पुढील कालावधीत पाणी या घटकाकडे उत्पन्नाचे साधन म्हणून परकीय सत्तेने पाहिले. व्यवस्था टिको अथवा न टिको ठरावीक पाणीपट्टी मध्यस्थामार्फत (देशमुख, देसाई, मालगुजार) राजकोषात जमा व्हायला पाहिजे, याबद्दल बळजबरीचे धोरण वापरले गेले असल्याची शक्यतापण नाकारता येणार नाही. एक फरक स्पष्टपणे जाणवतो, तो म्हणजे प्राचीन कालखंडापर्यंत पाणीपट्टी ही शेतीतील उत्पन्नाशी निगडित होती, फड पद्धती या न्याय्य व्यवस्थेमध्येसुद्धा पाणी व्यवस्थापनेसाठी जे पाटकरी नेमले जात असत, त्यांची मजुरी शेतीच्या उत्पन्नाशी निगडित होती. पण नंतर मात्र पाणीपट्टीची सांगड ही शेतातून निघणाऱ्या उत्पादनाशी घातली गेली नाही. दुष्काळ असो, सुकाळ असो, ठरावीक पाणीपट्टी ही राज्याकडे वसूल होऊन जात असे आणि यातच या व्यवस्थापनाच्या लयाची बीजे पेरली गेली.

### जलव्यवस्थापनातील न्याय्य व्यवस्था

पाण्याचा स्रोत पाऊस आहे. आणि पाऊस हा मान्सूनच्या स्वभावावर अवलंबून असतो. पाऊस कुठे, कधी, कसा पडतो; याचा अंदाज आत्तापावेतो मानवाला निश्चितपणे बांधता आलेला नाही. एखाद्या ठिकाणी तो खूपच पडतो तर त्याच ठिकाणी दुसऱ्या वर्षी पडतच नाही. देशपातळीवर जर विचार केला तर ईशान्येकडे (उत्तरपूर्व) १५००० मिलिमीटर इतका जास्त पाऊस पडतो, तर वायव्येकडे (उत्तर-पश्चिम) १०० मिलिमीटर इतका कमी पाऊस पडतो. महाराष्ट्रातपण अशीच स्थिती आहे. कोकणात ५००० ते ६००० मिलिमीटर पाऊस पडतो, तर देशावर पश्चिमघाट संपल्यानंतर राज्याचा जवळ-जवळ ५० टक्के भाग हा पर्जन्यछायेत येतो. सीना, येरळा या खोऱ्यांत ४०० ते ५०० मिलिमीटरच्या आसपास पाऊस पडतो. मांजरा, तेरणा, सिंदफणा या तुटीच्या खोऱ्यांमध्ये पावसाची चणचण सतत असते. पावसाचे हे चक्र १०० वर्षांपेक्षा जास्त कालावधीचे आहे, असे मानले जाते. एकूणच पाऊस हा अतिशय उच्छृंखल व लहरी आहे. अशा बदलणाऱ्या पावसाच्या आकड्यांचे शास्त्रात रूपांतर करून लोककल्याणकारी योजना निर्माण करण्यासाठी नियोजनात त्याचा कसा अंतर्भाव करावा, हे मोठे कोडेच असते. आजपर्यंत तो वैज्ञानिकाला, नियोजनकर्त्याला अडचणीत आणणारा विषय ठरलेला आहे.

पाण्याच्या उपलब्धतेतील ही दोलायमानता पाण्याच्या नियोजनातील अडसर ठरते. नद्यांवर बंधारे बांधून कालव्यांद्वारे पाणी वळवून आपण सिंचनाची सोय करतो. बंधाऱ्याच्या जवळच्या शेतकऱ्यांना जास्त पाणी उपलब्ध होते. तर बंधाऱ्यापासून दूर असणाऱ्या शेतकऱ्याला पाणी

मिळेलच असे नाही. निसर्गत:च पाणी उपलब्धतेत विषमता आहे. एखाद्या ठिकाणी जास्त पाणी तर दुसऱ्या ठिकाणी पाण्याची चणचण. मानवी प्रयत्नांतून ही विषमता बोथट करण्याचा प्रयत्न करण्याची गरज आहे. अशा दोलायमान परिस्थितीत पाणी वाटपात न्याय कसा प्रस्थापित करावा, हा मोठा यक्षप्रश्न असतो आणि आहे. यावरपण या देशाने मात करून जगात सर्वप्रथम अशी पाणीवाटपातील आदर्श न्याय्य व्यवस्था तापी खोऱ्यात बसविलेली दिसून येते. ही व्यवस्था मौर्य कालखंडापासून कार्यान्वित आहे, असे इतिहासकार सांगतात. या व्यवस्थेला सिंचनातील फड-पद्धती या नावाने ओळखतात. सिंचनातील ही पद्धत पाण्याच्या उपलब्धतेतील विषमता संपूर्णत: दूर करते. अशी फड-पद्धतीची व्यवस्था असणारे बंधारे उत्तर महाराष्ट्र, मराठवाडा या परिसरात त्या काळी हजारोंच्या संख्येने असावेत. भूजलाचा उपसा कमी असल्यामुळे त्या काळामध्ये नद्यांचे वाहणे हे जास्त काळासाठी असे, पांझरा नदी ही पाझरणाऱ्या खडकातून वाहणारी नदी आहे. गिरणा, मौसम, पांझरा, अनेर या तापीच्या उपनद्या. या नद्यांवर आजपण इतिहासकालीन फड-पद्धतीचे बंधारे व त्यावरील सिंचन काही ठिकाणी पाहावयास सापडते. या बंधाऱ्याची निर्मिती, त्यांचे परिचालन, त्यांची देखभाल-दुरुस्ती ही संपूणत: लोकप्रणीत आहे. लोकव्यवस्थेने नेमलेला पाटकरी शेतकऱ्यांना पाण्याचे वाटप करीत असे. त्याचे वेतन हे अन्नधान्याच्या स्वरूपात दिले जात असे. याचाच अर्थ एका ठरावीक क्षेत्रावर सामूहिक पद्धतीने सिंचन करणे. साधारणत: फड-पद्धतीच्या बंधाऱ्यापासून लाभ मिळणाऱ्या शेतीची चार भागांत विभागणी व्हावयाची. प्रत्येक भागाला फड असे म्हटले जाई. पहिल्या वर्षी पहिल्या फडामध्ये बारमाही पीक व्यवस्था, दुसऱ्या फडात आठमाही पीक व्यवस्था, तिसऱ्या फडात हंगामी पीक व्यवस्था व चौथ्या फडात काहीही नाही. दुसऱ्या वर्षी हा क्रम चक्रीय पद्धतीने बदलत असे. म्हणजेच पहिल्या वर्षी ज्या फडाला (शेवटच्या) पाणी मिळाले नाही त्याच फडाला दुसऱ्या वर्षी बारमाही पिकासाठी पाणी मिळणार आणि पहिला फड हा रिकामा राहणार. अशा रीतीने दर चार वर्षांनी प्रत्येक फडाला म्हणजेच प्रत्येक शेतकऱ्याला बारमाही पिके घेण्याची संधी मिळत राहणार. एका फडात एकाच प्रकारचे पीक घेतले जाणार. अशा प्रकारे चक्रीय पद्धतीने पाणी देण्याची व्यवस्था निर्माण केल्यामुळे सिंचन व्यवस्थेतील सर्व शेतकऱ्यांना समन्यायाची वागणूक मिळत राहणार. प्रत्येक शेतकऱ्याची जमीन ही सारखी राहणार नाही. आणि त्यामुळे प्रत्येक शेतकऱ्याला सारखे पाणी मिळणार नाही. जमिनीच्या प्रमाणात पाणी मिळणार आणि म्हणून समन्यायी पाणी वाटप म्हणजे समान पाणी वाटप नाही. हा भेद समजून घेण्याची गरज आहे. 'Equity is not equality.' आजकाल याची गल्लत केली जाते.

दरवर्षी लाभधारकांच्या समितीच्या बैठका, त्यातून या व्यवस्थेवर निगराणी ठेवणाऱ्या पंचांची नेमणूक, पानाड्याची नेमणूक, कालव्यातील गाळ काढणे, दुरुस्ती करणे यांसाठी शेतकऱ्यांकडून श्रमाच्या स्वरूपात, अन्नधान्याच्या स्वरूपात, धनाच्या स्वरूपात सहभाग अशी ही व्यवस्था. प्रत्यक्ष कृतीमध्ये खऱ्या अर्थाने लोकशाही राबवीत असल्याचे हे उदाहरण आहे. अशा आदर्श व्यवस्थेचा जन्म या देशात झाला.

तुटीच्या खोऱ्यात पाणीवाटप हा एक गहन विषय ठरतो. जगात पाणी-चणचणीच्या परिस्थितीत पाणी वाटपात समता कशी आणावी, याचे निश्चित असे उत्तर मिळालेले नाही. सिंचनामध्ये मोठी परंपरा असलेल्या स्पेन या देशात असा प्रश्न पाण्याच्या खास न्यायालयात सोडविला जात असे. अलीकडच्या काळात पाणी मोजून देणे आणि तेपण समूहाला देणे, पाण्याचा ताण असेल, तेव्हा त्या प्रमाणात सर्वांसाठी पाणी कमी करणे अशा काही तरतुदींतून समन्यायी वाटपाचे सूत्र पाळण्याचा आपण प्रयत्न करीत आहोत. महाराष्ट्र शासनाने २००४ साली **लोकसहभागातून सिंचन** करण्याचा कायदा केला आहे. त्या कायद्याची उत्पत्ती फड-पद्धती या पाणी वाटपाच्या न्याय्य पद्धतीतून झाली व आपण हे इतिहासापासून शिकलो आहे, असेच म्हणावे लागेल. म्हणून कल्याणकारी राज्याचा इतिहास आपणास विसरता येत नाही.

महाराष्ट्रातील वाघाड या खोऱ्यामध्ये लोकसहभागातून सिंचनाचा विकास याची सुरुवात झाली आहे. राज्याच्या इतर भागांत तितकासा वेग प्राप्त झाला नाही. तापी खोऱ्यातील फड-पद्धतीच्या शेजारी वाघाड खोरे असल्यामुळे शेतकऱ्याच्या मानसिकतेत बदल होण्याची प्रक्रिया या लोकांमधील पूर्वापार परंपरेला धरून झाली असावी, असे अनुमान काढले तर ते चुकीचे ठरू नये. त्याच्याच शेजारी असलेल्या पिंपळनारे या गावाने स्वत:च्या पायावर उभे ठाकून केलेल्या सिंचनामध्ये पाण्याचे वाटप ठरावीक कालावधी ठरवून तासांच्या हिशोबावर केले जाते. गडचिरोली येथील बामणी गावाचे उदाहरणपण आदर्श आहे.

वरील सर्व विवेचनावरून असे लक्षात येते की, खानदेशातील फड-पद्धती, विदर्भातील मालगुजारी तलाव, मराठवाड्यातील नांदेड या भागातील जुने मालगुजारी तलाव व खजाना विहीर व बारव विहिरींचे जाळे, दक्षिण कोकणातील झऱ्यावरील सिंचन व उत्तर कोकणातील तळी व पंचगंगा खोऱ्यातील बंधाऱ्यावरून उपसा सिंचन अशी सिंचनातील लोकसहभागाची प्रदीर्घ परंपरा महाराष्ट्राच्या विविध भागांमध्ये वेगवेगळ्या प्रकारांनी प्राचीन काळापासून रुजलेली आहे. निसर्गाच्या दोलायमानतेवर उपाय शोधण्यासाठी व लहरीपणावर मात करण्यासाठी पृष्ठभागावर तलावांची मालिका निर्माण करून पाण्याची साठवणूक करणे आणि त्या साठविलेल्या पाण्याचा उपयोग उर्वरित काळामध्ये सिंचनासाठी व पिण्याच्या पाण्यासाठी करण्याची अनेक उदाहरणे महाराष्ट्रातील अनेक ठिकाणी प्राचीन काळापासून आपणास पाहावयास मिळतात.

तलावात पाणी साठवून व विहिरीद्वारे भूजल उसपून त्यावर दुबार व बारमाही पिके घेऊन समृद्धीकडे जाण्याची प्रक्रिया अनेक वर्षांपासून या भूमीत रुजलेली आहे. सिंचित शेती महाराष्ट्राला नवीन नाही. विज्ञान व तंत्रज्ञानाबरोबर अलीकडच्या काळातील यांचेच आधुनिक विकसित झालेले रूप म्हणजे मोठे जलाशय, त्यापासून कालवे आणि वितरिकांचे जाळे, पंपाने उंचावर पाणी उचलणे, इत्यादी पद्धती होत.

सर्वांत जुनी आणि सध्यापण कार्यान्वित असलेली व्यवस्था म्हणून कावेरी वरील ग्रॅन्ड ॲनिकेटचा उल्लेख करावा असे अभिमानाने वाटते. सातवाहनाच्या आणि भोजराजाच्या काळातील अनुक्रमे खडकी आणि भोपाळ येथील दोन मोठे तलावपण डोळ्यांपुढे येतात. वेगवेगळ्या प्रकारच्या विहिरी, आच्छादित विहिरी, तलावात किल्ले, तलावात विहिरी, भूमिगत कालवे, महालाला मागे टाकतील अशा बारवा, जलमहाल, किल्ल्याला तिहेरी खंदक, जीवन जास्त समृद्ध करणारी, सुखद करणारी, चैनीची करणारी, मध्ययुगीन राजवटीतील हमाम, कारंजे, उद्याने अशी साधनांची फार मोठी यादी नजरेआड करता येत नाही. ही साधने हाताळण्यास सोपी होती. देखभालीचा खर्च अल्पसा होता. या दृष्टीने या व्यवस्था जलव्यवस्थापनामधील अभियांत्रिकी, सामाजिक, आर्थिक, न्यायिक बाबतीतील उंचीची शिखरे गाठलेल्या आहेत, असेच म्हणावे लागेल. देवगिरी, औरंगाबाद, मांडवगड, जुन्नर, विजापूर, बुऱ्हाणपूर इत्यादी ठिकाणचे जलव्यवस्थापन हे जीवनाच्या सर्वच अंगांना स्पर्श करणारे आहे, असे वाटते. समाजातील विषमता कमी करण्यासाठी पाणी आहे, हे प्रत्यक्ष कृतीने सिद्ध करणारी व सिंचनासाठी जमीन कशा प्रकारे तयार करावी हे सांगणारी तापी खोऱ्यातील फड-पद्धत, लोकभावनांचा वापर कशा प्रकारे करावा, हे सांगणारी, तलावाजवळ मंदिर, बारवेत मंदिर, वृक्ष आणि मंदिर यांची जोड हे वेगवेगळे संदेश देतात. गोदावरीच्या त्रिभुज प्रदेशात आजपण जलवाहतूक केली जाते. सध्याच्या ऊर्जा टंचाईच्या काळात जलवाहतूक किफायतशीर राहणार आहे, असे बोलले जाते. पाण्याचा प्रत्येक थेंब पकडावा, तो साठवावा, शक्य आहे त्या ठिकाणी नद्यांना वळविणे, नद्या एकमेकांना जोडणे या काळाच्या गरजा आहेत, हाच संदेश इतिहास देतो.

**संदर्भ :**

डॉ. दि.मा.मोरे, ऐतिहासिक जलव्यवस्थापनातून संप्रेषित होणारे लोककौशल्य - अप्रकाशित पीएच.डी.प्रबंध, यशवंत चव्हाण मुक्त विद्यापीठ, नाशिक, २००६.

* * *





शुद्ध लोखंड तयार करण्याची भट्टी, नैकुंड.

# वैज्ञानिक शोधपरंपरा

■ उदयन इंदूलकर

**कोपर्निकस, टायकोब्राही, न्यूटन या आधुनिक शास्त्रज्ञांचे महत्त्वाचे सिद्धान्त भास्कराचार्यांनी पूर्वीच मांडले आहेत. सूर्य-चंद्रांना राहुकेतु हे दैत्य ग्रासतात, ही ग्रहणाबद्दलची कल्पना त्यांना मान्य नव्हती. लोकांच्या श्रद्धेला गोंजारून घेऊन ग्रहणाचे शास्त्रीय ज्ञान सांगताना त्यांनी म्हटले आहे, 'लोकहो, राहू नावाचा राक्षस नाही. ग्रहणात चंद्रबिंब पृथ्वीचा छायेत जाते. पण तुम्हांला राहू हवाच असेल, तर असे म्हणा, की राहूने पृथ्वीच्या छायेत शिरून चंद्राचा ग्रास केला.'**

महाराष्ट्रामध्ये विज्ञानाची परंपरा ही प्राचीन काळापासून होती.

विदर्भातील गोंडांनी खनिजापासून उत्तम लोखंड तयार करण्याची प्रक्रिया विकसित केली होती. तयार झालेल्या लोखंडावर पुनःप्रक्रिया करून अतिशय टणक व धारदार शस्त्रेही त्यांना करता येत होती. याशिवाय दैनंदिन वापराच्या वस्तूही ते उत्तम प्रकारे करत, असे उत्खननामध्ये आढळून आले. या ठिकाणी ज्याच्यात ते लोखंड तयार करत, ती भट्टीही सापडली आहे. या भट्टीत लोखंडाचे खनिज, कोळसा आणि वाळू टाकून पेटवली जाई. दिवसभरात ३६ ते ४० किलो लोखंड त्यात तयार होत असे. विशेष म्हणजे हे लोखंड ९९ टक्के एवढे शुद्ध असे. (या भट्टीची प्रतिकृती पुण्यातील डेक्कन महाविद्यालयामध्ये पाहायला मिळते.) (नैकुंड-विदर्भ). याच लोखंडापासून विविध प्रकारच्या पहारी, छिन्न्या, दगड कोरण्याच्या छोट्या कुऱ्हाडी, हातोड्या इत्यादी अवजारांचा विकास इ. स. पूर्व दुसऱ्या शतकापासूनच झालेला आपल्याला दिसतो. भारतामध्ये कोरीव लेण्यांची संख्या १,२०० आहे. त्यांपैकी १,००० हून अधिक लेण्या केवळ महाराष्ट्रात आहेत.

यावरून या शास्त्राचा किती विराट विकास झाला असेल, याची कल्पना येते. भूगर्भशास्त्र, दगडांच्या परीक्षणाचे शास्त्र, आलेखन, मापन या सर्वांतूनच लेण्यांचे विधान (नकाशा) विकसित केले जायचे. या विज्ञानाच्या विकसित ज्ञानाच्या मदतीने कलाकार त्यांची कला आणि कलाकृती या लेण्यांच्या भिंतींवर शिल्पाच्या आणि चित्राच्या रूपाने उमटवत होते. याशिवाय लाकूडकामासाठी लागणारी हत्यारेसुद्धा मोठ्या प्रमाणावर विकसित झाली होती. कार्ल्याच्या लेणीत (इ. स. चे पहिले शतक) लाकडी बांधकामामध्ये पाच मजली वास्तूचे शिल्पांकन केलेले दिसते.

सातवाहन (इ. स. पूर्व २३० ते इ. स. २३०) राजांची राजधानी ही पैठण येथे होती. खनिजापासून विशुद्ध सोने प्राप्त करणे आणि त्याची विविध अलंकरणे करणे, ही आपल्या देशातील फार प्राचीन विद्या होती. एवढेच नव्हे तर सोन्याचे तंतूमध्ये रूपांतर करून त्याचा उपयोग वस्त्रामध्ये करण्यात आल्याचा उल्लेख ऋग्वेदातही सापडतो. महाराष्ट्रामध्ये या ज्ञानाचा उपयोग गेली जवळजवळ २,००० वर्षे अव्याहतपणे सुरू आहे. पैठणी हे वस्त्र कापूस, रेशीम आणि सोन्याचे तंतू यांपासून तयार करण्यात येते. धातूंचे तंतू असतानासुद्धा ते वस्त्र अत्यंत तलम करण्याच्या हातोटीमुळे आजही ते लोकप्रिय आहे. सातवाहन काळामध्ये याची मोठ्या प्रमाणात निर्यात रोममध्ये होत होती. उत्तम पद्धतीची नाणी पाडण्याच्या टांकसाळी जुन्नरमध्ये होत्या. तेथील नाणेघाटातील नागनिकेच्या शिलालेखात अनेक आकडे लिहिले आहेत. वीस हजाराचा आकडाही लिहिला आहे.

सातवाहन काळामध्ये कप्पी, रहाट आणि अन्य यंत्रे यांचा वापर केला जात असे. जमिनीतून पाणी काढून ते पिण्यासाठी किंवा शेतीसाठी वापरण्याचे तंत्र त्या काळी विकसित झाल्याचे आढळते. लोहार, सुतार, गवंडी यांप्रमाणे औदयांत्रिक यांची वेगळी श्रेणी होती. नाशिक येथील पांडवलेण्यामधील (इ. स. १५०) शिलालेखात याचा स्पष्ट उल्लेख केला आहे. तसेच गोदावरी नदीतून नौकानयनाद्वारे मालाची वाहतूकही होत असल्याचा उल्लेख आहे.

सातवाहन, वाकाटक, कलिचुरी, चालुक्य, राष्ट्रकूट, यादव यांच्यासारख्या महासत्तांचा वारसा महाराष्ट्राला लाभलेला आहे. म्हणजे इ. स. पूर्व ३ ऱ्या शतकापासून ते इ. स. च्या १४ व्या शतकापर्यंत महाराष्ट्रामध्ये सातत्याने भरभराटीचा इतिहास दिसतो. महाराष्ट्रामध्ये आधी पाली भाषा, मग थोडी प्राकृत आणि त्यानंतर कन्नड आणि मराठी असा भाषांचा वापर केला गेला. यादव काळापासून मराठी भाषेला अधिक प्रोत्साहन मिळाले. परंतु या सर्व कालखंडांमध्ये विद्वानांची भाषा संस्कृतच होती. भरभराटीच्या काळामध्ये सातत्याने नवीन-नवीन उपकरणे आणि शोध हे लागतच असतात. परंतु महाराष्ट्रामध्ये विज्ञानाची परंपरा प्राचीन काळापासून असूनसुद्धा त्यातील संशोधक आणि वैज्ञानिक कोण असावेत, याबद्दल मात्र फारशी माहिती उपलब्ध नाही. पुरातत्त्वाच्या दृष्टीने तर इ. स. च्या ४थ्या शतकापासून इ. स. च्या १४व्या शतकापर्यंत महाराष्ट्र नाहीसाच झालेला आहे. सातवाहन-वाकाटक काळानंतर थेट मुघलकालीन वस्त्या आणि वस्तू उत्खननामध्ये आढळतात. यामुळे राष्ट्रकूट आणि यादव यांनी निर्माण केलेला सुवर्णकाळ हा बराचसा अज्ञातच आहे.

### कैलास लेणे-स्थापत्याचा वैज्ञानिक चमत्कार

राष्ट्रकूट काळामध्ये स्थापत्याचा अनोखा आविष्कार दाखविणारे एकपाषाणी कैलास मंदिर कोरले गेले. राष्ट्रकूट राजा कृष्ण (पहिला) इ. स. ७५६ ते ७८० याच्या कारकिर्दीमध्ये या मंदिराचे काम सुरू झाले. यानंतर हे काम जवळजवळ पुढील दोनशे वर्ष सुरू होते. तीस लाख घनफूट दगड केवळ मानवी हातांनी आणि छिन्नी-हातोडी यांसारख्या साध्या हत्यारांनी कोरून काढण्यात आला आहे. दहा पिढ्या चालणाऱ्या या कामामध्ये हजारो कलाकार काम करत असतानाही एकानेही कुठेही छोटीशीसुद्धा चूक केलेली आढळत नाही. एका योजनेचा इतक्या दीर्घकाळ इतक्या प्रतिकूल परिस्थितीमध्ये पाठपुरावा केला गेला. त्याचे तंतोतंत पालन केले गेले. हे अत्यंत प्रगत व्यवस्थापनशास्त्राचे मूर्त प्रात्यक्षिक आहे. या वास्तूचे वैशिष्ट्य असे की, दगडावर दगड रचून बांधण्यात येणाऱ्या

विराट मंदिराची प्रतिकृती डोंगर कोरून करायची होती. विशेषतः छताखालील दगडाचा भाग काढताना कमीजास्त निघाल्यास संपूर्ण छत खचून खाली येण्याची शक्यता होती. परंतु त्या स्थपतींनी या सगळ्याचा अत्यंत बारकाईने विचार केला होता. छताचे वजन पेलण्यासाठी त्याच्याखालील खांबांची रचना, त्यांच्यामधील अंतर आणि आत प्रकाश येण्यासाठी भिंतींमध्ये करायची खिडक्यांची रचना याचे शास्त्र पूर्णपणे विकसित झालेले आढळते. याला आजच्या काळामध्ये कायनेस्टेथिक्स असे म्हणतात.



विज्ञानाच्या परंपरेचे उल्लेख ज्ञानेश्वरीमध्ये स्पष्टपणे दिसतात. या उल्लेखांवरून असे लक्षात येते की, त्या वेळेच्या अभ्यासक्रमामध्ये विज्ञानाचे शिक्षण हे अपरिहार्य होते. एवढेच नाही तर त्या वेळच्या जगातल्या उपलब्ध ज्ञानामधले अत्यंत विकसित ज्ञान हे शिकवले जायचे आणि त्यावर शोधकार्यही निरंतर सुरू होते.

हिमवंतीची सरोवरें। चंद्रोदयाते होती कश्मिरे।
आणि सूर्योदयाते। द्रवत्व ये। ।।ज्ञानेश्वरी।।

बर्फाच्छादित भागांमध्ये विशेषतः हिमालयामध्ये बर्फवृष्टी सुरू झाल्यावर कधीकधी अचानक तापमान २-३ मिनिटांतच सुमारे २० अंशांनी कमी होते. याला इंग्रजीत हायपोथर्मिया असे म्हणतात. अशा वेळेस मोठ्या-मोठ्या सरोवरांतील पाणी हे अकस्मात थिजते. यामुळे संपूर्ण सरोवर स्फटिकासारखे दिसू लागते. जर तापमान हळूहळू कमी होत गेले, तर पाण्याचा एक-एक थर थिजतो. त्यामुळे त्याला पांढरा शुभ्र रंग येतो. हिमालयात होणाऱ्या या वैज्ञानिक चमत्काराची कल्पना ज्ञानेश्वरांना होती.

एका ठिकाणी ज्ञानदेवांनी लोखंडाच्या ओतीव कामाचा व त्यातून होणाऱ्या स्तंभनिर्मितीचा उल्लेख केलेला आहे. शेती व्यवसायामध्ये द्राक्षाच्या बागेचे मालक त्याही काळी श्रीमंत असावेत. ज्ञानदेव म्हणतात, लहान मुलांच्या तोंडी दूध न घालता हे लोक द्राक्षांच्या वेलींना दूध पाजण्यात धन्यता मानतात. ही दूध घालण्याची प्रक्रिया वेलींच्या मुळांजवळ नसून ते पाण्यात मिसळून फवारण्याची पद्धत होती. दुधामधील लॅक्टीक आम्ल हा घटक एक नैसर्गिक सेंद्रिय बुरशीनाशक असतो. द्राक्षांच्या वेलींवर बुरशी लागण्याचे प्रमाण खूप असते. त्यासाठी आजही रासायनिक औषधांऐवजी ताक फवारण्याची पद्धत आहे. द्राक्ष हे प्रामुख्याने महाराष्ट्रातील पीक होते. याचप्रमाणे ज्ञानेश्वरीमध्ये भूगोलाचे, खगोलशास्त्राचे (ध्रुवाचे अढळपण - अ. १३, ओवी क्र. ४८९) हवामानाचे, पर्जन्याचे (भरती-ओहोटी, अ. १३, ओवी क्र. १३८), विज्ञानाचे (लोहचुंबक अ. १३, ओवी क्र. १३९) प्राणिशास्त्राचे, शरीरशास्त्राचे, वैद्यकीय शास्त्राचे उल्लेख थक्क करून सोडणारे आहेत.

संगीतावरील संगीत रत्नाकर हा ग्रंथ लिहिणारा शारंगदेव आणि स्थापत्य शास्त्रावरील ग्रंथ लिहिणारा हेमाद्री पंडित हे दोघेही यादवांच्या दरबारातील विद्वान होते. संगीताचा वैज्ञानिक अभ्यास शारंगदेवाने केला. सर्व स्वरांची कंपनसंख्या ही अचूकतेने मोजून त्याप्रमाणेच त्याच्या २२ श्रुतीही त्याने गणिती पद्धतीने मांडल्या. त्याचप्रमाणे ग्राम, मूर्च्छना, क्रम, तान आणि ताल ह्यांचे गणिती कोष्टकाद्वारे विवरण केले आहे. याशिवाय शारंगदेवाने तत्त्वज्ञान आणि

आयुर्वेद ह्यांवर अनेक पुस्तके लिहिली आहेत. परंतु केवळ संगीतरत्नाकरामुळेच तो प्रख्यात झाला. या ग्रंथामध्ये त्यांनी आधीच्या ४० पूर्वसुरींची मते उद्‌धृत केली आहेत. त्याने 'निशङ्कविणा' नावाची वेगळी वीणा तयार केली. स्वतःला तो अनेक अभिधाने देतो, त्यामध्ये शेवटी 'अनवद्यविद्याविनोद' हे म्हणवत असे. अनवद्यविद्याविनोद म्हणजे निर्दोष ज्ञान हाच मनाचा विरंगुळा असणारा! (उदा. 'सा' या स्वराची कंपनसंख्या २४० अशी मानली जाते. त्याने ती २४० ११३/३८५ सांगितली आहे.)

हेमाद्री पंडिताने प्राचीन स्थापत्याचा अभ्यास करून त्यावर ग्रंथ लिहिला. विशेषतः दगडी बांधकामे आणि मंदिर स्थापत्य यांचा अधिक उल्लेख त्या ग्रंथामध्ये आढळतो. ही मंदिर स्थापत्याची पद्धत भारतात ३ऱ्या, ४थ्या शतकापासूनच होती. परंतु हेमाद्री पंडितांचा प्रभाव एवढा होता की, आजही महाराष्ट्रात कोणत्याही जुन्या मंदिराला 'हेमाडपंथी' असेच म्हणण्याची प्रथा आहे. हेमाद्री पंडितांनी मोडी लिपी विकसित केली. तसेच श्रीलंकेमधून बाजरीचे एक वाण आणून महाराष्ट्रात त्याची यशस्वी लागवड करून दाखवली.

## सहदेव–भाडळी

यादव काळामधील अनेक ग्रंथ उपलब्ध असल्यामुळे त्या वेळच्या वैज्ञानिक प्रगतीचे अनेक संदर्भ सापडतात. बाराव्या शतकामध्ये मराठवाड्यातील सहदेव आणि भाडळी यांनी भविष्यकथनाविषयक ग्रंथाची निर्मिती केली. हे भाऊबहीण होते. त्यांच्या पित्याचे नाव मार्तंड जोशी अथवा कृष्णभट्ट असावे. त्याला त्याच्या दोन स्त्रियांपासून ही दोन अपत्ये झाली. सहदेव–भडाळी यांच्या ग्रंथात गमनास शुभाशुभ तिथी, दिशासाधन इत्यादी दैनंदिन जीवनात येणाऱ्या काही गोष्टींची भाकिते केली आहेत. आजच्या काळात त्याचे संदर्भ नेमके लक्षात येत नाहीत. उदाहरणार्थ कुठल्या दिशेला शिंक आल्यास त्याचे फल काय समजावे यावरील भाष्य आज दुर्बोध वाटते. परंतु त्यांच्या ग्रंथामधील पावसाचे अनुमान मात्र कमालीचे अचूक आहे. त्यावरून आजही काही लोक पर्जन्यमान ठरवू शकतात. मूळ ग्रंथामध्ये पर्जन्याची शुभाशुभ फळे, मेघलक्षण, इंद्रधनुष्यावरून पर्जन्यनिदान, वायूवरून पर्जन्यनिदान, दुर्भिक्ष लक्षण, ग्रहण आणि नक्षत्रपरत्वे पर्जन्यफल यांचे आश्चर्यकारक विवेचन आहे. हे शास्त्र त्यांनी कोठून शिकून घेतले किंवा कोणत्या शास्त्रीय ग्रंथांवरून ही अनुमाने काढली, हे मात्र ज्ञात नाही.

## थोर गणिती भास्कराचार्य

महाराष्ट्रामध्ये वैज्ञानिक म्हणून ज्याचा गौरवपूर्ण उल्लेख केला जाऊ शकतो असे एक ज्ञात व्यक्तिमत्त्व म्हणजे भास्कराचार्य (इ. स. ११४४ ते १२२३). हे सह्यपर्वताजवळील विज्जलवीड गावचे रहिवासी होते. हे गाव जळगाव जिल्ह्यातील चाळीसगावाच्या नैर्ऋत्येस १० मैलांवर वसलेल्या पाटण नामक खेड्याच्या आसपास असावे, असा तर्क एका शिलालेखावरून डॉ. केतकरांनी केला आहे. श्री. वा. कृ. भावे यांच्या मते विज्जलवीड म्हणजे बीड हेच गाव होय. भास्कराचार्यांचे गोत्र शांडिल्य होते. त्यांच्या पित्याचे नाव महेश्वर होते. भास्कराचार्यांचे शिक्षण त्यांच्या वडिलांकडेच झाले. भास्कराचार्यांच्या सिद्धान्तशिरोमणीवर टीका लिहिणाऱ्या मुनीश्वर नावाच्या पंडिताने म्हटले आहे की, भास्कराचार्य हा याज्ञिकांचा अग्रणी, यजुःशाखियांचा उपाध्याय व काव्य, नाटक आणि अलंकार यांचा अध्यापक होता.

भास्कराचार्य हे थोर गणिती होत पण त्याचबरोबर त्यांनी ज्योतिषशास्त्र, खगोलशास्त्र, भौतिकशास्त्र यांवरही लेखन केले आहे. त्यांच्या गणिती अचूकतेमुळे ज्योतिषाबद्दल अचूक निदाने काढता येऊ लागली. त्यामुळे पुढील काळात सर्व विद्वानांनी ज्योतिषाचाच अभ्यास करून त्याचा प्रचार व प्रसार केला आणि महाराष्ट्रामध्ये गणित विषय मागे पडला. भास्कराचार्यांचा मुलगा चांगदेव हा देवगिरीच्या सिंगण यादवाचा ज्योतिषी होता. त्याने ज्योतिषशास्त्राच्या अभ्यासासाठी पाटण येथे एका मठाची स्थापना केली होती. भास्कराचार्यांचे गणिती आडाखे ज्योतिषाच्या दृष्टीने किती अचूक होते, याविषयी एक आख्यायिका प्रचलित आहे.

भास्कराचार्यांना लीलावती नावाची एक कन्या होती. तिच्या लग्नाचा विचार सुरू झाल्यावर त्यांनी तिच्या

जन्मपत्रिकेचे सूक्ष्म निरीक्षण केले आणि त्यात त्यांना आपल्या मुलीच्या दैवात वैधव्य योग आहे, असे आढळून आले. त्यामुळे ते अस्वस्थ झाले. अधिक बारकाईने विचार करता त्यांना एक उपाय सापडला. एका विशिष्ट मुहूर्तावर लीलावतीचे लग्न झाले, तर वैधव्य टळणे शक्य आहे, असे त्यांना वाटले. लग्न निश्चित झाले. तो विशिष्ट मुहूर्त साधण्याची योजनाही निश्चित झाली. एका घंगाळ्यामध्ये पाणी भरण्यात आले. त्यामध्ये मधोमध छिद्र असलेले फुलपात्र वेळ पाहून ठेवण्यात आले. ज्या वेळेस ते पात्र पूर्ण बुडेल तोच विवाहाचा मुहूर्त. लीलावती गौरीहराच्या पूजेला बसली. पण एकाएकी तिच्या मनात विचार आला की, घटिकापात्र पाण्यात नीट बुडते आहे की नाही ते पाहावे. त्या कुतूहलाने ती पूजा सोडून पात्राचे निरीक्षण करायला गेली. पण इतक्यात तिच्या कपाळावर कुंकवात माखलेल्या ज्या अक्षता चिकटलेल्या होत्या, त्यातील एक दाणा घटिकापात्रात पडून थेट छिद्रावर जाऊन बसला. त्यामुळे घटिकापात्रात पाणी शिरून ते बुडायला विलंब लागला. त्यामुळे तो विशिष्ट मुहूर्तही टळला. शेवटी तिला वैधव्य आलेच. लीलावती पित्याच्या घरी परत आली. तिचे आयुष्य व्यर्थ जाऊ नये म्हणून मग भास्कराचार्यांनी तिला गणितशास्त्र शिकवले.

भास्कराचार्यांच्या सिद्धान्तशिरोमणी या गणितविषयक ग्रंथातील पहिल्या भागाचे नाव लीलावती असे आहे. गणित विद्या 'लीलया' म्हणजे सहजपणे समजावून देणारा ग्रंथ या अर्थाने भास्कराचार्यांनी आपल्या ग्रंथाचे 'लीलावती' असे काव्यमय नाव ठेवले. पुढे कालांतराने भास्कराचार्यांच्या ग्रंथावर टीका लिहिणाऱ्या पंडितांनी लीलावती हे नाव विशिष्टार्थक असल्याचे सांगण्यासाठी वरीलप्रमाणे आख्यायिका रचली असावी, असे म्हणतात. आख्यायिकेमधील दिवसातील अचूक वेळ गाठण्यासाठी संपूर्ण दिवसाच्या घटिका, पळे यांची अचूक माहिती भास्कराचार्यांना होती. तसेच अमुक एक वेळ गाठण्यासाठी बुडणाऱ्या घटिकापात्रासारखे शास्त्रीय उपकरणही होते. भांडे बुडल्यावर मुहूर्त साधला जाणार आहे, हे ज्ञात असण्यासाठी घंगाळ्यातील पाण्यामध्ये ते घटिकापात्र कधी सोडावे याचे अगदी अचूक ज्ञानही त्यांना होते.

सिद्धान्तशिरोमणी आणि करणकुतूहल हे भास्कराचार्यांचे ज्योतिर्गणितविषयक दोन ग्रंथ आहेत. त्यांच्या व्यतिरिक्त वासनाभाष्य हा सिद्धान्तशिरोमणीच्या ग्रहगणित व गोलाध्याय यांवरील स्वकृत टीकाग्रंथ आहे. भास्करव्यवहार व विवाहपट हे ग्रंथ त्यांचेच असावेत, असे अनुमान आहे. पहिला ग्रंथ त्यांनी आपल्या ३६व्या वर्षी लिहिला तर दुसरा ६९व्या वर्षी लिहिला. सिद्धान्तशिरोमणी ग्रंथाचे लीलावती, बीजगणित, ग्रहगणित व गोल असे चार खंड असून, प्रत्येक खंड म्हणजे गणिताच्या त्या-त्या शाखेवरचा स्वतंत्र ग्रंथच आहे. लीलावतीला पाटीगणित असेही म्हणतात. अंकगणित व महत्त्वमापन (क्षेत्रफळ, घनफळ) यांवरचा तो ग्रंथ आहे. त्यात अनेक कोष्टकेही आहेत. शून्य या अर्थी त्यांनी पूर्ण शब्द वापरला आहे. वैज्ञानिक जगात या ग्रंथाचा फार लौकिक आहे. हा ग्रंथ भास्कराचार्यांनंतर पाचशे वर्षे भारतीय शिक्षणक्रमात गणित विषयाचा पाठ्यग्रंथ म्हणून वापरला जात होता.

इ. स. १५८३ मध्ये अबुल फैजी याने लीलावतीचे फारसी भाषांतर केले. लीलावती ग्रंथाची हस्तलिखिते काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंत सर्व भारतभर विखुरलेली आहेत. लीलावतीवर १७ ते २० टीका झालेल्या आहेत. लीलावतीत आजच्या दृष्टीने सारे अंकगणित आणि बीजगणित व रेखगणितातील काही भाग यांचा अंतर्भाव झालेला आहे. श्रेढी व्यवहार व अंकपारा ही प्रकरणे पाश्चात्त्य पद्धतीने बीजगणितात अंतर्भूत होतात आणि क्षेत्रव्यवहार हे भूमितिशास्त्राचे अंग समजतात.

दुसरा खंड बीजगणित होय. यात घनवर्ण संख्यांची बेरीज, अव्यक्तांची बेरीज, करणी संख्यांची बेरीज, एकवर्ण समीकरण, अनेकवर्ण समीकरण एकानेकवर्ण वर्गादी समीकरणे इत्यादी विषय आले आहेत. लीलावतीप्रमाणेच बीजगणितावरही अनेक टीका झालेल्या आहेत. शहाजहानच्या कारकिर्दीत अताउला रसीदी याने इ. स. १६३४ मध्ये त्याचे फारसी भाषांतर केले. लांग्रज या पाश्चात्त्य गणितशास्त्रज्ञापूर्वी भास्कराचार्यांच्या योग्यतेचा दुसरा गणिती नव्हता, असे गणितशास्त्राचा इतिहास लिहिणाऱ्या पंडितांचे मत आहे.

पुढील गणिताध्याय व गोलाध्याय यांत ज्योतिषशास्त्र आहे. पहिल्यात ग्रहगणित हा विषय व पंचांग करण्यास लागणारे गणित आहे व दुसऱ्यात ग्रहगणिताध्यायातील सर्व विषयांची उपपत्ती, त्रैलोक्यसंख्यावर्णन, यंत्राध्याय, गोलीय त्रिकोणमिती इत्यादी विषय आहेत. सिद्धान्तशिरोमणी हा ग्रंथ इतका उत्कृष्ट आहे की, त्यावरून भारतीय ज्योतिषशास्त्रासंबंधी संपूर्ण माहिती कळते. त्या काळी त्याच्या अध्ययनाने विद्यार्थ्यांची गणिताच्या चारही शाखांतली उदाहरणे सोडविण्याची सोय होत असे.

भास्कराचार्यांच्या ग्रंथांचा प्रसार सर्व भारतभर झाला व इतर ग्रंथ मागे पडले. भास्कराचार्य ब्रह्मगुप्ताला आपला गुरू मानतात. पण सिद्धान्तशिरोमणीच्या सोयीस्कर पद्धतीमुळे ब्रह्मगुप्ताच्या ब्रह्मसिद्धान्ताचेदेखील अध्ययन लोकांना भावले नाही. भास्कराचार्यांच्या ग्रंथात सोप्या रीती व काही नवीन शोध आहेत. त्यांना क्षेत्रफळ काढण्याची रीत अवगत होती. इष्टदिक्-छायासाधन व पातसाधन या दोन गोष्टींसंबंधी त्यांनी नवीन माहिती दिली आहे. शरासंबंधी पूर्वीच्या ग्रंथकारांची चुकीची समजूत खोडून काढून शर हा आयनिक वृत्तावर लंब असतो, असे त्यांनी दाखवून दिले आहे.

भास्कराचार्यप्रभृती ज्योतिर्विदांना पृथ्वी वाटोळी आहे, ती आपल्याभोवती फिरते व तिला कशाचाही आधार नाही, हे माहीत होते. प्रस्तुत शोध सूर्यसिद्धान्त ग्रंथात दिले आहेत. त्या काळी दुर्बीण वगैरे सूक्ष्म वेधसाधने उपलब्ध नव्हती. पण अशा साधनांच्या अभावीही त्यांनी वरील शोध लावले, यात त्यांची कुशाग्र बुद्धी दिसून येते. भास्कराचार्यांना पृथ्वीच्या अक्षभ्रमणाची आणि कक्षाभ्रमणाचीही कल्पना होती. न्यूटनचा गुरुत्वाकर्षणाचा सिद्धान्त सुमारे आठ शतकांपूर्वी भास्कराचार्यांनी मांडलेला आहे, तो असा-

**आकृष्टशक्तिश्च मही तया यत् खस्थं गुरु स्वाभिमुखंस्वशक्त्या**

**आकृष्यते तत् पततीव भाति समे समन्तात् क्व पतत्विदम्।।**

अर्थ : पृथ्वीच्या ठिकाणी आकर्षणशक्ती आहे. या शक्तीने ती आकाशातील जड वस्तू आपल्याकडे खेचते. ती पडत आहे असे वाटते, पण ती पडत नाही. सर्व बाजूंनी समान असणाऱ्या आकाशात ती कुठे जाणार?

पृथ्वी गोल आहे, हे सिद्ध करताना भास्कराचार्यांनी म्हटले आहे ते असे-

यदि समा मुकुरोदरसन्निभा भगवती धरणी तरणिः क्षितेः।
उपरि दूरगतोऽपि परिभ्रमन् किमु नरैरमरैरिव नेक्ष्यते।।
समो यतः स्यात्परिधेः शतांशः पृथ्वी नितरां तनीयान्।
नरस्य तत्पृष्ठगतस्य कृत्स्ना समेव तस्य प्रतिभात्यतः सा।।

अर्थ : पृथ्वी जर आरशासारखी सपाट असती, तर सूर्य दूर गेला असता तरी मनुष्यांना सतत दिसला असता. परंतु तसे घडून येत नाही. यावरून पृथ्वी सपाट नाही, तर गोलाकार आहे, अशी निश्चिती होते. मनुष्याला तिचा गोल आकार दिसून न येण्याचे कारण इतकेच की मनुष्य फार लहान असल्यामुळे त्याच्या दृष्टीला पृथ्वीचा फार थोडा भाग पडतो व वर्तुळ परिघाचा शंभरावा भागसुद्धा सपाट असतो. त्यामुळे पृथ्वीचा अगदी थोडा दृष्टीस पडणारा भाग सपाट आहे, असा भास होतो.

पृथ्वीच्या वातावरणाविषयी भास्कराचार्यांचे म्हणणे असे-

भूमेर्बहिर्द्विदिश योजनानि भूवायुरत्राम्यबुदविद्युदाद्यम्।।

अर्थ - पृथ्वीच्या पृष्ठभागापासून १२ योजने पर्यंत (म्हणजे ९६ मैल) भूवायू (वातावरण) आहे. त्या वातावरणात मेघ, विजा इत्यादी चमत्कार घडून येतात.

हर्षल, नॉर्मन, लाकियम, लार्डनर इत्यादी अर्वाचीन युरोपीय ज्योतिषी वातावरणाची उंची पृथ्वीच्या व्यासाच्या शंभराव्या भागाइतकी म्हणजे निदान ८० मैल आहे, असे मानतात. यावरून भास्कराचार्यांचे वातावरणाच्या उंचीविषयीचे मत अर्वाचीन काळी सूक्ष्म ज्ञान करून मोठमोठ्या देणाऱ्या यंत्रांच्या साहाय्याने मिळालेल्या ज्ञानाशी पुष्कळ अंशी जमते, ही गोष्ट ध्यानात घेण्यासारखी आहे.

कोपर्निकस, टायकोब्राही, न्यूटन या आधुनिक शास्त्रज्ञांचे महत्त्वाचे सिद्धान्त भास्कराचार्यांनी पूर्वीच मांडले आहेत. सूर्य-चंद्रांना राहुकेतु हे दैत्य ग्रासतात, ही ग्रहणाबद्दलची कल्पना त्यांना मान्य नव्हती. लोकांच्या श्रद्धेला गोंजारून घेऊन ग्रहणाचे शास्त्रीय ज्ञान सांगताना त्यांनी म्हटले आहे, 'लोकहो, राहू नावाचा राक्षस नाही. ग्रहणात चंद्रबिंब

पृथ्वीचा छायेत जाते. पण तुम्हांला राहू हवाच असेल, तर असे म्हणा, की राहूने पृथ्वीच्या छायेत शिरून चंद्राचा ग्रास केला.' चंद्र स्वयंप्रकाशित नाही, हेही भास्कराचार्यांना माहीत होते.

भास्कराचार्यांनंतर ज्योतिषाचा अभ्यास पुष्कळच वाढला. मात्र भास्कराचार्यांच्या योग्यतेचा ज्योतिर्विद महाराष्ट्रात दुसरा झाला नाही. भास्कराचार्यांच्या ग्रंथांवर जितक्या टीका आहेत, तितक्या दुसऱ्या कोणत्याही ग्रंथावर नाहीत.

भास्कराचार्यांची विवेचनपद्धती तार्किक असूनही सोपी आहे. प्राचीन पद्धतीप्रमाणे त्यांचे लेखन छंदोबद्ध आहे; पण त्यातही कवीची कल्पकता दृष्टीस पडते. काटकोन– त्रिकोण, गोलांचे क्षेत्रफळ, विमूलाचा सिद्धान्त व विमूलाची उदाहरणे सोडविण्याची पद्धती हे सारे त्यांनी जगास दिले. त्याचप्रमाणे बीजगणितामध्येही कुट्टक, वर्गकुट्टक व मिश्रकुट्टके सोडविण्याच्या पद्धती त्यांनी बनवल्या. पाश्चात्त्यांनी त्याच पद्धती सतराव्या शतकात पुनः जगापुढे मांडल्या. नेहमीच्या वापरात येणारी पुढील समीकरणे भास्कराचार्यांनीच मांडली आहेत.

$\sin (a+b) = \sin a \cos b + \cos \sin b$

$\sin (a-b) = \sin a \cos b - \cos \sin b$

**समीकरणाच्या नावाचा घोळ**

$ax^2 + 1 = y^2$ याला जे 'पेलचे समीकरण' म्हणतात, त्याऐवजी भास्कराचार्यांचे समीकरण म्हणायला हवे, असे प्राध्यापक श्री. एल. व्ही. गुर्जर यांचे म्हणणे आहे. या समीकरणामध्ये a ही संख्या कुठलाही पूर्ण वर्ग नसावी लागते. a च्या ८, ११, ३२, ६१ आणि ६७ या मूल्यांसाठी भास्कराचार्यांनी त्या समीकरणाची सोडवणूक केल्याचे आढळते. हे समीकरण वरवर दिसते तितके सोपे नाही. कारण a च्या ६७ मूल्यासाठी x = ५९६७ आणि y =४८८४२ होते. तर a च्या ६१ मूल्यासाठी x = २२६१५३९८० आणि y =१७७६३१९०४९ एवढे होते!

जॉन पेल (इ.स.१६११ ते १६८५) या इंग्लिश गणितीला या समीकरणाचे श्रेय चुकून दिले गेले आहे. लिनोनोर्ड युलर याने त्याच्या विशीतच गणिताचे संशोधन केले. त्या वेळेस विल्यम ब्राउंकर याने या समीकरणावर काम केले, असे समजून युलरने चुकून ब्राउंकरऐवजी पेलचे नाव त्या समीकरणाला दिले आणि ते नाव आजतागायत तसेच चिकटले. खरंतर ब्राउंकरच्या आधी जॉन वॉलीस या ब्रिटिश गणितीने ते समीकरण ब्राउंकर याला काही वैयक्तिक स्वार्थासाठी दिले. पिअर द फर्मा याने १६५७ साली ब्रिटिश गणितींना हे समीकरण देऊन त्यांच्यापुढे आव्हान उभे केले. १७ व्या शतकामध्ये युरोपमध्ये ह्या समीकरणाची सोडवणूक पुरावा दिल्याशिवाय केली गेली आणि त्याचे श्रेय लॉर्ड ब्राउंकर यांना दिले. परंतु त्याच्यानंतर १०० वर्षांनी (इ.स.१७६६ मध्ये) थोर गणिती जोसेफ लुई लाग्रांजे यांनी त्याचे उत्तर पहिल्यांदा दिले. 'कॅटल प्रॉब्लेम' या नावाने आर्किमिडिजने मांडलेले गणित हे या समीकरणाप्रमाणे आहे. परंतु आर्किमिडिजने त्याच्या 'कॅटल प्रॉब्लेम' या नावाच्या गणिताशी या समीकरणाचा संबंध जोडल्याचा पुरावा कुठेही उपलब्ध नाही.

याचा पहिला शास्त्रीय उल्लेख ब्रह्मगुप्त (इ.स.५९८ ते ६६६) या भारतीय वैज्ञानिकाने केला आहे. हा राजस्थानचा रहिवासी होता. त्याने ब्राह्मस्फूटसिद्धान्त या ग्रंथात त्याचे विवरण केले आहे. भास्कराचार्यांनी ब्रह्मगुप्तांनाच आपला गुरू मानले होते व त्याला गणचक्रचूडामणी ही पदवीही दिली. ब्रह्मगुप्तांचे समीकरण सोडवण्याची अत्यंत शास्त्रशुद्ध पद्धत भास्कराचार्य यांनी शोधून काढली. भास्कराचार्यांच्या या विषयातील प्रावीण्याबद्दल पाश्चात्त्य पंडितांनी आश्चर्य व्यक्त केले आहे. पाश्चात्त्य विद्वानांनी याचे श्रेय त्यांना दिले नाही कारण त्यांच्या मते १२व्या शतकात इतकी क्लिष्ट गणिते सोडविणारा गणिती होऊच शकत नव्हता.

जीवनाच्या अंती कर्जबाजारी होऊन तुरुंगात जाणाऱ्या पेलच्या नावावर आजही ते समीकरण आहे. प्रगत पाश्चात्त्य जगतामधल्या विज्ञानामधील या घोडचुका कधी दुरुस्त होणार? या समीकरणाला भास्कराचार्यांचेच नाव दिले पाहिजे. १७व्या शतकातील युरोपमधील वैज्ञानिक विशेषतः भौतिकशास्त्राचे आणि रसायनशास्त्राचे संशोधक हे चर्चच्या भयामुळे मुक्त संशोधन करू शकत नव्हते. आणि ते प्रकाशित केल्यास त्यांना तुरुंगातही टाकले जात

होते. चार शतकांपूर्वी त्या संशोधकांच्या अभ्यासाइतकाच उत्तम आणि गाढा अभ्यास भास्कराचार्यांनी केला व त्यांचे सर्व संशोधन सामान्य माणसाला सहज समजेल इतक्या सोप्या भाषेमध्ये लिहून ठेवले आहे. भारतीय वैज्ञानिकांच्या परंपरेमध्ये भास्कराचार्यांचे स्थान सुवर्णाक्षरांनी लिहून ठेवले पाहिजे.

### छत्रपती शिवरायांची वैज्ञानिक दृष्टी

महाराष्ट्रामध्ये जलसंधारण शास्त्राची अनेक उदाहरणे मिळतात. तळी, धरणे, बावड्या, पाट इत्यादींचा उपयोग लेण्यांमध्ये आणि किल्ल्यांवर पाहायला मिळतो. दुर्गबांधणीचे शास्त्र इस्लामी हल्लेखोर येण्यापूर्वीच विकसित झाले होते, असे दिसते. यामध्ये छत्रपती शिवरायांनी घातलेली भर ही फार मोलाची आहे. शिवाजी महाराजांनी १२ किल्ले बांधले आणि काही किल्ल्यांचे नूतनीकरण केले. या सर्व किल्ल्यांमध्ये महाराजांची स्थापत्यविषयक जाण दिसून येते. त्यांनी संरक्षणासाठी केलेले बांधकामातील निरनिराळे प्रयोग हे थक्क करणारे आहेत. दुर्गबांधणीच्या शास्त्रात महाराजांनी वैज्ञानिक प्रयोग केल्याचे दिसतात. तसेच शिवाजी महाराजांनी नौकानयन शास्त्राचा अभ्यास करून त्यांच्या आरमारासाठी वेगळ्या बनावटीच्या नौका स्वतः तयार करून घेतल्या. या नौका त्या वेळच्या प्रस्थापित जहाजांप्रमाणे खोल बांधणीच्या नव्हत्या तर सपाट तळ असलेल्या थोड्या उथळ नौका होत्या. त्यामुळेत्यांना पाण्यावरून अतिशय गतीने हालचाली करता येत असत. या विशिष्ट बांधणीच्या नौकांमुळे महाराजांच्या आरमाराने इंग्रज, डच, फ्रेंच आदींचे बलाढ्य आरमार पराजित केले आणि मोठी जहाजे बुडवली किंवा काबीज केली. पुरंदर किल्ल्यावर तोफा ओतण्याचा कारखाना त्यांनी सुरू केला होता. खांद्यावरून मारा करायच्या तोफा (मॉटर्स) इंग्रजांनी महाराजांना कधीही दिल्या नाहीत. त्या तयार करण्याची ही खटपट होती. शिवरायांना अधिक अवधी मिळाला असता, तर ते एक उत्तम शास्त्रज्ञ म्हणून प्रसिद्धीस आले असते. शिवाजी महाराजांचे विज्ञाननिष्ठ धोरण पुढे पेशवाईतही तसेच चालू होते. नानासाहेब पेशव्यांनंतर पुण्याची झालेली नगररचना, कात्रज तलावातून पुण्यातील हौदांमध्ये जलवाहिन्यांमार्फत आणलेले पाणी आणि मोठ्या वास्तू आणि पूल ह्यांची केलेली बांधणी हे त्याचे पुरावे आहेत. कात्रजच्या जलवाहिन्यांतले पाणी आजही मुठा नदीपर्यंत त्याच वाहिन्यांद्वारे वाहत आहे.

महाराष्ट्राची विज्ञान परंपरा आणि त्यातील निरनिराळ्या वैज्ञानिकांचे योगदान हे अमूल्य आहे. वैज्ञानिकांची नावे जरी सापडली नाहीत, तरी त्यांनी केलेल्या प्रयोगांचे आणि त्यांच्या शोधांचे अनेक पुरावे उपलब्ध आहेत. प्राचीन काळापासून विज्ञाननिष्ठता हे महाराष्ट्राचे व्यवच्छेदक लक्षण राहिले आहे. आजही जगभरात महाराष्ट्रातील वैज्ञानिक हे संगणक शास्त्र, अवकाश शास्त्र, वैद्यकीय शास्त्र आणि इतर सर्व शास्त्रांत अग्रेसर आहेत.

### संदर्भ :


१. भारतीय संस्कृतिकोश, संपादक - पं. महादेवशास्त्री जोशी.
२. प्राचीन महाराष्ट्र - श्री. व्यं. केतकर.
३. दक्षिण काशी, पैठण - डॉ. रा. श्री. मोरवंचीकर.
४. वेरूळ दर्शन - डॉ. गो. बं. देगलूरकर, स्नेहल प्रकाशन पुणे- (२००८).
५. गणित शिरोमणी भास्कराचार्य - प्रा. मोहन आपटे, मोरया प्रकाशन.
६. अ मॉडर्न इन्ट्रोडक्शन टू एन्शंट इंडियन मॅथॅमॅटिशियन्स - टी. एस. भानुमूर्ती.
७. रिक्रिएशन्स इन द थिअरी ऑफ नंबर्स - टी. एस. बायलर
८. सहदेव-भाडळी मत - ज्योतिष प्रकाश, शंकर गणपत चिंचणकर, चक्रवर्तिनी प्रेस (१८९४).
९, संगीत रत्नाकर- भाग १ आणि २, भाषांतरकार डॉ. ग. ह. तारळेकर, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई (१९७९).
१०. सार्थ श्रीज्ञानेश्वरी - श्री नानामहाराज साखरे, सारथी प्रकाशन, पुणे (१९८६).
११. पुराभिलेखविद्या - डॉ. शोभना गोखले, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे (१९७५).


* * *

# लेखक परिचय

**डॉ. श. न. राजगुरू**

डेक्कन कॉलेज पुणे येथून भू-पुरातत्त्वाचे प्राध्यापक म्हणून निवृत्त. तीन पुस्तके व ४०० शोधनिबंध प्रसिद्ध. संशोधनाबद्दल एशियाटिक सोसायटीतर्फे सुवर्णपदक प्राप्त.

**डॉ. गो. बं. देगलूरकर**

डी.लीट.

अध्यक्ष डेक्कन कॉलेज पुणे. प्राचीन भारतीय कला व स्थापत्य या विषयातील राष्ट्रीय पातळीवरील सर्वमान्य अभ्यासक. महाराष्ट्राच्या मंदिर स्थापत्यावरील डी.लिट. अनेक पुस्तके प्रकाशित.

**डॉ. रामचंद्र श्रीनिवास मोरवंचीकर**

एम. ए. (इतिहास) पीएच. डी.

प्राचीन भारतीय सांस्कृतिक विभाग, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद येथून प्राध्यापक म्हणून निवृत्त. पर्यटन व प्रशासन विभाग, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद ह्या संस्थेच्या संचालकपदाचा कार्यभार त्यांनी सांभाळला. भारतीय जलसंस्कृती मंडळाचे ते उपाध्यक्ष होते. 'कला व सांस्कृतिक वारसा' आंतरराष्ट्रीय समितीचे निमंत्रक म्हणून काम बघितले. प्राचीन भारतीय संस्कृती, पुरातत्त्व, वारसा, जलव्यवस्थापन, इतिहास संशोधन, कला व इतिहास इत्यादी विषयांवरील ३० पुस्तकांचे लेखन. राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय पातळीवर २०० शोधनिबंधाचे सादरीकरण.

**डॉ. सुभाष वाळिंबे**

नामवंत मानवशास्त्रज्ञ. पुरातत्त्व विभाग, डेक्कन कॉलेज पदव्युत्तर संशोधन संस्थेमध्ये कार्यरत. मानवशास्त्रीय अभ्यासक व संशोधक.

**डॉ. प्रमोद वि. पाठक**

एम. टेक., पीएच.डी.

वैदिक वाङ्मयावर डॉक्टरेट. वेद, सिंधू संस्कृती, रामायण इत्यादी विषयांवरील पुस्तके व संशोधनपर लेख प्रसिद्ध.

**डॉ. शशिशेखर गोपाळ देवगांवकर**

एम. फिल. पीएच. डी.

सेवानिवृत्त प्रपाठक व विभाग प्रमुख, राज्यशास्त्र विभाग, आनंद निकेतन कॉलेज, आनंदवन वरोरा (जि. चंद्रपूर). आदिवासींचे जीवन आणि विकास यावर इंग्रजीतून अठरा पुस्तके प्रकाशित तसेच मराठीतून पाच पुस्तके प्रकाशित.

**डॉ. भा. रा. अंधारे**

विदर्भातील नामवंत इतिहासतज्ज्ञ व अभ्यासक. भोसले राजवट आणि चंद्रपूरच्या गोंड घराण्याची राजवट याचा विशेष अभ्यास.

**डॉ. अरुणचंद्र पाठक**

एम.ए., पीएच.डी.

'गोदावरी एक सांस्कृतिक अभ्यास- महानुभाव पोथीच्या विशेष संदर्भात' ह्या विषयात डॉक्टरेट. दर्शनिका विभाग, महाराष्ट्र शासन कार्यकारी संपादक व सचिव म्हणून कार्यरत. तत्पूर्वी राज्य पुरातत्त्व विभागात सेवा. तीस संशोधनपर लेख तसेच महाराष्ट्रातील बारव स्थापत्य हा संशोधनपर ग्रंथ प्रकाशित. सातारा, लातूर, नागपूर व जिल्हा गॅझेटिअरचे संपादन.

**डॉ. विनायक शंकर फडके**

एम. एस्सी., पीएच. डी.

कीर्ती महाविद्यालय तसेच मुंबई विद्यापीठ येथे प्राध्यापक व विभाग प्रमुख म्हणून कार्यरत. शालेय

पाठ्यपुस्तकांसाठी मूल्यपरीक्षक ह्या प्रकल्पासाठी मराठी विश्वकोश (वाई) लेखन, 'भूगोल शिक्षक' या मासिकाचे संपादन.

### मल्हार कृष्ण गोखले

भारतीय इतिहास संकलन समितीचे कार्यकर्ता, बँक ऑफ इंडियामध्ये कार्यरत. लोकसत्ता, सकाळ, सामना, तरुण भारत, पाञ्चजन्य, साप्ताहिक विवेक आदी वृत्तपत्रांमध्ये आणि नियतकालिकांमध्ये नियमित लेखन.

### डॉ. गिरीश दत्तात्रय मांडके

एम. ए. (इतिहास)

मराठ्यांच्या इतिहासाचे अभ्यासक. मराठा इतिहास संग्रहालय डेक्कन कॉलेज, पुणे येथे क्यूरेटर या पदावर कार्यरत.

### डॉ. वृंदा पाठारे

इतिहास विषयातून एम. ए. ची पदवी मुंबई विद्यापीठातून प्राप्त. एशियाटिक सोसायटी, मुंबईची फेलोशिप. सध्या गोदरेज अर्काइव्हज् ऑफ गोदरेज अँड बॉईझ मॅन्यूफॅक्चरिंग कंपनी लिमिटेड, मुंबई इथे कार्यरत.

### डॉ. विद्या गाडगीळ

एम. ए. पीएच. डी.

पी. डी. कारखानीस कला आणि वाणिज्य महाविद्यालयात इतिहास विभाग प्रमुख म्हणून कार्यरत. दहा शोध-निबंध प्रकाशित. महाराष्ट्र राज्य शासनाचा उत्कृष्ट ग्रंथ निर्मितीचा पुरस्कार प्राप्त. तंजावरचे मराठी राज्य व संस्कृती ह्या विषयावरील ग्रंथ प्रकाशित.

### लक्ष्मण कृष्ण पित्रे

संस्कृत विषयाचे अध्यापन. बत्तीस वर्षे शासकीय सेवा. गोवा राज्य संग्रहालय, पणजी येथून संग्रहालय संचालक ह्या पदावरून सेवानिवृत्त.

### अरविंद प्र.जामखेडकर

एम.ए., पीएच.डी.

कल्चरल हिस्ट्री फ्रॉम द वासुदेवहिंडी या विषयात डॉक्टरेट. जैन व बुद्ध साहित्यावर विशेष अभ्यास. निवृत्त संचालक, पुरातत्त्व व वस्तुसंग्रहालय विभाग महाराष्ट्र शासन १९७७ ते १९९७. 'कुवलयमाला- अ कल्चरल स्टडी' पुस्तक प्रकाशित. नैकुंड एक्सकॅव्हिएशन, वासुदेवहिंडी- अ कल्चरल स्टडी इत्यादी लेखन प्रकाशित. महाराष्ट्र स्थापत्य व कला, राज्य गॅझेटिअरमध्ये लेखन.

जैन साहित्य, शिल्पकला, स्थापत्य यांचे जाणकार. सोमय्या बुद्धिस्ट स्टडी सेन्टरचे संचालक. काही काळ नागपूर व पुणे विद्यापीठात अध्यापक. विविध उत्खननांत सहभाग.

### डॉ. सौ. शोभना गोखले

सेवानिवृत्त. डेक्कन कॉलेज, पुणे. पुराभिलेखविद्या, नाणकशास्त्र, बौद्धधर्म, प्राचीन भारताचा सांस्कृतिक इतिहास हे त्यांचे अभ्यासाचे विषय. प्राचीन नाण्यांच्या आणि शिलालेखांच्या अभ्यासासाठी ब्रिटीश कौन्सिलची शिष्यवृत्ती प्राप्त. रॉयल न्युमिस्मॉटिक सोसायटी लंडनच्या सभासद. अखिल भारतीय नाणकशास्त्र परिषदेचे तसेच जागतिक नाणकशास्त्र परिषदेचे ब्रुसेल्स (बेल्जियम) अध्यक्षपद भूषविले. सव्वाशेहून अधिक शोधनिबंध सादर. या विषयांवर सहा पुस्तके प्रकाशित.

### डॉ. अनुराधा (अलका) रानडे

एम.ए., पीएच.डी., एम.फिल.

सोशल इकॉनॉमिक कंडिशन्स ऑफ महाराष्ट्र (११०० ते १६००) या विषयात डॉक्टरेट. के.व्ही.पेंढरकर महाविद्यालय, डोंबिवली येथे इतिहास विषयाच्या प्राध्यापक म्हणून कार्यरत. पंचवीसच्या वर शोधनिबंध प्रकाशित झाले. मुंबई विद्यापीठाच्या पदवी वर्गासाठी अनेक पुस्तकांचे लेखन. महाराष्ट्र राज्य गॅझेटिअरसाठी लेखन. 'सोशो इकॉनॉमिक लाइफ ऑफ महाराष्ट्र' हे पुस्तक प्रकाशित. पॉवर लिफ्टिंगमध्ये छत्रपती पुरस्कार प्राप्त.

### डॉ. सुनील पुरी

इतिहासाचे नामवंत अभ्यासक. बहमनी आणि त्याच्या पातशाह्या यांचा विशेष अभ्यास. विविध वृत्तपत्रांतून लेखन.

**प्रा. ओमप्रकाश समदानी**

पीएच.डी.

'त्र्यंबक शंकर शेजवलकरांच्या संदर्भात विशेष अभ्यास' या विषयात डॉक्टरेट. मराठ्यांचा इतिहास आणि इतिहासकार हा त्यांचा अभ्यासाचा विषय. मराठवाडा इतिहास संशोधन पत्रिकेतून शोधनिबंध प्रकाशित.

विविध वृत्तपत्रे व नियतकालिके यातून लिखाण प्रसिद्ध. 'चीन आणि जपानचा इतिहास' हे पाठ्यपुस्तक प्रकाशित. राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय परिषदांमधून शोध निबंधांचे सादरीकरण.

**डॉ. श्रीनिवास सातभाई**

पीएच.डी.

'नागपूरकर भोसल्यांच्या राजकारणात ब्रिटिश रेसिडेन्टाची भूमिका' या विषयात डॉक्टरेट. शासकीय ज्ञानविज्ञान महाविद्यालय, औरंगाबाद येथे इतिहास विभागात वरिष्ठ अधिव्याख्याता म्हणून कार्यरत. 'सार्क स्थापनेची वाटचाल' व 'आधुनिक भारताचा इतिहास' हे ग्रंथ प्रकाशित.

**डॉ. कल्याणी नामजोशी**

संतसाहित्याच्या जाणकार व नामवंत अभ्यासक. संतसाहित्यावर विपुल लेखन. आध्यात्मिक परंपरांच्या अभ्यासक आणि नामवंत प्रवचनकार.

**दीपक हनुमंतराव जेवणे**

बी. कॉम.

साप्ताहिक विवेकमध्ये उपसंपादक. विवेकच्या ग्रंथ आणि पुस्तक प्रकल्पात संपादनाचे कार्य. विविध विषयांवर सहा पुस्तके प्रकाशित. नाटककार व प्रवचनकार.

**प्राचार्य डॉ. गजकुमार शहा**

पीएच.डी.

सेवानिवृत्त प्राचार्य, सुमारे ३३ वर्षे इतिहास विषयाचे प्राध्यापक म्हणून कार्यरत, खानदेशाच्या इतिहासाचे प्रमुख संशोधक म्हणून मान्यता. या विषयावर विपुल विवेचक लेखन.

**डॉ. अरविंद सदाशिव गोडबोले**

एम. डी.(मुंबई), एफ. आर. सी. पी.(एडिंबरो), एफ. आर. एफ. पी. एस.(ग्लासगो), एफ. ए. आय. आय. डी. (मुंबई). एम. डी.

एम. डी. परीक्षेत दोन सुवर्णपदके. कन्सल्टन्ट फिजिशिअन आणि मधुमेह तज्ज्ञ. माजी ऑनररी प्रोफेसर ऑफ मेडिसिन. अनेक रुग्णालयांत वैद्यकीय तज्ज्ञ. ग्रंथ – गुरू नानक ते गुरू गोविंदसिंग, फिलॉसॉफी ऑफ श्रीगुरू ग्रंथसाहिबजी, सावरकर विचारदर्शन, ख्रिश्चॅनिटी, मधुमेह इ.

**प्रा. दाऊद दळवी**

पार्ले कॉलेज, बुरहानी कॉलेज, ज्ञानसाधना कॉलेज, मुंबई विद्यापीठ, एस.एन.डी.टी. विद्यापीठ येथे सर्वोच्च पदे भूषविली. इंग्रजीत व मराठीत ग्रंथसंपदा प्रकाशित. 'लेणी महाराष्ट्राची' या पुस्तकाला डॉ. झाकीर हुसेन स्मृती व राष्ट्रीय शैक्षणिक पुरस्कार. प्राच्यविद्या, इतिहास, संशोधन, राष्ट्रीय एकात्मता, शिक्षक संघटना, सोशिओ-पोलिटिकल इनोव्हेटिव्ह थॉट्स अ‍ॅन्ड रिसर्च (चेन्नई) अशा विविध माध्यमांतून कार्य सुरू आहे.

**फादर फ्रान्सिस दिब्रिटो**

एम.ए.

महाराष्ट्र साहित्य परिषदेची साहित्याचार्य पदवी प्राप्त. रोमच्या ग्रेगोरिअन विद्यापीठामधून धर्मशास्त्रातून एम.ए. १९७२ साली धर्मगुरूपदाची दीक्षा. वसईला सेन्ट थॉमस चर्चमध्ये कार्यरत. 'ओॲसिसच्या शोधात' (प्रवासवर्णन), 'परिवर्तनासाठी धर्म' (वैचारिक), 'संघर्षयात्रा', 'ख्रिस्तभूमीची पोप', 'दुसरे जॉन पॉल', 'सृजनाचा मोहोर', इत्यादी ग्रंथ प्रकाशित. साहित्यासाठी द मालो पुरस्कार, नाशिक सार्वजनिक वाचनालय पुरस्कार, मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालय, कोकण मराठी साहित्य परिषद ह्यांचे पुरस्कार. कुसुमाग्रज प्रतिष्ठामध्ये विश्वस्त म्हणून कार्यरत.

**प्रा. यास्मिन शेख**

एम.ए.बी.टी. पूर्वाश्रमीच्या जेरुशा जॉन रुबेन. मराठी व्याकरण व भाषाविज्ञान हे विशेष अभ्यासाचे

विषय. शाळा तसेच महाविद्यालयातून ३४ वर्षे अध्यापन. एस.आय.ई.एस. महाविद्यालय, शीव येथून विभाग प्रमुख म्हणून निवृत्त. आय.ए.एस.च्या विद्यार्थ्यांना मार्गदर्शन. बालभारती पाठ्यपुस्तकाचे संपादन. 'अंतर्नाद' या मासिकाच्या व्याकरण सल्लागार म्हणून कार्यरत. 'मराठी लेखन मार्गदर्शिका', 'मराठी शब्दलेखन कोश' इत्यादी पुस्तके प्रकाशित.

विविध वृत्तपत्रांतून नियतकालिकांमधून लेखन प्रसिद्ध. नाशिक सार्वजनिक वाचनालय ४१ व्या साहित्यिक मेळाव्याचे अध्यक्षपद भूषविले.

**वि. ग. जोशी**

एम.ए. (हिंदी)

पश्चिम रेल्वेतून राजभाषा अधिकारी म्हणून १९९२ साली निवृत्त. महाराष्ट्र राष्ट्रभाषा सभा पुणे यांच्या हिंदी परीक्षार्थींसाठी मार्गदर्शन. मराठी आणि हिंदी या भाषांचे उत्तम अनुवादक.

**डॉ. मंगला आठल्ये**

धर्म, पंथ व संप्रदाय यांच्या चिकित्सक अभ्यासक.

**डॉ. मधुकर रामदास जोशी**

एम.ए., पीएच.डी.

नागपूर विद्यापीठातून निवृत्त. विदर्भ संशोधन मंडळ व विश्वसंत साहित्य प्रतिष्ठान, नागपूर येथे सचिव. ज्ञानेश्वर चरित्र संशोधन, ज्ञानेश्वरी आणि वाङ्मयीन परंपरा, ज्ञानेश्वरी संशोधन, नाथसंप्रदाय, प्रमाणित मराठी वाङ्मयशोध, दत्तात्रेयांचे दोन अवतार इत्यादी संशोधनपर ग्रंथ प्रकाशित. समग्र समर्थ साहित्याचे संकलन, संपादन.

**डॉ. श्यामा घोणसे**

पीएच. डी.

'वीरशैव : मराठी हिंदी एक अभ्यास' या विषयात पुणे विद्यापीठातून डॉक्टरेट. 'मराठी संत कादंबरी-रसास्वादाची दिशा' या प्रकल्पावर डी. लिट.साठी काम सुरू. 'भारतीय स्त्रीवाद' अखिल भारतीय स्तरावर स्त्रियांच्या वाङ्मयाचा अभ्यास. समरसता साहित्य परिषद महाराष्ट्र, उपाध्यक्षा.

**डॉ. प्रा. अविनाश वामन आवळगावकर**

एम.फिल., पीएच. डी.

एकूण आठ पुस्तके प्रकाशित. पुणे विद्यापीठाचे मराठी विभागाचे माजी प्रमुख तसेच पुणे विद्यापीठ माजी अधिसभा सदस्य. अनेक चर्चासत्रांतून शोधनिबंधांचे वाचन.

**विद्याधर ताठे**

एम. ए. (पत्रकारिता)

एकता मासिकाचे संपादक. साईलीला मासिकाचे माजी कार्यकारी संपादक. महर्षी व्यास पत्रकारिता पुरस्कार प्राप्त. पुणे प्रेस क्लबचे सचिव.

**सुनील चिंचोलकर**

रामदासी संप्रदायाचे गाढे अभ्यासक आणि चिंतक व विचारवंत. समर्थ रामदास चरित्र, वाङ्मय आणि कार्य यांवर संशोधन आणि लेखन. विविध पुस्तके प्रकाशित आणि विविध पुरस्कारांनी सन्मानित. प्रभावी वक्ता.

**प्रा. मधु जामकर**

एम.ए.

परळी वैजनाथ कॉलेज येथून मराठी विभाग प्रमुख म्हणून निवृत्त. तीन कविता संग्रह व तीन ललित लेखसंग्रह. सहा वृत्तपत्रांतून लेखन. महाराष्ट्र शासनाचा उत्कृष्ट वाङ्मयनिर्मितीचा पुरस्कार.

**डॉ. संगीता सुरेंद्र देशमुख**

बी.ए. एम.ए., बी.एड., एम. एड., पीएच.डी.

'अज्ञानसिद्ध-व्यक्ती आणि वाङ्मय' या विषयात डॉक्टरेट. डॉ. बाबासाहेब आंबेडकर कला व वाणिज्य महाविद्यालयात अध्यापन. कविता व समीक्षा या प्रकारांतर्गत पाच पुस्तके प्रकाशित. प्रौढसाक्षरांसाठी लेखन.

**डॉ. ॐ श्रीश दत्तोपासक**

शंकराचार्य विरचित विवेकचूडामणी आणि यादवकालीन मराठी संतवाङ्मय हा प्रबंध. पुणे येथील संत नामदेव अध्यासनात संशोधन सहायक म्हणून कार्यरत. विविध नियतकालिकांतून सुमारे पंचवीस लेख प्रसिद्ध.

**डॉ. अरुणा ढेरे**

एम.ए.

'स्वातंत्र्योत्तर मराठी कथा व कादंबऱ्या यांचा आदिबंधात्मक अभ्यास, या विषयावर डॉक्टरेट. कवयित्री, कथालेखिका, संशोधक, समीक्षक म्हणून परिचित. 'लोकसंस्कृतीची रंगरूपे' आणि 'विस्मृतिचित्रे' हे ग्रंथ प्रसिद्ध.

**मोहसिना मुकादम**

एम.ए., एम.फिल., पीएच.डी.

'भारतीय खाद्यसंस्कृती, ऐतिहासिक दृष्टिकोन' या विषयात डॉक्टरेट. रामनारायण रुइया महाविद्यालयात इतिहास विभाग प्रमुख म्हणून कार्यरत. राज्यस्तरीय व राष्ट्रीय पातळीवर पाच शोधनिबंध प्रसिद्ध. विविध वृत्तपत्रे व नियतकालिके ह्यांतून लेखन. मालिकांसाठी लेखन व संशोधन सल्लागार.

**नंदकुमार गणपतराव मेगदे**

एम. ए. (इतिहास), एम.पी.एड.

शारीरिक शिक्षण संचालक, श्री गुरु गोविंद सिंघजी अभियांत्रिकी व तंत्रशास्त्र महाविद्यालय, विष्णुपुरी, नांदेड. 'शारिरिक शिक्षणातील पर्यवेक्षण १९९९–२०००' हे पुस्तक प्रकाशित. प्राचीन भारतीय खेळांचा इतिहास आणि प्राचीन नांदेडचा इतिहास यांबद्दल २५ लेख प्रकाशित. राज्यस्तरीय व जिल्हास्तरीय विविध क्रीडा संघटनांशी संबंध. लातूर जिल्हा गॅझेटिअरमध्ये सहयोगी लेखक म्हणून क्रीडाविषयक लिखाण.

**ॲड. डॉ. दत्तात्रेय व्यंकटेश देशपांडे**

एम.ए., एल.एल.बी., पीएच.डी.

३८ वर्षे वकिली व्यवसाय (सिनियर ॲडव्होकेट). सज्जनगड रामदास स्वामी संस्थानचे माजी विश्वस्त. क्रांतिस्मृती व्यायाम मंडळ सातारा, माजी पदाधिकारी. कोयना शिक्षण संस्था, पाटणचे आठ वर्षे कार्यवाह. 'श्री परब्रम्ह गोपालनाथ: व्यक्ती आणि वाङ्मय' हा प्रबंध प्रसिद्ध. महाराष्ट्र राज्य शासनाचा (१९९७) तत्त्वज्ञान क्षेत्रातील प्रथम पुरस्कार. गोपालनाथांच्या 'वेदान्त शिरोमणी' या ९००० ओव्यांच्या ग्रंथाचे महाभाष्य १५०० छापील पृष्ठांत प्रसिद्ध. समर्थांच्या 'आत्माराम' या ग्रंथाची संशोधित आवृत्ती प्रसिद्ध. ना. ह. आपटे पारितोषिक प्राप्त. कायदेविषयक अनेक पुस्तके प्रकाशित.

**प्रा. डॉ. लीला गोविलकर**

पेमराज सारडा महाविद्यालय, अहमदनगर येथून मराठी विभाग प्रमुख म्हणून निवृत्त. भाषाविज्ञान, समीक्षा, साहित्यशास्त्र इत्यादी विषयांवरील वीस ग्रंथ प्रकाशित.

विविध महाविद्यालयांतून संतसाहित्य, समीक्षा, व्याकरण या विषयांवर व्याख्याने. विविध नियतकालिकांतून संशोधनपर लेखन. विविध सामाजिक व साहित्यिक संस्थाच्या पुरस्कारांच्या मानकरी.

**डॉ. अलका दीपक मटकर**

एम. ए., पीएच. डी.

मुंबई मराठी विद्यापीठ विभाग. प्रकाशित ग्रंथ– भाषाविज्ञान–ऐतिहासिक व वर्णनात्मक (एम. ए.) दूरशिक्षण विभाग, मुंबई विद्यापीठ. एम. फील. मुंबई विद्यापीठ. वर्णनात्मक सूची (खंड–१)

याखेरीज विविध नियतकालिके, वृत्तपत्रे, चर्चासत्रे यांतून वेळोवेळी वाङ्मयीन लेखन प्रसिद्ध.

**डॉ. यशवंत पाठक**

एम.ए., पीएच.डी.

कीर्तन परंपरा व मराठी वाङ्मय या विषयावरील डॉक्टरेट. नाचू कीर्तनाचे रंगी, अंगणातले आभाळ, ब्रह्मगिरीची सावली, मातीचं देणं, नक्षत्रांची नाती, स्पंदने श्रीसमर्थांची, नीरंजनाचे माहेर असे अनेक ग्रंथ प्रकाशित. राज्यस्तरीय व अन्य पुरस्कार व पारितोषिकांचे मानकरी. मराठी विश्वकोश, भाषा, इतिहास संशोधन खंड २ मध्ये विपुल लेखन. संत ज्ञानेश्वर अध्यासन, पुणे विद्यापीठ, प्रपाठक.

**डॉ. सतीश बडवे**

नाट्यशास्त्र आणि लोककला यांचे नामवंत अभ्यासक. या विषयावर प्रसंगोपात ह्यांचे लेखन प्रकाशित.

**डॉ. सूरज पंडित**

एम.ए., पीएच.डी.

पुरातत्त्वज्ञ व कलेतिहास तज्ज्ञ. एम.ए.के.सी. कॉलेज तसेच साठ्ये कॉलेज व शैलेंद्र कॉलेज येथे व्याख्याता म्हणून कार्यरत. कान्हेरी गुंफा या विषयात डॉक्टरेट. वेगवेगळ्या विषयांवरील कार्यशाळांचे आयोजन. अकरा शोधनिबंध प्रसिद्ध. राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय पातळीवर अठरा निबंधांचे सादरीकरण.

**प्र. के. घाणेकर**

शिवकालीन दुर्ग आणि किल्ले यांचे नामवंत अभ्यासक. विविध दुर्ग आणि किल्ले यांवर विपुल लेखन. विविध पुस्तके प्रकाशित.

**डॉ. रमेशचंद्र पाटकर**

निवृत्त, मराठी विभाग प्रमुख, विल्सन महाविद्यालय मुंबई. साहित्य व दृश्य-कलाविषयक लेखन प्रकाशित. 'कलेचा इतिहास: भारतीय व पाश्चात्त्य', 'शहीद भगतसिंग: आठवणी, विवेचन, विचार' ही काही प्रकाशित पुस्तके.

**माधव प्रभाकर इमारते**

जी.डी.आर्ट (फाइन आर्ट्स), एम.एफ.ए. (कंठसंगीत)

व्यावसायिक चित्रकार. संगीत व चित्रकला या विषयांवर अनेक वृत्तपत्रांतून व नियतकालिकांतून लेखन. अनेक चित्रप्रदर्शने आयोजित.

**डॉ. प्रभाकर मांडे**

डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठातून मराठीचे प्राध्यापक या पदावरून निवृत्त. उंडणगाव, जि. औरंगाबाद येथे झालेल्या २९ व्या मराठवाडा साहित्य संमेलनाचे अध्यक्ष. साहित्य व शिक्षण या क्षेत्रांतील अनेक संस्थांचे अध्यक्ष व सदस्य लोकसाहित्याचे संशोधक, लोकसाहित्यावरची अनेक पुस्तके प्रसिद्ध. भारतीय तसेच आंतरराष्ट्रीय परिषदांमध्ये सहभाग.

**सुपर्णा कुलकर्णी**

बी.एस्सी.बी.एड., एम.ए.(मुंबई)

विविध वृत्तपत्रांतून ललितलेख. काव्यसंग्रह प्रकाशित.

**डॉ. नीळकंठ बापट**

पुणे व केसवेस्टर्न युनिवर्सिटी क्लिवलॅन्ड (अमेरिका) येथून शिक्षण. डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ येथे वाणिज्य व जलव्यवस्थापनशास्त्र विभागाचे विभागप्रमुख म्हणून कार्यरत होते. थायलंड येथील विद्यापीठात प्राध्यापक म्हणून काम केले. थाई भाषेवरील अभ्यासपूर्ण पुस्तक प्रसिद्ध.

**डॉ. वा. ब. राहुडकर**

कृषी शास्त्रातील सर्वोच्च चार पदव्या. अनेक कृषी विद्यापीठांत अध्यापनाचा अनुभव. कृषी संचालनालयात कृषि- माहिती अधिकारी या पदावर कार्यरत. शेतकरी मासिकाचे तीन वर्ष संपादन. पंजाबराव व मराठवाडा कृषी विद्यापीठाचे उच्च पदस्थ अधिकारी म्हणून कार्यकाल भूषविला. विविध लेख आणि अनेक पुस्तकांचे लेखन. शेतकऱ्यांशी संपर्क ठेवण्याची आवड. अखंड वाचन व वाचनात आढळलेली नवी माहिती शेतकऱ्यांसाठी प्रसिद्ध करण्याची आवड.

**डॉ. दि. मा. मोरे**

बी.ई. (सिव्हिल), पीएच.डी.

ऐतिहासिक जलव्यवस्थापन या विषयात डॉक्टरेट. महाराष्ट्राच्या जलसंपदा विभागात विविध पदांवर कार्यरत होते. नाशिक विभागातून महासंचालक म्हणून निवृत्त. महाराष्ट्र जल व सिंचन आयोगाचे सचिवपद भूषविले. अनेक व्यावसायिक सेवाभावी संघटनांचे सदस्य. पर्यावरणातील वैशिष्ट्यपूर्ण कामगिरीबद्दल वनश्री पुरस्कार प्राप्त. जलव्यवस्थापन या विषयावर विपुल अभ्यासपूर्ण लेखन.

**उदयन अनंत इंदूलकर**

बी.एससी., एम.बी.ए., एम.ए. (इंडॉलॉजी)

वेगवेगळ्या वृत्तपत्रांतून, नियतकालिकांतून लेखन 'द्रष्टा कलासाधक' हरिभाऊ वाकणकर यांच्यावरील चरित्र-लेखन तसेच 'अद्‌भूत भारतीय शिल्प-वेरूळ' नावाचे पुस्तक प्रसिद्ध.

* * *



"मानवी संस्कृतीच्या प्रगतीचे प्रत्येक पाऊल हे कुणीतरी एखाद्या व्यक्तीने उचललेले असते. अशी व्यक्ती हीच प्रेरक व पथदर्शक राहते. मानवी संस्कृतीचा विकास हा अशा व्यक्तीच्या परिश्रमाची अंतिम परिणतीच आहे. कारण व्यक्तीमध्येच नवोन्मेषी प्रतिभा व ती साकार करण्याची ऊर्जा आणि प्रत्यक्षात आणण्यासाठी आवश्यक ती कार्यपद्धती विकसित करण्याची क्षमता असते." - योगी अरविंद




साप्ताहिक विवेक

१२, कामत औद्योगिक वसाहत, ३९६, स्वातंत्र्यवीर सावरकर मार्ग, प्रभादेवी, मुंबई - ४०० ०२५.
दूरध्वनी: (९१-२२) २४२२ १४४०/ ५६३९, फॅक्स : (९१-२२) २४३६ ३७५६
Email: charitrakosh@gmail.com Website: www.maharashtranayak.com